

# A DICTIONARY
*of the*
# MARATHA LANGUAGE

**COMPILED BY**


*Jugunnauth Shastree Kramuvunt*
*Bal Shastree Ghugwe*
*Gungadhur Shastree Phurke*
*Ramchundra Shastree Janvakur*
*Sukha Ram Joshee*
*Dajee Shastree Shookl*
*and*
*Purshoo Ram Punt Gorbole*
*Pundits*
*In the service of the*
*Bombay Native Education Society.*





**VOL: 2.**
**प — ळ**


***LITHOGRAPHED***
*At the Press of the Society.*
**BOMBAY**
**1829.**

# महाराष्ट्र भाषेचा कोश

## मुंबईचे शिक्षामंडळीचे आज्ञांकित पंडित

जगन्नाथशास्त्री क्रमवंत

बाळशास्त्री घगवे

गंगाधरशास्त्री फडके

रामचंद्र शास्त्री जन्हवेकर

सखाराम जोशी

आणि

परशुरामपंत गोडबोले

## याणीं शिक्षामंडळीचे आज्ञेवरून हा ग्रंथ केला

तो

शिक्षामंडळीचे छापखान्यांत

छापला

## द्वितीय भाग

## प — ज्ञ

P155,3:4K
F9.2

सन इसवी १८२९

शक शालीवाहन १७५१

**प.** ३लिं० सं० संस्कृत शब्दांच्यावरून समासीं याचा प्रयोग होतो, अर्थ रक्षिता किं० नाशिता; उ० भूमीतें रक्षितो तो भूमिप. म्ह० राजा. धनप. म्ह० कुबेर, इ०; उ० रक्तानें नाशितो, रक्तप, म्ह० ढेकूण, राक्षस, इ०;

**पइलवान,** पु० जेठी;

**पंक.** पु० सं० कर्दम, २ झाडू इ० करयाकरितां साखर किं० गूळ यांचा जो रांधा करितात तो.

**पंकज,** न० सं० कमळ.

**पकड.** स्त्री० मल्लयुद्धामध्यें दुसऱ्यास धरण्याचें किं० पाडण्याचें जे डावपेंच ते न० २ स्त्री० प्रसंगानुसार पाहिजे तसा अर्थ व्हावयाजोगें भाषणादिकामध्यें मर्म ठेविलें असतें किं० दुसऱ्याचा दमक आपल्यावरून चढतां आपला दमक त्याजवर चढावा अशी जी भाषणामध्यें वक्त्याची युक्ति असते ती; उ० मी रुपयारवाल्या नाहीं म्हणून हा शपथ वाहतो परंतु यांत पकड आहे, ३, भाषणांत दुसऱ्यानें आपल्यास मर्मी धरावें असा जो पूर्वापरविरोधादि भाषणदोष पडतो ती; उ० ज्याची पकड धरायाची असेल त्यास पाहून वेळ बोलवावें.

**पकडणें,** कोणेकास हस्तादिकानें धरणें; २, स्त्री० भाषणादि मर्मी धरणें.

**पकवा,** पु० को० मुरली फुगडी इ० क्रीडासमयीं मुखानें एक अव्यक्त शब्द करितात तो.

**पकार, पकारा,** पु० संकेतानें पावल्यास म्ह०

**पकारी,** स्त्री० संकेतानें ज्याठिकाणीस व पावलास म्ह०

**पक्का,** ३लिं० कच्चा नव्हे तो.

**पंक्ति.** स्त्री० सं० अनेक पदार्थांचा एक सूत्रपातामध्यें



जो सन्निवेश तो २, स्त्री० अनेकांनीं मिळून भोजन करण्याचे जे पर्याय ते म० उ० मला वेळ लागेल मी दुसऱ्या पंक्तीस जेवीन ३, श्लोकांत एक छंद आहे.

**पंक्तिदोष,** पु० सं० भोजनपंक्तीस कोणी पतितादिक समजून बसल्या मुळें इतर भोजन कर्त्यांस जो दोष लागतो तो,

**पंक्तिपठाण,** पु० पंक्तिबारगीर.

**पंक्तिपावन,** ३लिं० निर्दोषते मुळें पंक्तीस भोजन करण्यास जो योग्य तो.

**पंक्तिप्रपंच,** पु० पंक्तिभेद.

**पंक्तिबारगीर,** पु० राजा इ० यजमानाचे पंक्तीस भोजन करून त्याकरितां करणारे जे बारगीर ठेविले असतात ते २, स्त्री० यजमानाचे पंक्तीस जे उपरी जेवायास असतात तो.

**पंक्तिभेद,** पु० एकपंक्तीस भोजन करायास बसले जे अनेक त्यामध्यें कोणेकास कांहीं पदार्थ वाढून कोणेकास वगळावें असा वाढण्याचा जो प्रकार तो; २, भोजनादिसमयीं व्यवधान, अवकाश, दिग्भेद, इ० कृत जो परस्पर पंक्तीचा भेद तो; उ०, पंक्तिभेद असल्यास गोळक आणि आह्मी एकत्र जेवलों तरीं चिंता नाहीं.

**पंक्तिव्यवहार,** पु० परस्परांनी एकपंक्तीस बसून भोजन करावें असा अन्यतरांस पातित्यादि दोष नसतां जो व्यवहार घडायास योग्य असतो तो. उ० पंचद्राविडांचा पंक्तिव्यवहार आहे परंतु शरीरसंबंध होतो त्यांचाच होतो.

**पंक्तीचा,** ३लिं० समान योग्यतेचा अथवा कोणेकाचे पंक्तीस भोजन करणारा, उ० आपले पंक्तीचे ग्रह

स्थाशीं सोईरगतकरावी.

**पक्क**, ३ लिं० कालानें किंवा अग्नियोगानें शेवटील जो योग्य परिणाम त्यानें पावलें जें फलादिक किं० अन्नादिक तें, ३ ला० शास्त्र, व्यवहार, दर्शनादि संस्कारानें प्रौढ जाली जी बुद्धि ती.

**पक्कबुधि**, ३ लिं० पक्क जाली आहे बुधि ज्याची तो.

**पक्कान्न**, न० लाडू, घिवर, इ० जी उंची अन्नें तें.

**पंख**, पु० पक्ष्यांचा पक्ष किं० तदेकदेश जें पीस तो.

**पखरडा**, पु० फलपुष्पादिकांचा समुदाय वरून पडल्यामुळें चहूंकडे होऊन प्रसृतपणें भूमीवर जी त्याची स्थिति होती तो किं० तीत सापडलेला फलपुष्पादि समुदाय तो, उ० पखरडा पडला बदरीतळीं फकिर रक्षित एक महाबळी.

**पखरण**, स्त्री० पखरडा.

**पखरणें**, भूम्यादिस्थलावर पखरडा होईअसें पुष्पें, धान्यें, इ० प्रसृतपणें पडणें.

**पंखवाळी**, स्त्री० स्त्रियांचें कर्णभूषण आहे.

**पखवाज**, पु० मृदंग.

**पखवाजजी**, पु० मृदंग्या.

**पखळ**, स्त्री० कों० पखरडा.

**पखल्लण**, स्त्री० कों० पखरडा.

**पखळणें**, द० पखरणें.

**पंखा**, पु० वारा घ्यावयाकरितां वस्त्र. थाळा. वेळू. ताडपत्र, कागद, इ० कांचा पक्ष्याचे पक्षासारिखा करितअसतात तो.

**पखा**, पु० स्त्रियांचें एक कर्णभूषण आहे.

**पखाल**, स्त्री० बैलावर घालून पाणी आणावयाचें चर्मपात्र आहे.



**पखालजी**, पु० पखालीनें पाणी वाहून उपजीवन करितो जो मनुष्य तो.

**पखाल्या**, पु० निंदेनें पखालजी म्ह० २ पखाल वाहणारा जो बैल तो.

**पंखीं**, अ० या वस्तदार्थाचा जात्यादि धर्मानें परिछेद करून भिन्न भिन्न मानिल्या जा कोटी त्या कोटींत याचा प्रयोग प्राय; उखाणा घालण्याचे प्रसंगीं येतो, उ० तूं उखाणा घातलास तो पक्ष्यांचे पंखीं आहे किं० पशूंचे पंखीं आहे हे सांग, म्ह० तुझा उखाण्याचा अर्थ पक्षी विशेष आहे किं० पशू विशेष आहे.

**पंखेवाळी**, स्त्री० स्त्रियांचें कर्णभूषण आहे.

**पग**, न० बुदबळें. सोंकटी, इ० कांचे पटांचीं जीं घरें तें. २ पाउल या अर्थी प्रयोग प्राय: ग्रंथी उ० पग पाहून मोरस्थुरे, ३ ला० कोणेक व्यवहाराचा मूलभूत जो मर्मांश असतो, ज्याचा ज्ञानानें तो व्यवहार सर्वांशीं करतलामलकवत् समजला जातो तें, उ० हा बारावर्षें हिशेब शिकतो आहे परंतु हिशेबाचें पग अझून याचे मनांत आलें नाहीं. भाषणांत दुसऱ्यास पगीं धरणें म्ह० पकडीस धरणें असा अर्थ होतो.

**पगडडाव**, पु० सोंगट्यांचे खेळांत एक भेद आहे.

**पगडबंद**, पु० लोकांचीं पागोटीं बांधून देऊन उपजीविका करितो तो.

**पगडबंदी**, स्त्री० पगडबंदाचें जें कर्म ती.

**पगडा**, पु० संख्याबोधक फांशावरील जें बिन्दु असतें तो, २ ला० कोणेक व्यवहारादिकांत शिरण्याविषयीं तत्तद्व्यवहारीं घातलें जें पाउल तो, उ० आलीक

डे यानें आमचे घरीं येण्याजाण्याचा पगडा घातला आहे. उ० आपली अप्रतिष्ठा करितात हें समजून त्याणें साधूपणाचा पगडा घातला, ३ विवक्षितानुरूप कार्य किं० प्रतिष्ठा व्हावयाजोगा राजगृहादि-स्थलीं कोणेकाचा पडतो जो डोल तो; उ० त्यापंडिताचा राजाजवळ पगडा चांगला पडला, या-दोहीं अर्थी प्राय; पडणें किं० घालणें या धातूंचा योग.

पगडी, स्त्री० बांधलेल्या पागोटयाचे आकाराची शिवलेली जी टोपी असती ती, २ पगडी फेंकून जाणें इ० डोलाचे भाषणांत पागोटयासही पगडी म्ह०, पगडी फिरविणें कि० फेरपगडी करणें इ० स्थलीं सामोपचार सोडून विरोधास प्रवृत्त होणें. कोणेकाची पगडी घेणें म्ह० विद्यादिगुणानें त्याहून वरचढ होणें म्ह० शीरसलामत तर पगडया पंचवीस, २ श्रीमं

पंगत, स्त्री० पंक्तीचा अपभ्रंश, परंतु छंदोरूप अर्थावांचून: २. श्रीमंत लोकांचे एथें खाशाचें भोजना वांचून इतर जो भोजनाचा कारखाना असतो ती; कोणेकास पंक्तीस घेणें म्हणजे पंक्तिपावन करणें, त्यांची आमची पंगत होत नाहीं म्ह० पंक्ति व्यवहार होत नाहीं असा अर्थ जाणावा.

पगदस्त, अ० जें बुदबळ एकवार पगीं टाकिलें तें-फिरऊन मागें नघेतां खेळणें या धातूचें विशेषण-भाषणादिकांत आपण दुसऱ्यास मनासीं पडतो दुसऱ्यास पगीं धरणारा जो चतुर मनुष्य तो; ३ कधीं टळूं नये असें विचारपूर्वक, भाषणादि करणारा जो तो.

पगदस्ती, ३ लिं० पगदस्तामध्यें जें भाषणादि कर्म तो, २ पगदस्त.

पगार, पु० होडीमध्यें एक भेद आहे; २, मुशारा.

पंगू, ३ लिं० चालायाचे उपयोगी ज्याचे पाय नाहीं तो; २ ला जाजा व्यापारा विषयीं जीं इंद्रियें किं० कांहीं पदार्थ उपयोगी त्या इंद्रियादिकें करून जो विकल तो; ३ उ० मी डोळयानी पंगू जालों म्हणून हे माझें घर धुतात उ० पैसा नाहीं म्हणून मी पंगू -म्ह० धान्यावांचून दुनिया पंगू.

पंगेरा, पु० या० पांगारा.

पघळ, ३ लिं विस्तृत.

पघळणें, दे० पदृ जो घृतादि पदार्थ तो अग्न्यादि संयोगानें पातळ होणें २ रा० ढाणं, चिरगूट, इ० पदार्थ-भूम्यादिकांवर प्रसृत होत असें करणें.

पघा, पु० दे० सुवर्णादिकांचा रस लगड व्हावयाकरितां ज्या पात्रांत ओतितात तें पात्र तो.

पंच, ३ लिं० सं० पांच

पंच, ३ लिं० वादी प्रतिवादी यानी आपल्या खटल्याचा निर्णय करून आपल्यास सांगण्या विषयीं मान्य जें केले जे लोक ते प्रत्येकीं; २ ते प्राय: पांच असतात.

पंचक, न० पंचकाचा अपभ्रंश प्रा० प्रथमार्थावांचून अर्थ.

पंचक, न० पांच पदार्थांचा जो समुदाय तें. २ धनिष्ठोत्तरार्धा पासून अश्विनी पूर्वार्ध पर्यंत जीं पांच नक्षत्रें तें; किं० मरणा विषयीं, तृण, काष्ठादि संग्रहा विषयीं, निषिद्ध आहेत म्हणून विशेष प्रसिद्ध. ३ विवक्षित कालींचे लग्नसंख्येस गततिथी मिळवून कांहीं फल येत असतें तें.

**पंचकडी**, स्त्री० कागदाचे जे पांच ताव, किं० पांचक पयें इ० कांचा जो समुदाय, ती.

**पञ्चकन**, अ० असा शब्द होई असें थुंकण्याचें विशेषण.

**पचकर**, **पचदिशीं**, अ० पचकन.

**पंचकल्याण**, ३ लिं० जा घोडयाचे पाय गुडघ्यापर्यंत पांढरे आणि तोंडावर पांढरापट्टा असतो तो, २ ला० नाकाला जाचे निरंतर शेंबूड असतो आणि वारंवार मणगटानीं काढून टिरीस पुसत असतें असें जें पोर त्यास म्ह०.

**पंचकल्याणी**, ३ लिं० पंचकल्याण.

**पचकळ**, ३ लिं० जाचे भाषणामध्यें अभद्र, हलकं शब्द बहुत येतात जामध्यें ताळतंत किमपि नाहीं सभ्यतेची रीति किमपि नाहीं असा जो मनुष्य, किंवा त्याचें भाषण ती.

**पचकी**, स्त्री० कों० दमडीचें जें नाणें ती.

**पंचकणें**, न० हींग, जिरें, मिरें इ० थोडे थोडे सर्व पदार्थ दुकानांत बाळगिले असतात तें.

**पंचक्रोशी**, स्त्री० चार पांच कोशाचे आंत जे पांच चार गांव परस्पर संन्निहित असतात त्यांचा जो समुदाय ती, उ० तुह्मी आज आपले गांवांत आमंत्रण करणार कीं सगळे पंचक्रोशीस करणार, प्रायः ब्राह्मण ग्रामवृत्ति.

**पंचखाजें**, न० पंचखाद्याचा अपभ्रंश.

**पंचखाद्य**, न० ख्यारीक, खोबरें, खसखस, खिसमीस, खडीसाखर, हे पांच पदार्थ तें.

**पचंग**, **पचंगी**, स्त्री० पासोडी इ० वस्त्र माने पासून कंबरेपर्यंत पोट व पाठ झांके असा गुंडाळून बांधण्याचा प्रकार आहे ती.

**पंचगंगा**, स्त्री० एक तीर्थ आहे, २ ला० दोन डोळे, दोन नाकपुडया व एक तोंड ही निरखट इ० खाल्यामुळें गळ्यागळीं असतां पंचगंगा वाहतात असें म्ह०

**पंचगव्य**, न० गाईचें दूध, दहीं, तूप, शेण, आणि मूत्र हीं पांच मिळून तें.

**पंचगौड**, पु० ब्राह्मणांत गौड कनोजे इ० पांच जाती आहेत.

**पचणी**, **पचणीस**, अ० जिरमाणीस.

**पचणें**, भक्षिल्या पदार्थानें जठराग्निचा योगानें यथास्थित परिणामातें पावणें, २ ला० घेतलेलें द्रव्यादिक किं० केलेला अपराधादिक निस्तरायास न पडे असा होणें, ३ भाकर, पोळी इत्यादिक तव्यावर परिपक्क होणें ४ दुखणें इ० दुःखांत चिरकाल क्लेश पावणें, म्ह० पचेल तितकें खावें आणि शोभेल तितकें बोलावें.

**पंचत्व**, न० सं० मरण.

**पंचदश**, ३ लिं० सं० पंधरा.

**पंचदाळीचें वरण**, न० तूर, हरभरा, मूग, उडीद, वाटाणा, इ० पांच दाळी एकत्र करून जें मसालेदार वरण करितात तें.

**पंचद्रविड**, पु० तैलंगद्रविड, गुजराथी, करनाटकस्थ महाराष्ट्र असे पांच जातीचे जे ब्राह्मण ते.

**पंचदुर्गा**, स्त्री० पंचादेवी.

**पंचधार**, स्त्री० दे० पांच बोटें तुपाचे पात्रांत बुचकळून घालितात जी धार ती.

**पंचधारा**, स्त्री० पंचगंगा लाक्षणिकार्थी.

**पंचधारें**, न० देवावर पांचधारा पडत असाव्या असें पंचछिद्रांचें अभिषेकपात्र केलें असतें तें.

**पचन**, न० पचण्याचा व्यापार किं० फलतें.

**पंचनख**, ३लिं० हस्तादिकांस पांच आहेत नखें ज्यास असा जो मनुष्य, वाघ, वानर इ० तो.

**पंचनवटे**, पु० ग० कोंहीं एक संसारादिकांचा अनेकांनीं मिळून अनेक प्रकारचा केला जो नाश ते.

**पंचपक्वान्नें**, न० लाडू, मांडे, इ० जीं अनेक पक्वान्नें त्यांस ह्म०.

**पचपच, पचपचां**, अ० पचकन परंतु अनेकवार थुंकण्याचें वि०.

**पचपचीत**, ३लिं० आंत जलांश बहुत झाल्यामुळें किं० भूम्यादिदोषामुळें किं० स्वभावामुळें चांगली मिष्टता ज्यास नाहीं असा भाजी, ऊंस, इ० पदार्थ तो; २, ला० केवल निरस जें गाणें, भाषण, इ० त्यास ह्म०.

**पंचपदी**, स्त्री० कोणी साधू, संत, इ० देवापुढें नित्यनियमानें कांहीं पदें किं० अभंग इ० ह्मणतात ती.

**पंचपल्लव**, पु० अश्वथ, उदुंबर, पाईर, अंबा, वड, या पांच वृक्षांचे जे पल्लव ते.

**पंचपात्र, पंचपात्री**, न० स्त्री० एकपाणी घ्यावयाचें भांडे आहे. लिंगाचा अन्वय यथासंख्य आणावा.

**पंचपाळें**, न० हळद, कुंकु किं० हींग, जिरें, इ० ठेवायाचें चौफुल्यासारिखें पितळेचें किं० लांकडाचें पात्र असतें तें.

**पंचप्राण**, पु० गुदस्थानादि उपाधि भेदानें प्राणाचे मानिलेले जे पांच भेद ते.

**पचंबा**, पु० शाहीर लोक श्रावणाचे सर्व सोमवारीं देव प्रीत्यर्थ लावण्या, गाणें, इ० समारंभ करितात तो.

**पंचभेळ**, कों० पंचमेळ.

**पंचम**, ३ लिं० पांचवा २, पु० सप्तस्वरांतील पांचवा स्वर तो ३, संकेतानें रथायाचें तमाखूस ह्म०.

**पंचमघा**, स्त्री० मघा सूर्यनक्षत्र प्रवृत्त झाल्यापासून पांच दिवस त्या २, कों० मघापासून जीं पांच सूर्यनक्षत्रें त्या.

**पंचमत**, न० पंचाईत मततें.

**पंचमहापातकी**, ३लिं० पंचमहापातकें घडलीं आहेत ज्यास तो.

**पंचमहापातकें**, न० ब्रह्महत्या, सुरापान, स्वर्णस्तेय, मातृगमन, तत्संसर्ग, अशीं पांच जीं पातकें ती.

**पंचमहाभूतें**, न० पृथ्वी, उदक, तेज, वायु, आणि आकाश, हीं पांच.

**पंचमिसळ**, स्त्री० पांच, सात, जातीचा डाळी इ० धान्यें एकत्र मिसळून होती जी मिसळ ती, हेतांदूळ पंचमिसळ आहेत इ० स्थलीं विशेषण ही होतें.

**पचरट**, ३लिं० ग० पचकळ.

**पचरटाण**, स्त्री० रा० वस्त्र, भूमि इ० कांवर मनुष्याचें मूत पडून सुकलें असतां येते जी घाण ती.

**पंचमी**, स्त्री० पांचवी तिथी किं० विभक्ति.

**पंचमीपूजन**, न० कोणी प्रसूत झाली असतां पांचवे रात्रीं जन्मदादिदेवतांचें जें पूजन करितात तें.

**पंचमुखी**, ३लिं० पांच आहेत मुखें ज्यास तो, महादेव, हनुमान्, रुद्राक्ष, इ० तो.

पंचमेळ.

**पंचमेळ**, स्त्री० अनेक प्रकारचीं धान्यें एकत्र मिस ळ्या मुळें जी जाली मिसळ कि० अनेक जातीचा शरीर संबंध जाल्यामुळें होतीजी संकीर्ण जाति-ती, कदाचित विशेषण ही होतें.

**पंचरंगी**, ३ लिं० पांच आहेत रंग ज्यास असा नाडा. रेशीम, इ० धोत्रा, आफू, इ० पांच कैफाचे पदार्थ घालून भांगेचा घोटा करितात तो.

**पंचरणें**, शरीरावरील क्षत, नायटा, इ० पसरणें,

**पंचरत्नें**, न० सोनें, हिरा, नीळ, पाच, मोती हीं पांच, कि० सोनें, रुपें, मोती, राजावर्त्त, पोंवळें, हीं-पांच तीं.

**पंचरशी**, ३ लिं० पांच धातूंचा रस एकत्र करून जें भां डें इ० ओतितात तो.

**पंचराशिक**, न० प्रमाणादि पांच राशी मांडून ग-णिताचा प्रकार आहे; उ०, दोन हात रुंद चार हा त लांब एक लांकूड एक रुपयाला मिळतें तर-चार हात रुंद आणि साहा हात लांब किती रुप-यांस मिळेल हें पंचराशिका वरून सांग.

**पंचवीस**, ३ लिं० २५

**पंचहत्यारी**, ३ लिं० दोन पाय, व दोन हात, आणि तोंड, हीं पांच ज्याचीं शस्त्रप्राय आहेत तो व्याघ्र, सिंह इ० तो; २, तलवार, भाला, कटार, इ० पांच हत्यारें बाळगणारा जो शिपाई त्यास ह्म०.

**पंचा**, पु० हात सवा हात रुंद आणि पांच सात हात लांब असें एक नेसायाचें पांढरें वस्त्र आहे.

**पंचाईत**, स्त्री० पंचानी वादि प्रतिवादी यांचा पक्ष समजून घेऊन करायाचा निर्णय तो; उ०, पंचा इतींत ठरेल तसें उभयतानी वर्तावें; २, पंचांनीस नास आणाया जोगा जो खटला तो; उ० आह्मीं ही पंचाईत घेऊन त्या पंचाकडे गेलों; ३, ला० कोणे क गोष्टीचा दुर्निर्वेहतेमुळें जी संकट रूपता वा टती ती; उ० पर्जन्य काळीं नदी भरली ह्मणजे जा ण्यायेण्याची पंचाईत आहे, त्याचे घरीं अन्ना-ची पंचाईत आहे, ह्म० अन्न मिळण्या विषयीं परम संकट आहे; ४, गुप्त गोष्टीचा विचका कि० कांहीं एक गोष्टी विषयीं उगीच जी घासाघीस त्यांस ह्म०, पंचाईत सांगणें ह्म० कज्जा सांगणें. ५, ३ लिं० पंच.

**पंचाईतदार**, पु० पंच; २, पंचाईत करण्याविषयीं-जो कुशळ तो.

**पंचाईतमत**, न० पंचानी निर्णय करून ठरविला-जो निश्चय तें.

**पंचांग**, पु० कों० कोणी एक गोष्ट साधण्या विषयीं भगीरथप्रयत्नवत् जे मोठे प्रयत्न पडतात तो, न० अनेव०.

**पंचांग**, न० तिथि, वार, नक्षत्र, योग, करण, इ० यांचीं ज्याजवर लिहिलीं असतात तें पत्र.

**पंचांगशुद्धि**, स्त्री० विवक्षित शुभकर्माविषयीं तिथी, वार, नक्षत्र, योग, करण, यांचीजी निर्दोषता ती.

**पंचांगश्रवण**, न० तिथि, वारादिकांचें वर्षप्रतिपदेस कि० नित्यश: करितात जें पंचांगावरून श्रवण तें.

**पंचाचाँ**, पंचाचा, अ० पच पचां.

**पंचाण्णव**, ३ लिं० ९५.

**पंचादेवी**, स्त्री० कोणेक पदार्थांचे पांच विभाग करून त्यामध्यें तीन एकाचे आणि दोन एकाचे असा-

वांटण्याचा

वारण्याचा प्रकार तो.

**पंचानन**, पु० सिंह, किं० व्याघ्र तो; २, ३लिं० पंचमुखी.

**पंचापंच**, अ० पचाचा.

**पंचामृत**, न० दूध, दहीं, तूप, मध, शर्करा, हीं पांचतें तीं; २, मिरच्या, चिंच, नारळाचारस, गूळ, इ० पदार्थ एकत्रकरून तोंडी लावणें करीत असतात तें. ३, ला० पक्कान्नादियुक्त जें मिष्टान्न त्यास म्ह०

**पंचायतन**, न० शिव, विष्णु, सूर्य, गणपति, देवी, या पांच देवांचा जो समुदाय तें; २, ला० कोणेक कार्यांत पडलेले समान योग्यतेचे एकचित्त जे पांच पुरुष त्यांस म्ह०.

**पंचारती**, स्त्री० तबक इ० पात्रांत पांच दिवे ठेऊन देवादिकांस ओंवाळण्याचा जो व्यापार तो; २, तदर्थ पात्रांत लाऊन ठेविलेले पांच दिवे ती; ३, पांच दिवे लावायाचें सोईचें पात्र असतें ज्यास ओंवाळतेसमयीं धरायास मागें मूठ असती ती.

**पंचाल, पचाळ**, ३, लि० पचकळ.

**पंचावन्न**, ३लिं० ५५

**पंचाशीं**, ३लिं० ८५

**पंचाहत्तर**, ३, लिं० ७५

**पंचाळ**, ३लिं० सोनार, सुतार, कांसार, लोहार, पाथरवट, या पांच जातीस संज्ञा आहे.

**पंचाक्षरी**, पु० पिशाचनिरसक मंत्र जास येतअसतात तो.

**पंचीकरण**, न० एकमेकाचे गुणाचा एकमेकास संबंध व्हावा, अशा रूपानें स्थित जीं आकाशादि पंचभूतें त्यांचें देहादि सृष्ट्यर्थ ईश्वरशक्तीनें झाले जें परस्पर संमिश्रण तें.

**पंचीकृत**, ३लिं० पंचीकरण झाल्यामुळे इतर भूतांशा संसर्ग युक्त जें पृथिव्यादि भूत तो.

**पंचेचाळ, पंचेचाळीस**, ३लिं० ४५

**पंचेजोडी**, सारखे दोन जे पंचे ती.

**पंचेताळ, पंचेताळीस**, ३लिं० पंचेचाळीस.

**पंचोतरा**, पु० महिनाशंभरास पांच रुपये व्याज द्यावें असा व्याजाचा जो दर तो; २, पंचोतरी.

**पंचोतरी**, स्त्री० अंबे, कडबा इ० विकत घेतलें असतां शंभरास पांच वर देत असतात ती.

**पंचोपाख्यानी**, ३लिं० जास दृष्टांतीक श्लोक येतात व त्याजवर अनेक प्रकारचा युक्ति कल्पनेनें बसवून टीकामध्यें आपण सांगितलेली जी गोष्ट ती शोभविती तो.

**पञ्जी**, अ० पक्केपणा होई असें सांधा बसविणें-जडणें, खळी बुजविणें, दार विणणें, इ० क्रियांचें वि०.

**पछाडणें**, पकडणें.

**पंछी**, पु० शृंगारांत ग्रंथीं प्रियनायकास म्ह०.

**पंजर**, पु० सं पिंजरा.

**पंजा**, पु० पांच अंगुलीं सहवर्तमान जो मनुष्यादिकांचा तळहात किं० वानर व्याघ्रादिकांचें पाऊल तो; २, तळहातांत घालायाकरितां वस्त्रादिकाचें तदाकार कवच करितात तो.

**पंजा**, पु० गंजिफांत पंचसंख्याबोधक चिन्हांकित जीं पानें तीं; २, फांशावरील पंचसंख्यारूप जो डाव तो.

**पंजाबी**, ३लिं० पंजाब म्हणून देश आहे तत्संबधी

जो मनुष्यादि तो, २, भाषणादि व्यवहारीं पुराशहाणा जो मनुष्य त्यास म्ह०.

**पंज्ञारणें,** दे० घोडानें तारुण्य दशेतें पावणें.

**पट,** पु० सं० वस्त्र, २, पु० स्त्री० सोंगटी, बुदबळें इ० खेळायाकरितां वस्त्रादिकांवर पाडितात जीं घरें तीं सर्व मिळून तोती, ३, पु० याया प्रकारें वर्त्तावें अमुकास अमुक घावें इ० पुढें मागें समजायाकरितां जो कागदावर लेख लिहिला असतो तो. उ० सर्कारच्चे पटास यांची नावनिशी असली तर पाहून यांस दक्षिणा द्या, ४, अनेक कागद एकत्र चिकटवून त्यांजवर नानाप्रकारचीं चित्रें काढिलीं असतात तो कागद; ५, ३ लिं० चितनव्हे तो पैसा कवडी इ०; ६, संख्यावाचक सर्व शब्दांवरून किं० किनि जितका इ० शब्दांवरून हा प्रत्यय होतो; विशिष्टाचा अर्थ तत्तत्संख्या गुणित असा होतो; ७, स्त्री० तत्तत्संख्या गुणितत्व. उ० यंदा दुष्काळामुळें धान्याचे उदमांत पैक्याची दाहापट झाली.

**पटकन, पटकर, पटदिशीं,** अ० पट् शब्द होई इतक्यांत म्हणजे मध्यें करावें नकरावें इ० विचार किं० कांहीं प्रतिबंधक इ० कृत विलंब न पडतां त्वरेनें, बोलणें, जाणें, पडणें, करणें, इ० धातूंचें वि०.

**पटका,** पु० वीत, दीड वीत रुंद पांच चार हात लांब असें एक कंबरेस बांधावयाचे उपयोगीं वस्त्र आहे.

**पटकावणें,** कोणेक पळणारास युक्तीनें पटकण जाऊन धरणें, किं० भाषणादिकांत दुसऱ्यास युक्तीनें धरणें किं० दुर्मिळ पदार्थादि पटकन आत्मसात् होई असें करणें. कांहीं लाघव. अनायासता, त्वरा, इ० डौल दाखवायाच्या असतां मेळविणें, शिकणें, धरणें, इ० कांहीं व्यापारास पटकावलें म्ह०.

**पटकी,** स्त्री० जरी मरी, कोणेकास पटकी देणें-म्ह० चांदी देणें, पटकी बसणें किं० खाणें म्ह० कांहींएक केल्या व्यवहारादिकापासून खोड मोडायाजोगा धक्का प्राप्त होणें किं० अनुभवणें किंवा अपथ्यादि केल्यामुळें मोठें कांहीं दुखणें प्राप्त होणें.

**पटकूर,** न० कांबळ्याचे पट्ट्यास तिरस्कारानें म्ह०

**पटकूळ,** स्त्री० एक झाड आहे.

**पटण,** स्त्री० कों० पटणी.

**पटणी,** स्त्री० भातांत एक जाति आहे.

**पटणें,** दुसऱ्याकडून आलेला जो पैका इ० किं० हुंडी इ० लेख पत्रें सावकार इ० कानें त्याचें कांहीं दोषादि निघालें असतांही त्याचा धनी आपण अशा संकेतानें परिगृहीत होणें, उ० तुह्मी रुपये पाठविल्याप्रमाणें दुकानी पटले धोत्रजोडे पटतील तितके ठेवा बाकीचे आमचे आमचेकडे पाठवून द्या, तुह्मी माणूस पाठविला तो च्याकरीवर पटत नाहीं; २, दुसऱ्यानें सांगितलेली गोष्ट, प्रश्न, इ० तें अनुभवास येणें किं० उपपन्न होणें, उ० तुह्मी याज्वराचें कारण तक्रपान म्हणून सांगीतलें तें पटलें कांकीं कालमीत क्रपान केलें होतें खरें, उ० तुह्मी हिरोबा बाहेर भलतीच गोष्ट सांगीतली तर ती पटेल कशी

शी दाखला पटणें म्ह० दाखला येणें खातरी पटणें इ० खुली होणें असा अर्थ होतो.

**पटपट**, अ० पटकन् पण बहुतवार उ० चार कामें पटपट करून टाकावीं आणि स्वस्थ निजावें, उ० रागें भरतांच डोळ्यावाटे पटपट टिपें गळूं लागलीं

**पटल**, न० नेत्रांवर रोगानें जे दृष्टि प्रतिबंधक पडदे येतात तें; २, धूर, धूळी, इ० कांचा जो समूह तें; ३, आत्मस्वरूपादि दर्शना विषयीं प्रतिबंधक जे मायामद इ० त्यांस म्ह०.

**पटवणें**, पुतळ्या, रुद्राक्ष, इ० सुवर्ण, रेशीम, इ० कांचा तंतूनीं इकडचें तिकडे न होई असें ग्रंथ्यादि देऊन घट्ट ओंवणें.

**पटवा**, पुं० पटवेकरी.

**पटवादोर**, पुं० कीं० मुडा इ० बांधण्याचे उपयोगी केळीचें वाळलेलें जें सोप तो.

**पटवेकरी**, पुं० रेशमानें पुतळ्या इ० पटवून उपजीविका करित असतो तो.

**पटवेगार**, पुं० पटवेकरी.

**पटाईत**, पुं० पट्टा खेळण्यामध्यें जो कुशल तो; २, आ० जो जो ज्या विद्यादि व्यवहारामध्यें निपुण तो तत्तद्विषयीं; ३, ३ लिं० ज्याचे अंगावर काळे, पिंवळे, पट्टे असतात असा जो वाघ, तो.

**पटाटों** अ० पटपट.

**पटापट**, अ० पटाटों.

**पटापटी**, स्त्री० भस्माचे अंगावर पट्टे ओढण्याचा जो व्यापार ती; २, चट्टी पट्टी.

**पटु**, ३, लिं० सं० कोणेक कर्म करण्या विषयीं जो समर्थ, किं० कुशल तो.

**पटू** पुं० पट्टू.

**पट्टकूल**, न० रेशमी उंचजें वस्त्र तें.

**पट्टराणी**, स्त्री० राजासह वर्तमान जीस राज्याभिषेक झाला अशी जी राजाची स्त्री ती.

**पट्टा**, पुं० खोबळ्याची मूठ जा तलवारीस असती अशी जी तलवार ती; २, कंबर पट्टा; ३, शिपाई इ० कांचा गळ्यांत, किं० कंबरेस बांधलेली कंबरपट्ट्यासारिखी चर्माची वादी असती, किं० सरखलाद इ० कांचा तदाकार असतो तो; ४, शरीर, वस्त्र, इ० कांवर कांहीं एक रंगाचें, किं० केंस भादरल्यानें लांबट जें चिन्ह करितात, किं० असतें तो, पट्टा मारणें, किं० देणें म्ह० कोणेकाचा घरावर हात मारणें.

**पट्टाधूळ**, स्त्री० कोणेकाची केली जी अतिशयित दुर्दशा ती.

**पट्टाभिषिक्त**, ३ लिं० ज्यास पट्टाभिषेक झाला आहे तो राजा, किं० राणी तो.

**पट्टाभिषेक**, पुं० राजास सिंव्हासनावर बसवून जो राज्याभिषेक करितात तो.

**पट्टी**, स्त्री० वस्त्र, कागद, फळी, धातूचा पत्रा, चर्म, इ० कांचा दोन, तीन, चार, अंगळें पर्यंत रुंद लांबट जो तुकडा जो क्षतादिकांवर बांधणें, किं० अन्य वस्त्र फळी इ० कांस लावणें इ० उपयोगीं पडतो ती; २, कांहीं एक कार्यावर, किं० कोणेकास द्रव्यादि देणें, किं० कोणेकापासून घेणें याचा अनेकांवर जो विभाग ती, उ० आलीं चवघानीं पट्टी करून या गरिबाचें घर बांधून दिलें; ३, त्या विभागाप्रमाणें नावनिशी बार-

... याद करितात ती, इ० हातीं पट्टी घेऊन शि पाई वसुलास आला आहे आतांशी गावांत पट्टी चालली आहे इ०; ३, तत्संबंधी वसूल घ्यावयास असा अर्थ होतो; ४, पागोटें बांधते समयीं पदर मागें बसावें म्हणून मध्यें दुमडून चाक चोप दिसायाजोगी करितात जी पट्टी; किं० नेसलें वस्त्राचा रेखून थापटून साफ बसवितात ती; ५, फौलाद पट्टी; ६, पानांत सुपारी इ० घालून लांबट जो विडा बांधिला असतो तो; किं० उभे शिरेवर दुणलेलें जें विड्याचें पान तें, कोणेकास पट्टा देणें सं० रो जगार इ० कामापासून दूर करणें; ७, रुंदीस प्राय: सारखा असा लांबट जो भूमीचा विभाग तो; ८, गृहसमुदाय विशिष्ट जो ग्रामाचा विभाग तो; ९, भोजनाध्ययनादि प्रसंगीं बसलेली जी ओळ ती; १०, स्त्रिया वेणी घालते समयीं कपाळावर दोहीं बाजूनें मागें करून बसवितात जो केशसमुदाय ती.

पट्टीपासोडी, स्त्री० द्वितीयार्थक पट्टी इ० ती.

पट्टू, पु० उर्णा वस्त्र आहे.

पट्टे, न० कांबळा, पासोडी, शेला, इ० जीं जोडीं म्हणजे त्यांचे जे ते अवयव, किं० असे अवयव व्हावयास योग्य जीं वस्त्रें विणिलीं असतात तीं प्रत्येकीं.

पट्टेकरी, पु० पट्टा म्हणून जी तरवार तीतें वाळगणारा जो शिपाई तो; २, चपराशी.

पठण, न० श्लोकादि ग्रंथ म्हणण्याचा जो व्यापार तें, हा ग्रंथ मी पठन केला म्ह० ग्रंथाचें पठन केलें असा अर्थ जाणावा.

पठाण, पु० मुसलमान जातीत एक भेद आहे.

पठाणी, ३लिं० पठाण संबंधी वेषादि.

पठाणीलोध्र, पु० औषधी धूप आहे.

पठार, स्त्री० बेलाचा मूठ आंवळायाचें साधन सुतळी इ० कांचें नवारेसारिखें केलें असतें ती; २, न० पर्वताचें मस्तकावरील जी सपाट भूमी तें.

पठिंगा, पठिंबा, पु० कों० एकादे व्यापारीं प्रवृत्त झाला जो कोणी एक तो कांहीं थकला असतां त्याचा पाठपुरावा करणारा जो कोणी मागें आश्रयभूत असतो तो.

पठ्ठा, ३लिं० तरुण असून शरीरानें पुष्ट, बळकट, जो तो.

पठ्ठ्या, ३लिं० पठ्ठा.

पड, स्त्री० वादयुद्ध, इ० प्रसंगीं अंगीं बळ असून कांहीं कारणामुळें तत्तदावेश सोडून राहण्याचा जो प्रकार ती. या अर्थी घे, पत्करणें यांचा योग होतो; २, झाडावरून भूमीवर पडलेलें जें अंबे ती; ३, आगवड झाल्यापासून राहिलें जें शेत ती; ४, कों० एकसमयीं अनेक मनुष्यांचा कांहीं दुखण्यामुळें पडून राहावें अशी अवस्था होती तिला म्ह० उ० ज्वरानें दोनशें मनुष्यांची पड पडली आहे; ५, वा० दोनशेर जें माप ती; ६ गंजिफांचे डावांत उत्तरोत्तर हार येत असावी अशी जी दशा ती; ७, चाकर, कुणबीण, इ० कांहीं शब्दामागें याचा योग होतो तेव्हां चाकराचा चाकर तो पडचाकर असा अर्थ विशिष्टा

चा होतो; ८, पु० विशाची, पेटी, इ० कांवें जें कंप ते प्र० गांव, शेत, इ० पड पडणें ह्म० पडरूप रहाणें·

**पडक**, न० वा० पिकलेलें पोफळ·

**पडकथ**, स्त्री० कों० आपलीं माणसें दुसऱ्यास शेतला वणें इ० कामावर काळांतरीं द्यावयास करून त्याचीं माणसें आपले कामावर आणण्याचा जो प्रकार तो·

**पडकर**, ३लिं० वा० पडीत·

**पडका**, ३लिं० लवकर पडण्याचा स्वभाव ज्याचा असा जो कंठध्वनि तो·

**पडकें**, न० कों० दोऱ्याची एक कानी तें·

**पडखर**, ३लिं० भीड, भाड, इ० न धरितां स्वसरद शीन जें बोलणें जाबसाल करणें इ०·

**पडखळणा**, न० वा० पायांतील जोडवीं न पडावीं ह्मणून पुढें अडकवण जें ताम्रवलय घालितात तें टोपलेला कान बरा होई तों त्यांत ताम्रवलय घालितात त्यासही ह्म०·

**पडगा**, पु० कों० कोशिंबीर इ० पदार्थ ठेवायासाठीं लाहान काठवटी सारिखें काष्ठपात्र करितात तें·

**पडगी**, स्त्री० पेंदी·

**पडघा**, पु० पडगा·

**पडघम, पडघँव, पडघॉम, पडघॉव**, न० एक चर्मवाद्य आहे·

**पडघे**, न० चवघडा, तबला, संमेळ इ० जीं जोडगीर चर्मवाद्यें असतात त्यांचे जे दोन दोन अवयव ते प्र०·

**पडछाया**, स्त्री० दीपामुळें मनुष्य स्तंभ इ० कांची जी छाया पडती ती·

**पडजीभ**, स्त्री० जिव्हा मूळावर एक मांसगोलरूप अवयव लोंबत असतो ती·

**पडझड**, तळ्यावरून पदार्थ काढिला असतां किंवा मेंन्यादि निघालें असतां तळ्यावर जें कांहीं पडलेलें झडलेलें राहातें ती·

**पडणा**, न० कोणेक कार्याचे संभवाचें देशरूप किंवा कालरूप टिप्पण असतें तें, इ० बैल उतरायाचें हें एक पडण आहे एथें उतरले नाहींतर कोसावर दुसरें पडण आहे तेथें उतरतील, यंदाचे पडणास अंबे लागले नाहींत तेव्हां पुढचे पडणास बहुत लागतील असें वाटतें·

**पडणीस**, अ० वा० येगें याचा योग शेतपिकल्यानंतर त्याणें खालीं पडावें अशी जी त्यास दशा प्राप्त होती त्या दशेस, २ आरोपानें तोटा वृद्धि इ० कांमुळें व्यवहार मनुष्य इ० कांस पतनयोग्य दशा प्राप्त असतां ह्म०·

**पडणें**, कांहींएक आधेय वरून अधोदेशस्थ आधारावर येणें, उ० या किल्यावरून खालीं दगड पडला तरी फुटेल एथें पक्ष्यांस उड्डान शक्ति, मनुष्यांस अवष्टंभादि, तोफेचा गोळा इ० कांस वेग इ० जें वरराहायास आधार असतात तद्वियोगामुळें, किं० स्वीय गौरव माहात्म्यानें जें खालचें आधारावर येणें तें विवक्षित आहे अतएव पक्षी उतरला, पक्षी पडला, इ० प्रयोग व्यवस्थेनें होतात, २, उभेपणी स्थित जो पदार्थ त्याणें आडवेपणी आधाराशीं संबद्ध होणें आश्चे-

वाऱ्यानें झाडें मोडून पडलीं एथें ही प्रायः गौरव माहात्म्यविवक्षित आहे; ३, रचना विशेषें करून रचित जे किल्ला, वाडा, इ० ते कोसळणें; ४, कोणेक मनुष्यादि पदार्थ कार्याकडे विनियुक्त न होतां निर्व्यापारपणें स्थलांच्या ठायीं स्थित असणें उ० पांच शालजोड्या पडल्या आहेत तुला पाहिजे ती घे; ५, कोणेक संतत चालले ला व्यवहार विरत होणें अथवा कालानें, किं० देशानें तत्तद्व्यवहार संबंधावांचून राहाणें, उ० पैसा नाहीं ह्मणून सावकारी पडली तुझे रती बाचे मध्यें चार दिवस पडले, बीं मिळालें नाहीं ह्मणून यंदा हें शेत पडलें; ६, परस्परांचा-परस्परांशीं अनुकूल भाव असणें, एथें अनुकूल भाव असणें एवढा धात्वर्थ ह्मणून अकर्तृक, उ० विद्येस आणि लक्ष्मीस प्रायः पडत-नाहीं; ७, उद्देश्य कार्या विषयीं उपयुक्ततेनें, किं० अनुपयुक्ततेनें कोणेक गुणादिकास विधेयता असतां असणें याधातूचे अर्थी याच्या प्रयोग होतो, उ० तुह्मी धनी पडलां मी चाकर पडलों तस्मात् बोलालतें सोसून घेणें प्राप्त आहे. हें शहर पडलें ह्मणून एथें लांकूड फांट्याची महागाई; ८, कोणेकानें कोणेक कार्यावर, किं० स्थाणें. मारणें. इत्याद्यर्थ पदार्थावर झटून प्रवृत्त होणें, उ० ती आतांसा लिहिण्यावर पडला-आहे, अकस्मात् गनीम पडला आणि निसंतान केलें; ९, ऊन, थंडी, अंधार, उजेड, दुष्काळ, इ० कांनीं विवक्षित देशातें आक्रमित करून असणें; १०, त्रैराशिकादि गणितावरून कांहीं एक फल फलित होणें, उ० कोशास आठहजार हात तेव्हां अर्ध कोशास काय पडतें; ११, कांहीं एक लाभादि सिध्यर्थ मूल्यादिक द्यावें लागणें, किं० कांहीं कर्म अवश्य पणीं करावें लागणें, उ० शालजोडीस पांचशें रुपये पडतील ह्म० घेणारास द्यावे लागतील, उ० वायको केली तर घर बांधायास पडेल; १२, कांहीं एक काल सतत चालू असायाचा जो कारखाना फड, इ० व्यापार, किं० मार्ग संप्रदाय, दर, इ० ते चालू पणास लागणें, उ० पत्रावळीच्या एकदां फड पडला ह्म० कोणी येईल तो लावील; १३, वाद, किं० क्रीडा इ० कां मध्यें पराजित होणें; १४, कांहीं एक पदार्थांचे विभाग विभागलें करून, किं० विवक्षित पदार्थलें करून छेदादि क्रियेनें घडणें उ० या कागदाचे चार तुकडे पडतील, या भिंगाचे दोन आरसे पडतील; १५, कांहीं संकटरूप कार्य कोणेकास निर्वाह्यलें करून प्राप्त होणें-उ०, मला या पोराचें लग्नाचें पडलें आहे; १६, कोणेकानें कोणेक व्यापारीं निविष्ट होणें, उ० तुह्मी सोदे आहां तुमचे खटल्यांत आह्मी पडत नाहीं; १७, कोण एक अंकराशींतून कोण एक अंकराशि उणा केला जाणें; युद्धामध्यें पडणें ह्म० मरणें, किं० मृत प्राय होणें, अक्षर, अंक, शब्द इ० पडणें ह्मणजे लिहिला जाणें, रंग, काळा, पडणें हात, पाय गारपडणें इ० स्थलीं तत्तद्रूपें करून होणें पंक्तींत पानें बरावर वांसे इ० पडणें ह्म० आहित होणें, रबडी, शेत, विहीर इ० पडणें ह्म० होऊन तत्तद्रूपें करून स्थिती तें पावणें

तें पावणें दूर पडणें, बाहेर पडणें, जवळ पडणें इ० स्थळीं तत्तद्रूपदेश संबंधाद्यधिकरणीं स्थितिपावणें, पडघेणें या अर्थी पडला राहाणें, पडून घर घेणें इ० प्र० कांहीं कांहीं आढळतात, कंठपडणें ह्म० कंठांतून स्वर ननिघे असा होणें, पडलेफळाची आज्ञा परमाणगी इ० स्थलीं कोणेक कार्याचा यत्किंचिदंश करण्याविषयीं राजादिकांचीजी आज्ञानी जीझाली असतां चंचुप्रवेशे-मुसलप्रवेशः यान्यायानें करणारा स्वसंकल्पानुरूप सर्वकाम करून घेतो, ह्म० पडल्यावर पाय देऊंनये. पडतेपावसांत ह्म० धडधडीत पाऊस पडतअसतां जाणें, येणें, निघणें, चालणें इ० वि०.

**पडतउभें**, न० कों० उत्पन्न होतांच उभें राहातें असाजो गाय, इ० कांचा वत्स त्यास तज्जातीय प्रसवाचे स्तुति प्रसंगीं ह्म०; २, ला० जो व्यवहार आरंभाचा तो सिद्धीस जावा असें कोणे काचें जें प्रारब्ध असतें त्यास ह्म०.

**पडतझडत**, अ० झडत पडत.

**पडतपोशी**, स्त्री० पडदा, भिंत, इ० कांचे आश्रयामुळें स्थलावर उघडेपणाच्या प्रतिपक्षी आवृत्तत्व रूप जो धर्म विशेष येतो त्याचे योगानें त्या स्थलावर जाणारा येणाराची दृष्टि, किं० वायु इ० सहज येऊं शकतनाहीं ती.

**पडतळणें, पडताळणें**, कांहीं एक संदिग्ध गोष्ट पडताळ्यानें ताडून पाहाणें, २ ढाल, तरवार, जोडा, पागोटें, इ० निघते समयीं जा अवयवाचा ठायीं जा प्रकारें धारण करायाचें त्या प्रकारें

प्रकारें धारणकरणें: ३. कोणेकानें आपणास गालिप्रदानादि दुर्भाषणें केलीं असतां त्यांची आपण उलटकरणें.

**पडताळा**, पु० कोणेक गोष्टीविषयीं प्रामाण्य संदेह आला असतां तन्निरसनार्थ प्रमाणांतर, प्रकारांतर, आवृत्त्यंतर, इ० कांनें ताडून पाहाण्याचा जो प्रकार तो.

**पडथळ**, न० रा० पिशाचोपद्रवाचा एकादेवानें कांहीं निर्णय सांगितला असतां इतर गांवचे देवाला विचारून जो त्याचा पडताळा पाहातात तें, किं० त्या देवानें सांगितल्याप्रमाणें जो लेख करून घेतात तें.

**पडदणी**, स्त्री० नेसलेलें वस्त्र भिजवायाचें नसतां स्नान करिते समयीं जें लाहान वस्त्र नेसतात ती.

**पडदळ**, न० ग्रामांतरास जायायाचे प्रसंगीं बरोबर न्यावयाचें जें ओझें त्यास ह्म०; २, पडदळें,

**पडदळें**. न० शिपाईलोक तलवार. इ० अडकवायाकरितां चर्म, बनात, इ० कांचा पाश गळ्यांत अडकवीत असतात तें.

**पडदळ्या**, ३ लिं० सामानसुमानाची कंडाळ घालून शिष्यादिक कोणीवर बसतात असे जे त्यांरीबरोबर तट्टू असतात ती.

**पडदा**, पु० दृष्टिपात, इ० निरोधार्थ वस्त्र, किं० वाळे तृण. इ० कांचे वस्त्रासारिखें करून जें मध्यें अंतर्धान लावितात तो; २, नेत्रांवर जें पटल येत असतें तो, शरीर, कांदा, लांकूड, दगड, घडीचीपोळी, इ० कांचाठायीं एका खालीं एक एकाखालीं एक असे जे त्वगादि अंश असतात ते प्रत्येकीं

जें शस्त्रादिकांनें ईषन्मात्र सोडविलेंअसतां वेगळे होतात; ३, अंगरख्याच्या उरावरील जो कापडाचा अंश तो; ४. पेटी, बटवा, इ० कांम ध्यें भिन्नभिन्न घरेंपडावीं म्हणून फळी, वस्त्र, इ० रूपजें अंतर्धायक जडलें असतें तो; ५, भाषणादिव्यवहारीं भीड, मर्यादा, इ० संरक्षणार्थ किं० दुसरा आपल्याला वचनादिकांचाठायीं धरूंलागला असतां नसांपडावें इत्याद्यर्थ-तोतोव्यवहार केवळ स्पष्ट उघड नदिसावाजोगे अवलंबित जे छलादिक तो; ६, परस्परांनीं भाषणादिव्यवहारीं केवळ साफ नवागायाजोगें जें परस्परांचें अंतःकरण मिळण्यांत कांहीं अंतर असतें तो; ७. कानाचेंआंत एकअवयवआहे जाजवर शब्दप्रहार झालाअसतां ऐकूं येतें तो.

**पडदाळें**, न० पडदळें.

**पडदी**, स्त्री० एकेरी विटेची जी पातळभिंत घालितात ती.

**पडदोरा**, पु० दे० गळसरी इ० कांचे दोऱ्यास दुसराजोड लावितात तो.

**पडप**, न० कोणेकास कोणेकाची सर्वदाप्रतिष्ठा वर्णावी असाजो तद्विषयीं पक्षपात किं० पक्षपातानें वर्ण्यमानजी ती प्रतिष्ठा तें, उ० इला सर्वदा नवऱ्याचें पडप, दिवसभर माहेरचें पडप सांगती; २, कोणेकानें कोरडी ओढून आणलीजी प्रतिष्ठा तें तिरस्काराविषयीं प्र०; उ० चाकराचें इतकें पडप कशास पाहिजे.

**पडपावणी**, स्त्री० रा० न्हाव्यानें आपले घरच्या जा हजामती पडतील त्या कराव्या आणि त्यास वर्षास अमुकद्यावें अशीजी एकवार बोली केलीअसती ती.

**पडम**, न० पडशी इ० करण्याचा उपयोगी दुहेरी तिहेरी सुतानें विणलेलें अरुंद वस्त्र असतें तें.

**पडवळ**, न० एकभाजीचेंफळ आहे; २, स्त्री० त्याचाजो वेल ती.

**पडवी**, स्त्री० घराचे वांसे संपून जेथें पाघोळ्या आल्या तेथें दुसरे वांसे लावून जो गृहप्रदेश वाढवितात ती.

**पडशी**, स्त्री० दुमोटकरायाचे सोयीचेंमध्यें तोंड ठेवून पडम इ० कांचें पोतें करितात ती.

**पडसळ**, स्त्री० कों० पडसाळ तृतीय चतुर्थार्थी.

**पडसावणें**, रा० पडशानें युक्त होणें.

**पडसावली**, स्त्री० पडछाया.

**पडसाळ**, स्त्री० धर्मशाला; २, पडवी; ३. कों० देवी बऱ्याझाल्यानंतर अंगावर पुरळ येतअसतो-ती; ४, शेतें कापल्यानंतर पुनः त्याशेतांस अंकुर येतो ती.

**पडसाक्ष**, स्त्री० पडसाक्षाचें जें कर्म ती; २ पु. पडसाक्षी.

**पडसाक्षी**, पु० साक्षीदाराचाजो साक्षी तो.

**पडसूत्र**, न० रा० मंगळसूत्र, गळसरी, इ० ओंवून गांठदिल्यावर जी त्या दोऱ्याचीं शेवटें कांहीं राहिलीं असतात तें.

**पडसें**, न० शैत्यादिक मस्तकांत जाल्यामुळें नाकांतूनपाणी, शेंबूड, इ० गळतो असा एक रोग आहे.

पडसेकरी. ३लिं॰ पडसें जास झालें आहे तो.

पडस्थळ, न॰ कों॰ पडथळ

पडळ, न॰ नेत्रांवरजे पटल येतें तें.

पडाँव, पडाव, कों॰ जलयानांत एकभेद आहे.

पंडित, पु॰ शास्त्रवेत्ता तो, पुराजो चतुर त्यास किं॰ जाकामामध्यें पुराजो निपुण त्याकामांत त्यास स॰ लेखपत्रादिव्यवहारीं राजपुरुषादि थोरलोकांचे नावापुढें याचाप्रयोग असतो.

पंडितंमन्य, ३लिं॰ स्वतः अज्ञान असून आपण आपल्यास पंडित असें मानितो तो.

पंडितराव, पु॰ राजापाशीं एकअधिकारी असतो तो.

पडिवार, पु॰ पडप.

पडीचा, ३लिं॰ झाडावरून अलगउतरून नफा दितां खालीं पडलेला जो अंबा तो व झाडावर पिकून गळलेला जो अंबा तो.

पडीत, ३लिं॰ शेतव्हावयाजोगी असून शेतनहोतां उगीच पडलेली जी जागा ती; २, कों॰ तत्तत्कार्यावर विनियुक्त न होतां उगीच रिकामा पडला जो पदार्थ तो.

पडू, ३लिं॰ कों॰ पडया.

पंडु, पु॰ एक रोग आहे.

पडोशी, पु॰ शेजारी.

पडोशीस, अ॰ शेजारीं.

पडोसा, पु॰ पडताळा.

पडया, ३लिं एकाएकीं चढीला गुंतूनये पडूनच यागावें असा स्वभाव ज्याचा तो.

पढणें, शास्त्रादिविद्यापठन करणें.

पढतमूर्ख, ३लिं॰ शास्त्रज्ञाना असून कार्याकार्यें विचार न करितां वर्ततो त्यास स॰.

पंढरपुरी, ३लिं॰ पंढरपुर स॰ पंढरीतलसंबंधीजें माप, रवण, भाषा. इ॰ तो.

पंढरी, स्त्री॰ जामध्यें मुख्यत्वेंकरून विठोबाराहतो तें क्षेत्र, पंढरीपिकणें स॰ भक्ष्यभोज्यादि किं॰ पैसा इ॰ जितका पाहिजे तितका मिळावा अशी दशा प्राप्त होणें.

पढीक, ३लिं॰ पढलेला जो मनुष्य तो.

पण, पु॰ सं॰ कांहीं एक कार्याविषयीं केलाजो प्रतिज्ञापूर्वक नियम तो, उ॰ त्यानें मत्स्यवधील त्यास मुलगी देईन असा पण केला होता, आज पाऊस पडेल न पडला तर मी शंभर रुपये देईन असा पण करितो; २, द्यूतास जिंकण्याविषयीं जें द्रव्य मांडितात तो; ३, अ॰ परंतु ही या अव्ययार्थी. तो येणार होता पण आला नाहीं, उ॰ तो गेला नाहीं म्हणून मी पण गेलों नाहीं; ४, न॰ शब्दमाचापुढें तत्तत्पदार्थावर प्रकारतेनें भासमान जो धर्म त्याचा, किं॰ कोठें तन्निष्ठ कर्मीचा वाचक हा प्रत्यय होतो, उ॰ सोनारपण, तो आचारीपण करून पोट भरतो.

पणंज, न॰ पणजें.

पणजवळ, न॰ रा॰ पणजोळ.

पणजा, पु॰ आजाचा जो बाप तो संबंधास द्वार आजेपणा असतां आजेसासू आजेसासरा इ॰ शब्द जसे होतात तसे पणजे पण द्वार असल्यास पणजेसासू इ॰ शब्द होतील असें जाणावें.

पणजी, स्त्री॰ पणजाची जी बायको ती.

पणजें, न॰ भातांत जें बिंब निघतें तें.

**पणजोळ**, न॰ आईचें किं॰ बापाचें आजोळतें.

**पणत**, स्त्री॰ नातवंडाची जी कन्या ती.

**पणतवंड**, न॰ नातयाचें किं॰ नातीचें जें अपत्य तें.

**पणती**, स्त्री॰ दीपलावण्याचें उपयोगी मृत्तिकेचें पात्रआहे.

**पणतुंड**, न॰ रा॰ पणतवंड.

**पणतू**, पु॰ नातवाचा जो पुत्र तो.

**पणस**, पु॰ वा॰ फणस.

**पणा**, पु॰ यावत् शब्दमात्रापुढें पण हा जसाप्रत्यय होतो त्याचअर्थी हाही होतो, उ॰ लहानपणा मोटेपणा, इ॰ जाणावे.

**पणाजा**, पु॰ कों॰ पणजा.

**पणाजी**, स्त्री॰ कों॰ पणजी.

**पत**, स्त्री॰ देणेंघेणें इ॰ व्यवहारीं प्रामाणिकतेनें चालल्यामुळें लोकानीं गहाण, जामीन, इ॰ कांची अपेक्षा नधरितां त्याशीं व्यवहार केवळविश्वासावर करावा अशी जी कोणेकास योग्यता आली असतीती.

**पंत**, पु॰ राजाचे अष्टप्रधान प्रतिनिधी हे प्रत्येकीं उ॰ पंतप्रतिनिधि पंतअमात्य; २, ब्राह्मण असून प्राधान्येंकरून कारकुनीची क्रियाजोजाणतो त्याचानामापुढें हें नामलागतें तो.

**पतक**, न॰ एकेक सर्दार कलून त्याचे त्याचे दिमतीस लावलेलाजो राऊतांचा समुदाय तें; २, रा॰ अकातीवर कांहीं अधिकारआहे; ३, पदकासही ह्म॰.

**पतकर**, पु॰ याकार्याचानिर्वाह माझेकडे लागला अशाप्रकारानें कोणेककार्याविषयीं केलाजो अंगिकार तो.

**पतकरणें**, कोणेककार्यनिर्वाह करण्याविषयीं अंगीकारणें.

**पतकार**, पु॰ पतकर.

**पतकारणें**, पतकरणें.

**पतकी**, पु॰ रा॰ अकातीचे पतकाचा वतनदार अधिकारी असतोतो; २, पतक्या.

**पतक्या**, पु॰ राउतांचें पतक ज्याचे स्वाधीनआहे तो सर्दार.

**पतंग**, पु॰ दीपपाहून त्याजवर जो क्षुद्रजंतु मोहानें पडत असतोतो; २, वावडीमध्यें एकभेदआहे; ३, एक तांबड्यारंगाचे उपयोगी लांकुडआहे; ४, सं॰ पक्षी; ५, सं॰ सूर्य.

**पतंगी**, ३लिं॰ पतंग लांकडाचाजो रंग तो; २, रा॰ स्त्री॰ पाण्यांत उडी मारण्याचा एक भेद आहे.

**पतन**, न॰ पडण्याचाजो व्यापारतें.

**पतपात**, स्त्री॰ पत इ॰ ती.

**पतळी**, स्त्री॰ लोखंड, सोनें, इ॰ लोडायाकरितां पोलादी शस्त्र असतें ती.

**पताक**, स्त्री॰ पताका.

**पताका**, स्त्री॰ सं॰ लाहानजो ध्वज ती.

**पताड**, स्त्री॰ कों॰ गलबतांत सांठवण राहावें ह्मणून त्याचे कांठावर काठ्या, कांबट्या, आंथऱ्या, बांधून गलबताचाकांठ चढवितात ती २; दे॰ पठारप्रथमार्थी.

**पताडा**, ३लिं॰ चापट चेपडा इ॰ कांची शेंग, केळें, ह्मशीचें शिंग, इ॰ तो.

**पति**, पु० धनी; २, स्त्रियांचाजोनवरा; पृथ्वीपति, भूपति, इ० समासजाणावे.

**पतिंगा**, पु० कों० गलबतावरचीजीमोठी वल्ही अ सतात तों.

**पतित**, ३लिं० कांहीं पातककेल्यामुळें जातिभ्रष्टजालातो; २, ऊर्ध्वगतीस कारणीभूतजें पुण्य त्याचालेशही ज्याचेपदरीं नाहीं तो, उ० पतितमीपापी शरण आलों तूज राखीमाझीलाज पांडुरंगा; ३, पडलेला.

**पतितपावन**, ३लिं० पतितांचाही उद्धारकरणारा जो ईश्वर किं० साधुजन त्यास म्ह०.

**पतिव्रता**, स्त्री० पतीचे आज्ञेचें कदापि उल्लंघन करूनये अशारीतीनें चालती जी स्त्री ती; २, जिनें व्यभिचार कधीं केला नाहीं तीस म्ह०

**पतेमारी**, स्त्री० फतेमारी.

**पंतोजी**, पु० वेतनघेऊन मुलांस व्यवहारिक लिहिणें शिकवितो तो; २, मनस्वी वर्तणूक केलीअसतां आपासून शिक्षा होईल अशी संभावना असती असाजो धनी इ० त्यांस म्ह०.

**पत्ता**, पु० कोणेकपदार्थाचें राहवयाचें जें ठिकाण ज्याचे ज्ञानानें तो तेथें आहे अशाप्रकारें त्या पदार्थाचें ज्ञान होतें तो, अशाप्रकारें जाणण्याचा प्रसंग असतांच प्रयोग होतो, उ० तुह्मीं दौनको ठें ठेवणार तो मला पत्ता सांगून ठेवा; २ कोणी एक गोष्ट याप्रकारें होणार किं० जाली असें तत्तचिन्हादिकांवरून त्यात्या गोष्टीचें ज्ञान होतें-तो, उ० यावाटेनें चोरगेला असा पत्ता लागला-यंदा तें लग्नकरणार किं० नाहीं हा पत्ता लागूनये ३, तंबाखूचें चुरल्यावांचून जें पान तो.

**पत्ती**, स्त्री० भांगेचीं पानें ती.

**पत्थर**, पु० फत्तर.

**पत्नी**, स्त्री० विवाहाची जी स्त्री ती.

**पत्र**, न० पर्ण; २, कोणेकास कांहीं लेहून पाठविजाजो कागद तें; ३, पोथीचे एक सांचाचें जें अनेक कागद असतात ते म्ह०.

**पत्रक**, न० कांहीं एक व्यवहार संबंधीं जमाखर्च इ० कांचे झाडयाचें टांचण ज्याजवर लिहिलें असतें तो कागद तें; २, सं० पोथीचें किं० कोणास पाठवायाकरितां लिहिलेलें जें पत्र तें.

**पत्रज**, पु० एकवृक्षआहे.

**पत्रदर्शनीं**, अ० पत्र पाहातांच पत्रांत लिहिल्या प्रमाणें त्वरितकरणें इ० वरअन्वय हाशब्द पत्रीं लिहिण्याचा संप्रदाय आहे.

**पत्रद्वारा**, अ० कोणेकास पत्राचें जें प्रेषण तद्द्वारा समाचारघेणें इ० धातूचें वि०.

**पत्रवडी**, स्त्री० वा० अळू इ० कांचे पानाचा ज्या वडया करितात ती.

**पत्रशाक**, स्त्री० सं० पाले भाजी ती.

**पत्रा**, पु० सुवर्ण, रौप्य, तांबें, इ० कांचा फळीसारिखा पातळ जो आकार केला असतो तो.

**पत्राज**, स्त्री० मीथोर, मीशाहणा, इ० रूपजो प्रतिष्ठितपणाचा डौल मिरवितात ती. तिरस्कार विषयीं प्रयोग.

**पत्राजी**, ३लिं० जो पत्राज भारी मिरवितो तो.

**पत्रावळ**, स्त्री० दाहावीस पानें एकत्र शिवून भोजनार्थ जें पात्र करितात ती, पत्रावळ उडणें म्ह०

यजमानादिकाकडे होतांजी भोजनादिकांचीसोय ती नाहींशी होणें·

**पत्रिका**, स्त्री० जन्मपत्रिका ; २, लग्न, मुंज यांचा मुहूर्त जा पत्रावर लिहून ज्योतिषी आणितात तें पत्र ती ; ३, ग्रंथादि मोठ भाषणांत लग्नचिठ्ठी इ० पत्रांस पत्रिका असाव्यवहार आहे·

**पत्रिकापूजन**, न० विवाहांत किं० मुंजींत मुहूर्तलिहिलेले पत्रिकेचें यजमान पूजन करितो तें·

**पत्री**, स्त्री० आयपत्री ; २, देवास वाहायाकरितां जी अनेकवृक्षांची पत्रें आणितात ती ; ३, संकेतानें स्वायाचें तमारवूस्त ह्म० ; ४, सं०पु० बाण·

**पंथ**, पु० मार्ग ; पंथास किं० मरणाचेपंथासलागणें, किं० टेंकणें, ह्म० मरणासन्न दशापावणें, पंथास्पींचणें ह्म० मरणें, पंथलागणें ह्म० हाल, फजीती, इ० न होतां मरणें, उ० माझाएकदां पंथ लागला ह्म० मग पाठीमागें काय होणार तें होऊ. जाजा साधूनें जोजो ईश्वरप्राप्तीचामार्गस्थापिलाआहे तोतो वाच्य असतां तत्तत्साधूनाम पूर्वक याचा समास होतो, उ० ज्ञानेश्वरपंथ. नाथपंथ, कबीरपंथ, इ०

**पथ**, पु० पंथ·

**पंथा**, पु० पंथ·

**पंथाप्रश्न**, पु० ग्रामांतरादिकांस गेलेलें मनुष्यादिक येईल केव्हां असाजो जोशास प्रश्नकरितात तो, किं० त्याचें उत्तर तो·

**पथारी**, स्त्री० सरासरीपसरून निजायाचें असेंजें आंथरूण त्यास ह्म०·

**पथिक**, पु० वाटसरू·



**पंथी**, ३लिं० ज्ञानेश्वरपंथादि पंथानें वर्त्तणारा जोतो, परंतु तत्तन्नाम पूर्वकयाचा प्रयोग होतो, उ० तुह्मी ज्ञानेश्वरपंथी कीं नाथपंथी·

**पथ्य**, न० झालेलारोग शांतव्हावा, किं० रोगजडूं नये इत्याद्यर्थ अमुकच पदार्थ भक्षावे, अमुक सर्वथावर्जावे उष्णोदकानेंच स्नान करावें इ० रूपजो तत्तद्रोगानुसार भोजनादि नियमअसतो तें ; २, दुखणेकरी, बाळंतीण, इ० कांचे भोजनास ह्म०, उ० तुमचेंपथ्य झालें ह्म० मगहीमाचाघ्या ; ३, जाजा व्यापारादि विषयीं जोजो पदार्थ किं० क्रियाहितकारक तो त्यात्या विषयीं, उ० मातापितरें पुत्रास जें पथ्यअसेल तोउपदेश करितात, अंधार हा चोरांस पथ्यआहे, पथ्यावर-पडणें ह्म० हितावह होणें, पथ्याचा ह्म० पथ्यकर. किं० पथ्य आहे जास त्यास ह्म०·

**पथ्यकर**, ३लिं० पथ्य तृतीयार्थी·

**पथ्यकरी**, ३लिं० दुखण्यामुळें पथ्यभोजन करितो तो·

**पथ्यकारक**, ३लिं० पथ्यकर·

**पद**, न० पाऊल ; २ राजाद्यधिकाररूप जें स्थान तें, ३, वर्ग किं० घन यांचें जें मूल तें, उ० वर्ग ४, यांचें पद २, घन २७, याचें पद ३, प्रथमादिविभक्त्यंत, क्रियापद, अव्यय, इ० रूपजे वाक्याचे अवयव ते प्रत्येकीं ; ४ गाण्यांत कवित्वाचा भेदआहे ; ५ वृत्ताचे नघद अंश रूपजे चतुर्थांश पडतात ते प्रत्येकीं, मुळचेपदास येणें ह्म० प्रयत्नानें घाटास आलेली जी कांहीं गोष्ट किं० ऊर्जित दशापावलेला जो मनुष्यादिक त्याणें तो प्र

यत्न सर्वविफल होऊन मुळचे दशेस येणें ·

**पदक**, न० कंठी, कंठा, इ० कांचे मध्यभागीं सुव र्णाचें किं० जडताचें अश्वत्थ पत्राकार घालीत-असतात तें ·

**पदकमल**, न० कमलासारिखें कोमल आणि-शोभिवंत असें जें ईश्वरादिकांचें पाऊल त्या सम्ह० ·

**पदकृत्य**, न० कांहींएक अर्थाचे लक्षणांत जीं विशेषणादि रूप अनेक पदें असतात त्यांचें अव्याप्त्यादि दोषपरिहार रूपजें त्या त्या पदाचें असाधारण प्रयोजन तें ·

**पदच्छेद**, पु० संहितारूप जो ग्रंथ त्याचे पोटचे पदरूप जे विभाग ते भिन्न भिन्न होत असाम ध्येंमध्यें करितात जो खंड तो ·

**पदच्युत**, ३ लिं० राजाद्यधिकार पदापासून जो भ्रष्ट झाला तो ·

**पदभ्रष्ट**, ३ लिं० पदच्युत ·

**पदयोजना**, स्त्री० श्लोकादिकांत अर्थ, रस, छंद, प्रास, इ० काव्यगुणास अनुगुण जी पदां ची योजना ती ·

**पदर**. पु० वस्त्राचें दोहोंशेवटांचे दोन अंश ते प्रत्येकीं; २, त्याच पदरास रेशीम, कलाबतू इ० कानें कांहीं निराळा विचित्रप्रकार केला असतो तो ३, वस्त्र, दोर, माळ, इ० घडी इ० रूपानें दुहेरी तिहेरी इ० दशा पावलें असतां त्याचे दोन तीन इ० संख्याक जे अवयव ते प्रत्येकीं; ४, कोणे काचा कोणे काशीं साक्षात् किं० परंपरेनें झा लेला जो योनिसंबंध तो; ५, पडदा तृतीयार्थी ६, स्वसत्ता संबंधरूप जें कांहीं अधिकरण आहे यत्संबंधाक्रांत पदार्थ आला असतां आपला असा होतो तो या अर्थीं प्रयोग प्राय: प्रथमांत नाहीं उ० आपले पदरचा माणूस आऊं देऊं नये भाताचें माप तुह्मीं आपले पदरीं घ्या; ७, पदरीं पडोन आपलें जालें असें जें द्रव्य तो परंतु जा व्यवहारीं तें आपलें जालें तदितर व्यवहारीं त्याचे व्ययाची गोष्ट बोलायाची असतां याचा प्र० होतो, उ० आह्मी प्रस्तुत पदर मोडून खातों त्या व्यवहारांत पदर भरीस घालावा लागला;

पदरचा म्ह० भाषण, लेखन, इ० प्रसंगीं मूलक भास नसतां आपले कल्पनेनेंच कल्पिलेला जो अर्थ तो, उ० त्यानीं आज्ञा केली तसेंच मी तुह्माला सांगीतलें यांत कांहीं माझे पदरचें नाहीं; प्रतीचीं अशुद्ध काय असतील तीं असोत पदरचीं मात्र घालूं नका; ८, रा० स्त्रियांचे प्रथम रजोदर्शनास म्ह०, पदर घालणें म्ह० मुलगी दाहा अकरा वर्षांची जाली म्ह० खांद्यावरून पदर येई असा नेसण्याचा प्रकार आहे. तत्प्रारंभरूप संस्कार करितअसतात तो करणें, पदरास खार लागणें म्ह० कांहीं व्यवहारीं पदरचें कांहीं द्रव्यादि खरचणें. पदर फाडून देणें म्ह० काडी मोडून देणें, पदर टाकणें म्ह० आपणास ती जाण्याविषयीं निश्चय केला एतज्ज्ञापनार्थ डोसकीवरचा पदर खांद्यावर घेणें, पदर टाकणें, पालणें, म्ह० दूरस्थित मनुष्यास स्वसन्निहित येण्याविषयीं वस्त्रानें खुणावणें, पदरीं धरणें म्ह० कांहीं आप

ली गोष्ट खोटी बोलिला असतां खरी करून दे ह्मणून त्याचा गळीं पडणें, किं० चोर इ० कास मुद्यापत्यानिशीं धरणें, डोकीवर पदर येणें ह्म० विधवा होणें, किं० कांहीं अप्रतिष्ठा आल्यामुळें बाहेर तोंड दाखवायास नाहीं अशी दशा प्राप्त होणें आक्षेपविषयीं प्र०, उ० शेजारणीने शिंदळकी केली ह्मणून माझे काय डोकीवर पदर येणार आहे याअर्थीं नाकावर. किं० तोंडावर पदर येणें असें ही ह्म०, ह्म० पदरीं पडलें पवित्र जालें, आपण करीसो काम पदरीं असेल तो दाम, पदर पसरणें ह्म० कांहीं एक गोष्टी विषयीं परम काकळूत करणें·

**पदरकर**, स्त्री० कों० पदरकरीण·

**पदरकरीण**, स्त्री० जिला नहाण आलेलें नाहीं आणि पदर मात्र घातला आहे किं० पदर घालायाचे योग्यतेस आली आहे अशी जी स्त्री ती·

**पदरचना**, स्त्री० पदयोजना.

**पदरमोड**. स्त्री० संसारकृत्यास वार्षिकादि कांहीं चालता लाभ नसल्यामुळें किं० कांहीं एक व्यवहारीं खर्च भागायाजोगता लाभ नसल्यामुळें पदरचे द्रव्याचा व्यय करावा लागतो ती.

**पदलालित्य**, न० अर्थबोध नहोतांही केवल शब्दश्रवण मात्रें करून चमत्कार वाटावयाजोगी श्लोकादिकांत प्रासादिविशिष्ट पदांची योजना असती तें·

**पदवी**, स्त्री० राजा, प्रधान, इ० अधिकाररूप जें स्थान ती·

**पदार्थ**, पु० आहे किं० नाहीं असें ह्मणायास यावया जोगा जो अर्थ तो, त्यामध्यें प्रकार सात द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष, समवाय, अभाव, ;२, पदाचा जो अर्थ तो ;३, भोज्य, पक्वान्ने, इ० जीं भक्ष्यें केलीं असतात तीं प्रत्येकीं केवल प्राकृत व्यवहारीं वृक्ष, पाषाण, वस्त्र, अलंकार, इ० अचेतन मूर्त जे पदार्थ त्यांचे ठायीं प्रसिद्ध त्यांतही रुपया इ० नाण्यावर तशीप्रसिद्धि नाहीं तूं काय पदार्थ आहेस त्याचा काय पदार्थ आहे इ० स्थलीं गण्य कोटींत गणायाची योग्यता नाहीं असा भाव होतो, गाणें ह्म० एक पदार्थ आहे इ० स्थलीं पदार्थ सामान्य कोटींत परिगणनीय गाणें नव्हे विशेष कोटींत परिगणनीय आहे असा भाव.

**पदें**, न० गवतांत एक भेद आहे·

**पदोपदीं**, अ० प्रतिपदाचा ठायीं, उ० त्यानें श्लोकांत पदोपदीं दोष दिल्हे, हें पोर मला पाऊल टाकूं देत नाहीं पदोपदीं अडवितें;२ ला० कार्यमात्राचे प्रत्यवसराचे ठायीं; उ० तूं मला पदोपदीं बोलूं लागलास तर मी चाकरी करणार नाहीं·

**पद्धत**, स्त्री० कांहीं एक कार्य करण्याचा याया प्रकारें असें असें करावें असा जो एक मार्ग असतो ती·

**पद्धति**, स्त्री० पद्धत·

**पद्म**, न० कमल ;२, शतकोटि रूप जी संख्या तें ३. सर्पाचे फणीवर जें दशांकचिन्ह असतें तें

**पद्मकाष्ठ**, न० एक ओषधीला कूड आहे·

**पद्मराग**, पुं० सं० एक रत्न आहे जास लाल म्ह०.

**पद्महस्ती**, ३ लिं० जाणें कोणेकास आरोग्य करण्याविषयीं किं० विद्यासांगण्याविषयीं इत्याद्यर्थ हातीं धरलें असतां आरोग्यादिद्वारा त्याचें बरें होतें अशा देवाचा जो पुरुष असतो तो.

**पद्मासन**, न० बसण्याचा एक भेद आहे; २. पु० सं० ब्रह्मदेव.

**पद्मिनी**, स्त्री० सं० स्त्रियांत रूपगुण इ० कांवरून भ्र भेद कामशास्त्रांत सांगीतले आहेत त्यांतील सर्वोत्कृष्ट जो भेद ती; २. कमलिनी.

**पद्मीण**, स्त्री० पद्मिनी प्रथमार्थी; २. साधारण सुंदर स्त्रियेस स्तुतिप्रसंगीं म्ह०.

**पद्य**, न० सं० श्लोक.

**पद्या**, पु० ब्राह्मणांत एक भेद आहे.

**पंधरवडा**, पु० पंधरादिवसांचा जो समुदाय तो.

**पंधरा**, ३ लिं० १५.

**पंधें**, न० दे० पंदें.

**पनस**, पु० सं० फणस.

**पनळ**, पु० पन्हळ.

**पनळी**. स्त्री० पन्हळी.

**पनाळीरुपया**, पु० रुपयांत एक भेद आहे.

**पन्ना**, पु० एक हिरवा मणि आहे.

**पन्नाशी**, स्त्री० पन्नास पदार्थांचा समुदाय ती.

**पन्नास**, ३ लिं० ५०.

**पन्याकार**, पु० कों० भाजी इ० पदार्थ मिष्टव्हावा म्हणून हिंग, जिरें, मिरें, इ० कांनीं जे अनेक संस्कार करावे लागतात ते; किं० भोजन गोड लागावें म्हणून शाकभाजी इ० अनेक उपचार करावे लागतात ते प्रयोग अने० व०.

**पन्याळ**, पु० दे० पन्हाळ.

**पन्याळी**, स्त्री० दे० पन्हळी.

**पन्हळ**, पु० विवक्षित स्थळीं पाणीं आवें म्हणून लांकूड, दगड, इ० पोखरून मार्ग करितात तो; २. दोहींकडे उंच वटा आणि मध्यें खोलगट असा लांबट आकार भूमि, पाठ, इ० कांवर आला असतां त्यास म्ह०.

**पन्हळी**, स्त्री० अरुंद जो पन्हळ ती; २. पन्हळीनें वाहतें जें पाणीं ती; ३. पन्हळीच्या पाण्यासारिखा वृक्ष, मनुष्य, इ० कांचा शरीरापासून जो रस, रक्त, इ० कांचा प्रवाह चालतो त्यास म्ह०; उ० तोंड आलें तेव्हां सात दिवस लाळेची एकसारिखी पन्हळी लागली होती.

**पन्हा**, पु० वस्त्राची जी रुंदी तो.

**पन्हाळ**, पु० गच्ची इ० कांचें पाणी बाहेर आवें म्हणून जा ताम्रादिकांच्या नळ्या लावितात तो; २. स्त्री० पन्हळ पाठीस पडतो ती.

**पन्हाळी**, ३ लिं० रुपयांत एक भेद आहे.

**पन्हें**, न० आंबा, चिंच, इ० कांचें आंबट पाणीं करून त्यामध्यें गूळ, शर्करा, घालून जें प्यावयास करितात तें.

**पन्हेरी**, स्त्री० उष्णकालीं आल्यागेल्यानें पाणी प्यावें यासाठीं मार्गादिकांवर जें जलस्थान करितात ती; २. दे० कितीएक बीजांचें उपटून अनेकस्थळीं लावायाकरितां एके ठिकाणीं जें रोप करितात ती.

**पपय्या**, पु० हिं० पोपया.

**पपिता**, पु० एकओषधीवृक्षआहे·

**पय**, न० सं० दुग्ध,२,उदक·

**पयस्विनी**, स्त्री० सुवासिनीमरणपावलीअसतां वृषोत्सर्गस्थानीं जी गायब्राह्मणास देतातनी २; पुष्कळदूधजिलाअसनेंअशीजीगायती·

**पयोधर**, पु० सं० स्तन;२, मेघ·

**पर**, ३लिं० सं० इतर;२,आत्मरूप किं० आत्मीय रूपनव्हे तो, उ० आत्मज्ञान्यास देहहापरसावा टतो, पुत्रस० आपला आणि शिष्य स० पर अ शी बुद्धि गुरूची असत नाहीं;३, आजाअर्था कडे जामनुष्यादिकांचें,किं० भाषणादिकांचें मु ख्यत्वेंकरून लक्ष्यअसतें तोमनुष्यादिक,किं० भाषणादिक त्यात्या अर्थाविषयीं तत्तदर्थवा चक शब्दपूर्वक समासीं प्रयोग होतो, उ० उद्यो ग परमनुष्यास यादग्यागोष्टी आवडत नाहीत ज्ञान परशास्त्र तुह्मीं कर्मपरलावूंह्मणतांतर लागणार नाहीं सभ्यपुरुष लोकनिंदा परभा षण बोलत नाहींत;४, सं० परम;५, शत्रु;६, पु० पीस;७, प्रकार, उ० याचाबोलण्याचीपर निराळी त्याचे बोलण्याचीपरनिराळी, पंचवीस परीकराव्यालागतात तेव्हां हाजेवितो;८,३लिं० संप्रदायिक जातव्हा तद्दिलक्षण तव्हेंचाजो य स्त्र, पक्षी, इ० पदार्थ तो;९, अ० पलीकडे, उ० ई श्वरस्वरूप मायेचेपरआहे;१०; पणयाअव्ययरूपार्थी

**परकर**, पु० लाहानमुलीस नेसायास शिवून वस्त्र करित असतात तो·

**परकळा**, पु० वस्त्रभेदआहे·

**परका**, ३लिं० आत्मीयत्वें करून विवक्षित नव्हे जो मनुष्यतो·

**परकायप्रवेश**, पु०सं० मंत्रादिसिद्धीनें आपला कूडसोडून दुसरे कोणेकाचे प्रेतांत प्रवेश करि तात तो·

**परकाळा**, पु० परकळा·

**परकाळें**, न० दे० परकाळा·

**परकी**, ३लिं० परका·

**परकीय**, ३लिं० सं० आत्मसंबंधी नव्हे असाजो पदार्थ,गोष्ट,इ० तो·

**परकीयभाव**, पु० परकीयपणा

**परकीया**, स्त्री० सं० दुसऱ्याची जी स्त्री ती·

**परकोर**, पु० दे०परकर·

**परगणा**, पु० किल्ला, किं० मोठें शहर याचे नाया खालीं चालतात जे भूविभागरूप देश ते प्र० तो;२, ला० कांहींएककामाचें फारच मोटें खटलेंपडलेंअसतें त्यास ह्म०·

**परचक्र**, न० सं० एकराजाचे राज्यांत इतरराज कृत ओ उपद्रव तें·

**परचुरण**, न० रेजगण·

**परज**, पु० तलवारीचीजी मूठ तो·

**परजणें**, तलवार, पट्टा, इ० मुठींतधरून कंपित होई अशीहालविणें किं० सभोंवतीं फिरविणें·

**परटीण**, स्त्री० एकपारवरू आहे·

**परटीस**, अ० परटाकडे धुवायास वस्त्रें देणें. घा लणें, पाधातूंवर अन्वय·

**परडी**, स्त्री० लाहानसें वेत्रपात्र आहे·

**परडें**, न० तागडीचा दांडीचे दोहीं शेवटांस दोनवे कू, लांकूड, किं० ताम्रादिधातुयाचीं पात्रें जीं बांध लीं

लींअसतात तीं प्र०;२,गृहाचेसमीप कुंपणाचे आंत शाकभाजी किं० फुलझाडें करायाकरितां जीजागा राखिली असती तें, कोणेकाचें परडें जडहोणें,चढणें, इ० स्थलीं विद्याद्रव्यादि मूलक योग्यताचढणें,किं०अभिमानचढणें असाअर्थ जाणावा. परडें बसणें किं० उतरणें इ०स्थलीं योग्यता,किं०अभिमानउतरणें असाअर्थ एकेताग डीचीं परडीं आहेत एथे हे लबाडी इ० दुर्गुणाविषयींसमानयोग्यतेचे दोघेजण असाअर्थहोतो.

**परत**, अ०जिकडून आलें तद्विपरीत गतीनें पुनः तिकडेहोईअसें येणें, जाणें, देणें, करणें, टाकणें, इ०क्रियांचें वि०, परतगोष्टसांगणें इ० स्थलीं उलटून गोष्टसांगणें असाअर्थ.

**परतअहेर**, पु० आपल्यास कोणी अहेर केलाअसतां त्यास आपणजो अहेरकरितों तो.

**परनकूळ**, न०जाघरीं आपलेघरची मुलगी दिली ती जीवंतअसतां त्या घरचीमुलगी आपलेघरीं करण्याचा जोप्रकार तें.

**परतणी**, स्त्री० भूम्यादिकांचाठायीं एक्याअंगावर स्थितजोपदार्थ त्याचा दुसरे अंगावर परतण्याचाजोव्यापार ती.

**परतणें**, परतकरणें होणें, देणें येणें, जाणें,इ० २; भूम्यादिकांचाठायीं एक्याअंगावर स्थित जो पदार्थ तो दुसरेअंगावर करणें,किं० इकडचा तिकडे तिकचा इकडे असाकरणें, उ० भाकरी सुटली स्प० परताची, जोडा डावेपायांचा उजवेपायांत उजवेपायांचा डावेपायांत असानित्य परतीनअसावें स्प० सारख्याझिजतो,३,सिद्धतेस आले ली गोष्ट इ० विपरीत भावपावे असेंकरणें उ०अर्थलिहिलाहोता परंतु दोषआला म्हणून परतला;४, मनुष्यादिकानें धृतनिश्चयानेंसोडून विपरीत भावानें पावणें;५. संवत्सर,दशा इ०पूर्वस्थित सोडून दुसरें प्रवृत्त होणें,दुपार मध्यरात्र, इ० परतणें स्प० अतिक्रांत होणें, मनुष्य स्वभावादिकानें पूर्वस्थितितें सोडून स्थित्यंतरातें पावणें.

**परतंत्र**, १लिं०सं० दुसऱ्याचेजो स्वाधीन तो;२, सं० स्त्रियाभर्तृ परतंत्र इ०स्थलीं समासीं भर्त्रधीन असाअर्थ होतो.

**परतभाडें**, न० भाडेकरी भाडें पोंहोंचवून मागें स्वस्थानीं जाण्याचे प्रसंगीं जें तिकडचेंच भाडें पतकरितो तें.

**परतवण**, न०द्विरागमन.

**परतवेल**, स्त्री० परतकूळ.

**परतवेळ**, स्त्री० दुपार परतल्यावरची जीवेळ ती.

**परता**, अ० पलीकडे;२,भाषणांत औदासिन्यादि गम्यअसतां केवलवाक्यालंकारार्थ याचा प्रयोग होतो.उ० मलाजावेंना मी परता एथेंच राहतो.

**परतीर**, न० नद्यादिकांचें पलिकडलें जें तीर तें.

**परंतु**, अ० पूर्ववाक्यार्थ अंगिकारून त्यास दोषप्रतिपादनादिरूप विरुद्धवाक्याचा उपन्यास कर्त्तव्यअसतां मध्यें याचा प्रयोग होतो.

स परतून

**परतून**, अ० पुनरपि; परतून गोष्ट इ० सांगणें म्ह० उलटून गोष्ट सांगणें असा अर्थ आणावा.

**परत्वें**, अ० अनुरोधें करून याचा प्रयोग समासीं होतो; उ० कालपरत्वें, वयः परत्वें.

**परदेश**, पु० सं० स्वदेशाहून भिन्न कांहीं दूर जो देश तो; २, प्रवास.

**परदेशी**, ३ लिं० स्वदेश सोडून परदेशांत आला जो मनुष्यादि त्यास तेथें म्ह०; २, पु० हिंदुस्थानी, रजपूत, इ० लोकांस दाक्षिणात्य म्ह०.

**परदार**, न० सं० परवनिता किं० सामान्य वनिता यांशीं जो संग तें.

**परदारी**, ३ लिं० सं० व्यभिचारी पुरुष तो.

**परधन**, न० सं० कन्यारूप संतानास म्ह०; २, परानें जें धन तें.

**परंपरा**, स्त्री० सं० एकापुढें एक किं० एकामागें एक अशा क्रमानें अनेक संबद्ध पदार्थांची जी माला ती, वंशपरंपरा, वडिलपरंपरा, शिष्यपरंपरा, इ० शब्द आणावे.

**परंपरागत**, ३ लिं० सं० वंशादिपरंपरेनें चालत आली जी वृत्ति, आचार, इ० ती.

**परंपराविटाळ**, पु० परंपरास्पर्शजन्य जो विटाळ तो.

**परंपरासंबंध**, पु० सं० आपले संबंध्याशीं कोणे काचा संबंध आहे म्हणून त्याचा आपल्या जो संबंध तो.

**परंपरास्पर्श**, पु० सं० परंपरासंबंधानें जो स्पर्श तो.

**परपुरुष**, पु० सं० स्त्रियांस आपले पतीवांचून जो इतर पुरुष तो.

**परबाण**, न० जा काठीस शीड संबद्ध असतें अशी जी डोलकाठीवर चढवायाची काठी तें.

**परभारां, रा, रें, रे**, अ० गमनावसरीं जा मध्यवर्तिस्थला वरून जाण्याची संभावना असते त्या स्थलास चुकवून, आणें, येणें, या क्रियांचें वि०; उ० घरीं जाण्याची त्वरा होती म्हणून तुमचे घरीं न येतां परभारें मीं गेलों; २, कोणे कव्यवहार ज्या ज्या स्थलीं संबंध पावून होत असावा अशी योग्यता असतां त्या त्या स्थलीं संबद्ध न होतां; उ० मला न सांगतां त्यास तूं परभारें निरोप देऊं नको, तुमचे शत्रूचें परभारेंच पारिपत्य झालें; ३, आपले परोक्ष; उ० आपले परभारें आपल्यास कोणी शिव्या दिल्या तर त्याचा राग मानूं नये.

**परभुडा**, पु० निंदेनें परभूस म्ह०

**परभू**, पु० कायस्थ आणि पाठारे या दोन जातींचा जो मनुष्य त्यास म्ह० व त्या दोन जाती त्या प्र०

**परम**, ३ लिं० उत्कृष्ट, केवल प्राकृत व्यवहारीं हें क्रियाविशेषण, किं० विधिविशेषण प्रायः दिसत नाहीं.

**परममर्यादा**, स्त्री० कांहीं एक व्यवहार, शक्ति, इ० कांची केवल शेवटची जी मर्यादा ती.

**परमहंस**, पु० सं० संन्याशांत एक भेद आहे.

**परमा**, पु० एक धातुरोग आहे.

**परमाणु**, पु० सं० पृथ्वी, जल, तेज, वायु, यांचा केवल सूक्ष्म जो अंश आहून पुढें सूक्ष्मतेची कल्पना रहात नाहीं तो.

**परमात्मा**, पु० सं० सर्वव्यापी, सर्वसाक्षी, सच्चित्स्वरूप एक जो आत्मा तो.

**परमायु**, न० सं० योनिपरत्वें करून परममर्यादा जा आयुष्याचा आहे न तावत्पर्यंत जें आयुष्य तें.

**परमार्थ**, पु० सं० ईश्वरसाधनरूप जो पुरुषार्थ तो; २, कांहीं एक गोष्टींतील केवल खरा जो अंश असतो

तो तद्रूप जो अर्थ तो; उ॰ कवी वर्णनप्रसंगीं मुखा पेक्षां चंद्रास केवल तुच्छ करितात परंतु परमार्थ पाहतां मुखतें मुख आणि चंद्र तो चंद्रच.

**परमार्थबुद्धि**, स्त्री॰ सं॰ कपटादिरहित भावार्थरूप जी बुद्धि ती.

**परमार्थी**, ३ लिं॰ सं॰ ईश्वरसाधनरूप परमार्थाकडे जाचें प्रपंचापेक्षां विशेष लक्ष्य तो; २, भावार्थी.

**परमावधि**, पु॰ स्त्री॰ सं॰ परममर्यादा.

**परमें**, न॰ परमा.

**परमेश्वर**, पु॰ सं॰ जगदीश्वर.

**परलोक**, पु॰ सं॰ पुण्यपाप, तारतम्यानें मेल्यानंतर प्राप्त होणारे जे स्वर्ग, नरक, इ॰ तो.

**परवचा**, पु॰ साळेंतली मुलें सायंकाळीं धुळाक्षरांचा पाठ ह्मणतात तो; २, रा॰ ला॰ संसारकृत्यादि संबंधी झालेल्या गोष्टी ऐकणारास कंटाळा येई तों कोणी पुष्कळपणीं सांगूं लागला असतां त्या गोष्टीस ह्म॰.

**परवंट**, पु॰ मुली नेसलेवस्त्राचाच कांहीं पदर उरवून तो त्या नेसणावरून कंबरेभोंवता गुंडाळितात असा नेसण्याचा प्रकार तो.

**परवंटी**, स्त्री॰ परवंटानें नेसायाचें दशेंत जी मुलगी ती.

**परवड**, स्त्री॰ या॰ पत्याकार द्वितीयार्थी; २, परवचा; ३, दे॰ दुर्दशा; उ॰ मीं घरीं नव्हतो ह्मणून मासे संसाराची परवड झाली; ४, कों॰ थर; उ॰ शंभर परवडींनी ही भिंत तयार होईल.

**परवडणें**, पुरवणें प्रथमार्थी.

**परवणें** ग॰ कन्हणें.

**परवता**, पु॰ परवचा

**परवर**, न॰ एक भाजीचें फल आहे; २, स्त्री॰ त्याची वेल.

**परवश**, ३ लिं॰ सं॰ परतंत्र.

**परवा**, स्त्री॰ कोणेक पदार्थादिकाचा ठायीं यास जपलें पाहिजे एतदनुरोधानें वर्तलें पाहिजे इ॰ रूप जो उत्कृष्टताग्रह असतो ती; उ॰ हे जेव्हां भांगेचे कैफांत गुंग होतात तेव्हां राजाचीही परवा बाळगीत नाहीं; प्रायः निषेधविषयीं प्र॰; २, कोणे गोष्टीविषयीं ही गोष्ट कशी निभावेल इ॰ रूप जी चिंता वाटत्ये ती; उ॰ हें काम तुमचें मला पावलें तुह्मी परवा बाळगूं नका.

**परवां**, अ॰ वर्तमान दिवसापासून एक दिवसानें व्यवहित पूर्वदिवशीं किं॰ उत्तरदिवशीं; २, स्त्री॰ न॰ तो दिवस; उ॰ तूं परवां देईन परवां देईन ह्मणतोस पण अशीं शंभर परवां गेलीं; हें पोर परवांचें आणि फार बोलतें इ॰ स्थलीं अल्पकालाचें उपलक्षण होतें.

**परवाजा**, पु॰ कों॰ परवचा.

**परवाणगी, परवानगी**, स्त्री॰ राजादिकांपासून कोणेक कार्य करण्याविषयीं मागून घेतलीजी आज्ञा ती.

**परवानगीबरदार**, पु॰ कोणेकास परवानगी घेवुन देण्याचे कामावर श्रीमंत लोकानीं कोणी सेवक ठेविला असतो तो.

**परवार**, अ॰ जाणें, याचायोगीं प्र॰ व्यालेली गोमहिष्यादिक फळायाचे पडणास नफकतां राहणें.

**परवारी**, पु॰ महार.

**परव्हा**, पु॰ मूल केवळ लाहान असतांच त्याची माता

पुनः गरोदर राहिली असतां तिनें दुग्ध पाजिल्यामु ळें मुलास रुखवशी लागले तो.

**परव्हां**, अ० स्त्री० परवा.

**परश**, पु० परशु.

**परशु**, पु० सं० शस्त्र आहे.

**परशुराम**, पु० सं० विष्णूचे दशावतारांतील साहावा अवतार तो.

**परशुरामक्षेत्र**, न० सं० दक्षिणेस गोकर्ण, उत्तरेस वि मलनिर्मल, पूर्वेस सह्याद्रि, पश्चिमेस समुद्र, एत न्मध्यवर्ती जो देश तें.

**परस**, न० परडें ह्या अर्थी; परसांतील भाजी म्ह० जास आत्मसात् करायास विशेष प्रयत्न नलागे तसा जो शत्रु इ० त्यास म्ह०.

**परसदार**, न० मागील दार.

**परसा**, पु० शीतनिवारण किं० भिजलेलें वस्त्रादि शे कणें इ० अर्थ जो चुलीवांचून इतरत्र भूमीवर अ ग्निपेटवितात तो.

**परसाकड, परसाकडे, परसाकडेस**, अ० मल विसर्गार्थ जाणें, बसणें, इ० क्रियांचें विशेषण; २, स्त्री० न० मलाची बाहेर पडायासाठीं अपान द्वा राकडे गति होउं लागत्ये तें.

**परसूं**, न० परस.

**परस्त्री**, स्त्री० सं० आपले स्त्रियेवांचून इतर दुस र्याची जी स्त्री: जिशीं संग केला असतां व्यभिचा र दोष घडतो ती.

**परस्पर**, ३ लिं० सं० याणें त्याजवर उपकारादि करावे त्याणें याजवर करावे अशा प्रकारानें उपकारकरण कलह, युद्ध, इ० क्रियांचा ठायीं प्रवृत्त जे उभयतां ते; उ० परस्परांनीं परस्परांचे तोंडांत मारिली, हे परस्पर सखे आहेत म्ह० याचा तो सखा त्याचा हा सखा; २, ताद्दशरीतीनें केलेला जो कलह, स्नेह, इ० तो; उ० यांचें परस्पर वैर आहे; ३, अ० परभारें; ४, याणीं एकमेकास परस्पर चावलें इ० स्थलीं क्रियाविशेष ण ही होतें.

**परस्परां, परस्परें**, अ० परस्पर तृतीय चतुर्थार्थी.

**परस्वाधीन**, ३ लिं० सं० परतंत्र; म्ह० परस्वाधीन जिणें आणि पुस्तकीं विद्या उपयोगी नाहीं.

**परळ**, पु० मृत्तिकेचें पात्र आहे, आजवर तव्याचे अ भावीं भाकरी भाजता येतात इ० उपयोगी पडतो तो; २. एक झाड आहे.

**परळी**, स्त्री० लाहान ओपरळ ती.

**परा**, स्त्री० सं० केवलसूक्ष्म सकल शब्दांचें बीजभूत असें जें योगगम्य शब्दस्वरूप आहे ती.

**पराई**, स्त्री० तारुण्य आणि वार्धक्य अशा दोन अ वयोवस्था त्या प्र०; उ० चढती पराई आणुन उत रती पराई लागली.

**पराकाष्ठा**, स्त्री० सं० कांहींएक गोष्टीचे अतिशयित पण्याची शेवटची जी दशा, जी पुढें अतिशय हो ण्याची मर्यादा राहिली नाहीं ती; यंदां पराकाष्ठा स्वस्ताई आली इ० स्थलीं स्वस्ताईची पराकाष्ठा आली किं० पराकाष्ठेची स्वस्ताई आली असें ता त्पर्य.

**पराक्रम**, पु० सं० लोकानीं वाहवा म्हणाया जोगें जें प्रबल शत्रूचा पराजय विपुलधन संपादन इ० अ साधारण कर्म त्याचा निर्वाह व्हावयाजोगा पुरुषा दि चेतनाचेतन सर्वपदार्थाचे अंगीं जो सामर्थ्यविशेष

असतो तो; २, त्याची अभिव्यक्ति त्या रिपुपराजयादिकर्मेंकरून होत्ये ह्मणून त्याकर्मास ही ह्म०.

**पराक्रमी**, ३ लिं० सं० पराक्रम आहे ज्याचे अंगीं तो.

**पराग**, पु० सं० पुष्पांतजें बारीक चूर्ण असतें तो.

**परागंदा**, ३ लिं० आपलेंजें गांव, घर, वतन, शेत, इ० तें कांहीं कारणामुळें सोडून तेथील वस्तीमोडून ग्रामांतरास किं० देशांतरास गेलाजो तो; होणें, असणें, इ० धा० योगीं प्र०; उ० आह्मी दाहावर्षें परागंदा होतों ह्मणून वतनाचा भोगवटा आह्माकडे नव्हता.

**पराङ्मुख**, ३ लिं० सं० तोंडमागें फिरविलें आहे ज्याणें तो; २, ला० कोणेक विषयाची किं० कार्याची वाटसोडली तो त्यापासून.

**पराजय**, पु० वाद, युद्ध, इ० कामध्यें दुसऱ्याचा उत्कर्ष होउन आपल्याकडे अपकर्ष येतो तो.

**पराजित**, ३ लिं० सं० ज्याचा पराजय जाला तो.

**परात**, स्त्री० ताटाचा आकाराचें धातूचें पात्र आहे.

**पराधीन**, ३ लिं० सं० परस्वाधीन.

**परान्न**, न० सं० अन्यस्वामिक जें अन्न तें; ला० अन्यस्वामिक अन्नाचें भोजन तें; उ० आज परान्न आलें त्यामुळें पथ्याचा विचार राहिला नाहीं.

**पराभव**, पु० सं० पराजय.

**पराभवणें**, पराजित करणें.

**पराभूत**, ३ लिं० सं० पराजित.

**परामर्श**, पु० सं० आपले स्वकीयजन किं० गोरगरीब इ० कांस कोणास काय पाहिजे कोणास काय विपत्ति आहे तें जाणून घेउन स्वसामर्थ्यानुसार पाहिजे तें देणें किं० विपत्ति दूर करणें इ० आचरणाचा जो प्रकार तो, करणें, घेणें, इ० धा० योगीं प्र०; २, सर्वनामादि सामान्य पदानें वाक्यप्रसंगानुरूप विवक्षितार्थाचें ग्रहण होतें तो; उ० जो पढतो तो सन्मान पावतो, एथे जो या शब्दानें उपात्त जो पढणारा मनुष्य त्याचाच तो या शब्दानें परामर्श होतो; ३, अनुमितीस कारणीभूत जें ज्ञान तो; पोळ्या इ० कांचा परामर्श घेणें ह्म० खाउन निःशेष करणें; चोरादिकांचा परामर्श घेणें ह्म० चांगली शिक्षा करणें.

**परामृष्ट**, ३ लिं० सं० परामर्श केला आहे ज्याचा तो.

**परायण**, ३ लिं० सं० परतंत्री यार्थी, याचा हा समासीं प्र०; उ० याचमनो वृत्ति नारायण परायण जाल्या.

**परार्ध**, न० सं० ब्रह्मदेवाचे आयुष्याचे जे दोन विभाग ते प्रत्येकीं संख्या १००००००००००००००००

**परावर्तन**, न० सं० कांहीं एक गोष्टीचा ठायीं जो प्रवृत्त त्यानें विमुख होउन मागें फिरण्याचा जो व्यापार तें.

**परावा**, ३ लिं० परका.

**परि**, अ० हा संस्कृत उपसर्ग आहे, शब्दाचे मागें लागला असता त्या त्या धात्वर्थाचें सर्वांशीं सर्वथाच हूं कडे इ० प्रकारें भजन अशा अर्थाचें द्योतन करितो, विशेष प्रसिद्ध शब्द आहेत ते लिहितों.

**परिखा**, स्त्री० सं० चर.

**परिगणन**, न० सं० कोणेक समुदायांतून विवक्षित कार्यार्थ कांहीं पदार्थ हा एक हा एक अशा प्रकारें मेजून घेण्याचा जो व्यापार तें.

**परिगणित**, ३ लिं० सं० परिगणन करून घेतलेला तो.

**परिगृहीत**, ३ लिं० सं० अंगीकृत; उ० ह्मांगीं शिष्ट

परिगृहीत आहे.

[प]रिघ, पु॰सं॰ कांहीं एकस्थलांत मनुष्यादि प्रतिबंधार्थ भोंवतालें भिंत किं॰ कुंपण इ॰ करितात तो; २, एक आयुध आहे; ३, सत्तावीस योगांतील एकुणिसाव्या योग तो.

परिचय, पुं॰सं॰ मनुष्यादिकांची परस्परें सहवासादिकामुळें पुरतेपणीं जी ओळख किं॰ कोणेक विषयाचें अथवा गोष्टीचें सेवनाद्यभ्यासामुळें यामध्यें याप्रकारचे गुण आहेत किं॰ हें याप्रकारें करावें लागतें इ॰ रूप ज्ञानसंस्कार होतो तो; २, दे॰ प्रत्यय.

परिचरण, न॰सं॰ सेवा.

परिचर्या, स्त्री॰सं॰ परिचरण.

परिचायक, ३ लिं॰सं॰ कोणेक अर्थाचें अन्यथात्व भ्रांतिपरिहारक जें कांहीं चिह्न असतें तो.

परिचित, ३ लिं॰सं॰ ज्याचा परिचय ज्यास झाला आहे तो त्याचा.

परिछिन्न, ३ लिं॰ कोणेक परिमाणानें किं॰ संख्येनें परिछेद झाला आहे ज्याचा तो; २, अ॰ ज्यांत अन्यथाभावाचा यत्किंचित् हि प्रवेश नठेवितां सांगणें इ॰ क्रियांचें वि॰; उ॰ तुला परिछिन्न बोलूनकों ह्मणून सांगीतलें असतां पुनः बोलतोस.

परिछेद, पु॰ कोणेक परिमाणादिकें करून कांहीं पदार्थाचें जें इयत्ताकरण तो; २, ग्रंथादिकांचे कांहीं प्रकरणादि संगतीनें भिन्नभिन्न केलेले जे विभाग ते अ॰.

परिछेदक, ३ सं॰ परिछेदकर्त्ता जो पुरुषादिक किं॰ परिछेदसाधन जें परिमाणविशेषादि तो.

परिजन, पु॰सं॰ सेवक.

परिणत, ३ लिं॰सं॰ परिणाम पावला तो; २, नम्र.

परिणय, पुं॰सं॰ विवाह.

परिणयन, न॰सं॰ विवाहमार्गानें जें स्त्रीचें ग्रहण तें.

परिणाम, पु॰सं॰ कोणेक पदार्थाचें किं॰ गोष्टीचें पूर्वरूप जाउन रूपांतररूप जी अवस्था होत्ये तो; उ॰ उदकाचा धूमरूप परिणाम होउन त्याचा पुनः पर्जन्यरूप परिणाम होतो; पापकर्माचा परिणाम नरक होतो, एथें कारणच फलादिरूपता पावतें असा सिद्धांत विवक्षित आहे.

परिणामशूल, पु॰सं॰ एक पोटस्त्रळांत भेद आहे, ज्याची अन्नपचन होउन पोट रिकामें होउं लागलें ल॰ वेदना होउं लागत्ये तो.

परिणीत, ३ लिं॰ विवाहित.

परितः, अ॰सं॰ सभोंवार चहूंकडे.

परितुष्ट, ३ लिं॰सं॰ संतुष्ट.

परितोष, पु॰सं॰ संतोष.

परित्यक्त, ३ लिं॰सं॰ सर्वथा जो त्यक्त तो.

परित्याग, पु॰सं॰ कोणेक गोष्टीचा किं॰ मनुष्याचा सर्वथा जो त्याग तो.

परिधान, न॰सं॰ नेसणें किं॰ पांघुरणें एतद्रूपें करून जें वस्त्राचें धारण तें.

परिधि, पु॰सं॰ कांहीं एक वस्तूचा जो सभोंवता घेर तो; २, कांहीं एक वस्तू भोंवता जो कशा एकाचा वेढा तो.

परिनाळिका, स्त्री॰ कोणेक कर्मामध्यें यापुढें हें करावें त्यापुढें अमुक करावें इ॰ रूप जो क्रम ती; २, ला॰ ऐकणारास कंटाळा यावयाजोगी लांबचलांब

जी गोष्ट तिला ह्म०; २, शालुंकेचा वरचें पाणी जाया स जो पनळासारखा अवयव करितात तो.

**परिपक्क**, ३ लिं० सं० पुरता जो पक्क तो.

**परिपक्कबुद्धि**, ३ लिं० सं० प्रौढबुद्धी तो.

**परिपाक**, पु० सं० पुण्यपापरूप कर्मांचा किं० अन्न, धान्य, फल, इ० कांचा पुरतेपणीं जो पाक तो.

**परिपाटी**, स्त्री० सं० परिनाळिका.

**परिपाठ**, पु० कोणेक गोष्ट करण्याची चाल चालत असले तो; उ० आमच्या त्यांने घरीं जाण्याचा परिपाठ नाहीं.

**परिपालन**, न० सं० सर्वांशीं जें पालन तें.

**परिपालित**, ३ लिं० सं० परिपालन केलें आहे तो.

**परिपीठिका**, स्त्री० सं० मूळपीठिका.

**परिपुष्ट**, ३ लिं० सं० सर्वांशीं जो पुष्ट तो.

**परिपूरण**, न० कांहीं एकाची न्यूनता परिहार करण्याचा जो व्यापार तें.

**परिपूर्ण**, ३ लिं० सं० परिपूरण झालें आहे तो.

**परिपूर्ति**, स्त्री० सं० परिपूर्णता.

**परिभाषा**, स्त्री० सं० लौकिक किं० शास्त्रीय जे भिन्नभिन्न व्यवहार त्यांचाठायीं प्रत्येकीं विधिव्यवस्थार्थ अमुकास अमुक ह्मणावें अमुक प्राप्त झालें असतां अमुक करावें इ० रूप जे शब्दादि विषयक नियमित संकेत निरनिराळे असतात ती, ती त्या त्या व्यवहाराची; २, ग्रंथप्रतिपाद्य व्यवहारांतील संकेत समजावा ह्मणून तद्विधायक जो ग्रंथांश असतो ती.

**परिमल, परिमळ**, पु० सं० सुगंध.

**परिमाण**, न० सं० हें एवढें, इतकें, अशा व्यवहास कारणीभूत जो पदार्थनिष्ठ संख्या भिन्न गुणविशेष असतो तें; २, तद्विशिष्ट पदार्थाचीं परिछेदक तोळा, पायली, गज, घटिका, इत्यादि साधन तें; ३, त्या साधनानीं तद्विशिष्ट पदार्थाचें जें परिछेदकरण तें.

**परिमार्जन**, न० सं० मलादि दूरीकरणार्थ जें प्रक्षालन; २, क्रोध, शोक, लज्जा, इ० कांचें कांहीं उपायें करून जें निरसन तें.

**परिमार्जित**, ३ लिं० सं० प्रक्षालित; उ० घडयाजा वस्त्रांचा रजक परिमार्जीत नितुक्या.

**परिमित**, ३ लिं० सं० कांही एक परिमाणानें जो मापलेला पदार्थ तो; २, ला० जितक्यास तितकें अतिरिक्त नव्हे जें भाषणादि तो.

**परियेसणें**, ग्रं० ऐकणें.

**परिवर्जन**, न० सं० कांहीं पदार्थादिकांचें सर्वथा जें वर्जन तें.

**परिवर्जित**, ३ लिं० सं० परिवर्जन केलें आहे तो.

**परिवार**, पु० सं० आपले पदरचे दासी, दास, चाकर, कारकून, इ० रूप जें रबटलें तो.

**परिवेष**, पु० सं० चंद्रास किं० सूर्यास खळें पडतें तो.

**परिवेषण**, न० सं० भोजनोपयुक्त पदार्थांनें पात्राव र घालण्याचा जो व्यापार तें.

**परिवेष्टित**, ३ लिं० सं० कांहीं एकाभोंवतालें परितः वेष्टित जें वस्त्रादिक किं० वस्त्रादिकानें परितः वेष्टित जो कांहीं पदार्थ तो.

**परिशीलन**, न० सं० शास्त्रादिकांचें अनेक प्रकारें जें अभ्यसन तें.

**परिश्रम**, पु० सं० कांहीं एक कामावर शरीरास कष्ट होत असें खपण्याचा जो व्यापार तो; २, तेणेंकरून होता

होतात असें कष्ट तो.

**परिष्कार**, पु॰ सं॰ लक्षणावर कांहीं दोष आला असतां विशेषण दानादि द्वारा त्या लक्षणाचें जें समर्थन तो.

**परिष्कृत**, ३ लिं॰ सं॰ परिष्कार झाला आहे ज्याचा तो.

**परिसंख्या**, स्त्री॰ सं॰ करणार नर एवढेंमात्र करावें अशा तात्पर्याचा जो कांहीं एक गोष्टीविषयीं विधि असतो ती; उ॰ अनध्यायदिवशीं खेळावें हा परिसंख्याविधि, याचें तात्पर्य खेळावें या अंशीं नाहीं अध्ययनदिवशीं सर्वथा खेळूं नये या निषेधांशीं आहे.

**परिसणें**, ग्रं॰ परियेसणें.

**परिस्फुट**, स्त्री॰ सं॰ गुप्त गोष्टीची जी प्रसिद्धि ती; २, ३ लिं॰ अर्थाविषयीं कांहीं गुप्तांश राहूं नये असें जें स्पष्ट भाषणादि तो; उ॰ असें आंवाकून आंवांकून कां बोलतां काय असेल तें चांगलें परिस्फुट बोला.

**परिस्फोट**, पु॰ सं॰ फलादिकांचा आंतील अंश बाहेर दिसूं लागे असें फुटण्याचा जो प्रकार तो; २, गुप्तांशाची जी फोड तो.

**परिहार**, पु॰ सं॰ दोष, संकट, इ॰ कांचें जें दूरीकरण तो.

**परिहार्य**, ३ लिं॰ सं॰ परिहार करायास योग्य जें दोषादिक तो.

**परिहास**, पु॰ सं॰ थट्टा, मस्करी, इ॰ जो विनोद तो.

**परिहृत**, ३ लिं॰ सं॰ परिहार झाला आहे ज्याचा तो दोषादिक.

**परिज्ञात**, ३ लिं॰ सं॰ पुरतेपणीं जो जाणला किंवा ओळखिला तो.

**परिज्ञाता**, ३ लिं॰ सं॰ परिज्ञान आहे ज्यास तो.

**परिज्ञान**, न॰ सं॰ कांहीं गोष्टीचें किं॰ पदार्थाचें पुरतेपणीं जें ज्ञान किं॰ ओळख तें.

**परी**, अ॰ स्वस्वबुध्यनुसार किं॰ स्वस्वयोग्यतानुसार; उ॰ मी आपले परी काय सांगायाचें तें सांगीतलें, वडील वडिलांपरी बोलणार लेंकरें लेंकरांपरी छळणार; २, तद्रूपें करून तो अशा प्रकारें कोणेक अर्थाची विवक्षा असतां याचा प्र॰ होतो; उ॰ पैक्यापरी पैका खर्च झाला बायकोपरी बायको मेली; घरांत नको काय तांदुळांपरी तांदुळ पाहिजेत तुपापरी तूप दुधापरी दूध पाहिजे अचवें पाहिजे; ल॰ बापापरी बाप गेला बोंबलतां ओंठ गेला; ३, परंतु या अर्थी ग्रंथीं प्र॰; ४, परस्पर अर्थाचें जें सादृश्य त्याचें वाचक हें अव्यय; उ॰ अलाप्रभुहि सेवका भजा सिरवा सदारापरी; ५, स्त्री॰ प्रकार, यापरी, त्यापरी, इ॰ स्थलीं याप्रकारें त्याप्रकारें असा अर्थ होतो; ६, तोंड मनुष्याचें, अंग पशूचें, पुच्छ मयूराचें असें सपक्ष जें चित्र करितात ती.

**परीट**, पु॰ लोकांचीं वस्त्रें धुवून उपजीविका करणारी अशी जाति आहे.

**परीटघडी**, स्त्री॰ परीट वस्त्र धुवून त्याची घडी घालितो ती; २, ३ लिं॰ तद्विशिष्ट तें वस्त्र तो.

**परीप्रकारचा**, ३ लिं॰ नानाप्रकारचा.

**परीप्रकारें**, अ॰ नानाप्रकारें.

**परीस**, पु॰ एक पाषाण आहे, ज्याचे स्पर्शानें लोहाचें सुवर्ण होतें; २, सौंदर्यादि गुणानीं उत्कृष्ट जो मुलगा, इ॰ त्यास आरोपानें विधान करितात; ३, अ॰

अधिक, उणा, चांगला, वाईट, दूर, जवळ, लांब, आंखूड, इ॰ कांचें सांवधिकत्वें करून कथून कर्तव्य असतां अवधिभूतापुढें याचा प्रयोग होतो; उ॰ या मुलापरीस हामूल चांगला, इ॰.

परीक्षक, ३ लिं॰ परीक्षा करण्यामध्यें जो कुशल तो.

परीक्षणें, कोणेक पदार्थ किं॰ गोष्ट हा अमुक किं॰ यामध्यें असुक गुण आहेत, अमुक दोष आहेत, अ. शा प्रकारानें जाणणें.

परीक्षा, स्त्री॰ सं॰ परीक्षण्याचा जो व्यापार ती; २, नद्विषयीं जें बुद्धिकौशल असतें ती; उ॰ मला रुपयांची परीक्षा नाहीं, तूं खरा खोटा सराफास दाखीव.

परीक्षित, ३ लिं॰ परीक्षा जाची झाली आहे तो.

परूस, न॰ परसूं.

परूसदार, न॰ परसदार.

परोचा, परोता, पु॰ परवचा.

परोपकार, पु॰ दुसर्यावर जो उपकार तो.

परोपकारी, ३ लिं॰ परोपकार करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

परोपरी, अ॰ नानाप्रकारें.

परोक्ष, अ॰ सं॰ असमक्ष.

पर्जन्य, पु॰ सं॰ मेघापासून पडतें जें उदक तो, हा बोलूं लागला ह्मणजे पर्जन्य पाडतो ह्म॰ त्वरित आणि पुष्कल असें बोलतो, पुष्पाचा पर्जन्य इ॰ स्थलीं पुष्पादिकांचा पर्जन्यवत् पात असा अर्थ होतो.

पर्जन्यकाळ, पु॰ उन्हाळा आणि हिंवाळा यांचे मधला चातुर्मास्यात्मक पर्जन्य पडायाचा जो काळ तो.

पर्ण, न॰ क्रमानें बारीक होत गेलेली अशी मध्यें मोठी शीर पाठीचे कण्यासारिखी असते आणि तिचे दोहों अंगानीं अस्थिपंजरासारिखे तुल्य अवयव विभाग असतात, असे जे वृक्षावयव विशेष तें.

पर्णकुटी, स्त्री॰ सं॰ वरपर्णानेंच आच्छादन करून केलेलें जें लहानसें घर ती; २, लहान जें तृणादिकानें घर त्यास गाईसगायरुं ह्मणणें असा कांहीं एक बोलण्यांत दुबळेपणाचा डौल आहे त्या डौलानें ह्म॰

पर्णणें, पुरुषानें पत्नीत्वेंकरून स्त्रीतें, किं॰ स्त्रीनें पतित्वेंकरून पुरुषातें, विवाहधर्मानें स्वीकृत करणें.

पर्णबीज, न॰ एक औषधी आहे, जिचा पानास च अंकुर फुटून झाडें होतात तें.

पर्णशाला, स्त्री॰ सं॰ पर्णकुटी.

पर्वाण, न॰ परवाण.

पर्यंक, पु॰ सं॰ मंचक.

पर्यटन, न॰ सं॰ विवक्षित देशीं इकडून तिकडे तिकडून इकडे किं॰ सभोंवार इ॰ अनेक गतीनीं फिरण्याचा जो व्यापार तें.

पर्यंत, पु॰ जेथें पदार्थाचें अस्तित्व संपतें आणि पुढें अभाव लागतो असा जो त्या पदार्थाचे भोंवताला भावाभावांचा अवधि असतो तो; २, अ॰ कोणेक क्रियादिकां विषयीं उत्तरावधित्वेंकरून विवक्षित जो देशकालादि तो लागे इत्यर्थांत

पर्यवसान, न॰ सं॰ कोणेक गोष्टीचा जो शेवट तें.

पर्वा, पु॰ रा॰ ओढा.

पर्याप्त, ३ लिं॰ सं॰ आणखी कांहीं पाहिजे अशी

आकांक्षा नउरे इतका झाला जो तो; उ० एवढा कागद् इतके लिहिण्यास पर्याप्त होईल; शंभर रुपये मिळाले ह्म० मासे इछेस पर्याप्त, हा थोर मासे शक्तीस पर्याप्त होणार नाहीं; २, कांहीं विषयाविषयीं आणखी पाहिजे अशी आकांक्षा जास राहिली नाहीं तो; उ० पावसानें सगळीं सेवरें पर्याप्त झालीं.

पर्याप्ति, स्त्री० सं० परिपूर्णता.

पर्याय, पु० सं० एकार्थक जे दोन शब्द ते परस्पर; २, एक कार्याविषयीं साधक परस्पर निरपेक्ष अनेक जे कृतिप्रकार असतात ते प्रत्येकीं; उ० माहागिरी करून जलमार्गानें जावें किं० घोडें करून पायवाटेनें जावें असे दोन पर्याय आहेत, त्यामध्यें एकास मुख्यत्व आणि इतरास गौणत्व असतां गौणास मात्र ह्म०; एकादशीचा मुख्य पक्ष होईना तर कांहीं पर्याय करावा; ३, कोणेक गोष्टीचा पूर्वप्रवर्तमान जो ओघ तो, विवक्षितानुरूप दुसरे कडे फिरायासाठीं युक्तीनें काढिला जो कांहीं मार्ग तो; सावकार सोडीनां तेव्हां शेत पिकलें ह्मणजे तुह्मी स्वाधीन करीन असा पर्याय काढून मीं निघून आलों; ४, कांहीं एक कार्याची मुळापासून शेवटपर्यंत जी आवृत्ति तो; उ० शास्त्र केवळ पहिल्या पर्यायास समजतें असें नाहीं दोन तीन पर्याय करावे लागतात; ५, एकच कार्य एकवारन करितां विभागून विभागून अनेकवार केलें असतां कालभेदप्रयुक्त घडतात जे त्याचे विभाग ते प्र०; उ० आग्याचे अडचणीमुळें चार पर्यायानीं ब्राह्मणभोजन झालें; ६, कोणेक मोठें कार्य थोडके कालांत व्हावें ह्मणून कर्त्रादि सर्व सामग्री अनेक पट करून अनेक स्थलीं चालतात जीं तीं कार्यें तीं प्र०; उ० एक दांच चार पर्याय चालविले तेव्हां हजार ब्राह्मणास चार घटकांत दक्षिणा आटपली; ७, कोणेक क्रियेचा संस्कार अनेकांवर यौगपद्येंकरून असूनये एकावर झाला ह्म० दुसर्‍यावर होई असा जो क्रियेचा प्रकार तो; उ० नित्य एकच धोत्र नेसूनये पर्यायानें दोन्हीं नेसावीं; ८, बयाद; उ० होय किं० नाहीं ह्मणून सांगावें तो हजार पर्याय सांगतो, हि शेव विचारिला असतां इकडे दोन शें खरचले तिकडे शंभर खरचले असे अनेक पर्याय सांगतो; ९, क्रिया किं० गुण यांचा भेदक जो प्रकार त्याचे अर्थीं प्रायः याचा प्रयोग करितात; उ० यांचे बोलण्याचा पर्याय निराळा त्यांचे बोलण्याचा निराळा इ०.

पर्युदास, पु० सं० विधीचाठायीं अन्वित होणारा जो अर्थसमुदाय त्यांतून जा व्यक्तीवर विध्यन्वय इष्ट नसतो त्या व्यक्तीचा त्या समुदायापासून केला असतो जो भेद तो; उ० अनृतातिरिक्त सर्व बोलावें या वाक्यांत बोलावें या विधिविषयीं अनृताचा पर्युदास केला आहे.

पर्युषित, ३ लिं० शिजलेलें अन्न, घरांत आणिलेलें पाणी, पुष्प, इ० क एकरात्र आदिकाल राहिल्यामुळें जें दोषयुक्त झालें तो.

पर्व, न० अमावास्या, पूर्णिमा, वैधृति, व्यतीपात, संक्रांति, ग्रहण, कपिलाषष्ठी, इ० जे समुद्रस्नान, श्राद्ध, दान, इ० पुण्यकर्माविषयीं काल सांगीतले आहेत जांचा ठायीं पुण्यकर्म केलें असतां

कोटिगुणित फल होतें इ० सांगितलें आहे ते काल प्रत्येकीं; २, ला० कोणक व्यवहार अतिशय पूर्वक सर्वत्र प्रवृत्त होतो किं० कांहींपदार्थ विपुलपणें सर्वत्र होतो असा जो काल तो, त्या व्यवहाराचें किं० पदार्थाचें पर्व असें म्ह०; उ० आतांसें हुरड्याचें पर्व आलें आहे; ३, वेळू, बोरू, बोट, इ० कांचें पेरतें,

**पर्वकाल, पर्वकाळ**, पु० पर्व, तृतीयार्थावांचून; २. कांहींएक अर्थाचें जिकडे पाहावें तिकडे तेंच दिसावा असें होतें जें बाहुल्य त्यास म्ह०

**पर्वणी**, स्त्री० पर्वकाल आणि पर्व यांचा अपभ्रंश.

**पर्वत**, पु० सं० सह्याद्रि इ० पृथ्वीचे मोठमोठे जे उंच वटे आहेत ते प्रत्येकीं; २, दुर्निर्वह जड भारी जें काम, दुःख, इ० त्यास त्याचा त्याचा पर्वत असें म्ह०; उ० बापानें कर्जाचे पर्वत करून मात्र ठेविले आहेत.

**पऱ्ह्या**, पु० कों० पर्या; २, पर्जन्य कालीं पावळ्या इ० संबंधी पाणी बाहेर काढून द्यावयासाठीं जो चर खणून करितात तो.

**पल**, न० सं० घटकेचा साठावा भाग; २, मांस; ३, चाळीसमासे वजन तें.

**पलख**, पुं० न० हिं० पलप्रथमार्थी

**पलंग**, पु० हिं० वरनिजाया जोगा लांकडाचा एक पदार्थ करीत असतात तो.

**पलंगडी**, स्त्री० लाहानजो पलंग ती.

**पलंगपोस**, पुं० हिं० सर्वआंथरुणाचे वर घालायाचें जें पांढरें वस्त्र असतें तो.

**पलटण, पलटन**, न० बंदूकवाले पायदळाचा जो समुदाय तो प्रायः अकराशांचा असावा.

**पलटणी, पलटनी**, ३ लिं० पलटनसंबंधी मनुष्यादिक तो.

**पलतड**, स्त्री० नद्यादिकांचें जें परतीर ती.

**पलभा**, स्त्री० सं० अयनांशसहित सूर्य केवल विषुवसूत्रावर असतां मध्यान्हीं द्वादशांगुल शंकूची जाजा देशीं जीजी अंगुलाद्यात्मक छाया पडती ती त्या देशीं.

**पलाखतीमार**, पु० फरमाशीमार.

**पलाटन**, न० पर्यटन, २, पलांटी.

**पलांटी**, स्त्री० आसपासचे देशीं जी फेरी ती; उ० तुह्मीं अशी पलांटी मारून या तों मीं रुपये तयार करून ठेवितों.

**पलांडु**, पु० सं० कांदा म्हणून कंदविशेष आहे तो.

**पलाण**, न० उंटाचें जें पल्याण तें.

**पलायन**, न० सं० भयादिकामुळें दुसर्यास आपण न सांपडावें म्हणून शीघ्रगतीनें किं० त्याचा डोळा चुकवून इ० युक्तीनें क्वचित् गमन करितात तें.

**पलाश**, पु० सं० एक वृक्ष आहे.

**पलिकडचा, पलिकडला, पलिकडील**, ३ लिं० पलिकडे जो स्थित तो.

**पलिकडून**, अ० पलिकडचे देशादिकाहून.

**पलिकडे**, अ० स्वसन्निकृष्टतेंकरून विवक्षित जो सभोंवतादेशांश किं० भूतभविष्य रूप कालांश त्याचे बाहेर; उ० तुझा घोडा आलीकडे पडळी कालचें वर्तमानमात्र मला ठाउक आहे पलिकडेन कळे; उद्यांचा दिवस मीं संभाळीन पलिकडे मला न कळे.

**पलिता**, पु॰ हिं॰ हिलालांत घालायासाठीं चिरगुटाची वाटोळी गुंडाळी करितात तो.

**पलिस्त**, ३ लिं॰ हिं॰ अतिशयितपीडा देणारा जो चारा, पर्जन्य, द्वाडपोर, कार्याधिकार, इ॰ त्यांस म्ह॰.

**पल्याण**, न॰ सं॰ बसायाचे किं॰ ओझें घालायाचे सोईकरितां घोडें, उंट, इ॰ कांचे पाठीवर घालायाचें जें जीन, खोगीर, इ॰ केलें असतें तें.

**पल्लव**, पु॰ सं॰ पर्णसमुदाय विशिष्ट जें शाखाग्र तो; २, ला॰ कोणेक गोष्टीस नवाच जोडिला जो दुसरा अवयव तो; उ॰ त्याणें सांगीतलें असेल तितकेंच बोल नवा पल्लव लावूं नको; ३, वस्त्राचा जो पदर तो.

**पल्लवित**, ३ लिं॰ सं॰ पल्लव ज्यास फुटले आहेत तो वृक्ष, शाखा, इ॰.

**पल्ला**, पु॰ तीन पायली रूप जें माप तो; २, पल्लेकर्याचें जें दाणें इ॰ वाहायाचें पोतें तो; ३, अडीच मण रूप जें पक्कें वजन तो; ४, गतिमंताचे गतीनें प्राप्य जो देशरूप, कालरूप, किं॰ व्यवहाररूप, अवधि तो; उ॰ अशाच्यालीनें लांबचा पल्ला आटोपणार नाहीं; इतक्या द्रव्यानें पुढाच वर्षपर्यंत पल्ला पोंचणार नाहीं; मनसुबीचें प्रकरण साक्षीदार सांगतील तें ऐकावें इतक्या पल्यास आणून ठेविलें; कोणेकाचे पल्यावर असणें म्ह॰ बरें करायास पाठीवर किं॰ वाईट करायास पाठलागावर असणें; ५, शाल इ॰ कांचा जो जरीचा मोठा पदर तो; ६, रव्युतें इ॰ पक्ष्यांचा जो कळप तो.

**पल्लाण**, न॰ फा॰ पल्ला चतुर्थार्थीं परंतु देशविषयीं प्र॰

**पल्ली**, स्त्री॰ सं॰ क्षुद्र जंतु आहे.

**पल्लेकरी**, पु॰ दाण्याचे पल्ले वाहून उपजीविका करीत असतो तो.

**पल्लेदार**, ३ लिं॰ लप्केदार; २, लांबगोळा जावयाजोगा जी तोफ, बंदूक, ती.

**पव**, पु॰ फांशावर एकत्वसंख्या बोधक चिन्ह असतें तो.

**पवन**, पु॰ सं॰ ज्यास रूप नाहीं असें असून ज्याचा स्पर्श होतो असें पंचमहाभूतांतील भूत आहे तो.

**पवनचक्की**, स्त्री॰ कोणी हातानें न फिरवितां वार्यानेंच फिरत असावें असें जें तें केलें असतें ती.

**पवबारा**, पु॰ तिफांशी खेळांत एक दान आहे, पवबारा करणें, किंवा म्हणणें म्ह॰ पळून जाणें.

**पँवाडा**, पु॰ कोणेक पराक्रमी पुरुषाचे कीर्तीचें वर्णन ज्यांत केलें असतें असा एक प्राकृत कविता विशेष आहे.

**पवित्र**, ३ लिं॰ सं॰ ज्याचें भक्षण, स्पर्शन, इ॰ करून संबंधानें प्रत्यवाय लागत नाहीं किं॰ पापक्षयादि चांगलें फल होतें तो अन्न, उदक, स्थल, इ॰ पदार्थ त्यामध्यें भक्षणाविषयीं अपवित्र असून स्पर्शाविषयीं पवित्र असे ही कितीएक पदार्थ क्रियाविशेषीं मात्र पवित्र आहेत; २ प्रत्यवाया जनक किं॰ पापक्षयकारक जें कर्म तो; ३, निष्पाप किं॰ अशौचादि दोषरहित जो मनुष्य तो.

**पवित्रक**, न॰ ब्राह्मणादिक संध्यादिकर्म समयीं दर्भाचें आकृतिविशेषयुक्त अंगुलीयक बोटांत घालितात तें किं॰ तदाकार सुवर्णाचें ही असतें तें.

**पशम**, न॰ پشم संकेतानें उपस्थांस्थित लोमास म्ह॰; २, लोहोंकर.

**पशमी**, ३लिं० پشمی लोंकरीचें जें वस्त्र तो.

**पशु**, पु० सं० हत्ती आदिकरून मुंगुसपर्यंत जे चतुष्पाद् जीव तो; २, ला० केवल जो मूर्ख मनुष्य त्यास म्ह०.

**पश्चात्**, अ० सं० अनंतर; २, पाठीमागें.

**पश्चात्ताप**, पु० सं० काहीं वाईट कर्म हातून झाल्यानंतर छी छी, वाईट, म्यां कर्म केलें असा जो मनास भाव उत्पन्न होतो तो.

**पश्चिम**, स्त्री० अस्ताचलाकडील जी दिशा ती; २, ३ लिं० पश्चिमदिगवच्छिन्न तो; उ० एथून समुद्र शुद्ध पश्चिम आहे.

**पश्चिमद्वार**, न० संकेतानें अपानद्वारास म्ह०.

**पश्चिमवायु**, पु० संकेतानें अपानवायूस म्ह०.

**पश्यंती**, स्त्री० सं० परेपासून हृदयस्थानीं ईषन्मात्र उमटती जी वाणी ती.

**पश्यतोहर**, पु० सं० सोनार.

**पसंत, पसंद**, ३ लिं० चवघानीं खोडून ठेविना मान्य करायाजोगा जो पदार्थ, भाषणादिव्यवहार, पुरुष, इ० तो; २, जो पदार्थादि ज्यास मान्य झाला तो त्यास.

**पसरट**, ३ लिं० उंची लांबीपेक्षां रुंदीचा विस्तार ज्याचा काहीं अधिक दिसतो असें जें भांडें आवृतस्थल इ० किं० त्याचा जो आकार तो; २, ला० आटोपसारखा असा जो कारभार इ० व्यवहार किं० भाषणादि तो.

**पसरणें**, संकुचितपणें स्वल्पदेशव्यापून स्थित जो पदार्थ तो अधिकदेशव्यापी असा करणें किं० होणें.

**पसवणें**, घोडीनें प्रसूत होणें; २, केळीनें केळफूल, भात, नाचणी, वरी, इ० कानीं कणसें, तसेंच इतरही तृणास काहीं तुरे येत असतात ते त्याणीं बाहेर टाकणें.

**पसा**, पु० एके हातांत जितकें धान्यादिक मावेल तितकें घ्यावयाकरितां खोलकट करितात जो हाताचा आकार तो; २, वा० ओंजळ.

**पसार**, पु० एकत्र बसून राहिलें असतां भुक्ताचा परिणाम चांगला होत नाहीं तो व्हावा इ० अर्थ आसमंतात् भागीं फिरण्याचा व्यापार करितात तो; २, भरून चुकला तो घटिकादि कालमानवृत्ति.

**पसारा**, पु० काहीं एक पदार्थाची किं० कार्याची चहूंकडे पसरून जी स्थिति होते ती; २, गुरांस रात्रीं चरायास नेण्याचा जो व्यापार तो.

**पसारी**, पु० हिंग, जिरें, मिरें, लसूण, कांदा, इ० किरकोळ जिन्नस विकणारा जो दुकानदार तो.

**पसू**, ३लिं० शिंगरें उत्पन्न करायासाठीं जी घोडी बाळगितात ती, घोडीचें च वि०

**पस्तकरणें**, चोरादिकानीं कोणेकास सर्वस्वीं नागविणें; उ० शहरपेंढार्यांनीं लुटून पस्त केलें.

**पस्तावणें**, पस्ताव्यांत पडणें.

**पस्तावा**, पु० काहीं एक कार्याचा उद्देशानें केला जो उद्योग तो निष्फल होउन उरफाटें काहीं संकट आल्यामुळें मीं यांत व्यर्थ प्रवृत्त जालों असा जो खेद उत्पन्न होतो तो.

**पस्तीस**, ३लिं० ३५.

**पहांट, पहाट**, स्त्री० उषःकालापासून सूर्योदयपर्यंत जो काळ ती; २, उत्तररात्रीसही म्ह०; उ० पहांटेचे प्रहर रात्री उठला.

**पहांटपर्दां**, अ० रा० मोठ्या पहांटेस.

**पहाड**, पु॰ हिं॰ डोंगर; २, अत्यंत उंच मोठा जो कंठध्वनि त्यास ल॰; ३. भूमीवरून हातपुरेना अशा उच्चप्रदेशीं भि कार्यकर्तव्य असतां भित्यादिकांत लांकडें घालून माळ्यासारिखा आश्रयार्थ करितात तो.

**पहाडमूळ**, न॰ एक औषधीमूल आहे.

**पहाडी**, स्त्री॰ पालखी, मेणा, इ॰ एकेका यानास वह्यास जे भोयांचे समुदाय ठेविले असतात ते प्र॰; २, डोंगरवट जो देश, जागा, इ॰ तो.

**पहाडीकिल्ला**, पु॰ डोंगरावरील जो किल्ला तो.

**पहाडीजिल्हा**, पु॰ हिं॰ एक रागिणी आहे.

**पहाणखरडा**, पु॰ शेत इ॰ कांची पाहाणी करून त्याचा लेख जाजवर लिहिला असतो तो कागद.

**पहाणदार**, पु॰ पाहाणीदार.

**पहार**, स्त्री॰ दगडफोडणें इ॰ उपयोगी एक लोखंडी आउत आहे ती; २, प्रहराचा अपभ्रंश.

**पहारा**, पु॰ मार्गादिकांच्याठायीं अविवक्षित मनुष्यादि येउं नये किं॰ ठेवलेला जिन्नस पानस कोणीं नेउं नये किं॰ बंदिवान इ॰ कानीं कोणीकडे यथेछ जाउं नये म्हणून तत्तद्विषयीं जपत बसण्याचा जो व्यापार तो; २, त्या कामावर नियुक्त जो शिपाई इ॰ तो; ३, ला॰ कोणेकस्थलीं तेथील वस्त्र इ॰ गेली आली असतां समजाया जोगी कोणेकाची जागरूकपणें सर्वकाल असत्ये जी स्थिति ती.

**पहारेकरी**, पु॰ पहाऱ्यावर नियुक्त जो शिपाई इ॰ तो.

**पहारेबंदी**, स्त्री॰ शहर इ॰ कांत जागजागां पहारे बसवून केला असतो जो बंदोबस्त ती.

**पहाळी**, स्त्री॰ दे॰ पावसाची मोठी जी सरती.



**पहिलवान**, पु॰ हिं॰ जेठी.

**पहिला**, ३लिं॰ एक दोन तीन असें मोजायाचें असतां एकयासंख्येचा जो विषय तो; २, अ॰ पूर्वी.

**पहिलार, पहिलारू**, ३लिं॰ पहिल्यानेंच आलेली जी गर्भिणी किं॰ प्रसूत ती.

**पहिल्यान, पहिल्यानें**, अ॰ प्रथमपर्यायास.

**पहीपाहुणा**, पुं॰ पाहुणा इ॰ तो.

**पहुडणें**, ग्रं॰ निजणें.

**पळ**, न॰ पल; २, पु॰ दंगा इ॰ कांमुळें गावांतील किं॰ देशांतील सर्वमनुष्यादिकानीं पळत सुटावें अशी जी अवस्था येत्ये तो; ३, तसा पळत चाललेला जो मनुष्यादि समुदाय तो; उ॰ महामारी येतांच गावांत पळ सुटला; उ॰ आमचे गावांत पळ आला आहे; ४, स्त्री॰ कों॰ शेताचे बांधणांत पाणी अधिक आलें असतां तें बाहेर जावयास वाट बांधली असत्ये ती; ५, कोणेक पाठीस लागल्यामुळें कोणेकाची होत्ये जी तिरपीट ती.

**पळका**, पु॰ दे॰ जळल्यामुळें जो आंगावरील त्वगंश निघतो तो.

**पळंज**, न॰ आंत तांदूळ नाहीं असा वांझा जो भातगोटयांचा समुदाय तें.

**पळंजी**, स्त्री॰ कों॰ वांझा जो धान्याचा समुदाय ती.

**पळण**, स्त्री॰ पळ द्वितीयार्थी.

**पळणें**, पलायमान होणें, पळायास वाट ठेवणें ल॰ भाषणांत किं॰ लेखांत दुसरा धरील तर न सांपडावें अशी कांहीं खिडकी राखून ठेवणें

**पळतेंपीक**, न॰ फलादिकांचा शेवटला बार तें; २, ला॰ कांहींएक पदार्थापासून कांहींएक फलाचा शेवटील

ओ लाभ तें.

**पळपट**, स्त्री॰ कों॰ पळण.

**पळपटा, पळपट्या, पळपुटा, पळपुट्या**, ३लिं॰ पळण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**पळपळीत**, ३लिं॰ ज्यांत खंबीरपणा नाहीं अतएव विश्वसनीय नव्हे असें जें भाषण व्यवहार इ॰ तो.

**पळवा**, पु॰ वाळवून ठेविली जी पालेभाजी तो.

**पळशा**, पु॰ हिंदूंत एक जाति आहे.

**पळशी**, स्त्री॰ एक झाड आहे.

**पळस**, पु॰ पलाश.

**पळसपापडी**, स्त्री॰ पळसाची जी बी ती.

**पळसुला**, पु॰ मुंजीचे चौथे दिवशीं करायाचें एक कर्म आहे.

**पळा**, पु॰ मोठी जी पळी तो.

**पळिंज**, न॰ पळंजी.

**पळी**, स्त्री॰ पात्रांतून कांहीं जल, घृत, इ॰ पदार्थ काढणें इ॰ कांस साधनभूत दंडविशिष्ट धातुमय पात्र असतें ती.

**पळूं**, न॰ कों॰ पळी, डाव, यांचें जें टवळें तें.

**पल्हाटी**, स्त्री॰ कापसाचे झाडाची जी काठी ती.

**पक्ष**, पु॰ सं॰ चांद्रमासाचीं दोन अर्धें तीं प्र॰; २, महालयश्राद्ध; ३, आकाशमार्गें जाणारे जे काकादिक त्यांचें उड्डान साधनभूत जे दोन दोन अवयव असतात ते प्र॰; ४, वाद, युद्ध, एतदुपजीवक परस्परविरुद्ध जे दोन किं॰ बहुत मतभेद असतात ते किं॰ तीं प्रकरणें प्रत्येकीं; ५, एकाच कार्याचे साधनाविषयीं परस्पर निरपेक्ष अनेक जे कृतिप्रकार असतात ते प्र॰; ६, संदिग्धरूपें करून साध्य ज्या अवर राहतें तो अनुमानाविषयीं; ७, अनेक मनुष्यादिकांकडील मनुष्य समुदायादिरूप जीं अनेक भिन्नभिन्न प्रकरणें तीं प्रत्येकीं; उ॰ आमचे मातुलपक्षांत कोणी मूर्ख जाला नाहीं, आजवर पक्षाचे चव्हाड्यांस मेजवानी आहे.

**पक्षघात**, पु॰ पक्षाघात.

**पक्षपात**, पु॰ वाद, युद्ध, इ॰ संबंधि जे दोन पक्ष त्यामध्यें एके पक्षाकडे कोणेकाचे अंतःकरणाचा त्याचे वर्याविषयीं जो ओढा असतो तो.

**पक्षपाती**, ३लिं॰ पक्षपात आहे ज्यास तो.

**पक्षवायु**, पु॰ अर्धांगवायु.

**पक्षाघात**, पु॰ पक्षवायु.

**पक्षिणी**, स्त्री॰ एक रात्रि आणि दोन दिवस किं॰ दोन रात्रि आणि एक दिवस इतका जो सतत काल ती, अशौचप्रकरणीं प्र॰ प्र॰.

**पक्षी**, पु॰ पक्षांनीं आकाशमार्गें चालणारे जे प्राणी तो.

**पक्षीं**, अ॰ विकल्पें करून.

**पां**, अ॰ ग्रं॰ वाक्यालंकारार्थक.

**पाईक**, पु॰ चाकर.

**पाईर**, पु॰ स्त्री॰ एक वृक्ष आहे.

**पाउठणी**, स्त्री॰ पायरी प्रायः मुख्यार्थीं.

**पाउणकें**, न॰ पाउण अंक एकापासून शतांत अंकानीं गुणून क्रमें करून मुलांस एक पावणें पाउण इ॰ शब्दपूर्वक शिकवितात तें.

**पाउणखातारी**, स्त्री॰ मज पुढें हा केवळ तुच्छ, अप्रयोजक, अशी कोणेकाची निंदा कर्तव्य असतां त्यास प्र॰.

**पाउ**, स्त्री॰ फणस, अननास, रामफल, इ॰ फळाचे आंत जें देठाचें अग्रशिरलेलें असतें ती; २, ओंत्याने वरल्या तळीचे भोंकाचे आंतल्ये बाजूस खुंट्यास आश्रयभूत आ दोहों बाजूंचा दोन कडा असतात ती.

**पाउड**, पु॰ न॰ पांगूळ, वाघ्या, मुरळी, इ॰ भिकारी धर्मार्थ पैसा पाउड या शब्दानें मागतात,

**पाउण**, ३लिं॰ चतुर्थांशानें उणा जो पदार्थ तो.

**पाउल**, न॰ पायांचे घोंट्याखालचा जो भाग तें; २, चालतानां सहजरीतीनें जितकें लांब पाउल पडतें तत्परिमित जें मार्गादिप्रमाण तें, पाउल जपून टाकणें, ठेवणें, इ॰ स्थलीं कोणेक गोष्ट करणें ती विचारपूर्वक करणें असा अर्थ, कोणेकाचें पाउल ओळखणें स्न॰ भलेपणा, लबाडपणा, इ॰ स्वभाव यत्किंचित् त्याचा व्यवहार पाहिल्यावरून ओळखणें, वाटेचें पाउल आडवाटेस पडणें स्न॰ प्रमादानें एकादी गोष्ट घडूं नये ती हातून घडणें, कोणेकाचें पाउल वांकडें पडणें स्न॰ व्यभिचारादि अन्याय्य गोष्टीच्याठायीं प्रवृत्ति होणें, कोणेक व्यवहारादिकाचे ठायीं कोणेकाचें पाउल पडणें किं॰ शिरणें स्न॰ तेथे तेथे कोणेक संबंधानें याणें लागू होणें, पाउल पुढें ठेवणें किं॰ माघारें काढणें इ॰ स्थलीं कोणेक काम करण्याविषयीं प्रवृत्त होणें; किं॰ निवृत्त होणें; स्न॰ चोराचीं पावलें चोर ओळखतो, सगळ्यांचीं पावलें हत्तीचे पावलांत, जेथे जावें तेथे पाउलभर पाणी.

**पाउलवाट**, स्त्री॰ गाडे, घोडीं, इ॰ जा वाटेनें आंत नाहींत अशी जी लाहानशी वाट ती.

**पाउस**, पु॰ पर्जन्य.

**पाउसकाळ**, पु॰ मृगशीर्ष महानक्षत्रापासून हस्त नक्षत्रपर्यंत पर्जन्याचे दिवस तो.

**पाउसकाळा**, पु॰ पाउसकाळ.

**पाउसपाणी**, न॰ पु॰ पाउस इ॰ तो तें.

**पाक**, पु॰ सं॰ तंडुलादि पदार्थांच्या ठायीं अग्निसंयोगानें, आम्रादि फलांच्या ठायीं कालयोगानें, पक्कताजनक जो व्यापार होत असतो तो; २, स्वयंपाक; ३, दाहापांच औषधें एकत्र करून त्यांचा रांधा करितात तो; ४, पंक द्वितीयार्थीं; ५, ला॰ महाकवी इ॰ कांचे वाणीच्याठायीं भिन्नभिन्न रसोत्पादक जो धर्मविशेष असतो तो; उ॰ कालिदासाचे काव्याचा पाकच निराळा; ६, निर्मळ; उ॰ माझें अंतःकरण तुजविषयीं पाक आहे; ७, पवित्र; स्न॰ लावली राख आणि झाली पाक.

**पांक**, पु॰ पंक द्वितीयार्थीं.

**पाकटी**, स्त्री॰ कों॰ किंचित् तांदूळ आंत उत्पन्न होत आहे इतक्यांत वाळलें जें भात ती.

**पाकड**, पु॰ भाताचे शेतांत एक तृणधान्य उत्पन्न होतें तो.

**पाकणें, पांकणें**, बुंदीचा कळ्या, चिरोटे, इ॰ पाकानें युक्त करणें.

**पाकदोस्ती**, स्त्री॰ हिं॰ कोणेक स्त्रियेचा कोणेक पुरुषाशीं मैथुनसंबंध नसतां शुद्धभावानें केवल मैत्री असत्ये ती.

**पाकनिष्पत्ति**, स्त्री॰ सं॰ स्वयंपाकाची शिजविणें, भाजणें, इ॰ तत्तत्क्रियाद्वारा जी सिद्धता ती.

**पाँकळी, पाकळी**, स्त्री॰ पांकोळी प्रथमार्थीं.

**पाकी**, स्त्री॰ हिं॰ एकमेकाची एकमेकाशीं अंतःकरणाची जी मित्रता ती.

पाँकुलें, न॰ रा॰ मुलांचे भाषेनें गुरांचे वत्सास म्ह॰

पाँकोळी, पाकोळी, स्त्री॰ पुष्पांचे पत्रासारखे अनेक अवयव असतात ते प्र॰; २, लाहान देहाची एक वाघळांत जाति आहे; ३, चिमणी सारखें एक पांखरू आहे.

पांक्त, ३ लिं॰ सं॰ पंक्तिव्यवहारास जो योग्य तो; २, पुस्तकाचा जा मूळचा पंक्ति असतात त्यामध्यें लिखितजो ग्रंथ म्ह॰ टीप इ॰ रूपें वरखालीं लिहिलेला नव्हे तो; उ॰ बोलतांयास प्रमाण काय असें विचारतांच त्याणीं पांक्त ग्रंथ वाचून दाखविला; श्लोकादि पांक्त लागणें इ॰ स्थलीं मधील पदें किं॰ अक्षरें न जातां यथास्थित लागणें.

पाँख, पाख, पु॰ पक्ष; २, कों॰ महिन्याचे जे दोन पक्ष ते प्रत्येकीं.

पाखंड, पाखांड, न॰ एक देवतेस पूज्यत्व मानून इतर देवांची निंदा करावी अशीं जीं कलियुगामध्यें अनेक मतें जालीं आहेत तीं प्रत्येकीं; २, निर्मल बुद्धि बलानेंच जी एखादी गोष्ट रचली ते.

पाखडणें, शूर्पव्यापारानें धान्यादि तुषादिरहित करणें; कोणेकावर आग पाखडणें म्ह॰ सर्वस्वीं त्याचा नाश होई असें कुभांड घेणें, चहाडी सांगणें, इ॰ द्वारा करणें, दे॰ हातपाय पाखडणें म्ह॰ मरणासन्न दशा प्राप्त जाल्यामुळें किं॰ क्रोधावेशामुळें हातपाय इतस्ततः आदळणें.

पाखंडी, पाखांडी, ३ लिं॰ पाखंडमतानें चालणारा जो तो; २, नवेंच पाखंड रचण्याचा स्वभाव ज्याचा तो.

पाखर, स्त्री॰ घोड्यास गोळी, भाला, न लागावा म्हणून सूत्रादिकाचें विणून काहीं आछादन करून घालिताततीं; २, कों॰ पक्षी आपले पिलांवर पक्षरूपजें आछादन घालितात ती; कोणेकावर पाखर घालणें म्ह॰ संकटसमयीं कृपा करणें, गाई, म्हशी, इ॰ कांचे दोन दोन सडांचे जे वामदक्षिण भाग ते प्रत्येकीं.

पाखरूँ, पांखरूँ, न॰ पक्षी.

पाखल, स्त्री॰ वा॰ पाखर तृतीयार्थी; २, क्षुधादिकारणामुळें पोटास बाहेरून जी खळी पडत्ये ती.

पाखलपुजा, स्त्री॰ यात्रादिप्रसंगीं अनेक लोकांचे संमर्दामुळें देवापाशीं जमतो जो खळमळ तो सर्व धुवून स्थल स्वछ करून जी पूजा करितात ती.

पाखा, पु॰ वा॰ लहान देहाची वाघळांत जाति आहे.

पाखाडी, स्त्री॰ चिरेबंदी जी अरुंद वाट ती; २, कों॰ ग्रामांत जा घरांचा आळ्या असतात त्या प्र॰; ३, वा॰ गृहाचीजी पडवी ती; ४, गृहाचें आढें आणि इट्टकट यांचेमध्यें वांशास आधारभूत जीं आडवीं लांकडें असतात तीं प्र॰

पाखाळणी, पाखाळपुजा, स्त्री॰ पाखलपुजा.

पाखें, न॰ घरावरचा आढ्यापासून पावसाचें पाणी उतरायाकरितां जे दोहोंकडे दोन भाग किं॰ चहूंकडे चार भाग पक्षाकार करितात ते प्र॰.

पाग, पु॰ रा॰ समुद्रादिकांत मासे धरायाचीं मोठीं जाळीं असतात तो; २, स्त्री॰ कों॰ गलबतावर शेजारीं होडी शिडी बांधून ठेवणें इत्यार्थ जी पिछाडीस दोरी बांधून ठेविली असत्ये ती.

पांग, पु॰ अन्नाछादनादिविषयक जी चिंता तो; प्रायः फेडणें, फिटणें, या धा॰ योगीं अनेकवचनांत प्र॰; उ॰ हा मुलगा मोठा जाला म्ह॰ तुझे पांग फेडील; २, वा॰ तावी; उ॰ त्याचा पांगांत मा म्यानें राहवत नाहीं;

३,ओशाळगत; उ॰ या कर्जदाराचा मला पांग यात तो.

**पागणें**, स॰ पागानीं मासे धरणें.

**पाँगणें**, समुदायभूत जे मनुष्यादि जीव त्यानीं समुदायफुटे असें चहूंकडे आणें.

**पागनीस**, पु॰ पागेकडला पाग्याचे हाताखालचा जो मुख्य कारभारी तो.

**पागळणें**, पाघळणें.

**पांगळा**, ३लिं॰ जन्मतः किं॰ वातादि विकृतीमुळें अधू अतएव चालण्याचे उपयोगी नाहींत असेजे दोनींपायने किं॰ तद्विशिष्ट मनुष्यादि तो.

**पाँगा**, ३लिं॰ पांगळा; २, हात टेंकल्यावांचून आसचालतां येतनाहीं इतकाजो पायांनीं अधू तो; ३, फेंगडा.

**पागा**, स्त्री॰ हिं॰ घोडशाळा; २, एक स्वामिक जो अश्वसमुदाय ती; कांहीं एकपदार्थ कोणेकाचे पागेस लागणें म्ह॰ त्याचा धनी माघारें घेईतोंपर्यंत यानें संभाळावें अशाप्रकारानें स्वाधीन होणें, कोणेकमनुष्य कोणेकाचे पागेस लागणें म्ह॰ त्याजवर आपला वरचडपणा पडूं नये अशाप्रकारें स्वाधीन होणें.

**पाँगारा**, पु॰ एकवृक्ष आहे.

**पाँगूळ**, ३लिं॰ पांगळा; २, नंदीबैल बाळगून जोभीक मागतो तो किं॰ पहांटेस भीक मागायास फिरत असतो असा एक भिकारी आहे तो.

**पाँगूळगाडा, पांगूळगाडी**, पु॰ स्त्री॰ लहानमुलास चालायास शिकवायासाठीं जी लहानशी गाडी करितात ती तो.

**पाँगूळपोवा, पांगूळपोहा**, पु॰ अशक्त, दुर्बल, आंधळे, पांगळे, इ॰ रूपजो मनुष्यसमुदाय तो; २, चालायास धरीं करीं न्हेत अशींजीं मुलें, बायका, म्हातारी, इ॰ रूप जें खटलें त्यास मार्गप्रसंगीं म्ह॰.

**पागोटें**, न॰ शिरास वेष्टित करायाचें वस्त्र आहे; पागोटें गमावणें म्ह॰ कोणेक केलेला व्यवहार आंगीं आल्यामुळें पदरभरीस घालणें; पागोटें खालीं करणें म्ह॰ कांहीं दुष्कर्म करून कुळास बट्टा लावणें; पागोटें संभाळणें म्ह॰ कांहीं व्यवहार आंगीं न येई असें त्या व्यवहारांतून पार पडणें; कोणेकाचे पागोट्यास फुलें बांधणें म्ह॰ त्याणें स्वेष्टकार्यीं प्रवृत्त व्हावें म्हणून स्तवादि आर्जव करणें; पागोट्याचे पेंच गळ्यांत येणें म्ह॰ केलें कर्म आंगीं येणें; हा त्याचें पागोटें घेईल इ॰ स्थलीं हा त्याचे हातून ठकला जाणार नाहीं उलटा त्यास ठकवील असा अर्थ होतो; पागोटें फिरवणें म्ह॰ उक्त जें कांहीं एक तदर्थ गळ्यांत येतो असें वाटल्यास तें भाषण फिरवून बोलणें किं॰ फेरपगडी करणें.

**पागोरा**, पु॰ वृक्ष, वल्ली, कंद, इ॰ कांचे मूलप्रदेशीं फुटोन चोहोंकडे पसरतात जा तंतुरूप मुळ्या त्या प्रत्येकीं; २, एका वेलास फुटोन वृक्षादिकांस संबध होउन पसरले असतात जे अनेक वेल ते प्र॰; ३, ला॰ तनावा, पागोरे फोडणें म्ह॰ फांटे फोडणें.

**पागोळी**, स्त्री॰ पर्जन्योदकाची धारा जा प्रदेशापासून पडत्ये तो गृहप्रदेश; २, तेथून गळतात जा उदकधारा ती; ३, ला॰ तदाकार कांहीं एकापासून गळत्ये जी उदकादि धारा ती; उ॰ डोळ्यांत केर पडल्यामुळें एकसारखी पागोळी लागली आहे.

**पाग्या**, पु॰ पागेवरजो मुख्यत्वें करून अधिकृत असतो तो; म्ह॰ आदीं होता वाघ्या मग झाला पाग्या त्याचें एलकोट गहीना मूळस्वभावजाईना.

**पाँघरणें** वस्त्र, पाठ, पोट, इ॰ विवक्षित अवयव झांकत असें अंगावर घेणें, एथें नेसणें, आंगरखा, पागोटें, घालणें, यांविषयीं पांघरणें याचा प्रयोग होत नाहीं.

**पाँघरूण**, न॰ पांघरलें आई अशाप्रकारें अंगावर घेतलें जें वस्त्र तें; उ॰ आंगवस्त्र गुंडाळून कशाला घेतलें आहेस चांगलें पांघरूण घे; २, आंगरखा, पागोटें, शेला, रजई, इ॰ शरीरावर धारण करायाचीं जीं वस्त्रें तें; उ॰ परटाकडचीं पांघरुणें आलींनाहींत; ३, ला॰ आपले निर्वाहाचा भार ज्जावर असतो ज्याचे योगानें आपल्यास तादृश चिंता करावी लागत नाहीं असे जे माता पित्रे, यजमान. इ॰ त्यांस म्ह॰; उ॰ आई हें मुलाचें पांघरूण तीमेल्यावर पोरें उघडीं पडतात यांजवरतें पांघरूण आहे म्हणून यांची अब्रू आहे त्याचे पाठीमागें यांना जोड्यानीं मारतील; पांघरूण घालणें म्हणजे कोणेकाचें दुष्कर्मादि आपल्यास समजलें असतां हीबभ्रा न होई असें करणें; म्ह॰ उघड्यावर पांघरूण घालावें.

**पाघळ**, पु॰ रा॰ गूळ, साखर, इ॰ पदार्थांस द्रव स्फुटतो तो.

**पाघळणें**, जलादिद्रवयुक्त आईवस्त्रादिक जो पदार्थ त्यापासून जलादिक गळणें, पक्षीं आईवस्त्रासही कर्तृत्व असतें; २, गूळ, शर्करा, घृत, इ॰ द्रवरूप होणें; पाघळत जाणें कि॰ येणें म्ह॰ पराजित होउन जाणें कि॰ येणें असा अर्थ.

**पाच**, पु॰ स्त्री॰ एक रत्न आहे; २, एक सुगंधि वनस्पति आहे.

**पाँच**, ३ लिं॰ ५; त्यापाशीं पांच रुपये आहेत पांच करनील तें आपण करावें इ॰ स्थळीं पांच हें अनियमित संख्येचें उपलक्षण; पांचांवर धारण बसणें म्ह॰ घाबरणें; म्ह॰ पांचामुखीं परमेश्वर; मा सँघ्या आणि पांचां तन्या; पांचां बुद्धि ती पन्नासां बुद्धि.

**पाचक**, पु॰ सं॰ आचारी; २, ३ लिं॰ जेणें करून अन्नाचें पचन होतें असें औषधादि तो.

**पाचकळ**, ३ लिं॰ पचकळ.

**पाचंग**, स्त्री॰ पचंग.

**पाचजन्य**, पु॰ सं॰ विष्णूचा शंख; २, संकेतानें बोवेस म्ह॰.

**पांचट**, ३ लिं॰ पानचट.

**पाचट**, न॰ दे॰ उसाचा पाला.

**पाचन**, अ॰ धा॰ रुजत ,, अर्क इ॰ कद्वृत्ति धान्ये या धातूचा योगीं प्र॰

**पाचन**, न॰ सं॰ भुक्ताचाने जें पचन तें; २, ३ लिं॰ पाचक.

**पाँचपट**, स्त्री॰ धा॰ पहाट.

**पाँचपाट**, पु॰ चोरादिकांची बहुत श्रमनिष्ठा कर्तव्य असतां वस्त्र यांनें डोकीचे केसांचे पांच पट्ट काढितात ते.

**पाँचपालीभाजी**, स्त्री॰ रा॰ उडीद, चवळी, इ॰ पांच चार पाले एकत्र करून जी भाजी करितात ती.

**पाँचपेँच**, पु॰ मल्लयुद्धामध्यें जे डाव घात करितात ते; २, ला॰ वाद, युद्ध, इ॰ व्यवहारीं दुसऱ्यास पाडाव करण्याची अनेक प्रकारची जी युक्ति कौशल्यें ते.

**पांचभौतिक**, ३लिं॰ पृथ्वी इ॰ पंचमहाभूतांपासून आलेलें जें शरीरादि तो.

**पाचर**, स्त्री॰ खुंटा इ॰ घट्ट बसायाकरितां किं॰ छिद्र बुजवायाकरितां लहानशी धलपी मारितात ती; कोणेककार्यांत पाचरमारणें ह्म॰ कांहीं विघ्न होउन सर्वथा न होई असें करणें.

**पांचवा**, ३लिं॰ पांच ही संख्या जेणेंकरून पूर्ण होते तो.

**पांचवी**, स्त्री॰ प्रसूतिदिवसापासून पांचवे दिवशीं जीवंतिकादि देवतांची जी पूजा करितात ती.

**पांचशेरी**, स्त्री॰ पांचशेर प्रमाणाचा ओरवायासाठीं दगड इ॰ बांधिला असतो ती.

**पाचारण**, न॰ आकारण.

**पाचारणें**, कोणेकास विवक्षित देशीं येअसें ह्मणणें; २, कोणेकास कुशलप्रश्नानें सन्मानित करणें; ३, न॰ ग्रामांतराचा गार्यी स्थितजो इष्टमित्रादि त्यास जें पुसणें सांगून पाठवितात तें; ४, वा॰ कोणी मेला असतां त्याचा घरीं समाचारार्थ जाणें.

**पाचावा**, पु॰ दे॰ ज्वरादि दुखणें एकदांबरें आलें असतां दृष्टिविकार आल्यामुळें पुनः जें उलटून तें दुखणें येतें तो; २, कों॰ पाचुंदा ह्मणून वृक्ष आहे तो.

**पाचित**, ३लिं॰ पक्क केला जो तो; तैलपाचित, घृतपाचित, ह्म॰ तैलादिकांत पक्क केलेला वडा इ॰ ब्राह्मणपाचित, स्त्रीपाचित, ह्म॰ ब्राह्मणादिकानें पक्क केलेला इ॰ समास जाणावे.

**पांची**, स्त्री॰ पांचरुपयांचें एक रुवर्णाचें नाणें आहे.

**पांचींव**, न॰ श॰ गुरांचें जें मूत्र तें.

**पाचुंदा**, पु॰ एक वृक्ष आहे ज्याचे लांकडाचे मणि आला पाचावा झाला आहे त्याचे हातांत किं॰ गळ्यांत बांधितात तो; २, गवत, कडबा, इ॰ दिकांचे पेंढयांचें पेंचक तो; ३, भक्षणातिशयादि वर्णनप्रसंगीं लाडू, पोळी, इ॰ कांचे पंचकास ह्म॰.

**पाचू**, स्त्री॰ पाच ह्मणून जें रत्न ती; उ॰ पाचूचे पदकरुळतीं स्मरमना श्रीदेवकीनंदना.

**पांचेरूं**, न॰ श॰ पाचर.

**पाचोळा**, पु॰ कडबा, वेळू, इ॰ कांचा पानेरा.

**पाज**, स्त्री॰ श॰ सह्याद्रि इ॰ मोठे पर्वतांवर चढायास घाटावांचून इतर जी चोरवाट असत्ये ती.

**पाजण**, न॰ नवें वस्त्र करायाचें असतां त्याचे ताने ताण्यास पूर्वीं जी खळ देतात तें.

**पांजणी**, स्त्री॰ श॰ सूत, दोरी, इ॰ पांजण्याचा व्यापार किं॰ तज्जनित सूत्रादिकावर संस्कार होतो ती.

**पांजणें**, श॰ सूत, दोरी, इ॰ काष्ठादिकानें घांसून साफ करणें किं॰ हस्तादिकावरून दोरीबळानें घांसत गेल्यामुळें हस्तादिक खरवडला जाणें.

**पाजणें**, पिववणें.

**पांजरा**, पु॰ वर आणि खालीं दोन फळ्या किं॰ पत्रे घेउन त्यांस सभोंवार गज मारून कीर, साळुंखी, इ॰ बाळगायास घर करितात तो; २, ला॰ मनुष्यादिकांचे पाठीचे कण्यांतून फुटून हाडें उरापर्यंत आलीं आहेत त्या विशिष्ट आकारास हाडांचा पांजरा ह्म॰.

**पाजवणें**, शस्त्रास धार यावयासाठीं शस्त्र साहाण इ॰ कांवर घांसणें; मिशी पाजवणें ह्म॰ गर्वानें आपल्ये मिशीवरून हात फिरविणें.

**पाजळणें**, दिवटी, दिवा, इ० उजळणें; २, रा० पाजवणें; त्याचा टेंभा पाजळला म्ह० राजद्वारादिकांच्या ठायीं मोठी प्रतिष्ठा मिळाली.

**पाजी**, ३ लिं० वीर, सभ्य पुरुष, यांस उचित नव्हे असें जें युद्धपलायनादि हलकें अश्लाघ्य कर्म तें करायास जो लाजत नाहीं तो.

**पाझर**, पु० गूळ, मीठ, बर्फी, इ० कांस द्रव सुटतो तो; २, उदक, घृत, इ० कांनें भरलेल्या मडक्यापासून किं० खडक इ० कांपासून थोडथोडा द्रवाचा स्राव होत असतो तो; दगडास पाझर आणणें म्ह० अर्जवायनेक युक्तीनीं केवळ निर्दयास दया अद्त शिरोमणीस कांहीं दानवासना उत्पन्न करणें असा अर्थ.

**पाझरणें**, गूळ, इ० क द्रवविकारानें पावणें; २, मडकें इ० क पाझरानें युक्त होणें किं० त्यांतील जलादिक पाझरपणें बाहेर वाहणें

**पाट**, पु० बसायासाठीं लांकडाचें आसन करितात तो; २, नदी, तळें, इ० कांपासून खणून विवक्षित देशीं जें पाणी नेलें असतें तो किं० तें पाणी आयाच्या मार्ग तो; ३, शूद्रादिकांच्या स्त्रिया पुनर्विवाह करितात तो; ४, गोणताट, पडम, इ० वस्त्र विणतेसमयीं जी रुंदी धरली असत्ये तितकें रुंदीचें जें तें वस्त्र तो; उ० तीन पाटांची धोंगटी केली म्ह० रुंदच रुंद होत्ये; ५, डोकीचे केशांच्या जो वस्त्र यानें काढिला पट्टा तो; ६, रा० न० बैल, टोणगा, इ० कांचा गाय, म्हैस, इ० कांवर उडण्याचा जा आवृत्ति त्या मत्ये; ७, पु० कों० नदीचें जें पात्र तो.

**पाटकरी**, पु० पाटाची बायको आणे केली आहे तो.

**पाटकरीण**, स्त्री० पुनर्विवाह केला आहे जिणे ती.

**पाटकरूं**, न० पाटकरीण निंदावृत्ति; म्ह० पाटकरूं तें घटकरूं.

**पाटकुळी**, स्त्री० रा० लहान जो पाणी यावयाचा पाट ती.

**पाटणी**, स्त्री० पाटण्याचा जो व्यापार किं० तद्द्वारा आलें जें आच्छादन ती.

**पाटणें**, तक्तपोशीनें गृहप्रदेश आच्छादित करणें.

**पाटपासोडा**, पु० कों० विवाहादिकांत वधूवरें बसायासाठीं सखलाद इ० वस्त्रानें आच्छादित दोन ती न पाट पंक्तीनें संलग्न मांडितात तो.

**पाटल**, पु० सं० ईषत् पांढरेपणानें युक्त जो रक्तवर्ण तो; २, ३ लिं० तद्विशिष्ट तो.

**पाटली**, स्त्री० स्त्रियांचें हस्तभूषण आहे.

**पाटव**, न० सं० पटुपणा.

**पाटवड**, स्त्री० रा० पाटाचें पाणी वहावयाचा जो खणून करितात मार्ग ती.

**पाटवडी**, स्त्री० हरभर्याचा पिठाच्या शिजवून जा बरफी सारिख्या तोंडीं लावायाकरितां वड्या करितात ती.

**पाटवण**, न० दे० पाण्याचा जो पाट तें.

**पाटवणी**, न० पाटाचें जें पाणी तें.

**पाटसरी**, स्त्री० जई.

**पाटस्थळ**, न० पाटाचे पाण्यानें शेत, आगर, इ० जेथें होतें तें स्थळ.

**पाटा**, पु० पुरण, कोशिंबीर, इ० जाजवर वाटितात तो दगड; २, एकसारिखी लागत गेली जी मोठी शेतजमीन तो; कोणेक देशांचा पाटावर वंटा होणें म्ह०

म्ह० दुष्काळ, गनीम, इ० कानें सत्यानास होणें; जन्माचा पाटावरबंटा घेणें म्ह० जन्मपर्यंत पोषणाविषयीं पक्कर घेणें याचा प्रयोग निषेधार्थी.

**पाटागर**, न० पाटाचे पाण्यानें करितात जें आगर तें.

**पाटाव**, पु० न० अनेक चित्रविचित्रां किनरेशमी वस्त्र आहे; म्ह० वेडीचें सोंग घेतल्यास पाटाव फाडावें लागतें.

**पाटिलकी**, स्त्री० पाटलाचा जो अधिकार ती.

**पाटी**, स्त्री० धुळाक्षरादि लिहायाची जी फळी असते ती; २, मोठी जी टोपली ती; ३, ग० तुळई इ० च्या वयाजोगें मोठें लांब चौरस लांकूड ती; ४, नरकाचे मुसळाचे खालीं आणि वर जा दोन आडफळ्या बसविल्या असतात त्या प्रत्येकी; ५, को० रुंदी थोडी आणि लांबी बहुत असें जें शेत ती; ६, दे० आत्यापाट्यांची जी फळी ती; ७, को० घरदाचे किंवा वर जी आडवी लोखंडाची पट्टी बसवितात ती; ८, स्त्रियांचें कटिभूषण आहे.

**पाटी**, स्त्री० मोठी जी टोपली ती.

**पाटील**, पु० गांवचा कारभार करणारा वतनदार अधिकारी आहे.

**पाटीलपटवारी**, पु० पाटील, कुळकरणी इ० ते.

**पाटें**, न० रा० मोठी रुंद दर जी पाटी तें.

**पाटेल**, पु० पाटील.

**पाटेलकी**, स्त्री० पाटिलकी.

**पाठ**, पु० विद्यार्थी गुरूपासून स्वाध्याय दिवशीं जितकें व्याख्यान शास्त्रादिकांचें घेतो तो; २, परिपाठ; ३, ग्रंथादिकांची जी आवृत्ति तो; ४, कोणेक ग्रंथामध्यें एका पोथीवर एक आणि दुसरे पोथीवर दुसरे प्रकारचा परंतु अशुद्ध नव्हे अर्थही प्रायः सारखा मिळतो असे जे दोन प्रकारचे अक्षरक्रम असतात ते प्र०; ५, ३ लिं० तोंडपाठ; ६, स्त्री० शेळीचें जें स्त्र्यपत्य ती; ७, कंबरेपासून मानेपर्यंत जो शरीराचा मागला भाग ती; ८, फूल, पान, चर्म, साल, इ० कांचा बाहेरचा जो भाग ती; ९, तवा, पाट, सहाण, पाटा, यांचे प्रसिद्ध कार्योपयुक्त आंगाचा मागचा जो भाग ती; १०, मत्स्य, किंवा स्वाप, इ० कांचें दर्शनीय अंगाचें प्रतिपक्षी जें आंग ती; पाठ रिघणें किं० निघणें म्ह० भयादिकांमुळें कोणेक समर्थाचा आश्रय करणें; पाठ घेणें किं० पुरवणें म्ह० कोणेकास विवक्षित कार्य करण्याविषयीं सततत्व ष्ट लावित असणें किं० कोणेक कार्यावर निरंतर लटून उद्योग करित असणें किं० कोणेकाचे हात धुवून पाठीस लागणें; पाठ मोडणें म्ह० कोणेकाची पाठ घेण्याचा जो व्यापार धरिला होता त्यापासून निवृत्त होणें; पाठ धरणें म्ह० चालत्यास मागून धांवत आडुन गांठणें; पाठ देणें म्ह० कोणी कलहादि करीत असतां आपल्यास सामर्थ्य असतां ही उपेक्षा करणें; त्याची त्यास पाठ आहे इ० स्थलीं पाठ बळ आहे असा अर्थ होतो; शत्रूस पाठ देणें किं० दाखविणें म्ह० युद्धादि प्रसंगीं पळून जाणें; पाठ कांपणें म्ह० भयानें किं० घोर कर्म पाहिल्यानें शरीर कांपणें; पाठ टाकणें म्ह० पासलपट्टी करणें; पाठ राखणें म्ह० कोणेकाचा पाठराखेपणा करणें; पाठ भुईस लागणें म्ह० द्रव्यहीनतेमुळें किं० वार्धक्यामुळें तत्त द्व्यापारीं केवल असमर्थ होणें; पाठ उचलणें म्ह०

म्ह० तद्विपरीत समर्थदशा पावणें; म्ह० वारावाहील तर्शी पाठ करावी; शत्रूची पाठ तुडविणें म्ह० आघाडी पिछाडी मारणें; पाठवळणें म्ह० विवक्षित देशाकडे पाठ व्हावया जोगें फिरणें; पाठीवर असणें म्ह० प्रभु इ० कानें प्रमादादि जाले असतां शिक्षा करण्याविषयीं मित्र, बंधु, इ० कानीं प्रसंगीं आपत्ति दूर करण्याविषयीं, शत्रूनें नाश करण्याविषयीं, आश्रयभूत असणें; उ० या माणसांचा पाठीवर कोणी असल्याशिवाय काम करणार नाहींत; उ० आमचे पाठीवर ईश्वर आहे; चोराचे पाठीवर दोनशें स्वार पाठविले आहेत; संततिक्रमानें कनिष्ठ सोदरस्थानीं असणें; उ० माझे पाठीवर पांच भावंडें आहेत; संसारादि पाठीवर पडणें म्ह० अंगावर पडणें असा अर्थ जाणावा; कोणीएक कार्य पाठीवर टाकणें म्ह० आज करूं उद्यां करूं अशा रवालीं टाकणें; पाठीस लागणें म्ह० कोणक गोष्ट सुटेना अशा प्रकारें जडणें किं० कोणक जाणारास मागून धरायास धांवणें किं० पाठ पुरवणें; पाठीस लावणें म्ह० आग्रहानें काहींएक कोणकाचे पदरीं बांधणें; याचे काळीज पाठीस आहे म्ह० हा पराकाष्ठेचा साहसिक आहे; पाठीवरून असणें म्ह० आपले मागून स्वसोदरस्थानीं असणें; उ० माझे पाठीवरून चार भाउ जाले; पाठीशीं आपल्यास अवश्य निर्वाह केला पाहिजे अशा प्रकारें आपल्या संबंधीं; उ० हें काम मी आपले पाठीशीं लावून घ्यावें; तर मा झामागें हजार लचांडें आहेत; पाठीस पोट लागणें किं० पोट आणि पाठ एक होणें म्ह० अन्नाश कांहीं नसल्यामुळें अतिशयित पोट खोल जाणें; पाठीशीं घालणें म्ह० दुसर्याचा अपराध्यास आपण

आश्र

[illegible] यीं [illegible] उुन गे [illegible] पाठीमागें; उ० त्याचे पाठीपोटीं कोणी नाहीं; पाठीशीं म्ह० पाठीमागें; उ० माझे पाठीशीं शंभर माणसें आहेत; पाठीमागें म्ह० जास वास्तविक पाठ आहे असे जे मनुष्यादि त्याचे पाठीमागें किं० परोक्ष; उ० आपले पाठीमागें आपल्यास दिसत नाहीं; पाठीमागें कोणास कोण चागलें म्हणतो; विवक्षित देशापासून किं० कालापासून अतिक्रांत जे पूर्ववर्ति काल किं० देश त्यांचा ठायीं; उ० आतां तो गांव पाठीमागें राहिला; वर्षाचे पाठीमागें आपणास काहीं समजत नव्हतें; कोणक क्रिया किं० मनुष्यादिक होउन गेल्यावर अनंतर कालीं; उ० बापाचे पाठीमागें मुलानें नावलौकिक चांगला मिळविला; विभक्त जाल्याचे पाठीमागें जें जानें मिळविलें तें त्याचें; कोणक पदार्थाचा आपल्याकडील जो भाग तद्विपरीत भागाकडे; उ० त्या जोव्याच्या पाठीमागें तुझी गाय चरती; चालणारा जो पदार्थ तो जो शरीरभाग पुढें करून चालत असतो तद्विपरीत भागाकडे; उ० घोड्याचे पाठीमागें जाउन को लात मारील; आपण प्रवासार्थ गेलों असतां आपलें सर्व संभाळायास अधिकारी पुत्र, बंधु, इ० जे संबंधी असतात त्या कोटींत; उ० मी येथें एकटाच आहें परंतु पाठीमागें दोस मनुष्यें आहेत; पाठीमागें जो असेल तो क्रिया करील; कोणक क्रिया जिकडून जाली पुनः विपरीत गतीनें तिकडे; उ० पाणी आणली होती ती पाठीमागें दिली; पाठीमागें सरणें म्ह० कोणक कार्याविषयीं

मागें

मागें सरणें; उ० ह्याकोणतेंही साहसकर्माविषयींपा ठीमागें सरणार नाहीं; कोणेकाच्यापाठीमागें लागणें स्म० कोणेकाचे नादीं लागणें; पाठवळणें स्म० पाठमोरा होणें.

**पाठक**, पु० अध्यापक.

**पाठकांब**, स्त्री० दे० वेळूच्या पाठीसहित जी कांबती.

**पाठकुळी, पाठकोळी**, अ० दे० घेणें इ० कांच्यायोगीं प्र० पोर इ० उचलून त्यायासाठीं पाठीवर घेणें.

**पाठकोरा**, ३ लिं० एका अंगानें लिहिल्यामुळें दुसरें अंग ज्याचें कोरें आहे तो कागद.

**पाठकोरें**, न० एक्या अंगानें जो कोरा कागद तें.

**पाठचा**, ३ लिं० पाठीमागचा किं० आपले पाठीवर आलेलें भावंड तो.

**पाठजाळ**, पु० आपले पाठचे भावंडास कांहीं वाईट झालें असतां जो शोकादिक होतो तो; स्म० पाठजाळ पुरवेल पण पोटजाळ पुरवत नाहीं.

**पाठण**, न० कों० मारबसणें इ० प्रसंगीं पाठीस पाठण स्म०; २, रा० चोळीचा पाठीवरचा जो प्रदेश तें.

**पाठपुरावा**, पु० कोणेककार्यार्थ जो प्रवृत्त आलात्याचे पाठीमागून अनेकप्रकारें साहित्य करण्याचा जो व्यापार तो.

**पाठपोट**, अ० दोहीं पृष्ठांकडून लिहिण्याचें किं० वाचण्याचें वि०; उ० पुण्याहून कागद पाठपोट लिहून आला; २, दे० न० बायका मकरसंक्रांतीचे दिवशीं दोन जोगल्या सुतानें गुंडाळून परस्पर वाण देतात तें.

**पाठबळ**, न० कोणेक कार्याविषयीं प्रवृत्त आलेल्या समागाहून पाठपुरावा होण्याविषयीं कोणेक बंधु इ० समर्थाचा आश्रय असतो तें.

**पाठबोळ, पाठबेळ**, न० रा० पाठीकडल्या अंशाची सूप इ० करण्याचे उपयोगी जी पातळ वेळू इ० कांची कांबतें.

**पाठमोरा**, अ० ज्याची पाठ जासमोर आहे तो त्यास; २, गमनादिप्रसंगीं जिकडे मुख असावें तिकडे पाठ करून; उ० मला अडचणीमुळें फिरायास सांपडेना म्हणून पाठमोरा माघारा सरलों; कलहादिकांविषयीं पाठमोरा होणें स्म० पराङ्मुख होणें; पाठमोरा पहाणें स्म० मागें दृष्टि करून पहाणें.

**पाठराखणा**, ३ लिं० नव्यानेंच मुलगी सासर्यास जाते वेळेस जो माहेरचा कोणी बरोबर जाउन जो रहातो तो.

**पाठराख्या**, ३ लिं० पाठराखणा; २, कोणेकास कोणेक जो पाठपुरावा करितो त्याचा तो.

**पाठरिघावा**, पु० बा० पाठबळ.

**पाठलग**, पु० बा० विद्यादिसाधनार्थ गुरु इ० कांचे संबंधांत सर्वदा रहाण्याचा जो प्रकार तो; उ० त्याच्या तूं पाठलग सोडूं नको स्म० बरें होईल.

**पाठलाग**, पु० चोरादिक कोणी पळाला असतां त्यास कोणीएक पाठवून धरण्याविषयीं जो उद्योग तो.

**पाठवण, पाठवणी**, स्त्री० आपले घरीं कोणी आलेला जो भिक्षुकादिक त्यास कांहीं दक्षिणादि दान पूर्वक निरोप देतात ती किं० तें दक्षिणादिद्रव्य ती.

**पाठवणें**, धाडणें.

**पाठवळ**, न० पाठाळ, स्म० शेटशाह्णा आणि बेल

पाठबळ.

**पाठशक्ति**, स्त्री० कांहीं एक ग्रंथ पाठ करण्याचें किं० पाठ ह्मणण्याचें बुद्धिसामर्थ्य तें.

**पाठशाला, पाठशाळा**, स्त्री० शास्त्रादि पाठ सांगण्यासाठीं जी शाला केली असत्ये ती.

**पाठाड**, न० मारदेणें इ० प्रसंगीं पाठीसच ह्म०

**पाठाण**, न० पाठाड.

**पाठांतर**, न० कोणेक ग्रंथामध्यें श्लोक, वाक्य, पद, इ० विषयीं जो पाठ चालत असतो त्याहून विलक्षण क्वचित् प्रत्यंतरादिकांचा ठायीं उपलभ्यमान असतो जो इतर पाठ तें; २, तोंडपाठ जो श्लोकादि ग्रंथ त्याचा कोणेकापाशीं असतो जो भरणा तें किं० त्या भरण्यानें त्या पुरुषास असतें जें वैशिष्ट्य तें; ३, तोंडपाठ.

**पाठार**, न० ग्रंथादिकांत पाठीसच ह्मणतात; उ० अग्नीचे पाठारीं पिकें होतीं; २, पर्वतादिकांचें जें पठार तें; ३, महागिरी बांधतेसमयीं तळीं जें लांब उभें लांकूड प्रारंभीं घालितात तें; ४, ला० कोणेक कार्याची जी आरंभावस्था तें; उ० त्यानें नुकतें घर बांधायाचें पाठार घातलें आहे.

**पाठाशक्ति**, स्त्री० पाठशक्तीचा अपभ्रंश.

**पाठाळ**, न० पाठीवरून ओझें किं० स्वारी वाहाण्याचे उपयोगीं जें घोडें, बैल, उंट, इ० तें.

**पाठिंगा, पाठिंबा**, पु० ज्याचें ज्यास पाठबळ आहे तो बंध्वादि त्याचा.

**पाठी**, ३ लिं० ज्यास पाठशक्ति मोठी तो.

**पाठीमागचा**, ३ लिं० पाठीमागें स्थित्यादि द्वारा ज्याचा संबंध आहे असा जो कांहीं पदार्थ किं० कांहीं गोष्ट इ० तो.

**पाठीमागला**, ३ लिं० पाठीमागचा.

**पाठीमागून**, अ० कांहीं एक पदार्थाचा किं० मनुष्यादिकांचा जो पाठीमागला भाग किं० प्रदेश त्यातें धरून; उ० मासे पाठीमागून तूं धिरून नेतुस को; हें पागोटें पाठीमागून चांगलें दिसतें; २, कोणेक व्यवहार, काल, किं० देश यांचा अतिक्रांत जो विभाग त्यातें पुनः धरून; उ० हें वाक्य पुनः पाठीमागून ह्मण; पाठीमागून असा संप्रदाय चालत आला आहे तसें चालावें; ३, कोणेक मनुष्यादिक किं० कार्य होऊन गेल्यानंतर; उ० बाप मेल्यानंतर पाठीमागून यानें पैसा मिळविला; तुह्मी जेवल्यानंतर पाठीमागून आह्मी जेवूं; ४, विवक्षित मुख्य समयातें अतिक्रमून; यंदा पाठीमागून आवणी आली; ५, परोक्षता धरून; उ० हा तोंडावर गोड बोलतो आणि पाठीमागून शिव्या देतो.

**पाठून**, अ० पाठीमागून.

**पाठोपाठ**, अ० एकानें आरंभिली जी क्रिया तद्व्यवहितोत्तरक्षणीं तदन्यकर्तृक तत्सजातीय क्रियेचा आरंभ होई असें; उ० तुझे पाठोपाठ मी निघालों.

**पाड**, पु० निरख; त्याचा काय पाड आहे इ० स्थलीं तो कः पदार्थ असा अर्थ; २, आंबा, बोर, चिंच, इ० कांहीं वृक्षांचीं फळें वृक्षावर कांहीं पिकूं लागण्याची जी दशा तो; ३, दे० वृक्षावरच ईषन्मात्र पिकलेला जो आंबा तो; पाडचा ह्म० वृक्षावरच पिकलेलें असें आंबा, पेरू, बोर, रामफळ, इ० तो, किं० तदासन्नदशापन्न जो तोही.

**पांड**, पु० वांसकाठ्यारूप जें क्षेत्रप्रमाण, किं० क्षेत्र तो.

**पाडकुला**, ३ लिं० श० वयातीत असतां ही ज्याचे अंगावर कोवळेपणा आणि कांहीं पुष्टता दिसत असते असा जो पुरुषादिक तो; उ० तिजा पंधरा लेंकरें झालीं तथापि पाडकुली दिसते.

**पाडगें**, न० पासोडी इ० कांचें एक पट्टें; २, लुगडें, खणानें, इ० कोरे कापडाचा जो व्यक्ति त्यास म०, क्रयविक्रयव्यवहारप्रसंगीं प्र०.

**पाडणें**, पाड असा करणें.

**पाडव**, पु० पाडाव.

**पांडव**, पु० पुराणप्रसिद्ध पांच जण भाऊ राजे आहेत; २, ला० पांच या संख्येस म्ह०.

**पांडवकृत्य**, न० डोंगर, खडक, पोखरून देवालयें मठमंडप इ० कांहीं मनुष्य शक्तीनें व्हावयास कठिन दिसावा योग जे आकार कोठें कोठें आहेत त्यांस म्ह०.

**पाडवणें**, पाडणें.

**पाडवा**, पु० प्रतिपदा.

**पांडवांचें लेणें**, न० पांडवकृत्य.

**पाडस**, न० हरिणीचा वत्स तें; २, ग्रंथादिकांत गाय मनुष्यादिकांचे ही वत्सांस म्ह०; ३, ३लिं० पाडसा.

**पाडसा**, ३ लिं० कों० तान्हें नव्हे असें जें गोमहिष्यादिकांचें वासरूं तो किं० तान्हें नव्हे असें जें दुपतें गुरूं इ० तो.

**पाडळ**, स्त्री० एक औषधी आहे.

**पाडा**, पु० गाईचें जें पुमपत्य तो; प्रायः अल्पवयस्कवृत्ति, २, कों० पोफळ, नारळ, कोकंब, इ० वृक्षसमुदायाचीं जून पाडायास आलेलीं फळें एकवार पाडण्याचा जो व्यापार तो; ३, कोणेक गांवचा जो मुख्य वसति असल्ये तदितर दहापांच घरांचा स्थलभेदें करून जा अनेक वस्त्या असतात त्या प्रत्येकीं; ४, एकादिक संख्या एकादि दशांत संख्यानीं गुणून जे मुलांस लिहायास शिकवितात ते प्रत्येकीं

**पाडाचा**, ३ लिं० वृक्षावरच पिकलेलें आंबा, बोर, इ० फल तो व तदासन्न दशापन्न जो तो ही.

**पाडाव**, पु० दे० पराजय; उ० त्यानें दोन शब्दांत त्याचा पाडाव केला; २, ३ लिं० पराजित; उ० मी त्याचीं घोडीं पाडाव करून आणिलीं.

**पाडाव**, ३ लिं० पाडाव द्वितीयार्थी.

**पांडित्य**, न० शास्त्रार्थकथन, तत्वविवेचन, इ० रूप जें पंडितकर्म तें; २, भाषणचातुर्य.

**पाडी**, स्त्री० गाईचें जें स्त्र्यपत्य ती.

**पांडु**, **पांडुर**, ३ लिं० सं० पांढरा.

**पाडकरी**, पु० कों० नारळ, पोफळ, इ० कांचा पाडा करण्याविषयीं जो कुशल तो.

**पाँड्या**, पु० ग्रामाद्यधिकारी एक वतनदार आहे; २, दे० केवळ लहान नव्हे आणि केवळ प्रौढ नव्हे असा जो वाघ तो.

**पाँढर**, स्त्री० देवतारूपें करून मानलेली जी ग्रामाचे चतुःसीमेचा आंतली भूमि ती; उ० तूं या गावांत राहून अशा लबाड्या करितोस पण पांढरीस मानणार नाहीं; २, गांवचे वतनदारांचा किं० गावांत राहणारे यच्चयावत् मनुष्यांचा जो समुदाय तो.

**पाँढरपेशा**, पु० ब्राम्हण, परभू, सोनार, कांसार, लोहार इ० जी जाति तो, म्ह० जी जाति मुख्यत्वें करून कृषिकर्म करीत नाहींत.

**पाँढरमाती**, स्त्री० पांढरी जी माती ती.

**पाँढरवट**, ३ लिं० ईषत् जो पांढरा मृत्तिकादि पदार्थ तो.

**पांढरा**, ३ लिं॰ दुधाचे वर्णासारिखा जो वर्ण तो; २, नष्टदृष्ट; ३, संकेतानें सर्पास म्ह॰; पांढर्‍यावर काळें करणें म्ह॰ आपण दस्तऐवजी गुंते असा लेख करून देणें.

**पांढरापरीस**, पु॰ पांढरे पायांचा जो मनुष्यादि त्यास म्ह॰.

**पांढरापाल**, ३ लिं॰ रोगादिकानें शरीर नीरक्त झाल्यामुळें पांढरे पालासारिखा दिसूं लागला तो.

**पांढराफटफटीत**, ३ लिं॰ केवळ जो पांढरा तो; २, जेथें कांहीं लाली इ॰ वर्णांतर असावें तें नाहीं म्हणून पदार्थ निस्तेज दिसतो तेथेंच प्रायः प्र॰; उ॰ पुतळीपुढें बागेचे दराचें सोनें पांढरें फटफटीत दिसतें.

**पांढराभोंपळा**, पु॰ दुधभोंपळा.

**पांढरासफेत**, ३ लिं॰ स्वच्छ पांढरा जो वस्त्रादि पदार्थ तो.

**पांढरी**, स्त्री॰ पांढर.

**पांढरेंपाणी**, न॰ केवळ पातळ जें ताक त्यास म्ह॰.

**पांढरेपायांचा**, ३ लिं॰ जेथें जाईल तेथें वाटोळें होतें असा अपयशाचा जो मनुष्यादि त्यास म्ह॰; कोणाकाचें उखळ पांढरें होणें म्ह॰ दारिद्र्यदशा जाउन कांहीं संपत्तिदशेतें पावणें.

**पांढुरका**, ३ लिं॰ पांढरा असा जो दिसतो तो, जेव्हां पदार्थाचें अमुकत्व करून जाणत नाहीं केवळ तन्निष्ठ पांढरेपणामात्र दिसतो इ॰ कांहीं विषय असतां प्र॰; उ॰ तो मार्गावर कोणसा पांढुरका दिसतो तस्मात् तो कांबळा नव्हे कोणी धोत्र्या आहे असें वाटतें.

**पाणउतारा**, पु॰ कठोर भाषण, शिवी, गाळ, पराजय, इ॰ कें करून होतो जो तेजोभंग तो.

**पाणकापड**, न॰ कापल्या अंगावर ओल्या वस्त्राची जी पट्टी बांधितात तें.

**पाणकोमडा**, पु॰ कोमड्यासारिखा पाण्यांत एक जीव असतो तो.

**पाणक्या**, पु॰ लोकांचे घरीं पाणी भरून उपजीविका करितो तो प्रायः ब्राह्मण.

**पाणखार**, पुं॰ उकडांबे इ॰ खारवायासाठीं पाण्यांत मीठ घालून खारें पाणी करून ठेविलें असतें तो.

**पाणघर**, न॰ पाणी तापवून स्नान करायाकरितां जें स्थल केलें असतें तें.

**पाणचट**, ३ लिं॰ जास मिष्टपणा कांहीं कमी असा जो सद्रवपदार्थ तो; २, ला॰ ज्यांत रस नाहीं किं॰ तात्पर्य नाहीं असें जें भाषण, गाणें, इ॰ किं॰ तादृश भाषणादि करणारा मनुष्य तो.

**पाणचूल**, स्त्री॰ पाणघरची जी चूल ती.

**पाणजंजाळ**, न॰ कों॰ पर्जन्य बाहुल्यादिकामुळें जिकडे तिकडे पाणीच पाणी अशी जी दशा होते तें.

**पाणजांवई**, पु॰ जांवयाचा बंधू सथट्टेनें म्ह॰.

**पाणढाळ**, पु॰ घराचे पाण्याचा किं॰ भूमीचा कोणेक दिशेकडे जो क्रमें करून उतरतेपणा असतो तो.

**पाणथरी**, स्त्री॰ पोटांत एक रोग होत असतो ती.

**पाणथळ**, न॰ पर्जन्य गेला असतांही जेथील ओल एकाएकीं उडत नाहीं व उष्णकालीं खणिलें असतां जवळच उदक लागतें अशी जी भूमि तें; २, ज्या स्थलीं पाटाचें पाणी इ॰ सोय असती अशी जी जमीन तें.

**पाणंद**, स्त्री॰ दोहींकडून कुंपण, शेरताटी, इ॰ आवरण जास आहे असा जो ग्रामांतील किं॰ ग्रामसन्निध

द्दिन

ढिनमार्गतो.

**पाणद्ळ**, न० पाणथळ.

**पाणपट्टी**, स्त्री० पाणकापड.

**पाणपिकलें**, न० कों० पाउस पडत असतांच पिकतें असें जें हळवें धान्य त्याचें पावसाळ्यांत करितात जें शेत त्यास प्रसंगविशेषीं स्त०.

**पाणपीक**, न० कों० पाणपिकलें.

**पाणपोई**, स्त्री० पन्हेरी प्रथमार्थी.

**पाणफोल**, न० गा० भाताचे फुलावर पर्जन्य पडल्यामुळें जें त्यामध्यें फोल होतें तें.

**पाणबुडया**, पु० नदी, समुद्र, इ० कांत मोती इ० तळचा पदार्थ काढायासाठीं चिरकाळ बुडण्याचा ज्याणें अभ्यास केला असतो तो.

**पाणभर्या**, पु० पाणक्या.

**पाणमांजर**, न० पाण्यांत मांजरासारिखा एक जीव असतो.

**पाणमोट, पाणमोटली, पाणमोटळी**, स्त्री० प्रसूतिकालीं गर्भ बाहेर पडायाचे पूर्वी पाण्यानें भरलेली एक चर्माची मोट बाहेर येत्ये ती.

**पाणरस**, पु० गा० आंब्याचा एकदा रस काढिला असतो पुनः त्या साली कोयांत पाणी घालून रस काढितात तो.

**पाणलोट**, पु० पाणढाळ.

**पाणवठा**, पु० गांवचे लोकांचें पाणी भरुन आणणें वस्त्रें धुणें, इ० कर्मांचें नद्यादिकांवर जें स्थल असतें तो.

**पाणवळ**, न० कों० पाणथळ; २, ३ लिं० पाणचट प्रथमार्थी.

**पाणशाई**, स्त्री० मृदंगास केवळ जी पानळशाई देतात ती.

**पाणशेंग**, स्त्री० सकेतानें मासळीस स्त०.

**पाणसरडें**, न० पाण्यांत एक सर्पजातीय जीव असतो तें; २, रहाटाची माळ सरुं नये ह्मणून जें प्रतिबंधक लांकूड बांधितात तें.

**पाणसरा**, पु० घाटानें बैल, घोडे, इ० आले त्यापासून कांहीं कर घेउन घाट कोसळला असेल तो नीट करावा इ० कर्माचा अधिकारी वतनदार असतो तो.

**पाणसा**, पु० कों० गोमहिष्यादिकांस जीवनपोषणादि हेतुभूत जें तत्तद्देशीय उदक तृण इ० तो; उ० या गांवचा पाणसा गुरांस मानत नाहीं.

**पाणसाप**, पु० जळांत राहाणारा साप आहे.

**पाणसांपूड**, स्त्री० कों० गृहादिकांचे पाख्याचे खालचे बाजूचे बांशांचे टोकाजवळ जी मोटी मजबूद सांपूड बांधित असतात ती.

**पाणसाळ**, स्त्री० भूम्यादिकांचें उच्चत्व प्रयुक्त जें समत्व, विषमत्व, तें पाहाण्याचे उपयोगी गवंडीइ० कां पाशी ओळंब्यानें विशिष्ट काष्ठाचें त्रिकोण आउत असतें ती.

**पाणारणें**, न० फणस, आंबा, इ० कांचें फल इ० पर्जन्यादिसंबंधी उदकाचा आंत संबंध झाल्यामुळें त्याचा स्वादादि बिघडायाजोगें विकृतीनें विशिष्ट होणें.

**पाणि**, पु० सं० हस्त; दंडपाणि, वज्रपाणि, इ० स० आणावे.

**पाणिग्रह**, पु० विवाहधर्मानें स्त्रीचा जो स्वीकार तो.

**पाणिग्रहण**, न० पाणिग्रह.

**पाणिवैद्य**, पु० विषार इ० उपद्रवांवर पाणी अभिमंत्रित करून देतो तो.

**पाणी**, न० उदक; २, शस्त्रादि लोहमय पदार्थास तापवून पाण्यांत बुडविलें असतां तत्संस्कारानें जो गुणविशेष उत्पन्न होतो तें; ३, तेज लाक्षणिकार्थी; उ० मोतीं मोठें आहे पण पाणी कमी; लढकून दोन आपसाल करायास अंगीं पाणी पाहिजे; ४, कांहीं पदार्थावर रुवर्णादिकांचा जो द्रव करून लाविताात तें; पाणीपाउस, पाउसपाणी, केरपाणी, धुणें पाणी, म्ह० पाणीभरणें. केरकाढणें, धुणीधुणें, इ० नित्यव्यवहाराच्या उद्योग असा अर्थ जाणावा; पाण्यावरची रेघ किं० रेघ म्ह० लागलेंच दुसरे प्रकारचें व्हायाचें असें जें कोणाकाचें प्रतिज्ञादिरूप भाषण त्यास म्ह०; कोणाकास पाण्यापेक्षां पातळ करणें म्ह० त्याचा केवळ पाणउतारा करणें; कोणाकास पाणी पाजणें म्ह० पराजित करणें.

**पाणीदार**, ३ लिं० ज्याचे अंगीं पाणी चांगलें आहे तो रत्नादि पदार्थ किं० मनुष्यादि तो.

**पाणीपाउस**, पु० पाउस इ०.

**पाणेरा**, पु० **पाणेरें**, न० कों० पाणी भरलेलीं भांडीं ठेवायासाठीं घरांत चिरेबंदी किं० चुन्याची भूमि करितात तें तो.

**पान**, स्त्री० कांदा, लसूण, भात, तृण, इ० कांचें जें पर्ण तें; २, धान्यमळायासाठीं खळ्यामध्यें तिवडा पुरून त्याचे भोंवतीं कणसें इ० कांचे राशीवर फिरायाकरितां जी बैलांची पंक्ति बांधितात ती, पर्याय० पात; ३, पु० सं० पतन; ४, चंद्र सूर्यांचें जें क्रांतिसाम्य तो; ५, व्यतीपात; ६, न० कों० पातें; ७, केवळ लाहान जो माड तें.

**पांत**, स्त्री० कों० लावणीलावणें किं० शेपकाढणें इ० व्यापारीं तत्तत्संबंधाचा सारखेपणा दीचा आपले समोरचा जो भूप्रदेश धरिला असतो तो.

**पातक**, न० अधर्म; २, त्याणें लागतो जो दोष तें.

**पातकिरला**, ३ लिं० कों० पातळांगी मनुष्य तो.

**पातकी**, ३ लिं० पातक केलें आहे ज्याणें तो.

**पातडें**, न० पंचांग म्ह०.

**पातफणस**, पु० फणसांत एक भेद आहे.

**पातवड**, पुं० कों० अळू इ० कांचे पानास डाळीचें पीठ लावून गुंडाळून शिजवून कापून तळून खावयासाठीं वड्या करितात तो.

**पातवडी**, स्त्री० पातवड.

**पातळ**, ३ लिं० ज्यामध्यें द्रवांश अधिक असा जो तक्रादि सद्रवपदार्थ; २, जाडपणास कमी असा जो फळी, पान, इ० पदार्थ; ३, विरल; उ० शेत भारी पातळ पेरलेंस; ४, दाटत के असें जें स्नेह ममता, इ० तो; ५, कृश जें शरीर; ६, न० स्त्रियांचें नेसायाचें वस्त्र आहे.

**पातळपोटया**, ३ लिं० ज्याचें पोट वर दिसत नाहीं तो.

**पातळाई**, स्त्री० दाटीचा प्रतिपक्षी जो धर्म तो; उ० मघां देवळांत दाटी होती आतां पातळाई झाली.

**पातळांगी**, ३ लिं० जन्मतः शरीरानें जो कृश तो.

**पातळांग्या**, ३ लिं० पातळांगी.

**पातळी**, स्त्री० दे० पातळाई; २, लोहाचें एक आउत आहे.

**पाताण्या**, पु० एक जाति आहे.

**पाताल**, न० भूलोकाचे खालीं सात लोक आहेत ते त्यांपैकीं;

२, खोलपणा आधिक्येंकरून वर्णायाचा असतां अतिशयोक्तीनें तत्तत्प्रदेशास ल०; उ० एकेउपासानें डोळे पाताळांत गेले; पोट पाताळास गेलें.

**पाताळ**, न० पाताल.

**पाताळयंत्र**, न० उदेल इ० तेल काढायाचें पात्र आहे तें.

**पाताळयंत्री**, ३ लिं० ज्याची मसलत भारी खोल असल्ये तो.

**पातित्य**, न० सं० पतितपणा, दुष्कर्म केल्यामुळें जो पतितपणा येतो तद्विषयीं लोकांत प्र०.

**पातिव्रत्य**, न० पतिव्रतापणा.

**पाती**, स्त्री० अनेककृतव्यवहारांत अनेकांचे जे अंश असतात ते प्र०; उ० या सावकारींत नवघांचा पत्या आहेत; २, सोनें, रुपें, इ० कांमें सांधकाम करण्याचे उपयोगी जो डांकाचा पत्रा असतो ती; ३, रा० पात प्रथमार्थी; ४, माडसुपारी इ० कांचें पर्ण ती.

**पांती**, स्त्री० पाती प्रथमार्थी.

**पातीदार**, ३ लिं० भागीदार.

**पानें**, न० डोळ्याची पापणी; २, तरवार, सुरी, इ० कांचें जें पान तें; ३, रा० फणसांत जामध्यें आंठळ असतनाहीं असें जे केवळ वारीकगरे असतात तें; पात्यास पातें नलागणें ल० ईषन्मात्रहि निद्रा नलागणें.

**पातेजणें**, पात्यवणें.

**पातेरा**, पु० अनुपयोगित्वेंकरून विवक्षित वाळलेल्या पर्णाचा जो समुदाय तो.

**पातेरें**, न० कों० पातेरा.

**पातेली**, स्त्री० लहान जें पातेलें ती.

**पातेलें**, न० कढी, सांबारें, इ० करण्याचे उपयोगी ताम्रादिकाचें आकारविशेषाचें उथळ पात्र असतें तें.

**पातोडा**, पु० पापोडा.

**पातोडी**, स्त्री० पातवडी.

**पातोळा**, पु० तांदळांचे पिठाचें पक्वान्न आहे.

**पात्यवणें**, रा० जो पदार्थ किं० व्यवहार निरंतर देखरेख इ० पूर्वक आपण संभाळायाचा तो दुसरा संभाळील असा विश्वास पावून त्याजवर ठेवणें किं० केवल आपण देखरेख नकरितां मोकळा सोडणें; उ० नेणते मुलावर घर पात्यवून बाहेर जातां येत नाहीं; विहिरीवर मुलास पात्यवूं नका.

**पात्र**, न० कांहीं एक पदार्थ ठेवायास आधार भूत जें भांडें, पान, इ० तें; २, नदीचें पाणी जितकी रुंदी व्यापून चालतें तो तितका प्रदेश; ३, ला० दान, शाप, इ० देण्याविषयीं उचित जो ब्राह्मण अपराधी इ० तें; ४, प्रशंसा व निंदा, इ० करण्याविषयीं उचित जो सद्गुणी दुर्गुणी इ० तें; ५, क्षमा, दया, इ० काविषयीं जें उचित उद्देश्य तें; ६, गुण दोष इ० कांचा जो निधि तें, सत्पात्र, दानपात्र, इ० समासहि आणावे; ७, सं० नाटकामध्यें जीं सोंगें येतात तीं प्रत्येकीं.

**पात्रा**, स्त्री० वेश्या.

**पात्सर**, पात्सार, पु० वा० विश्वास.

**पांथ**, स्त्री० पांत.

**पांथ**, पु० पथिक.

**पाथर**, स्त्री० रा० वस्त्रें धुणें, वर बसून स्नान करणें, इ० कुपयोगी सपाट जो दगड ती.

**पाथरआंबटी**, स्त्री० रा० जी बोंत्री दगडांवर पर्जन्यकालीं

कालीं एक ओंबट वनस्पति रुजत असती ती.

**पाथरफोड**, पु० एकपक्षी आहे जो चोंचीनें दगडफोडीत असतो तो; २, श० पाथरवट.

**पाथरफोड्या**, पु० पाथरवट.

**पाथरवट**, पु० जोतें इ० बांधायाचे दगड घडून उपजीविका करणारी अशी मनुष्यांत एक जाति आहे.

**पाथरी**, स्त्री० पालेभाजी आहे; २, मनुष्यांचे पोटांत एक रोग होत असतो ती.

**पांथस्थ**, पु० पांथाचा अपभ्रंश.

**पांथा**, स्त्री० पांत; २, दे० पु० कोणेक कामाचा जो मार्ग तो.

**पांथी**, स्त्री० भागी प्रथमार्थी.

**पांथीदार**, पु० भागीदार.

**पाथेय**, न० सं० मार्गी खावयाचे उपयोगी लाडू इ० जे पांथजन बाळगितात तें.

**पाद**, पु० चरण; २, गुदशब्द तो.

**पांद**, स्त्री० पाणद.

**पादचारी**, ३ लिं० पायानें चालणारा जो मार्गस्थ तो, स्म० अश्वादियानरहित.

**पादडणें**, कों० कोणेकास कांहीं एक कामाखालीं धरून पुष्कळ श्रमविणें.

**पादडा**, पु० कों० कोणेकास पुष्कळ पादडल्यामुळें जी जर्जरप्राय अवस्था होत्ये ती; काढणें, घालणें, निघणें, या धातूंचायो० प्र०.

**पादणें**, गुदद्वारानें शब्दकरणें, स्म० पादोपणनादो.

**पादत्राण**, न० सं० जुतें, जोडा, इ० तें.

**पादरदाण**, स्त्री० रा० गुदवायूचीजी घाण ती.

**पादरधिटाई**, स्त्री० अंगीं सामर्थ्य व धीटपणा नसतां तोंडानेंमात्र जो धीटपणाचा डौल कोणी दाखवितो ती.

**पादरफुसका**, ३ लिं० विवक्षित कामाचे निर्वाहापुरतें ज्याचे अंगीं सामर्थ्य नाहीं तो मनुष्यादि जीव किं० पदार्थ तो.

**पादरा**, ३ लिं० अतिशयित पादण्याचा स्वभाव ज्याचा तो; २, ला० भितर्यास स्म०, स्म० पादर्यास वरणाचें मीस.

**पादरीमामी**, स्त्री० एक वनस्पति आहे.

**पादवणें**, पादडणें.

**पादशाह**, पु० फा० پادشاه यवन जातीय जो राजा तो.

**पादशाही**, स्त्री० फा० پادشاهی पादशाहाचा जो अधिकार तो; २, ३ लिं० पादशाहीसंबंधी जो शिका सनद इ० तो.

**पादाक्रांत**, ३ लिं० पराक्रमानें पराजित करून स्वाधीन केले जे देश, शत्रु, इ० तो.

**पादुका**, स्त्री० देवादिकांचा ज्या खडावा असतात त्या प्र०; २, दगड इ० कांवर देव, गुरु, इ० कांचे पाउलांचें चिन्ह केलें असतें ती; ३, साधारण पादत्राणासही कदाचित स्म०

**पादेलोण**, न० एक क्षार आहे.

**पादोदक**, न० चरणतीर्थ.

**पाद्य**, न० सं० पादप्रक्षालन किं० तदर्थ जें उदक तें; २, ला० कोणेकास पायाचें घालणें स्म० लात, बुक्या, इ० कानें पुष्कळ तुडविणें.

**पान**, न० सं० प्राशन; २, पर्ण; ३, शस्त्राचीमूठ सोडून अवशिष्ट जो भाग तें; ४, कागदाचा जो ताव किं० पोथीचें जें पत्र तें; ५, मुलांचे कपाळावर एक

भूषण पर्णाकार बांधिन असतात तें; ६, धोतरजो ड्याचीं जीं दोन धोतरें तीं प्र०; ७, केतकीच्या पुष्पा ची जी पांकळी तें; ८, गंजीफांचा जो एक रंग त्या मध्यें आठ पानें असतात त्या प्र०; याशब्दानें मद्यपानासही केवल पा न व्यवहार आहे; सर्प झोंबण्यास पान लागणें ह्म० विडा खाण्यास पान खाणें ह्म०.

**पानउतारा**, पु० पाणउतारा.

**पानकोंबडा**, पु० पाणकोंबडा.

**पानगा**, पु० तवा नसतां पानास न्न पीठ लावून जी भा करी करितात ती.

**पानगी**, स्त्री० ल्हान जो पानगा ती.

**पानघणस, पानघोणस**, पु० सर्पाकार पाण्यांतील एक जीव आहे.

**पानघोंगडें**, न० विरल्यास ह्म०

**पानचट**, ३ लिं० पाणचट.

**पानडी**, स्त्री० कंठा इ० कांत पदकस्थानीं त्रिदलाकार किं० पर्णाकार पदार्थ करून जी घालितात ती.

**पानढाळ**, पु० पाणढाळ.

**पानतोटा**, स्त्री० पत्रावळी इ० उपयोगी पानांच्या का ड्या लावून जो लांबट भारा बांधितात ती.

**पानथळ**, न० पाणथळ.

**पानदान**, न० विड्याचीं पानें ठेवायाचें जें पात्र तें.

**पानपट्टी**, स्त्री० विड्याचें पानांत सुपारी इ० घालून जी गुंडाळी केली असती ती.

**पानपात्र**, न० उदकादि प्राशन करायाचें पेला, लो टी, इ० पात्र तें.

**पानफूल**, न० कांहीं आकार विशेषाचें तेल इ० कांचें पानदान असतें तें.

**पानपेंडा**, पु० रा० पानभारा.

**पानबाजी, पानबाजू**, स्त्री० पादशाह आणि वजीर इतर दंतिरिक्त जीं उंची पानें गंजिफांचे डावांत वाट णीस येतात तीं.

**पानबाळी**, स्त्री० स्त्रियांचें कर्णभूषण आहे.

**पानभारा**, पु० भोजनायुपयुक्त पानांचें जें ओझें तो.

**पानमळा**, पु० विड्याचे पानांचा जो मळा तो.

**पानलोट**, पु० पाणलोट.

**पानवठा, पानवथा**, पु० पाणवठा.

**पानवेल**, स्त्री० नागवेल.

**पानसडें**, न० रा० पानसुपारी इ० विड्याचें साहित्य ठेवायाचें बटवी इ० पात्र तें.

**पानसरडें**, न० पाण्यांतील जिवाणू आहे.

**पानसळ**, स्त्री० दे० भूमि इ० कांचें समानत्व पाहाण्या चें एक आयुत आहे.

**पानसुपारी**, स्त्री० विडा; २, आपलें काम दुसर्‍यापासू न करून घ्यावयाचें असतां अल्पस्वल्प जें त्यास इत्यादि देतात त्यास ह्म०.

**पाना**, ३ लिं० पुरता पिकल्यानंतर वर पर्जन्य पडल्यामु ळें विकृति पावलेला जो धान्य इ० दाणा तो.

**पानेणें**, धा० दाण्यानें पानेपणा पावणें.

**पान्हणें**, गाय इ० कांनीं पान्ह्यानें युक्त होणें.

**पान्हवण**, न० गाय इ० कांस पान्हा यावयासाठीं जें तृ ण अंबोण इ० खावयास घालितात तें; २, लो० कों णी कानें आपल्यास अनुकूल व्हावें ह्मणून जें इ त्यादि देतात त्यास ह्म०.

**पान्हवणें**, पान्हणें.

पान्हा, पु० पुत्रप्रेमादिकारणानें शरीरावयव बंधशिथिल झाल्यामुळें दुग्धादिकांची गति बाहेर व्हावयास कारणीभूत जो त्याजवर वेगउत्पन्न होतो तो; २, ला० दयेनें किं० प्रसन्नतेनें जो अंतःकरणास कळवळा येतो तो.

पान्हेणें, पान्हवणें.

पाप, न० पातक; २, कोणेकामिआदिकाविषयीं कुडाभाव इ० कजी दुष्टवासना उत्पन्न होती तिला म्ह०; उ० आतां याचेमनांत कांहीं पाप आलें म्हणून हा निर्मळ बोलत नाहीं; मीं कांहीं पापानें पायधुतले नाहीं इ० स्थलीं मीं कांहीं सर्वदा पापाचरणच करितो असे नाहीं असा अर्थ.

पापड, पु० उडदांची दाळ इ० कांचे पिठाच्या आंतमीठ, हिंग, पापडखार, इ० मसाला घालून भिजवून लाटून जो पोळी सारखा तोंडीं लावावयास पदार्थ करितात तो.

पापडखार, पु० एकक्षार आहे.

पापडी, स्त्री० पापडासारिखेंच तांदळाचे पिठाचें तळून खावयाचें तोंडीं लावणें आहे; २, घारग्याला कचित् म्ह०; ३, गुळाचीमाय तबक इ० कांत घालून जी पातळ वडी बांधितात ती; ४, कों० फरसबंदी केलेली जी भूमि ती; ५, बुंदी पाकून परात इ० कांत थापून वड्या बांधितात ती.

पापणी, पांपणी, स्त्री० डोळ्यास खालीं आणि वर जी सकेश आच्छादक चर्मे आहेत तीं प्र०

पापदरा, पु० शरीर, फळ, कंद, इ० कांवरील केवळ पातळ जो त्वगंश तो; २, कों० पापोडा.

पापदृष्टि, स्त्री० कांहीं एकपदार्थाकडे काम, मत्सर, इ० मनांत धरून पाहण्याचा जो प्रकार ती; उ० परस्त्रीकडे पापदृष्टीनें पाहिलें तर दोष.

पापा, पु० मुलांचे भाषेनें भाकरीस म्ह०.

पापिष्ठ, ३ लिं० अतिशयित जो पापी तो.

पापी, ३ लिं० पातकी.

पापुदरा, पु० पापदरा.

पापोटा, पापोडा, पु० भाकर, गोळी, इ० कांचे दोहीं अंगें जे साली सारखे पातळ अवयव असतात ते प्र०.

पापोदरा, पु० पापदरा.

पाप्याचापितर, पाप्याचें पितर, पु० न० केवळ शरीरानें रोड, अशक्त, जो मनुष्यादि त्यास म्ह०.

पांबरी, स्त्री० पामरी.

पाभर, स्त्री० शेतांतील बीं पेरावयाचें एक आउत आहे.

पाभळ, स्त्री० ग० वृक्ष, माळा, इ० कांपासून पुष्पें, ढेंकूण इ० कांची दाटपणें जी वृष्टि होत असते ती.

पाभारी, स्त्री० दे० पाभर.

पामर, ३ लिं० सं० ज्यामध्यें कोणतेंही तेज नाहीं अशा प्रकारें केवल तुच्छत्वेंकरून विवक्षित जो मनुष्यादि तो.

पामरी, स्त्री० रेशमाचें एक पांघरायाचें वस्त्र आहे.

पामा, स्त्री० सं० खरूज.

पाय, पु० चालण्याचें साधन भूत जे शरीराचे अवयव असतात ते; २, पलंग, माचा, इ० कांचा जो खूर तो; ३, चतुर्थांश या अर्थीं गतपर्यायभूत जें चरण, पाद, इ० संस्कृत शब्द त्याचा व्यवहार वहूत आहे; ४, वृक्षांचीं जीं मुळें त्यांस त्यांचे पाय

असें म्ह० ; ५, पर्वतांच्या ओ केवळ खालच्या प्रदेश तो ; ६, अक्षरांच्या जो अधोभाग तो ; ईश्वर, गुरु, धनी, इ० उद्देशून नम्रतेनें भाषणादि प्रसंग असतां पाय या अवयवानें लक्षून तत्तव्यवहार होतो ; उ० मजवर आपले पायांची कृपा असली म्ह० मी तरेन; मी पायांच्या सेवक आहें इ० व्यवहार आणावे ; कोणे काचे पाय धरणें म्ह० आपला सांभाळ होण्याविषयीं कोणेकाच्या आश्रय धरणें ; कोणेक व्यवहारादिकांत पाय घालणें किं० शिरविणें इ० स्थलीं तत्तव्यवहारीं आपण शिरणें ; पाय काढणें इ० स्थलीं तत्तव्यवहारादिकांपासून बाहेर निघणें ; कोणेकाचे पोटावर पाय देणें म्ह० पोटिंस्थ बुडविणें ; कोणेकाचे डोकी, उर, नाक, यांवर पाय देणें म्ह० त्यापेक्षां आपण वरचढ होणें ; पायरीस पाय लावणें म्ह० चिरकाल चालत आलीजी मर्यादा तिचा वरचढपणें उल्लंघ करणें ; पाय मोडणें म्ह० चिंतिलेलें कार्य करण्याविषयीं उत्साहभंग होणें ; पाय पसरणें म्ह० एखादे व्यापारांत किं० देशांत अल्पस्वल्प प्रवेश आला असतां युक्तियुक्तीनें तो सर्व व्यवहारादि व्यापणें; म्ह० भटास दिली ओसरी आणि हळू हळू पाय पसरी ; वाटेच्या पाय आडवाटेस पडणें म्ह० प्रमादानें हातून दुष्कर्म घडणें ; कोणेकाचे पाय उचलणें म्ह० त्यास अधिकार भ्रष्ट करणें ; पायांची आग किं० आळ मस्तकांत आणें म्ह० एकाएकी क्रोध चढणें ; पायांशीं पाय बांधून बसणें म्ह० कोणेकास सक्त तगादा करणें ; पायांवर पाय देउन वाद मांगणें किं० काम करणें इ० स्थलीं त्याची त्याची भीड न धरितां बरोबरीपेक्षां किंचित् अधिक वाद सांगणें, काम करणें, असा अर्थ ; पायांत खोडा पडणें, पाय बांधून घेणें, पाय गुंतणें, इ० स्थलीं कांहीं एक व्यवहारामध्यें आपण गुंतून पडणें ; मी त्याचा पायांवर कुतरीं मांजरें घातलीं नव्हती म्ह० तत्तत्कार्याविषयीं प्रवृत्त होण्यास मी कांहीं त्याचें आर्जव केलें नव्हतें ; पायांचा प्रताप म्ह० पायगूण मनुष्यवृत्ति ; त्याचा पायांशीं तो बांधावा म्ह० लबाडी इ० दुर्गुणाविषयीं तेउभयतां तुल्य असा अर्थ ; पायांवर पाय घालून, टाकून, चढवून, बसणें इ० स्थलीं निष्काळजीपणें उद्योगादि श्रम न करितां राहणें ; पायांतला पायपोस डोकीवर चढणें म्ह० हलक्या मनुष्यानें चढून थोराची अमर्यादा करणें ; पायांतला पायपोस पायांतच ठेवावा म्ह० हलक्या योग्यतेचा मनुष्यास उच्चपद संबंध होउं देउं नये ; पायांखालची वाट, मार्ग, म्ह० नित्याचे वहिवाटेची वाट, मार्ग, पायांखालीं जळतें तें न विझवितां डोंगरास आग लावायास धांवणें म्ह० आपले दोष न पाहतां किं० न गणितां दुसऱ्यांचे दोष काढण्यास प्रवर्तणें ; पाय पुढें ठेवणें म्ह० कांहीं एक व्यापारीं प्रवृत्त होणें ; जळता पाय जाळणें म्ह० धरिलेला हट्ट तडीस नेणें ; एका पायांवर उभें असणें म्ह० कोणेक गोष्टीविषयीं हौसेनें सिद्ध असणें ; पाय फोडणें म्ह० नपशाल लावणें ; फुंकून पाय टाकणें म्ह० अतिशयितच विचार करून व्यवहार करणें ; पायां पडणें किं० पायांवर डोकी ठेवणें म्ह० नमस्कार करणें ; म्ह० आंथरूण पाहून पाय पसरावे.

**पायउतार**, पु० नद्यांस होडी इ० साधनांवांचून उतरून जावया जोगा जो उतार असतो तो.

**पायउतारा**, ३ लिं० वाहनावरून उतरून पायानें चालतो.

तो; उ० थोराचे दर्शनास पायउतारा आलें; २, अ० चरणचालीनें; उ० आम्ही काशीस पायउतारा गेलों; ३, पुं० पानउतारा; दे० पायउतार्यावर येणें म्ह० अरे तुरेवर येणें.

**पायका**, पु० कों० पावका.

**पायकाळा**, पु० कों० कृष्यादिकर्माविषयीं ओगडीटविला असतो तो.

**पायखुंट**, न० कों० गोमहिष्यादिकांस पळूनये इ० कारणार्थ पायांला आणि गळ्याला मिळून एकदोरीनें बंधन करितात तें.

**पायखुंटी**, स्त्री० कों० पायखुंट.

**पायगत**, न० पायतें.

**पायगूण**, पु० कों० कोणी आपलेघरीं उत्पन्न आला किं० आला जो मनुष्य, पशु, इ० पदार्थ तत्संबंधानें आपल्यास जें बरें किं० वाईट फल होतें तत्कारणानें करून कुसतन्मनुष्यनिष्ठ सुलक्षण किं० दुर्लक्षण तो.

**पायघडी**, स्त्री० लग्नसमारंभांत रासनाहण्याचेदिवशीं वरपक्षीय वऱ्हाडणींस आपले घरीं आणतेसमयीं मार्गांत त्यांचे पायांखालीं मृदु लागावें म्हणून आंथरण्याच्या घड्या घालितात त्या प्र० बहुवचनांत.

**पायघोळ**, ३ लिं० अतिशयित विस्तृतपणामुळें पायांवर घालायाजोगें जें नेमायानें घोळ अंगरखा इ० किं० पायांवर घोळे असें न आटोपितां पांघरलें जें शेला, शालजोडी इ० किं० तादृश गळ्यांत घातलीजी पुष्पादिकांची माळ इ० तो.

**पायचळ**, स्त्री० रा० पायरवा.

**पायचाल**, स्त्री० चरणचाल.

**पायजमा**, **पायजामा**, पु० इजार.

**पायजिर्भी**, स्त्री० दे० तोरडी.

**पायठा**, पु० रा० सपाटभूमीस भाजून जें नाचण्याचें शेत करितात तो.

**पाँयडा**, पु० कोणेक व्यवहार याविर्तानें उत्तरोत्तर सतत चालणार अशा अर्थाचा ज्ञापक तत्त्व्यवहाराचा जो प्रारंभांश तो; २, रा० माड, पोफळ, इ० कांवर चढतेसमयीं जी दोरी पायांत किं० हातांत घालितात तो.

**पाँयतण**, **पायतन**, न० जुनें किं० कुणब्याचे उपयोगी जो दांडगा जोडा तें.

**पायतर**, **पायथर**, पु० कों० पायतें प्रथमार्थी.

**पायतें**, न० निजणारानें पायांकडील जो प्रदेश तो; २, भूमी, डोंगर, इ० कांचे निम्नतेकडच्या शेवटील जो प्रदेश तें.

**पायथा**, पु० पायथें.

**पायथें**, न० पायतें.

**पायदळ**, न० पायानें चालणारी अशी जी फौज तें.

**पायधरणी**, स्त्री० कोणेक कार्यार्थ कोणेकाचें जें पगकाष्ठें आर्जव ती. प्र० अनेकवचनांत.

**पायधूळ**, स्त्री० पायांस लागलेली मार्गसंबंधी जी धूळ ती; याचा प्रयोग आपलेघरीं कोणी आला असतां आपणमजवर दया केली अशा प्रकारें त्याचा गौरव यानें असतां आजमजवर पायधूळ झाडली इ० होतो; २, नम्रतेनें गुरू इ० कांजवळ बोलायाचें असतां आपल्यास म्ह०

**पायपिटी**, स्त्री० अनेक कारणार्थ इकडे धांव तिकडे धांव

असे जे पायानें करायाचे परिश्रम ती.

**पायपोशी**, ३लिं॰ पायपोसाचे डौलानें बांधलेलें जें पागोटें किं॰ घडलेला पोहरा ती.

**पायपोस**, पु॰ चर्मीं जोड्याचे जे दोन अवयव ते प्र॰; कोणेकास पायपोस मारणें म्ह॰ दुर्भाषणादिकानें निर्भर्त्सना करणें; पायपोस दांतीं धरणें म्ह॰ कोणेकास अतिनम्रभावानें शरण जाणें; पायपोसासारिखें तोंड करणें म्ह॰ फजीती आल्यामुळें तोंड वाईट करणें; त्याचे पायपोस घेउन तो पळेल म्ह॰ त्यास तो ठकवील.

**पायपोसखाडु**, ३लिं॰ खेटरखाउ.

**पायपोळ**, स्त्री॰ तापलेले जमीनीवरून चालताना जी पायांची सनसना होती ती.

**पायबंद**, पु॰ घोड्याचे मागले पायांस बांधितात जी दोरी ती; २, ला॰ कोणेकामागें संसार इ॰ रूप जो पाश असतो त्यास म्ह॰.

**पायमर्दी**, स्त्री॰ या॰ कांहीं एक कार्य साधनार्थ जिकडे जाण्याचा प्रसंग येईल तिकडे धांवत जावें असें त्या कामावर खपण्याचा जो प्रकार ती; उ॰ काम होण्याचें कठिन होतें परंतु पायमर्दी केली तेव्हां काम आलें.

**पायमली, पायमल्ली, पायमाली**, स्त्री॰ सैन्य, गुरें, इ॰कानीं देश, शेत, इ॰कांची केलीजी तुडवातुडवी ती; २, शेत इ॰ कांस जी निगा असावी तिचा अभाव ती; उ॰ यंदां शेताची पायमल्ली जाली म्हणून शेत चांगलें पिकलें नाहीं; ३, ला॰ कोणेकाचे भाषणादिकांची कोणेकानें केलीजी अवगणना ती.

**पायमार्ग**, पु॰ भूमीवरील जो मार्ग तो, जलमार्गाचे व्यावृत्त्यर्थ याचा प्रयोग होतो; २, गाडे, घोडीं, इ॰ जा मार्गानें जात नाहींत केवल मनुष्य मात्र जातें असा जो लहान अवघड मार्ग तो.

**पायमोडें**, न॰ कों॰ कोणेक व्यापारीं प्रवृत्त होणारास उत्साहभंगरूप जें निवृत्तीस कारण उपस्थित होतें तें; २, क्रमानें कांहीं एक व्यवहार वाढत जात असतां तीगति कुंठित होण्यास जें कांहीं निमित्त उपस्थित होतें तें; उ॰ हें पोर अमंगळ, अंमळ चालूं लागले म्ह॰ खोकला, पडसें, अशीं अनेक पायमोडीं येतात.

**पायरव**, पु॰ कों॰ चाहूल; २, रसायन, दुग्ध, इ॰ नासायास किं॰ दुखणें अधिक व्हावयास कारणीभूत येणार्या जाणार्या मनुष्याचे रहदारीनें जो विकार उत्पन्न होतो ती; ३, कोणेकाचें कोणेकाचे घरीं किं॰ कोणेक देशीं जाणें येणें इ॰ रूप जी वहिवाट असती तो.

**पायरवणें**, रसायनादिक पायरवाचे विकारानें युक्त होणें; २, रा॰ चाहुलीनें किं॰ प्रत्यक्षतः कोणेक मनुष्यादिक आढळणें.

**पायरस्ता**, पु॰ पायवाट.

**पायरहाट**, पु॰ पायांनें पाणी काटायाचा जो रहाट तो.

**पायरहाटी**, स्त्री॰ कों॰ पायरहाट.

**पायरी**, स्त्री॰ उच्चस्थलावर चढायाचा जो मार्ग त्याचा ठार्या एकापेक्षां एक उंच अशा क्रमानें पाषाण काष्ठादिकांचे पाय ठेवायास आधार केले असतात ते प्र॰; २, एकापेक्षां एकानें उच्चपणानें वागावें एकानें नीचपणानें वागावें असे लोकशास्त्र व्यवहार

सिद्ध जे अनेक अधिकार ते प्रत्येकीं; पायरीनें पायरी चढावी किं० जिकावी इ० स्थलीं आज थोडेंसें, त्यापेक्षां उद्यां कांहीं अधिक, अशा क्रमानें कोणेक कार्यक्रित जाणें; ३, कों० पाईर.

पायली, स्त्री० देशभेदें करून व्यवस्थित केलीमणाच्या षोडशांश रूप किं० द्वादशांशरूप धान्यादिमोजायाचें एक माप आहे ती.

पायवट, स्त्री० दे० मार्गादिकाच्या ठायीं येणारा जाणाराचे पावलाची जी पंक्ति उठत असती ती.

पायवटणें, मार्गादिस्थल कोणेकाचे पायवटीनें युक्त होणें; २, कोणेकमार्ग कोणेकाचे नित्य येण्या जाण्याचा वहिवाटीमुळें अभ्यस्त होणें.

पायवस, न० रा० पायतर.

पायवाट, स्त्री० पायमार्ग.

पायस, न० खीर.

पायसूट, ३लिं० चालण्याविषयीं जो चपळ तो.

पाया, पु० भिंत, जोतें. इ० करायाचें असतां पूर्वीं भूमी खणून त्यामध्यें दगड चुना इ० क घालून जी बंदिस्त करितात तो; २, ला० कांहींएक कर्तव्य व्यवहाराचा जो प्रारंभांश तो, जावरून त्या कार्याचा आकाररीत्यादि प्रायः समजतें, प्रायः घालणें, पडणें या धातूंचा यो० प्र०.

पायाशुद्ध, ३लिं० कोणेक कार्यास जींजीं साहित्यें असावीं किं० जीरीति असावी त्यामध्यें यत्किंचित वैकल्य नाहीं असें जें कार्य तो.

पायांस, न० रा० पायवस.

पायाळ, पायाळू, ३लिं० पायांकडून जो उत्पन्न होतो तो मनुष्य.

पायी, स्त्री० दे० राहुटीचा तना च्या दरच्या हातभर जो अंतर तो; २, राहुटांचें पाणी आंत नयावें म्हणून तिचा भोंवता चरखणितात ती.

पायीं, अ० मुळें; उ० शेतापायीं मी शंभर रुपयांस बुडालों; वानराचे पायीं वस्ती होणें कठिण; २, चरणचालीनें चालत; उ० ते सर्व घोड्यांवर होते आणि मी पायीं होतों.

पायींत, न० कों० पायतर.

पार, पु० पिंपळ, वट, इ० कांचे मुळीं भोंवताला जो ओटा बांधितात तो; २, कों० नद्यांस जो पायउतार असतो तो; ३, कोणेक गोष्टीचा किं० पदार्थाची पलीकडची जी कड, म्ह० यदुत्तर त्या गोष्ट्यादिकांचा अंश उत्तरत नाहीं तो; उ० या शास्त्राचा पार कोणी पाहिला नाहीं; माया, प्रपंच, समुद्र इ० कांचे पाराविषयीं सर्व प्रयोग होतात, इतरत्र तत्तत्धातुसन्निधानानें अव्ययता पावून होतात ते प्रायः लिहितों; पारपडणें म्ह० संकटादिकांतून मुक्त होणें किं० कांहींएक कार्य शेवटास जाणें किं० कालमार्गादि अतिक्रांत होणें; पार जाणें म्ह० नद्यादिमध्यवर्त्ति पदार्थ अतिक्रमून पलीकडे जाणें; पार होणें म्ह० पारपडणें किं० जाणें किं० आरपार होणें; पिंपळास पार बांधून देणें म्ह० कोणेकाचें लग्न किं० कांहीं मोठें कार्य करणें; पुण्याचे पारीं बसणें म्ह० निरंतर परोपकार करायाचा स्वभाव धरणें; ४, समुद्रकांठीं भरतीचा वेळेस मात्र उतार होत नाहीं अशा जाला हानन द्या असतात तो; ५, रा० प्रहराचा अपभ्रंश.

पारई, स्त्री० रा० पहार प्रथमार्थी.

**पारका**, ३ लिं० परकी; २, कों० पारखा.

**पारख**, स्त्री० परीक्षा.

**पारखणावळ**, स्त्री० रुपये इ० दुसऱ्याचे पारखीनें पारखून घेतलेअसतां त्यापारखणारास जें मोल्य द्यावें लागतें ती.

**पारखणें**, परीक्षितकरणें.

**पारखा**, ३ लिं० पूर्वी जाचें प्रत्यक्ष झालेलें नाहीं किं० प्रत्यक्ष होउन बहुत दिवस झाले ह्मणून ह्या अमुक च अशा जाची ओळख पटत नाहीं असा जो मनुष्य, पशु, स्थल, भाषण, इ० सर्वपदार्थ तो; २, पूर्वी आपला असोन कांहीं कारणामुळें आजवर पूर्ववत् आत्मसंबंध मानायास शंका वाटोंलागली अशा अवस्थेंत पावला जो मनुष्य गृहादि तो; उ० माझे कडचें पंचजें वोलत होतें तें तिकडून कांहीं लोभ दृष्टीस पडताच मारे पारखें जाह्लें.

**पारखी**, ३ लिं० परीक्षक.

**पारंगत**, ३ लिं० सं० आरब्ध व्यापाराचा जास पार लागला तो त्या व्यापारामध्यें; उ० तो ब्राह्मण एका शास्त्रामध्यें पारंगत आहे.

**पारंगा**, पु० मागास.

**पारगीवारगीनें**, अ० पाळीपाळीनें.

**पारजक**, पु० पारिजातकाचा अपभ्रंश तो; २, न० त्याचें पुष्प तें.

**पारठा**, ३ लिं० पाडसा.

**पारडी**, स्त्री० ह्मशीचें जें स्त्रीपत्य ती, प्रायः लाहान असतां व्यवहार.

**पारडूं**, न० ह्मशीचें जें वत्स तें.

**पारडें**, न० परडें प्रथमार्थी.

**पारणें**, न० कांहीं एक निमित्तानें उपोषण केलें असतां त्या नियमानें सोडून जें भोजन करितात तें; पारणें फिटणें ह्म० जा जा इंद्रियास जा जा विषयावर अतिशयित प्रीति आहे तत्तद्विषय लाभानें तत्तदिंद्रियाचें समाधान होणें; उ० आपला मुखडा पुरता दाखवून माझ्या डोळ्यांचें पारणें फेड.

**पारणें**, वा० अन्न, उदक, औषध, इ० हिताबद्दल पडणें.

**पारतंत्र्य**, न० सं० परतंत्रपणा.

**पारद**, पु० सं० पारा, पारदभस्म इ० समास आणावे.

**पारध**, स्त्री० अरण्यांतील पशु किं० पक्षी मारण्याचा किं० धरण्याचा व्यापार तो, किं० ते पशु पक्षी ती; पारध साधणें ह्म० जा कार्याचा उद्देशानें प्रवृत्त आला तें कार्य साधणें

**पारधी**, ३ लिं० पारध करणारा जो तो.

**पारपत्य**, न० अपराध्यास शिक्षा लागावी ह्मणून जें दंडन तें.

**पारंपर्य**, न० सं० शिष्य, वंशज, इ० कांचा तादृश परंपरारूप जो क्रम तें.

**पारपळ**, **पारंपळ**, ३ लिं० कों० शिक्षकाचे शिक्षेंतून सुटल्यामुळें मनस्वीपणें वर्तूं लागला जो मनुष्य, पशु, इ० तो.

**पारपोळ**, ३ लिं० वा० पारपळ.

**पारंबा**, पु० रा० पारंबी प्रथमार्थी.

**पारंबी**, स्त्री० वड, पिंपरी, पाईर, इ० कांचे खांद्यास जा मुळ्या फुटून खालीं येतात ती; ह्म० शेंडी तुटो किं पारंबी तुटो; २, रा० आंब्याचे वांठ्याचे आंतली

हिरवळ वी असती ती.

**पारय**, स्त्री॰ कों॰ पाहार.

**पारलौकिक**, ३ लिं॰ सं॰ परलोकसंबंधी जे भोगादि तो.

**पारवडा**, पु॰ कों॰ एका गावांतील जे अनेक विभाग ते प्र॰.

**पारवा**, पु॰ एक पक्षी आहे; २, याचे अंगवर्णासारिखा जो रंग तो; ३, नाहूशिष्टवस्त्रादि तो.

**पारशी**, पु॰ एक मनुष्यांत जाति आहे.

**पारसनाथ**, पुं॰ जतींचा देव आहे.

**पारसनीस**, पु॰ हिं॰ हिंदुजातीय राजा असतां त्यापाशीं प्रसंगवशात फारशी भाषा लिहिण्याचें जें काम पडतें त्याजवर जो अधिकारी कारकून ठेविला असतो तो.

**पारसा**, ३ लिं॰ कों॰ पारोसा.

**पारा**, पु॰ रसायनाद्युपयोगी एक रस आहे; २, कोंवळा जो फणस तो; ३, कों॰ घायाळ म्हणून झाड आहे तिची पाती; ४, वा॰ भिंतीस विटादिकांचा थर लावितात तो; ५, काळे व पांढरे ठिपके ज्याचे अंगावर आहेत असा जो बैल, गाय, इ॰ तो.

**पारायण**, न॰ पुराणादिग्रंथांचें साद्यंत जें पठन तें.

**पारायणी**, ३ लिं॰ पुराणादिकांचें पारायण करणारा तो.

**पारावार**, पुं॰ सं॰ अंतपार याचा निषेधार्थी वि॰ प्र॰; उ॰ भाषेत शब्द किती आहेत याचा पारावार कोणास ठाऊक नाहीं.

**पारिजातक**, पु॰ एक पुष्पवृक्ष आहे.

**पारितोषिक**, न॰ सं॰ आपल्यास कोणेकानें संतोषविल्यामुळें प्रसन्न होऊन त्यास देतात तें वस्त्र इत्यादि तें.

**पारिपत्य**, न॰ पारपत्य.

**पारिभाषिक**, ३ लिं॰ विवक्षितव्यवहारांस व्यर्थ काहीं परिभाषेनें संकेतित करून ठेविला जो अर्थ तो.

**पारी**, स्त्री॰ केळफुलांचे पोटच्या फण्यावर जे आवरक अवयव असतात ते प्र॰; २, मोदकाचे पुरणाभोंवतालें जें पिठाचें आवरक असतें तें; ३, वा॰ ओल्याचा जो बांगा तो.

**पारुष्य**, न॰ सं॰ कठोरपणा; २, कोणास शिव्यागाळी एतद्रूप किं॰ हाणणें, मारणें, एतद्रूप कोणेकानें केला जो अपकार तें.

**पारोशी घोंसाळी**, कों॰ स्त्री॰ घोंसाळीसच म्ह॰ कदाचित पारोशी इतक्याचा ही प्र॰ होतो.

**पारोसा**, ३ लिं॰ रात्र अतिक्रमल्यामुळें धुवून शुद्ध करण्याचे योग्यतेचा जो मनुष्य, मनुष्यावयव, वस्त्र, भांडें, इ॰ पदार्थ तो धुतल्याचे पूर्वी; उ॰ तू पारोसा आहेस तर पारोशी भांडीं घासून आण; २, पूर्वदिवशीं आणून ठेविलें जें पाणी, पुष्पें, इ॰ किं॰ पूर्वदिवशींचा पडलेला जो केर तो; पारोसें काम म्ह॰ रात्र अतिक्रमिल्यामुळें दुसरे दिवशीं भूम्यादि शुध्यर्थ सडासंमार्जन इ॰ करावें लागतें तें.

**पारोसा दोडका**, कों॰ पु॰ पारोसें.

**पारोसें**, न॰ कों॰ पारोशी घोंसाळीचें जें फल तें.

**पारोळी**, ३ लिं॰ पारोळें म्हणून गांव आहे तेथील जी संध्येचीपळी, उपकरणी, इ॰ पदार्थ तो.

**पार्थक्य**, न॰ सं॰ पृथक्पणा.

**पार्थिव**, न॰ ग॰ पूजा करावयाकरितां जें मृत्तिकेचें लिंग करितात तें; २, ३ लिं॰ पृथ्वीसंबंधी जो पदार्थ तो.

३, पु॰ राजा.

पार्वती, स्त्री॰ देवी.

पार्श्वभाग, पु॰ सं॰ मनुष्यादि प्राण्याचे किं॰ गृहादि पदार्थांचे पुरोभाग आणि पृष्ठभाग वर्जून अवशिष्ट जे दोन भाग ते प्र॰.

पाल, स्त्री॰ पल्ली; २, न॰ दाहापांच सुताडे एकत्र जोडून बैठक घालणें किं॰ छाया करणें इत्याद्यर्थ जें वस्त्र करून ठेविलें असतें तें; ३, उडपाल; ४, पु॰ मोठे लढाऊ गलबतांत एक भेद आहे; ५, ३, सं॰ पालक याचे प्र॰ प्रायः समासीं, भूपाल, महीपाल, गृहपाल, इ॰ जाणावे; पाल घालणें मांडणें ल॰ स्त्रीनें प्रसिद्धपणें व्यभिचारावर पैका मिळवूं लागणें.

पालक, ३ लिं॰ सं॰ पालन कर्त्ता तो; २, पु॰ ग्रं॰ पाळणा.

पालकी, स्त्री॰ पालखी.

पालकीपदस्थ, ३ लिं॰ पालखीपदस्थ.

पालख, पु॰ ग्रं॰ पाळणा; २, स्त्री॰ सोनें, रुपें, तापवून परीक्षा कर्त्तव्य असतां कानस, फलाख, इ॰ त्यास चिन्ह करितात ती.

पालखी, स्त्री॰ राजादिकांनीं बसून जावयाचें मनुष्यवाह्य लोकडांचें यान आहे, जीस धनुष्याकार वेळूची दांडी असती ती.

पालखीपदस्थ, ३ लिं॰ ज्यास राजापासून पालखींत बसायाचा अधिकार मिळाला आहे तो.

पालछत्र, न॰ कांठीस पागोटें बांधून नवर्‍यामुलावर मार्गीं धरायाकरितां गुढीसारिखें करितात तें.

पालट, पु॰ एक कार्य अनेकानीं वांटून वांटून करायाचें असतां त्याविभाग्यांनीं वांटून घेतलें जे कालविभाग तेत्या त्याविभाग्यांचे येथें विभागी शब्दानें कर्त्ता कर्म, करण, इत्यादि कारकें किं॰ क्रिया विवक्षित आहे; उ॰ चाकरी करायास चार चार घटकेंचे पालट बांधून दिल्हे आहेत; कालपांढरें पागोटें घातलें आज तांबडे पागोट्याचा पालट; काल जेवलों आज उपोषणाचा पालट; २, कोणेक क्रिया एक दिवस वगळून होत असती तिचा होण्याचा जो दिवस तो, किं॰ तशा प्रकारें क्रिया होण्याचा जो प्रकार; उ॰ उद्यां ज्वराचा पालट आहे; ज्वर नित्य येत नाहीं, पालटानें येत असतो; ३, कांहीं एक पदार्थाची इकडेंचें तिकडे, तिकडचें इकडे, होई अशी जी व्यवस्था; उ॰ नित्य एकच पागोटें घालूं नये पालट करून घालावें; ४, कांहीं एक अवस्थावान् किं॰ प्रकारवान् जें बुद्धि क्रियादि त्यांची तत्तदवस्थादि भेदें करून जी भिन्नता तो; उ॰ त्याला पैसा मिळतांच बुद्धीस पालट आला; एकाच मांडीवर बसलें असतां कळ लागती मांडीचा पालट करावा.

पालटणें, बुध्यादिकानीं पालटचतुर्थार्थातें पावणें; २, कोणेक पदार्थानें पालट तृतीयार्थरूप व्यवस्थेतें पाववणें.

पालटें, न॰ रा॰ तट्या उभा करून दाणा ठेवायास जें सांठवण करितात तें

पालत, पालथ, स्त्री॰ कों॰ पाळत.

पालती, पालथी, ३ लिं॰ पाळती.

पालथणें, पालथें करणें.

पालथा, ३ लिं॰ उपडा; कोणेकास पालथा घालणें ल॰ विवादादिकांमध्यें पराजित करणें.

पालन, न॰ रक्षण.

पालपट्टी, स्त्री॰ पाल करण्याचे उपयोगीं जें वस्त्र

विणलें असतें ती; २, लहान जें पाल ती.

**पालपडद्ळ**, न० पाल इ० तें.

**पालंबी**, स्त्री० कों० पारंबी प्रथमार्थी.

**पालव**, पु० पदर प्रथमचतुर्थार्थी; २, पल्लव; ३, कोणेक मुख्य देशादिकांचा जो आसपास देशाचा ठायीं छायारूप संबंध असतो तो; ४, कोणेक गोष्टीस किं० ग्रामादिकांस नवाच वाढला जो अवयव तो; ५, कोणेकास पालव घालण्याचा जो व्यापार तो; कोणेकास पालव घालणें किं० टाकणें ह्म० दूरस्थितास समीप येण्या करितां वस्त्रानें खुणावणें; ६, दयादिरूप जो हृदयास द्रव त्यास कदाचित् ह्म०; उ० वाळल्या झाडास पालव फुटेल पण याचे हृदयास पालव फुटणार नाहीं.

**पालवण**, न० वा० गुरानीं खावया जोगा जो ओला पाला तें.

**पालवणी**, न० दुखण्यांतून उठलेल्या मनुष्यास प्रथम स्नान घालायासाठीं ओषधी कढवून जें पाणी करितात तें.

**पालवणें**, वृक्षानें पल्लवयुक्त होणें; २, कोणेकास जवळ येण्याकरितां वस्त्रानें खुणावणें; ३, पदराचे वार्यानें किं० पुष्पादिकानें दिव्यानें मालविणें.

**पालवा**, पु० कों० नांगरादिक हाकतेवेळेस बैलादिकांस हाकायाकरितां जी काठी घेतात तो.

**पालवी**, स्त्री० वृक्षांस नूतन फुटला जो पल्लव समुदाय ती; २, ला० केवल क्षीण शरीरास रसायनादि द्वारा रक्त वृद्धीचा जो प्रारंभ होतो ती; ३, वा० कोणेकाची दरिद्रावस्था जाउन कांहीं संपत्ति येउं लागती ती दशा; फुटणें येणें या धा० प्रा० प्र०.

**पाला**, पु० व्यक्तिगत संख्या ज्याची विवक्षित नाहीं अशा पर्णांचा जो समुदाय तो.

**पालाशविधि**, पु० जामेल्या मनुष्याचा दाहसंस्कारार्थ देह किं० अस्थि सांपडत नाहींत ह्मणून पळसाचे पानाचा पुतळा करून दाहादि उत्तरक्रिया करितात तो.

**पालुपद**, न० दे० वारंवार ह्मणायाचें गीतादिकांमध्यें जें ध्रुपद असतें तें.

**पालें**, न० कों० पालवण; २, वा० पालटें.

**पालेआसण**, पु० एक झाड आहे.

**पालेजणें**, वा० वृक्षानें पल्लवयुक्त होणें; २, ला० मनुष्यानें पालवी तृतीयार्थानें युक्त होणें.

**पालेणें**, कों० वृक्षानें पल्लवयुक्त होणें.

**पालेभाजी**, स्त्री० पालारूप जी मेथी, माठ, इ० भाजी ती.

**पालोपद**, न० कों० पालुपद; २, ला० कोणेकाचे भाषणामध्यें वारंवार उगीच एखादा शब्द येत असतो त्यास ह्म०

**पाल्हाळ**, पु० थोड्यांत सांगावयाची जी गोष्ट तीचा विशेषणादि द्वारा अतिशयित जो विस्तार तो; उ० कविजन गोष्टीचा क्वचित् संक्षेप करितात क्वचित् पाल्हाळ करितात; २, मूलभूत गोष्टीस वाढवायास नवा जो विशेषणांश लावितात तो; उ० मी याला थोडेंच बोलायास सांगितलें होतें परंतु यानें पदरचा त्यास पाल्हाळ लाविला; ३, कों० दयादिनिमित्त हृदयास जो द्रव येतो तो.

**पाव**, पु॰ चतुर्थांश; पावभाकर, पावशेर, पावमण, इ॰ समासीं भाकर इ॰ कांचा चतुर्थांश असा अर्थ होतो, परंतु लिंग उत्तरपदाचें होतें; २, स्त्री॰ कों॰ पाउ.

**पावक**, पु॰ सं॰ अग्नि.

**पावका**, पु॰ शिडीस पायरें बांधायास जीं लांकडें मारिलीं असतात तीं न॰; २, घडोंची, मेज, इ॰ कांचा जो पाय तो; ३. माड, ताड, इ॰ कांवर चढायाकरितां आ किं॰ विहिरींत उतरायाकरितां त्यास खांचा पाडितात तो.

**पावकें**, न॰ एक पाव पाव, बेपाव अर्धा, अशी चतुर्थांशाचें जें लेख आहे तें; २, कापड, चोपड, इ॰ कितीएक जिनसांचे एका ओळीचा जो चतुर्थांश तें.

**पावटा**, पु॰ एक द्विदल धान्य आहे; २, नृत्य, दांडपट्टा, इ॰ व्यवहारीं बेताप्रमाणें जो पावला चा प्रक्षेप तो; उ॰ इला आजून नाचण्याचा पावटा साधला नाहीं; ३, पायंडा प्रथमार्थी; पाउल शब्दावरील संप्रदाय प्रायः एथें ही आणावे.

**पावठणी**, स्त्री॰ या॰ पाउठणी.

**पांवडा**, पु॰ पावका तृतीयार्थी.

**पावडा**, पु॰ खोरखडाचे नांगरास फाटे असतात त्याचे अग्रास पर्णासारिखी आकृति असत्ये तो.

**पावडी**, स्त्री॰ नांद, शेण, गुळ, इ॰ काढायाकरितां जें लाकडाचें पावडें केलें असतें ती.

**पावडें**, न॰ खोरें म्हणून माती ओढायाचें आउत आहे.

**पावण**, न॰ कों॰ ग्रामांतराहून नवीवधू सासर्यास आणण्याचा जो व्यापार तें; २, रा॰ मुलीची वरात आतेसमयीं माहेराहून लाडू, तांदूळ, इ॰ एके पात्रांतून बरोबर देतात तें.

**पावणा**, पु॰ या॰ पाहुणा.

**पावणी**, स्त्री॰ या॰ मार्गी भय नव्हावें म्हणून सर्कारचा शिपाई किं॰ पत्र बरोबर घेतात ती.

**पावणें**, मनुष्यादिपदार्थानें गतिद्वारा मध्यदेशातें आक्रमून विवक्षित देशीं संबद्ध होणें; २, अवस्था, गुण, मान, अवमान, इ॰ कांनीं कोणेकानें विशिष्ट होणें, येथें त्या अवस्थादिकांस कर्मता असती; उ॰ वृद्धत्व पावल्यामुळें तो बधिरत्व पावला इ॰ आणावें; ३, कोणेक मनुष्यादिपदार्थ किं॰ निरोप इ॰ नेवून विवक्षित स्थलीं संबद्ध करणें; उ॰ मला तुलीं माहेरीं पावून माघारें जा; ४, कांहींएक विषय कोणेकास कोणेकापासून लब्ध होणें; उ॰ आजवर यजमानाची कृपा असती त्याला काय तें पावतें आल्यास कांहीं पावत नाहीं; मागील कर्जापैकीं काय पावलें तें सांगा; हीगोष्ट मला पावली म्ह॰ या गोष्टीविषयीं बरें वाइटाचा निर्वाह करणार मी धनी आलों अशा प्रतिज्ञेचें वाक्य; ५, आराध्यादिदेवानें इष्टकामना पूरक होणें.

**पावता**, ३ लिं॰ विवक्षित स्थलीं विवक्षित मनुष्यादिकांकडे पावला जो कागद, द्रव्य, इ॰ ती; उ॰ जाची पोथी त्यास पावती करून ये; २, पु॰ सासरवाशीण, माहेरवाशीण, इ॰ सासरें इ॰ स्थलीं आउं लागली असतां तिकडचें मूळ न आल्यास इकडचा कोणी गडी इ॰ आपल्यास पोंहचवायाकरितां घेती तो.

**पावती**, स्त्री॰ कोणेकापासून कोणेकास कांहीं रुपये इ॰ द्रव्याचा जो पावलेपणा ती; २, सावकार इ॰ कांस कूळ इ॰ कांपासून पावलें जें द्रव्यादिक त्याचा अमुक अमुक पावलें असा जो लेख करून देतात ती.

**पावंद**, स्त्री॰ कों॰ भात झोडतेवेळेस मांदीचे आसपास पडतें जें भात ती.

**पावधी**, ३ लिं॰ कों॰ वर्षास किं॰ महिन्यास अमुक द्रव्य देईन अशा बोलीनें जी दुपत्यासाठीं दुभती गाय किं॰ म्हैस आणली ती.

**पावधूक**, स्त्री॰ कों॰ गुरूं पावधें आणल्यामुळें जें गुराचे धन्यास देय द्यावें लागतें ती.

**पावधें**, न॰ कों॰ पावधी परंतु महिष्यादि गुरांचें वि॰

**पावन**, ३ लिं॰ सं॰ पवित्र; २, पाप किं॰ अस्पृश्यतादि दोष ज्याचा गेला तो; ३, ज्याचे संबंधानें पापादि दोष जातो तो.

**पांवरी**, स्त्री॰ लहान जो पांवा ती.

**पावलट**, स्त्री॰ रा॰ पायवट.

**पावलटणें**, वा॰ पायवटणें.

**पावला**, पु॰ रुपयाचा चतुर्थांश; २, पावटा द्वितीयार्थी.

**पावली**, स्त्री॰ पावल्याचे मोलाचें रुप्याचें नाणें आहे.

**पावलोपावलीं**, अ॰ पदोपदीं.

**पावशा**, पु॰ चातक म्हणून पक्षी आहे.

**पावशेर**, पु॰ शेराचे चतुर्थांशाचें माप किं॰ वजन असतें तो; २, तत्परिमित जें धान्य, गूळ, इ॰ तो.

**पावसाळा**, पु॰ पर्जन्यकाळ.

**पावसाळी**, स्त्री॰ कों॰ पावसाळा.

**पावसाळें**, न॰ कों॰ मेघाछादन, वृष्टि, इ॰ रूप जी पर्जन्याची व्याप्ति तें; उ॰ काल उघड होती पण आज पावसाळें दिसतें.

**पावळी**, स्त्री॰ कों॰ पागोळी.

**पांवा**, पु॰ वंशाचे नळीस अनेक छिद्रें पाडून समस्वर साधून वाद्य करितात तो.

**पावीत**, ३ लिं॰ रा॰ पावना.

**पावेतों**, अ॰ पर्यंत.

**पाव्हणा**, पु॰ पाहुणा

**पाव्हणारावळा**, पु॰ पाहुणाराउळा.

**पाश**, पु॰ सं॰ दोरी इ॰ कांस गांठ मारून कांहीं पदार्थ बांधाया करितां जो वलयाकार करितात तो; २, जेणेंकरून आपण गुंतला जातो असा जो संसार, स्नेह, चाकरी, इ॰ त्यास म्ह॰; ३, मोकरीं, इ॰ खेळायाचा जो फांसा तो.

**पाशी**, स्त्री॰ कों॰ फाशी म्हणून गुरांस रोग होत असतो ती.

**पाशीं, पासीं**, अ॰ कोणेकाचे जवळ; उ॰ त्याजपाशीं हजार रुपये आहेत; शेतापाशीं गाय चरते आहे.

**पाशुपत**, पु॰ सं॰ शिवोपासनेमध्यें मत आहे त्या मतानें चालणारा जो तो.

**पांशेरी**, स्त्री॰ पांचशेरी.

**पाषंड**, न॰ पाखंड.

**पाषंडी**, ३ लिं॰ पाखंडी.

**पाषांडी**, ३ लिं॰ पाखांडी.

**पाषाण**, पु॰ सं॰ दगड.

**पाषाणभेद**, पु॰ एक ओषध आहे तो.

**पाषाणी**, ३ लिं॰ पाषाणाचा जो पदार्थ तो.

**पाष्ट**, पु॰ रा॰ गृहाचा आढ्यावरील जो प्रदेश तो.

**पास**, स्त्री॰ कों॰ जमीन साफ करण्याचे उपयोगीं एक विखंड आहे; २. बादला करावयासाठीं सोनें चढवायाकरितां त्रा॰ पर्ज्ञास तोळे रुप्याची जी लगड करितात ती.

**पासंग**, न॰ तराजू. कांटा. इ॰ कांस जो विषमपणा तें; २. तो विषमपणा जाउन समव्हावें म्हणून हलक्या पारड्यांत जें दगडादि घालितात तें; त्याचा पासंगास तो पुरणार नाहीं म्ह॰ त्यापेक्षां तो फार च कमी असा अर्थ.

**पासचा**, ३ लिं॰ जो ज्यापार्शीं स्थित तो त्यापासचा.

**पासंबा**, पु॰ केळीचे कांद्यास जो कोंब फुटतो तो.

**पांसरी**, स्त्री॰ पांच शेरी.

**पासल**, स्त्री॰ भूमीवर शरीर आडवें टाकून जी स्थिति ती; घे धा॰ प्र॰.

**पासलणें**, पासल घेणें.

**पासलपट्टी**, स्त्री॰ पासल घेण्याचा जो व्यापार ती.

**पासला**, ३ लिं॰ भूमीवर आडवा पडला जो मनुष्य, वृक्ष. इ॰ पदार्थ तो; कोणे कास पासलें पाडणें म्ह॰ वाद युद्धादिकांचा ठायीं पराजित करणें; कांहीं कार्य पासलें पाडणें म्ह॰ कांहीं विघ्न करून विवक्षितानुरूप न होई असें करणें.

**पासाव**, अ॰ पासून.

**पासून**, अ॰ येणें, काढणें, जाणें, इं॰ क्रिया द्वारा कोणे क अर्थाचा जा अर्थाशीं वियोग विवक्षित आहे तें जें अवधिभूत कारक त्यापुढें तन्निष्ठकारकतेचें वाचक हें अव्यय लागतें; २, जा अवधिभूत पदार्थातें आरंभून कालदेशादिरूप अवधिमान् धरला असतो त्या अवधिभूत पदार्थापुढें पूर्वावधित्व वाचक हें अव्यय लागतें.

**पासोडा**, पु॰ चित्रविचित्र रंगाची जी पासोडी तो.

**पासोडी**, स्त्री॰ खादी इ॰ वस्त्राचीं दोन आटपळीं एकत्र शिवून केलें जें प्रावरण ती.

**पाहणी**, स्त्री॰ शेत, आगर, इ॰ कांचा त्यांत अमुक उत्पन्न होईल असा सर्कारांतून अदमास करण्याचा व्यापार ती; कोणेक पदार्थाची पाहणी करणें म्ह॰ कांहीं पदार्थ ठायीं पाडायाकरितां तत्संभावितस्थलीं इंद्रिय व्यापार करणें, एथें त्या पदार्थास कर्मता.

**पाहणें**, अवलोकिणें; २, जिव्हादि इंद्रिय द्वारा तत्तद्विषय अनुभविणें; ३, संसार दुकान इ॰ कांचें खटलें अंगावर भार घेउन करणें; उ॰ संसाराचा खटला मुलगा पाहतो; ४, कांहीं एक व्यापारीं प्रवृत्त किं॰ त्यापासून निवृत्त होण्याविषयीं निमित्तें करून कांहीं पदार्थादिकांतें हा आपल्यास जड अनुल्लंघनीय अशाप्रकारें मानणें; उ॰ यावेळेस थोबाडांत मारली असती परंतु तुझ्या ब्राह्मण्याकडे पाहिलें; आह्मी पैशाकडे पाहत नाहीं मनुष्याकडे पाहतों; ५, तीती क्रिया करून कांहीं फलाचा अनुभव घेणें या अर्थीं पुनः तत्तद्वाचक सर्व धातूंवरून याचा प्र॰ होतो; उ॰ एकदां सांगून पहा; ६, कांहीं एक व्यापार करायास इच्छून त्या व्यापाराचे तजविजीं असणें; आवयास, आयास, उं, एतत्प्रत्ययांत तत्तद्व्यापारवाचक धातूंवरून याचा

प्र॰ होतो; कोणेकाच्या अपराधादिक किं॰ अपराधिमनुष्यादिक यांस पाहून घेणें ल॰ जितका अपराध तितकी शिक्षा करणें; उ॰ तूं असा अपराध करितोस पण ईश्वर तुला पाहुन घेईल; माझा हातचा लेल त्या दिवशीं मीच पाहून घेईन; दुरवर पाहणें इ॰ स्थलीं कांहीं कार्य करण्याविषयीं पुरते पणीं विचार करणें; मागें पुढें पाहणें ल॰ दुरवर पाहणें किं॰ करावें न करावें या संदेहांत पडणें; याचें बोलणें मात्र पाहून घ्यावें इ॰ स्थलीं तदतिरिक्त पहावया जोगा आंत गुणादिक नाहीं असा अर्थ; मीं आजपर्यंत दुसर्याचें घर पाहिलें नाहीं इ॰ स्थलीं द्रव्यार्जना यर्थ दुसर्याची सेवा इ॰ केलें नाहीं इ॰ प्रसंगानुरूप अनेक अर्थभेद होतात.

**पाहण्या**, पु॰ हारवल्या वस्तूंचा थांग लावण्याची मंत्रादिविद्या जाणतो किं॰ भूमींत अमुक स्थलीं खणिलें असतां पाणीं लागेल असें जो जाणतो तो.

**पाहार**, स्त्री॰ पहार.

**पाहारा**, पु॰ पहारा.

**पाहारेकरी**, ३ लिं॰ पहारेकरी.

**पाहारेबंदी**, स्त्री॰ पहारेबंदी.

**पाहाळ**, स्त्री॰ पहाळ.

**पाहाळी**, स्त्री॰ पाहाळी.

**पाहिजे**, हें क्रियापद, अ॰ अपेक्षित आहे; उ॰ हा घोडा मला पाहिजे; २, तीनी क्रिया अवश्यक आहे या अर्थी आयास, आवयास, आणिलीं असतां त्यांत तत्तत्क्रियावाचक धातूंपुढें याचा प्र॰ होतो; उ॰ तिथें आवयास पाहिजे, गेलें पाहिजे.

**पाहिजेत**, अ॰ पाहिजे याच अर्थी परंतु अपेक्षित पदार्थांस किं॰ सकर्मक स्थलीं आवश्यक क्रियेचे कर्मास अकर्मक स्थलीं कर्त्यास अनेकत्व असतांच प्र॰

**पाहिजेल**, पाहिजे.

**पाहुणचार**, पु॰ कोणी पाहुणा आला असतां त्याचा यथायोग्य सत्कार करितात तो.

**पाहुणा**, ३ लिं॰ नातलग, ओळखीदेखीचा, जो कोणी गांवाहून आपले घरास आला तो; २, अतिथि, अभ्यागत, जो कोणी आपले घरीं भोजनायर्थ येतो तो.

**पाहुणाराउळा**, पु॰ पाहुणा इ॰ तो.

**पाळ**, स्त्री॰ तळें, विहीर, यांचा जो कांठाचा प्रदेश तो; २, आंत कांहीं पाणी इ॰ राहावया करितां भोंवताला माती इ॰ कांचा जो परिधि करितात तो; ३, कानाचा सभोंवतालची जी कड, जी यत्किंचित दुणलेली असती ती; ४, आंत्याचे वरचे तळीचें अं तोंड त्याचे भोंवती जी उंच कड राखली असते ती, आंत वैरण घालितात; ५, न॰ वृक्षाचे मूळप्रदेशापासून जे अवयव भूमींत प्रसृत झाले असतात ते प्र॰; कोणेकाचीं पाळेंमुळें खणून टाकणें ल॰ विवक्षित देश व्यवहारादिकांच्या ठायीं चिरकाल प्रसृत झालेला जो त्याचा संबंध तो सर्वथा नाहीं असा करणें; कोणेकाचीं पाळेंमुळें भूमींत जाणें किं॰ कोणेकानें पाळें घेणें ल॰ कोणें कदेशीं किं॰ व्यवहारीं वृत्ति, गृह, दार, इ॰ कानें पुरते पणीं

**पाषाणभेद**, पु॰ एक औषध आहे तो.

**पाषाणी**, ३ लिं॰ पाषाणाचा जो पदार्थ तो.

**पाष्ट**, पु॰ रा॰ गृहाचा आढ्यावरील जो प्रदेश तो.

**पास**, स्त्री॰ कों॰ जमीन साफ करण्याचें उपयोगी ए कविरकंड आहे; २. बादला करावयासाठीं सोनेंच ढवायाकरितां ग्रा॰ पर्म्तास तोके रुप्याची जी लगड करितात ती.

**पासंग**, न॰ तराजू, कांटा, इ॰ कांस जो विषमपणा तें; २, तो विषमपणा जाउन समव्हावें म्हणून हल क्या पारड्यांत जें दगडादि घालितात तें; त्याचा पासंगास तो पुरणार नाहीं म्ह॰ त्यापेक्षां तो फार च कमी असा अर्थ.

**पासचा**, ३ लिं॰ जो आपार्शीं स्थित तो त्यापासचा.

**पासबा**, पु॰ केळीचे कांघास जो कोंब फुटतो तो.

**पाँसरी**, स्त्री॰ पाचशेरी.

**पासल**, स्त्री॰ भूमीवर शरीर आडवें टाकून जी स्थि ति ती: घे धा॰ प्र॰.

**पासलणें**, पासल घेणें.

**पासलपट्टी**, स्त्री॰ पासल घेण्याचा जो व्यापार ती.

**पासला**, ३ लिं॰ भूमीवर आडवा पडला जो मनुष्य, वृक्ष, इ॰ पदार्थ तो; कोणे काम पासलें पाडणें म्ह॰ वाद युध्दादिकांचा ठायीं पराजित करणें; कांहीं कार्य पासलें पाडणें म्ह॰ कांहीं विघ्न करून विवक्षितानुरूप न होई असें करणें.

**पासाव**, अ॰ पासून.

**पासून**, अ॰ येणें, काढणें, जाणें, इ॰ क्रिया द्वारा कोणेक अर्थाचा जा अर्थाशीं वियोग विवक्षित आहे तें जें अवधिभूत कारक त्यापुढें तन्निष्ठका रकतेचें वाचक हें अव्यय लागतें; २, जा अवधिभू त पदार्थातें आरंभून कालदेशादिरूप अवधिमा न् धरला असतो त्या अवधिभूत पदार्थापुढें पूर्वा वधित्व वाचक हें अव्यय लागतें.

**पासोडा**, पु॰ चित्रविचित्र रंगाचीजी पासोडी तो.

**पासोडी**, स्त्री॰ खादी इ॰ वस्त्राचीं दोन आटपळीं एकत्र शिवून केलें जें भावरण ती.

**पाहणी**, स्त्री॰ शेत, आगर, इ॰ कांचा त्यांत अमुक उत्पन्न होईल असा सर्कारांतून अदमास करण्या चा व्यापार ती; कोणेक पदार्थाची पाहणी करणें म्ह॰ कांहीं पदार्थ ठायीं पाडायाकरितां तत्संभावि तस्थलीं इंद्रिय व्यापार करणें, एथें त्या पदार्थास कर्मता.

**पाहणें**, अवलोकिणें; २, जिव्हादि इंद्रिय द्वारा त त्तद्विषय अनुभविणें; ३, संसार दुकान इ॰ कांचें खटलें अंगावर भार घेउन करणें; उ॰ संसाराचा खटला मुलगा पाहतो; ४, कांहीं एक व्यापारीं प्र वृत्त किं॰ त्यापासून निवृत्त होण्याविषयीं निमि त्तें करून कांहीं पदार्थादिकांतें हा आपल्यास ज ड अनुल्लंघनीय अशा प्रकारें मानणें; उ॰ या वेळे स थोबाडांत मारली असती परंतु तुझ्या ब्राम्हण्या कडे पाहिलें; आम्हीं पैशाकडे पाहत नाहीं मनुष्या कडे पाहतों; ५, ती ती क्रिया करून कांहीं फलाचा अनुभव घेणें या अर्थी तुनंत तत्तद्वाचक सर्व धातूं वरून याचा प्र॰ होतो; उ॰ एकदां सांगून पहा; ६, कांहीं एक व्यापार करायास इच्छून त्या व्यापाराचे तजविजींत असणें; आवयास, आयास, उं, एतदत्ययांत तत्तद्व्यापार वाचक धातूंवरून याचा

प्र० होतो; कोणेकाचा अपराधादिक किं० अपराधिमनुष्यादिक यांस पाहून घेणें म्ह० जितका अपराध तितकी शिक्षाकरणें; उ० तूं असा अपराध करितोस पण ईश्वर तुला पाहुन घेईल; माझा हातचालेल त्या दिवशीं मीच पाहून घेईन; दुरवर पाहणें इ० स्थलीं कांहीं कार्य करण्याविषयीं पुरतेपणीं विचारकरणें; मागें पुढें पाहणें म्ह० दुरवर पाहणें किं० करावें नकरावें यासंदेहांत पडणें; याचें बोलणेंमात्र पाहून घ्यावें इ० स्थलीं तदतिरिक्त पहावयाजोगा आंत गुणादिक नाहीं असा अर्थ; मीं आजपर्यंत दुसर्याचें घर पाहिलें नाहीं इ० स्थलीं द्रव्यार्जनार्थ दुसर्याची सेवा इ० केलें नाहीं इ० प्रसंगानुरूप अनेक अर्थभेद होतात.

**पाहण्या**, पु० हारवल्या वस्तूंचा थांग लावण्याची मंत्रादिविद्या जाणतो किं० भूमींत अमुकस्थलीं खणिलें असतां पाणी लागेल असें ओजाणतो तो.

**पाहार**, स्त्री० पहार.

**पाहारा**, पु० पहारा.

**पाहारेकरी**, ३लिं० पहारेकरी.

**पाहारेबंदी**, स्त्री० पहारेबंदी.

**पाहाळ**, स्त्री० पहाळ.

**पाहाळी**, स्त्री० पाहाळी.

**पाहिजे**, हें क्रियापद, अ० अपेक्षित आहे; उ० हा घोडा मला पाहिजे; २, तीती क्रिया अवश्यक आहे या अर्थी आयास, आवयास, आणि लीं स्वतंत्र त्यांत तत्तत्क्रियावाचक धातूंपुढें याचा प्र० होतो; उ० तिथें आवयास पाहिजे, गेलें पाहिजे.

**पाहिजेत**, अ० पाहिजे याच अर्थी परंतु अपेक्षित पदार्थास किं० सकर्मकस्थलीं आवश्यक क्रियेचे कर्मास अकर्मकस्थलीं कर्त्यास अनेकत्व असतांच प्र०

**पाहिजेल**, पाहिजे.

**पाहुणचार**, पु० कोणी पाहुणा आला असतां त्याचा यथायोग्य सत्कार करितात तो.

**पाहुणा**, ३लिं० नातलग, ओळखी देखीचा, जो कोणी गांवाहून आपले घरास आला तो; २, अतिथि, अभ्यागत, जो कोणी आपले घरीं भोजनार्थ येतो तो.

**पाहुणाराउळा**, पु० पाहुणा इ० तो.

**पाळ**, स्त्री० तळें, विहीर, यांचा जो कांठाचा प्रदेश तो; २, आंत कांहीं पाणी इ० राहावयाकरितां भोंवताला माती इ० काचा जो परिधि करितात तो; ३, कानाचा सभोंवताल ची जी कड, जी यत्किंचित् दुणलेली असती ती; ४, जांत्याचे वरचे तळीचें जें तोंड त्याचे भोंवती जी उंच कड राखली असते ती, जांत वैरण घालितात; ५, न० वृक्षाचे मूळप्रदेशापासून जे अवयव भूमींत प्रसृत झाले असतात ते प्र०; कोणेकाची पाळें मुळें खणून टाकणें म्ह० विवक्षित देश व्यवहारादिकांचा ठायीं चिरकाल प्रसृत झालेला जो त्याचा संबंध तो सर्वथा नाहीं असा करणें; कोणेकाची पाळें मुळें भूमींत जाणें किं० कोणेकानें पाळें घेणें म्ह० कोणेक देशीं किं० व्यवहारीं वृत्ति, गृह, दार, इ० कानें पुरतेपणीं

स्थिर होणें; ६, सर्कारांतून ज्याचा कर सोडिला आहे असें जें शेत, घर, कूळ, इ० तें, किं० सर्कारानें कोणेकाची वेठबिगार पडलतीं करून त्यांचे ठिकाणांत घर बांधून घरदेणें न देतां राहावें असें जें कूळ सोडिलें असतें तें.

**पाळक**, ३ लिं० पालक प्रथमार्थी; २, पाळ नपुंसकार्थी.

**पाळकबेटा**, पु० जो दुसर्याचा मूल पुत्रत्वें करून पाळिला तो.

**पाळण**, न० पालन.

**पाळणवाला**, ३ लिं० अन्न, उदक, इ० कें करून जो ज्याचा रक्षण कर्ता तो त्याचा.

**पाळणा**, पु० लाहान मूल निजवून त्यास झोंके द्यावे म्हणून जो काष्ठाचा पदार्थ टांगायाजोगा करितअसतात तो; २, पाळण्यांत मूल निजवून स्त्रिया कृष्णादिकांचें बाळचरित्राचें गाणें म्हणत असतात तें.

**पाळणूक**, स्त्री० बालकादिकांचें पालन करण्याचा व्यापार ती.

**पाळणें**, ज्याचे ज्याचे जीवनास जोजो अन्नादिपदार्थ हितकारक तोतो देउन त्यास जगिवणें; २, धर्ममर्यादा, व्रतादिनियम, शपथ, इ० कन्तदनुरूप स्वाचरणानें राखणें; ३, रा० अन्न, उदक, औषध, इ० कोणेकास सौख्यावह होणें; उ० हें जड उदक तुम्हास पाळणार नाहीं.

**पाळत**, **पाळथ**, स्त्री० कोणेकाचा कृत्याचें किं० त्यापाशीं आहे काय नाहीं काय इ० वर्तमानाचें त्यास समजून देतां गुप्तरूपें करून जें कोणीं परिज्ञान करून घेतो ती.

**पाळतवणें**, या० कोणेकाचें कृत्य किं० पदार्थादिक गुप्तरूपें करून आणणें.

**पाळती**, ३ लिं० पाळत घेणारा जो तो.

**पाळा**, पु० प्रा० ग्रं० कोणेकाचे भोंवताली मनुष्यादिकांचें पडलें असतें जें कडें तें.

**पाळी**, स्त्री० पालट अंत्यअर्थावांचून; २, कांहीं इष्टानिष्ट होण्याविषयीं संभावित जो प्रा० क्रमप्राप्त अवसर ती; उ० मीं आज छत्री आणली नाहीं म्हणून फजीतीची पाळी दिसती; म्ह० नावडतीची आली पाळी तों गांवाची झाली होळी.

**पाळींव**, ३ लिं० कोणेकानें घरीं पाळलेलीं जीं गुरें, कुत्रा, बकरा, इ० तो.

**पाळें**, न० मीठ, तिरवट, इ० ठेवाया करितां जें लांकडाचें पात्र करितात तें.

**पाळेगार**, पु० राजास न गणितां रामोशी, भिल्ल, इ० लोक ठेवून देशापासून खंडदंड घेणारा जो तो.

**पिंक**, स्त्री० तांबुलादि भक्षण करून जो थुंका टाकितात ती.

**पिकटाण**, स्त्री० रा० पिकला फणस, केळें, यांचा जो वास ती.

**पिकटी**, स्त्री० रा० अंगावर जो पिकुटलेपणा दिसतो ती.

**पिकणें**, पर्ण, फल, धान्य, केश, गळूं, इ० केवल कालानें किं० औषधयोगानें पक्क होणें; २, धान्य, गूळ, इ० त्या त्या शेतांत उत्पन्न होणें; उ० बिघ्यांत दाहा खंडी गूळ पिकला; म्ह० पिकल्यावांचून

विकत नाहीं; वस्त्रादिकांवरील रंग सर्दीमुळें पिकट होणें; कोणेकाचें पिकणें ह्म॰ अनुकूल कालदशा प्राप्त होणें; कांहीं वर्तमान पिकणें ह्म॰ लोकांत प्रसिद्ध होणें; याशीं बोलतांना उर पिकला इ॰ स्थलीं दुखूं लागला असा अर्थ; कोणेकास पिकविणें ह्म॰ लाथाबुक्यां खालीं मारून जर्जर करणें.

**पिकंद्र**, न॰ आंबोत्री धोंडेफोडा याचें शस्त्र आहे.

**पिकदाणी**, स्त्री॰ पिंक थुंकायाचें पितळ इ॰ काचें पात्र आहे.

**पिकदाव**, पु॰ **पिकराड**, **पिकलाड**, स्त्री॰ **पिकलें**, न॰ कों॰ शेतांतील जें पीक किं॰ शेतें पिकण्याचा जो समय तो ती तें.

**पिकलेंपान**, न॰ केवल वृद्ध मनुष्यास ह्म॰

**पिकवण**, न॰ अंबे, केळें, किं॰ गळू, बद, इ॰ पिकायाकरितां जें तृणादि घालितात किं॰ औषध लावितात तें.

**पिकळी**, स्त्री॰ रा॰ गोगलगाय.

**पिका**, ३ लिं॰ रा॰ पिकलेला जो फलादि पदार्थ तो.

**पिकाउ**, ३ लिं॰ पिकायाचे योग्यतेस आला जो अंबा, फणस, इ॰ तो.

**पिकी**, **पिंकी**, स्त्री॰ पिंक.

**पिकुटणें**, मनुष्यादिकाचें शरीर, वृक्ष, पर्ण, इ॰ रोगादि विकृतीनें पिंगटवर्ण दिसूं लागणें किं॰ वस्त्रावरील तांबडा जो रंग तो सरदी इ॰ विकारानें फिक्का होणें.

**पिकूट**, ३ लिं॰ पिकुटलेला तो.

**पिखुरणें**, धान्य, केश, इ॰ विखरणें.

**पिंगट**, ३ लिं॰ एक रंग आहे; २, तद्विशिष्ट तो.

**पिंगल**, पु॰ साठ संवत्सरांतील एकावन्नावा संवत्सर आहे.

**पिंगवी**, स्त्री॰ कों॰ कांगोणी.

**पिंगवें**, न॰ कों॰ कांगोणीचें जेंवीतें.

**पिंगवेल**, न॰ कांगणेल.

**पिंगळा**, पु॰ एक पक्षी आहे; २, मेढेजोशास ह्म॰; ३, ३ लिं॰ पिंगटवर्ण विशिष्ट जो नेत्र इ॰ पदार्थ तो.

**पिंगा**, पु॰ मुलींचा खेळांत एक प्रकार आहे; २, ३ लिं॰ पिंगटवर्ण जो नेत्रादि तो.

**पिंगाणें**, न॰ एक क्षुद्र पक्षी आहे.

**पिंगूळ**, पु॰ एक सपक्ष किडा आहे.

**पिचकट**, ३ लिं॰ स्वल्प जो पिचका डोळा किं॰ तद्विशिष्ट तो.

**पिचकन्**, **पिचकर्**, **पिचदिशीं**, अ॰ पिंक किं॰ चिपळीचें पाणी इ॰ चपकन उडविण्याचें वि॰.

**पिचकळी**, स्त्री॰ वा॰ गुळणी.

**पिचका**, ३ लिं॰ जा डोळ्यास सतत पाणी येतें असा विकार आहे तो डोळा; २, जाला चीर पडली आहे असा जो चुडा, बांगडी, इ॰ तो; ३, पादरफुसका; ४, विवक्षित कामापुरतें ज्याचे अंगीं सामर्थ्य नाहीं असा काष्ठ, वस्त्र, इ॰ तो.

**पिचकारी**, स्त्री॰ चिपनळी; २, रक्त, उदक, इ॰ कांची जी चिरकांडी ती.

**पिचकुडा**, ३ लिं॰ कों॰ पिचकट.

**पिचंडया**, स्त्री॰ वा॰ पिचुंडया.

**पिचणें**, बांगडी, काच, भिंग, इ॰ किं॰ वरू, चिवा, इ॰ फुटणें; २, हाड, चुन्याचे खडे, इ॰ केवल भस्मप्राय होत असे भाजले जाणें; ३, तांदूळ फार वेळ भिजून राहिल्यामुळें केवल हातानें चुराया जोगे होणें.

**पिचपीच**, अ॰ अनेकवार सशब्द थुंकण्याचें वि॰.

**पिच्चवणें**, रा० चुन्यानें खडे, हाड, इ० पिच्चणें; २, पित्तविकृतीमुळें गळ्याखालीं जळजळणें.

**पिचुंडया, पिचोंडया**, स्त्री० पाठीमागें हात वळवून बांधिलेजे दंड त्या; कोणेकाचा पिचुंडया बांधून घेणें ल० लेखपत्रादिद्वारा पुरता गुंतवून घेणें.

**पिच्छ**, न० पक्ष्यांचें जें पीस तें.

**पिच्छा**, पुं० कांहीं पदार्थाचा पाठीकडील जो प्रदेश परंतु लाक्षणिक अर्थी प्रयोग होतात ते लिहितों; कोणेक मनुष्यादिकाचे किं० व्यवहाराचे पिच्छास बसणें, किं० लागणें, पिच्छा पुरविणें, घेणें, धरणें, ल० पाठ पुरविणें; पिच्छावर असणें ल० पाठलागावर किं० पाठपुराव्यावर असणें

**पिछाडा**, पु० कांहीं एकाचा पाठीकडील जो प्रदेश तो.

**पिछाडी**, स्त्री० पिछाडा; २, घोड्याचे मागील जे पाय ती; ३, पायबंद; ४, चाललेला जो सैन्यादि समुदाय त्याचा जो मागील विभाग ती.

**पिछोंडे**, पु० पिचुंडया ते.

**पिंजका**, ३ लिं० पिंजलेला वेळू, बरू, इ० तो; २, रा० फाटलेलें जें वस्त्र, हंत्री, इ० तो.

**पिंजट**, ३ लिं० किंचित् पिंजलेला जो बरू, चिवा, इ० तो; २, न० रा० चोया इ० उपयोगीं जी चिव्याची किं० बरूची कांबीट काढितात तें.

**पिंजणावळ**, स्त्री० कापूस, लोहोंकर, पिंजल्यामुळें जें पिंजार्यास मोल देतात ती.

**पिंजणें**, बरू, चिवा, इ० उभा फोडणें; २, कापूस, लोहंकर, विशकलावयव होत अशीं करणें; ३, रा० वस्त्र, कागद, इ० उभें फाडणें ; ओरडण्यानें गळा पिंजला ल० अपूर्व विलक्षण कर्कशध्वनियुक्त झाला असा अर्थ.

**पिंजर**, स्त्री० उंच लाल जें कुंकुं; २, कों० तेल घालून कालविलें नव्हे असें जें कुंकूं ती.

**पिंजरणें**, डोसकीचे केश, तृण, इ० कं वातादिकानें उडून अस्ताव्यस्त होणें.

**पिंजरा**, पु० पांजरा; २, सभोंवताल्या झाव ज्या फुटल्या असतात त्याचा मध्यवर्ती जी जागा तो; कोणेकास पिंजर्यांत घालून रक्षण करणें इ० स्थलीं मोठ्या प्रयत्नानें कांहीं उपसर्ग लागूं नये असें अगत्य रक्षिणें.

**पिंजरी**, स्त्री० पालखीवर छायार्थ जें सुशोभित वस्त्र केलें असतें ती; २, गाडीस छायेकरितां घुमटाकार जें आच्छादन करितात ती.

**पिंजार**, न० रा० भाताचें आंखूड गुंतलेलें तृण तें.

**पिंजारणावळ**, स्त्री० पिंजणावळ.

**पिंजारणें**, पिंजणें द्वितीयार्थीं; २, डोसकीचे केश, पिसें, इ० पिंजरत असें करणें; ३, डोळे किं० नाक, पिसें इ० क्रोधादिकानें प्रफुल्लित करणें; ४, वृक्ष, शाखापह्व फुटून विस्तृत होणें.

**पिंजारी**, पु० कापूस, लोहंर, पिंजून उपजीविका करितो तो; ल० पादशाहास पादशाही झाली म्हणून पिंजार्यानें तार तोडूं नये

**पिंजूळी, पिंजोळी**, स्त्री० पाती, झाडाचा तार इ० पिंन बारीक जो अवयव काढिला ती.

**पिटकन, पिटकर, पिटदिशीं**, अ० अनु० बेटकुळी, टोळ, इ० कानीं उडी मारणें किं० लिंबू इ० कांलवी इ० पटकर उडणें इ० कांचें वि०.

**पिटकुला**, ३ लिं० चिमकुला.

**पिटकें**, न० दे० कोंळवें.

**पिटणें**, शत्रु इ॰ कांस पराभूत करून पळेअसा करणें. किं॰ आसूद इ॰ विवक्षित देशीं त्वरेनें जाईअसाकरणें; २, घोडा, गाय, इ॰ धांविवणें; ३, सुवर्ण, धान्य, उर, इ॰ हातोडा, मुसळ, हात, इ॰ कांच्या आघातानीं बळकट चेंचणें; दोंडी, धांडोरा, थाळा, पिटणें ह्म॰ तेंतें वाजवीत गांवभर फिरणें; टाळी पिटणें ह्म॰ वाजिवणें.

**पिटपीट**, स्त्री॰ पिरपीर.

**पिटाळणें**, पिटणें प्रथम द्वितीयार्थी.

**पिटरडीभाजी**, स्त्री॰ रा॰ आंत पीठ घालून करितात जी पडवळ इ॰ कांची भाजी ती.

**पिठलें**, न॰ झुणका.

**पिठा**, ३ लिं॰ केवळ भुसभुशीत जो दगड तो; २, जेंचि भूड आंत पांदरें व्रयाळ

**पिठाड, पिठार**, पु॰ अ॰ कों॰ भाकरी, तृण, इ॰ कांची खाउन नासून केलीजी निःशेषता तो; पाड, कर, इ॰ धा॰ योगीं प्र॰

**पिठाळ**, ३ लिं॰ दे॰ पुरता न भाजल्यामुळें किं॰ नशिजल्यामुळें गिजगिजीत लागतो असाजो भाकरी इ॰ पिठाचा पदार्थ तो.

**पिठी**, स्त्री॰ पापड, पोळी, इ॰ लाटतेवेळेस नचिकटावें ह्मणून त्यांस कोरडे तांदूळ इ॰ कांचें बारीक पीठ लावितात ती; २, तांदुळ इ॰ कांचें पीठ पाण्यांत शिजवून जो पातळ पदार्थ दुखणे करी इ॰ कांस खावयास करितात ती.

**पिठुळणें**, भाकरी इ॰ कास वरपाणी लाविनात तें न लाविल्यामुळें किं॰ अग्निसंयोग सारखा नलागल्यामुळें पिठाळ होणें; २, तांदूळ बहूतवेळभिजून राहिल्यामुळें फुसफुशीत होणें

**पिठळ**, ३ लिं॰ पिठाळ; २, भुसभुशीत जो दगड, भाकरी इ॰ तो.

**पिठोरा**, पु॰ श्रावण अमावास्येस करायाचें व्रतआहे

**पिठोरी**, स्त्री॰ पिठोराव्रत करायाचा जो दिवस ती.

**पिठोळा**, ३ लिं॰ दे॰ पिठूळ.

**पिठ्या**, ३ लिं॰ पिठा; २, कणस्याचा प्रतिपक्षी तो.

**पिंड**, पु॰ भात, मृत्तिका, धातु, यांचा जो गोळा तो; २, देह; ३, देहांतच दोन विभाग कल्पून मस्तकांतीलजी पोकळी तदतिरिक्त जो देहभाग तो; ४, क्षेत्रव्यवहारीं पदार्थाचे जाडीस ह्म॰; भातांचा पिंड, भाकरीचा पिंड, इ॰ स्थलीं जन्मापासून भात इ॰ खाउनच वाढलेला असा अर्थ जाणावा; कोणेकाचे पिंडास बसणें, लागणें, इ॰ स्थलीं ज्याचा आपल्यास कंटाळा त्यामनुष्यादिकानें आपल्यास कदापि नसोडणें.

**पिडणें**, कोणेकास कोणेकानें त्रासे असा करणें.

**पिंडा**, पु॰ सूत्र, स्तंभ, इ॰ कांचा जो गोळा करितात तो.

**पिडा**, स्त्री॰ पीडा; २, ज्यापासून आपल्यास पीडा होती किं॰ ज्याचा आपल्यास कंटाळा आला त्यास ह्म॰ उ॰ ही पिडा येथून गेली ह्मणजे मी सुटलों; ३, पु॰ या॰ माडाचे झापाचें जें थरपील तो.

**पिंडी**, स्त्री॰ महादेवाचें जे बाण किं॰ स्वयंभू किं॰ पाषाण तासून केलेलें जें लिंग असतें ती.

**पिढा**, पुं॰ रा॰ थरपील.

**पिढी**, स्त्री॰ पुत्र, नातू, पणतू, बाप, आजा, पणजा, इ॰ जे वंशपरंपरेंतील पुरुष ते प्र॰; हें वतन चारपिढ्या चालत आलें इ॰ स्थलीं हा शब्द त्या

पिढ्यांचा उपभोग्य जो काल त्याचा उपलक्षक होतो.

**पिढीचा**, ३लिं० अनेक पिढ्या जो गुणादिक अनुस्यूतपणें चालत आला त्या गुणादिकानें विशिष्ट जो त्यावंशींचा कोणी एक तो; उ० हा गृहस्थ पिढीचा संपत्तिमान्.

**पिढीजादा**, ३लिं० कुलीन; २, पिढीचा.

**पिढीदरपिढी**, अ० पुस्तदरपुस्त.

**पिढीपेस्तर**, अ० पिढीदरपिढी.

**पिढें**, न० सरासरी बसायासाठीं केला जो लांकडाचा लाहानपाट तें; २, घरट मांडाया करितां जीं ती न लांकडें खालीं बसिवतात तीं प्र०; ३, वर तुळई इ० ठेवाया करितां खांबाचे डोईवर आडवा जो लांकडाचा तुकडा बशिवतात तें.

**पिणें**, जल, वायु, इ० पातळ पदार्थ गळ्याखालीं मुखद्वारानें उतरणें; २, गुरगुडी, विडी, यांचा धूर मुखांत प्राणवायूनें आकर्षून घेणें; येथें गुरगुडी इ० कांसही कर्मता येती; ३, क्रोध, दुःख, अपशब्द, इ० साहून जिरविणें; ४, वस्त्र, जोडा, गाडा, इ० कानें रंगाचें पाणी तेल इ० आकर्षून घेणें; तोफ, इ० कानें रंजक पिणें म्ह० बार न होतां कान्यावरची दारू जळणें; म्ह० पीहळद होगोरी.

**पितर**, पु० अग्निष्वात्तादिक शास्त्रप्रसिद्ध देवताविशेष आहेत ते; २, पु० न० मेल्यानंतर ज्याचें श्राद्ध, तर्पण, पुत्रादिकांनीं करावें म्हणून सांगितलें आहे तो तें; म्ह० काल मेला आणि आज पितर झाला; ३, न० आई, बाप; ४, न० महालय श्राद्ध; हा शब्द प्रायः अनेकवचनांत, कोणेकाचीं पितरें उद्धरणें म्ह० आईबापावरून शिव्या देणें.

**पितरखस्ता**, स्त्री० श्राद्धाचे खटपटीस म्ह०; २, ला० अल्प कार्याविषयीं फार मोठी कंटाळा यावयाजोगी जी खटपट ती.

**पितरलंड**, ३लिं० पितरांचें श्राद्ध करावयास जो चुकवितो त्यास म्ह०.

**पितळ**, न० स्त्री० एक धातु आहे.

**पितळा**, ३लिं० रा० चिरडखोर.

**पितळी**, स्त्री० पितळेची लहान जी परात ती; २, ३लिं० पितळेचा जो गडवा इ० पदार्थ तो.

**पिता**, पु० सं० बाप.

**पितांबर**, पु० एक रेशमाचें नेसायाचें वस्त्र आहे.

**पितांबरी**, स्त्री० अल्पमोलाचा लाहान जो पितांबर ती.

**पितांबी**, स्त्री० वा० पित्तोपद्रवामुळें जी अंगावर गांठ येती ती.

**पितामह**, पु० सं० बापाचा जो बाप तो; २, ब्रह्मदेव.

**पितामही**, स्त्री० पितामहाची जी स्त्री ती.

**पितृकर्म**, न० सं० श्राद्ध, तर्पण, इ० जें कर्म तें.

**पितृगृह**, न० सं० पित्याचें जें गृह प्रायः स्त्रियांविषयीं प्र०.

**पितृतिथि**, स्त्री० सं० पित्याचा किं० आईचा जो श्राद्धदिवस ती.

**पितृपक्ष**, पु० सं० भाद्रपदाचा कृष्णपक्ष तो.

**पितृव्य**, पु० सं० चुलता.

**पित्त**, न० सं० शरीरनिर्वाहक प्राणिमात्राचे शरीरांत एक पातळ पदार्थ विशेष आहे; ज्याचा अतिरिक्तपणा किं० न्यूनपणा झाला असतां विकृति होती;

पित्तखवळणें, -चढणें, पायांचें पित्त मस्तकास आणें ह्म० कांहीं कारणामुळें अकस्मात् क्रोध येणें.

**पित्तकर, पित्तकारी**, ३ लिं० सं० ज्याचा भक्षणादि संबंधानें पित्तक्षोभ होतो तो पदार्थ.

**पित्तज्वर**, पु० सं० पित्तक्षोभ आल्यामुळें जो ज्वर येतो तो.

**पित्तपापडा**, पु० पित्तनाशक एक ओषधी आहे.

**पित्तप्रकोप**, पु० सं० पित्ताचा जो अतिशय तो.

**पित्तमारी**, स्त्री० एक ओषधी आहे.

**पित्तवायु**, पु० सं० पित्तप्रकोप होऊन जी वातविकृति तो.

**पित्तवेगी**, ३ लिं० रा० शीघ्रकोपी जो मनुष्य, पशु इ० तो.

**पित्तक्षोभ**, पु० सं० पित्तप्रकोप.

**पित्ताळू**, ३ लिं० पित्तकर; २, ज्यास पित्तविकृति फार होती तो.

**पिंपरी**, स्त्री० एक वृक्ष आहे.

**पिंपरें**, न० पिंपळाचें फल तें.

**पिंपळ**, पु० एक वृक्ष आहे; पिंपळास पार बांधणें ह्म० कोणेक गरीबाचें लग्न करून देणें; २, वा० न० पिंपरें.

**पिंपळपान**, न० मुलाचे कपाळावर बांधायाचें एक भूषण आहे.

**पिंपळमूळ**, न० एक ओषधीचें मूळ आहे.

**पिंपळवण, पिंपळवन**, न० पिंपळपान.

**पिंपळवासी**, ३ लिं० अंधारीं रात्रीं घोर अरण्यांत फिरायास भीत नाहीं इ० कर्मांनीं जो अघोरी तो.

**पिंपळाचेंफूल**, न० जो कोणेक स्थलीं वारंवार यावयाचा नव्हे ह्मणून ज्याचें दर्शन दुर्लभ अशा मनुष्यास ह्म० .

**पिंपळी**, स्त्री० एक ओषधोपयोगी फल आहे; २, तिचा जो वेल ती; ३, पानवेलीची जी शेंग ती; ४, दोरीचा एक पदर धरून दुसरा पदर खालीं सरकिवला असतां जो पिंपळीसारिखा आकार होतो ती.

**पिंपळीपाक**, पु० पिंपळी इ० ओषधांचा जो भक्षायाकरितां पाक करितात तो.

**पिंपाणी**, स्त्री० सनई, सूर, इ० कांस ताडपत्रादियुक्त तोंड्याची बारीक नळी लावितात ती; २, नदाकार वळकटी पर्णाची वाजवायाकरितां करितात ती.

**पिपासा**, स्त्री० सं० तृषा.

**पिपीलिका**, स्त्री० सं० मुंगी.

**पिरंगणें**, रा० पोर इ० कानें पिरपीर लावणें किंवा वाचकादिकानें रडगाणें.

**पिरगळणें, पिरगाळणें**, शरीरावयव, वृक्ष, इ० क धरून बळानें पीळ पडे असा फिरिवणें.

**पिरंगा**, ३ लिं० वा० पिरंगण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**पिरपिरणें**, कों० पिरंगणें.

**पिरपिरा, पिरपिर्या**, ३ लिं० सर्वकाळ पिरपिर करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**पिरपीर**, स्त्री० असंभाव्य योगा बालक, याचक, इ० कांचा हें दे, तें दे, हें नको, तें नको, इ० क जो लांबचलांब भाषणादि व्यापार ती; २, केवळ उघडूं नये आणि केवळ मोठ्यानें ही पडूं नये असें चिरकालजें पर्जन्याचें पतन ती.

पिलखाना, पु० پیلخانه हत्ती बांधायाची जी शाला तो.

पिलवा, पु० कों० पिलूं.

पिलवान्, पु० پیلبان महान.

पिला, पु० कों० वाघ, सिंह, सर्प, इ० कांचा जो बालक तो.

पिलूं, न० पशु, पक्षी, सर्प, इ० कांचें जें बालक तें.

पिलें, पिल्लूं, न० पिलूं.

पिंवळट, ३ लिं० यत्किंचित् जो पिंवळा तो.

पिंवळणें, वा० पिरगाळणें.

पिंवळा, ३ लिं० एकरंग आहे; २, तद्विशिष्ट जें वस्त्रादिक तो; अर्थ्या हळकुंडानें पिवळें होणें स्व० अल्पविद्यासंपत्त्यादिकानें फारगर्व बाळगणें.

पिंवळाधमक, ३ लिं० अतिशयीत जो पिंवळा तो.

पिशवी, स्त्री० वस्त्र, चर्म, इ० कांचें आंत कांहीं पदार्थ ठेवायाकरितां शिवून जें पात्र करितात ती; २, पोटांत पित्तादिसमावेशाचीं जीं पात्रें आहेत ती प्र०.

पिशाच, पु० न० सं० देवयोन्यंतर्गत जातिविशेष आहे; २, मरणसमयीं काहीं हेतू गुंतल्यामुळें मेल्यानंतर वायुरूपी होउन मनुष्यादिकांस पीडा करितो तो; पिशाचबाधा पिशाचोपद्रव इ० समास आणावे; ३, ला० जाचेकृतीचा अनुगम कोणास होत नाहीं असा मनस्वी वर्तणारा अघोरी, साहसी, जो मनुष्यादि त्यास ल०.

पिशाचपक्वान्न, न० वडे, कोडबुळीं यांस ल०.

पिशानदेवरू, ३ लिं० वा० वेडसर जो मनुष्य त्यास ल०.

पिशानवल्ली, ३ लिं० पिशानदेवरू.

पिशी, स्त्री० जोंधळे, सजगुरे, यांचें धान्यरहित जें कणीस ती.

पिशुन, ३ लिं० सं० चहाडखोर.

पिष्ट, न० सं० धान्यादिकांचें पीठ.

पिष्टपेषण, न० सं० एकदा सिद्ध आलेल्या गोष्टीचा अप्रयोजकपणें निष्फल जो पुनः पुनः व्यापार तें.

पिसणें, दळणें किं० चंदनादि उगाळणें.

पिसळणें, पिसाळणें.

पिसा, ३ लिं० पिशाचासारिख्याचेष्टा करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

पिसाई, स्त्री० दळणावळ.

पिसाट, न० पिशाचजनित जो कोणेकास बुद्धिभ्रंश व्हावयाजोगा उपद्रव होतो तें.

पिसाटणें, कों० कोणेकानें पिसाटानें विशिष्ट होणें

पिसारा, पु० पिसांचा जो समुदाय तो; २, निराचे मूलप्रदेशीं पिसांचे तुकडे बांधिले असतात तो.

पिसाळणें, कुत्रा, कोल्हा, यांस एक रोग होत असतो जेणें करून ते वेडावतात आणि सविषता प्राप्त होत्ये अशा रोगानें त्याणीं युक्त होणें; २, तो कुत्रा इ० डसल्यामुळें मनुष्यादिकानें त्या रोगानें विशिष्ट होणें; ३, ला० पिशाचोपद्रवानें किं० क्रोधाधावेशामुळें कर्तव्याकर्तव्य विचार सुटे अशी दशेतें पावणें;

पिसू, स्त्री० ढुवेएवढा सपक्ष एक जंतु आहे.

पिसें, न० पिशाचोपद्रव, सन्निपात, इ० कारणानें कोणेकास लागतें जें वेड तें.

पिसोडया, स्त्री० दे० पिचुंडया.

पिसोळा, पु० एकक्षुद्रजंतु आहे; २, एक ओषधी आहे.

पिस्ता, पु० एकवृक्षाचें फल आहे.

पिस्ताई, ३लिं० एकरंग आहे; २, तद्विशिष्टजो वस्त्रादि तो.

पिस्वाद्, पु० रा० वेश्या नृत्य करिते समयीं अंगांत जो झगा घालितात तो.

पिहू, अ० कोकिल पक्ष्याचे शब्दाचें अनु०.

पिळण, स्त्री० कों० ओलें वस्त्र, सूत्र, इ० कांतील जलांश निघावा म्हणून त्यांस जो पीळ घालितात ती.

पिळणें, आंतील द्रवांश बाहेर निघे असा कोणेक पदार्थ दाबणें किं० पिळवटणें; पक्षीं त्या द्रवांशासही कर्मता येते; उ० याचे नाकांत कांद्याचा रस पिळावा; गोमहिष्यादिकांस पिळणें म्ह० त्यांचें दुग्ध काढणें.

पिळपिळीत, ३लिं० ज्यास पीळ कमी असा जो सूत, दोरी, इ० पदार्थ तो.

पिंळवटणें, हस्तादि शरीरावयव, इक्षुदंड, वृक्षशाखा, इ० पदार्थ बळानें जितका पीळ पडेल तितक्या पिळानें युक्त करणें.

पिळा, पु० पिळलेलें वस्त्रादिक जें पिळासहित असतें तो; २, पिशाच, वायु, इ० उपद्रवानें पिळ्यासारिखें होतें जें शरीर तो.

पिळू, स्त्री० रा० पेळू.

पीक, न० शेत, आगर, इ० कांपासून उत्पन्न होतें जें धान्यादि तें; २, स्त्री० रा० पिंक.

पीठ, न० धान्यादिक दळून, कुटून, त्याचें बारीक करितात जें चूर्ण तें; खाउन पीठ करणें इ० स्थलीं च पाट करणें, इ० कोणा एकास मारून पीठ पाडणें इ० स्थलीं जें करणें, आइत्या पीठावर रेघा ओढणें; किं० मुटका मारणें, एथें पित्रादि संपादित संपत्तीवर मौजा करणें.

पीडणें, कोणेकास पीडा विशिष्ट करणें.

पीडा, स्त्री० रोग, शत्रु, अग्नि, इ० कांसंबंधी जें दुःख तें.

पीडित, ३लिं० पीडा पावला जो तो.

पीत, ३लिं० सं० पिंवळा; २, प्राशिला तो.

पीनस, पु० सं० नाकामध्यें एक रोग होत असतो तो.

पीर, पु० हिं० मुसलमान लोकामध्यें कोणी साधु मरून देवरूप पावतो तो; कोणेकास पीर भेटणें म्ह० मारून त्याची सेरी जिरवी असा दमनकर्ता भेटणें.

पील, न० पिलू.

पीस, पींस, पु० न० पक्ष्यांचे पक्षांस किं० पुच्छास जे अनेक अवयव असतात ते प्र०

पीळ, पु० सूत्र, लता, तार, इ० कांचें एक शेवट धरून दुसरें शेवट वर्तुलाकार फिरविलें असतां त्याचे अंगीं जो संस्कार विशेष उत्पन्न होत असतो तो; २, ला० कोणेकाचे अंगीं जो अभिमानाचा ताठा असतो तो; ३, कोणेकाविषयीं कोणेकाचे अंतःकरणांत जो बांक असतो तो; पीळ घालणें, पीळ पाडणें, इ० स्थलीं. सैरस्यानें चालणारे जे उभयतां त्यांचे मनांत परस्परांविषयीं वक्रभाव उत्पन्न करणें म्ह० सुंभ जळतें पण पीळ जळत नाहीं.

पुकार, स्त्री० दे० हाकाटी.

पुकारणें, दूर ऐकायास जावयाजोगी कोणेकास हाक मारणें.

पुकारा, पु० पुकार.

पुखा, पु० संकेतानें भोजन, उपहार, यांस ह्म०.

पुखानंद, पु० पोटभर मिष्टान्न मिळालें ह्मणजे कृतार्थता मानून कांहींउद्योगाची काळजी बाळगीत नाहीं असा जो तो.

पुंगट, ३ लिं० दे० पिंगळाचे अंगास जसा वास ये तो तत्सजातीय जो वास त्याचें वि०.

पुंगळ, पु० पिंगूळ.

पुंगळवेल, स्त्री० एक लता आहे.

पुंगी, स्त्री० मुखानें वाजवायाचें गारुडी इ० कांचें एक वाद्य आहे; कोणेकाची पुंगी बंद करणें ह्म० कोणेक साध्याविषयीं भाषणादि व्यापारीं आरब्धजो प्रयत्न तो चालेनासा करणें; ह्म० गाजराची पुंगी वाजली तर वाजली नाहींतर मोडून खाल्ली.

पुच्ची, स्त्री० स्त्रियांचें जें उपस्थ ती.

पुच्छ, न० पशु, पक्षी, सर्प, इ० प्राण्याचें गुदाचें उपरिभागीं लंबायमान अवयव विशेष असतो तें; कोणेक गोष्टीस पुच्छ फुटणें इ० स्थलीं पूर्वीचेपेक्षां अधिक कांहींनवाच एक अवयव उत्पन्न होणें; पुच्छ वाढणें, लांबणें, ह्म० कोणेक कार्याचा प्रथमतः मनांत आलाजो आकार तो अधिक वाढणें;

पुंज, पु० सं० धान्यादिकांचाजो राशि तो.

पुंजणें, देवब्राह्मणादिक गंधपुष्पादिकें करून अर्चिणें; लोकांचीं घरें दारें, पुजणें इ० स्थलीं आर्जवास्तव प्रा० प्रतिदिनीं तेथें तेथें खेपा घालणें; पात्र पुजणें इ० स्थलीं कांहीं भक्ष्यपदार्थ पात्रांवरथोडाथोडा वाढलासा करणें; कोणेक पदार्थ पुजून ठेवणें ह्म० त्याचा उपभोग, दान, इ० न करितां उगीच संग्रहीं ठेवणें.

पुजा, पुजा, स्त्री० पूजा शब्दाचा अपभ्रंश; २, रा० पिशाचोपद्रवामुळें दुखणें आलें असतां तच्छांत्यर्थ शूद्रलोक पिशाच संतोषार्थ कांहीं कर्म करितअसतात ती; कोणेकाची पुजा करणें ह्म० खरडपट्टी काढणें.

पुंजा, पु० पुंज; २, कांहीं एक नियत प्रमाणाचें सुताचें गुंडळें असतें तो; उ० आठ पुंजे सूताचे दोन पंचे निघतात.

पुजारा, पुजारी, पु० रा० देवालयांतील देवाची पूजा करायाकरितां जो ब्राह्मणादिक वेतन देऊन ठेविला असतो तो.

पुंजावणें, भूम्यादिकांचेठायीं प्रसृतजें धान्यादिक तें एकत्र पुंज होईअसें गोळा करणें.

पुंजी, स्त्री० दाणे, रुपये, इ० पदार्थांचा लहानजो ढीग ती; २, संग्रहीं स्थितजो द्रव्य, विद्या, इ० कांचा भरणा ती; ३, सूताची अखंड केली असत्ये जी सरोसर ती; धान्यादि पुंजी करणें ह्म० पुंजावणें.

पुट, न० सं० मध्यें कांहीं पदार्थ रहावयाचे योग्य ते मुळें पात्रत्वें करून विवक्षित जो हस्त, पर्ण, कर्ण, इ० तें; चंचु, पुट, इ० समास.

पुटकळी, पुटकुळी, स्त्री० रक्तादि विकारानें शरीरावर

वर बारीक जो स्फोट येतो ज्यामध्यें निवळपणी असतें ती.

**पुटपाक**, पु॰ सं॰ औषधादिकांचे भोंवतालीं पर्णादिक गुंडाळून तो पदार्थ अग्नींत घालून जी त्याची पक्वता करितात ती.

**पुटपुटणें**, दुसऱ्यास स्पष्ट ऐकायास न येई असें कांहीं एक हळूहळू बोलणें किं॰ पढणें.

**पुटपुट**, स्त्री॰ लांबट अस्पष्ट जें हळूहळू भाषण ती; २, अ॰ बेडकी, पोर, इ॰ कानें पटपट उड्या मारणें चालणें, इ॰ कांचें वि॰.

**पुटी**, ३ लिं॰ पुटें दिल्हीं आहेत ज्यास असें जें रसायनादिक ती; समासीं प्र॰; उ॰ सातपुटें दिल्हीं आहेत ज्यास तो सातपुटी; गजपूट दिल्हें आहे ज्यास तो गजपुटी.

**पुठा, पुट्ठा**, पु॰ अश्वादिकांचे पुच्छाजवळचा जो भाग तो; २, वहीचे खालीं वर लाबितात जीं कातडीं तीं प्रत्येकीं.

**पुंड**, ३ लिं॰ राजा, मातापितरें, धनी, इ॰ कांची आज्ञा नमानितां स्वेच्छेनें अनेकप्रकारचीं मोठमोठालीं कर्चाटें करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**पुडका, पुडकें**, पु॰ न॰ कागद, पत्रावळी, इ॰ अनेक पदार्थ एकत्र जुळून सूत्रादिकानें बांधिला असतां जो आकारविशेष होतो तें.

**पुडा**, पु॰ पुडका; २, साकर इ॰ पदार्थ, कागद, पान, इ॰ कानें गुंडाळून बांधिला असतां जो आकारविशेष होतो तो; ३, मृदंगादिकांचें जें पूड तो.

**पुंडाई, पुंडायकी**, स्त्री॰ देश, ग्राम, इ॰ कांस उपद्रव करणें इ॰ रूप जें पुंडाचें कर्म ती; २, पुंडाचा जो देशादिकांस उपद्रव ती.

**पुंडावकें, पुंडावें**, न॰ पुंडाई.

**पुडी**, स्त्री॰ लाहान जो पुडा ती, प्रा॰ तृतीयार्थी बांधून; २, दूरदेशापासून कोणेकानें कोणी एक मेला किं॰ कोणेकाचें दिवाळें निघालें इ॰ रूप आणिलें जें वर्तमान ती; आणणें, फोडणें, येणें, इ॰ कांचे योगीं प्र॰; ३, संन्याशास अर्पितात जी भोजनभिक्षा ती.

**पुंड्र**, पु॰ सं॰ गोपीचंदन, भस्म, इ॰ कांचा शरीरावर लावितात जो तिलक तो.

**पुढचा**, ३ लिं॰ देश, काल, आणि अनुक्रम, यांचा अग्रिमप्रदेशीं किं॰ मनुष्यादिकांचे तोंडाकडील प्रदेशीं स्थित जो तो; म्ह॰ पुढच्यास ठेंच लागली म्हणजे मागचा सावध होतो; २, वा॰ आपेक्षां जो आधीं उत्पन्न किं॰ कांहीं कार्याचे ठायीं आधीं उत्पन्न झाला तो त्यापेक्षां.

**पुढचापुढें**, अ॰ पुढपुढें प्रथमार्थीं; २, कोणेकानं सांगीतलें जें कांहीं काम तें त्याचे डोळ्यां देखत मात्र करितो असें दिसायाजोगें कांहींएक करण्याचें वि॰.

**पुढपुढें**, अ॰ अनेक साध्य जें काम त्याविषयीं इतरांस मागें टाकून आपण एकल्यानेंच पुढें सरून बोलणें कांहींएक कामकरणें इ॰ कांचें वि॰; २, उत्तरोत्तर पुढें; उ॰ हा ग्रंथ पुढपुढें चांगला आहे.

**पुढला**, ३ लिं॰ पुढचा.

**पुढा**, पु॰ रा॰ कोणेक अर्थाचा तोंडाकडील जो भाग किं॰ प्रदेश तो; उ॰ दक्षिणेकडे पुढा करून बसून कों; मा मे पुढ्यांतील दोन यानें घेतली.

**पुढां**, अ॰ पुढें.

**पुढाकार**, पु॰ अनेकांनीं कर्तव्यजें कार्य त्याविषयीं कोणेकाकडेस दिल्हाजो मुख्यत्वेंकरून अधिकार तो; २, अनेकसाध्यकार्याविषयीं अनेकांस द्वारास्वाधीं घेउन तेंकरायाविषयीं एकानें पुढें सरण्याचा जो प्रकार तो.

**पुढाकारी**, पु॰ कांहींएक कार्याचा पुढाकार आणेंघेतला आहे तो.

**पुढार**, पु॰ पुढाकार द्वितीयार्थीं; २, दे॰ पुढाकारी.

**पुढारां**, अ॰ ग्रं॰ पुढें.

**पुढारीं**, अ॰ ग्रं॰ पुढें.

**पुढारी**, पु॰ पुढाकारी.

**पुढील**, ३ लिं॰ पुढचा.

**पुढून**, अ॰ पुढें या अव्ययानें वाच्यजें अधिकरण तेथून किं॰ तिकडून.

**पुढें**, अ॰ विवक्षित अवधीपासून अग्रिमप्रदेशीं किं॰ अग्रिमकालीं किं॰ अग्रिम विषयीं; २, मनुष्यादिकांचे तोंडाकडल्या भागीं किं॰ प्रदेशीं.

**पुणेरी, पुणेशाई**, ३ लिं॰ पुणें ह्मणून एकशहर आहे तेथील जो मनुष्य, कागद, भाषा, चाल, इ॰ तो.

**पुण्य**, न॰ उत्तमाचरण केल्यानें ईश्वरप्राप्ति द्वारा सुखप्रापक आत्म्याचे ठायीं जो धर्मविशेष होतो तें.

**पुण्यकर्म**, न॰ पुण्यजनकजें कर्म तें.

**पुण्यकाल**, पु॰ संक्रांति, ग्रहण, इ॰ कांचा जो पर्वकाल तो.

**पुण्यतिथि**, स्त्री॰ संन्याशी मेला असतां बाराव्या दिवशीं किं॰ प्रतिवार्षिक मृततिथीस त्याचे पुत्र शिष्यादि श्राद्धस्थानीं जें कर्म करितात ती.

**पुण्यप्रताप**, पु॰ कांहीं लोकोत्तर कार्यसिद्धीस आणयाविषयीं साधनभूतजें पुण्याचें सामर्थ्य तो.

**पुण्यभूमि**, स्त्री॰ यज्ञादिकर्म करण्याविषयीं शास्त्रानें योग्य ह्मणून सांगीतली जी भूमि ती किं॰ हिमाचलआणि विंध्याचल यांचेमधला जो प्रदेश ती.

**पुण्यलोक**, पु॰ पुण्यानें प्राप्त होणारा जो स्वर्गलोक, ब्रह्मलोक, इ॰ तो.

**पुण्यवंत, पुण्यवान्**, ३ लिं॰ ज्याचे पदरीं पुण्य आहे तो.

**पुण्यश्लोक**, ३ लिं॰ ज्याचे नामस्मरणादिकेंकरून पुण्यलागतें असा ईश्वर, धर्मराज, नल, इ॰ ते प्र॰.

**पुण्यसामग्री**, स्त्री॰ इष्टकार्यसिद्धकरण्याविषयीं साधनत्वेंकरून विवक्षित जें पुण्य तो.

**पुण्यक्षेत्र**, न॰ जेथें वासादिकेंकरून पुण्य लागतें अशीं काशी, कुरुक्षेत्र, इ॰ क्षेत्रें तीं प्र॰.

**पुण्याई**, स्त्री॰ पुण्यसामग्री.

**पुण्याचा**, ३ लिं॰ बाप, आई, भाउ, बहीण, इ॰ धर्माचा.

**पुण्याहवाचन**, न॰ विवाहादि शुभकर्माचें अंगभूत एक कर्म आहे.

**पुतणी**, स्त्री॰ धाडी.

**पुतण्या**, पु॰ भावाचा जो मुलगा तो त्याचा, त्याचे स्त्रीचा ही; २, रा॰ एके बहिणीचा जो मुलगा तो दुसरे बहिणीचा.

पुतळा, पुं० धातू, काष्ठ, मृत्तिका, यांचें जें पुरुषाकार बाहुलें करितात तो.

पुतळी, स्त्री० धात्वादिकांचें स्त्रीच्या आकाराचें जें बाहुलें ती; २, एकसुवर्णाचें नाणें आहे; ३, तलवारीचें जें अग्र ती.

पुत्येण, न० रा० गवतांत भेद आहे.

पुत्र, पु० जा आईबापांपासून उत्पन्न झाला जो पुरुष तो त्यांचा; २, दुसऱ्यापासून दत्तक घेतला किं० अन्नदानादिकें करून पोषिल्यामुळें जो पुत्रत्वें करून मानिला इ० तो.

पुत्रक, पुं० सं० पुत्र.

पुत्रधर्म, पु० मातापितरांची शुश्रूषा, श्राद्ध, इ० कजो पुत्राचा धर्म तो.

पुत्रपौत्रादिवंशपरंपरा, स्त्री० पुत्र, नातू, इ० रूपजी संततीची परंपरा ती.

पुत्रवंती, स्त्री० एक झाड आहे.

पुत्रवान्, ३ लिं० स्त्री० वती किं० वंती, पुत्र आहे जास तो.

पुत्रसंतान, न० पुत्ररूपजें संतान तें.

पुत्रावण, न० जातकर्म.

पुत्रिका, स्त्री० जा आईबापांपासून उत्पन्न झाली जी कन्या त्यांची ती.

पुत्री, स्त्री० पुत्रिका; २, ३ लिं० पुत्रवान्.

पुत्रेषणा, स्त्री० पुत्राविषयीं जो लोभ ती.

पुत्रोत्सव, पु० आपल्यास पुत्र आल्यामुळें जो आनंद होतो तो; किं० तत्समयीं जो वाद्यगजर, इ० समारंभ करितात तो.

पुदडणें, पुदळणें, ह्मणासेल दुर्दशापावेल हें मनांत नधरितां वस्त्र, अश्व, इ० पदार्थ जर्जर होई असें उपभोगिणें.

पुदाणा, पु० पुदिना.

पुदिना, पु० एक ओषधी आहे.

पुनः, अ० कांहीं एक गोष्ट केल्यापेक्षां किं० झाल्यापेक्षां आणखी एकदां; उ० याला एकदां सांगीतलें ह्मणजे पुनः सांगावें लागत नाहीं, त्याक्रिया प्रायः एकात्मक असाव्या किं० परस्पर विरुद्ध असाव्या; उ० एकदां रुपये दिले ते पुनः घेणार नाहीं.

पुनःपुनः, अ० वारंवार.

पुनरपि, अ० पुनः ही.

पुनरागमन, न० जास्थलापासून जो निघाला त्याचें त्याठिकाणीं पुनः जें आगमन तें.

पुनरावृत्ति, स्त्री० कांहीं एक ग्रंथादिकाची दुसरी जी आवृती.

पुनरुक्त, ३ लिं० एकवार उच्चारिलें तें न पुनः उच्चारिलें जें वाक्यादि तो.

पुनरुक्ति, स्त्री० एकवार बोलले ल्या वाक्याची पुनः निष्प्रयोजन जी उक्ति ती.

पुनर्जन्म, न० पु० मृत्यु यावयाजोग्या रोगादिसंकटापासून निभावून जी जीवंतपणें स्थिति तें तो.

पुनर्नवा, स्त्री० पु० एक ओषधी आहे.

पुनर्भू, स्त्री० पाटाची जी स्त्री ती.

पुनर्वसु, पु० स्त्री० सातवें जें नक्षत्र तें त्या.

पुनव, स्त्री० पूर्णिमा.

पुनश्च, अ० मात्त्यानं, आणखी.

पुनस्संधान, न० कांहीं आरंभिलेला व्यवहार तडीस नजातां विसकटल्यामुळें पुनः मुळापासून

करावी लागली जी खटपट तें.

**पुनीत**, ३लिं॰ प्रायश्चित्तादिकेंकरून जो शुद्ध आला तो.

**पुनीव**, स्त्री॰ पुनव.

**पुन्नाग**, पु॰ नागचांपा; २, उंडीण.

**पुन्हा**, अ॰ पुनः.

**पुमपत्य**, न॰सं॰ पुरुषरूपजें अपत्य तें.

**पुमान्**, पु॰ पुरुष.

**पुर**, न॰सं॰ नगर.

**पुरः**, अ॰सं॰ पुढें; याचा प्रयोग समासीं; उ॰ पुढें गमन करणारा तो पुरोगामी इ॰ आ॰.

**पुरखांब**, पु॰ जमनींत पुरलेला जो गृहादिकांचा खांब तो.

**पुरचुंडी**, स्त्री॰ पराकाष्ठा नारळा एवढी मोटी जी मोटली ती.

**पुरजा**, पु॰ कागदाचाजो कपटा तो.

**पुरण**, न॰ पोळ्या, मोदक, करंजा, इ॰ कांत घाला यासाठीं शिजवलेली दाळ, नारळाचाकीस, इ॰ कांत गूळ साकर घालून जो पदार्थ करितात तें; २, रूपणीचे पाटली इ॰ कांचे पोटीं जें ताम्रादि घालितात तें; ३, भिंत, बांध, जोतें, इ॰ कांचा पोटीं भरीस जें माती, धोंडे, इ॰ घालितात तें; ४, न॰स्त्री॰ कांहीं वेल, झाड, लाविलें असतां त्याचे मुळांत जें माती, शेण, इ॰ घालितात तें ती.

**पुरणपोळी**, स्त्री॰ जिचे पोटीं दाळीचें पुरण घातलें असतें अशी जी गव्हांची पोळी ती.

**पुरणावरणाचें**, न॰ नित्याचाजो स्वयंपाकाचा आणि भोजनाचा साधाप्रकार असतो त्याहून विलक्षण कुलधर्म, पाव्हणा, इ॰ निमित्तानें पोळ्या, पक्वान्न, इ॰ असावें असा आधिक्यविशिष्ट जो भोजनाचा स्वयंपाकाचा प्रकार असतो तें.

**पुरणी**, स्त्री॰ पुरण तृतीय चतुर्थीं थीं.

**पुरणें**, कांहींएकपदार्थ भूम्यादिकांचा खळींमध्यें घालून आच्छादित करणें किं॰ मेढ, स्तंभ, वृक्ष, इ॰ कांचा मूलावयव भूम्यादिकांत घट्टबसवून तो पदार्थ स्थिरगही असा करणें; २, कांहींएकपदार्थ विवक्षित कार्यास किं॰ विवक्षित प्रमाणाशीं तुल्य व्हावयास जितका पाहिजे तदपेक्षया न्यून नहोणें; ३, इच्छा, होस, मनोरथ, आशा, हेत, इ॰ पूर्ण होणें; दारिद्र्य हें सर्वांस पुरलें आहे इ॰ स्थलीं अमुकस्थलीं याची व्याप्ति नाहीं किं॰ न्यूनपणा आहे असें नाहीं असा अर्थ होतो.

**पुरत**, अ॰ पुरेत.

**पुरतकाली**, ३लिं॰ पुरतकाल म्हणून देश आहे तेथील जो कागद, भाषा, लोक, इ॰ तो.

**पुरता**, ३लिं॰ ज्यामध्यें अवयव, अवस्था, इ॰ संबंधी न्यूनत्व किमपि नाहीं तो; २, कांहींएक कार्यास किं॰ कांहींएकप्रमाणाशीं तुल्य होण्यास पुरायाजोगा जो तो; याअर्थीं त्यात्या कार्याचा नामाशीं समास होउन प्रयोग होतो किं॰ आया आवया प्रत्ययांत नहाचक धातूपुढें प्रयोग होतो; उ॰ संसारापुरता पैसा मिळाला म्हणजे पुरे, जेवायापुरता घरीं येतो; हा धोत्रजोडा पुरता दाहा हात नाहीं.

**पुरतेपणी**, अ॰ कांहीं आंत न्यूनता नराहतां पुरतें होई असें, ऐकूनघेणें, करणें, बोलणें, इ॰ वि॰.

**पुरपुराट**, पु॰ कांहींएकपदार्थाची विवक्षित कार्यास

पुरून उरायाजोगी जी विपुलता तो.

**पुरव**, पु॰ पुरवठा.

**पुरवटा, पुरवठा**, पु॰ कांहींएक कार्याविषयीं यो जिलेला जो अन्न, द्रव्य, इ॰ पदार्थ त्याचा त्या त्या कार्याविषयीं तोटा नयेतां पुरण्याचा किं॰ पुरून उरण्याचा जो प्रकार तो; २, रा॰ बायकांचा ओव्या इ॰ गाण्याचें जें शेष पूरण तो; ३, ग्रा॰ बटवा.

**पुरवणी**, स्त्री॰ कागदामध्यें लिहिल्या मजकुराचा शेष तो कागद संपल्यामुळें जो दुसरे कागदावर लिहितात ती; २, तो दुसरा कागद ती; ३, कांहींएक बोललेल्या गोष्टीचा साक्षी, लेख, इ॰ प्रमाणांनीं खरें करून देण्याचा जो व्यापार ती; ४, त्यामध्यें जो न्यूनांश त्याचें पूरण करण्याचा व्यापार ती; ५, मोत्यांचे घोंसास जे अनेक सर असतात त्यांस प्रत्येकीं अमुक अमुक मोतीं असावीं असें जें संख्यारूप एक प्रमाण धरिलें असतें ती.

**पुरवणीबंद**, पु॰ पुरवणी द्वितीयार्थी.

**पुरवणें**, कांहींएक गोष्ट किं॰ पदार्थ हें मला येईलका मास अशाबुद्धीनें मान्य होणें; उ॰ ह्यामाशा स्वभावशिव्या देण्याचा आहे पुरवेल तर राहा; ही गोष्ट सांगतां पुरवत नाहीं इ॰ स्थलीं सांगायास शक्य होत नाहीं असा अर्थ; २, कांहींएक पदार्थानें कांहींएक विषयानें व्यापून राहाणें प्रायः जा पदार्थाचा संबंध अभीष्ट आहे तद्विषयीं प्र॰; उ॰ हा जेथे तेथे पुरवला आहे; ३, कांहींएक कार्याविषयीं साधनभूत कांहींएक पदार्थ जितका पाहिजे तितका देणें किं॰ युक्तियुक्तीनें खर्चून कांहींएक पदार्थ विवक्षित कार्याचे समाप्तीपर्यंत पुरायाजोगा करणें; उ॰ तुली पुरवून पुरवून खाल तर तुलाजे पाहिजे तितकें मीं पुरवीन; ४, कोणेक व्यवहार किं॰ पदार्थ त्यापासून आपल्यास तोटा नयेतां कांहीं नफा होईल असा सोईवार पडणें; उ॰ फारसस्त ई असली ह्मणजे कोणताही व्यवहार पुरवत नाहीं.

**पुरशीस**, پرسش स्त्री॰ वादी प्रतिवादी इ॰ कांनीं आपलें वृत्त समजाविल्यानंतर त्यांतील कांहींएक अंशाविषयीं त्यांस जो प्रश्न करितात ती धाल, पड, इ॰ धा॰ यो॰ प्र॰

**पुरश्चरण**, न॰ सं॰ मंत्र आपल्यास सिद्ध व्हावा ह्मणून तदनुसार त्यामंत्राचा अमुक संख्याक जप करावा इ॰ मंत्रशास्त्रामध्यें अनुष्ठान सांगितलें आहे तें.

**पुरस्कर**, अ॰ पुरस्सर तृतीयार्थी; भक्तिपुरस्कर, आदरपुरस्कर, इ॰ समासीं प्र॰.

**पुरस्कर्ता**, पु॰ सं॰ राजकीय व्यवहारादिकांचा ठायीं आपलें कांहीं काम असतां तेथें आपला प्रवेश करून अनेकप्रकारें आपलें साहित्य करणारा असा जो आपला पक्षपाती असतो तो.

**पुरस्कार**, पु॰ सं॰ पूजादिसत्कार तो.

**पुरःसर**, ३ लिं॰ सं॰ अग्रेसर; २, जा समुदायामध्यें जो मुख्यत्वें करून विवक्षित तन्नामपूर्वक या शब्दांशीं समास होतात तेथें विशिष्टाचा अर्थ तो तो समुदाय होतो; उ॰ इंद्रपुरःसर देव ईश्वरास शरण गेले; शपथादि शब्दांपुढें याचा योग होउन समास झाला असतां विशिष्ट शब्द क्रियाविशेषण होतो तेथें वक्ष्यमाण क्रियेवर शपथादिपदार्थांचा अन्वय होई असें, असा अर्थ; उ॰

शपथपुरस्सर मी सांगतों, आदरपुरःसर त्यानें बोलाविलें.

**पुरक**, पु॰ पित्तादि विकृतीमुळें अंगावर जो पुळ्यांचा समुदाय येतो तो.

**पुरा**, ३ लिं॰ पुरता प्रथमार्थी; उ॰ हा अंगरखा पुरा झाला नाहीं; २, जा कर्मामध्यें जो निपुण तो त्या विषयीं; उ॰ हा पुरा गाणार आहे; ३, पु॰ एक जातीचे किं॰ एक कसबाचे लोक जेथें राहातात असा जो नगराचा एक अवयव तो; उ॰ आम्हीं गोसावीं पुर्यांत राहातों; ४, अ॰ सं॰ पूर्वी.

**पुराड**, न॰ नदीच्या पुराबरोबर वाहवत येतें जें तृण, काष्ठ, पानें, इ॰ तें.

**पुराण**, न॰ सृष्टीची उत्पत्ति, स्थिति, प्रलय, इ॰ ईश्वरचरित्र जामध्यें सांगीतलें असतें असे जे भागवतादि ग्रंथ ते प्र॰; २, ३ लिं॰ सं॰ पुरातन; ३ अा॰ संसारादि संबंधी भारी लांबट जी गोष्ट तिला म्ह॰

**पुराणा**, ३ लिं॰ हिं॰ जुना.

**पुराणीक**, पु॰ पुराण वाचून त्याचा अर्थ सांगणारा जो तो; २, देवालयादिकाच्याठायीं पुराण सांगण्याची वृत्ति आहे जास तो तेथील.

**पुराणोक्त**, ३ लिं॰ पुराणांत सांगीतलें जें स्तोत्र, मंत्र, इ॰ तो.

**पुराणोक्तआशीर्वाद**, पु॰ जांस वेदाधिकार नाहीं त्यांस आशीर्वाद लिहायाचा असतां हा शब्द लिहितात तो.

**पुरातन**, ३ लिं॰ जुना.

**पुरवा**, पु॰ कांहीं कार्याविषयीं पाहिजे जो पदार्थ तो पुरविण्याचा व्यापार तो; २, पुरवणी तृतीय चतुर्थार्थी.

**पुरी**, स्त्री॰ नगरी; २, एक पक्वान्न आहे; ३, पु॰ गोसाव्यांत भेद आहे.

**पुरीतति**, स्त्री॰ सं॰ शरीरामध्यें एक नाडी आहे.

**पुरीष**, न॰ सं॰ विष्ठा.

**पुरुष**, पु॰ सं॰ ज्याचे अंगीं प्रजोत्पादक बीज आहे असा जो मनुष्यादि प्राणी तो; २, बाप्या; ३, एक जातीयच जे वृक्ष, लता, इ॰ दोन प्रकारचे असतात एकास फल आहे आणि एकास नाहीं त्यामध्यें जास फल येत नाहीं त्या व्यक्तीस म्ह॰; ४, पुंलिंग नामानें वाच्य जो अर्थ तो; उ॰ वृक्ष हा पुरुष आणि झाडें हें नपुंसक; ५, साडेतीन हात रूप जें उच्चतेचें प्रमाण तो; उ॰ या विहीरींत दोन पुरुष पाणी आहे; ६, दिव्य सामर्थ्य ज्याचे अंगीं नाहीं असा जो मनुष्यादि जीव तो; उ॰ भ्रांति हा पुरुषाचा धर्म आहे.

**पुरुषत्व**, न॰ पुरुषाच्याठायीं प्रजोत्पादनाविषयीं उपयुक्त जी शक्ति असती तें; २, कांहीं पराक्रम करण्याविषयीं उपयुक्त पुरुषाचे अंगीं जो उत्साहादि शक्तिरूप धर्मविशेष असतो तें.

**पुरुषार्थ**, पु॰ सं॰ मनुष्यादि जन्म ल्या प्राण्यानें साधायास योग्य जे धर्म, अर्थ, काम, मोक्ष, हे चार ते प्र॰; २, लोकानीं वाहवा म्हणायाजोगा केला जो शत्रुपराजयादि पराक्रम तो.

**पुरुषोत्तममास**, पु॰ सं॰ अधिकमास.

**पुरूरव**, पु॰ रा॰ अतिशूद्रांचा देव आहे.

**पुरूळ**, पु॰ पुरळ.

**पुरे**, अ॰ विवक्षित कार्याचे किं॰ इच्छेच्या पूर्ततेविषयीं जितका पाहिजे तितका तो तो पदार्थ व्यापार

झाला या अर्थाचें वाचक तो पदार्थ आणखी नको किं॰ तो व्यापार आणखी करूं नये या अर्थाचें भान अर्थात होतें; उ॰ मला दाहा हात धोत्रजोडा पुरे; हा एकदां बोलूं लागला ह्मणजे पुरे.
पुरेत, पुरेयाचें अनेकवचन.
पुरोडाश, पु॰ सं॰ अग्निहोत्राचा अग्नीवर पिष्ट भाजून जें होमद्रव्य करितात तो.
पुरोभागी, ३ लिं॰ सं॰ कांहीं पदार्थ किं॰ गोष्ट यांतील दोष काढण्याकडेसच जाचें लक्ष्य तो.
पुरोवर्ती, ३ लिं॰ कोणेकाचा पुढें जो स्थित तो; उ॰ पुरोवर्ती पदार्थ आसदिसेना त्यास दूरस्थित कसा दिसेल.
पुरोहित, पु॰ सं॰ उपाध्याय.
पुलक, पु॰ सं॰ भयादिकामुळें जो अंगावर कांटा उभा राहतो तो.
पुलन, न॰ शा॰ क्षतादिकांत पू उत्पन्न करणारा जो पावटा इ॰ पदार्थ तें.
पुला, पु॰ पुली.
पुलाव, पु॰ ⁄. मुसलमान लोक एक पक्वान्न करीत असतात तो.
पुलिन, न॰ सं॰ वाळवंट.
पुली, स्त्री॰ गवत, कडवा, इ॰ कांची जी पेंढी ती.
पुलेणें, शा॰ क्षत, गळूं, इ॰ पुळणास येणें.
पुल्लिंग, न॰ सं॰ नामाचींजीं तीन लिंगें त्यांत तो या सर्वनाम्यानें ज्याचा परामर्श होतो त्याचें लिंग तें.
पुवळणें, कों॰ पुलेणें.
पुशी, स्त्री॰ कों॰ पिसू.
पुंश्चली, स्त्री॰ सं॰ व्यभिचारिणी.

पुष्कर, न॰ सं॰ हत्तीचा शुंडेचा जो अग्रभाग तें.
पुष्कराज, पु॰ सं॰ एक रत्न आहे.
पुष्करिणी, स्त्री॰ सं॰ लहानजें सरोवर ती.
पुष्कल, पुष्कळ, ३ लिं॰ थोडा नव्हे तो.
पुष्ट, ३ लिं॰ सं॰ कृशाचा प्रतिपक्षी.
पुष्टि, स्त्री॰ सं॰ पुष्टता; २, भाषणादि व्यवहाराचे व्यंगतेचें जें पूरण.
पुष्टिपत्र, न॰ पुस्तक न मळावें, न चुरावें, ह्मणून त्याचे भोंवतालें बिरीचा तुकडा, आडा कागद, इ॰ लावितात तें; २, लिहितेसमयीं त्या कागदाचें रक्षालीं आधारार्थ जो दुसरा कागद धरितात तें.
पुष्टीकरण, न॰ सं॰ भाषणादि व्यवहाराची पुष्टि करण्याचा जो व्यापार तें.
पुष्प, न॰ सं॰ फूल; २, स्त्रियांचें ऋतुसंबंधी जें रज तें.
पुष्पवटिका, पुष्पवाटिका, स्त्री॰ अनेक प्रकारचीं पुष्पांचीं झाडें लावून जें सुशोभित स्थल करितात ती.
पुष्पवृष्टि, स्त्री॰ सं॰ कोणेकानें कांहीं उत्कृष्ट कर्म केलें असतां त्याजवर देव, मनुष्य, इ॰ आनंदित होउन जी पुष्पांची वृष्टि करितात ती; २, सर्व सभासदादिकानी समाधान पावयाजोगें कोणेकाचें अर्थपुष्ट अस्खलित जें भाषण त्यास ह्म॰.
पुष्पांजलि, पु॰ सं॰ पूजासमाप्तीस देवादिकांवर जी दोहीं हातानें फुलें वाहतात तो.
पुष्पित, ३ लिं॰ सं॰ पुष्पें ज्यास आलीं आहेत तो.
पुष्य, पु॰ सं॰ आठवें नक्षत्र तें.
पुष्यार्क, पु॰ रविवारीं पुष्यनक्षत्राचा जो योग तो.
पुसकट, पुसट, ३ लिं॰ यत्किंचित् पुसका जो

अक्षरादि तो; २, अ॰ अंधकारादि दोषानें अस्पष्ट दिसण्याचें वि॰.

**पुसकटणें, पुसटणें**, लिहिलेलें अक्षरादिक पुसकटे असें करणें.

**पुसका**, ३ लिं॰ स्पष्ट ढळढळीत दिसत नाहीं असें जें अक्षर, चिन्ह, गंधाचीरेषा, इ॰ तो.

**पुसणें**, कागद, शरीर, वस्त्र, इ॰ कांस लागलेला मलादिक किं॰ अक्षर, रेषा, इ॰ चिन्ह फडकें इ॰ कानें चोळून नाहीं असें करणें; २, विचारणें; ३, न॰ पुसायाचें साधन जें फडकें इ॰ तें; प्रयोग समासीं; उ॰ नाकपुसणें, तोंडपुसणें, इ॰.

**पुसणारा, पुसता**, पु॰ कोणी अपराध इ॰ केले असतां तूं हें कां केलेंस असें पुसण्याविषयीं जो धनी इ॰ अधिकारी तो.

**पुंसवन**, न॰ स्त्रीस प्रथमतः गर्भ असतां दुसर्या तिसर्या मासीं करायाचा एक संस्कार आहे तें.

**पुसूनटाकणें**, शत्रु, सैन्य, इ॰ मारून लुटून भयाभंगास आाई असें करणें.

**पुस्त**, स्त्री॰ न॰ پشت गंजीफांचे पानाचा जो पृष्ठभाग तो; २, पु॰ पिढी; उ॰ हें वतन आम्हाकडे चार पुस्त चालत आलें आहे.

**पुस्तक**, न॰ सं॰ वेद, शास्त्र, पुराण, इ॰ ग्रंथ जा कागदांवर लिहिले आहेत असा जो त्या कागदांचा समुदाय; ल॰ पराधीन जिणें आणि पुस्तकीं विद्या.

**पुस्तकपाठ**, ३ लिं॰ पोथीपाठ.

**पुस्तंग**, पु॰ घोड्याचें खोगीर आंवळायाचा जो तंग त्याचा खोगराबर यावयाचा जो कातड्याचा अव

यव असतो तो.

**पुस्तदरपुस्त**, अ॰ एके पिढीपासून दुसर्या पिढीचा ठायीं दुसर्येपासून तिसरीचा ठायीं कांहीं एक अच्छिन होत आाई असें वतन इ॰ चालणें, उपभोगणें, इ॰ कांचें वि॰.

**पुस्तपना**, पु॰ कांहीं एक कार्याचा ठायीं प्रवृत्त झाला जो कोणी एक त्याचें जें न्यून पडेल त्याविषयीं कोणी मित्रादिक करितो साहित्य किं॰ त्या साहित्य करणाराचा कार्यप्रवृत्तास असतो जो आश्रय तो.

**पुस्तापास्त**, स्त्री॰ तूं कोण कोठें जातोस, काय नेतोस, इ॰ वाटसरू इ॰ कांस जो प्रश्न करितात ती.

**पुस्ती**, स्त्री॰ अक्षर कोठपर्यंत वळलें याची परीक्षा पाहावयासाठीं मुलापासून कागद लिहून घेतात ती; २, मोट, जोडा, इ॰ फाटलें असतां त्यास जें चर्माचें ठिगळ देतात ती; ३, पाठबळ; ४, कों॰ जीर्ण झालेला कागद, भिंत, इ॰ कांचा संरक्षणार्थ तत्तत्सजातीय दुसरा जो जोड देतात ती; ५, लिहिणार मुलाची यास काय काय समजतें हें पाहावया करितां कोणेक घेतो जी परीक्षा ती.

**पुळण**, स्त्री॰ कों॰ रेती; २, न॰ पुलिन; ३, न॰ था॰ पुलन.

**पुळणवट**, ३ लिं॰ जा जमिनीमध्यें पुळणीचा अंश बहुत आहे ती भूमि तो.

**पुळणासयेणें**, गळू, क्षत, इ॰ पुवानें युक्त होणें.

**पुळी**, स्त्री॰ फुटकुळी; २, एक स्फोटरूप रोग आहे.

**पू**, पु॰ शरीरांतील रक्तास कांहीं विकृति झाल्यामुळें जो त्याचा पांढरा द्रवरूप परिणाम होतो तो; २, वस्त्र, काष्ठ, इ॰ अतिशयित कुजल्यामुळें जो परिणाम होतो

त्यास ल० .

**पूगीफल**, न० सं० पोफळीचें फल तें.

**पूज**, न० टिंब; २, कांहींएक पदार्थाच्या अभावाचें द्योतक लेखामध्यें जें वाटोळें चिन्ह करितात तें; बाकी पूजकरणें इ० स्थलीं यारून निःशेषकरणें इ० अर्थ आणावे; स्नानसंध्येचा नावें पूज, पैशाचे नावें पूज, इ० स्थलीं त्यात्यापदार्थाचा केवल अभाव असा अर्थ; स्नानसंध्यादिकांवर पूजपडणें यास्थलींही तोच अर्थ.

**पूजक**, ३ लिं० पूजा करितो तो.

**पूजणें**, पुजणें.

**पूजन**, न० अर्चन.

**पूजा**, स्त्री० सं० पूजन; २, देवादिपूजनार्थ आणिलीजी पुष्पादिसामग्री ती; पूजा बांधणें ल० देवावर सुशोभित दिसायाजोगी गंध, पुष्प, वस्त्र, धान्य, इ० कांची रचना करणें; विपरितलक्षणेनें कोणेकास शिवी, गाळ, करणें.

**पूजित**, ३ लिं० पूजिजेला जो तो.

**पूज्य**, ३ लिं० ज्याची पूजा करण्यास योग्य असा जो देव, गुरू, इ० तो; २, ज्याची आज्ञा अवश्य पाळली पाहिजे असे जे माता, पिता, गुरु, शास्त्र, इ० तो; ३, न० पूज.

**पूट, पूढ**, न० कांहींएक पदार्थांत विशेष गुण उत्पन्न व्हावा ह्मणून कांहींएक रसादिकांचा त्या पदार्थास लेप देउन सुकवून त्याचा अंगीं तो रस भिने असा जो संस्कार करितात तें; २, तें रसादि द्रव्य तें; धोत्रास शाईचीं पुटें बसलीं आहेत इ० स्थलीं लेप बसला आहे असा अर्थ.

**पूड**, स्त्री० कांहीं पदार्थाचें केलें जें चूर्ण ती; २, न० नगारा, नौबत, इ० काचें जें पात्र तें; ३, पु० न० जो फुला, पानपुडा, पेटी, बटवा, इ० कांचा पोटीं जीं घरें असतात तीं प्र०; ४, न० वेळू, वेत, इ० कांचा पात्यांचें याती, विड्याचीं पानें, इ० ठेवायाकरितां जें पानपुडाचे आकाराचें पात्र करितात तें; ५. चुनाळ्याचीं जीं दोन टोपणें तीं कि० मृदंगास दोहोंकडे दोन जीं चर्में लाविलीं असतात तीं प्र०.

**पूत**, पु० पुत्र; असा कोण मायेचा पूत आहे इ० वाक्यीं प्र०; २, ३ लिं० पुनीत.

**पूय**, न० सं० पू.

**पूर**, पु० नदी, ओढा, यांस पर्जन्योदक आंत मिळाल्यामुळें जी त्या उदकाची अतिशयित वृद्धि होती तो.

**पूरक**, ३ लिं० पूरण करणारा तो.

**पूरण**, न० संख्या, प्रमाण, श्लोकादिग्रंथ, इ० कांत न्यून जो अंश तो आंत घालून पुरता करण्याचा जो व्यापार तें कि० जेणें करून तो पुरता होतो तो जो अंश तें.

**पूरित**, ३ लिं० पूर्ण केला जो तो.

**पूर्ण**, ३ लिं० सं० पुरता प्रथमार्थी; २, जलादिकानें भरण्याविषयीं ज्यामध्यें यत्किंचित् रिकामपणा राहिला नाहीं तो; ३, न० संख्येचें अभावबोधक जें वर्तुलाकार चिन्ह करितात तें.

**पूर्णगर्भा**, स्त्री० पुरणपोळी ती.

**पूर्णपात्र**, न० सं० राजादिकानीं ब्राह्मणास बहुत भिक्षामिळावी एतदर्थ एकपंचपात्रासारिखें धातुमय पात्र दिल्हें असतें तें; २, विवाहादिकीं तीं

एक कर्मामध्यें अक्षतादिकांनीं भरलेलें जें पात्र घेतअसतात तें.

**पूर्णपात्री**, पु० सं० व्रथमार्थसंबंधी पूर्णपात्र घेउन भिक्षामागणाराजो तो.

**पूर्णा**, स्त्री० सं० पंचमी, दशमी, पूर्णिमा, अमावास्या, यातिथि भ०.

**पूर्णिमा**, स्त्री० सं० जातिथीस सर्वचंद्रबिंब तेजानें पूर्णहोतें तीतिथि.

**पूर्त्त**, न० सं० विहीर, तळें, वाट, देवालय, इ० निर्माण करणें इ० रूपजें धर्मकृत्य तें; २, ३ लिं० परिपूर्ण.

**पूर्तता**, ३ लिं० परिपूर्णता; इतक्याद्रव्यानें याची पूर्तता होणारनाहीं इ० स्थलीं याचे इछेची परिपूर्णता होणारनाहीं असा अर्थ.

**पूर्त्ति**, स्त्री० सं० पूर्तता.

**पूर्भय्या**, पु० हिंदुस्थानी लोकांत एक भेद आहे.

**पूर्या**, पु० कल्याणरागांत भेदआहे.

**पूर्व**, स्त्री० जिकडेसूर्योदय होतो तिकडील जीदिशा ती; २, ३ लिं० विवक्षितस्थलापासून पूर्वदिशेकडील जो देश किं० तद्देशस्थित पदार्थ तो; ३, विवक्षितक्रमानुरोधानें जाहून जो आधींचा तो त्याहून; उ० श्राद्धदिवसाचे पूर्वदिवशीं व्रतस्थअसावें.

**पूर्वक**, अ० पुरस्सर तृतीयार्थी; २, ३ लिं० ओपदार्थ जाक्रमस्थितपदार्थाचा पूर्वभागीं आहे तत्पूर्वक तोपदार्थसमुदाय तो; उ० ईश्वराचें नाम श्रीशब्दपूर्वक घ्यावें.

**पूर्वकथा**, स्त्री० नित्यनित्यपुराणादिग्रंथाचाक्रमानें अर्थसांगतअसतां वक्ष्यमाण कथेचा संदर्भ लागावा ह्मणून पूर्वीची उक्तकथा पुनः सांगतात ती.

**पूर्वकर्म**, न० सुखदुःखास कारणीभूत जें पूर्वजन्मादिकांचाठायीं केलें जें कर्म तें.

**पूर्वज**, ३ लिं० आपलाबाप, आजा, पणजा, ज्येष्ठबंधू, इ० जे वडील तो.

**पूर्वजन्म**, न० वर्तमानजन्माचा पूर्वीचें जें जन्म तें.

**पूर्वजन्मार्जित**, ३ लिं० सं० पूर्वजन्मीं संपादिलेलें जें पुण्य किं० पाप तो.

**पूर्वदत्त**, ३ लिं० याजन्मीं तत्तत्पदार्थ प्राप्तहोण्यास कारण भूत पूर्वजन्मीं केलेंजें दानादि सत्कर्म तो.

**पूर्वपद**, न० हरिदास कथेचा आरंभीं जेंपद, अभंग, इ० ह्मणतो आणि त्या कथेचा उपसंहारीं ही तेंच ह्मणतो तें.

**पूर्वपश्चिम**, ३ लिं० पूर्वेकडून पश्चिमेकडे ज्याची लांबी आहे असें जें गृहादिरूप क्षेत्र तो.

**पूर्वपक्ष**, पु० दुसऱ्यानें वरउत्तर करावें अशाबुद्धीनें पंडितापुढें कांहींएक मताचा केला उपन्यास तो; २, उपन्यास करावयाजोगा दोषाभास विशिष्टजो ग्रंथप्रतिपादित विषय तो; ३, वादप्रकरणीं अग्रवादी निवेदितोजें आपलें वृत्त तो.

**पूर्वपीठिका**, स्त्री० कोणेकपुरुषादिकांचें विवक्षितसमयापासून पूर्वीचें इत्थंभूतजें वृत्त ती; उ० आतां यानीं साधूपणा धरलापण याची पूर्वपीठिका तर बहूत विरुद्ध आहे; २, कांहींएकगोष्टीचा विवक्षित अंशापासून पूर्वींचाजो अंश जाचे ज्ञानावांचून उत्तरांशाची व्युत्पत्ति होतनाहीं ती.

**पूर्वपुण्य**, न॰ पूर्वजन्मार्जित जें पुण्य तें.

**पूर्वपुण्याई**, स्त्री॰ पूर्वजन्मींची पुण्याई.

**पूर्वरात्र**, स्त्री॰ मध्यरात्रीच्या पूर्वींचा जो रात्रिभाग ती.

**पूर्वरूप**, न॰ रोग, संकट, इ॰ पुढें होणार ह्मणजे पूर्वीं त्याचें ज्ञापक जें विकृत्यादि होतें तें; उ॰ कामला ही पांडूचें पूर्वरूप; बुद्धिभ्रंश हें दारिद्र्याचें पूर्वरूप.

**पूर्वरेषा**, स्त्री॰ देवरेषा.

**पूर्ववत्**, अ॰ पूर्वींच्याप्रमाणें.

**पूर्वसमुद्र**, पु॰ पूर्वदिशेकडील जो समुद्र तो.

**पूर्वस्थल, पूर्वस्थान**, न॰ ज्या स्थलापासून जो निघून देशांतरादिकास गेला तें त्याचें.

**पूर्वस्थिति**, स्त्री॰ बुध्यादिकांची प्रकृतिभूत जी विकृत्यवस्थेहून पूर्वींची अवस्था ती; उ॰ आलीकडे याला पिशाचउपद्रव झाला आहे हा पूर्वस्थितीवर केव्हां येईल हें कळत नाहीं.

**पूर्वा**, स्त्री॰ अकरावें नक्षत्र त्या.

**पूर्वांग**, न॰ कांहींएक अनुष्ठानाचे प्रधान कर्माचे पूर्वींचें जें कर्म तें; उ॰ स्वयंपाकाचें सडासंमार्जन हें पूर्वांग.

**पूर्वापर**, अ॰ विवक्षित काल, देश, ग्रंथ, इ॰ कांचा पूर्वींचा आणि अनंतरचा असे जे दोन विभाग त्यांतें धरून; उ॰ ग्रंथ पूर्वापर पाहिल्यावांचून लागणार नाहीं.

**पूर्वापरविरोध**, पु॰ एका ग्रंथांत पूर्वापर स्थित जीं वाक्यादिक त्यांच्या परस्पर जो विरोध तो.

**पूर्वापार, पूर्वपार, पूर्वींपार**, अ॰ कांहींएक व्यापाराचा जो आद्यकाल त्या कालापासून सतत; उ॰ आली पूर्वापार जसे वर्तत आलों त्याप्रमाणें पुढें वर्तूं.

**पूर्वाफल्गुनी**, स्त्री॰ पूर्वा.

**पूर्वाभाद्रपदा**, स्त्री॰ पंचविसावें नक्षत्र त्या.

**पूर्वाषाढा**, स्त्री॰ विसावें नक्षत्र त्या.

**पूर्वाह्ण**, पु॰ प्रातःकालापासून दुपार पर्यंत जो काल तो.

**पूर्वी**, स्त्री॰ एक राग आहे.

**पूर्वीं**, अ॰ अगोदर.

**पूर्वींचा, पूर्वील**, ३ लिं॰ अगोदरचा.

**पूर्वींपासून**, अ॰ अगोदरपासून.

**पूर्वोत्तर**, ३ लिं॰ आधींचा आणि त्याहून मगचा असा मिळून विशिष्ट जो ग्रंथ, वर्तमान, संबंध, इ॰ तो.

**पूर्व्या**, पु॰ पूर्भय्या.

**पूल**, पु॰ नद्यादिक उल्लंघून जायाकरितां पाषाण, लांकडें, इ॰ कानीं खालून पाणी जायास मार्ग ठेवून जो मार्ग बांधितात तो.

**पूस**, पु॰ पौष; ह्म॰ पूस आणि थंडीनें पाडिला भूस.

**पृछक**, ३ लिं॰ पृच्छा करणारा तो.

**पृच्छा**, स्त्री॰ हें कसें, काय, इ॰ रूप दुसऱ्यास विचारण्याचा व्यापार ती.

**पृथक्**, अ॰ निराळा.

**पृथक्करण**, न॰ एकत्रस्थित पदार्थ निराळे निराळे करण्याचा जो व्यापार तें.

**पृथिवी, पृथ्वी**, स्त्री॰ समवाय संबंधानें जेथे गंध

गंधरूपगुण राहतो असें जें पंचमहाभूतांतील भूत आजवर नद्या, समुद्र, वृक्ष, पर्वत, वनें, नगरें, मनुष्य, पशु, इ॰ राहातात असाजो हाईश्वरानें पृथ्वीरूप द्रव्याचा गोलाकार पदार्थ रचला आहे तो; २, ला॰ त्याजवर राहाणारे जे मनुष्य, पशु, वृक्ष, इ॰ सर्व ते.

पृथु, ३ लिं॰ सं॰ मोठा जाडा जो कांहीं पदार्थ तो.

पृथुक, पु॰ सं॰ पोहा; २, बालक.

पृष्ठ, न॰ सं॰ मनुष्यादिपदार्थाची जी पाठ तें; २, कागदाचीं दोन जीं अंगें तीं प्र॰ ०

पृष्ठतोनुपृष्ठ, अ॰ एकाचे पुढें दुसऱ्याचीपाठ दुसऱ्याचा पुढें तिसऱ्याची पाठ असें व्हावयाजोगे प्रकारें किं॰ एकमेकापुढें एकमेकाची पाठ व्हावयाजोग्या प्रकारें.

पृष्ठफल, न॰ गोलक्षेत्राचें जें वरील क्षेत्रफल तें.

पृष्ठभाग, पु॰ सं॰ मनुष्यादिकांचा जो पृष्ठ देश तो.

पृष्ठमात्रा, स्त्री॰ केकैकोकौ इ॰ अक्षरांस वरद्या वयाची जी मात्रा ती त्या अक्षराचा मागें देतात ती.

पेकट, पेंकट, न॰ कंबरेचाजो सांधा तें.

पेकणें, पेखणें, कोणेकाची वाटपाहात खोळंबून राहाणें

पेंका, पु॰ बेडकासारिखा एक प्राणि आहे.

पेंगणें, बसून डुकल्या घेउंलागणें; २, लंगडणें; ३ रोगादिकानीं अशक्त होणें.

पेगम, पु॰ पराधीन दुर्घट कार्याचा सिद्धिविषयीं अनेकयुक्तीनीं बांधिलेंजें संधान तो.



पेंगळा, ३ लिं॰ दे॰ पांगळा.

पेंच, पेंच, पु॰ मल्लयुद्धांत दुसऱ्यास पाडावयाच्या जा अनेकयुक्ति त्या प्र॰; २, अनेकप्रकारचीं संकटें प्राप्तजाल्यामुळें जी अडचण प्राप्त होती तो किं॰ तीं संकटें; ३, वादप्रदिवादादि भाषणांत दुसऱ्यासि धरावयाचा आपणनसांपडावें अशा जा अनेक युक्ति असतात त्या प्र॰; ४, पागोट्याचे जे वेढे किं॰ जे सारखे पीळ पडतात ते प्र॰.

पेंचणें, हस्तपाद्यवयव किं॰ वृक्षशाखा इ॰ पिळवटणें, दुमडणें, इ॰ कारणामुळें आंत मुरगळले आणें; कदाचित् अन्यकर्तृकता असतां सकर्मकही प्रयोग होईलसा दिसतो; २, कोणेकास भाषणानें कोंडणें; ३, रा॰ काष्ठादिक पिंजलें आणें; ४, चोर, शत्रु, इ॰ कांचें अनिष्टकरण्याविषयीं कांहीं नवस करून देवास प्रार्थिणें; ५, पायफांकटणें.

पेंचपांच, पेंचपांच, पु॰ पांचपेंच.

पेंचाटी, स्त्री॰ कचाटी.

पेज, स्त्री॰ तांदूळशिजल्यानंतर जें वेचून पाणी काढितात ती; २, पुष्कलपाण्यांत थोडे तांदूळ शिजवून प्यावयाजोगें करितात ती.

पेजट, ३ लिं॰ जाभातामध्यें पेजेचा अंश बहूत असाजो भात तो; २, ला॰ पुष्टदिसून शक्तिहीन तो.

पेजपात्र, न॰ पेजट द्वितीयार्थी.

पेजबुडा, ३ लिं॰ कों॰ पेजट प्रथमार्थी.

पेजवतें, न॰ गा॰ पावधूक.

पेजळी, स्त्री॰ रा॰ पावधी.

पेजळूक, स्त्री॰ रा॰ पावधूक.

पेजा, ३लिं॰ पेजपात्र.

पेजें, न॰ रा॰ गाय, म्हैस, यांचें एकेविणीचें दुपतें तद्रूपजें फलतें; उ॰ हीगाय तूंपोस आणिव्याली ह्मणजे आवपें तूंघे आणि पेजें आह्मासदे.

पेजेंआवपें, न॰ रा॰ पेजें आणि आवपें मिळून जे दोन शय ते,उ॰हीपाडी मीं पेजें आवप्याचे बोलीनें आणली आहे.

पेट, पु॰ कों॰ बंदूक, इ॰ कांचा जो बार तो; २, बा॰ चोप; ३, स्त्री॰ पेटी.

पेटघेणें, काष्ठादिकानीं अग्निसंयोग झाल्यामुळें पेटूंलागणें; कों॰ पेटहोणें ह्म॰ क्रोधानें शरीराच्या संताप होणें.

पेटका, पु॰ पेडका.

पेटणें, अग्नीनें प्रदीप्त होणें किं॰ काष्ठादिकानीं पेटघेणें; २, ला॰ कलह, क्रोध, इ॰ कानीं अतिशय पूर्वक प्रवृत्त होणें; हटासपेटणें ह्मणजे हटानें युक्त होणें; ३, भूमिचोपणें; ४, बैल, टोणगा, इ॰ नांगर, गाडा, इ॰ कांस जुंपाया जोगा शिक्षित होणें; ५, न॰ बा॰ चोपणी.

पेटवण, न॰ अग्निपेटायाचें साधन जा गोंवर्याकाटक्या इ॰ तें; २, रा॰ अग्निपेटायासाठीं त्याजवर गोंवरीचे तुकडे, बारीक काटक्या, इ॰ जें रचून ठेवितात तें.

पेटा, पुं॰ राजकीय व्यवहारार्थ कोणेक मोठा गांव, किल्ला, यांस मुख्य करून त्यांचे संबंधाखालीं लाविला असतोजो आसपासचे गांवांच्या समुदाय तो त्यामुख्य ग्रामादिकासुद्धां; २, त्याचे पोटीं अवांतर भेद अनेक आहेत अशींजीं व्यवहार संबंधी भिन्नभिन्न प्रकरणें असतात तीं प्र॰; उ॰ हाखर्च घरखर्चाचे पेट्यांत लिहा; हामनुष्य त्यागृहस्थाचा पेट्यांतला इ॰ स्थलीं त्याहून पृथक् लेंकरून गणनीय नव्हे केवल तदीयत्वेंकरूनच गणनीय असा अर्थ; ३, वाघाचें जें पिलूं; ४, पेटें.

पेटारा, पु॰ वेळू, वेत, इ॰ कांचा पेटी सारखा जो मोठा करंड करितात तो.

पेटारी, स्त्री॰ कों॰ शेत इ॰ कांतील मातीउपसायाचें एक रूपासारिखें औत आहे; २, एक झाड आहे; ३, लहानजो पेटारा ती.

पेटी, स्त्री॰ बंदोबस्तानें रुपये इ॰ ठेवायाचें लांकडादिकाचें आच्छादनसहित एकपात्र आहे; २, एक भूषणावयव आहेत जा अनेक ओंवून गळ्यांत घालितात ती; ३, दंडावर बांधायाचें चतुष्कोण भूषण आहे; ४, फटाकड्याच्या माळा एकाकागदांत गुंडाळून जो पेटी सारिखा आकार करितात ती.

पेटूल, न॰ लहानजी काष्ठाची पेटी तीस ह्म॰.

पेटें, न॰ अनेक भोंपळे एकत्र बांधून नद्यादिकांत तरायाचें साधन करितात तें.

पेटेकरी, पु॰ माणसें पेटयावर बसवून नद्यादिकांतून नेणाराजो तो; २, पेटें आहे ज्यापाशीं तो.

पैंठ, स्त्री॰ देशोदेशाहून अनेक जिन्नस येउन जेथे त्यांची घडामोड होती किं॰ अनेकप्रकारची बहूत वस्त्रें जेथें निर्माण होउन देशोदेशीं जातात असें

असें जें अनेक उद्मी लोकांनी वसलेलें स्थल तीं; २, शहराचे जे अनेकविभाग ते म० जेथें प्रायः थोडाबहून बाजार असतो; ३, सावकार लोक पेंठोपेंठच्या जिनसाच्या भाव इ० बातमी देशांतरींच्या सावकारांस लिहून पाठवितात ती; ४, किल्याचे बाहेर जी शहरची वस्ती ती.

पेंठचलण, पेंठचलन, पेंठचलनी, पेंठचाल, पेंठचाली, ३ लिं० जा पेंठेंत जाणाऱ्याची चालआहे तें तेथे.

पेंठपाड, पु० पेंठेंतील जिनसा पानसाच्या जो भाव तो.

पेंड, स्त्री० तीळ, खोबरें, इ० कांतील तेल काढून घेउन जो चोथा राहतो ती; २, नारळाच्या किं० ताडफळांचा जो घडनी; ३, पु० नारळाच्याचव किं० निरगुंडीचापाला इ० कुटून तापवून हस्तपादादिक मोडला असतां किं० दुखवला असतां किं० उठाणू इ० झालें असतां त्याजवर बांधितात तो; ४, हजीर बिगारीनें अनुक्रमानें चालतआलें जें ओझें तो; ५, घराचे पादणीवर किं० ओमणावर जो दाटचिखलाचा लेप दिलाअसतो तो; ६, भिजलेले चिकट मातींतून चालले असतां पांयांस किं० ओड्यास जो मातीचा लेप बसतो तो; ७, कों० शेताचा बांध बांधाया इत्यार्थ जें मातीचें ढेप काढितात तो; ८, धान्यादि भिजून एकत्र गोळा झाला असतां त्यास म्ह०; पेंडटाकणें म्ह० नवें शेत करावयासाठीं योजिली जी भूमी तीढेंकळाचे परिधीनें चिन्हित करणें; मनुष्यादिकांचा पेंडवळणें म्ह० एकसमयावळी देंकरून अनेकमनुष्यादि दुखण्यांत पडणें; वा० पेंडवळणें म्ह० सावकार, सर्कार, इ० कानीं घरांतील सर्वमनुष्यें अडवून धरणें.

पेड, पु० दोरी, वेणी, यांचे पोटचे अनेक जे पदर ते म०; २, कों० स्त्री० न० आंतें, घरट, यांचे जे दोन अवयव असतात ते म०; ३, वा० न० सर्पाचें वारूळ, आजवर प्रायः देवालय बांधितात.

पेडका, पेडगा, पु० वायु, मोडशी, इ० विकृतीमुळें पांयांचे पोटर्या इ० कांत जो गोळा येतो तो.

पेंडका, पु० थोरजें पेंडकें तो.

पेंडकी, स्त्री० पेंडकें.

पेंडकें, न० गवत, कडबा, इ० कांचें जें लहानसें ओझें तें.

पेंडण, न० रा० मोदक, उंडे, इ० शिजवाया करितां त्यांस पाणी नलागावें म्हणून भांड्यांत कळकीचा पाचोळा इ० घालितात तें.

पेंडस, पु० रा० मुसळासारख्या दांड्यास लोखंडाची भाल मारून नेमखणायाचे उपयोगीं एक औत आहे.

पेंडसणें, न० कों० खणपटें.

पेंडा, पु० रा० वड, इ० कांचा पानाच्या किं० ओल्या गवताच्या जो भारा तो.

पेंडी, स्त्री० पेंढी.

पेंडूक, न० कों० पेंडकें.

पेंडें, न० मोत्यांचे अनेक सर एकत्र करून जें कंठभूषण करितात तें; २, दावें, दावण, यांस पशुंचा गळा बांधायाजोगा विरड्यानें युक्त जो अवयव असतो तें; ३, ला० कों० एकमताचा मनुष्यांचा किं०

किं० एक कुलोत्पन्न मनुष्यांचा जो समुदाय तें;४, कांहीं एक कार्यार्थ एकत्र जमला जो मनुष्य समुदाय तें; उ० पंच, वादी, साक्षीदार, असें सगळें पेंडेंचे पेंडेंच उठून आलें.

**पेढ**, न० स्त्री० कों० पोफळ, माड, यांचें जें झाड तें;२, स्त्री० निवडुंगाचें जें झाड ती; ३, पेड प्रथमद्वितीयार्थी.

**पेंढकी**, स्त्री० कों० पेंढकें.

**पेंढरा**, पु० एक झाड आहे.

**पेंढरी**, स्त्री० पेंटरा.

**पेंढरें**, न० पेंटरीचें जें फल तें.

**पेढा, पेडा**, पु० दुधाचा खवा करून आंत साखर इ० घालून जो गोळा करितात तो.

**पेंढा**, पु० भाताचें तृण, किं० त्याची पेंढी तो.

**पेंढार, पेंडार**, न० पेंढारी लोकांचा जो समुदाय तें.

**पेंढारी, पेंडारी**, पु० स्वार असतात, जे अनेक मिळून गांव, किं० देश, लुटितात ते प्र०.

**पेंढी**, स्त्री० तृण, कडबा, इ० कांचा अनेक व्यक्ति एकत्र बांधून जो आकार विशेष होतो ती; जळत्यांत पेंढी टाकणें, अ० कलह करणारांस अनेजन कांहीं देऊन कलह वाढिवणें.

**पेढी**, स्त्री० सराफ, हुंडीवाला, यांचें जें दुकान ती.

**पेणें**, न० मार्गस्थ जो कोणी त्याची प्रति दिवशीं भोजन, शय्या, इ० करावया साठीं मार्गी उतरून जी कांहीं काल स्थिति होते तें. किं० ती स्थिति करण्याचीं जीं स्थळें तीं प्र०.

**पेंद**, न० कों० तृणादिकांचा एका बीजापासून अनेक अंकुर फुटून जो विशिष्ट समुदाय होतो तें.

**पेंदारणें**, वा० तृणादिकानीं पेंद होई अशा प्रकारें विस्तृत होणें, किं० भूमीनें तृणादिकांच्या पेंदानीं युक्त होणें.

**पेंदी**, स्त्री० पेल्याची जी खालची बैठक ती;२, भोंपळ्याचे विण्याचा भोंपळ्यास जो काष्ठादिकांचा पदार्थ करितात तो ज्यांत तारांचीं अग्रें गुंतविलीं असतात.

**पेंधें**, न० गवतांत भेद आहे.

**पेंपेरें**, न० कों० पिपाणी.

**पेय**, ३ लिं० प्यावयास योग्य जें उदक, अंबील, इ० पदार्थ तो.

**पेर**, न० कों० बोर, ऊंस, वेळू, इ० कांचें जें कांडें तें; २ पु० भात इ० कांतील निर्दोष दाणा झडावा म्हणून, बैलांचे पायाखालीं मळायासाठीं, जें तृण पसरितात तो; ३, फुलें, धान्य, इ० कांची पडली जी पखळण तो; वस्त्रादिकांचा पेर घालणें. अ० मनस्वी गुधडणें असा अर्थ; ४, स्त्री० या० पेरूचें झाड; ५, न० पेरू.

**पेरकूट**, न० कों० निवडुंग.

**पेरण**, न० पेहरण.

**पेरणी**, स्त्री० भूमींत दाणा इ० चा पेरण्याचा जो व्यापार ती.

**पेरणें**, भूमीवर उगवायासाठीं बीं टाकणें; २, ला० स्वनिष्ठ विद्यादि गुण प्रसृत व्हावयासाठीं शिष्यादिकांस शिकविणें; ३, धनादिक व्याजाचे बोलीनें अनेकांस देउन ठेवणें; ४, न० पेहरण.

**पेरा**, पु० पेरणी.

**पेराव, पेरावा**, पु॰ हिं॰ जातिदेशादिभेदेंकरून मनुष्यांचा वस्त्रालंकार धारणकरण्याचा भिन्नभिन्न जो प्रकार आहे तो; २. क्वचित् पोषाकासही अ॰.

**पेरावणी**, स्त्री॰ वा॰ कोणेकास सत्कारार्थ दिलें जें वस्त्रालंकारादि ती; २, वस्त्रालंकारानें कोणेकाचा करितात जो सत्कार तो.

**पेरू**, पु॰ एक झाड आहे; २, त्याचें जें फल तो.

**पेरें**, न॰ वरू, ऊस, इ॰ कांचें जें कांडें तें; २, बोटाचे पेऱ्यास एक रोग होत असतो तें.

**पेलण**, न॰ पेलनें.

**पेलणें**, उ॰ मुद्गल, लेजीम, इ॰ शरीर दृढ व्हावयासाठीं हातीं धरून रुमाली, साधी, इ॰ चालीनें फिरविणें; २, ओझें, उभा केलेला स्तंभादिक, न पडूं देतां, किं॰ इतस्ततः न होऊं देतां संभाळून धरणें; ३, बुद्धि, धन, शरीर, यांचा बलानें तत्तद्योग्य संसारादि कार्य संभाळून धरणें; ४, घर, स्तंभ, इ॰ एक्या अंगावर कलणें.

**पेलनें**, न॰ कों॰ गृहावरील घातलेलें गवत, इ॰ न उडावें म्हणून वर जे वांसे, लांकडें, इ॰ घालितात तीं प्र॰.

**पेलवान्**, पु॰ कों॰ पहिलवान.

**पेला**, पु॰ धातु, कांच, मृत्तिका, यांचें आकार विशेषाचें एक पात्र आहे; २, वा॰ कांटया इ॰ कांचें जें ओझें तो.

**पेलाव**, पु॰ कों॰ शरीर शक्तीनें साध्य जें उडी मारणें, इ॰ काम तद्विषयीं शरीरांतील शक्ती तोलून पहाण्याचा जो प्रयत्न तो; २, तोलून पाहून नेटानें त्या कार्या विषयीं जी शरीराची उठावणी तो.

**पेलें**, न॰ कों॰ कुंपणाकरितां जें कांटयांचें ओझें आणीतात तें.

**पेंव**, न॰ जमीनींत धान्यादि ठेवाया करितां जी जागा करितात तें; भिकार, मुंग्या, इ॰ कांचें पेंव फुटणें, उघडणें, म्ह॰ त्यांचा त्यांचा अतिशय असा अर्थ.

**पेंवणी**, स्त्री॰ रा॰ नद्यादिकांचा ठायीं पोहून आण्याचा जो व्यापार ती, मार, धातु योगीं प्र॰.

**पेंवणें**, रा॰ उदकाचा ठायीं मनुष्य, काष्ठ, इ॰ कानीं तरणें.

**पेंवें**, न॰ एक ओषधी आहे.

**पेशा**, ३लिं दर्बार इ॰ कांचा ठायीं उत्तमलेंकरून प्रसिद्ध जो मनुष्य तो.

**पेशजीं**, अ॰ वर्त्तमान कालाचे पूर्वी, याचा व्यवहार कोणेकास पत्र लिहावयाचें असतां; उ॰ तुम्हास पेशजी पत्र पाठविलें होतें त्याचें उत्तर आलें.

**पेशवा**, पु॰ राजाचा जो मुख्य प्रधान तो.

**पेशवाई**, स्त्री॰ पेशव्याचा जो अधिकार, किं॰ कारकीर्द, किं॰ राज्य ती.

**पेशवाज, पेषवाज**, पु॰ कळवांतिणी नृत्यसमयीं जो झगा घालितात तो.

**पेशा**, पु॰ कारकूनपणा, शागीर्दपणा, चाकरपणा, इ॰ रूप जें नातें तो.

**पेषकबज, पेशकबज**, न॰ एक कटारी सारिखें शस्त्र आहे.

**पेषणूक**, स्त्री॰ कों॰ पिशाचास कांहीं देऊंकरून दुसऱ्यावर घालण्याचा जो व्यापार ती.

**पेस**, स्त्री॰ कों॰ भोंपळा, कांकडी, इ॰ कांची जी फांक ती.

**पेसकळी, पेषकळी**, स्त्री॰ अंगरख्यास जो लहान

न कळ्या असतात त्या प्र॰.

**पेसणें**, क्रि॰ काहीं नवस करून कोणेकास उपद्रव करण्याकरितां भूत उठविणें; २, रा॰ भोंपळा, कांकडी, इ॰ कांचा अनेक फांकी होत असें चिरणें.

**पेस्तरसाल**, न॰ पुढील जें वर्ष तें.

**पेहरण**, न॰ केवळ लहान मुलाचें आकारविशेषाचें जें अंगडें तें.

**पेहरणी**, स्त्री॰ कों॰ पेरणी.

**पेहरणें**, क्रि॰ पेरणें; २, न॰ पेहरण.

**पेहराव, पेहरावा**, पु॰ पेराव.

**पेहेरा**, पु॰ कों॰ पेरा.

**पेळ**, स्त्री॰ वा॰ अंगण, खळें, इ॰ कांचा कडेस किंचित् कंगोरा राखितात ती.

**पेळव**, स्त्री॰ कों॰ पेळू.

**पेळू**, स्त्री॰ कंब वळायाकरितां काथ्यास पीळ घालून ओवाती सारिखा आकार होतो ती.

**पेक्षां**, अ॰ जा अर्थानें अवधिलें करून कल्पून उत्कृष्टत्व, निकृष्टत्व, गौरत्व, मूर्खत्व, इ॰ गुण सांगायाचे आहेत तेव्हां त्या अवधिवाचकावरून याचा प्रयोग होतो; उ॰ यापेक्षां हा उत्कृष्ट इ॰ आणावे; जापेक्षां तुह्मीं आलां त्यापेक्षां वस्त्रू दिली पाहिजे इ॰ स्थलीं पेक्षां शब्दाचा अर्थ हेतुत्व होतो याअर्थीं जो तो या सर्वनामापुढें पक्षीं असें ही अव्यय लागतें; उ॰ जापक्षीं त्यापक्षीं.

**पैं**, अ॰ ग्रं॰ वाक्यालंकारार्थ.

**पैकडी**, स्त्री॰ रा॰ मोहऱ्याची जी पोळी ती.

**पैका**, पु॰ व्यावहारिक रुपये, मोहरा, इ॰ नाण्यांचा जो समुदाय तो; २, रुक्याचे चतुर्थांश प्रमाण जें द्रव्य तो.

**पैकाना**, पु॰ रा॰ गोव्यांतील शेण इ॰ निरपून काढायाचें साधन विरीचा किं॰ माडाचे पोईचा तुकडा असतो तो.

**पैकीं**, अ॰ काहीं पदार्थादिकांची विवक्षित समुदायांतर्गतत्वें करून किं॰ विवक्षित प्रकरण संबंधित्वें करून विवक्षा असतां तत्तत्समुदाय वाचक किं॰ प्रकरणवाचक शब्दांपुढें याचा प्रयोग; उ॰ शंभर रुपयांपैकीं दाहा रुपये राहिले, मामलतीपैकीं बाकी यावयाची आहे.

**पैकेकरी**, ३ लिं॰ पुष्कळ पैका आहे ज्याजपाशीं तो.

**पैकेपूर**, ३ लिं॰ पैकेकरी.

**पैकेवान**, ३ लिं॰ पैकेकरी.

**पैंगळ**, पु॰ रा॰ पिंगूळ.

**पैज**, स्त्री॰ कोणेकाशीं कांहीं एक कार्याविषयीं हें या या प्रकारें निश्चय होईल किं॰ मी करीन अन्यथा झाल्यास मीं अमुक द्रव्यादि देईन इ॰ रूप जी कोणेक प्रतिज्ञा करितो ती.

**पैजण**, पु॰ तोरडी.

**पैजार**, स्त्री॰ पायपोस.

**पैजारखाउ**, ३ लिं॰ खेटरखाउ.

**पैजारपगडी**, स्त्री॰ पैजारेचा डौलानें बांधिलें जें पागोटें ती.

**पैजेचा विडा**, पु॰ कांहीं एक दुर्घट काम करण्याविषयीं ज्यास अवसान असेल त्यानें करितां ह्मणून प्रवृत्त व्हावें अशा संकेतानें सभादिकांचा ठायीं मांडितात जो विडा तो.

**पैठणी**, ३ लिं॰ पैठण ह्मणून पेंठ आहे तत्संबंधी पागोटें इ॰

इ॰ तो; २, स्त्री॰ लुगड्यांत एक भेद आहे.

**पैठणी आदर**, पु॰ वरकर्मी जो आदर तो.

**पैण**, स्त्री॰ एक रोग आहे.

**पैरा**, पु॰ दिवसाचे बोलीनें कामासाठीं आणिला जो गडी तो.

**पैरें**, न॰ ग॰ मा॰ शेतकामास चार सा घटका दिवसा सयावें आणि सायंकाळचे चार घटिका दिवसा स घरीं जावें अशा बोलीनें जो पोर, बायको, इ॰ मजूर येतो तें.

**पैरेंपण**, न॰ पैर्यांस द्यावयाची मजूरी तें.

**पैल**, ३ लिं॰ पलीकडच्या तीर, थड, पार, इ॰ कांचें वि॰; उ॰ तो पैल तिरास नेईल.

**पैलाड**, स्त्री॰ पलीकडलें तीर.

**पैलीकडे**, अ॰ पलिकडे.

**पैलू**, पु॰ हिरा, माणीक, इ॰ कांस जे कोन पाडिले असता दोहों कोनांचे मध्यें सपाट प्रदेश पडतात ते प्र॰.

**पैवस्ती**, स्त्री॰ कोणेकस्थलापासून कागद आला असतां कालांतरीं हा अमुक दिवशीं आला हें समजावें ह्मणून तो समय त्या कागदावर मांडून ठेवितात ती; २, कांहीं एक दिवस कोणेक मनुष्याची कोणेक गावींच्या ठायीं जी वसती ती; ३, कोणेकाची कोणेकाचा गृहीं कांहीं दिवस चाललेली जी जाणें, येणें, इ॰ कांची वहिवाट ती.

**पैशाचिक**, ३ लिं॰ पिशाचसंबंधी जो उपद्रवादिक तो.

**पैशून्य**, न॰ प्रसिद्ध आली असतां अप्रतिष्ठा व्हावयाजोगा जो कोणेकाचा दुराचरणादिरूप दोष असतो तें.

**पैस**, ३ लिं॰ विवक्षित कार्यास पुरून उरायाजोगी प्रशस्त जी जागा तो; २, अ॰ दाटी, अडचण, नहोई असें; दूर होणें, करणें, बसणें, अक्षरादि लिहिणें, इ॰ कांचें वि॰.

**पैसा**, पु॰ तांब्याचें नाणें आहे; २, पैका प्रथमार्थी.

**पैसावणें**, उ॰ दाटीनें स्थित जे मनुष्यादि त्यांस पैस होत असें करणें.

**पैसेकरी**, ३ लिं॰ पैकेकरी.

**पोई**, स्त्री॰ मोठ्या नदीस जे लहान सहान ओहळ मिळाले असतात, नदीचें पाणी वाढलें असतां त्या ओहळांत जेथपर्यंत तुंबून जातें तितका त्या ओहळाचा प्रदेश ती; २, धर्मपोई; ३, रा॰ नारळाची पोगी.

**पोईड**, न॰ वा॰ पोई प्रथमार्थी.

**पोंक**, न॰ पोंग.

**पोंकटी**, स्त्री॰ केवल कोवळें जें पोंफळ ती.

**पोंकण**, न॰ कों॰ किडीनें धान्यांतील अंश खाऊन राहिला जो पोकळ दाणा तें; २, भाताचे शितास निंदेनें ल॰.

**पोंकणें**, कों॰ पोंकानें युक्त होणें.

**पोकळ**, ३ लिं॰ भरीव नव्हे तो; २, सईल; ३, ला॰ ज्यामध्यें विवक्षित अर्थांश किं॰ तेजोंश किं॰ लभ्यांश, इ॰ नाहीं असा जो उद्योग, भाषण, इ॰ तो; ४, दुसर्याचा दोष एकाएकीं नयावा अशा जा युक्ति किंवा यमक, प्रास, अर्थपुष्टता इ॰ जांत नाहीं असा जो ग्रंथ, भाषण, इ॰ तो; जें काम करायास किं॰ शिकायास बहुत आयास लागतात त्यास पोकळ नव्हे असें ल॰; ल॰ बडा घर आणि पोकळ वांसा.

**पोकळधोत्र्या**, पु॰ निंदेनें ब्राह्मणास ल॰.

**पोकळभट**, पु॰ पोकळघोऱ्या; २. जासवस्त्रपात्राविषयीं आधारशक्ति नाहीं असा जो ब्राह्मणत्यासम्र॰

**पोकळा**, पु॰ एकपालेभाजी आहे.

**पोकळापोकळी**, ३लिं॰ जामध्यें लभ्यांश इ॰ नाहीं असें भाषण व्यापार इ॰ तो.

**पोकळी**, स्त्री॰ पदार्थाच्या पोटीं जो पोकळपणा असतो ती.

**पोक्क**, ३लिं॰ मोट.

**पोक्का**, ३लिं॰ पोक्क.

**पोंक्या**, ३लिं॰ कुबडा.

**पोंख**, स्त्री॰ कों॰ वस्त्र, ग्राम, इ॰ कांची शेवटील जी टोकें तीं प्र॰.

**पोखर, पोंखर**, ३लिं॰ आंतील अंश पोंखरून काढिल्यामुळें पोकळ झाला जो काष्ठ, धान्य, इ॰ पदार्थ तो; २, पु॰ पोंखरून काढिलेला जो काष्ठादिकांतील चूर्णप्राय अंश तो.

**पोखरण**, स्त्री॰ पुष्करिणी.

**पोखरणें, पोंखरणें**, काष्ठ, धान्य, इ॰ पदार्थ आंतील अंश कोरून काढून पोकळ करणें.

**पोंग**, न॰ मनुष्याची पाठ, भिंत, भांडें, इ॰ कांस वांकून मध्यें येती जी वक्रता तें.

**पोंगणें**, कों॰ भांडें इ॰ क॰ पोंगानें युक्त होणें.

**पोंगा**, ३लिं॰ कों॰ ज्याचे पाठीस पोंग आहे तो.

**पोगाडा**, पु॰ कों॰ कांसाळ्याचा मोठा जो देंट तो.

**पोगी**, स्त्री॰ कों॰ नारळ, करमाड, इ॰ कांचें कणीस बाहेर पडतें ती.

**पोंग्या**, ३लिं॰ पोंगा.

**पोंच**, स्त्री॰ कों॰ पावती; २, पु॰ अमुक केलें असतां अमुक होईल इ॰ दूरचा तर्क करण्याविषयीं जें बुद्धीचें सामर्थ्य तो.

**पोचट, पोंचट**, ३लिं॰ आंत पोकळ असल्यामुळें ज्याचे अंगीं ताठपणा नाहीं हस्तादिकानें आंवळला असतां चिंबतो असा जो धान्य, तृण, इ॰ पदार्थ तो; उ॰ म्ह॰ बाभळीचा कांटा पुढें तिखट आणि मागें पोंचट; २, पोंचानें युक्त जें पात्रादि तो.

**पोचंडी**, स्त्री॰ पुरचुंडी.

**पोंचणें**, पावणें प्रथम चतुर्थार्थीं; तर्कास पोंचणें म्हणजे कांहीं एक चिन्हावरून एथें असें असें आहे असें जाणणें; खुणेस पोंचणें म्हणजे कोणे कानें केली जी नेत्रसंकेतानें खूण ती जाणणें.

**पोंचता**, ३लिं॰ पावता.

**पोंचलणें**, भांडें, अलंकार पोंचानें युक्त होणें.

**पोचा, पोंचा**, पु॰ धातुमय पात्रास, अलंकारास कांहीं आघातादि झाल्यामुळें पडती जी खळी तो.

**पोंची**, स्त्री॰ पोंहची.

**पोट**, न॰ उरापासून बस्तीपर्यंत जो शरीराचा भाग जामध्यें अन्नोदकादि किं॰ गर्भ राहतो तें; २, पदार्थमात्राचा आंतील जो गर्भांश किं॰ पोकळी तें; उ॰ या घागरीचें पोट मोटें आहे; याला कडाच्या पोटांत शिरलों नाहीं; ३, डोळ्याचे खालचे वरचे बाजूचा पापणीचे जवळचा फुगीर भाग तें; ४, व्यवहारादिक जो विशिष्ट अवयवी त्याचा अंगभूत अनेक अवांतर व्यवहारादिरूप अनेक अवयवांस व्यापून राहतो जो संबंध तें; उ॰ वरप्रस्थान, वाक्दान, इ॰ सर्व विवाहाचे पोटचीं

कर्में; संसाराचा खर्च सुटला ह्मणजे त्याचा पोटीं धडोती, धान्य, गवत, लांकडें, इ॰ खर्च येतात; ५, सदर ह्मणून जी बंदाची जागा तिला समार अंगुळभर जागा सोडून खालीकडील जी जागा जेथें पोटचारकमा इ॰ लिहितात तें; ६, पर्वत, भिंत, रांगोळी, इ॰ कांस मध्येंच वाढलेलाजो अवयव असतो तें; ७, यत्संबंधिलेंकरूनच जो पदार्थ किं॰ पदार्थसमुदाय कांहीं कार्यार्थ गणनीय आहे पृथक्‌त्वेंकरून गणनीय नाहीं त्याचा त्यांजवर जो संबंध तद्रूप जें अधिकरण तें; उ॰ यजमानाचा सत्कार झाला ह्मणजे त्याचे पोटीं आह्मीं आहों च; ८, क्षुधाशांत्यर्थ जें खर्चाचें प्रकरण त्यास ह्म॰; उ॰ पोटासाठीं चाकरी करितों एथें कांहीं मिळत नाहीं परंतु पोट बाहेर पडतें; ९, नदी, ओढा, इ॰ कांचा पात्रांत जल राहण्यास जो अवकाश असतो तें; पोटकरणें, वाढविणें, फुगविणें, ह्मणजे व्यभिचारानें गरव्हार होणें; पोटजाणें ह्मणजे ढाळ होणें; ह्म॰ हगलें नाहीं पोट गेलें; पोटजिरणें ह्मणजे वाढूं लागलेला गर्भ आंतलेआंत नाहींसा होणें; पोटपिकणें ह्म॰ पुत्र, कन्या, एतद्रूप संतति होणें; पोटजाळणें ह्म॰ दुसऱ्याचें द्रव्यादिहरण करून आपला स्वार्थ करून घेणें किं॰ करूं नयेतें करून पोटभरणें किं॰ निंदेनें जेवणास च ह्म॰; पोटभरणें ह्मणजे पोटापुरतें द्रव्यादि मिळणें; पोटपाडणें, झाडणें, ह्म॰ औषधादिकें करून पोटांतील गर्भ पाडणें; पोटदुखणें ह्मणजे पोटांत वेदना होणें ह्मणजे परोत्कर्षादि पाहून वाईट वाटणें; ह्म॰ खरचणारानें खरचतें आणि कोठवळ्याचें पोट दुखतें; पोट पाताळास जाणें किं॰ पाठीस लागणें ह्म॰ अन्नाद्यभावामुळें पोटास खळी पडणें; पोटीं असणें ह्म॰ संतति असणें असा अर्थ; पोटावर मारणें ह्म॰ सेवकादिकांस द्यावयाचें जें द्रव्य त्यांत कांहीं कमी करणें; पोटाआड येणें, पोटावर उठणें, पोटावर येणें ह्म॰ कोणेकाचें पोटिस्य बुडविणें, पोट बांधून चाकरी, काम, इ॰ करणें ह्म॰ पोटास यथास्थित न खातां किं॰ जाचें काम करितो त्याजपासून पोटासही न घेतां करणें; पोटमारणें, जिरविणें, ह्म॰ गोमहिष्यादिकांनीं आपला दिसूं लागलाजो गव्हारपणा तो न दिसे असें करणें; पोटांत शिरणें ह्म॰ कोणेकाचा चित्ताभिप्राय ओळखावा इत्याद्यर्थ केवल त्याचा आपल्यावर विश्वास होई असें आर्जवादि द्वारा करणें; पोटाशीं धरणें ह्म॰ कोणेकास ममतेनें आपला सामानणें; अपराधादि पोटीं घालणें ह्म॰ क्षमा करणें; वा॰ पोट धरणें ह्म॰ हगवण बंद होणें; पोटफुटणें ह्म॰ कांहीं एक व्यवहारांत गुप्त राखलीजी गोष्ट ती उघड होणें; कोणेकाचे पोटावर पाय देणें ह्म॰ जेणें करून पोट चालतें अशी वृत्ति, चाकरी, इ॰ त्याचे नाशाविषयीं निमित्तभूत होणें.

**पोटकटार**, स्त्री॰ मरायासाठीं आपले हातानें कटारीनें पोट फोडून घेण्याचा जो व्यापार ती.

**पोटकरपी**, स्त्री॰ स्त्रियांस शिवी आहे.

**पोटकरीण**, स्त्री॰ व्यभिचारानें जी गरव्हार आली ती.

**पोटकली, पोटकुली, पोटकुळी**, स्त्री॰ कडोस्त्री; २, पोट प्रथमार्थीं, प्रायः निंदावृत्ति.

**पोटकूळ**, पु॰ पोटप्रथमार्थी निंदावृत्ति.

**पोटखराबा**, पु॰ कों॰ आगवड जमीनीच्या पोटीं जी ओसाड खराब जमीन असती ती.

**पोटखर्च**, पु॰ भोजनसंबंधी जो खर्च तो.

**पोटखर्ची**, स्त्री॰ पोटखर्चासाठीं घेतलेलें अंइ्यादि ती.

**पोटगडी**, पु॰ आंगगडी.

**पोटगी**, स्त्री॰ पोटखर्ची; २, पोट भरायाचें साधन जें वतन, वृत्ति, इ॰ कांहीं कोणाचें असतें त्यास ह्म॰.

**पोटगें**, न॰ रा॰ पोटगी.

**पोटघडी**, स्त्री॰ गन्हवारपणाचें चिन्ह दाखवायें ह्मणून पोटावर जी वस्त्राची घडी बांधितात ती.

**पोटघर**, न॰ सोंकट्याचे पटास जा घरांच्या तीन ओळी असतात त्यांतील मधल्या ओळीचें शेवटलें जें घर तें.

**पोटचा**, ३ लिं॰ ज्याचा वीर्यशोणितांपासून झालें जें अपत्य तें त्या मातापितरांचें तो; २, व्यवहारादिकांचें पूर्वी सांगितलें जें पोट तत्संबंधी खर्च, रकम, बेरीज इ॰ तो.

**पोटआळ**, पु॰ पोटचा पुत्रादिकांचा नाश झाला असतां जो शोक होतो त्यास ह्म॰; ह्म॰ पाठआळ अपेक्षां पोटआळ अधीक.

**पोटझाकणें**, न॰ विवाहामध्यें स्तनमुखसमयीं वरमाईनें वधूचे आईस एक लुगडें द्यावयाचा मान आहे तें लुगडें.

**पोटफुगी**, स्त्री॰ जेणेंकरून पोट फुगतें असा एक रोग आहे ती; २, ३ लिं॰ व्यभिचारानें गर्भिणि झाली जी स्त्री ती.

**पोटफूग**, स्त्री॰ कांहीं एक गोष्ट कोणाजवळ बोलावी अशी इच्छा होउन बोलावयास न सांपडतां कांहीं काळ गेल्यामुळें जी उत्कंठित दशा जाहाली असती ती; पोटफूग झाडणें ह्मणजे बोलायाचें बोलून ती उत्कंठा शमविणें.

**पोटफोड**, स्त्री॰ कांहीं एक व्यवहारादिकांतील गुप्तांशाची जी प्रसिद्धि ती.

**पोटबांधणें**, न॰ लहान मुलाचें किं॰ बाळंतिणीचें पोट बांधायाचें जें वस्त्र तें.

**पोटबाबू**, पु॰ पुरवानंद.

**पोटभर**, अ॰ पोट भरे असें जेवणें, अन्नादि पर्याप्त होणें, इ॰ कानें वि॰; २, ला॰ इच्छा तृप्त होई असें; उ॰ तुह्मांशीं मनांतून पोटभर बोलावयाचें आहे; ३, कर्तृशक्ति, भोक्तृशक्ति, यांस पर्याप्त होई असें; उ॰ हें काम मला पोटभर आहे; शेतास पोटभर पाणी मिळालें ह्मणजे असें पाहिजे तसें पिकतें.

**पोटभरणा**, स्त्री॰ रा॰ अन्नादिकानें पोटाची भरती; उ॰ गुरांची पोटभरणा होत चालली ह्मणजे दूध वाढवितील.

**पोटभरू**, पु॰ पुरवानंद; २, पोट भरायाच्या उद्देशानें जो प्रवासास गेला तो; ३, ज्यामध्यें रुच्यादि गुण असोत नसो परंतु ज्यांत भक्ष्यांश बहुत अ तएव ज्याचा भक्षणीं पोट भरतें असा जो फलादि पदार्थ तो.

**पोटभर्या**, ३ लिं॰ पोटबाबू.

**पोटमांडणी**, स्त्री॰ कों॰ गृहादिकांचीं पाखीं न

द्वावी ह्मणून आधारार्थ पारव्याचे प्रायः मध्य प्रदेशीं अनेकस्तंभांवर लग्यासांधून विशिष्टउ भेंकरितात तें.

**पोटमारा**, पु॰ पोटाचीजी आबाळ तो.

**पोटह्मातारा**, ३लिं॰ पोटाचे आबाळीमुळें ह्माताऱ्यासारिखा अशक्त झाला तो.

**पोटरी, पोटरी**, स्त्री॰ पायाचे नडगीचे मागलाजो प्रदेश ती; २, वा॰ उजाण्या हाताचा मणगटापासून कोंपरापर्यंत जोभाग ती; ३, धान्य, तृण, यांचें बाहेरपडायाचे दशेस आलेंजें कणीस, कणशी, तुरा, इ॰ ती; धान्य इ॰ पोटरीस येणें ह्मणजे त्या दशेस येणें असा अर्थ.

**पोटसूळ**, पु॰ पोटांत एकरोग होतो तो.

**पोटस्थ**, न॰ पोटिस्थ.

**पोटळणें**, कों॰ पोटाळणें प्रथमार्थीं.

**पोटळी**, दे॰ स्त्री॰ पुरचुंडी.

**पोटा**, पु॰ गव्हांत जाति आहे, २, स्त्री॰ जास्त्रीस दाढीमिशी इ॰ पुरुषचिन्हें आहेत ती.

**पोटाग**, स्त्री॰ कांहींएक कार्य करण्याविषयीं कोणेकास चिंतापासून जो अगत्यवाद ती.

**पोटाचाचाकर**, पु॰ पोट भरावें ह्मणून जो चाकरी, इ॰ उद्योग करितो तो.

**पोटाचापाईक**, पु॰ पोटाचाचाकर.

**पोटारा**, था॰ ३लिं॰ ज्याचे पोटाची आकृति साधारण असून आंत बहुत पदार्थ मावतो असाजो पदार्थ तो.

**पोटाळणें**, गोमहिष्यादि स्त्रीनें आंतील गर्भ वाढू लागल्यामुळें पोटाचे वृद्धीनें विशिष्ट होणें; २, मनुष्य, वृक्ष, इ॰ कांस पोटाशीं कवळून धरणें.

**पोटाळा, पोटळा**, पु॰ पोटाचा बाहेर पडतो जो कोथळा तो.

**पोटिस्थ**, न॰ निर्वाहसाधन जें वृत्त्यादि तें.

**पोट्या**, पुं॰ कों॰ पोटा प्रथमार्थीं.

**पोंढ**, पु॰ कों॰ चोंडें कुजत घालावयासाठीं खाजणांत जी खळी खणितात तो; २, आगर शिंपायासाठीं जे दांडे करितात त्यांत पाणी राहावें ह्मणून जी खळी खणितात तो.

**पोंढळणें**, कों॰ उपोषणादि कारणामुळें डोळे खोलजाणें; २, माड, पोफळ, इ॰ रुखवणीचीं झाडें उपटून दुसरे ठिकाणी लावणें.

**पोंढी**, स्त्री॰ कों॰ मानेचा मागले बाजूची जी खळी ती.

**पोत**, पु॰ एकावर एक चिरगुटें गुंडाळून जो मशालीसारिखा पदार्थ भुत्या हातीं घेतो तो; २, विडीबांधून जी मशाल तो; ३, दांडा वर्ज करून जो रवण किं॰ त्यांचा अंश तो; ४, स्त्री॰ पु॰ कांचेचे किं॰ स्वर्णाचे आंत बारीक मण्यांचाजो समुदाय ती, प्रायः अनेकवचनांत प्र॰; ५, स्त्री॰ पु॰ पोंत; ६, पु॰ गां॰ स्त्रियांचें कंठभूषण आहे; ७, पु॰ न॰ सूत विणल्यानें सिद्ध आलेंजें वस्त्राचें शरीर तो तें.

**पोंत**, ३लिं॰ कांहींएक शरीरांतील रोग निघून जावा ह्मणून हस्तपादादिकांस भाजून किं॰ विद्या, इ॰ लावून जो व्रण करून घेतात तो ती तें.

**पोतडी**, स्त्री॰ मोतीं, हिरा, यांचीजी पुरचुंडी किं॰ पिशवी ती; २, सोनार, सराफ, यांचाजो तत्तद्व्यवहारोपयोगि सामग्री ठेवायाचा बटवा असतो ती.

**पोतडें**, न॰ पोतडी द्वितीयार्थी.

**पोतदार**, पु॰ सर्कारांत आलेले रुपये इ॰ नाणें पारखून घ्यावयाचा अधिकारी तो.

**पोतदारी**, स्त्री॰ पोतदाराचा जो अधिकार ती.

**पोतनिशी**, स्त्री॰ पोतनिसाचा जो अधिकार ती.

**पोतनीस**, पु॰ सर्कारचे पोत्यावर जो अधिकारी ठेविला असतो तो.

**पोतां**, अ॰ सर्कारच्या पोत्याकडे.

**पोतें**, न॰ धान्यादि भरून आणावयाचे उपयोगीं पडेल, इ॰ कांचा जो थैला करितात तें; २, सर्कारी द्रव्य ठेवण्याचें जें अधिकरण तें.

**पोतेरें**, न॰ गृहादिकांतील भूमी, भिंत, इ॰ शेणमातीनें सारवाया करितां जो वस्त्रादिकांचा बोळा घेतात तें; २, तेणेंकरून जें सारवण तें; वस्त्र, इ॰ दिकांचें पोतेरें करणें ह्मणजे मळवून, गुधडून, टाकणें; कोणेकास पोतेरें करून टाकणें ह्मणजे मानपान घावयाचे योग्यतेचा असतां ते मानपान इ॰ न देतां तुच्छ करून मानणें.

**पोथा**, पु॰ रा॰ शेण, विष्ठा, यांचा जो पोहो तो; २, ज्याचे अंगीं कांहीं श्रम करण्याविषयीं त्वरा नाहीं आणि शरीर वातूळ त्यास ह्म॰.

**पोथी**, स्त्री॰ पुस्तक.

**पोथीपाठ**, ३ लिं॰ पोथीवरून लवकर वाचून ह्मणायाजोगा पाठ येतो जो ग्रंथ तो.

**पोथीपुस्तक**, न॰ पोथी, वही, इ॰ तें.

**पोंद**, न॰ वा॰ पायाच्या आंतला किं॰ बाहेरला जो तलप्रदेश तें.

**पोंधा**, अ॰ रा॰ वायां

**पोंधा**, ३ लिं॰ शरीरानें पुष्टदिसून ज्याचे अंगीं शक्ति नाहीं तो.

**पोपट**, पु॰ कीर.

**पोपटपंडित**, पु॰ दुसऱ्यापाशीं पूर्वपक्षादि पाठ करून घेउन पांडित्य मिरवायाकरितां सभादिकांचा ठायीं पुढेंपुढें होउन बोलतो त्यास ह्म॰.

**पोपटी**, स्त्री॰ कबडींत एक भेद आहे; २, कों॰ वाल इ॰ कांचा शेंगा भाजून खावयासाठीं सिद्ध करिताती ती.

**पोपडा**, पु॰ सारवलेली जमीन, भाकरी, शरीर, इ॰ कांवरील त्वचेसारिखा किं॰ त्वचारूप अंश निघतो तो.

**पोपया**, पु॰ एक झाड आहे; २, त्याचें जें फल तो.

**पोपली**, स्त्री॰ वा॰ लहानशी भाकरी ती.

**पोपी**, स्त्री॰ केवल लाहानशी भाकर ती, परंतु मुलांचे भाषेंत प्र॰.

**पोंपेरें**, न॰ पेंपेरें.

**पोफळ**, स्त्री॰ सुपारीचें झाड ती; २, न॰ तिचें जें फल तें.

**पोबारा**, पु॰ पबारा.

**पोम**, न॰ अंगीं विद्या, तप, इ॰ नसतां अतिरिक्त दिसायाजोगा जो डौल बाह्यत्कारीं करितात तें.

**पोय**, स्त्री॰ कों॰ पोगी; २, पोई.

**पोयकर**, ३ लिं॰ कों॰ प्रथमतः ज्यास पोय आली असा जो माड तो.

**पोयें**, न॰ रा॰ भूमीचे बिळांत किं॰ दगड, लांकुड, यांचे संधीस एक जातीचा माशा आहेत त्या मोहळ करित असतात तें.

पोर, न॰ मुलगें प्र॰ तीनलिंगी, प्रा॰ निंदावृत्ति; २, पश्वादिकांचा अपत्यासही हीसंज्ञा आहे; ३, न॰ तारुण्यावस्थेस आलेलानाहीं असा अल्प वयस्क जो मनुष्य, पशु, वृक्ष, इ॰ प्राणी इ॰ तें.

पोरका, ३लिं॰ भव्य, गंभीर, प्रौढ, इ॰ दिसायाजोगें नव्हेअसें भाषण, वस्त्र, अलंकार, इ॰ तो; २, ज्यास कोणी आई,बाप, इ॰ नाहीं त्यास ल॰; ३, केवल मातृहीनासही ल॰

पोरकिडा, पु॰ एक क्षुद्र कीटक आहे.

पोरखेळ, पु॰ पोरांचा विटी दांडू इ॰ खेळण्याचा जो व्यापार तो; २, पोरासारिखें हांसणें, उड्यामारणें, इ॰ व्यापार तो; ३, घेणें, देणें, इ॰ व्यवहारांचा मर्यादासोडून मनस्वीजें वर्त्तन तो

पोरगा, पु॰ पोर; २, खिसमतगार जो पोर ठेवितात त्यास ल॰; ३., जा पुरुषास नाचाया करितां स्त्रीचा वेष देतात त्यास ल॰.

पोरचेष्टा, स्त्री॰ पोरखेळ प्रथमार्थावांचून.

पोरटा, ३लिं॰ पोरकाद्वितीयार्थी.

पोरवडा, पु॰ गृह, ग्राम, इ॰ कांमध्यें किं॰ राज्यादि कारभारामध्यें कोणी प्रौढ मनुष्य नाहींसा झाल्यामुळें होतेंजें पोरांचें प्राधान्य तो.

पोरा, पु॰ रा॰ पोरकिडा; २, ३लिं॰ लावल्यावांचून आपल्या आपण उगवलेंजें झाड तो.

पोरांडी, स्त्री॰ पोरवडा.

पोरांडें, न॰ रा॰ पोरवडा.

पोरापोरका, ३लिं॰ पोरकाद्वितीयार्थक जो त्यास ल॰.

पोर्णिमा, स्त्री॰ पूर्णिमेचा अपभ्रंश

पोर्या, पु॰ पोरगा द्वितीय तृतीयार्थी; २, कों॰ पोरकिडा.

पोल, न॰ फोल.

पोलकट, ३लिं॰ कों॰ किंचित्पोलानें युक्त जो धान्यसमुदाय तो; २, वा॰ बीजरहित जो अंबा, फणस, इ॰ तो.

पोलट, ३लिं॰ वा॰ पोलकट प्रथमार्थी.

पोलाद, न॰ तिखें.

पोलादी, ३लिं॰ पोलादाचें जें शस्त्रादि तो.

पोल्हारा, पु॰ स्त्रियांचे पायांचे बोटांत घालायाचें भूषण आहे.

पोव, पु॰ रा॰ पोहो.

पोवटी, स्त्री॰ रा॰ पोहटी.

पोवणी, स्त्री॰ कों॰ नद्यादिकांचाठायीं मनुष्यादिकानें गमन करण्याचा जो व्यापार ती.

पोँवणें, कों॰ पोहणें; २, तरंगणें मुख्यार्थी.

पोँवतीपूर्णिमा, स्त्री॰ श्रावणी पूर्णिमा.

पोँवतें, न॰ श्रावण मासीं पोर्णिमादि तिथींचा ठायीं जानव्यासारिखा सुताचा दोरा देवादिकांस अर्पितात व आपणही घालितात तें.

पोँवरी, स्त्री॰ पांवा.

पोवली, स्त्री॰ वा॰ सुपारीचीजी विरी ती.

पोँवळपाटली, स्त्री॰ पोंवळीं सोन्यानें बांधून स्त्रियांचें एक हस्त भूषण करितात ती.

पोँवळा, ३लिं॰ पोंवळ्याचे रंगासारिखा जो रंग तो; २, तद्विशिष्ट गाय बैल, इ॰ तो; ल॰ दवळ्याजवळ बांधिला पोंवळा वाण नाहीं पण गूण लागला.

पोँवळ, पोंवळी, स्त्री॰ देवालयादिकांचा भोंवताली

जी भिंत असती ती.

पोंवळीं, पोंवळें, न० एकमणी आहे.

पोंवा, पु० पांवा; २, कों० सर्पाचें पिलूं.

पोंवाडा, पु० पंवाडा.

पोंवाणी, पोंवाळी, स्त्री० कों० पोंयणी.

पोशा, पु० दत्या; २, ३लिं० शरीरानें पुष्ट असून तादृश ज्याचे अंगीं सामर्थ्य नाहीं तो.

पोशाक, पोशाख, पोषाग, पु० शोभार्थ जीं अंगावर घ्यावयाचीं वस्त्रें शेला, पागोटें, इ० तो; पोशाख करणें ह्मणजे तीं वस्त्रें धारण करणें.

पोशाखी, पोषागी, ३लिं० पोशाखाचे मात्र उपयोगीं तादृश टिकाउ नव्हे असें जें पागोटें, इ० तो; २, ला० पाहण्यामध्यें रूबेरख डौलदार दिसून ज्यामध्यें तादृश सामर्थ्यादि नाहीं असें मनुष्य, भांडें, वस्त्र, इ० त्यास ह्म०.

पोशिंदा, पु० गुणी लोक, शिपाई, घोडे, इ० कांचें प्रीतिपूर्वक इतमामाप्रमाणें पालन करणारा तो.

पोंशेर, पु० कमळणीमध्यें एक जाति आहे.

पोषक, ३लिं० जो ज्याचा पोषण कर्ता तो त्याचा.

पोषण, न० भक्षणादि पदार्थ ज्याचे जीवनास पाहिजे तितका देउन कोणेकाचें जें रक्षण तें.

पोषणें, कोणेकाचें पोषण करणें.

पोषाक, पु० पोशाख.

पोष्या, ३लिं० दत्तक; २, आपल्यास पोसायाचें सामर्थ्य नाहीं ह्मणून पोसायाकरितां दुसऱ्याचे स्वाधीन केलें जें गुरूं इ० तो.

पोष्य, ३लिं० ज्यानें ज्यानें अवश्य पोषण केलें पाहिजे तो पुत्र, स्त्री, इ० त्याचा; २, आपले यजमान इ० कांस पत्र लिहावयाचें असतां आपलें नाम एतद्विशेषणपूर्वक लिहितात.

पोष्यवर्ग, पु० पोष्य जे पुत्रादि त्यांचा जो समुदाय तो.

पोसगा, ३लिं० गा० दत्तक.

पोसणें, पोषणें; २, पुष्ट होणें.

पोस्त, न० शिमग्यांतील रखेळे लोकांपासून द्रव्य मिळवून भोजनादि समारंभ करितात तें; २, तदर्थ जें लोकांपासून द्रव्य घेतात तें; ३, कों० काम करी, इ० कांस कामाबद्दल जें द्रव्य द्यावयाचें तें देउन श्रमपरिहारार्थ मद्यादि प्राशनार्थ अधिक जें द्रव्यादि देतात तें; ४, श्रमपरिहारार्थ प्राशितात जें मद्य तें; ५, शाईत काजळ घोटाया करितां जें फडकें घेतात तें किं० शाई न वोळतां, न सुकतां, टिकावी ह्मणून दौतींत जो चिरगूट इ० कांचा बोळा घालितात तें.

पोस्ती, ३लिं० पोशा द्वितीयार्थीं; २, मद्यपी.

पोस्त्या, ३लिं० पोस्ती.

पोंहची, स्त्री० पुरुषांचे मनगटास बांधावयाचें सुवर्णाचें किं० जडावाचें भूषण असतें ती.

पोहटी, स्त्री० लहान जो पोहो ती.

पोहणी, ३लिं० नद्यादिकांचा ठायीं पोहाया जोगें जें पाणी तो.

पोहणीस घालणें, गोमहिष्यादि पशूंस पोहायासाठीं नद्यादिकांत घालणें.

पोहणें, हातापायांनीं पाणी तोडून नद्यादिकांचा ठायीं तरणें किं० तरून गमन करणें; तो शास्त्रामध्यें किं० कांहीं एक व्यवहारामध्यें पोहतो

आहे इ॰ स्थलीं त्या त्या विषयामध्यें परिपूर्ण होत्सा ता त्यांतच निरंतर वर्ततो आहे असा अर्थ.

पोहा, पु॰ साळीवर उन पाणी घालून मृदु झाल्यानंतर भाजून कुटिले असतां जो चापट दाणा निघतो तो.

पोहो, पु॰ गाय, म्हैस, इ॰ कांचा एक वेळ हगलेल्या विष्ठेचा गोळा तो.

पोहोंच, पोहंच, पु॰ कुळापासून सावकार इ॰ कास पावले जें द्रव्यादिक तो; २, पोंच द्वितीयार्थी.

पोहोंचणें, पोंहचणें, पोंचणें.

पोहोंचता, ३लिं॰ पावता.

पोहोटी, स्त्री॰ पोहटी.

पोहोडी, स्त्री॰ कों॰ खाडीचा जो लहान फांटा असतो ती.

पोहोरा, पोहरा, पु॰ विहिरींतून पाणी काढायाचें एक पात्र आहे.

पोळ, पु॰ पितरादिकांचा उद्देशानें जो बैल डागानें त्रिशूळादि चिन्हयुक्त करून सोडिला असतो तो; २, वृथापुष्ट मनुष्यास ल॰.

पोळणें, अग्नि, सूर्य, किरण, तिखट, इ॰ कानें शरीर, जिव्हा, वेधनायुक्त होणें; २, ला॰ कांहींएक व्यवहारापासून कांहीं काल संस्कार राहायाजोग्या दुःखातें अनुभविणें, तत्सदृश कार्यांतर उपस्थित असतां प्र॰; उ॰ तुह्मी रुपये मागतां पण मी पोळलों आहे; ३, कांहींएक शोकानें व्यथित होणें.

पोळपट, पोळपाट, पु॰ पोळी लाटायाचा जो लांकडाचा वाटोळा पाट तो.

पोळा, पु॰ श्रावणाची किं॰ भाद्रपदाची जी अमावास्या त्या दिवशीं बैलांचे शिंगांस काव इ॰ लावून त्या आ[?]

आकरितात व त्यांस मिरवितात; २, गांधिणीमाशांचें किं॰ मधुमक्षिकांचें जें घर किं॰ मुंगळे साडावर अनेकपानें एकत्र करून जें घर करितात तो; ३, दाढ भाजली असतां जो मध्यें मध्यें भाजल्यावांचून अंश राहतो तो; ४, गृहादि जळत असतां त्यांतून जो प्रज्वलित तृणादि समुदाय वायूनें उडतो तो.

पोळी, स्त्री॰ भाकरीच्या आकाराची कणीक, उडद, इ॰ लाटून भाजून करितात ती; २, आळित्यानें कापूस भिजवून जी भाकरीच्या आकारासारिखी करितात ती; ३, मोहोळांत भाकरीच्या आकाराचें जें मक्षिकेचें घर ती; पोळी पिकणें ह्मणजे कांहीं दिवस खायास मिळाया जोगा योग प्राप्त होणें; ल॰ आचीखायाची पोळी त्याची वाजवायाची टाळी; ४, रा॰ गलकंबल.

पोळीतुकडा, पु॰ पोळी इ॰ पक्वान्न तो.

पौ, पु॰ पव.

पौगंड, न॰ सं॰ मनुष्याची पांच वर्षांपासून जी वयोवस्था तें.

पौंची, स्त्री॰ पोहची.

पौत्र, पु॰ सं॰ पुत्राचा पुत्र.

पौत्री, स्त्री॰ सं॰ पुत्राची कन्या ती.

पौनःपुन्य, न॰ सं॰ कांहींएक गोष्टीचा पुनःपुनः करण्याचा जो प्रकार तें.

पौबारा, पु॰ पवबारा.

पौर, ३लिं॰ सं॰ पुरसंबंधी जे जन इ॰ तो.

पौराणिक, पु॰ सं॰ पुराणीक.

पौरुष, ३लिं॰ सं॰ पराक्रम; २, पुरुषसंबंधी जें कर्म इ॰ तो.

**पौरोहित्य**, न॰ सं॰ पुरोहितपणा.

**पौर्णमासी**, स्त्री॰ सं॰ पूर्णिमा.

**पौर्णिमा**, स्त्री॰ पूर्णिमेचा अपभ्रंश.

**पौर्वापर्य**, न॰ सं॰ पूर्वापर कांहीं एक क्रमाच्या ठायीं अमुकपूर्व अमुकअपर असावा असाजो परस्परांचा संबंध तें.

**पौष**, पु॰ सं॰ दाहावा जो महिना तो.

**पौषी**, ३लिं॰ सं॰ पौषसंबंधी जीतिथि ती.

**पौष्टिक**, ३लिं॰ सं॰ धातूपुष्टकरणारें जें रसायन इ॰ तो; संपत्ति, आयुष्य, इ॰ कांची वृद्धि व्हावी म्हणून जें होमादिकर्म करितात तो.

**प्याजी**, ३लिं॰ एकरंग आहे; २, तद्विशिष्ट जें वस्त्र तो.

**प्यादा**, पु॰ पायानें चालणारा जो शिपाई तो; २, बुदबळांत मोहर्या यांवांचून जें बुदबळ तो.

**प्यादाजवादा**, पु॰ प्यादा इ॰ शिपाई.

**प्यादी**, स्त्री॰ बुदबळांतील प्याद्यानें केलीजी मात ती.

**प्यादें**, न॰ बुदबळांतील जो प्यादा तें.

**प्यादेमात**, स्त्री॰ प्यादी.

**प्यार**, हिं॰ स्त्री॰ प्रीति.

**प्यारा**, ३लिं॰ हिं॰ प्रिय.

**प्याला**, पु॰ پیاله पेला.

**प्यास**, स्त्री॰ पु॰ हिं॰ बहुतजी तहान ती तो.

**प्याहा**, पु॰ उदररोगांतील भेद आहे.

**प्र**, अ॰ हा उपसर्ग ज्याचे मागें लागतो त्यात्या पदार्थांचा प्रकर्ष बोधितो; उ॰ प्रकृष्टजो कंप तो प्रकंप प्रकृष्ट जो यत्न तो प्रयत्न इ॰ जाणावे.

**प्रकट**, ३लिं॰ सं॰ गुप्तदशा सोडून सर्वांस विदित व्हावया जोगा झाला तो.

**प्रकटणें**, उ॰ प्रकट करणें.

**प्रकटित**, ३लिं॰ सं॰ प्रगटित केला जो तो.

**प्रकरण**, न॰ सं॰ कांहींएक साध्यविषयाचे किं॰ प्रकाराचे भेदानें भिन्नभिन्न जे अनेक व्यवहार ते प्र॰ ज्याचे पोटीं एकविषयत्वें करून परस्पर संगत असे व्यापार अनेक असतात तें; उ॰ राज्यकारभाराचें प्रकरण निराळें, आणि सावकारी उदीम व्यापार वगैरे प्रकरणें निराळीं; २, कथनीयविषयांचा भेदानीं भिन्नभिन्न जे ग्रंथ विभाग केले असतात ते प्र॰ तें; ३, जो व्यवहारास कर्त्ताकरण इ॰ अनेक साहित्यें लागतात त्यासाहित्यास हितजो तो व्यवहार तें; उ॰ पंचाइतीचें प्रकरण येथें आलें, ४, विद्या, कुल, जाति, गुण, मत, इ॰ कें करून एकरूपत्वें करून विवक्षित जे मनुष्यादि त्यांचा जो समुदाय तें; ५, सामान्यकोटींमध्यें परिगणनीय नव्हे असाजो मनुष्यादि त्यास म्ह॰ प्रकरणपठित, प्रकरणसंगति, इ॰ स॰ जाणावे.

**प्रकर्ष**, पु॰ सं॰ उत्कर्ष.

**प्रकार**, पु॰ सं॰ सर्वपदार्थांचें भिन्नभिन्नत्वें करून ज्ञान होण्यास त्यात्या पदार्थांचे ठाईं भेदक जो धर्मविशेष असतो जो तत्तत्पदार्थविशेष्यक ज्ञानाच्या ठायीं विशेषणत्वें करून भासतो तो; २, प्रकारभेदानें भिन्नभिन्न जे पदार्थ ते प्र॰; उ॰ दोनचार प्रकारचीं वस्त्रें घेतुं नये, घरांत चार प्रकार असले म्ह॰ उपयोगी पडतात.

**प्रकाश**, पु॰ सं॰ उजेड.

**प्रकाशक**, ३ लिं॰ प्रकाश करणारा सूर्य, दीप, इ॰ तो; २, काहींएक पदार्थातें अंगुलिनिर्देश, उपदेश, इ॰ द्वारा दाखिवणारा किं॰ समजाविणारा तो.

**प्रकाशणें, प्रकाशिणें**, उ॰ सूर्यादिकानीं प्रकाश द्वारा कांहींपदार्थ दिसे असा करणें किं॰ सूर्यादि तेजोरूप पदार्थानीं स्फुरद्रूप होणें; २, गुप्तजो विषयतो प्रसिद्धीस आणणें; उ॰ हें योगशास्त्र कपिलाचार्ययानीं प्रकाशिलें.

**प्रकाशित**, ३ लिं॰ सं॰ प्रकाशलाकिं॰ प्रकाशिलातो.

**प्रकाश्य**, ३ लिं॰ सं॰ प्रकाशकानें प्रकाशावयास जो योग्य तो.

**प्रकृत**, ३ लिं॰ सं॰ याकालीं वक्ता, कर्ता, इ॰ कांस विवक्षितजो विषय, इ॰ तो; २, स्त्री॰ प्रकृति शब्दाचा अपभ्रंश.

**प्रकृति**, स्त्री॰ सं॰ आदिमाया; २, जासमवायिकारणापासून जें कार्य उत्पन्न होतें त्या कार्याचीती; ३, पदार्थमात्राचा जो मूलस्वभाव ती; ४, जा नामापुढें किं॰ धातूपुढें प्रत्ययहोतो त्या शब्दामध्यें जो नामांश किं॰ धात्वंशती; ५, कांहींएक व्यवहाराचा सामान्यतः चाललेलाजो प्रकार ती; ६, एक छंद आहे.

**प्रकृतिविकृतिभाव**, पु॰ प्रकृति आणि विकृति यांचाजो परस्पर संबंध तो

**प्रकृतिस्वभाव**, पु॰ शरीरादिकांचा प्रकृतिरूप जो स्वभाव तो.

**प्रकृष्ट**, ३ लिं॰ सं॰ उत्कृष्ट.

**प्रकोप**, पु॰ सं॰ वात, पित्त, धातु, इ॰ कांचा जो क्षोभ तो.

**प्रक्रिया**, स्त्री॰ सं॰ कांहींएक कार्याची याप्रकारें करावें अशीजी कृति असती ती; २, प्रकृतीपुढें प्रत्यय द्वित्वादि विकार इ॰ रूप व्याकरणांत उक्त जी शब्दसिद्ध करण्याची कृति ती; ३, संधि, लोप, इ॰ संस्कार व्हावयाच्या पूर्वींची जी शब्दाची दशा ती.

**प्रखर**, ३ लिं॰ सं॰ अतितीव्र शस्त्र, अग्नि, इ॰ तो.

**प्रख्या**, स्त्री॰ प्रसिद्धि.

**प्रख्यात**, ३ लिं॰ सं॰ प्रसिद्ध.

**प्रगट**, ३ लिं॰ प्रकटाचा अपभ्रंश.

**प्रगटणें**, प्रकटणें.

**प्रगणा**, पु॰ परगणा.

**प्रगल्भ**, ३ लिं॰ सं॰ प्रौढजो मनुष्य किं॰ भाषण तो.

**प्रगाथ**, पु॰ या॰ प्रघात.

**प्रघट्टक**, न॰ कोणेक अर्थातें अधिकृत करून त्याचा विचार करूंलागलें असतां अनेक शंका समाधानें, हेतु, प्रमाणोपन्यास, इ॰ कें करून त्या अधिकृत विषयाचा उपसंहार होई पर्यंत विस्तरले असतात जे ग्रंथाचे किं॰ भाषणाचे विभाग ते प्र॰.

**प्रघात**, पु॰ परिपाठ.

**प्रचंड**, ३ लिं॰ सं॰ क्रोध, पराक्रम, विद्या, बल, इ॰ गुणानें जो भारी तो.

**प्रचार**, पु॰ सं॰ प्रघात.

**प्रचीत**, स्त्री॰ प्रतीति.

प्रचुर, ३ लिं० सं० पुष्कळ.

प्रच्छन्न, ३ लिं० सं० गुप्त.

प्रच्छादणें, आच्छादणें.

प्रच्छादन, न० सं० आच्छादन.

प्रजा, स्त्री० सं० जाराजास करभार देउन त्याचे राज्यांत राहतात ती त्याची; २, संतति; म्ह० यथा राजा तथा प्रजा.

प्रजापति, पु० सं० ब्रह्मदेव; २, शिश्नास म्ह०.

प्रजोत्पत्ति, स्त्री० सं० पुत्रादिरूप संततीची उत्पत्ति ती.

प्रजोत्पादन, न० सं० मैथुनद्वारा पुत्रादि संततीचें जें जनन ती.

प्रज्वलन, न० सं० अग्नि पेटविण्याचा व्यापार तें; २, तेणेंकरून होतो जो पेटलेपणा तें.

प्रज्वलित, ३ लिं० ज्वालायुक्त झालेला जो अग्नि तो किं० काष्ठादि तो.

प्रणत, ३ लिं० सं० नम्र; २, कोणेकानें आपल्यावर कृपा करावी म्हणून नमस्कारादिकें करून दिसे असा विनय धरिला आहे जाणें तो.

प्रणति, स्त्री० सं० नमून जो नमस्कार ती.

प्रणय, पु० सं० प्रीति.

प्रणयकोप, पु० सं० आपल्या प्रीतीचा मनुष्यावर त्यानें आपली समजूत करावी अशा बुद्धीनें जो कोप तो.

प्रणाम, पु० सं० नमस्कार.

प्रणालिका, स्त्री० परिनाळिका.

प्रणिपात, पु० नमस्कार.

प्रणीत, ३ लिं० सं० ज्यानें रचिला जो शास्त्रादि ग्रंथ तो तत्प्रणीत.

प्रत, स्त्री० कांहींएक ग्रंथाचें पुस्तकरूप जें स्वरूप ती; उ० भागवताची प्रत आल्यास पाहिजे; २, आलेखावरून लेखांतर करितात किं० वाचून कांहीं कर्मादि करितात तो पुस्तकादि लेख किं० त्याजवरून लिहिलें जें पुस्तकादि ती; ३, चित्रादि पाहून त्यासारखेंच दुसरें चित्रादि करितात त्यास म्ह०; ४, मासला; ५, उत्कृष्ट, मध्यम, निकृष्ट, इ० अनेक पक्षाश्रयणें करून कांहीं पदार्थांचे कांहीं विधिविषयीं केले जे अनेक विभाग ते प्र०; उ० आंब्याचा चार प्रती केल्या आहेत जसे पाहिजे तसे आहेत; ६, शिष्टांस दक्षिणा द्यावयाची जी उत्तम प्रत ती; ७, अ० कांहींएक जातीचा पोटचा जा अनेक व्यक्ति त्यांचा ठायीं कांहींएक विधीची समानरूपें व्याप्ति होई असें; उ० घरास प्रत पांच पांच रुपये दिले; ८, गमन व्यापारानें प्राप्य जें स्थलादिक त्यापुढें किं० वचनानें कांहींएक अर्थ जाणवायाचा तद्वाचकापुढें तत्त्कारकता बोधकयाचा प्रयोग होतो; उ० ते ग्रामाप्रत गेले आहेत; शुक परीक्षितीप्रत सांगताहेत.

प्रतवार, ३ लिं० समुदायाचे पोटचे अनेक प्रतीचे जे अवयव ते त्या त्या प्रतीप्रमाणें लावून ठेवणें इ० कांचें वि०.

प्रताप, पु० सं० पराक्रम; २, शत्रु, रोग, इ० कांचे निर्दलनाविषयीं चालायाजोगा जो मनुष्य, औषध, इ० कांच्या ठायीं सामर्थ्यविशेष असतो तो.

**प्रतापलंकेश्वर**, पु॰ सं॰ एक मात्रा आहे.

**प्रतापी**, ३ लिं॰ सं॰ मोठ्या प्रतापाचा जो पुरुष, औषध, इ॰ तो.

**प्रतारक**, ३ लिं॰ सं॰ प्रतारणा करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**प्रतारणा**, स्त्री॰ सं॰ वास्तविकाश कपटानें आच्छादून कोणेकास ठकिवण्याचा जो व्यापार ती.

**प्रतारणें**, ठकविणें.

**प्रतारित**, ३ लिं॰ सं॰ प्रतारिलागेला जो तो.

**प्रति**. स्त्री॰ सं॰ अ॰ प्रत, परंतु समान विध्यर्थ जे व्हां याचा प्रयोग कराव्याचा तेव्हां तत्तज्जाति वाचकाचा मागें होतो आणि प्रत शब्दाचा पुढें इतका विशेष; उ॰ प्रतिगृहास पांच पांच रुपये दिले; २, हा उपसर्ग ज्या शब्दाचे मागें लागतो तेथें तद्रूपच परंतु दुसरा असा विशिष्टाचा अर्थ होतो; उ॰ तो ब्राह्मण प्रति सूर्य आहे; ३, पूर्वी जें कांहीं झालें तद्विलोम प्रकारें अशा अर्थाचा द्योतक तत्तच्छब्दाचे मागें याचा प्र॰ होतो; उ॰ दान आणि प्रतिदान म्ह॰ ज्यानें दान दिलें त्यास जें उलट दान.

**प्रतिकूल**, **प्रतिकूळ**, ३ लिं॰ सं॰ अनुकूलाचा प्रतिपक्षी; २, न॰ विवाहादि मंगल कार्याचा निश्चय झाल्यानंतर कोणी सपिंड मरण पावला असतां तेणेंकरून सूचित जी त्या कार्यास अशुभता तें.

**प्रतिक्रिया**, स्त्री॰ आपणास उद्देशून कोणेकानें बरी किं॰ वाईट क्रिया केली म्हणून आपण त्यातें उद्देशून तत्सदृश जी क्रिया करितो किं॰ ज्या क्रियेपासून जें कांहीं एक फल झालें तन्निरसनार्थ जें क्रियांतर ती.

**प्रतिगृहीत**, ३ लिं॰ सं॰ प्रतिग्रह केला ज्याचा तो पदार्थ.

**प्रतिग्रह**, पु॰ सं॰ दुसऱ्यानें दिलेल्या दानाचा जो अंगीकार तो.

**प्रतिग्राहक**, ३ लिं॰ सं॰ प्रतिग्राही.

**प्रतिग्राही**, ३ लिं॰ सं॰ प्रतिग्रह करणारा तो.

**प्रतिग्राह्य**, ३ लिं॰ सं॰ प्रतिग्रह करण्यास जें दान तो.

**प्रतिघात**, पु॰ सं॰ कांहीं पदार्थावर कांहीं पदार्थ वेगानें आपटला असतां विपरीत वेग उत्पन्न व्हावया जोगा जो त्याजवर तडाखा बसतो तो.

**प्रतिच्छाया**, स्त्री॰ पडसावली; २, प्रतिबिंब.

**प्रतिदान**, न॰ सं॰ कोणेकापासून कांहीं पदार्थ घेउन त्याबद्दल त्यास पदार्थांतर देण्याचा जो व्यापार तें.

**प्रतिध्वनि**, पु॰ सं॰ भेरी इ॰ कांचा ध्वनीपासून गुहा इ॰ कांचा ठायीं जो दुसरा ध्वनि उठतो तो.

**प्रतिनाद**, पु॰ सं॰ प्रतिध्वनि.

**प्रतिनादित**, ३ लिं॰ प्रतिनादानें जो युक्त तो.

**प्रतिनिधि**, पु॰ जो पदार्थ ज्या कार्यास पाहिजे त्याचा अभावीं शास्त्रादिकांचा ठायीं तत्स्वरूपच मानिलें जें पदार्थांतर तो; २, राजानें जें कार्य करावयाचें तें त्याचा अभावीं करावयाचे योग्यतेचा जो राजानें अधिकारी करून ठेविला असतो.

प्रतिपत्, प्रतिपदा, स्त्री० पक्षाचे प्रारंभाची पहिली तिथि.

प्रतिपदोक्त, ३ लिं० सं० शास्त्रादिकांच्या ठायीं तदर्थ शब्द स्पष्ट जाचें विधान केलें आहे तो विध्यादि अर्थ तो.

प्रतिपक्ष, पु० सं० वादप्रतिवादामध्यें जे दोन पक्ष ते परस्परें; २, प्रतिपक्षी.

प्रतिपक्षी, पु० सं० विरुद्ध उपयपक्षाश्रित जे ते परस्पर.

प्रतिपादक, ३ लिं० सं० कांहीं एक विषयाचें प्रतिपादन करणारा तो.

प्रतिपादणें, कांहीं एक अर्थ साक्षि, लेखादि प्रमाणानें खरा करून देणें; २, कांहीं एक पदार्थ कोणे कास स्वत्व निवृत्तिपूर्वक देणें.

प्रतिपादन, न० कोणेक पक्षाचें दोष निरास करून जें स्थापन तें; २, दान करण्याचा व्यापार.

प्रतिपाल, प्रतिपाळ, पु० सं० अन्नवस्त्रादि द्वारा जें संरक्षण तो.

प्रतिपालन, न० सं० प्रतिपाल.

प्रतिपालित, ३ लिं० सं० प्रतिपाल केला आहे ज्याचा तो.

प्रतिपाळणें, प्रतिपालित करणें.

प्रतिप्रसव, पु० सं० कांहीं कार्याचा सामान्यतः केलेला जो निषेध त्याचा पुनः कांहीं विशेषांशीं केला जो विधि तो.

प्रतिबंदी, स्त्री० प्रतिबंधाचा अपभ्रंश.

प्रतिबंध, पु० कांहीं एक कार्य होण्याविषयीं किं० कोणे कास गमनादि व्यापारीं स्वच्छंदें वागण्याविषयीं शास्त्राज्ञा, राजाज्ञा. इ० कृत असतो जो अवरोध तो.

प्रतिबंधक, ३ लिं० सं० प्रतिबंध करणारा तो; २, न० प्रतिबंध जेणें करून होतो तें.

प्रतिबद्ध, ३ लिं० सं० प्रतिबंध जाला आहे ज्यास तो.

प्रतिबिंब, न० सं० जलादिकांचा ठायीं कांहीं एक पदार्थाचें जें स्वरूपांतर दिसतें तें.

प्रतिबिंबणें, कांहीं एक पदार्थ काचादिकांचा ठायीं प्रतिबिंब रूपें करून दृश्य होणें.

प्रतिबिंबित, ३ लिं० सं० प्रतिबिंबला जो तो.

प्रतिभू, पु० जामीन मुख्यार्थी.

प्रतिमा, स्त्री० सं० धातुपाषाण, इ० कांची केली जी मूर्ति ती; हा आणि तो एक्या प्रतिमेचे इ० स्थलीं एके प्रतीचे असा अर्थ; त्याची प्रतिमा त्यास येणार नाहीं येथें उपमा येणार नाहीं असा अर्थ.

प्रतिरोध, पु० सं० चाललेला व्यवहार पदार्थयाचा गतीस प्रतिबंध झाल्यामुळें होतो जो रोध तो.

प्रतिरोधक, ३ लिं० सं० प्रतिरोध करणारा तो.

प्रतिलोम, ३ लिं० सं० अनुलोमाचा प्रतिपक्षी तो.

प्रतिवचन, न० सं० कोणी प्रश्नादि रूप केलेल्या भाषणावर उत्तरादि रूप जें भाषण तें.

प्रतिवादी, पु० सं० एका वादानें स्वमताचा उपन्यास केल्यावर त्याजवर उत्तरादि भाषण करितो जो वादी तो.

**प्रतिवार्षिक**, ३ लिं० प्रतिवर्षी करायाचें किं० व्हायाचें जें कर्म तें.

**प्रतिशब्द**, पु० सं० प्रतिध्वनि.

**प्रतिषिद्ध**, ३ लिं० सं० शास्त्रादिवचनानें जो निषिद्ध तो.

**प्रतिषेध**, पु० सं० निषेध.

**प्रतिषेधणें**, निषेधणें.

**प्रतिष्ठा**, स्त्री० सं० लोकानीं श्रेष्ठत्वें करून मानायास कारणीभूत जें विद्यादिसद्गुणामुळें कोणेकाच्या ठायीं महत्त्व असतें तें; २, कोणेक अधिकारावर मनुष्याचें किं० देवालयादिकांत नवीन देवमूर्तीचें जें स्थापन तें; ३, कोणेकस्थलीं कोणेकाची जी स्थिति ती.

**प्रतिष्ठापन**, न० सं० प्रतिष्ठा द्वितीयार्थीं.

**प्रतिष्ठावस्त्र**, न० सं० सभा, राजदर्बार, इ० स्थलीं प्रतिष्ठेनें घेउन आवयाचे उपयोगीं जें शालजोडी, शेला, इ० उंचवस्त्र त्यास म्ह०.

**प्रतिष्ठित**, ३ लिं० सं० प्रथमार्थक प्रतिष्ठेनें युक्त जो तो; २, अधिकार, देवालय, इ० कांच्या ठायीं स्थापित झाला जो मनुष्य, देव, इ० तो.

**प्रतिस्पर्धा**, स्त्री० सं० कोणेकाबरोबर जी स्पर्धा ती.

**प्रतिस्पर्धी**, ३ लिं० सं० प्रतिस्पर्धा करणारा तो.

**प्रतिहत**, ३ लिं० सं० कांहींएक प्रतिबंधकामुळें अग्रिमकार्याविषयीं ज्याची गति कुंठित झाली तो.

**प्रतिज्ञा**, स्त्री० सं० अमुकगोष्ट अमुकरीतीनेंच घडेल किं० मी अमुकच करीन किं० मीं अमुक करीनच इ० रूप कोणेकानें केला जो निश्चय ती.

**प्रतिज्ञात**, ३ लिं० सं० ज्याविषयीं प्रतिज्ञा केली तो विषय तो.

**प्रतीक**, न० सं० व्याख्या करावयाकरितां मूलग्रंथाचें जें पदादिक तें; २, वाद्याचे भाषणांतील खरा करून घ्यावा किं० खंडून घ्यावा इ० यर्थ घेतला जो दुसर्यावाद्यानें कांहीं अंश तें; ३, वाद्यानें दुसर्या वाद्यावर अवश्य निर्वाह करायाजोगें जें दोषादि आणिलें तें.

**प्रतीकार**, पु० सं० प्रतिक्रिया.

**प्रतीच्य**, ३ लिं० जो ज्याशीं गुणादिकें करून तुल्य तो त्याचा.

**प्रतीची**, स्त्री० सं० पश्चिमदिशा.

**प्रतीत**, ३ लिं० प्रतीति आली आहे ज्याची तो; २, स्त्री० प्रतीति.

**प्रतीति**, स्त्री० सं० शब्दादिद्वारा जें विदित गुणादिक त्याचा सेवनादिकें करून तदनुरूप आला जो अनुभव ती; उ० या औषधाची मला प्रतीति आली आहे; या देवाची मोटी प्रतीति आहे इ० स्थलीं प्रतीति यावया जोगें देवत्वादि आहे असा अर्थ; २, शब्दादिक जें ज्ञापक त्यापासून अंतःकरणाच्या ठायीं कांहींएकआकारात्मक होतें जें ज्ञान ती; उ० या श्लोकापासून तुलीं बोलता या अर्थाची प्रतीति होत नाहीं; भेर्यादिशब्दांच्या ठायीं वर्णांची प्रतीति नाहीं.

**प्रतीप**, न० काव्यांत एक अलंकार आहे.

**प्रतीयमान**, ३ लिं० सं० प्रतीतिविषय होतो जो तो.

**प्रतीहार**, पु० सं० राजादिद्वाराच्या ठायीं जो द्वारपाल

असतो तो.

**प्रतीहारी**, पु॰ प्रतीहार;२,स्त्री॰ अंतःपुराचे द्वारावर अधिकृत जी स्त्री असती ती.

**प्रतोद**, पुं॰ सं॰ अश्वादिकांस माराया चाजो चाबूक;२, छायेवरून कालसाधन करण्याचे उपयोगीं सोटयासारिखें यंत्र आहे.

**प्रत्यय**, पु॰ सं॰ प्रतीति प्रथमार्थी;२, नाम,धातूंच्या संबंधानें अर्थविशेषवाचक जे शब्दविशेष व्याकरणांत सांगीतले आहेत जांचा स्वातंत्र्येंकरून लोकामध्यें प्रयोग होतनाहींत ते प्र॰.

**प्रत्यवाय**, पु॰ सं॰ जें अवश्य करावें तें नकेल्यामुळें किं॰ नकरावें तें केल्यामुळें जो दोष लागतो तो; २, पदार्थ,किं॰क्रियायांच्या ठायीं सेवनी, करणी, पाप लागाया जोगा जो दोष असतो तो.

**प्रत्यवायी**, ३ लिं॰ सं॰ प्रत्यवाय लागला आहे जासतो मनुष्य तो.

**प्रत्यहीं**, अ॰ प्रतिदिवशीं.

**प्रत्यक्ष**, अ॰ सं॰ परोक्षाचा प्रतिपक्षी;२, साक्षात्;३, न॰ चक्षुरादि इंद्रियानें रूपादिविषयाची जीगोचरतातें; उ॰ शब्दाचें प्रत्यक्ष श्रोत्रेंद्रियांवांचून होतनाहीं; स्म॰ प्रत्यक्षास प्रमाण कशास पाहिजे.

**प्रत्यक्षता**, स्त्री॰ समक्षता.

**प्रत्यक्षदर्शी**, ३ लिं॰ सं॰ कांहीं एक गोष्टीचा अनुभव जाणें घेतला तो.

**प्रत्यक्षसिद्ध**, ३ लिं॰ प्रत्यक्षानें अनुभव झाला आहे ज्याचा तो.

**प्रत्याख्यात**, ३ लिं॰ प्रत्याख्यान झालें आहे ज्याचें तो.

**प्रत्याख्यान**, न॰ सं॰ निराकरण.

**प्रत्याम्नाय**, पु॰ सं॰ मुख्यत्वेंकरून जें प्रायश्चित्तादिकर्म सांगीतलें आहे तें तसें नघडे तर द्रव्यदान किं॰ इतर कांहीं अनुष्ठान सांगितलें आहे तो त्यात्या प्रायश्चित्तादि कर्मांचा.

**प्रत्यासत्ति**, स्त्री॰ सं॰ कोणेकाचा कोणेकाशीं जो सामीप्य संबंध ती; उ॰ हालुच्या आहे याची प्रत्यासत्ति इतकी कामाची नाही.

**प्रत्यासत्तिन्याय**, पु॰ कांहीं एक वाक्याच्या ठायीं अनुक्त अर्थ जो साकांक्ष पदांचा शक्तीमुळें अन्वित व्हावयाचा तो त्या प्रकरणांत वाक्यांतराच्या ठायीं जो उपस्थित तोच अन्वित व्हावा इतर नव्हावा अशा अर्थाविषयीं उपस्थितांचाच अन्वय होतो अशा लोकवाक्याचा दृष्टांत.

**प्रत्याहार**, पु॰ सं॰ योगबलेंकरून सर्व इंद्रियांचें विषयांपासून जें परावर्तन.

**प्रत्युत**, अ॰ सं॰ उलट आणखी; उ॰ तुम्ही हें असें करतां याणें पुण्य लागणार नाहीं प्रत्युत पाप लागेल.

**प्रत्युत्तर**, न॰ प्रतिवचन.

**प्रत्युत्थान**, न॰ वाद किं॰ युद्ध यामध्ये एकानें केलीजी उत्थिति तिजवर प्रतिपक्षी जी उत्थिति करितो तें.

**प्रत्युद्गमन**, न॰ सं॰ कोणी शिष्ट आपल्याकडे येतो असें समजलें असतां आदरार्थ जें अभिमुख गमन करितात तें

**प्रत्युपकार**, पु॰ सं॰ दुसर्यानें आपल्यावर केला उपकार फिटावा म्हणून त्याजवर जो करितात

उपकार तो.

**प्रत्युपस्थान**, न॰ आपले पराजयार्थ उत्थित किं॰ आपला पराजय जाणें केला आहे असा जो कोणी तसरि भयार्थ आपली जी उत्थिति तें.

**प्रत्यूष**, न॰सं॰ प्रातःकाल.

**प्रत्येक**, अ॰ समुदायांतर्गत सर्वव्यक्तींचा विधीवर पृथक् पृथक् अन्वय होईअसें; २, ३लिं॰ विवक्षित विधीचा ज्यां पृथक् पृथक् अन्वय होण्याविषयीं विवक्षित जा समुदायांतर्गत व्यक्ति ते.

**प्रथम**, ३लिं॰सं॰ पहिला; २, अ॰ पहिल्यानें.

**प्रथमचरण**, पु॰सं॰ कांहीं एक कार्याची जी केवल आरंभावस्था तीस म्ह॰.

**प्रथमतः**, अ॰सं॰ पहिल्यानें.

**प्रथमदर्शनीं**, अ॰ कांहीं कार्याचा आरंभसमयीं.

**प्रथमदिवस**, पु॰ प्रथमचरण; उ॰ इतके दिवस वाद सांगतो परंतु आजून प्रथमदिवस आहे.

**प्रथमपुरुष**, पु॰सं॰ संस्कृत व्याकरणामध्यें मी,तूं, एतदतिरिक्त कर्ता किं॰ कर्मरूप जो अर्थ तद्वाचक धातूवरून होतो जो प्रत्यय जेणें करून क्रियापद होतें तो; २, प्राकृतांत कर्तृरूप किं॰ कर्मरूप क्रियापदांचा प्रत्ययाशीं समानाधिकरण जो मी त्या शब्दाचा अर्थ तो प्रत्यय.

**प्रथमा**, स्त्री॰सं॰ पहिली विभक्ति, जी क्रियापदाचे अर्थाशीं समानाधिकरण जें कारक

त्याची

त्याची आणि संबोधनाची बोधक होती ती.

**प्रथमारंभ**, सं॰पु॰ मुख्यारंभ.

**प्रथा**, स्त्री॰ प्रघात; २, प्रसिद्धि.

**प्रथित**, ३लिं॰सं॰ प्रसिद्ध.

**प्रदर**, पु॰सं॰ स्त्रियांस निरंतर रजस्राव होतो असा एक रोग आहे.

**प्रदर्शिवणें**, दर्शिवणें.

**प्रदक्षिण**, अ॰सं॰ पूर्व, आग्नेयी, दक्षिण, या क्रमानें दिशा धरून गमनादि क्रियांचें वि॰; उ॰ उजवा हात पुढें करून भिंगरी फिरविली असतां प्रदक्षिण फिरती.

**प्रदक्षिणा**, स्त्री॰सं॰ देव, ब्राह्मण, इ॰ कांस उजव्या हाताकडे करून त्यांचे भोंवतालें एकवेळ फिरण्याचा जो व्यापार ती; म्ह॰ लक्षप्रदक्षिणा आणि पैसा दक्षिणा.

**प्रदाता**, ३लिं॰सं॰ दाता परंतु याचा प्रयोग प्रा॰ समासीं होतो; उ॰ विद्याप्रदाता, धनप्रदाता, इ॰ जाणावे.

**प्रदान**, न॰सं॰ दान याचा समासींच प्रा॰प्र॰; उ॰ विद्याप्रदान, गालिप्रदान, इ॰

**प्रदीप्त**, ३लिं॰सं॰ प्रज्वलित.

**प्रदेश**, पु॰सं॰ कांहीं पदार्थाचा किं॰ दिशेचा संबंधानें परिछिन्न जो देश तो.

**प्रदेशिनी**, स्त्री॰सं॰ तर्जनी.

**प्रदोष**, पु॰सं॰ रात्रीचा जो केवल प्रारंभसमय तो; २, त्रयोदशीस नक्तव्रत करून प्रदोषसमयीं शिवपूजा करण्याचें व्रत आहे तो; ३, चतुर्थी, सप्तमी, आणि त्रयोदशी, या पूर्वरात्रींत

पड

पडल्या असतां अनध्याय सांगितला आहे तो.

**प्रधान**, पु॰ सं॰ राजकारभार करणारे जे अमात्य, सचिव, मंत्री, इ॰ जे राजांचे हस्तक ते प्र॰; २, न॰ प्रपंचोत्पत्तिविषयीं मुख्यत्वेंकरून कारणभूत जें मायास्वरूप तें; ३, ३लिं॰ मुख्य.

**प्रपंच**, पु॰ सं॰ ईश्वरमायेपासून जीवानीं मरावें, उत्पन्न व्हावें, अनेक सुखदुःखादि भोगावीं, इ॰ रूप जो व्यवहार उत्पन्न झाला तो; २, मनुष्यादिकांचा बायका, मुलें, घर, शेत, इ॰ क जो खटला तो; ३, कांहीं देणें, वाढणें, सांगणें, इ॰ क्रियांचा ठायीं एकास एक्या प्रकारचें, एकास एका प्रकारचें, एकास चांगलें, एकास वाईट, कांहीं एकास वगळून, कांहीं एकास च घावें, इ॰ भेद करण्याचा जो प्रकार तो; ४, कोणेकाशीं कोणेकानें केलीजी प्रतारणा तो; ५, ग्रंथ, पुरुष, इ॰ कांचा व्याख्या, संतति, इ॰ रूपेंकरून झाला जो विस्तार तो.

**प्रपद**, न॰ सं॰ चवडा.

**प्रपा**, स्त्री॰ सं॰ निर्जलमार्गादिकांचा ठायीं कोणी सत्पुरुष येणारा जाणारास पाणी प्यावयासाठीं एकस्थल बांधितात जामध्यें चांगलें गार पाणी भरून ठेविलें असतें ती.

**प्रपादणें**, प्रतिपादणें प्रथमार्थी, एथे प्रायः आग्रहपूर्वकता दिसती.

**प्रपिता**, पु॰ पपिता; २, पितामहास प्रसंगविशेषीं ल॰; उ॰ एवढ्या मोठ्या मोठ्या गोष्टी कशास सांगतोस मी तुझ्या पित्यास भिणार नाहीं, प्रपित्यास भिणार नाहीं.

**प्रपितामह**, पु॰ सं॰ पितामहाचा बाप तो.

**प्रपितामही**, सं॰ स्त्री॰ पितामहाची आई.

**प्रपौत्र**, पु॰ सं॰ पौत्राचा जो पुत्र तो.

**प्रपौत्री**, स्त्री॰ सं॰ पौत्राचीजी कन्या ती.

**प्रफुल्ल**, ३लिं॰ सं॰ चांगलें विकसित झालें जें पुष्प, मुख, इ॰ तो; २, तद्विशिष्ट वृक्ष.

**प्रफुल्लित**, ३लिं॰ सं॰ प्रफुल्ल.

**प्रबंध**, पु॰ सं॰ गाण्यांतील एक चीज आहे; २, श्लोकादिकांची जी रचना तो.

**प्रबल**, **प्रबळ**, ३लिं॰ सं॰ अतिशयित बलवान्.

**प्रबुद्ध**, ३लिं॰ सं॰ लेंकुरपणा जाउन प्रौढ दशा पावला तो; २, निद्रा जाउन जागृति दशा किं॰ प्रपंचादिरूप अज्ञान जाउन आत्मज्ञान पावला तो; ३, अतिशयित जो बुद्धिमान् तो.

**प्रबोध**, पु॰ सं॰ निद्रा, माया, इ॰ संबंधी मोहाचें पटल अंतःकरणावर पडल्यामुळें प्रापंचिक किं॰ पारमार्थिक विषय यथार्थपणें नसमजाया जोगा आला असतो जो नेणतेपणा तो जाउन जागृत्यादिरूप येतो जो अंगीं जाणतेपणा तो; उ॰ धृतराष्ट्रास बहुत उपदेश उद्धवानें केला परंतु प्रबोध झाला नाहीं.

**प्रबोधित**, ३लिं॰ सं॰ कोणेकानें प्रबोध केला आहे जास तो.

**प्रबोधिनी**, स्त्री॰ सं॰ कार्तिक शुद्ध ११

**प्रबोधोत्सव**, पु॰ सं॰ कार्तिक शुद्ध द्वादशीस श्रीविष्णूस जागृत करण्याविषयीं कांहीं कर्म सांगीतलें आहे तो.

**प्रभंजन**, पु॰ सं॰ वायु परंतु मोटा वेगवान् जो वायु त्याविषयीं लोकांत प्र॰.

**प्रभव**, पु॰ सं॰ प्रथमजो संवत्सर तो; २, जा पदार्थापासून आपदार्थाची उत्पत्ति झाली तो त्याचा किं॰ जेथे जो पदार्थ प्रथमतः दृष्टीस पडूं लागला तें स्थल त्याचा; उ॰ वस्त्राचा प्रभव कार्पास, भागीरथीचा प्रभव हिमालय, इ॰ जाणावीं; ३, कोणेकपदार्थापासून कोणेकपदार्थाची जी उत्पत्ति तो.

**प्रभा**, स्त्री॰ सं॰ कांति; २, सूर्यादि तेजाच्या उपाधीमुळें जी पदार्थाची छायापडती ती.

**प्रभाकर**, पु॰ सं॰ सूर्य.

**प्रभागजाति**, स्त्री॰ सं॰ पदार्थाची कांहींएक संख्या सांगून त्याचा अमुक अंश, त्या अंशाचा अमुक अंश, इ॰ हिशेब करण्याचा प्रकार सांगितला आहे ती.

**प्रभात**, न॰ सं॰ सूर्योदयाच्या पूर्वींचा कांहीं प्रकाश झालेला जो समय तें.

**प्रभाव**, पु॰ सं॰ प्रताप.

**प्रभावळ**, स्त्री॰ देवमूर्तीचे पाठीमागें टेंकायासाठीं रौप्यादि धातूंचा सुशोभित जो पदार्थ करितात ती.

**प्रभास**, न॰ सं॰ एक पुण्यक्षेत्र आहे.

**प्रभु**, पु॰ सं॰ ईश्वर, राजा, इ॰ जो धनी तो; २, जी गोष्ट करण्याविषयीं जो समर्थ तो तीविषयीं.

**प्रभृति**, अ॰ सं॰ कांहींएक काल देशादिकांचा अवयव आद्यवधित्वेंकरून धरून; उ॰ मी जन्मप्रभृति आजपर्यंत खोटें बोललों नाहीं; २, विवक्षित समुदायामध्यें विवक्षित व्यक्तीस आद्यत्वेंकरून गणून; उ॰ इंद्रप्रभृति देव ईश्वरास शरण गेले, याचा नित्यें समासींच प्र॰.

**प्रमत्त**, ३ लिं॰ सं॰ अतिशयित जो मत्त तो.

**प्रमदा**, स्त्री॰ सं॰ स्त्री; शृंगाररसयोग्यता असतां प्र॰

**प्रमा**, स्त्री॰ सं॰ यथार्थ जें ज्ञान ती.

**प्रमाण**, न॰ सं॰ प्रमा उत्पन्न होण्यास कारणीभूत जें आप्तवाक्य, अनुमान, इ॰ शास्त्रनिर्णीत आहेत तीं प्र॰; २, विवादविषयांचीं निर्णायक जीं लेख, भोग, साक्ष्य, इ॰ निर्णीत आहेत तीं प्र॰; ३, तप्तदिव्यादिक जें दिव्य तें; ४, कांहींएक गोष्ट होईलच किं॰ नाहींच होणार किं॰ अशीच होईल इ॰ रूप जो निश्चय असतो तें; उ॰ आज पाउस लागेल असें प्रमाण नाहीं; ५, कांहींएका गोष्टीची जी इयत्ता तें; उ॰ शब्द किती आहेत यांचें प्रमाण कोणास लागलें नाहीं; ६, परिमाण; ७, जा विद्या कलांचें जें शास्त्र तें त्यां त्यां विषयीं; ८, जास अनुल्लंघनीयत्वेंकरून मान्य जें शास्त्रादि किं॰ पित्रादि तें त्यास; उ॰ आम्हास आमचा वेद प्रमाण; ९, त्रैराशिकांमध्यें पांचास पंचवीस मिळतात तेव्हां विसांस किती मिळतील अशा रीतीच्या न्यासांत प्रथम पांच हा जो राशि तें; १०, ३ लिं॰ खोटेपणा जीमध्यें नाहीं अशी जी गोष्ट तो; उ॰ हें मासें भाषण प्रमाण आहे.

**प्रमाणभूत**, ३ लिं॰ सं॰ प्रमाणरूप.

**प्रमाणिक**, ३ लिं॰ सं॰ सप्रमाण जो भाषणादि व्यवहार किं॰ तादृश व्यवहार करणारा तो पुरुष; २, ग्रंथस्थ जा कल्पना तितक्याच बोलणारा विशेष आपल्या बुद्धिबलानें पाल्हाळ करणारा नव्हे असा जो तो.

**प्रमाणें**, अ॰ अनुरूप, समासीं प्र॰ उ॰ आज्ञप्रमाणें तुमच्यें मरणें त्याप्रमाणेंमाझें सतीजाणें.

**प्रमाता**, ३ लिं॰ सं॰ कांहींएका प्रमाणानें प्रमेयाची प्रमिति करणारा तो.

**प्रमाथी**, पु॰ सं॰ एक संवत्सर आहे.

**प्रमाद**, पु॰ सं॰ अनवधानता किं॰ तेणेंकरून घडतो जो दोषादि तो.

**प्रमादी**, पु॰ सं॰ सत्तेचाळिसावा संवत्सर; २, ३ लिं॰ प्रमाद आहे ज्याचे अंगीं तो.

**प्रमित**, ३ लिं॰ सं॰ कांहींएक प्रमाणाशीं जो तुल्य तो; उ॰ हस्तप्रमित काष्ठ घेउन ये.

**प्रमिति**, स्त्री॰ सं॰ प्रमा; २, पायली, तोळा, इ॰ परिमाणानें धान्यादि मोजण्याचा व्यापार किं॰ तेणेंकरून होतेंजें तन्निष्ठ इयत्तेचें ज्ञान तो.

**प्रमुख**, ३ लिं॰ सं॰ ज्यासमुदायामध्यें जो मुख्य तो; २, ज्यासमुदायामध्यें जो मुख्यत्वेंकरून विवक्षित तो समुदाय तत्प्रमुख अशा अर्थी समासीं प्रयोग होतो; उ॰ श्रीमहाविष्णुप्रमुख देव महादेवापाशीं गेले.

**प्रमुदित**, ३ लिं॰ सं॰ हर्षित.

**प्रमेय**, न॰ सं॰ प्रमाणानें ज्याची प्रमिति करण्यास योग्य आहे तो अर्थ किं॰ प्रमाणानें साध्य जो अर्थ तो; २, भाषणादिव्यवहाराचा ज्या साध्य अर्थावर अभिप्राय असतो तो अर्थ तें.

**प्रमेह**, पु॰ सं॰ एक धातुरोग आहे.

**प्रमेहित**, ३ लिं॰ प्रमेही.

**प्रमेही**, ३ लिं॰ सं॰ प्रमेहरोग झाला आहे ज्यास तो.

**प्रमोद**, पु॰ सं॰ आनंद; २, चवथा जो संवत्सर तो.

**प्रयत्न**, पु॰ सं॰ कांहींएक फलावर लक्ष्य ठेवून तत्सिध्यर्थ जसा साधेल तसा अनेकप्रकारचा अनेकवार जो उद्योग तो; २, कांहींएका कार्याविषयीं कर्त्यानें अंगीं घेतला जो वेग ज्याचा विराम मध्यें झाला असतां तें कार्य पुरतें होई तों पर्यंत पुनः पुनः घ्यावा लागतो तो; उ॰ मला एक कामयत्नानें होईना म्हणून चार प्रयत्नानें केलें; ३, एकाच स्थानीं उत्पन्न होउन भिन्नभिन्नत्वें करून जे वर्ण होतात त्याभेदास कारणीभूत तत्तत्स्थानीं जिव्हाग्रादि संबंधाचे अनेक प्रकार आहेत ते प्र॰.

**प्रयत्नी**, ३ लिं॰ कांहीं कार्य सिध करण्याविषयीं प्रयत्न करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**प्रयाग**, पु॰ सं॰ भागीरथी आणि यमुना यांचा संगम जेथे झाला आहे तें क्षेत्र.

**प्रयागवळ**, पु॰ प्रयाग क्षेत्रींचा जो उपाध्याय तो.

**प्रयाण**, न॰ सं॰ देशांतरादिकांचाठायीं जें गमन तें.

**प्रयास**, पु॰ सं॰ आयास.

**प्रयुक्त**, ३ लिं॰ सं॰ जो पदार्थ किं॰ जी गोष्ट ज्यास प्रयोजक तें कर्मादिक तत्प्रयुक्त; उ॰ हें पापप्रयुक्त दुःख भोगितो, ईश्वरप्रीतिप्रयुक्त तप करितो. इ॰ समासीं प्र॰ होतात; २, कांहींएका

प्रभंजन, पु॰ सं॰ वायु परंतु मोटा वेगवान् जो वायु त्याविषयीं लोकांत प्र॰.

प्रभव, पु॰ सं॰ प्रथम जो संवत्सर तो; २, जा पदार्थापासून आपदार्थाची उत्पत्ति झाली तो त्याचा किं॰ जेथे जो पदार्थ प्रथमतः दृष्टीस पडूं लागला तें स्थल त्याचा; उ॰ वस्त्राचा प्रभव कार्पास, भागीरथीचा प्रभव हिमालय, इ॰ जाणावीं; ३, कोणेक पदार्थापासून कोणेक पदार्थाची जी उत्पत्ति तो.

प्रभा, स्त्री॰ सं॰ कांति; २, सूर्यादिकांच्या उपाधीमुळें जी पदार्थाची छाया पडती ती.

प्रभाकर, पु॰ सं॰ सूर्य.

प्रभागजाति, स्त्री॰ सं॰ पदार्थाची कांहीं एक संख्या सांगून त्याच्या अमुक अंश, त्या अंशाचा अमुक अंश, इ॰ हिशेब करण्याचा प्रकार सांगितला आहे ती.

प्रभात, न॰ सं॰ सूर्योदयाच्या पूर्वीचा कांहीं प्रकाश झालेला जो समय तें.

प्रभाव, पु॰ सं॰ प्रताप.

प्रभावळ, स्त्री॰ देवमूर्तीचे पाठीमागें टेंकायासाठीं रौप्यादि धातूचा स्तशोभित जो पदार्थ करितात ती.

प्रभास, न॰ सं॰ एक पुण्यक्षेत्र आहे.

प्रभु, पु॰ सं॰ ईश्वर, राजा, इ॰ जो धनी तो; २, जी गोष्ट करण्याविषयीं जो समर्थ तो तीविषयीं.

प्रभृति, अ॰ सं॰ कांहीं एक काल देशादिकांचा अवयव आद्यवधित्वेंकरून धरून; उ॰ मी जन्मप्रभृति आजपर्यंत खोटें बोललों नाहीं; २, विवक्षित समुदायामध्यें विवक्षित व्यक्तीस आद्यत्वेंकरून गणून; उ॰ इंद्रप्रभृति देव ईश्वरास शरण गेले, यांचा नित्यें समासींच प्र॰.

प्रमत्त, ३ लिं॰ सं॰ अतिशयित जो मत्त तो.

प्रमदा, स्त्री॰ सं॰ स्त्री; शृंगाररसयोग्यता असतां प्र॰

प्रमा, स्त्री॰ सं॰ यथार्थ जें ज्ञान ती.

प्रमाण, न॰ सं॰ प्रमा उत्पन्न होण्यास कारणीभूत जें आप्तवाक्य, अनुमान, इ॰ शास्त्रनिर्णीत आहेत तीं प्र॰; २, विवादविषयांचीं निर्णायक जीं लेख, भोग, साक्ष्य, इ॰ निर्णीत आहेत तीं प्र॰; ३, तप्तदिव्यादिक जें दिव्य तें; ४, कांहीं एक गोष्ट होईलच किं॰ नाहींच होणार किं॰ अशीच होईल इ॰ रूप जो निश्चय असतो तें; उ॰ आज पाउस लागेल असें प्रमाण नाहीं; ५, कांहीं एका गोष्टीची जी इयत्ता तें; उ॰ शब्द किती आहेत यांचें प्रमाण कोणास लागलें नाहीं; ६, परिमाण; ७, जा विद्या कलांचें जें शास्त्र तें त्यांविषयीं; ८, जास अनुल्लंघनीयत्वेंकरून मान्य जें शास्त्रादि किं॰ पित्रादि तें त्यास; उ॰ आह्मास आमचा वेद प्रमाण; ९, त्रैराशिकांमध्यें पांचास पंचवीस मिळतात तेव्हां विसास किती मिळतील अशा रीतीचा न्यास असतो त्यांत प्रथम पांच हा जो राशि तें; १०, ३ लिं॰ खोटेपणा जीमध्यें नाहीं अशी जी गोष्ट तो; उ॰ हें मासें भाषण प्रमाण आहे.

प्रमाणभूत, ३ लिं॰ सं॰ प्रमाणरूप.

**प्रमाणिक**, ३ लिं॰ सं॰ सप्रमाण जो भाषणादि व्यवहार किं॰ तादृश व्यवहार करणारा तो पुरुष; २, ग्रंथस्थ जा कल्पना तित क्याच बोलणारा विशेष आपल्या बुद्धिबलानें पाल्हाळ करणारा नव्हे असा जो तो.

**प्रमाणें**, अ॰ अनुरूप, समासीं प्र॰ उ॰ आप्रमाणें तुमच्यें मरणें त्याप्रमाणेंमाझें सती जाणें.

**प्रमाता**, ३ लिं॰ सं॰ कांहींएका प्रमाणानें प्रमेयाची प्रमिति करणारा तो.

**प्रमाथी**, पु॰ सं॰ एक संवत्सर आहे.

**प्रमाद**, पु॰ सं॰ अनवधानता किं॰ तेणेंकरून घडतो जो दोषादि तो.

**प्रमादी**, पु॰ सं॰ सत्तेचाळिसावा संवत्सर; २, ३ लिं॰ प्रमाद आहे ज्याचे अंगी तो.

**प्रमित**, ३ लिं॰ सं॰ कांहीं एक प्रमाणाशीं जो तुल्य तो; उ॰ हस्त प्रमित काष्ठ घेउनये.

**प्रमिति**, स्त्री॰ सं॰ प्रमा; २, पायली, तोळा, इ॰ परिमाणानें धान्यादि मोजण्याचा व्यापार किं॰ तेणेंकरून होतें जें तन्निष्ठ इयत्तेचें ज्ञान ती.

**प्रमुख**, ३ लिं॰ सं॰ जासमुदायामध्यें जो मुख्य तो; २, जासमुदायामध्यें जो मुख्यत्वेंकरून विवक्षित तो समुदाय तत्प्रमुख अशा अर्थी समासीं प्रयोग होतो; उ॰ श्रीमहाविष्णुप्रमुखदेव महादेवापाशीं गेले.

**प्रमुदित**, ३ लिं॰ सं॰ हर्षित.

**प्रमेय**, न॰ सं॰ प्रमाणानें ज्याची प्रमिति करण्यास योग्य आहे तो अर्थ किं॰ प्रमाणानें साध्य जो अर्थ तो; २, भाषणादिव्यवहाराचा ज्या साध्य अर्थावर अभिप्राय असतो तो अर्थ तें.

**प्रमेह**, पु॰ सं॰ एक धातुरोग आहे.

**प्रमेहित**, ३ लिं॰ प्रमेही.

**प्रमेही**, ३ लिं॰ सं॰ प्रमेहरोग झाला आहे ज्यास तो.

**प्रमोद**, पु॰ सं॰ आनंद; २, चवथा जो संवत्सर तो.

**प्रयत्न**, पु॰ सं॰ कांहींएक फलावर लक्ष्य ठेवून तत्सिध्यर्थ जसा साधेल तसा अनेक प्रकारचा अनेकवार जो उद्योग तो; २, कांहींएका कार्याविषयीं कर्त्यानें अंगीं घेतला जो वेग ज्याचा विराम मध्यें झाला असतां तें कार्य पुरतें होई तों पर्यंत पुनः पुनः घ्यावा लागतो तो; उ॰ मला एका प्रयत्नानें होईना म्हणून चार प्रयत्नानें केलें; ३, एकाच स्थानीं उत्पन्न होउन भिन्न भिन्नत्वें करून जे वर्ण होतात त्याभेदास कारणीभूत तत्स्थानीं जिव्हाग्रादि संबंधाचे अनेक प्रकार आहेत ते प्र॰.

**प्रयत्नी**, ३ लिं॰ कांहीं कार्य सिध्य करण्याविषयीं प्रयत्न करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**प्रयाग**, पु॰ सं॰ भागीरथी आणि यमुना यांचा संगम जेथे झाला आहे तें क्षेत्र.

**प्रयागवळ**, पु॰ प्रयाग क्षेत्रींचा जो उपाध्याय तो.

**प्रयाण**, न॰ सं॰ देशांतरादिकांचा ठायीं जें गमन तें.

**प्रयास**, पु॰ सं॰ आयास.

**प्रयुक्त**, ३ लिं॰ सं॰ जो पदार्थ किं॰ जी गोष्ट ज्यास प्रयोजक तें कर्मादिक तत्प्रयुक्त; उ॰ हें पापप्रयुक्त दुःख भोगितो, ईश्वर प्रीतिप्रयुक्त तप करितो, इ॰ समासीं प्र॰ होतात; २, कांहींएक कार्याचा

र्याचा उद्देशें योजिलाजो मंत्र, बाण, पुरुष, इ० तो; उ० जा अर्थावर जो शब्द शोभेल तो प्रयुक्त करावा.

प्रयुत, न० सं० १०००००० संख्या.

प्रयोग, पु० सं० पदाची वाक्याचा ठायीं अर्थानुसंधान पूर्वक किं० श्लोकादिग्रंथींजी वाक्याची योजना तो; २, कर्तृप्राधान्य,कर्मप्राधान्य,भावप्राधान्य,सकर्मकता, अकर्मकता, इ० भेदें करून विभक्तिभेद विशिष्ट भिन्नभिन्न जे वाक्यरचनेचे प्रकार होतात ते प्र०; ३, मंत्र, शस्त्र, औषध, इ० कांची तत्तन्निर्वाह्यकार्यावर जीयोजना तो; उ० त्यागृहस्थावर त्यानें मारेकर्यांचा प्रयोग केला; ४, शास्त्रामध्यें जें कर्म सर्वविशेष शास्त्रार्थपूर्वक सांगितलें असतें त्यांतील विशेषांश टाकून केवल अनुष्ठानांश मात्र लिहून काढिला असतो तो; ५, कांहीं शास्त्रादिग्रंथांच्याठायीं सांगितल्या क्रियेच्या तत्तदनुरूप जो व्यापार तो; उ० किमयाची क्रियाजशी सांगितली तसा आह्मीं प्रयोग करून पाहिला परंतु साधत नाहीं; ६, जारणमारणादिमंत्रांचा जो प्रयोग त्यास संकेतानें ह्म०.

प्रयोगपाठी, ३ लिं० विवाहादिकर्माचे प्रयोगमात्र ज्यास पाठ येतात परंतु त्यांतील शास्त्रार्थ कांहीं समजत नाहीं तो.

प्रयोगी, ३ लिं० जारणमारणाचा प्रयोग करितो तो.

प्रयोजक, पु० सं० कर्त्यास क्रियेचाठायीं प्रवर्तविणाराजो दुसरा कोणी तो; उ० ईश्वर करवितो तसें मीं करितों एथें ईश्वर हा प्रयोजक; २, जें कांहीं कार्य घडतें त्याचा घडण्याविषयीं निमित्त तें करून विवक्षितजो कर्त्याचा मनोरथ इ० पदार्थ तें.

प्रयोजन, न० सं० कांहीं क्रिया होण्याविषयीं जें उद्देश्य तें; उ० गुरुगृहीं राहण्याचें प्रयोजन विद्या; २, कांहीं कर्तव्यकार्यसिध्यर्थ तत्साधनीभूत पदार्थांची किं० कांहीं क्रियेची असती जी आवश्यकता तें; उ० जाला तोंड पाठ येतें त्याला पोथीचें प्रयोजन लागत नाहीं; मासे कामांत तुह्मास बोलण्यास प्रयोजन काय; ३, लग्न, मुंज, ब्राह्मणभोजन, इ० रूप जें कार्य तें.

प्रयोज्य, ३ लिं० सं० प्रयोजकानें योजावयास योग्य जो तो.

प्रयोज्यप्रयोजकभावसंबंध, पु० सं० प्रयोज्य आणि प्रयोजक याउभयांचा जो संबंध विशेष असतो तो.

प्ररोह, पु० सं० बीजापासून उत्पन्न होतो जो अंकुर तो.

प्रलय, पु० सं० कल्पांतादिसमयीं जो सृष्टीचा उपसंहार होतो तो; २, ला० महामारी, दुष्काल, इ० कारणामुळें देशाचे देश उजाड पडावे असाजो संहार होतो त्यास ह्म०; ३, कोणेक कर्त्यानें स्वनिष्ठ व्यापाराचे अतिशयाची पराकाष्ठा केली असतां तिला ह्म० परंतु तो व्यापार प्रायः सर्वांस भासयावा दुःखद्दावें अशा प्रकारचा असतांच प्र०; उ० चंद्रोउंदिरानीं प्रलय मांडला आहे.

**प्रलयकाल**, पु॰ सं॰ कल्पांतसमय लाक्षणिकार्थसहित.

**प्रलाप**, पु॰ सं॰ शोक, मद, निद्रा, इ॰ कानीं जो विव्हल त्यानें जें तादृश भाषण तो; २, असंगत, असमंजस, अतिरिक्त, अशा भाषणास म्हणतात.

**प्रवण**, ३ लिं॰ सं॰ कोणेएकीकडे क्रमेंकरून उतरता जो भूमिभागादि तो; उ॰ हापर्वत दक्षिणप्रवण आहे. प्रा॰ समासीं प्र॰; २, ला॰ जा विषयादिकांकडे आहे शोक ज्याचा तें अंतःकरण, अभिप्राय, शब्द, बुद्धि, इ॰ तत्प्रवण तो; उ॰ ज्यासमयीं ईश्वरभक्तिप्रवण चित्त होतें त्यासमयीं विषयवैराग्य होतें.

**प्रवर्तक**, ३ लिं॰ सं॰ विद्या, धर्म, इ॰ कांचा प्रवर्तविणारा तो; २, कांहीं कर्माच्याठायीं मनुष्यादिकांस प्रेरणारा तो.

**प्रवर्त्तकाचार्य**, पु॰ सं॰ कांहीं अपूर्वच विद्या, व्यवहार, धर्म, मत, इ॰ ज्यानें लोकांत प्रवृत्त केलें तो त्या विद्यादिकांचा.

**प्रवर्त्तणें**, कर्त्यानें करावयाच्या उद्देशानें कांहीं एक व्यापारीं लागणें किं॰ कांहीं एक व्यापार चालू होणें.

**प्रवर्त्तन**, न॰ कोणाएका व्यापारीं कोणेकास किं॰ कोणेक व्यापार प्रवृत्त करण्याच्या जो व्यापार तें.

**प्रवर्तमान**, ३ लिं॰ सं॰ प्रवर्त्तला आहे जो तो.

**प्रवर्तित**, ३ लिं॰ सं॰ प्रवर्तविला जो तो.

**प्रवर्त्यमान**, ३ लिं॰ सं॰ कोणेकानें प्रवर्तविजे तो जो तो.

**प्रवाद**, पु॰ सं॰ कांहीं एक गोष्टीचे मूलाची उपलब्धि किं॰ फलादिकांचा अनुभव नसून केवल लोकामध्यें भाषण मात्र चालत असतें तो; किमया सिद्ध होती असा प्रवाद मात्र आहे; दौलश्कर येणार असा प्रवाद मात्र आहे.

**प्रवाल**, **प्रवाळ**, सं॰ न॰ पोंवळें.

**प्रवालभस्म**, न॰ सं॰ प्रवाळ जाळून जें भस्मरूप औषध करितात तें.

**प्रवास**, पु॰ सं॰ स्वदेश सोडून द्रव्यार्जनाद्यर्थ जी परदेशस्थिति तो; त्यास्थितीस अवस्थारूप अधिकरणता आहे म्हणून प्रवासीं राहणें, येणें, इ॰ प्र॰ होतात.

**प्रवासी**, पु॰ सं॰ प्रवासांत जो वर्तमान तो.

**प्रवाह**, पु॰ सं॰ सतत चाललेले जे वायु, जल, अग्नि, इ॰ क त्यांची कोणी एकीकडे जी गति असती तो; २, तद्विशिष्ट तें जलादि तो; ३, ला॰ चिरकाल चाललेले जे संसारादि व्यवहार, काल, इ॰ त्यांची जी गति तो; ४, ममता बुद्धि, इ॰ कांचें तत्तद्विषयाकडे जें सतत प्रावण्य असतें तो; उ॰ ममतेचा प्रायः असा प्रवाह आहे कीं वडिलानीं लाहानावर ममता करावी; ५, सतत, अखंडित, अस्खलित अशा प्रकारें कोणेकाचा भाषणाची किं॰ सैन्यादि समुदायाची जी सवेग गति तो; प्रवाहांत पडणें म्हणजे कांहीं एक चाललेल्या व्यवहारानें गत्यनुरूप त्या व्यवहारांत पडून वर्तणें.

**प्रवाहपतित**, ३ लिं॰ सं॰ जलादिकांचा किं॰ व्यव

व्यवहारादिकांच्या प्रवाहांत पडल्यामुळें तद्नुसार वर्त्तन करूंलागला जो तो.

**प्रविष्ट**, ३लिं० सं० ज्यामध्यें ज्याचा प्रवेश झाला तो त्यामध्यें; पत्र, निरोप, इ० विवक्षितस्थलीं किं० विवक्षितपुरुषास प्रविष्टकरणें ह्म० पोंहचतें करणें.

**प्रवीण**, ३लिं० सं० निपुण.

**प्रवृत्त**, ३लिं० सं० लोकव्यवहारविषयतेस आलेंजें शास्त्र, धर्म, व्यवहार, इ० तो; उ० शालिवाहन शक प्रवृत्त होउन १७५० वर्षे झालीं; २, आरंभ होउन चालू झालें जें कर्मादि तो; ३, कांहींएक कार्याच्याठायीं लागवें, जाणावें, इ० उद्देशानें त्यात्या व्यापारींलागला जो कोणीएक तो; ४, ईश्वरप्राप्तीहून इतरविषयक जे व्यवहार, शास्त्र, कर्मे, इ० तो.

**प्रवृत्ति**, स्त्री० सं० आत्मस्वरूपाच्या विसर पडून प्रापंचिक व्यवहारोन्मुखता रूप जो जीवाच्या वृत्तिविशेष ती; २, कोणेकाच्या कार्यादिकांच्याठायीं किं० शास्त्रादिकाच्या लोकव्यवहाराच्याठायीं जो प्रवृत्तपणा ती; ३, प्रधान.

**प्रवृत्तिनिमित्त**, न० सं० ज्याधर्मानें आश्रयून अर्थाच्याठायीं शब्दप्रवृत्तहोतोतोजो शाब्दबोधीं विशेषणतेकरून भासमान तें.

**प्रवृत्तिमार्ग**, पु० ईश्वराराधनेवांचून इतरव्यवहाराचा जो मार्ग तो.

**प्रवृद्ध**, ३लिं० सं० अतिशयितवाढून मोटेपणा पावला जो वेष, अग्नि, ज्ञान, वैर, इ० तो.

**प्रवेश**, पु० सं० मध्यवर्ति व्यवधानाचें वेगादिकानें उल्लंघन करून गतिद्वारा विवक्षित स्थलाचें जें आक्रमण तो; २, बुद्धीच्या शास्त्रादिविषयाच्याठायीं किं० कोणेक पुरुषादिकांच्या राजकीयव्यवहारादिकांच्याठायीं जोगतीनें संबंध तो

**प्रवेशक**, पु० सं० नाटकामध्यें मुख्यपात्र प्रवेशाच्या पूर्वीं कोणी अर्थांतर पात्र येउन संदर्भार्थक जो ग्रंथ बोलतो तो; २, ३लिं० कोणेकस्थलीं कोणेकाचा प्रवेश करून देणारा तो.

**प्रवेशणें**, गृहादिकामध्यें प्रविष्ट होणें.

**प्रवेशन**, न० प्रवेश करण्याच्या व्यापार तें.

**प्रशम**, पु० सं० राग, काम, क्रोध, इ० कांचा जो उपशम तो.

**प्रशमन**, न० सं० प्रशम करण्याच्या व्यापार तें; २, जेणेंकरून प्रशमन होतें तें; उ० घृत हें पित्ताचें प्रशमन होय.

**प्रशंसक**, ३लिं० सं० प्रशंसा करणारा तो.

**प्रशंसनीय**, ३लिं० सं० ज्याची प्रशंसा करण्यास योग्य तो पुरुष, पदार्थ, गुण, इ० तो.

**प्रशंसा**, स्त्री० कोणेकाचें उत्तमत्वें करून जें वर्णन, ख्याति, ती.

**प्रशंसापात्र**, न० प्रशंसा करण्यास योग्य त्यास ह्मणतात.

**प्रशस्त**, ३लिं० सं० निर्दोष; २, अपळपघळ जें भाषण, स्थल, वस्त्र, इ० तो; ३, ज्याच्या संबंधानें अंतःकरणास कंटाळा, त्रास, भय, इ० मूलक संकोच होत नाहीं तें कर्म किं० पदार्थ तो; उ० मला काम केल्यावांचून फुकट पैसा खाणें प्रशस्त वाटत नाहीं; ४, ज्याची प्रशंसा कोणेकानें केली तो.

**प्रशांत**, ३लिं० सं० काम, क्रोध, इ० दोष शमले आहेत ज्याचे असें अंतःकरण; तद्विशिष्ट मनुष्यादि तो.

**प्रशिष्य**, पु० सं० शिष्याचा जो शिष्य तो.

**प्रश्न**, पु० सं० पृच्छा; २, ग्रामांतरास जावयाकरितां गृहांतून जो निघाला त्यास पुढें होणारें शुभाशुभाचें सूचक जें चिन्ह होतें तो; ३, ज्योतिषी, तपस्वी, इ० कांस विचारणीय जो परदेशींचा किं० भूतभविष्यादि कालींचा अपरोक्ष वृत्तांत तो किं० त्या शास्त्रादि ज्ञानानें जाणून त्याणीं केलें जें त्याचा प्रश्नाचें उत्तर तो; प्रश्न पाहाणें ह्मणजे विवक्षित पसेक्ष वृत्तांताची इदमित्थता ज्योतिः शास्त्र, रमल, इ० द्वारा जाणणें.

**प्रश्नोत्तरी**, स्त्री० प्रश्न कालावरूनच कोणेकाची करितात जी जन्मपत्रिका ती.

**प्रष्टा**, ३लिं० सं० प्रश्न करणारा तो.

**प्रसक्त**, ३लिं० सं० जा गोष्टीचा करावयाचा किं० व्हावयाचा प्रसंग आला तो; २, कांहीं एक कार्यादि विषयांकडे लागलें जें अंतःकरण, पुरुष, इ० तो.

**प्रसक्तानुप्रसक्ति**, स्त्री० सं० भाषणादिकांत कोणेक प्रकृत विषयाचा प्रसंग चालला असतां दृष्टांताद्यर्थ अप्रकृत विषय बोलूं लाग त्यामुळें त्यावरून दुसर्या अप्रकृताचा त्यावरून तिसर्याचा असें होतां होतां केवळ प्रकृतानुपयुक्त विषयाचा प्रसंग होतो ती; उ० आतां पुरे ही प्रसक्तानुप्रसक्ति प्रकृत गोष्ट चालली आहे ती सांगा.

**प्रसक्ति**, स्त्री० सं० लक्ष्यादिकांचा ठायीं लक्षणादिकांची जी प्राप्ति ती.

**प्रसंग**, पु० सं० हा व्यवहार कालदेशरूप अधिकरणावर चाललेला आहे त्यामध्यें जाजा क्रियेशीं सापेक्ष जोजो त्या अधिकरणाचा अंश तो त्यात्या क्रियांचा तो; २, जेथें ती क्रिया अवश्य करावी असें प्राप्त होतें तो; त्या क्रियेचा प्रसंगास कर्ता इ० कांचा ही प्रसंग ह्म०; ३, कांहीं दुर्निर्वाह संकटाचा जो समय तो; उ० त्या गृहस्थावर प्रसंग गुदरला आहे; ४, परस्परांचा बोलणें, चालणें, इ० व्यवहार निमित्त जो संबंध तो; उ० आज सभेंत त्यांचा आमचा प्रसंग झाला; तुमचा आमचा नेहेमीं देणें घेण्याचा प्रसंग आहे; ५, कांहीं क्रियेचा अनुरोधामुळें कोणेकास कांहीं पदार्थाशीं गांठ पडती, जेथें भोगादिकानें अवश्य निर्वाह करावा लागतो तो; उ० शुद्र देशांत गेलें ह्मणजे धाब्यांचे घराशीं प्रसंग.

**प्रसंगसंगति**, स्त्री० सं० प्रकृत विषय चालला असतां त्यामध्यें कांहीं अप्रकृत विषयाची प्रसंग वशात् उपस्थिति झाल्यामुळें जी संगति लागती ती; उ० ब्रह्मज्ञान प्रकरणीं विषयाचें विवरण प्रसंग संगतीनें केलें जातें.

**प्रसंगसिद्धि**, स्त्री० सं० एक समयावच्छेदें करून सजातीय दोन कर्में एक व्याप्य आणि एक व्यापक अशीं प्राप्त झालीं असतां व्यापकाचा आचरणानें सहज जें व्याप्याचें घडतें ती; उ० एथून काशीयात्रेस निघालें ह्म० मध्यस्थित यात्रांची प्रसंगसिद्धि होती.

**प्रसंगोपात्त**, अ० प्रसंगाच्या अनुरोधानें कांहीं गोष्ट निघणें, ह्मणणें, इ० कांचें वि०; उ० तुह्मी मुजरत गोष्ट काढूनका प्रसंगोपात्त निघाल्यास बोला.

**प्रसज्यप्रतिषेध**, पु० सं० पर्युदासाहून भिन्न प्राधान्येंकरून विधीयमानजो निषेध तो.

**प्रसन्न**, ३लिं० समाधानयुक्त किं० कोणेकावर अनुग्रहोन्मुख जें अंतःकरण किं० तद्विशिष्ट मनुष्यादि तो; २, त्या प्रसन्नतेच्या चिन्हानें युक्त जें मुख, नेत्र, इ० तो; ३, निर्मल, आमध्यें चांचल्य, घोघो शब्द इ० नाहीं असेंजें नद्यादिकांचें उदक किं० धुळी, मेघाडंबरें, इ० रहित जा दिशा किं० आकाश, जाच्या दर्शनानें अंतःकरणास बरें वाटावें तो.

**प्रसन्नमुख**, ३लिं० सं० प्रसन्न आहे मुख जाचें तो.

**प्रसर**, पु० सं० विद्या, धर्म, रोग, शत्रु, इ० कांच्या विवक्षित देशकाल व्याप्त व्हावया जोगा जो विस्तार तो.

**प्रसरण**, न० सं० प्रसरण्याचा व्यापार तें.

**प्रसरणें**, प्रसरयुक्त होणें.

**प्रसव**, पुं० सं० मातेच्या उदरापासून गर्भस्थ प्राण्याचें जें बहिर्निःसरण तो.

**प्रसवणें**, गर्भचारीनें गर्भस्थ अपत्यानें बाहेर येई असें करणें; २, त्या अपत्यानें गर्भापासून बाहेर निघणें; ३, कांहींएक उपादानापासून कांहीं कार्यरूप पदार्थ उत्पन्न होणें किं० त्या कारणानें कार्यातें उत्पन्न करणें त्यास ह्म०; उ० हीमाया सर्वजगातें प्रसवली; ४, कांहींएकापासून कांहींएक अभिव्यक्त होणें किं० त्यानें त्यास अभिव्यक्त करणें अशा अर्थीं ग्रंथीं प्र०; उ० शब्दप्रसवला अर्थानें इ०.

**प्रसवकाल**, पु० सं० बाळंत होण्याचा समय तो.

**प्रसववेदना**, स्त्री० सं० प्रसवसमयीं जी वेदना होती ती.

**प्रसाद**, पुं० सं० प्रसन्नता; २, धनी, देव, गुरु, इ० कानीं प्रसन्न होउन दिलाजो फल, पुष्प, वस्त्र, इ० पदार्थ तो; ३, देव, गुरु, तपस्वी, इ० कांकडील भक्तीनें सेवन करायाचें जें अन्न त्यास ह्म०; ४, पुराण, कीर्तन, इ० कांचा सेमासीस सर्वश्रोत्यांस जें फल, मिठाई, वांटितात त्यांस ह्म०; ५, देवास शुभाशुभ विचारायाकरितां त्याचे अंगास जो कौल लावितात तो.

**प्रसादन**, न० सं० कोणेकास स्तुत्यादिकानें प्रसन्न करण्याचा व्यापार तें.

**प्रसादित**, ३लिं० सं० कोणेकानें प्रसन्न केला तो.

**प्रसारण**, न० सं० प्रसृत करण्याचा व्यापार तें.

**प्रसारित**, ३लिं० सं० प्रसरणयुक्त केला तो.

**प्रसिद्ध**, ३लिं० सं० अनेकांस जो विदित तो; २, जा पदार्थास अस्तित्व आहे तो पदार्थ; उ० शशविषाण, वंध्यापुत्र, इ० पदार्थ असिद्ध इतर सर्व प्रसिद्ध; ३, अ० उघडपणें; उ० ही बायको प्रसिद्ध व्यभिचार करूं लागली.

**प्रसिद्धि**, स्त्री० सं० कांहींएक पदार्थ, गोष्ट, इ० कांचा अनेक स्थलीं प्रसिद्धपणा ती; २, कांहींएक गोष्टीची जी उघडीक ती.

**प्रसिद्धिपत्र**, न० सं० कांहींएक गोष्ट सर्वत्र सर्वांस विदित व्हावी ह्मणून त्या गोष्टीचा लेख देशोदेशीं पाठवायाकरितां करितात किं० चवाठा इ० स्थलीं लावायाकरितां करितात तें.

**प्रसृत**, ३ लिं॰ सं॰ बाळंत;होणें याचायोगीं प्र॰.

**प्रसृतिका**, स्त्री॰ सं॰ बाळंतीण.

**प्रसृतिवायु**, पु॰ सं॰ प्रसवकाल आसन्न आलाम्हणजे जो पोटांत गर्भ बाहेर निघायास कारणीभूत वायु उत्पन्न होतो तो.

**प्रसृत**, ३ लिं॰ सं॰ प्रसरणावला जो तो.

**प्रसृति**, स्त्री॰ सं॰ पसा.

**प्रस्ताव**, पु॰ कांहीं एक विषयाचें प्रकरण चाललें असतां त्याविषयानें अधिकृत जो समय तो; उ॰ हा प्रस्ताव ब्रह्मज्ञानाचा आहे म्हणून यांत विषयकथा शोभत नाहीं.

**प्रस्तावना**, स्त्री॰ सं॰ नाटकांचा प्रारंभीं सूत्रधार, इ॰ सोंगें घेउन कथासंदर्भार्थ जो ग्रंथ बोलतात ती.

**प्रस्तुत**, अ॰ सं॰ विद्यमानकालीं; २, ३ लिं॰ प्रस्तावजाचा निघाला आहे अशी जी गोष्ट,विषय,इ॰ तो.

**प्रस्थ**, न॰ सं॰ विद्या, द्रव्य, इ॰ वैशिष्ट्यामुळें सामान्य कोटींत परिगणनीय नव्हे पृथकृत्वें करून गणावा असा जो मनुष्यादि त्यास म्ह॰; २, कोणी थोर मनुष्य प्रवासास जाणार किं॰ लग्नादिक होणार इ॰ क कांहीं मोठें कार्य उपस्थित झालें असतां तन्निमित्तक जें खटलें पडतें तें; उ॰ तें निघणार म्हणून कोणी भेटायास आले कोणी मागायास येत इ॰ असे चार दिवस घरामध्यें प्रस्थ पडलें होतें; प्रस्थमाजिवणें, वाढिवणें, इ॰ स्थलीं ढोंग असा अर्थ होतो; ३, लग्न, मुंज, इ॰ संबंधी जें ब्राह्मणभोजनादि तें; ४, पुं॰ सं॰ एक धान्यमान आहे

**प्रस्थान**, न॰ सं॰ अधिष्ठित स्थलांपासून ग्रामांतरादि स्थलीं जावयाकरितां निघण्याचा जो व्यापार तें; २, मुहूर्तावर प्रस्थान करून तत्समयीं गांवसोडुन दूर जावयास अनुकूल नसतां जी शेजारींपाजारीं स्थिति करितात तें; ३, निघायास जो मुहूर्त त्याजवर निघायास अनूकूल नसल्यास कवर्ण, हाळकुंड, तांदुळ, इ॰ दुसर्याचे घरीं नेउन ठेवितात तें जें घेउन मग विवक्षित स्थलीं जातात; मरणारास संकेतानें प्रस्थान करणें, गुंडाळणें, आटोपणें, इ॰ म्ह॰; ४, देवपूजा, दुकान, पुस्तकें, लिहिणें, इ॰ संबंधी उपकरणादि पदार्थांचा जो पसारा पडतो तें; ५, प्रस्थ प्रथमार्थी; ६, ईश्वरप्राप्तीचे जे योग सांख्य,वेदांत, इ॰ अनेक मार्ग आहेत ते प्र॰.

**प्रस्थानीवऱ्हाडी**, पु॰ वराकडील जो वऱ्हाडी तो.

**प्रस्थित**, ३ लिं॰ सं॰ देशांतरास जावयाकरितां ज्यानें प्रस्थान केलें तो.

**प्रस्फुट**, ३ लिं॰ सं॰ बहुत जनास समजली अशी जी गोष्ट इ॰ तो; २, चांगलें विकसित जें पुष्पादिक तो.

**प्रहर**, पु॰ सं॰ दिवसाचा किं॰ रात्रीचा जो चतुर्थांश तो.

**प्रहार**, पु॰ सं॰ शस्त्र, काष्ठ, हस्त, इ॰ कानें मनुष्य, वृक्ष, इ॰ कांवर जो आघात तो; २, ला॰ कठोर भाषणादिकांचा जो कोणेकावर प्रक्षेप तो; उ॰ म्ह॰ दंडप्रहार सोसवेल पण शब्दांचा प्रहार सोसवत नाहीं.

**प्रादक्षिण्य**, न० सं० प्रदक्षिणपणा.

**प्रादुर्भाव**, पु० सं० कांहीं अधिकरणाच्या ठायीं कांहीं पदार्थाची समजुतींत यावयाजोगी उत्पत्ति ती; उ० आज याचे शरीरांत ज्वराचा प्रादुर्भाव दिसतो.

**प्रादुर्भूत**, ३लिं० सं० प्रादुर्भाव पावला जो तो.

**प्रादेश**, पु० सं० टींच.

**प्रादेशमात्र**, ३लिं० सं० टींचभर.

**प्राधान्य**, न० सं० प्रधानपणा.

**प्रापक**, ३लिं० सं० प्रापण करणारा तो.

**प्रापंचिक**, ३लिं० सं० प्रपंचसंबंधी जो व्यवहार, ज्ञान, इ० तो.

**प्रापण**, न० सं० कांहीं पदार्थादि कोणेकास किं० कोणेक स्थलीं प्राप्त करण्याचा व्यापार तें.

**प्रापित**, ३लिं० कोणेकानें जो पावविला तो.

**प्राप्त**, ३लिं० सं० स्वगतीनें किं० परगतीनें किं० कालादिगतीनें संबद्ध व्हावयाजोगा जो जाला उपस्थित झाला ते उभयतां परस्परें; उ० जातां जातां मध्यें डोंगर प्राप्त झाला, सूर्योदयास मी डोंगरापाशीं प्राप्त झालों; मला दुःख प्राप्त झालें; २, जें करितां गत्यंतर नाहीं अशा प्रकारें उपस्थित झालें कांहीं एक कर्म या अर्थी विधिविशेषणता; होणें, असणें, पडणें, इ० कांचें वि०; उ० सर्कारचा हुकूम आला तेव्हां जाणें प्राप्त आहे; ३, स्त्री० प्राप्ति प्रथम तृतीयार्थी.

**प्राप्तांश, प्राप्तंश**, पु० सं० कोणेक व्यवहारादिकांपासून होत्येजी मिळकत तो.

**प्राप्ति**, स्त्री० सं० शेत, सावकारी, इ० कांपासून मिळतेंजें द्रव्यादिक किं० त्याचा लाभ ती; १, सुख, दुःख, रोग, इ० कांचीजी लब्धि ती; २, खुद्दरत.

**प्राप्तिपुरुष**, पु० जास भगवत्स्वरूपाचा साक्षात्कार झाला आहे असाजो साधू त्यास म्ह०

**प्राप्त्यंश**, पु० सं० प्राप्तांश.

**प्राप्य**, ३लिं० सं० गत्यादिकानें प्राप्त करायास योग्य तो.

**प्राबल्य**, न० सं० प्रबलपणा.

**प्राभाकर**, पु० सं० प्रभाकर म्हणून कोणी मीमांसक होता त्याचा मतानें जो चालणारा तो.

**प्रामाणिक**, ३लिं० सं० सप्रमाणजो भाषणादिव्यवहार किं० तादृश व्यवहार कर्ताजो पुरुष तो.

**प्रामाण्य**, न० सं० सप्रमाणता.

**प्रामाण्यग्रह**, पु० सं० कांहीं एक गोष्टीविषयीं हें सप्रमाण असाजो ग्रह तो.

**प्रामादिक**, ३लिं० सं० प्रमादामुळें अयथास्थित जो भाषणादि व्यवहार तो.

**प्रायः**, अ० सं० बहुत करून.

**प्रायश्चित्त**, न० सं० केलेल्या पापाचा किं० कर्मामध्यें वैगुण्य झालें असतां तज्जनित प्रत्यवायाचा परिहार व्हावा म्हणून शास्त्रांत उपवासादिक में सांगितलीं आहेत तें; २, ला० कांहीं लाहान मोठी चूक झाली असतां तदनुसार राजा, ईश्वर, धनी, यांपासून दंड होतो त्यास म्ह०

**प्रायश्चित्ती**, ३लिं० सं० कांहीं एक दोष पडल्यामुळें प्रायश्चित्तास योग्य झाला तो.

**प्रायिक**, ३लिं० सं० अवच्छेदकावच्छेदेंकरून चालतें असें नव्हे कदाचित् व्यभिचारही दिसतो असेंजें प्रमाणादिक तो.

**प्रायोपविष्ट**, ३लिं० सं० प्रायोपवेशनकरून बसलेला तो.

**प्रायोपवेशन**, न० सं० जीवितास कंटाळलेला मनुष्य अन्नोदकादिसर्वविषयांचा त्याग करून मरण येईतोंपर्यंत ईश्वरस्मरण करीत एकासनीं बसावें असाजो नियम धरितो तें.

**प्रारब्ध**, न० सं० वर्तमानदेहाचें आरंभक जें कर्म जें या देहानें भोगिल्यावांचून चुकत नाही तें; २,३लिं० आरंभिलेंजें कर्मादि तो.

**प्रारंभ**, पु० आरंभ.

**प्रारंभणें**, आरंभणें.

**प्रारीप्सित**, ३लिं० सं० प्रारंभ करण्याविषयीं कर्त्यानें इच्छिलाजो व्यवहार, ग्रंथ, इ० तो.

**प्रार्थक**, ३लिं० सं० प्रार्थना करणारा तो.

**प्रार्थन**, न० सं० ईश्वर, राजा, इ०कानीं आपल्या इष्टकार्याविषयीं अनुकूल व्हावें ह्मणून आपल्यास कांहीं द्यावें ह्मणून जी विनयपूर्वक याचना करितात तें

**प्रार्थना**, स्त्री० प्रार्थन.

**प्रार्थनीय**, ३लिं० सं० राजा, गुरू, इ० थोरांपाशीं मागायाचें जें कांहीं एक किं० ज्यापाशीं मागायाचें तो राजा, गुरु, इ० तो.

**प्रार्थिणें**, प्रार्थिन करणें.

**प्रार्थित**, ३लिं० सं० ज्याची प्रार्थना केली तो राजादिक किं० त्यापाशीं ज्याविषयीं प्रार्थना केली तें कार्य, परार्थ, इ० तो.

**प्रालब्ध**, न० प्रारब्ध प्रथमार्थीं.

**प्रावण्य**, न० सं० प्रवणपणा.

**प्रावरण**, न० सं० शरीरावर पांघरूण जें वस्त्रादि तें.

**प्रावीण्य**, न० सं० प्रवीणपणा.

**प्रावृट्काल**, पु० सं० वर्षाकाल.

**प्राशक**, ३लिं० सं० प्राशन करणारा तो.

**प्राशणें**, पिणें.

**प्राशन**, न० सं० जलादिकाचें जें पान तें.

**प्राशनीय**, ३लिं० सं० प्राशन करण्यास योग्यजें जलादिक तो.

**प्राशस्त्य**, न० सं० प्रशस्तपणा तें.

**प्राश्निक**, ३लिं० सं० प्रश्नसंबंधीजो ग्रंथादिक किं० प्रश्न सांगायास जाणतो जो ज्योतिषी इ० तो.

**प्रास**, पु० सं० दोन, तीन, चार, इ० अक्षरांची अनुपूर्वी एक आली ती पुनःपुनः अर्थभेद असून यावी असाजो श्लोकादि ग्रंथामध्यें शब्दालंकार असतो तो; उ० अन्या धन्या कन्या अन्यायन्याय जाणत्या होत्या, एथें अन्या अन्या असा प्रास आहे; २, भाला.

**प्रासंगिक**, ३लिं० सं० प्रसंगानेंजें प्राप्त तो; उ० प्रासंगिक गोष्ट संपवून प्रकृत कथा चालूं या.

**प्रासाद**, पु० सं० देव, राजा, इ० कांचें जें मंदिर तें.

**प्रासादप्रतिष्ठा**, स्त्री० सं० नूतन देवालय बांधिलें असतां तेथें पूजादिकर्मास योग्य ना यावी ह्मणून जो संस्कार करितात ती.

**प्रासादिक**, ३लिं० सं० देव, साधु, इ० कांपासून प्रसाद

प्रसादत्वेंकरून मिळालाजो पदार्थ तो; २, ईश्वर कृपाविशिष्ट मनुष्यानें केलाजो ग्रंथादिक तो: ज्यावर सर्वांची भक्ति असती भक्तीनें श्रवणादि केलें असतां तदनुरूप ज्ञानादि होणें; ३, रोग्यास बरें करण्याविषयीं, शिष्यास पढविण्याविषयीं, हातीं धरिलें असतां यश येतें असाजो वैद्य, गुरु, इ० त्यास ह्म०

**प्रासूतिक**, ३लिं० सं० प्रसवसंबंधी वेदना, वायु, इ० तो.

**प्रास्ताविक**, ३लिं० सं० प्रसंगीं उपयोगीं पडावयाचा असा श्लोक, ह्मण, इ० तो.

**प्रास्तुत्य**, न० प्रस्तुतपणा.

**प्रास्थानिक**, ३लिं० सं० प्रस्थानसंबंधी मुहूर्त, साहित्य, इ० तो; २, न० प्रस्थान द्वितीयार्थीं.

**प्राह्न**, पु० त्रिधा विभक्त दिवसाचा प्रथम भाग तो.

**प्राज्ञ**, ३लिं० सं० बुद्धिमान् असून शास्त्रादिविषयादिजो जाणतो तो.

**प्रिय**, ३लिं० सं० जो ज्यास आवडता मनुष्य, पदार्थ, गोष्ट, इ० तो; २, पु० नायिकेसजो नायक तो; गान प्रिय आहे ज्यास तो गानप्रिय, भक्तिप्रिय, इ० स० जाणावे.

**प्रियकर**, ३लिं० सं० प्रिय.

**प्रियंगु**, पु० सं० राळा.

**प्रियतम**, ३लिं० सं० अतिशयेंकरूनजो प्रिय तो; २, पु० नायक.

**प्रियतमा**, स्त्री० नायिका.

**प्रियंवद**, ३लिं० सं० प्रियभाषी.

**प्रिया**, स्त्री० सं० स्वस्त्री, इ० नायिका ती.

**प्रीणन**, न० सं० कोणेकास दान, सेवा, इ० केंकरून संतुष्ट करण्याचा व्यापार तें.

**प्रीत**, ३लिं० प्रीति पावलाजो तो; २, स्त्री० प्रीति.

**प्रीति**, स्त्री० आवड; २, कोणेकाचें परस्परजें सौरस्य ती; ३, सत्तावीसयोगांतील दुसराजो योग ती.

**प्रीतिदान**, न० कोणेकाच्या विद्यादि सद्गुण पाहून संतुष्ट होऊन जें द्रव्य, वस्त्र, इ० देतात तें.

**प्रीतिपात्र**, न० सं० कोणेकाचे अत्यंत प्रीतीचें स्त्रिया, इ० मनुष्य त्यास ह्म०

**प्रीतिवाद**, पु० सं० अंतःकरणांत किलमिष नसतां कांहीं एक विषयावरजो परस्परांच्या प्रीतीनें वाद होतो तो.

**प्रीतिविवाह**, पु० सं० वधुवरांचें परस्पर घटित न पाहतां जो विवाह करितात तो.

**प्रीतिसंगम**, पु० सं० दोन नद्या केवल समोरासमोर येऊनजो संगम होतो तो.

**प्रीत्यर्थ**, अ० सं० कांहीं एक पदार्थाचे किं० कार्याचे उद्देशानें तिकडे द्रव्यादि खर्चणें, जाणें, इ० कांचें वि०; उ० शेत्ताप्रीत्यर्थ हजार रुपये खर्च पडला.

**प्रेत**, न० पु० जीव गेल्यानंतरजो देह अवशेष असतो तें तो; २, सपिंडयंतउत्तरक्रिया होऊन पितृत्व प्राप्त ज्यास झालें नाहीं तो मेलेला मनुष्यादि.

**प्रेतकला, प्रेतकळा**, स्त्री० मृत्यु आसन्न आला ह्मणजे कोणेकाचे मुखावर पूर्वच्छायेचा

लोप होउन निस्तेजस्कपणा येतो ती; २, अपश ब्द, फजीती, इ॰ केंकरून जी तोंडावर कालिमा येती ती.

प्रेतकार्य, न॰ सं॰ मृताचीजी उत्तरक्रिया तें.

प्रेतभूमि, स्त्री॰ सं॰ श्मशान.

प्रेत्या, पु॰ कर्मांतर्या.

प्रेम, न॰ सं॰ परस्परांचें अत्यंतजें सौरस्य तें; २, प्रियपदार्थाचा संबंध झाला असतां त्याचा प्री तीनें अंतःकरण केवल तदेकाग्र होती असा जो अवस्था विशेष हो तो तें; ३, कोणेक विषया च्याठायीं किं॰ पुत्रादिपदार्थाच्याठायीं जी अति शयित प्रीति असती तें.

प्रेमपान्हा, पु॰ प्रियजो पुत्रादिक त्याचा दर्शना दिसंबंधानें जो पान्हा येतो तो.

प्रेमल, प्रेमळ, ३ लिं॰ ईश्वरभक्ति, कथा, इ॰ कां च्याठायीं अतिशयित ज्यास प्रेम तो.

प्रेमा, पु॰ सं॰ प्रेम.

प्रेमाश्रु, पु॰ न॰ सं॰ प्रेम दाटल्यामुळें जो अश्रु ये तो तें तो.

प्रेरक, ३ लिं॰ सं॰ प्रेरणा करणारा तो.

प्रेरण, न॰ सं॰ कोणेकास गमनादिकार्याच्याठायीं प्रवृत्त करण्याचा व्यापार तें.

प्रेरणा, स्त्री॰ सं॰ प्रेरण.

प्रेरणें, कोणेकास प्रेरित करणें

प्रेरित, ३ लिं॰ सं॰ प्रेरणा केली आहे ज्यास तो.

प्रेषक, ३ लिं॰ सं॰ कोणेकास ग्रामांतरादिस्थलीं पाठविणारा तो.

प्रेषण, न॰ सं॰ पाठविण्याचा व्यापार तें.

प्रेषणीय, ३ लिं॰ सं॰ प्रेष्यप्रथमार्थी.

प्रेषणें, पाठविणें.

प्रेषित, ३ लिं॰ सं॰ पाठविला तो.

प्रेष्य, ३ लिं॰ सं॰ पाठवायास जो योग्य तो; २, पु॰ से वक तो.

प्रेक्षक, ३ लिं॰ सं॰ प्रेक्षण करणारा तो.

प्रेक्षण, न॰ सं॰ अवलोकन.

प्रेक्षणें, अवलोकिणें.

प्रेक्षित, ३ लिं॰ अवलोकित

प्रोत्सहन, न॰ सं॰ युद्धादिकाच्याठायीं कोणेका सस्तुत्यादिद्वारा उत्साह आणण्याचा व्यापार तें.

प्रोत्साह, पु॰ सं॰ युद्ध, दान, इ॰ कांच्याठायीं कोणेकास उत्कृष्ट झाला जो उत्साह तो.

प्रोत्साहक, ३ लिं॰ सं॰ प्रोत्सहन करणारा तो.

प्रोत्साहित, ३ लिं॰ सं॰ प्रोत्सहन केलें ज्याचें तो.

प्रोषितभर्तृका, स्त्री॰ सं॰ प्रवासीं आहे पति जीचा अशी जी स्त्री ती.

प्रोक्षण, न॰ सं॰ पदार्थाचा अपवित्रपणा जाउ न शुद्ध व्हावा म्हणून जल, गोमूत्र, इ॰ कानें जें सेचन तें.

प्रोक्षणें, प्रोक्षित करणें.

प्रोक्षित, ३ लिं॰ सं॰ जलादिकानें प्रोक्षण केलें आहे ज्याचें तो.

प्रौढ, ३ लिं॰ सं॰ वयानें किं॰ बुद्धीनें जो प्रगल्भ तो; २, कोवळेपणा ज्यामध्यें नाहीं सभ्यांस मान्य असा शब्द, भाषण, व्यवहार, इ॰ तो; प्रौढ आहे बुद्धि ज्याची अशा अर्थी प्रौढमति, प्रौढ

प्रकाश, इ० स० आणावें.

**प्रौढप्रताप**, ३ लिं० सं० रणादिकाचा ठायीं ज्याचे प्र तापाची मोठी ख्याति झाली आहे तो.

**प्रौढा**, स्त्री० सं० मदनावस्थेनें जीची लज्जा जिंकली आहे अशीजी नायिका ती.

**प्रौढि**, स्त्री० सं० प्रौढपणा ती.

**प्रौढिवाद**, पुं० सं० पंडितादिकच्यानें आपल्यापे क्षां जड पुरुष गाठ भेटेल तेव्हां पाहून घेउं अशा बुद्धीनें वक्तव्यांशावर दोषाचा विचार पुरतेपणीं न करितां केलेलें जें भाषण तो.

**प्लवंग**, पुं० सं० चाळिसावा संवत्सर तो; २, वानर.

**प्लक्ष**, पुं० सं० एक वृक्ष आहे.

**प्लीहा**, पुं० सं० उदररोगांत भेद आहे.

**प्लुत**, पुं० सं० तीनमात्रा लांब उच्चार ज्याचा असा जो आकारादि स्वर तो.

**प्लुति**, स्त्री० सं० पक्षी, अश्व, मंडूक, इ० कांचा उडत जी गति ती.

---



**फकडी**, ३ लिं० जास पांकळ्या एकेरी असतात असेंजें आस्वन, तगर, मखमाल, इ० पुष्प तो आणि तादृश पुष्पें जाजवर येतअसतात असेंजें आस्वन इ० फुलझाड तो.

**फकत**, अ० फक्त.

**फकफक**, अ० फकाफक.

**फकस्त**, अ० फक्त.

**फका**, पु० फक्का.

**फकाकां**, अ० फकाफक.

**फकांडी**, स्त्री० को० जीमध्यें स्वार्थ नाहीं, परमार्थ हीनाहीं, कोरडें कालहरण मात्र होतें अशीजी कोणी रिकामटवळेपणें सांगतो गोष्ट तीस स्त्र० मारणें धातुयोगीं प्र० प्रा० अनेकवचनांत; २, ३ लिं० फकांडया मारण्याचा स्वभाव ज्याचा तो मनुष्य.

**फकाणा**, पु० फक्का.

**फकांदा**, पु० फक्का.

**फकाफक**, अ० अनु० फक्के मारमारून कोरडे पोहे पीठ, इ० खाणें; मुष्ट्यादिकांनीं घेघेउन गुलाल इ० फेंकणें; एकामागून एक एकामागून एक उभडयेत असें ओकणें, इ० कांचें वि०.

**फकिका**, स्त्री० कांहीं एक अर्थाचे प्रतिपादनार्थ छंदोलंकारादिरहित ग्रंथकारानें रचित जीं दाक्यें तीं प्र०.

**फकिरी**, स्त्री० फकीरपणा; २, डोलयांचे दिवसात फकीरांस देतात जी भिक्षा ती; ३, ३ लिं० फकीरसंबंधी जो वेश स्वभाव इ० तो.

**फकिरीद्राक्ष**, न० द्राक्षांत एक जाति आहे.

**फकी**, स्त्री॰ फक्की.

**फकीर**, पु॰ जातीचा यवन असून प्रपंच सोडून विरक्त होत्साता ईश्वरभजनीं लागलेला जो तो; २, डोल्यांचे दिवसामध्यें त्या देवतेचा प्रीत्यर्थ आंगावर नाडे घालावे, उपास करावा, भिक्षा मागावी, इ॰ रूप व्रत जाणें घेतलें आहे तो त्या दिवसांत; ३, ला॰ ज्यास मागेंपुढें कोणी नाहीं असा जो संसारांत एकाकी त्यास ह्म॰.

**फकीरफुकरा**, पु॰ फकीर, गोंसावी, इ॰ जो कोणी तो.

**फकीरी**, स्त्री॰ ३ लिं॰ फकिरी.

**फकीरीद्राक्ष**, न॰ फकिरीद्राक्ष.

**फक्कड**, ३ लिं॰ लोकांस न गणितां, कोणाची अपेक्षा न धरितां, आपल्या उत्साहानें स्वतंत्रपणें वर्तणारा असा जो तो.

**फक्कण, फक्कन, फक्कर**, अ॰ अनु॰ फकाफक परंतु खाणें, फेंकणें, इ॰ क्रियांस एकवार कल्प असतांच हें वि॰

**फक्का**, पु॰ पोहे, लाहीपीठ, औषधादि चूर्ण, इ॰ कोरड्या पदार्थांचा हातानें तोंडांत टाकितां न जो ग्रास तो मारणें इ॰ धातुयोगीं म॰.

**फक्किका**, स्त्री॰ फकिका.

**फक्की**, स्त्री॰ लहान जो चूर्णादिकांचा फक्का ती.

**फक्त**, अ॰ विवक्षित अर्थाशीं सहवर्त्तणारे जे इतर कोणी अर्थ त्यांच्या वृत्ति द्वारा त्या विवक्षित अर्थाचें वर्णित व्य जें केवलत्व त्याचें वाचक हें अव्यय; उ॰ फक्त यजमानास मात्र बलावा भडव्याकांहीं नका; पेंढार्यांनीं फक्त सोनें आणि रुपें नेलें वस्त्र भावरणास कांहीं शिवलें नाहींत.

**फकुदिनी, फकुदिशीं**, अ॰ फक्कन.

**फजितखोर**, ३ लिं॰ फजीतखोर.

**फजिता**, पु॰ दे॰ फजिती; २, जामध्यें पाणी, पीठ, इ॰ अधिक झाल्यामुळें किं॰ स्वादिष्टतेस कारण जें मसाला, फोडणी, इ॰ तें नसल्यामुळें थाईट लागायासारिखा झालेला जो वरण, सांभारें, आम्ररस, इ॰ कांहीं पानळ पदार्थ त्यास ह्म॰.

**फजिती**, स्त्री॰ लोकांत उपहास व्हावयाजोगी जी कोणेकास अप्रतिष्ठा प्राप्त होत्ये ती; २, आपल्ये शक्तीपेक्षां अधिक अडकांहीं संकटादि प्राप्त झाल्यामुळें कसें करूं काय करूं असें वाटायाजोगी होत्ये जी अवस्था ती.

**फजीत**, ३ लिं॰ व्यवहारापासून येत असतो जो वेडसंरेपणा ह्मणून दोष तो ज्याचे पदरी आला आहे तो; वासना फजीत करणें ह्म॰ पदार्थभक्षणादि विषयक उठलेली जी इच्छा ती ईषन्मात्र किं॰ यथाकथंचित् त्या पदार्थाचे भक्षणादिकें करून घालवली अशी करणें.

**फजीतखोर**, ३ लिं॰ कितीही फजीती झाली तथापि लाज न धरितां पुनः पुनः तसेंच कर्म करीत असावें अशे स्वभावाचा जो तो.

**फजीता**, पु॰ फजिता.

**फजीती**, स्त्री॰ फजिती.

**फजीन**, न॰ वाडी, शेत, इ॰ कोणेकाचें जें स्वसत्ताक ठिकाण तें

**फजीनदार**, पु॰ ठिकाणदार.

**फट**, स्त्री॰ कोणेक अर्थांचा परस्परें केवळ मिळून निबिड संयोग नझाल्यामुळें मध्यें राहिला असतो जो यत्किंचित् अवकाश ती; २, ला॰ भाषणादि व्यवहारीं समर्था न्यूनाधिक भावादि व्हावयाजोगी असते जी जागा ती; ३, रा॰ दुसऱ्यास फटवायाकरितां कोणी कांहींएक करितो जी लबाडी ती; कोणेकास फट म्यणणें त्य॰ धिक्कारार्थ यत्किंचित् दुःशब्द बोलणें, मा॰ निषेधविषयीं म॰; त्य॰ फट म्यणतांच्र त्यहत्या; रांड, लंडी, फजीती, इ॰ शब्दांचे मागें याचा त्याला अर्थाचा अतिशय द्योतनार्थ याचा म॰; उ॰ हें काम जर मी न केलें तर लंडी नव्हे फटलंडी म्यण; त्य॰ रांडजवळ रांड गेली आणि फटरांड झाली.

**फटक**, पु॰ फटीक.

**फटकडी**, स्त्री॰ फटकी; २, फटाका; ३; बांध्यानें ठेंगणी, मडपातळ, छानदार, अशीजी स्त्री तिला म्य॰.

**फट,-,कण,-कन,-कर,-दिनी,-दिशीं**, अ॰ अनु॰ अकस्मात् शब्द व्हावयाजोगें फळादिखालीं पडणें, बारउडणें, कोणी उडीमारणें, विचारादि न करितां कांहीं एक बोलणें, मारणें, इ॰ कांचें वि॰.

**फटकणें**, फटफट शब्द होई असें शूर्पादिकानें धान्यादि झपाट्यानें पाखडणें; २, झडपणें मथमार्थी; ३, कोणकानें अधिष्ठित स्थळसमुदाय. अनेकानीं आरंभिलेला व्यवहार, इ॰ झटकन सोडून एकाएकीं त्यापासून एकीकडे होणें; ४, न॰ अग्न्यादि फटकायास साधनभूत जो विष्णुण्यासारिखा पदार्थ केला असतो तें.

**फटकफटक**, अ॰ पायांबरोबर घट्ट बसला नव्हे, जो जोडा, किं॰ पाखडलेयेळेस वाजणारें जें सूप इ॰ संबंधी जो अनेकवार शब्द त्याचें अनु॰ चालणें, वाजणें, इ॰ कांचें वि॰.

**फटकफळी**, स्त्री॰ आंतआसाणा इ॰ कांचें फळ, किं॰ पाल्याची गुंडळी इ॰ घालून गजानें रेंटलें असतां जी पासून आवाज होतो अशी वेळूची नळी करितात ती; २, फटकडी तृतीयार्थी.

**फटकळ**, ३ लिं॰ मागें पुढें पाहतां फटकन एखाद्यास शिवी द्यावी, किं॰ बीभत्स भाषण करावें, अशा स्वभावाचा जो तो, आणि त्याचें तें भाषण आणि तोंड तो; २, कों॰ जा मध्यें अनेक संकटें प्राप्त होतात असा विषम जो काल तो.

**फटका**, पु॰ काठी, चाबूक, शस्त्र, हात, तोबा, इ॰ कानीं फटशब्द होई असा ताडनार्थ करितात जो प्रहार तो.

**फटकाफटकी**, स्त्री॰ कों॰ हातानीं, किं॰ काठी इ॰ कानीं एकमेकांस अल्पस्वल्प मारावें, शिवी गाळकरावी, इ॰ रूप होतो जो व्यापार ती.

**फटकाफटकीं**, अ॰ तडकाफडकीं.

**फटकारणें**, कोणेक अर्थ फटकन आत्मसात्करणें, किं॰ कोणेक काम फटकन करून टाकणें; लाघव, अनायासता, त्वरा, इ॰ डौल दाखवायाचा असतां मेळवणें, शिकणें, धरणें, इ॰ धातूचे अर्थी फटकारणें याचा प्रयोग करितात.

**फटकारा**, पु॰ फटका; २, कोणेक कार्यीं प्रवृत्ति होण्यास प्रयोजक कर्ता इ॰ कांचे अंगीं उठतात जें एकेक वेगानें घेऊन प्रयत्न तें म॰; उ॰ आलों तो पहिल्या फटकाऱ्यास हजार रुपये मिळवले; ३, कांहींएकावर लागला असतां बळकट प्रहार व्हावयाजोगा

याओगा मोठ्या वेगानें येतोजो धारा,पाउस, इ॰ त्याचाजो झपाटा तो ;४, दे॰ कोणेकास होतोजो भुताचा झपाटा तो .

**फटकावणें**, फटकारणें.

**फटकी**, स्त्री॰ तुरटी ह्मणून एक तुरट पदार्थ आहे ती . .

**फटकुरी**, स्त्री॰ कंबलास चिंदें ह्म॰

**फटकुर्या**, पु॰ घोंगडया.

**फटकून**, अ॰ कोणेकापासून एकीकडे होउन वेगळेपणें मनुष्यादिकानें राहणें, असणें, इ॰ कांचें वि॰ ; उ॰ मंडळींनजेव्हां कलह होउं लागला तेव्हां मीं कंटाळून फटकून राहिलों .

**फटकूर**, न॰ फटकुरी.

**फटफट**, अ॰ अनु॰ अनेकवार अव्यवहितपणें एकामागून एक एकामागून एक अशेप्रकारें कोणेकास अपशब्द बोलणें काठी, इ॰ कानें मारणें फलादि पदार्थानें भूम्यादिकांवर पडणें किं॰ पडत्येसमयीं वाजणें, इ॰ कांचें वि॰

**फटफटां**, अ॰ फटफट.

**फटफटीत**, ३ लिं॰ नीरक्तजें शरीर तदवयव, वस्त्र, रौप्य, चांदणें, प्रातःकालींचाउजेड, इ॰ कांचें तन्निमित्तक पांढरेपणाचा अतिशय वाच्यअसतां विशेषण होतें .

**फटफटें**, न॰ केळीचे डांगेचा दांडा किं॰ अन्य कांहीं काष्ठ यांचें फटफट शब्द व्हावयाजोगें मुलांसाठीं खेळणें करितात तें ; २, खटखटें प्रथमार्थी.

फट

**फटवण**, स्त्री॰ कोणेकास फटविण्याकरितां लबाडीची करितातजी रचना ती ; २, मुलांस फटवायाकरितां त्यांचे हातावर जें कांहीं खाउ, इ॰ देतात ती.

**फटवणें**, कोणेकास मिषादिकानें वंचित करणें .

**फटाकफळी**, स्त्री॰ फटकफळी.

**फटाका**, पु॰ पोटींदारु घालून कागदाची घडी किं॰ गुंडळी असत्ये जिला आग लाविली असतां आवाज होतो तो ; २, आंबकादिल्हाअसतां वायूचे योगानें फट्असा शब्द व्हावयाजोगी एक प्रकारची जी कागदाची घडी करितात तो.

**फटांगा**, ३ लिं॰ कों॰ फताडा द्वितीयार्थी.

**फटाटां**, **फटाफट**, अ॰ फटफट.

**फटावळ**, स्त्री॰ आम्रफलादिपदार्थांचा एकामागून एक एकामागून एक फटाफट पडनअसावें अशेप्रकारें होतोजो पात ती.

**फटिंग**, पु॰ रांड,पोर, इ॰ खटलें ज्याचेपाशीं नाहीं असाजो प्रपंचांत एकाकी तो .

**फटीक**, पु॰ स्फटिक शब्दाचा अपभ्रंश परंतु चांदणें इ॰ कांवर पांढरेपणाचा अतिशय द्योतनार्थ आरोपानें मात्र प्रयोग करितात .

**फट्ट**, ३ लिं॰ फटफटीत .

**फटया**, पु॰ दुसर्यानें दबावणी दाखविली असतां एकाएकी भ्यावयाचा नाहीं आणि हें केलें असतां काय होईल कसें होईल असें वाटून ज्याचें अवसान गळत नाहीं असा धीट निःशंक

जोतो

ओतो.

**फटयाळ**, ३लिं० कों० फटकळ प्रथमार्थी.

**फड**, पु० लिहिणें, नाचणें, पथावळी लावणें, पंचा इतकरणें, इ० व्यवहारांची आपआपल्या मांडा नें सहित अशी प्रवृत्तपणें जी स्थिति तो; फड मारणें, संभाळणें, इ० स्थळीं प्रसंगीं जें उचित तयोगानें तो प्रसंग सुशोभितपणें पारपाडणें; २, प्रा० सर्कारसंबंधी लिहिणें, कुळें आणणें त्यांजकडील वसूल घेणें इ० कितीएक व्यवहा रांचें जें अधिकरण तो; ३, यांग्या, मिरचा, उुस, आलें, हळद, इ० कितीएक पदार्थांचें के लेलें जें शेत तो; ४, पोर्यासजवून तमाशाक रणारें जे तमासगीर त्यांचासमुदाय तो,

**फडकणें**, ध्वजादिकांस संबंध होउन लोंबतरा हिलेलें जें वस्त्रादि त्याणें फडफड शब्दकरि त हालणें.

**फडकरी**, पु० त्यात्या फडाचाजो अधिकारी तो.

**फडका**, पु० कों० फडकें; फडकाफाडून देणें स० तुकडा तोडून देणें; २, दे० लुगडयाचे आंतून नेसायाचा जो परकोर तो.

**फडकी**, स्त्री० लहानमुलानीं पांघरायाचें रंगीत वस्त्र आहे.

**फडकें**, न० वस्त्राचा जो तुकडा तें.

**फडचा**, पु० फडशा.

**फडणिशी**, स्त्री० फडनविशी.

**फडणीस**, पु० फडनवीस.

**फडतार**, **फडताळ**, न० आंत कांहीं ठेवायाक रितां भिंतीस चौकट फळ्या लावून जें पेटीसा रिखें स्थल करितात तें; २, दुकान इ० स्थलास पुढचे अंगास दरवाजा भिंत नकरितां समयीं पाहिजे तितके उघडलें जाई लावलें जाई अशा सोईची उभ्या फळ्या लावून जी भिंती सारिखी रचना केलीअसल्ये तें आणि तद्विशिष्ट जें तें दुकान इ० स्थल.

**फडनविशी**, स्त्री० हिं० फडनविसाचाजो अधि कार ती

**फडनवीस**, पु० सर्कारी कारभाराचें जें लिहिणें त्याजवर मुख्यजो अधिकारी असतो तो.

**फडनिशी**, स्त्री० फडनविशी.

**फडनीस**, पु० फडनवीस.

**फडफड**, अ० बंदूक इ० कांचें, अनेकवार वाता दिकानें हालणाराजो खडखडीत कागद, वस्त्र, इ० शिव्यादेण्यास प्रवृत्त जें तोंड इ० संबंधी शब्दाचें अनु० शिव्यादेणें, मारणें, वाजणें, इ० कांचें वि०.

**फडफडणें**, वस्त्र, कागद, सूप, इ० कानीं फड फड वाजणें; २, ला० कोणेकानें कोणेकातें उद्देशून क्रोधावेशानें शिवीगाळ इ० जे दुर्भाष ण शब्द तद्विशिष्ट होणें; योजलेलें जें मसलत लग्न, इ० कार्य किं० प्राप्त झालेला किं० प्रा प्त होईल अशाप्रकारें संभावितजो अधि कार, रोजगार, इ० त्याणें घडघडणें.

**फडफडवणें**, **फडफडावणें**, चपराक, चाबूक, इ० कानीं कोणेकास फडाफड मारणें; पक्षी त्याचपराक इ० कासही कर्मता; २, ला० युद्ध, वाद, इ० कांचाठायी कोणेकास पराजित करणें

करणें; २, विवाहादि कोणेक कार्य चांगलें यथास्थित व्हावें असें तात्पर्य न धरितां थोडक्यांत यथाकथंचित् उरकून टाकणें.

**फडफडां**, अ॰ फडफड.

**फडफडागत**, स्त्री॰ शेत, वाडी, गुरूं, ढोर, माणसें, इ॰ रूपजें संसारानें खटलें ती.

**फडफडाट**, पु॰ फडाड.

**फडफडीत**, ३ लिं॰ रुक्षपणामुळें ज्याचे कण परस्पर चिकटत नाहींत आणि कठिण असा जो भात, सांजा, घुगर्‍या, इ॰ पदार्थ तो.

**फडफर्मास**, स्त्री॰ राजा, मोकाशी, सुभेदार, इ॰ अधिकारी, पाटील, इ॰ कांस आज्ञा करून आणवितात जें शाक, भाजी, पान, पत्रावळ, इ॰ कांहीं ती.

**फडशा**, पु॰ देणें, घेणें, इ॰ व्यापारांची देणें, घेणें, इ॰ कें करून किं॰ कोणेक पदार्थाची खरचणें, भंगणें, इ॰ कें करून जी निःशेषता ती.

**फडसंपादणी**, स्त्री॰ फड मारून नेण्याचा जो व्यापार ती.

**फडा**, स्त्री॰ दशांक चिन्ह विशिष्ट जो सर्प त्याचा विस्तीर्ण झालेला जो कंठापासून वरचा विभाग ती; २, स्त्री॰ पु॰ निवडुंगास सर्पाचे फडेसारिखे जे अवयव असतात ते प्र॰; ३, आलें, वेखंड, हळद, इ॰ कांचा अनेक अवयव ज्यास फुटले असतात असा जो विशिष्ट कंद ती तो; ४, पु॰ शिंदी इ॰ कांचे झावळीचा केर रुणी, इ॰ करायाचे उपयोगी अनेक पात्यांनीं विशिष्ट जो तुकडा तो.

**फडाड**, पु॰ लाता, बंदुका, शिव्या, फटाका, इ॰ कांचें फडफड शब्दाचा जो अतिशय तो; उ॰ लातांचे फडाडापुढें दूध काढायाचा कांहीं उपाय नाहीं.

**फडाडां**, अ॰ फडफडां.

**फडाफड**, अ॰ फडफडा.

**फडी**, स्त्री॰ फडा प्रथमार्थीं.

**फडें**, न॰ गोफणीस किं॰ गलोलीस मध्यें खडा ठेवायासाठीं विणून जो सर्पाचे फणेसारिखा आकारविशेष केला असतो तें.

**फडयानिवडुंग, फडयानिवडुंग**, पु॰ **फडयें निवडुंग**, न॰ ज्यास फडे असतात अशी एक निवडुंगांत जाति आहे.

**फणका**, पु॰ मोहरी, मिरची, इ॰ पदार्थ शरीरास लागल्यामुळें अतिशयित होत्ये जी आग, दिविज्वरादियोगानें तप्त दश होतो जो संताप तो; २ कोणी मर्मोद्घाटनादि केल्यामुळें अकस्मात येतो जो क्रोधाचा वेग तो; ३, विंचू आपले नांगीनें करितो जो कोणेकावर प्रहार तो; मारणें, धा॰ प्र

**फणकारा**, पु॰ फणका द्वितीय तृतीयार्थीं.

**फणकावणें**, विंचवानें कोणेकास फणक्यानें विशिष्ट करणें

**फणफणणें**, ज्वर, क्रोध, इ॰ योगानें शरीर अतिसंतप्त होणें; २, ताक, दहीं, इ॰ अतिशयित आंबट झाल्यामुळें किं॰ मोहरी अतिशयित चढल्यामुळें वरफेंस याचा कांहीं शब्द व्हावा अशो दशेतें पावणें.

**फणफणीत**, ३ लिं॰ फणफणलेला जो तो.

**फणशी**, स्त्री॰ फणसासारिखा एक वृक्ष आहे;

२, ३ लिं० फणससंबंधी जें लांकूड किं० तन्निर्मित पाट इ० पदार्थ तो.

**फणस**, पु० एक वृक्ष आहे तो; २, त्याचें जें फल तो.

**फणसट**, न० फणसाचे फळास निंदेनें ल०.

**फणसपोळी**, स्त्री० बरके गरे घाटून त्याचा रस पान इ० कांवर पातळ लावून जो पोळी सारिखा पदार्थ करितात ती.

**फणसंबें, फणसांबा, फणसांबें**, न० पु० एखादे फणसाचे झाडास छत्राक सदृश एक अवयव फुटत असतो तें तो.

**फणा**, स्त्री० फडा प्रथमार्थी; २, पु० फडा तृतीयार्थी; ३, केळवंडीचे दांड्यास जे अनेक घडअसतात ते प्र० तो; ४, दे० गुह्माळ इ० कांचे ठायीं काहील इ० कांतील गूळ इ० निरपून काढायासाठीं लांकडाचें आउत केलें असतें तो.

**फणाणणें**, फणफणणें.

**फणी**, स्त्री० केशादिविंचरायास साधनभूत जो हस्तिदंत, काष्ठ, धातु, इ० कांचा अनेक दांत्यानीं विशिष्ट पदार्थ असतो ती; २, वस्त्र विणते समयीं तंतु दांसून बसवायाचे उपयोगी एक आउत असतें ती; ३, रा० फडी; ४, पु० सर्प.

**फणेर**, न० फणी, कुंकुवाचा करंडा, आरशी, इ० पदार्थ ठेवायासाठीं जुजदाना सारिखी विशर्बी केली असत्ये तें.

**फण्णा**, पु० दे० फन्ना.

**फतकण, फतकल**, स्त्री० थबकण.

**फतरडा**, ३ लिं० रा० फताडा प्रथमार्थी.

**फताडा**, ३ लिं० विशोभित दिसायाजोगा चापट असून पसरट जो शेंग, शिंग, मनुष्यादिकांचें तोंड, इ० पदार्थ तो; २, आडवीं बाहेर वाढत गेलेलीं जीं शिंगें किं० तद्विशिष्ट लैस, टोणगा, इ० पशु तो.

**फतुला**, पु० को० नपुंसक जो तो.

**फते**, स्त्री० वादयुद्धादि जें कांहीं मोठें काम त्याविषयीं प्रवृत्त जो कोणी त्याचा तें काम यथास्थित सिद्धीस गेल्यामुळें होतो जो उत्कर्ष ती; स्वारी, उद्योग, काम, इ० फते होणें ल० स्वाभिमतानुरूप सिद्धीस गेल्यामुळें जी उत्कर्षावस्था तद्विशिष्ट होणें.

**फतेमारी**, स्त्री० गलबतांत एक भेद आहे.

**फतेलश्कर**, न० शरीरानें अतिशयित स्थूल आणि अंगीं आटोप नाहीं असें जें मनुष्य, गुरूं, इ० त्यास ल०; २, पु० दे० कोण त्याही कामाचे ठायीं प्रवृत्त झाला असतां ज्याची प्रायः फते न होत्ये असा जो मनुष्य त्यास ल०.

**फत्तर**, पु० हिं० दगड, प्रायः लाक्षणिकार्थी प्र०.

**फत्तरफोड**, स्त्री० मूर्खास बोध करणें कांहीं एक कठीण विद्या शिकणें इ० रूप जें अति कठिण काम त्यास ल०; पक्षीं त्या कामाचें ही विशेषण होतें.

**फत्ते**, स्त्री० फते.

**फत्य**, न० दे० फते.

**फत्या**, पु० किल्याचे तटावर गस्ती बराबर चौक्याचौक्यानी फिरवायाचा एक सोटा असतो तो.

**फंद**, पु॰ हिं॰ बंडउठवावें, लोकांसलुटावें, दुसर्यावर ना हींनाहींत्या आदावती घालाव्या, फितूरकरावा, इ॰ रूपजे खेळ ते प्र॰, जेणेंकरून सर्कारचा अपराधी होतो; २, अबरूचे सभ्यजे लोक त्यांचेरीतीस विरुद्ध जे रांडबाजी, लावण्या ऐकणें, तमाशा करणें जुगारखेळणें, इ॰ मनस्वी खेळते प्र॰; ३, अयोग्यत्वेंकरून विवक्षित जो कोणेक व्यापार त्यास ह्म॰; उ॰ तुह्मीं इतःपर सावकारीनें फंदांत पडूं नका.

**फंदफितूर**, पु॰ फितूर इ॰ जो फंद तो.

**फंदी**, पु॰ हिं॰ नाच, तमाशा, दारू, भंग, इ॰ व्यसनें प्रसिद्धपणें बाळगून लोकमर्यादा नगणितां स्वछंदपणें वर्तणारा जो तो; २, ३ लिं॰ फंदफितूर करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**फद्या**, पु॰ तांब्याचें एक नाणें आहे.

**फना**, **फन्ना**, पु॰ कोणेक वस्तूचा खाणें, खरचणें, लुटणें, जाळणें, इ॰ द्वारा निःशेषपणें जो नाश तो.

**फर**, न॰ को॰ स्त्री॰ ग॰ पायांचे मूलप्रदेशाचे संधीस रुंदट झालेलें जें पायांचें हाड असतें तें ती.

**फरक**, पु॰ हिं॰ परस्पर अर्थानें परस्पर अर्थाशीं देशरूप कालरूप किं॰ न्यूनाधिकभावरूप जें अंतर तो; मनुष्यादिकानीं फरकहोणें ह्म॰ पैसहोणें.

**फरकटणें**, फरपटणें.

**फरकटा**, पु॰ फरगडा.

**फर,-कण,-कन,-कर,-कदिनी,-कदिशीं**, अ॰ अनु॰ वस्त्र, कागद, इ॰ फाडणें, पाय इ॰ निरसणें, इ॰ कांचें चि॰.



**फरकणें**, मनुष्यादिकानीं फरक होणें; २, फिरकणें; ३, दे॰ पाय इ॰ कानें फरकन निरसणें.

**फरकावणें**, शालजोडी, पितांबर, इ॰ उंचें वस्त्र फाटेल, चुरेल, लोळेल, इ॰ शंका नबाळगतां डौलानें प्रावरण, परिधान, इ॰ द्वारा शरीरावर धारण करणें.

**फरगडा**, पु॰ दे॰ कागद इ॰ कांवर शाई, इ॰ कांचा आडव्या उभ्या वांकडया तिकडया काढिलेल्या जा रेषा त्या प्र॰; २, भाषणामध्यें कोणी फोडिलो जे फांदाडे ते.

**फरडा**, पु॰ आपआपल्या कसबामध्यें पुरापटाईत जो वक्ता, लिहिणार, गाणार, मसलती, इ॰ त्यास ह्मणतात.

**फरडुकें**, न॰ दे॰ फरडूक.

**फरडुक्या**, ३ लिं॰ अनेक फरडुकें ज्याचे पोटांत असतात असा जो तो.

**फरडूक**, न॰ दृष्टांतार्थ सर्वत्र उपयोगीं पडाया जोग्या लहान लहान चमत्कारीक गोष्टी किं॰ ह्मणी, इ॰ वाक्यें असतात तीं प्र॰; २, जिलामागें पुढें कांहीं संबंध नाहीं अशी प्रकृत गोष्टीमध्यें निघते जी अप्रकृत लहानशी कांहींएक गोष्ट तें.

**फरद**, पु॰ फर्द.

**फरपट**, स्त्री॰ को॰ कोणेकास हात, तंगडी, इ॰ धरून फरफर ओढीत नेण्याचा जो व्यापार ती; काढणें धा॰ प्र॰.

**फरपटणें**, भूमीशीं कुळे, मांडया, इ॰ घसवटलेंजाई असें अधिष्ठितस्थलापासून एकीकडे सरणें.

**फरफट्या**, अ॰ कों॰ फरपटत फरपटत जाणें, येणें इ॰ कांचें वि॰.

**फरफट**, स्त्री॰ कों॰ फरपट.

**फरफटणें**, कों॰ फरपटणें.

**फरफट्यां**, अ॰ कों॰ फरफट्यां.

**फरफर**, अ॰ अनु॰ मनुष्यादिकांस भूमीवरून ओढीत नेणें, वस्त्रादि फाडणें किं॰ त्याणें फाटल्येसमयीं वाजणें इ॰ कांचें वि॰.

**फरफरणें**, फाडणें इ॰ प्रसंगीं वस्त्रादिकानें फरफर वाजणें.

**फरफरवणें, फरफरावणें**, कों॰ कोणाकास फरफर ओढणें.

**फरफरां**, अ॰ फरफर.

**फरश**, पु॰ फरशी तृतीयार्थी.

**फरशी**, स्त्री॰ दे॰ दगडाची जी चीपटी; २, त्याविशीं स्नान करायाची जागा इ॰ स्थलीं लहानशी करितात जी फरसबंदी ती; ३, परशुशब्दाचा अपभ्रंश; ४, ३ लिं॰ परशूचे चिन्हानें चिन्हित असें रुपया, अधेली, इ॰ नाणें तें.

**फरस**, पु॰ चिरेबंदी जी भूमि ती.

**फरसबंदी**, स्त्री॰ फरसरूप जी बंदिस्त ती.

**फरळ**, न॰ कों॰ नाचणी, हरीक, इ॰ कित्येक धान्यावरील जें टरफल तें.

**फरा**, पु॰ फर; २, मनुष्यें, घोडीं, इ॰ क्रमानें उभीं राहिलीं असतां होत्ये जी पंक्ति ती; ३, धान्यादि मोजायाचें एक माप आहे; ४, रा॰ कपाळ इ॰ कांवर कुंकुमादिकांचा नीटनेटका नळे मरासरी ओढलेला जो मोठा पट्टा तो.

**फरांटा**, पु॰ कों॰ फरगडा.

**फराफर**, अ॰ फरफर.

**फरारा**, पु॰ ध्वजास लांबजें फडकें बांधिलें असतें तें; २, ला॰ लांबलांब न असतां जो वस्त्राचा सोगा इ॰ त्यास म्ह॰.

**फरारां**, अ॰ फरफरां.

**फराशीस**, पु॰ टोपीवाल्यांत एक जाति आहे.

**फरास**, पु॰ कचेरी इ॰ कांचेठायीं बैठका घालणें राहुट्या डेरे, इ॰ उभे करणें इ॰ कामावर जे चाकर असतात ते म्ह॰.

**फरासखाना**, पु॰ हिं॰ राहुट्या, डेरे, कनाथा, बैठका, इ॰ सरंजाम ठेवायाचें जें स्थल तें आणि तो सरंजाम.

**फराळ**, पु॰ उपाहार; २, रा॰ पोहे, पीठ, फल, मूल, इ॰ जें उपहार साहित्य तें; ३, ला॰ बोलतांना, म्हणतांना, लिहितांना, मध्यें कांहीं अक्षरांचें होतें जें निगरण तें; उ॰ तुम्हीं घाईनें म्हणतां यामुळें कांहीं पदांचा फराळ होतो.

**फरी**, स्त्री॰ कों॰ अदमणपरिमाणाचें माप आहे.

**फरोक्त**, ३ लिं॰ हिं॰ विक्रीत.

**फरोक्तखत**, न॰ खरीदखत.

**फर्जी**, पु॰ हिं॰ राजाचा जो वजीर तो, बुद्धबळांचे खेळांत विशेषेंकरून प्रसिद्धि.

**फर्णादीन**, पु॰ गोमांतकी ओव्यांत एक जाति आहे.

**फर्द**, पु॰ हिं॰ आदोनचार, इ॰ व्यक्ति मिळून वस्त्र, अलंकार, इ॰ रूप विशिष्ट जोड होतो त्या व्यक्ति म्ह॰; उ॰ शालजोडीचे दोन फर्द दोघांनीं घेतले;

इ॰ गोठांचा जोड केला होता त्याचे तीन फर्द आहेत आणि एक फर्द चोरीने हारविला; २, नक्का हि ती यार्थी.

**फर्दी**, पु॰ नक्का.

**फर्मा**, पु॰ कोणेक अर्थाचे स्वरुपाची बोधक जी त्याची प्रत ती.

**फर्मान, फर्माना**, पु॰ हिं॰ ठिकाण, वतन, इ॰ संबंधी जी पातशाही सनद् ती.

**फर्मावणें**, राजा, धनी, इ॰ कानी सेवकादिकांस कोणेक गोष्ट आज्ञापिणें.

**फर्माशी**, ३ लिं॰ हिं॰ पदार्थ निर्मिणारा जो कोणी त्यास या या प्रकारचा पदार्थ कर अशी आज्ञा करून पाहिजे तसा करविला जो वस्त्र पात्रादि पदार्थ ती; २, ला॰ रासवटनव्हे असा उत्तम प्रतीचा जो कोणेक पदार्थ त्यास म्ह॰; फर्माशी मार इ॰ स्थलीं खूब परा काष्टेचा मार इ॰ अर्थ होतो.

**फर्मास**, स्त्री॰ हिं॰ अमुक काम कर कि॰ अमुक पदार्थ तूं पाठवून दे इ॰ रूप राजादिक सेवकादिकांस करितात जी आज्ञा ती; २, राजादि आज्ञापकाकडेस आज्ञाप्यजे सेवकादि त्यांही पाठविला जो कोणेक पदार्थ त्यास म्ह॰.

**फल**, न॰ कितीएक ओषधि वनस्पति यांस आपल्या तारुण्यावस्थेंत आल्यावर त्यांस प्रायः पुष्पानंतर अवयवविशेष उत्पन्न होतात असतो ज्यामध्ये प्रायः बीज असतें तें जेणे करून प्राण्यांचें जन्म सार्थक होतें; २, पदार्थ व्यापारमात्रापासून निष्पन्न होतें जें पुण्य, पाप, सुख, दुःख, द्रव्य, गुण, इ॰ कांहीं एक अपूर्व तें; फलोत्पादन फलोपधायक, इ॰ स॰ कोणेक व्यवहारादिकानें फला संयोग म्हणजे फलद्रूप होणें; ३, ग्रहयोग, उत्पात, इ॰ निमित्तानें सुख, दुःख, रोग, इ॰ जे भोक्त्यास करून प्राप्त होतें तें; ४, त्रैराशिकामध्यें प्रमाण आणि इच्छा या राशीहून विजातीय जो तृतीय राशि तें.

**फलकावणें**, फरकावणें.

**फलग्रंथ**, पु॰ ज्योतिःशास्त्रामध्यें गणिताव्यतिरिक्त शकुन मुहूर्त प्रश्न यांचीं शुभाशुभफलें ज्यामध्यें निरूपिलीं असतात असा जो ग्रंथ तो.

**फलत्यागी**, ३ लिं॰ कांहीं एक इष्टफल प्राप्त होण्याची वेळ आली असता त्यासमयीं कांहीं बुद्धीस विपर्यास होऊन रागें भरावें कोठें निघून जावें आणि त्या फलाचा त्याग करावा असा स्वभाव ज्याचा तो; २, कोणी दैवयोगानें फलास अंतर तो जो तो.

**फलद्रूप**, ३ लिं॰ विवक्षित फल ज्यापासून उत्पन्न झालें असा जो कोणेक अर्थ तो.

**फलभाग्य**, ३ लिं॰ सं॰ फलद्वारा उपभोग ज्याचा घडतो असें जें वृत्ति, भूमि, इ॰ तें.

**फलम**, पु॰ हिं॰ सुवर्णाचें एक नाणें आहे.

**फलश्रुति**, स्त्री॰ व्रत, स्तोत्र, यज्ञादिकर्म, इ॰ विषयक जो ग्रंथ त्यामध्यें त्याचें त्याचें फल सांगितलें असतें असा जो त्याचा विभाग तो; २, फलद्रूपतेची यार्थी म्ह॰, इ॰ गोष्ट झाली खरी आता रागें भरून फलश्रुति काय.

**फलाणा बिस्तान**, न॰ हिं॰ मदरफटर.

**फलाणा**, पु॰ अमुक या अर्थी हें सर्वनाम आहे.

**फलाणा बिस्ताना**, पु॰ अमुक तमुक.

**फलाणीबिस्तानी**, स्त्री० **फलाणेंबिस्तानें**, न० फलाणाबिस्ताना.

**फलाहार**, पु० फराळ तृतीयार्थावांचून.

**फलित**, ३ लिं० फळ आलें आहे ज्यास असा जो वृक्ष लता, इ० तो; २, फलद्रूप; ३, वाक्यादिकांपासून वाच्यादि वृत्तीनें निघतो जो अर्थ तन्माहात्म्यानें जें अर्थांतर भासतें जावर त्या वाक्यार्थाचें पर्यवसान होतें; उ० त्याची आज्ञा होईल तर मी जाईन यावरून तो त्याचे आज्ञेंत वागतो असें फलित होतें; उ० दिवसास येणार नाहीं या वाक्यावरून रात्रीं येईल असा अर्थ फलित होतो.

**फलितार्थ**, पु० कोणेक वाक्यादिकांपासून फलित जो अर्थ तो; २, फलश्रुति द्वितीयार्थी.

**फवारा**, पु० हिं० हजारा का रंज इ० कांचें छिद्रान्वित जें बोंड तें.

**फशीं**, अ० फसून जी संकटावस्था तींत पडणें, देणें, इ० प्र०; उ० सराईस धान्य घेतलें नाहीं यामुळें फशीं पडलों.

**फसकटणें**, मसलत इ० कोणेक गोष्टीनें सिद्धीस न जातां मध्येंच घडघडणें.

**फसकणें**, फसकटणें.

**फसकन**, - कर, - दिनी, - दिशीं, -, अ० अनु० धान्यादिकांचे राशींत हात खुपसणें, पाटी, इ० कांतून धान्यादि ओतणें, गोणी, इ० कानीं अकस्मात् फाटणें इ० कांचें वि०.

**फसकी**, स्त्री० सर्कारचा फड, पेंट, इ० कांचा रार्यी धान्यादिकांचें माप घेणारा जो शेट्या इ० अधिकारी तो मणास पसा इ० रूपजें हक्काचें धान्य इ० घेतो ती; माळेवीं पाटें, उजळणी चे दिवशीं पंतोजीस ओंजळ ओंजळ पसा पसा धान्य देतात ती; ३, स्त्रिया वर्षभर किं० श्रावण मासीं प्रतिसोमवारीं नियमानें शिवावर जो धान्याचा पसा वाहतात ती.

**फसगत**, स्त्री० व्यवहारीं संधान चुकल्यामुळें होतो जो फशीं पडलेपणा ती.

**फसगपत, फसगयवत**, स्त्री० फसगत.

**फसणें**, चिखल, रेती, इ० विशिष्टस्थलांत मनुष्य किं० गोमहिष्यादि पशूंनी फसकन आंत जाणें; २, ला० कोणेकानें कोणेक व्यवहाराचा परिणाम प्रतिकूल झाल्यामुळें अनिष्टावस्थेंत पडणें; ३, कोणेक व्यवहारानें कर्त्याची अनवधानता इ० कारणामुळें प्रतिकूल परिणामविशिष्ट होणें; ४, कोणाजवळ ठेविलेलें किं० कर्जी दिल्हेलें जें द्रव्यादि त्याणें आपले हातास न येई अशी अवस्थेंत पडणें.

**फसफशीत**, ३ लिं० मध्ये चिकणाई नाहीं असा जो पिष्टादि पदार्थ वाळवट जमीन वाळू इ० ती.

**फसफस**, अ० अनु० चालतेसमयीं वाळवेंत पाय रुतणें वाळू उडणें इ० वि०

**फसफसणें**, स० महिष्यादिकानीं फळफळ मुतणें.

**फसफसां**, अ० फसफस.

**फसल**, स्त्री० घोडें, मूल, इ० कांस पुष्ट करावया करितां ओला हरभरा, तूप, खारीक, इ० जें खुराक चारितात ती.

**फसलहंगाम**, पु० धान्यें पिकून सिद्ध आल्यानंतर वाटून्यें करून क्रयविक्रय व्यवहारयोग्यता जो

दिवसांत असत्ये असाजो काल तो.

**फसवणी**, स्त्री॰ कोणेकास फसविण्याचा जो व्यापार ती.

**फसव्या**, ३ लिं॰ दुसर्यास फसवावें असास्वभाव ज्याचा तो.

**फसाफस, फसासो**, अ॰ फसफस.

**फस्त**, ३ लिं॰ लुटणें, आवळणें, खाणें, इ॰ ह्यांनी निःशेष नाहींसा करून टाकला जो गांव, देश, अन्नादि पदार्थ, तो.

**फळ**, न॰ फल; २, पिठाचा एक भक्ष्य पदार्थ करित असतात तें; ३, दे॰ भाला, बरची, इ॰ कांस जें पातें बसवीत असतात तें.

**फळ —, कण, — कन, — कर, — दिनी, — दिशी**, अ॰ अनु॰ आधारबंध स्फटल्यामुळें एकाएकी लोट बाहेर पडे असें पाणी, इ॰ सांडुणें, मुतणें, इ॰ कांचें वि॰.

**फळकर**, ३ लिं॰ फळायाचे योग्यतेस आलेली जी गांय, म्हैस, इ॰ तो.

**फळकवणी**, न॰ अतिपातळ जो वरण, ताक, सांबारें, आंबटी, इ॰ पदार्थ त्यास निंदेनें म्ह॰.

**फळण**, स्त्री॰ गोमहिष्यादि पशूंचे फळायाचे जे दिवस ती.

**फळणें**, कोणेकानें कोणेकास फलद्रूप होणें; २, गोमहिष्यादि पशु किं॰ पक्षी, इ॰ कांचे स्त्रियांनी गर्भधारणार्थ मैथुनसंस्कार विशिष्ट होणें; ३, कों॰ उघडलेलें जें कवाड, खिडकी, फडताळ, इ॰ तें लावणें.

**फळफळ**, अ॰ अनु॰ दाणे, पाणी, इ॰ गळणें, म्हैस, इ॰ कांनी मुतणें, इ॰ कांचें वि॰.

**फळफळणें**, शब्द होई असें फळफळ मुतणें किं॰ पाणी इ॰ कांनी गळणें, सांडुणें, इ॰; २, कोणेकाचे दैवानें अकस्मात् उदयास येणें.

**फळफळो**, अ॰ फळफळ.

**फळफळावळ**, स्त्री॰ अनेक जातींचीं वगैरे बारीक लहान मोठीं जीं फळें ती.

**फळफळीत**, ३ लिं॰ फारच मोकळा झालेला जो भात, सांजा, डाळ, इ॰ पदार्थ तो; २, फिळफिळीत.

**फळभाजी**, स्त्री॰ भोंपळा, पडवळ, इ॰ फळरूप जी भाजी ती.

**फळवला**, पु॰ कचटतप एतदादिक जे अक्षरांचे पांच वर्ग ते म्ह॰.

**फळशाक**, स्त्री॰ फळभाजी.

**फळशोभन**, न॰ गर्भाधान म्हणून जो संस्कार तें.

**फळश्रूत**, स्त्री॰ फलश्रुतीचा अपभ्रंश.

**फळाफळ**, अ॰ फळफळ.

**फळावळ**, स्त्री॰ नानाप्रकारचीं जीं फळें ती.

**फळी**, स्त्री॰ लहान मोठा जो नक्ष्याचा तुकडा ती; २, आंत दुसर्याचा प्रवेश न व्हावया जोगी कडा यानें अवस्थित जी मनुष्य, पशु, मेघ, इ॰ कांची पंक्ति ती; ३, परस्परस्पर्धेनें होतात जे अनेक पक्ष त्या त्या पक्षानें अवलंबून होतात जे पृथक्पृथक् समुदाय ते म्ह॰.

**फळें**, न॰ कों॰ विहिरीचें तळीं जी चौकट बसवितात तीचीं जीं लांकडें तीं म्ह॰; २, नक्ष्याचा

सरासरी केला असतो जो झोपाळा तें; ३, मोठा आड ओबड धोबड जो तक्का तें; कोणेकाचें फळें पडणें म्ह० पिशाचोपद्रवानें लांकडासारखें शरीर ताठून पडणें.

**फांक**, स्त्री० आंबा, खरबूज, भोंपळा, इ० फळांचा किं० सूरणादि कंद इ० कांचा पुष्पांचे पाकळीसारिखा लांबट जो तुकडा ती; २, कों० शिमग्याचे महिन्यांत बोंब मारायाचे पूर्वी जीं बीभत्स वचनें म्हणत असतात तीं प्र०; ३, न० रा० घोणस, फुरसें, इ० कांचे आंगावर जे डाग असतात ते प्र०.

**फांकट**, ३ लिं० फांकटल्यासारिखे तिर्यक् पसरत गेलेले जे पाय, लांकूड, इ० तो; २, न० फाटक द्वितीयार्थी.

**फांकटणें**, मनुष्यादिकांचे पाय किं० तत्सदृश जें दुबेळकें इ० संबंधी दोन अवयव तेमध्यें ताण बसे असें दोहींकडे दोन पसरणें.

**फांकटी**, स्त्री० पादादिक दोन अवयव फांकटल्यामुळें ताणलेपणानें विशिष्ट जी स्थिति होत्ये ती.

**फाकंड**, न० रा० न्याय्यरीति सोडून वितंडवादाचें जें फरडूक तें.

**फांकडा**, ३ लिं० अक्कडबाज जो शिपाई, नायिका, नायका, वक्ता, कारकून, इ० तो.

**फाकंडी**, ३ लिं० रा० अनेक प्रकारचीं फाकंडें बोलण्याचा स्वभाव ज्याचा तो आणि त्याचें भाषणादि तो.

**फांकणें**, फांकटणें; २, एकत्र जमून राहिलेला जो मनुष्यादि समुदाय, रक्त, प्रभा, इ० कांहीं एकत्याणें चहूंकडेस पसरणें; दिशा फांकणें म्ह० दिशा

दिशांचे ठायीं प्रकाश फांकणें; बुद्धि, दृष्टि, इ० दिकांनीं फांकणें म्ह० एका विषयावर सूक्ष्म रूपें न राहतां चहूंकडे पसरणें; ३, पोहे, इ० पदार्थ फक्यामार मारून खाणें; ४, रा० फलादि फांकी पडत असें कापणें.

**फांका**, पु० फक्का; कोणेकानें फांके मारीत फिरणें म्हणजे लाभादि कांहीं फल नसतां व्यर्थ फिरणें; २, अन्नाचे प्रातिकूल्यामुळें भोजन न घडतां दिवस अतिक्रांत व्हावा असा जो भोजन क्रियेचा खाडा पडतो तो; ३, ३ लिं० नियमानें व्हावयाचें जें लाभादि तें न होतां अतिक्रांत झाला जो दिवस, मास, वर्ष, इ० रूप काल तो; उ० नित्य विक्री होत्ये असेंच कांहीं घडत नाहीं एखादा दिवस फांका जातो.

**फांकी**, स्त्री० फक्किका; २, जोगी, कांडार, व्याघ्र, मार्जार, इ० कांचे आंगावर जे पट्टे असतात ते प्र०.

**फाग**, पु० हिं० शिमग्यामध्यें वेश्यादिकांचीं गावयाचीं शृंगाररसप्रधान जीं गाणीं असतात तीं प्र०; २, फांक द्वितीयार्थी.

**फांज**, स्त्री० एक पालेभाजी आहे.

**फाजील**, ३ लिं० हिं० सर्कार, सावकार, इ० कांस द्यावयाचें जें द्रव्यादि तदपेक्षया अधिक पावलें जें द्रव्यादि तो.

**फाट**, पु० परस्परें ऐकमत्यानें व्यवहारीं वर्तणारे जे त्यांचें परस्परें मिळेनासें झाल्यामुळें व्यवहारीं होतो जो भिन्नभिन्नपणा तो.

**फांट**, पु० फाट; २, जुळत आलेला जो पंचाईत

इ०

इ० कांहीं व्यवहार त्याविषयीं प्रतिकूलजो कोणी घेतो आडफांटा तो; ३, को० भाषण, लेख, इ० कांचेगर्यी पूर्वोत्तरग्रंथास विरोध दिसायाजोगें पडलेंजें अंतर तो; ४, जासंस्कारानें होडी, गलबत, इ०जलयान चाललें असतें तें फिरवायाकरितां विपरीतवल्हें धरून त्याजलयानास विपरीतजो वल्हवणी चासंस्कार देतात तो; वल्हें इ० फाटधरणें ह्म० जलयानास फांटबसायाजोगें विपरीत धरणें.

**फाट**, न० औषधिपदार्थ भिजत घालून तद्रंशविशिष्टकाढितातजें पाणी तें.

**फाटक**, न० को० जुनेर; २, दे० आवार इ० कांचे द्वारास फळ्याचे अभावीं आडवीं उभीं लांकडें लावून जी कवाडी करितात तें.

**फाटकर**, ३लिं० रा० अल्पस्वल्प फाटलेलें जें वस्त्र, पर्ण, इ० तो.

**फाटका**, ३लिं० फाटलेलाजो वस्त्र चर्म पर्णादि पदार्थ तो; २, ला० शरीरानें किं० द्रव्यसंपत्तीनें जी रोड तो; फाटक्यांत पायशिरणें ह्म० कांहीं एकगोष्टीविषयीं लंगडेपडल्यामुळें वैरी इ०कांचा आंतप्रवेशहोणें; ३, यथास्थितपणें चालायास साधनभूतजी द्रव्यमनुष्यादि सामग्री तीणेंकरून हीनजोराज्य, संसार, इ० पदार्थ तो.

**फाटकातुटका**, ३लिं० फाटलेला तुटलेला असाजो वस्त्र, चर्म, कागद, इ० पदार्थ तो.

**फाटणें**, वस्त्र, कागद, चर्म, आंथरी, पान, भूमि, भिंत, इ० पदार्थांनी ताणबसणें इ० कारणानें भेदविशिष्टहोणें; २, ला० एकत्रंआमेंचालणारे जेकोणी त्यांचापरस्परें भिन्नभाव होणें.

**फाटफूट**, स्त्री० रुपया इ० नाणें, भिंत इ० इमारत, इ० कांचे अंगीं जोफुटलेपणा, तुटलेपणा, इ० रूपदोष ती; २, ३लिं० दे० फुटकातुटका जो रुपया; इ० नाणें तो; ३, न० रा० फटाके, बंदुका, इ० संबंधी जो थोडाबहुत शब्द तें; उ० लढाई चालू झाली ह्मणतां पण फाटफूट कांहीं ऐकायास येत नाहीं तें.

**फांटा**, पु० एकेरी अंगानें चाललेलें जें वृक्षाचें कांड, नदी; मार्ग, पंक्ति, इ० त्यास आडवा निडवा मत्सदृश फुटलाअसतो जो अवयव तो; २, लिहिलेलें अक्षरादि खोडायाचें असतां किं० कांहीं अन्यसंकेत असतां तेथें जें रेषारूप चिन्हकरितात तो; भाषणादिव्यवहारीं फांटा फोडणें ह्मणजे आडफांटाधरणें; कोणेकाचें नाव, रकम, इ० कांस फांटा देणें ह्म० दूर करणें; कोणेकास फांटाफुटणें ह्मणजे मंत्रबळ, पिशाच, इ० कांनी वेड लागणें.

**फाटाफाट**, स्त्री० मिळून व्यवहार करणारे जे कोणी त्यांची कांहीं कारणानें एकमेकांशीं होत्सेजी तुटातूट ती.

**फाटाफूट**, स्त्री० समुदितपणें एकत्रजमून स्थित जे मनुष्यादि कोणेक अर्थ त्यांतून एकएकीकडे गेला एकएकीकडेगेला असें झाल्यामुळें होतोजो परस्परांचा वियुक्तपणा ती; २, फाटाफाट.

**फांटें**, न० जांळाचुजें लांकूड तें.

**फाड**, पु॰ गळूं इ॰ उठाणूं इ॰ कांस आंतील अंश बाहेर निघायाजोगा पडतोजो छेद तो आणि छेदकरण्याचा जो व्यापार तो; २, ला॰ आंतील सर्व दर्द स्पष्ट व्हावयाजोगा कोणेक विषयाचा जो परिस्फोट तो.

**फाड, — कण, — कन, — कर, — दिनी, — दिशीं**, अ॰ अनु॰ तोंडावर मारणें, फटाका, इ॰ कानीं वाजणें इ॰ कांचें वि॰.

**फाडणें**, वस्त्र, कागद, इ॰ फाटेअसें करणें; ओळ रेघ, इ॰ फाडणें ह्मणजे काढणें; डोळेफाडणें ह्मणजे वटारणें; पट्टीफाडणें ह्मणजे कुळाकडील वसूल घ्यावयाकरितां अमक्यापासून अमुक घ्यावयाचें अशी याद लिहिणें.

**फाडा**, पु॰ पाडा चतुर्थार्थी; कोणेक गोष्टीचा फाडा वाचणें ह्मणजे कोणेकापाशीं इत्थंभूत वृत्त कथन करणें.

**फाडी**, स्त्री॰ फाडें.

**फाडींव**, ३ लिं॰ विकायाकरितां किं॰ खर्चायाकरितां पाहिजे तितकें फाडून काढलेलें जें वस्त्रादि तें आणि फाडून अवशिष्ट राहिलेलें तें.

**फाडें**, न॰ मेजायाकरितां आम्रादिफळें किं॰ रुपया इ॰ नाणें इ॰ कांचे जे पंचकडी, छकडी, इ॰ रूपसमुदाय घेतात ते प्र॰

**फाणस**, पु॰ न॰ फानस.

**फातकील**, स्त्री॰ कों॰ फनकल

**फानमाय**, स्त्री॰ शरीरानें वातूळ अंगीं चापल्य नाहीं अशी मंद जी स्त्री तीस निंदेनें ह्म॰.

**फांद**, स्त्री॰ कों॰ किल्ला, इ॰ कांचे तटाचीं जीं भिताडें तीं प्र॰; २, फौज.

**फांदडणें**, दे॰ काष्ठादिकाचे एके शेवटाचे दोन विभाग दोहींकडे तांणून तें काष्ठादि मध्यें चिरणें; २, कोणेकास मोह घालून बुद्धिभेद विशिष्ट करणें.

**फांदडा**, पु॰ मोटी जी फांदी ती; २, कोणे गोष्टीस नवाच फोडितात जो फांटा तो.

**फांदणें**, दे॰ अश्वादिकानी चालते समयीं मोठी लांब उडी मारणें.

**फांदाडणें**, फांदडणें.

**फांदाडा**, पु॰ फांदडा.

**फांदी**, स्त्री॰ खांदी; २, मेणबत्ती, उदबत्ती, इ॰ लावायाकरितां भिंत, खांब, इ॰ कांस जो आंकडा बसवितात ती.

**फांदोरी**, स्त्री॰ दे॰ लहान जी खांदी ती.

**फानस**, पु॰ न॰ कंद्या.

**फांपर**, न॰ त्वचेवर पसरलेलें, चिडलेलें, जें खरूज, बिबवा, इ॰ संबंधी क्षत तें.

**फांपरणें**, कों॰ शरीरावयवानें पाषाणादिकाशीं घांसलें गेल्यामुळें वरील त्वगंशीं खरचटणें.

**फांपरा**, ३ लिं॰ वा॰ तोंतरा.

**फांपा**, ३ लिं॰ रा॰ तोतरा.

**फांप्या**, स्त्री॰ मारधा॰ यो॰ प्र॰ कों॰ धंदा, रोजगार, द्रव्य, इ॰ गेल्यामुळें दीन होउन ररकरीत असणें; उ॰ पेंढार्यांनी सर्वस्वनेतांच फांप्यामारीत बसले.

**फांफर**, न॰ फांपर.

**फांफरणें**, फांपरणें.

**फाँफा**, ३ लिं॰ रा॰ फांपा.

**फाँफूँ**, न॰ टाणाटोणा; द्रव्य, धान्य, इ॰ कांचें फांफूं करणें ह्मणजे मनस्वीपणें अनेकप्रकारें उडवून निःशेष नाहींसें करणें.

**फाँफ्या**, स्त्री॰ फांप्या.

**फाम**, स्त्री॰ कोणेक गोष्टीविषयींचें जें अवधान तें.

**फायदा**, पु॰ कोणेक गोष्टीपासून जो लभ्यांश तो.

**फार**, ३ लिं॰ पुष्कळ; २, रा॰ कांडायाचे पदार्थावर मुसळाचा जो घाव तो.

**फारक**, ३ लिं॰ देणें, करणें, इ॰ द्वारा ज्याचा उलगडा झाला आहे असें जें द्यावयाचें कर्ज, राजकर, इ॰ किं॰ करायाचें जें कोणेक काम इ॰ तो.

**फारकत, फारकती**, स्त्री॰ फारखत.

**फारकरून**, अ॰ बहुतकरून.

**फारखत**, स्त्री॰ उभयतांचा देणें, घेणें, इ॰ व्यवहार संबंध तुटला असतां तद्विषयींचा जो एकमेकापासून लेख करून घेतात ती.

**फारफेर**, पु॰ अन्योन्याशीं न्यूनाधिकभावकृत थोडें बहुत जें अंतर तो.

**फारशी**, ३ लिं॰ फारस ह्मणून देश आहे तेथील जे लोक, भाषा, लिपि, इ॰ तो; २, पु॰ पारशी.

**फारिखत**, न॰ स्त्री॰ फारखत.

**फारीक, फारीख**, ३ लिं॰ फारक.

**फारूनफेरून**, अ॰ पासंग, इ॰ कृनजें वजनांत अंतर येतें तें नयावें ह्मणून कांहीं वेळा एका पारड्यांत जिन्नस घालावा दुसर्यांत वजन घालावें कांहीं वेळा दुसर्या पारड्यांत जिन्नस घालावा आणि जिनसाचे पारड्यांत वजन घालावें असे प्रकारें तोलून देणें, घेणें, इ॰ कांचें वि॰

**फारोळें**, न॰ दे॰ पाभरीचे खुंट्यास फाळासारिखे मेलो खंडाचे अवयव लाविले असतात ते प्र॰

**फाल**, पु॰ सं॰ फाळ

**फाल्गुन**, पु॰ सं॰ चैत्रापासून जो बारावा महिना तो.

**फाल्गुना, फाल्गुनी**, ३ लिं॰ फाल्गुनसंबंधी जें अवार, तिथि, इ॰ तो.

**फावडी**, स्त्री॰ घोड्याची लीद, गुरांचें शेण, इ॰ जमा करायाकरितां किं॰ फकीर इ॰ कांची झोळी त्यांवर अडकवायाकरितां जें लांकडाचें लहानसें फावडें केलें असतें ती; २, ला॰ कोणेक अर्थाची प्रतिकूल संबंधानें होत्ये जी दुर्दशा ती स ह्म॰.

**फावडें**, न॰ खोरें हितीयार्थी; २, शेण, लीद, इ॰ काढावयाकरितां तादृश जें लांकडाचें करितात तें.

**फावणें**, कांहीं एक कार्य करायाविषयीं कोणेका सवड सांपडणें.

**फावती**, स्त्री॰ रा॰ एका कार्याकडेस गुंतलेला जो त्यास कार्यांतराकडे लागण्याविषयीं मध्यें मिळतो जो कांहीं काल रिकामेपणा ती.

**फाँशी**, स्त्री॰ गोमहिष्यादिकांस वेळेस पाणी चुकल्यामुळें एक रोग होत असतो ती.

**फाँस**, पु॰ पाश शब्दाचा अपभ्रंश; परंतु गांठ मागें पुढें होउन जो वलयाकार लहान मोठा होत असतां तद्विषयीं प्र॰; २, दे॰ बाभूळ इ॰ कचे कांट्यांचा जो भारा तो; कोणेका स फांशीं देणें

ह्मणजे गळां देणें.

**फाँसकी**, स्त्री॰ पक्षी धरायाकरितां जो केशादिकां च्या फांस करितात ती.

**फाँसटणें**, भस्म, औषधादिपदार्थ, पात्र, अंग, इ॰ कांस सरासरी फांसणें; २, रा॰ नाचण्याचे परिश्रमानें पाय शिजविणें किं॰ कोणेकानें कोणे काम पाय शिजत असें चालवून श्रमविणें, त्या परिश्रमास व्यर्थत्व प्रतिपादनाचा विषय असतां प्र॰; उ॰ कांहींलाभ नसतां उगीच पाय फांसटीत चार काम आतो कोण; ३, कों॰ कोणेकास भुलथापीनें मोहून कोणेक व्यवहारीं गुंतविणें.

**फाँसटाफाँसट**, स्त्री॰ रा॰ पायफांसटत गेल्या आल्यानें पडतात जे श्रम ती.

**फाँसणी**, स्त्री॰ शरीरांतील रक्त निघावें ह्मणून वस्त्रा, इ॰ शस्त्रानें जे बारीक बारीक छेद करितात ते प्र॰; दुःखावर फांसण्या टाकणें ह्म॰ दुःखावर डाग देणें.

**फाँसणें**, भस्म, चिखल, रंग, इ॰ पदार्थ हस्तादिकें करून घेउन तो हस्तादिक सरकत शरीरादिकांवरून ओढून तें भस्मादि शरीरादिकांस लावणें; पक्षीं भस्मादिविशिष्ट हस्तादिकास ही कर्म ना.

**फाँसळी**, स्त्री॰ फांसोळी.

**फाँसा**, पु॰ सोंकट्या खेळणें, शकुन पाहणें, इ॰ उपयोगी चारी अंगास ज्यास भिन्न भिन्न चिन्हें केलीं असतात असा हस्तिदंतादिकांचा चौरस तुकडा केला असतो तो; फांसा सोईचा पडणें, उरफाटा पडणें, इ॰ स्थलीं अनुकूलरूपें करून किं॰ प्रतिकूलरूपें करून घडोन येत्ये जी कोणेक गोष्ट तीस ह्म॰; २, सरी, नथ, इ॰ कांस एके शेवटास वलय करून त्यांत अडकवायासाठीं त्याचे दुसऱ्ये अग्रीं जो आंकड्यासारिखा अवयव केला असतो तो आणि तें वलय आणि आंकडा मिळून जें विशिष्ट त्यास ही ह्म॰; ३, पशु पक्षी यांस धरावयाकरितां जो फांस करितात तो; फांशांत पडणें, सांपडणें, इ॰ स्थलीं एकाद्ये पेंचाटींत असा अर्थ.

**फाँसूं**, न॰ नदी, खाडी, इ॰ कांस फुटलेला जो लहान फांटा तें.

**फाँसेपारधी**, पु॰ दोऱ्यांचे फांस करून पशु किं॰ पक्षी यांस धरितो तो; २, ला॰ दुसऱ्यास एखाद्या पेंचाटींत घालण्याचा स्वभाव ज्याचा त्यास ह्म॰.

**फाँसोळी**, स्त्री॰ पाठीचे कण्यापासून उरापर्यंत आडवीं लागत आलेलीं जीं हाडें तीं प्र॰.

**फाळ**, पु॰ नांगराचे अग्रास पर्णाकार जो लोखंडाचा अवयव लाविला असतो तो.

**फाळका**, पु॰ केळ, चवेण, इ॰ कांचे आंगचे एकीकडल्या भागाचा जो तुकडा तो.

**फाळकी**, स्त्री॰ रा॰ लहान जो फाळका ती; २, ला॰ भूमीची जी चिंधी ती.

**फाळणी**, स्त्री॰ कोणएक द्रव्यादि संख्या अनेकांवर यथायुक्तपणें बसविण्याचा जो व्यापार ती.

**फाळणें**, रा॰ फाडणें.

**फाळा**, पु॰ शेत, इ॰ संबंधी जो सारा तो; २, धस लागणें, इ॰ कारणानें वस्त्रादिकांचा फाटोन निघतो जो मोठा तुकडा तो किं॰ तेणेंकरून त्या वस्त्रादिकास पडतो जो छेद तो; ३, रेशमाचें सूत्र रहाटावर गुंडाळून जो कोंपरीसारखा रचनाविशेष करि

तात तो.

**फाळी**, स्त्री॰ फाळका द्वितीयार्थी.

**फाळेटूं**, न॰ नांगराचा फाळ घट्ट बसावा म्हणून त्या अवरें जें लांकूड बसवितात तें.

**फिकट**, ३ लिं॰ यत्किंचित् जो फिका तो.

**फिका**, ३ लिं॰ हिं॰ काळेपणा पिंवळेपणा तांबडेपणा इ॰ जो गुण तो ज्यामध्यें कमी असा जो काळा, पिंवळा इ॰ रंग तो आणि तद्विशिष्ट जो पदार्थ तो; २, ला॰ विवक्षित रुचीनें कमी जो मधुरादि रस तो आणि तद्विशिष्ट जो भक्ष्य भोज्यादि पदार्थ तो; ३, ज्या तेजाचे योगानें योग्यता येत्ये शोभा येत्ये असें जें तेज तेणें करून हीन जो अधिकारच्युत मनुष्य नीरस भाषण इ॰ कोणेक अर्थ तो.

**फिकीर**, स्त्री॰ हिं॰ चिंता.

**फिक्कट**, ३ लिं॰ फिकट.

**फिक्का**, ३ लिं॰ फिका.

**फिगारणें**, दे॰ धोंडा, इ॰ भुगारणें.

**फिटणें**, आपल्यावर चढलेलें दुसर्याचें ऋण, शपथ, शंका, संशय, उपकार, सूतक, डाव, इ॰ जें कांहीं एक अवश्य निरसनीय त्याणें द्रव्यदान प्रत्युपकार, इ॰ कें करून निरस्त होणें; २, नेसलेलें जें लुगडें, धोतर, इ॰ वस्त्र, किं॰ त्याचा चुण्या, कांसोटा, इ॰ त्याणें स्फरणें.

**फिटंफाट**, ३ लिं॰ वि॰ फिटून निःशेष झालें जें ऋण, डाव, उपकार, इ॰ तो.

**फिटाफीट**, स्त्री॰ ऋणादिकाचा जो निःशेष फिटलेपणा ती.



**फिटी**, स्त्री॰ रा॰ इटी.

**फिटू**, पु॰ रा॰ फिटी.

**फिणफिणणें**, दे॰ कुरमुरणें.

**फिणफीण**, स्त्री॰ कुरमूर.

**फितणें**, एका पक्षावर आनुकूल्य आणि तद्विरुद्ध पक्षावर प्रातिकूल्य अशा भावानें असतो जो कोणी त्याणें तद्विरुद्ध भाव विशिष्ट होणें; २, मूल, इ॰ ज्यानें कोणी खाउ इ॰ काचा लोभ दाखविल्यामुळें ठकणें.

**फितवणी**, स्त्री॰ कोणेकास फितविण्याचा जो व्यापार ती.

**फितवा**, पु॰ हिं॰ फितूर प्रथमार्थी.

**फितावणी**, स्त्री॰ फितवणी.

**फितावणें**, फितविणें.

**फितावा**, पु॰ फितवा.

**फितुरणें**, कोणेकानें फितूर करणें.

**फितुरी**, ३ लिं॰ ज्या पक्षानें आश्रय [illegible] तद्विरुद्ध पक्षास मिळून स्वपक्षा[illegible] फितूर करण्याचा स्वभाव ज्याचा तो; २, बाह्यात्कारीं ज्या पक्षाचा लपवितो तद्विरुद्ध पक्षाचा आंतून [illegible] आस पक्षपात आहे तो.

**फितूर**, पु॰ हिं॰ स्वपक्षाशीं विरुद्ध [illegible] परपक्षास अनुकूल व्हावें असा जो राजकीय लोकादिकांचे अंतःकरणाचा धनलोभादिकामुळें होतो भेद तो; २, ३ लिं॰ वि॰ तादृश भेदविशिष्ट झाला जो तो.

**फित्यावणें**, रा॰ फितावणें.

**फिद्फीद्**, अ॰ हास्यशब्दाचें अनु॰ हसण्याचें वि॰

निंदा असतां प्र०;२, स्त्री० सशब्द जो हास्य त्या पारती.

**फिदा**, ३ लिं० हिं० अवि० यद्विषयीं आपल्या प्राणा पेक्षांही हा मला प्रिय अशा भावनेनें विशिष्ट जो तो त्या नायकादि विषयावर.

**फिदारणें**, प्रायः क्रोधावेशानें नाक, डोळे, इ० शरीरावयव पिंजारणें.

**फिरक**, स्त्री० गात्रें समयीं घेतात जो कंप ती.

**फिरकणें**, अधिष्ठित स्थल सोडून आसपासचे प्रदेशीं यत्किंचित संचार विशिष्ट होणें प्रा० निषेधविषयीं प्र०.

**फिरकंडा, फिरकांडा**, पु० सोईनें कोणत्या तरी तऊीस लागावें तें न लागतां भ्रमत असावें अशी जी कोणेक कार्यास प्राप्त होत्ये गति तो आणि तदनुरोधानें कर्त्यासही स्फटका न होतां तशीच गति प्राप्त होत्ये तो;२, मंडलाकार किं० समूर आजुन पुनः पूर्वस्थलीं यावें इतकी जी गति तो; प्रायः त्या गतीस दुःखरूपता प्रतिपादनीय असतां प्र०

**फिरकंडी, फिरकांडी**, स्त्री० फिरकांडा.

**फिरकी**, स्त्री० फिरक ;२, वेश्यादिक नृत्यादि समयीं मारितात जो गरका ती;३, मळसूत्राचा जो नर म्हणून अवयव असतो तो, कडडा, पाळणा, इ०कांस शोभार्थ कांतीव अनेक खुंट्या ओळीने लावितात त्या प्र०;४, कांतणें इ० कांस गरगर फिरावया जोगा चक्राकार अवयव असतो ती; ५, सोनें इ० वजन करावयाचा लहान तराजवाआहे.

**फिरंग**, स्त्री० प्रा० ग्र० तरवार.

**फिरंगाण, फिरँगाण**, न० जाचें आधिपत्य फिरंग्याकडेस आहे असा जो मुलुख तें.

**फिरंगाणी, फिरँगाणी**, ३ लिं० फिरंगाण संबंधी जी चाल, भाषा, वेष, इ० ती.

**फिरंगी, फिरँगी**, पु० टोपीवाल्यांत एक जाति आहे.

**फिरँगूट**, न० फिरंग्यास निंदेनें लं०.

**फिरणें**, चक्रादिकानी मंडलाकार गति विशिष्ट होणें;२, जा दिशेतें लक्षून चाललेला जो मनुष्यादि जीव, मार्ग, नदी, सूत्र, रेषा, इ० त्याणें ती दिशा सोडून इतर दिशेकडे होणें;३, पुढें जावें, मागें यावें, तिर्यक्चालावें, इ० रूप अनेक प्रकारचा गतीनी जो कोणेक स्थलीं संचार तद्विशिष्ट कोणेकानें होणें;४, कोणेक अर्थानें पालटलें जाणें; उ० एक पाउस पडतांच झाडांची नवलीफिरली; उन लागतांच पागोट्याचा रंग फिरला; मामलेदार फिरला म्हणजे कांहीं शिरस्ते ही फिरतात; कोणेकानें कोणेकावर फिरणें म्हणजे विरुद्ध भाव विशिष्ट होणें; कोणेकाचें द्रव्यादि कोणेकाकडेस फिरणें म्हणजे हिशेबानें द्यावें असें होणें.

**फिरवाफिरव**, स्त्री० इकडलें तिकडे ने तिकडचें इकडे आण हें काढून तें लाव तें काढून दुसरें लाव असा जो व्यापार ती.

**फिरस्त**, पु० जो जेथला स्थायी नव्हे देशांतराहून फिरत फिरत आलेला तो तेथें.

**फिरस्ता**, पु० फिरस्त;२, एका स्थलीं दुकान न घालितां गावांत घरोघर हिंडून जिन्नस विकणारा जो

जो वाणी, इ॰ उदमी तो.

**फिरून, फिरोन**, अ॰ पुनः.

**फिर्याद**, स्त्री॰ हिं॰ आपला कोणी अपराध केला असतां त्या अपराध्याचा शासनकर्ता जो कोणी त्यापाशीं किं॰ अस्मानी, सुलतानी, इ॰ कारणानें होतो जो तोटा त्याचा निरास करणारा जो राजा इ॰ कोणी त्यापाशीं करितात जें निवेदन ती; कोणेकानें फिर्याद होणें ह्मणजे फिर्याद करणें; फिर्याद आणें किं॰ येणें ह्मणजे फिर्याद करावयाकरितां राजादिकांजवळ आणें किं॰ येणें.

**फिर्यादी**, ३ लिं॰ फिर्याद करावयासाठीं आलेला जो कोणी तो.

**फिशारकी**, स्त्री॰ फुशारकी.

**फिशारखोर**, ३ लिं॰ फुशारखोर.

**फिशारणें**, फुशारणें.

**फिशारी**, स्त्री॰ फुशारी.

**फिश्श, फिश्शो**, अ॰ कोणेक अर्थाविषयीं उँः यांत काय आहे असें वाटलें असतां हा उद्गार निघतो.

**फिसकटणें**, फसकटणे; २, कोणेक कार्याविषयीं अनुकूल भावें वागत असतो जो कोणी त्याणें रुसवा, तिरस्कार, इ॰ कारणानें विथरणें.

**फिसकणें**, फिसकटणें.

**फिसका**, ३ लिं॰ फुसका.

**फिसकारणें**, दे॰ माजर, वाघ, इ॰ कानें क्रोधावेशानें फिस्स अशा शब्दानें विशिष्ट होणें.

**फिसकें**, न॰ दे॰ केंसतूड.

**फिस्स**, अ॰ फिश्श.

**फिळकवणी**, न॰ फळकवणी.

**फिळफिळीत**, ३ लिं॰ केवळ फळकवणी झालेला जो कढी, सांबारें, दहीं, इ॰ पदार्थ तो.

**फींट**, स्त्री॰ ऋणादिकाचा जो फिटलेपणा; २, न॰ रा॰ बसलेला संधि इ॰ मोकळा व्हावा ह्मणून त्यामध्यें जो लांबट लांकडाचा तुकडा मारावयाकरितां घेतात तें; ३, यज्ञोपवीत इ॰ कांचें सूत भोंवनालें गुंडाळून मेजावयाकरितां शा॰ धातींचे प्रमाणाचा जो कांबीट इ॰ कांचा तुकडा घेतात ती.

**फीत**, स्त्री॰ स्फीत; २, रेशीम, सूत, इ॰ विणून दालासारिखा एक पदार्थ करितात ती.

**फीर**, स्त्री॰ कों॰ कोणेकस्थलीं गेलेला जो यात्रा, फौज, इ॰ त्याची तेथून मागें यावयाकरितां जी परावृत्ति ती.

**फुइजी**, स्त्री॰ स्त्रिया सासू आणि आत यांस ह्म॰.

**फुई**, स्त्री॰ फुइजी.

**फुंक**, पु॰ स्त्री॰ अग्निप्रदीप्त करणें इत्यार्थ मुख आकुंचित करून घालितात जो वायु तो ती.

**फुकट**, अ॰ कोणेकापासून कांहींएक अर्थ घेतला असतां मूल्य सेवादिरूप जें प्रतिदान करणें लागतें त्यावांचून, कोणेक अर्थ देणें, घेणें, मिळणें, इ॰ कांचें वि॰; २, वृथा.

**फुकटखाउ**, ३ लिं॰ कोणेकाचे घरीं सेवादि न करितां फुकट जेवून राहतो जो तो.

**फुकटचा**, ३ लिं॰ फुकट दिल्हेला, मेळविलेला, जो कोणेक अर्थ तो; हें काम फुकटचें नव्हे इ॰ स्थलीं अनायासें सहजांत घडावा सारखें नव्हे असा अर्थ.

**फुकटचोट**, पु॰ कोणेक कार्यीं करावा लागतो जो खर्च वेच किं॰ आंगमेहनत तेंन करितां त्या कार्या

विषयींचा फुकट गोष्टी मात्र सांगाव्या आणि लाभ समयीं मात्र पुढें व्हावें अशा स्वभावाचा जो त्यास म्ह॰.

**फुकटचोट**, पु॰ पदरचा पैसा न खरचतां फुकटचे फुकट कांहीं भोग्य पदार्थ मिळाला असतां निलाजरे पणीं उपभोगिण्याचा स्वभाव ज्याचा त्यास म्ह॰.

**फुकटपसारा**, ३ लिं॰ फुकट हात पसरण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**फुकटफाकट**, अ॰ फुकट अशा प्रकारें कोणेक अर्थ मिळणें, देणें, इ॰ कांचें वि॰.

**फुकटफुका**, अ॰ रा॰ फुकटफाकट.

**फुकटबिसनी**, पु॰ फुकटचोट.

**फुकटशाई**, ३ लिं॰ फुकटचा.

**फुकटाफुकट, फुकटाफुकटी**, अ॰ फुकटफाकट.

**फुकटावारीं**, अ॰ फुकट अशा प्रकारें मिळणें, खरचणें, इ॰ कांचें वि॰.

**फुकट्या**, ३ लिं॰ फुकटचोट.

**फुंकण**, न॰ रा॰ आंतील अंश किडीनें खाल्यामुळें पोकळ केवळ हलका झालेल्या जो नांदूळ इ॰ दाणा तें.

**फुंकणी, फुंकणी**, स्त्री॰ अग्न्यादिकांवर फुंकर घालावा किं॰ भाता इ॰ संबंधी वायु वहावा इत्यादि अर्थ जी वेळू, ताम्रादि धातु, इ॰ कांचा नळ्या केल्या असतात त्या प्र॰; २, गळेसरी करावया करितां कांच, स्वर्ण, इ॰ कांचे बारीक बारीक नळ्यांचे आकाराचे करितात जे मणी ते प्र॰; ३, दे॰ फुंकण; कोणेकाचे हातापायांचा किं॰ हाडाचा फुंकण्या होणें म्हणजे त्याणें अतिशयित कृश होणें.

**फुंकणें, फुंकणें**, मुखवायूनें किं॰ भात्याचे वायूनें अग्न्यादि संबंध करणें; २, सनई, करणा, इ॰ मुखवाद्य वाजायासाठीं मुखवायूनें संबद्ध करणें; ३, भाता आंतून वायुनिघाया जोगा हालविणें; ४, सर्पादिलक्ष्यावर शाबरादि मंत्र प्रयुक्त करणें; कोणेकाचे कान फुंकणें म्ह॰ त्यास मंत्रोपदेश करणें किं॰ अंतःकरणवृत्ति वळवायासाठीं कांहीं कानमंत्र सांगणें; कोणेक गोष्ट, बातमी, इ॰ फुंकणें म्ह॰ कोणेक विवक्षित स्थलीं पोंचे असें लेखादि द्वारा करणें; देश, गांव, भांग, तमाखू, रसायन, इ॰ फुंकणें म्ह॰ जाळून भस्मसात् करणें; दौलत, पैका, इ॰ फुंकणें म्ह॰ उधळून निःशेष करणें; फुंकून पाय टाकणें म्हणजे दूरवर पाहून बहुत विचारानें वागणें; पोरानीं गडी फुंकणें म्ह॰ गाल फुगवून वरबुक्या मारून फूत्कार करावा असा मित्रता तोडण्याचा मुलांचा संप्रदाय आहे त्याप्रमाणें गडी तोडणें.

**फुंकर**, पु॰ फुंक.

**फुंकरणें**, अग्न्यादिक फुंकरानें संबद्ध करणें.

**फुका**, अ॰ फुकट परंतु याचा प्रयोग व्यवहारीं संकुचित ग्रंथीं सर्व होतात.

**फुकाचा**, ३ लिं॰ फुकटचा.

**फुंकारा**, पु॰ दे॰ फुंकर.

**फुकी, फुंकी**, स्त्री॰ एकीबेकीचे खेळामध्यें हातांत कांहीं न घेतां मूठ वळली असतां त्यांत होतो जो द्रव्याचा अभाव ती.

**फुगट**, ३ लिं॰ फुगीर.

**फुगडी**, स्त्री॰ एकमेकाचे हात किं॰ दंड धरून मंडलाकार

कार फिरावें किं० एकमेकासमोर बसून उडयामारीत पुढें जावें इ० रूप फुगडी फू असा शब्द करीत करायाचा अनेकप्रकारच्या क्रीडा आहेत त्याम० .

**फुगणें**, वायु आंत भरल्यामुळें कोणेक पदार्थानें स्थूल होणें; २, ला० आंत कांहीं एक द्रव्यादि भरल्यामुळें पोट, पिशवी, गांठोडें, इ० कानें वरील आवरण ताठलें जाई असें स्थूल होणें; ३, वायूनें किं० जलानें गतिनिरोध झाल्यामुळें तुंबणें; ४, रुसणें; ५, फुशारणें; ६, प्रकरणादि कोणेक अर्थ आंत विवक्षित अनेक अर्थ शिरल्यामुळें मोठा दिसाया जोगा होणें; उ० कांहींनाहीं ह्मणत होतों पण बेरीज करतांच पहा केवढी रकम फुगली ती; हे असे आहेत तसे आहेत ह्मणून तुह्मी उगीच फुगिवलें होतें त पण आंत कांहीं नाहीं.

**फुगवटी**, स्त्री० पोट इ० शरीरावयवांस वातविकृतीनें किं० वायु जल यांचा गतिनिरोध झाल्यामुळें त्यांस येतो जो फुगलेपणा ती.

**फुगवणी**, न० तुंबारा बसल्यामुळें फुगून जमलेलें जें नद्यादिकांचें पाणी तें; २, स्त्री० आंत कांहीं तादृश ऐवज नसतां उगीच स्तुतीनें कोणेक अर्थास फुगविण्याचा जो व्यापार ती.

**फुगवशी**, स्त्री० पोट इ० शरीरावयव संबंधी जी फुवटी ती.

**फुगा**, पु० कागद इ० कांचा पिशवी सारिखा आकार करून आंत वायु किं० उदक कोंडिलें असतां फुगून तटतटीत जो आकार होतो तो; २, जलादिकांचा जो बुडबुडा तो; ३, तत्सदृश शरीरादिकांवर अग्निसंयोगादि कारणानें जो उंच वटा उठतो तो; ४, हजारी कारंजे इ० कांचा फुगीर जो मुखावयव असतो तो.

**फुगारा**, पु० फुगा तृतीय चतुर्थार्थी; २, जल, वायु, पोट, इ० कांची फुगलेपणानें विशिष्ट जी स्थिति ती.

**फुगीर**, ३ लिं० कांहींसा फुगलेल्या सारिखा दिसतो जो आकार आणि तद्विशिष्ट मुखादि शरीरावयव, अळंकार, भांडें, इ० कोणेक पदार्थ तो.

**फुगें**, न० बा० मनुष्याचे आंगावर आदेवी येतात तें.

**फुगोशी**, स्त्री० फुगवशी.

**फुटक**, ३ लिं० को० फुटकें जें पात्र, रुपया, इ० नाणें मध्येंमध्यें फुटून पडलेला जो शेताचा बांध, किल्ल्याचा तट, इ० किं० तद्विशिष्ट शेत, किल्ला, इ० तो.

**फुटकपात्र**, न० फुटून छिन्नभिन्न झालेलें किं० केवळ फुटाया जोगें झालेलें जें पात्र तें.

**फुटकर**, ३ लिं० वा० फुटक.

**फुटकळ**, ३ लिं० विवक्षित जो विशिष्ट समुदाय तद्रूप नव्हे असा जो विभागात्मता पावलेला कोणेक अर्थ तो; उ० तुह्मी सगळी तसबी घ्याल तर सोईवार पडेल एकेक दोन दोन अशीं फुटकळ घ्याल तर महाग पडतील; २, मधलेमधले अंश जात गेले आहेत अतएव अखंड नव्हे असा जो ग्रंथ, शेताचा बांध, तट, इ० तो.

**फुटका**, ३ लिं० फुटून छिन्नभिन्न झालेला जो पात्र, काष्ठ, पाषाण, नाणें, इ० पदार्थ तो; २, अंधत्व पावलेला डोळा, बधिरत्व पावलेला कान, आणि दुर्दशापन्न झालेलें दैव तो; ३, फुटकळ जी रकम इ० तो; ४, फुटरा जो कागद किं० शाई तो.

**फुटणें**, दगड, काष्ट, पात्र, फोड. इ॰ मूर्तपदार्थ-त्याणें किं॰ संसार, व्यापार, मसलत, इ॰ अमूर्त अर्थ त्याणें आंतील अंश उघड व्हाया योगें भेदविशिष्ट होणें किं॰ भेदपावून अनेकखंडरूप होणें किं॰ विशिष्ट अवयवीपासून कोणेक विभागानें खंडरूपें करून भिन्न होणें; २, अनेक व्यक्ति एकत्र जमून झालेला जो सेना इ॰ समुदाय त्याणें विसकळीत होणें किं॰ त्याचे अवांतरावयवानीं त्यापासून निराळें होणें; ३, एकमत्यानें कोणेकाशीं एकरूपता पावलेला जो कोणेक त्याणें तें मत सोडून भिन्न होणें; ४, कोणेक अधिकरणाचे अभ्यंतरीं अव्यक्तरूपेंकरून स्थित जें कांहीं अवयवादि त्याणें व्यक्तरूपेंकरून बाहेर पडणें; उ॰, या पोरास आगोदर वाचा फुटली आणि मग दांत फुटले; ५, कागदाचे किं॰ शाईचे दोषामुळें एका बाजूस लिहिलेलें अक्षरादि दुसऱ्या बाजूस उमटे असें होणें एथें त्या अक्षरादिकास शाईस आणि कागदास पर्यायेंकरून कर्तृता येत्ये; ६, ताक, दहीं, खीर, इ॰ कानीं अग्निसंयोगादिकारणानें नासून पाणी आणि शिनड्या होत अशी अवस्था पावणें; ७, फूटम्हणून जो व्यथाविशेष तद्विशिष्ट कोणेक शरीरावयवानें होणें, गोमहिष्यादिकानीं दुधास फुटणें म्ह॰ त्यांस दूध फुटणें, डोळे, कान, दैव, यानीं फुटणें म्ह॰ फुटकेपणानें विशिष्ठ होणें, कोणेकानें आंगीं फुटणें म्ह॰ शरीरानें पुष्ट होणें.

**फुटफुटणें**, वा॰ पुटपुटणें.

**फुटफूट**, स्त्री॰ वा॰ पुटपूट.

**फुटरा**, ३लिं॰ हेमंत ऋतूचे वाऱ्याचा संयोग इ॰ निमित्तानें फुटावें अशा स्वभावाचा जो पादादि शरीरावयव, भूमि, मृत्तिका, इ॰ तो; २, अग्निसंयोगानें फुटून लाह्या व्हाव्या अशा स्वभावाचें जें भात, वरी, इ॰ धान्य, तो.

**फुटवा**, पु॰ कों॰ वृक्षलता यांस ऋतु माहात्म्यामुळें किं॰ खशीकेल्यामुळें नवा फुटतो जो अंकुर समुदाय तो.

**फुटळ**, स्त्री॰ रा॰ भात, हरीक, इ॰ भरडलें असतां तांदूळ फुटून बारीक निघतात जा कण्या ती.

**फुटागूळ**, पु॰ रा॰ ढेंपफुटून अनेक तुकडे झालेला असा जो गूळ तो.

**फुटाणा**, पु॰ भिजवून, भाजून, भक्षायासाठीं खुसखुशीत केलेला जो हरभऱ्याचा दाणा तो, फुटाणें फुटणें किं॰ उडणें म्ह॰ सर्बत्तीं किं॰ त्वरेचें भाषण एतत्संबंधी शब्द होणें.

**फुटाणी**, ३लिं॰ फुटाण्या सारिखीं वर रंगाचीं चिन्हें असतात असें जें चीट इ॰ वस्त्र तो.

**फुटाफूट**, स्त्री॰ समुदायांतून किं॰ ऐकमत्यांतून यानें फुटावें, त्याणें फुटावें असा जो व्यापार किं॰ तज्जन्य त्या समुदायाच्या किं॰ ऐकमत्याचा फुटलेपणा ती.

**फुटाळ**, न॰ कों॰ झाडावरून पडून फुटलेलें जें फळ तें प्रा॰ आम्रफलावर प्रसिद्धि.

**फुटीर**, ३लिं॰ आगेजाग भेगांनी विशिष्ट

झालेला जो हात, पाय, इ० शरीरावयव किं० भिंत, भूमि, मडकें, इ० पदार्थ तो; २, ज्याचे पोटचें रेशीम जागोजाग उघडें दिसतें असा जो कलाबतू तो; ३, फुटरा प्रथमार्थी.

**फुडचा**, ३ लिं० रा० पुढचा.

**फुडला**, ३ लिं० रा० पुढला.

**फुडवट**, ३ लिं० रा० पहिला रूजी गाय, म्हैस, इ० तो.

**फुडा**, पु० रा० पुढा.

**फुडां**, अ० रा० पुढां.

**फुडार**, पु० रा० पुढार.

**फुडारी**, पु० रा० पुढारी.

**फुडील**, ३ लिं० रा० पुढील.

**फुडून**, अ० रा० पुढून.

**फुडें**, अ० रा० पुढें.

**फुणगी**, स्त्री० ठिणगी; फुणगी लावणें, टाकणें, इ० स्थलीं कज्जा इ० पेटविणें.

**फुणफुणणें**, क्रोधावेशानें संतापलें असतां डोळे लाल व्हावे नाक फिंजारावें वारंवार रूसकारे टाकावे, अशी जी अवस्था होत असत्ये तद्विशिष्ट कोणकानें होणें; २, हस्तादिकानें फुणफुणीनें विशिष्ट होणें.

**फुणफूण**, स्त्री० अग्नीने भाजलें असतां किं० वृश्चिकादिकांचा दंश झाला असतां पहिला जो दुःसह वेग तो गेल्यानंतर कांहीं काल राहत्ये जी यत्किंचित् व्यथा ती.

**फुंदणें**, स्फुंदणें.

**फुन्ना**, पु० मोत्यांची मसबी, कुंचडें, इ० कांस असतो जो रेशीम, इ० कांचा गोंडा तो.

**फुंपणें**, दे० सर्पादिकानें क्रोधाविष्ट होउन फूं फूं असा शब्द करणें.

**फुपाटा, फुंपाटा**, पु० चूल, आगटी, इ० कांचे ठायीं पेटलेला जो अग्नि तो विसाल्यावर अग्निकणानी विशिष्ट जी धगधगीत राख असत्ये तो; २, ला० सूर्यकिरणानीं फार तापलेली जी धूळ, वाळू, इ० त्यास म्ह०.

**फुप्फुस**, पु० सं० हृत्कमलांत पिवरा सारिखा अनेकछिद्रान्वित एक पदार्थ आहे तो.

**फुयजी, फुयी**, स्त्री० फुई.

**फुरका**, पु० भुरका प्रथमार्थी.

**फुरगुटणें**, फुरगुटानें युक्त होणें; २, रा० रुसल्यामुळें तोंड नाक मुरडावें गाल फुगवावे कोणाशीं बोलूं नये असा जो मुद्राविशेष हो तो तद्विशिष्ट कोणेकानें होणें.

**फुरगूट**, न० तादृश आदरादि न झाल्यामुळें रोष येउन किं० कोणी रुस्त्यादि केल्यामुळें गर्व येउन कोणी बोलिवलें असतां धड बोलूं नये गाल फुगवावे, नाक मुरडावें, इ० व्हावया जोगा जो अंतःकरणांत धर्मविशेष उत्पन्न होतो तें.

**फुरडी**, स्त्री० वा० कसर म्हणून जो तळें इ० कांचे ठायीं केंद होत असतो ती.

**फुरडूक**, न० रा० फरडूक.

**फुरण**, न० युद्धादि कोणेक कर्माविषयींचा जो उत्साह त्याचा आवेश शरीरांत होउं लागला म्हणजे जो कंपसदृश शरीरांत विकार उत्पन्न होतो तें.

**फुरणें**, स्फुरणें या अर्थी कोणी म्ह०.

**फुरफुरणें**, अश्व, गर्दभ, खेचर, यांचा नाकाचे जो फुरफुर शब्द होतो तद्विशिष्ट त्याणीं होणें; २, तैलांश विशिष्ट जें करवंटी, शिसवाचें काष्ठ, इ० इंधन त्याणें जळत्येसमयीं फुरफुरवाजणें या अर्थी पक्षीं त्या अग्नीसही कर्तृता; ३, लहान बालकाने ओष्ठानीं जो फुर असा शब्द होत असतो तद्विशिष्ट होणें; ४, नेत्रादि शरीरावयवानें स्फुरणें विशिष्ट होणें; ५, जिव्हा, हात, इ० जाजा इंद्रियांचा जो जो बोलणें, मारणें, इ० व्यापार तद्विषयीं वाऊल्या हानें त्यात्या इंद्रियाचें स्फुरण विशिष्ट होणें.

**फुरफुराट**, पु० फुरफुर शब्दाचा जो अतिशय तो.

**फुरफुरी**, स्त्री० **फुरफुरें**, न० दे० हरभऱ्याचे पिठाचा तळून तोंडीं लावण्या करितां एक पदार्थ करीत असतात ती तें.

**फुरफुर**, अ० अनु० काष्ठ, करवंटी, इ० कांचें जें जळतांना वाजणें इ० त्याचें वि०; २, स्त्री० अग्नि, अश्व, इ० संबंधी जो फुरफुरण्याचा व्यापार ती.

**फुरसत**, **फुरसूत**, स्त्री० फावती; २, पुढें होणारजें कोणेक कार्य त्याला विवक्षित अवधी पासून मध्यें असतो जो कालरूप अवकाश ती.

**फुरसें**, न० एक सविष जिवाणू आहे.

**फुरारणें**, फुरफुरणें पंचमार्थी.

**फुलकारी**, ३ लिं० जाजवर विणकरीनें विजातीय रंगाचे सूत्राचे फुलांचे आकार उठविले असतात ती; २, स्त्री० मत्यक्षरीं फुल या शब्दाचा उच्चार करावा अशा संकेतानें कोणेक भाषेचें करितात जें भाषांतर ती.



**फुलगोटा**, पु० पिठ्ये साखरेंत एक भेद आहे.

**फुलछडी**, स्त्री० फुलें गुंफून हातीं घ्यावया करितां जो छडी सारिखा आकार करितात ती.

**फुलजी**, पु० कोणी स्तुत्यादि केल्यामुळें खुलून जें म्हटलें तें कराया जोगा अनुकूल झाला जो त्यास म्ह०.

**फुलझडी**, स्त्री० फुलबाजी.

**फुलझाड**, न० ज्याचें फूलच प्रधान असें जें गुलबास, कन्हेर, जास्वंद, मोगरा, इ० झाडतें.

**फुलणें**, पुष्पकलिकेनें पुष्परूपता येई असें विकसित होणें या अर्थी पुष्पासही कर्तृता; २, तांदूळ, जोंधळा, इ० कांनी अग्नि, जल, इ० संयोगानें लाही इ० रूप परिणाम व्हाया जोगें उमलणें; ३, छिद्रादिकांत बसवायाचा जो धातूचा खिळा इ० त्याणें अग्रभागीं ठोकल्यामुळें रुंदावून फुलासारिख्या आकारानें विशिष्ट होणें; ४, फुलफुलणें प्रथमार्थी; ५, वृक्षलतादिकानीं पुष्पविशिष्ट होणें; ६, ला० गाय, अश्व, इ० पशूनी जागोजाग फुलासारिख्या ठिपक्यानीं विशिष्ट होणें; ७, घोंगडी, सखलात, पासोडी, पितांबर, इ० वस्त्र किं० कार्पासादिकांचें जें गुत्र याणीं त्यांजवर येत असतें जें फूल तद्विशिष्ट होणें; ८, भरानें वृक्ष फुलूं लागला म्हणजे असा केवळ पुष्पमय दिसतो तद्वत् दिसाया जोगें कोणेक स्थलाद्यधिकरणानें चित्र विचित्र वर्ण विशिष्ट जे मनुष्य पशु, कीटक, इ० तिहीं करून निबिड व्याप्त होणें.

**फुलपगर**, न० स्त्रियांचें एक पुष्पसदृश शिरोभूषण

आहे.

**फुलपात्र**, न॰ रामपात्र.

**फुलफुलणें**, क्रोधाद्यावेशानें श्वानमार्जारादिकांचें पुच्छ, केश, मनुष्यादिकांची नासिका, इ॰ कांनीं प्रफुल्लित होणें; २, जाणें, येणें, लढणें, इ॰ व्यापार करण्याविषयीं कोणेकाचें उत्साहविशिष्ट होणें.

**फुलबरडा**, पु॰ रूपारींत एक भेद आहे तो.

**फुलबाजी**, स्त्री॰ पोटीं दारू घालून जी कागद इ॰ कांची क्रीडार्थ आकाशाकरितां नळी करितात ती.

**फुलबासन**, न॰ दे॰ फुलवासन.

**फुलबिसनी**, ३ लिं॰ दे॰ ज्याचे हातून कांहीं एक श्रम व्हावयाचा नाहीं असा पोशागी जो त्यास ल॰.

**फुलमाळी**, पु॰ फुलझाडें लावून फुलें, फुलांचे हार, तुरे, इ॰ विकून उपजीविका करणारा जो माळी तो.

**फुलवरा**, पु॰ बाजरीचे कणसा भोंवता असतो जो पुष्पसमुदाय तो; २, अनेक पुष्पें एकत्र गुंफून चंद्र, पिंपळाचें पान, इत्याद्याकारक करितात जी रचना ती; ३, कों॰ देवावर शोभार्थ पुष्पें फळें लोंबत बांधून जी रचना विशेष करितात ती.

**फुलवात**, स्त्री॰ फुलाचे आकाराची जी कापसाची वात करितात ती.

**फुलवासन**, न॰ उदमी लोकांपासून कांहीं उंचें वस्त्र घेत्येसमयीं तें नमळावें म्हणून त्याचे भोंवतें जें शुभ्र वस्त्र गुंडाळितात तें.

**फुलारी**, पु॰ फुलमाळी; २, स्त्री॰ फुलकारी द्विती यार्थी.

**फुली**, स्त्री॰ देंठ सोडून अवशिष्ट जें पुष्प त्याचा जो कागद, इ॰ कांवर रेघांनी आकार काढितात ती; २, तत्सदृश जो कागदें, धातूंचा पत्रा, इ॰ कांचा आकार करितात ती; ३, श॰ कागदाची जी पंचकडी ती.

**फुलेल**, न॰ मोगरा, चमेली, इ॰ पुष्पांचे सुगंधानें सुगंधित केलेलें जें तीळ त्यांचें जें तेल तें.

**फुशारकी**, स्त्री॰ अंगीं तादृश योग्यता नसतां लोकांत अतिरिक्त दिसावा जोगा कोणी बाळगतो जी कोरडी प्रतिष्ठा जीचा डौल, बोलणें, चालणें, इ॰ व्यवहारीं दिसत असतो ती; २, बडिवार.

**फुशारखोर**, ३ लिं॰ अंगीं फुशारकी बाळगण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**फुशारणें**, कोणेकानें फुशारकीनें विशिष्ट होणें.

**फुशारी**, स्त्री॰ फुशारकी.

**फुसकट**, ३ लिं॰ कों॰ फुसक्या पदार्थाचे कोटींत गणावा जोगा जो पदार्थ तो.

**फुस—कण—कन—कर—दिनी—दिशी—**, अ॰ अनु॰ फुसक्या पदार्थाचे मोडणें, तुटणें, फुसकुली सोडणें, इ॰ कांचें वि॰.

**फुसका**, ३ लिं॰ जी बळकटी ज्यांत असावी त्या बळकटीनें रहित जो काष्ठ, पाषाण, कागद, मनुष्य, नारळ, अग्नि, ग्रंथ, भाषण, लेख, इ॰ पदार्थ तो.

**फुसकारणें**, सर्प इ॰ कानें फुसकाऱ्यानें विशिष्ट होणें.

**फुसकारा**, पु॰ क्रोधावेशानें सर्प, मार्जार, गुरूं, मनुष्य, इ॰ कांचा जो फूं असा शब्द तो.

**फुसकुली**, स्त्री॰ मोठ्यानें शब्द न होतां हळूच येतो जो अपानवायु ती; २, ला॰ दुसऱ्याचे मर्मास लागावें इ॰ रूप कोणी समोरून येतां आडून हळूच बोलतो जें कांहीं एक कुत्सित भाषण त्यास ल॰.

**फुसफुशीत**, वि॰ कों॰ ज्याचे आंगीं काठिन्य नाहीं अतएव फोडायास भेदायास विशेष बल लागत नाहीं असा जो कुजकें काष्ठ, वाळवंट भूमि, इ॰ पदार्थ तो; उ॰ फुसफुशीत जमीनीस रवाळें चागलें पोसतें.

**फुसफुसणें**, सर्पादिकानीं फुसफुस असा शब्द करणें; २, ला॰ मनुष्यानें दूर फुसफुस असा शब्द मात्र ऐकायास आवयाजोगें हळू हळू बोलणें.

**फुसलावणें**, कोणेक कार्य साधून घेण्याविषयीं कोणेकास खोटीच स्तुति करावी कांहीं आशा दाखवावी अशा अनेक कपटयुक्तीनीं स्ववश करून घेणें.

**फुस्स**, अ॰ फिस्स.

**फूं**, अ॰ सर्पादिकांचे फूत्काराचें अनु॰; कोणेकानें फूं होणें ला॰ पराकाष्ठेचा रोष चढल्यामुळें सर्व क्रिया सोडून नाकपुड्या फुगवून फूसकारे टाकीत राहणें.

**फूग**, स्त्री॰ फुगारा हिती यार्थी; २, रा॰ वाहतें पाणी वायु, इ॰ फुगून रहायासाठीं गतिरोधार्थ जो वहाणीचे मार्गास बांध, चोंथडी, इ॰ कांहीं लाविनात ती.

**फूट**, स्त्री॰ दगड, लांकूड, भांडें, रुपया, इ॰ कोणेक पदार्थास फुटल्यामुळें जी चीर पडत असत्ये ती; २, संघीभूत जे अनेक अर्थ किं॰ एकोप्यानें स्थित जे अनेक मनुष्यादि त्यांचा तो संघ किं॰ एकोपा बिघडायाजोगा होतो जो भेद ती; ३, गुसम सलन, इ॰ कांची जी परिस्फूटती; ४, वायु किं॰ शैत्य यांचे विकृतीनें तोंतो शरीरावयव फुटतो आहे असें वाटायाजोगी जी अवस्था अनुभवास येते ती; ५, फुटाळ; ६, भात, हरीक, इ॰ भरडल्येसमयीं तांदूळ फुटून बारीक बारीक होतात तुकडे ते प्र॰

**फुटतूट**, स्त्री॰ भांडें, रुपया, इ॰ कांस फुटलेपणा, तुटलेपण्या, इ॰ रूप जो दोष ती; २; फुटकीं तुटकीं मोंवललेलीं अशीं जीं पात्रें, फलें, इ॰ त्यांचा जो समुदाय ती.

**फूत्कार**, पु॰ ओष्ठ संकुचित करून बळानें वायु बाहेर किं॰ आंत घेतला असतां जो शब्द होतो तो; २, सर्प, गोमहिष्यादि पशु, इ॰ कांनीं क्रोधावेशादि कारणानें मोठ्यानीं वायु बाहेर टाकिला असतां जो शब्द होतो तो.

**फूल**, न॰ वृक्ष, वल्ली, इ॰ भूरुहांस तारुण्यावस्था प्राप्त झाली असतां जो अवयवविशेष येत असतो तें जें प्रा॰ फलोत्पत्तीचें कारण असतें; २, ला॰ कोणेक वृक्षाचे फुलासारिखा सोनें, इ॰ धातु, कागद, हस्तिदंत, इ॰ कांचा जो भूषणार्थ पदार्थ करितात तें; ३, दारू इ॰ संबंधी जो अग्नि त्यापासून जे फुलासारिखे अग्नीचे आकार निघतात ते प्र॰; ४, गालिचा, सखलात, इ॰ वस्त्र किं॰ सूत यांवर जो केसरासारिखा अंश दिसतो तें; ५, फुललेला जो अश्वादि त्याचे अंगावर जीं चिन्हें असतात तीं प्र॰; ६, मडकें इ॰ कांचे तळीं उदाचा धूर जमला असतां त्याचा परिणाम होउन जो द्रव्यविशेष होतो तें; ७, जस्ताचा अग्निसंयोगानें लाहीसारिखा होतो जो परिणाम तें; ८, डोळ्याचे बुबळावर जो पांढरा ठिपका उत्पन्न होत असतो तें; ९, दगड, काष्ठ, इ॰ कांचे अंगास जो छत्राकसदृश

सदृश अवयव येत असतो जाला दगडफूल ह्म०; १०, सुपारी पातळ बारीक कापून त्याचा जो हलका चुरा करितात तें; ११, कोणेक पदार्थाचा जो हलकेपणा तदतिशय द्योतनार्थ त्या पदार्थास आरोपानें ह्म०; उ० हें गांठोडें हलकें फूल आहे याला न्याय ला काय झालें; १२, एक वन्य झाड आहे; कोणेकास फुलांत घालून नेणें, राखणें, इ० स्थलीं यत्किंचित् उपसर्ग न लागूं देतां मोठ्या जोपासनेनें संभाळून नेणें इ० अर्थ; फुलावोला सगांठ पडणें ह्म० वोलाफुला सगांठ पडणें; दिव्यास फूल देणें ह्म० दिवा मालवणें; फूल नाहीं फुलाची पांकळी देणें ह्म० जितकें द्यावें तितकें द्यायास सामर्थ्य नाहीं ह्मणून यत्किंचित् देउन दिल्हेसें करणें.

फूस, स्त्री० कांहीं वाईट गोष्ट केली असतां तन्निमित्त शासन करणारा जो राजा, पति, मातापितरें, इ० कोणी अधिकारी त्याचें जें त्या वाईट गोष्टी विषयीं गुप्तरूपें अनुमत तद्रूप जें त्या अपराध कर्त्यास बल असतें तें; २, पु० मोड आलेला जो नारळ ताडफळ यांचे पोटीं जो फुसफुशीत अंश उत्पन्न होतो तो.

फेकणें, फेंकणें, पाषाणादि पदार्थ दूर जाई असा सुगारणें; पगडी, पागोटें, इ० फेंकणें ह्म० अक्कडदिसा या जोगें डौलानें डोकीस घालणें; आसूद, शिपाई, घोडा, इ० फेंकणें ह्म० विवक्षित स्थलीं वेगानें जाई असा करणें.

फेंगडा, ३ लिं० मधल्या सांध्या जवळ धनुष्याकार वांकडा झालेला जो पाय तो आणि तद्विशिष्ट मनुष्यादि तो आणि त्याचें चालणें तो.

फेट, न० रा० फीट द्वितीयार्थीं.

फेटा, फेंटा, पु० लहान जें पागोटें तो.

फेड, स्त्री० आपल्यावर चढलेलें जें ऋण, उपकार, डाव, इ० त्याचा प्रतिदानादि द्वारा फेडण्याचें जो निरास तो.

फेडणें, फिटे असें करणें; नाकर्कि० शेंबूड फेडणें ह्म० शिंकरणें.

फेडा, पु० मृदंगाचा जो पुडा तो.

फेण, पु० फेन शब्दाचा अपभ्रंश.

फेणी, स्त्री० तारफेणी; २, तोंडीं लावायाचे उपयोगी पापडासारिखा एक पदार्थ आहे; ३, मोठा जो बत्तासा ती.

फेन, पु० दूध, तेल, पाणी, मद्य, इ० सद्रव पदार्थाचे कांहीं अंशाचा आलोडनादि कारणामुळें जो हलका परिणाम होतो तो.

फेंपरी, स्त्री० बंद करणें किं० होणें याचे योगीं प्र० कोणेकाची चालली असत्ये जी वाग्जल्पना ती दटावणी, इ० द्वारा बंद करणें किं० होणें.

फेंफरें, न० अपस्मार वायूचे योगानें शरीरास कंप सुटून मुखास फेंस यावा आणि मूर्छा येउन पडावें असा जो विकार होतो तें; २, तत्सदृश जो पिशाचबाधेनें विकार होतो त्यास ही ह्म०.

फेंफें, न० वेंवें.

फेर, पु० घेर; २, कोणेक पदार्थाभोंवता जो दोरी, इ० कांचा फेरा तो; ३, अंतर प्रथम द्वितीय तृतीयार्थीं; ४, मार्गादिकांस ऋजु सूत्रापेक्षां दीर्घता यावयास कारणभूत जी वक्रता असत्ये तो; ५, फेरफटका प्रा० प्रथमार्थीं.

फेरघोडी, स्त्री० जाचे आज्ञेंत वागणारा जो कोणी तो

त्यालाच उलटून गोष्ट सांगावी त्याणें एक ल० दलें असतां आपण बेक ह्मणावें असा आपले द्यूतीचा करितोजो उलट तो; २, एकदां पराजयादि होउन परावृत्त झालेला जो कोणी तो पुनः स्वातो जी उलट ती.

**फेरणी**, स्त्री० क्रमानें कोणेक अर्थावर जो उलटापालट इ० द्वारा चालनसंस्कार होतजातो तो मुळच्या व्यक्तीपासून शेवटचे व्यक्तीपर्यंत झाला ह्मणजे होतोजो त्याक्रियेच्या पर्याय तो; उ० पहिल्या फेरणीस जितकीं अशुद्धें सांपडलीं इतकीं दुसऱ्ये फेरणीस नाहीं सांपडणार.

**फेरणें**, घोड्यास अनेक प्रकारच्या गतीनी व्यायामार्थ किं० शिक्षार्थ आसमंताद्भागीं चालविणें; २, याआंगच्या त्याआंगावर इकडच्या तिकडे तिकडच्या इकडे याबेळच्या त्याबेळेस त्या वेळच्या या वेळेस कांहीं काळ हा कांहीं काळ तो अशो प्रकारें कोणेक अर्थ चालित करणें.

**फेरपगडी**, स्त्री० फेरघोडी प्रथमार्थीं.

**फेरपाळीनें**, अ० पारगी वारगीनें.

**फेरफटका**, पु० घोड्यासजो फेरण्याचा संस्कार तो; २, ला० एकाठिकाणी खुडकलेलाजो मनुष्यादि तो इतस्ततः फिरल्यामुळें जो त्यास चालनसंस्कार होतो तो; ३, शास्त्रादिकांस आवृत्ति, अध्यापन, इ० द्वारा जो चालन संस्कार तो.

**फेरफार**, पु० फारफेर.

**फेरा**, पु० कोणेक पदार्थास मध्यें घेउन त्याचे भोंवतें सूत्रादि फिरून पूर्वस्थलीं आलें असतां त्यासूत्रादिकांची त्यापदार्था भोंवती होत्येजी व्याप्ति तो; २, कोणेक पदार्थाची मंडलाकार फिरण्याने जेथून फिरायास आरंभ झाला तेथपर्यंत पुनः यावें इतकी जी गति तो; ३, फेर चतुर्थार्थीं; ४, प्रा० फेरीया अर्थीं; ५, फिरकांडा.

**फेरिस्त**, न० व्यवहारिक लिहिण्याचे कागदांचाजो समुदाय त्यामध्यें कोणकोण त्याप्रकरणाचे कितो किती कागद आहेत हें समजावें ह्मणून त्यांचें टांचण करून ठेविलें असतें तें.

**फेरी**, स्त्री० कोणेकाची कोणेकाचे भोंवताली जिथुन निघावें तेथें फिरून यावें इतकीजी गति ती किं० कोणेकस्थलीं जाउन पुनः माघारें पूर्वस्थलीं यावें इतकीजी गतिती; २, मंडलाकार किं० इतस्ततः फिरत फिरत चालणाराजो कोणी त्याची तीतीं स्थलें आक्रांत करीत होत्येजी गति ती; उ० तीसवर्षांनी शनीची पुनः त्याचराशीस फेरीयेत्ये; उ० त्यापेठेस सहजांत तुमचीफेरी होईल तेव्हां तो जिन्नस आणा.

**फेरीवाला**, पु० फेरेकरी.

**फेरूनफारून**, अ० फारूनफेरून.

**फेरेकरी**, पु० फिरस्ताजो उद्यमी तो; २, नित्यांत भिक्षा घेतनाहींत कांहीं विशेष भिक्षा एकदांच घ्यावया करितां जे घरोघर रोज फेरी घालित असतात भिकारी ते प्र०.

**फेल**, न० कों० जांतील दाणा पोसलाचाहीं असा जो वाल इ० कांची शेंग, हरभ्याचाघांटा इ० ते.

**फेस**, स्त्री० रा० पेस.

**फेंस**, पु० फेन.

**फेंसट**, ३ लिं० ज्यामध्यें फेंस आहे किं० अमळ

हाल

हालल्यानें आला फेंस येतो असाओ काकवी इ० पदार्थ तो.

**फेंसणें**, घृतादिपदार्थ हलका व्हावयाकरितां परात इ० कांचा ठाई घालून हस्तादिकाने मर्दून घोटणें.

**फेसणे**, वा० भोंपळा इ० फळ अनेक फांकी होतअसा कापणें.

**फेंसळणें**, तक्रादिकाने कांहीं कारणे करून फेंसानें युक्त होणें.

**फेंसाटी**, स्त्री० फांसद्वितीयार्थी.

**फेलाव**, पु० मनुष्य, वृक्ष, श्लोक, इ० कोणेक अर्थाची पुत्र, पौत्र, शाखा, पल्लव, विवरण, टीका, इ० स्वस्वविस्तारद्वारा पसरून जी स्थिति तो; सावकारी, इ० जो व्यवहार तोही त्यात्या पुरुषाचा विस्तार असें मानून या सावकाराचा फैलाव या देशांत पुष्कल आहे इ० प्र० होतात.

**फेलावणी**, स्त्री० फेलावण्याचा जो व्यापार ती.

**फेलावणें**, सावकारी इ० कोणेक अर्थ फैलाव विशिष्ट करणें.

**फैसल**, स्त्री० पु० विवादविषय अर्थाचा जो एकरूप निर्णय जेणेकरून त्या वादाची समाप्ति होती तो; २, ऋण किं० कोणेक पदार्थ इ० कांचा फिटणें खरचणें इ० केंकरून जो फडशा ती तो.

**फैसलनामा**, पु० वादाची फैसल झाली असतां तद्विषयींचा जाणें वाद जिंकला त्यास सर्कारांनून जो लेख करून देतात तो.

**फैसल्ला**, पु० हिं० फैसल.

**फोक**, पु० मध्यें वांकडें तिकडें न होतां मध्यें शाखा नफुटतां नीट सरळ गेलें असतें जें वृक्षादिकाचें ओलें शाखा कांड तो.

**फोंकणें**, **फोकणें**, कों० विरळविरळ पडे असें धान्यबीआदिक हस्तादिकाने उडवून पेरणें; बानमी इ० फोकणे ल० सर्वत्र प्रसिद्ध होई असें करणें.

**फोकलण**, स्त्री० कों० ढेंढळ.

**फोकलणें**, रा० कोणे कास फोकानें मारणें; २, कों० ढेंदळणें.

**फोकाटी**, स्त्री० लहान जो फोक ती.

**फोकी**, स्त्री० गलबताचे नाळीवर जें त्रिकोण लहानसें शीड लावितअसतात ती.

**फोंड**, पु० रा० पाट इ० संबंधी पाणी शिंपणें इत्यार्थ त्यांचावें एतदर्थ जी खळी केली असत्ये तो.

**फोड**, पु० शरीरावर भाजल्यामुळें किं० खरूज इ० रोगामुळें जो बुद्बुदासारिखा आकार उठतो तो; २ भाजलेला पापड, जिलबी, उंबर, इ० कांचें पान, इ० कांवर जे तसे आकार असतात यांस ल०; ३, स्त्री० न० अम्रादिफल किं० सूरणादिकंद यांचे भाजी इ० करायासाठीं केलेले जे लहान लहान तुकडे ते प्र०; ४, रा० मोठें लांकूड तोडून त्याचे पाडितातजे करांडे ते प्र०; ५, स्त्री० मुग्धपणें स्थितजी कोणेक गोष्टती चा जो परिस्फोट ती; ६, ऐकमत्यानें किं० समुदितपणें राहिलेलेजे कोणेक अर्थ त्यांचीजी परस्परें एकमेकाशीं भिन्नता ती; उ० हे चवघेपोर एकेजागीं बसलेअसतां कज्जा करतील याजकरितां त्यांची

फोडकरा.

**फोडणी**, स्त्री॰ तेल किं॰ तूप तप्त करून त्यांत मोहऱ्या, हिंग, इ॰ घालून भाजी, सांभारें, इ॰ कांस मिष्ट वास लागावा म्हणून जें तें संस्कारक द्रव्य सिद्ध करितात तीं; फोडणीस टाकणें म्ह॰ अग्नीवर भांड्यांत फोडणी सिद्ध करून त्यांत भाजी, इ॰ पदार्थ टाकणें; २, भोजनोत्तर मुखास सुगंध यावया करितां खातात जो विडा त्यास किं॰ विड्यास सुगंध लागावा म्हणून त्यांत घालितात जें लवंग, वेलदोडा, पत्री, इ॰ सुगंधि द्रव्य त्यास म्ह॰.

**फोडणें**, फुटे असा करणें.

**फोंडवळी**, स्त्री॰ रा॰ डोकीचे केंसाचे समासीस मानेचा मध्यभागीं जी लहानशी खळी असते ती.

**फोडशी**, स्त्री॰ रा॰ एक वन्य पालेभाजी आहे.

**फोंडळणें**, रा॰ पोंदळणें.

**फोडी**, स्त्री॰ देवीचा जो फोड ती.

**फोडींव**, ३ लिं॰ जाळाया करितां उभें फोडलेलें जें लांकूड तो.

**फोदलणें, फोदालणें**, झंबाडणें.

**फोदलपट्टी, फोदालपट्टी**, स्त्री॰ झंबाडपट्टी.

**फोपशा, फोपसा**, ३ लिं॰ तादृश घटमूट नव्हे असें मेदोवृद्धीनें स्थूल झालेलें शिथिल जें शरीर तो आणि तद्विशिष्ट मनुष्यादि तो.

**फोपीस**, न॰ फुप्फुस.

**फोंपेटी**, स्त्री॰ कों॰ फोंफेटी.

**फोंपेटें**, न॰ कों॰ फोंफेटें.

**फोपेणें**, रा॰ विषवा, शेराचा चीक, इ॰ लागून चिडल्यामुळें किं॰ पित्तक्षोभादि कारणानें वरील त्वचा फगून वरयावी अशीजी विकृति होत्ये तद्विशिष्ट शरीर शरीरावयव याणी होणें.

**फोंफावणें**, सर्पादिकानी फुंपणें.

**फोंफेटी**, स्त्री॰ कों॰ एक वेल आहे.

**फोंफेटें**, न॰ कों॰ फोंफेटीचें फल तें.

**फोल**, न॰ ज्याचे पोटीं कणांश नाहीं असा जो भात, इ॰ धान्याचा दाणा तें; २, आंतील कणांश वेगळा निघाला असतां जें धान्याचें नुसतें टरफल रहातें तें; ३, असावा तो तत्त्वांश ज्यांत नाहीं असें जें भाषण, व्यवहार, इ॰ त्यास म्ह॰; ४, स्त्री॰ गा॰ कागदाचें जें एक पान ती.

**फोलकट**, न॰ ज्यामध्यें कणांश स्वल्प आहे असें जें धान्य तें.

**फोलणें**, आंतील कणांश न दुखवतां बाहेर निघे असा भात, इ॰ कांचा दाणा, नख, दांत, चोंच, इ॰ कानी सोलणें; कोणेकानें राज्यादिकांहीं एक फोलून फोलून खाणें म्ह॰ ज्याचें हरण करतो त्यास किं॰ इतरास हा हरण करतो असें न समजूं देतां युक्तिप्रयुक्तीनें निघेल तितका तत्त्वांश काढून घेणें किं॰ तादृश युक्तीनी सर्व तत्त्वांश काढून घेउन तो राज्यादि अर्थ निस्तत्व करणें.

**फौज**, स्त्री॰ हिं॰ सैन्य.

**फौजदार**, पु॰ हिं॰ चोरी, शिंदळकी, कज्जा, मारामार, इ॰ कांचे चौकशी, इ॰ कामावर जो सर्कारांतून अधिकारी ठेविला असतो तो; २, महात.

**फौजदारी**, स्त्री॰ फौजदाराचा जो अधिकार ती.

**फौजफांटा**, पु॰ फौज, तोफखाना, इ॰ जें खटलें तो.

**फौजबंद**, ३ लिं॰ सेनाबल ज्यापाशीं यथास्थित आहे असा जो राजा, सर्दार, इ॰ कोणी तो.

ब, स्त्री० मुलें आपले आईस म्ह०

बईल, पु० बैल.

बक, पु० एक पक्षी आहे; २, केवळ अल्प वयस्क जें पिलूं तें; २, स्त्री० ज्याला लेखपत्रादि प्रमाण नाहीं अतएव सत्य मानितां येत नाहीं असें जें प्रतिज्ञादिविषयक तोंडचें भाषण तें; ३० म्ह० हजार बका आणि एक लिखा.

बकई, स्त्री० एक चाकूंत भेद आहे ज्याचा आकार बकस्थासारखा असतो ती.

बकटभेरू, ३ लिं० दे० खुळचोंर.

बकटमोडीचा, ३ लिं० एक शिवी आहे.

बकटें, न० प्रसंगविशेषीं निश्वास म्ह०

बकणी, स्त्री० बकबक; २, पिष्टादिकांची जी फकी ती.

बकणें, अहंकारादिकानें ओंत कांहीं अतिशय दिसायाजोगें मनस्वी बोलणें.

बकध्यान, न० बकाची मत्स्य धरण्याविषयींजी ध्यानस्थ बसल्यासारखी स्थिति तें; २, ला० कांहीं एक कार्य सिध्यर्थ लोभादि पोटांत ठेवून बाह्यात्कारीं शांतपणें जी स्थिति कोणी धरितो तें.

बकध्यानी, ३ लिं० बकध्यान धरून बसतो जो मनुष्य तो.

बकबक, स्त्री० मनस्वी बकण्याचा जो व्यापार ती.

बकमार, स्त्री० हिं० बंदूकींत एक जाति आहे.

बकरकुदाई, स्त्री० हिं० बकऱ्यास जसें बुकलून बुकलून मारितात तसें कज्जा, इ० प्रसंगीं एका दुर्बळ्यास अनेकांनीं मारण्याचा जो व्यापार ती.

बकरा, पु० हिं० एक ग्राम्य पशु आहे.

बकरी, स्त्री० हिं० बकऱ्याचे जातीची स्त्री ती.

बकरूं, न० बकऱ्याचें पोर तें; २, बकरें.

बकरें, न० बकऱ्याची जी साधारण जाति तद्वाचक तें.

बंकवरी, स्त्री० रा० एक तृणधान्य आहे.

बकवा, पु० स्त्री० हिं० बकबक.

बकवाद, पु० हिं० बकबक.

बकाण, बकाणा, पु० निंबाचा जातींत भेद आहे.

बकाबक, अ० कोणेकास बुक्यांनीं मारणें, पोहे, इ० मुठींनीं घेऊन भराभर खाणें, भराभर सगळं ओकणें, इ० कांचे वि०

बकाल, पु० بقال फा० धान्य. कापड. किराणा. इ० कांचा व्यापार करणार जो उदमी तो; २, न० बकाल लोकांचा जो समुदाय तें.

बकाली, स्त्री० بقالي बकालाचें जें क्रयविक्रयात्मक व्यापाररूप कर्म ती; २, ३ लिं० बकाल संबंधी जी रीति, जागा, इ० ती.

बकाळी, स्त्री० एक वन्यझाड आहे.

बकी, स्त्री० एक फुलझाड आहे.

बकुल, पु० एक पुष्पवृक्ष आहे; २, न० त्याचें जें फूल तें.

बकूळ, स्त्री० बकुल प्रथमार्थी; २, न० बकुलाचें जें पुष्प तें आणि फळ तें.

बक्कर, न० हिं० चिलखत.

बक्तवार, ३ लिं० बख्तवार.

बक्तवारी, स्त्री० बख्तवारी.

बक्शीगहूं, पु० गव्हांत एक जाति आहे.

बख्तवार, ३ लिं० हिं० तालेवार.

बख्तवारी, स्त्री० हिं० तालेवारी.

**बखंदणें**, रा० बखांदणें.

**बखंदी**, स्त्री० रा० बखांदी.

**बखर**, स्त्री० हिं० प्राकृत भाषेनें राजादिकांचें गद्यरूप चरित्र लिहिलेंअसतें ती; २, ग्रामादिकांत कज्जा, चोरी, इ० झालें असतां तें सर्कारांत कळवायासाठीं ग्रामाधिकारी लिहून पाठवितोजें वर्तमान ती.

**बखल**, न० केवळ फुटलेलें किं० ठेंचलेलें असें धातुमय जें भांडें त्यास म्ह०

**बखलणें**, वा० मनुष्यादिकांस कुमलणें.

**बखळ**, स्त्री० गावांतली गृहादिरूप जी वंदिस्त तिणें रुधलेली नव्हे अशी रिकामीजी जागा ती; उ० आमचे घराजवळ बखळ मोठी आहे तींत तुह्मी घर बांधा; २, मनुष्यादि वसतीनें शून्य गृहादिसंबंधीजें विस्तीर्ण स्थल त्यास आरोपानें म्ह०

**बखा**, स्त्री० केया द्वितीयार्थी.

**बखांदणें**, रा० बाहुमूलानें दुसऱ्यास धक्का मारणें.

**बखांदी**, स्त्री० रा० बाहुमूलानें मारितांनजो धक्का ती.

**बखेडखोर**, ३ लिं० बखेडा करण्याचा स्वभावजाचा तो.

**बखेडा**, पु० स्वस्वरुत्तीनें चालणाऱ्या व्यवहारास अडचण करणारेंजें कांहींएक खटलें तो आणि तेणेंकरून त्याव्यवहारांत होतोजो व्याक्षेप तो किं० त्याव्यवहाराची होत्येजी दुर्दशा तो.

**बखूशी**, पु० بخشی फौजेवरजो एक मुख्य अधिकारी असतो तो.

**बखूशीगिरी**, स्त्री० हिं० बखशीचाजो अधिकार ती.

**बखूशीस**, न० हिं० कोणएकाचे शौर्यादिगुण पाहून राजा, इ० संतोषयुक्त होऊन त्यास जें द्रव्यादि देतात तें; २, ३ लिं० माफ.

**बगड**, स्त्री० तोरळाची करड ती.

**बगणें**, पाहणें.

**बगर**, अ० वांचून; उ० मी रुपये घेतल्याबगर जाणार नाहीं; बगर हुकूम, बगर परवानगी, इ० स०

**बगल**, स्त्री० काख.

**बगलबंद**, पु० हिं० आंगरखा, इ० कांसजो बगलेचा रुमारें बंद लावितात तो.

**बंगला**, पु० हिं० क्रीडा, बैठक, इ० कांसाठीं भूमीवर किं० दरवाजा, इ० कांवर मजला देऊन नेथें गृहासारखी वंदिस्त करून करतातजें रम्य स्थल तो.

**बगलांट, बगलांठ**, न० रा० कुभांड.

**बगलांटी, बगलांठी**, ३ लिं० रा० बगलांट करण्याचा स्वभावजाचा तो.

**बगली**, स्त्री० पायांचे घासण्यानें उंटास एकरोग होत असतो ती.

**बगल्या**, पु० जो जाचा चाकर नसतां हाताखालीं सर्वदा वागणारा तो त्याचा; २, कोणेक अधिकारावर सर्कार, इ० कांतून मुख्यत्वेंकरूनजो नेमला असतो त्याचे हातांखालीजो दुसरा दिलेला तो त्याचा.

**बगल्याचोर**, पु० प्रतिष्ठेनें वागून प्रसंग पाहून

हळूच बगलेस वस्त्र मारून चोरणारा तो.

बगळा, पु० बकप्रथमार्थी.

बगाड, न० देवापुढें मनुष्यास नवसाचें गळ टोचायासाठीं एक यंत्र करून ठेवितात तें.

बगारणी, स्त्री० फोडणी.

बंगाला, पु० एक देश आहे.

बंगाली, ३ लिं० बंगालदेशसंबंधी जो जिन्नस, भाषा, मनुष्य, इ० तो.

बंगी, स्त्री० हिं० फळें, फुलें, इ० जिन्नस वहावया करितां दोहोंकडे शिंकीं लावून जी कावड करितात ती.

बगीचा, पु० باغچه लहान जो बाग तो.

बगुणी, स्त्री० लहान जें बगुणें ती.

बगुणें, न० विस्तीर्ण तोंडाचें कढी, सांभारें, इ० करण्याचें उपयोगी ताम्रादि धातूचें पात्र असतें तें.

बगोरी, स्त्री० कों० नरडें.

बगोटें, स्त्री० कों० नरडें.

बघणें, पाहणें.

बचक, स्त्री० पिष्टादि पदार्थ गशींतून काढून घ्यावयासाठीं केला जो कमलाकार हस्त ती; बचकेंत पाणी धरणें म्ह० एखादे दुःसाध्य गोष्टीविषयीं व्यर्थ प्रयास करणें.

बचकण, स्त्री० रा० बचक.

बचकुणा, ३ लिं० कों० लहान मुलांचा उपयोगी लहान जें वस्त्र तो.

बचकुणी, ३ लिं० बचकुणा; २, स्त्री० मुख्य संप्रदायापेक्षां लांबी रुंदीस कमी जो धोत्रजोडा,



प्रा० लहान मुलांस नेसावयाचा उपयोगी ती; ३, मद्यानें भरलेला जो शिसा ती.

बचकन, बचकर, बचदिशीं, अ० बच असा शब्द होई असें चिखल, इ० कांत पाय भरणें, इ० कांचें चि०

बचका, पु० रा० बचक.

बचडा, पु० हिं० लहान जें मनुष्य, पशु, पक्षी, इ० कांचें पुमपत्य तो.

बचडी, स्त्री० मनुष्यादिकांचें लहान जें स्त्र्यपत्य ती.

बचडें, न० हिं० मनुष्यपश्वादिकांचें लहान जें अपत्य तें.

बचनाग, पु० एक सविष कंद आहे जो संस्कारें करून औषधोपयोगी होतो तो; २, त्याचें जें झाड तें.

बचबच, स्त्री० कोणएक कार्याची व त्या कार्यकर्त्याची जी दबदब होत्ये ती.

बचाव, पु० हिं० उपद्रवकारक जें कांहीं एक त्यापासून तो उपद्रव न बाधतां कोणकाचे योगानें सुरक्षितपणें होत्ये जी स्थिति तो.

बचावणें, उ० कोणएकास बचावानें विशिष्ट करणें.

बचेरी, स्त्री० उपहास्यता.

बच्चा, पु० हिं० बचडें; २, कवड्या, पैसे, इ० खळी, इ० करून खेळतात त्या प्रकरणीं प्रसिद्ध एक अर्थ आहे तो; ३, गाड्याचे चाकाचें भोंक मोठें झालें असतां त्यांत ठाकला मारितात तो; ४, अंगरखा, इ० कांचे कळीस जुपूर आली

असतां त्याकळांत त्याविनानजो बाजूस लहान-
सा जोड तो.

**बच्छान**, स्त्री॰ छानचाजो बिघडलेपणा ती.

**बच्छडा**, पु॰ बचडा.

**बच्छडी**, स्त्री॰ बचडी.

**बच्छडें**, न॰ बचडें.

**बजरबट्टू**, पु॰ एक वृक्ष आहे; २, त्याचा बी तो.

**बजाँ**, अ॰ बजाहां.

**बजाग**, स्त्री॰ कजाकजी स्त्री तिला म्ह॰

**बजाज**, पु॰ कापडाचा क्रयविक्रय व्यापार कर-
णाराजो शिंपी, इ॰ तो.

**बजाजी**, स्त्री॰ बजाजाचें कर्म ती.

**बजावणें**, तद्धकारणें; २, कांहीं एक दुर्घट काम
अंगावर घेऊन सिद्धीस नेणें.

**बजाहां**, अ॰ वैभवादिकरूनसाधर्म्यास्तव किं॰
सेवकादिकांचेठायीं मानिलेलें जें स्वप्रतिनि-
धित्व त्यास्तव आरोपानें तद्रूप मानिलेला अ-
सानहि केवळ स्वतः तोच असा अर्थ जेव्हां वि-
वक्षित आहे तेव्हां या उक्तप्रकारचें द्योतनार्थ
याचा प्र॰; कदाचित् वस्तुतः तादृश आरोप
असतांही आरोप मानायाजोगा भेद दिसत ना-
हीं अशी विवक्षा असतांही प्र॰; उ॰ सर्दाराचे
हातून काम रेटेना तेव्हां बजाहां महाराज गेले
तथापि एक वर्ष लागलें; शिंदे म्हणजे बजाहां
पेशवे होते.

**बजिन्नस**, अ॰ प्रा॰ प्रत्यक्ष या अर्थी सांगणें.
बोलणें, जाणें, पाहणें, इ॰ कांचें वि॰; उ॰ ब-
जिन्नस मी पाहिलें आणि तूं नेलें नाहींस म्हणतो-
स.

**बजरंगबली**, पु॰ हनुमंतास म्ह॰

**बट**, पु॰ स्वभावानें ठेंगणा, पुष्ट. आणि चालीस
चांगला जो घोडा तो; २, कों॰ खेळायाचे गो-
ट्यांतील जो टपतो; ३, न॰ लोखंडांत एक
जाति आहे; ४, स्त्री॰ अंबाडी, ताग, इ॰ कां-
चे दहावीस, वीं पंनास, इ॰ तंतु एकत्र संबद्ध
होऊन झाला असतोजो समुदाय ती; ५, कें-
सांचीजी जटा तीस म्ह॰

**बटकुली**, स्त्री॰ निंदेनें बटकीस म्ह॰

**बटकुरूं**, न॰ रा॰ बटकूर.

**बटकुऱ्या**, ३ लिं॰ बटक्या.

**बटकूर**, न॰ बटकुली.

**बटक्या**, ३ लिं॰ बटकीशीं रत असतो तो.

**बटछपाई**, स्त्री॰ सर्कारांतून न्यूनाधिक मापां-
ची चोकशी करून खरें मापांवर छाप मार-
ण्याचा व्यापार करितात ती; २, जांचें मापा-
वर छाप मारिला त्याबद्दल त्यापासून द्रव्य
घेतात ती.

**बटणावळ**, स्त्री॰ चालीचें नाण्यापेक्षां कमी-
जें नाणें तें बटाविलें असतां यरजो बट्टा द्यावा
लागतो ती.

**बटमोगर**, न॰ कों॰ बटमोगऱ्याचें फूल; २,
स्त्री॰ बटमोगरा.

**बटमोगरा**, पु॰ एक लहान फुलझाड आहे.

**बटमोगरी**, स्त्री॰ बटमोगरा.

**बटमोगरें**, न॰ बटमोगरीचें फूल तें.

**बटवा**, पु॰ ज्यास पांच चार पुडें असतात आणि

झांकदोरा, उघडदोरा, लाविला असतो अशी एक पिशवी आहे.

बटवी, स्त्री० लहान जो बटवा ती.

बटाई, स्त्री० बटणावळ; २, शेताच्या भूमीचें धान्यास द्यावयाचा पेन जिनशीं जो सारा ती.

[illegible]टाऊ, ३ लिं० बटाव.

[illegible]टाटा, पु० बटाटें.

[illegible]टाटें, न० एक वर्तुल कंद आहे.

[illegible]टाव, ३ लिं० हरामी, सोदा, तो.

[illegible]टावणें, आपले जवळचें नाणें विकून बाजार भावाप्रमाणें सजातीय विवक्षित नाणें घेणें.

[illegible]टीक, स्त्री० कुणबीण; २, मुळची गरत असून व्यभिचारी प्रवृत्त होऊन त्याजवरच उपजीविका करत्ये अशीजी स्त्री ती आणि त्याच मार्गे वर्तूं लागली जी तिची कन्या तीही.

[illegible], पु० मुलाची मुंज झाल्यापासून त्यास तारुण्य प्राप्त होईपर्यंत तो.

[illegible]भोजन, न० सं० मुंजीचे दिवशीं बटूंस भोजन देतात तें.

[illegible]वस्त्र, न० मुंजीमध्यें जें बटूंस वस्त्र नेसावयास देतात तें.

[illegible]वामन, पु० बटूसच म्ह०

[illegible], पु० हिं० विवक्षित नाण्यास सजातीय नाण्यापेक्षा मूल्यकृत जी हीनता असत्ये ती किं० [illegible] नाणें देऊन सजातीय दुसरें नाणें घ्यावयाचे असतां सम संख्याक घेऊन मूल्यकृत समता व्हावयास वर जो द्रव्यांश द्यावा लागतो तो; २, त्या सजातीय नाण्यास मूल्यकृतजें आधिक्य त्यास, आणि तें विकलें असतां येतो जो चरताळा त्यासही म्ह०; ३, ला० लोकांनी नाव ठेवण्यास कारणीभूत जो दोष तो; उ० असें लिहिलें म्हणून कांहीं बट्टा नाहीं; या पोरानें दुष्कर्म करून कुळास बट्टा लाविला; ४, मार्णाक, मोतीं, इ० रत्नें बांधायाचें जें लहानसें कडकें असतें तो.

बट्टावणें, स० बटावणें.

बट्टेखोर, ३ लिं० बट्टा आहे ज्यास असें जें कुल किं० नाणें, इ० तो.

बठ्ठ, ३ लिं० अत्यंत जड, मंद, आळशी, असा जो मनुष्यादि त्यास म्ह०

बंड, न० राजाज्ञा नसतां सैन्यादि जमवून एकानें धनी व्हावें, एकानें कारभारी, इ० व्हावें आणि प्रजांपासून खंडणी घ्यावी, मुलूख मारावा, असें कांहीं उत्पन्न होतें जें प्रकरण तें; २, नेतन्या; ३, साधुता, तपस्विता, इ० गुण अंगीं नसतां लोकवंचनार्थ त्याचें कोणी धरितो जें सोंग तें.

बडका, पु० कफाचा जो दाट गोळा तो.

बडखुळा, पु० ग० कोणेक कार्याचेठायीं प्राधान्यें करून जो कर्मकर्ता त्याचे हाताखालीं दुसरा कोणी असावा म्हणून उगीच निमित्तास जो कोणी सहाय असतो तो.

बंडखोर, ३ लिं० बंड करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

बडगा, पु० सोटापा मुख्यार्थीं; मारण्याचे प्रसंगीं च प्र०; उ० त्याणें दूध पाहिलें परंतु बडगा पाहिला नाहीं; बडगा दाखविणें म्ह० स्वकार्य साधून

धून दुसऱ्यास ठकविणें; तेथें काय बडगा आहे, इ० स्थलीं तेथें कांहीं नाहीं

**बडबड**, स्त्री० प्रयोजनशून्य जें बहुत भाषण तें; २, असंगत निर्मूल, अश्लाघ्य, इ० दोष विशिष्ट जें भाषण, ग्रंथ, इ० तें.

**बडबडणें**, बडबड करणें.

**बडबडीत**, ३ लिं० पाणी अधिक झाल्यामुळें स्वाद रहित जी कढी, सांभारें, पातळ भाजी, इ० पदार्थ तो.

**बडबड्या**, ३ लिं० बडबड करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**बडम**, न० पांच चार भाजा एकत्र शिजवून करितात जी एक पातळ भाजी तें.

**बडवणें**, काठी, सोटा, घण, इ० कोनीं कांहीं एक पदार्थ ठोकणें, किं० वस्त्र, इ० पाषाणादिकावर उचलून आपटणें; २, बैल, टोणगा, इ० कांचे आंड ठेंचणें किं० त्यास तत्संस्कार विशिष्ट करणें; ३, न० बडविण्याचें साधन टोणपा, इ० तें; उ० मुडाहातानें किती ठोकशील कांहीं बडवणें घे.

**बडवाला**, पु० बड प्रथमार्थीत मिळालेलाजो तो.

**बडा**, ३ लिं० हिं० मोठाजो तो; म्ह० बडाघर पोकळ वांसा; याची प्रसिध्दि क्वचित.

**बडा**, पु० एका जातीचें भक्ष्य आहे त्याचा जो कोरा तो.

**बंडाळी**, स्त्री० एक मत्याभाव किं० द्रव्याभाव, इत्यादिअनेक निमित्तानींजी अव्यवस्था ती; उ० त्याचे घरीं जेवणाची बंडाळी असत्ये.

**बडिवार**, पु० अतिशयोक्ति, इ० रीतीनें वर्णन विषय जो कोणाएकाचा मोठेपणा तो परंतु तत्‌ थन प्रसंगीं त्या मोठेपणाची निंदा असतां त्या विषयीं लोक प्रयोग करितात; उ० याची बायको सारा दिवस माहेरच्या बडिवार सांगत असत्ये.

**बडी**, स्त्री० ग्रा० फुलें, फळें, इ० उंच पदार्थ खाली पाडावयाची जी आंकडी ती.

**बंडी**, स्त्री० कमरपर्यंत जो आंगरखा ती.

**बडीव**, ३ लिं० सूत भरावें म्हणून बडवून साफ केलेलें जें जोठ, इ० वस्त्र तो.

**बडीशेप, बडीशोप**, स्त्री० एक औषधी धान्यविशेष आहे.

**बडेजाव**, स्त्री० कोणाएकाचा संपत्तिमूलक जो उत्कर्ष त्यास म्ह०; उ० त्या गृहस्थाची शिद्यांनील इकरांत बडेजाव झाली; २, राजादिकांपुढें चोबदारानीं म्हणायाचा शब्द आहे.

**बंड्या**, पु० व्यवहारांत चतुर, धीट, नवेंच लचांड एखादें उठवावें अशा स्वभावाचा जो मनुष्य तो

**बढई**, पु० हिं० सुतार काम करणारी अशी एक जाति आहे.

**बढती**, स्त्री० हिं० संपत्ति, प्रतिष्ठा, यांची जी चढती कळा ती.

**बढाइकी**, स्त्री० बढाई.

**बढाई**, स्त्री० प्रा० फुशारकी.

**बढाईखोर**, ३ लिं० फुशारखोर.

**बढायखोर**, ३ लिं० बढाईखोर.

**बढेल**, न० वडे, इ० तळून अवशिष्ट राहिलेलें जें तेल तें.

**बढया**, पु० कों० एरंड, इ० कांचें जें दोडकें तें.

**बणगी**, स्त्री० गजगुप्याची जी लुंगी ती.

**बतका**, पु० बदका.

**बतखल**, न० ३लिं० बदखल.

**बतणें**, गोट्यांचे खेळांत एका गोटीपासून दुसऱ्या गोटीनें अमुकप्रदेशीं रहावें अशीजे मर्यादा ती सोडून ती गोटी जवळ आली असतां खेळण्याचा अनुपयोगी होत्ये अशादर्शनें तिणें युक्त होणें; गोट्यांचें बतणें, प्रा० वीत, पाऊल, चौंगा, इत्याचे अंतरानें होतें.

**बता**, पु० ग्रा० बत्ता.

**बताडा**, ३लिं० सामान्यरीतीपेक्षां आकारपरिमाण ज्याचें मोठें असा जो गृह, पात्र, फळ, इ० पदार्थ तो.

**बताना**, पु० गुजराथी, इ० लोक पागोट्याचे आंतजें दुसरें लहानसहान पागोटें घालतात ज्याचे योगानें विशिष्ट पागोट्याचा आकार मोठा दिसतो तो.

**बतावणी**, स्त्री० ज्याचें सोंग आणिलें त्याचा वर्तनाचें अनुकरणद्वाराजें प्रदर्शन तो सोंगाडी करितो ती; २, अल्प किं० नीरस जी कांहीं गोष्ट ती श्रोत्यास नीट दिसे अशी बनावून सांगण्याचा जो प्रकार ती; ३, देणें, येणें, याची अटकळ पहावयाकरितां कीर्दीवरून खतावणीचे पूर्वी कच्ची खतावणी करीत असतात ती.

**बतासफेणी**, स्त्री० मिठाई आहे.

**बतासा**, पु० बत्तासा.

**बतेल्या**, पु० गलबतांत एक भेद आहे.

**बत्ता**, पु० खलांत औषधादिक घालून कुटायासाठी दगड, लोह, इ० कांचा दंडाकार पदार्थ केला असतो तो; २, गोटी बतली किं० नाहीं हें पाहायासाठीं दोन गोट्या किं० एक गोटी आणि कोंडयामध्यें पाऊल, वीत, चौंगा, घालितात तो.

**बत्तासा**, पु० साखरेचा एक पदार्थ आहे.

**बत्तिशी**, स्त्री० बत्तीस पदार्थांचा जो समुदाय ता २, आपणास्साधनभूतजो बत्तीसदंतांनी उपलक्षित मुखविभाग त्यास म्ह०; याचा प्रयोग वाईट बरें बोलिला असतां प्रारब्धदर्शनें खरें होतें तेथेंच; उ० तो बोलला होता कीं तुमचें कार्य होईल त्याप्रमाणें कार्य झालें तस्मात् त्याची बत्तिशी चांगली आहे; त्याची बत्तिशी वाईट आहे; बत्तिशी बठणें म्ह० कांहीं एक बोलल्याजें अक्षरशः तदनुरूप होणें; ३, बत्तीस वर्षांचें जें वय ती; उ० आह्मी बत्तिशीमध्यें होतों त्याचेसमयीं पांचमणाचें ओझें उचलीत होतों; ४, बत्तीसहात लांब एक वस्त्र आहे.

**बत्तिशीमसाला**, पु० बत्तीस औषधें एकत्र करून घोडयास चारायाचा एक मसाला आहे तो.

**बत्तिसा**, पु० बत्तिशीमसाला; २, बाळंतिणीस खावयाचा जो बत्तीस औषधांचा समुदाय प्रसिद्ध आहे तो.

**बत्ती**, स्त्री० हिं० दारूचे बाण, फटाके, इ० कांस पेटवायाकरितां दारूंत घोळलेलें सूत, इ० जें ससत्य करितात ती; २, दिवा, इ० कांचे वातीसही कदाचित् म्ह०; बत्ती लावणें म्ह० गृहादिकांस आग लावणें किं० कज्जा लावणें; ३, एक पागोटें ओवेष्टिरून जीं असेंच दोन पागोटीं करिता

न तो प्र० किं० तितक्या रुईचेंच विणलें असतें जें पागोटें तें.

**बत्तीस**, ३ लिं० संख्या आहे ३२; बत्तीस हालवीत, पाडीत, इ० स्थलीं विशेष्य संनिधानावांचूनही दांतांचा बोध होतो.

**बत्तीसलक्षणी**, ३ लिं० शास्त्रामध्यें स्त्रिया, पुरुष, यांचीं उत्तम लक्षणें बत्तीस लिहिलीं आहेत तत्फक जो तो.

**बत्त्या**, पु० को० बत्ता.

**बद**, पु० जांडसंधीस गर्मीमुळें एक निर्मुख गळवासारखें उठाणू होतें तो.

**बंद**, पु० कांहीं एक पदार्थ बांधावयासाठीं साधनभूत जो दोरी, इ० कांचा तुकडा तो; २, तेणेंकरून बांधिलें असतां पदार्थाभोंवता होतो जो रचनाविशेष तो; ३, अंगरखा, पालखीचा पडदा, इ० कांस लाविला असतो जो कसा तो; ४, ला० कोणएक गोष्टीविषयीं अमुकानें अमुक रीतीनें अमुककालीं अमुक करावें, या बाहेर वर्तूं नये असा शास्त्र, राजा, लोक, इ० कांनीं केला असतो जो नियम तो; उ० ब्राह्मणानें प्रातःस्नान केल्यावांचून कांहीं करूं नये असा शास्त्रांत बंदकरून ठेविला आहे; ५, कारागृहादिकांच्याठायीं जी प्रतिबद्धता तो; ६, रोज वर्खाचा जो कागदाचा तुकडा तो; ७, ३ लिं० वि० गति कुंठित होऊन प्रतिबन्ध आला जो मार्ग, व्यवहार, उदक, भाषण, इ० तो; कर, हो, अस, इ० धातूंचे योगीं प्र०

**बदअंमल**, पु० व्यभिचारादिक जें दुष्कर्म तो.

**बदक**, न० एक पक्षी आहे.

**बदकण, बदकन, बदकर, बददिन, बददिशीं,** अ० अनु० चिखल, इ० मृदुस्थलावर मनुष्यादिकानें पडणें, इ० कांचें किं० लोणी, शेण, इ० कांचा गोळा, पक्क अंबा, इ० मृदु पदार्थांचें पडणें, मारणें, इ० कांचें वि०

**बदकर्म**, न० बदअंमल.

**बदका**, पु० शरीरादिकांवर बुक्कीनें प्रहार तो; २, भिंत्यादिकांवर टाकणें, मारणें, इत्याद्यर्थ घेतला किं० घेण्यासाठीं उद्दिष्ट जो बचकभर चिखल, शेण, लोणी, इ० कांचा गोळा तो.

**बदखल**, न० चहूंकडे टेंप असून मध्यें खोलवट जें स्थल तें; हें स्थल वाचकाचें विशेषण होतें; उ० त्या बदखलांत दहा घरें आहेत; तो जागा बदखल आहे; २, ३ लिं० थबकडें जें भांडें, इ० तो.

**बंदखलास**, ३ लिं० हिं० कारागृहापासून सुटला जो तो.

**बंदखाना**, पु० हिं० कारागृह.

**बंदखुलास**, पु० हिं० राजादिकानें प्रतिबंधांत ठेविलेले जे चोर, पशु, पक्षी, इ० त्यांची जी सुटका तो.

**बदनकशा**, पु० हिं० कोण एकानें कीर्त्यर्थ आरंभिला जो व्यापार तो विवक्षानुरूप सिद्धीस न गेल्यामुळें होत्ये जी बेअबरी तो; उ० सभेमध्यें त्या पंडिताचा बदनकशा झाला.

**बदनक्शा**, पु० हिं० बदनकशा.

**बदनामी**, स्त्री० हिं० युद्धाच्याठायीं पलायन किं० आरंभिलेलें कार्य तडीस न गेलें, इ० कारणामुळें आब जाऊन होतो जो दुर्लौकिक तो.

**बदफेल**, ३लिं॰ بدفعل नीतिविरुद्ध आचार करि-
तो तो.

**बदफेली**, स्त्री॰ بدفعلی बदफेलाचें जें कर्म तें.

**बदबद**, अ॰ अनु॰ घट्ट दहीं, आंबरस, पू, इ॰ पा-
त्रादिकांतून ओतणें, शरीरादिकांतून बाहेर प-
डणें, इ॰ कांचें वि॰

**बदबदणें**, नगारा, भांडें, इ॰ फुटणें, इ॰ कार-
णामुळें विस्वर नीच वाजणें; २, पिकलेलें उ-
ठाणूं, इ॰ पूयातिरेकानें विशिष्ट होणें

**बदबदीत**, ३लिं॰ बदबदायाजोगा जो नगारा.
भांडें, इ॰ तो.

**बदबोय**, स्त्री॰ दुर्गंध; २, ला॰ दुर्लौकिक.

**बदमस्त**, ३लिं॰ بدمست पराकाष्ठेचा जो उन्मत्त तो.

**बदमस्ती**, स्त्री॰ بدمستی बदमस्तपणा.

**बदमामली**, स्त्री॰ بدمعامله दंडेली.

**बंदर**, न॰ हिं॰ ग्राम्यादिकांचा आश्रयानें समुद्रा-
चे किं॰ खाडीचे कांठीं जीं गलबतें लागायाची
जागा असल्यें तें, किं॰ तद्विशिष्ट तो गांवही तें,
२, समुद्राचा जो कांठ तो; उ॰ मी बंदरानें आ-
लों; बंदर करणें म्ह॰ वायु प्रातिकूल्य भांजन,
इ॰ कांहीं कारणामुळें गलबत अविवक्षित बं-
दरीं लावणें; ३, ३लिं॰ दुसऱ्यास ठकला जाया-
चा नाहीं सर्व लौकिकीं व्यवहारांत दक्ष असा-
जो मनुष्य तो; बारा बंदरचें पाणी प्यालेला
म्ह॰ अनेक देश फिरल्यामुळें चतुर झालेला
बंदर वाहणें, इ॰ स्थलीं जलमार्ग वाहणें.

**बंदरकांठ, बंदरकांठा**, पु॰ समुद्रतीर.

**बंदरकिनारा**, पु॰ बंदरकांठ.



**बदरंग**, पु॰ बेरंग.

**बंदरवार**, स्त्री॰ बंदरकाठानें जी वार ती.

**बंदरसई, बंदरसही**, ३लिं॰ जलमार्गेकरून
किं॰ खुशकीनें बंदरांत दाखल झाला तो पदा-
र्थ.

**बंदरी**, ३लिं॰ देशांतराहून जलमार्गानें आलेला
जो खोबरें, सुपारी, तूप, छीट, इ॰ जिन्नस तो;
२, वा॰ बंदर जो मनुष्य तो.

**बंदरीजिन्नस**, पु॰ मासळीचा कुट्यास संकेतानें
म्ह॰

**बद्रा**, पु॰ नौकेंत एक भेद आहे.

**बदल**, अ॰ हिं॰ कांहीं आपल्याजवळील वस्तु दु-
सऱ्यास देऊन त्यापासून विक्रय व्यवहाराचानु-
न तत्प्रतिनिधित्वेंकरून कांहीं दुसरें घ्यावें अ-
शा संकेतानें देणें, करणें, इ॰ कांचें वि॰; उ॰
या घोगोट्याबदल हा शेला देतोस तो करसा घ्या-
वा; २, अवश्य द्यावयाचें, घ्यावयाचें, करावयाचें,
इ॰ जें कांहीं तदभावीं. तत्स्थानीं, तत्प्रतिनिधि
त्वेंकरून देणें, घेणें, करणें, इ॰ कांचें वि॰; उ॰ ए-
कादशीचें उपोषण होईना म्हणून त्याबदल ए-
क गोप्रदान केलें; ३, कांहींएक प्रयोजक जें नि-
मित्त त्यामुळें; उ॰ चोरी बंदल दंड पडला; अध्य-
यनाबदल या गावांत राहणें प्राप्त; ४, न॰ आप-
ण आपले घरची मुलगी कोणाकडे द्यावी.
आणि त्याचे घरची आपले घरीं करावी. असें
किं॰ आपण दुसऱ्याकडे द्यावी, दुसऱ्यानें तिस-
ऱ्याकडे द्यावी, त्या तिसऱ्यानें पुनः आपल्याक-
डे द्यावी, इ॰ अनेक स्थान संकेतानें विवाह

करण्याचाजो प्रकार तें; को॰ बदल॰ स्त्री (खाणें) धरलेल्या संकल्पादिकापासून ब- दलणें.

**बदलखातर**, अ॰ हिं॰ कोणेकाची मर्जी संतुष्ट व्हा- वी म्हणून ये,जा,दे, इ॰कांचें वि॰

**बदलणें**, मुळचाजो पदार्थ तो अन्यत्र नेऊन त्या ठि- काणीं विवक्षितरूपानें जो तत्सजातीय तो आण- णें; २, ला॰ फिरणें दुनीयार्थी; उ॰ तो वचनास ब- दलला; तो राजाचा प्रधान राजावर बदलतांच त्याणें सर्व राज्य बुडविलें.

**बदलमुशारा**, पु॰ بدل مشاهره संस्थानसंबंधी, इ॰चा- करांस मुशाऱ्याबदला जें द्रव्य देतात तो; प्रा॰ ख- र्चखात्याचे लिहिण्यामध्यें याचा प्र॰ होतो.

**बदला**, अ॰ बदल प्रथम द्वितीयार्थी; २, पु॰ कोण एकास रुपये, इ॰ नाणें द्यावयाचें असतां पारखुन देत्येसमयीं त्यांतजो वाईट ऐवज निघतो तोजो पु- नः बदलून द्यावा लागतो.

**बदलाचेंलग्न**, न॰ बदलावणानें झालेंजें लग्न तें.

**बदलाबदल**, स्त्री॰ अदलाबदल.

**बदलामी**, स्त्री॰ आपण अपराध, इ॰ मुळींच केला नसता किं॰ बुध्या केला नसतां जें एखादें दुर्निमि- त्त प्राप्त होतें ती; उ॰ त्याणें चोरी केली नसतां त्या- जवर चोरीची बदलामी आली.

**बदलावण**, न॰ रा॰ बदल चतुर्थार्थी.

**बदली**, स्त्री॰ हिं॰ अधिकारादिक जीं अनेक स्थानें आणि अधिकारी, इ॰ जे अनेकस्थानीं त्यांचा या- स्थानींचा त्यास्थानीं, त्यास्थानींचा तिसऱ्या स्था- नीं, इ॰रूपजो स्थानभेद ती.

**बदलौकिक**, पु॰ दुष्कर्मांच्याचरणमूलकजो अ- पकीर्ति तो.

**बदल्या**, पु॰ काहींएक कार्य करावयाकरितां आपलेस्थानीं योजितजो दुसरा तो; उ॰ आम- चा चाकर आपला बदल्या देऊन लग्नासाठीं गेला.

**बदसूरत**, ३ लिं॰ कुरूप.

**बदसूर**, ३ लिं॰ हिं॰ अपसूर.

**बंदा**, पु॰ आपले दासीचाजो पुत्र तो; २, ओशा- ळगतीमुळें दुसऱ्याचे आज्ञेंत वागतो तो त्याचा; ३ लिं॰ खुर्दा, रुपये, कवड्या, इ॰ रूपें करून खं- डरूप झालेला नव्हे असा अखंडजो रुपया. मोहर, पैसा, इ॰ तो.

**बदाबद**, अ॰ अनु॰ वृक्षादिकावरून आंबे, फ- णस, इ॰ पडणें किं॰ निसरड्या भुईवर पाय नि- सरून माणसें, इ॰ पडणें किं॰ शरीरावर बु- क्या मारणें, इ॰ कांचें वि॰

**बदाबदी**, स्त्री॰ अनेकानीं परस्पर बुक्या, इ॰- कानीं बराबर मारण्याचाजो व्यापार ती.

**बदाम**, स्त्री॰ वृक्ष आहे; २, न॰ पु॰ तिचें फळ तें तो.

**बदामी**, ३ लिं॰ एक रंग आहे; २, तद्विशिष्ट शा- लजोडी, इ॰ वस्त्र, इ॰ तो; ३, बदामाचा आकारा- चाजो डबा, ठिकला, इ॰ पदार्थ तो आणि तद्वति आकारही तो.

**बंदीखाना**, पु॰ हिं॰ बंदरखाना.

**बंदीवान**, पु॰ हिं॰ राजादि प्रभूनी स्वतंत्रपणें वा- गण्याविषयीं प्रतिबंधकरून कारागृहादिकां

चाठायीं ठेविला असतोजो चोर, इ० अपराधी तो

**बंदिशाळा**, स्त्री० बंदिखान.

**बंदिस्त**, स्त्री० किल्ला, वाडा, चौथरा देवळ, शेताचा बांध, इ० कांची विटा, दगड, चुना, इ० कांहीं करूनजी रचना ती; २, किल्ला, वाडा, इ० जी इमारत ती; ३, शिलकबंद, इ०कांचे बंद अधिक उणे झालेअसतां समजावे ह्मणून वरील बंदावर संख्येचा अंक घालूनजो. संख्यानियम करितात ती.

**बंदिस्ती**, स्त्री० बंदिस्त प्रथमार्थी.

**बंदी**, स्त्री० कांहीएक कारणानें कांहींएक कार्यास जो प्रतिबंध ती; उ० त्याचेघरीं जावयास बंदी नाहीं; २, चालताजो व्यवहार, इ० त्याची गति कुंठित होऊनजी अवस्थिति ती; उ० एखादावेळ दक्षिणा चालली होती अतां बंदी झाली; ३, पु०सं० राजादिकांपाशीजो स्तुतिपाठक असतो तो.

**बंदीजन**, पु० बंदी तृतीयार्थी.

**बंदूक**, स्त्री० दारूच्या योगानें गोळी मारावयाचें लोखंडाची नळी इत्या एतद्विशिष्ट यंत्र आहे ती.

**बंदोबस्त**, पु० चेतनाचेतन पदार्थ किं० कोणेक व्यवहार अव्यवस्थित होऊं नये ह्मणून त्याचें कांहींएक नियामक साधनानें इष्ट व्यवस्थेंत जें स्थापन तो किं० तेणेंकरून त्याची होत्येजी तादृश व्यवस्थेंत स्थिति तो किं० अव्यवस्थित नहोतां रहावें असाजो त्या व्यवहारादिकांचा स्थितिप्रकार तो.

**बंदोबस्ती**, स्त्री० प्रा० बंदोबस्त.

**बद्द**, अ० विवक्षितसंख्यापरिमाणांत ईषन्मात्र न्यूनता किं० आधिक्य यांचाजो अभाव त्याचें द्योतक त्या संख्यापरिमाणाचें वि०; उ० नेोगावएथून बद्द चार कोस आहे.

**बद्दल**, अ० बदल प्रथम द्वितीय तृतीयार्थी.

**बद्दू**, ३लिं० व्यभिचारादि दुष्कर्म दैववशात् झाल्यामुळें लोकांनीं हा वाईट आहे असें मानावया जोगे योग्यतेस पावलाजो तो किं० कोणेकाचा अपराध हातून हकनाक झाल्यामुळें किं० नहोतां उगीच आरोप आल्यामुळें त्याणें हा दुष्ट आहे, वाईट आहे असें मानावयाचे योग्यतेस पावला तो त्याचा; उ० मी याडुष्टाचे संगतीस लागून त्या गृहस्थाचा मात्र बद्दू झालो.

**बद्ध**, ३लिं० बंधन पावलाजो तो.

**बद्धक**, न०सं० पोटामध्यें अजीर्णादिविकृतीमुळें जी स्तब्धता तें; २, आपल्यास जाचायाजोग्या रूपानें परिणाम पावलें जें स्वकर्मादि तें.

**बद्धकटाक्ष**, न०सं० परस्परांचें जें परम वैर तें.

**बद्धकोष्ट**, न० सं० पोटामध्यें नित्यशः बद्धक असावें अशीजी कोणेकास विकृति जडली असत्ये तें.

**बद्धमुष्टि**, ३लिं० सं० कदर्यूस ह्म०

**बद्धमूल**, ३लिं० सं० मुळ्या भूमींत दूर गेल्यामुळें दृढसंबद्ध झालाजो वृक्ष तो; २, ला० शरीरांत पुरती व्याप्ति झाली जाची असाजो रोग तो; ३, अधिकारावर बहुत दिवस ठरल्यामुळें दृढता पावलाजो अधिकारी, इ० तो.

**बद्धवैर**, न० बद्धकटाक्ष.

**बद्दस**, स्त्री० हिं० डेरा, राहुटी, इ० कांस खांब अ॰ डकावयाचें कातड्यानें मढवून करितात जें मो॰ क ती.

**बंध**, पु० सं० बंद परंतु तृतीय, षष्ठ, सप्तमार्थांवांचून; २, ला० जेणेंकरून गुंतला जातो असा स्नेह, माया, प्रपंच, ममता, मोह, इ० तो; ३, चक्र, कमळ, इ० कांचें अंकन करून त्यांत अक्षरें लिहून तीं अक्षरें आंत घेऊन श्लोकादि करण्याचा प्रकार आहे तो; चक्रबंध, कमलबंध, मालाबंध, रथबंध, इ० स० प्र०

**बधणें**, कोण एक गोष्टीविषयीं वशकर्ताजो कोणएक त्यास कोणएकानें तद्विषयीं वश होणें; २, उभयसाध्यजो सवदा, विवाह, इ० तो उभयतांस वश करून तिसऱ्यानें बनविला जाणें.

**बंधन**, न० सं० बांधण्याचाजो व्यापार तें किं० तेणेंकरून होतोजो बांधलेपणा तें किं० तत्साधनजें दोरी, इ० तें; २, ला० संसारादिकांत गुंतायास कारणजे मोहादिक तें.

**बंधारी**, स्त्री० बंद प्रथमार्थी.

**बंधारण**, न० प्रा० बंद चतुर्थार्थी.

**बंधारा**, पु० कों० बांध प्रथमार्थी.

**बधिर**, ३ लिं० सं० बहिरा.

**बंधु**, पु० सं० ज्याचे आईबापाचाजो पुत्र तो त्याचा; २, पितृव्य, आत, मातुल, मावशी, गुरु, इ० जे मातापितृसस्थानिक त्यांचेजे पुत्र ते प्र०; ३, धनी, गुरु, वतन, व्यवहार, इ० एक आहे ज्यांच्या असेजे ते परस्पर ह्मणवितात; ४, आपला उपकारकर्ता, कैवारी; जो कोणेक ईश्वरादिक त्यास ह्म०; या अर्थी दीनाचाजो बंधु तो दीनबंधु, अनाथबंधु, इ० स० प्र०; ५, बांधव.

**बंधुत्व**, न० पराकाष्ठेचेंजें सख्य त्यास ह्म०

**बंधुराज**, पु० स्तुतीनें किं० निंदेनें भायास च ह्म०

**बंधुवर्ग**, पु० भाऊ. इ० बंधूंचाजो समुदाय तो; २, रा० कांहीं निंदा, उपरोध, इ० विवक्षित असतां भावास ह्म०; या अर्थी नित्यें अनेक वचनांत; उ० मी चांगली गोष्ट केली तथापि आमचे बंधुवर्गांचे मनास येत नाहीं काय करावें

**बन**, न० हिं० वृक्ष समुदायानी विशिष्टजो भूविभाग तें; या अर्थी प्रा० समास होऊन प्र०; उ० बोरबन, आंबेवन, बाभुळबन, इ० ग्रंथ ह्मण, इ० कांत केवळाचाही प्र० होतो; २, पु० दशविध गोसाव्यामध्यें एक भेद आहे.

**बनकेळ**, स्त्री० केळींत एक भेद आहे.

**बनणें**, कोणेकास कोणेक कार्य करण्याविषयीं कालावकाश, अंतःकरणवृत्ति, द्रव्य, इ० अपेक्षित असल्येजी सामग्री, त्यांचे आनुकूल्यानें अनुकूल पडणें; उ० आह्मी गतवर्षीच घर बांधणार होतों परंतु साहित्य मिळालें नवतें ह्मणून बनलें नाहीं; मला तिकडे जावयास बनत नाहीं; २, पूर्वी तत्तद्धर्म वैशिष्ट्येंकरून असिद्धपणें स्थितजें कांहीं त्याणें तत्तद्धर्म वैशिष्ट्येंकरून व्यवहार्यता पावावयाजोगे योग्यतेस येणें; उ० प्रतिष्ठिताचा पोर पण सोद्यांचे संगतीनें सोदा बनला; ३, शरीर किं० शरीरी मनुष्यादिक याणें बळकट आणि पुष्ट होणें; ४, अनेकांचे अनुमतानें व्हावयाचाजो देव घेव,

विवाह, इ० कांहीं व्यवहार तोनीं सर्व अनुमतें परस्पर अनुकूल होऊन घडनेस येणें; उ० हा भाडेकरी मनस्वी हाकतो त्यास तुह्मी जर बनवून चालतर भाड्याचें बनेल; ५, परस्परांचा संयोगादि संबंध झाला असतां विशिष्टगुण उत्पन्न व्हावा कांहीं चांगलें कार्य व्हावें असा परस्परांचा अनुकूलभाव असणें; उ० याचें बाहेरचा माणसांशीं बनतें घरचे माणसाशीं बनत नाहीं; त्या गोत्रास आणि या गोत्रास चांगलें बनतें; अंबराचें आणि गोडाचें बनतें; ६, कोणेकानें सुशोभित दिसायाजोगें वस्त्रालंकारादि रचनेनें विशिष्ट होणें; उ० अशी चट्टीपट्टीकरून बनून कोणीकडेगे चाललीस; ७, फज्जा, युध्द, इ० ऊपणें; उ० त्याची आमची लढाई बनली.

बनतगर, स्त्री० तगरीत एक भेद आहे.

बनबनकीलकडी, स्त्री० हिं० एका नियंत्याचे आज्ञेत वर्तणारे नव्हत परस्पर एकमनाचे नव्हत असे कोणेक व्यवहाराचेठायीं असतात जे अनेक कर्ते त्यांचाजो समुदाय त्यास ह्म०

बनात, स्त्री० प्रावरणाउपयोगी एक ऊर्णावस्त्र आहे.

बनाती, ३ लिं० बनातीचाजो बटवा. टोपी. पिशवी. इ० तो.

बनाव, पु० कार्य यथास्थित होण्यासजीं अनेक साहित्यें पाहिजेत त्यांचे अनुकूल्यानें तें कार्य सिद्ध झालें असतां त्याजवर येतोजो सुघटितपणा तो; उ० हीं बिलोरी झाडें लावल्यानें या अराशीचा चांगला बनाव झाला; अद्यापि त्याचे आमचे सख्याचा बनाव बसत नाहीं; २, परस्परांचे संयोगानें कांहीं विशिष्टगुणादि उत्पन्न व्हावें असा कांहीं पदार्थांचा असतो जो अनुकूल भाव तो; उ० केशरी गंध आणि कस्तुरीचा टिकला याचा बनाव आहे.

बनावणी, स्त्री० बनावण्याचाजो व्यापार ती.

बनावणें, कांहीं कार्य गोष्ट, इ० तदनुकूलव्यापारानें बनावानें विशिष्ट दिसे असें सिध्द करणें; उ० गोष्ट जरी नीरस असली तरी बनावून सांगितली ह्मणजे गोड लागत्ये.

बनोट, स्त्री० ध्रुपद, ख्याल, इ० कांचाजो रचनाप्रकार ती.

बंब, पु० जलादिक उंच उडविण्याचें यंत्र आहे, २, पदार्थाचें स्थूलत्व वर्णायाचें असतां हें विशेषण करितात.

बबब, अ० अबब.

बंबाळ, ३ लिं० भंबाळ.

बंबू, पु० सकेतानें शिश्नास ह्म०

बंब्या, पु० विद्यादि गुणानीं रहित असून शरीरानें जो धष्टपुष्ट आणि दांडगा त्यास ह्म०; २, बंबू.

बभ्रा, पु० गुप्तरूपेंकरून राखून ठेवावयाचीजी कांहींएक गोष्ट तिचाजी जनांत प्रसिद्धि तो; २, कोणेकाचें दुष्कर्मादि बाहेर पडल्यामुळें जी लोकामध्यें त्याची होत्ये उपहास्यता तो; ३, रा० कोणएकाचें कांहींएक गोष्टीचें प्रत्यक्ष नसतां सर्वत्र जनामध्यें त्या गोष्टीचें प्रचुरश्रवण होत असावें अशीजी प्रसिद्धि ती; उ० या बंब्यानें औषध दिलें असतां सर्व वांचतात एकही मरत नाहीं

असा असा आजपर्यंत बभ्रा आहे.

**बंमहादेव**, पु० गोसाव्यांचा भीक मागायाच्या वेळचा शब्द आहे; २, अगडबंब.

**बमूजिब**, ३लिं० हिं० कांहीं एकासदृश याच्या प्रयोग कागदोपत्रीं; उ० अस्सल बमूजिब नक्कल.

**बया**, स्त्री० आईस किं० आईसारिखे वडील स्त्रीस ह्मणतात.

**बयाणा**, पु० हिं० बयाना; २, राजादि प्रभूपुढें चोबदार, इ०कांनीं ह्मणायाचीं जीं वाक्यें आहेत तीं.

**बयाद**, स्त्री०पु० हिं० तपशील.

**बयादवार**, ३लिं० हिं० तपशीलवार.

**बयाना**, पु० हिं० कांहींएक मोठा जिन्नस घेण्याविषयीं ठरवून नंतर जिन्नस देणारास घेणारा किंचित द्रव्य विश्वासार्थ देतो तो; २, दुसऱ्यापाशीं सांगायाची जी मोठी कांहींएक वर्तमानाची कथा तो.

**बरकत**, स्त्री० हिं० द्रव्यादि लाभार्थ आरब्ध जो कांहींएक व्यापार त्याचीजी संभावितफलानुरूप फलद्रूपता ती किं० त्या व्यवहारापासून त्याकर्त्यास होत्येजी लब्धफलता ती; उ० ज्याचें दैव अनुकूल नाहीं त्यास कोणतेंही व्यवहारांत बरकत येत नाहीं; २, कांहीं पदार्थ यायाप्रकारें इतका व्यय झाला असतां संपावा अशी संभावना असत्ये तो तितका व्यय झालातरीं कांहीं अवशेष रहातोच असेंजे त्या पदार्थास आधिक्य येणें तें; ३, धान्यादि माप. इ० कानें मेजतेसमयीं प्रथमतः एक यास्थानीं मंगलार्थ उच्चारितात.

**बरकत्या**, पु० कों० कापलेलें भात, इ०कांचा बांधायासाठीं जो भातेण, इ० कांचा दोर करितात तो.

**बरकंदाज**, पु० हिं० बंदूकवाला जो शिपाई तो.

**बरकंदाजी**, स्त्री० हिं० बरकंदाजाचें निशाण मरणें, इ० रूपजें कर्म ती.

**बर– कण, कन, कर, दिनी, दिशीं**, अ० अकरण आहे; खिरवल, शेण, इ० कांनं पाय, इ० भरणें इ० कांचें वि०

**बरकशी, बरकस**, स्त्री० हिं० स्पर्धा; उ० बलवंताबरोबर बरकस लावणें ती विचारेंकरून लावावी.

**बरका**, ३लिं० ज्याचा गरा परम मृदु असतो असा जो फणस तो व त्याचा गरा तो व त्याचें झाड तो; २, पिक्येंजें चिभूड त्यासही ह्म०

**बरकास**, ३लिं० हिं० बरखास.

**बरकीण**, स्त्री० हिं० लघुनौकेंत भेद आहे.

**बरखत**, स्त्री० हिं० बरकत.

**बरखत्या, बरकश्या**, पु० कों० बरकत्या.

**बरखास**, ३लिं० हिं० वि० विसर्जित; कचेरी. इ० कांचें वि०

**बरग**, पु० एक धान्य आहे.

**बरगडी**, स्त्री० फांसळी.

**बरगा**, पु० पाटणी, इ० करायासाठीं दोहों तुळयांवर आडवीं बसवितातजीं लांकडें तीं प्र०

**बरची**, स्त्री० हिं० भाल्यासारिखें एक शस्त्र आहे.

**बरज**, पु० रा० बरग.

**बरड**, पु० एक क्षुद्रजंतु आहे जो हरभरे, तुरी, इ० धान्यांत उत्पन्न होऊन तेंच धान्य पोंखरून खातो तो; २, स्त्री० कों० जेथें भाजून भाताचें आवण केलें तें उपटून घेऊन त्यास्थलांत लावणी न लावितां दुसरेवर्षी आवण करायास नसेंच राखून ठेवितात जें तें स्थल ती; ३, ३लिं० जेथें चांगलें शेत होत नाहीं अशीजी निकृष्ट जमीन तो; ४, बरबडलेला जो तोंड, इ० शरीरावयव तो.

**बरडणें**, बरड. इ० जे किडे त्याणी धान्यादि पोंखरले जाणें; २, नितळपणा जाऊन विशोभित दिसायाजोगें देवींचे वण, इ०कांनी मुखाद्यवयवानें युक्त होणें.

**बरडा**, पु० जून झालेलीं पोफळें सोलून उकडून याळविलेली जी सुपारी तो.

**बरडीसुपारी**, स्त्री० बरडारूपजी सुपारी ती.

**बरणी**, स्त्री० मृत्तिकेचें आकारविशेषाचें पात्र आहे.

**बरतरफ**, ३लिं० हिं० अपराधादि झाल्यामुळें धन्यानें मामलत, इ० अधिकारावरून केलाजो च्युत तो; कर, हो, इ० धातुचे योगीं प्र०

**बरदास्त**, स्त्री० हिं० पही पाहुणा, शिष्ट, संभावित, इ० जो कोणी त्याला पाहिजे काय. नको काय, इ० विचारून न्यूनता असेल तिचें पूरण करावें, इ० रूप त्यांचा समाचार घेण्याचाजो प्रकार ती; २, पत्र, मुलें, वस्त्र, इ० पदार्थांचीजी जोपा ती.

**बरबट**, न० पु० पाणी, ताक, इ० कांत अंबा, चिंच इ० पदार्थ कोळून केलाजो दाट रस तें तो; २, न० बकरा, इ०कांचे मांसाचा सांभान्यासारिखा करितात जो पदार्थ तें.

**बरबटणें**, चिखल, बरबट, इ०कानीं हस्तादिक पदार्थ लिप्त होणें

**बरबडा**, पु० आरण्यक एक लहान झाड आहे तो आणि त्याचें बी तो.

**बरबरणें**, उठाणु, खरूज, इ० किं० तद्विशिष्ट शरीरावयव पूय, रक्त, अति अरक्त होऊन बाहेर सांडे अशाप्रकारें त्या पूयादिकानें विशिष्ट होणें किं० नसेंच नाक शेंबडानें विशिष्ट होणें; २, फणस, भोपळा इ० पदार्थ फार पिकल्यामुळें किं० कुजल्यामुळें केवळ द्रवप्राय जी दुर्दशा तीतें पावणें.

**बरबरीत**, ३लिं० पातळ शेंण. चिखल किं० कुजून द्रवप्राय झालेला फणस, नारळाचें च्याबरें, इ० पदार्थ जामध्यें हस्तादिक घातला असतां बरकन जातो भरतो असा तो; २, बरबरलेलें जें नाक. इ० तो.

**बरमा**, पु० दारवेचें बाणास ठासल्यावर तोंडाकडून पाडितात जें भोंक तो; २, तें भोंक पाडायाचें जें शस्त्र तो.

**बरम्हा**, पु० सुनाराचें एक शोन आहे.

**बरवा**, ३लिं० ग्रं० चांगला; उ० राघव माझा बरवा गे वनासि जातो फिरवा गे.

**बरशी**, स्त्री० बरची.

**बरसात**, **बरसाती**, स्त्री० हिं० घोड्यास शेत्यापासून एक रोग होत असतो ती.

**बरहुकूम**, अ० हिं० निर्दिष्ट जें कांहीं एक त्याप्रमाणें; उ० धनी हुकुम करील त्या बरहुकूम चालावें.

**बरळ**, स्त्री० निद्रेमध्यें कोणी करितोजी बडबड ती; २, मद्यादिकानें बेशुद्ध होऊन किं० अविचारानें मनस्वीजें कोणेकाचें भाषण त्यास ह्म०

**बरळणें**, निद्रा, मूर्च्छा, इ०कामध्यें असंगत बडबडणें.

**बरा**, ३लिं० उत्कृष्ट चांगला असो किं० नसो परंतु हा वाईट असें नाव जाला देवतां येत नाहीं ह्म० विवक्षित कार्याचा निर्वाह इ० सरासरी जेणेंकरून होई अशा योग्यतेचाजो मनुष्य, गोष्ट, पदार्थ, इ० तो; उ० हा धोत्रजोडा केवळ चांगला नव्हे पर बरा आहे; २, थोडा आणि पुष्कळ याचें मधलेंजें प्रमाण त्याहून कांहीं अधिक तो; उ० तूप केवळ थोडें असेलसें वाटलें होतें पण थोडें नाहीं बरें आहे; घराहून बरा लांब निघून गेलों मग आठवण झाली; ३, दुखण्यापासून मुक्त झालाजो दुखणाईत तो; बरा नामी आलों, इ० वाक्यस्थळीं माझें आगमन झालें हें बरें झालें असा अर्थ; ४, वा० चांगला.

**बराडी**, ३लिं० कों० खाण्यापिण्याचे पदार्थाची चव नपाहतां अरबचरब पुष्कळ खाण्याचा स्वभाव ज्याचा त्यास निंदेनें ह्म०; २, खाण्यापिण्याचा पदार्थ पाहिलाअसतां भीड सोडून मागावा दुसऱ्यानें कितीं दिलेंतरीं तृप्त होऊं नये असा स्वभाव ज्याचा तो.

**बरात**, पु० चंग कांचन, गंजिफांतील जो तिसरा रंग तो.

**बराबर**, ३लिं० तुल्य; उ० हें माप त्या मापाचे बराबर आहे; २, अधिकउणा नव्हे तो; उ० त्यास एथून जाऊन बराबर पंधरादिवस झाले; ३, अ० कांहींएक कृतीविषयीं मर्यादा अवधि इ० रूपेंकरून धरिलाजो कालविभाग किं० देशविभाग, इ० त्यापासून ईषन्मात्र इकडे तिकडे नहोतां त्यातेंच अनुलक्षून; उ० भुईबराबर जोंधळा कापला; मागेंपुढें ह्मणू नका बराबर ह्मणा; ४, सहवर्तमान; उ० माझे बराबर गडी आहे; संपनि. व्यापार, इ० बराबर होणें ह्म० नाश पावून निःशेष होणें.

**बराबरचा**, ३लिं० जो ज्याचा बराबर झाला, आला, इ० तो त्याचा.

**बराबरी**. स्त्री० तौल्य; २, अधिक द्रव्यादि लाभार्थ आरब्धजें साहुकारी, इ० व्यापार त्यांत तोटा किं० नफा नहोतांजें मूलभूत द्रव्य त्याची मूलपरिमाणवैशिष्ट्येंकरून जी स्थीति ती; ३, धनी आणि चाकर, इ० जे उत्कृष्ट निकृष्ट त्यांचा परस्पर स्पर्धादि संबंधझालाअसतां होत्येजी समान योग्यता ती; उ० हलक्या माणसाच्या तोंडीं लागून आपली त्याची बराबरी करून घ्यावी यांत विशेष काय.

**बराबरीचा**, ३लिं० जा परस्परांची विद्यादिकृत योग्यता तुल्य आहे ते परस्पर.

**बरी**, स्त्री० अंगरख्याचीजी पेसकळी ती.

**बरीक**, अ० वाक्यालंकार आहे; सजातीय पदार्थ समुदायांतून एखाद्याच पदार्थाचा कांहीं विशेष विवक्षित धर्माचे विधानार्थ जेव्हां अंगिकार विवक्षित आहे तेव्हां प्र०; उ० सगळ्या शाळेत एखादा मुलगा बरीक चांगला आहे.

**बरीगत**, स्त्री० धडगत.

**बरू**, पु० ज्याचा प्रा० लेखणी करितात असा एक तृणवृक्ष आहे.

**बरें**, न० हितरूपेंकरून विवक्षितजें लाभ आरोग्य, इ० तें सर्व; २, अ० कांहींएक गोष्ट मनांत घेऊन अंगीकृतकेली अशा अर्थाचें द्योतक उद्गारसदृश अव्यय आहे; केवल वाक्यालंकारतेंकरूनही प्रयोग होतो; उ० कायबरें यास उदाहरण.

**बरेंवाईट**, न० दैवगतीनें संभाव्यमानजें दुखणें, मरण, नाश, इ० कांहीं अरिष्ट तें, किं० आरोग्यादिरूप बरें आणि रोगादिरूप वाईट तें.

**बरोबर**, ३ लिं० बराबर.

**बरोबरचा**, ३लिं० बराबरचा.

**बरोबरी**, स्त्री० बराबरी.

**बरोबरीचा**, ३लिं० बराबरीचा.

**बऱ्हाणपुरी**, ३लिं० बऱ्हाणपूर म्हणून शहर आहे तत्संबंधी कापड, जरतार, इ० तो.

**बर्फ**, न० हिं० आकाशांतून दहिंवरपडून थंडीचा योगानें थिजतें तें.

**बर्फी**, स्त्री० हिं० एक मिठाईत पदार्थ आहे.

**बर्बर**, पु० सं० यवनांत एक जाति आहे.

**बल**, न० कोणेक कार्याविषयीं प्रवृत्त जें कर्ता, इ० कारक त्याचेहातून स्वस्वक्रिया त्याजवर लागू पडून त्यात्याकार्याचा निर्वाह व्हावा किं० कोणेक अर्थ आपण ज्या स्थितीनें स्थित असतो त्याहून वेगळ्यास्थितीनें कोणी पावधूं लागला असतां त्याणें त्यास्थितीनें नपावतां स्वस्थितींत न रहावें अशा विषयीं प्रयोजक जो अर्थमात्राचेअंगीं शरीरदृढता, विद्वत्ता, धनिकता, इ० निरूपित धर्मविशेष असतो तें; २, त्यास निरूपक जे विद्याधन, सहायाश्रय, इ० त्यास म्ह०; ३, ग्रह तारा, इ० कांचा आनुकूल्यरूप जो आश्रय असतो तें; ४, सैन्य.

**बलक**, पु० कोरफड पक्ष्याचें अंडें, इ० कांत जो बुळबुळीत केवळ पातळ नव्हे, केवळ दाट नव्हे असा द्रव्यांश विशेष असतो तो आणि तत्सजातीय कितीएक फळें, पुष्पें, पत्रें, इ० कांपासून निघतो जो द्रव्यांश तो.

**बलकी**, अ० दोचढ्याचापर्क्षी; उ० तीनशें पडोत बलकी साडेतीनशें पडोत परंतु घोडा घ्यावयाचा; २, स्त्री० दिवाणखाना, मखर, इ०संबंधी खांब, इ०कांचे कोंपरा, इ० कांवर शोभार्थ पन्हळासारखा आकारविशेष करितात ती.

**बलकुबल**, स्त्री० हिं० कांहींएक संभाव्यमान जो संकटप्रसंग ती; उ० हत्यार जवळ असावें बलकुबल पडली असतां कामावर पडतें.

**बलव**, पु० रा० बलक.

**बलवत्तर**, ३लिं० अतिशयित जो बलाढ्य तो; दैव, काळ, कर्म, इ० कांचाठायीं विशेषेंकरून प्र०

**बलाई**, स्त्री० बलाय.

**बलागत**, स्त्री० आपण कुश्याविषयीं उद्योग न करितां बळेंच प्राप्त होतें जें कज्जा इ० लचांड ती.

**बलांडा**, पु० को० बलगांठ

**बलाढ्य**, ३ लिं० विशेष बल आहे ज्यास तो.

**बलाणी**, स्त्री० ग० देवालयादिकांच्याठायीं भिंतीच्या आश्रयानें ओट्यासारिखी बसायास करितात जी जागा ती.

**बलात्कार**, पु० तेणें कर्मादि होण्यास कर्त्याची प्रीति, नीतिकालमहात्म्य, इ० जीं प्रसिद्ध निमित्तें आहेत त्यांच्या अभाव असतांही तेणें करोंड प्रवृत्त व्हावें ह्मणून त्यावर केवळ बलाचा प्रयोग करितात तो.

**[illegible]**, न० वादप्रतिवादादि संबंधीजे अनेक पक्ष त्यांत असतें जें एकापेक्षां एकास सबलत्व [illegible] एकास दुर्बलत्व तें; उ० हे दोन पक्ष [illegible] त्यांत [illegible]पाहून सबलपक्ष असेल [illegible].

**[illegible]**, स्त्री० हिं० इडापिडा; उ० बलाय गेली तूं [illegible] आलास तर; ह्म० शहाण्याची बलाय दूर.

**[illegible]**, [illegible] प्रथमार्थी; २, न० आमंत्रण [illegible]र्थी.

**बलावणेकरी**, पु० आमंत्रण्या.

**बलि**, पु० देवता, पिशाच, इ०कांचे प्रीत्यर्थ अन्नाचा गोळा, इ० किं० मांस, पशुपक्षी मारून किं० जिताच अर्पितात तो; २, बलिदान, बलिप्रदान, इ०स० देवादिकांचे पूजनार्थ जी पुष्पादिक सामग्री ती.

**बलिप्रतिपदा**, स्त्री० कार्तिकशुद्ध प्रतिपदा.

**बलिष्ठ**, ३ लिं० अति बलाढ्य तो.

**बली**, ३ लिं० बलाढ्य.

**बलुतें**, न० गांवचे वतनदार जे उपाध्या, जोशी, नहावी, परीट, कुंभार, सुतार, इत्यादिक त्यांस त्यांचे चाकरीबद्दल शेतांवर यावें लागतें धान्यादिक ते; वारा जी बलुतें त्यांस प्रसंगविशेषीं ह्म०

**बलुतेदार**, पु० बलुत्या.

**बलुत्या**, पु० बलुतें घेणारजे महार, जोशी, इ० ते प्र०

**बलोतें**, न० बलुतें

**बलोत्या**, पु० बलुत्या.

**बल्यांव**, न० लहान गलबतांत एक भेद आहे.

**बल्लम**, पु० भल्यासारखा शस्त्रविशेष आहे.

**बव**, न० सं० अक्रा जीं करणे त्यांतील जें पहिलें तें.

**बशर्त**, स्त्री० कांहींएक कार्याविषयीं यत्नाची जी पराकाष्ठा ती; उ० त्याणें त्यास बशर्तीनें वांचविलें; २, अ० प्रयत्नाची पराकाष्ठा करून; उ० या प्रांतांत बशर्त अंमल बसविला.

**बस**, अ० हिं० पुरे; २, स्त्री० यापुढें उत्कर्ष व्हावयाचा राहिला नाहीं अशी कोणेक व्यवहाराची पराकाष्ठेची पूर्ति ती; उ० त्याणें गाण्याची बस करून दिली.

**बसक**, स्त्री० अनेकानी बसायासाठीं सभामंडप, कचेरी, इ०कांचेठायीं आस्तरलेलें रुजामा, सतरंजी, इ० ती; २, पदार्थमात्राच्या आधाराशीं संबद्ध होऊन रहायाचाजो अधोभाग ती; उ० या दउतीची बसक लहान ह्मणून उलटलें; ३, मूर्त्यादिकानी नपडतां वर रहायाजोगें त्यास करितात जें आसन ती; ४, कों० बाजारांचे रस्त्यांत विकायास बसणार जे माळी, सराफ, इ० त्यांस

स त्या भूमिसंबंधें सर्कारांत जें देय पडतें तीं; ५, ज्यांतील पाणी बाहेर जात नाहीं असें केवळ समानजें शेत करायाजोगें स्थल तीं.

**बसकट**, ३लिं० थपकड; २, स्त्री० उठायाविषयीं अशक्ति किं० अनादर, इ० दिसायाजोगा हातपाय मोकळे सोडून बसण्याचाजो प्रकार तीं; ४, मार, इ० धातुचेयोगीं प्र०; उ० ही ह्मैस उर्मी आहे तीं दूध काढा एकदा बसकट मारली ह्मणजेउठणार नाहीं.

**बसकण**, स्त्री० रा० बसकट द्वितीयार्थी; २, ला० कोणेकानें बसकण मारणें घेणें एथें कांहींएक व्यापारांत थकून त्यापासून विरक्त होणें.

**बसकर**, स्त्री० पु० न० सभा. इ०कांचाठायीं बसायास घालायाचेउपयोगीं रुजामा. सतरंजी. इ० तीतोतें.

**बसकल**, स्त्री० वा० बसायासजी फावती तीं; उ० हा सारा दिवस फिरतो यास क्षणभर बसकल नाहीं; प्रा० निषेधार्थी प्र०

**बसका**, ३लिं० बसकट प्रथमार्थी; २, स्त्री० बसक द्वितीय तृतीयार्थी.

**बसकार**, पु० रा० बसक प्रथमार्थी.

**बसकीचा**, ३लिं० आधाराशीं संबद्ध होऊन रहायाचाजो अधोभाग तो विस्तीर्ण आहे ज्याचा असेंजें पात्रादि तो

**बसकूर**, न० बसकर.

**बसणें**, केवळ आडवें न पडतां पायांचे संबंधानें जी शरीरास उच्चता येत्ये तितकीमात्र नाहींशी व्हावयाजोगें पादाकुंचनानें किं० इतर अंगें टेकल्यानें जो स्थितिविशेष होतो तेणेंकरून राहणें; २, पक्ष्यानी हस्ताधाधारावर पक्षाकुंचनकरून कांहींएक काळ स्थितिविशिष्ट होणें; ३, विवक्षित कोणएक आधारीं विवक्षित कोणएक आधेयानें विवक्षानुरूप स्थित होणें; उ० पेटीस पट्टी बसली. अंमल प्रजावर बसला; अंगावर धूळ बसली; ४, चाबूक, छडी, दगड, इ० शरीरादिकावर प्रहार होई असा लागू होणें किं० तो प्रहार सपाटा मार इ० लागू होणें; ५, श्लोक कूटपद, वाक्य, हिशेब, सांधा, जवा, इ० कानी यथायोग्य योजनेनें जुळलें जाणें; ६, शरीरादिकांचाठायीं उठलेलेंजें उठाणू, इ० त्याणें ती उन्नतता सोडून त्या शरीरादि आधाराचा बरोबर होणें किं० अवयव सन्निवेशाचा शैथिल्यामुळें उन्नतता पावलाजो कापसाचा ढीग इ० पदार्थ त्याणें अवयवसंनिवेशीं दार्ढ्य धरून दबला जाणें; ७, ला० सावकारी, इ० व्यवहार संपत्ति, इ०कानीं अपकर्षदशेनें पावणें; ८, विवक्षित संख्या परिमाणादि विशिष्टजो खर्च दंड, तोटा, नफा, दरमूल्य, इ० तो; पुरुष, पक्षार्थ, इ० त्याच्या अधिकरणावर त्याच्या योग्यसंबंधानें संबन्ध होणें; उ० हीं दोन कार्येमिळून हजार रुपये खर्च बसला; हिशेबाशीनें मजवर काय बसेल तें मी देईन; ९, कोणेकानें कोणेक अधिकरण धरून स्वव्यापार विशिष्ट स्थिर होणें; उ० घरीं तगादेदार बसला ह्मणून बाहेर पैका मागायास जाचेंतर एक सारखा पंधरादिवस पाऊस बसला आहे; १० लेखन व्यापारादिकांचाठायीं हाताच्या सरावामुळें

हस्तादिकानें दृढसंबद्ध होणें जेणेंकरून त्या लेखनादिकांविषयीं हस्तादिकांची वृत्ति साहजिक होत्ये; ११, कांहींएक व्यापाराचाठायीं प्रवृत्तजो कोणेक त्याणें तो व्यापार सोडून उगीच राहणे; १२, कोणेकानें कोणेक विशिष्टजी स्थिति तद्विशिष्ट असणें; उ० याला कांहीं उलीदालीं पाहिजेत क्षणभर उगाच बसावयाचा नाहीं; तो उगाच बसला; हा रडत बसला; १३, जेऊं लागणें.

**बसंती**, ३ लिं० वस्त्रादिकांवर छिडकावरूप देतातजो कुसुंब्याचा रंग तो; २, तद्विशिष्ट जें वस्त्र, कागद, इ० तो.

**बसफुगडी**, स्त्री० बसून घालितातजी फुगडी ती.

**बसराई**, ३ लिं० बसराह्मणून शहर आहे तत्संबंधी मोत्यें, रेशीम, इ० पदार्थ तो.

**बसल्याघडीचा**, ३ लिं० घडीबंदपणें बहुत दिवस राहिलेलें जें कोरें सनंग तो.

**बसवण्णा**, पु० जंगमाचे देवळांत देवतारूप दगडाचा नंदी असतो तो.

**बसवा**, पु० या० महादेवाचे पुढचा नंदी तो.

**बसवी**, स्त्री० कसबीण, इ० कांस प्रायः निंदेनें म्ह० आणि तिचा आरोपानें निर्लज्जत्वादिगुणविशिष्टजी गरत तिलाही म्ह०

**बस्ता**, पु० वस्त्राचें लहान दिंडासारिखें जें बांधितात गाठोडें तो; २, ३ लिं राजादिकांचा नेहमी बसायाचा जो खाशा घोडा इ० तो.

**बस्तानी**, स्त्री० पंतोजी एके काठीचे अग्रास दोरी बांधून पोरांस मारावयाकरितां साधन करितो ती.



**बहकणें**, कोणेकानें उद्दिष्टस्थलीं जावयाचाजो मार्ग त्यापासून भ्रष्टहोऊन केवळ भलत्याच मार्गास लागणें; उ० तोफेच्या अवाजानें घोडा बुजूनजो बहकला तो चारकोस रानांत गेला; २, ला० गृहस्थपणा, सभ्यपणा, इ० कांचा उचित जो व्यवहारमार्ग, रीति, त्यास सोडून दुर्व्यसनादि छंद लागल्यामुळें केवळ भलत्याच रीतीत शिरणें; उ० हा पोर सोद्यांचा छंदास लागून बहकला; ३, हिशेब, कूटश्लोक, रत्नादिपरीक्षा, इ० विषयीं कल्पना चालवायाचें जें तें तें संधान तें सटून अंतःकरणवृत्ति भलत्याच संधानाकडे लागणें किं० कोणतेंच संधान नलागतां भ्रमांत पडणें; ४, त्या मनुष्यानें तादृश प्रकारविशिष्ट होणें; उ० मघाची कल्पना कांहीं जवळशी होती आतां केवळ बहकली; ५, मालाची किंमत, इ० मनस्वी हांकणें.

**बहकावणी**, स्त्री० दुसऱ्यानें मोहांत पडावयाजोगा दोनरुपयांचे पदार्थास शंभर रुपये किंमत सांगावी प्रत्यक्ष दरिद्री दिसत असून उद्यांमी लाख रुपये धर्म करणार इ० रूप जो शब्द व्यापार ती.

**बहँगी**, स्त्री० बंगी.

**बहर**, पु० स्त्री० पदार्थ उत्पन्न झाल्यापासून उत्तरोत्तर उत्कर्ष पावत असतो त्या उत्कर्षाची पूर्णता झाली म्हणजे अपकर्ष पावत पावत नाश पावतो त्यामध्यें अपकर्षाचा प्रारंभाचे पूर्वींची उत्कर्षाचा पूर्णतेनें विशिष्टजी त्या पदार्थाची दशा ती; २, नृत्य, गायन, इ० कांचा पराकाष्ठेचाजो रंग ती; बहर मारणें म्ह० नानाप्रकारचे उत्साहांतीं काल पा

लविणें.

बहुळ, ३लिं॰कों॰ उपयोगापेक्षां मोठें जें स्थल तो.

बहादुरखानी, ३लिं॰ दवलताबादी कागदांत एक भेद आहे.

बहादूर, बहादर, बहाद्दर, ३लिं॰ वाद, युद्ध, इ॰ कांत जो शूर, तो; २, विवक्षितकला, विद्या, यांत जो पुरा प्रवीण तो.

बहाणा, पु॰ वास्तविक अंशाचा निन्हवकरून दुसन्यास वंचावें ह्मणून करितात जें कांहीं मिष तो.

बहार, स्त्री॰ बहर प्रा॰ द्वितीयार्थी.

बहाल, न॰ तुळई; २, ला॰ अवेल आणि चूल, यांचे मधलाजो चुलीच्या अवयव तें; २, ३लिं॰ कोणेकावर प्रसादोन्मुख असल्येजीं कोणेकाची मर्जी तिचें वि॰; मामलत, सनद, इ॰ कोणेकास बहाल करणें ह्म॰ प्रसन्न होऊन त्याचे स्वाधीन करणें.

बहाली, स्त्री॰ मर्जीचाजो बहालपणा ती.

बहिः, अ॰ सं॰ बाहेर; बहिःप्रदेश, बहिर्मार्ग, इ॰ स॰प्र॰

बहिणावळा, स्त्री॰ कों॰ अनेक बहिणी मिळून जात्या; अनेकवचनीं प्र॰

बहिरंग, ३लिं॰ अंतरंगाचा प्रतिपक्षी तो.

बहिरट, ३लिं॰ बहिरा; २, ईषतजो बहिरा तो.

बहिरा, ३लिं॰ ज्याला कांहीं ऐकूं येत नाहीं असाजो कान तो; आणि तद्विशिष्ट मनुष्यादिक तो; २, वाय्वादिविकृतिमुळें ज्याची शुद्धि गेली असा जो हात, पाय, इ॰ अवयव तो.

बहिरागी, पु॰ वैरागी.

बहिरी, पु॰ भैरव ह्मणून देव आहे त्यास ह्म॰; २, बहिरीससाणा.

बहिरीव्यथा, बहिरीवेथा, स्त्री॰ एक महारोग आहे.

बहिरीससाणा, पु॰ एक पक्षी आहे.

बहिरोबा, पु॰ बहिरी प्रथमार्थी; २, बहिराजो पुरुष त्यास कदाचित् ह्म॰; त्याला बहिरोबाची सेवा आहे इ॰ स्थलीं तो बहिरा आहे असा अर्थ.

बहिर्दिशेस जाणें. अ॰ परसाकडे जाणें.

बहिर्बुणगें, न॰ बाजारबुणगें.

बहिर्भूत, ३लिं॰ सं॰ विवक्षितकोटीहून बाहेरचा जो तो; उ॰ कोणी मनाची गणना इंद्रियांत करितात, कोणी त्याहून बहिर्भूत असें गणतात.

बहिर्भूमीसजाणें, बहिर्दिशेस जाणें.

बहिर्मुख, ३लिं॰ आत्मस्वरूपाचे सुखाची गोडी ज्यास लागली नाहीं अतएव संसारिकविषयांकडे ज्याचे चित्ताचें प्रावण्य आहे तो आणि तें त्याचें अंतःकरण तो.

बहिर्लापिका, स्त्री॰ ज्याचे अर्थ पूरणास बाहेरचें पदादि घ्यावें लागतें असा कूटरूप कवितेचा एक प्रकार आहे.

बहिर्व्यसन, न॰ संकेतानें व्यभिचाराचे व्यसनास ह्म॰

बहिर्व्यसनी, ३लिं॰ बहिर्व्यसन आहे ज्यास तो.

बहिष्कार, पु॰ कोणेकापासून अगम्यागमनादि दुष्टकर्मघडल्यामुळें ज्यातीच्या बाहेरजी त्याची स्थिति करितात तो.

बहिष्कृत, ३लिं॰ पातकादिकारणामुळें ज्यातीनें

जास बहिष्कार घातला आहे तो; २, जा विव - क्षितकोटींतून बाहेर केलाजो तो तद्बहिष्कृत; उ० ज्ञाति बहिष्कृत, सत्य बहिष्कृत, इ० स०

**वहीण**, स्त्री० जाचे आईबापापासून जी आली क न्या ती त्याची; म्ह० बहिणीमुळें भावोजी सोय रा; २, आईबापाचे सस्थानिकजे चुलता, मामा, मावशी, इ० त्यांचीजी कन्या तीस म्ह०

**बहिणबीज**, स्त्री० भाऊबीजेचे दुसरेदिवसचीजी तृती-या ती त्यादिवशीं भाऊ आपल्या बहिणीचा भोजन वस्त्रालंकारेंकरून गौरव करितो.

**बहीणभावंडें**, न० बहीण आणि भाऊ मिळूनजा अ-नेक व्यक्ति तीं.

**बहीणभाया**, पु० रा० बहीणरूप किं० भाऊरूप कों-णीजो सोदर तो .

**बहु**, ३लिं० सं० एक दोन याहून अधिक संख्यावि - शिष्टजें कांहींएक तो; २, पुष्कळ; बहुत आहेत पाद जाला तो बहुपाद, बहुभुज, बहुतांस जो प्रि-य तो बहुप्रिय, बहुत भक्षितो तो बहुभक्ष, इ० स० प्र०; वाक्य बहुरत्न वसुंधरा .

**बहुऋणी**, ३लिं० बहुतांचा देणेकरी किं० बहुत आ-हे ऋण जास तो; म्ह० बहु उंवा त्यास खाज नाहीं बहुऋणी त्याला लाज नाहीं .

**बहुगुणी**, स्त्री० वगुणी; २, ३लिं० बहुत आहेत गु-ण जामध्यें तो मनुष्यादिक .

**बहुगुणें**, न० वगुणें .

**बहुचक**, ३लिं० चावटजो मनुष्य तो .

**बहुत**, ३लिं० पुष्कळ .

**बहुतकरून**, अ० प्रायशः

**बहुतकाळी**, ३लिं० बहुत दिवस जास जाले असा जो पदार्थ, गोष्ट, इ० तो .

**बहुतदिवशी**, ३लिं० बहुतकाळी .

**बहुतावें**, न० कों० कोणेक व्यवहारावर कर्तृत्व वक्तृत्वादिविषयीं समप्राधान्येंकरून बहुतांचा जो संबंध तें; उ० बहुतावें जालें म्हणजे एकट्या चा उपाय चालत नाहीं .

**बहुतेक**, ३लिं० यत्किंचिदंशसोडूनजो सर्व तो; उ० त्या देशांत बहुतेक मूर्ख आहेत विद्वान थोडे .

**बहुदुधी**, ३लिं० बहुत आहे दूध जीस अशीजी गाय म्हैस, इ० तो; उ० आंखुड शिंगी अल्पमोली बहुदु-धी अशी मिळणें कठीण .

**बहुधा**, अ० बहुतकरून .

**बहुधान्य**, पु० साठासंवत्सरांतील बारावा संवत्सर तो .

**बहुनायकी**, स्त्री० राज्यादि व्यवहारावर अनेक मताचेजे अनेक मनुष्य तत्सत्ताक्रांतत्वजें असतें तीं .

**बहुबीज**, ३लिं० बहुत आहेत बिया जामध्यें तो .

**बहुभाग्य**, न० राज्य चांगलें होणें. पर्जन्यपतन, सुभिक्ष, इ० गोष्टीस कारणजें बहुतांचें भाग्य तें

**बहुभाष, बहुभाषी**, ३लिं० निष्कारण बहुत बोल तो तो .

**बहुमत**, न० कोणेक गोष्टीविषयीं असतेजें बहु-तांचें संमत तें; २, ३लिं० बहुतांचें संमत आहेज विषयीं असाजो शास्त्रार्थ, इ० तो .

**बहुमान**, पु० शिष्टादिकांचा आदरपूर्वक सन्मान तें

**बहुमोली**, ३लिं० बहुत मोल पडतें ज्यास तो.

**बहुरुपी, बहुरूपी**, पु० नरामध्यें एक जाति आहे जो नाना प्रकारचीं सोंगें आणून उपजीविका करितो तो.

**बहुरूप**, न० बहुरूपी करितात जो खेळ तें.

**बहुल**, ३लिं० घट्ट.

**बहुलें**, न० लग्न किं० मुंज, इ०कारसाठीं चतुष्कोण आकारविशेषाची वेदी करितात ती.

**बहुवचन**, न० अभिधेय अर्थास बहुत्व विवक्षित असतांजें वचन होतें तें.

**बहुवचनांत**, ३लिं० बहुवचनविशिष्ट जो नामरूप किं० क्रियापदरूप शब्द तो.

**बहुवस**, ३लिं० ग्रं० बहुत याअर्थी; उ० पहावया बंधूचें मानस सेना पावली बहुवस.

**बहुवार**, अ० बहुत वेळां.

**बहुव्रीहि**, पु० समासांत एक भेद आहे.

**बहुशः, बहुशा**, अ० बहुधा.

**बहुश्रुत**, पु० केवळ एकाच्या विद्येंत निष्णात नव्हे थोड्याथोड्या सर्वविद्या जाणे पाहिल्या आहेत असा जो तो.

**बहुसाल, बहुसाळ**, ३लिं० ग्रं० बहुवस; उ० बहुसाळ वाद्यें वाजती.

**बहुज्ञ**, ३लिं० शास्त्र आणि लौकिक एतत्संबंधी बहुत गोष्टी ज्याला ठाऊक आहेत तो.

**बळ**, न० बल; बळास येणें स० विवक्षितानुरूप होण्याविषयीं बलात्कारसापेक्ष होणें; बळ करणें स० विवक्षित कर्मावर आहे तिनकें बळ लागू करणें; बळ धरणें, बळ बांधणें स० बलाधायक जी सर्व सामग्री तिचे पुष्टतेने बळकट होणें; २, स्त्री० बलि प्रथमार्थी.

**बळकट**, ३लिं० फार बळ ज्याचे आंगांत तो; २, पुष्कळ; उ० बळकट पाऊस पडला, त्यास बळकट मारलें, इ० कितीएक प्र०; ३, दृढ; उ० गांठ रूरेनाशी बळकट बांध.

**बळकटी**, स्त्री० बळकटपणा.

**बळकटून**, अ० दृढ होई असें बांधणें, धरणें, इ० धातुचें विशेषण.

**बळकावणें**, दुसऱ्याचा पदार्थ हातारवालीं आलातो परत द्यावा असें न्यायतः असतांही न देतां बळानें आपल्यापाशीं राखणें.

**बळगी**, स्त्री० स्त्रियांचे लुगड्यांत हलके किंमतीचें एकप्रकारचें लुगडें आहे.

**बळजोरी**, स्त्री० बलात्कार.

**बळत**, पु० रा० बळद द्वितीयार्थी.

**बळत्कार**, पु० बलात्काराचा अपभ्रंश.

**बळद**, न० दाणे इ० सांठवायाकरितां भिंतीमध्यें पोकळी राखून स्थळ करितात तें; २, सांठवल्याचे पदार्थ लोणचें, इ०क ठेवायासाठीं भोंवताला विटा, माती, इ० कांचा परिघ करून जें आश्रत स्थळ करितात तें.

**बळभद्र**, पु० बळिभद्र.

**बळमोड**, स्त्री० पु० उत्तरोत्तर स्फुरित होण्यास प्रयोजकीभूत वृक्ष, दुरवणें, उठाणू, पर्जन्य, इ०कानीं धरिलेलें जें बळ त्याचा कांहीं कारणामुळें होतो जो भंग ती तो; उ० झाड चांगलें वाढत होतें पण गुरानें तोंड लावल्यापासून त्याची बळमोड

जाली; उ० दोन दिवस ज्वर थोडाथोडा येतो खरा पण ती मावण्याचे बळमोड जाली; २, ३लिं० रा० बळमोड जाली असा जो रक्तादि तो.

बळस, पु० मनुष्य, पशु, हे जन्मतात त्यांचे मुखांतून जो द्रवरूप बुळबुळीत मलांश निघतो तो.

बळाढ्य, ३लिं० बलाढ्य.

बळाचा, ३लिं० जोमदार; २, बुदबळांमध्यें जाला दुसऱ्याचें बळ आहे तो.

बळात्कार, पु० बलात्कार.

बळावणें, उत्तरोत्तर उत्कर्षदशा पावायास प्रयोजकीभूत जें बळ तद्विशिष्ट रोग, शत्रु, पाऊस, इ० कांनी होणें.

बळिभद्र, बळिभद्या, पु० कपाळकरंटा जो त्यास ह्मणतात.

बळी, ३लिं० बलाढ्य; ह्म० बळी तो कान पिळी; २, बुदबळें खेळण्याचा एक प्रकार आहे; ३, पु० बलि प्रथमार्थी.

बळें, अ० दादून.

बळेंचा, ३लिं० आहार्यज्ञानविषय जो कांहीं एक अर्थ तो.

बळेंबळेंचा, बळ्यांबळ्यांचा, ३लिं० बळेंचा.

बक्षी, पु० बखशी

बक्षीगहूं, पु० बखशीगहूं.

बक्षीस, न० बखशीस.

बा, पु० बाप; २, प्रायः मनुष्य, देव, यांचा नावापुढें बहुमानार्थ हा शब्द लागतो; उ० मोरोबा, विठोबा, कान्होबा, बहिरोबा; ह्म० बाचा बा गेला नी बोंबलतां ओंठ गेला; प्रेमानें पुत्रादिकांसही या शब्दानें व्यवहार करितात; उ० येरे बा प्रल्हादा करिकां रे भोजन; बाबाइा भ्रमला भक्तहितार्थी.

बाआगळा, ३लिं० कोणेक पदार्थास विवक्षित पदार्थापेक्षां विवक्षित गुणानें पराकाष्ठेचें आधिक्य वर्णनीय असतां हें विशेषण देतात; उ० तेथें असला धोत्रजोडा मिळेल ह्मणून काय विचारितोस त्याचे बाआगळा मिळेल.

बाइलबुध्या, ३लिं० बाइलेचे बुद्धीनें वागतो तो.

बाइलबोल्या, ३लिं० जनानी ज्याचें भाषण असा जो पुरुष तो.

बाइलवेडा, ३लिं० लोकांत वाईट दिसाया जोगें निरंतर बायलेचें वेड जास असा जो पुरुष तो.

बाई, स्त्री० मातोश्रीस किं० तत्सदृश कोणी वडील प्रतिष्ठित जी स्त्री तीस या नावानें व्यवहारितात; २, स्त्रियांचें व्यावहारिक नामापुढें आदरार्थ याचा प्रयोग होतो; उ० रमाबाई आली आणि अकाबाई गेली; ३, वडील जावेस किं० कोणी प्रतिष्ठित श्रीमंत स्त्री तीस ह्मणतात या अर्थी अनेकवचनांत प्र० एथें पक्षीं नपुंसकता येत्ये; उ० बाई आल्या; बाई कोठें गेलीं नकळे; ४, कों० जन्मात एकवार देवी ह्मणून जे अंगावर फोड येत असतात त्या; या अर्थी नित्यें अनेक वचनांत; उ० या मुलीस बाया अझून आल्या नाहीत.

बाईल, स्त्री० ज्या बराबर जिचें लग्न किं० पाट झाला ती त्याची.

बाईलभिडंग, न० रा० बायको, पोरें, इ० खटलें.

बाईलमाणूस, न० बायकोमाणूस.

बाऊ, पु० मुलास भयप्रदर्शन करत्येसमयीं भयंकर जे सर्प व्याघ्रापासून कीड, मुंगी, इ० सर्व पदार्थ त्यांस

त्यांस ह्मणतात किं० तसेंच शरीरावरील क्षत, फो. इ, यांसही ह्मणतात; बाऊकरून सांगणें, हारबविणें, इ० स्थलीं भयप्रदर्शनार्थ हलकी गोष्ट फुगवून सांगणें असा अर्थ.

बाऊद, स्त्री० वा० वृक्षाची किं० पर्जन्यावांचून मेघाची छाया ती.

बाऊल, पु० रा० मांजरासारखा एक अरण्यांत प्राणी आहे तो.

बाऊस, न० बाहुमूल.

बाऊळ, स्त्री० रा० कातळावरची जी भातजमीन जिला सर्वकाळ ओल असतें आणि जी जमीन भाजून भाताची पेरणीमात्र करावी लागत्ये ती; २, न० वा० नदीच्या कडेस वांग्या, मिरच्या, इ० शाकभाजीचें जें स्थळ तें.

बाँक, पु० बसावयाकरितां घडोंचीसारिखा काष्ठाच्या पदार्थ करितात तो; २, काष्ठादिकाचे अंगीं असत्येजी वक्रता तो; ३, परस्परांच्या अंतःकरणाच्याजो विरुद्धभाव तो; उ० त्याच्या व आमच्या आलीकडेस बांक पडला आहे; ४, एक आयुधविशेष आहे.

बाकबूक, न० कांहींएक भयानें जें पोटांत धडधड होतेंसें वाटतें अशीजी कांहीं विकृति होत्ये तीस ह्मणतात.

बाकस, ३लिं० विवक्षितसत्वांशेंकरून जो रहित तो.

बाँका, ३लिं० हिं० दुसऱ्यानें जिंकून हस्तगत करायास अशक्य असाजो किल्ला, शिपाई, इ० तो; २, पु० मुखानें वाजवायाचें एक वाद्य आहे तो.

बाकाळी, स्त्री० बकाळी.

बाकी, स्त्री० कांहींएक पदार्थ गोष्ट, इ० कांच्या देणे, घेणें, बोलणें, इ० क्रियानीं निःशेष नहोतां जो राहिला उर्वरितांश तो; बाकी पूज्य करणें ह्म० देणें घेणें एतत्संबंधी जी बाकी ती देऊन घेऊन नाहींशी करणें.

बाकीचा, ३लिं० अंशतः कांहीं विनियोग सांगितला असतां त्याविनियोगावांचून राहतो जो अवशेष अंश तो; उ० एक शास्त्रीबावामात्र यावयाचे आहेत बाकीचे सर्व आले.

बाकीसाकी, स्त्री० बाकी इत्यादिक.

बाँकी, स्त्री० लाहनजें बांका ह्मणून वाद्य तें.

बाकुटणें, रा० वृक्षादिक कोमेजणें.

बाँकेकरी, पु० देव, राजा, इ० कांपाशीं बांका वाजविण्याची चाकरी करितो तो.

बाग, पु० स्त्री० उपवन; २, कों० बांक द्वितीयार्थीं.

बागट, ३लिं० कों० ईषद्वक्रजें काष्ठादिक तो; २, न० तरवारीस निंदेनें ह्म०

बाँगडरवार, पु० बांगड्या, इ० करावयास कांचेच्या रस करण्याचे उपयोगीं एक रवार आहे.

बागडणें, कों० कुत्रीं, मांजरें, इ० कानीं आनंदांत उड्या मारणें खेळणें.

बाँगडी, स्त्री० स्त्रियानीं मणगटांत धारण करायाकरितां कांचेचीं वलयें करितात तीं प्र०; २, तदाकार स्वर्णादिकांचें केलें असतां त्यास ह्म०

बागणें, काष्ठादिक वक्रतेनें युक्त होणें.

बागदोर, पु० घोड्याची काढणी.

**बागबगीचा**, पु० बाग, इ० तो.

**बाँगर**, पु०रा० ओंडीलजो रोपागा,वेल, इ० तो; २, ला० तत्त्वदवाजो फार वाढला आणि विद्यादि गुण ज्यांत नाहींत त्यास ह्म० .

**बागवान**, पु० हिं० बागेंत संरक्षण इत्यादर्थ ठेविला असतोजो माळी,इ०तो; २, बागेंतील भाजी, इ० पदार्थ विकत घेऊन त्यांचा उदीम करणारी एक जाति आहे.

**बागझाई**, स्त्री० हिं० गृहादिकांपुढें स्थळास रम्यता यावी ह्मणून फुलझाडें. केळी, इ० रक्षांची करितात जो सन्निवेश तो.

**बागाइती**, ३लिं० बागाईत ज्यांत आहे असें जें स्थळ: ग्राम, इ० तो; २, बागाईलसंबंधीजो पदार्थ इ० तो.

**बागाईत**, न० पाटाच्या किं० विहिरीचापाण्यानें करितातजें नारळी, पोफळी, केळी, अंजीर, पेरु, रताळीं, रवपला, वांगी, इ०जिन्नस तें किं०तें जिन्नस करायाजोगें सोईचेंजें स्थल तें.

**बागीव**, ३लिं०कों० बागट प्रथमार्थी.

**बागुरडा**,पु० करळ.

**बागूल**, पु० मुलांस भयप्रदर्शनार्थ एक भयंकरप्राणी कल्पून त्यास हें नाम ठेविलें आहे; २,मुलानी भ्यावें ह्मणून भयंकरजें सोंग आणितात त्यास ह्म०

**बागेसरी**, स्त्री० कानडेरागाचा एक भेद आहे; २, सोनें.इ० अटवायासाठीं दागीना, इ० तापवायासाठीं ज्यांत सोनार अग्नि प्रदिप्त करितात असें जें मृत्तिकादिकाचें पात्र असतें तीं.



**बांच, बाच**, पु० कोणेक कर्माविषयींजी अंतःकरणाची प्रवृत्ति चालली असत्ये ती अन्यथा व्हावयाजोगाजो भयादिसंभावनेनें अंतःकरणांत धर्मविशेष उत्पन्न होतो तो; खाणें धातूचेयोगीं प्र०; उ० प्रथम काम करीन असें ह्मणत होता मग काय मनांत आलें नकळे लागलाच बांच खाल्लान.

**बाचकणें**, कांहींएकगोष्टीविषयीं अंतःकरणानें धरिलें असतेंजें संधान त्यापासून कांहींकारणानें भ्रष्टहोऊन चकितप्राय होणें.

**बाचकावणें**, कोणेकास कोणेकानें बाचके असा करणें.

**बाचणें**, तंडणें.

**बाचरट**, ३लिं०रा० बाचरा.

**बाचरा**, ३लिं०रा० ज्याचे भाषणांत ताळतंत्र नाहीं असाजो मनुष्य तो.

**बाचुकणें**, बाचकणें.

**बाज**, स्त्री० खाटलें; २,पु०कों० फलप्रधान किं० पुष्पप्रधानजे वृक्ष त्यांस त्यात्याकालीं येतोजो फलोद्गम किं० पुष्पोद्गम तो; ३,असभ्यगुणवाचक किं० दुर्व्यसनवाचकजे शब्द त्यापुढें प्रायः तें तें आहेज्यास या अर्थी हाप्रत्यय होऊन विशिष्टशब्द विशेषणें होतात; उ० ज्याचेअंगीं कुर्रा आहे तो कुर्रेबाज, दारूचें व्यसन आहे ज्यास तो दारूबाज, इ०; ४, बचक; खाणें धातुचेयोगीं प्र०;उ० ज्यापुढें मोठेमोठे वीर बाज खातात तेथें तुझी पामराची कथा किती; बाज खाणें ह्म० आपले महत्वाचा अभिमान सोडून कांहीं कार्य करून घ्याव-

यासाठीं नम्रपणें आर्जवानें कोणेकापाशीं वर्तूं लागणें.

बाजणें, कों० बाज द्वितीयार्थानें विशिष्ट होणें.

बाजत, अ० शिवाय, परंतु एकेअंशीं कांहीं विधानकरून अवशिष्टांशीं विरुद्धविधानाची जेव्हां विवक्षा आहे तेव्हां प्र०; उ० एक धोतर मात्र राहिलें बाजत सारें चोरानीं नेलें.

बाजरा, पु० हिं० बाजरीचा एक भेद आहे.

बाजरी, स्त्री० हिं० एक धान्य आहे.

बाजलें, न० रखाडलें.

बाजवट, पु० कों० चौरंग; २, ३लिं० बाज बहुत येतो जास असाजो वृक्ष तो.

बाजा, पु० अनेक वाद्यांचा गजर तो.

बाजांगूळ, स्त्री० कों० बादांगूळ.

बाजार, पु० दुकानें मांडून क्रयविक्रयादिव्यवहार जेथें होत असतो तो जागा; २, तो दुकानें उदमीलोक याचा जमलेलाजो समुदाय आणिव्यवहार तो; ३, ला० गुप्तगोष्टीचीजी सर्वत्र प्रसिद्धि तो; म्ह० बाजार भरला नाहीं तोंच उचल्यानीं कमरा बांधल्या; ४, अव्यवस्थेनें कोणेकाचे गृहीं चालला असतोजो संसारादिव्यवहार त्यास आणि त्या गृहासही म्ह०

बाजारअफवा, बाजारआफवा, स्त्री० कोणेक वर्तमानाविषयीं लेखपत्रादि प्रमाणाचें प्रत्यक्ष नसतांतद्विषयीं जनसुखानें श्रवण होत असतेजी अफवा ती.

बाजारअवाई, बाजारआवाई, स्त्री० बाजार आफवा.

बाजारकरी, पु० बाजारांतील जे दुकानदार कि० बाजारांत जिन्नसपानस व्यापारास गेलेजे मनुष्य ते प्र०

बाजारचलन, ३लिं० बाजारांत ज्याचें चलन आहे असाजो रुपया, पैसा, इ० तो.

बाजारचलनी, ३लिं० बाजारचलन.

बाजारचीरवाद, स्त्री० कों० कलवीण, इ० आसामान्यस्त्रिया त्यांची निंदा कर्तव्य असतां त्यांस म्ह०

बाजारनिरख, पु० बाजारांत चालला असतोजो जिनसापानसाचा दर तो; २, अ० सर्व प्रसिद्ध; उ० तो बाजारनिरख सोदा; प्राय: दुर्गुणवर्णनीयअसतां प्र०

बाजारनिरखा, अ० बाजारनिरख द्वितीयार्थी; उ० त्याची बाजारनिरखी फजीती केली.

बाजारबसवी, स्त्री० बसवी.

बाजारबसव्या, ३लिं० निर्लज्जजो तो.

बाजारबातनी, स्त्री० हिं० बाजार आवाई.

बाजारबातमी, स्त्री० बाजार आवाई.

बाजारबुणगें, न० लढाऊ फौज सोडून दुकानदार, बायकापोरें, भडंगभिकार, इ० जे लष्करांत रखडलें असतें तें; २, ला० कांहींएक कार्याविषयीं उपयुक्त मुख्य मनुष्यातिरिक्त जो मनुष्य समुदाय जमला असतो त्यास म्ह०

बाजारभरणा, पु० स्पोगिरभरती.

बाजारभरती, स्त्री० बाजारभरणा.

बाजारभाव, पु० बाजारनिरख प्रथमार्थी.

बाजारमहशूर, ३लिं० बाजार, इ० सर्व जनांत

प्रसिद्ध जो मनुष्यादि तो किं० कांहीं गोष्ट तो.

**बाजारबाडा**, पु० रा० गावांत जेथें बाजार बसला असतो असाजो गांवाचा एक देश तो; २, ला० बाजार चतुर्थार्थी.

**बाजारशिरस्ता**, पु० व्याज किती घ्यावें वजन. माप, इ० घ्यावेंकसें, द्यावेंकसें, इ० विषयीं बाजारांत प्रवृत्त असत्येजी चाल तो.

**बाजारी**, ३लिं० बाजारसंबंधी जें माप, धारा, लोक, इ० तो; २, ला० केवळ निर्लज्ज, लुच्चा, जो मनुष्य त्यास ह्म०

**बाजारीण**, स्त्री० बाजारबसवी.

**बाजिंदा**, ३लिं० हिं० असभ्यपणाचें जें शहाणपण तें पुरें ज्यामध्यें आहे असाजो मनुष्य तो.

**बाजी**, स्त्री० प्रायः गंजिफा किं० सोंगटी याचाजो डाव ती; २, गंजीफांतील प्रतिरंगाचे बाराबारा पानाचेजे समुदाय ते प्र०; ३, गंजीफा खेळतांना एकेकाचे वांटणीस येतोजो पानाचा समुदाय तो.

**बाजू**, स्त्री० पदार्थमात्राचे वामदक्षिण जे पार्श्वभाग ते प्र० किं० तदुपलक्षित जे दिग्विभाग ते प्र०; उ० तो पंडित राजाचे उजवेबाजूस बसतो; २, पदार्थमात्राचे सभोंवतेजेविभाग ते प्र० किं० तदुपलक्षितजे दिग्विभाग ते प्र०; उ० याला कडाच्या चारी बाजू ताशीव आहेत; ३, फार मोठी जी सबंजी ती; ४, ला० परस्पर स्पर्धेनें प्रवृत्तजे वादयुद्ध, इ० त्याचे उपजीव्यजे दोन पक्ष ते प्र०; उत्कर्षापकर्षवर्णनप्रसंगीं प्र०; ५, अब्रू आणी, सर्वस्वें नाश व्हावा असाजो कोणेकावर येतो संकट प्रसंग ती; ६ बाजी.

**बाजूबंद**, पु० स्त्रियांचें करभूषण आहे.

**बाजेगिरी**, ३लिं० खोटें नकलीजें लुगडें, खण. इ० समंग तो.

**बाजेखर्च**, पु० हिं० मुख्य खर्चाहून इतरजो खर्च तो.

**बाझ**, पु० कों० बाज द्वितीयार्थी; उ० या माडास चांगला बाझ आला.

**बाझणें**, कों० बाजणें.

**बाझवद**, ३लिं० बाजवद द्वितीयार्थी.

**बाट**, पु० बाटलेपणारूपजो दोष तो; पड, अस, धातूचेयोगीं प्र०; उ० एकानें दुष्कर्म केलें त्याचे संसर्गामुळें सर्व गांवास बाट पडला; अक्षरवळणशुद्ध नसलें ह्मणून कांहीं पोथीस बाट पडला नाहीं; २, ३लिं० बाटगा.

**बाटगा**, ३लिं० आचार विचार शून्य भ्रष्टजो मनुष्य तो.

**बाटणें**, नीच जातीशीं योनिसंबंधादि संबंध किं० अभक्ष्य भक्षणादि दुष्कर्म केल्यामुळें स्वजातीयांशीं अव्यवहार्यता प्रयोजकजो दोष तद्विशिष्ट होणें; २, वस्त्र पात्र, इ० कांहीं पदार्थ मद्यादि दुष्ट वस्तुसंबंधादिकानें भोजनादिव्यवहारविषयीं घ्यावयास अयोग्य होई अशा दोषानें विशिष्ट होणें.

**बाटाबाट**, स्त्री० विटाळ, सोंवळें, ओंवळें, यांचा कोणेकस्थळीं होतोजो संकर ती; २, व्यभिचारादिकामुळें होतोजो भ्रष्टाकार ती.

**बाटूक**, न० जोंधळ्याचीं ओलीं लहानजीं तांटें तीं

**बाट्या**, ३लिं० बाटलेलाजो मनुष्य तो; २, ला० बाटगा.

**बाँठ**, स्त्री० अंबाजून झाला ह्मणजे त्याचें बी वर कठीणहोतेंजें कवच ती.

**बाँठळ**, ३लिं० बांठायुक्त झालाजो आंबाह्मणून फल तो.

**बाँठळणें**, आंब्याचें फळ बांठ्यानें युक्त होणें.

**बाँठा**, पु० कों० आंब्याचे फळांतील बाठीनेंविशिष्टजी बी तो; २, ला० आघातादि झाल्यामुळें शरीरावरजो उंचवटा उठतो तो; ३, काथाकरायासाठीं कुजत घालितातजी चोडें त्यांत नकुजतां राहतोजो कठिनांश त्यासकिं० तत्सदृश केश, इ० कांचा जमून घट्ट गोळा होतो त्यास ह्म०

**बाँठाळ**, ३लिं० बांठळ.

**बाँठी**, स्त्री० बांठा प्रथमार्थी.

**बाँठूक**, न० कों० ठेंगणाअसून बळकटजो मनुष्यादिक तें.

**बाड**, न० हिं० वैद्यक, ज्योतिष, इ० ग्रंथांचें वेंचेवेंचे लिहून जी वही केली असत्ये तें; २, विवक्षित स्थल आरत व्हावें ह्मणून मा० कनाथांचें करितातजें आचरण तें.

**बाँड**, पु० उणारव लुगड्यांत एक भेद आहे; तो तरणा बांड आहे ह्म० तो तरुणअसून निरोगी बळकट असा अर्थ; २, कांदा, नागरवण, इ० किती एकांस तुऱ्याचा येतोजो दांडा तो; ३, न० कणीस येण्याचे अवस्थेस येऊन रोगादिकारणानें जावर कणीस आलें नाहीं आणि मेलें किं० कोंवळीं कणसें गुरें, इ० कानीं जाचीं मोडिलीं असाजो जोंधळा, सजगुरा, तें.

**बाडगा**, ३लिं० मोगाहरामीजो मनुष्यादिक तो.

**बाँडगूळ**, न० अंबा, इ० वृक्षावर उगवतअसतें असें एक झाड आहे.

**बाडबिछाद**, स्त्री० हिं० चिरगूट, पांघरूण, भांडेंकुंडें, इ० जो उपकरणसंघात ती.

**बाडबिशाद**, स्त्री० हिं० बाडबिछाद.

**बाँडा**, ३लिं० जाचे अंगाची भुई एकारंगाची असत्ये आणि तदितर रंगाचे पट्टे असतात असाजो बैल, कुत्रा, इ० पशु तो; २, कदाचित् तादृशवर्णाचेंजें वस्त्र त्यास ह्म०

**बाडी**, ३लिं० बाडसंबंधी वही, औषध, तो; २, दे० शास्त्र पुरतें नपढतां बाडावरूनच वैद्यपणा, इ० करणाराजो जोशी, वैद्य, इ० त्यास ह्म०

**बाण**, पु० धनुष्यानें मारायाचाजो तीर तो; २, लोखंडाचे नळींत दारू रचून त्यास काठी बांधून केला असतोजो आयुधविशेष तो; ३, तत्सदृश कागदाचे तोट्यांत किं० कळकाचे नळकड्यांत दारू भरून जो पदार्थ करितात तो; हातचाबाणगमाविणें, इ० स्थलीं वादादिव्यवहारीं आपली विवक्षानुरूप सिद्धि होण्यास आपल्यापाशीं असतेंजें कांहीं साधन तें दवडणें; शब्दबाण, वाग्बाण, इ० स०; ४, नर्मदेंतील पाषाण, जास शिव मानून पुजितात तो.

**बाणणें**, कांहींएक गोष्ट मनांत पुरतेपणीं ठसणें उ० ही गोष्ट माझे मनांत बाणली.

**बाणदार**, पु० लोखंडी बाण वागवणारे जे राजादिकांनी शिपाई ठेविले असतात ते प्र०

**बाणा**, पु॰ विद्वत्ता, धनिकत्ता, शूरत्व, गायकत्ता, इ॰ गुण समुदायांतील ज्या गुणातें पुढेंकरून लोकांमध्यें वागतोजो त्याणें त्या गुणाविषयीं मी अमुकगुणविशिष्ट आहे असा अंतःकरणांत धरिला असतो अभिमान तो; २, एक आयुधविशेष आहे; ३, वस्त्रादिकांच्याठायीं आडवाजो तंतुसंनिवेश तो; बा॰ ताणायाचासंनियोगीं प्र॰; उ॰ या धोत्रजोड्याच्या ताणा आणि बाणा सारखा आहे.

**बाणाईत**, पु॰ ज्याज्या विद्या कलादिकांचाजो बाणा बाळगतो तो त्यात्याविषयीं; २, बाणदार.

**बाणी**, स्त्री॰ हिं॰ पठितव्य वस्तूजें ध्रुपद, ख्याल, श्लोक, इ॰ तें एकच असतां ह्मणायाच्याज्या अनेक चाली त्या प्र॰; २, गलबत, धक्का, भिंत, इ॰ कांचीजी केवळ फड ह्मणजे जेथून ईषन्मात्र पुढें कांहीं पदार्थ गेला असतां खालीं पडतो ती; कोणेकानें बाणीवर येणें ह्म॰ निकरावर येणें; ३, जेथेंजें उद्योगादि करायाचें त्यांत ईषन्मात्र अंतर पडल्यास पूर्वप्रवृत्तजो वादादि व्यवहार तो विध्वस्त होऊन मोठें कांहीं संकट प्राप्त होतें असाजो त्यात्या व्यवहाराचा जपून संभाळायाचा समय ती; उ॰ यावेळेस जर तुह्मी जामीन रहाल तर मोठी बाणी संभाळली जाईल; ४, बाणा प्रथमार्थीं.

**बाणीचा**, ३लिं॰ बाणाईत प्रथमार्थीं; २, चांगले बाणीवर ह्मणतात जो श्लोक, ध्रुपद, किं॰ सांगतात जें पुराण, इ॰ तो.

**बाणीदार**, ३लिं॰ चांगली आहे बाणी ज्याची असें जें गाणें, ह्मणणें, इ॰ तो; २, बाणाईत प्रथमार्थीं.



**बाणेदार**, ३लिं॰ बाणाईत प्रथमार्थीं.

**बाण्याचा**, ३लिं॰ बाणाईत प्रथमार्थीं.

**बात**, स्त्री॰ हिं॰ गप.

**बातनी**, स्त्री॰ बातमी.

**बातनीदार**, पु॰ बातमीदार.

**बातमी**, स्त्री॰ दूर देशादि परोक्षस्थलींचें जें कांहीं वर्तमान ती; बातमी ठेवणें किं॰ राखणें ह्म॰ विवक्षित कोणेक वृत्त आपल्यास समजल्यावांचून न राही असें संधान ठेवणें.

**बातमीदार**, पु॰ परराज्यादि विवक्षितस्थलींचें वर्तमान आपल्यास समजावें ह्मणून त्या कामावर नियुक्त असतोजो दूत तो.

**बातल**, ३लिं॰ हिं॰ खोटेंजें वर्तमान, भाषण, लेख, इ॰ तो; २, तें बोलण्याचा स्वभाव ज्याचा असाजो मनुष्य तो.

**बात्या**, ३लिं॰ निर्मूल खोटेंच कांहीं वर्तमान करून सांगण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**बाद**, ३लिं॰ वि॰ कोणेक गणतीचे क्रमामधें संबद्ध असून तेथें नाहीं असा केलाजो कांहीं एक अर्थ तो; घाल, कर, पड, इ॰ धातूचेंयोगीं प्र॰; उ॰ पन्नास शिपायांतून दहा शिपाई बाद घातले; पंचविसांत पांच बाद घातले बाकी वीस राहिले; माझें नांव पटास होतें तें बाद पडलें.

**बादखासा**, ३लिं॰ केवळ खासा नव्हे, केवळ खर्ची नव्हे असा मध्यमप्रतीचा बांधलेलाजो विडा, पट्टी, तो; २, केवळ पक्कें नव्हे, केवळ कच्चें नव्हे, असें मध्यम पिकलेलें जें विड्याचें पान तो.

**बादणें**, बाद करणें.

बादबाकी, स्त्री० باقی بعد मोठ्या रकमेंतून लहान रकम बाढूनजी बाकी रहात्ये ती.

बादला, पु० بادله कलाबतू करायासाठीं किं० एरवींच वस्त्रांत विणायासाठीं चापरलेल्या जा तारा तो; २, परवालेचा एका आंरव्यासारिखें पाणी भरून ठेवायाचें चर्मपात्र आहे.

बादली, ३लिं० हिं० कांहीं सूत, रेशीम, यांचें तंतू आणि कांहीं बादला मिळून विणलेलें जें पागोटें दुपट्टा, इ० वस्त्र तो.

बादशाह, पु० हिं० पादशाह.

बादशाही, ३लिं० स्त्री० पादशाही.

बांदा, पु० रा० बंदा; परंतु प्रथमार्थी प्रयोग थोडा.

बादांगूळ, स्त्री० कों० बांडगूळ.

बांदी, स्त्री० रा० दासी.

बांदीचा, ३लिं० रा० लंवडीचा.

बांध, पु० उदकादिकाच्या प्रतिबंधार्थ दगड, चुना, किं० माती, इ० कांचा जो रचनाविशेष करितात तो; २, बंद प्रथम द्वितीयार्थी.

बाध, पु० शब्दादिप्रमाणानें कोणेक कर्मादिकास येत्येजी प्रतिषिद्धता तो किं० कोणेक कर्मादिकास असत्येजी प्रतिषेधार्हता तो; उ० या उत्सर्गाचा त्याविशेषविधीनें बाध होतो; गेंडस गेंड ह्मटलें असतां बाध नाहीं खरा परंतु ह्मणूं नये.

बाधक, ३लिं० जा वचनादिकांचें स्वविषयीं बाध करणारें जें विशेष विध्यादिरूपप्रमाण तो त्याचा; २, विवक्षित व्यवहारास प्रतिकूल जें लेख, पत्र, कर्म, इ० तो; उ० आह्मी मागें याला दस्तऐवज दिला तोच आतां आह्माला बाधक झाला.



बांधटणें, रा० बांठळणें.

बांधण, न० कों० ओढा, डोंगराचें खोरें, इ० स्थळीं पाणी अडे असें मोठमोठे बांध घालूनजी शेतजमीन साधिली असत्ये तें; २, पर्जन्यानें शेत वाहूनये ह्मणून घालितात जी ताल तें.

बांधणी, स्त्री० गृह, बांध, विहीर, पागोटें, मुडा, इ० बांधण्याचाजो प्रकार ती; २, गृहादि बांधण्याचाजो व्यापार ती; ३, ३लिं० बांधणसंबंधी जी जमीन, धान्य, इ० ती.

बाधणें, केलेलें कर्म, सेविलेला पदार्थ किं० झालेली कांहीं गोष्ट, इ० तो उपद्रवदायकत्वेंकरून परिणत होणें; उ० मी शीतोदकानें स्नान केलों तें मला बाधलें; काल हरभऱ्याची उसळ खाल्लीती बाधली; त्याचा शाप याला बाधला; २, पिशाचानें कोणेकास उपद्रवदायक होणें; ३, कोणेक वचनादिकानें कोणेक वचनादिक बाधविशिष्ट करणें.

बांधणें, वस्तून; निराळे निराळे जे पदार्थ ते एकत्र संयुक्त करून त्याणी वियुक्त नहोतां तसेंच संयुक्तपणें रहावें ह्मणून सूत्र, दोर, वस्त्र, इ० कांचें जें वेष्टन ग्रंथि, कांहीं चिकटपदार्थांचा संबंध, इ० रूपजो कांहीं अटकावतेणेंकरून विशिष्ट करणें; जेव्हां मनुष्यादिपदार्थ स्तंभादिकाशीं संबंद्ध करायाचा अशी विवक्षा आहे तेव्हां त्यामनुष्यादिकांस कर्मता आणि जेव्हां अनेक पदार्थ परस्पर संयुक्त असावे अशी विवक्षा तेव्हां त्या पदार्थसमुदायास कर्मता; २, काष्ठ, इ० एकच पदार्थ दोरी, इ० कानें घट्ट वेष्टित करणें;

३, दोरी, सूत, वस्त्र, इ० कोणेक पदार्थाशीं वियुक्त नहोतां राही असें ग्रंथ्यादिकानी युक्त करणें; ४, पूल, बांध, घर, घाट, नौका, इ० दगड, चुना, माती, लांकूड, इ० पदार्थांनीं तत्तदाकारविशिष्ट रचनेनें निर्मिणें; ५, विहीर, तळें, वाट, घाट, घाटी, इ० बंदिस्तीनें विशिष्ट करणें; ६, एकापुढें एक, एकापुढें एक, इ० प्रकारें अनेक शब्द, अर्थ, इ० पदार्थ संनिविष्ट करून ग्रंथादिक जो विशिष्ट धर्मी तो निर्मिणें; ७, व्यवस्था, रीति, प्रमाण, इ० नियामकानें व्यवहारादि नियमित करणें; ८, लोभ, स्नेह, माया, इ० कानीं कोणेकास त्यात्या विषयाशीं गुंतविणें; ९, अटकळ, तर्क, युक्ति, कल्पना, इ० असें झालें असतां असें होईल, इ० प्रमाणाचा ऊहापोह करून त्यात्या योग्य योजनेनें तें तें सिद्ध करणें; १०, जोडा, जुतें, इ० अनेक चर्म खंडे एकत्र शिवून नवें सिद्ध करणें; ११, चिखल. साखरेचा पाक, इ० जमून गोळा, दाणा, वडी, इ० आकार विशेषयुक्त पदार्थ सिद्ध होणें; १२, कणीस, शेंग, इ० कांचाठायीं दाणा, नारळांत खोबरें, पोफळांत सुपारी, इ० काळयोगानें परिपाक होऊन सिद्ध करणें; पागोटें बांधणें स्म० डोकी, गुडघा, इ० कांवर गुंडाळून डोकीस घालायाजोगें रचनेनें विशिष्ट करणें कि० कोणेकास सन्मानार्थ देणें; कोणेकाशीं वैर, द्वेष, स्पर्धा, इ० बांधणें स्म० करणें; दरबार, इ० कांचाठायीं पक्ष, संधान, इ० बांधणें स्म० स्वविपक्षानुरूप कार्य तेथून स्मरलेवेळेस होई असें संधान करून ठेवणें; दिशा बांधणें स्म० मंत्रप्रयोगानें भारणें; दृष्टि बांधणें स्म० मंत्रप्रयोगानें एक असतां भलतेंच दिसावें अशा मोहानें विशिष्ट करणें; देवादिकांची पूजा बांधणें स्म० पुष्पादिकानी देवतादिक सुशोभित दिसायाजोग्या योग्य रचनेनें त्या देवतादिकांवर ती पुष्पादि रचित करणें; ताड माड बांधणें स्म० त्यांपासून मद्य निघे असें त्याची पोई बांधून ठेवणें; घोडयास नाल बांधणें स्म० त्याचे पायांस खिळ्यानी संबद्ध करणें; ताप, ज्वर, हींव, इ० बांधणें स्म० त्याणें शांत व्हावें म्हणून मंत्रप्रयोग विशिष्ट कांहीं एक कुचेड्यानें अभिसंबद्ध करणें; तो त्याचा बांधला आहे स्म० आशा लगत, इ० कारणानें केवळ स्वाधीन झालेला आहे; १३, न० रा० कोणेक स्थलापासून जो पाण्याचा पाट चालला असतो त्यास मध्यें मध्यें पाणी मोडून न्यावयाकरितां जीं द्वारें राखिलीं असतात तीं प्र०; १४, त्यात्या द्वारांचा प्रतिबंधार्थ तेथें लावायासाठीं सोपें, गवत, इ० एकत्र गुंडाळून जो चोंथा करून ठेविला असतो तें; शेवटचे बांधण्यास पाणी मोडणें स्म० तोडमोड, रदबदल, इ० होण्याची योग्यता न राही असें शेवटचें भाषण करणें; स्म० शिकविली बुद्धि आणि बांधली सिदोरी सर्वदा पुरत नाहीं.

**बांधन**, न० कांहीं विध्यादिक बांधण्याचा जो व्यापार तें.

**बांधप**, न० रा० घराचें ओंबण, इ० बांधायाचें साधनजें स्तंभ, दोर गुंडें, इ० तें.

**बांधबांधोळी**, स्त्री० शेताचे जमीनीस लहानमोठे बांध ती.

**बांधलेकंबरेचा, बांधल्याकंबरेचा,** ३लिं० रा० कांहींएक कार्यकरण्याविषयीं ह्मटले वेळेस सिद्ध व्हावयाजोगाजो शिपाई,इ० तो.

**बांधलेकमरेचा, बांधल्याकमरेचा,** ३लिं०रा० बांधलेकंबरेचा.

**बांधव,** पु० सं० भाऊ, चुलता, इ०जे स्वगोत्रीचे किं० मामा, त्याचापुत्र, श्वशुर, इ०जे सोयरेधायरे, इ०स्वसंबंधी ते प्र०

**बांधवाट,** स्त्री० रा० दगडानीं बांधलेली जी वाट ती.

**बाधा,** स्त्री० पिशाचादिकृतजी पीडा ती.

**बांधा,** पु० शरीराचे हस्तपादादि अवयवांचा संनिवेशाचाजो प्रकार तो; २, ३लिं० कों० बंदानृती याथीं.

**बांधारणें,** रा० बांधरणें.

**बांधारी,** स्त्री० ओंबण, इ०कांस वळकटी यावी ह्मणून जा त्यास मध्येमध्यें उभ्या काठ्या बांधितात त्या प्र०

**बांधाबांध,** स्त्री० अनेक ओझींपाझीं,इ० बांधण्याचाजो व्यापार ती.

**बांधावांधी,** स्त्री० बांधाबांध.

**बांधावळ,** स्त्री० ग्रंथ, वाडा, किल्ला, पूजा, इ०कांचाजो रचनाप्रकार ती; उ० या ग्रंथाची बांधावळ चांगली आहे.

**बाधित,** ३लिं० बाध झाला आहेजाचा तो; उ०हें वचन त्या विशेषवचनानें बाधित आहे.

**बांधील,** स्त्री० कों० भाताची लाणी झाल्यानंतर त्याचे भारे बांधण्याचाजो व्यापार ती; २, ३लिं० रा० ओशाळगत इ० कारणानेंजो जाचा बंदा तो त्याचा.

**बांधीव,** ३लिं० अगोदर बेत देऊन बांधिवलाओ जोडा, जुनें, इ० तो; २, बेताबांधूनही चांगल्ये बंदिस्तीचाजो जोडा, इ० तो; ३, बंदिस्तकरून केलेली विहीर, तळें, इ० तो; ४, पोटीं शिसें, इ० कांहीं खोटी धातु घालून सोनें, रुपें, इ० कांचा लगड, रुपया, इ० पदार्थ केला असतो तो.

**बांधें,** न० बांडगूळ.

**बाध्य,** ३लिं० बाधकानें जाचा बाध करायास योग्य तो.

**बाप,** पु० जाचे वीर्यापासून जो उत्पन्न झाला त्याचा तो; २, दत्तकत्वादिरूपजें गौण पुत्रत्व किं० कन्यात्व तें यन्पुरुषनिरूपित जास आहे त्याचा तो; ३, ग्रंथादिकांत संबोध्यजे त्यास सत्कारानें या शब्दानें संबोधन करितात; तो बापास बाप ह्मणायाचा नाहीं, इ० स्थलीं हिशेबाचे याजचीगोष्टीस कोणाची मुरवत धरायाचा नाहीं असा खडखडीत स्वभावाचा; ह्म० बापास बाप ह्मणत नाहीं तो चुलत्यास काका कोठून ह्मणणार

**बापजन्मांत, बापजन्मीं,** अ० जन्मल्यापासून एतावत्कालपर्यंत; कोणक पदार्थादिकांचेंजें दर्शन, उपभोग, इ०द्वाराजो संबंध त्यास केवल अपूर्वत्व वर्णनीय असतां प्र०; त्या दर्शनादिकांचे नसण्याचें वि०; उ० मी बापजन्मांत कोणाचें उणेंउत्तर बोलून घेतलें नवतें तें तूं आज बोललास असो.

**बापजादे**, पु० वाड वडील नित्यें अनेकवचनांत.

**बापडा**, पु० प्रकृतीचा गरीब निरापराधअसून कांहीं संकटांत सांपडलेलाजो मनुष्यादि त्यास करुणेचा कळवळ्यानें तत्समयीं ह्म०; उ० जानेचोरी केली ती पळाला आणि या बापड्या वाटसराला किंवा उगीच मारितात; २, औदासिन्य विवक्षित असतां तद्योतनार्थ याचा प्र० होतो; उ० करणारतर करा बापडें माझें काय गेलें.

**बापदादे**, पु० बापजादे.

**बापदेव**, पु० बापा.

**बापभाऊ**, पु० आपलाजो दायाद तो.

**बापभावकी**, स्त्री० रा० भाऊबंदकी.

**बापया**, पु० कों० बाप्या.

**बापरोटी**, स्त्री० बापानें मिळवलीजी वृत्ति, द्रव्य, भूमि, इ० तीस ह्म०

**बापळी**, स्त्री० कों० रानची पालेभाजी आहे; २, तिचें बी.

**बापा**, पु० कों० पिशाचदेव आहे.

**बापुडवाणा**, ३ लिं० अधिकार गेला, आईबापमेले, इ० कारणामुळें लोकांनीं बापडा ह्मणायाजोगा झालाजो पोर, पुरुष, इ० किं० त्याचें तदनुसार भाषण तो.

**बापुडा**, ३ लिं० ग्रं० बापडा.

**बापू**, पु० पुरुषास प्रतिष्ठानाम आहे.

**बापूस**, पु० कों० बाप.

**बाप्या**, पु० बाल्य जाऊन प्रौढदशा प्राप्त झालीजास तो.

**बाब**, स्त्री० हिं० कानू.

**बांबट**, स्त्री० रा० कांहीं बारीकबारीक पाऊस मेघाची अंधारी वारा थंडगार वाहत असतो अशी जी पर्जन्यकाळीं एखादेदिवशीं हवा होत्ये ती.

**बाबत**, अ० हिं० कांहीं एका निमित्तें; हा शब्द त्या निमित्तभूताचेपुढें लागतो; उ० याकर्माबाबत त्यास शंभररुपये दंड बसला; २, स्त्री० कांहीं गोष्ट दुसऱ्यानें सांगितली ती मनांत करायाची नाहीं विचारलेंतें नीट सांगायाचें नाहीं, इ० कारणास्तव त्यास प्रतारायासाठीं भलतेंच कांहीं लावितातजें निमित्त ती.

**बाबता**, पु० एक वस्त्र आहे.

**बाबती**, स्त्री० देशमुख, देशपांड्य, इ० कांचे जे मूलकावर हक्क असतात त्या; हा शब्द नित्यें बहुवचनांत.

**बाबद**, अ० हिं० बाबत.

**बांबर**, न० घा० सर्वदा चिखल असतो जा जमीनींत तें.

**बाबरओंठ्या**, ३ लिं० फार मोठेजाड ज्याचे ओंठ तो; उ० शिद्दी प्रा० बाबरओंठ्ये असतात.

**बाबरझोटी**, स्त्री० ग्रं० खालीं लोंबायाजोगे मस्तकावर वाढलेलेजे केस ती.

**बाबलणें**, रा० पाणी, खत, इ० मिळाल्यामुळें झाडानें बल धरून पत्रशाखादिकांनी पुष्ट होऊन विस्तृत होणें.

**बाबा**, पु० प्रा० बापास ह्म० किं० प्रतिष्ठार्थ कोणाच्या पुरुषाचे नावापुढें लावून ह्म० किं० एरवींच ह्म०; बाबापुता करणें ह्म० पुत्र, चाकर, इ० कांपासून कांहीं काम करावा याकरितां रागें न भरतां

आर्जवानेंच बोलणें.

**बाबू**, पु० हिं० बैरागी. गोसावी. इ० गृहस्थलोकांस ह्म०; २, बा० लेकरें लहान मुलांस ह्म०

**बांबू**, पु० वेळूमध्यें एक भेद आहे.

**बांबूट**, स्त्री० कों० जून नहोतां पिकल्यासारखें दिसतेंजें आंब्याचें फळ तें.

**बाबे**, अ० हिं० बाबत; उ० याबाबे हजार रुपये खर्च केला.

**बाब्या**, पु० लाडिकपणानें किं० निंदेनें पुरुषरूप अर्भकास ह्म०

**बाभळ**, स्त्री० बाभूळ.

**बाभूळ**, स्त्री० एक वृक्ष आहे; तुझी यांत काय बाभूळ बुडाली ह्मणजे तोटा झाला; बाभळीस कांटा लावणें ह्म० यद्दोषविशिष्टत्वकरून प्रसिद्ध जो पुरुष त्यावर त्यादोषाचा आरोप करणें; ह्म० जा गांवच्या बोरी त्याच गांवच्या बाभळी.

**बाम**, स्त्री० एक मत्स्यजाति आहे.

**बामण**, ३लिं० शेणव्यांत एक भेद आहे.

**बाह्मणी**, ३लिं० कांकडी, पाल, सरडा, यांत भेद आहे ज्यांचा वर्ण पांढरा असतो तो; प्रा० शूद्रभाषाप्रसि.

**बायक**, ३लिं० गंजीफांचे डावांत हुकूम जें पान तें; प्रा० उत्तारीचेवेळेस प्र०

**बायको**, स्त्री० मनुष्यादिजीवजातिमध्यें अवांतर दोनदोन भेद आहेत त्यामध्यें एकाचे अंगीं गर्भनिदानभूत शुक्र उत्पन्न होतें आणि दुसऱ्याचे पोटीं तें शुक्रमैथुनादिसंबंधें गर्भता पावून प्रसवहोतो त्यामध्यें जो दुसरा भेद तो; २, वृक्षादिकांत एका जातीमध्यें कित्येकांस फळें येतात आणि कित्येकांस कदापि येत नाहींत्यांत जांस फळें येतात त्यास ह्म०; ३, स्त्रीलिंगविशिष्टजाचें नाम त्यासही ह्म०; ४, बाइल; बायकांचें शास्त्र न० जे विधिनिषेध धर्मशास्त्रीय आकरग्रंथीं प्रा० नाहींत आणि पुरुषही ज्याजवर फारशी निष्ठा ठेवीत नाहींत असे स्त्रिया मानितात जे विधिनिषेध त्यास ह्म०

**बायकोवेल्हाळ**, ३लिं० रा० बाइलवेडा.

**बायक्या**, ३लिं० चालणें, बोलणें, इ० बायकांससारखें ज्याचें दिसतें असा जो पुरुष त्यास ह्म०

**बायल्या**, ३लिं० बायक्या.

**बाया**, स्त्री० गा० प्रा० आईस किं० आईसारख्या स्त्रीस ह्म०

**बार**, पु० हिं० तोफ, बंदूक, इ० कांत अवाज काढण्यासाठीं भरलेली असत्येजी दारू ती किं० तिणें करून होतो जो अवाज तो; २, प्रसंगविशेषीं बंदुकेनें विशिष्ट जे शिपाई त्यांस ह्म०; ३, फटाके, सुरंग, इ० कांचा जो तत्सदृश अवाज होतो त्यास ह्म०; बार भरणें ह्म० कोणेकास विवक्षितव्यवहारीं स्वविवक्षितानुरूप वर्तण्याविषयीं एकांतीं शिकवून ठेवणें; कांहीं एक कामाचा बार उडविणें ह्म० तत्साधकसामग्रीची सिद्धता गुप्तरूपें यथास्थित करून ठेवून तें विवक्षितकाम अकस्मात् आरंभुन एकाएकीं संपवून टाकणें; ४ वृक्षलतादिकांस त्यात्याकालानुरोधानें फळें, पुष्पें, किं० पर्णें यांचा उद्गम होऊन तींहींतींहीं फुटून संमृद्ध असावें अशाज्या वारंवार अवस्थाप्र

प्राप्त

स होतात त्या प्र०;५, तीळ,पाणी, इ० कांस पुष्पादिसुगंधानें विशिष्ट करण्यासाठीं पुष्पादिमिश्रणरूपजे संस्कार करितात ते प्र०;६, उभयतां परस्परस्पर्धेनें एकमेकांस दमवावें म्हणून चढानें म्हणतात जें श्लोकादि तो; घाल, टाक, इ० धातूंचे योगीं प्र०;७, भार;८, न० रा० तुळई; बार करणें म्ह० फीर्दीवरचे कलम खतावणीस किं० हुंडी, रोखा, चिठी, इ० जांगड, बेहडा, इ० कांवर लिहून ठेवणें किं० रोखा, चिठी, इ० बार याअक्षरानीं चिन्हित करणें.

**बारकस**, न० जिन्नसपानस भरून वहायाचे उपयोगीजें गलबत तें.

**बारका**, ३लिं० बारीक.

**बारकाई**, स्त्री० बारीकपणा; परंतु प्रा० बुद्धिकौशल्य ग्रंथ व्यापारादि रीति.

**बारकावणें**, बारीक होणें; उ० पाऊस अंमळ बारकावला म्हणजे जाऊं.

**बारकावर**, ३लिं० या० मध्यम बारीकजें सूत, धान्य, इ० तो.

**बारकावा**, पु० बारकाई.

**बारगळ**, ३लिं० कोणाएकाच्या शिक्षेंत न राहतां स्वच्छंदाचारीजो पोर, गुरूं, इ० तो.

**बारगळणें**, बारगळ होणें.

**बारगा**, ३लिं० या० बारगळ.

**बारगिरी**, स्त्री० बारगिराचें कर्म ती; २, ३लिं० बारगीरसंबंधीजें घोडें, पोशाख, इ० तो.

**बारगीर**, पु० सर्काराचे पागेचे घोड्यावर स्वार होऊन लष्कर, इ०कांत चाकरी करतोजो शिपाई तो.

**बारणें**, कों० काम ओझें इ० दुसऱ्याचर ओपणें.

**बारदान**, न० हिं० तेल, तूप, धान्य, इ० जिन्नस साठवून ठेवायाचे उपयोगीजें बुधला, कणिंग, पाटी, पोतें, इ० तें; २, कों० झाज, इ०कांवर माल मनुष्य, इ० रूप येतेंजें ओझें तें.

**बारदार**, ३लिं० कों० केवळ झाताठि झाल्यामुळें लाग जाऱ्या कमी झाला असें नव्हे आणि तुकतेंच लागास आलेलें असें नव्हे असेंजें लागतें माड. पोफळ, फणस, उंडीण, इ० झाड तो

**बारनीस**, पु० हिं० चिठी, रोखा, याद, इ० बार करण्याविषयीं सर्कारांतजो अधिकारी करून ठेविला असतो तो.

**बारबंडा**, ३लिं० बारगळ.

**बारभाई**, स्त्री० हिं० कोणेक व्यवहारीं अव्यवस्थाप्रयोजक अनेकमतांचेजे अनेक तत्तत्काळ तलजें येतें ती; २, पु० कोणेक व्यवहारीं मिळालेले अनेक मताचेजे अनेक ते.

**बारमहा**, अ० बारा महिने.

**बारमाशीखरबूज**, न० खरबुजांत एक भेद आहे.

**बारमास**, अ० बारमहा.

**बारमाही**, ३लिं० हिं० बारामहिन्याचाजो रोजमुरा, वसूल, चाकरी, इ० तो; २, अ० बारमहा.

**बारव**, स्त्री० थोरजी विहीर ती.

**बारवरशीसोळवरशी**, **बारवर्षेसोळवर्षे**, ३लिं० कोणेक मोठ्या व्यवहारीं एकही आंत प्रौढ नाहीं असे एक जात अप्रौढ, नवे, मिळालेलेजे अनेक मनुष्य त्यांस म्ह०; नित्यें अनेक वचनांत.

**बारस, बारशी,** स्त्री० द्वादशी.

**बारसकडी, बारसखडी,** स्त्री० मूलवर्णास काना, मात्रा, वेल्हांटी, व्यंजन, विसर्ग लाऊन जो ह्रस्व दीर्घादि भेद होतो तत्बोधक कसकानादिल्याका, इ० रूप ती; या सर्व बारसकड्यांचें प्रकरण प्रसिद्ध आहे.

**बारसा,** पु० रा० बारसें.

**बारसें,** न० जन्मदिवसापासून प्रा० बाराव्यादिवशीं जो नामकरणसंस्कार करितात तें; तुझ्या बारशास मी जेवलों आहे, इ० स्थलीं तुझ्यानें मी ठकला जाणार नाहीं.

**बारा,** ३ लिं० संख्या आहे १२; बारा करणें, म्हणणें, क्रि० बाराचा फाडा लेखें इ० वाचणें, इ० म्ह० पळून जाणें; बाराबत्तीशा लावणें म्ह० तीनतेरागोष्टी सांगणें; बाराबाबू, पु० बारभाई द्वितीयार्थी; बारापिंपळावरचामुंजा, पु० ज्याचीं स्वकार्यार्थ जाण्यायेण्याचीं स्थलें अनेक असतात अतएव म्हटलेवेळेस अमुकस्थलीं सांपडेल असा नेम करतां येत नाहीं असा जो मनुष्य त्यास म्ह०; बाराबारा होणें म्ह० जमलेलें जें सैन्य-दवलत, इ० त्याची वाताहत होणें; त्यास बारावाटा मोकळ्या आहेत म्ह० प्रसंगीं पाहिजे तें कर्म करण्यास मोकळीक आहे; म्ह० पळणारास एक वाट आणि शोधणारास बारा वाटा; उदीम करतां सोळा घारा आणि शेत करतां डोईवर भारा; बारा महिनें, अ० मधें मासपक्ष, इ० खाडा न पडतां सर्वकाल; उ० हिमाचलावर बारा महिनें थंडी असत्ये; २, पु० जा समुद्रकांठचें बंदर, किल्ला, गांव, इ० स्थलाचे समोरचा जो समुद्रांतील प्रदेश तो त्या बंदर इ० कांचा; उ० मुंबईहून सकाळीं निघालों ते दोनप्रहरीं सुरतचे बाऱ्यावर आलों.

**बारारवडी,** स्त्री० बारसखडी.

**बाराबलुतीं,** न० गांवांत महार, जोशी, सुतार, इ० संबंधी बाराजीं बलुतीं तीं.

**बारावा,** ३ लिं० क्रमानें मोजिलें असतां बारा या संख्येचा विषय जो होतो तो; कोणेकाचा कोणेकाशीं बारावा बृहस्पति असणें म्ह० त्याचें त्याचें वद्दकटास असणें; २, पु० मृताचा बारावेदिवशीं जें कर्म करितात तो.

**बारी,** स्त्री० डोंगर, झाडी, याचा आश्रयामुळें जेथें चोर व्याघ्रादिकांची संभावना असत्ये अतएव मार्गस्थांस भयंकर असें जें स्थल ती; २, पालट प्रथमार्थी; ३, बारा क्रि० प्रकाश यावा म्हणून गृहादिकांस जी खिडकी राखिली असत्ये ती.

**बारीक,** ३ लिं० विवक्षितपदार्थांपेक्षां विस्तारपरिधि ज्याचा कमी असा जो स्तंभ शरीर शरीरावयव सूत, इ० तो क्रि० ज्याचा सर्वत्र; परिधि कमी असा जो दाणा, खडा, सुपारी, लवंग, इ० तो; ३ ज्याचें सूक्ष्म, कण, इ० अवांतर अवयव बारीक असा जो वस्त्र, पीठ, इ० पदार्थ तो; ३, केवळ बारीक जो पदार्थ तो जसा एकाएकीं इंद्रियगोचर होत नाहीं तद्वत् अंतःकरणादिकांस एकाएकीं विषय होत नाहीं असा जो कांहीं एक अर्थ तो; उ० हें अक्षर आणि तें अक्षर सारखें दिसतें खरें परंतु ह्यांत कांहींसा बारीक भेद आहे; ४, तारशा

बारीक

बारीक विषयांविही विषयीकरण व्हावयाजोगें अंत:करण, नेत्र, इ० इंद्रिय किं० त्याची रति तो; बारीक दृष्टि, नजर, इ० म्न० कार्पण्यविशिष्टस्वभाव; म्न० बारीक तेथें तुटे.

बारीकमोठा, ३लिं० केवळबारीक किं० कांहीं मोठें असेंजें वर्तमान, इ० कांहींएक तो.

बारीकसारीक, ३लिं० बारीक, इ०

बारुला, बारूला, ३लिं० बारा पायल्यांनी मण होतो अशा संकेतानेंजें माप, मण, इ० तो.

बारोत्रा, पु० हिशेबानेंजें व्याज आकारलें त्या व्याजाचाजो बाराचा अंश तो; व्याजांत सूट घालण्याचेप्रसंगीं म्न०, २, कों० वर्षास शेकडा बारा रुपये व्याज पावें असाजो व्याजाचा संकेत तो.

बाल, न० पु० सं० अर्भक; २, पु० पुरुषरूपजें अर्भक तो; ३, अज्ञानजो त्यास म्न०; ४, नुकता उदय पावलाजो सूर्य, चंद्र, इ० किं० त्याचा आतप चांदणें इ० तो; ५, केवळ कोंवळाजो पल्लव, अंकुर, फळ, इ० तो; ६, सं० केश; बालबाल बोलणें म्न० अति त्वरेनें दुसराचूकभूल होईअसें बहुल बोलणें; बालबालरखूप होणें म्न० पराकाष्ठा रखूप होणें.

बालक, पु० न० बाल.

बालक्रीडा, स्त्री० बाळपणाचीजी क्रीडा ती.

बालगुंडा, पु० रा० बाळगुंडा.

बालग्रह, पु० बालकास उपद्रव करणारे देवताविशेष आहेत ते म्न०

बालचंद्र, पु० शुक्लद्वितीयेपासून पंचमीषष्ठीपर्यंत जो चंद्र तो.

बालचरित, बालचरित्र, न० बाळपणचेंजें चरित्र तें.

बालद, बालंद, न० बालांट.

बालदरखोर, ३लिं० दुसऱ्यावर बालद घेण्याचा स्वभाव आहे ज्याचा तो.

बालदी, थालद्या, ३लिं० बालदखोर.

बालंड, न० बाल्लांड.

बालत्व, न० बालपणा; २, सं० सूर्याचे किरणापासून उदय पावलेलेजे गुरु, शुक्र, इ० ग्रह ते प्रशस्तपणें प्रकाशमान होतपर्यंत त्याजवर पांच सहा दिवसजो बालपणा ह्मणून धर्म असतो तें.

बालदी, स्त्री० गलबत, इ० कांतील पाणी उपसायाचें चर्मपात्र आहे.

बालंपेच, पु० अकड दिसायाजोगा पागोट्यास एके प्रकारचा पेच देतात तो.

बालंपेची, ३लिं० बालंपेचानें विशिष्टजें पागोटें तो.

बालफुटका, ३लिं० बारीक केसासाररवी फूट जाला आहे असाजो रुपया, इ० तो.

बालबुद्धि, ३लिं० जाची बुद्धि प्रौढ नाहीं तो; २, स्त्री० ती बुद्धि.

बालबोध, ३लिं० अज्ञानजनासही समजायाजोगा म्न० अति सुगम असाग्रंथ, भाषण, इ० तो.

बालब्रह्मचारी, पु० लहानपणापासून ज्याला स्त्रीसंग घडला नाहीं आणि लग्नही ज्याचें झालें नाहीं तो.

बालभाषा, स्त्री० नाटकादिकांत शूद्र स्त्रिया.

इ० हलक्या पात्रांनीं बोलायाची संस्कृताची अपभ्रंशरूप एक भाषा आहे ती; २, गाईला हम्मा. भाकरीस पापा, इ० संकेतविशिष्टजी अर्भकांची भाषा ती.

बालमित्र, पु० उभयतां बाळपणांत असतां जा परस्परांचें मित्रत्व झालें आहे ते परस्पर

बालमूरिचरा, पु० दे० खिऱ्यांत एक भेद आहे.

बालरंडा, स्त्री० नहाण आल्याचापूर्वी जीचा नवरा मेला ती.

बाललीला, स्त्री० बालक्रीडा.

बालव, न० सातांकरणांतील दुसरें करण.

बालविधवा, स्त्री० बालरंडा.

बालसरस्वती, पु० लहानपणापासून अत्यंतजो बुद्धिमान् त्यास ह्म०

बालहत्या, स्त्री० बालाची हत्या ती.

बालहत्यारा, ३लिं० बाल हत्या केली जाणे तो.

बालहरीनकी, स्त्री० कोवलेच काढून वाळविलेलेजे हिरडे ती.

बाला, स्त्री० जिलापुरती तारुण्यदशा प्राप्त झाली नाहीं अशीजी स्त्रीती; २, पु० नाण्यावरठेकायाचाजो ठिका तो; कोणेकास कोणेकानें बाला देणें ह्म० आपण पळून जाऊन दगा देणें.

बालाईयाफूत, स्त्री० खेरीज मिळखत प्रा०सर्कारी लिहिण्यांत प्र०

बालांट, न० जाचे हातूनजें दुष्कर्मादि पडलें नाहीं त्याजवर त्यादुष्कर्मादिकाचा आरोप करावा ह्मणून लबाडीचा कल्पनेनें रचलीजी तद्विषयींची गोष्ट तें; घेणें, घालणें, धातूचेयोगीं प्र०; बालांटास येणें ह्म० केलेल्यानियमाविषयीं लबाडीस येणें.

बालांटु, न० बालांट.

बालाभ्यास, पु० विद्या, कला, इ० काविषयीं बालपणींच केला असतोजो अभ्यास तो.

बालाभ्यासी, ३लिं० जा विद्यादिकाविषयीं जाणे बालाभ्यास केली आहे तो त्याविषयीं.

बालार्क, पु० सं० उदय पावलेला प्रातःकालचा जो सूर्य तो; २, प्रातःकालचेंजें कोवळें उन्ह त्यास ह्म०; उ० बालार्क घेतला ह्मणजे आयुःक्षय होतो.

बालिश, ३लिं० अज्ञानजो मनुष्यादि तो.

बालेकिल्ला, पु० पहाडी किल्ल्याचा इतरविभागापेक्षां अति उंचजो विभाग असतो तो.

बाल्य, न० बालत्व.

बाव, स्त्री० विहीर.

बावउपसणी, बावउसपणी, स्त्री० कों० बावींतील चिखल, मळ, इ० काढण्याचा व्यापार ती.

बावउपसणें, बावउसपणें, न० कों० विहिरीतील चिखल, इ० काढायासाठीं साधनभूतजें आकारविशेषाचें यंत्रपात्र करितात तें.

बावका, ३लिं० बा० बावलेलाजो पदार्थ तो.

बावखड, न० कों० बाहुमूलाचाजो संधिप्रदेश तें; २, गाड्यावरील सांगाड्याचा चोकटीचीं जीं चार लांकडें तीं प्र०; ३, रा० होडीच उलंडीस दोहींबाजूंस दोन लांकडें असतात तीं प्र०

बावरबोल, न० गा० मुळची बाव परंतु ती होऊन तेथें कांहीं खळगा राहतो तें.

**बांवची**, स्त्री० एक झाड आहे; २, त्याचें बीज; ३, गोवारीम्हणून झाड आहे तें; ४, तिची शेंग.

**बावटा**, पु० ध्वज; २, बाहुटा द्वितीयार्थी.

**बांवट्या**, स्त्री० बा० सरळ गोष्ट विचारिली असतां अनेकप्रकारचे फांटे फाडतो त्या; प्रयोग अनेकवचनीं; उ० याला कोठून आलास म्हणून विचारिलें त्याणें हजार बांवट्या लाविल्या.

**बायगें**, वा० कोमेजणें.

**बावन, बावन्न**, ३लिं० एक संख्या आहे ५२; म्ह० एकहेंच खाई तो बावन वीर होई; आणि बावनहेंच खाई तो गद्धा होई; एथें बावनवीर म्ह० पराकाष्ठेचा धीट शहाणा.

**बावनकशी**, ३लिं० पराकाष्ठा उत्तम सोनें तें; याची उपलब्धि प्रा० मनुष्यलोकीं नाहीं स्तव सरी पुतळीचे कसाहून कांहीं अधिकजें सोनें त्यास आरोपानें म्ह०.

**बावरणें**, अद्भुत दर्शन, भय, हर्ष, पिशाचोपद्रव, इ० कारणामुळें सभांत बिन होणें; उ० खेडेगांवचें मनुष्य शहरांत जाऊन तें अनेक चमत्कार पाहून बावरतें.

**बावरा**, ३लिं० बावरला तो.

**बावला**, पु० रा० बाव्हला.

**बावली**, स्त्री० कों० बाव्हली.

**बावलें**, न० कों० बाव्हलें; २, मनुष्यादिजीवांचें प्रतिबिंब किं० छाया तें.

**बावलेभोरीप**, न० रा० कळसूत्री, खांबसूत्री, इ० बावल्यांचा जो खेळ तें.

**बावलेभोरपी**, पु० रा० बावलें भोरीपकरून उपजीविका करितो तो.

**बाव्हळा**, ३लिं० बेडसर मुद्राजाची दिसत्ये तो किं० त्याची ती मुद्रा तो; २, रा० बाव्हळा.

**बावा**, पु० तपस्वी, गोसावी, साधु, विद्वान्, इ० जे थोर त्यांस हें प्रतिष्ठानाम आहे; केवलाचा किं० इतरनामपूर्वक प्र०; उ० बावा शास्त्रीबावांचे घरीं गेले; २, बाहल्या.

**बावाजी**, पु० गोसावी, बैरागी, इ० कांस महत्त्वार्थ म्ह०.

**बावांचें**, पु० रा० बावंट्या; अनेकवचनांत.

**बावीस**, ३लिं० बेवीस.

**बांवें**, न० गलबताचें स्फकाणूत हाली धरायासाठीं लांकूड अडकविलें असतें तें.

**बाव्हला**, पु० बाहुला.

**बाव्हली**, स्त्री० बाहुली.

**बाव्हलें**, न० बाहुलें.

**बाव्हळ**, पु० हस्ताचा जो मूलभाग तो.

**बाशा**, पु० बांच; २, स्त्री० पु० कों० अवरवा.

**बाशिंग**, न० विवाहांत नवरा आणि नवरी यांचे कपाळीं बांधायाचें कागदाचें भूषण आहे; २, बा० गद्धांचें विकींत रहापांच स्फतें यालून नवरानवरीचे कपाळीं बांधावयास भूषण करितात तें; कोणेक कामाचें कोणेकाचे कपाळीं बाशिंग बांधलें असणें म्ह० तें काम त्याणेंच करावें असा अधिकार असणें; म्ह० ज्याचे कपाळीं बाशिंग तो नवरा; उतावळा नवरा आणि गुडघ्यास बाशिंग; ३, घोड्याचे कपाळावर एक दुर्लक्षण असतें तें; ४, बाशिंगीचें पान तें.

**बाशिंगबळ**, न॰ कोणेकाचा विवाह होण्यास प्रयोजक जें दैवबल तें, प्रा॰ उभें रहाणें याचा योगीं प्र॰

**बाशिंगाकार**, ३ लिं॰ बाशिंगाचे आकाराचें जें भूम्यादि क्षेत्र तो.

**बाशिंगी**, स्त्री॰ एक औषधी आहे जी अंबा, इ॰ वृक्षाचे कांडावर उत्पन्न होत्ये ती.

**बाष्कळ**, ३ लिं॰ जाचे आचरणांत, बोलण्यांत, ताळतंत नाहीं अशा स्वभावाचा जो मनुष्य तो किं॰ त्याचें तें तदनुरूप भाषणादि तो: स्त्र॰बाष्कळ नमा आणि पुष्कळ खर्च.

**बाष्कळणें**, मनुष्यानें बाष्कळ होणें.

**बाष्प**, पु॰न॰सं॰ अश्रु.

**बांस**, पु॰ डोली, मंडप, इ॰ कांस लावायाचे उपयोगीं विवक्षितानुरूप तोडून ठेविलेला जो कळक तो.

**बासट**, न॰ग॰ जा पदार्थावर जो पदार्थ भक्षिला असतां विकार होतो असें जे परस्पर विरुद्ध पदार्थ ते एकमेकाचें; उ॰ पुरणाचे पोळीवर ताक बासट आहे.

**बासन**, न॰ आंत वस्त्रें बांधून ठेवायासाठीं खारवा, छीट, इ॰कांचा अस्तरण लाविलेला जो चतुष्कोण तुकडा केला असतो तें; २, त्यांत वस्त्रें बांधून जें गाठोडें होतें तें; ३, धातुमय किं॰ मृन्मय जें पात्र तें.

**बासनी**, ३ लिं॰ वासनी.

**बासष्ट**, ३ लिं॰ संख्या आहे ६२

**बासा**, ३ लिं॰ पर्युषित.

**बासुंदी**, स्त्री॰ दूध आटवून निमें करून त्यांत शर्करादि पदार्थ टाकून भक्ष्य पदार्थ करितात ती

**बांसरी. बांसुरी**, स्त्री॰ मुरली म्हणून जें वाद्य तो.

**बाहणें**, प्रा॰ग्रं॰ कोणेकास शब्दानें हाक मारणें; उ॰ धनुवल्लें तुला बाहती यादवा.

**बाहला**, पु॰ गाईचें दूध काढतांना लात मारित्ये याकरितां तिचे पायांस जी दोरी बांधितात तो.

**बाहवा**, पु॰ एक झाड आहे.

**बाहवापंचक, बाहवेपंचक**, न॰ काढ्याचे उपयोगीं जीं बाहवा, इ॰ पांच औषधें प्रसिद्ध आहेत तें.

**बाहळा**, ३ लिं॰ बांडा: प्रा॰ शावरनि.

**बाहाड**, न॰ को॰ बाहु प्रथमार्थी; २, ग्याजण, जांत तिवीर, इ॰ झाडें असतात तें.

**बाहाण**, स्त्री॰ कों॰ गलबताचे बाजूची कड ती.

**बाहाणा**, पु॰ बहाणा.

**बाहात्तर, बाहत्तर**, ३ लिं॰ एक संख्या आहे, ७२

**बाहात्तरखोंडी, बाहत्तरखोंडी**, स्त्री॰ मनुष्य, अश्व, इ॰कांस जा वाईट बाहत्तर खोंडी असतात त्या.

**बाहादर, बाहादूर, बाहाद्दर**, ३ लिं॰ बहादर.

**बाहार**, स्त्री॰ बहार.

**बाहाल**, न॰ बहाल.

**बाहाली**, स्त्री॰ बहाली.

**बाहिरची**, स्त्री॰ बाहेरची.

**बाही**, स्त्री॰ बाबरखंडापासून मणगटपर्यंत जो हात ती; २, अस्तनी; ३, दार, इ॰कांचे चौकटी-

च्या दोहोंबाजूंचे दोन उभेजे अवयव ते प्र०

**बाहीर**, अ० बाहेर.

**बाहू**, पु० भुज; बाहुभूषण, बाहुमूल, इ०स०

**बाहुटा**, पु० बाहुमूलापासून कोंपरपर्यंत जो हाताचा अवयव तो; २, स्त्रियांचें बाहुभूषण आहे.

**बाहुबल, बाहुबळ**, न० युद्धांत दुसऱ्यास जिंकावें, इ० कर्माविषयीं उपयोगीं कपट, मंत्र, फितूर, इ० साधन निरपेक्षजो केवळ अंगचा पराक्रम तें.

**बाहुयुद्ध**, न० उभयतां हातीं कांहीं शस्त्र नधरितां बुक्या, मुष्टि, इ० कांचा प्रहार करावा एकमेकास ओढावें, रेटावें, इ०रूपजें युद्ध करितात तें.

**बाहुला**, पु० वस्त्र, काष्ट, मृत्तिकादि निर्मित पुतळा तो.

**बाहुली**, स्त्री० वस्त्र काष्ठादि निर्मित जी पुतली ती; २, नेत्रांत जें दुसऱ्याचें प्रतिबिंब दिसतें ती; ३, बाहुलें.

**बाहुलें**, न० वस्त्र काष्टमृत्तिका पीठ, इ० कांनी निर्मित जी मनुष्य, पशु, इ० जीवांची प्रतिमा तें.

**बाहुलेभोरपी**, पु० बावलेभोरपी.

**बाहुलेभोरीप**, न० बावलेभोरीप.

**बाहेर**, अ० विवक्षित देशकालपदार्थ, गोष्ट, इ० कांच्याजो अंतःप्रदेश त्याहून इतर प्रदेशीं; उ० त्वांघराबाहेर जाऊं नये; तो महिन्याचेबाहेर काशीस जाणार; तो आज्ञेबाहेर नाहीं; बाहेर जाणें म्ह० परसाकडे, लघुशंकेस जाणें.

**बाहेरख्याल**, पु० बहिर्व्यसन.

**बाहेरख्याली**, ३ लिं० बहिर्व्यसनी

**बाहेरचा**, ३ लिं० बाहेर म्हणून जो प्रदेश तत्संबंधी; २, परकी जो मनुष्य तो; उ० बाहेरचा मनुष्यादेखत गृहछिद्र बोलूं नये; ३, रा० कुटुंबांतील बायको, पोर, इ० अंतरंगजीं माणसें त्यांहून इतरजीं दासी किं० दासरूप माणसें असतात तीं प्र०; ४, पु० गांवाबाहेरचा; बाहेरची पीडा म्ह० उपदंशास म्ह० बाहेरची बाधा, इ० पिशाचोपद्रवास म्ह०

**बाहेरचाल**, स्त्री० आंत चालीची प्रतिपक्षी ती

**बाहेरची**, स्त्री० विटाळशी.

**बाहेरचीचाल**, स्त्री० बाहेरचाल.

**बाहेरभितर, बाहेरभीतर**, अ० बाहेरल्या किं० आंतल्या प्रदेशीं; उ० तो घोडा कोठे बाहेरभीतर असेल त्यास शोधून आण.

**बाहेरला, बाहेरील**, ३ लिं० बाहेरचा.

**बाहेरून**, अ० बाहेरूनजो प्रदेश तेथून.

**बाह्य**, ३ लिं० बाहेरचा प्रा० प्रथमार्थी.

**बाह्या**, पु० तबल्याचा धूम वाजवावयाचा जो अवयव तो.

**बाह्यात्कारीं**, अ० अंतःकरणांत भाव कांहीं निराळा राखून दुसऱ्या भावानें; उ० हे दोघे बाह्यात्कारीं गोडीनें बोलतात परंतु आंतून द्वेष आहे; २, आंतील तत्वांश परोक्षअसतांही पदार्थ गोष्ट, इ० कांचा लोकांचे दृष्ट्यादिकांस विषय होतो जो बाहेरचा आकार त्याच्याठायीं; उ० हे आंबे बाह्यात्कारीं चांगले दिसतात मग आंत कसे असतील तसे असोत.

**बाळ**, पु० न० बाल; परंतु प्रा० प्रथम द्वितीयार्थी.

**बाळक**, न० पु० बालक.

**बाळकडू, बाळकडूं**, न० लहानमुलास किराईत, इ० दहापांच औषधें उगाळून पाजावयासाठीं जें करित असतात तें.

**बाळक्रीडा**, स्त्री० बालक्रीडा.

**बाळगण**, स्त्री० रा० लहानमुलाचे संरक्षणाचा जो व्यापार ती.

**बाळगणा**, पु० रा० जो मुलाची बाळगण करितो तो.

**बाळगणावळ**, स्त्री० पोर, इ० बाळगण्याबद्दल जें मोल ती.

**बाळगणें**, पोर पक्ष इ०कांस लालन, पोषण, इ० योग्य उपचारानीं संभाळणें; २, कांहीं मूर्तामूर्त पदार्थ स्वसत्ताविषयांत ठेवणें जेणेंकरून आपण लहान होतो; उ० त्याणें दोन हजार फौज बाळगली आहे; तूं इतका अभिमान कशास बाळगतोस.

**बाळगळा**, पु० बाळपणचाजो बारीक मंजुळ गळ्याचा स्वर तो.

**बाळगील**, स्त्री० कों० आपण श्रम भोगून पोर, इ० बाळगण्याचाजो व्यापार ती; २, जें बाळगण्यास आपणास श्रम आणि अडचण पडाची असें जें पोर किं० परकीयवस्तु इ० ती.

**बाळगुंडा**, पु० रा० पेलवान, इ० कानीं उचलायाची जी दगडाची गोटी तो.

**बाळगोपाळ**, पु० सर्वमिळून देवादिकांबद्दल कांहींएक विज्ञापनच्यअसतां ग्रामादिकांतील सर्व लहानथोरजे मनुष्य त्यास स०; उ० देवा या गावांत गुरें फार मरतात यासाठीं हे सर्व बाळगोपाळ तुला शरण आले आहेत, नित्यें अनेक वचनांत.

**बाळचरित्र**, न० बालचरित.

**बाळदोंक**, न० बगला.

**बाळंत**, स्त्री० नूतनप्रसूतझालेली जी स्त्री ती; प्रा० मनुष्य इति; बाळंत होणें स० प्रसूत होणें.

**बाळंतकाढा**, पु० बाळंतीस द्यावयाचा वैद्यक प्रसिद्ध काढा आहे तो.

**बाळंतखोली**, स्त्री० गृहामध्यें बाळंत होण्याचे सोईचीजी खोली केली असत्ये ती किं० जीत स्त्री बाळंत आहे ती.

**बाळंतघर**, न० ज्या घरांत कोणी स्त्री बाळंत झालेली आहे असें जें घर तें सोहेर फिटे पर्यंत; २, बाळंतखोली.

**बाळंतचुडा**, पु० बाळंतीस प्रथमतः ज्या बांगड्या भरितात तो.

**बाळंतनिंब**, पु० कडुनिंब.

**बाळंतपण**, न० बाळंतीचीजी शुश्रूषा तें.

**बाळंतबोळ**, पु० बोळांत एक भेद आहे.

**बाळंतरोग**, पु० बाळंतिणीस जो क्षयरोग जडतो तो.

**बाळंतविडा**, पु० बाळंतिणीस प्रसूत झाल्यानंतर बारावे दिवशीं किं० पुढें सोयरेधायरे, इ० विड्याचें साहित्य चोळी, इ० मुलास पेहरणें, कुंची, टोपडें, इ० देतात तो.

**बाळंतशोप, बाळंतशोप**, स्त्री० शोपेंत एक भेद आहे.

**बाळंतीण**, स्त्री॰ बाळंत.

**बाळंतें**, न॰ बाळंतीचीं, मुलाचीं, हंतरायाचीं इ॰ जीं मलिन वस्त्रें तीं प्र॰; २, तत्संबंधानें मलिन झालेंजें बाळंतिणीचा अंगावरचें वस्त्र त्यासहीं म्ह॰

**बाळंदा, बाळंधा**, पु॰ मुलें, इ॰ पदरीं असल्यामुळें निरंतर त्यांची शुश्रूषा राखिली पाहिजे, भूक तान्ह संभाळलीपाहिजे, इ॰ स्वरपर्टीची आपल्यास जी अडचण असत्ये ती; २, ज्याचे योगें तादृश अडचण प्राप्त होत्ये असेंजें मुलें, गुरें, बायका, इ॰ खटलें तें.

**बाळदृष्टि**, स्त्री॰ केवळ बारीक किं॰ दूरस्थितजो पदार्थ तो जीणेंकरून न्यहाळतो अशीजी बाळपणाची दृष्टि ती.

**बाळपरवेशी**, स्त्री॰ स्वामिकार्यावर कोणी मेला जो शिपाई, इ॰ त्याचे पोराबाळांस जीविकार्थ निरंतर चालायाजोगें देतात जें भूमि, द्रव्य, इ॰ ती; २, ३लिं॰ बाळपणापासून जोडलेलाजो चाकरी, मित्रत्व, आश्रितत्व, इ॰ कोणेकाचा संबंध तो किं॰ ते चाकर, मित्र, आश्रित, इ॰ संबंधी तो.

**बाळफूट**, स्त्री॰ कों॰ रुपया, इ॰कास केवळ बारीक जी फूट असत्ये ती.

**बाळबद**, ३लिं॰ न॰ एक महाराष्ट्रजनाची लिपि आहे; २, ३लिं॰ कपट क्रूरतादि रहितजो मनुष्यादिक तो किं॰ त्याचाजो सरळ सर्वास समजायाजोगा भाषणादि व्यवहार तो.

**बाळबेल**, न॰ कोंवळेंजें बेलाचें फळ तें.

**बाळबोध**, ३लिं॰ बालबोध; २, बाळबद इत्यार्थी.

**बाळब्रह्मचारी**, पु॰ बालब्रह्मचारी.

**बाळभूक**, स्त्री॰ घटकेघटकेस कांहींतरी खालें पाहिजे अशीजी पोर, इ॰कास भूक असत्ये ती.

**बाळभोंक**, न॰ बाळटोंक.

**बाळभोग**, पु॰ प्रातःकाळीं देवाची पूजाकरून जो अल्पपदार्थाचा नैवेद्य दाखवितात तो.

**बाळमित्र**, पु॰ बालमित्र

**बाळरंडा, बाळरांड**, स्त्री॰ बालरंडा.

**बाळलेणें, बाळल्याणें**, न॰ बाळपणीं घालायाचे जे बिंदली इत्याद्यलंकार तें.

**बाळवतें**, न॰ बाळंतें.

**बाळवाटी**, स्त्री॰ भोजनास उशीर होईल म्हणून सकाळचे प्रहरीं जो कांहीं अल्प उपहार करितात ती.

**बाळविधवा**, स्त्री॰ बालविधवा.

**बाळशिरें**, न॰ कों॰ बाळंतीचा मुलास धर्मार्थ दूध व त्याचें पात्र. इ॰ कोणी देतात तें.

**बाळसंतोष**, पु॰ भिकाऱ्यांत एक जाति आहे; जे प्रा॰ वस्त्रें मागतात; उघडाबोडा बाळसंतोष म्ह॰ तो केवळ निर्धन किं॰ ज्यास मागेंपुढें कोणी नाहीं तो.

**बाळसरस्वती**, पु॰ बालसरस्वती.

**बाळसें**, न॰ वर्षसहामहिन्याचे आंत मुलाचे आंगावरजी पुष्टता येत्ये तें; ये, ये, धातूचे योगीं प्र॰

**बाळख्यार**, ३लिं० जा गोष्टीविषयीं जाचा ज-न्माभ्यास तो त्या गोष्टीविषयीं.

**बाळहरडा, बाळहिरडा**, पु० बालहरीतकी.

**बाळहरडी, बाळहिरडी**, स्त्री० बालहरीतकी.

**बाळा**, पु० वाहळा; २, स्त्री० ग्रं० स्त्री; ३० प्रसूत झाली बाळा वाजवा ह्मणती थाळा.

**बाळांतीण**, स्त्री० बाळंतीण.

**बाळांबा**, पु० कोंवळाजो आंबा तो.

**बाळाभ्यास**, पु० जन्माभ्यास.

**बाळाभ्यासी**, ३लिं० जन्माभ्यासी.

**बाळी**, स्त्री० कर्णभूषण आहे; २, ग्रं० मुलगी; बाळ्या हकणें ह्म० पवबारा करणें.

**बाळीबुगडी**, स्त्री० बाळ्या, बुगड्या, इ० जें ग्विडुकमिडूक ती.

**बाळें**, न० रा० अतिव्यातारपण झाल्यामुळें एखाद्यास केवळ वेड लागतें तें.

**बाळेणें**, रा० बाळ्यानें युक्त होणें; २, मिरची वांगी, इ० झाड, खत, पाणी, इ० अधिक झाल्यामुळें माजून फल फूल नधरे अशा अवस्थेतें पावणें.

**बाळेभोंक**, न० रा० बाळभोंक.

**बाळोपचार**, पु० केवळ बाळकासही केलाअसतां सोसायास कठीण पडायाचा नाहीं असाजो सात्विक औषधाद्युपचार तो.

**बाळोपचारी**, ३लिं० बाळोपचारसंबंधीजें औषधादिक तो.

**बिकट**, ३लिं० अवघडजो किल्ला, वाट, गोष्ट, श्लोक, हिशेब, इ० तो.

**बिकलम**, न० खत पत्र, इ० कांवर हें अमक्याचे हातचें अक्षर असें समजायाकरितां एतच्छब्दपूर्वक किं० हस्ताक्षर शब्दपूर्वक आपल्या नावाचा लेखकानेंजो शेवटीं लेख केला असतो तें.

**बिगड**, पु० बिघाड.

**बिगडणें**, बिघडणें.

**बिगडाबिगड**, बिघडाबिघड.

**बगर**, अ० बगर.

**बिगाड**, पु० बिघाड.

**बिगार**, स्त्री० मोल नघेतां सर्कार, इ० कांचें काम करावें लागतें ती किं० तसें काम करण्याचाजो प्रकार ती; २, तशाप्रकारानें ग्रामांतरादिकांस पोहचवायाचेंजें ओझें, इ० त्यास ह्म०; ३, ला० अनास्थेनें में सरासरी करितात काम त्यास ह्म०

**बिगारी**, पु० बिगारीचें काम करणाराजो तो.

**बिगें**, न० अपेक्षितजो साहित्यसमुदाय त्यामध्यें एखादे पदार्थाचे अभावामुळें कार्य यथास्थित शोभिवंत दिसूनये असेंजें कांहीं त्या कार्यांत उणें पडतें तें; उ० त्याणीं प्रयोजन चांगलें केलें परंतु तूप घाणेरें होतें एवढें बिगें पडलें.

**बिघड**, पु० बिघाड.

**बिघडणें**, कोणेक पदार्थ गोष्ट, इ० कांचे अंगीं विवक्षित कर्मोपयोगिता प्रयोजक असतोजो गुण तद्वियोगामुळें किं० कांहीं विरुद्ध

द्गुणसंबंधामुळें तो पदार्थगोष्ट, इ० त्याकर्मा विषयीं अनुपयोगिला विशिष्ट करणें; कोणे-कानें कोणेकाशीं विघडणें स० परस्पराचीं अंतःकरणें विरुद्धभाव विशिष्ट होणें.

**विघडाविघड**, स्त्री० विवक्षितकार्यसाधकभूत जे अनेकपदार्थ त्यांचाजो विघडलेपणा किं० तन्मूलककार्याचाही ती.

**विघा**, पु० बीसपांड जे क्षेत्र तो.

**विघाड**, पु० परस्परांचे अंतःकरणाचा किं० घडायास आलीजी गोष्ट तिचाजो विघडलेपणा तो.

**विघावणी**, स्त्री० हात, काठी, इ०कानीं क्षेत्र मोजून त्याचे विघे बांधण्याचाजो व्यापार ती.

**विचकरणें**, रा० काठी, इत्यादिकानीं किंचित् रचणणें.

**बिचकणें**, अकस्मात् अद्भुत किं० भयानक कांहीं पाहिल्यामुळें स्वाभाविकजो अंतःकरणवृत्तीचा ओघ चालूला असतो तो परावृत्त होऊन क्षणमात्र संभ्रांतप्राय होणें.

**बिचकावणें**, बिचके असा करणें.

**बिचल**, स्त्री० पु० कों० रचाणें धातूचेयोगीं प्र० अ० बदल रचाणें.

**बिचलणें**, पोर, गुरूं, घोडें, इ०कानें पूर्वीचा जो योग्यरीतीचा स्वभाव तो सोडून कोणेकाचें ऐकूं नये कोणाला मारावें, शिव्याद्याव्या, पळावें, इ०रूप अयोग्यस्वभाव विशिष्ट होई असा पोर, इ०कास कोणेकानें करणें.



**बिचवा**, पु० हिं० जाडेन्यास आभयाभूतमध्ये रचावू नाहीं असाजो लहान डेरा तो.

**बिचारा**, ३लिं० बापडा.

**बिचोबा**, पु० हिं० बिचवा.

**बिछाइती**, पु० हिं० पेठबाजार, यांत बाहेरून कांहीं माल घेऊन विकायाकरितां आलेलाजो उदमी तो; २, बंदिस्तीचें दुकाननसतांरस्त्यांत किं० कोणाचे ओट्यावर कांहीं किरकोळ माल घेऊन विकायास बसलेलाजो उदमी तो; २, ३लिं० त्याजवळचाजो मालतो.

**बिछाईत**, स्त्री० हिं० बिछायत.

**बिछाद, बिच्छाद**, स्त्री० बिशाद.

**बिछाना, बिछोना**, पु० हिं० आंथरूण.

**बिछायत**, स्त्री० अनेकानीं बसणें इत्यादर्थ भूम्यादिकांवर सत्रंजी, रुजामा, इ०कांचेंजें आस्तरण करितात ती.

**बिछायती**, पु० ३लिं० बिछाइती.

**बिछावणें**, भूम्यादिकांवर सत्रंजी, रुजामा, इ० अस्तरणें; २, ला० कोणेक मनुष्यादिकास जमीनदोस्त करणें.

**बिजली**, स्त्री० पोरांचा अक्करें दुकुरे म्हणून खेळ आहे त्यांत एक शब्द आहे; लंगडयाई खेळते वेळेस जी चीप किं० लांकडाचा तुकडा घेतात ती.

**बिजवर**, न० कों० उत्पत्तिकारणजें बीज तें; २, बीजोत्पन्नपदार्थाचा चांगलेपणा, वाईटपणा, इ० वर्णायाचें असतां त्यापदार्थासही स० ; उ० बिजवर चांगलें असलेंतर पोर

चांगलें होतें; हा घोडा काठेवाडी घोड्याचें बिजवट आहे.

बिजवड, पु॰ ज्यापासून बीजाविशाराजो उत्पन्न झाला तो त्याचा. प्रा॰ इक्षलतादिस लि; उ॰ हा आंबा वनखोडाचा बिजवड आहे.

बिजवर, पु॰ दुसरें लग्न करायासजो नवरा झाला तो.

बिजवरा, पु॰ स्त्रियांचें एक शिरोभूषण आहे.

बिजा, ३लिं॰ हिं॰ दुसरा.

बिजागरें, न॰ पेटी, फडताळ, इ॰ कांचें झांकण उघडावें पुनः मिटावें म्हणून त्या उभयतांचा संधीस सांध्याचीपट्टी मारितात तें.

बिजेंवारें, न॰ कों॰ हिर्दारशाक; २, ला॰ उभा दावा; उ॰ त्याचें व याचें बिजेंवारें आहे.

बिजोरा, पु॰ हिं॰ बिजवरा.

बिटी, स्त्री॰ खडे, इ॰ खेळत्येसमयीं एक खडा वर उडवून तो झेलत्येसमयीं जे दोन खडे उचलून घेतात ती; २, मका, जोंधळा, इ॰ दिकांचेंजें लहान कणीस ती.

बिडती, स्त्री॰ दोहोंकडूनजो संकटप्रसंग प्राप्त होतो ती; उ॰ पुढें वाघ मागें आस्वल अशा बिडतींत सांपडलों; २, ला॰ दुर्निर्वहजें संकट तेथेंही प्रयोग करितात.

बिंडा, पु॰ सूत, दोरी, इ॰ कांचें गुंडाळून केलेंजें भेंडोळें तो; २, पर्वताचे मस्तकावर किं॰ भूमीवर ठेवल्यासारखा जो गोलाकार अवयव वाढला असतो तो; ३, काष्ठ, गवत, इ॰ कांचाजो लहान भारा तो.



बिर्डी, ३लिं॰ बिडाचाजो पदार्थ तो का, इ॰ तो; २, बीडम्हणून पेंद आहे तेंथील जें चागोटें, इ॰ कापड तो; ३, स्त्री॰ अपराध्याचे पायांत प्रतिबंधार्थ हरंखला घालितात ती; ४, शूद्रादिक शोभार्थ रुप्याचें वलय करून पायांत घालितात ती; ५, ला॰ स्त्रीपुत्रप्रमता स्नेह, इ॰ ज्याचेयोगानें अडकला जातो त्यास म्ह॰

बिडार, बिढार, न॰ कों॰ बिऱ्हाड.

बिढारकरी, बिढारकरू, पु॰ कों॰ बिऱ्हाडकरी.

बितणें, कांहींएक गोष्ट मध्यें कालावकाश नाहीं अशी समीपयेऊन ठेपणें; उ॰ लग्नतरउद्यांवर बितलें आणि साहित्य तों झालें नाहीं कसें होतें पहावें; २, भाररूप किं॰ संकटरूपजें कर्मादिक तें कोणेकावर तदेकलक्ष्यहोत्सानें अवश्य निर्वाह्यलेंकरून प्रसक्त होणें; उ॰ तो प्राणावर बितलेंतरीं एकाएकीं खोटें बोलणार नाहीं; एथें संकटादिरूप कर्ता प्रा॰ अध्याहारगम्य असतो; ३, कज्जा, लढाई, इ॰ प्रवृत्त होणें.

बितपशील, अ॰ नपशीलवार.

बित्तीम, ३लिं॰ हिं॰ तहकीक बातमी सांगणें. बोलणें, इ॰ कांचे वि॰

बिथरणें, कोणेक कर्माविषयीं कोणेकाशीं अनुकूलभावानें वागणाराजो कोणेक त्यास प्रतिकूलभावानें विशिष्ट करणें; २, घटनेस आलेलेंजें कांहीं काम तें बिघडणें; प्रा॰

अकर्मक प्र० प्रचुर; ३, सोईनें वागत अस तोजो कोणी त्याणें कांहीं कारणामुळें स्तब्ध होणें; उ० हा सोईनें वागतो आहे तों बरा एकदां बिथरल्यानंतर शंभरांस ऐकणार नाहीं.

**बिंद**, पु० रा० बिंदूचा अपभ्रंश.

**बिंदडी**, स्त्री० बस्ता प्रथमार्थी.

**बिंदलें**, न० लहानमुलाचें हातांतील सोन्याचें भूषण आहे; २, रा० अनुस्वार किं० विसर्ग बोधकजें एतदाकारक चिन्ह तें; उ० माथा बिंदलें फं.

**बिदा, बिदाई, बिदागी, बिदायकी**, स्त्री० हिं० पाठवणी.

**बिंदी**, स्त्री० स्त्रियांचें शिरोभूषण आहे.

**बिंदु**, पु० तिपका; २, अनुस्वारबोधक किं० विसर्गबोधकजें चिन्ह तें.

**बिंदुकली**, स्त्री० बिंदुद्वितीयार्थी; २, कों० बांडगूळ.

**बिंदुकलें**, न० बिंदु द्वितीयार्थी.

**बिन**, अ० विनायार्थी परंतु जाजा अर्थाचें राहित्य वर्णायाचें त्यात्याशब्दामागें याचायोग होउन समास होतो; ते विशिष्टशब्द क्वचित् द्रव्यविशेषण क्वचित् क्रियाविशेषण असे होतात; उ० तुह्मी बिनघोर आपल्या घरास जा; पुत्रानें संसार आटपला आतां मी बिनघोर झालों. क्व० पुढेंही प्र० होतो; मी रुपये घेतल्याविन जाणार नाहीं: बिन अपराध मला मारलें; बिनबट्टा, बिनरफ़्लारव, बिनदिकत, बिनकदेली, इ० किं० वांचून, शिवाय, इ० कानीं राहित्याचा बोध होत असतांही उगीच याचा प्र० मागें कोणी करितात; उ० बिनपैशावांचून मोज; क्व० पुत्र परंतु याचा प्र०; कागदोपत्रीं कोणेकाचें नाम लिहून संबंधार्थ पित्याचें नाम लिहावयाचें असतां एतत्पूर्वक लिहितात; उ० रामभट्ट बिन कृष्णभट ह्म० कृष्णभटाचा पुत्र रामभट्ट.

**बिनकदली, बिनकदेली**, स्त्री० दुफाशी खेळांत जुगल्यानंतर कदली पडावी तीन पडल्यामुळें जो पराजितपणा येतो ती; २, ३ लिं० तिद्विशिष्टजो खेळणारा तो; कोणेकानें बिनकदलीवर येणें ह्म० तिरगीमिरगीवर येणें.

**बिनगा**, पु० रा० ताम्रादिकाची आकारविशेषाची कळशी तो.

**बिनधोक**, अ० मनांत काय होईल, कसें होईल, इ० धोका न बाळगतां.

**बिनसणें**, बिघडणें.

**बिनारखी**, स्त्री० कोणेक पदार्थ, गोष्ट, इ० कांच्या आंत संदेह विषयला न राहे असा त्याच्या अवयवशः चौकशी, इ० उपायानीं करितात जो फाड ती.

**बिनासणें**, बिनसणें.

**बिनी**, स्त्री० सैन्यादिकांचा अग्रभाग; २, कपाळावर यावयाचाजो पागोटें, पगडी, यांचा अग्रभाग तो; ३, द्वाराचे चौकटीचाजो वरचा भाग तो.

**बिनीचा**, ३ लिं० अग्रगण्य, शूर, शिपाई,

लबाड, चोर, इ॰कांचें वि॰

**बिनीवाला,** पु॰ फौजेचा बिनीचाजो अधिकारी तो.

**बिंब,** न॰ सूर्य चंद्र आणि भूभा यांचींजीं मंडलें तीं प्र॰; २, आरसा, जल, इ॰कांत ज्यारूपाचें प्रतिबिंब दिसतें आहे तें मुख्यरूप; ३, सं॰ तोंडलें; ४, दृष्टांत इ॰ अलंकारविशिष्टभाषणामध्यें दार्ष्टांतिकादिरूपजो प्रतिपाद्य अर्थ तें; ५, राज्याद्यधिकारपदीं असतांजे पराक्रमादिगुण असावे ते असोत किं॰ नसोत परंतु ज्याचेयोगानें तें अधिकारी पद शून्य दिसत नाहीं असाजो कोणी त्यात्यापदीं असतो त्यास म्ह॰; उ॰ सर्दार लोक जाऊन लढाई देतील परंतु राजाच्या पुत्र उगीचबिंबह्मणून बरोबर घ्यावा.

**बिंबप्रतिबिंबभाव,** पु॰ बिंबभूत आणि प्रतिबिंबभूत असेजे अर्थ त्यांचाजो परस्परसंबंध तो.

**बिबट,** न॰ बा॰ बिबव्याचें बोंड; २, ला॰ व्याघ्र, मांजर, इ॰कांचा आंगावर बिबव्यासारिखें ठीक असतें तें.

**बिबटा,** ३ लिं॰ बिबटें आहेत ज्याचे अंगावर असाजो व्याघ्र, मांजर, इ॰ तो.

**बिंबणें,** कांहींएक गोष्ट, इ॰ अर्थ, आरसा, इ॰कांत जसें पदार्थांचें प्रतिबिंब पडतें तसें अंतःकरणांत प्रतिबिंब पडे असाजा णला जाणें.

**बिंबली,** स्त्री॰ एक झाड आहे.

बिंबलें

**बिंबलें,** न॰ बिंबलीचें फळ तें.

**बिबवा,** पु॰ एका झाडाचें फळ आहेज्याचे रसाचा आंगास स्पर्श झालाअसतां त्वचा नासत्ये परंतु औषधी आहे; कामावर बिबवा घालणें ह्म॰ कांहीं प्रतिकूळकरून काम बिघडणें.

**बिबवी,** स्त्री॰ बिबव्याचें झाड.

**बिबळा,** पु॰ कों॰ बिबळा प्रथमा द्विती यार्थी; २, वाघांत एक जाति आहे.

**बिंबी,** स्त्री॰ नागरमोथ्याचें झाड ती.

**बिबी,** स्त्री॰ बुबू.

**बिंबूड,** न॰ स्त्री॰ पर्जन्याभावादिकारणामुळें शेत, इ॰कांत बियापुरतेंही उत्पन्न होऊ नये असाजो अभाव होतो तें ती; २, ला॰ मनुष्यादिजाति किं॰ कांहीं इतर पदार्थांचा रोगादिकारणामुळें बीजभूत ईषन्मात्रही अंश राहूं नये असाजो अभाव होतो ती.

**बिबा,** पु॰ बिबवा.

**बिबी,** स्त्री॰ बिबवी.

**बिबूव्यावाघ,** पु॰ ज्याचे अंगावर बिबव्यासारखे ठिपके असतात अशी एक वाघांत जाति आहे.

**बिबूबा,** पु॰ रा॰ बिबवा.

**बिबूबी,** स्त्री॰ रा॰ बिबवी.

**बिभित्स,** ३ लिं॰ बीभत्सशब्दाचा अपभ्रंश प्रथमार्थी प्र॰ नाहीं.

**बिभूत,** स्त्री॰ विभूत; ह्म॰ विभूतीचें मूळ

रेड्याचे

रेड्याचे गाडीत.

**बियंबी**, स्त्री॰रा॰ बेहंबी.

**बियबणी**, न॰रा॰ पिकलेली कोकंबे फोडून त्यांतील मगजानें विशिष्टजा बिया त्यांचें त्यार करितात तें.

**बियांचा**, ३लिं॰ बियासाठीं ठेवलेलेंजें धान्यादिक तो; २, ला॰ असंकीर्ण शब्दजी ब्राह्मणत्व इत्यादि जाति किं॰ सोदेपणा, लुच्चेपणा, शाहणपणा, इ॰ धर्म तद्विशिष्टजो ब्राह्मण, शूद्र, सोदा, लुच्चा, शहाणा, इ॰ तो.

**बियाणें**, न॰रा॰ भूमींत घालून त्यांच्या वृक्ष, धान्य, इ॰कांची उत्पत्ति करावी म्हणून उद्दिष्टजें धान्य, वांगी, मिरची, इ॰कांचें बीज तें; २, मनुष्य, पशु, इ॰कांचें उत्पत्तिकारणजें बीज त्यास बीजभिन्नगुणदोषानें अधिकारून बीजोत्पन्नाची स्तुति किं॰ निंदा जेव्हां वर्णनीय आहे तेव्हां म्ह॰; उ॰ आमचे घरचे गुरांचें बियाणेंच असेंकीं जें गुरूं होतें तें दुधाळ होतें; कांहींएक पदार्थ बियाण्यास नसणेंम्ह॰ अगदीं नसणें.

**बियाँवळ**, स्त्री॰ वा॰ भेंड्या, कांकड्या, इ॰ कांचें बीं दुसरेसालीं पेरावयासाठीं ठेवितात ती.

**बिरखडणें**, कागद, इ॰ बिरखड्यानीं युक्त करणें; २, श्लोक, वाक्य, इ॰ किं॰ कांहीं मजकूर घाईपाईनें वांकड्यातिकड्या अक्षरानीं लिहिणें.

**बिरखडी**, स्त्री॰ कागद, भिंत, इ॰कांवर वांकडीतिकडी शाई, इ॰कानीं ओढलीजी रेघ ती; २, जास बळण नाहीं घाईघाईनें वांकडेंतिकडें लिहिलेलेंजें अक्षर त्यास म्ह॰

**बिरखुंड**, न॰ बोरू, जोंधळ्याचें ताट, इ॰कांचेंजें भेंड तें; २, बिरंबुटा.

**बिरखुडी**, स्त्री॰ बिरखडी.

**बिरडी, बिरढी**, स्त्री॰ जलानें भिजल्यामुळें जाला मोड आला आहे किं॰ अंकुर आला असाजो पावटा, इ॰ द्विदलाचा दाणा ती.

**बिरडें, बिरढें**, न॰ अंगरखा, दावें, इ॰कांचे गुंडीस कोणी म्ह॰ कोणीत्या गुंडीचे अडकवणास म्ह॰ कोणी त्या दोहोंस मिळून म्ह॰; २, बिरढी.

**बिरदाईत**, ३लिं॰ कांहींएक विद्या, कला, इ॰ कांमध्यें पुरा प्रवीण असोन त्याचा बाणा बाळगतो असाजो वैदिक, पंडित, पुराणीक, गायक, शिपाई, इ॰ तो.

**बिरबिरी**, स्त्री॰ जाचा पिंड करूं गेलें असतां होऊं नये असें पातळजें शेण, लोणी, जलादिकांत कालविलेलें पीठ, इ॰ पदार्थ ती.

**बिरबिरीत**, ३लिं॰ बिरबिरीरूप झालेलाजो शेण, इ॰ पदार्थ तो.

**बिरंबुटा**, पु॰ मक्याचे कणसाचा दाणे काढून घेतल्यावर अवशिष्टजो दांडा राहतो तो.

**बिरंबोटा**, पु॰ बिरंबुटा.

**बिरंबोळा**, पु॰ एकवन्यवेल आहे तो; २, त्याचा

त्याचा कारा

**बिरमोटा**, पु॰ बिरंबुदा.

**बिरादर**, पु॰ बंधु; याचा म॰ पादशाहीसनदांत असतो.

**बिरी**, स्त्री॰ स्त्रियांचें कर्णभूषण आहे.

**बिरीद**, न॰ जो जा विद्या कलादि गुणाविषयीं बाणा बाळगतो त्याचें ज्ञापकचिन्ह ह्मणून हस्तादिकांच्याठायीं दोरा, इ॰जें बाळगितो तें; २, बाणाप्रथमार्थी; बिरदावळी, स्त्री॰ बिरुदावलीचा अपभ्रंश.

**बिरुद**, न॰ बिरीद; बिरुदांचीजी आवलि ती बिरुदावलि, इ॰स॰

**बिऱ्हाड**, न॰ कांहीं दिवस रहावयाकरितां परसत्ताकअसून आपल्याकडे घेतात जें गृह किं॰ गृहैकदेश, इ॰स्थल तें; २, तेथें रहाणारांचें त्यास्थलीं असतेंजें हांडेभांडें, वस्त्रपात्र, चीजवस्त, इ॰स्वटलें तें; उ॰ आह्मी एथून बिऱ्हाड उचलून तिकडे नेलें; ३, कांहीं दिवस रहावयाकरितां परकीय स्थलीं करितातजी उतरून अधिष्ठिति तें किं॰ तेणेंकरून त्यास्थलावर येतोजो तदधिष्ठितपणा तें; उ॰ या खोलींत दुसऱ्याचें बिऱ्हाड आहे; तुह्मी त्या खोलींत बिऱ्हाड करा; ४, तेथें तशी अधिष्ठितिकरून रहाण्याचाजो प्रकार तें; उ॰ आह्मी तेथें बिऱ्हाडानें आहों; ५, ला॰ भाषणादिकांत स्पष्टन करितां गुप्त राखिला असतोजो कांहीं अर्थांश तें; उ॰ घरोब्यानें बोलतअसतां आंत बिऱ्हाड ठेवणें चांगलें नव्हे; बिऱ्हाड आटोपणें ह्म॰ संकेतानें मरणें याअर्थी म्ह॰

**बिऱ्हाडकरी**, **बिऱ्हाडकरू**, पु॰ बिऱ्हाडानें राहिलेलाजो तो; अनेकवचनीं नपुंसकींही प्र॰होतो.

**बिऱ्हाडखर्च**, पु॰ बिऱ्हाडसंबंधीजो खर्च तो.

**बिऱ्हाडबाजलें**, न॰ बिऱ्हाडसंबंधी वस्त्र, पात्र, इ॰जें खटलें तें; त्याचें बिऱ्हाडबाजलें सांगातीच आहे, इ॰ स्थलीं त्यास मागेंपुढें कोणी नाहीं असाअर्थ.

**बिऱ्हाडू**, पु॰ बिऱ्हाडकरू.

**बिदि**, न॰ भूम्यादिकांस आंत उंदीर, सर्प, व्याघ्र, इ॰कांच्या प्रवेश, स्थिति, व्हावयाजोगें असतेंजें मोठें छिद्र तें; बिलेशय, बिलद्वार, इ॰स॰

**बिलग**, ३लिं॰ विलग.

**बिलगणें**, कोणेकापासून कांहीं काढून घ्यावें किं॰ कोणेकास पराजित करावें, लुटावें, इ॰कारणार्थ त्याच्याशीं तिकडच्या येग अंगीं धरून भिडणें.

**बिलंद**, ३लिं॰ अट्टल.

**बिलंदी**, ३लिं॰ हिं॰ तालांत एक भेद आहे;

**बिलबिलीत**, ३लिं॰ पिकणें, हस्तादिकानें चोळचटणें, इ॰कारणामुळें आंतील घनता मोडून चेपायाजोगा मृदुझालाजो अंबा, निंबू, गळू, इ॰ तो.

**बिलवर**, न॰ दे॰ बिलोर.

**बिलवरी**, ३लिं०दे० बिलोरी.

**बिलावर**, पु० गानांतील एक राग आहे.

**बिलोर**, न० उंचीजें कांच तें.

**बिलोरी**, ३लिं० बिलोराचाजो हंडी, झाड, इ० पदार्थ तो.

**बिल्याण**, पु० पैलूदार असून केवळ बसकट नव्हे अशा आकाराचा जो हिरा तो.

**बिल्व**, पु० एक शिवप्रिय वृक्ष आहे; २, त्याचें पान; ३, न० त्याचें फल; बिल्वकाष्ठ, बिल्वपत्र, इ० स०

**बिवलकरी**, ३लिं० बिवलकर ह्मणून ब्राह्मणांत एक कुल आहे त्या कुलींचा पुरुषानें प्रसिद्ध केलेलें पिशाचलिपीचें वळण आहे तें आणि त्या वळणाचें अक्षर. किंवा, इ० तो.

**बिंबळा**, पु० रा० एक वन्यवृक्ष आहे; २, नागवेली करायासाठीं लाविनातजे नागवेलीचें वेल ती किं० जुन्या नागवेलीखुंटावरून उतरून पुनः त्याचे वेल चांगले वाढावे ह्मणून त्यावेलांचीं गुंडाळीकरून तेथेंच जीं पुरतात तो; २, रा० लांबट आकाराचा लहानजो मुडा ज्यांत प्रा० बियांचें धान्य असतें तो.

**बिशाद**, स्त्री० पैका किं० ज्यापासून बिक्रयादिद्वारा पैका उत्पन्न होतो असाजो वस्त्र, पात्र, भूषण, इ० सर्व पदार्थ ती; उ० चडलांचे वेळची जी काय बिशाद होती ती अह्मी सर्वांनी वांटून घेतली; २, तत्तांश पेशिल्यामुळें पदार्थाचे अंगीं असत्येजी गणनार्हता ती किं० तत्कारणीभूतजो पदार्थनिष्ठ तत्तांश ती; निषधविषयीं प्र०; उ० पागोट्याची बिशाद ती काय आणि भांडता कशास; शंभररुपये ह्म० बिशाद काय जातांजातां मिळवूं.

**बिसनी**, पु० द्रव्यादि व्यायास करून वेश्यादिसामान्यस्त्रियांकडे उपभोगार्थ गेलेला जो पुरुष त्यास तत्समयीं ह्म०; २, तादृश द्रव्यादि जवळ नसतां दुर्व्यसनें चाळगून अद्यू जाणे सोडली आहे असाजो पुरुष तो; ह्म० फुकट बिसनी आणि लंबाखू उसनी.

**बिसाद**, स्त्री० बिशाद.

**बिहाबा**, पु० कों० बेहबी.

**बी**, स्त्री० फलांतर्गतजी बीजांशरूप व्यक्ति ती; २, अंडकोशांतर्गतजे दोन अवयव ते प्र०; ३, गळू, इ० उठाण्यांत घट्टजो पूयांश असतो ती; बी रुजणें ह्म० कोणेकापासून कांहीं कार्यकरून घ्याचें ह्मणून केलाजो प्रयत्न तो लागू होणें.

**बीं**, न० राजगिरा, माठ, इ० किं० दर्भादि तृणें. वेळू, इ० कांवर येतोजो बीजसमुदाय तें; २, बियाणें; ३, कंद, शाखा, मुळी, पान, बी, इ० ज्याज्या वृक्षलतादिकांचें जेंजें उत्पत्तिकारण तेंतें त्याचें त्याचें; त्यास उत्पत्तिकारणतेंकरून विवक्षाअसतां प्र०

**बीज**, स्त्री० द्वितीया; २, न० बीज.

**बीज**, न० मनुष्य, पशु, पक्षी, वृक्ष, लता, इ० पदार्थांचें मूलभूत मुख्यजें उत्पत्तिकारण

रेत, इ॰जें त्यात्यापदार्थाचें सूक्ष्मरूप होय तें; २, तत्तद्बीजोत्पन्नजो मनुष्यादिक त्यास प्रसंगविशेषीं ह्म०; ३. कांहीं व्यवहार, कलह, इ॰कांचें जें तादृश मूलकारण तें; ४, बीजगणित; ५, भाषण, कविता, इ॰कांत सप्रसंगविस्तार पावणारजी कांहीं गोष्टति च्या कवी, इ॰कानें पूर्वी तत्ज्ञापक दर्शविला असतोजो ईषदंश तें.

**बीजक**, न॰ रेशीम, कापड, इ॰कांचे ओझ्यांतजो त्यांचेंत्यांचें वजन, संख्या, इ॰कांचा आंकडा कागदावर लिहून टाकिलात तें.

**बीजांकुरन्याय**, पु॰ बीजापासून अंकुरहोतो, अंकुरापासून बीज होतें, याव्यवहाराचा पर्जन्यापासून उदक, उदकापासून पर्जन्य, इ॰व्यवहारास घेतात जो दृष्टांत तो.

**बीजगणित**, न॰सं॰अव्यक्तगणित.

**बीजारोप**, पु॰ वृक्ष, मनुष्य, इ॰ पदार्थाचें किं॰ कलहादिव्यवहाराचें किं॰ विस्तारपावणारे गोष्टीचें जें तेंतें बीज त्याचा त्यात्या क्षेत्रादि योग्यस्थलींजो निक्षेप तो.

**बीजारोपण**, न॰ बीजाचें रोप करण्याचा व्यापार किं॰ बीजारोप तें.

**बीड**, न॰ लोहासारखा एक धातु आहे; २, कांसार, इ॰कांचे साळेंत वर मोरमोठे पत्रे इ॰ ठोकून वाढवायासाठीं चौरस मोठा बिडाचा तुकडा असतो तें; ३, स्त्री॰ कों॰ गाड्यावर भरलेलें जें तृणादिक त्यास आंवळाव

याचा जो तिहेरी, इ॰ जाड दोरी असते ती.

**बीत**, स्त्री॰ हिं॰ कागदाचा बंद, इ॰कांवर दोहोंअंगे जागा सोडून मध्यें कांहीं लेखनार्थ काढितातजी रेघ ती.

**बीद, बीध**, स्त्री॰ गांवांतीलजो लहानमोठा मार्ग ती.

**बीन**, न॰पु॰ तंतुवाद्य आहे ज्यास दोहोंकडे दोन भोपळे असतात तें तो.

**बींधियाणें**, न॰ बींबिवळा.

**बींबिवळा**, पु॰ धान्यादिकांचें बीं किं॰ ऊंस, रताळीं, इ॰कांचें ब्याणें यांस सामान्येंकरून ह्म०; उ॰ यंदा शेतभात कांहीं करणार होतों परंतु बींबिवळा कोठें मिळेना ह्मणून सोडलें

**बींबेणें, बींब्याणें**, न॰ बींबिवळा.

**बीभत्स**, पु॰ नव रसांतील एक रस आहे; २ ३लिं॰ रक्त कुजलेलें मांस, पू, विष्ठा, शिश्न, योनि, इ॰ ओंगळ पदार्थ किं॰ तद्दिशिष्ट स्थल किं॰ तद्वाचक शब्द इ॰ तो ज्याचे योगानें तो बीभत्स रस उत्पन्न होतो; ३, बीभत्स शब्द बोलण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**बीर**, पु॰ मंत्रसाध्य देवता आहे; कोणेकास बीर भरणें, देणें, ह्म॰ कलहादिकांविषयीं तेणानें प्रयत्न होई असा उत्तेजन व्यापार करणें.

**बील**, पु॰ कोंबडे, इ॰कांचे अंड्यांतील गिलगिलीत जो अंश तो.

बीळ, न० बिल; बीळ पाडणें म्ह० विवक्षित कार्यार्थ दर्वार, इ० स्थलीं प्रवेश होई असें युक्तीनें द्वार करणें; बीळ उघडणें म्ह० पेंच फुटणें; २, रा० सूप, रोवळी, इ० करावयासाठीं वेळू, चिवा, इ० कांची काढिलेली तजी पातळ ते.

बुकटी, स्त्री० औषधादिकांचें जें चूर्ण ती.

बुकणाहत्ती, पु० बाहेर दिसायाचे जे दोनदांत ते ज्यास येत नाहींत असा जो हत्ती तो; २, ला० शरीरानें लठ्ठ गांड, गर्दन, ज्याची एक झाली आहे असा जो त्यास म्ह०

बुकणी, स्त्री० बुकटी.

बुकलणें, मनुष्यादि जीवांस बुक्यांनीं प्रहार करणें.

बुकलाबुकल, स्त्री० कोणेकास लाथाबुक्यांनीं अनेकांनीं मिळून किं० एकानेंच पुष्कळ मारण्याचा जो व्यापार ती.

बुका, पु० सुवासिक द्रव्यांचें चूर्ण आहे जें देवादिकांस अर्पितात तो.

बुकाडा, पु० वा० फार जोराची जी बुकी तो.

बुकांदा, पु० मोठा जो बुकीचा प्रहार तो.

बुकांदी, स्त्री० बुकांदा.

बुकालणें, बुकलणें.

बुकी, स्त्री० ताडनार्थ केली जी हाताची मूठ ती; २, बुकणी.

बुगडी, स्त्री० स्त्रियांचें कर्णभूषण आहे.

बुचकणें, वा० यथास्थित रास, इ० करून ठेवलेलें जें धान्य, पीठ, इ० त्यांत हात वारंवार घालून तो संनिवेश बिघडे असें तें धान्यादि करणें.

बुचकरणें, रा० बिचकुरणें.

बुचकरा, पु० बिचकुरा.

बुचकली, स्त्री० बुचकुली.

बुचकळणें, कांहींएक पदार्थ जलादि द्रवरूप पदार्थांत बुडवून बाहेर काढणें; तो शास्त्रांत बुचकळला आहे, इ० स्थलीं कांहींसा एकवार शास्त्राचा संस्कार झाला आहे; २, ला० कांहींएक व्यवहारादिकांत कर्तव्याचा निश्चय होईनासा झाल्यामुळें असें करावें, कीं तसें करावें, हें करावें, कीं तें करावें, अशी अनेकवार बुद्धि होई अशा दशेतें पावणें किं० बुद्धिनें कुंठित होऊन जडप्रायता पावणें.

बुचकळी, स्त्री० मनुष्यादिकानें उदकादिकांत पटकन बुडून वर यावें इतका जो व्यापार ती; मारणें धातुचे योगीं प्र०; बुचकळ्या खाणें म्ह० गटंगळ्या खाणें.

बुचकुरणें, बिचकरणें.

बुचकुरा, पु० बिचकरा.

बुचकुली, स्त्री० पिष्टादि पदार्थ घेण्याकरितां पालथा कमलाकार केला जो हस्त ती; २, रा० मार्जारादिकांचे पुढचे पायांचा जो पंजा त्यास आणि लहान मुलाचा जो पंजा त्यास म्ह०.

बुचकुळणें, बुचकळणें.

बुचकुळी, स्त्री० बुचकळी.

बुचकोली, स्त्री॰ बुचकुली.

बुचरणें, न॰ दे॰ गुडरी.

बुचडा, पु॰ डोकीचे केंसाचीं अग्रें एकत्र करून गांठ द्यावी आणि ते केंस गुंडाळून आंतले आंत गुंतविले असतां किं॰ वेणी करून गुंडाळून तें गुंडाळें केंसांत गुंतविलें असतां जो रचनाविशेष होतो तो; २, भूमीवर रुजलेलीं जीं तृणें, भाताचा काड्या, इ॰ त्या अनेकांचीं अग्रें एकत्र करून गांठ दिली असतां जो आकारविशेष होतो तो.

बुचडी, स्त्री॰ कांबळा, इ॰ कांचा चुण्या एकत्र बांधून पर्जन्य निवारणार्थ खोळेसारखी रचना करितात ती.

बुचबुचणें, कृमि, उवा, इ॰ कांचा क्षत, केंश, इ॰ कांचाठायीं बुचबुचाट झाल्यामुळें कृमि इ॰ कांनीं चलनवलन विशिष्ट होणें.

बुचबुचाट, पु॰ कांहींएक पदार्थामध्यें कृमींचा, केंशांत उवांचा, पलंग, इ॰ कांत ढेंकणांचा होतो जो अतिशय तो.

बुचबुचावणें, ओमळणें.

बुचबूच, अ॰ बुचुबुचू.

बुचा, ३ लिं॰ ज्या शरीरावयवाच्याठायीं जें भूषण असावें तद्रहित जो अवयव तो.

बुचाकारभार, पु॰ लांडाकारभार.

बुचाकारभारी, पु॰ लांडाकारभारी.

बुचारणें, बुचाडणें, आंगावरचे अलंकार, वस्त्रादिक पदार्थ, त्वरेनें तो पदार्थ मोडेल, तुटेल, हें न पाहतां बलात्कारानें ओरबडून घेणें; पक्षी ज्याचें आंगावरून घेतलें त्यास ही कर्मता येत्ये; २, ला॰ कोणाकापासून चोर, इ॰ कानें कांहींएक विषय लुगारून घेणें.

बुचुकली, स्त्री॰ बुचकुली.

बुचुबुचू, अ॰ कांहींएक पदार्थ नासला जाई असें आंत अनेकवार होत, इ॰ पालण्याचें वि॰

बुचू, पु॰ कौं॰ डोण, इ॰ कांचें भोंकाचें प्रतिबंधार्थ चिरगुट, तृण, इ॰ कांचा जो दट्टा मारितात तो.

बुजकणें, न॰ बुजगावणें.

बुजगवणें, बुजगावणें, न॰ पशु, पक्षी, इ॰ कांनीं भ्यावें म्हणून शेत, इ॰ कांचाठायीं केलें असतें जें तृणादिकांचें मनुष्य, सिंह, इ॰ कांचें बाहुलें किं॰ ज्याला स्पर्श होतांच भयंकर शब्द व्हावा, इ॰ रूप यंत्रादिक जें कांहींएक करितात तें; २, ला॰ प्रसंग पडला असतां चोरादिकांचा पराभव करण्याचें सामर्थ्य आंत नसतांही ज्याला बाह्याकारावरूनच ते चोरादिक भीत असावे असें जें कांहीं वस्तु, क्रिया, इ॰ तें; उ॰ यारेनें चोराची गांठ पडली असतांही तरवार उपयोगी पडेलसें प्रमाण नाहीं पण बुजगावणें आहे म्हणून बाळगावी.

बुजट, ३ लिं॰ बुजण्याचा स्वभाव ज्याचा तो.

बुजणें, अपूर्व पदार्थास भयकरी असें मानून भयचकित होणें; २, कोणएक छिद्र भरलें जाणें किं॰ भरे असें करणें.

बुजबुजाट, पु॰ बुचबुचाट.
बुजरा, ३ लिं॰ बुजट.
बुजवणी, स्त्री॰ दुसरा बुजला जाई असाजो शब्दादि व्यापार तो.
बुजावणें, न॰ बुजगावणें.
बुजीर, ३ लिं॰ बुजट.
बुजू, पु॰ कों॰ बुबू.
बुझट, ३ लिं॰ बुजट.
बुझणें, बुजणें.
बुटकण, बुटकन, बुटकर, बुटदिनीं, बुटदिशीं, अ॰ अनु॰ जलादिकांत पाषाणादिक त्वरेनें बुडणें किं॰ त्यापासून बाहेर निघणें, इ॰कांचें वि॰
बुटका, ३ लिं॰ संप्रदायापेक्षां आंखुडजो लेखणी, काठी, हात, पाय, बोट, इ॰ पदार्थ तो.
बुटकुला, ३ लिं॰ घागर, इ॰ पात्र लघुत्वविशिष्टअसतां निंदेनें त्यास ह्म॰
बुटकुलें, न॰ बुडकुलें.
बुटकुळी, स्त्री॰ बुचकळी.
बुटटकी, स्त्री॰ वा॰ फुत्तारी.
बुटबुटीत, ३ लिं॰ वा॰ चांगला शिजला नाहीं ह्मणून सरसरीतजो भात, इ॰ पदार्थ तो.
बुटबूट, स्त्री॰ अ॰ पुटपूट.
बुटा, पु॰ कों॰ बूट द्वितीयार्थीं.
बुटारणा, ३ लिं॰ बुजट.
बुटी, स्त्री॰ वस्त्रादिकांवर रंगादिकानें जी पुष्प, पर्ण, फल, इ॰कांचीं चिन्हें केलीं असतात ती; २, विलक्षण गुणाधायक कोणकापाशीं गुप्त असलेलें कांहीं औषध ती; ३, प्रसंगीं त्यात्या व्यवहाराचा निर्वाहाविषयीं उपयुक्त असें आपल्यापाशीं असतेंजें विद्यारूप किं॰ द्रव्यरूप साहित्य त्यास ह्म॰
बुटीदार, ३ लिं॰ बुटीनें युक्तजें वस्त्रादिक तो.
बुटें, न॰ गाड्याचे कण्यावरजें लांकूड बसवितात तें.
बुटेदार, ३ लिं॰ बुटीदार.
बुट्टा, पु॰ बूट द्वितीयार्थीं.
बुट्टी, स्त्री॰ बुटी.
बुट्टीदार, ३ लिं॰ बुटीदार.
बुट्टेदार, ३ लिं॰ बुटेदार.
बुंठण, न॰ थोंटण.
बुंठा, ३ लिं॰ थोंटा.
बुडकणें, धा॰ डुबणें.
बुडकी, स्त्री॰ उन्हाळ्यांत नदी, ओढा, इ॰कांचेकांठीं मोट, इ॰ लावायाकरितां नद्यादिकांचें पाणी येऊनसांचे अशीजी खळी खणितात ती; २, बुडी.
बुडकुला, पु॰ रा॰ शेरभर स्कमार पाणी, इ॰ मावायाजोगें जें मृत्तिकेचें पात्र तो.
बुडकुली, स्त्री॰ रा॰ लहानजो बुडकुला ती.
बुडकुलें, न॰ बुडकुला आणि बुडकुली यांचें सामान्य नाव.
बुडखा, पु॰ वृक्ष, काष्ठ, पर्ण, गोष्ट, इ॰ पदार्थांचें मूल आणि अग्र असेजे दोन प्रांत असतात त्यामध्यें मूलरूप विभाग किं॰ मूळाकडील विभाग तो.

बुडऱ्या, ३लिं० तळचा.

बुडणें, कोणेकानें जलादिकांत अंतर्हित होणें; २, ला० विद्या, व्यापार, देणें, घेणें, दुःख, विषय, इ०कांनीं केवळ कोणेकानें व्यापलें जाणें; ३, द्रव्य, धान्य, इ०कानीं हानीतें पावणें किं० तन्मूलकजी अपकर्षदशा तद्विशिष्ट मनुष्य, देश, इ०कानें होणें; उ० यंदा अवर्षामुळें शेतें बुडालीं ह्मणून मीच बुडालों असें नाहीं सारादेश बुडाला; ४, चिंतित उद्योगादि केलें असतां लब्ध होईल किं० सफल होईल अशाप्रकारें संभावित जो अर्थ त्याणें त्या उद्योगाद्यभावामुळें लब्ध किं० सफल नहोतां फुकट जाणें; उ० समयास जर तुह्मी तेथें पोहचलां नाहीं तर तिकडील दक्षणा बुडेल आणि घरचा कामाचा दिवसही बुडेल; ५, पूर्वी व्यवहारांत चालत होता जो नाणें, ग्रंथ, धर्म, रीत, इ० त्यांची व्यवहार्यता नाहीशी होणें किं० तन्मूलक त्या रुपया, इ०कानीं अव्यवहार्यता पावणें; उ० रुपया कांहीं पाण्यांत बुडवावा लागत नाहीं त्याची चाल बुडाली ह्मणजे रुपया बुडतो; दिवस बुडणें, इ०स्थलीं मावळणें; ह्म० चढेल तो पडेल, पोंहेल तो बुडेल.

बुडता, ३लिं० ग्रा० शिजावा, तळावा, भिजावा इत्याद्यर्थ आंत घातला भाजी, फळें, इ०पदार्थ तो बुडे इतका जो पाणी, तूप, दूध, इ०पदार्थ तो; पक्षीं फलादिकांचेंही वि०

बुडताकाळ, पु० संपत्यादिकांचा उत्तरोत्तर अपकर्ष होण्यास कारण जो काळ तो.

बुडतापाया, पु० बुडत्या काळाची जी आरंभावस्था तो.

बुडबुडणें, पुटपुटणें.

बुडबुडा, पु० उदक, दूध, इ० सद्रवपदार्थांचा मौक्तिकाकार फोकळ जो क्षणिकविकार विशेष होतो तो.

बुडबूड, स्त्री० अ० पुटपूट.

बुडला, ३लिं० ग्रा० बुडचा

बुडवणी, ३लिं० वा० दोरी न लागतां हातानेंच काढायाजोगें जें पाणी तें व त्याचा आशय.

बुडवण्या, ३लिं० वा० व्यवहारादिकामध्यें आपण बुडवून दुसऱ्यास बुडविण्याचा स्वभाव ज्याचा तो.

बुडव्या, ३लिं० बुडवण्या.

बुडस्थळ, न० जेथें व्यवहार कर्ता बुडेल अशी संभावना असते असा जो कांहीं व्यवहारांश त्यास ह्म०; उ० समुद्रांतील व्यवहार हें मोठें बुडस्थळ आहे शहाण्यामाणसानें करूं नये; २, कांहीं व्यवहार बुडाल्यामुळें त्याव्यवहारकर्त्यास जी बुडालेपणारूप दुष्टअवस्था प्राप्त होते ती; उ० यंदा घरीं बसलों त्यामुळें चोहोंकडून बुडस्थळ झालें.

बुडी, स्त्री० उदकादिकांचाठायीं प्रा० बुद्धिपूर्वक बुडण्याचा व्यापार ती; मारणें धातूचेयोगीं प्र०; याणें चारघटका बुडी मारली, इ०

ग्यल्यीं बुडीमारून गहिला; रा० शंभर बुड्यामारून गांड कोरडी दारववि णारा ह्म० कोणेक कर्म यथेष्टकरूनही लोकांत अलिप्तपणें वागणारा.

**बुडीं**, अ० तळीं.

**बुडीत**, न० कोणेक व्यवहारीं फलावर दृष्टि न ठेवतां केवळहें बुडालें असा बुडीनें कोणेकास देणें, इ० द्वारा खर्चावें लागतें जें द्रव्यादिक तें; उ० गुह्यागरकरांची मुलगी तुह्मी करणार तर दोनशें रुपये बुडीत द्या आणि तीनशें रुपये कर्ज द्या ह्मणजे घडेल.

**बुडीतकुळ**, न० सावकार, इ०कांचा पैका, इ० फेडण्याविषयीं थकलेलें जें कुळ तें.

**बुडीतखत**, न० ज्याचे रुपये, इ० उगवतीलच अशी संभावना होत नाहीं असें जें कर्जखत तें.

**बुडीतखर्च**, पु० ज्याचा मोबदला ऐवज आपल्यापाशीं रहात नाहीं असा जो विवाहादि व्यवहारांगत्वेंकरून होतो खर्च तो किं० ज्यापासून कालांतरीं कांहीं फल होईल तर होऊ परंतु प्रस्तुत कांहीं फलसंबंध दिसत नाहीं अतएव हें बुडालें असें समजून कोणेकव्यवहाराच्या उद्देशें करितात जो खर्च तो; उ० लग्नास हजार रुपये लागले त्यांत पांचशें रुपयांचे मुलीवर दागीनें आहेत बाकी पांचशें रुपयेमात्र बुडीतखर्च झाला; एथें शेतपाडीत ह्मटलें तर अर्धी दोनहजार रुपये केवळ बुडीतखर्च केला पाहिजे तेव्हां बांधघालण्याचे योग्यतेस येईल; २, व्यवहारांत बुडालें ह्मणून खर्ची लिहितात जें द्रव्यादिक तो.

**बुडीतखातें**, न० बुडीत कुळांचें जें खातें तें.

**बुडील**, ३लिं० रा० बुडत्या.

**बुडूख**, न० बुडखा.

**बुणगी**, स्त्री० सजगुऱ्याचे दाण्यावर जें टोपण असतें ती.

**बुणगें**, न० बाजारबुणगें प्रथमार्थी.

**बुतारा**, पु० कों० थोर केरसुणी.

**बुतारी**, स्त्री० कों० केरसुणी.

**बुंद**, पु० एक औषधीचें फल आहे; २, बिंदु प्रथमार्थी; ३, ३लिं० लालपणाचा अतिशय वर्णनीय असतां हें विशेषण; उ० ह्या पागोट्याचा रंग लालबुंद आहे; ४, पदार्थाचा नामीपणा वर्णनीय असतां हें वि०; उ० हें अक्षर कसें बुंद आहे.

**बुदकणें**, कों० बुकलणें.

**बुदका**, पु० कोणाएकास मोठ्यानीं मारली जी बुकी तो.

**बुंदकी**, स्त्री० वस्त्रादिकांवर बारीक असतें जें रंगादिकांचें बिंदुसारखें चिन्ह ती.

**बुंदडा**, ३लिं० बुंद चतुर्थार्थी.

**बुदबळ**, न० राजा, वजीर, हत्ती, प्यादा, इ० क्रीडासाधन काष्ठादिकांचे पदार्थ केले असतात ते प्र०

**बुंदी**, स्त्री० हरभरा, इ०कांचें पीठ पातळ करून झाऱ्यानें तळणींत त्याचे थेंब पाडून तळून पक्वान्न करितात त्या; प्रा० अनेकवचनांत

चनांत प्र०; बुद्धीचें लाड इ० स्थलीं एक व-चनही दिसतें.

**बुद्द**, स्त्री० बुद्धीचा अपभ्रंश; २, पु० नास्तिक मत प्रवर्तक देव आहे; ३, ३ लिं० जाणला गेलाजो कांहीं अर्थ तो; ४, बोध झालाआहे ज्यास तो.

**बुद्धि**, स्त्री० सं० निश्चयात्मकजी अंतःकरण वृत्ति ती; २, विद्या, कला, लोकव्यवहार, दुसऱ्याचें इंगित, इ० जाणणें, पाठकरणें, न विसरतां धरणें, इ० विषयीं साधनभूतजी अंतःकरणशक्ति ती; बुद्धीचा सागर म्ह० उत्कृष्टजो बुद्धिमान त्यास म्ह०; बुद्धीचा खदक, बुद्धीचा नवसागर, म्ह० विपरीत लक्षणेनें केवळ अप्रबुद्धजो त्यास म्ह०; म्ह० ज्यास बुद्धि नाही त्यास भांडवल नाहीं; शिकिवली बुद्धि आणि बांधली शिदोरी बहुत दिवस पुरत नाहीं; आधिं बुद्धि जात्ये मग वेभव जातें; ३, पदार्थाचा विपर्यास करणसमर्थ हावरा, हा वाईट, हाउंच, हा ठेंगणा, इ०रूप विशेषणविशिष्ट जे अंतःकरणाचे आकार होतात ते प्र० गुणबुद्धि, दोषबुद्धि, कपटबुद्धि, इ० स०; ४, पुण्यपापादि बरें, वाईट, इ० करण्याविषयीं प्रयोजकजो अंतःकरणाचा स्वभाव तो; म्ह० बुद्धीसारखें फळ; ५, कांहीं कर्माचाठायीं प्रवृत्त होण्यास किं० निवृत्त होण्यास प्रयोजक उठत्येजी अंतःकरणवृत्ति ती; उ० कोठाहून माघारें यावें अशी मला नव्हती बुद्धि झाली; ६, कोणेक कार्याचा निर्वाहाविषयीं दुसऱ्याचेसांगीवरून किं० स्वतः विचारानें असें असें याप्रकारें करावें, इ०रूपजें उपाय ज्ञान होतें तें; उ० मागली बुद्धि असेल ती मागावी; बुद्धीचा खोटा म्ह० ज्याची दुष्टबुद्धि तो; बुद्धीशीं वैर करणें म्ह० हें यावेळेस केलें असतां बरें आहे, इ० मनांत आलें असतांही उपेक्षा करणें; कोणेकाचे बुद्धीस लागणें म्ह० त्याचे अनुमतानें वागणें.

**बुद्धिकौशल**, न० तर्कादि करण्याविषयीं बुद्धीचें जें कौशल तें.

**बुद्धिपुरःसर**, अ० सहजगतीनें असें नव्हे अंतःकरणानें तोच उद्देश लक्षून उठविलीजी प्रवर्त्तकवृत्ति तीणेंकरून; उ० बुद्धिपुरःसर पाप केलें आणि सहज घडलें यास अंतर आहे; हे आमचे घरीं येत नाहींम्हणतात म्हणून बुद्धिपुरःसर यांचेघरीं गेलों.

**बुद्धिपूर्वक**, अ० बुद्धिपुरःसर.

**बुद्धिबळ**, न० प्रसंगविशेषीं बुद्धबळास म्ह०

**बुद्धिभेद**, पु० अमुक करावें किं० अमुक करूनये, इ०रूप प्रयत्न झालेल्या बुद्धीच्या कांहीं कारणामुळें होतोजो विपर्यास तो.

**बुद्धिभ्रंश**, पु० कर्तव्या कर्तव्यादि विचार

जिणेंकरून समजतो अर्थात् जी बुद्धि ति-
जपासून काम, लोभ, इ० कारणामुळें होतो
जो मनुष्यादिकांचा भ्रंश तो.

**बुद्धिमंत**, ३ लिं० विद्याकलादि समजणें, इ० विषयीं ज्याची बुद्धि परम निपुण तो.

**बुद्धिमंद**, ३ लिं० जडबुद्धि.

**बुद्धिमान्**, ३ लिं० बुद्धिमंत.

**बुद्धिवंत**, ३ लिं० बुद्धिमंत.

**बुद्धिवाद**, पु० कोणेकास कोणी तूं याप्रकारें असेंअसें कर त्यांत तुझें बरें होईल, इ० रूप कथितो जें बुद्धीविषयीं उपदेशात्मक वाक्य तो.

**बुद्धिवान्**, ३ लिं० बुद्धिमान्.

**बुद्ध्या**, अ० बुद्धिपूर्वक.

**बुद्ध्यारूढ**, ३ लिं० बुद्धीच्याठायीं आरूढ ल० विषयीकृत जो कांहीं अर्थ तो.

**बुद्बुद**, पु० सं० बुडबुडा.

**बुद्रुख**, ३ लिं० विवक्षितसजातीय मंडळीत वयानें थोर, बुद्धीनें प्रौढ, असा जो मनुष्यादिक तो; २, एक प्रांत परगणा, इ० कांत एकानावाचे दोन गांव, दोन शेतें किं० दोन पुरुष, इ० असतां त्यांत जो आगोदरचा किं० मोठा किं० प्रतिष्ठित त्याचें हें वि०

**बुध**, पु० सं० नवग्रहांतील चवथा जो ग्रह तो; २, ज्ञाता.

**बुंध**, न० वृक्ष, तृण, केरसुणी, इ० कांचा मूलरूप विभाग तें; २, कों० पात्रादिकांचा जो तळल्लणून विभाग तें.

**बुधला**, पु० तेल, तूप, इ० पदार्थ ठेवायाकरितां आंवळगळ्याचें मोठें जें चर्मपात्र केलें असतें तो.

**बुधली**, स्त्री० मशाल, इ० कांचें तेल बाळगायासाठीं तोटीलावून चर्माचें किं० धातूचें करितात जें पात्र ती; २, सुगंधि ओषधी तेल, इ० ठेवायाकरितां अंवळगळ्याचें केवळ लहान जें चर्मपात्र करितात ती; ल० तोंडी तीळ आणि गांडीस बुधली.

**बुधलें**, न० बुधला.

**बुधवार**, पु० सातांवारांतील चौथा.

**बुधवारणें**, ल० शनीनें बुधवारीं विणें.

**बुंधा**, पु० वृक्षादिकांचा बुडख्याकडील जो विभाग तो.

**बुंधारणें**, कों० केरसुणीचे बुंध्यानें पोर. इ० कांस मारणें.

**बुंधारा**, पु० बुंधा.

**बुधाष्टमी**, स्त्री० शुक्लपक्षींची जी बुधवारीं अष्टमी ती.

**बुबळ**, न० बुबूळ.

**बुबू**, स्त्री० हिं० यवनजातीय अमीरलोकांचीजी स्त्री ती.

**बुबूळ**, न० नेत्रांतीलजो मांसगोलक तें किं० त्यांतील काळा आणि पांढरा असे जे दोनविभाग ते प्र०

**बुभुक्षा**, स्त्री० सं० क्षुधा.

**बुभुक्षित,** ३लिं० क्षुधित; २, ला० उत्पन्नभक्षी.

**बुरखा,** पु० मराठ, यवन, इ०कांच्या स्त्रिया, इ० गमनादिसमयीं मुखाद्यवयव झांकले जात असें डोईवरून घेतातजें वस्त्राचें प्रावरण, तो; २, पालखी, हत्ती, इ०कांवरचें आच्छादन वस्त्र तो.

**बुरंगट,** न० केवळ बारीकअसून दाटजो पर्जन्य तें.

**बुरंगाळणें,** रा० पोर, इ०कानें मनस्वी वर्तलों असतां मला शिक्षा होईल अशा भयानें अंतःकरणांत धरली असत्ये मर्यादा ती शिक्षकभयाच्या अभावामुळें सोडून मनस्वी होणें.

**बुरंगें,** न०कों० बुरंगट.

**बुरजी,** स्त्री० बुदबळांच्या डावांत सारीं मोहरीं मरून राजामात्र शेष रहतो असेंजें खेळाचें पर्यवसान तें.

**बुरट,** ३लिं० जीस दूध थोडें अथवा जें क्लेश किंवा गाय, इ० तो; २, बुरट.

**बुरट,** न० तृणें लहानलहान झाडें यांचे दाटीनें गच्च झालेलें जें स्थळ तें.

**बुरटाचोर,** पु० केवळ दरोडेखोर नव्हे मनुष्यांची दृष्टिचुकवून निजलेले पाहून हळूच चोरीकरून जाणाराजो चोर तो.

**बुरडी,** ३लिं० बुरडीव

**बुरडीव,** ३लिं० बुरुडानें केलाजो वेळूचा सूप, रोवळी, इ० पदार्थ तो.

**बुरणुशी,** ३लिं० बुरणुसाचाजो जीन, इ० पदार्थ तो.

**बुरणूस,** पु० मेंढ्यांच्या लोंकरेस तंतू नवळितां खळलावून लादूनजें ऊर्णावस्त्र करितात तो.

**बुरदंड,** पु० भुरदंड.

**बुरंबट,** ३लिं० बुरुंबजामध्यें बहुत असेंजें स्थळ तो.

**बुरबुरणें,** ओला बुळबुळीतजो मळ तेणेंकरून दांत, शरीर, भांडें, इ० लिप्त असणें; २, क्रोधादिकामुळें कोणेकानें कुरकुरणें; ३, चा० चिघळणें.

**बुरबूर,** स्त्री० कुरबूर; २, पावसानें बुरंगटपणें पडण्याचा जो प्रकार तो.

**बुरशी,** स्त्री० केनशी.

**बुरसणें,** बुरशीनें युक्त होणें.

**बुरसा,** पु० बुरशी; २, ३लिं० रा० ओंगळ द्वितीय तृतीयार्थी.

**बुरसावणें,** पदार्थ बुरशानें युक्त होणें; उ० तें दह्याचें मडकें बुरसावलें; २, रा० वस्त्र, पात्र, स्थळ, शरीर, शरीरावयव, इ० मळसंबंधानें हिडिस दिसे असें करणें; उ० हा पोर स्नान करतांना आंग चोळावें तें चोळीत नाहीं बुरसावूनमात्र येतो.

**बुरा,** पु० बुरशी.

**बुरासाकर,** स्त्री० साकरेंत एक भेद आहे.

**बुरुंब,** पु० कों० बुरुजप्रथमार्थी.

**बुरुज,** पु० तोफ, इ० ठेवायासाठीं किल्ला, इ०कांची तटबंदी, इ० स्थळीं वर्तुळाकार बांधिल्या

स्त करितात तो; २, ला० तदाकार जो सेनासंन्निवेश तो; ३, पगडडावामध्यें जा एकानें जिंकल्या एकारंगाचा सोंगट्या तो.

**बुरूड**, पु० वेळू, इ०कांचें पाट्या, रूपें, इ०करणारी एक जाति आहे.

**बुरूम**, पु० घट्टपिंडीभूत झालेला असा मृत्तिकाविशेष आहे; २, मनुष्यास तारुण्यआलें म्हणजे सुखावयवयांवर पुळ्या याव्या असा विकृतिविशेष होतो तो; ३, न०रा० त्या पुळ्या प्र०

**बुरेहाल**, पु० हिं० पराकाष्ठेचेंजे हाल ते.

**बुलाख**, पु० हिं० नाकाचा मधलेपडद्यास-छिद्रपाडून जें एकमोती यवन, इ०कोंचा स्त्रिया घालित असतात तो.

**बुली**, स्त्री० लहानमुलाची चोंटकुली; २, ला० तदाकार रूपसुवर्णादिकांचें भूषण मुलाच्ये कमरेस करगोट्यांत बांधावयास करितात ती.

**बुवा**, पु० बाबा.

**बुळक**, स्त्री० बुळकी.

**बुळकट**, ३लिं० बा० तैलादिसंबंधामुळें धरला असतां निसटायाजोगा बुळबुळीत झालेला जो पात्रादिपदार्थ तो.

**बुळकण, बुळकन, बुळकर, बुळदिनी, बुळदिशीं**, अ० अनु० कोणेक आधारापासून आधारबंधाचे शैथिल्यामुळें धक्का, वेग, प्रयत्न, इ०कारणावांचून अचळजें कोणेक पदार्थाचें स्फुरणें त्याचें चि०; उ० खुंटीवर पागोटें ठेवायास गेलों तों बुळकण खुंटीहातांत आली.

**बुळकणें**, अतिसारादिविकृतीमुळें गुदद्वाराचा बंध शिथिलहोऊन बुळकन हगणें; २, रा० सांधा, ग्रंथि, इ० घट्टनबसल्यामुळें बुळकन मोकळें होणें; ३, भोपळा, कोहळा, इ०दगळणें.

**बुळका**, ३लिं० रा० घट्टनव्हे असाजो सांधा, गांठ, गृहादिरचना, इ० तो; २, ला० व्यवस्था, बंदोबस्त, इ०मूलक जें दृढत्व तें ज्यांत नाहीं असाजो कारभार, व्यवहार, वचन, किं० तो कर्त्ता, इ० तो.

**बुळफांडी**, स्त्री० कों० बुळकी.

**बुळकी**, स्त्री० अतिसारादिविकृतीमुळें गुदद्वाराचा आधारबंध शिथिलहोऊन पातळ विष्ठेची धारा लागत्ये ती; २, ला० कणिंग, घागर, इ०कांस छिद्रपडल्यामुळें जी धान्य, जल, इ०कांची धारा लागत्ये तीसह्म०

**बुळबुळाट**, पु० बुळबुळीतपणा.

**बुळबुळावणें**, क्षालन, घर्षण, इ० संस्कारानें स्वच्छकरायाचाजो वस्त्र, पात्र, शरीर, इ० पदार्थ तोतो संस्कार बरवरकेल्यामुळें बुळबुळीत मळानें विशिष्ट करणें.

**बुळबुळीत**, ३लिं० अतिस्निग्ध स्वरूप ज्याचा स्पर्श मृदु ज्याचा भूम्यादिकांवर लेपझाला असतां तेथून हात, पाय, इ० निसरतें असा जो तेल, तूप, शेवाळ, कोरफड, भोंकर, इ० कांचा मगज, इ० तो; २, तेणेंकरून लिप्त जो

जो पात्र, वस्त्र, मार्ग, शरीर, अवयव, स्थल, इ० पदार्थ तो; ३, सामान्यतः नपुंसकीं विशेष्यरूपें प्रयोग करितात. उ० हातांचें बुळबुळीत अद्यापि जात नाहीं.

**बुळबुळ**, स्त्री० बुळबुळाट.

**बुळा**, पु० नपुंसक; २, बुळकाडित्यार्थी.

**बुळी**, स्त्री० गंजीफांतीलजी नादर ती.

**बू**, पु० बाऊ.

**बूच**, पु० बुचू; २, गुडरी.

**बूज**, स्त्री० विद्वान्, इ० जो गुणी किं० शूरादिकजो कर्मकर्ता त्यांची किं० तदीयगुणकर्मांची राजा, धनी, इ० कांजवळ त्याणीं तें गुणादिक जाणून यथायोग्य प्रशंसा पूजादिक करावें अशी असत्येजी मान्यता ती: किं० तादृश प्रशंसादिरूप होतोजो सन्मान ती; २, गंजिफांचे खेळांत लागतातजीं पानें ती; ३, पु० बुचू.

**बूट**, पु० भांगेचाजो पुष्पगुच्छ तो; २, ला० वस्त्रादिकांवरजीं पुष्प, पर्ण, इ० कांची रंगादिनिर्मित अनेकचिन्हें असतात तीं प्र०; ३, अपूर्व चमत्कारिक गोष्ट, श्लोक, वाक्य, कल्पना, स्त्री, इ० जो पदार्थ त्यास म्ह०

**बूड**, न० वृक्ष, पात्र, इ० कांचाजो तळ तें; बूड टेकणें म्ह० गांड टेकणें; २, स्त्री० सावकारी, कृषिकर्म, इ० व्यवहारांत येतोजो तोटा तो.

**बूंद**, पु० बुंद.

**बूर**, पु० अतिश्रमामुळें जो शरीराचा चुराडा तो; पड, निघ, धातूंचे योगीं प्र०; उ० लिहितां लिहितां माझा बूर निघाला.

**बृहत्**, ३ लिं० सं० आकारानें मोठाजो द्रव्यरूप किं० ग्रंथादिरूप पदार्थ तो; २, मोठें ज्याचें शरीर तो; बृहच्छरीर, बृहदुदर, इ० म्ह०

**बृहती**, स्त्री० रिंगणी आणि डोरली त्या प्र०; २, गाडीस म्ह०

**बृहस्पतवार**, पु० बृहस्पतिवाराचा अपभ्रंश.

**बृहस्पति**, पु० नवग्रहांतील पांचवा ग्रह तो; जो देवांचा गुरु आहे; २, ला० उत्कृष्टजो बुद्धिमान् किं० वक्ताजो त्यास उपमा आरोप इ० कानें म्ह०

**बृहस्पतिवार**, पु० गुरुवार.

**बें**, न० शेळी, मेंढी, गोवत्स, इ० कांचा शब्दाचें अनुकरण; बें करणें, म्हणणें, म्ह० अभिमान सोडून मी हरलों असें म्हणणें किं० दाखविणें.

**बे**, ३ लिं० हिं० दोन; परंतु याचा प्रयोग लेखें इ० संख्या व्यवहारांत दिसतो; उ० बे एकें बे; बेवीस, बेचाळीस, इ०; २, अ० वांचून याअर्थी याचा इतरपदाशीं पूर्वी योग होऊन विशिष्टसमास होतो; हा शब्द यवनभाषेतील आहे म्हणून प्रा० यवनी शब्दाशींच योग होतो; उ० बेकैद, बेदर्दी, इ०

**बेअदबी**, स्त्री० धनी, इ० कांशीं मर्यादा सोडून अमर्यादपणें जें वर्तन ती.

**बेइमान, बेइमानी**, ३ लिं० आपलें इमान जाणें सोडलें तो.

**बेइलाज**, पु० ३लिं० हिं० नाइलाज.

**बेक**, न० आपण दुसऱ्यापाशीं बोलतो जो कांहीं अर्थ त्याशीं केवल विरुद्ध किं० असंगत असा जो दुसरा बोलतो किं० करतो जो अर्थ त्यास म्ह०; उ० मी एक म्हटलें असतां तो बेक म्हणणार तो माझे आज्ञेंत कसा चालेल मी सांगितलें एक आणि तूं समजलास बेक त्यास मी काय करूं; अशा एकशब्दघटित वाक्यांतच याचा प्र०

**बेकार**, ३लिं० بیکار धंदा, रोजगार, नाहीं म्हणून घरीं रिकामा बसलेला जो कारकून, शिपाई, इ० तो.

**बेकी**, स्त्री० दोन, चार, सहा, इ० जी समसंख्या ती; इचा प्रयोग एकीबेकीचे खेळांत.

**बेकुबी**, स्त्री० हिं० बेकूबपणा.

**बेकूब**, ३लिं० हिं० वेडझवा.

**बेकैद**, स्त्री० بیقید विरुद्धाचरणानें राज्यादिकानीं स्थापिल्या कैदेचा जो उल्लंघ ती; २, अ० तद्विशिष्ट होई असें बोलणें, वर्तणें, करणें, इ०कांचें वि०

**बेकैदी**, ३लिं० بیقیدی बेकैदीनें विशिष्ट जो मनुष्य, किं० भाषण, इ० तो.

**बेगड**, स्त्री० पिंवळा, तांबडा, इ० रंगाचा धूर देऊन करितात जो कथलाचा वर्ख त्या जातीचें नांव.

**बेगडी**, ३लिं० बेगड लावून सुशोभित केला जो चित्र, मुकुट, जोडा, इ० तो.

**बेगम**, स्त्री० بیگم उपवर होऊन जिचा विवाह झाला नाहीं अशी जे स्त्री ती; २, मोठा प्रतिष्ठित जो मनुष्य त्याची स्त्री हा अर्थ यवनप्रसिद्ध.

**बेगमी**, स्त्री० कोणेक कार्यास निर्वाहक अपेक्षित जी सामग्री तिचा संपन्नतेनें होते जी कार्यास परिपूर्णतारूप दशा जिचे योगानें सामग्री नाहीं आतां कार्य निर्वाह कसा होईल हा काळजी फिटते ती; २, संसारादिकांचे बेगमीविषयीं संपादित जो धान्यादि सामग्री समुदाय ती; उ० वर्षाची बेगमी सहामहिन्यांत खर्च जाली; ३, निश्चिंति; उ० हा एकदां निजला म्हणजे चारप्रहरांची बेगमी.

**बेगार**, स्त्री० हिं० बिगार.

**बेगारी**, पु० हिं० बिगारी.

**बेगीं**, अ० झटकर.

**बेगून**, अ० बेगीं.

**बेचक**, न० स्त्री० हात, पाय, वृक्ष, इ० कांस जेथें बोटें, शाखा, इ० दोन अवयव फुटतात त्यांचा तेथील मधला जो संधिप्रदेश तें ती.

**बेचकुळांत**, अ० काष्ठादि दोन पदार्थांचा जी मिठी त्यांतील जो संधिप्रदेश त्यांत सांपड, धर, इ० धातूंचे योगीं प्र०

**बेचकुळ**, न० बेचक.

**बेचकें**, न० बेळकें.

**बेचरक**, अ० हिं० भय, लज्जा, संशय, इ० रूपजी प्रवृत्तीचे संकोचास कारणें तीं मनांव

नधरितां जाणें, येणें, मारणें, इ०कांचें वि०

बेचव, उलिं० निचव.

बेचागळें, न० बळकें.

बेचाळ, उलिं० संख्या आहे ४२; २, न० गा० बेचाळी.

बेचाळी, स्त्री० चर्वण करण्याचे मुखाचे जे दोनभाग त्यांतील खालचा जो भाग तो.

बेचाळीस, उलिं० बेचाळप्रथमार्थी; २, मातृवंशाकडील एकवीस, आणि पितृवंशाकडील एकवीस, असे बेचाळीस जे पितर त्यांस लक्षून शपथ, गालिप्रदानादिप्रसंगीं विशेष्यावांचूनही प्रयोग करितात; उ० तूं बेचाळीस स्मरून बोल; त्याणें त्याचे बेचाळीस उद्धरले.

बेचाळें, न० बेचाळी.

बेचिराख, अ० بےچراغ वस्ती मोडून दिवा न लागायाजोगी अवस्था होई असें; हो, कर, बुड, इ०कांचें वि०

बेजबाब, अ० بےجواب अमर्याद भाषण करणें, बोलणें, इ०कांचें वि०

बेजबाबी, उलिं० بےجوابی बेजबाबपणें वर्तण्याचा स्वभाव ज्याचा तो.

बेजमी, स्त्री० बेगमी.

बेजरब, अ० हिं० बेचरक.

बेजार, उलिं० بیزار कांहीं दुखणें किं० व्यापार, व्यवहार, इ०संबंधी परिश्रम भोगतां भोगतां पुढें कंठायाविषयीं असमर्थ झाला जो तो.

बेट

बेट, न० ज्याचे भोंवता नदी, समुद्र, तळें, इ० पाण्याचा परिधि असतो असा जो गांव, शेत, इ० व्हायाजोगा किं० तृणादि रुजायाजोगा स्थलविभाग तें; २, ज्या वृक्षादिकांचा मुळ्यांस अंकुर फुटून अनेक वृक्षादिक होतात असे जे केळ, वेळू, दर्भ, इ० त्यांचा एकापासून अनेक व्यक्ति होऊन झालेला जो समुदाय तें.

बेटकुळी, स्त्री० बेडकी.

बेटणें, विवक्षित ठसा खालीं ठेवून, वर पत्रा ठेवून ठशाचा आकार पत्र्यावर उठे असा ठशाशीं पत्रा संबंध करणें.

बेटा, पु० हिं० पुत्र; २, अ० वाक्यालंकारार्थ याचा प्रयोग करितात; जो कर्ता, कर्म, इ० कांशीं हा संबन्ध होतो त्याचे लिंगवचन यास होतें; उ० कारभारी दोन चांगली आहे.

बेटी, स्त्री० हिं० कन्या; म्ह० पहिली बेटी माल्याची पेटी.

बेटींव, उलिं० वेढून केलेला जो मूर्ति, दागिना, इ० तो.

बेट्याचा, अ० बेटा हिच्यायार्थी.

बेड, न० गळूं, इ०जें उठाणें तें; २, वेणी उंच वाढलेली असल्ये तें; ३, काजूचा हिरवे बियेचा मागला जो देठ किं० बेड भोंवत्यांचा मूळचा जो देठ तें; ला० बेड फुटणें किं० बाहेर पडणें, म्ह० गुप्तपणें स्थित जो कांहीएक अर्थ तो प्रसिद्ध होणें.

बेडकी, स्त्री० लहान जो बेडूक तो; २, दंड किं० पोटरी

पोटरी, इ० कांचर आयानझाल्यामुळें जी त- त्काळ उंचवटा उठतो तो; ३, मल्लादिकांचे दंड, पोटरी, यांतजो तालिम खेळण्याच्या योगानें घट्ट मांसगोलक होतो तो.

**बेडकुळी**, स्त्री० बेडकी.

**बेडभोंवरा**, पु० एक वेलीचें फळ आहे.

**बेडभोंवरी**, स्त्री० बेडभोंवऱ्याची वेल

**बेडा**, पु० ग्रा० गेंठा.

**बेडा**, पु० रा० गलबतांची वहिवाट करणारे जे लोक डच, इं० त्यांचें एक प्रतिष्ठित नांव आ- हे; २, अलिं० ज्याचें बेंबीचें बेंड वाढलें आहे त्यास म्ह०

**बेडी**, स्त्री० हिं० बिडी बिडाच्यार्थी.

**बेडूक**, पु० बगून उड्या मारीत देशांतिक्रम करितो असा एक जलाश्रित जंतु आहे.

**बेडें**, न० को० गुरें बांधायाकरितां निराळें जें ग्रह करितात तें; २, ग्रा० चेळें.

**बेडौल**, अलिं० हिं० ज्या पदार्थाचा डौल चांगला नाहीं तो.

**बेढंग**, पु० हिं० सोदेगिरी, इ० जा वाईट चेष्टा तो; प्रा० अनेक वचनांत प्र०; २, बेढंगी.

**बेढंगी**, अलिं० रांडबाजी, इ० बेढंग करितो तो.

**बेढब**, अलिं० बेडौल.

**बेणणी**, स्त्री० बेणण्याचा व्यापार तो.

**बेणणें**, शेत, इ० स्थलांतील अविवक्षितजें तृणादिक तें काढून स्वच्छ करणें.

**बेणा**, अलिं० अदृश्यपणास कारणभूत जें कां- हीं आच्छादन त्यापासून बाहेरून दिसाया जोगा बहिर्भूत झाला जो तो; उ० पाणीं ओ- होटलें म्हणजे खडक बेणा पडतो; २, ग्रा० बेणावला जो तो.

**बेणावणें**, दूरदेशीं गेल्यामुळें किं० इकडेतिक- डे गैरसिल्लेस पडल्यामुळें आहे किं० नाहीं असें वाटायाजोगा झालेला जो मनुष्यादिप- दार्थ त्याणें दिसायाजोगें होणें; उ० संध्या- काळीं माघारा यतों म्हणून गेला तो पंधरा दिवसांनीं बेणावला.

**बेत**, पु० कर्तव्य कार्याचा असें यायाप्रकारें करावें, इ० रूप योजनांत जो आकार तो; उ० मी बेत सांगेन त्याप्रमाणें घर बांध; २, को- णेक कार्याविषयीं अंतःकरणांत झाला असतोजो संकल्प तो; उ० यंदा काशीस जावें असा बेत आहे; ३, कोणेक व्यवहा- राविषयीं व्यवस्थारूप केला असतो जोनि- यम तो; उ० त्याचे घरीं जेवणाखाणाचा बेत चांगला आहे; ४, कर्तव्य कार्याचा आ- कार विवक्षितानुरूप व्हावा म्हणून जी त्या- ची ओंकणी किं० कांडी, इ० द्वारा जें आका- रपरिमाण करितात तो; उ० तुमचे पाया- चा बेत द्या म्हणजे जोडा बांधीन.

**बेतणी**, स्त्री० अंगरखा, चोळी, इ० बेतण्याचा जो व्यापार तो.

**बेतणें**, अंगरखा, चोळी, जोडा, इ० विवक्षि- ताकारांत अंतर नपडावें म्हणून त्यात्यांब- तानें अंकनादिद्वारा अन्वित करणें; २, बि- तणें.

**बेतबात**, पु० कांहींएक कार्याचा बेत, व्यवस्था, इ० तो.

**बेतविणें**, चारवविणें.

**बेताचा**, ३ लिं० व्यवस्थानियमरूप बेत आहे ज्यामध्यें असाजो बोलणें, करणें, इ० व्यापार तो; २, विवक्षितकार्याचे बेतास उतराया जोगा जो पदार्थ तो.

**बेताल**, ३ लिं० हिं० तालप्रमाणाची व्यवस्था ज्यांत नाहीं असेंजें गाणें तो; २, नगें गाणागजो तो; ३, क्षोभादिकारणानें पूर्वप्रकृत्यवस्थारूप मर्यादा रुटून मनस्वी झालाजो मनुष्य, त्याची प्रकृति, घोडा, रोग, इ० तो.

**बेताळीस**, ३ लिं० बेचाळीस.

**बेती**, स्त्री० हिं० दुफांशी सोंगट्यांचा खेळामध्यें दोन फांशांवर तीनतीन पडल्लअसत्तांजो डाव ती.

**बेतींव**, ३ लिं० बेतानें करविलाजो अंगरखा, काम, इ० तो.

**बेत्या**, ३ लिं० उगाच भलतेकार्याचा बेतमात्र करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**बेदडा**, पु० एक मनुष्यांत जाति आहे.

**बेदम**, ३ लिं० بیدم बेजार

**बेंदर**, स्त्री० एक वनस्पति आहे.

**बेदर्दी**, ३ लिं० بیدرد भय संभावना न बाळगतां स्वछंदपणें वागण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**बेदाणा**, पु० हिं० ज्यांत बीं नाहीं अशी द्राक्षांत जाति आहे.

**बेदाणाडाळिंब**, न० ज्या डाळिंबाचे दाण्यांत बीं नाहीं तें.

**बेदाद**, स्त्री० हिं० राज्यादिकांत कोठें दाद लागूं नये असाजो भाव होतो ती; उ० त्याचे राज्यांत बेदाद झाली; २, ३ लिं० तद्विशिष्ट राज्य देशादिक.

**बेदावा**, पु० हिं० कोणेक विषयावर वादी किं० प्रतिवादी यांचे दाव्याचें होतेंजें राहित्य तो.

**बेदावापत्र**, न० यावर भाझा दावा राहिला नाहीं, इ० रूप त्यामालकास पत्र कोणी दावा सांगणारा करून देतो तें.

**बेदिकत**, **बेदिक्कत**, अ० हिं० बिनदिक्कत.

**बेदिल**, ३ लिं० ज्याचें अंतःकरण ठिकाणीं नाहीं असा खिन्नज्ञा तो.

**बेंदूर**, पु० दे० पोळा, ज्यादिवशीं बैलांची पूजा करितात तो.

**बेधडक**, अ० हिं० बेचरक.

**बेनिसबत**, अ० हिं० बेलाशक.

**बेपरवा**, ३ लिं० بےپروا ज्ञो कशाची किं० कोणाची पर्वा बाळगीत नाहीं तो.

**बेफाम**, ३ लिं० بیفام गैरसावध.

**बेफिकीर**, ३ लिं० بیفکر काळजीनें रहित तो.

**बेंबट**, न० मोठा उंच ज्या बेंबीनें किं० नितंबवर्ती साधारण बेंबीसही म्ह०; २, पुष्टची ज्या बेंबीसें.

**बेंबटणें**, स० चांसरूं, इ० कानें भयामुळें बें अरसा शब्द करणें.

**बेबंद**, अलि० بےبند जांत बंदोबस्त नाहीं असेंजें राज्य, कारभार, इ० तो.

**बेबा**, पु० एक अनिश्चितपक्षी आहे.

**बेबाक**, स्त्री० بیباک घेणें, देणें, इ० व्यवहारादिकांची देऊन घेऊन जिकडीलतिकडे उलगडूनजी निःशेषता ती; २, अलि० जिकडीलतिकडे उलगडून निःशेषता झाली ज्याची असाजो देणें, घेणें, इ० व्यापार तो.

**बेबावरणें**, बेवटणें.

**बेंबी**, स्त्री० उदराचेमध्यें जो ग्रंथिरूप अवयव असतो जेथें नाळसंबद्ध असतें ती.

**बेमान**, अलि० بےایمان बेइमान.

**बेमालूम**, अलि० بےمعلوم कोणेक अधिकरणासंबद्ध झालेलें जें चीर, रेषा, इ० काही एक तें नीट करणें, पुरून टाकणें, सांधणें, इ० संस्कारानीं त्याची खूणही राहूनये असें दूर झालेंजें तें रेषादि तो किं० तें अधिकरण तो.

**बेमुरवत**, अ० हिं० मुरवत नधरितां मारणें, जाणें, इ०कांचें वि०

**बेर**, पु० कों० तृणांत एक जाति आहे; २, स्त्री० ग० भूमीस बेरणीचाजो संस्कार तो.

**बेरकट**, न० बेरीनें मिश्रित अतएव दाट बिरवलासारखें झालेलेंजें तेल, तूप, तें.

**बेरकटणें**, समई, तेलाचें भांडें, इ० बेरीचे कराने लिप्त होणें.

**बेरंग**, पु० कथा, पुराण, गोष्ट, लग्नाद्युत्सव, इ०कांत चाललाअसतोजो रंग त्याचा काहीं कारणामुळें होतोजो भंग तो.

**बेरट**, न० बेरकट.

**बेरड**, पु० मनुष्यांत एकजाति आहे; प्रा० जे चोरीकरून उपजीवन पावतात तो.

**बेरणी**, स्त्री० ग० पेरणी, इ० करायाकरितां जमीन बेरण्याचाजो व्यापार तो.

**बेरणें**, एकदां नांगरलेलीजी जमीन तीपुनः आडवी नांगरणें.

**बेरी**, स्त्री० तेल, तूप, यांचे पोटचाजो मळ तो; २, गुळाचाजी मळी ती.

**बेरीज**, स्त्री० अनेक अंकराशी एकत्र मिळविल्यानें विशिष्टसंख्यात्मक सिद्ध होतें जें फळ तो.

**बेरोजगार**, **बेरोजगारी**, पु० बेकार.

**बेरोजा**, पु० रंगाद्युपयोगी पदार्थ आहे.

**बेल**, पु० बिल्व; २, न० बेलफळ.

**बेलकडें**, न० कों० खेकडा.

**बेलका**, पु० वा० दांडा नाहीं ज्यास असाजोओळक तो.

**बेलकाचरी**, स्त्री० बाळबेलाचे काप वाळवून औषधार्थ ठेवितात ती.

**बेलखरूज**, स्त्री० ग० मोठेमोठे फोड येऊन चिघळून मोठीचकंदळें पडतात अशीजीओली खरूज ती.

**बेलगाम**, **बेलगामी**, अलि० हिं० जाण्यायेण्याचे सोईचें नव्हे असें आडवळणीजें ठाण, घर, इ० तो.

**बेलटी**, स्त्री० कों० डोकें; निंदावृत्ति; उ० तूं

लवाड्या करितोस परंतु तुझी बेलटी फोडू न टाकीन.

**बेलटें**, न० कों० नारळ; निंदाहृति; २, बेलटी.

**बेलदार**, पु० हिं० खाण, इ० कोरून दगड आणू न विकून उपजीविका करणारी अशी एक मनुष्यांत जाति आहे.

**बेलपत्रीरुपया**, पु० बिल्वपत्राचें चिन्ह ज्यावर असतें असा अंकुशीरुपयांत भेद आहे.

**बेलफळ**, न० बिल्ववृक्षाचें जें फळ तें; २, तदाकार काष्ठादिकांचें तपकील, इ० ठेवायास करितात जें पात्र तें.

**बेलभंडार**, पु० दिव्य, शपथ, इ० करण्याविषयीं उचलितात जो देवावरील बेल, भंडार, इ० तो; २, तत्पूर्वक जी आण भाक तो.

**बेलवान**, स्त्री० देवाजवळ लावायाच्या वातींत एक भेद आहे.

**बेला**, पु० डह; २, नारळाचें पात्र.

**बेलाग**, ३ लिं० हिं० ज्यावर कोणाकडून लाग चालत नाहीं असा जो दुर्गमकिल्ला, दुःसाध्यगोष्ट, दुरवर्ण, इ० तो.

**बेलापुरीरुपया**, पु० अंकुशीरुपयांत एक भेद आहे.

**बेलाशक**, अ० हिं० बेधडक.

**बेलिया**, पु० एक मोगऱ्यांत भेद आहे; २, तिचीं जीं फुलें तीं; ३, त्याणें सुगंधित केलेल्या तिळांचें काढितात जें तेल तो; ४, त्या फुलाचें अत्तर तो.

**बेली**, स्त्री० नारळ मध्यें फोडिला असतां होतात जीं दोन शकलें त्यांतील खोबरें काढून घेऊन जीं कवचें राहतात तीं प्र०; २.

३ लिं० अनेक रंगाचीं अनेक सूत्रें विणून वस्त्र करण्याचा एक प्रकार आहे त्याप्रकारें वस्त्र विणलें असतां जो वस्त्रावर विचित्र वर्ण उत्पन्न होतो तो; ३, तद्विशिष्ट जें तें लुगडें, इ० वस्त्र तो; याचा स्त्रीलिंगीं लुगड्याविषयीं विशेष्यत्वें करून हा प्र० होतो.

**बेलें**, न० बेला; २, राजादिकांची स्वारी निघाली असतां रुपये, होन, मोहरा, इ० द्रव्य घालून जें पोतें स्वाराबरोबर घेतात तें.

**बेलेबरदार, बेलेबारदार**, पु० हितीयार्थक बेलें वाळगणारा जो मनुष्य तो.

**बेवकूब**, ३ लिं० हिं० बेकूब.

**बेवाडें**, न० कों० गृहास जो मजला देतात त्यास म्ह०

**बेवारसा**, पु० हिं० कोणेक विवक्षितविषयावर कोणेकाचे वारशाचा होतो जो अभाव तो.

**बेवारशी**, ३ लिं० बेवारशीक.

**बेवारशीक**, ३ लिं० ज्या पदार्थावर विवक्षित मनुष्याचा वारसा नाहीं तो पदार्थ.

**बेवारा**, पु० देणें, घेणें, इ० व्यवहाराचा, देणें. घेणें, इ० व्यापारानें जिकडील तिकडे व्यवस्था करून जो उलगडा तो.

**बेवीस**, ३ लिं० संख्या आहे २२.

**बेश**, ३ लिं० विं० वि० विवक्षित गुणयोगानें चांगला तो.

**बेशरवास्ता**, ३लिं० वि०वि० अनिशयितजें बेश तो.

**बेशर्मी**, अ० हिं० सर्कार, इ०कांस कनबालिहून द्यावयाचा असतां मालकाचें नावामागें याचा प्र० होतो; उ० दस्तक बेशर्मी नारायण चौगुले.

**बेशरम**, ३लिं० निर्लज्ज.

**बेशिस्त**, ३लिं० गैरशिस्त.

**बेशुद्ध**, ३लिं० कामक्रोध रोगादिकांची मूर्च्छा, इ०कानें ज्याची शुद्ध गेली आहे तो.

**बेष**, ३लिं० बेश.

**बेषक**, ३लिं० बेशरम.

**बेषरवास्ता**, ३लिं० बेशरवास्ता.

**बेसन**, न० हिं० हरभन्याचें पीठ तें; २, तें तुपांत तळून त्यांत साकर, इ० घालून पक्वान्न करितात तें.

**बेसनेकड**, न० बैल रहाटाचे रुळकुंड्यास जें आडवें लांकूड मारलें असतें तें.

**बेसरम**, ३लिं० बेशरम.

**बेसावध**, ३लिं० गैरसावध.

**बेरुमार**, ३लिं० करावें किंवा, नकरावें किंवा, इ०रूप जो रुमार तो न राखिला अतिरिक्त जें भाषण, भोजन, इ० क्रिया किं० कांहीं गुण, इ० तो.

**बेस्रम, बेश्रम**, ३लिं० बेशरम.

**बेहतनमाल**, पु० बेवारशीक जो माल, इ० तो.

**बेहद, बेहद्द**, स्त्री० हिं० कांहीं एक व्यापार गुण, इ० कांचा हद्द रुद्दून जी पराकाष्ठा तो; पक्षीं पराकाष्ठाशब्दाप्रमाणेंच क्रियाविशेषणही होतें; उ० बेहद्द पाऊस पडला.

**बेहंबी**, स्त्री० कोंवळ्या अंब्याचा केन्या काढून खारखून खायासाठीं खारांत घालून ठेवितात त्या प्र०

**बेहया**, ३लिं० अवि०वि० निर्लज्ज.

**बेहडा**, पु० एक वृक्षाचें औषधी फळ आहे; २, हिं० किल्ला, मुलुख, परगणा, गांव, इ० कांची वहिवाट करणारे जे मामलेदार, सुभेदार, इ० त्यांणीं भलतशी वहिवाट करूं नये म्हणून सर्कारांतून अमुक रीतीनें वहिवाट करावी, अमुक शिबंदी राखावी, अमुक इनाम, धर्मादाय चालवावें, अमुक रीतीनें वसूल घ्यांवा, इ० लेखपूर्वक बांधून देतात जो नियम तो; किं० तादृश नियमाचा करितात जो लेख तो; बेहडा पार करणें, होणें, म्ह० पतकरलेलें किं० आरंभलेलें कार्य कसेंहीकरून एकवेळ शेवटास नेणें.

**बेल**, न० रा० अर्धा आणा; २, बीळ द्वितीयार्थी.

**बेळकें**, न० दुबळकें.

**बेळा**, पु० वा० भातांत एक जाति आहे.

**बेळें**, न० कुंपण, गडगा, इ०कांस जाण्यायेण्याची जी वाट ठेविली असल्ये तेथें मनुष्यांस प्रतिबंध नहोतां गुरें, इ०कांस मात्र प्रतिबंध व्हावा म्हणून दुबळकें पुरून किं० आडवीं लाकडें बांधून रचनाविशेषरूप जो प्रतिबंध

**भरडण**, न॰ कों॰ भरडायास घेतलें जें धान्य तें, किं॰ तो व्यापार तें.

**भरडणें**, जात्यानें धान्यादिकांचें केवळ बारीक पीठ न होऊं देतां विवक्षित द्विभाग, त्रिभाग, इ॰ जितपत पाहिजे तितपत दळणें; २, कों॰ ना॰ भरकटणें. कांशा भरडणें म्ह॰ एखाद्याची खरड काढणें.

**भरडा**, पु॰ वडे, उंडे, इ॰ करायासाठीं तांदूळ, डाळी, एकत्र करून भरड दळितात जें पीठ तो; २, कों॰ भरडतृतीयार्थं.

**भरडाव**, पु॰ रा॰ जों पर्यंत राजे, वजीर, किं॰ त्यांचे खालचे हुकूम बहुतकरून पडले नाहींत अशा अवस्थेंतलाजो गंजिफांचा डाव तो; २, बहुतकरून मोहरीं नर्शींचींनर्शींच आहेत अशा अवस्थेंतील जो बुदबळांचा डाव तो.

**भरण**, न॰ भरवण प्रथमार्थं; २, सं॰ अन्नादिकेंकरून कोणाकाचें पोषण तें. कुटुंबभरण इ॰ स॰; ३, धान्यादिकेंकरून पात्रादिकांचें जें पूरण तें, उदरभरण, पात्रभरण, इ॰ स॰; ४, स्त्री॰ वा॰ भर पंचमषष्ठार्थं.

**भरणा**, पु॰ विवक्षित संख्येचें किं॰ परिमाणाचें रुपये इ॰ द्रव्यादिकानें जें पूरण तो; उ॰, सर्कारचे मखल्याचा भरणा झाल्यावर मग वर मिळेल तें वांटून घेऊं; २, सर्कार, दुकान, इ॰ जें व्यवहाराधिकरण त्याचा ठायीं विवक्षित संख्याक रुपये इ॰ द्रव्याचें जें भापण तो, उ॰, तुह्माकडे ऐवज यावयाचा आहे त्याचा शेटजीचे दुकानीं भरणा करून पावती आणून द्या; ३, कोणएक सजातीय अनेक पदार्थांचा जो समुदाय तो; उ॰, यागांवांत ब्राह्मणांचा भरणा भारी आहे; ४, कोणकापाशीं मोहरा होन, भांडीं, पाट, श्लोक, ध्रुपदें, इ॰ एकजातीय पदार्थांचा असतो जो संग्रह तो; उ॰, याहरदासापाशीं ध्रुपदांचा भरणा चांगला आहे.

**भरणी**, स्त्री॰ सत्तावीस नक्षत्रांतील दुसरें जें नक्षत्र तें; २, भर अष्टमार्थं; भरणीचा म्ह॰ बांध. जोतें. इ॰ घालून भरणी टाकून गृहादिक रावयास उंच केलेलें स्थल तो.

**भरणें**, पात्रभूत जो कांहीं पदार्थ त्यांत कांहीं एक पदार्थ समाविष्ट करणें; २, पदार्थांचा समावेश होण्याला जें आदिस्थल तें त्या त्या पदार्थांचे समावेशानें निरवकाश करणें; ३, स्पर्शमात्रें करून चिकटणारा जो तेल, तूप, चिखल, इ॰ सद्रव किं॰ धूळ, काजळ, इ॰ पदार्थ तेणें करून शरीर, भूमि, पात्र, वस्त्र, इ॰ लिप्त करणें किं॰ कोणेकाच्येमतें लिप्त होणें; ४, चित्र, कोष्टक, इ॰ कांत शलाकादिकानें रंग संबद्ध करणें किं॰ सर्कार, सावकार, इ॰ संबंधीं जी कोठी, पोतें, दुकान, इ॰ व्यवहाराधिकरणें त्यांचा ठायीं तत्तद्व्यवहाराचे अनुरोधानें द्यावयाचें जें द्रव्यादिक तें प्रविष्ट करणें; ५, खर्च वेच, नागवणूक, इ॰ झाल्यामुळें होते जी कोणेक अधिकरणीं द्रव्यादिकांची न्यूनता ती आपल्या पदरचें द्रव्यादिक त्या अधिकरणीं घालून पूर्ण करणें या अर्थं पक्षीं द्रव्यादिकास ही कर्मता; ६, कोणेकानें कचित्स्थलीं शिरणें; ७, अंग, धान्य, इ॰ कांतील अंश वृद्धिंगत होऊन पुष्ट होणें; ८, कांहीं एक परिमेय संख्येनें किं॰ परिमाणानें मोजलें असतां कोणेक संख्येशीं किं॰ परिमाणाशीं तुल्य पडणें; उ॰, तांदूळ चार पायली भरले, नारळ शंभर भरले; ९, विवक्षित जें देशकालादि नियतपरिमाण तें त्यातितक्या देशकालाद्यतिक्रमानें पूर्ण होणें; उ॰ महिना भरला म्ह॰ पगार मिळेल या अर्थं कदाचित् सकर्म

कप० ही होतो; उ०, चारदिवस कमी आहेत ते भर मग-
याकरी सोडनियम भरणें इ० स्थळीं त संबंधी कालादि
रूप परिमाण भरणें; १०. पाय, मांड्या, इ० अवयव ब
हुत चालपडणें, ओळवणें. इ० कारणानें उचलाया-
स कठिण पडायाजोगे जड होणें, शस्त्रादिकांची धार
भरणें स० बोळणें, **छतभरणें** स० विवक्षितस्थळीं का
ष्ठादिकानीं निर्मिगे. त्याच, **क्षत**, इ० **भरणें** स० मृत्ति
का. मांस, इ० कानीं बुजणें, **कोणेकाचें भरणें** स० आ
युष्य कि० ऊर्जित दशायांची परममर्यादा होणें, **भरू
नदेणें** स० आपल्या अपराधामुळें दुसऱ्याचें गेलें, न
ष्टझालें, बिघडलें, जें कांहींवस्तू, तें मूल्य, वस्त्वंतरदा
न, इ० द्वारा त्यास देणें, **भरूनपावणें** स० दुसऱ्यापासू
न आपल्यास अवश्य यावयाचें कर्ज, खंडणी, इ० द्र
व्यादि तें त्यापासून आपल्याकडे आल्यामुळें त्याकडे
तद्विषयीं आपला कांहीं संबंध राहिला नाहीं असें आ
पण होणें; **भरलेपायांचा. भरल्यापायांचा भरल्ये
पायांचा**, स्य० यामांतरादिकांपासून बाहेरून आ
लेल्या जो त्याणें पादप्रक्षालन, इकडे तिकडे बसू
न विश्रांति इ० न करितां जसा आला तसाच घरां-
त जाणें, शिरणें, येणें, इ० कांचें वि०; उ० घरांत बा-
ळंतीण आहे, भरलेपायांचा घरांत येऊं नको; **भ-
रलेपायांनीं. भरल्यापायानीं. भरल्येपायानीं**, स०
भरलेल्यापायानीं शिरणें, इ० कांचें वि०; **भरलेपो-
टीं. भरल्यापोटीं. भरल्येपोटीं**. स्य० जेवल्यानें पो-
ट भरलें असतां. कांहीं काम करणें. जाणें. येणें. इ०
कांचें वि०; उ० भरलेपोटीं माझ्यानें काम करवत
नाहीं; **भरलेबंदांत. भरल्याबंदांत भरल्येबंदांत**, स०
**सहस्त्रबंदाखालीं**, स्य० भरलीमूठ सवालक्षाची
स०

स० भरलेपोटां आणि आरेदिसा.

**भरणेवाईक**, ३लिं० विवक्षितवस्तूच्या भरणा ज्याच्या
शीं बहुत आहे तो.

**भरण्याचा**, ३लिं० भरतीचा; २. आपल्यास उपयोगीं
पदार्थांच्या भरणा ज्यापाशीं आहे तो.

**भरतखंड**. न० हिमाचलापासून समुद्रपर्यंत दक्षिणे
कडील जो भूविभाग तें.

**भरतशास्त्र**, न० गावें कसें. नाचावें कसें. अभिनय
कसे कसे करावे. इ० नाट्यविषय ज्या शास्त्रांत आहे
तें शास्त्र.

**भरतशास्त्री**, पु० भरतशास्त्र जाणणारा तो.

**भरताड**, स्त्री० मालभरून आली जी बेल, गलबतें.
इ० कांची खेप ती; २. रा० ज्या पेठ, बंदर, इ० कांकड
स चाललेली जी बेल, गलबतें, इ० कांची खेप ती
त्या पेठ बंदर इ० कांची; ३. कों० रहाटाचे माळेंत भ
रून ओतावयाकरितां वर चाललेलें जें लोटें तें; ४,
रा० भरगत.

**भरती**, स्त्री० चंद्राचे उदयास्तसमयीं समुद्राचे उदका
स जी वृद्धिगतता होत्ये ती; २, आ० दौलत. दुरवणें,
दारिद्र्य, इ० कांची उत्तरोत्तर वृद्धि होत असावी अ-
शी जी दशा ती; ३. भरगत प्रथमद्वितीयार्थ.

**भरतीचा**, ३लिं० जे गुण असावे ते सामर्थ्य नाहींत
सरासरी विवक्षित संख्यापरिमाणादिकांची भर
ती करण्या विषयीं मात्र उपयोगी असा जो कांहीं प
दार्थ तो.

**भरतें**, न० चिरकाल थोडें बहुत अपथ्यसेवन. पा
पाचरण, इ० घडत गेलें असतां रोग, दंड, भय,
इ० उत्पन्न करण्यास प्रयोजकरूप होतें तो पूर्णानु
तानें;

ऊन येतों; २, गृहांत नित्याच्या खर्चीचें पाणी भरून ठेवण्याचा जो व्यापार तो; उ०, चंद्रबाई मला आऊंदे अजून घरांत भराभर करायाची आहे.

भरारणें, भरभरणें; २, पक्ष्यांनी भरकन उडणें; ३, कोणेक कर्तव्याविषयीं हुरहुरणें.

भरारां, अ० भरारां.

भरारी, स्त्री० भर्र शब्द होई असा पक्ष्यांचे उडण्याचा व्यापार तो. मारणें धातु योगीं प्र०.

भरावण, स्त्री० कों० भरावळ.

भरावळ, स्त्री० रा० शेताची भूमि भाजायाकरितां आंत काट, कवळ, तृण, इ० भरायाचा व्यापार तो.

भरित, ३ लिं० सं० जो जेणें करून भरलेला तो त द्वरित; उ०, जलानें जो भरित तो जलभरित, दयाभरित, इ० म० प्र०.

भरीचा, ३ लिं० विवक्षित परिमाण पात्र जेणें करून भरलें जाई इतका जो तांदूळ, इ० पदार्थ तो; २, निमेशिमें भरलेलें जें पात्रादिक तें पूर्ण व्हावयामाठीं अपेक्षित जो अन्यांश तो.

भरीत, न० भरताचा प्रथमार्थ; २, वांगें, पोंसाळें, इ० भाजून किं० शिजवून आंत तिखट, मीठ, दहीं, इ० घालून तोंडिलावायास पदार्थ करितात तें.

भरींव, ३ लिं० ज्याचे पोटीं पोकळी नाहीं असा जो काष्ठ, अलंकार, इ० पदार्थ तो.

भरेकरी, पु० पेठेपेठेचें कापड आणून दुकानदारांस विकीत असतात अशी उदम्यांत एक जाति आहे तो.

भरोभरी, अ० कोणेक पदार्थाशीं मापानें बराबर, पदार्थांतर देणें, घेणें, इ० कांचें वि०; उ०, गहूं दिले आणि भरोभरी तांदूळ घेतले.

भरोंसा, पु० भरंवसा.

भर्जन, न० सं० धान्यादि भाजण्याचा जो व्यापार तें; २, तेणें करून त्या धान्यादिकांवर होतो जो संस्कार तें.

भर्जित, ३ लिं० सं० भर्जन केलें जाचें तो.

भर्ता, पु० सं० पति.

भर्ताड, स्त्री० भरताड.

भर्तार, पु० दादला.

भर्त्सणें, भर्त्सित करणें, प्र० प्रा० ग्रं०.

भर्त्सन, भर्त्सना, न० स्त्री० तूं ह्मणजे पदार्थ काय, तुझानें काय होणार, हो एकीकडे, तोंड दाखऊं नको, इ० हलक्या वाक्यांनी कोणेक मनुष्य, इ० कांचा करितात जो तिरस्कार तें तो.

भर्त्सित, भर्त्सना केली जाची तो.

भऱ्याचा, ३ लिं० दिवस, रात्र, वर्ष, महिना, इ० जे कालविभाग वाचक शब्द त्यांपुढें याचा प्र०.

भऱ्याभरी, अ० रा० अमुक भाताचें अमुक तांदूळ उतरावे असें जें प्रमाण त्याप्रमाणें उतरणें, इ० धातूंचें वि०.

भलतसला, ३ लिं० भलतसा असा जो तो.

भलतसा, ३ लिं० भलते प्रकारचा; २, अ० भलत्या प्रकारें.

भलता, ३ लिं० अमुक अशा रूपें करून विवक्षित नव्हे असा अर्थ त्याचा परामर्शक हा सर्वनाम; उ०, आह्माला अमुकच पदार्थ भोजनास पाहिजेत असें नाहीं भलतें कांहीं असलें तरी चालतें; २, जा

ना गोष्टीचा प्रसंग चालला असतां त्या गोष्टीशीं कांहीं संबंध नाहीं असा निराळाच जो कांहीं अर्थ तो, किं० ज्या अर्थास औचित्य असतें त्याहून केवळ विलक्षण जो अर्थ तो, या अर्थी प्रा० चचा योग असतो; उ०, मी रुपयांची गोष्ट काढली म्हणजे आपण भलतेंच बोलून तें उडवितो; उ०, धनी झाला म्हणून काय भलतेंच बोलावें. तो शब्दापासून जसे तिकडचा, तिकडे, तेवढा, तिथें, इ० शब्द झाले तद्वत् या शब्दापासून ही भलतिकडचा, भलतिकडे, भलतेवढा, भलतिथें, इ० अनेक शब्द होतात तेथें तो शब्दाचा अर्थाचे स्थानी भलता या शब्दाचा अर्थ संबद्ध करून विशिष्ट शब्दाचा अर्थ तद्वत् जाणावा.

**भलतासलता**, ३ लिं० भलता इ० तो.

**भलभलता**, ३ लिं० अनेक प्रकारें करून जो भलता च तो; उ०, सवघांमध्यें योग्य असेल तेंच बोलावें, भलभलतें बोलूं नये.

**भला**, ३ लिं० ज्याचे अंगीं लबाडी नाहीं आणि आपल्यापासून दुसऱ्यास एकाएकीं अपकार होईल देऊं नये अन एव दुसऱ्यानें आपलें वाईट केलें तथापि सोसून रहावें असा स्वभाव ज्याचा तो; २., असा असावा तसा, जेवढा असावा तेवढा, अन एव वाहवा म्हणायाजोगा जो कांहीं अर्थ तो, प्रा० अभिनंदन कर्तव्य असतां प्र०; उ०, त्यावेळेस तुला भलें उत्तर सुचलें; ३, बराया अर्थी क्वचित् ग्रंथादिकांत प्र० होतो; ४, अबूचा, सभ्य रीतीनें वर्तणारा जो तो; उ०, भल्यानें या कामांत पडूं नये.

**भलाइकी, भलाई**, स्त्री० भलायकी.

**भलामाणूस**, पु० अब्रूचा, प्रमाणिक, सभ्यपणें लोकांत वागणारा, जो मनुष्य तो.

**भलायकी**, स्त्री० भलेपणा.

**भलावण**, स्त्री० कोणी कांहीं कार्यार्थ देशांतरीं किं० ग्रामांतरीं जाऊं लागला असतां त्यास कोणी तेथें ज्याजवळ आपली पत असेल त्याजवर ज्याग गरज लागली असतां अमुक पर्यंत किं० मागेल तितका ऐवज देऊन आमचे नांवें त्याहावा असें जें पत्र लिहून देतात तो; २., कोणे काचें कार्य व्हावें म्हणून देतात जें साहित्य पत्र किं० सांगून पाठवितात निरोप त्यास म्ह०; ३, कोणक कार्याची कोणावर असलेली जी भिस्त तो.

**भलावणी**, स्त्री० कों० भलावण प्रथमार्थी वाचून.

**भलीभलाई**, स्त्री० परोपकारादि केल्यामुळें लोकांनी भला भला म्हणावें अशी जी योग्यता येते ती; २., भलीभलाय.

**भलीभलाय**, स्त्री० कों० कोणा एका कडील कुशलतेचें जें वर्तमान तो प्रश्न असतांच प्र०.

**भलीभलायकी**, स्त्री० भलीभलाई.

**भले**, अ० कोणे काचें गाणें इ० कर्म पाहून चित्तास आनंद वाटला असतां तत्प्रशंसार्थ हा उद्गार निघतो; उ० भले मृदंगी भले.

**भलेरी**, स्त्री० कों० शेत नांगरणें किं० रोप उपटणें इ० काम जेव्हां अनेक मिळून करितात तेव्हां तोंडानें भलेर दादा भलेर भाई असा जो शब्द घोष करीत असतात ती; घालणें धातुयोगीं प्र०; २., ज्या० आरंभल्यापासून मध्यें विसावा न घेतां एके दमानें कांहीं एक काम करण्याचा प्रकार तो; ३., कोणका

चे गाणें इ० कसवाचें मर्म नजाणतां उगीचजें भले भले ह्मणणें ती.

**भलेलोक**, पु० राजे, सर्दार, इ० कांचे पदरीं जे मानकरी, शिपाई, इ० लोक असतात ते.

**भव**, पु० जन्ममरणरूप जो संसार तो, भवसागर, भवदुःख, भवबाधा इ० स०; २. उत्पत्ति, देहापासून उत्पत्तिजाची तो देहभवदुःख इ० मनोभवकाम इ० समुद्रभवलवण इ० स०

**भवई**, पु० तमाशा करून उपजीविका करणारे जे गुजराथी लोक ते, प०.

**भँवई**, स्त्री० ग्रा० मनुष्याचे डोळ्यांचे ऊर्ध्वभागीं धनुष्याकार असलेली जी केशपंक्ति ती.

**भँवडणें**, भोंवडणें.

**भँवणें**. भोंवणें.

**भँवता**, अ० भोंवता.

**भँवतालचा**, ३लिं० भोंवतालचा.

**भँवताला**, अ० भोंवताला.

**भवतिनभवति**, स्त्री० कोणे कशास्त्रार्थादिकांचा निर्णय करण्याविषयीं जो परस्पर वादप्रतिवाद होतो ती; काय हो काल तुमची त्यांची भवतिनभवतिचालली होती मग पुढें काय ठरलें.

**भँवतीं**, अ० भोंवतीं.

**भँवरगांव**. पु० न० भोंवरगांव.

**भवन**, न० सं० गृह; २. होण्याचा किं० असण्याचा जो आधार तें.

**भँवरा**, पु० भोंवरा.

**भँवरी**, स्त्री० भोंवरी.

**भँवाडा**, पु० दे० ग्रा० नव्वायाशं.

**भवानी**, स्त्री० पार्वती ह्मणून जी देवी ती; २. बोहणी.

**भवितव्य**, न० अवश्य होणारजें कांहीं एक तें.

**भविष्य**, न० वर्तमानकालाहून उत्तरकालीं होणारजें कांही एक तें; २. तद्विषयीं आपले बुद्धीनें किं० ज्योतिःशास्त्रादि प्रमाणानें असें असें होईल असा कोणी करितो जो सिद्धांत तें; ३. भावी.

**भविष्या**, ३लिं० कों० कोणेक काम आतां करितों ह्मणून सांगावें परंतु महिना, दोनमहिने इ० बहुत काळ गेला तथापि होऊं नये पुनः विचारलें असतां हा नसेंच सांगावें पण लवकर करूं नये अशा स्वभावाचा चेंगट जो मनुष्य तो आणि त्याचा तसा कारभार, बोलणें; इ० तो; २. मागें केलें काय पुढें करायाचें काय इ० जास अवधान रहात नाहीं पदोपदीं अनेक भ्रांति उत्पन्न व्हाव्या अशा स्वभावाचा जो तो.

**भव्य**, ३लिं० पोरकेपणा, हलकेपणा, किरकोळपणा, नदिसतां सुशोभितपणा दिसायाजोगें मोठें आकार परिमाण जाचें असा जो शरीर, वस्त्र, पात्र, गृह, अक्षर, इ० पदार्थ तो.

**भसकण, कन, कर, दिशीं**, अ० अनु० टोंचणें, भोंसकणें, ओतणें, इ० धातूंचें वि० उ० त्याचे पायांत भसदिशीं कांटा भरला.

**भसकणें**, शरीरादिकांत भाला इ० भसकण शिरकविणें.

**भसका**, पु० भिंत, वस्त्र, इ० कांस मोठें पडतें भोंक तें.

**भसकापुरी**, स्त्री० जी भस भशीत वाईट तप कील ती; २, भगवती हितीयार्थं.

**भसकावणें**, शरीर, कूड, इ० कांत शस्त्र, शिंग, इ० घुपसून.

पसून भसक्यानें तें युक्त करणें; २. भसकणें

**भसभशीत**, ३ लिं० ज्याचे अंगीं दमदारपणा नाहीं अ तएव भसाभस उडायाजोगा तपकील इ० चूर्ण तो.

**भसभस**, अ० अनु० धूळ अनेकवार उडणें, रेती, चिखल, इ० कांत पायरुपणें, इ० धातूंचें वि०.

**भसभोंगळ**, ३ लिं० ढिलें जें ओझें, शरीर, कारभार, इ० तो.

**भसरा**, पु० दे० भसरें प्रथमार्थी.

**भसरें**, न० संग्रहणी इ० विकृतीमुळें मुलें इ० कांस अपक्रमळ पडतो तें; २. रा० गळसूत्रांत फोडयाचे, तोंडाचे आंतील भाग कुजावा, इ० रूप उष्णतेनें विकृति होते तें.

**भसाड्या**, ३ लिं० भारी मोठें जें सूत, वस्त्र, अक्षर, इ० तो.

**भसाभस**, अ० अनु० कापणें, फाडणें, फुटणें, तोडणें, तुटणें, इ० कांचें वि० शस्त्रादिकांचे प्रखरतेमुळें - किं० त्यापदार्थाचे अंगीं तादृश दार्ढ्य नाहीं म्हणून विशेष प्रयास न होतां ती ती क्रिया होते अशी वर्णन विवक्षा असतां प्र०; २., भसभस.

**भसाम्यां**, अ० भसाभस.

**भस्म**, न० गोमय, काष्ठ, धातु, पाषाण, इ० सर्व पदार्थ निःशेष अग्नीनें जळला असतां त्याचा पुन्हा जळायाचा नाहीं असा होतो जो परिणाम तें.

**भस्मणें**, कांहीं पदार्थ जळून भस्म होणें.

**भस्मरोग**, पु० कितीही भक्षिलें असतां क्षुधा शांत होतच नाहीं असा एक रोग आहे.

**भस्मरोगी**, ३ लिं० भस्मरोग आहे ज्यास तो.

**भस्मसात्**, अ० करणें, होणें, यांचा योगीं प्र० जाळून भस्मरूप करणें किं० जळून भस्मरूप होणें.

**भस्मस्नान**, न० जळाचा अभाव किं० स्नान करण्याचे शक्तीचा अभाव इ० कारणांमुळें स्नान करावें त्याचे स्थानीं शास्त्रांत सांगितल्या प्रमाणें अंगास जें भस्मलेपन करितात तें.

**भस्मासुर**, पु० एक दैत्य होता; २. ला० ज्याचें करणें अचाट, खाणें बहुत, असा जो मनुष्य त्यास म्ह०.

**भस्मी**, ३ लिं० सोनेरी वर्खाचे बूट ज्यावर असतात असें शेला, पागोटें, इ० वस्त्र तो.

**भस्त्रें**, न० भसरें.

**भळभळ**, अ० अनु० बाहेर पडून वाहण्यास प्रतिबंधक असतें जें कांहीं त्याचा अभाव झाल्यामुळें अकस्मात् बाहेर पडोन रक्त, उदक, इ० कांचें वाहणें, सांडणें, इ० त्याचें वि० किं० तसें नेत्रोदक वाहे असें जें रडणें त्याचें वि०

**भळभळणें**, भरभरणें प्रथमार्थी.

**भळभळां**, अ० भळभळ.

**भळभळीत**, ३ लिं० मोठा भव्य दिसायाजोगा जो वस्त्राचा कांठ किं० तद्विशिष्ट वस्त्र तो; २. भळभळणें दिसायाचा.

**भळ्**, ३ लिं० व्यवहार इ० कांत साधारण युक्तीनें कोणी ठकविलें असतां ठकला जावा असा जो भोळसर तो म०; त्याचे अंगीं वस्त्र, पात्र, धारण करणें इ० विषयीं ठाकठिकी असत नाहीं.

**भक्ष**, पु० जो पदार्थ ज्यास खावयास योग्य तो त्याचा.

**भक्षक**, ३ लिं० भक्षणारा.

**भक्षण**, न० भक्षण्याचा जो व्यापार तें; २. भक्षिलात जें अन्नादिक तें; ३० पशूचें भक्षण गवत, मनुष्याचें भक्षण अन्न.

**भक्षणीय**, ३ लिं० भक्षायास योग्य जो पदार्थ तो.

**भक्षणें**, खाणें.

**भक्षस्थानीं**, अ० पडणें किं० घालणें इ० कोणाचा योगी प्र० अ० कोणें कोणाचें द्रव्यादिक कोणें कार्यें भक्षासारिखें होणें किं० खाणें आपले भक्षासारिखें करणें ह्म० खाऊन टाकणें.

**भक्षित**, ३ लिं० भक्षिलेलो.

**भक्षी**, ३ लिं० जो ज्यानें भक्षितो तो तद्भक्षी; उ०, वायू तें भक्षितो तो वायुभक्षी. अन्नभक्षी. मांसभक्षी, इ० समासीं प्र०.

**भक्ष्य**, ३ लिं० भक्षायास योग्य जो पदार्थ तो; २. न० भक्ष.

**भक्ष्यभोज्य**, न० भक्षायास आणि भोजनास जें योग्य पदार्थ तें.

**भाई**, पु० भाऊ, याचा व्यवहारीं प्रयोग थोडा.

**भाईचारा**, पु० एकामेकानीं एकमेकाचें हित करीत असावें नित्य एकमेकाचें घरीं जात येत असावें असा जो परस्परांचा सख्यभाव चालतो तो.

**भाईचारी**, स्त्री० भाईचारा.

**भाईबंदकी**, **भाईबंदी**, स्त्री० भाऊबंदकी. कोणाकास कांहीं गोष्ट भाईबंदीनें मागणें, विचारणें. इ० ह्मणजे आपलेपणानें हांसीनें दाखवितो याचा पुढा इ० करून मागणें, विचारणें, इ०

**भाईपणा**, पु० बंधुत्व.

**भाईभाई**, अ० भयाभयां.

**भाईराज**, **भाईराय**, पु० बंधुराज.

**भाऊ**, पु० बंधु सख्य सहिता द तृतीयार्थः; २, हें पतिचा नाम आहे हें वडील बंधु इ० कोस व्यवहारांत सन्मानार्थ ह्म० किं० त्यांचे त्यांचे नामापुढें ही याचा योग होतो; उ० हरीभाऊ, बाळाभाऊ.

**भाऊगर्दी**, स्त्री० भाऊसाहेब ह्मणून पेशवे होते त्यांचे पाणिपतचे युद्धांत मोठी गर्दी झाली होती तत्सदृश जी आतां युद्धादि प्रसंगीं मोठी पराकाष्ठेची गर्दी होते तीस ह्म०.

**भाऊपणा**, पु० बंधुत्व.

**भाऊबंद**, पु० बंधुआदिकरून जो दायाद तो

**भाऊबंदकी**, स्त्री० भाऊबंदपणा.

**भाऊबीज**, स्त्री० कार्तिक शुद्ध द्वितीया ज्यादिवशीं बंधु आणि बहिणी परस्परें एकमेकांची वस्त्रालंकारादिकें करून पूजा करीत असतात.

**भाओ**, पु० भाओजी; गोष्टी ह्मणी इ० कोत याचा प्र०

**भाओजी**, पु० पतिचा नाम आहे मेहुणा किं० दीर यास ह्म०.

**भाक**, स्त्री० कांहीं एक कार्याविषयीं कोणाकास दे कार्य मी खचित करीन इ० रूप देतात जें वचन तें.

**भाकड**, ३ लिं० विऊन बहुत दिवस झाल्यामुळें दूध देईना अशी झालेली जी गाय. किं० म्हैस. इ० तो; २. बा० वृद्ध झाली किं० बुढार झाली अशी जी गाय. किं० म्हैस. इ० तो; ३. थोडे दिवस रूप जो प्रतिपदादि तिथि किं० तद्विशिष्ट जो दिवस त्याचें वि०.

**भाकडकथा**, स्त्री० एका कथेचें अनुसंधान चालत असतां मध्यें दुसरी कथा निघते तीस किं० उगाच निरुपयोगी रिकामपणें सांगतात जी गोष्ट त्यांस ह्म०.

**भाकणें**, पुढें होणार जें कांहीं एक तें अमुक अमुक रीतें होईल असें शब्दानें निश्चित करणें, करुणा भाकणें ह्म० दुसऱ्यास करुणा याची ह्म० दीन शब्दें बोलणें.

**कर**, स्त्री० बाजरी, जोंधळे, इ० कांचें पीठ भिजवून त्याचा गोळा थापटून त्याचाच कासारिखा आकार करून तवा इ० कांवर भाजितात ती.

**करखाऊ**, ३ लिं० ज्याचे भोजनांत प्रा० भात असतां ही प्राधान्येंकरून भाकरच असते असा जो कोणी त्यास निंदेनें म्ह०

**करवडव्या**, पु० दुसऱ्याचे घरीं आचारीपणा करून उपजीविका करणारा जो त्यास निंदेनें म्ह०

**ाकरतुकडा**, पु० भाकर, पोळी, वडा, इ० जो भक्ष्य पदार्थ तो.

**ाकरमोडया**, ३ लिं० भाकरखाऊ; २. तुकडमोडया.

**ाकरी**, स्त्री० भाकर.

**ाकीत**, न० भाकून ठेविलेला जो होणार कांहीं एक अर्थ तें.

**ाग**, पु० एका अर्थाचे अनेक जे अंश ते प्र०; २. भाग्याकारानें येतें जें फळ तो; ३. भागण्याचा संस्कार तो, कोणकें गोष्ट भागास येणें म्ह० करण्याविषयीं उचित असणें किं० आळीस येणें; ही गोष्ट करणें भाग आहे इ० म्हटलें उचित आहे असा अर्थ भाग तुटणें म्ह० दुसऱ्याशीं आरंभ जो कांहीं एक व्यवहार तो, कोणत्येतरी एकतडीस जाणें.

**भांग**, पु० स्त्रिया इ० कांचे मस्तकावरचे केश दोहोंकडे सारखे करून मध्यें सारखी काढितात जी रेषा ती; २. समुद्रास उधानाचे दिवस जाऊन कमी पाणी भरण्याची जी अवस्था प्राप्त होत्ये ती; ३. भंग तृतीयार्थः.

**भांगट**, ३ लिं० भंगट.

**भांगटिळा**, पु० भांग नीट नेटका करणें, काजळ कुंकू लावणें, वेणी घालणें, इ० रूप जो व्यापार तो.

**भांगणें**, भाग द्वितीयार्थ युक्त समुद्रानें होणें.

**भागणें**, कोणेक संख्या कानें विवक्षित संख्या स्वपरिमित भाग पडत अशी विभक्त करणें; उ०, चोहोनीं चोवीस भागले असतां सहासहा असे चार विभाग होतात; २. कांहीं एक श्रम केल्यामुळें दमणें; ३. घराची तुळई, आढें, किं० सगळें घर, इ० चिरकाल वर भार असल्यामुळें दबून लागाया जोगें अशक्त होणें; ४. स० उपटणें, काढणें, इ० द्वारा नाहींसें केलें तरीं पुनःपुनः जागीं उत्पन्न होतच असतात असे जे केंस, तृणें, ढेंकूण, इ० त्याणीं कितीएक कालानें पहिल्यासारखी उत्पत्ति न होई असें होणें; ५. विवक्षित द्रव्यानें विवक्षित जो खर्च तो निर्वाहित होणें; उ०, आम्हास पगार येतो इतक्यानें बिगाड खर्च मात्र भागतो; ६. वा० शरीरानें कृश होणें.

**भांगभुरका**, पु० भांग तमाखू, मेवामिठाई, इ० संबंधें अव्यवस्थितपणें जो खर्च तो.

**भांगलणें**, कों० शेत वेणणें; २. स० शेत तृणादिकांनीं भरलें असतें आणि इकडचा काडया तिकडे, तिकडच्या काडया इकडे, झाल्या असतात असें जें शेत तें भांतील तृणादि काढून जिकडच्या तिकडे काडया होत असें करणें.

**भागलीक**, स्त्री० वा० भागवटा.

**भागवटा**, पु० फार श्रम केल्यामुळें शरीरास फार च येतो जो भागलेपणा जेणें करून ज्वरादिक विकृति होत्ये तो.

**भागवणीची गोष्ट**, स्त्री० ग० दमवणीची गोष्ट.

**भागवत**, ३ लिं० भगवत्संबंधी मत संप्रदाय इ० तो; २. पु० त्या मतानें, त्या संप्रदायानें, वागणारा जो मनुष्य तो;

तो; ३, न० अष्टादश पुराणांतील एक पुराण आहे.

**भांगवळ**, स्त्री० कों० भांगोळी.

**भांगसळई**, भांगसळय, स्त्री० स्त्रियांचे मस्तकावरी ल भांग करण्याची एक कांडी इ० कांचीसळई असत्ये ती.

**भांगा**, पु० रा० शेत इ० भूमींतील जो लहान विभाग तो.

**भागाकार**, पु० अंक भागण्याचा जो व्यापार तो; २, ते णें करून येतें जें फल तो.

**भागाळी**, स्त्री० कों० एक अनेक विभाग्यांनीं विभाग करून घेतलेले जे शेत, गृह, इ० कांचे अंश ते प्र०.

**भागिनेय**, पु० सं० बहिणीचा जो पुत्र तो.

**भागिनेयी**, स्त्री० सं० बहिणीची जी कन्या ती.

**भागी**, स्त्री० अनेक मिळून कांहीं एक केला जो व्यापार-त्यामध्यें अनेकांचा अंशतः अंशतः असतो जो संबंध तो; २, पु० भागीदार.

**भागीदार**, पु० जा व्यवहारांत जाची भागी आहे तो त्या व्यवहाराचा किं० ते अनेक व्यवहार करते एकमेकांचे.

**भागीरथी**, स्त्री० सर्वांमध्यें श्रेष्ठ अशी एक महानदी आहे.

**भागीलदार**, पु० कों० भागीदार.

**भागूबाई**, स्त्री० केवळ अपराक्रमी नाकर्ता जो पुरुष त्यास म्ह०.

**भांगेली**, पु० कों० भागीलदार.

**भांगोळी**, स्त्री० कों० स्त्रियांचे कर्णाजवळचे केश प्रा० देशी घालतें समयीं म्ह०.

**भाग्य**, न० दैव; २, ऐश्वर्य. भाग्याचा म्ह० दैववान. भाग्याचा भोपळा म्ह० कपाळकरंट्यास म्ह०. भाग्योदय इ० स०.

**भाग्यपुरुष**, पु० घरचा पुरुष ज्याला कठोर भाषणादिकानें कोणास दुखवायाचा नाहीं, पुण्यशाली, लहानमोठे धर्मकृत्यें ज्याचे हातून बहुत घडतात, असा जो पुण्यात्मा पुरुष त्यास म्ह०.

**भाग्यवंत**, ३ लिं० भाग्य आहे ज्यास तो; उ० भाग्यवंत म्हणूनतया शरण गेले पंढरिराया.

**भाग्यवान्**, ३ लिं० भाग्यवंत.

**भांग्या**, ३ लिं० भंगट.

**भाचरूं**, न० भाचा आणि भाची यांस सामान्यतः म्ह०.

**भाचा**, पु० पुरुषास आपले बहिणीचा मुलगा तो; स्त्रियेस आपले भावाचा किं० आपले नणंदेचा किं० आपले बहिणीचा जो मुलगा तो.

**भाची**, स्त्री० ज्यांचा पुत्र आपला भाचा होतो त्यांची जी कन्या ती.

**भाचेजांवई**, पु० भाचीचा नवरा.

**भाचेसून**, स्त्री० भाचाची जी बायको ती.

**भाजक**, ३ लिं० जा अंकानें कांहीं एक संख्या भागायाची तो अंक.

**भाजकट**, ३ लिं० तांदूळ इ० पदार्थ किंचित भाजल्यामुळें विलक्षण त्याची लागल्ये जी गोडी ती किं० त्याचा वास तो.

**भाजका**, ३ लिं० भाजलेला जो तांदूळ, जमीन, इ० तो.

**भांजगड**, स्त्री० भानगड.

**भांजगडणें**, भानगडणें.

**भाजण**, न० खापर इ० कांत भाजायासाठीं घेतलें जें धान्यादिक तें; २, आणि तो व्यापार; ३, खापरांत भाजायासाठीं एक एक वार घेरितात जें धान्यादिक तें.

**भाजणी**, स्त्री० दोन चार प्रकारचीं धान्यें भाजून मिश्रित

श्रित करून जें पीठ करितात तें.

भाजणी, स्त्री० कोणा एक अंकराशींतून कोण कअं कराशी उणा करण्याचा व्यापार ती परंतु जे अंक-उणें करायाचें तें वर मांडून तिसरी पंगत न मांडितां तेथचें तेथें उणें करून शेष मांडावें असा प्रकार-असतां प्र०; २, ला० समुदायरूपें करून भिन्न जीं कांहीं कामें कांहीं द्रव्यें इ० त्यांचे व्यक्तींच्या अनेक स्थलीं विनियोग करून जी विल्हेवाट ती :उ०. मांड कंड येऊं लागलें तेव्हां दाहा कामें तुंबून राहिलीं होतीं मग एक काम याला एक काम त्याला अशीं चौघांस चार कामें सांगून सरासरी भाजणी केली आणि निपून आलें.

भाजणें, कों० भाजणीनें विशिष्ट करणें.

भाजणें, अग्नींत घालून किं० अग्नीवर तवा, खापर, इ० निरुदक पात्र ठेऊन त्यांत घालून फळ, भाकर, दाणा, इ० पदार्थ पक्क करणें; २, पोळणें, ३, कों० जाळणें ;४, ला० कोणाकास अनेक प्रकारें गांजणें; ५, न० रा० भाजण तृतीयार्थी.

भाजन, न० पात्र. मान-भाजन, सुखभाजन, दुःखभाजन, इ० समास जाणावे; २, अंक भागण्याचा व्यापार तें.

भाजप, न० रा० भाजण प्रथम द्वितीयार्थी.

भाजपी, पु० पोहे, लाह्या, इ० करायासाठीं धान्य भाजितो तो.

भाजपीण, स्त्री० रा० पोहे, लाह्या, इ० भाजणारी जी-स्त्री ती.

भाजपोळ, स्त्री० शेतजमीनीस भाजणें इ० संस्कार करण्याचा व्यापार ती; २, चोर इ० कानीं घरें जाळावीं, मनुष्यांस भाजावें इ० रूप जो व्यापार ती.

भजलेलें, न० भाजून केलेले जें पोहे, पीठ, इ० उपहार पदार्थ तें.

भाजवट, स्त्री० कों० शेत भाजण्याचा व्यापार ती; २, भाजलेली जी भूमि ती.

भाजा, पु० कों० भाजण तृतीयार्थी; २, ग्रं० स्त्री० भार्या.

भाजाणा, पु० कों० खायासाठीं भाजलेला जो हरभरा इ० दाणा तो.

भाजाणी, स्त्री० कों भाजणी.

भाजावळ, स्त्री० कों० शेतभाजण्याचा व्यापार ती; २, भाजून पेरायास सिद्ध केली जी भूमि ती.

भाजित, ३ लिं० कोणेक अंकानें भागला जो अंक तो.

भाजी, स्त्री० भात, भाकर, इ० मुख्य जें अन्न त्यासह वर्तमान रुच्यर्थ भक्षायासाठीं फळ, मूळ, इ० शिजवून त्यांत तिखट, मीठ घालून तोंडिलावणें करितात ती २, तदुपयोगी फळ, पत्र, कंद, मूळ, पुष्प, त्वक्, अंकुर, इ० ती; ३ कों० विटीदांडूचे खेळांत एक शब्द आहे, तुझी भाजी कोर्ची या वाक्याचा प्रयोग नावडतीचें मीठ अळणी या प्रयोगासारखा दिसतो.

भाजीपाला, पु० फळभाजी, पालेभाजी, इत्यादिक, त्याचें बोलणें भाजीपाला स० त्यांत कांहीं एक ऐवज नाहीं असा अर्थ.

भाज्य, न० भाजकानें भागायाचा जो अंक तो.

भाट, पु० गजादिकोंचा स्तुति करून उदरनिर्वाह करणारी एक जाति आहे; २, न० कों० शेतजमीनीचे आसपास सपाट उंच वट्याची जी जमीन असते

त्ये जथें पाणी ठरत नाहीं आणि शेत नाहीं चांगलें होत नाहीं तें: ३, स्त्री० न० नदी, समुद्र, इ० कांत जो सपाट उंचवट प्रदेश असतो तो कदाचित् ओहोटी इ० कानें पाणी कमी झालें असतां उघडा पडतो तें.

भाटजांबूळ, भाटजांभूळ, स्त्री० एक औषधी झाड आहे.

भाटलें, न० रा० डोंगरवट जमीनींत सपाट दोन विघे, चार विघे, समार जो भूविभाग असतो तें.

भाटवळ, ३ लिं० कों० जेथें भाटें बहुत अशी जे जमीन तो.

भाटी, स्त्री० कों० समुद्रादिकांतील जें भाट ती: २, खाडी, नदी, इ० कांचे कांठची चांगली, दमदार, ऊस इ० जिचेवर व्हावयाजोगी जी जमीन ती: ३, मार्जार जातीय जी स्त्री ती.

भाटया, पु० गुजराथ्यांत एक जाति आहे.

भाड, स्त्री० कोणी आपली बहीण, बायको, इ० किं० विकत घेतलेली, बाळगलेली, अशी जी स्त्री ती दुसऱ्यास मैथुनार्थ देऊन त्यापासून घेतात जें द्रव्य तो.

भांड, पु० पश्वादिकांचे शब्दांचें अनुकरण करणें, नकला करणारा, इ० कला करून उपजीविका करणारी एक जाति आहे: २, कज्जेदलाल. म्ह० रांड भांड, ह्मसा, विघडे तो होय केसा.

भांड, न० सं० भांडें यथमार्थ.

भांडकुडाळें, न० दे० थाळीपीठ.

भाडकन, कन, कर, दिन, दिनी, दिशीं, अ० अनु० शब्द होई असें तोंडावर मारणें. वृक्षादिकांनें कि० वृक्षादिकांवरून फलादिकानें पडणें इ० कांचें वि०; २, करावें, न करावें, कसें करावें, काय करावें, इ० विलंब न लावितां तत्काल बोलणें, करणें, सांगणें, इ० कांचें वि०

भाडखाऊ, ३ लिं० भाडखातो तो.

भांडखोर, ३ लिं० भांडण्याचा स्वभाव ज्याचा तो.

भांडगा, ३ लिं० भांडखोर.

भांडण, न० कलह.

भांडणें, कलह करणें.

भाडभीड, स्त्री० भीडभाड.

भांडरा, ३ लिं० भांडखोर.

भांडवल, न० सावकारी, इ० व्यवहारास साधन लेंकरून त्या त्या व्यवहारकर्त्यानें योजिलें असतें जें द्रव्यादिक तें: २, ला० वादयुद्धादिप्रसंगीं त्या त्या व्यवहाराचे निर्वाहास साधनभूत आपले संग्रहास असतें जें लेखपत्र, श्लोकवाक्य, बुद्धीची कल्पना, दारूगोळा, इ० तें.

भांडागार, न० भांडार.

भांडार, न० श्रीमंत लोकांचें द्रव्यादिसंग्रहाचें जें गृह तें.

भांडारगृह, न० भांडार.

भांडारी, पु० भांडारावर जो अधिकारी केला असतो तो.

भांडें, न० धातु, मृत्तिका, काष्ठ, पाषाण, इ० कांचें जें पंचपात्र, मडकें, पडगा, द्रोण, इ० पात्र तें: २, तोफ: ३, कांहींएक विकृतीनें योनिद्वारा मांसगोळक बाहेर येतो तें.

भाडें, न० दुसऱ्याचें घर, भूमि, इ० कांचा उपभोग करीत

करीत असतां तन्निमित्त जें त्याधन्यास द्रव्य द्यावें लागतें तें; २, कांहीं माल, मनुष्य, इ० घोडें, मनुष्य, बैल, इ० कानीं वाहून ग्रामांतरादि स्थलांतरीं पोंहोचऊन जें द्रव्य घेतात तें; ३. तसें भाडें कबूल करून माल, मनुष्य, इ० स्थलांतरीं पोंहचविण्याचें पतकरून घेतात जें काम तें.

भाडेकरी, पु० घोडें, बैल, इ० कानें दुसऱ्याचा माल किं० मनुष्य, स्थलांतरीं पोंहचविण्याचें भाडें पतकरितो जो मनुष्य तो; २. पु० न० दुसऱ्याचें गृहादिस्थलांत भाडें कबूल करून राहिला जो कोणी तो; ३. ला० कोणेक व्यवहारांत जाणें कष्टमात्र करावें परंतु फलोपभोग कर्ता किं० धनी दुसरा असतो असा जो त्यास ह्म०.

भाडोत्री, पु० भाडेकरी हिती याथे॰.

भाण, पु० न० नाटकासारखी एक काव्यांत जाति आहे.

भाणवशी, स्त्री० रा० एके लोचफलीस चारपाय लावून ताक इ० कांचीं भांडीं ठेवायास साधन केलें असतें तो.

भाणवसा, पु० भानवसा.

भांत, स्त्री० बोलणें, चालणें, इ० व्यवहाराचा किं० कांहीं द्रव्याचा भेद को प्रकार तो; भांतीभांतीनीं बोलणें, छळणें, इ० ह्म० अनेक युक्तींनीं अनेक प्रकारानीं कडोविकडीनें बोलणें इ०; २. रा० फार दाट उंच वाढलेलें, जून झालेलें जें कुसळाचें गवत तो, पण तें जेथें रुजलें तेथें तसेंच असतांप्र०

भात, न० शालिधान्य; २, पु० तांदूळ शिजवून करितात जो भोज्य पदार्थ तो.

भातकण, न० पु० साळीचा एक दाणा.

भातकोंडेतांदूळ, पु० ग० भात कांडून मध्यः केलेले जे तांदूळ ते.

भातकुली, स्त्री० लाहान मुली क्रीडार्थ स्वैंपाक करितात ती.

भातकूण, पु० ग० भातकण.

भातकें, न० रा० विवाहामध्यें नवरीकडून फराळाचें सामान नवऱ्याकडे नेतात तें.

भातखाऊ, ३ लिं० भातच जामध्यें प्रधान असें नित्यें भोजन करणारे जे त्यास प्राधान्येंकरून भाकर खाणारे जे ते उपहासानें ह्म०.

भातगोटा, पु० भातकण.

भातभोंकण्या, ३ लिं० भातखाऊ, ह्म० भोंकणें आणि भात भोंकणें.

भातभोंक्या, ३ लिं० भातखाऊ.

भातवडीरुपया, पु० अंकुशी रुपयांत एक भेद आहे.

भातशेत, न० ग० भात करायाजोगें जें शेत तें; २, भात पेरून केलें जें शेत तें.

भातशेती, ३ लिं० भातशेतसंबंधी जो जमीन, वसूल, लोक, इ० तो.

भातळ, ३ लिं० कों० जेथें भात पुष्कळ पिकतें अशी जी भातांची करडजमीन इ०

भाता, पु० लोहार, सोनार, इ० कांचें अग्नीस वारा घालायाचें एक चर्माचें यंत्र आहे; २, तीरखाकमायाचें शिपाई लोकांचें चर्मपात्र आहे तो; ३. शिपाई लोक इ० भांडें कुंडे इ० वाटचा सरंजाम वाळगायाकरितां जी कातड्याची पिशवी वाळगितात तो.

४, भाजल्यामुळें जो शरीरावरचा कळपा निघतो तो.

भाँतीभाँतीं, अ० भांतीभांतीं.

भाँतीभाँतीचा, ३लिं० पत्रीप्रकारचा.

भातुकली, स्त्री० भातकुली.

भातुकें, न०ग०भोजनाहून इतर पोह, पोहे, लाडू, मेवा, मिठाई, इ० भक्ष्य मुलें इ० भक्षितात तें; उ०, सहस्त्रखंडीनरमांसकाचें हें भातुकें नित्य दशग्रिवाचें.

भातें, न० दरमहा करून देविलेला जो चाकर इ० त्यास दूरदेशीं जाणें इ० कांहीं जड काम करायाचें असतां पोटासाठीं रोजमुऱ्याहून अधिक जें द्रव्य देतात तें; २, सावकार, सर्कार, इ० संबंधी मनुष्य आपल्याकडे कांहीं कामाकरितां आला असतां त्याचा आपल्याकडून खोळंबा झाला इ० कारणामुळें जें त्यास पोटास देतात तें; ३, चांकेरी इ० कितीएक औषधांचे कंदांस हें नाव आहे; ४, कों० उरीं फुटलेल्या माणसास किंवा गुरास पाजायासाठीं एक औषध करितात तें.

भातेण, न० भाताचें तृण तें.

भाँतीभाँतीं, अ० नहेनहेनें बोलणें, करणें, इ० धातूचें वि०.

भाल्या, पु० भाता प्रथमार्थ २.

भाल्याण, भालेण, न०ग० भातेण.

भादरणी, स्त्री० भादरण्याचा व्यापार ती.

भादरणें, चर्मावरील किं० केस इ० कांचे अंगावरील केश किं० मचेजी इ० कांचें अंगावर विणतांना राहतात जे सूत्रांश ते वस्त्रा, छुरी, इ० कानें अंगाबरोबर कापणें, पक्षीं त्याच मोदिकांस कर्मता; २, हजामत करणें या अर्थी डोकी भादरणें, केश भादरणें, इ० प्र० निंदार्थ पसरीं करितात.

भादवड, स्त्री० भाद्रपदसंबंधी जो काल ती; उ० भादवडींत वांसे तोडले ह्म० लागत नाहींत.

भादवडीचा, ३लिं० भादवडींत तोडलेला जो वांसा, इ० काष्ट, तो.

भादवा, पु० भाद्रपद.

भादवातीळ, पु० भादव्यामध्यें पिकतो अशा तिळांनएक जाति आहे.

भादवी, ३लिं० भादवडीचा; २, भाद्रपदसंबंधी जी तिथि इ० ती.

भादा, ३लिं० कों० बडविलेला असा जो टोणगा, बैल, इ० तो; २, एकदोनवार प्रसून होऊन निगावलेला केवळ नव्यानेंच प्रसवलेला असा नव्हे जो गोमहिष्यादि जीव तो.

भाद्या, ३लिं० भादा.

भाद्रपद, पु० चैत्रादि बारामासांतील जो साहवा मास तो.

भाद्रपदा, भाद्रपदी, ३लिं० भाद्रपदसंबंधी जी तिथि, वार, इ० ती.

भान, न० अंतःकरणाची जागृतपणें जी स्थिति जेणें करून देहास विषयसंबंधादि झालेले समजतें तें; २, जिचायोगानें तत्तत्समयीं जें जें करायाचें जें जें न करायाचें तें तत्तद्रूपें करून स्फुरतें अशी जी ज्ञानवृत्ति तें; उ०, तुह्माशीं बोलतां बोलतां घरीं भोजनास जाण्याचें भान

हीं त्याचे योगानें भारवाहकासारखें आपलें मनथ कनें, दबतें. तत्वरतंत्र असतें, ह्मणून त्या व्यवहारादिकांस भारविशिष्ट पाषाणादि पदार्थासारिखें मानून तत्संबंधी भार असें ह्मणतात आणि त्या व्यवहारादिकांस ही भारत्वेंकरून व्यवहार करितात;५, रुपयाचें वजनाइतकें जें वजन तो: उ०, हीचांदी पंचवीसभार आहे: ६, भारप्रमाणत्वेंकरून विवक्षित जो पैसा, दबू, दगड, इ० कांहीं एक तत्तुल्य भार जो कोणेक पदार्थ तो तद्भार; उ० पैसाभार लोणी आणि दबूभारसाखर प्रतिदिवशीं खात आ; ७, सं० तुलाह्मणून एक उन्मान आहे त्याचें-वीसपट जें उन्मान तो.

भारकस, पु० उंट, हत्ती, इ० कांवर ओझें कसणें एतदर्थ केला असतो जो मोठा सोल तो.

भारंग, स्त्री० भार्ङ्गीशब्दाचा अपभ्रंश.

भारंगमूळ, न० भारंगीचें जें मूळ तें.

भारंगी, स्त्री० भारंग.

भारणी, स्त्री० भारण्याचा जो व्यापार तो सर्पादिकांवर भारणी टाकणें ह्म० मंत्रप्रयोगकरणें.

भारणें, शाबरादिमंत्रानें अक्षता, पाणी, शस्त्र, इ० कांहीं एक अभिमंत्रित करणें: २, मंत्रफलजें मोहवशता इ० तेणें करून कोणेकास अभिसंबद्ध करणें: ३, ला० आपल्या तंत्राबाहेर नवर्ते असें कोणेकानें गुप्तरूपें भयलाभादिविषयक कांहीं कानमंत्र करून स्ववश करून ठेवणें.

भारत, न० एक इतिहासरूप व्यासकृत ग्रंथ आहे २, ला० लांबचलांब जी प्रपंचादिविषयक कोणेक गोष्ट तीस ह्म०

भारती, स्त्री० वाणी; २, वाणीचा अभिमानिनी देवता जी सरस्वती ती: ३, पु० दशविधगोसाव्यांत एक भेद आहे.

भारतीवीर, पु० ला० मोठा कीर्तिमान् आणि युद्धांत कधीं ही पराङ्मुख व्हावयाचा नाहीं असा जो वीर तो.

भारदस्त, ३लिं० वजनदार जो मनुष्य तो किं० त्याचें भाषण इ० तो.

भारदस्ती, स्त्री० भारदस्तपणा; २, भारदस्तास-ह्म०

भारद्वाज, पु० कुकुडकुंभा ह्मणून एक पक्षी आहे तो.

भारंभार, ३लिं० विवक्षितवजनाशीं जो तुल्य तो: उ०, हे रुपये यावे आणि भारंभार चांदी घ्यावी: भाझे तोळ्याचे भारंभार तुझा तोळा आहे.

भारवाहक, पु० ओझें वाहणारा जो गद्धा, घोडें, उंट, इ० तो; २, ला० जो विद्यादि व्यवहाराचें विनय, धनलाभ, इ० रूप जें फल त्याचा लाभ न सतां उगीच भारप्राय ती विद्या किं० व्यवहार वाळगणारा जो त्यास ह्म०

भारशिंग, न० सांबराचें जें शिंग तें.

भारा, पु० डोकीवर वाहून न्यावयाजोगें जें तृण, काष्ठ, पानें, इ० कांचें रचून बांधून केलेलें ओझें तो; २, पालेभाजी, ओलें तृण, इ० कांची बांधलेली जी पेंढी तो.

भारावणें, शरीर किं० शरीरावयव शैत्यादि आंत शिरल्यामुळें आपलें आपणासच जड वाटाया जोगें भारानें विशिष्ट होणें; २, कंगाळ, गांठोडें, इ० जें ओझें तें भिजणें, आंत कांहीं ओझें अधिक

पडणें. इ० कारणामुळें पूर्वापेक्षां अधिक जड होणें.

भारी, स्त्री० कों० लांकडांची जी मोळी ती; २. विद्या, शौर्य, बल, भार, किंमत, इ० गुणानीं विवक्षितापेक्षां जो अधिक तो; उ०, नारायण पंडितापेक्षां हरिपंडित भारी; ३. जाळाजाची गांठ पडली असतां निर्वाह करणें अडपडलें तो त्यास; उ०. हाशिपाई दाहांस भारी आहे; हें काम त्यास कांहीं भारी नाहीं; ४. फार.

भारीपणा, पु० पोरपणा, छचोरपणा, रूपजो हलकेपणा तद्व्यतिपक्षी जो थोरपणा ह्मणून अंगीं गुण असतो तो.

भारूड, न० सांगूं लागलें असतां एकाएकीं संपायाचें नाहीं आणि समजोन येणारा सहीं एकाएकीं पूर्वापर संधान जुळून आकलन होऊंन ये असें जें लांबच लांब सांप्रत झालेलें वर्तमान किं० पुरातन कवीनीं बांधलेली कथा, शास्त्र, गोष्ट, इ०नें.

भारेभात, न० कों० उतरणें किं० होणें यांचा योगीं प्र० अ० प्रतिभात्यास अदमण भात उतरावें इ० रूप असतो जो प्रायिक नेम त्याप्रमाणें ते भारे झोडले असतां भात उतरणें.

भारोभार, अलिं० भारंभार.

भार्गव, पु० गुजराथी ब्राह्मणांत एक जाति आहे; २. परशुराम. भार्गवजयंती इ० स०.

भार्ङ्गी, स्त्री० सं० एक औषधी झाड आहे.

भार्या, स्त्री० बाईल.

भाल, स्त्री० भाला, बर्ची, सांग, इ० कांचे अग्रभागीं जें लोखंडाचें फळ लावितात ती; २. कों० विटी दांडूचे खेळांत दुसऱ्यानें फेंकली जी विटी ती माघारी फिरायासाठीं दांडूनें परचेवर मारितात जी टोला ती; ३, न० सं० भाळ.

भालकाठी, स्त्री० भाला करायाचे उपयोगीं जी शिवा इ० कांची काठी ती.

भाँलगड, स्त्री० रा० भानगड.

भाँलगडणें, रा० भानगडणें.

भालगाँजा, पु० एक वनस्पति आहे.

भालदार, पु० राजादिक जे मुद्राधारी त्यांपाशीं एक सेवक असतो जाणें हातीं छडी धारण करून सर्दार, प्रधान, इ० कांस यलावणें, ताकीद. इ० काम करावें.

भालदारी, स्त्री० भालदारपणा.

भालदोरी, स्त्री० पिशाचाद्युपद्रव निरसनार्थ मंत्रानें अभिमंत्रित करून ओहस्तादि कांचे ठायीं दोरा बांधितात ती.

भाला, पु० चिवा इ० कांचा लांब काठीस अग्रभागीं लोखंडाचें फळ लाऊन जें शस्त्र करितात तो; ह्म० खांद्यावर भाला आणि जेवायास घाला; २. गाईचें दूध काढते वेळेस तिचे मागले पाय बांधावयास जी दोरी घेतात तो. भाला घालणें ह्म० भाल्यानें गाईचे पाय बांधणें.

भालू, स्त्री० वन्यपशु विशेष आहे.

भालेकरी, पु० भाला बाळगणारा जो शिपाई तो.

भालेराई, स्त्री० भालेराव ह्मणून पुर्वी कोणी पुंड होता त्याणें केली होती जी पुंडाई ती; २, ला० कांहीं कारणानें जास जसें मनास वाटेल तसें वर्तावें अशी होत्से जी पुंडाई ती.

भाव, पु० अंतःकरणाचे जे अनेक वृत्तिभेद तेही

करून होतात जे अंतःकरणाचे अनेक स्थितिभेद ते प्र०; उ०, मी त्याला बंधुभावानें पाहतों आणि तो मला शत्रुभावानें पाहतो, मला जो क्रोधभावानें पाहत होता तो आज स्नेहभावानें पाहूं लागला: २, देव, गुरु, औषध, मंत्र, इ० कांच्या ठायीं कोणकाचा हा ईश्वरच, यापासून माझें बरें होईलच, अतएव सर्वथा याला च सेवावें, इ० रूप किं० यांत काय आहे, याचे सेवनानें कांहीं व्हावयाचें नाहींच नाहीं, किं० वाईटच होईल, इ० रूप अंतःकरणाचा होतो निश्चय तो; उ०, जसा भाव तसें फळ; ३, ग्रंथ, भाषण, इ० कांतील जो आशय तो; उ० यालिहिण्याचा भाव कळत नाहीं; ४, श्लोक वाक्य इ० कांचा सारांशभूत जो अर्थ तो किं० सामान्यतः जो अर्थ तो; उ०, या श्लोकांतील सर्व पदांचा अर्थ समजला पण भाव काय तो समजला नाहीं; अह्मास प्राकृत श्लोकांचा भाव समजतो परंतु संस्कृत श्लोकांचा भाव कळत नाहीं; ५, शृंगारादि रसांची अभिव्यंजक जीं स्वेद, रोमांच, इ० लक्षणें होतात तीं प्र०; ६, वेश्यादिक जो त्या त्या रसांचा अभिनय करितात तो; ७, कोणक अर्थाचें जें अस्तित्व तो; उ०, जेथें धनाचा भाव तेथें विद्येचा अभाव असें प्रा० असतें; ८, केवळ धातूचाच वाच्य जो अर्थ तो; उ०, चाल इ० धातूं पुढें णें हा प्रत्यय भावीं होतो; ९, अर्थ मात्राचे बोधीं विशेषण त करून भासत असतो जो त्यावरील धर्म तो; उ०, ब्राह्मणावरील जो भाव तो ब्राह्मणपणा; १०, पदार्थ मात्राची उत्पत्ति, नाश, वृद्धि, क्षय, इ० रूप जा अनेक अवस्था त्या प्र०; ११, तनु, धन, इ० जे बारा विषय त्यांचे विचार करण्याचीं लग्नकुंडलीगत जीं बारा स्थानें तीं प्र०; १२, कों० बाजार, पेंठ, इ० कांत जिनसपा



नस; इ० घेण्यादेण्याचा असतो जो दर तो. भाव सोडणें ह्म० अंगात संचरित जें पिशाचादि त्याणें अंगांतून जाणें किं० कोणकानें मरणें किं० नाश पावणें किं० नाश पावण्याचा किं० मरण्याचा रंगास येणें.

भावई, स्त्री० भावयी.

भावकुंडली, स्त्री० कोणता ग्रह विचलित झाला हें पहायासाठीं मांडितात जी कुंडली ती.

भावचलित, ३ लिं० तन्वादि स्थानीं असून अंशें करून चलित झाला जो भान्वादि ग्रह तो.

भावजई, स्त्री० भावजय.

भावजय, स्त्री० आपले भावाची जी बायको ती आपल्यास.

भावंड, न० बहीण किं० भाऊ यांचें सामान्य नाव.

भावणें, कोणक अर्थ हा बरा, हा वाईट, हा गुरु, हा ईश्वर, इ० अशा भावानें मानणें; २, कोणक पदार्थ किं० कांहीं एक गोष्ट शरीरास किं० अंतःकरणास मानणें; उ०, इथली हवा मला भावत नाहीं, असलीं कुजकीं भाषणें तुह्माला बरीं भावतात.

भावना, स्त्री० कोणक पदार्थास अस्तित्वें करून किं० विवक्षित गुणवैशिष्ट्यें करून मानण्याचा जो अंतःकरण व्यापार ती; उ०, ईश्वरास मूर्ति नाहीं खरी परंतु पूजेसाठीं मूर्ति आहे अशी भावना करावी लागते; हा साधु आहे अशी भावना करून तुह्मी त्याला वंदा; २, वातपित्तादि न्यूनाधिक्यामुळें शरीर प्रकृतीचे जे अवस्थाभेद होतात ते प्र०; ३, भाव द्वितीयार्थ ३: ४, रसायनादिकांस औषधी रसाचीं पुटें, अग्निपुटें, इ० जे संस्कार करितात ते प्र०; ५, बीजगणि

तान गुणनाचा एक प्रकार आहे ज्याचे अवांतर भेद अंतर्भावना, समासभावना, तुल्यभावना, असे आहेत; ६, कों० कोणेक पदार्थांचा जो प्रकृतिस्वभाव तो: उ०, या अंब्याची भावनाच अशी कीं कोईपाशीं अंबट असावें.

भावभगत, स्त्री० मनुष्यादि पदार्थांचा किं० कांहीं एक गोष्टीच्या कांहीं दिवस असतो जो भरभराट ती प्रा० तिची अचिरस्थायितावर्णायाची असतो प्र०; २, कों० बाजारांतील दरदाम इ० संबंधी किं० कोणेकाचे संसार इ० संबंधी जें अधिक उणें वर्तमान ती.

भावभक्ति, स्त्री० भावभगत.

भावयी, स्त्री० ज्येष्ठी अमावास्या.

भावला, पु० बाहुला.

भावली, स्त्री० बाहुली.

भावलें, न० बाहुलें.

भावशबल, न० अंतःकरणांत एकच रस पूर्णतान होतां अनेक शृंगारादि रसांचा जो मिश्रीभाव होतो तें.

भावसंधि, पु० जो एक शृंगारादि रस हृदयांत होत असतो तो पूर्ण नाहीं झाला तों त्याचा उपमर्द करून दुसरा भयानकादि रस उठतो पुनः त्याचा उपमर्द करून पूर्वींच्या शृंगारादि उठतो किं० तिसराच उठतो असा जो रस प्रकार तो.

भावळ, पु० कों० अनेक जे भाऊ ते ग्रा० अनेक वचनांत प्र०; उ०, दोघे भावळ रोजगारी आहेत.

भावा, पु० भ्रतारचा जो वडील भाऊ तो.

भावार्थ, पु० श्लोकादिकांतील सारांशभूत अर्थ तो; २, भावद्वितीयार्थ; ३, अंतःकरणाचा निष्कपट जो भाव तो अ० खरेंच सांगणें, बोलणें, इ० कांचें वि० उ०, तो भावार्थ गांवास गेला मी आपल्यापाशीं खोटें सांगेन.

भावार्थी, ३ लिं० ज्याचे अंतःकरणांत कपट नाहीं दुसरा जें सांगेल बोलेल तें खरें वाटतें अशा स्वभावाचा जो मनुष्य तो.

भावांचे [illegible] कों० बावांचे.

भावित, ३ लिं० मनानें भावना ज्याची केली किं० ज्यास भावना दिली असें औषधादिक तो.

भावी, ३ लिं० भविष्यकालीं होणार जें कांहीं तें.

भावीक, ३ लिं० देव, गुरु, औषध, इ० कांपासून बरें होतें इ० जें त्याचें माहात्म्य लोकशास्त्रांत सांगतात त्याजवर ज्याचा मनःपूर्वक विश्वास असतो तो.

भावीण, स्त्री० आपला दादला सोडून कोठें देवस्थानी जाऊन देवाचे नंदादीपांतील तेल आपले डोईवर घेऊन देवाची दासी म्हणवून राहते जी स्त्री ती; २, रा० भावणीचा कांसोटा इ० प्रण्यांला नपुसतो पाहिजे त्याणें घ्यावा उपभोगावा असा जो वस्त्र, पात्र, इ० पदार्थ असतो त्याला म्ह०.

भावुक, ३ लिं० सं० भावीक.

भावो, पु० भाओ.

भावोजी, पु० भाओजी.

भाष, स्त्री० भाक.

भाषण, न० बोलण्याचा व्यापार तो; २, तेणें करून वाणीपासून निघतो जो शब्दसमुदाय तें.

भाषा, स्त्री० बोली प्रथमार्थ.

भाषांतर, न० एका भाषेनें लिहिलेला जो ग्रंथ इ० त्याचा दुसऱ्या भाषेंत जो अर्थ करितात तें.

भाषित, ३लिं० कोणेकानें उक्त जो कांहीएक शब्द किं० अर्थ तो; २, न० कोणेकाची जी उक्ति तें.

भाषी, ३लिं० बोलणारा, परंतु प्रा० स० प्र०; उ० मित बोलण्याचा स्वभाव आहे तो मितभाषी, अल्पभाषी, बहुभाषी, मधुरभाषी, इ०.

भाष्टाण, स्त्री० भाजलेल्या पदार्थास जो विलक्षण वास येतो ती.

भाष्य, न० कोणेक मूलग्रंथ धरून त्याची व्याख्या करीत असतां व्याख्येंत जें शब्दवाक्यादि कठिन पडतें त्याची तेथें तेथें आपणच व्याख्या करावी अशा ग्रंथकाराचा जो व्याख्या ग्रंथ तें.

भास, पु० कोणेक अधिष्ठानीं हा अमुकच अशी निश्चयात्मकता पावलेलें नव्हे हा अमुक असेल कांय इतकें कांहीएक अर्थविषयीं होतें जें ज्ञान तो. उ०, बाहेर कोणी आला असा मला भास झाला, शरीरांत ज्वराचा भास होतो.

भाँस, स्त्री० कों० भात भरडलें असतां त्याचा कांहीं कणांश, कांहीं तुषांश असें मिश्रित जें बारीक चूर्ण निघतें ती.

भाँसकटणें, कों० गळफटणें.

भाँसकणें, कों० गळफटणें.

भासणें, कोणेकाला कोणेक अर्थ भासविषय होणें.

भाँसळ, ३लिं० कों० भांशानें विशिष्ट जी करड, तांदूळ, इ० ती.

भाँसळणें, कों० करड, तांदूळ, इ० कानीं भाँसळ होणें; २, भिसळणें या अर्थी स०.

भास्कर, पु० सूर्य.

भास्करी, स्त्री० भाकरीस स०.

भास्वर, ३लिं० प्रकाश आहे ज्याला असें जें रूप किं० तद्विशिष्ट अग्नि, सूर्य, हिरा, इ० तो.

भाळ, न० कपाळ प्रथमार्थी.

भाळणें, कोणेकानें कोणेक विषयाचा मोहानें किं० दुसऱ्यानें केला जो प्रार्थना युक्त लेणें करून तें बरें सें वाटून अंतःकरण वृत्तीनें तिकडे वळणें.

भाळी, स्त्री० अनेक कामटांचे तुकडे आडवे मांडून त्यांस मध्यें मध्यें गांथण घेऊन जो सादरी सारिखा पदार्थ करितात ती.

भिकटणें, रा० वृक्ष, वृक्षाची सांदी, इ० ओरखडणें.

भिकणी, स्त्री० हांतरुणावर आलेले टेंकूण दुसरे दिवशीं बाहेर काढायास सांपडावे ह्मणून आंत टेंकूण रहायाजोगा छिद्रें पाडलेला जो लांकडाचा तुकडा हांतरुणाजवळ बाळगतात ती.

भिकणें, न० भीक मागून मिळवलेलें जें धान्यादिक तें; २, देण्यारानें धर्मस्मरोंच दिलें तरच भिकायाचें नाहींतर घेणाऱ्या ओरान्याला याचा नाहीं असें जें उपाध्या, जोशी, संत, भिक्षुक इ० कांस यजमान इ० कांपासून मिळत असतें तें.

भिकबाळी, स्त्री० भिक्षेनें सुवर्णादि मिळवून त्याचें बाळीसारखें भूषण करून मुलग्याचे उजवे कानांत घालितात ती; २, कोणी भिक्षा न मागतां एरवींच करून शोभार्थ कानांत घालितात

भिकार, न० भिकाऱ्यांचा जो समुदाय तें; २, ला० ३लिं० संपत्तिमान लोक जेथें नाहींत किं० भि

क्षित वस्तु पाहिजे ते व्हां मिळत नाहीं किं० उत्पन्न होत नाहीं असा जो देश, ग्राम, इ० त्यास म्ह० उ०, येथें भाजी देखील मिळत नाहीं अशा भिकारगांवांत कशास राहिला.

भिकारखोड, स्त्री० भिकारचाळा.

भिकारचाळा, पु० वस्त्रें फाटलीं तथापि दंड घालून नेसावीं धातुमय पात्राच्या अनादर करून काष्ठ, मृत्तिका यांचींच पात्रें करावीं अध्ययनादि चांगले उद्योग सोडून सोंगट्या इ० खेळावीं इ० शिष्टसंभावित जनास अयोग्य दिसाया जो गोष्टी खोड कोणेकास लागत्ये ती.

भिकारचोंट, पु० दरिद्र्यास किं० कृपणास निंदेनें म्ह०; २, किंमत, बळकटी, उघ्रता, इ० गुणानीं हीन जो पदार्थ त्यास किं० विवक्षित कार्यास पुरायाजोगा नव्हे असा जो उणा पदार्थ त्यास निंदेनें म्ह०.

भिकारडा, पु० भिकाऱ्यास निंदेनें म्ह०.

भिकारभोंपळा, पु० कपाळकरंटा जो त्यास म्ह०.

भिकारलक्षण, न० भिकारचाळा.

भिकारी, पु० भीक मागून पोट भरतो तो; २, भिकारचोंट; ३, दुसऱ्यानें हिताची गोष्ट सांगितली असतां ऐकूं नये, त्याविषयीं पराङ्मुख असावें, जा कामांत तोटा, नाश, त्याविषयीं सादर असावें, अशा स्वभावाचा जो मनुष्यादि त्यास म्ह०.

भिकाळ, स्त्री० भिक्षाळ.

भिकुटणें, भिकटणें.

भिकूट, ३लिं० भित्रा.

भिकूण, पु० ढेंकूण.

भिंग, न० आरसा, उपनेत्र, इ० करायाचे उपयोगीं पडत्यासारखा सपाट जो कांचेच्या पदार्थ करितात तें.

भिंगरी, स्त्री० चातीसारखें परंतु आंखूड दांड्याचें एक मुलाचें खेळणें आहे ती; २, भोंवरी म्हणून वेल आहे; ३, तिचें फळ; कोणेकाचे पायांस भिंगरी असणें म्ह० सारा दिवस फिरत असावें असा स्वभाव असणें.

भिंगोरी, स्त्री० भिंगरी.

भिजकट, ३लिं० थोडेसें भिजलेलें जें लांकूड, गवत, वस्त्र, इ० तो.

भिजका, ३लिं० भिजलेलें जें लांकूड, तृण, वस्त्र, इ० तो त्या भिजलेपणास जेव्हां दोषरूपता आहे तेव्हांच या० प्र०.

भिजणें, अक० जो काष्ठ, भूमि, वस्त्र, पात्र, धान्य, इ० पदार्थ तो, उदक, दुग्ध, इ० सद्रव पदार्थानें ओला होणें, भिजत पडणें म्ह० कोणेक काम घडासन आगतें लांबणीवर पडणें, याच अर्थी भिजत कोंवळें पडणें, भिजत घोंगडें पडणें इ० प्रयोग करितात, कर्ता अन्य असतां भिजत कांबळें घालणें, ठेवणें, इ० प्र०.

भिजवण, न० खरकटीं भांडी इ० कांस बांधून घट्ट चिकटलेलें जें खरकटें इ० तें भिजून शिथिल व्हावें म्हणून त्यांत भिजलेली माती, राख, इ० जें लावून ठेवितात तें; २, भात, पोहे, इ० भिजवायाचें साधन जें ताक, पाणी, इ० तें.

भिजाणा, पु० भिजल्यामुळें मृदु झाला जो हरभरा, इ० दाणा तो.

**भिडणें**, कालरूप किं॰ देशरूप अंतर मध्यें ईषन्मा त्र न राहीअसें कोणेकानें कोणेकाचे जवळ येऊ-नसंबद्ध होणें ;उ॰, अवकाश होतातों घरनीटक रावें तें केलें नाहीं आतां पावसाळा येऊन भिडला आतां कसें होईल. दूरबेसअंगाशीं भिडूं नको ;२, स्थळांतरीं पाठवायाकरितां कागद इ॰ कांचा सिद्ध केला जो लखोटा, पुडकें, इ॰ त्यांतच दुस राएकादा मागून समाविष्टकरणें ;उ॰, तुह्मी आपले लखोट्यांतच येवढा माझा कागद भि डून पाठवा.

**भिडती**, पु॰ रा॰ भेडतू.

**भिडसरू, भिडसारू**, ३लिं॰ भिडस्त.

**भिडस्त**, ३लिं॰ कांहीं एक कर्म करण्यास, किं॰ बोल ण्यास, जोला दुसऱ्याची भारी भीड वाटते तो- किं॰ दुसऱ्याचा मुखसंकोच जाला भारी तो.

**भिडावणें**, कोणाकानें कोणाकाचे भिडेनें विरि ष्ट होणें.

**भिणभिणणें**, भणभणणें द्वितीयार्थीं.

**भिणें**, भीतीनें विशिष्ट होणें, ह्म॰ भित्यापाठीं ब्रह्मराक्षस.

**भिंत**, स्त्री॰ गृहादिस्थलास आवर व्हावें इत्याद्य र्थ दगड, विटा, चुना, माती, इ॰ कांचा जोर चनाविशेष करितात ती ;२, तेथास कांहीं कारणामुळें जें केवळ आंध्य येतें त्यास ह्म॰.

**भितर**, अ॰ आंत.

**भितरसवाई**, स्त्री॰ कोणेक व्यवहाराच्याठायीं संभावित असतो जो नफा तो नहोतां उलटी जी नुकसानी होते ती.

**भितरा**, ३लिं॰ भयनिमित्त थोडें असतांही फार जाणें भ्यावें असा स्वभावाचा जो तो.

**भिंतळा**, पु॰ कों॰ लांकूड फोडून काढिलेला जो मोठा दलपा तो.

**भिंताड**, न॰ जिजवर आच्छादन नाहीं अशीजी भिंत ते.

**भिंताळा**, पु॰ भिंतळा.

**भित्ति**, स्त्री॰ सं॰ भिंत प्रथमार्थः.

**भित्रा**, ३लिं॰ भितरा.

**भिनणें**, शरीर, वस्त्र, इ॰ पदार्थांचेठायीं तेल, दूध, जल, इ॰ पदार्थांनीं स्वरूपतः किं॰ विष, औषध, इ॰ कांनीं स्वशक्तिद्वारा सकलावयवा वच्छेदें करून व्याप्त होणें ;२, ला॰ दुसऱ्यानें सांगितलेलें जें बरें किं॰ वाईट तें पुरतेपणीं मनांत ठसणें.

**भिनारणें**, कों॰ भिनणें.

**भिन्न**, ३लिं॰ भेदप्रथमार्थानें जो विशिष्ट तो ;२, निराळा ;३, फुटका जो पात्रादि पदार्थ तो.

**भिन्नभाव**, पु॰ दुजाभाव.

**भिंबिरटें**, न॰ कों॰ उजाडूं लागलें ह्मणजे होतें जें संजुकमुजुकतें.

**भिंभिरकटें, भिंभिरडें**, न॰ कों॰ भिंबिरटें.

**भिरकोंडी**, स्त्री॰ भोंकांडी ;२, लाभावांचून निरर्थक परिभ्रमण त्या, मार, खा, इ॰ धातूंयो गीं प्र॰.

**भिरकावणें**, झुगारणें.

**भिरड**, स्त्री॰ क्रोधाच्या आवेश ;२, पु॰ शेंवगा, आंबा, इ॰ वृक्षांस एक कृमिरूप रोग लागत असतो

असतो तो.

भिरडणें, भिरड ह्मणून जो रोग तद्विशिष्ट अंबा, इ० वृक्षानीं होणें.

भिरडी, स्त्री० भिरड प्रथमार्थ; २, भोंसडपट्टी.

भिरभिरणें, झणझणणें; २, शैत्यादिविकारामुळें शरीर किं० शरीरावयव मुंग्या आल्या असें वाटाया जोगें विकृतीनें विशिष्ट होणें.

भिरभिरी, स्त्री० अंगास मुंग्या आल्या असें वाटाया जोगी होती जी विकृति ती; २, भिरड प्रथमार्थ.

भिरभिरें, न० वाऱ्यानें मंडलाकार भिरभीर फिराया जोगें कागद इ० कांचें खेळणें करितात तें.

भिरभीर, अ० अनु० शब्द होई असें भोंवरा, भिंगरी, इ० कांचें वाजणें, फिरणें, इ० कांचें वि०.

भिरिरी, स्त्री० भिरड प्रथमार्थ; अ० शब्द होईजसें, पाषाणादिकांचें झुगारणें, येणें, इ० कांचें वि०.

भिलावा, पु० बिबा.

भिल्ल, पु० डोंगर, अरण्य, इ० दुर्गमस्थलीं राहाणार एक मनुष्यांत जाति आहे.

भिल्लटी, भिल्लणी, स्त्री० भिल्लजातीय जी स्त्री ती प्रा० ग्रं० प्र०.

भिल्लाण, न० फारकरून जेथें भिल्लांचीच वसती असा जो देश तें; २, देशामार्ग इ० कांच्या ठायीं लोकांस भिल्ल मारतात, लुटतात, असा असतो जो उपद्रव तें.

भिंवई, स्त्री० भंवई.

भिंवरथडी, स्त्री० भीमा ह्मणून नदी आहे तीचे उभयतीरींचा जो देश ती; २, तेथील जो घोडा, भाषा, भाषा, माणसें इ० तो.

भिंसटी, स्त्री० रा० झिंपरी.

भिसळ, स्त्री० कोणेक पदार्थांत कोणेक पदार्थांचा जो मिश्रीभाव ती; उ० या गाईच्या तुपांत म्हशीचे तुपाची भिसळ करूं नको; २, कोणेक पदार्थांत मिश्रित झालेलें जें पदार्थांतर ती; उ०, त्या अंब्यांत खटया अंब्यांची भिसळ आहे ती काढा मग मोजून घ्या; ३, इतर पदार्थांची भिसळ जामध्यें झाली आहे असा जो विशिष्ट पदार्थ तो; उ०, हे शुद्ध अंबे मोहोराचे नाहूक नव्हत भिसळ आहेत

भिसळणें, कांहीं एक पदार्थ कोणेक पदार्थांत मिसळणें.

भिसें, न० कमळाची जी देंठ तें.

भिस्त, स्त्री० भरंवसा प्रथमार्थ; २, कांहीं एक जीवित निर्वाहादि कार्याविषयीं काय एक आश्रय ती हाच पाहून इतर कोणी नाहीं असा जो भाव धरिला असतो ती.

भिस्ती, पु० पखाल किं० मसक याणें पाणी, पाणी, इ० कांचा ठायीं वाहून उपजीविका करतो तो

भिळभीळ, रा० अ० तोंडानें मोठा शब्द न होतां अश्रुपातपूर्वक रडण्याचें वि०.

भिक्षणें, कोणेकापाशीं कांही एक भिक्षारूपें मागणें.

भिक्षा, स्त्री० कोणेकाचें देणें आपण लागत नसतां त्याणें मागितल्यामुळें धर्मार्थ जें त्यास धान्य, द्रव्य, इ० देतात ती; २, धर्मार्थ संन्यासी, योगी, इ० कांस देतात जें भोजन ती; उ०,

उ०, आज आह्मी त्यामीस भिक्षा करणार याज-करितां गाईचें तूप कोठून आण भिक्षान्न, भिक्षावृत्ति, इ० म०; ३, ग० अपराधाची क्षमा, दुर्व्यसनापासून परावृत्ति, विवक्षित कार्याचे ठायीं प्रवृत्ति, इ० रूप जें कांहीं एक दुसऱ्यापाशीं विनयपूर्वक करुणशब्दानें मागतात त्यास ह्म०; उ०, तूं कोणावर रागें भरूनको एवढीं मला भिक्षा दे.

**भिक्षाटण**, न० भिक्षाटनाचा अपभ्रंश.

**भिक्षाटन**, न० भिक्षार्थ ग्रामादिकांचाठायीं हिंडण्याचा जो व्यापार तें.

**भिक्षाभाग्य**, ना० न० भिक्षुकीनें पैसा मिळावा असें जें कोणेकास दृष्टादृष्ट असतें तें.

**भिक्षार्थी**, ३ लिं० भिक्षा मागायास आलेला जो कोणी तो.

**भिक्षावळ**, स्त्री० मुंजीमध्यें मुंजा मुलास घालितात-जी लाडू, फळें, द्रव्य, इ० भिक्षा ती; २, ती भिक्षा घालण्याच्या करितां जो समारंभ ती.

**भिक्षित**, ३ लिं० भिक्षिलेला जो तो.

**भिक्षुक**, पु० याजन, प्रतिग्रह, किं० अध्यापन, या वृत्तीनीं संसार निर्वाह करीत असतो जो ब्राह्मण तो.

**भिक्षुकी**, स्त्री० भिक्षुकपणा.

**भिक्षेकरी**, पु० अन्न, किं० धान्य, याची भिक्षा परोपर मागत असतो तो.

**भी**, स्त्री० सं० भय.

**भीक**, स्त्री० भिक्षा, परंतु हा हलका शब्द ह्मणून निंदाध वसरीं याचा प्र०, कोणेकास भीक लागणें इ० स्थळीं त्याणें भीक मागून पोट भरावें अशा प्रकारचें दरिद्र प्राप्त होणें, कोणेक पदार्थाची भीक लागणें ह्म० तो पदार्थ अति दुर्भिळ होणें; उ० या देशांत काय पाण्याची भीक लागली आहे, कोणेकास कोणेकानें भीक घालणें ह्म० तत्व्यवहारीं त्यास कांहीं गणणें निषेध विषयीं प्र०; उ०, ती मोठ्या मोठ्या लागणीत नाहीं मग याला कोठून भीक घालणार, भिकेचा डोहाळा ह्म० कांहीं दारिद्र्यादि दुर्दशा यावयाचे पूर्वी तदनुरूप पूर्वसंपत्यादिकांस विरुद्ध असा कांहीं उठतो जो मनोरथ त्यास ह्म०, आठवणें, होणें, यांचा योगीं प्र०, ह्म० भिकेची हांडी शिक्यास चढत नाहीं, भीक नको पण कुत्रा आवर.

**भीकमाग्या**, ३ लिं० भिकारी प्रा० तृतीयार्थी.

**भीज**, स्त्री० उसळ्याकरितां भिजवलेले किं० भिजवून उसळलेले जे सजगुरे ती.

**भीड**, स्त्री० कोणेक कर्म करण्याविषयीं दुसऱ्याचे मनांत जसें आहे तदन्यथा वर्तलें असतां दुसऱ्याच्या मनोभंग होईल असा जो भय सदृश मनांत भाव यागतो ती; उ०, मला कोणाची भीड तुटत नाहीं; त्या दरबारांत तुमची भीड आहे ह्मणून तुह्मी साहित्य पत्र द्यावें, कोणेकास भीड घालणें किं० भिडेस घालणें ह्म० आर्जव स्तुत्यादिद्वारा त्याचे हृदयांत भीड उत्पन्न होईल असें करणें; ह्म; भीड भिकेची बहीण, ; २, दुसऱ्याचे देखत बोलणें, खेळणें, इ० विषयीं हा मला उद्धत अमर्याद इ० आहे असें मानील ह्मणून अंतःकरणास वाटते जी श

का तो; उ०, तुला बापाचे देखत याय कोशीं बोलावयास कांहीं भीड वाटत नाहीं, भीड चेपणें ह्म० परिचय पडतां पडतां हळू हळू भीड जिकणें; भिडेचा ह्म० जाणें कांहीं एक गोष्टीविषयीं भीड यातली असतां सहसा मोडवत नाहीं तो; २, अल्पअवकाशांत बहुत पदार्थ समाविष्ट झाल्यामुळें होत्ये जी दाटी ती; उ०, आजदेवळांत मनुष्यांची फार भीड झाली उभे रहायास जागा सांपडेना.

**भीडभाड**, स्त्री० मीड, मुखसंकोच, इ० ती.

**भीडमुरवत**, स्त्री० भीडभाड.

**भीत**, ३लिं० भयपावला तो.

**भीतरीं, भीतरी**, अ० भितर.

**भीति**, स्त्री० भय; प्रा० प्रथमार्थं२, प्र०.

**भीम**, ३लिं० भयंकर; २, पु० भीमसेन.

**भीमसेन**, पु० एकपुराणप्रसिद्ध बलाढ्य राजा होता; २, ला० शरीरानें धष्टपुष्ट बळकट त्याणें ही बहुत असा जो पुरुष त्यास ह्म०.

**भीमसेनीकापूर**, पु० कापुरांत एक भेद आहे

**भीषण**, ३लिं० भयंकर.

**भीष्म**, पु० मोठा योद्धा, ब्रह्मचारी, सत्यप्रतिज्ञ, भीट, असा पुराणप्रसिद्ध एक क्षत्रिय होता-तो; २, ला० बुद्धीनें गंभीर, सत्यप्रतिज्ञ, इंद्रियनिग्रही, शूर, असा जो पुरुष त्यास ह्म०; ३, टेंकणास ह्म०.

**भीष्मप्रतिज्ञा**, स्त्री० कधींहीं टळायाची नाहीं अशी कोणी केली जी प्रतिज्ञा ती.

**भींस**, स्त्री० रा० हजामत न केल्यामुळें मुठींत सांपडायाजोगे वाढतात जे केश ते; २, कुत्रा, शेळी, मेंढी, इ० कांचे अंगावर मुठींत धरायास सांपडे इतकी मोठी असत्ये जी लोंकर ती.

**भुइकोट, भुईकोट**, पु० पर्वताचा आश्रय नसतां भुईवरच तट बांधून करितात जो किल्ला तो.

**भुइकोव्हाळा, भुइकोहळा, भुइकोहाळा, भुइकोहोळा**, पु० एक अरंण्य औषधी शाकंद आहे.

**भुइकोंव्हाळा, भुइकोंहळा, भुइकोंहाळा, भुइकोंहोळा**, पु० भुइकोव्हाळा.

**भुइँकोंव्हाळा, भुइँकोंहळा, भुइँकोंहाळा, भुइँकोंहोळा**, पु० भुइकोव्हाळा.

**भुइँकोव्हाळा, भुइँकोहळा, भुइँकोहाळा, भुइँकोहोळा**, पु० भुइकोव्हाळा.

**भुइकोव्हाळी, भुइकोहळी, भुइकोहाळी, भुइकोहोळी**, स्त्री० भुइकोहळ्याची वेल ती.

**भुइकोंव्हाळी, भुइकोंहळी, भुइकोंहाळी, भुइकोंहोळी**, स्त्री० भुइकोव्हाळी.

**भुइँकोंव्हाळी, भुइँकोंहळी, भुइँकोंहाळी, भुइँकोंहोळी**, स्त्री० भुइकोव्हाळी.

**भुइँकोव्हाळी, भुइँकोहळी, भुइँकोहाळी, भुइँकोहोळी**, स्त्री० भुइकोव्हाळी.

**भुइकोहळें, भुइकोहाळें**, न० भुइकोहळा.

**भुइचांपा, भुइचांफा, भुइँचांपा, भुइँचांफा**, पु० पानें फुटायाचे अधीं भुईंतुनच जाला फुलें येतात असें एक फुलझाड आहे.

**भुइँचार**, स्त्री० रा० ओलें गुरें इ० कानीं मशा

याचें तृण तो.

**भुईंठाकूर**, पु० रा० केवळखुजाजो मनुष्यादित्यास ह्म०.

**भुइतरवड**, पु० एकऔषधी झाड आहे ज्याचे पाल्यास सोनामुरवी ह्मणतात तो.

**भुइनळा**, पु० भुईवरठेऊन लावायाच्या असा दारुभरून नळाकरितात तो.

**भुइपारणें** न० पात्रावांचून भूमीवरच अन्नादिवाढून भोजनकरावें असें जें कोणीचातुर्मास्यादिकांत व्रतकरितात तें.

**भुइभाडें**, न० दुसऱ्याचे भूमीवर गृह इ० बांधिलें असतां तन्निमित्त जें भूमीचे धन्यास भाडें प्रतिवर्षी द्यावें लागतें तें.

**भुइमाडा**, पु० कों० आपल्याआपण बीजपडून रुजला जो माडा तो.

**भुईंमूग**, **भुइमुग**, पु० ज्यालाभुईंतच मुळ्यांसशेंगा लागतात असा एक वेल आहे.

**भुईसपट**, **भुइसपटा**, अ० कों० भूमीशीं सपटत असे असें भूमीपासून उंच असावी-जी वृक्षाची खांदी, घराचें पाखें, इ० त्यांचें जें भूमीबराबर असणें किं० तीर, गोळी, इ० कांचें जाणें इ० कांचें वि०.

**भुईंसांड**, **भुइसांड**, ३लिं० रा० जमीनसांड

**भुई**, **भुंई**, स्त्री० जमीन.

**भुक्**, ३लिं० ज्यातें जो भोगणारा किं० भक्षिणारा तो नद्भुक्; उ०, पृथ्वीतें भोगितो तो पृथ्वीभुक्, राजा, दासीभुक् ह्म० दासीतें भोगणारा, वायूतें भक्षणारा तो वायूभुक् सर्प, आखुभुक्, भुजंगभुक्, इ० समासीं प्र०.

**भुकटी**, **भुकणी**, स्त्री० बुकणी.

**भुँकणें**, कुत्र्यानें आवेशपूर्वक ओरडणें.

**भुका**, पु० भुकणी.

**भुकाळू**, ३लिं० क्षुधाजालावरचेवर लागते आणि कागली असतां कंठवत नाहीं अशा स्वभावाच्या जो तो.

**भुकित**, ३लिं० भुकेबंगाल.

**भुकी**, स्त्री० बुकणी; २, ईषन्मात्र क्षुधा राखून जेवितो तो; ह्म० भुकीनोकरवी, प्रा० या ह्मणीतच प्र०.

**भुकेकंगाल**, ३लिं० भुकेवंगाल.

**भुकेणें**, भुकेनें विशिष्ट होणें; २, ला० कोणाकपदार्थाविषयीं आशेसयेणें; उ०, मी त्याचे भेटी विषयीं भुकेलों आहे.

**भुकेबंगाल**, ३लिं० खावयास मिळणें हीजाला कठीण असाजो पराकाष्ठेच्या दरिद्री तो.

**भुकेला**, ३लिं० क्षुधित; २, जाविषयावर जाची सर्वभावें प्रीति तो त्याविषयीं.

**भुक्त**, ३लिं० भोगिला किं० भक्षिला जो पदार्थ इ० तो.

**भुक्ति**, स्त्री० भोजनव्यापार; २, सूर्यादिग्रह, चक्र, काळ, यांची जी गति ती.

**भुगा**, पु० बुकणी.

**भुंगा**, पु० भ्रमर; २, स्त्रियांचें तदाकार शिरोभूषण असतें तो.

**भुगी**, स्त्री० बुकणी.

**भुज**, पु० बाव्हळ्यापासून अंगुल्यग्र पर्यंत जो.

जो हात तो; २, चतुष्कोण, त्रिकोण, इ० जीं क्षत्रें त्यांचीं एकेकोणापासून दुसरे कोणापावेतों जीं सूत्रें तीं प्र०; ३, राशिचक्रामध्यें नव्वदअंशांहून न्यून किं० पराकाष्ठा नव्वद अंश जें प्रमाण तो.

भुजंग, पु० ज्याचे शिरीं दशांक चिन्ह असतें असा जो सर्प तो प्रा० मोठा असतां ह्म०.

भुजणें, क्रि० भाजणें, शूद्रभाषेंत प्र०

भुजपत्र, न० भूर्जपत्र; २, ला० फार पातळपणामुळें किं० केवळ जुनें झाल्यामुळें जें निर्जीव वस्त्र, कागद, इ० त्यास ह्म०.

भुजबल, न० सं० बाहुबल.

भुजा, स्त्री० ग्रं० भुज.

भुजारी, भुंजारी, पु० भडभुंजा.

भुजिपत्र, न० भुजपत्र.

भुटा, भुट्टा, पु० मक्याचें कणीस.

भुटेचोर; भुट्टेचोर, पु० जो प्रसिद्धपणें दरवाडा घालीत नाहीं घरचे मनुष्यांची असावधता लक्षून हळूच युक्तीनें लहान सान वस्तु चोरून नेतो असा जो चोर तो; २, ला० यजमानाचे संसाराची पोटागजो सनाहीं तोंडावर गोड बोलून आपलें कार्य साधावें असे मिळाले असतात जे भोजनभाऊ त्यांस ह्म०.

भुडकी, स्त्री० बुडकी प्रथमार्थं.

भुडभुड, अ० अनु० शब्द होई असें ओंवळगल्याचे पात्रांत पाणी भरणें किं० त्यांतून ओतणें इ० क्रांचें वि०.



भुंडा, ३ लिं० माघारीं मुरडलीं आहेत शृंगें ज्याचीं असा जो गोमहिष्यादि पशु तो; २, बोडका द्वितीयार्थं.

भुतखान. न० रा० केंस ट्यामोकळ्या सुटलेल्या, राख, धूळ, इ० कांनीं अंग ज्याचें मळलेलें, असें उच्छृंखल, विद्रूप, जें पोर इ० त्यास ह्म०.

भुतखाना, पु० अनेक पिशाचांनीं अधिष्ठित जें स्थल तो; २, दुसऱ्याचे मानेस बसावें, दुसऱ्यास उपद्रव करावा. इ० रूप जो पिशाचसंबंधी व्यवहार तो; उठणें माजणें इ० क्रांचे योगीं प्र० उ० जिकडे तिकडे भुतखाना उठला आहे दुपारची बाहेर जाऊं नको; ३, भुतखान.

भुता, रा० पु० भुत्या.

भुताटकी, स्त्री० कोणाचें वाईट करण्याविषयीं किं० बरें करण्याविषयीं भुतास कांहीं देऊं करून त्याजवर उठवावें किं० बसवावें इ० रूप जो भूतसंबंधी व्यवहार तो.

भुताटणें, मनुष्यादिकानें क्रोधादिकामुळें भूत आंगीं आल्यासारखें अनावरपणें वाळे करूं लागणें; उ०, या गाईनें काल चांगलें दूध दिलें आज कां भुताटली न कळे हात लावूं देत नाहीं. वासरालाही जवळ येवूं देत नाहीं.

भुतारणें, रा० भुताटणें.

भुतावळ, स्त्री० पिशाचांचा जो समुदाय तो; ह्म० वेताळाचे मागें भुतावळ आहेच.

भुतावळें, न० दारूचा अनेक चिंधुक्या. तोटे, इ० एकत्र मुद्दईवर मांडून त्याजवर थोडी

शी दारूयाल्हन एकदांच पेटवितात त्यारचना विशेषास म्ह०.

**भुताळा, भुताळ्या**, ३लिं० दुसऱ्याचा नाश व्हावा म्हणून त्याजवर भुतें घालितो तो.

**भुत्या**, पु० अंगावर कवड्यांची भूषणें, तेलकट वस्त्रें, हातांत पोत धारण करून भीक मागणारा असा भवानीचा भक्त आहे तो.

**भुदकन, कर, दिशीं**, बुदकन.

**भुदगा**, पु०रा० भाजी, भांडें. इ० कांचा करपल्यामुळें राखुंडीसारखा होतो जो परिणाम तो.

**भुपकार**, पु० भुभुःकार.

**भुपाळी**, स्त्री० भूपाळी.

**भुभुःकार**, पु० वानरांचा जो उत्साहाचा शब्द तो.

**भुभुक्षित**, ३लिं० बुभुक्षिताचा अपभ्रंश.

**भुमका**, स्त्री०रा० ग्रामाभिमानिनी जी भूरूपदेवता ती.

**भुमखान**, न०रा० टोळ, गोचीड, चांचड, भिकार, इ० कांचा एकदांच अतिरिक्तपणें प्रवृत्त होतो जो समुदाय तें, उठणें धातुयोगीं प्र०.

**भुम्या**, पु० जा ठिकाणीं जाचे वाडवडील नांदत आले तो त्या ठिकाणचा; २, ला० कोणे कस्थलाचा किं० कांहीं एक व्यवहाराचा बहुत परिचयामुळें पुरा माहितगार झालेला जो त्यास म्ह०.

**भुयार**, न० पर्वतादिकांत भुंईचे पोटीं असले जी गुहेसारखी पोकळ जागा तें किं० गृहादिकांचें भूमीचे पोटीं कांहीं वस्तु ठेवाया करितां जी होदालारखी बांधून जागा केली असल्ये तें.

**भुरकट**, ३लिं० ईषत् भुरका जो वर्ण तो आणित द्विशिष्ट जो तो; २, अ० स्वच्छपणें न दिसे असें दृष्टीचा, अंधकार, किं० दूरस्थितत्व इ० कारणामुळें अंधक अंधक दिसण्याचें वि०.

**भुरकण**, न०रा० व्याघ्राचा शब्द; २, रडण्याचा वेग बळानें जो आटोपून धरिला असतो तो अकस्मात् बाहेर पडल्यामुळें जो मोठा शब्द होतो तें.

**भुरकणें**, कढी, खीर, इ० पातळ पदार्थ भुरका मारीत खाणें; २, रा० व्याघ्रानें स्वजातीय शब्द करणें; ३, न० केवळ कोंवळें जें गवत हालें तें.

**भुरकन, कर, दिशीं**, अ० भरकन पर्यायः.

**भुरका**, पु० कढी, खीर, इ० पातळ पदार्थांचें हस्त, चमच्या, इ० कांपासून शब्द होई असें मुखानें जें आकर्षण तो, मार, घे, धातुयोगीं प्र०; २, भगवतीद्वितीयार्थः; ३, संकेतानें एक जो रुपया त्यास म्ह०; ४, ३लिं० एक वर्ण आहे; ५, तद्विशिष्ट जें जल, केश, इ० तो.

**भुरकाड**, न० दे० जेथें पाणी टिकत नाहीं अशी जी माळजमीन तें.

**भुरकाडी**, स्त्री० दे० कावळकाठी प्रा० अनेकवचनांत प्र०

भुरकी, स्त्री॰ घोड्याचे नेत्रादिसर्वांग ह्याकांच्या जोगें जें शिवून आच्छादन वस्त्र केलें असतें ती.

भुरँगुली, स्त्री॰ भुरँगुलें, न॰ कों॰ भात, इ॰ कांची लाही.

भुरदंड, पु॰ दुसऱ्याच्या कांहीं जिनस आपणापासून हारवल्या किं॰ जामीनगत, इ॰ व्यवहार कांहीं अंगास आला इ॰ कारणामुळें नाहकजें द्रव्यादि भरावें लागतें तो.

भुरभुरा, ३ लिं॰ भुरभुरीत.

भुरभुरीत, ३ लिं॰ भुरभुर जळायाजोगें हलकें जें लांकूड, गोंवरी, तृण, इ॰ ती.

भुरभूर, अ॰ अनु॰ हलका, तत्वांशरहित, जो तृण, काष्ट, इ॰ पदार्थ त्याचें जें झराझर जळणें त्याचें वि॰ २; एकत्र जमलेल्या मनुष्यांनीं अकस्मात् तळ मोकळा पडायाजोगें एकाचे मागून दुसरा निघाला, दुसऱ्याचे मागून तिसरा निघाला, अशाप्रकारें अन्यत्र जाण्याचें किं॰ कोणेक तळ भरला जावयाजोगें अन्यस्थलापासून तादृश येण्याचें वि॰; उ॰, पत्रावळींचा फड मांडतांच भोजन भाऊ भुरभूर निघोन गेले आणि पात्रें मांडतांच भुरभूर जमले-काय सांगावें.

भुरली, स्त्री॰ रा॰ एक चिमणीसारखें परंतु मोठें असें पांखरूं आहे ती.

भुरलें, न॰ कों॰ भात बहुत दिवस ठेविलें असतां आंत सपक्ष क्षुद्र प्राणी उत्पन्न होतो तें.

भुरवणें, न॰ कों॰ जमीन चोपायाचें मोठें जें चोपणें तें.

भुरशी, स्त्री॰ कों॰ बुरशी २; भूयसीचा अपभ्रंश.

भुरळणें, छिद्र मोठें होण्यासाठीं आंत खिळा इ॰ घालून त्याचे फिरविण्यानें भोंतालच्या परिधि घांसणें.

भुरळ, स्त्री॰ भुरळें.

भुरळें, न॰ कोणी आपल्यावर मंत्रप्रयोग किं॰ गोडगोड भाषण, आर्जव, इ॰ केल्यामुळें केवळ तत्पर वश व्हावें असा पडतो जो मोह तें.

भुरा, ३ लिं॰ कों॰ भोरा.

भुरी, स्त्री॰ कों॰ लांकूड, गोंवरी, इ॰ कांची सफेत राख ती.

भुरुभुरू, अ॰ भुरभूर.

भुऱ्यावणें, रा॰ हुरळणें.

भुऱ्यो भुऱ्यो, अ॰ रा॰ करणें धातुयोगीं प्र॰ भुऱ्यावणें.

भुलणें, कैफ, संपत्ति, इ॰ कांच्या योगानें बेशुद्ध होणें; २, कांहीं पदार्थ चांगला असा वाटे त्यामुळें कर्तव्याकर्तव्यादिविचार सुटून त्याजवर केवळ लुब्ध होणें.

भुलताप, भुलथाप, स्त्री॰ दुसऱ्यास निश्चय आपलें कार्य होईल इ॰ रूप भरंवसा यावयाजोगा कोणी करता जो खोटें भाषण, खोटा लेख, इ॰ रूप कपटाचार ती, देणें धातुयोगीं प्र॰; उ॰, तुम्ही पुढें चाला, मागाहून मी आलों अशी मला भुलथाप देऊन निघोन गेला.

ला.

**भुलवण**, स्त्री॰ रा॰ भुरळ.

**भुँवई**, स्त्री॰ भंवई.

**भुवन**, न॰ भूलोकादि चतुर्दश किं॰ वैकुंठ, कैलास, इ॰ जे देवतांचे जे पृथक् पृथक् अनेक लोक आहेत ते प्र॰, इंद्रभुवन, कैलासभुवन इ॰ स॰.

**भुँशी**, स्त्री॰ कों॰ भुसकट.

**भुँसकट, भुसकट**, न॰ धान्यराशींत त्याचेल गंवताचें बारीक असतें जें चूर्ण तें तेथून पृथक् केलें असतांही प्र॰ होतें; २, तत्सदृश काष्ठ, तृण, इ॰ कांचें परस्पर घर्षण, किडा, भुंगा, इ॰ कानीं कोरणें इ॰ कारणामुळें पडतें जें चूर्ण तें.

**भुसकटा**, पु॰ कों॰ भुसकट.

**भुसकण, कन, कर, दिन, दिनी, दिशीं**, अ॰ अनु॰ बसविलेला सांधा किं॰ छिद्रांत बसविलेली खुंटी इ॰ विशेष बळ न लागतां झपकण निघणें किं॰ छिद्र इ॰ अडचणीचे जाग्यांत विशेष प्रयास न लागतां कोणेकानें झपकन शिरणें इ॰ कांचें वि॰.

**भुँसकूट, भुसकूट**, न॰ भुसकट.

**भुसडा**, पु॰ बहुत घुसडल्यामुळें किं॰ बहुत श्रम पडल्यामुळें शरीर, वस्त्र, इ॰ कांचा चुरा झाला सा वाटायाजोगा होतो जो जर्जरपणा तो, पडणें धातुयोगीं प्र॰.

**भुसभुशीत**, ३ लिं॰ ज्यामध्यें चिक्कणता, काठिन्यांश, नाहीं असा जो ज़मीन, माती, दगड, इ॰ पदार्थ तो.

**भुँसा, भुसा**, पु॰ भुसकट; २, भुसडा.

**भुसाडा**, पु॰ भुसडा.

**भुँसार, भुसार**, न॰ क्रयविक्रय व्यवहारीं धान्य, आणि तृण, एतद्रूप जो माल तें; २, भुसारी लोकांचा जो समुदाय तें.

**भुसारमाप**, न॰ अधोली, पायली, इ॰ जें मापायाचें साधन तें भरलें भरलें नाहीं अशा प्रकारें कोणी धान्याचें घालितो जें माप तें.

**भुसारी**, पु॰ धान्याचें दुकान घालून किरकोळ धान्य विकणारा जो उदमी तो; २, कों॰ भोंवरगांवीं धान्य खरेदी करून पेठेंत नेऊन विकतो किं॰ भात, तुरी, इ॰ धान्य विकत घेऊन त्याचें तांदूळ, डाळ, इ॰ करून विकीत असतो असा जो उदमी तो; ३, कांदा, लसूण, गूळ, तूप, इ॰ अनेक किरकोळ जिनसाचें दुकान घालून विकणारा जो उदमी तो.

**भुळभुळाँ**, अ॰ सारवर, माती, वाळू, इ॰ शिथिल होऊन वाहणें, गळणें, इ॰ कांचें वि॰; २, भिळभीक.

**भुळभूळ**, अ॰ भुळभुळाँ.

**भू**, स्त्री॰ सं॰ पृथ्वी; भूपति, भूलोक, भूचर, भूदान, इ॰ स॰; २, ज्यापासून जो उत्पन्न झाला जो तद्रू; उ॰, अग्नीपासून उत्पन्न तें अग्निभू स्वर्ण, पद्मभू ब्रह्मा, मनोभू काम, इ॰.

**भूक**, स्त्री॰ जठराग्नीस आंत पचन करायास कांहीं अन्नादि नाहीं सें झाल्यामुळें अन्नादि भक्ष

वें सें वाटायाजोगा जो दुःखरूप कलनाविशे-
षउत्पन्न होतो ती;२, ला॰ कोणेकपदार्थ घेणें मिळविणें इ॰ विषयीं इतका,किं॰ एवढा, मिळाला म्हणजे मलापुरे अशी कोणेक अवधि पर्यंत असल्येजी इच्छेची धांव ती;३लिं॰ भुकेचामोटला, पु॰ भूक लागली असतां ज्याचा नें कंठ वत नाहीं तो, म्ह॰, भूकेस कोंडा आणि निद्रेस धोंडा, भूकेंमरणें म्ह॰ उपाशीं मरणें.

भूकंप, पु॰ धरणीकंप.

भूकलाडू, पु॰ प्रवासाचे मार्गीं क्षुधानिवारणार्थ जे लाडू इ॰ फराळाचें घेतात तो याचा गोष्ठ इ॰ कांमध्यें प्र॰; उ॰, तो राजपुत्र भूकलाडू, तान्हलाडू आईनें दिले ते घेऊन परदेशास निघाला.

भूगोल. भूगोळ, पु॰ पृथ्वीरूप जो हा गोळा आहे तो

भूज, स्त्री॰ भुज प्रथमार्थीं.

भूत, पु॰ देवयोन्यंतर्गत एकजातिविशेष आहे;२, न॰ पिशाच द्वितीय तृतीयार्थीं; ३, पृथ्वी, उदक, तेज, वायु, आकाश, हीं प्र॰; ४. विश्वांतःपाती जे चेतनाचेतन सर्वपदार्थ ते प्र॰; उ॰, सर्व भूतीं ईश्वर भरला आहे; ५, दुफांशी सोंगट्याचे खेळांत उठून गेलेली सोंगटी पुनः जी जिवंत होत्ये ते; ६, ३लिं॰ पूर्वी होऊन गेलेला जो काळ तो किं॰ त्या काळच्या व्यवहार, गोष्ठ, इ॰ तो; उ॰, गेला एथें ला प्रत्ययांत क्रियेनें भूतकाळाचा बोध होतो; उ॰, भूतगोष्ठ कशास सांगतां आतां करून दाखवाल तर मौज; ७, यदात्मत्वें करून जो विवक्षिला तो तद्भूत; उ॰, कार्याचे उपादान भूतद्रव्याचे अंगीं जे जे गुण असतात ते ते कार्यावर अनुवृत्त होतात.

भूतखेत, न॰ संबंध, झोटिंग, इ॰ तें.

भूतचेष्टा, स्त्री॰ मनुष्यादिकांस शारीर बाधा व्हावी, अंतःकरणास भ्रम व्हावा, ठेवल्याजाग्यावरून पदार्थ अकस्मात् नाहींसा व्हावा, गाला या, इ॰ होण्याविषयीं कारणीभूत जी त्यात्या कार्याव रून अनुमेय पिशाचाची कृति ती.

भूतदया, स्त्री॰ प्राणिमात्रावर जी दया ती.

भूतपूर्व, ३लिं॰ विद्यमानकाली विवक्षित स्वरूप न व्हे परंतु पूर्वी विवक्षित स्वरूप होता जो तो; उ॰, सांप्रत तुमची फडणिशी गेली परंतु फडणीस असें भूतपूर्व नाव चालतें आहे.

भूतप्रेत. न॰ भूतखेत.

भूतबाधा. स्त्री॰ मनुष्यादिकांस भूतकृत जी बाधा ती.

भूतल, भूतळ, न॰ पृथ्वीची पाठ.

भूतवेद्य, [illegible]

भूतसृष्टि, स्त्री॰ वस्तुतः ते ते पदार्थ नसतां कोणेक पिशाच आपले सामर्थ्यानें ग्राम, हत्ती, घोडे, बाजार, इ॰ कितीएक पदार्थ जे क्षणमात्र दाखवितो ती; [illegible], यासृष्टींतील पिशाचें म्हणून जें एक प्रकरण ती; २, पंचमहाभूतांची किं॰ त्यापासून मनुष्यादि देहाची जी ईश्वरानें केली उत्पत्ति ती;४, भूतचेष्टेनें अकस्मात् अविरिक्त उत्पन्न होतें [illegible] अकस्मात् [illegible] असें [illegible] गोचीड, पिसू, [illegible] त्यास म्ह॰

भूदेव, पु॰ ब्राह्मण.

भूधर, पु० पर्वत; २, शेषसाणून गर्पतो.

भूप, पु० राजा; २, भूपकल्याण.

भूपकल्याण, पु० कल्याणरागामध्यें एक भेद आहे.

भूपाल, भूपाळ, पु० राजा.

भूपाळी, स्त्री० एक रागिणी आहे; २, त्यारागावर पहांटेस सणायाचीं गाणीं असतात तीं प्र०.

भूभा, स्त्री० भूमीची छाया ती जी चंद्रावर पडली असतां चंद्रास ग्रहण लागतें.

भूभार, पु० पातकीजन बहुत झाले असतां त्यांचा या भूदेवतेस होतो जो भार तो.

भूमंडल, न० पृथ्वीचें जें हें गोलाकार शरीर तें.

भूमि, स्त्री० पृथ्वी; २, भुई.

भूमिका, स्त्री० सं० भूमि; २, नाटकामध्यें राजादिकांचीं येतात जीं सोंगें तीं प्र०; ३, कर्मयोग इ० जे भगवत्प्राप्तीचे मार्ग त्यामध्यें उत्तरोत्तर चढत्या जो अधिकार पदवी आहेत त्या प्र०; उ०, आपण या कर्मभूमिकेंत आहों तोंपर्यंत सर्व कर्म केलें पाहिजे.

भूमिशयन, न० भूमिशय्या, स्त्री० खाटलें, पलंग, माचा, इ० कांवाचून केवळ भूमीवरच जें करितात शयन तें तो कंबलादि अल्पस्वल्प आस्तरण असतांही प्र० होतो.

भूय, स्त्री० भुई.

भूयसी, स्त्री० पुण्याहवाचनादि कर्म केलें असतां तसांगतार्थ एकदांच उत्सर्ग करून अनेक ब्राह्मणास जी दक्षणा वांटितात ती.

भूर, स्त्री० कों० नेत्राचे [illegible] वर येतो जो सारा ती.

भूर्ज, पु० एक वृक्ष आहे.

भूर्जपत्र, न० भूर्जवृक्षाची कागदासारखी जी साल निघत असते तें.

भूल, स्त्री० मादक पदार्थाचा मद चढल्यामुळें अंतःकरणास येतो जो बेशुद्धपणा तो; २, कोणेक प्रसंगीं बरें कोणतें, वाईट कोणतें, करावें कोणतें, न करावें कोणतें, इ० विचार नस्फुरतां अन्यथा प्रवृत्ति निवृत्ति व्हावया जोगें बुद्धीवर पडतें जें अज्ञानाचें आच्छादन तो, घाल. पड, इ० कांचे योगीं प्र०.

भूलोक, पु० भूमिरूप जो हा लोक तो.

भूषण, न० शोभार्थ शरीरादिकांच्याठायीं धारण करितात जो सुवर्णरत्नादिनिर्मित अलंकार तो; २, जें लोकामध्यें स्वतः शोभतें आणि स्वसंबंधी जो त्यासही शोभवितें, प्रतिष्ठेस चढवितें, अतएव भूषण सदृश मानलें जें विद्या, कला, विनय, इ० गुण, पराक्रमादिकर्म, इ० जें कांहीं एक त्यास स्म०; उ०, विद्या हें पुरुषाचें भूषण आहे; पुत्राचा पराक्रम मातापितरांस भूषण होतें; ३, त्या विद्यादि भूषणानें येतें जें भूषितत्व तें; उ०, तुह्मास लोकानीं चांगलें ह्मटलें असतां तेणें करून आह्मास भूषण आहे; ४, ग्रंथ, वाक्य, इ० कांचा विवक्षित गुणाचा आधानानें कोणी करितो जें मंडन तें; उ०, सज्जनापुढें कसें हा वाक्य बोललें असतां तो त्याचें भूषण करितो.

भूषविणें, कांहीं एक अर्थ अलंकारादिकें करून सुशोभित करणें.

भूषा, स्त्री० सं० भूषण.

भूषित, ३लिं० भूषविला तो.

भूस, भूंस, न० भुसकट; २. भुसडा; ३. भसा रप्रथमार्थ.

भ्रुकुटी, स्त्री० भ्रूमध्यांत क्रोधादिकारणामुळें पडत्येजी आठी ती; २. भिवईस कोणी ह्म०.

भृंग, पु० भ्रमर.

भृंगराज, पु० माका ह्मणून औषधी आहे ती.

भृंगिराज, पु० भृंगराजाचा अपभ्रंश. कोणेकानें भृंगिराज होणें ह्म० एकपिसानें मोर होणें.

भृंगी, भृंगा, स्त्री० ज्ञानवल्ली.

भृगु, पु० सं० ऋक्ष प्रथमार्थ; २. पर्वतादिकांचा उंचतुटलेला जो कडा तो.

भृगुपात, पु० सं० डोंगरावरून करून येतातजो कडेलोट तो.

भृगुवार, पु० शुक्रवार.

भृति, स्त्री० सं० वेतन.

भृत्य, पु० चाकर.

भें, न० भय.

भेंकड, ३लिं० भित्रा.

भेंकर, भेंकरें, न० एकमृगविशेष आहे.

भेंकाड, न० कों० भोंकाड.

भेंकूड, ३लिं० भेंकड.

भेग, स्त्री० भूमी, काष्ट, पाषाण, पाय, हात, इ० कांस पडत्येजी चीर ती.

भेगळणें, भूम्यादिकानीं भेगानीं विशिष्ट होणें

भेजूड, ३लिं० कों० चौघांत बोलायास चालायास जाला धैर्य नाहीं तो.

भेट, स्त्री० गमनानें कोणेकाचा कोणेकापाशीं परस्पर बोलणें चालणें, इ० व्हावयाजोगा होतोजो सामीप्य संबंध ती; प्रा० चेतनवृत्ति. अचेतन विषयीं क्वचित् प्र० होतो; उ०. लोहचुंबकाची आणि लोखंडाची भेट झाली ह्मणजे लोखंड त्यास चिकटतें; २. मित्रमित्रादिकांची चिरकालें करून गांठ पडली असतां परस्पर देतातजें आलिंगन तो; ३. प्रभू सुभेदार इ० कांस भेटावयास गेलें असतां भेटतेसमयीं जें फळ, द्रव्य, वस्त्र, यान इ० कांहीं अर्पितात तो. किं० प्रभु, शिष्ट, मित्र, आप्त, इ० कांस स्नेहाभिवृध्यर्थ जो फलादि कांहीं अपूर्वाईचा पदार्थ पाठवितात ती.

भेटणें, कोणेकानें कोणेकाशीं भेट ह्मणून जो संबंध तद्विशिष्ट होणें; २. चिरकालें करून गांठ पडल्यामुळें एकमेकाचे आलिंगनानें परस्पर विशिष्ट होणें; ३. धनी, चाकर, सावकार, कूळ, वादी, प्रतिवादी, दादला, बायको, इ० जे परस्पर संबंधी त्याणीं त्या संबंधिरूपें करून स्वसंबंध्यास उपलब्ध होणें; उ०, मला जेव्हां कोणी विचारणार भेटेल तेव्हां सांगेन. मला जेवढें कूळ भेटलें तेवढें स्वष्ट ह्म० जशास तसा भेटे आणि मनच्या संशय फिटे.

भेटवकरा, भेटवकरें, पु० न० सुभेदार, मामलेदार, इ० कोणी आपले गांवीं आला असतां त्यास गांवचे अधिकारी पा

पाटील, खोत, इ॰जी इत्यादिरूप भेट देतात तो तें; २, लग्नांत रास न्हाण्याचे वेळेस वरमाईस द्यावयाचा मान आहे.

भेटाभेट, स्त्री॰ अनेकांचा परस्परें भेटण्याचा जो व्यापार ती किं॰ एकाचाच कोणेकाशीं आलिंगन कुशलप्रश्न इतकाजो व्यापार ती; २, स्पर्शास अयोग्यता इ॰ कांहीं विवक्षित असतां केवळ स्पर्शमात्रास ही प्र॰ करितात; उ॰, त्यासुतक्याची माझी भेटाभेट झाली आतां स्नान केलें पाहिजे.

भेंड, न॰ भोंस, बोरू, जोंधळ्याचें तांट इ॰कांचे पोटीं केवळ मृदु असतो गर तें; २, ला॰ केवळ हलकें ज्यांत तत्वांश नाहीं असें जें लांकूड त्यास म्ह॰; ३, रा॰ नेत्रसंबंधी जो मळ नेत्रकोणांत जमत असतो तें.

भेंडणें, आट्यापाट्या इ॰खेळांत भेडतूनियाव याचें जे गडी त्याणी आपल्यामध्यें दोन विभाग करून त्यास नामादि संकेत ठेऊन भेडतूकडे जावयास दोघा दोघानी मिळणें.

भेडतू, पु॰ विटीदांडू, आट्यापाट्या, इ॰ खेळांत प्रथम गडी वांटून घेतेसमयीं जे दोन फळ्यांत दोन नायक होतात ते प्र॰.

भेडसावणें, भिवविणें.

भेंडा, पु॰ भिंत इ॰कांचे उपयोगी चिखलाचा वरंबा रचून त्याचे जे अनेक तुकडे पाडितात ते प्र॰; २, एक भाजी करायाचे उपयोगीं फळ आहे तो, आणि त्याचें झाड.

भेडावणें, भेडसावणें.

भेंडाळें, न॰ भेंडोळें.

भेंडी, स्त्री॰ भेंडा द्वितीयार्थ २; २, एक वृक्ष आहे; ३, यानावाचा आरण्यक दोन चार प्रकारचा औषधी आहेत त्या प्र॰.

भेंडोळें, न॰ सूत, दोरी, कागद, इ॰ गुंडाळून केलें जें मोठें गुंडाळें तें.

भेणें, अ॰ य॰ भयानें; उ॰, तो व्याघ्राचे भेणें लपाला.

भेत, न॰ स्त्री॰ रा॰ फणस, भोंपळा, पेरू इ॰फळ किं॰ लांकडाचा ओंडा इ॰उभा फोडिला असतां होतात जा अनेक फांकळ्या त्या प्र॰.

भेतलणें, रा॰ फणस, भोंपळा, लांकूड, इ॰उभ्या भेगानीं विशिष्ट होणें.

भेतळा, पु॰ रा॰ भितळा.

भेतूक, न॰ रा॰ फणस इ॰ फळाची लहानशी जी भेत तें.

भेद, पु॰ परमाण्वादिरूप जे अनेक अवयव ते परस्पर संबद्ध होऊन झालेला जो विशिष्ट अवयवी त्याचा ज्यांत शस्त्रादिकांचें शिरणें इ॰ कारणानें होतो जो त्या अवयवांचा ठायीं परस्परें वियोग तो; उ॰, योग्याचा प्राण मस्तकाचा भेद करून जातो; २, अर्थमात्रावर परस्परें भिन्न भिन्नत्वें करून भान होण्यास कारणीभूत जें वैधर्म्य असतें तो; उ॰, हीं दोन पागोटीं सारखीं म्हणतां पण कांहीं यास त्यास भेद आहे, कालचे बोलण्यास आणि आजचे बोलण्यास फारच भेद दिसतो; ३, कोणेक भेदकाचे

योगानें विशिष्टापासून विशेषाचा होतो जो निराळेपणा तो; उ०, एकानावाचे अनेक असले तरी उपनामे भेददारखविनानह्मणूनविशेषाचा बोधहोतो; ४, सामान्य धर्माक्रांताचे पोटचेजे अवांतर विशेष असतात ते प्र०; उ०, ब्राह्मणामध्यें दहा भेद आहेत; ५, कोणेक कार्याकडे प्रवृत्त असल्यें जी कोणेकाची अंतःकरण वृत्तिविंवा भयलोभादि प्रदर्शनानें करितातजो अन्यथाभावतो; उ०, हा मजपाशी चाकरीसराहण्याविषयीं कबूलझाला होता परंतु तुह्मी याचा भेद केला ह्मणून राहीमासा झाला; ६, कोणेकाव्यवहाराचे आंतील गुप्त बारीकजें वर्तमान तो; उ०. हा शाह्मणा आहे यास पाठविलें असतां त्याराज्यांतला भेदकाढून आणील.

भेदक, ३लिं० भेदकरणारें जें शस्त्र इ० तो किं० मनुष्यादिकांचे अंतःकरणाचा भेदकरणारा मनुष्य इ० तो किं० सामान्याचे पोटचेजें अवांतर विशेष अर्थ त्यांची पृथक्त्वें करून उपस्थिति होण्यास कारण जो गुणसंज्ञा खूण, मुद्रा, इ० तो.

भेदड, ३लिं० दे० भेकड.

भेदणें, काष्ठ, पाषाण, इ० पदार्थ शस्त्रादिकानें भेदविशिष्ट करणें; २, मनुष्य इ०-कांस बुद्धिभेदविशिष्टकरणें, उ०, किल्ल्याचा हवालदार भेदतांच किल्ला आला; ३, औषधादिक शरीरादिकांत भिनणें.

भेददृष्टि, स्त्री० हें माझें, हें दुसऱ्याचें, इ० किं० कार्य निराळें; कारण निराळें, इ० भेदविशिष्ट जी बुद्धि ती.

भेदन, न० भेदण्याचा जो व्यापार तें.

भेदबुद्धि, स्त्री० भेददृष्टि.

भेदरणें, चिरकाल अंतःकरणांत संस्कार रहायाजोगें भयानें विशिष्ट होणें.

भेदरा, पु० काणेक गोष्टीचे परिणामाविषयीं कसें होईल, काय होईल, इ० रूप पोटांत असतेंजें भय तो; २, भेदरल्यामुळें राहतोजो भयसंस्कार तो.

भेदवादी, पु० द्वैतवादी

भेदाभेद, पु० अनेक पदार्थ भिन्नभिन्नत्वें करून मानण्याविषयीं प्रयोजक जी जात्यादि धर्माची विद्यमानता तो; उ०, ब्रह्मस्वरूपीं कांहीं भेदाभेद नाहीं.

भेदी, पु० विवक्षित व्यवहारांतील गुह्यमर्मादिभेद ज्यांला ठाऊक आहे तो त्याव्यवहारांतील.

भेद्य, ३लिं० भेद्यायास योग्य किं० शस्त्र जो कांहींएक अर्थ तो.

भेद्या, पु० भेदी.

भेर, स्त्री० श० भेग; २, दे० देर.

भेरकट, ३लिं० श० बहिरट.

भेरड, पु० भिरड द्वितीयार्थः.

भेरलामाड, भेरलीमाड, पु० कों० सुरमाड.

भेरळ, भेरळीमाड, पु० कों० सुरमाड.

भेरा, ३लिं० श० बहिरा.

भेरी, स्त्री॰ मोठा जो नगारा.

भेल, स्त्री॰ कोणेक पदार्थांत पदार्थांतराचा असतोजो मिश्रितपणा तो;२, भेलण.

भेलकंड, न॰ उपोषणादिकानें शरीराच्या तो लसंभाळेनासा झाल्यामुळें जात्येजी शरी राची झोकांडी तें.

भेलकंडा, पु॰ भेलकंड.

भेलकंडी, स्त्री॰ भेलकंड.

भेलगा, पु॰ (उतरणें) वातादिविकारानें वृ- षण मोठा होऊन खाली लोंबूंलागे असा, वृषणाचा आधारबंध शिथिल होणें.

भेलण, न॰ रा॰ कोणेक पदार्थांत मिश्रित- होतें जें पदार्थांतर तें.

भेलणें, कों॰ कोणेक पदार्थांत पदार्थांतर मिसळणें.

भेली, स्त्री॰ गुळाचा लहान लहान बांधिल्या असतात जा वड्या, गोळे, इ॰ ती.

भेश, पु॰ कों॰ वेष.

भेष, पु॰ वेष.

भेषज, न॰ सं॰ औषध.

भेस, पु॰ कों॰ वेष.

भेसूर, ३लिं॰ भयंकर.

भेळ, स्त्री॰ कों॰ भेल.

भेळणें, कों॰ भेलणें.

भैरव, पु॰ एकदेव आहे, भैरवाचीसेवाम्ह॰ बहिरोबाचीसेवा;२, गाण्यांत एकराग आहे;३, एकस्त्रियांचें कर्णभूषण आहे; ४, भयंकर.

भैरवजोगी, पु॰ कानफाटा पीसांबी.

भैरवी, स्त्री॰ एकरागिणी आहे.

भैरवीयातना, स्त्री॰ काशींत जो मरण पावला त्याचे पदरीं असतें जें पातक त्या चे निरासार्थ रुद्रपिशाच योनीपासून जी यातना भोगावी लागत्ये ती.

भैरीवेथा, स्त्री॰ रा॰ बहिरीव्यथा.

भैरीससाणा, पु॰ बहिरीससाणा.

भोई, पु॰ डोली, पालखी, इ॰ यान वाहूनउ पजीविका करणारा जो पुरुष तो;२, ए कजाति आहे तिचीहि पालखी इ॰ यानें वहावें पेट्यानें माणसें नदीपार उतरावीं, मासे मारावे, इ॰ वृत्ति आहे;३, घोडे पाळ ण्याचे घोड्याचे जे दोहोंकडचे दोन विभा गते प्र॰;४, घोडेपाळणा टांगावयाकरि तां उभी करितात जीं चारकाष्ठें तीं प्र॰.

भोईखाना, पु॰ पालखी, पालखीचेभोई, इ॰रहायाचें जें घर असतें तो.

भोईराज, पु॰ पालखी इ॰ वाहणारे जे भोई त्यांस गौरवानें म्ह॰.

भोंक, न॰ छिद्र मुख्यार्थ॰, सावकारी इ॰ कोणेक व्यवहाराचें उपजीव्य जें द्रव्यादि पदार्थ त्यांची त्याव्यवहारांत लोकांचेबा हेर लक्ष्यांत न यावयाजोगी असते जी उणीव तें;उ॰, याचीबाहेर सावकारी मोठी दिसत्ये परंतु आंतसारें भोंक आहे ;२, ला॰ राज्यादि व्यवहाराचे ठायीं प्र- वेशास केलें जें द्वार तें;उ॰, याणें त्याद

रवारांत कोणी कडून भोंकपाडलें नकळे;
२ कों० कुत्र्याचा जो स्वजातीय शब्द तें;उ०
एथून तो गांव कुतऱ्याचे भोंक भरस्रांव-
आहे ; ४, रा० बहुत प्रयत्नानें रडें आटो-
पित असतां ही आटपेनासें होऊन जो भों
असा मोठा शब्द होतो तें ;उ०, यानें त्यानें
रडें गिळलें होतें पण आई दृष्टीस पडतांच
भोंकफोडलें.

भोंकण, न० रा० भोंकचतुर्थी.

भोंकणें, कट्यार,भाला, बर्ची, इ० कांचे अग्र-
प्रहारानें कोणेकास छिद्रविशिष्टकरणें
;२, कुत्र्यानें भुंकणें.

भोंकर, स्त्री० एक झाड आहे ;२, न० तिचें
फळ ;३, तोंगल.

भोंकरबाळी, स्त्री० तोंगलानें विशिष्ट एक बा-
ळी ह्मणून स्त्रियांचें कर्णभूषण आहे.

भोंकसणें, रा० वृक्षाचीडहाळी, शरीराचे
हातपाय, इ० अवयव मुळापासून मूळा
धाराचाही कांहीं त्वगाद्यंश नियोन येईअ
सें उपटणें.

भोंकसा, पु० रा० भोंकसल्यामुळें किं० वर
दोरी इ० कांचे घर्षण झाल्यामुळें वृक्ष, श
रीर, इ० कांचा निघून गेला जो लगंश तो
;२, ला० कोणेक व्यवहारांत बट्टा याबया
जोगें जातें जें कांहीं पदरचें द्रव्यादि तो;
३, भोंसका.

भोंकसा, पु० भिंत, वस्त्र, शरीर, इ० का
स पडतें जें मोठें भोंक तो, स्वतःसिद्ध-
किं० कांहीं कामासाठीं वेतानें पाडलें जें भों
क त्याविषयीं या० प्र० नाहीं.

भोंका, पु० कों० बोका.

भोंकाड, न० रुदनादि प्रसंगीं तोंडाच्या मो
ठ्या पसरतो जो आवाज निंदेनें स०;उ०, को
णी मारलें नसतां उगीच भोंकाड पसरून
रडतो स्नकशाला.

भोंकूं, पु० कों० डोळूं.

भोक्तव्य, १लिं० भोगाव्यास योग्य जें सुखदुः
ख किं० तज्जनक कांहीं विषय तो.

भोक्ता, १लिं० कोणेक विषयाचा भोगये-
णारा जो तो ;२, भक्ष्य भोज्य पदार्थ जाला
बहुत आवडतात आणि भक्षायाविषयीं
शरीर शक्ति अनुकूल असत्ये असा जो
पुरुषादिक तो ;उ०, आज चार पदार्थ चां
गले केले आहेत कोणी भोक्ता ब्राह्मण भो
जनास सांगा ;२, विद्या, कला, इ० कांचा
जो ग्राहक तो.

भोक्तृत्व, न० प्रारब्धयोगानें दुःख किं० सु
ख अवश्य भोगलेंच पाहिजे असा जो भो
गणारावर योग्यता विशेष असतो तें.

भोग, पु० सुखविषयक किं० दुःखविषय
क आत्म्याचाठायीं जो अनुभव तो ;उ०,
श्रीमंताचे योगानें सुखाचा भोग पुष्कळ
घेतला ;२, आत्म्याचाठायीं सुखदुःखा
त्मक अनुभव व्हावयाजोगा तत्तद्विष
यक र्मक खाणें, पिणें, नेसणें, पांघर
णें, लेणें, देणें, इ० यथायोग्य जो व्या

पार

पार तो किं॰ त्याव्यापारापासून जन्य आत्म्याचाठायीं अनुभूयमान होणारें जें सुखात्मक किं॰ दुःखात्मक फल तो ; उ॰, म्यां बतनाचा मी आजपर्यंत भोग केला, तुह्मी याजाल जोडीच्या आजपर्यंत भोग घेतलात ; ३, अवश्य भोक्तव्यत्वें करून भासतें जें प्रारब्ध कर्माचें फल तो ; उ॰, कायकरावें भोग असेल तितका भोगून सारला पाहिजे ह्म॰ भोग फिटे आणि वैद्य भेटे : ४, उत्तरोत्तर गतिविशिष्ट जे सूर्यादि ग्रह किं॰ कोणी क्रव्यवहार तत्कर्तृक देशरूप किं॰ कालरूप जो विषय त्यातें स्वगतीनें आक्रमून मागें टाकुण्याचा जो व्यापार तो ; उ॰, सूर्य मास तीस दिवसांत एका राशीचा भोग करितो, कोणेक गोष्ट भोगास येणें ह्म॰ दैवदशेनें भोगायास उपस्थित होणें. भोग देणें ह्म॰ पुरुषानें स्त्रीस किं॰ स्त्रीनें पुरुषास मैथुन सुख देणें.

**भोगणें**, कोणेक अर्थ भोग विषय करणें ; उ॰, प्रारब्धकर्म भोगल्यावांचून सुटत नाहीं, कर्मास कर्तृत्व मानिलें असता त्या कुळाकडून पंचवीस रुपये व्याज भरल्यास भोगलें इ॰ रूप प्र॰ होतात.

**भोगवटा**, पु॰ क्षेत्र, ग्राम, इ॰ कोणेक विषयाचे भोगाची काहीं काळ कोणाकडे चालली असल्येजी वहिवाट तो, जाला विवाद प्रसंगीं साधनचतुष्टयांत गणितात.

**भोगविडा**, पु॰ मकरसंक्रांतीस स्त्रिया नईन उपानें, नईनईरूपान्या, इ॰ यांतून नईविडे नईब्राह्मणांस किं॰ नऊसुवासिनीस प्रतिवर्ष देतात ते प्र॰.

**भोंगूळ**, ३लिं॰ ज्यामध्यें असावा तसा यदृपणा काहीं असे जें नेसणें, पागोटें, बांधलेलें इ॰ तो किं॰ नेसणें, पागोटें, इ॰ सरळ नाहीं असा जो मनुष्य तो किं॰ तादृश त्याचा राईल जो कारभार तो.

**भोंगळणें**, कों॰ गांठोडें, तृणाचा भारा, इ॰ ढिलावणें.

**भोंगळभट**, पु॰ पोकळभट.

**भोंगळी**, स्त्री॰ स्त्रियांसही शिवी देत असतात.

**भोगळी**, स्त्री॰ कों॰ बाहेरचें पाणी शेतांत घ्यावयाकरितां किं॰ शेतांतील पाणी बाहेर दवडायाकरितां पोखरलेला माड इ॰ कांचा नळ करून जो शेताचे बांधांत घातला असतो ती.

**भोगी**, ३लिं॰ निरंतर पुष्पें, चंदन, स्त्रिया, वस्त्रालंकार, इ॰ विषयांचा उपभोग करीत असावा असा जो पुरुषादिक तो ; २, पु॰ सर्प ; ३, स्त्री॰ मकरसंक्रांत आणि कर्कसंक्रांत यांचे जे अदलेदिवस ते प्र॰ ; ४, नरकचतुर्दशीच्या जो अदला दिवस त्यासही कवित् ह्म॰.

**भोग्य**, न॰ भोगवटा ; २, ३लिं॰ ग्रहादिकानें भोगायाचा राहिलेला जो चक्रांश, दशा

ग इ० तो; ३, स्वरूपतः किं० फलद्वारा भोगायास योग्य जो वस्तु, क्षेत्र, इ० पदार्थ तो उ०, कांहीं भोग्यवस्तु जर गहाण ठेवशील तर व्याज हलकें पडेल.

भोग्या, पु० अंधळी कोशिंबिर, इरगी मिरगी इ० खेळांत सर्वांनीं येऊन त्यास शिवावें असा जो मनुष्य, दगड, खांब, इ० संकेतित केला असतो जो पदार्थ तो.

भोजन, न० जेवण, भोजनखर्च, भोजनवेळ, इ० इष्टभोजन, आम्रभोजन, ब्राह्मणभोजन, इ०स०.

भोजनभाऊ, पु० संसारसंबंधी कामकाज नकरितां काळजी नवाहतां केवळ भोजनार्थच जो मिळाला असतो त्यास म्ह०.

भोजनीय, ३ लिं० ज्यांस अवश्य भोजन द्यावें अशीं जीं मातापितरें, मुलें, अतिथि, इ० तो.

भोजन्या, पु० भोजनभाऊ.

भोजी, ३ लिं० जो जा पदार्थाचें भोजन करितो तो तद्भोजी, कदन्नभोजी, अमृतभोजी, इ० स० प्र०.

भोज्य, न० भोजनास उपयोगीं भात, पोळी, लाडू, पक्वान्न, इ० जो पदार्थसमुदाय तें.

भोंड, स्त्री० भोंवळ; २, न० जोंधळ्यावरील जें गोड तें.

भोंडगा, पु० कों० निंदनें भंडाऱ्यास म्ह०.

भोंडला, पु० मुली आश्विनमासीं भिंतीवर हत्तीचें देवालय देवचित्रें काढितात तो; २, आणि त्यापुढें जें नित्य गाणें गात असतात तो.

भोंडा, ३ लिं० कों० ह्यातारडा.

भोंडार, न० कों० ह्यातारखंड.

भोत, पु० धान्यादिक आंत भरून ठेवायाकरितां गोणपाट इ० कांचा जो मोठा थैला करितात तो; २. भाजल्या पोळल्यामुळें शरीरावरील निघोन जातो जो त्वगंश तो; ३, कों० केतकीचें जें दोर निघायाजोगें कोवळें मूळ तो.

भोंदणें, कपटानें आर्जवून किं० लोभवून किं० आपणांत मंत्रविद्या किमया इ० अद्भुत सामर्थ्य आहे असें दाखवून कोणेकास आपण म्हटल्याप्रमाणें वर्तायाजोगा स्ववश करणें.

भोंदू, पु० दुसऱ्यास भोंदण्याचा स्वभाव ज्याचा तो.

भोंपळदेवता, स्त्री० रा० भोंदढशापन्न अगदीं कांहीं लेकरासारिखें खेळ करित्ये जी स्त्री-तिला निंदावसरीं म्ह०.

भोंपळसुती, ३ लिं० ज्यांत बंदोबस्त ताहशा नाहीं आणि बारकाया नाहीं असा जो कोणेकाचा राज्य, सावकारी, व्यवहार, कारभार, इ० तो.

भोंपळा, पु० यानावाचीं दोन प्रकारचीं फळें आहेत तीं प्र०, हातीं भोंपळा येणें म्ह० भिक्षा मागून पोट भरायाजोगी दारिद्र्य दशा पावणें; २, विण्याचा जो डेरा तो.

भोंपळी, स्त्री० दोहों प्रकारचा ज्या भोंपळ्याचा वेली त्या प्र०.

**भोंपळीखरबूज**, न० खरबुजांतएक भेद-आहे.

**भोपा**, पु० ग्रामदेवता इ० कांचें पूजेसाठीं जो पुजारी अधिकृत केला असतो तो प्रां० शूद्र वृत्ति.

**भोप्या**, पु० भोपा.

**भोंबा**, पु०रा० बागूल, भोंबाकरणें ह्म० बाउकरणें.

**भोबा**, पु० कों० भोभा.

**भोबी**, स्त्री० कों० धणा, शूद्रभाषावृत्ति.

**भोंबूल**, पु०रा० भुंगा.

**भोभा**, पु० कों० उंडिणीचें किं० मोगलीएरंडाचें त्वचेसहित जें फळ तो; २, ला० केवळ कोंवळें लहान जें भोपळा, कोहळा, इ०फळ त्यास ह्म०.

**भोम**, न० कों० वारूळ.

**भोमवार**, पु० भौमवाराचा अप०.

**भोमाड**, न० कों० भोम.

**भोय**, स्त्री० दे० भुई, भुईशब्दपूर्वक जसे जितके शब्द झाले आहेत तसे तितके एतच्छब्दपूर्वक भोयकोट, भोयमूग, इ० शब्द होतात.

**भोयार**, न० भुयार.

**भोंर**, २लिं० डोह इ० कांतील जें पाणी किं० डोकी, मिशी, इ० संबंधी जे केश किं० कांहीं पदार्थ त्याचे काळेपणाचें अतिशयद्योतकविशेषण.

**भोरकडी**, स्त्री० भोंवरकडी.



**भोरपी**, पु० कोल्हाटी; २, कळसूत्री, खांबसूत्री, दशावतार, इ० भोरीपकरून उपजीविका करणारा तो.

**भोरा**, ३लिं० गौर आणि रक्त हे वर्ण एकत्र झाले असतां जो एक निराळाच वर्ण होतो तो किं० तद्विशिष्ट जे केंस, गदूळपाणी, हेस इ० पशू इ० तो.

**भोरीप**, न० कळसूत्र, खांबसूत्र, इ० कानीं बाहुलीं नाचवून किं० नाड्यावरचढणें इ० केंकरून किं० दशावतारादिसोंगें आणून जो खेळ करितात तें; २, ला० पोरें इ०कानीं मनस्वीपणें खेळाचें, नाचावें, उड्या माराव्या, असा जो व्यापार चालला असतां त्यास ह्म०.

**भोरूप**, न० भोरीप.

**भोंयई**, स्त्री० मुंबई.

**भोंवड**, स्त्री० भोंवळ.

**भोंवडणें**, कांहींएक पदार्थ मंडलाकार-फिरविणें; २, कों० कोणेक मनुष्यादिकास अनेकमार्गांनी इकडून तिकडे तिकडून इकडे अशाप्रकारें हिंडायास लावणें; उ०, याघोड्यानें मलापाठीमागून चारकोस भोंवडलें न तेव्हां सांपडला.

**भोंवणें**, कोणेक पदार्थानें मंडलाकारफिरणें; २, पित्तादिकामुळें डोळे, कपाळ, इ० भोंवतें असे वाटाया जोगे विकृतीनें विशिष्ट होणें; उ०, यापर्वतावरून खालीं पाहिलें असतां डोळे भोंवतात; ३, दुरवणें,

मरण, इ० संकट किं० तत्कारणी भूत-
जें अपथ्य दुष्कर्म इ० तें भोगद्वारा अवश्य
निस्तारायास पडे अशारूपें कोणेकावर
पडणें; उ०, तीचोरधाड वरकडांस सोडून
त्यागरिबास भोंवली, कालदहीं खाल्लें तें
मला भोंवलें लागलेंच पडसें आलें तें संक
टादिं अनेकांस भोंवण्याची संभावना अ
सून कांहीं एकास सोडून कांहींकास भों
वलें असतां भोंवतां या अर्थी व्ययाचाप
क्षीं योगहोतो; उ०, सर्वांनीं व्यवहारके
ला पण मज भोंवता मात्र भोंवला.

भोंवता, अ० कोणेक पदार्थाचें जें परिधिसू
त्र त्याचे अनुलक्ष्यें करून; कोणेकानें को
णेकाचे भोंवताल्लागणें ह्म० उपद्रवदाय
कलेंकरून पाठीस लागणें.

भोंवताल्च्या, ३लिं० कोणेक पदार्थाचे भों
वताजो स्थित तो.

भोंवताला, अ० भोंवतां.

भोंवती, स्त्री० रा० देवळाचे मुख्य गाभाऱ्या
चे भोंवताली बाहेरचे भिंतीचे आंत प्रद
क्षिणादिक करायाजोगी जी जागा ठेविली
असत्ये ती.

भोंवतीं, अ० भोंवता.

भोंवर, पु० कों० भुंगा.

भोंवरकडी, स्त्री० दांवें. इ० कांचे दोन अव
यव दोहींकडे बांधले असतां ते अवयव-
भोंवडले असतां ही पीळ न पडायाजोगी
जी लोहादिकांची कडी मध्यें बांधायास
करितात
करितात ती.

भोंवरगांव, पु० विवक्षित पत्तनादि ग्रामाचे
भोंवतालचे जे गांव ते प्र०.

भोंवरा, पु० काष्ठादिकांचा वर्तूळ फिरविला
असतां भोंवन रहायाजोगा एक क्रीडासा
धन पदार्थ केला असतो तो; २, नद्यादि-
कांचाठायीं उदकांचें जेथें मंडलाकार भ्र
मण होतें तेथें जो आकार विशेष होतो तो
३, शरीरावरील केंसांचा जो मंडलाकार
तो; ४, भोंवरी ह्मणून वेल आहे तिचें फळ
तो; ५, धुळींत वाटोळी खळी करून त्यांत
राहतो असा एक क्षुद्रप्राणी आहे तो; ६,
शेंडीचे भोंवता राखितात जो केंसांचा घेरा
तो, कोणेकाचे पांयावर भोंवरा पडणें ह्म०
त्याणे एकत्र न बसतां सर्वकाळ हिंडत अ
सणें; ७, क्वचित् भ्रमरास ह्म०; ८, गोमहि
ष्यादि पशूंचे त्वचेस तृणादिस्पर्श झाला अस
तां त्यास्थलीं होतें जें स्फुरण तो.

भोंवरी, स्त्री० यानावाचा दोन वेली आहेत
; २, पांयांचा तळवा इ० कांचा ठायीं कां
टा लागणें इ० कारणामुळें कातडी जाड
होऊन जो मंडलाकार होतो ती; ३, रा० क
णेकडाची अग्रें रुखावर जास्थलीं टेंक
लीं असतात तीं स्थलें प्र०; ४, खेळे इ०
नृत्य करित असतां मंडलाकार जें भ्रमण
करितात ती, या अर्थी मारणें, येणें, इ०
कांचे योगी प्र०.

भोंवळ, स्त्री० पित्तादिविकृतीनें येत्ये जी
घेरी

घेरी ती. कोणेकाचा भोंवळ जिरणें ह्म० को हांपिश्यादि मास झाल्यामुळें बलादिकृत द र्पोचा परिहार होणें.

**भौंवाडा**, पु० को० मार्गाचे वांकडेपणामुळें वि वक्षितस्थलीं जावयास जो फेरा तो.

**भौंवार**, स्त्री० को० तेल्याचा घाणा, बैल, रहा ट, इ० कांस जुपलेला बैल, टोणगा, इ० कां चा फिरायाची जी मंडलाकार वाटपडली असल्ये ती.

**भौंवारगाव**, पु० को० भोंवरगाव.

**भौंशाऊंस**, पु० को० ऊंसांतएक भेद आहे

**भौंस**, पु० भोंशाऊंस ;२, बरूसारखा एकतृ णविशेष आहे.

**भौंसकट**, **भौंसकटें**, न०ग० भोंकसा मथ मद्विलीयार्थ.

**भौंसकणें**, तरवार, भाला, इ० कांहीं एक पदार्थांत खुपसणें.

**भोंसकणें** रा० भोंकसणें.

**भौंसका**, पु०रा० भोंकसा.

**भौंसका** पु० भोंकसा.

**भोसकें**, न०रा० भोसकट.

**भोसकू**, पु० को० भोंकू.

**भौंसडणें**, फोदलणें.

**भौंसडपट्टी**, स्त्री० फोदलपट्टी.

**भौंसणें**, भोंसकणें.

**भौंसा**, पु०रा० भोंशाऊंस.

**भौंळ**, स्त्री० भोंवळ.

**भोळवट**, ३लिं० सुमाराचा जो भोळा मनु ष्य ती.

**भोळसर**, ३लिं० भोळवट.

**भोळसावणें**, रा० भोळावणें.

**भोळा**, ३लिं० ज्याचे मनांत कपट नाहीं आणि कोणेक गोष्ट पदार्थ बाह्यात्कारें ज्यारूपें क रून दिसती तेंचरूप त्याचें खरें अभ्यंतरीं कांहीं अन्यथाभाव असावा असें वाटत ना हीं अशा अंतःकरणाचा जो मनुष्यादिक- तो.

**भोळानाथ**, पु० महादेवास ह्म० ;२, प्रभुता दिथोरपणा अंगीं असून निष्कपट जो म नुष्य तो.

**भोळाभाव**, पु० सर्वांवर विश्वास ठेवून निष्क पटपणें वर्तण्याचा जो कोणेकाचा स्वभाव असतो तो ह्म० भोळा भाव सिद्धीस जाव.

**भोळावणें**, रा० कोणेकास लाभादि मदर्श नानें आपल्यावर विश्वास धरून आपण ह्मटल्याप्रमाणें वर्ते असा कांहीं स्वकार्य साधायाविषयीं करणें ;उ०, त्यामुलानें पो थीचें पत्र घेतलें आहे तें खाऊचा कांहीं दास वून त्यास भोळावून घे.

**भोळाशंकर**, पु० भोळानाथ.

**भोळें**, न० क्रयविक्रयादि व्यवहारीं गणती हिशेब इ० कांत दृष्टिचुकल्यामुळें एकमे काचें एकमेकाकडे अन्याय्य अधिक येतें- जें द्रव्यादिक तें ;उ०, हिशेब चुकून अस ल्यातर आणखी करून पहा मला तुझें भो ळें नको ;२, भुरळें ;उ०, एकगोसांवी का

ल आला होता त्याणें भोळें घालून दोन रुपये आणि पागोटें नेलें.

भोक्ष्यमाण. ३लिं० पुढें भोगायाचा जो काळ सुखदुःख इ० तो.

भौतिक, ३लिं० भूतसंबंधी तो; उ०, यामुलाला कांहीं भौतिक उपद्रव आहे ह्म० पैशाचिक; हासर्व प्रपंच भौतिक आहे ह्म० पांच भौतिक.

भौम, पु० मंगल ह्मणून जो ग्रह तो; २, ३लिं० भूमिसंबंधी; उ०, भूकंपादिक जे उत्पात ते भौम जाणावे.

भौमवार, पु० मंगळवार.

भ्याड, ३लिं० भित्रा.

भ्यासूर, ३लिं० भयंकर.

भ्रतार, पु० दादला.

भ्रम, पु० पदार्थाचें वस्तुतः जें स्वरूप असतें तें नस्फुरतां त्यापदार्थाचें पदार्थांतरत्वें करून जें ज्ञान होतें तो; उ०, रज्जूच्याठाईं जसा हा सर्प असा भ्रम होतो तसाच ब्रह्मी हा प्रपंच असा भ्रम होतो; २, असावें एक, आणि भासावें एक, किं० कांहींच स्फुरूनये अशीजी पित्त, कैफ, इ० कारणामुळें अंतःकरणाची अवस्था होत्ये तो; उ०, ज्वरानें वरचेवर भ्रम पडतो ह्मणून भलभलतेंच दिसूं लागतें; ३, कोणेकाच्याठायीं विद्याकलाधिकता इ० जो गुण किं० कोणेकापासून झालेलें किं० होणारें जें दान, पराक्रम, चोरी, इ० बाईट बरें कर्म इ० रूप जो अमत्यक्ष अर्थ तद्विषयींको हीं लक्षणादि दर्शनामुळें केवळ निश्चयात्मकतेस पावलेलें नव्हे असें संभावनात्मक जें कोणेकास ज्ञान असतें तो; ३, यापाशी [redacted] गांशास भ्रम होतापण तें कांहीं नाहीं; ज्याचा ह्मी भ्रम धरला होता तोच शेवटीं चोर ठरला; ४, संशय; उ०, हा ब्राह्मण किं० शूद्र याविषयीं अह्माला भ्रम आहे; ५, सूत्रचक्रादिकाची मंडलाकार जी गति तो किं० त्या गतीनें होतात जे फेरे ते प्र० किं० तशीगति होण्यास कारणीभूत जो मंडलाकार फिरविण्याचा संस्कार तो.

भ्रमण, न० सूत्र, चक्र, इ० कांचें मंडलाकार जें चलन तें; २, परिभ्रमण.

भ्रमणें, चक्रादि मंडलाकार फिरणें; २, कोणेकानें परिभ्रमण करीत असणें; ;३, एक असतां भलतेंच वाटावें अशा दशेतें अंतःकरणानें पावणें.

भ्रमर, पु० पुष्पादिकांचे सुवासास अतिलंपट असा एक सपक्ष सहापायांचा क्षुद्र जंतु आहे.

भ्रमाचा भोंपळा, पु० भरमभोंपळा.

भ्रमित, ३लिं० भ्रमिष्ठाचा अपभ्रंश.

भ्रमिष्ठ, ३लिं० कैफ, शोक, ज्वर, पित्तक्षोभ, इ० कारणानें किं० स्वभावतः ज्याचे अंतःकरणास भ्रम पडला आहे असा जो पुरुष इ० तो.

भ्रमिस्त, २लिं० भ्रमिष्टाचा अपभ्रंश.

भ्रंश, पु० अधिकारादि स्थानाचाठायीं स्थित जो मनुष्यादिक त्याचा त्यास्थानापासून जो वियोग जेणेंकरून त्या मनुष्यादिकास प्रा० निराधारता रूप दुर्दशा प्राप्त होत्ये तो; उ०, राज्यपदापासून भ्रंश झाल्यापासून हा राजा भडकत फिरतो आहे; २, शोकादि कारणामुळें बुद्धीस होतो जो चळ तो; राज्यभ्रंश, बुद्धिभ्रंश इ० स०.

भ्रंशणें, कोणेकास भ्रंशविशिष्ट करणें.

भ्रंशित, २लिं० कोणेकानें राज्यादि पदापासून भ्रंशिला.

भ्रष्ट, २लिं० राज्यपदादिकापासून भ्रंश पावला जो तो; २, आचारविचारादि हीन अतएव अपवित्र जो मनुष्य किं० स्थल इ० तो; राज्यभ्रष्ट, आचारभ्रष्ट, इ० स०.

भ्रष्टाकार, पु० सोंवळें, ओंवळें, व्यभिचारादि दोष यांची व्यवस्था नाहींशी झाल्यामुळें सर्व एकवट झाल्यानें गृह, ग्राम, इ० कांचा ठायीं होत्ये जी भ्रष्टता ती.

भ्रष्ट्या, पु० आचारविचारहीन अतएव भ्रष्ट-जो मनुष्य तो.

भ्रांत, २लिं० कांहीं एक पदार्थाचे ज्ञानाविषयीं भ्रम जास झाला तो; २, भ्रांतिष्ट; ३, स्त्री० भ्रांतीचा अपभ्रंश.

भ्रांतखोर, २लिं० भ्रांतिखोर.

भ्रांतवट, २लिं० भ्रांतिवट.

भ्राता, पु० भाऊ प्रथमाथ०, भ्रातृपुत्र, भ्रातृपत्नी इ०.

भ्रांति, स्त्री० भ्रम, परंतु प्रा० प्रथ० द्विती० चतुर्थीत, ग्रंथादिकांत वर्णादिका विषयीं एथें शकार असावा किं० सकार असावा अशी भ्रांति पडायाजोगें जें स्थल तें भ्रांतिस्थल इ० स०.

भ्रांतिकर, २लिं० स्पष्ट हें अमुकच असें एकरूपेंकरून निश्चय नहोतां हें असें असेल, किं० असें असेल, हें अमुक होय, किं० नव्हे अशी भ्रांति उत्पन्न व्हावयाजोगें जें वाक्य, अक्षर, भाषण, इ० तो; उ०, आलों तर येईन असें भ्रांतिकर सांगून का कायतें स्पष्ट सांगा.

भ्रांतिखोर, २लिं० दिकतखोर.

भ्रांतिवट, २लिं० भ्रांतिकर.

भ्रांतिष्ट, २लिं० आपणच केलें तें नकेलेंसें वाटावें, नकेलें तें केलेंसें वाटावें, पूर्वापर अनुसंधान जास राहूनये आणि हें किं० हें अशी वारंवार भ्रांति जाला होत असावी अशा स्वभावाचा जो मनुष्य तो.

भ्रांत्या, २लिं० भ्रांतिष्ट.

भ्रामक, २लिं० स्वविषयीं हें अमुकच असेंच असा एकरूप निश्चय होऊं देतां अंतःकरणास अनेकप्रकारें भ्रम उत्पन्न करणारें असें जें संदिग्ध भाषण, अक्षर, वाक्य, इ० तो; उ०, हा रुपया भ्रामक दिसतो केवळ खरा ह्मणवत नाहीं, केवळ खोटा ही ह्मणवत नाहीं.

भ्रुकुटी. स्त्री० भ्रूकुटी.

भ्रू, स्त्री० सं० भुंवई, भ्रूभंग इ० स०.

भ्रूणहत्या, स्त्री० गर्भस्थ प्राण्याची जी हिंसा ती.

भ्रूणहत्यारा, २लिं० भ्रूणहत्या घडली आहे जापासून तो.

मउ, उ लिं० शिथिलावयव जो पदार्थ तो, २, खरख-
रीत नव्हे तो, ३, ला० ज्याचें भाषणादि कठोर नव्हे
तो व त्याचें भाषणादि तो, म्ह० मउ सापडलें म्ह-
णून कोपरानें खणूं नये.

मकडी, स्त्री० माकड म्ह० लकडीवांचून मक-
डी वठणीस येत नाहीं, प्रा० याचा प्रयोग या म्हणी-
तच.

मकर, पु० एक जलजंतु आहे, २, बारा राशींतील
दाहावी जो राशि तो, ३, न० दुसऱ्यास ठकवायाचा
जो अनेक प्रकारची युक्ति तें.

मकरकुंडल, न० सं० मकराकार जें कुंडल तें.

मकरंद, पु० सं० पुष्पांत जो मद असतो तो.

मकरसंक्रांति, स्त्री० सं० धनसंक्रांतीपासून मकरग-
शीस जें सूर्याचें गमन ती.

मका, स्त्री० पु० एक धान्य आहे.

मकाण, न० मकेचे तांटांचा जो समुदाय तें.

मकाणा, पु० मकेच्या कणसांचे दाणे भाजून जी लाही
करितात तो २. एक कमलबीज आहे ज्याचा भाजून
लाह्या करितात तो.

मकान, न० مكان हिं० राहायाची जागा तें, २,
टप्पा द्वितीय चतुर्थार्थी, कांहींएक गोष्ट मकानांत ये-
णें म्ह० टप्प्यांत येणें.

मक्ता, पु० مقطع हिं० कांहींएक कार्याची केली
जी तुटकी बोली तो, २, रा० अ० जितक्यास तितकें प-
रिमित.

मक्तेकरी, उ लिं० हिं० मक्त्यानें जो कांहींएक काम प-
तकरितो तो.

मक्तेदार, उ लिं० مقطعدار हिं० मक्तेकरी.

मक्तेवाला, उ लिं० हिं० मक्तेकरी.

मख, पु० सं० यज्ञ.

मखमल, मखमाल, स्त्री० مخمل हिं० एक पु-
लझोडें आहे, २, न० तिचें फूल तें, ३, अति मृदु वस्तु
आहे.

मखमली, मखमाली, उ लिं० مخملی हिं० मखमल
वस्त्र निर्मित जो पदार्थ तो.

मखर, न० देवब्राह्मण इ० कांचा समारंभार्थ जाळ्या, वस्त्रें
इ० त्याचा सभोंवतें लावून जें सशोभित स्थल करि-
तात तें, २, जाळ्या सहित जी दांडी तें.

मखलाशी, स्त्री० مخلصی हिं० सर्कारी कांहींएक गो-
ष्टीचें ठरावाचा जो कौल इ० कागद त्याजवर जें त्यांत-
रायानें जाणविणारें चिन्ह असतें ती, २, विवाद विष-
य गोष्टीच्या सिद्धांत होऊन जी समाप्ति दशा ती, ३, ब-
हुत देणें घेणें असतां सर्कार इ० कांपासून थोड्या द्र-
व्यानें करून घेतली जी तोड ती.

मखी, स्त्री० हिं० श्लोक, भाषण, पदार्थ इ० कांमध्यें जें गु-
प्त मर्म असतें ती, २, कांहींएक पदार्थ सिद्ध करण्यावि-
षयीं जी युक्ति किं० पद्धति ती.

मखूख, उ लिं० कों० ज्याचा मनांतलें कांहींच कोणास
एकाएकी कळत नाहीं असा जो गृहागरा मनुष्य
तो.

मखूखम, उ लिं० कों० खम्माल.

मग, अ० उत्तरकालीं, वाक्यालंकारक; उ० जाईन मग तु-
झें काय आलें.

मगज, पु० सं० फलादिकांतील जो गीर तो, २, अस्थींती-
ल जो मद्दा तो.

मगजी, स्त्री० हिं० आंगरखा इ० कांस जो भारें कडेस

किं॰विवक्षितप्रदेशीं तापता इ॰कांची पट्टी लावितात ती ·

**मगदूर**, पु॰ مقدور हिं॰ खुदरत

**मगर**, पु॰ एक जलजंतु आहे ·

**मगरमिठी**, स्त्री॰ मगराचीजी मिठी ती, २, ला॰ मगरासारिखें भाषणादि द्वारा जी सदृढ मिठी ती ·

**मगरुरी**, स्त्री॰ مغروری हिं॰ मगरूरपणा ती ·

**मंगरुळी**, ३ लिं॰ मंगरूळ ह्मणून शहर आहे तत्संबंधी जो पदार्थ तो ·

**मगरूर**, ३ लिं॰ مغرور हिं॰ द्रव्य विद्या इ॰कानींजो गर्विष्ट तो ·

**मंगल**, न॰ कल्याण, २, शुभकार्य, ग्रंथारंभ इ॰स्थलीं जो ईश्वरादिकाचे स्तुतींचा श्लोकादिक असतो तें, ३, कांहींएक कार्याचे आरंभीं जें ईश्वराचें भजन स्मरणादि करितात तें, ४, पु॰ एक ग्रह आहे ·

**मंगलकार्य**, न॰ लग्न, मुंज, इ॰ जें कार्य तें ·

**मंगलदायक**, ३ लिं॰ सं॰ कल्याणकारक जो व्यापार किं॰पदार्थ इ॰ तो ·

**मंगलवाद्य**, न॰ वाजंत्रें, मृदंग, इ॰ जीं कल्याणकारक वाद्यें तीं प्र॰

**मंगलागौरी**, स्त्री॰ एक देवी आहे ·

**मंगलागौरीव्रत**, न॰ जा कन्येचा विवाह झाला ती पहिल्या श्रावणमासापासून पांचवर्षपर्यंत श्रावण मासांत जितके मंगळवार येतात तितक्या मंगळवारीं देवीचें पूजनादि करिती तें ·

**मंगलाचरण**, न॰ सं॰ मंगलद्वितीयार्थी, २, पुराण. कथा. इ॰ कथनाचे आरंभीं जे देवस्तुतीचे श्लोकादिक ह्मणतात तें, ३, ला॰ कांहींएक गोष्टीचाजो आरंभ तें ·

**मंगलाष्टक, मंगळाष्टक**, न॰ सं॰ लग्न, मुंज, इ॰ लावितेसमयीं अंतःपट धरून आशीर्वादार्थ अथवा मंगलार्थ जे श्लोकादि ह्म॰ तें ·

**मंगळ**, न॰ मंगल; मंगळ माजणे ह्म॰ विवाहादि मंगल कार्यांत सोवळें, ओवळें, इ॰ कांच्या विशेष विचार न राहाणें ·

**मंगळणें**, तंतरणें ·

**मंगळभारणी**, स्त्री॰ एकास निजवून त्याचे पाय आपले पायांत सांपडवून श्रमपरिहारार्थ दाबण्याचा जो प्रकार ती ·

**मंगळमाळ्या**, ३ लिं॰ मूर्ख ·

**मंगळमूर्ति**, स्त्री॰ गणपति मुख्यार्थी ·

**मंगळवार**, पु॰ तिसराजो वार तो ·

**मंगळसूत्र**, न॰ सं॰ विवाहामध्यें नवरीचा गळ्यांमध्यें नवरामण्यानें युक्त जें सूत्र सौभाग्यचिन्हार्थ बांधितो तें ·

**मंगोडें**, न॰ पोरांचे भाषेनें मांजरास ह्म॰

**मग्न**, ३ लिं॰ सं॰ पाणी, इ॰ कांत बुडाला तो, २, ला॰ व्यसन, ईश्वरभजन, गाणें, इ॰ व्यापारामध्यें जो चूर तो ·

**मघा**, स्त्री॰ सत्तावीस नक्षत्रांतील दाहावें जें नक्षत्र, प्र॰ अने॰ व॰

**मघां**, अ॰ वर्तमान दिवसांत कांहींएक विद्यमानकालाचा अव्यवहित पूर्वकालीं ·

**मघाशीं, मघाशीं**, अ॰ मघां

**मंच**, पु॰ सं॰ पलंग ·

**मंचक**, पु॰ सं॰ मंच ·

**मचमचीत**, ३ लिं॰ पचपचीत ·

**मचवा**, पु० लाहान गलबतांत एक भेद आहे.

**मचावणें**, सोदेगिरी, लुच्चेगिरी, दांडगाई, दंगा, इ० उत्कृष्ट माजिवणें.

**मचूळ**, ३ लिं० खारें नव्हे गोड नव्हे असें जे पाणी तें.

**मच्या**, ३ लिं० कांहीं एका पदार्थाचा मध्यस्थित जो तो.

**मच्यामध्यें, मच्येमध्यें**, अ० हानि, मृत्यु, लाभ, इ० जनक जी मुख्यत्वेंकरून परस्परांची क्रिया तज्जन्यफलाचा त्या परस्परांदर अन्वय व्हावा तो न होतां तदितरावर होई असें; उ० ते दोघे भांडले आणि सोडवायास जो गेला त्याणें मच्येमध्यें शिव्या खाल्या, २, ज्या कार्याविषयीं ज्याचें अनुमत अवश्य असावें तें न घेतां; उ० तुला मच्येमध्यें हा कारभार कोणी सांगितला.

**मच्छर** न० एक क्षुद्र प्राणी आहे.

**मच्छरदानी**, स्त्री० मच्छरानें उपद्रव न करावा म्हणून छपरपलंगास भोंवतें जें बारीक वस्त्र लावितात ती.

**मजकुरी**, ३ लिं० हिं० कांहीं एक मजकूर ज्यांत लिहिला आहे असा जो कागद, भाषण, तो.

**मजकूर**, पु० हिं० कांहीं एक प्रकरणाचे कागदांत लिहिलेलें किं० ज्ञातजें वर्तमान तो, २, ज्याचें विशेषरूपेंकरून वर्तें नाव लिहिलें असतें असे जे किल्ला, मनुष्य, मोजे, इ० पदार्थ, त्याच्याच पुनः उल्लेख करावयाच्या असतां सामान्यनावापुढें या शब्दाचा प्रयोग होतो; उ० किल्ले मजकुरीं, मोजे मजकूरचा पाटेल गेला, इ० साल मजकुर ह्म० विद्यमान वर्ष, त्याच्या मजकूर काय ह्म० त्याची कथा काय.

**मजबुती, मजबुदी**, स्त्री० مضبوطی हिं० खंबिरी.

**मजबूत, मजबूद**, ३ लिं० مضبوط हिं० खंबीर मुख्यार्थी, २, अ० दृढ होई असें, बांध, इ० वि० ला० ३ लिं० न हालायाजोगें जें भाषणादिक तो.



**मंजरी**, स्त्री० सं० तुलसी इ० कांचें जें केसर ती, २, लाहान वाजवायाच्या जो टाळ ती.

**मजल**, स्त्री० हिं० गतीनें आक्रमणविषय जो मार्गावधी ती; उ० आह्मी प्रहरांत चार कोस मजल आटोपिली, २, एका दिवसांत साधारणरीतीनें चाललें असतां आक्रमित होतो जो मार्ग तो; उ० पुणे एथून चार मजला आहे, ३, ला० कांहीं एक कार्याची जी केवलपरिणामावस्था किं० विवक्षित दशा ती; उ० तें कार्य इतक्या मजलेस आलें आहे परंतु मजलेस पोहोचेल तेव्हां खरें

**मजला**, पु० हिं० भुई घरावर फळी सारिखी घालून वर माती घालून राहायाजोगी खालच्या घरा सारखी जागा करितात तो, २, वस्त्रास कांहीं रेशमाच्या मध्यें मध्यें खुणा करून बाकी सारें जरीचें काम करितात ते प्र० उ० त्या पातळास चार मजले आहेत, ज्या घरास वर मजला नाहीं त्यास प्रसंग विशेषीं एक मजली ज्या घरावर एक मजला चढला आहे त्यास दुमजली असा व्यवहार, यारीतीनें तिमजली, चौमजली इ० जाणावे.

**मजा**, स्त्री० مزه हिं० मोज.

**मजाल**, स्त्री० مجال हिं० खुदरत.

**मजालस**, स्त्री० مجالس हिं० क्वचित्स्थलीं राजादि लोकांची जमली जी कचेरी ती.

**मंजिरी**, स्त्री० मंजरीचा अपभ्रंश.

**मंजिष्ट** पु० औषध आहे.

**मजीत**, ३ लिं० हिं० ज्या रंगास नकाकी नाहीं असा जो रंग तो, व तद्विशिष्ट वस्त्रादि तो, २, मळल्यामुळें किं०

चोळवटल्यामुळें ज्याची नवेपणाची टवटवी गेली अ-
साजें वस्त्र, कागद, इ० तें, ३, ला० चांगली उपस्थित
नव्हेशी झालेली जी विद्या, कला ती ·

**मजुरा**, पु० हिं० रा० कांहींएक लक्ष्य कल्पून त्या लक्ष्याक-
डे नेमस्त, दृष्टि, बंदूक, इ० कांचें संधान धरण्याचा जो
प्रकार तो ·

**मजूर**, उ० लिं० مزدور हिं० एक दिवसास असुक देईन
तूं असुक काम कर अशी रीतीची बोली करून ठेविला जो
मनुष्य इ० तो; म्ह० दिवस बुडे आणि मजूर उडे ·

**मंजूर**, उ० लिं० हिं० कबूल ·

**मजूरकर**, उ० लिं० हिं० मजूर ·

**मजूरदार**, उ० लिं० हिं० मजूरी करितो तो ·

**मजूरा**, अ० مجرا हिं० देण्याघेण्याचा व्यवहारांत दस्तद्र-
व्यादिक मुख्य रकमेंत वजा होई असें दे, पड, हो, इ० वि०

**मजूरादास्त**, स्त्री० مجرادشت हिं० वाडी, शेत, इ० संबंधी
सर्कार देणें द्रव्य द्यावयाचें असतें त्या ऐवजीं सर्कारांत
कुळाकडून माल पोहोंचला असतो त्याचा ऐवज स-
र्कार, मुख्य जें वाडी, इ० कांचें देणें त्यांत वजा देतें ती ·

**मजूरी**, स्त्री० हिं० मजूर मनुष्यास देतें जें द्रव्य तें, २, मजूरांचें
कर्म तें ·

**मंजूळ**, उ० लिं० कर्णास गोड वाटे असा जो ध्वनी तो ·

**मज्जन**, न० सं० पाणी इ० कांत बुडण्याचा व्यापार तें ·

**मज्जा**, स्त्री० सं० जीपासून रेत उत्पन्न होतें अशी एक श-
रीरांतील धातु आहे ·

**मट, कन, कर, दिनी, दिशीं**, अ० कांहींएक व्यापारीं प-
डून जो त्याणें न द्विपर्थी आकुंची भाव पावून उगें राहा
णें, बसणें, इ० कांचें वि० २, अकस्मात् धरणें, इ० कांचें
वि० ·

**मटका**, पु० हिं० मटकींत एक भेद आहे ·

**मटकावणें**, पळून जाणारास किं० खालीं पडणारास
मटकन धरणें ·

**मटकी**, स्त्री० एक धान्य आहे ·

**मटगोळा**, पु० अन्न खाऊन जी निःशेषता तो, याचा प्र-
योग मुलांच्या भोजनादि प्रसंगीं; उ० त्या पोरानें टिपरी-
चे भाताचा मटगोळा केला ·

**मटमट**, अ० असा शब्द होई असें खाण्याचें वि०

**मटमटां**, अ० मटमट ·

**मटमटावणें**, मटमट शब्द होई असें त्वरेनें खाणें ·

**मटामट**, अ० मटमट ·

**मट्ट**, अ० कांहीं न बोलतां, राहा, हो, बस, इ० वि०

**मट्यासयेणें** बहुत चालण्यानें किं० फार श्रम केल्या-
मुळें थकणें ·

**मठ**, पु० एक धान्य आहे, २, गोसांवी, बैरागी, सन्यासी, इ०
कांचें राहायाचें स्थान तो, ३, बुद्धिमंद ·

**मठारणें**, जखम इ० भरत भरत येणें, २, नव्या भांड्याचे
ठोंके हत्यारानें ठोकून साफ होई असें करणें, ३, दे० कां-
हींएक कार्यास जो प्रवृत्त नाहीं त्यास त्या कार्याविषयीं
अनेक युक्तीनें अनुकूळ होई असें करणें ·

**मठी**, स्त्री० हिं० घरास लाहानपणानें नाव घ्यावयाचें अ-
स्तां म्हणतात, २, को० लाहान जो मठ ती ·

**मठ्ठ**, उ० लिं० मंद जो टोणगा, बैल इ० तो, २, बुद्धिमंद ·

**मठ्ठा**, पु० कालवण इ० द्यर्थ पाणी न घालितां दहीं घुसळू-
न लोणी न कादितां घट्ट करितात तो ·

**मठ्ठ्या**, उ० लिं० मठ्ठ ·

**मंड**, पु० सं० भाताचे लाह्यांचें कढवून पाणी औषधार्थ
देतात तो ·

मडु, ३लिं० दे० कांहींएका कार्यादिकाचाठायीं विघ्न करणारा मनुष्य तो ·

मंडई, स्त्री० हिं० शाहर इ० कांचेठायीं समुदायेकरून भाजी,मेवा, इ० विकला जातो ती जागा ·

मंडक, पु० सं० मांडा ह्म० एक पक्वान्न आहे ·

मडकूल, न० लाहानजें मडकें तें ·

मडकें, न० मृत्तिकेचें केलेजें पात्र तें ·

मंडण, न० वा० मनुष्यांचा जो समुदाय तें ·

मंडन, न० सं० भूषण, २, खंडित पूर्वपक्षादिकांचें जें स्थापन तें ·

मंडप, पु० सं० लग्नाद्युत्साहादिक करावयाचे असतां द्वारादिकांपुढें छायार्थस्तंभादिक पुरून सोवळ्या इ० कानीं आछन्न, किं० पडवळी, द्राक्षा, इ० कांचें वेलचढायाकरितां, किं० देवालयादिकांपुढें सभामंडपादिक करितात तो, २, ला० सूर्यादिक न दिसाया जोगी जी मेघाची निबिड छाया तो ·

मंडपदेवता, स्त्री० सं० विवाहादिकामध्यें मंडपसमर्थी जी देवता ती ·

मंडपप्रतिष्ठा, स्त्री० सं० मंडपदेवताचें जें स्थापन ती ·

मंडपशोभा, स्त्री० सं० विवाहादिकांचाठायीं मंडपादिक शोभावाह्मणून कांहीं लोकांकडली वस्त्रवानी आणून, किं० कोणी प्रतिष्ठित विद्वान इ० कांनी जी शोभा करितात ती ·

मंडपी, स्त्री० देवादिकावरती कांबीचा फुलवरा इ० टांगायासाठीं लाहान मंडपाकार करितात ती ·

मंडपोद्वासन, न० सं० विवाहादि मंडपदेवताचें जें उथ्थापन तें ·

मंडल, मंडळ, न० सं० वृत्ताकारजो घेरा तें, २, मनुष्यादिकांचा जो समुदाय तें, ३, राजसत्ताक्रांतजें भूखंड तें, मंडळावर धरणें, ह्म० घोडयास मंडळाकार धरविणें ·

मंडली, मंडळी, स्त्री० सं० मंडल द्वितीयार्थी, २, एक प्राणी आहे, जास स्पर्शकेला असतां वर्तुळाकार होत असतो ·

मंडवळी, स्त्री० नवरामूल किं० मुंजामूल इ० कांचे कपाळावर फुलादिकांची शोभार्थ जी बांधित असतात ती ·

मंडळवत, न० वा० एका घेन्याची जी पत्रावळ तें ·

मंडाई, स्त्री० हिं० सावकारापासून व्याजानें पैसा घेतला असतां हीनत्संतोषार्थ अणखी कांहीं द्रव्य कबूल करितात ती ·

मंडावण, स्त्री० हिं० मंडाई ·

मंडावळ, स्त्री० मंडवळी ·

मण्डित, ३लिं० सं० भूषित ·

मडूक, पु० सं० बेडूक ·

मंडूर, पु० सं० लोखंडाच्या किटाची कांहीं भट्टीकरून रसायण तयार करितात तो ·

मडें, न० प्रेत, मडयाचा ताळवेचें लोणी खाणारा, ह्म० अतिशयित लोभ्यास ह्म०, ह्म० केंस उपटल्यानें का मडें हलकें होतें

मडेकळा, स्त्री० प्रेतकळा ·

मडेंपंचक, न० वैशाखमासामध्यें जीं धनिष्ठादि पांच नक्षत्र येतात तें ·

मंडोदरी, स्त्री० वेटकुळामध्यें एक भेद आहे ·

मढणें, चर्मानें किं० वस्त्रादिकानें कांहींएक पदार्थ संबद्ध होई असें चिकटविणें ·

मढवळ, पु० वा० धांवा ·

मढें, न० दे० मडें ·

मण, पु० बारा पायल्याचें किं० सोळा पायल्याचें जें मापं तें २, चाळीसशेर प्रमाण जें वजन तें ३, त्याणें मापलें किं० वजन केलें जें धान्य, घृतादिक तें ·

मणका, पु० जांत मणभर धान्य राहातें तें माप, किं० मण वजनाचा दगड, इ० असतो तो, २, मण प्रमाण धान्य राहातें असें जें मडकें, पांटी, इ० तें किं० मणाचे वजनाचा धोंडा इ० तो, ३, मोठा जो मणी तो, ४, पाठीच्या कण्याच्या हाडाचा जो गांठी त्या प्र० ·

मणकी, स्त्री० मणाचे वजनाचा धोंडा, इ० तो ·

मणगट, न० हाताचें पंजाच्या आणि कोंपराचे मधला जो भाग तें परंतु पंजाच्या जो संधिप्रदेश तेथें व्यवहार बहुत, मनगटांत जोर असणें, ह्म० कांहींएक कृत्याविषयीं शरीरद्रव्यादि बळ असणें, त्याचे मनगटावर तेल घातलें पाहिजे, एथें कांहींएक विद्येविषयीं तो अज्ञ ·

मणगटी, स्त्री० मण्यानीं निर्मित जें मणगटांत घालावयाचें भूषण तें ·

मणदोरा, पु० बटव्याचें तोंड आवळावें उघडावें ह्मणून जो त्या बटव्याचे तोंडास दोरा घालितात तो, २, गाड्यावर कडब्याच्या, किं० गवताच्या हेल बांधावयाचा जो दोर तो ·

मणि, पु० हिरकादिकरत्नें २, तत्सदृश पाषाणादिकाचे कृत्रिम करितात तो ३, रुद्राक्षादिक, ज्याचा माळा इ० करितात तो, ४, ला० ज्यामध्यें कांहींएक विशेष गुण आहे त्याचें वर्णन कर्तव्य असतां त्यास ह्म० ५, दे० गाड्याचे हेल आंवळायास, किं० नाचेस शिडकाठी बांधायाच्या, इ० रूप दोर ओढाया करितां पोटांत चाक करून काष्ठाच्या अवयव विशेष केला असतो तो, हाडाचे मणी करणें, ह्म० हाडें झिजाया जोगा कांहींएक कार्याविषयीं बहुत श्रम करणें, ते एका माळेचे मणी आहेत, ह्म० एका प्रतीचे जे दोन मनुष्य त्यास निंदेनें ह्म०

मणिकर्णिका, स्त्री० एक काशीमध्यें क्षेत्र आहे २, एक धातुमय पात्र विशेष आहे ·

मणिबंध, पु० सं० मणगट ·

मणेर, मण्यार, पु० एक जाति आहे २, एक किरडूं आहे ·

मत, न० कांहींएक गोष्टीविषयीं मनांतला जो निश्चय तें २, वादादिकांतील जे अनेक पक्ष ते प्र० ३, कांहींएक गोष्टीविषयीं कोणा एकाचें घेतात जें अनुमत तें ·

मतरणें, अक्षता इ० मंत्रानें युक्त करणें २, ला० एखाद्यास कांहीं कानांत सांगून स्वानुकूलबुद्धि विशिष्ट करणें ·

मतलब, पु० مطلب हिं० कांहींएक गोष्ट सिद्ध करण्याविषयीं जो मनांतील आशय तो, २, तदर्थ कपटानें बांधिली जी मसलत तो ·

मतलबदार, ३ लिं० مطلب دار हिं० मतलबी ·

मतलबी, ३ लिं० مطلبی हिं० अनेक युक्तीनें आपला मतलब सिद्धीस नेतो असा जो मनुष्य तो ·

मतवादी, ३ लिं० सं० कांहींएक मत स्वीकारून त्याचा सदसद्विचार न करितां त्याविषयीं हेंच खरें असा वाद सांगण्याचा स्वभाव ज्याचा तो ·

मताभिमान, पु० सं० कांहींएक मत स्वीकारून तद्विषयीं धरिला जो अभिमान तो ·

मति, स्त्री० सं० बुद्धि ·

मतिमंद, ३ लिं० सं० बुद्धिमंद.

मत्कुण, पु० सं० ढेकूण.

मत्त, ३ लिं० मद्यलक्ष्मी इ०कांचा मदानें उन्मत्त जो तो.

मत्ता, स्त्री० हिं० स्वीयजी द्रव्यादि संपत्ति ती. स्म० काडाची मत्ता आणि लाखाची मत्ता बरोबर होत नाहीं.

मंत्र, पु० ज्याचा कांहीं विलक्षण शक्ति असती असें जें कांहीं ऋष्यादिकृत वाक्य तो, २, ला० खलबत.

मंत्रप्रयोग, पु० मंत्राचा जो प्रयोग तो.

मंत्रमुख, ३ लिं० कांहीं स्वकर्मापुरते मंत्र ज्यास येतात असा जो ब्राह्मण तो.

मंत्रवादी, ३ लिं० मंत्री.

मंत्रसाधन, न० मंत्र सिद्ध व्हावा म्हणून जें पुरश्चरणादिक करितात तें.

मंत्रसिद्धि, स्त्री० मंत्रेकरून जी सिद्धि ती.

मंत्री, पु० प्रधान, २, सर्पादिकांचें विष उतरयाचे इ० मंत्र जाणतो तो, ३, अष्टप्रधानांतील एक प्रधान आहे, ४, ला० जो कोणी एखाद्यास बुद्धिवाद सांगतो तो त्याचा.

मत्सर, पु० कोणा एकाचें बरें झालें असतां देखूं सकूं नये असा जो कांहीं धर्म उत्पन्न होतो तो, २, दे० न० एक क्षुद्र प्राणी आहे.

मत्सरी, ३ लिं० मत्सर उत्पन्न होण्याचा स्वभाव ज्याचा तो.

मत्स्य, पु० मासा मापशब्दापभ्रंशजो त्यायाचून ३, एका वृत्ताचें शेजारीं दुसरें वृत्त पूर्ववृत्त परिधीचें आंत जाई असें रेखिलें असतां दोहोंचें संयोगामध्यें जो आकारविशेष पडतो तो.

मत्स्यजयंती, स्त्री० मत्स्यावतार ज्या तिथीस झाला ती तिथी.



मत्स्यावतार, पु० ईश्वराचा दाहा अवतारांतील जो पहिला तो.

मथणें, कांहीं एक कार्य करण्याविषयीं कोणी एकानें बोधादि केला असतां अनुकूल होणें २, दध्यादिक घुसळणें ३, ग्रं० एखाद्यास जिवें मारणें, ४, ग्रंथादिकांतील आशय मनांत यावयाकरितां त्याचें विवेचन करणें.

मंथन, न० दध्यादिक घुसळण्याचा जो व्यापार तें.

मथन, न० मथणें प्रथमार्थावांचून अर्थांचा जो व्यापार तें.

मंथा, पु० सं० रवीचा जो माथ्या तो.

मथित, ३ लिं० मथिलें जें दध्यादि तें किं० मथून काढिलें जें नवनीतादि तें.

मथितार्थ, पु० सं० विचारानें सिद्ध झाला जो अर्थ तो.

मथुरा, स्त्री० एक क्षेत्र आहे.

मंद, ३ लिं० जड बुद्धि तो, २, ज्याचे अंगीं चापल्य नाहीं तो मनुष्य घोडा बैल इ० तो, ३, नवग्रहांतील सातवा जो ग्रह तो, ४, किंचित अंधक जी दृष्टि ज्योति इ० तो, तुमचे कामाचें मंद पडलें आहे, स्म० मंदगतीनें चालतें आहे, दुखणें जरीमरी इ०कांचें मंद पडणें स्म० कमी पणा होणें.

मद, पु० उन्मत्तता, २, हत्तीचा गंडस्थळांतून उन्मत्ततादशेंत जो द्रव निघतो तो, ३, पुष्प, फल, इ०कांतून जो उदकासारिखा असतो तो, धनमद, विद्यामद इ० समास होतात.

मदगडी, स्त्री० मधघडी.

मदत, स्त्री० १८ हिं० सहायता, २, ३ लिं० सहाय, उ० तो त्यास मदत आहे, ३, स्त्री० एक ओदायाचा अंमल

आहे.

**मदतगार**, ३ लिं० مددگار हिं० दुसऱ्याची सहायतारूप मदत करितो तो.

**मदतगारी**, स्त्री० مددگاری हिं० मदतगाराचें कर्म तें.

**मदन**, पु० कामदेव २, स्त्रीसंभोगाची इच्छा उत्पन्न होते जेणें असा जो शरीरांत विकार उत्पन्न होतो तो.

**मदनकामेश्वर**, पु० एक रसायन आहे.

**मदनबाण**, पु० एक मोगऱ्यामध्यें भेद आहे.

**मदनाचा पुतळा**, फु० अत्यंत सुंदर जो त्यास म्ह०

**मदनी**, पु० एक झाड आहे.

**मंदर**, **मंदराचल**, **मंदराचळ**, पु० एक पर्वत आहे.

**मंदवार**, **मंदवासर**, पु० सातवा जो वार तो.

**मदविव्हल**, **मदविव्हळ**, ३ लिं० कामादिकाचा मदानें जो विव्हळ झाला तो.

**मंदवेळ**, **मंदवेळा**, स्त्री० ज्या काळावर कार्य आरंभिलें असतां लवकर तडीस जात नाहीं असा जो काळ तो.

**मंदाई**, स्त्री० मंदपणा या अर्थीं प्रा०

**मंदाग्नी**, अ० मंद अग्नि लावून सावकाशपणीं, शिजं, भाज० धा० वि०, उ० ती भाजी मंदाग्नीं शिजूं दे.

**मंदाग्नि**, पु० प्रदीप्त नव्हे जो जठराग्नि तो २, ३ लिं० ज्याचा जठराग्नि मंद तो.

**मदांध**, ३ लिं० द्रव्यादि मदानें ज्याचा विचार नष्ट झाला तो.

**मंदार**, पु० स्वर्गीं एक कल्पवृक्ष आहे, २, एक पुष्प वृक्ष आहे.

**मदार**, स्त्री० हिं० भिस्त, २, उंटाचे पाठीवर जो उंच अवयव असतो तो.

**मदावर्ण**, भरानें मदोन्मत्त जो युद्ध, कलह, रोग, इ० त्याणीं मदगतीनें चालू असणें.

**मंदवा**, पु० दे० मंदाई.

**मंदिर**, न० सं० गृह, , राजमंदिर, देवमंदिर, इ० समास होतात.

**मदिरा**, स्त्री० सं० मद्य

**मंदी**, स्त्री० सं० मंदाई

**मंदील**, न० हिं० जरीचे काडीचें जे लाहान पागोटें असते तें.

**मदोत्कट**, ३ लिं० सं० मद झालेला हत्ती.

**मदोन्मत्त**, ३ लिं० द्रव्यादिमदानें जो उन्मत्त तो.

**मद्य**, न० सं० प्यायाची जी दारू तें.

**मद्यपी**, ३ लिं० मद्यपान करितो तो.

**मद्राशी**, ३ लिं० मद्रास संबंधी जो पदार्थ.

**मध**, स्त्री० पु० मधुमक्षिका आपले पोळ्यांत पुष्परसाचा संचय करून ठेवितात तो तो, २, फुलांत एक पुष्पांत मधुर द्रव असतो तो तो, ३, फणसाचे गऱ्यांत जो उदकरूप द्रव असतो तो, ४, गऱ्यांची साठं एक दिवस चाळवून एकत्र रचून ठेविलीं असतां जो द्रव निघतो तो तो, कोण एकास मधाचें बोट लाऊन ठेवणें. म्ह० कांहीं एक गोष्टी विषयीं आशा दाखविणें.

**मधघडी**, स्त्री० दौलताबाद, व अमदाबाद इ० संबंधीजे कागद त्यांची जे मध्यम प्रतीची घडी ती.

**मधच्या**, ३ लिं० मधल्या.

**मधच्यामधीं**, अ० मध्यमधीं

**मधपिंपळी**, स्त्री० मध आणि पिंपळी ती.

**मधपुळी**, स्त्री० काळपुळीसारखी एक पाठीवर पुळी होत असती ती.

**मधलंड**, ३ लिं० कांहीं एक कार्यादिकामध्यें जो उत्कृष्ट

नव्हे निकृष्ट नव्हे तो.

**मधवा**, ३ लिं० मधला जो बंधु बहीण तो.

**मधाळ**, ३ लिं० ज्या फणसाचा गर्‍यांत मध असतो तो फणस, किं० त्याचा गरा.

**मधिवला**, ३ लिं० सादर जे तिघे त्यांतला जो मधला तो.

**मधीं**, अ० कांहींएक कार्य किं० पदार्थ समुदायाचा विवक्षित अंतर्भागाचे ठायीं, २, आंत.

**मधील**, ३ लिं० मधला.

**मधु**, न० सं० मद्य, २, मध, ३, पु० चैत्रमास, ४, वसंत ऋतु.

**मधुकर**, पु० सं० भ्रमर.

**मधुकरी**, स्त्री० सं० शिजलेल्या अन्नाची ब्राह्मण मागतो जी भिक्षा ती, ३ लिं० ती मागतो तो.

**मधुकुल्या**, स्त्री० मध वाहायाचा जो पाट ती, २, भोजनाची चंगळ वर्णायाची असतां घृतकुल्येचे संधानातेच याचा प्रयोग.

**मधुपर्क**, पु० सं० नवरा विवाहसमयीं दारीं आला ह्मणजे दही, गंध, वस्त्र, इ० कानें जी त्याची पूजा करितात तो, २, ऋत्विजांचीं वरणें केल्यानंतर यजमान जी पूजा करितो तो, ३, दारीं एखादा शिष्ट आला असतां पाद प्रक्षालनादिक जी पूजा तो.

**मधुमक्षिका**, स्त्री० सं० मधाचा संचय करून ठेवितात जा मक्षिका ती.

**मधुमारी**, स्त्री० मधुमक्षिका.

**मधुर**, ३ लिं० गोड मिष्ट जो पदार्थ भाषण इ० तो, २, पु० षड्रसांतील एक रस आहे.

**मधुरा**, पु० ज्वर येऊन पुढें एक वायु प्रधान एक रोग होत असतो तो.

**मधुमाधवी**, स्त्री० एक रागिणी आहे.

**मधुरिमा**, पु० मधुरपणा.

**मधून**, अ० मध्य भागापासून, किं० मध्यभागांतून जा, ये, इ० वि०

**मध्य**, पु० सं० ज्या भागापासून पदार्थाचे इतर भाग सारिखे राहातात, असा जो त्या पदार्थाचा विभाग तो, २, कटिप्रदेश.

**मध्यगृह**, न० सं० माजघर.

**मध्यंदिन**, पु० सं० ब्राह्मणांत जाति आहे.

**मध्यदेश**, पु० सं० कोंकण व देश यांचा मधला जो देश तो, २, देशाचा मध्य भाग तो.

**मध्यम**, ३ लिं० सं० विवक्षित गुणानीं जो उत्कृष्ट नव्हे, निकृष्ट नव्हे, असा जो तो.

**मध्यरात्र**, पु० स्त्री० सं० रात्रीचा जो मध्य तो ती.

**मध्यवर्ती**, ३ लिं० दोघांचा जो कांहींएक व्यापार त्याचे ठरावादिक कांहींएक कर्म ज्याचे विद्यमाने होते तो, २, मध्यमार्गी राहातो तो.

**मध्यवृत्ती, मध्यावृत्ती**, स्त्री० परस्परांचे कार्यादिकाचा मध्यवर्तीपणा करण्याचा जो व्यापार ती, २, मध्यवर्ती अर्थ मार्थी.

**मध्यस्थ**, ३ लिं० सं० मध्यवर्ती, २, उभय पक्ष साधारण जो मनुष्य तो.

**मध्यस्थगिरी**, स्त्री० दोघांचे व्यापाराचे ठरावा विषयीं जो मध्यस्थपणा ती.

**मध्यस्थी**, स्त्री० मध्यस्थगिरी.

**मध्यान्ह**, पु० न० सं० दिवसाचा जो मध्य तो ते.

**मध्यान्हकाल, मध्यान्हकाल**, पु० मध्यान्ह रूप जो का

ळ तो, मध्यान्हकाळाचें कठीण, स्म० पोटास मिळायाचें कठीण स्म० अंतकाळापेक्षा मध्यान्हकाळ कठीण ·

**मध्यान्ही**, स्त्री० दुपारी एक पुष्पवृक्ष आहे ·

**मध्यें**, अ० मधीं ·

**मध्येंमध्यें**, अ० विवक्षित काल देश पदार्थ समुदायांचा मध्यामध्याचाठायीं ·

**मध्व**, पु०सं० मत प्रवर्तक ब्राह्मण झाला, २, त्याचे मतानें वागणारा असा एक वैष्णवांत भेद आहे ·

**मन**, न०सं० सुख दुःखादि समजतें जेणेंकरून, असें जें करावें इंद्रिय तें, २, संकल्पादिरूप जी मनाची वृत्ति तें, मन वसणें स्म० कोहींएक व्यापार करायास अनुकूळ होणें, किं० कांहींएक पदार्थावर आसक्त होणें, मन उठणें स्म० कांहींएक पदार्थावरची आसक्ति दूर होणें, मन घालणें, मन देणें, लावणें, इ०स्थलीं मन एकाग्र करून एखाद्या पदार्थावर किं० कार्यावर लावणें, मनास येणें, मनास वाटणें, स्म० मनास चांगल्येपणानें आवडणें, मनावर घेणें, मनावर धरणें, स्म० कांहीं कामाविषयीं अगत्य धरणें, मन मिळणें, स्म० उभयतांच्या मनाचा एक भाव होणें, मनांतून उतरणें, स्म० जा पदार्थाची पूर्वी आवड असती त्याजवर दुष्ट असा ग्रह झाल्यामुळें त्याजवर अप्रीति होणें, मन हिरावणें, मन नेणें, इ०स्थलीं स्वविषयीं आसक्त होणें, मन पाहाणें, स्म० कांहींएक चेष्टादिकानीं दुसऱ्याचे मनांतील अभिप्रायाची परीक्षा करणें, मनाच्या, कपटी, भोळा, इ० शब्द पुढें लाविले असतां याचें मन कपटी, याचें मन भोळें इ० अर्थ, मन मोकळें करून, मोकळ्या मनानें, सांगणें, घेणें, बोलणें, इ०स्थलीं लाभ, लोभ, कपट, भाव, न धरितां मनीं मांडे खाणें स्म० व्यर्थ मनोरथ करणें, मनापासून, काम करणें, ठेवणें, इ० स्थलीं कपटादिभाव न धरितां, मनास आणणें, स्म० कांहींएक गोष्टीचा विचार करून समजून घेणें, ला० कांहींएक पदार्थ खाऊन निःशेष करणें, मन मोडणें, स्म० कोणएकाची इच्छा पराहत करणें

**मनःकल्पित**, ३ लिं० वास्तविक नसतां जो उगीच नकोदिकानें कल्पिला तो ·

**मनकवडा**, ३ लिं० दुसऱ्याच्या मनांतलें सांगणारा असा जो तो ·

**मनकामना**, स्त्री० अंतःकरणातील जी इच्छा ती ·

**मनगट**, न० मणगट

**मनगटी**, स्त्री० मणगटी ·

**मनदेवता**, स्त्री० परोक्ष अर्थाच्या तर्काविषयीं जो मनाचा झोंक तो, २, लव, याहा, या धातूंवर प्रा०प्र०

**मनधरणी**, स्त्री० दुसऱ्याचें मन अनुकूळ करून घ्यायासाठीं जें आर्जव ती ·

**मनधरणीच्या**, ३ लिं० मनधरणी करायाच्या स्वभाव ज्याचा तो ·

**मनन**, न०सं० जाणलें त्याच्या पुनःपुनः अंतःकरणाच्याठायीं कांहींएक प्रकारानें विचार करण्याचा जो व्यापार तें ·

**मननशील, मननशीळ**, ३ लिं०सं० मनन करण्याचा स्वभाव ज्याचा तो ·

**मनपिंगळी**, स्त्री० मनदेवता ·

**मनःपूर्वक**, अ०सं० मनापासून ·

**मनमिळाउ**, ३ लिं० सर्वांशीं मिळून वागण्याचा स्वभाव ज्याचा तो ·

**मनमुराद**, ३ लिं० हिं० मनास आवडाजोगा किं० मनाची होस फेडायाजोगा जो विपुल पदार्थ तो ·

**मनमेळ**, ३ लिं० मनमिळाऊ २, राशि घटित न पाहातां नवरे

वरवाले.नवरीवाले यादोघांचा मिलाफानें लग्न करणें याचें वि०

**मनमोहन**, ३ लिं० मनास मोह उत्पन्न करणारा जो प्रियादिक तो.

**मनशा**, स्त्री० इच्छा.

**मनशामोड**, स्त्री० जा पदार्थावर इच्छा गेली, तो पदार्थ मिळाल्यामुळें जी अलंबुद्धि ती.

**मनशीळ**, न० एक पर्वतसंबंधी धातु आहे.

**मनसमजावणी, मनसमजाविशी**, स्त्री० क्रोध, दुःख, इ० दूर करायासाठीं जो सुखप्रद भाषणादि व्यापार ती.

**मनसमजूत**, स्त्री० वास्तविक या पदार्थाचेठायीं तो गुण असा नसो परंतु तद्रूपेंकरून जो शक्ति ग्रह ती.

**मनसा**, स्त्री० इच्छा.

**मनस्फबदार**, ३ लिं० منصبدار हिं० पुरा विचारवंत शाहाणा असून मनस्फबी करितो तो.

**मनस्फबा**, पु० منصبه हिं० काही एक कर्तव्य गोष्टीविषयीं असें करावें असा विचार तो, २, मनोगत

**मनस्फबी**, स्त्री० منصوبی हिं० पंचाईत.

**मनसोक्त**, अ० सं० स्वेच्छानुरूप.

**मनसोद्दिष्ट**, ३ लिं० मनामध्यें जो संकल्पिला तो.

**मनसोबदार**, ३ लिं० हिं० मनस्फबदार.

**मनसोबा**, पु० हिं० मनस्फबा.

**मनसोबी**, स्त्री० हिं० मनस्फबी.

**मनस्या**, स्त्री० मनसा.

**मनस्वी**, ३ लिं० सं० मन ज्याचा स्वाधीन तो, २, ज्याचें निर्मर्याद कर्म किं० तद्विशिष्ट तो, ३, अतिशयित.

**मना**, अ० منع हिं० कांहीं एक प्रवृत्त जें कार्यादिक तें निवृत्त होई असें कर, हो, या धा० वि०

**मनाई**, स्त्री० منائی हिं० मना करण्याचा व्यापार व प्रकार ती, २, तगादा मना व्हावा म्ह० त्याच्या धन्याची जी खूण मुद्रा आणितात ती.

**मनाचिठी**, स्त्री० हिं० प्रथम जाणें तगादा पाठविला त्याणें तो तगादा बंद करायासाठीं जी पाठविली चिठी ती.

**मनामोबदला**, अ० वा० कांहींएक देणें, घेणें, इ० जें संकट त्याचा अनेक तोडी काढून यथाकथंचित् टळे असें कर, हो, इ० वि०

**मनावणें**, हिं० कोणा एकाचें मन स्वकार्यार्थ अनुकूळ करणें.

**मनीषा**, स्त्री० मनसा.

**मनु**, पु० सं० ब्रह्मदेवाचे दिवसांत चवदाजे कालाधिकारी होतात ते प्र०, २, ला० बरें किं० वाईट करण्याविषयीं कारण जो काल तो.

**मनुका**, स्त्री० सुकलेलें जें द्राक्ष ती.

**मनुज**, पु० सं० मनुष्य, प्रथमार्थी, प्र० अने० व०

**मनुबाई**, स्त्री० दुर्धर स्त्रीत्वाचा आरोप कर्तव्य असतां मनासच मनुबाई म्ह०

**मनुष्य**, पु० न० अर्थानुसंधानपूर्वक व्यक्त भाषण करण्याची योग्यता ईश्वरें जा द्विपद प्राण्यांत ठेविली आहे तो तें, मनुष्यांतून उठणें, म्ह० लोकरीति सोडून वर्तूं लागणें किं० सर्वस्व नाश झाल्यामुळें महत्संकटावस्थेंत येणें किं० महाव्याधि, इ० रोगादिग्रस्त मनुष्य इतर मनुष्य व्यवहारीं अनुपयुक्त होणें, मनुष्यांत येणें, म्ह० मनुष्यांतून उठण्याचीं जीं कारणें त्याचें निरसन होऊन पूर्वस्थितीवर येणें.

**मनुष्यकळा**, स्त्री० लोकांस देवशक्तीची भ्रांती व्हावयाजोगी चातुर्यानें मनुष्यानें केली जी कृति ती, याचे

तोंडावर मनुष्यकळा नाहीं, एथें यांचे तोंडावर अगदी ते-
ज नाहीं

**मनुष्यगण**, पु० पूर्वात्रय, उत्तरात्रय, रोहिणी, भरणी, आ
र्द्रा, या नक्षत्रांवर उत्पन्न जो झाला त्यास ज्योतिःशास्त्र
वेद्य गण ह्मणून फल येत असतें तो ·

**मनुष्यपण**, न० **मनुष्यपणा**, पु० भलेपणाच्या जो मनु-
ष्याच्या स्वभाव तें तो ·

**मनेर**, स्त्री० मण्यार ·

**मनोगत**, ३ लिं० सं० मनामध्यें राहातो जो अर्थ तो, २, न०
मनांतील जो अभिप्रेत अर्थ तो ·

**मनोगति**, स्त्री० सं० मनाची जी गति ती, २, ३ लिं० मना-
सारखी गति जाची तो ·

**मनोगम्य**, ३ लिं० सं० सांगतां येत नाहीं, दाखवितां येत
नाहीं मनानेंच जें जाणतां येतें असा जो पदार्थ तो ·

**मनोजय**, पु० सं० मन स्वाधीन करून ठेवण्याचा जो प्रकार
तो ·

**मनोनी**, स्त्री० हिं० मंडाई ·

**मनोत्साह**, पु० सं० कांहीं एका विषयीं मनाचा जो उत्साह
तो ·

**मनोदय**, पु० सं० कांहीं एक कार्य करण्याविषयीं जी इच्छा
किं० मनांत केली जी योजना तो ·

**मनोद्देश**, पु० कांहीं एक, कार्य करण्याविषयीं जी मनाती-
ल योजना तो ·

**मनोधारण**, न० सं० दुसऱ्याची मर्जी आपल्यावर संतुष्ट
असावी ह्मणून त्याचें मन संभाळण्याचा जो व्यापार तें ·

**मनोधारणा**, स्त्री० मनोधारण ·

**मनोनिग्रह**, पु० सं० मनोजय ·

**मनोभंग**, पु० सं० कांहीं एक इछिलें जें तें तडीस न जातां इ-
छेचा जो भंग तो ·

**मनोभाव**, पु० सं० मनापासून जी प्रीति तो ·

**मनोमय**, ३ लिं० सं० वस्तुसत्तानपेक्षित मनःकल्पित जो
पदार्थ तो ·

**मनोमानसी**, अ० मनांत आकस्मिक अद्भुत गोष्टीचें
वर्णन प्रसंगीं निषेध असतां प्र० उ० असें घडेल हें म-
नोमानसींही नवतें ·

**मनोरंजन**, न० सं० चमत्कार दर्शनादिकें करून मनास जो
आनंद तें, २, दुसऱ्याचे मनास आनंद व्हावया जोगा जो
क्रीडादिक व्यापार तें ·

**मनोरथ**, पु० सं० मनांतील इच्छा ·

**मनोरम**, ३ लिं० सं० मनास आनंदकारक जो पदार्थ ·

**मनोरमा**, स्त्री० सं० बायकोस संकेतानें ह्म० ·

**मनोरा**, पु० ‹ हिं० दगड चुना इ० कांचा जो पोकळ
स्तंभ मोठा उंच बांधित असतात तो ·

**मनोवृत्ति**, स्त्री० सं० मनावर संकल्पादिरूप उठती जी
वृत्ति ती ·

**मनोवेग**, पु० सं० मनाचा जो गतिवेग तो ·

**मनोव्यापार**, पु० सं० मनाच्या संकल्पादिक जो व्यापार
तो ·

**मनोहर**, ३ लिं० सं० आपल्या सौंदर्यानें मन हरण करून
घेतो तो, २, पु० त्र्यंकोबाचे भक्त त्र्यंकोबाचा प्रसाद
वांटीत असतात तो ·

**मनोज्ञ**, ३ लिं० सं० मनोरम ·

**मन्वंतर**, न० सं० मनूचा जो शक तें, २, मनु द्वितीयार्थी ·

**मप**, अ० मजपाशीं ·

मम, ३लिं०सं० माझा, १, नांगरास, किं० गाड्यास, जे दोन बैल बांधितात त्यांतून बरणाराचे डावेबाजूचा जो बैल त्यास संकेतानें चालावयासाठीं म्ह०, मम म्हणणें म्ह० विवाहादिकांत वधूवरांचा, किं०इतरांचा ममशब्दपूर्वक निश्चय करणें·

ममता, स्त्री०सं० हें माझें अशी जी बुद्धि ती, २, कांहींएक पदार्थावर प्रीति, किं०दया उत्पन्न होती ती, ३, ला० मत्ता

ममतास्पद, ३लिं० माझें अशी बुद्धि ठेवायास योग्य असे जे पुत्रदारादिक ते·

ममताळू, ३लिं० दयाळू·

ममत्व, न०सं० ममता प्रथमार्थी

मय, अ०सं० तो एक पदार्थ दुसरें कांहीं नाहीं असें वर्णायाचें असतां प्रा० संस्कृत शब्दांच्यापुढें हा शब्द लागतो, व विशिष्टशब्द प्रा०वि० होतो, उ० समुद्रांत जाऊन पाहिलें तो जलमय सर्व दिसूं लागलें, २, प्रकृतीची कांहींएक विकृतिवाच्य असतां प्रकृतिवाचकावरून याचा प्रयोग होतो, आणि विशिष्टाचा अर्थ होतो, उ० स्फवर्णमय प्रतिमा करावी·

मयत, ३लिं०हिं० मेला जो तो, २, धान्यादिकाचें जें रुक वें, याचा नपुंसकीं विशेष्यलेंकरून प्र०होतो·

मयतपाणी, स्त्री० शेताचे रुकव्याची जी पाहाणी ती·

मयातेन, ३लिं० दोनशें या संख्येचा वाचक हा शब्द

मयूर, पु०सं० एक सुंदर पक्षी आहे·

मरकत, पु०सं० पांच रत्न आहे·

मरगाण, मरगळ, स्त्री० हात पाय अस्ताव्यस्त टाकून पडण्याचा जो प्रकार ती, २, मरगळ येणें मरगळीस येणें असा प्र० होतो, ३लिं० शरीरीं सामर्थ्य असून मरगळ घेण्याचा स्वभाव जा ना तो·

मरगी, स्त्री० जरीमरी·

मरण, न०सं० देहांतून प्राणाचें जें गमन तें, २ कांहींएक गोष्टी विषयीं न्यूनता किं० नाश कांहीं असें निःसंशयपणानें वर्णायाचें असतां मरण नाहीं असा प्र०, उ० या व्यापारांत वांभर रुपयांस मरण नाहीं निरवालस मिळतील, आजचें मरण उद्यावर लोटणें, इ० स्थळीं प्राप्त झालेलें संकट कालांतरावर नेणें, उद्याचें मरण आज आणणें म्ह० कालांतरीं प्राप्त होणार जें संकट तें लवकर प्राप्त होई असें करणें, रा० मरण माथा येणें, पावणें म्ह० कांहींएक व्यापार करून केवळ थकणें, उ० हा पांचकोस जमीन चालला म्ह० मरण माथा येतो, म्ह० कोशाआतें मरण पुढें साम्राज्य·

मरणप्राय, न० मरणासारिखें संकट प्राप्त व्हावयाजोगें जें निमित्त, २, मरण तुल्यतेकरून विवक्षित जें संकट तें, उ० हें कार्य करणें मला मरण प्राय आहे, कोणी मागितलेली वस्तु नाहीं म्हणायास मला मरणप्राय होतें·

मरणसोंग, न० कपटानें घेतलें जें मेल्यासारिखें सोंग तें·

मरणा, ३लिं०रा० ज्वरादिकानें अत्यंत जो अशक्त तो·

मरणें, मरण पावणें, २, दुरबणाइत होणें, प्र० वर्तमानीच, उ० तो दोन महिने मरतो आहे, ३, अतिशयित संकट, हानि, पावणें, उ० त्या साखरेचा व्यापारांत तो हजार रुपयाला मेला, ४, एरवादे कामावर अतिशयित झटणें, उ० तो या कामावर दोन वर्षें मरतो आहे तथापि अद्यापि सिद्धीस गेलें नाहीं, ५, कांहींएक गोष्टीविषयीं अत्युत्सुक होणें, ६, कांहींएक पदार्थावर अतिशय प्रीति ठेवणें, उ० एखदा मरतोस कां उद्या तुझें काम होईल

मू

होईल,७, हुतुतु इ० खेळामध्यें गड्यानीं खेळायास अनुपयोगी व्हावें अशी जी हार येती, तिणें युक्त होणें, उ० दाहा गड्यांतून दोन गडी मेले, ८, सोनें, रुपें, पारद इ० कांनीं वनस्पति, इ० कांचा योगानें पूर्वावस्था न प्राप्त व्हावयाजोगें भस्म दशेतें पावणें, ९, कोणास दिलें जें ऋणादिक तें थकणें, १०, खरूज, नाइटा, इ० रोगानीं औषधोपायानीं नाहींसें होणें, ११, किती एक पदार्थांतील रक्त, पाणी, आटणें, इ० कारणामुळें नाहीं असें होणें, १२, अंग इ० मरणें म्ह० अंगातील रक्ताचा अंश नाहीं असा होणें, किं० चेतनांश नाहींसा होणें, वृक्षादिकाचें अंग मरणें एथें पुढलें, मागलें, ऋतास कमी येणें, दृष्टि मरणें म्ह० वारंवार पदार्थ दर्शनाभ्यासामुळें तें अधिकोत्तर नाहीं अशा अवस्थेनें दृष्टियुक्त होणें; उ० आठ चार दिवस गलबतांत बसतांच पाण्याकडे पाहाण्याविषयीं त्याची दृष्टि मेली, मरण्या जिण्यास कामास येणें, म्ह० कोण एक पदार्थानें प्रसंगीं उपयोगी पडणें, मेले गळेवेळेस उपयोगी पडणें म्ह० अनियमित भलते वेळेस, भूक, तान, निद्रा, इ० मरणें म्ह० मंद होणें, आशा मरणें म्ह० उठेनाशी होणें, रा० मरों पुरेसें होणें, म्ह० भीड, किं० ओशाळगत इ० कारणामुळें मरण येईल तरबरें अशा अवस्थेनें युक्त होणें, रा० मरून पडणें म्ह० वृक्षादिकानीं अनिवार्यित फल भरानें युक्त होणें, किं० फलानिश्चय होणें, उ० अंबे, यंदा मरून पडले आहेत, मरतां मरतां हात पाय झाडणें म्ह० सर्व शक्तिहीन झाली तथापि शेवटीं एकदां पराकाष्ठेचा प्रयत्न करणें ·

**मरणोन्मुख**, ३ लिं० सं० आसन्न मरण दशेस पावला तो जीव वृक्षादिक ·

**मरतमडें**, न० केवळजो मरणा तो ·

**मरतवांझ**, स्त्री० जिला मुलें होऊन वांचत नाहींत ती·

मरत

**मरतसंभाळ**, स्त्री० पु० फार खाल्लें असतां मरेन ही भीति न बाळगितां बहुत खाण्याचा जो व्यापार ती तो ·

**मरतीक**, न० मेले मनुष्याची जी उत्तर क्रिया तें व तें मेलें मनुष्य, उ० त्याचे घरीं दोन मरतिकें झालीं ·

**मरतुकडा, मरतुगडा**, ३ लिं० मरतमडें ·

**मरद**, पु० मर्द शब्दाचा अपभ्रंश ·

**मरदणें** मर्दणें ·

**मरमर**, स्त्री० **मरमरा**, पु० मरणास न भितां दांडगाईनें उडी टाकणें, इ० साहस कर्मास प्रवृत्त जो त्यास जी मरण यावयाजोगी दशा प्राप्त होती ती तो ·

**मरवडा**, पु० वा० मरमरा ·

**मरवा**, पु० एक सुगंधिक झाड आहे ·

**मरशा**, पु० مرثيه हिं० मुसलमान डोल्यापुढें गात असतात असें गाणें आहे ·

**मरळ**, स्त्री० मरगळ ·

**मराटमोळा**, पु० जे आपणास मराटे म्हणवितात त्यांचे बायकानीं बुरखा घ्यावा अशा तऱ्हेचा जो साधारण रीति असतात तो ·

**मराठा**, ३ लिं० ज्याची मुळापासून भाषा मराठी आणि महाराष्ट्र देशांतला मुळचा राहाणारा तो, या शब्दाची विशेष प्रवृत्ति किती एक शूद्रांवर आहे ·

**मराठी**, ३ लिं० महाराष्ट्र देशाची जी भाषा रीति विशेष इ० ती ·

**मराठीमोळा**, पु० मराठमोळा ·

**मरातब**, पु० स्त्री० हिं० कांहीं एक मोठी विद्या संपादन केली असतां, किं० पराक्रम संपादिला असतां जें मोठें नाव देतात किं० संमान करितात तो ती, उ० भट्टाचार्य, उ० समशेर बाहादर ·

**मरांदा**, पु० वा० नारळ रुझला असतां जो आंत फूस होतो

तो तो.

**मरामत**, स्त्री० مرمت हिं० प्रा० निगेचा अर्थी, २, वा० कांहींएक पदार्थ यथास्थित व्हावयाजोगी जी विलक्षण युक्ति ती, उ० या पुरुषाची मरामत दुसऱ्यास येणार नाहीं, ३, प्रा० मरानब या अर्थी

**मरी**, स्त्री० जरीमरी.

**मरीच**, न० सं० मिरीं.

**मर्कट**, पु० न० सं० तांबडे तोंडाची एक वानरांत जाती आहे, स्म० मर्कट मदिरापान.

**मर्कटचेष्टा**, स्त्री० सं० मर्कट तुल्य जा मनुष्यानें दुसऱ्यास चिरड यावयाजोग्या केल्या जा चेष्टा ती.

**मर्जी**, स्त्री० مرضی हिं० कोण एकावर कोण एकाची जी सुप्रसन्नता ती, उ० आताशीं त्याची त्यावर मर्जी आहे, २, अंतःकरण वृत्ति, उ० त्याची मर्जी रुष्ट आहे, ३, हें चांगलें, हें करावें, हें न करावें, इ० विषय जो अंतःकरणवृत्तिचा आकार ती, उ० मर्जीस येईल ते वाटेल ते आउं, मर्जीस उतरणें स्म० चांगला असा वाटूं लागणे, मर्जी सभाळणें, मर्जी राखणें, स्म० मन सभाळणें, मर्जीत राहणें, स्म० रवप्पा होणें, मर्जी संपादणें, स्म० अनुकूल करून घेणें.

**मर्जीमाफक**, अ० हिं० मर्जी अनुकूळ होई असें, कर, हो, इ० धा० वि०

**मर्द**, पु० हिं० धैर्यवान् पराक्रमी असा जो तो, २, साधारण पुरुषव्यक्तीस स्म०

**मर्दगाजी**, पु० مردغازی हिं० मर्दास च स्म०

**मर्दणें**, सं० कांहीं एक पदार्थ हस्तादिकानें चेपून शिथिलावयव होई असें करणें, २, ग्रं० ठार मारणें.

**मर्दन**, न० सं० मर्दण्याचा व्यापार, सं० स्म० मर्दनं गुणवर्धनं.

**मर्दमाणूस**, पु० हिं० धैर्यवान् जो मनुष्य तो.

**मर्दा**, ३ लिं० हिं० धैर्यवान् घोडा, मनुष्य, इ०

**मर्दाई**, स्त्री० हिं० मर्दपणाचें जें कर्म, क्रिं० मर्दपणा ती.

**मर्दाना**, ३ लिं० हिं० मर्द.

**मर्दानी**, ३ लिं० हिं० स्त्री पुरुष साधारण वस्त्रास जें [illegible] नाव असतें त्यांतून जें पुरुषाचें मुकटा, सोवळे, इ० तीं, व जनानी नव्हे जो कर घ्यपदादि ती.

**मर्दित**, ३ लिं० सं० मर्दन केलें जाचें तो.

**मर्दी**, स्त्री० हिं० मर्दाई.

**मर्दुमी**, स्त्री० हिं० मर्दाई.

**मर्फा**, पु० हिं० ताशा बरोबर वाजवायाचें एक वाद्य आहे.

**मर्म**, न० सं० सन्निधानादिकें करून कांहीं एक कार्याविषयीं साधक जी तत्तत्पदार्थनिष्ठ योग्यताविशेष असतो तें, प्रा० त्याचें अनुमान कार्यावरून होतें, उ० सर्व पदार्थामध्यें जीं ईश्वरानें मर्में ठेविलीं आहेत तीं कोणास समजनात, २, शरीरादिकांत कांहींएक अवयवी त्याचा जा अवयवावर आघातादि संस्कार झाला असतां सर्व अवयवांस व्यापितो असा जो त्या अवयवावर धर्मविशेष असतो तो, व तद्विशिष्ट तें, ३, श्लोकादिकाचें जें तात्पर्य तें, ४, गुप्त जें कोणा एकाचें दुष्कर्म इ० तें, उ० कोणा एकाचें मर्म काढूं नये, ५, तत्तत्कार्य निर्वाहक जी युक्तिविशेष तें, उ० घडयाळांतलें मर्म समजत नाहीं.

**मर्मभेद**, पु० सं० जाजवर आघातादिक झालें असतां प्राण व्याकुळ होतो असें जें शरीरांतील मर्म त्याचा भेद, २, ला० गूढ गोष्टीचा आंतील मर्माचें प्रयत्नानें जें

जें परिज्ञान तो,३, एखाद्याचा दुष्कर्मांचें जें उद्घाटन तो,४, कांहीं एक मसलतींत मुख्यत्वें करून जो असतो त्याचा जो अनेक युक्तींनी स्वकार्यसाधनार्थ भेद तो·

**मर्मस्थल**, न० सं० मर्मस्थान·

**मर्मस्थान**, न० सं० शरीरांतील मर्माची जागा·

**मर्मज्ञ**, ३ लिं० कांहीं एक गोष्टीचें जें मर्म जाणतो तो·

**मर्यादशील**, ३ लिं० मर्यादेनें भाषणादिक करण्याचा स्वभाव ज्याचा तो·

**मर्यादा**, स्त्री० देशकाल क्रिया इ० कांस कांहीं एक प्रमाणानें कल्पित जो अवधि तो,२, लोक व्यवहारानुरूप जी विनीतता असावी ती,३, मनुष्यानें अमुक रीतीनें वागावें असा जो लोक संप्रदाय सिद्ध, किं० शास्त्र सिद्ध नियम तो·

**मऱ्हाटा**, ३ लिं० मराठा·

**मऱ्हाटी**, ३ लिं० मराठी·

**मल**, पु० सं० पदार्थावर मृत्तिका,केर, इ० कांचा योगानें उत्पन्न होतो तो,२, ला० अंतःकरणामध्यें दुष्टवासना इ० तो,३, विष्ठा·

**मलकंबरी**, ३ लिं० मल्लकंबर नामा कोणएक पुरुष होता त्यानें बांधिला जो शेत,इ० कांचे धान्याचा विरस्ता इ० तो·

**मलखांब**, पु० तालिमखान्यामध्यें गोलदार स्थंभ असतो तो·

**मलद्वार**, न० गुदद्वार·

**मलपृष्ठ**, न० ग्रंथाचा आरंभी लिहिल्यावांचून जें टाकितात पृष्ठ तें

**मलवारी**, ३ लिं० मलवार संबंधी जो जिन्नस इ० तो

**मलम**, न० पु० हिं० जखम भरून यावी,किं० वाहून निर्दोष व्हावी ह्म० जें औषध घृतादि मिश्रित लावितात तें तो·

**मलमपट्टी**, स्त्री० हिं० मलमाची पट्टी·

**मलमल**, स्त्री० फार बारीक एक कापड आहे·

**मलमा**, पु० घर,भिंत,इ० पडल्यानंतर त्यांचा अनुपयोगी होउन पडतो जो सरंजाम तो.प्रा० दगड मातीवर व्यवहार·

**मलमास**, पु० सं० अधिकमास·

**मलय**, पु० एक पर्वत आहे·

**मलयागर,मलयागीर**, पु० चंदनाची जाती आहे·

**मलयी,मलई**, स्त्री० श्रुतिशास्त्र इ० नसतां कांहींएक कार्यार्थ अनेकानी मिळून किं० एकानें केली जी दांडगाई ती·

**मलवस्त्र**, न० देवादिकांवर मळ बसू नये ह्मणून जें वस्त्र घालितात तें

**मलविसर्ग**, पु० सं० पोटांतील अन्नमल परित्यागाचा जो व्यापार तो·

**मलशुद्धि**, स्त्री० समाधान वाटायाजोगा जो पोटांतील मळाचा झाडा तो·

**मलिदा**, पु० हिं० पिठाच्या उंडेशें रोट करून दूध तूप साकर मिळवून जो करितात तो,२, ला० फार चेंचून मळून मृदु केला जो पिष्टादि पदार्थ तो·

**मलिन**, ३ लिं० सं० मल विशिष्ट जें वस्त्रादिक किं० अंतःकरण तो,२, ला० आचारहीन जो मनुष्य तो,३, बहुत दिवस आठवीत न घोकल्यामुळें अनुपस्थित झाली जी विद्यादिक तें·

**मलूर,मलूल**, ३ लिं० रोग,श्रम, इ० कानें यत्किंचित जो म्लान तो,२, आळ्यादिकामुळें मंदोत्साह जें अंतःकरण तो ·

**मल्ल**, पु० सं० जेठी ·

**मल्लयुद्ध**, न० सं० बाहुयुद्ध ·

**मल्लारी**, पु० खंडोबा ह्मणून एक देव आहे ·

**मल्लिका**, स्त्री० सं० मोगरा ·

**मल्हार**, पु० गाण्यांत एक राग आहे,२, मल्लारीसही ह्म०

**मल्हारी**, पु० मल्लारी,२,त्याचे भक्त जे वाघ्ये त्यांसही ह्म०

**मवाळी,मवारी**, स्त्री० शरीर मृदु व्हावें ह्मणून लावायाचें जें तेल,तूप इ० तो, शरीरादिकांस लावायाची असतांच प्र०

**मवाशी**, स्त्री० मवाशांचें जें कर्म तो,२, मवास ·

**मवास**, पु० राजाला न मानितां आपणच धनीपणानें वागतो तो ·

**मवाळी**, स्त्री० मवारी

**मशी**, स्त्री० पात्रादिकांस अग्निज्वाला संयोगानें काळा अंश लागतो तो ·

**मशागत**, स्त्री० हिं० शरीर कष्टानी शेत इ० चांगले करण्याचाजो प्रकार तो,२, मजूरी,उ० मी मशागत करून पोट भरितों, माझी झालेली मशागत दे ह्मण जे मी जातो ·

**मशागती**, ३ लिं० مشقتی हिं० मशागत करून पोट भरितो तो,२, सर्वदा उद्योगावांचून रहात नाही तो ·

**मशारनिल्हे**, अ० हिं० लेखांत पूर्वी जो थोर मनुष्याचें एकवार विशेष नाव आलें त्याचेंच पुनः नाव ल्याहावयाचें असतां त्याच्या सामान्यनावामागें हे अव्यय लागतें, किं० याणेंच बोध होतो ·

**मशाल**, स्त्री० مشعل हिं० दांड्यावांचून जी दिवटी तो·

**मशालची, मशालजी**, पु० مشعلچی हिं० मशाल धरण्याचें कसबकरून उपजीविका करितो तो·

**मशीद**, स्त्री० مسجد हिं० मुसलमान ईश्वर भजन करायासाठीं जें देवालयासारखें बांधितात तो,२,ला० मोठें जें मनुष्य रहित घर,वाडा,इ० त्यास ह्म०,ह्म० चुकला फकीर मशीदींत शोधावा ·

**मशेरी**, स्त्री० रेशिम, इ० जाळून काळी रक्षा करितात तो,२, मशी ·

**मश्रू**, स्त्री० हिं० गजनी ·

**मस**, पु० हिं० शरीरावर तिळापेक्षां मोठा काळा जो डाग किं० गोलाकार असतो तो,२, स्त्री० मशी,तोंडास मस लागणें, ह्म० काहींएक कलंकारोपानें अप्रतिष्ठा होणें ·

**मसक**, स्त्री० مشک हिं० पाणी वाहावयाचें उपयोगी बकरा इ०कांच्या चर्मांचें पात्र करितात तो ·

**मसकती**, ३ लिं० मसकत संबंधी जो जिन्नस इ० तो·

**मसण**, न० माणसें जाळावयाची किं० पुरावयाची जागा तें,ग्रा० मसण माजणें ह्म० तृण,कुंस, शेत, इ० फार मोठें वाढणें ह्म० आचार स्वाणें आणि मसणांत जाणें ·

**मसणखुंट**, पु० ग्रा० ज्यास विद्या आई बाप संसार इ० नसून जो शरीरानें धष्टपुष्ट तो·

**मसणवटी**, स्त्री० मसण,२,ला० मरारीच्या लाक्षणिकार्थी ·

**मसणा**, ३ लिं० अमुकच असा नाम निर्देश करावया-च्या नाहीं तेथें याचा प्र०, कंटाळ्यानें योलायाचें अ-सतां करितात ·

**मसंदणें, मसंदळणें**, पिष्टादिकांत पाणी इ० घालू-न मळणें, जेथें मळणें अविवक्षित आहे तेथेंच प्रा० प्र०

**मसलत**, स्त्री० مصلحت हिं० अमुक काम, अमुक री-तीनें करावें असा जो विचार तो, व तिचें फळ, मस-लत पडणें म्ह० कांहींएक गोष्टीचा विचार करावया जोगा प्रसंग प्राप्त होणें.

**मसलतदार**, ३ लिं० مصلحت دار हिं० मनसबदार ·

**मसलतबाज**, ३ लिं० हिं० मसलतदार ·

**मसल्तती**, ३ लिं० हिं० मसलतबाज ·

**मसाला**, पु० مصالح हिं० शाक भाजी इ० कांस रुचि याची म्हणून हिंग, जिरीं, मिरीं, धणें, इ० घालितात तो, २, घोडे, इ० पुष्ट व्हावें म्ह० गूळ, मेदा, भांग, इ० मि-ळून जो देत असतात तो, ३, लवंग, इलाची, ख-डीसाखर इ० क्षीर, लाडू, इ० कांत घालितात तो, ४, चुना इ० कांत विवक्षित गुण किं० स्वाद उत्पन्न व्हा-वा म्ह० त्यात जो जो जिन्नस घालितात तो, ५, सर्का-रांत कोणी अपराधी आणावयाचा असतां त्याजपासू-न त्याचे घरींच न्याय व्हावयाचे पूर्वीं जें द्रव्य घेतात तो, ६, रा० वसूल वासलाम सर्कारच्या शिपाई पा-ठविला असतां त्यास जें त्या चिठ्ठींत द्रव्य दे वविलें असतें तो ·

**मसूदर**, स्त्री० مسطر हिं० कागदोपत्रीं दोवटच्या र-काना टाकून ओढितात जी रेघ ती ·

**मसूदा**, पु० مسوده हिं० सिद्धांतपत्र करावयाचा पूर्वीं तो मजकूर स्थारावयासाठीं भलते एका पत्रावर मो मजकूर लेहून पत्र सिद्ध करितात तो ·

**मसूर**, स्त्री० एक धान्य आहे ·

**मस्करी**, स्त्री० مسخری हिं० थट्टा, मस्करीची कुस्करी होणें, म्ह० मस्करीपासून कज्जा उपस्थित होणें ·

**मस्त**, ३ लिं० हिं० मत्त, २, शरीरानें जो धष्टपुष्ट तो, ३, पुष्कळ तो, म्ह० पडेल हस्त तर पिकेल मस्त ·

**मस्तक**, पु० न० सं० डोकें, म्ह० दोन हस्तक आणि ति-सरा मस्तक ·

**मस्तवाल**, ३ लिं० हिं० स्वभावेंकरून उन्मत्त तो ·

**मस्ता**, ३ लिं० हिं० मस्त, प्रथम द्वितीयार्थीं ·

**मस्तावणें**, रा० मस्त होणें ·

**मस्ती**, स्त्री० मस्तवालाचें कर्म १ मस्तपणा ३, हतीपासू-न जो मद गळतो त्यासही म्ह०

**मस्त्या**, ३ लिं० हिं० मस्ता ·

**महकुबी**, स्त्री० مہکوبی हिं० महकूबपणा ·

**महकूब**, अ० موقوف हिं० तहकूब अव्ययार्थी

**महजर**, पु० محضر हिं० कोणा एकास वतनाचा साधनाचा काजी इ० क कागद करून देतात तो ·

**महत्**, ३ लिं० थोर, स्त्रीलिंग, किं० पुल्लिंग, संस्कृत शब्द याचेपुढें लागला असतां महा असें होतें, उ० महा बुद्धिमान, नपुंसकलिंग संस्कृत शब्द पुढें ला-गला असतां महत् असें होतें, उ० महत्संकटीं ई-श्वर पावतो, महालबाड, महा सोदा, महा माजा-गमनी इ० प्राकृत शब्दाचायोगींही समास होतात·

**महंत**, ३ लिं० गोसावी, बैरागी, इ० कांचा मंडळीमध्यें जो मुख्य असतो तो, २, ला० विद्वान्, तपस्वी, साधु, इ० कामध्यें जो श्रेष्ठ तो ·

**महताप, महताब,** स्त्री० दारूची मोठी जी चंद्रजोत करितात ती, २, सुंदर स्त्रीस ह्म०

**महत्तत्व,** न० प्रकृतिपुरुषसंयोगानें अहंकारादि सृष्टीस कारण भूत जो विकार उत्पन्न झाला तें ·

**महत्व,** न० सं० मोठेपणा, महत्व वाढविणें ह्म० वास्तविक गुण नसतां प्रतिष्ठा होई असें करणें महत्व उतरणें, ह्म० फजीत करणें ·

**महर्घ,** ३लिं० सं० सामान्य संप्रदायापेक्षां अधिक मूल्य ज्यास पडतें तो पदार्थ ·

**महर्घता,** स्त्री० सं० पदार्थास अधिक द्रव्य पडावें अशी देशकालादि धर्मामुळें जी अवस्था प्राप्त होती ती, २, महर्घपणा, ३, ला० पदार्थ मात्राच्या उणेपणा ती ·

**महला,** पु० हिं० नगरादिकांमध्यें प्रा० एक जातीयच लोक राहात असतात असा जो जो प्रदेश तो ·

**महशूर,** ३लिं० हिं० प्रसिद्ध जो पुरुष किं० सर्वत्र प्रसिद्ध जो व्यवहार तो, याचे समास, बाजार महशूर इ० जाणावे ·

**महसूली,** ३लिं० हिं० महसूल ज्यापासून यावयाचा तो देश, ग्राम, कूळ, शेत, इ० तो ·

**महसूल,** पु० हिं० सर्कारी जो देश ग्राम इ० कांकडून वसूल येतो तो ·

**महाग,** ३लिं० महर्घ ·

**महागरा,** ३लिं० महाग विकण्याचा स्वभाव ज्याचा तो, वाणी इ० तो ·

**महागाई,** स्त्री० महर्घता ·

**महाग्या,** ३लिं० महागरा ·

**महाजन,** पु० सं० विद्वान्, ज्ञानी, सदाचारसंपन्न असा जो मनुष्य तो, ह्म० सं० महाजनो येन गतः स पंथा ·

**महाजन,** पु० शहर, गांव एथील एक अधिकारी आहे ·

**महाजनकी,** स्त्री० महाजनाचें जें कर्म किं० अधिकार ती

**महाडी,** स्त्री० भातामध्यें एक जाति आहे ·

**महात,** पु० पिलवान

**महातारा,** ३लिं० उत्तर वयस्क जो मनुष्य इ० तो. ग्रंथी याचा प्रयोग करितील असें वाटतें

**महात्मा,** ३लिं० औदार्य धैर्य इ० कें करून संपन्न जो पुरुष तो ·

**महादान,** न० हस्ती इ० जीं सोळा दानें तीं ·

**महादेव,** पु० सं० एक देव आहे, ज्यास शिव असें ह्म० तो ·

**महान्,** ३लिं० सं० थोर, २, गा० गरवें जें धान्य तें, ३, जा वृक्षजातीमध्यें प्रतिवर्षी फळें पुष्पें येऊन मरतात, आणि कांहीं अनेक वर्षें फळें पुष्पें येऊन टिकतात, असे दोन भेद आहेत त्यांतून अनेक वर्षें राहाणारा जो मिरची, कापूस, पांढरा सूर, इ० वृक्ष तो ·

**महानदी,** स्त्री० उत्पत्तिस्थानापासून शतयोजनपर्यंत जी लांब गेली नदी ती ·

**महानवमी,** स्त्री० आश्विन शुद्ध नवमी ती, २, रामनवमीसही ह्म०

**महानुभाव,** ३लिं० कामक्रोध इ० दोषानीं ज्याचें चित्त चंचल होत नाहीं असा जो मनुष्य तो ·

**महानैवेद्य,** न० पु० देवास जो अन्नमय नैवेद्य दाखवितात तो ·

**महापद्म**, पु० एक नवनिधीमध्यें निधि आहे,२,एक संख्या आहे १००००००००००००

**महापातक**, न० ब्रह्महत्या,सुरापान, इ० जें पातक तें·

**महापुरुष**, पु० ईश्वर,२, साधु जो कोणी झालतो,२, ब्राह्मण मरून जो पिशाच होतो त्याची कोणत्याही स्थळीं स्थापना केली स्त्र० त्यास स्त्र०

**महाप्रलय**, पु० ब्रह्मदेवाचीं शतवर्षें भरल्यानंतर जो प्रळय होतो तो·

**महाप्रसाद**, पु० देवाच्या उत्साहामध्यें ललित झाल्यानंतर जो कांहीं प्रसाद वांटितात तो·

**महाप्रस्थान**, न० मरण·

**महाफल,महाफळ**, न० नारळ महाळुंग इ० फल तें·

**महाबळी**, पु० पिशाच्यादिकांस जो अन्नादिकांच्या मोठा बळी देत असतात तो·

**महाभारत**, न० एक इतिहास पुराण आहे·

**महाभूत**, न० पृथिव्यादि पांच भूतें तीं प्र०

**महामणि**, पु० हिरा माणीक इ० जीं रत्नें तो·

**महामाया**, स्त्री० आदिमाया.२,ला० निंदा कर्तव्य असतां बायकांस स्त्र०

**महामारी**, स्त्री० एककाळीं अनेक मनुष्यादिकांस हग,ओक, पोटांत तिडीक इ० व्यथा होउन मरतात असा एक रोग आहे,३,तदभिमानिनी जी देवता ती·

**महासुरी**, स्त्री० ... हिं० महासूरपणा·

**महासूर**, ३ लिं० हिं० विपुल जो धान्यादि पदार्थ तो. २, स्त्री० धान्यादिकांची जी विपुलता ती,३, किल्ला इ०कांचीं प्रतिबद्ध जीं कवाडें इ० तो करहो, इ० धा० प्र०,४, वा० लावल्यानें, पेरल्यानें, सस्यादिकानें परिपूर्ण दशा पावलें जें शेत,वृक्ष इ० तो·

**महामृत्यु**, पु० मनुष्यादिकांस जो मृत्यु प्राप्त होतो तो, अपमृत्यु सन्निधान असतां प्र०

**महायात्रा**. स्त्री० काशीयात्रा·

**महार**, पु० अतिशूद्र,स्त्र० महार मेला आणि विटाळ गेला, महाराची आई त्याहार घेऊ·

**महारकावळा**, पु० डोंब कावळा·

**महारकी**, स्त्री० गांवचा महाराचा जो वतनदारीचा अधिकार ती·

**महारकोंडी**, स्त्री० कोंडींत एक भेद आहे·

**महारथ, महारथी**, पु० सामान्य दाहा सहस्र जे धनुर्धर त्यांजबरोबर एकटा युद्ध करण्यास समर्थ जो तो,२,ला० मोठाश्टर किं० मोठा वक्ता इ०कांस स्त्र०

**महारपोर**. पु०न० ग्रामांतील नीचजातीचें जे लोक ते· प्र०अने०व०

**महारवडा,महारवाडा**,पु० महाराचें जें वसतिस्थान तो २.ला० सोवळें ओंवळें इ०कांचा अव्यवस्थेचा जो प्रकार तो,उ० त्याचे घरीं सारा महारवडा आहे. मी कांहीं जेवायास जात नाहीं·

**महारवी**, ३ लिं० महारानीं निर्मिलें जें सूत वंशपात्र इ० तो·

**महाराज**, ३ लिं० सं० राजा,२, थोर मनुष्यास सत्कारानें स्त्र०,३, गुजराथी याण्याचा जो गुरु त्यासही स्त्र०

**महाराष्ट्र**, पु० सं० उत्तरेस नर्मदा,दक्षिणेस कर्नाटक पूर्वेस तेलंगण, पश्चिमेस समुद्र या सिमेच्यामधला

घलाजो देश तो,२,३लिं० त्या देशांत राहाणारे जे लोक ते व त्या देशांतील भाषा इ० तो·

**महारोग**, पु० सं० राजयक्ष्मादिक जे नउ रोग ते प्र०

**महार्णव**, पु० सं० मोठा जो समुद्र तो,२,न० कलह युद्ध इ०कांचा जो मोठा प्रसंग किं० निरंतर प्रसंग तें. जघन्यउ० एवढे्शा गोष्टीचें त्यां लागलेंच महार्णव केलेंस·

**महाल**, पु० محل हिं० तालुक्याचा पोटीं अनेक ग्राम समुदायात्मक जे देशविभाग असतात तोव त्या ग्रामादिकांची देण्याघेण्याची वहिवाट जा स्थळीं होत असती तें स्थल तो व ती वहिवाट,२, क्रीडागृह, महाल मजकुरावर पडणें, महाल मजकुराखालीं पडणें, घालणें,इ० स्थळीं कांहीं एक गोष्ट जा काळीं अवश्य करावयाची त्या काळीं न करितां मागलटीस टाकणें·

**महालकरी**, पु० सर्कारी महालसंबंधीं जो अधिकारी तो·

**महालय**, पु०सं० भाद्रपद वद्य पक्षीं जीं श्राद्धें करितात तो·

**महालक्ष्मी**, स्त्री०सं० एक देवी आहे.व आश्विनांत तिचा जो अष्टमीस उत्साह करितात त्यासही म्ह०

**महाला**, ३लिं० न्हाव्याचा नावापुढें याचा प्र० होतो उ० रामहाला त्रिंबकमहाला इ०

**महावस्त्र**, न०सं० शालजोडी इ० जें प्रतिष्ठित वस्त्र तें·

**महाव्याधि**, पु०सं० रक्तकुष्ठ जो रोग तो·

**महाशंकु**, पु०सं० १०००००००००००० अशी एक संख्या आहे·

**महाशिवरात्र, महाशिवरात्रि**, स्त्री०सं० माघवद्य चतुर्दशी·

**महाळ**, पु० महालय·

**महाळवस**, पु०ग्रा० भाद्रपद वद्य पक्ष·

**महाळवसा**, पु०ग्रा० महाळवस·

**महाळुंग**. स्त्री० एक झाड आहे,२,न० तिचें जें फळ तें·

**महिना**, पु० शुक्ल कृष्ण जे दोन पक्ष तदात्मक जो काळ किं० साधारण त्रिंश दिनात्मक जो काळ तो, महिन्याचे कांठीं शंभर रुपये मिळतात एथें महिन्याचे कांठीं म्ह० सर्वही महिन्यांत·

**महिनेकरी**,३लिं० एक एक महिना कांहीं एक काम अनेकांनीं करावें असें वांटून घेतलें असतां त्या त्या महिन्याचा जो अधिकारी तो·

**महिनेभरू**, ३लिं० धन्याचा कामाची पोटागन सून महिन्याचा द्रव्याचीमात्र काळजी करितो तो·

**महिनेमाल**, ३लिं० हिं० कांहीं एक काम करायाकरितां महिन्यास अमुक द्रव्य द्यावें असा बोलीनें ठेविला जो चाकर तो·

**महिमा**, स्त्री०पु०सं० कोण एकाच्या वर्णनीय जो प्रभाव तो·

**महिला**, स्त्री०सं० लग्नाची जी बायको ती·

**महिष**, पु०सं० रेडा·

**महिषी**, स्त्री०सं० पट्टराणी,२, महिषाची जी स्त्री ती·

**महीस**, स्त्री० महिषी द्वितीयार्थी·

**महेश**, पु०सं० महादेव·

महेश्वर·

**महेश्वर**, पु० सं० महादेव, २, न० एक ग्राम आहे.

**महेश्वरी**, ३ लिं० महेश्वर ह्मणून जो ग्राम तत्संबंधी जें वस्त्रादिक तें.

**महोत्सव**, पु० सं० मोठा जो देवादिकांचा उत्साह तो.

**महोत्साह**, पु० सं० महोत्सव.

**महोदधि**, पु० सं० रामेश्वराच्या पलीकडच्या जो समुद्र तो.

**मळ**, पु० मल.

**मळई**, स्त्री० नदीच्या कांठीं वांगीं, मिरच्या, इ० व्हायाची जमीन ती, २, दुधाची साय ती, ३, मासे मारायाचें जाळें आहे.

**मळकट**, ३ लिं० मळलेलें जें वस्त्रादिक तें.

**मळका**, ३ लिं० मळकट.

**मळकी**, स्त्री० वा० मळई प्रथमार्थी.

**मळघावणें**, उ० वस्त्रादिक मलिन करणें.

**मळण**, न० रा० उसांचा रस काढून गूळ करण्याचा जो व्यापार तें, आणि तें स्थान.

**मळणकर**, ३ लिं० शेताची मळणी काढायासाठीं बोलावलें जें मनुष्य तें.

**मळणी**, स्त्री० धान्य तत्तृणापासून सुटें असें करण्याचा जो व्यापार ती, २, कांहीं एक पदार्थाचा पक्वदशेचा जो मुख्य समय ती, मळणीवर येणें ह्म० कांहीं एक पदार्थाचा सिद्ध होण्याचा जो समय त्या समयीं येणें.

**मळणें**, वस्त्र शरीर इ० मलानें युक्त होणें, २, धान्य मळणीनें युक्त करणें, ३, वस्त्र, पिष्ट, इ० हस्त, पाद, इ० कानें मृदु होई किं० विवक्षितोपयोगी होई असें करणें, ४, अश्वादिकांस हस्तादिव्यापारानें रगडणें, मार्ग मळला ह्म० येण्याजाण्याच्या वहिवाटीनें तयार झाला, गूळ मळला ह्म० गूळ तयार केला.

**मळभ**, न० अभ्र.

**मळभी**, स्त्री० रा० लाहानजी मेघाचा ढग ती.

**मळमळ**, स्त्री० पित्तामुळें किं० कलंकादि भक्षणामुळें जी कांहीं ओकाया जोगी विकृति होती ती, २, ला० कांहीं एक संदिग्ध गोष्ट मनांत आल्यामुळें चित्तास जी संशयात्मकता ती, उ० माझे पगच्या झाडा घेउन तुह्मी आपले मनाची मळमळ फेडून टाका.

**मळमळणें**, मळमळ प्रथमार्थानें युक्त होणें.

**मळमळा**, स्त्री० मळमळ मुख्यार्थी.

**मळमळीत**, ३ लिं० खरमरीत नव्हे तो, किं० तिखट मीठ इ० यथास्थित लागून स्वादिष्ट झाला नाहीं जो पदार्थ तो, २, नीटनेटकेपणा जो व्यवहारामध्यें जसा असावा तसा जोंत नाहीं तो व्यवहार, ३, दे० वस्त्र, पात्र, इ० चांगलें न घांसल्या धुतल्यामुळें चांगलें स्वच्छ झालें नाहीं तें.

**मळवट**, पु० स्त्रियादिकानीं कपाळभर जें लाविलें कुंकु तो, प्रा० भर घातूचे योगी प्र०

**मळशुद्धि**, स्त्री० मलशुद्धि.

**मळसूत्र**, न० एक पदार्थ दुसरे पदार्थास पाहिजे तेव्हां जडावा, पाहिजे तेव्हां मोकळा करावा, अशा रीतीनें फिरकीचे खिळ्यासारिखें करितात तें.

**मळसूत्री**, ३ लिं० मळसूत्रें जा पदार्थाचा सांध्यास असतात तो पदार्थ.

**मळा**, पु० शाख, भाजी, मिरच्या, कोथिंबिर, इ० कांचें जें शेत तो, २, रा० अबल जी दुपिकी जमीन ती,

३, तिळांत एक भेद आहे.

**मळी,** स्त्री० गांवच्या खळमळ धुऊन जाउन शेता-तजमला असतो ती, २. साकर, गूळ, शोधून जो मळ काढितात ती, ३. आंगाचे मळाची वळलेली जी गव्हल्यासारखी निघते ती, ४. रा० शेताचे मध्यावर बांध घालून जे लाहान लाहान खोंचे करितात ते प्र०

**मळेजमीन,** स्त्री० रा० मळा द्वितीयार्थक जी जमीन ती.

**मळ्या,** पु० दे० कांहीं तांबुस तेलकट जो रंग तो, २, तद्विशिष्ट जो बईल किं० गाय तो.

**मक्षिका,** स्त्री० सं० माशी, म्ह० सं० प्रथम ग्रासे मक्षिकापात:

**मा,** स्त्री० सं० लक्ष्मी, २, आई.

**माई, माईं,** स्त्री० मातृस्थानापन्न ज्या स्त्रिया त्यांस पुत्रस्थानापन्न जे ते या नावाने हाक मारितात, तें एक वार ज्या स्त्रीचें नाव पडतें तिला या नावानें सर्व हाक मारितात, २, रा० न० पोरांचे भाषेनें मांजरास म्ह० परंतु सानुस्वारपक्षीं.

**माईण, माईन,** स्त्री० एक झाड आहे.

**माईणसूळ,** न० माईणाचें जें सूळ तें.

**माउली,** स्त्री० आई, व आईसारखी अतिशयित भक्तीजी स्त्री, तीस स्तुत्यर्थ म्हणतात, २, जलदेवता प्र० अनेक व०

**माउशी,** स्त्री० ग्रं० आपले आईचीजी बहीण ती, उ० माउशि तुझि आली तान्हेबाळा.

**माउस,** अ० बंधु, भगिनी, इ० नातें साक्षात् नसत्तां मावशीचे द्वारानें सस्थानिकता आहे म्ह० बंधु भगिन्यादिवत् जे होतात, त्यांचे मागें हें उपपद लागतें एथें त्यात्या नात्याविषयीं प्रयोजक कर्त्यानुं आपण, किं० आपली बायको, किं० आपला बाप, किं० आई इ० जी त्यांचीत्यांची मावशी जाणावी, उ० माउसभाउ म्ह० आपले मावशीच्या लेक तो, उ० मावससासू, म्ह० बायकोचा, किं० पतीची माउशी

**मांऊ,** न० पोराच्या भाषेनें मांजरास म्ह०, २. दे० बाळभाषेनें आईच्या स्तनास म्ह०

**माऊन,** न० एक औषधी पदार्थ आहे.

**माऊलपणा,** पु० मातोश्री सारिखा जो दयाळूपणा तो.

**माकड,** न० पु० मर्कट, २, कवड्यांच्या खेळांत न उजवतां राहिलाजो च्यवथा तो, म्ह० माकड मारलें आणि पाला हगलें, म्ह० घर सांकड आणि बायको माकड.

**माकडचेष्टा,** स्त्री० मर्कटचेष्टा.

**माकडतोंड्या,** ३ लिं० माकडासारिखें ज्याचें तोंड तो.

**माकडमिठी,** स्त्री० माकडाचें पोर जसें आपल्या आईचे पोटाशीं मिठी मारितें तशी मारितात जी कोणा एकाचे आंगास मिठी ती.

**माकडशेंडा,** पु० एक तृणांत जाति आहे.

**माकडहाड,** न० पाठीचा कण्याचे समाप्तीचें गुद द्वाराचे वरचें हाड तें.

**मांकण,** स्त्री० घोडा, बैल, इ० कांचे पाठीवर घागरीनें पाणी आणायाचें एक यंत्र करितात ती.

**माकण्या,** ३ लिं० ज्याचे पाठीवर माकण घालीत असतात असा जो बैल उ० तो.

**माका,** पु० एक औषधी झाड आहे.

**माकुलवाणा**, ३ लिं० वा० गोजिरवाणा ·

**माकुला**, ३ लिं० रा० चिमकुला ·

**माकूल**, ३ लिं० प्रौढ सभ्य मनुष्य तो ·

**माकूल्यान**, **माकूल्यानी**, **माकूल्याने**, अ० पुनः

**माखटणें**, रा० भाकरी इ०कांस तूप, इ० कं चोपडणें

**माखण**, न० शरीर, भाकरी, इ० कांस चोपडायाचें जें काहीं तेल, तूप, लोणी, इ० तें, २, तेलादिक शरीरास चोपडण्याचा जो व्यापार तें ·

**माखणें**, तेलादिकानें कांहीं एक शरीरादिक पदार्थ चोपडणें, २, ला० चिखल इ०कानें शरीर लिप्त करणें ·

**माग**, पु० वस्त्र विणायाचें यंत्र आहे, २, कांहीं एक सांडल्या वस्तूच्या, किं० दरवडयादिकांच्या जो शोध तो, ३, अमुक वस्तु, किं० श्वापदादिक ज्या मार्गानें गेले तन्नशोधक जें त्यांचें त्यांचें चिन्ह तो, ४, ला० कांहीं एक गोष्टीच्या जो भाषणादिकानें लागतो थांग तो, ५, रा० झाडांस पाणी लावायासाठीं जो दांडा करितात तो, ६, ज्या दांडयानें एकवार पाणी लाविलें असतां जो प्रदेश शिंपिला जातो तो ·

**मांग**, पु० अंत्यजांत एक जाति आहे ·

**मागचा**, ३ लिं० पुढचाच्या प्रतियोगी जो तो ·

**मागणी**, स्त्री० लग्नार्थ कन्या मागायाचा व्यापार ती, २, समारंभपूर्वक कन्या मागून जो कांहीं अमक्यास द्यावी असा निश्चय ती, ३, गंजीफाचे डावामध्यें मागण्याचा जो अधिकार ती ·

**मागणें**, कांहीं एक पदार्थ मला देइत्याद्यर्थक बोलणें, २, न० कांहीं एक वस्तु मागायासाठीं आला किं० गेला जो मनुष्य तें, पाणी मागून देणें ह्म० पाणी मागायास अवकाश न सांपडूं देतां मारणें ·



**मागती**, अ० माकूल्यान

**मागनेकरी**, ३ लिं० मागणारा ·

**मागमूस**, पु० कांहीं एक गोष्टीच्या जो थांगदोरा तो मागमूस मोडणें ह्म० कांहीं एक पदार्थाचें मागलागायाचें चिन्ह दिसेनासें करणें ·

**मागर**, पु० रा० पोटीं बाहालें नसून जो धारण्या देउन लांब सोपा बांधितात तो ·

**मागरा**, ३ लिं० जी वस्तु पाहिली ती मागावी असा स्वभाव ज्याचा तो निदा असतां प्र०

**मागलट**, स्त्री० माग द्वितीयार्थी, २, कांहींएक प्रसंगा माघार घेण्याचा जो प्रकार ती, ३ कांहीं एक कार्याचा मुख्य समयाचा अतिक्रम झाल्यामुळें तें न होतां मागें राहाण्याची जी अवस्था ती, मागलटीस पडणें ह्म० कांहीं एक कार्याच्या समयातिक्रम झाल्यामुळें तें कार्य सिद्ध न होतां मागें राहाणें, किं० लग्नकार्य साधक जो उपचार तो कार्यांतर प्राप्त झाल्यामुळें मागें पडणें, मागलटीवर टाकणें ह्म० मागें पडे असें करणें ·

**मागलटणें**, कांहींएक कार्य मागलटीस पडणें

**मागला**, ३ लिं० मागचा ·

**मांगलिक**, न० सं० लग्न मुंज इ० जें शुभकार्य तें, २, तत्संबंधी जो मंडप इ० तें ·

**मांगल्य**, न० सं० मंगलकार्य ·

**मांगल्यतंतु**, पु० सं० मंगळसूत्र ·

**मागस**, ३ लिं० आगसाच्या प्रतिपक्षी जो तो ·

**मागसणें**, ज्या काळीं जें व्हावयाचें तें त्या काळीं न होतां मागें राहाणें, उ० यंदा पाउस मागसला यामुळें धान्यें मागसलीं, ह्म० आगसली ती मागसली आणि

मागून आली ती गरव्हार झाली.

**मागसाडणें**, क्रि० एक व्यापारीं प्रवृत्तजें अनेक त्यामध्यें कितीएकांनी पुढें जाउन कितीएकांनी मागें राहणें.

**मागसावणें**, मागसांडणें.

**मागा**, अ० ग्रा० मागें.

**मागाड्या**, ३ लिं० चोर इ० कोंचा माग लाविती तो.

**मागाहून**, अ० पाठीमागून.

**मार्गा**, स्त्री० ग्रा० मागणी प्रथमार्थी.

**मागील**, ३ लिं० मागला.

**मागुता, मागुती**, अ० ग्रं० माकुत्यान

**मागून**, अ० मागाहून.

**मागें**, अ० विवक्षितकालापूर्वी; उ० मागें आह्मास पैका फार मिळत होता; २, कांहींएक पदार्थमात्राच्या क्रमजो पाठचा भाग त्यानें अनुलक्षून; उ० आमचे घराचेमागें बगा आहे; ३, कोणे एकाच्या परोक्ष; उ० मी मेलों ह्मणजे मागें तुमचा विचारास येईल तें करा, मागें सरणें, फिरणें, होणें, घेणें, इ० स्थलीं संकल्पित प्रतिज्ञात इ० कार्यापासून निवृत्त होणें; उ० मी बोललों आहें, त्यास मागें फिरणार नाहीं, मागें पडणें, ह्म० मागलटीस पडणें.

**मागेंपुढें**, अ० कांहींएक कर्तव्य कार्याविषयीं हें करावें, किं० न करावें, किं० याया प्रकारानें करावें, इ० जे सर्व विचार्य अंश त्याते लक्षून; उ० मागें पुढें पाहून काय करणें तें कर; २, प्रसंगवशात् प्राप्त होणाराजो पुढील एखादा काळ त्या काळीं; उ० तुह्मी असें लिहितां परंतु मागेंपुढें जाचील; ३, न० कोणेएक व्यवहाराचाठाई मागचें पुढें, पुढचें मागें असाजो विपर्यास तें; ४, ३ लिं० नदिशिष्ट ग्रंथादितो; उ० मीं सांगीतलें या क्रमात कांहीं मागेंपुढें झालेंअसतां सर्व औषध नासेल, हा ग्रंथ मागेंपुढें झाला आहे तो मी नीट करितों, त्यास मागेंपुढें कोणी नाहीं, ह्म० माता पितरें, किं० बायको, पुत्रादिक नाहीं, तो मागेंपुढें करूं लागला, ह्म० माघार घेऊं लागला.

**मागोमाग**, अ० पाठोपाठ.

**मांगोळी**, स्त्री० थोरले दिवाळीचे दिवशीं मांग, मोळाच्या मोठा सोलकरून त्याचें वेंटोळेंकरून चावडीवर ठेवितात ती.

**माग्या**, ३ लिं० मागरा.

**माघ**, पु० चैत्रापासून अकरावा महिना तो, ह्म० माघीं अळें आणि वेंदरीं फळ.

**माघस्नान**, न० सं० पौषी पौर्णिमेपासून माघी पौर्णिमेपर्यंत सूर्योदयापूर्वी नित्य नियमानें स्नान करितात तें.

**माघार**, स्त्री० प्रतिज्ञातादिकार्यापासून मागें सरण्याचा प्रकार ती; उ० मी एकदां कामास हात घातला ह्मणजे माघार कदापि घेणार नाहीं; २, जास दैव प्रतिकूळदशा प्राप्त झालीअसतां कोणत्याही खटल्यांत जय येऊंच नये तोराच होत असावा, अशी जी कोणएकास दशा प्राप्त होती ती.

**माघारपण**, न० ग्रा० सासऱ्याहून माहेरीं, किं० माहेराहून सासऱ्यास आपल्या वस्त्रपात्रासहित कांहीं दिवस वास करण्याचा व्यापार तें.

**माघारा, माघारां,** अ० कांहींएक कार्याविषयीं जा वेगानें प्रवृत्त झाला तो वेग उलटल्यामुळें तद्विरुध्दवेगानें मागें येई असें येजा, इ० धा०वि०

**माघारी,** पु०ना० मुलगी, इ०कांस सासरें, माहेर, आजोळ, इ० स्थलीं न्यावयाकरितां जो बोलावयासाठीं गडी, इ० येतो तो·

**माघारीण,** स्त्री० कों० सासऱ्यांहून माहेरास किं० माहेराहून सासऱ्यांस चाललेली जी स्त्री ती·

**माघारें,** अ० माघारा·

**माघी,** ३लिं० माघमाससंबंधी ती तिथि इ० तो·

**माघील,** अ०दे० मागील·

**माघून,** अ०दे० मागून·

**माघें,** अ०दे० मागें·

**माघोटी,** स्त्री० माघमाशीं पर्जन्य पडत असतो ती·

**माच,** पु० गवत, पेंढा, इ० ठेवायाकरितां दगडावर लांकडें आडवीं उभीं घालून साठा सारिखा करितात किं० मंडपाकार करितात तो·

**माचण,** स्त्री० गलबताचें शीड फिरवण्याचा एक प्रकार आहे ती·

**माचवा,** पु०दे० माचा·

**माचा.** पु० मंचक·

**माची.** स्त्री० डोंगराचा शिरोभाग टाकून त्याचे खालीं सपाट भूमि असती ती; २, रा० लाहान वांसरें किं० शेळ्या राहायाकरितां लाहान खांबावर साठ, फळ्या, इ० घालून जागा करितात ती·

**माचोळी,** स्त्री० लाहानजो माच तो·

**माज,** पु० कमर; २, मस्ती; ३, गो, महिष्यादिकांस मैथुनेच्छेस कारण जो ऋतुभास होतो तो, माज करणें

करणें, स० गो महिष्यादिकानीं त्या ऋतूतें पावणें·

**माजघर,** पु० न० प्रा० गृहाचा मध्यभागीं भोजनार्थ भिंत्यायादतजो जागा केलेली असतो तो तें·

**माजण,** न० देवमूर्त्यादिकांस तेल शेंदूर इ०कांचा जो लेप करितात तें; २, रा० चुलीवर ठेवायाचे भांड्यास राख, माती, इ० कालवून लावितात तें·

**माजणें,** उन्मत्त होणें; २, हरिक इ० पदार्थ लागल्यामुळें व्याकुळ होणें; ३, विवक्षित मर्यादेपेक्षां अतिशयित पुष्प्यादिक पावणें; उ० यंदा पर्जन्य मागून पडला तेणेंकरून जोंधळा माजला; ४, कांहींएक गोष्ट सामिप्राय सर्वत्र प्रचार होई असा दशेतें पावणें; उ० ही बातमी माजली असतां तो सावध होउन पळेल, भांडी. इ० क माजणानें युक्त करणें·

**माजर,** न० एक लाहान ग्राम्य जनावर आहे; २, गाजराचे मध्यभागींजो पावेसारखा अवयव असतो तें·

**माजरडोळ्या,** ३लिं घारडोळ्या·

**माजरवेल,** स्त्री० भातांत एक जात आहे·

**माजरा,** ३लिं० जा पदार्थाचा सेवनेकरून मनुष्यादिक माजतें असा जो हरीक, इ० तो·

**माजरी,** स्त्री० कांखेमध्यें गाठ येती असा एक रोग आहे; २, कों० किसणी; ३, दे० रवी आंत अडकवायासाठीं घुसळखांबास जा दोन दोऱ्या बांधिलेल्या असतात ती; ४, एक वनस्पती आहे ५, मार्जरजातीय जी स्त्री ती·

मॉजरूं, न० मांजर प्रथमार्थी·

माजरें, न० रा० माजरे हशीक इ०कांच्या जो केफ येतो तें·

माजा, पु० औषधी फळ आहे, जास मायफळ ह्मणतात तो·

मॉजा, पु० वावडी, पतंग, इ०कांस कांचेचें पाणी दिलेला असा दोर असतो तो·

माजाड, न० पाठीचे कण्याच्या आणि कंबरेच्या जो सांधा तें·

माजी, ३ लिं० विवक्षित व्यवहाराविषयीं जोजो पदार्थ जाजा रूपानें व्यवहार्य असतो ती व्यवहार्यता सुटून एकीकडे अप्रकृत कोटींत, किं० अगण्यता कोटींत पड, इ० धा०वि०; उ० हा नवा रुपया होतांच तो रुपया माजी पडला; माजी मामलेदार, माजी कारकून, इ०स्थलीं प्रकृतचे पूर्वींचा तो·

माजीं, अ० ग्रं० आंत·

माजुमी, ३लिं० माजुम खाण्याची तलब, जास आहे. तो; २, माजुमेचा संबंध जा पदार्थास आहे तो; उ० ही माजुमी बरफी आहे·

माजूम, स्त्री० हिं० भांगेच्या रांधाकरून त्यांत अनेक जायफलादि पदार्थ घालून बरफी सारिख्या वड्या करित असतात ती·

माजूरी, ३लिं० मस्तवाल·

माजोरी, ३लिं० मस्तवाल·

माझा, ३ लिं०मीएतच्छब्दवाच्य जो अर्थ त्याचा; उ० माझे घोडे·

माझारीं, अ० ग्रं० माजीं

माटसूट, स्त्री० कांहीं एक भयादिकामुळें घाबरून आतां कायकरूं कसेंकरूं इ० रूपजी दशा प्राप्त होती ती·

मॉठ, पु० स्त्री० एक पालेभाजी आहे; २, पु० मोठा जो मातीचा डेरा तो; ३, ३लिं० खर नव्हे जें पर इ० तो·

माठणें, को० जखम भरून येणें·

माठलें, न० पळी इ०काचें टवळें; २, नाक करायाचे रवीचा माथा तें·

माठवण, न० को० जखम माठायासाठीं जें लाविलें औषधादि तें·

माठळणें, रा० करायाची जी जमीन ती, खणून भिजवून हलकेहाताचे चोपानें सारखी करणें·

माठ्या, ३ लिं० जामध्यें कळा, किं० विद्या, नाहीं असा जो मनुष्य तो·

माड, पु० नारळाचें झाड·

मांड, पु० कांहीं एक व्यापार कार्य याच्या सामग्रीच्या विवक्षित स्थलीं सिद्धता करण्याच्या जो व्यापार तदुत्तर त्या कार्याच्या चालूपणा तो; २, स्त्री० मांडीस एक रोग होत असतो ती; ३, एक समयावच्छेदें करून शत्रू इ०कांवर चालू झाला जो घोडेस्वारांच्या समुदाय ती; ४, रा० पु० जा व्यवहारांस अनेक साधनें लागत असतात त्या साधनांची सिद्धरूपें करून जी स्थिति तो; उ० दोहों जोताच्या आमचे घरच्या मांड आहे·

मॉडणी, स्त्री० गृहादिकांची विवक्षित उंचीपर्यंत जी स्तंभादि रचना ती; २, विवक्षित कितीएक कार्योपयोगी पदार्थांचें विवक्षितस्थलीं जें स्थापन ती; उ० जमीनीवर प्रथम टाहाळाची मांडणी करावी मग वर गवत घालावें.

मॉडणें, कांहीं एक कार्यास साधन जे अनेक पदार्थ

र्थ ते विवक्षित नतस्थलीं यथायोग्य स्थापणें;२, कांहींएक व्यापारकार्यादिक आरंभयुक्त करणें; उ० त्याणें लग्न माडिलें. त्याणें सोदेगिरी माडिली; ३, जमाखर्च इ० प्रकरणीं कांहींएक कलमें इ० लिहून ठेवणें; ४, रा० मनोदयानुरूप वर्ताया च्या प्रसंग येणें; उ० अंधारीरात्र आली म्ह० चोराचें माडतें; ५. नाचणावरी आवटणें.

**माडपीर**, ३लिं० माडी पितो तो निंदाअसतां प्र०

**माडलीक**, पु० सार्वभौमाचेरवालीं अवांतरजेराजे असतात तो.

**मांडव**, पु० मंडप. सभामंडपाचांचून.

**मांडवपरतणी**, स्त्री० साडे झाल्यानंतर वरपक्षी यासजो शोभनादि समारंभ करितात ती.

**मांडवपरतनें**, न० दे० मांडवपरतणी.

**मांडवशोभा**, स्त्री० मंडपशोभा.

**मांडवी**, स्त्री० मंडपी;२, बंदरावर सर्कारचे जिन्नस इ० उतरायासाठीं जें मोठें घरासारिखें बांधितात ती.

**मांडळ**, स्त्री० कों० मुसळ.काठी. इ०कांस जी कोरवंडादिकांची यसवी बसवितात ती.

**माडा**, पु० उपटून दुसऱ्याठिकाणीं लावायाजोगें कोंवळें जें झाड तो.

**मांडा**, पु० गव्हाचें एक पक्वान्न आहे तो;कोंड्याचा मांडा करणें म्ह० वाईट साईट भक्ष्य पदार्थ निवडून गोडीस आणणें, म्ह० स्मग्रण झाली म्हणून कांहीं हाताचे मांडे करीत नाहीं.

**माडी**, स्त्री० सराकरायाकरितां माडाचा पोईंचा जो द्रव काढितात ती;२, गृहादिकाचाठाई जी उपरि भूमि करितात ती.

**मांडी**, स्त्री० गुडघ्यावरलाजो पायांचा प्रदेश ती;२. मांडी देणें म्ह० बाप,इ०कांचा प्राणोत्क्रमण समयीं त्यांचे मानेखालीं मांडी घालणें, मांडीचें उसें करणें, एथें आपलें बरें वाईट करण्याविषयीं एखाद्यावर सर्वस्वीं विश्वास ठेवणें, मांडीवर घेणें देणें,इ०स्थलीं दत्तकलेंकरून देणें,घेणें, मांडीसमांडी टेंकून बसणें,इ०स्थलीं एखाद्याशीं बरोबरीनें वागणें, मांडी टेकून बसणें म्ह० कांहींएक लेखन गायन इत्याद्यर्थ आवेशपूर्वक नियमानें बसणें, मांडी ठोकून उभें राहाणें म्ह० युद्ध,कज्जा, इ०यर्थ सज्ज होउन उभें राहाणें, मांडीवर मांडीटाकून बसणें, इ०स्थलीं निरुद्योगी स्वस्थ बसणें, याचे समास, आसनमांडी, खुरमांडी, इ०जाणावे.

**मांडीचेपणें**, न० नवऱ्यामुलाचे आईला लग्नामध्यें ऋनमुखसमयीं एक लुगडें द्यावें लागतें तें.

**मांडीमोड**, स्त्री० लेखनादिकांच्या दृढ अभ्यास व्हावा म्हणून जो बैठकीचा परिश्रम करावा लागतो तो.

**मांडुकली**, स्त्री० कों० लाहानजो मांडव ती.

**माडू**, पु० शिपायांचें एक हतेर आहे. म्ह० सोयऱ्यांत साडू हतेरांत माडू.

**मांडूळ, मांदूळ**, न० दुतोंडें

**माटण**, न० कों० मीठ इ० ठेवायासाठीं ताड. इ०कांच्या बुधाचें लांकूड पोखरून पात्र करितात तें.

**माटाण**, न० माटण.

**माण**, स्त्री० मनुष्य. वासरूं इ०कांच्या मानेस एक रोग होतअसतो ती;२, जमीनींत एक भेद आहे.

**माणकी**, स्त्री० लाहानजें माणीक ती·

**माणगा**, पु० रा० चिव्यांत एक भेद आहे·

**माणगें**, न० रा० मादण;२, माण प्रथमार्थी

**माणसळणें**, आरण्यपशू, इ० कानीं मनुष्याच्या परिचय झाल्यामुळे मनुष्यांस बुजेनात असं धीट होणें, लांडगा, व्याघ्र, इ० कांनीं माणसास खायास सवंकणें·

**माणा**, पु० एक वृक्ष आहे·

**माणिकचौकडी**, स्त्री० रा० स्त्रिया भिंतीवर एक रेखांकित चिन्हविशेष शोभार्थ काढीत असतात ती·

**माणिक्य**, न० सं० माणीक·

**माणीक**, न० रक्तवर्ण एक रत्न आहे·

**माणुसकी**, स्त्री० थोरपणा, इ० विशिष्टजो मनुष्यपणा ती·

**माणूस**, पु० न० मनुष्य;२, माणसाच्या कांदा, माणसाच्या अवतार, माणसाच्या लेंक, इ० शब्दांच्या शिव्यांविषयीं प्र० रानमाणूस, जळमाणूस, बाइलमाणूस, इ० समास जाणावे·

**माणूसपणा**, पु० माणुसकी·

**माणूसबळ**, न० मनुष्यबल·

**माणें**, मावणें·

**माण्या**, पु० माणगा·

**मात**, स्त्री० बुदबळांच्या खेळांत शत्रूच्या हातीं घोडा, इ० कानीं राजाच्या प्रतिबंध केला असतां होतो जो डाव ती;२, आश्चर्य वाटाया जोगा झाला जो कांहींएक चमत्कार ती; उ० कालरात्रीं गाण्याची मोठी मात झाली;३ग्रं० कोण एकाची चमत्कारिक जी वृत्त गोष्ट ती; उ० एक बाई सांगते मात त्याची·

**मातकण**, न० दे० माती बहुत मिसळल्यामुळें नासलें जें धान्य तें·

**मातकरी**, ३ लिं० रा० शेताचे रानावर माती लावायासाठीं जे पेरेगडी करितात तो·

**मातकापड**, न० कांहीं पदार्थास अग्निपुटादि द्यावयाकरितां त्या पदार्थाभोंवता चिखलांत भिजलेल्या वस्त्राच्या लपेट देतात तें·

**मातक्यान**, अ० माकुत्यान·

**मातंग**, पु० सं० हस्ती·

**मातगा**, ३ लिं० रा० यत्किंचित् खायास जेवायास मिळाल्यामुळें माजून त्या पदार्थाचा अव्हेर करण्याचा स्वभाव ज्याचा तो·

**मातट**, ३ लिं० माती आंत मिसळल्यामुळें नासलाजो गूळ, धान्य, इ० पदार्थ तो·

**मातड**, ३ लिं० मातट·

**मातण**, स्त्री० रा० माचण·

**मातणें** उन्मत्त होणें, स० बोकड माने आणि आपल्या तोंडीं मुते·

**मॉतबर**, ३ लिं० द्रव्यसंपत्तीनेंजो संपन्न तो;२, का० लांबी, रुंदी, उंची, पुष्टपणा, इ० कानीं जो मोठा तो; उ० अहो हा घोडा मातबर दिसतो पण अगदीं चालत नाहीं·

**मातबरी**, स्त्री० मातबरपणा·

**मातमळ**, ३ लिं० रा० मातट·

**माता**, स्त्री० सं० आई, मातृकुल, मातृगोत्र इ० जाणावे·

**मातापितरें**, न० आई बाप तीं·

मातामह, पु० सं० आईचा पिता ·

मातामही, स्त्री० सं० आईची आई ·

माती, स्त्री० दगडावांचून पृथ्वीच्या अंशा ती; २, कांहीं एक पदार्थाच्या आंत तत्वांश कांहीं नाहीं अशी झा-लीजी दुर्दशा ती; उ० त्या पोराने संसाराची माती क-रून टाकिली, माती देणें, ह्म० मेरें पुरून टाकणें, तोंडां-त माती पडणें, ह्म० ग्रासांश बुडणें, अन्नांत माती कालवणें, ह्म० उपजीविकेच्या नाश करणें, माती-चे मोलाने देणें, विकणें, इ० स्थलीं हलक्या मोला-नें, माती जड होणें, ह्म० मरणासन्न झाल्या मनुष्या-चें शरीर जड होणें, ह्म० जित्या रोटी आणि मेल्या माती ·

मातुल, पु० सं० आईचा जो भाऊ तो, मातुल कन्या इ० समासही जाणावे ·

मातुलिंग, न० एक फल आहे

मातुश्री, स्त्री० आई ·

मातृका, स्त्री० सं० अकारादि क्षकारपर्यंत जीं अक्ष-रें तीं प्र०; २, विवाहादिकल्सांहीं ज्यांची पूजा करीत असतात अशा देवता आहेत

मातृगामी, पु० मात्रागमनी ·

मातृभोजन, न० सं० मुंजीचे दिवशीं मुलगा जें आई बरोबर भोजन करितो तें ·

मातेरा, पु० मातट; २, धान्यादिकांत मिसळलेलाजो माती, इ० कचरा तो; उ० या तांदुळांत दोन शेर मा-तेरा निघाला; ३, कांहींएक पदार्थाची झाली जीदु-र्दशा ती ·

मातेरें, न० दे० मातेरा विशेष्यार्थी

मातोश्री, स्त्री० मातुश्री ·



मात्र, अ० कांहीं एका प्रमाणानें जो परिमित तो; उ० आमची वितस्ति मात्र जागा आहे क्षणमात्र अव-काश, काडीमात्र शाहाणपण; २, साकल्येंकरून कांहीं पदार्थ विवक्षित असतां त्यापुढें याचा प्रयोग होतो; उ० मनुष्यमात्र लबाड आहे; ३, इतराहून व्या-वर्त्य पदार्थापुढें याचा प्रयोग होतो; उ० भात मात्र खा, इतर भाजीपाला खाऊ नको, जेवून मात्र आलो, तुला मात्र बोलाविलें आहे; ४, अ० या० यत्किंचित; उ० या दवतींत मात्रसें पाणी घालून आण; ५, स्त्री० अ-क्षरांवर एऐ ओऔ एतद्बोधक जें चिन्ह करितात ती·

मात्रा, स्त्री० हेमगर्भादि रसायनें जीं तीं प्र०; २, अक्षराव-र जी मात्रा देतात ती; ३, ऱ्हस्व वर्णउच्चारणीं जित-का काल लागतो तो काल; ४, ला० रोगघ्न जो औषधी पदार्थ सर्व त्यास आरोपाने ह्म०, संसारादिकाची मा-त्रा करणें, ह्म० दुर्दशा करणें असा अर्थ क्वचित हो-तो ·

मात्रागमन, न० मातेशीं जें मैथुन तें; २, ला० विश्वा-सघात, इ० जी मोठी लबाडी तें ·

मात्सर्य, न० सं० मत्सरीपणा ·

माथण, स्त्री० दे० ताक करायाचें उपयोगी रुंद तोंडा-चें एक मृत्तिकेचें पात्र आहे ·

माथणी, स्त्री० कों० माथण ·

माथा, पु० मस्तक; २, ताक करायासाठीं काठीसजो काष्ठगोल दोनबाजूनें, किं० सभोवत्या खांचण्या पाडून लावितात तो, डोई शब्दावरील प्रा० सम० एथें जाणावे, उजळता माथा होणें एथें कांहीं आ-लेला अपवादादि दूर होणें ·

माथ्या, पु० माथा द्वितीयार्थी

माद, पु० मत्तता.

मॉद, स्त्री० भाताची मळणी कादितेवेळेस खळ्यांत बाजूस कडा वाढून मध्यें किंचित् खळी अशा वर्के-च्या भाताच्या राशि जमतो ती; २, मांदण.

मादक, ३ लिं० ज्याच्या सेवनाने मद येतो, असा जो, म-दिरा, भांग, लक्ष्मी, इ० पदार्थ तो.

मादगी, ३ लिं० मातगा.

मॉदण, न० स्त्री० गंगाळाचे आकाराचें एक मोठें म-त्तिकेचें पात्र आहे.

मादरपाट, पु० अंगरखे, इ०कांचा उपयोगी एक व-स्त्र आहे.

मादयान, स्त्री० مادیان हिं० मोठीजी घोडी ती.

मादळा, पु० मोठाजो मृदंग तो; २. कों० गाडी, इ० कांचे च्याकास मध्यें ग्वे बसवायाचें कांतीव लाकू-ड असतें तो.

मांदा, ३ लिं० हिं० दुखणाइत.

मांदार, पु० पुष्पवृक्ष आहे.

मादी, स्त्री० مادہ हिं० नराचीप्रतिपक्षी.

मांदूस, स्त्री० मोठी पेटी ती.

मांदें, न० कों० सुसरी, इ० कांचे मांसाचें जें तेल औं-षधार्थ कादितात तें; २, बकरे, इ०कांचे मांसात काहीं मांस विशेष आहे.

मांद्य, न० मंदपणा. अग्नि मांद्य, दृष्टि मांद्य, इ० स-मास जाणावे.

माधव, पु० सं० विष्णु; २, वैशाखमास.

माधवी, पु० दशावतार, इ० खेळामध्यें एक सोंग येत असतें जो प्रा० हास्यरस वर्णित असतो तो.



माधुकरी, स्त्री० पु० माधुकरी.

माधुर्य, न० मधुरपणा; २, कंठमाधुर्य, वाङ्माधुर्य, इ० समास होतात.

माध्यंजन, पु० मध्यंदिनाचा अपभ्रंश.

माध्यंदिन, पु० सं० माध्यंजन.

माध्यस्थ, ३ लिं० वादप्रतिवादामध्यें मध्यस्थपणा करितो तो; २, न० मध्यस्थाचें जें कर्म तें.

माध्यस्थी, स्त्री० माध्यस्थाचें कर्म ती.

माध्यान्हिक, न० सं० मध्यान्हसमयीं करायाचें जें भोजनादिक कर्म तें.

माध्व, पु० मध्वाचार्यमतानुसारी ब्राह्मण ते.

माध्वी, स्त्री० सं० मोहाचे पुष्पाचें मद्य ती.

मान, स्त्री० ग्रीवा; २, पु० मी थोर शाहाणा, इ० रूप जी अहंता ती; ३, कांहीं एक व्यवहाराच्या ठाईं अ-मुकानेंच असुक गोष्ट करावी, किं० अमुकास विचारून करावी, इ० जो त्यात्या पुरुषादिकांक-डेस अधिकार असतो तो; उ० नाहीं होय ह्मण-ण्याचा मान सासूबाईकडे आहे; ४, तत्तत्कार्या-च्या ठाईं तत्तदधिकारीयांचा दानादिरूपजो अव-श्य कर्तव्य सत्कार असतो तो; उ० उपाध्याया-चा मान अगोदर कादून ठेवा; ५, लोकानीं मा-नावें अशी जी योग्यता असती ती; उ० या गावां-त आतां विद्वानाचा मान राहिला नाहीं; ६, न० काल, देश, मार्ग, धान्य, धातु, मनुष्यादिव्यक्ति, इ० कांची महत्वाल्पत्वादि इयत्ता समजायास सा-धनभूत जें घटिका, पाद, योजन, मण, तोळा, सं-ख्या, इ० प्रमाण तें, किं० त्या प्रमाणानें मोजलें असता कालादिकांची समजती जी इयत्ता तें; उ०

मास म्हणून एक कालाचें मान आहे; उ० आकाशांत नक्षत्रें किती आहेत याचें आह्मास मान समजत नाहीं; ७, कांहीं एक अर्थाविषयीं शब्द अनुमान इत्यादि रूपजें गमक तें; ८, माना अंत्यार्थी. र्थी; ९, कोणी एक व्यवहारादिक असाच अमुकचकाळीं अमुकच देशीं व्हावा, किं० अमुकानेंच करावा, इ० रूपजो नियम असतो तें; उ० पर्जन्याचें मान कोणाचे हातीं लागत नाहीं, नपुंसकार्थाचे संप्रदाय, त्या गृहस्थाचें आलीकडे मान चढलें इ० स्थलीं त्याचा डौल वाढला असा अर्थ, धान्यादिकाचें मान चढणें, ह्म० दर चढणें, स्त्री लिंगार्थाचे संप्रदाय, मान कापणें, ह्म० कोणा एकाचा वृत्त्यादिनाश होई असा मोठा घात करणें, मान खाली घालणें, ह्म० कांहीं अपमानादिकामुळें लज्जित होणें, मान डोलविणें, किं० हालविणें, ह्म० कांहीं एक गोष्टीविषयीं होय ह्मणणें, अथवा वाहावा ह्मणणे, मान धरणें, ह्म० ऐन मुख्यसमयीं खोळंबा करणें, मान सोडविणें, ह्म० कांहीं एक संकटामध्यें गुंतलेल्या मनुष्यादिकांची सुटका करणें, मान वर करणें, ह्म० दुखणें, दारिद्र्य इ० कांपासून मुक्त होउन वागूं लागणें, मानेस बसणें, ह्म० पिशाच्यादिकांनीं धरणें, किं० विवक्षित काम करून घेण्यासाठीं मनुष्यादिकाचे पाठीस लागणें, किं० काम तडीस नेण्याविषयीं खणी खापटी बसणें, मान मुरगाळणें, ह्म० सर्वस्वीं दुसऱ्यास नाडणें, मान मोडणें, ह्म० समग्रतेंकरून अभिमतजी कांहीं रकम, इ० त्याच्या कांहीं अंश खर्च करणें; उ० चारपैशांकरितां रुपयाची मान मोडावी लागती, पांचशें रुपयाची मान मोडिली तेव्हां लग्न झालें ·

**मानइ**, पु० बाप्या ·

**मानकरी**, ३लिं० कांहींएक व्यवहारीं ज्याचा सन्मान करावा लागतो असे जे दरबारामध्यें सरदारादिक किं० विवाहादिकाचाठाईं व्याही, विहीण, इ०, किं० ग्रामादिकामध्यें खोत, महाजन, इ० अधिकारी असतात तो ·

**मानखंडना**, स्त्री० वचनोल्लंघनादिकेंकरून झालाजो मान्य मनुष्यांचा अनादर ती ·

**मानखूंट**, न० माजलाजो गेणगा, बैल, इ० त्याणें फार न पळावें, किं० दुसऱ्यास न मारावें, ह्मणून गळ्यास, व पायांस मिळून दोरी बांधितात तें ·

**मानखोडा**, पु० मानखूंट ·

**मानगुटी, मानगोटी**, स्त्री० बोकांडी ·

**मानट**, न० कों० जाजमीनीमध्यें शेत चांगलें होत नाहीं आणि गवत फार रुजतें, त्याजमीनीस ह्म० ·

**मानटी**, ३लिं० कों० मानटसंबंधी भूमि, शेत, गवत, इ० तो ·

**मानणूक**, स्त्री० कों० मानता ·

**मानणें**, शास्त्र, देवता, माता, पिता, इ० पूज्य अनुल्लंघनीय अशा बुद्धीनें गणणें; २, तो तो पदार्थ तत्तद्रूपें करून आहे, अशा बुद्धीने गणणें; उ० विष्णु आणि शिव निराळा असें मानित नाहीं; ३, भक्ष्य भोज्य पाणी देश, हवा, इ० कानीं शरीरास हितावह होणें; उ० एथील पाणी मला मानतें; ४, शत्रु, इ० कांस हे आपणास भारी अशा रीतीनें गणणें; उ० ज्याचा एकदां पराजय झाला त्यास कोणी मानित नाहीं;

५, कांहींएक गोष्ट मनास अभिरुचि विषय होणें; उ० माझा मनास जें मानेल तें करीन ·

मानता, स्त्री० आपली मनांतील गोष्ट सिद्ध व्हावी म्हणून देवादिकांस जो नवस करितात ती ·

माननीय, ३लिं० मानायास योग्य जो मनुष्यादि पदार्थ तो ·

मानपान, पु० मानकऱ्याच्या करायाच्या जो आदर सत्कार, इ० तदुपयोगी वस्त्रादि पदार्थ तो ·

मानभंग, पु० मानखंडना ·

मानभाव, पु० वेदशास्त्र प्रतिकूल मनानें वर्तणारी अशी एक जाती आहे; २, ला० मनांत कपट असून बाहेर गोडगोड बोलणारा जो त्यास म्हणतात, म्ह० मानभावाची बायको आणि गाढवाचें जिव्हं ·

मानभावी, ३लिं० मानभावसंबंधीजें भाषण आचार इ० तें ·

मानमान्यता, स्त्री० कोणी प्रतिष्ठित सभादिकांच्या ठाई आला असतां त्याचा आदर करितात ती; २, ला० त्या आदर सत्कार व्हावयाजोगी जी योग्यता ती; उ० त्या दरबारामध्यें त्याची मान मान्यता मोठी आहे ·

मानमोड, स्त्री० लिहिणें, शिवणें, इत्याद्यर्थ मान वांकवुन करायाचा जो परिश्रम तो ·

मानमोडें, न० मनुष्य, वृक्ष, इ० कांहीं आरोग्यदशेस येऊं लागत असतां मध्यें तत्प्रतिबंधक जो रोगादि उपद्रव होतो त्यास म्ह०; उ० या बोंग्या कांहीं टवटवीत दिसूं लागल्या होत्या, इतक्यांत काय मानमोडें आलें तें कळेना ·

मानव, पु० सं० मनुष्य ·

मानवणें, कोणएक गोष्ट, कांहींएक पदार्थादि कोणेएकास मान्य होणें ·

मानवती, स्त्री० प्रियावर रुसलीजी नायिका ती; २, ३लिं० मानवत म्हणून एक पेठ आहे तेथील पागोटें, इ० वस्त्र तें ·

मानवी, ३लिं० सं० मनुष्यसंबंधी; उ० हा मानवी देह प्राप्त झाला असतां ईश्वर भजन करावें ·

मानस, न० पु० मनोरथ; उ० पुण्यास जावें असें माझें मानस झालें आहे; २, न० सं० मन; उ० मानस माझें मोहिलें यादेवें; ३, ३, मनःसंबंधी; उ० विचारानें मानसव्यथा दूर होत्ये ·

मानसपूजा, स्त्री० सं० गंधपुष्पादिक पदार्थ नसतां केवळ मनानेंच भावनामय तेते पदार्थ कल्पून जी पूजा करितात ती ·

मानसिक, ३लिं० सं० मनःसंबंधी तो; उ० स्वप्न हा मानसिक प्रपंच होय; २, न० नवस; ३, ला० कांहींएक पदार्थाचें जें केवल अल्पत्व तें; उ० मरुदेशांत पाण्याचें मानसिक आहे; ४, कांहींएक गोष्ट घडण्याविषयीं ज्ञानवांट्यानी जो संदेह तें; उ० त्याचें येण्याचें असल्या पावसांत मानसिकच दिसतें ·

मानहानि, स्त्री० सं० मानभंग ·

माना, पु० ﻣﻌﻨﺎ हिं० कोणएकानें पत्र कोणएकास लिहायाचें असतां तत्योग्यतानुसार वेदशास्त्रसंपन्न, श्रीमंत राजश्री, राजश्रियाविराजित, इ० संप्रदाय सिद्ध जे पत्राचा आरंभी लेख लिहित असतात तो; २, पत्रादिकांतील लिहिलेला जो मजकूर तो; ३, कांहींएक गोष्ट करण्याविषयीं भिन्नजें औचित्य तो, निषेधविषयीं प्र०; उ० राजा दुष्ट झाला आतां येथें राहाण्याचा माना राहिला नाहीं ·

**मानिनी**, स्त्री० मानवती प्रथमार्थी·

**मानी**, स्त्री० कों० घरटी, घरट, इ० कांच्या वरचे पेटास पाटी बसवायासाठीं जी खंचणी पाडिली असती ती; २, जांत्याचे वरचे तळीचे भोंकात लोखंडाची बिडी बशिवतात ती; ३, ३लिं० कांहीं महासंकट आलें असतांही नद्धारणार्थ आपले नावा लौकिकास बट्टा लागायाजोगें कर्म जो करीत नाहीं तो·

**मान्य**, ३लिं० आपले मनास मानवली जी काहीं गोष्ट किं० पदार्थ तो; २, मानावयास योग्य जो पदार्थ गोष्ट, इ० तो; ३, कांहींएक गोष्टीविषयीं मानवला जो कोणी एक तो·

**मान्यता**, स्त्री० सं० कांहींएक गोष्टीविषयीं मी मान्य आहें असा जो लेख, किं० भाषण करून घेतात तो; २, माननीयपणा·

**माप**, न० कांहींएक प्रमेय पदार्थांचा संख्याद्वारा किं० तत्प्रमाणानीं मेजणें, तोलणें, इ० रूप जो व्यापार तें, व त्याणें ज्ञात झाली जी त्या पदार्थाची इयत्ता तें; उ० आज भाताचें माप चालले आहे; उ० मी अव्याचीं माप घेतल्यावर जमीनीचें माप येईन; उ० दाहा खंडी माप भरलें; २, धान्यादि मापायाचें जें शेर, अधोली, इ० पात्र असतें तें; उ० हें माप बाजारचें मापा बरोबर आहे, ला० पदरीं माप घालणें, इ० स्थलीं जी गोष्ट जो मान्य करीत नाहीं ती गोष्ट अनेक प्रमाणानीं खरी करून त्याचे पदरीं घालणें, मापदेणें, माप घेणें, इ० स्थलीं मापून असा अर्थ, ३, कों० कांहीं एका प्रमाणानें मापून विभागिली जी जमीन तें; उ० या आमचा खांचरांत चार मापें आहेत·

**मांपटें**, न० निठवें·

**मापणें**, कांहींएक पदार्थ तत्प्रमाणानी संख्यात करणें·

**मापारी**, पु० धान्यादिकांचें माप घेण्यासाठीं जो मनुष्य ठेविला असतो तो; २, धान्यादि मेजायाचा जो करा त्यासही म्ह०

**मापी**, ३लिं० हिं० पात्ररूप जें माप त्याणें मोजलें जें घेतादेतो; २, मापरूप जो शेर इ० तो, प्रश्नादि प्रसंग विशेषी म्ह०; उ० एथील शेर वजनी आहे, किं० मापी आहे·

**माफ**, अ० معاف हिं० न्यायतः कोणाएकापासून घ्यावयाचें जें द्रव्य तें न घेतां, किं० शिक्षा करायाजोगा जो अपराध तो, क्षमा विषय, होई असें कर, हो, अस, धा० प्र०

**माफक**, ३लिं० موافق हिं० जितक्यास तितका, मर्जी माफक, जीवन माफक, इ० समास होतात, तेथेंही मर्जी, इ० कांस जितकें साहील तितकें असा०

**माफा**, पु० एक गाडीत भेद आहे·

**माफी**, स्त्री० معافی हिं० सर्कार इ० कानी न्यायतः ग्राह्य जो शेत इ० कांचा धारा इ० त्या विषयीं जो माफपणा ती·

**माफीसाल**, न० हिं० शेतादिकांच्या धान्याविषयीं जी माफी तिचें जें साल ते; उ० माफीसाल गुदरल्यानंतर धारा पडेल·

**माम**, न० मुलांच्या भाषेनें भोजनास म्ह०; २, पु० मुलाचे भाषेनें स्तनास म्ह०

**मामंजा**, पु० नवऱ्याचा जो बाप तो·

**मामलत**, स्त्री० معامله हिं० प्रजाचें संरक्षण

आणि राजकीयकराच्या उगवा, इ० काण्याच्या राज्यांगभूलजो अधिकार ती ·

**मामलतदार**, पु० معاملهدار हिं० सर्कारांतून जास मामलत सांगितली असा जो तो ·

**मामला**, पु० معامله हिं० मामलत ·

**मामलूत**, स्त्री० विवक्षितकार्याविषयीं जो अनुकूल त्यास शिक्षा करण्याचें सामर्थ्य असून याबापूता, इ० आर्जव करण्याचा प्रकार ती; २, मुलाजा, निषेध असतांच प्र०; उ० पुनः अपराध केलास तर मामलूत करणार नाहीं ·

**मामा**, पु० आईच्या बंधू तो, किं० स्वस्त्रीचा जो पिता तो, २, ला० निरक्षर असून व्यवहारामध्यें केवळ अप्रयोजक त्यास म्ह०

**मामी**, स्त्री० मामाची जी स्त्री ती ·

**मामु**, पु० बाळभाषेनें स्तनास म्ह०

**मामे**, अ० बंधुत्व भगिनीत्वादि साक्षात् संबंध नसतां सस्थानिकतामूलक मातुलद्योतक हा भाउ, ही बहीण, असा व्यवहार होतो, त्या भावादि शब्दांच्या मागें मामे हें अव्यय लागतें, क्र० तो मामाही आपणच आपणास द्योतक होतो; उ० मामेभाउ, मामेबहीण, मामेसासरा, इ० क, एथें बंधू, भगिनी, इ० त्या त्या नात्याविषयीं मुख्यत्वेंकरून प्रयोजक जो आपण, किं० आपला बाप, आई, बायको, इ० जाणावीं ·

**मामेभाउ**, पु० आईचे भावाचा जो मुलगा तो ·

**मामेसासरा**, पु० आपले बायकोचा जो मामा तो

**मामेसासू**, स्त्री० मामेसासऱ्याची जी बायको ती ·

**माय**, स्त्री० आई, त्यास माय मावशी नाहीं, तो माय मावशी पाहत नाहीं ह्मणजे अगम्य ज्या मातृसदृश स्त्रिया त्यांसही हा सोडीत नाहीं, ह्म० माय मरो पण मावशी जगो ·

**मायआजा**, पु० मातामह ·

**माय आजी**, स्त्री० मातामही ·

**मायना**, पु० معنا हिं० वाक्यादिकांतील जो भावार्थ तो ·

**मायपोट**, न० अनेक बरे वाइट जेथें सांठवले जातात, अनेकांचे नानाप्रकारचे अपराध जेथें साहिले जातात, बहुतप्रकारचे संकटांच्या जेथें परिहार होतो, असा जो ईश्वर, राजा, राज्य, ज्ञाति, इ० तें; उ० ईश्वर सर्वांचें मायपोट आहे संकटकाळीं कोणास उपेक्षित नाही; उ० आमची मुसलमानाची जात मायपोट जो येईल तो सांठवतो ·

**मायफळ**, न० एक औषधी फळ आहे ·

**मायबहीण**, स्त्री० आपले आईसारखी किं० बहिणीसारखी मानलेली जी कोणी एक स्त्री ती; उ० मायबहीण विठाबाई लागला छंद तुझे पाई ·

**मायराणी**, स्त्री० कोणएक जी देवता व्यक्ति ती; २, ला० करंजा ह्मणून एक पक्वान्न आहे त्यास निंदेनें ह्मणतात; ह्म० अडक्याची मायराणी आणि सापीक्याचा शेंदूर, या मायराणीच्या प्र० या ह्मणीतच आढळतो.

**माया**, स्त्री० सं० ईश्वरशक्ति; २, अवस्तूच्या ठाई यस्तुत्व बुद्धि जी होती तत्कारण जें ती; ३, अवस्तु असतां वस्तुत्वेंकरून भासमान जें जगदादिक ती; ४, इंद्रजालादि जें कपट ती; ५, ममता; ६, वस्त्रादिक शिवतेसमयीं दोरा न विसरावा इत्याद्यर्थ शि-

 वणीचा

यणीच्या बाहेर जो वस्त्रादिकांच्या यत्किंचिदंश राखितात ती; ३, काव्यादिकांच्या जो विवक्षित अंश त्यास कांहींएक धका न लागावा ह्मणून शब्दार्थ जो अविवक्षितांश राखिला असतो ती; उ० हा वरू केवळ काठ्याबरोबर कापून कांहीं थोडी माया राख, इ० ही फळी फारपातळ आहे ह्मणून इच्या अंगी माया कमी, ८, भाग, १, दया; उ० त्याला मारितात हे पाहून सर्वांस त्याची माया आली, आणि सोडविले

**मायामय**, ३लिं० सं० ईश्वर मायेनें, किं० इंद्रजालानें कल्पित जे पदार्थ तो; उ० स्त्री, पुत्र, मित्र, हे सर्व मायामय आहेत

**मायालाघव** न० अवस्तूचाठायीं वस्तुत्वबुद्धि उत्पन्न करावी, इ० रूप जें मायेचें कौशल्य तें ·

**मायावंत**, ३लिं० मायामय ·

**मायावी**, ३लिं०सं० मायेच्या जो नियंता ईश्वर, राक्षस, गारुडी, इ० तो; २, कपटयुक्त जें भाषणादि तें; ३, तद्विशिष्ट मनुष्य तो ·

**मायाळू**, ३लिं० पुत्रादिकांची विशेषमाया ज्यास आहे तो ·

**मायिक**, ३लिं०सं० मायेनें रचित जो प्रपंचादि पदार्थ तो ·

**मार**, पु० काठी, इ० कांनीं जें ताडण तो; २, पराजयार्थ पाषाण तोफांचे गोळे, इ०कांच्या जो प्रक्षेप तो; ३, ला० मारामारिनें दु सहजें भाषण त्यासही प्रसंगविशेषी ह्म०, उ० ते तसें बोलतात, हे असें बोलतात, एकूण मला दोहोंकडून मार; ४, कांहींएक पदार्थ ध्वस्त, नष्ट जर्जर, इ० रूप दशा होण्यास कारण जो अनर्थरूप कांहींएक पदार्थाचा पात तो; उ० त्या विहिरीवर सगळे गांवाच्या आठ दिवस मार पडतोच ती आटली; ५, कांहींएक पदार्थांची नकोनको होई पर्यंत जी विपुलता ती; उ० सालमजकुरीं आंब्यांचा मार झाला आहे, कांहींएक कर्मावर मारदेणें, मार मारणें एथें त्यात्या कर्मावर अतिशयित झटणें, प्रौढीचें बोलण्याचा डौलानें बोलायाचें असतां वाक्यालंकारार्थ याचा प्रयोग होतो, उ० मार पगडी फेंकून मार डौलानें चालतो ·

**मारक**, ३लिं० शस्त्र्यादिकांनीं हीन करून मृतप्राय जो ज्यास करितो तो त्याचा; उ० कोंकणसाळ घृताचें मारक आहे ·

**मारकट**, ३लिं० मारका प्रथमार्थी ·

**मारकणा**, ३लिं० मारका प्रथमार्थी ·

**मारका**, ३ लिं० शृंगादिकानें दुसऱ्यांस ताडण करण्याचा स्वभाव ज्याचा तो; २, पु० एक पिशाच्चांत भेद आहे ·

**मारकूट**, स्त्री० कोणाएकास शिक्षार्थ मारण्या, कुटण्याचा जो व्यापार ती ·

**मारगिरी**, स्त्री० हिं० कांहींएक लक्ष्यावर तोफा, बंदुका, धोंडे, इ० मारण्याचा जो व्यापार ती; २, विवक्षितस्थलीं गोळा, इ० जावयाजोगी किल्ला, इ० कांवर केली जी सोय ती, उ० या किल्याची चहुकडून मारगिरी साधली आहे ·

**मारण**, न० सं० मरे असें करण्याचा जो व्यापार तें ·

**मारणें**, कोणेएक मरे असें ताडनादिकें करून करणें; २, त्याबूक काठी, इ० कांनीं मनुष्य, अश्व, इ० कांस ताडणें; ३, कशा एकावर काठी, दगड, इ० प-

दार्थ

दार्थ आहत करणें; ४, कांहींएक पदार्थाच्याठायीं पदार्थांतराच्या अंश किं० आगंतुक गुण संबद्ध किं० भासमान होणें; उ० या तळ्याची ओल त्याचे ओठीवर मारती; उ० तुमच्या बोलण्यांत तीर्थरूपांचे बोलण्याची छाया मारती; उडी, लढाई, बोंब, धांव, टोला, तडाका, झांप, इ० मारणें ह्मणजे तदनुकूल व्यापारानें तो तो अर्थ घडे असें करणें, बंदूक, तोफ, इ० मारणें, ह्म० त्याचा आवाज काढणें, टाळें, विडी, खिळा, वांसा, इ० मारणें, ह्म० तत्तत्स्थलीं घट्ट बसविणें, वाट, गांव, घर, इ० मारणें, ह्म० तत्तत्स्थित मनुष्यादिकांस नागवणें, लुटणें, इ० करणें, अंग, ओंटी, इ० मारणें, ह्म० आकुंचित करणें, हाक मारणें, ह्म० कोणा एकास साद घालणें, फड, प्रसंग, इ० मारणें, ह्म० उचित भाषणादिकानें संभाळणें·

मारतापीर, पु० हिं० जबरदस्त जो मनुष्यादि त्यास प्रसंगविशेषीं ह्म०

मारंद, स्त्री० खारटांत एक सकंटक झाड आहे·

मारफत, स्त्री० مرفت हिं प्रा० निसबत या अर्थी·

मारवा, पु० गाण्यांत एक राग आहे·

मारवाडी, ३ लिं० मारवाड ह्मणून देश आहे तत्संबंधी जो मनुष्यादि पदार्थ तो·

मारवेल, पु० स्त्री० एक वेल आहे, जी प्रायः समुद्रतीरींच असती तो ती; २, एक गवतांत जाति आहे ती·

मारा, पु० तोफ, बंदूक, दगड, इ० कांच्या जो मारतो, किं० विवक्षितस्थलीं गोळा, इ० लागू व्हावयाजोगें जें संधान असलें तो; उ० या किल्यास दोन मारे आहेत तिसऱ्येकडून कोठून गोळा लागू व्हायाचा नाहीं; २, पिशाच किं० महामारी इत्यादि उपद्रवानें मनुष्य, किं० गो महिष्यादि पशु यांचा जो वध तो; उ० या भुतानें त्याचें घरचें तीन मारे घेतले; उ० ही नदी प्रतिवर्षी एक मारा घेती·

माराकुटी, स्त्री० दे० मारकूट·

मारामार, स्त्री० परस्परांस परस्परानीं मारणें, इ० रूप जो व्यापार ती; २, ला० कांहींएक गोष्ट सिद्ध करायासाठीं प्रयत्नाचा जो अतिशय ती; उ० दिवसभर मारामार करावी तेव्हां कोठें दोन आणे हातीं येणार·

मारामारी, स्त्री० मारामार·

मारि, स्त्री० मरी·

मारुत, पु० सं० वायु·

मारु, ३ लिं० अति मोहक किं० कामोद्दीपक जे स्त्र्यादिकांचे नेत्राद्यवयव किं० चेष्टादिक ते·

मारून, अ० उत्साहादिपूर्वक सातिशय प्रवृत्तिचें द्योतक वाक्यालंकारभूत अव्यय; उ० आज मारून हजारों रुपये धर्म केला·

मारूनकुटून, अ० मारूनमुटकून·

मारूनमुटकून, अ० कांहींएक गोष्ट सिद्ध करायासाठीं अनेक प्रकारें प्रयत्नातिशय करून; उ० एकदां मारूनमुटकून घर बांधलेंसें केलें·

मारे, अ० मार या वाक्यालंकारार्थी·

मारेकरी, पु० कोणाएकास एकीकडे सांपडवून ठार मारावें ह्मणून राजादिकांनीं नियुक्त जो अंत्यजादिक तो·

मार्ग, पु० सं० एका स्थलापासून दुसऱ्यास्थलीं

मनुष्यादिक गेल्याआल्यामुळें मळला किं० एकास्थलाहून दुसऱ्यास्थलीं जावयाकरितां बांधून केलाजो स्थलप्रदेश तो; २, स्थलांतरीं जायाच्या उद्देशानें आक्रमित जो आकाश जल पृथ्वी यांचा प्रदेश तो; ३, ला० मनुष्यादिकांचा व्यवहार यथास्थितपणें चालावा, किं० विद्या, कला, इ० यांच्या एतदर्थजा लोक शास्त्र प्रसिद्ध रीती आहेत त्या प्र०

**मार्गशिर**, पु० मार्गशीर्षाचा अपभ्रंश तो ·

**मार्गशीर्ष**, पु० सं० बारा महिन्यांतील जो नववा महिना तो ·

**मार्गस्थ**, ३ लिं० सं० स्थलांतरास जावयाचे उद्देशानें जाणें मार्ग धरिला आहे तो ·

**मार्गश्वर**, पु० मार्गशीर्षाचा अपभ्रंश तो ·

**मार्जन**, न० सं० जलादिकानें बाह्यर्थ पदार्थावर जें सिंचन तें ·

**मार्जार**, पु० सं० मांजर प्रथमार्थी ·

**मार्दव**, न० सं० मृदुत्व ·

**मार्मिक**, ३ लिं० सं० मर्मज्ञ जो मनुष्य तो किं० आंतील बारीक मर्मे धरणारें जें भाषणादिक तो ·

**माल**, पु० مال हिं० गुड तेलादि किम्मत व्हावयाचे योग्यतेच्या जो पदार्थ किं० जा किम्मतीस जो योग्य पदार्थ तो; उ० पावसानें यंदा लाखों रुपयांच्या माल नासला, उ० आठ रुपयांचा माल धोत्रजोडा आहे ·

**मालक**, ३ लिं० مالك हिं० जा मालाचा जो मुख्यत्वेंकरून धनी तो ·

**मालकंस**, पु० सं० गाण्यांतील एक राग आहे तो ·

**मालकांगोणी**, स्त्री० एक वेल आहे ती, व तिचें बीज ती ·

**मालकी**, स्त्री० مالكى हिं० मालकपणा ·

**मालकुडई**, स्त्री० भातांतील एक जाति आहे ती ·

**मालखरा**, ३ लिं० कुडका हीन इ० खोडी असल्यातरी असोत परंतु जाची मूळधातु खरी आहे असें जें रुपया मोहोर, इ० नाणें तो ·

**मालचाटी, मालचाटया**, पु० पंतोजीच्या शाळेंतील जो उपगुरु असतो तो ·

**मालजादी**, स्त्री० हिं० केवळ निर्लज्ज अथवा जी हलके किमतीची कसबीण तीस म्ह०

**मालती**, स्त्री० सं० एक पुष्पवल्ली आहे; २, खीर करायासाठीं गव्हांचे सपिठाचे फुलांसारिखे पदार्थ करीत असतात ती, प्रा० अनेक वचनांत प्र०

**मालपवा**, पु० एक पक्कान्न आहे ·

**मालपोहा**, पु० मालपवा ·

**मालमत्ता**, स्त्री० हिं० रोख नाणें व दाणा, गोरा, इ० रूपें जें सर्व धन ती ·

**मालमस्त**, ३ लिं० हिं० द्रव्यमदानें युक्त जो मनुष्य तो ·

**मालवणें** प्रदीप्त जो दीप कांकडा इ० जाई असें करणें; २, ला० कोणाएकाची संपत्यादि शोभा विनाशास पावणें; उ० त्या राज्यांत तो एक भाग्यवान् होता, तो मरतांच सगळे मालवले ·

**माला**, स्त्री० माळ स्त्रीलिंगार्थी; २, पु० पाटी मर्दायाकरितां खजूर इ० कांच्या गोळा करितात तो ·

**मालिन्य**, न० मलिनपणा तें ·

**माली**, पु० रा० नाहव्याचे नावापुढें हा प्रतिष्ठाशब्द लागत असतो; उ० काशी माली ·

**मालीक**, ३ लिं० हिं० मालक ·

मालुमत, स्त्री० हिं० कांहींएक व्यवहाराचें विषयमान जें इत्थंभूत वर्तमान तीं; २, भाषण लेखा,इ०कामध्यें अनुमानगम्यजो खोटेपणा ती; उ० या पत्रांत जें लिहिलें आहे ही सर्व मालुमत आहे हा मजकूर खरा नव्हे·

मालुमती, ३लिं० भाषणलेखादिकांमध्यें उघड खोटेपणादि सत्त नसतां अनुमानादियुक्तीने जायर खोटेपणा सिद्ध केला जातो असाजो लेखादि तो·

मालुमात, स्त्री० मालुमत·

मालू, स्त्री० पादी मर्दायाचे उपयोगी जी पांढरी माती असती ती·

मालूम, ३लिं० معلوم हिं० ठाऊक·

मालें. न० वतन गेल्यामुळें किं० भाऊबंद बंदांत पडणें इ० संकट पडलें असतां तन्निरासार्थ गळ्यांत नांगर बांधून जी भिक्षा मागताव तें; २, माला द्वितीयार्थी; ३, रा० पोळी,भाकर,इ० करायाकरितां पीठ,इ०कांचे गोळ्याच्या उथळघाटीसारिखा जो आकार करितात तें·

मालेकरी, ३लिं० मालें ह्मणून भिक्षा मागतो तो·

मालोमाल, ३लिं० हिं० जितकें मोल पडलें तितक्या मोलास खराखुरा योग्यजो पदार्थ तो.

माल्य, न० स० पुष्पमाला·

माव, स्त्री० इंद्रजालादिरूप किं० अनृत भाषणादिकृत जें कपटती; २, कोठें क्षत बरें झाल्यानंतर जें शेष चिन्ह राहातें ती·

मावणें, कांहींएक अवकाशामध्यें कांहींएक पदार्थ समाविष्ट होउन राहाणें·

मांवदें, न० यात्रा करून घरीं आल्यावर जो देवब्राह्मण करितात तें·

मावली, स्त्री० माउली·

मावशी, स्त्री० आईची बहीण·

मावस, अ० माऊस·

मावसा, पु० मावशीचा नवरा·

मावळ, न० सह्याद्रीचे पूर्वेस शब्द काळीजमीन लागेतावद्वधिकजो मधिल प्रदेश तें; उ० नानेंमावळ. पवनमावळ,अंधरमावळ. इ०

मावळण, स्त्री० मातुलपत्नी; २, आत ती; ३, रा० पश्चिम दिशेच्या जो वारा ती·

मावळणें, सूर्यादिग्रह किं० नक्षत्रें अस्ताचलाचे आड झाल्यामुळें किं० सूर्योदय झाल्यामुळें नक्षत्रादि अदृश्य होणें; २, ला० देवी,खरूज, नाइटा, इ०कानीं अदृश्यदशा पावणें; ३, विकसित झालेलें पुष्पादिक सायंकालादि माहात्म्यानें मिटणें; ४ ला०तारुण्यादि शोभा मालवणें·

मावळत, स्त्री० पश्चिम दिशा ती; २,अ० पश्चिमदिशेकडे; उ० तूं मावळत तोंडकरून बैस·

मावळा, पु० आईचा बंधु

मावळी, ३लिं० मावळदेश संबंधीजो पदार्थ तो·

माथा, पु० खवा·

मासीक, ३लिं० मासिक·

माशी, स्त्री० सपक्ष क्षुद्रजंतु आहे; २, निशाणाचें संधान धरायाचे उपयोगी बंदुकीचे तोंडास जें मक्षिकेसारिखें चिन्ह असतें ती·

माशांचावाघ, पु० माशा धरीत असतो असा एक क्षुद्रजंतु आहे; त्यास कोळी म०

माशूक, ३लिं० प्रीतीने स्पृहणीयजो पदार्थ तो.

प्रायः शृंगारांत म०

**माष**, पु० सं० उडीद; २, रुवर्णादिकांचें पंचगुंजात्मक जें प्रमाण तो ·

**मास**, पु० सं० महिना; २, न० मांस; ३, रा० स्त्री० मक्षिकांचा जो समुदाय ती ·

**मांस**, न० सं० शरीरांत चर्माचें आंत आणि हाडाचेवर जो धातुविशेष असतो तें ·

**मांसऔंटी**, स्त्री० बाहेर मोठी औंटी दिसतां आणि जिला दूध थोडें अशी जी गो महिष्यादिकांची औंटी तीस म्ह०

**मासन्हाणें**, न० विवाहदिवसापासून महिनाभर तो त्या दिवशीं नवरानवरी यांस नाहणें, इ० समारंभ करितात तें ·

**मासबाळी**, स्त्री० एक स्त्रियांचें कर्णभूषण आहे ती·

**मासभरू**, ३ लिं० गरभरू ·

**मांसल**, ३ लिं० सं० मांसानें परिपूर्ण जें शरीर किं० तदवयव तो; २, तद्विशिष्ट देही तो; ३, ला० दे० गर, पुरण, इ० कें करून परिपुष्ट जें फल, पोळी, इ० तो ·

**मासला**, पु० विशिष्ट अवयवीचाठायीं सर्व अवयवांत व्यापून जो साधारण धर्म राहात असतो ज्याची एकदेशीं परीक्षा केली असतां विशिष्टाची ही परीक्षा अर्थात् होती तो धर्म; उ० हे दोन्ही धोतरजोडे एका मासल्याचे आहेत; २, विशिष्ट पदार्थनिष्ठ गुण दोषांची परीक्षा समजायाकरितां तत्पदार्थाच्या पृथक्‌ काढिला जो कांहीं अंश तो किं० कांहीं एक गुणादिकाचे अंशाचा ईषन्मात्र जो श्रवणादि द्वारा अनुभव तो; उ० जे जिन्नस घ्यायाचे असतील त्याचे थोडेथोडे मासले घेऊन ये; उ० याचे गाण्याचा मी मासला पाहिला आहे ·

**मासलेदार**, **मासलेवाईक**, ३ लिं० चांगले मासल्याचा जो पदार्थ तो ·

**मासँवदण**, न० रा० मासन्हाण ·

**मासळी**, स्त्री० विकणें, मारणें, एतदर्थ उद्दिष्ट जो प्रा० लाहान मत्स्यांचा समुदाय ती ·

**मासा**, पु० जलजंतु आहे; २, अष्टगुंजात्मक जें उन्मान तो; म्ह० माशाचे पोरांस पोहायास शिकवायास नको ·

**मासांत**, पु० न० सं० चांद्रमासाचे जे अंतिम त्रयोदशीपासून प्रतिपदेपर्यंत दिवस तो तें ·

**मासिक**, न० सं० मृतमनुष्यास वर्षभरेपर्यंत प्रतिमासीं श्राद्ध करितात तें; २, मास संबंधी जें भत्यादिकांस द्यावें लागतें तें ·

**मासरुडा**, पु० **मासरुडें**, न० शरीरास कांहीं शस्त्रादिकानें क्षत झालें असतां त्यांतील जें मास बाहेर येतें तो तें ·

**मासूक**, न० रा० मक्षिका ·

**मासेगाळणा**, ३ लिं० रा० केवळ विरळरुताचें जें वस्त्र त्यास म्ह०

**मासोळी**, स्त्री० ग्रं० लहान मत्स्य ती; २, एक स्त्रियांचें मत्स्याकार पादभूषण आहे ती ·

**मासोळीबाळी**, स्त्री० स्त्रियांचे कानांतील बाळ्यांत मत्स्याकार बाळी आहे ·

**माहात्म्य**, न० सं० महिमा ·

**माहितगार**, ३ लिं० हिं० माहीत तृतीयार्थी ·

**माहितगारी**, स्त्री० हिं० माहीत प्रथमार्थी ·

**माहिती**, स्त्री० दे० माहीत प्रथमार्थी; २, तद्विशिष्ट तो·

माही, पु० स्त्री० माघमास.

माहीत, स्त्री० कांहींएक व्यवहारांचें किं० देशादिकांतील तत्तत्पदार्थांचें पुरतेपणीं जें परिज्ञान ती; २, ३लिं० परिचयादिकामुळें सर्वांशीं परिज्ञात झालेला जो पदार्थ गोष्ट इ० तो; उ० त्या गृहस्थाचें कर्म मला माहीत आहे; २, पदार्थादिकांच्या पुरतेपणीं जो परिज्ञाता झालेला तो तद्विषयीं; उ० या गांवच्या मी माहीत आहें जें पुसाल तें सांगेन.

माहुटी, स्त्री० गृहादिकांचे वंशांचे शेवटास जी आडवी फळी मारली असती ती.

माहुरी, ३लिं० माहूर म्हणून देश आहे तत्संबंधीजो महिष्यादि पदार्थ तो.

माहुली, स्त्री० एक झाड आहे.

माहूत, पु० हिं० महात.

माहे, पु० महिना, मोहोरम, चैत्र, इ० विशेष संज्ञेचा मागें याचा योग होतो; उ० माहे मोहोरम चंद्र आठवा.

माहेर, न० स्त्रीचा मातापित्रांचे गृहतें; २, ला-दुःखितांचें विश्रांतिस्थान त्यास म्ह० ; उ० साधुसंतांचें माहेर बापरखुमादेवीवर.

माहेरघर, न० माहेर.

माहेरवाशीण, स्त्री० आईबापाचेघरीं किं० तत्पक्षीयांचेघरीं राहिलीजी स्त्री ती.

माहेरवास, पु० माहेरवाशीणपणानें कोणएक स्त्रीची जी स्थिति ती.

माहेवारी, स्त्री० सर्कार, सावकार, इ० कानीं सरदार, इ०कांस महिन्यास अमुक खर्चाबद्दल द्यावें असा बांधून दिला असतोजो नियम ती.

माहेवारीनें, अ० दे० महिन्यास अमुक द्रव्य देऊं अशा बोलीनें चाकर ठेवणें इ०काचें वि०

माहो, पु० माघमास, म्ह० माहो आणि हिंवाचा रुाहो.

माळ, पु० जा ठिकाणी विशेष शेत होत नाहीं, अशी जी सपाट विस्तीर्ण भूमि ती; २, स्त्री० रुद्राक्षादिक मणि, पुष्पें, इ० एकत्र ओवून जी गळा इ० कांत घालायाकरितां करितात ती; ३, अनेक पदार्थ एकापुढें एक एकापुढें एक असे राहिले असतां जो क्रमविशिष्टसंनिवेश होतो ती; ४, रहाटांचे लोटे बांधायासाठीं मध्यें खापेकडांचा जुळ्या भरून जी दुहेरी दोरी वळली असती ती; ५, कथा, वसंतपूजा, इ० आज याणें करावी; उद्यां दुसऱ्यानें करावी, असा जो कितीएक दिवस क्रम चालतो ती.

माळका, स्त्री० एकापुढेंएक अशा क्रमानें जी मनुष्यादिकांची माळ ती.

माळखंड, न० रहाटाची जी मोठी माळ तिचा जो तुकडा तें, माळखंड गळ्यांत पडणें, म्ह० कांहींएक व्यवहाराचा भार गळ्यांत पडणें.

माळगंड, पु० निंदेनें माळ्यास म्ह०

माळजमीन, स्त्री० माळरूपजी जमीन ती.

माळरान, न० माळजमीन

माळघट, ३लिं० जामध्यें माळजमीन बहुत असाजो देश, ग्राम, इ० तो.

माळवद, न० धाब्याचें जें घर तें.

माळवी, ३लिं० माळवा म्हणून देश आहे तेथील

जो बैल, गाय, इ० तो.

**माळवें**, न० भाजी, पाला, कांदा, लसूण, इ० जें मळ्यांत उत्पन्न होतें तें.

**माळा**, पु० घराचे तुळयांवर आडवी चोपटें, कड्या, साठ, इ० घालून जी वर जागा करितात ती; २, डोंत राखायासाठीं जी उंच जागा करितात ती.

**माळी**, पु० स्त्री० इण एक जाति आहे; २, रा० स्त्री० घराची जी माडी ती; ३, दे० डोंगराच्या पठारावरचीजी ढोल व्हायाजोगी जमीन ती.

**माळीण**, स्त्री० नाकांमध्यें एक स्फोटरूप रोग होत असतो ती.

**माळू**, पु० मृदंगाचे पुडास जें कातडयाचें कडें करून घातलें असतें तो; किं० तदर्थ जावादि घेतात तो.

**मिचकावणें**, कोण एकास संकेतानें खूण करावी इत्याद्यर्थ डोळे झांकून झांकून उघडणें.

**मिचमिचीत**, ३लिं० कुरकुरीत किं० खुसखुशीत लागायाजोगा पुरतेपणी तळला गेला नाहीं असाजो बुंदीच्या कळ्या, करंजा, अनरसा, इ० पदार्थ तो.

**मिचमीच**, स्त्री० खानेसमयीं तोंडाच्याजो शब्द होतो ती, अ० त्या वाजण्याचें विशेषण; उ० तूं तोंड मिचमीच वाजवूं नको, म्ह० खाणें थोडें आणि मिचमीच बहु.

**मिजाज, मिजाद**, स्त्री० हिं० प्रकृतीस जेजे उपचार मानतात ते ते प्रयत्नानें करीत असावें आणि जेन मानत तें सर्वथा वर्जावें असा निरंतर स्वशरीरादि प्रकृतीच्या राखण्याचा जो प्रकार ती; म्ह० मिजाज बादशाहाचा आणि अवलाद भडभुंजाची.

**मिजाजखोर**, ३ लिं० हिं० तादृश योग्यता नसून उगीच मिजाज करण्याचा स्वभाव ज्याचा त्यास निंदेनें म्ह०

**मिजाजी**, ३लिं० हिं० मिजाद करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**मिजादी**, ३लिं० हिं० मिजाजी.

**मिटकी**, स्त्री० कांहीं एक पदार्थ भक्षण करतेवेळेस जो मुखशब्द करितात ती; प्रायः मार धालूचा योगीं. प्र० मिटक्या मारीत बसणें म्ह० ज्या पदार्थावर इच्छा गेली त्याची आशा धरून बसणें,

**मिटणें**, उ० मुख, नेत्र, छत्र, पुष्प, पत्र, कवाड, इ० कांच्या बाजूचे अवयवानीं आंतील अंश न दिसायाजोगें परस्पर संमीलित करणें, ला० प्रवृत्त जें युद्ध, कलह, इ० तें परस्परांचे समजतीनें किं० एकाच्या पराजयानें नाहीसें करणें.

**मिठपाणा**, पु० भाजलेले वाल, इ० द्विदल पदार्थ मीठ घालून शिजवून करितात तो. प्र० अने०

**मिठवणी**, न० मिठाचेंजें पाणी तें.

**मिठा**, ३लिं० हिं० मिष्टजो पदार्थ तो.

**मिठाई**, स्त्री० हिं० पेढे, बरफी, साकर, फुटाणें, इ० जे पदार्थ ती.

**मिठागर**, पु० खाडीचेकांठीं जी मीठ पिकायाची जागा केली असती तो.

**मिठागरी**, पु० स्त्री० ईण मीठ पिकविणारी एक आगऱ्यांत जाति आहे तो.

**मिठाणा**, पु० मिठपाणा.

**मिठास**, स्त्री० कांहीं एक पदार्थाची जी मिष्टता ती

ती ·

मिठी, स्त्री० अत्यंत मिष्ट पदार्थ भक्षण करीत असतां त्याचा जो तत्काळीं वीट येतो ती ; २, प्रेमानें कोणाएकास धरून जें दृढालिंगन किं० तसेंच धरण्याचा जो प्रकार ती; ३, दुर्भिक्षादिकारणामुळें कांहींएक पदार्थ घेण्याविषयीं त्यावर अनेकानीं झटण्याचा जो व्यापार ती; उ० यंदा अंब्यावर मोठ्या मिठ्या पडल्या आहेत ·

मिणमिणणें, दिव्यानें मंदमंद जळणें; २, ला० रडकें रडकें स्तिमितपणानें मंदमंद बोलणें ·

मिणमिण्या, ३लिं० मिणमिणण्याचा स्वभाव ज्याचा ती; २, कांहींएक कार्यास संप्रदायापेक्षां बहुत वेळ लावण्याचा स्वभाव ज्याचा त्यास म्ह०

मिणमीण, स्त्री० मिणमिण्याचें जें भाषण ती; २. अ० दीपाच्या मंद जळण्याचें वि० म्ह० मिणमीण दिवा आणि कृपणाची सेवा ·

मित, ३लिं० सं० ज्रितक्यास तितका; उ० मित भाषण, मित भोजन इ०

मिताक्षरी, स्त्री० अकारीं खकार, खकारीं गकार, अशा वर्णव्यत्यय यानें एक संकेतित भाषा केली आहे ती ·

मिति. स्त्री० सं० गणना मुख्यार्थी; उ० माझ्या अपराधांची तर मिति नाहीं, परंतु ईश्वरा मज तार ·

मिती, स्त्री० तिथिरूप जो काल ती; उ० आजची मिती वैशाख शुद्ध पौर्णिमा; २, ला० व्याज; उ० शेंकडा चार आणें आह्मास मिती पडती ·

मित्र, ३लिं० सं० स्नेही; २, पु० सूर्य ·

मित्रद्रोह, पु० सं० मित्रासंगती जो द्रोह ती ·



मित्रभाव, पु० परस्परांचा जो सख्यभाव तो ·

मिथुन, न० सं० स्त्रीपुरुषांचें जें युग्म तें; २, पु० द्वादशराशींतील तृतीय जो राशि तो ·

मिथ्या, ३लिं० सं० प्रा० असत्य या अर्थी ·

मिथ्यापवाद, पु० खोटा जो आळ तो ·

मिथ्याभिशाप, पु० मिथ्यापवाद ·

मिंधा, ३ लिं० हिं० जो ज्याचा ओशाळा तो त्याचा; उ० मी तुझा मिंधा नसतां शिव्या को सोशीन ·

मिनतमाना, पु० हिं० स्वकार्यार्थ बहुत जें कोणएकाचें आर्जव तो ·

मिनतवारी, स्त्री० हिं० मिनतमाना ·

मिना, पु० ـــ हिं० तांबडा, हिरवा, इ० एक तऱ्हेचा रंग आहे ज्यास चकाकी बहुत असती तो; २, अ० वजा; उ० शंभर रुपये देणें त्यांत तेतीस मिना घातले ·

मिनाकार, मिनागार, पु० मिन्याचे रंगाचें कसब करितो तो ·

मिनेकार, पु० मिनाकार ·

मिनेगार, पु० हिं० मिनागार ·

मिनेदार, ३लिं० मिन्याचें वेलबूट ज्यावर काढले असतात तो डबी, अंगठी, इ० पदार्थ तो ·

मिम्मी, स्त्री० कों० स्त्रीचा स्तन ·

मिरकादा, पु० मिऱ्यांच्या जो काढा करीत असतात तो ·

मिरकूट, न० एक क्षुद्रजंतु आहे ·

मिरगिटाण, स्त्री० दूध, तूप, तेल, इ० जळल्यामुळें जी घाण येती ती ·

मिरगी, स्त्री० फेंफरें रोग आहे ती, किं० पित्तादि

कानें येती जी येरी ती·

**मिरगोंड**, न० मिऱ्यांचा जो घड तें; २, उडदाचे पिठां त मिरें घालून जा गोळ्या तोंडीं लावायासाठीं करीत असतात तें

**मिरची**, स्त्री० एक झाड आहे ती व तिचें फल ती·

**मिरजी**, ३ लिं० मिरज ह्मणून देश आहे तत्संबंधीजो तमारखू, जोडा, इ० पदार्थ तो·

**मिरधा**, पु० च्योपुला; २, आलदारास ह्म०

**मिरपूड**, स्त्री० मिऱ्यांचें जें चूर्ण करितात ती·

**मिरमिटा**, ३ लिं० रा० झोपावास जा पदार्थास येतो असाजो अंबा इ० तो·

**मिरमिरणें**, अक्कलकरा, पिंपळी, इ० पदार्थ भक्षिलेअसतां जी व्यथा होती तीणें मुख, जिव्हा, इ० युक्त होणें किं० त्या पदार्थांनी तशी व्यथा उत्पन्न करणें·

**मिरमीर**, स्त्री० मिरमिरण्यानें होतीजी व्यथा ती·

**मिरवण**, स्त्री० मिरवण्याच्या व्यापार·

**मिरवणी**, न० मिरकादा; २, स्त्री० मिरवण्याच्या व्यापार ती·

**मिरवणूक**, स्त्री० मिरवण·

**मिरवणें**, वाद्यादि समारंभपूर्वक नगरादिकांत सावकाशपणीं फिरणें; उ० त्या नवऱ्याची कालरात्रीस वरात मिरवली; उ० त्या न्हाव्याची आज धिंड मिरवती आहे; २, ला० छानछोकीनें साधारण फिरण्यास-ही निंदेनें ह्म०; उ० आज पगडी फेकून कोणीकडे मिरवायास गेला होता, प्रतिष्ठा, ढोल इ० मिरवणें ह्म० तें तें तादृश नसतां त्याच्या त्याच्या उगाच ढोल घालणें·

**मिरवेल**, स्त्री० मिऱ्यांचीजी वेल ती·



**मिरशांग, मिरशेंग**, स्त्री० मिरची·

**मिराशी**, पु० सर्व वतनदारांस ह्म० को० ग्रामसंबंधी माहारकीच्या अंशजो घेतो असा वतनदार महार तो·

**मिरास**, स्त्री० मिराशाचें जें वतन ती·

**मिरासदार**, ३ लिं० मिराशी·

**मिरी**, स्त्री० एक वृक्ष आहे; २, ३ लिं० पैसे, कवड्या, इ० कांचा खेळांत पहिल्यानें खेळायाच्या अधिकाराजो असतो तो·

**मिरीं**, न० मिरवेलीचें जें फळ तें·

**मिरूं**, न० को० मिरीं·

**मिरें**, न० मिरूं·

**मिऱ्या**, पु० एक क्षुद्रजंतु आहे, जो प्रायः डोळ्यांत शिरत असतो तो·

**मिलाफ**, पु० हिं० अनेक पदार्थांच्या जो परस्पर विवक्षानुरूप संबंध तो; २, परस्परांच्या आनुकूल्य भाव तो·

**मिलाफी**, ३ लिं० हिं० ज्याच्या ज्याच्या परस्पर आनुकूल्य भाव आहे तो तो त्याच्या

**मिल्हा**, पु० एक पक्षी आहे; २, ला० कांहींएक कार्य साधनार्थ बकध्यान धरून असतोजो मनुष्य तो·

**मिशाळ**, ३ लिं० संप्रदायापेक्षां ज्याच्या मिशा मोठ्या तो मनुष्य·

**मिशी**, स्त्री० पुरुषादिकांचे ओठावर जे केश येतात ती; २, जी वेश्या नसती तिला वेश्यात्व संपादक गायनादि समारंभपूर्वक संस्कार करितात ती·

**मिश्र**, ३ लिं० एक ब्राह्मणांत भेद आहे, व त्याचा देश; २, जा पदार्थांत दुसऱ्ये पदार्थांची भेळ झाली तो पदार्थ·

**मिश्रित**, ३ लिं० मिश्र तृतीयार्थी

**मिश्री**, स्त्री० खडीसाकर ·

**मिष**, न० कांहींएक दुखणें, वेड, इ० धर्म आपणावर नसतां कांहींएक कार्यार्थ त्याचें घेतलेंजें सांगतें ·

**मिष्ट**, ३ लिं० गोडजो पदार्थ तो ·

**मिष्टान्न**, न० मिष्टजें रुग्रास अन्न तें ·

**मिसकिनमात्रागमनी**, ३ लिं० बाहेर शांत दिसतो आणि आंत हरामी जो असतो त्यास ह्म०

**मिसकिनमारबाडी**, ३ लिं० मिसकिन मात्रागमनी ·

**मिसकीन.मिसकील**, ३ लिं० प्रकृतीनें जो गरीब किं० अशक्त तो प्राय: परस्तुत्ति ·

**मिसखोर**, ३ लिं० मिषकरण्याचा स्वभाव ज्याचा तो ·

**मिसमिशीन**, ३ लिं० बिसविशीत ·

**मिसरी**, स्त्री० मिश्री ·

**मिसरूड**, न० नुकती फुटायास लागली जी मिशी तीसह्म०

**मिसल**, स्त्री० हिं० लष्करामध्यें तंबू इ० ठोकायाची ज्याचीज्याची जी जागा ती ·

**मिसळ**. स्त्री० भेळ ·

**मिसळण**, न० धणे, मोहोऱ्या, जिरें, इ० पदार्थ एकत्रकरून फोडणींत घालायासाठीं करीत असतात ती ·

**मिसळणें**, भिसळणें ·

**मिसळा**, पु० अनेक पदार्थ एकत्र होऊन झाली जी अवस्था तो ·

**मिस्सी**, स्त्री० दे० दातवण ·

**मिस्रूं**, न० मिसरूड ·



**मिळकत**, स्त्री० मिळण्याचे व्यापारानें प्राप्त होतें जें द्रव्यादि ती ·

**मिळणीस मिळणें**, कोणएकाचे तंत्रानें कोणएकानें चालणें ·

**मिळणें**, द्रव्यादि प्राप्त होणें; २, कांहींएक पदार्थाचा कांहींएक पदार्थाशीं विवक्षित संयोग होणें; ३, अनेकानीं कांहींएक कार्यार्थ एकचित्त होणें किं० समुदित होणेंजीवद्वृत्ति; ४, प्रमाणानुरूप प्रमेयाचा अनुभव येणें; ५, कोणएक पदार्थाची कोणएकपदार्थानें वर्णादिद्वारा बरोबरी पावणें ·

**मिळताव**, पु० प्राय: मिळकत ·

**मिळतीवस्त**, स्त्री० प्राप्त व्हायाजोगी जी वस्त ती; उ० बायकोजी आहे ही मिळती वस्त आहे ·

**मिळमिळाट**, पु० मिळमिळीतपणा ·

**मिळमिळीत**, ३ लिं० तैलादिकजे स्निग्धपदार्थ ते; २, त्याचे लेपानें लिप्तजो पात्रादि पदार्थ तो; ३, मिळमिळीतजें भाषणादिक त्यासही ह्म०

**मिळमीळ**, स्त्री० मिळमिळाट ·

**मिळवण**, न० सद्रवपातळ पदार्थ घट्ट व्हायासाठीं जें पिष्टादि घालितात तें ·

**मिळवणी**, स्त्री० अंकसंख्या एकत्र मिळवण्याचा जो व्यापार ती; २, मिळवण्याकरितां घातलीजी अंकसंख्या ती; ३, मिळवण्याचे व्यापारानें आलेंजें फळ ती; ४, अनेक गोष्टी एका गोष्टीशीं जुळण्याचा जो व्यापार ती ·

**मी**, ३ लिं० हें सर्वनाम आहे उत्तमपुरुषाचें एकवचन ·

**मीठ**, न० क्षारोदक आटून जो क्षार होतो तें; ह्म० नावडतीचें मीठ अळणी ·

मीन, पु० सं० मत्स्य; २, द्वादशराशींतील शेवटला जो राशि तो·

मीपणा, पु० अहंपणा·

मीर, पु० गंजिफांतील प्रतिरंगाच्या जो राजा तो·

मीस, न० मिषाच्या अपभ्रंश·

मीळ, स्त्री० मिळकत·

मुकटा, मुगटा, पु० स्त्रीपुरुषांचें सोवळ्याचें उपयोगी रेशमी वस्त्र आहे·

मुकणाहत्ती, पु० दंतशून्य जो हस्ती असतो त्यास म्ह० ·

मुकणीतूर, स्त्री० कांहींएक रोगानें नासलीजी तूर ती जीची डाळ चांगली होत नाहीं·

मुकणें, प्राप्त होणार किं० प्राप्त जालेलें जे उपभोगसाधनपदार्थ तत्पदार्थरहित मनुष्यादि जीवानें होणें; उ० तो आपले राज्याला मुकला·

मुकद्दम, पु० हिं० ग्रामाधिकारी आहे; २, कोणेक व्यवहारामध्यें किं० जातीमध्यें जो नायक कल्पिला असतो तो·

मुकदमा, पु० हिं० मुकदमाचाजो अधिकार तो·

मुका, ३लिं० ज्याचे मुखांतून वर्णात्मक शब्द येत नाहीं तो; २, ज्याने मौन धरलें तो; ३, पु० चुंबन; ४, निर्मुख जो नारू, गळूं, उठाणूं इ० तो; ५, भिजलेलें असून प्रायः ज्यास मोड आले नाहींत असेंजें द्विदल धान्यादि तो; ६, जा नारळांत पाणी वाजतें झालें नाहीं असा जो तो; ७, विकसित जाली नाहीं अशीजी पुष्पाची कळी, कळा, इ० तो; ८, वाजत नाहीं असा जो चरक राहाट, घागऱ्या, गेंद, इ० पदार्थ तो·

मुकाट्यां, अ० नबोलतां नचालतां, कर, बस, चाल. इ० धा० वि०·

मुकाट्यानी, अ० मुकाट्यां·

मुकाणा, पु० गणंग·

मुकादम, ३लिं० हिं० मुकद्दम·

मुकादमी, स्त्री० हिं० मुकद्दमा·

मुकाबला, पु० مقابل हिं० पडताळा; २. प्रा० मासल्याचे अर्थी·

मुकाम, पु० مقام हिं० केवळ एकाच्या ठिकाणीं बहुत दिवस राहावयाचा नियम ज्यांचा नाहीं अशींजी फौज, मनुष्य, इ० यांच्या कांहींएक दिवस राहायाच्या साधारणजो ठिकाणा तो; २, त्या ठिकाणीं राहाण्याच्याजो व्यापार तो; उ० त्या गांवीं आह्मीं पंधरा दिवस मुकाम केला होता; ३, ला० चाललेल्या व्यापाराची कांहींएक कालजी कुंठितावस्था तो·

मुकामारा, पु० गुप्त मारा·

मुकाह्मसोबा, पु० जा मनुष्यास विशेष बोलायास नको. असाजो मनुष्य त्यास निंदेनें ह्म०

मुकी मण्यार, स्त्री० मुकाह्मसोबा·

मुकुट, पु० सं० किरीट·

मुकुटमणि, पु० मुकुटसंबंधीजो हिरकादिक मणि तो; २, ला० कोणएक समुदायामध्यें जो मुख्य तो·

मुकेंजनावर, न० गो महिष्यादिजे त्यास प्रसंगविशेषी ह्म०

मुकेस, पु० सोनेरी रुपेरी वर्ख इ० कांच्या जो चुरा तो·

मुक्त, ३लिं० सं० प्रपंचादि बंधनापासून सुटला तो·

मुक्तद्वार, न० जाणेंयेणं इ० कार्यास जेथें प्रतिबंध नाहीं असेंजें द्वार तें·

मुक्ता, स्त्री० सं० मोती; २, ३लिं० पुष्कळ·

मुक्ता०

मुक्ताफल. न० सं० मुक्ता; याचें अक्षर मुक्ताफल आहे एथें फार चांगलें आहे.

मुक्ति, स्त्री० सं० संसारादिबंधनापासून जी मुक्तता ती; २ सायुज्यता, सलोकता, समीपता, सरूपता, या प्र०

मुख. न० सं० प्रायः तोंडया अर्थी.

मुखई, न० एक बंदर आहे तें; २, ३ लिं० तत्संबंधीजो डालिंब, बेदाणा, इ० पदार्थ तो.

मुखकमल, न० सं० मुखाच्या स्तव कर्तव्य असतां त्यास मुखकमल म्ह०

मुखचंद्र, पु० सं० मुखाची स्तुति कर्तव्य असतां म्ह०

मुखचर्या. स्त्री० मुखावरील तेजगी ती.

मुखजबानी, स्त्री० हिं० तोंडजबानी.

मुखडा, पु० हिं० मुखाचें वर्णन करायाचें असतां म्ह०

मुखत्यार, ३ लिं० हिं० कांहींएक कार्याविषयीं जाणें जास अखत्यार दिला तो त्याचा.

मुखत्यारी, स्त्री० हिं० अखत्यारी.

मुखदुर्बल, ३ लिं० सं० जास समयीं विशेष बोलायास येत नाहीं त्यास किं० विशेष बोलायास जास नको, त्यास भिदेनें म्ह०

मुखदुर्बळ, ३ लिं० मुखदुर्बल.

मुखपट्टा, पु० प्रायः घोड्याचे तोंडावर जो पांढरा उभा पट्टा असतो तो.

मुखपाठ, ३ लिं० तोंडपाठ.

मुखर, ३ लिं० सं० वक्तृत्वाविषयीं कुशल त्यास म्ह०

मुखरण, ३ लिं० जा कारभाराविषयीं जो मुख्यत्वें करून अभिमत तो.

मुखरणी, ३ लिं० मुख्खरण.

मुखरस, पु० स्वपरकार्यविघातक जें भाषण त्यास प्रसंगविशेषीं म्ह०

मुखरी, स्त्री० पात्रास जें बारीक छिद्र पडतें ती.

मुखवटा, पु० तोंडवळा; २, देवादिकांच्या जो धातु इ० कांचा मुखाकार करितात तो.

मुखशुद्धि, स्त्री० सं० भोजनोत्तर तांबुलादि भक्षणें करून जी मुखाची शुद्धि ती व तो तांबुलादि पदार्थ त्यासही म्ह०

मुखश्री, स्त्री० सं० मुखचर्या.

मुखसंकोच, पु० कांहींएक कार्याविषयीं कोणीं भीड घातली असतां ती त्याचे समक्ष न मोडतां तें कार्य करण्याविषयीं मनांत धर्म उत्पन्न होतो तो.

मुखोटा, पु० मुखवटा.

मुखोद्गत. ३ लिं० सं० मुखपाठ.

मुख्य, ३ लिं० जाजा मनुष्यादि पदार्थामध्यें किं० जाजा व्यवहारामध्यें जाचें प्राधान्येंकरून परिगणन तो.

मुगट, ३ लिं० पेंव इ० कांत बहुत दिवस धान्य राहिलें असतां त्यास जो मुगासारिखा वास येतो तो व तद्विशिष्ट धान्यादि तो.

मुगटा, पु० मुकटा.

मुगडी, स्त्री० बुगडी.

मुगदळ, न० मुगाचे दाळीचें जें लाडू करायासाठीं पीठ करितात तें व त्याचे लाडू ते.

मुगदमी, स्त्री० एक पिठीसाकरेंत भेद आहे.

मुगवण, न० मुगाचे जें गुळी तें.

मुगवा, ३ लिं० मुगाचे आकाराची चौकडी जावर असती असा जो स्त्रियांचे उपयोगी मुगटा, इ० तो.

**मुंगस**, पु० नकुल.

**मुगळ**, स्त्री० भातामध्यें तृण विशेषांचें बीज असतें ती.

**मुंगळा**, पु० प्रायः मोठीजी मुंगी तिला म्ह०, त्याला त्या कामाविषयीं भारी मुंगळा लागला आहे, एथें तो त्या कामाविषयीं अतिशयित घाई करितो.

**मुंगळी**, स्त्री० लाहान जो मुंगळा ती.

**मुगा**, ३लिं० मुगवा.

**मुंगा**, पु० कांहीं एक कार्याविषयीं जो कोणाएकास चव येतो तो; २, एक घोड्यास रोग होत असतो तो.

**मुगाघेवडा**, पु० घेवड्यांत एक भेद आहे.

**मुगाणा**, पु० मुकाणा.

**मुगाभोंपळा**, पु० दुध्याभोंपळा

**मुगारा**, पु० दे० धान्य, वृक्ष, इ०कांस जो अंकुर फुटतो तो.

**मुगी**, स्त्री० लुगडें, खण, इ० वस्त्रावरील जी बारीक चौकडी ती व तद्विशिष्ट लुगडें तें; २, मुगांत एक जाति आहे.

**मुंगी**, स्त्री० एक क्षुद्रजंतु आहे तीस पिपीलिका म्ह०; २, ला० वाय्वादि विकृतीनें शरीरावयव जड होउन त्यास जी खरखी फुटती ती.

**मुगुट**, पु० मुकुटाचा अपभ्रंश तो.

**मुंगूस**, पु० मुंगस

**मुग्ध**, ३लिं० हें असेंकच असा फोड किं० निर्णय झाल्यावांचून राहिलाजो व्यवहार, भाषण, इ० तो.

**मुग्धमा**, ३लिं० शरीर पुष्ट असूनजो मंदच विशेष जो बोलत नाहीं त्यास निंदेनें म्ह० प्रा० स्त्री ध्वनि.

**मुग्धा**, स्त्री० सं० तारुण्यावस्था जीस प्राप्त जाली अशी जी स्त्री ती; २, मुग्ध.



**मुंज**, स्त्री० द्विजत्वसंपादक एक संस्कार आहे; २, मोळ इ०कांची जी मुंज मुलाचे कमरेस बांधायाकरितां वळून दोरी करितात ती.

**मुजमू**, स्त्री० हिं० राजाच्या मुलकाची सर्व जमाबंदी करणें व सर्व खर्चाचा बंदोबस्त राखणें इ० रूप जो अधिकार ती.

**मुजमूदार**, पु० हिं० मुजमूच्या अधिकार ज्याकडेस आहे तो.

**मुजरत**, अ० हिं० तात पुरत्या.

**मुजरा**, पु० हिं० श्रेष्ठादिक धनीं, इ०कांस रामराम करायाच्या ठिकाणीं करितात तो; २, तमाशगीर इ० तमाशा इ०कांचा अंतीं रामरामाबद्दल लावणी म्ह० तो.

**मुंजा**, पु० मुंजीचे योग्य झाला जो मुलगा तो व ज्याचे कंबरेस मुंज बांधली आहे तो; २, कंबरेस मुंज असतां जो बुडून भूत झाला तो, तो वारा पिंपळावरचा मुंजा आहे, म्ह० जो अमुक ठिकाणीं भेटेल असा ज्याचा नियम प्रायः सांपडत नाहीं त्यास म्ह०

**मुजारव**, पु० स्त्री० مضارع हिं० विवाद.

**मुजारवा**, पु० مضارع हिं० मुजारव.

**मुजाफत**, स्त्री० हिं० परस्थलावाय जो ती.

**मुजामा**, पु० हिं० घोड्याचे पायांबरोबर जो त्यास चर्म बंध करित असतात तो जीस पायबंद अडकवीत असतात.

**मुजारत**, अ० हिं० मुजरत; २, स्त्री० तवाजू.

**मुजाहिम**, ३लिं० हिं० कांहीं एक कार्यास जो प्रतिबंधक तो.

**मुटकणें**, कोणाएकास स्वबाधार्थ बुक्यानीं प्रहार करणें.

**मुटकळणें**, मुटकणें; २, कणीक आदिकरून पदार्थ भिजवून मुठीनें मउ करणें; ३, वस्त्रादिक हातानें मोजतेसमयीं प्रतिहातास वस्त्राच्या पुढला अंश मुष्टिप्रमाण अधीक घेणें.

**मुटकळें**, न॰ पिष्टादिकांचें मुठीनें वळून करितात तें.

**मुटका**, पु॰ मुटकळें; २, शरीरावयव मुठीनें आवळण्याचा जो व्यापार तो; ३, रा॰ कोणाएकास केलाजो मुठीनें प्रहार तो.

**मुटकें**, न॰ मुटकळें.

**मुटमूट**, अ॰ भक्षणादिसमयींचे शब्दाचें अनु॰ खाणें, इ॰कांचें वि॰ भाषणादि न करितां पाहाणें, इ॰कांचें वि॰ माझा जीव मुटमूट करितो एथें माटमुट करितो.

**मुठा**, पु॰ रा॰ विस्तव ठरावासम्हणून चूल इ॰कांत ओले शेणाच्या गोळा पुरून ठेवितात तो; २, ला॰ वायू, भय, इ॰कांमुळें पोटांत येतोजो गोळा तो.

**मुठाण**. न॰ कांहींएक कार्याविषयीं जमलाजो एकचित्त मनुष्यांचा समुदाय तें.

**मुठाळीकेळ, मुठेळीकेळ**, स्त्री॰ केळीत एक जाति आहे.

**मुठाळें, मुठेळें**, न॰ मुठेळेकेळीचें जें केळ तें.

**मुठ्या**, पु॰ खेंकडयांत एक भेद आहे.

**मुंड**, न॰ डोकें मुरव्यार्थी; २, इटीदांडूचे खेळांत दांडूनें मोजत्येसमयीं तृतीयसंख्येस म्ह॰, व त्या संख्येनें मुठीवर इटी ठेवून जो टोला मारितात तें.

**मुंडकी**, स्त्री॰ मुंड प्रथमार्थी.

**मुंडकें**, न॰ मुंडकी.

**मुंडण**, न॰ मुंडनाचा अपभ्रंश तें.



**मुंडणें**, वस्त्रा, इ॰कानें डोकीवरले केश काढणें; २, ला॰ संत इ॰कानीं मंत्रोपदेशद्वारा कोणाएकास शिष्य करणें; ३, कोणाएकास डंभादि दाखवून ठकवून त्यापासून द्रव्य काढणें.

**मुडदा**, पु॰ हिं॰ प्रेत.

**मुडदार**, ३ लिं॰ दीपोच्छिष्ट जें तेल तें; २, मृतप्राय अप्रयोजक जो मनुष्यादि तो.

**मुडदारशिंग**, न॰ एक औषध आहे.

**मुंडन**, न॰ सं॰ चौल; २, मुंडण्याचा व्यापार तें; ३, ला॰ गालिप्रदानद्वारा दुसऱ्याचा पाणउतारा करण्याचा व्यापार तें.

**मुडा**, पु॰ पोटीं धान्यादि घालून बाहेरून तृण गुंडाळून बांधून करितात तो; २, पंचवीसमण किं॰ अठ्ठावीसमण प्रमाणजें धान्य तो.

**मुंडावळ, मुंदावळ**, स्त्री॰ मंडावळ.

**मुंडासें, मुंढासें**, न॰ पागोटें.

**मुंडी, मुंढी**, स्त्री॰ मुंडकें; २, एक औषधी आहे; ३, ३, लिं॰ संन्यासी, गोंसावी, इ॰ तो.

**मुडी**. स्त्री॰ लाहानजो मुडा ती.

**मुंडीमोचन**, न॰ द्रव्यादिहरणार्थ चोरादिक दुसऱ्याची मान मोडण्याचा जो व्यापार करितात तें; २, ला॰ केवल द्रव्यादिहरण, गालिप्रदान, इ॰ द्वारा केलीजी दुर्दशा ते.

**मुंदरी**, स्त्री॰ पावसाचें पाणी कुसू. इ॰कांचें भिंतीत न मुरावें म्ह॰ पाणदाळ यावयाकरितां तिजवर निमोळता भाग करितात तो.

**मुंदा**, ३ लिं॰ जास शेंडी नाहीं तो; २, नारळ, इ॰ फळांचा खरा नव्हे असाजो शेकडा तो.

**मुंदाहात**, पु० आकुंचितांगुली असा प्रमाणार्थ घेत ला जो हस्त तो.

**मूतरवडा**, पु० मूत्रप्रतिबंध करतो असा एक रोग हो त असतो तो.

**मुतगा**, पु० भातामध्यें एक जाति आहे.

**मुतणें**, मूत्र त्याग करणें.

**मुतरा**, ३ लिं० फार मुतण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**मुतलक**, स्त्री० खाशीचे जमीनींत एक भेद आहे.

**मुतसद्दिगिरी**, स्त्री० मुतसद्दीपणा.

**मुतसद्दी**, पु० राजाचा राज्यसंबंधी कारभार चालव णारे जे कारभारी ते प्र०

**मुतावटणें**, गाय, म्हैस, इ० पशुचें कांहींएक विकृतीनें मू त्र बंद होई अशा अवस्थेनें गो, महिष, इ० कांनी पा वणें.

**मुतारी**, स्त्री० घोडा बांधायाचे ठिकाणीं त्याचें मूत जायासाठीं फळ्या, इ० घालू० जी जागा करितात ती.

**मुत्री**, स्त्री० घोडा, इ० बांधायाचे ठिकाणीं त्याचें मूत खालीं पडून चिखल होउं नये म्ह० त्याचें मुतायाचा ठिकाणा पाहून तेथें खच्चा करून फळ्या, इ० घालून जी करितात ती.

**मुदगल**, पु० हिं० पैलवान, इ० आपलें शरीर दृढ व्हावें, म्ह० काष्ठादिकांचा पेलायाकरितां करीत असतात तो.

**मुदबख**, पु० مطبخ हिं० स्वयंपाक करायाचें स्थ ल तें.

**मुदबखखाना**, पु० مطبخ خانہ हिं० मुदबख.

**मुदबखा**, ३ लिं० हिं० आचारी.

**मुदलामुदल, मुदलामुदली**, अ० हिं० व्याज, नफा. इ० घेतां दे, घे, इ० क्रि०

**मुदली**, अ० कांहींएक देणें, घेणें, इ० व्यवहाराचा आरं भीं; उ० मुदली त्याजवळ पोटास पैसा नाहीं तो तुम्हा स काय देतो.

**मुदाई**, ३ लिं० हिं० चोरी, शिनळकी, इ० कांचा मुद्दा ज्या णें धरिला तो.

**मुदाईम**, ३ लिं० हिं० मुदाई.

**मुदाळें**, न० ओगराळें.

**मुदित**, ३ लिं० सं० हर्षित.

**मुदी**, स्त्री० अंगुलीयक.

**मुद्ग**, पु० सं० मूग.

**मुद्दई**, ३ लिं० हिं० मुदाई.

**मुद्दत**, स्त्री० कांहींएक व्यापाराविषयीं केलाजो का लावधि ती; उ० एकामहिन्याची मुद्दत करून त्या स रुपये दिल्हे.

**मुद्दल**, न० देण्याघेण्याचे प्रसंगी मूलभूतजें द्रव्य तें.

**मुद्दा**, पु० चोरी, चाहाडी, शिनळकी, खून, इ० कर्म ज्या णें केलीं तीं त्याचे आंगीं लागू व्हावयाजोगें जें साक्षी किं० चोरलेलापदार्थ, इ० तो; २, कोणाएकाचें कोणा एकास ठिकाण लागावें म्ह० कागदावर जी खूण लिहून देतात त्यासही कचित् म्ह०

**मुद्दाम**, अ० तात्पुरत्या. ये, जा. इ० क्रि०

**मुद्रा**, स्त्री० रुपया, मोहोर, पुतळी, इ० कांवर जें चि न्ह असतें ती; २, तादृश चिन्हांकित शिक्का, मोर्तब, रुपया, इ० ती; ३, शंख, चक्र, पद्म, गदा, रामनाम, इ० वैष्णवांची गोपीचंदन लावायाची असती ती; ४, ला० तोंडवळा; ५, ; कांहींएक पदार्थावर खुणेंकरितां जें चिन्ह तें.

**मुद्रिका**, स्त्री० मुदी·

**मुनवा**, पु० केळीपासून जो नूतन केळवा उत्पन्न होतो तो लाहान असतांच प्र०

**मुनशी**, ३लिं० منشی हिं० फारशी लीपीचें आणि भाषेचें ज्ञानअसून त्या लीपीनें जो चिटनिविशीचें काम करितो तो;२, अरबी, फारशी, इ० भाषा शिकविणार तो·

**मुनशीगिरी**, स्त्री० हिं० मुनशीपणा·

**मुनि**, पु० सं० ऋषि;२, अगसत्याचें झाड तो·

**मुनीम**, ३लिं० हिं० कांहींएक कारभाराविषयीं मुख्यसंकरून योजिलाजातो·

**मुफत**, अ० مفت हिं० फुकट·

**मुफतचा**, ३लिं० हिं० फुकटचा·

**मुंब**, पु० फार मोठीं जीं मडकीं त्यांतील एक डोंलाचें मडकें आहे;२, मुमडा·

**मुबलक**, ३लिं० مبلغ हिं० प्रायः पुष्कळ या अर्थीं·

**मुबा**, स्त्री० हिं० लोकांस कांहींएक कर्माविषयीं साधारणजो राजादिकृत प्रतिबंध असतो त्या कर्माविषयीं जी कोणाएकास मोकळीक देतात ती; उ० जा तुं सोदेगिरी कर तुला मुबा दिली आहे·

**मुमडा**, पु० थोर गलबतांत एक भेद आहे·

**मुर्मीर, मुमूर**, पु० फुंपाटा·

**मुमुक्षु**, ३लिं० विषयविरागी होउन मोक्षमार्गी जो लागला तो·

**मुमूर्षु**, ३लिं० सं० मरायास टेंकला तो·

**मुयदंड**, पु० पादयांचे खळामध्यें दाहा, पांच पाळ्यांचेमध्यें उभाजो एक पट्टा मारीत असतात तो·

**मुयधोंडा**, पु० गांवचा सीमेवर खुणेंकरितां जो धोंडा पुरला असतो तो·



**मुरकणें**, कांहींएक गोष्ट मनांतून करायाची असतां तुं मी नाहीं असें बोलून कांहींसें मुख वक्र करणें·

**मुरका**, पु० मुरकण्याचा जो व्यापार तो, प्रायः मार धालूण्यायोगीं प्र०

**मुरकुंटेंय**, न० मुरकुटासारिखें बारीक मक्षिकानीं मधुसंचयार्थ केलेंजें वृक्षादिकांचे ढोलांत पोळें तें·

**मुरकुंडी**, स्त्री० वृक्ष, अंदय, इ० कांवरून पडणें किं० ज्वर इ० कामुळें अथवा मोहादिकानें खालीं येणें बळणें इ० कांच्यायोगीं आकुंचितावयवकजें शरीर त्यास प्र० , तमाशा, नबरी, नाच, इ० कांवर मुरकुंड्या पडणें प्र० उड्या पडणें·

**मुरकूट**, न० चिलट·

**मुरगळणें**, शरीर, वृक्ष, इ० कांच्या अवयव पिळवटून वांकडा करणें, मान इ० मुरगाळणें प्र० इत्यादि हरणद्वारा कोणाएकाच्या नाश करणें·

**मुरट**, न० मुरडून वक्र झालेंजें फल तें·

**मुरटणें**, फलादिकांनीं कांहीं एक विकृतीनें वक्रता पावणें·

**मुरटा**, ३लिं० मुरटलेलेंजें फलादिक तो·

**मुरटी**, स्त्री० वृक्षादिकांचीं पर्णें, फळें, इ० मुरटायाजोगा एक वृक्षादिकांवर रोग पडत असतो ती·

**मुरड**, स्त्री० करंजी कानवला, इ० कांचे काठ दुमडून जी करितात ती;२, वस्त्राचे दोनी पदर गुंडाळून जी शिवण घालीत असतात ती·

**मुरडणें**, वस्त्र, कागद, इ० कांचा अंश इपदक्र होई असें करणें;२, कोणी एक पुढें गेलाजो त्याणें मागें फिरणें;३, मागला पदार्थ पाहायासाठीं मान वांकडी करणें; नाक, तोंड, मुरडणें इ० स्थलीं कांहींएक पदार्थ तुच्छ करणें·

रणें.

**मुरडशेंग, मुरुडशेंग,** स्त्री० एक वल्ली आहे व तिची शेंग ती.

**मुरडा,** पु० आमांशादि विकृतीनें पोटांत एक विलक्षण व्यथा उत्पन्न होत असती ती.

**मुरणें,** जलादि सद्रव पदार्थ भूमि आदिकांत जिरणें; २, कांहींएक कार्य अमुकसंख्याक मनुष्यांनीं किं० पदार्थांनी सिद्ध होईल असा अजमास असतां त्या कार्याकडे त्या अजमासापेक्षां अधीक मनुष्य जिन्नस, इ० खपलें जाणें; ३, अंबा, फणस, इ० कांचे अंगीचा रस किं० त्यांस कांहींविशेष गुण उत्पन्न व्हावा म्ह० घातला जो क्षारादिरस त्यात्या रसानें त्या पदार्थांनी सर्वावयवावच्छेदंकरून व्यापि विशिष्ट होणें; मन मुरणें म्ह० कांहींएक विषयानें तृप्त होणें, ज्वरादि दुखणें अंगीं मुरणें म्ह० जिरणें.

**मुरदा,** पु० ﻩ/ हिं० मुडदा.

**मुरदाड,** ३लिं० ﻩ/ हिं० मुडदार.

**मुरदाडणें,** वृक्षादिकांचा माना मुरगाळून मृतप्राय करणें; उ० त्या ज्वरानें तुळशी एका क्षणांत मुरदाडल्या.

**मुरदाडशिंग, मुरदाडशेंग,** न० मुरदाडशेंग.

**मुरंबा, मुरांबा,** पु० अंबा, आंवळा, इ० कांत शर्करादि अनेकप्रकारचें साहित्य घालून करितात तो.

**मुरब्बी,** ३लिं० हिं० अनेकांचें कार्य करणारा जो राज्यादिव्यवहारीं मुखत्यार असतो तो; २, कांहींएक काम डोकीवर घेउन नडीस नेणारा जो मनुष्य तो.

**मुरमुरणें,** बुरबुरणें

**मुरमुरा,** पु० चुरमुरा मुख्यार्थीं.

**मुरमूर,** स्त्री० बुरबूर.

**मुरमुरी,** स्त्री० ज्वरादिकानें जी ग्लानि येती ती.

**मुरमुसणें,** ज्वरादिविकृतीमुळें मूर्छित होणें.

**मुरली,** स्त्री० तोंडानें वाजवावयाचें वेळू, इ० कांचें एक वाद्य आहे ती.

**मुरवत,** स्त्री० कोणएकाच्या कोणएकास पडतो जो संकोच ती.

**मुरवा,** पु० कोंवळा जो भाजी, इ० कांचे झाडांचा समुदाय त्यास प्रसंगविशेषीं म्ह०

**मुरळी,** स्त्री० खंडोबा देव आहे त्यास वाहिली असती जी स्त्री ती.

**मुराण,** न० रोग विकृतीनें आळलें गेलें जें कोंवळें शेत तें.

**मुराद,** ३लिं० ﻩ/ हिं० पुष्कळ.

**मुरुमाचीपुळी,** स्त्री० तरुण मनुष्याच्या मुखादिकार कामोद्रेकामुळें जी पुळी येती ती.

**मुरूम,** पु० बुरूम.

**मुऱ्हाळी,** ३लिं० माघारी; २, विवाहामध्यें नवऱ्येमुलीचा जो बंधु तो.

**मुऱ्हाळीमान,** पु० मुऱ्हाळी हितार्थार्थक जो त्यास विवाहामध्यें जो मान देतात तो.

**मुलगा,** पु० पुत्र; २, बारा चौदा वर्षांचें वय होई तों पर्यंत सर्व पुरुषव्यक्तिमात्रास म्ह०

**मुलगी,** स्त्री० कन्या; २, दाहा बारा वर्षें पर्यंत जीचें वय त्या स्त्रीस म्ह०

**मुलगें,** न० सामान्यतः जें अपत्य तें.

**मुलतानी,** ३लिं० मुलतानदेशसंबंधी जो मनुष्य मृत्तिका कमाण इ० पदार्थ तो; २, स्त्री० एक रागिणी आहे.

**मुलना**, पु० हिं० यवनानें पढविणारा जो यवन असतो त्यास म्ह०

**मुलाइम**, ३ लिं० मृदु, नाजुक, करेरव, असा जो पदार्थ तो.

**मुलाखत**, स्त्री० ملاقات हिं० कोणाएकास कोणाएकाची जी भेट होती ती.

**मुलाजा**, पु० हिं० अपराधादिकांविषयीं जी क्षमा तो.

**मुलाणा**, पु० हिं० मुलना.

**मुलामा**. पु० ملمع हिं० सोनें रुपें यांचा जो इतर धातुमय पात्रास रंग, किं० धूर, इ० देतात तो.

**मुलामी**, ३ लिं० हिं० मुलाम्यानें युक्त केला जो पात्रादि पदार्थ तो.

**मुलूक**. **मुलूख**, पु० हिं० विवक्षित जो देश तो.

**मुलूकमेदान**, न० हिं० शहर, इ० कांतील घरें ढासळून झालें जें मेदान तें.

**मुलूखमेदान**, न० हिं० मुलूकमेदान.

**मुशकील**, स्त्री० हिं० कांहीं एक कार्य करण्याविषयीं किं० होण्याविषयीं जी संकटावस्था प्राप्त होती ती; २, ३ लिं० दुर्घट.

**मुशाफर**, ३ लिं० مسافر हिं० प्रवासी.

**मुशाफरी**, स्त्री० हिं० मुशाफराचें जें पर्यटनादि कर्म.

**मुशारखोर**, ३ लिं० मुशारा देऊन ठेविला जो चाकर तो.

**मुशारा**, पु० हिं० कांहीं एक कामासाठीं ठेविला जो चाकर त्यास जें तत्संबंधी देय देतात तो.

**मुशाहिरा**, पु० مشاهره हिं० मुशारा.

**मुष्टि**, पु० स्त्री० सं० हाताच्या अंगुली एकत्र आकुंचित केल्या असतां जो आकार होतो तो ती; २, तत्परिमित जें धान्यादिक तो ती; ३, तरवार इ० शस्त्रास हातीं धरायाकरितां जी केली असती ती ती.

**मुष्टिप्रयोग**, पु० कोणाएकास मारायाकरितां जो मंत्रप्रयोग करितात तो.

**मुष्टिमोदक**, पु० कोणाएकास प्रहार करायाकरितां केला जो मुष्टि त्यास म्ह०

**मुसकट**, **मुसकड**, न० मुखप्रदेशास निंदेनें म्ह०

**मुसकटणें**, मुसकटावर मारणें.

**मुसकल**, न० मुसकट.

**मुसकाड**, न० मुसकट.

**मुसकी**, स्त्री० कोणाएकाचे हात मागें आंवळून बांधण्याचा जो प्रकार ती: प्रयोग अनेक वचनांत.

**मुसकील**. स्त्री० हिं० मुशकील.

**मुसकूट**, न० मुसकट.

**मुसकें**, न० बेल. इ० कानीं धान्यादि न खावें म्ह० मुखास प्रतिबंधक जें दोरीचें जाळ्यासारिखें वळून बांधितात तें; २, मुसकट.

**मुसज्जर**, पु० مشجر हिं० कलाबतूंचे वस्त्राच्या एक भेद आहे.

**मुसंडी**, **मुसांडी**, स्त्री० दाटी इ० कांत प्रवेश करायासाठीं किं० त्यांतून पार पडायासाठीं तोंड पुढें करून किंचित् वांकून केला जो शरीराचा आकार ती; मार, दे, इ० धा० प्र०

**मुसमुसणें**, शरीरांत तारुण्यादिकांचा भर होणें किं० त्या तारुण्यादि भरानें मनुष्यादिकांनी युक्त होणें; २, दे० क्रोधानें संतप्त होणें.

**मुसल**, न० कंडनार्थ एक दीर्घ वर्तुलकाष्ठ करून त्यास लोखंडाची मांडक बसवून करितात तें·

**मुसलमान**, पु० स्त्री०ईण, हिं० यवनांत एक भेद आहे·

**मुसलमानी**, ३लिं० हिं० मुसलमानसंबंधी जी भाषा, वेश, इ० तो·

**मुसळ**, न० मुसल, मुसळ नेसणें म्ह० आपली अबरू सोडून निर्लज्यपणाचे आचार करूं लागणें: मुसळास अंकुर फुटणें, म्ह० रोग, वेड, इ० कारणानीं मनुष्यांतून केवळ उठलाजो त्याणें पुनः मनुष्यपणांत येणें; म्ह० सगळें मुसळ केरांत·

**मुसळकंद**, पु० ला० जो दांडगेखर त्यास निंदेनें म्ह०

**मुसळकांडा**, पु० निमसडाजो तांदुळ तो. याचा प्र० बहुवचनांत·

**मुसळधार**, स्त्री० मुसळासारिखी मोठीजी पर्जन्याची धार ती; २, ३लिं० तद्विशिष्टजो पर्जन्य. सर, इ० तो०

**मुसळसळ**, स्त्री० मुसळ करायासाठीं तयार करितात जें काष्ठ ती·

**मुसळसळई**, स्त्री० मुसळसळ·

**मुसळी**, स्त्री० एक औषधी आहे·

**मुसळेकोनफळ**, न० कोनफळांत एक जाति आहे·

**मुसांडा**, पु० पर्वतादिकांवरून पडतीजी मोठी पाण्याची धार किं० नळ, इ०कांतून उडतीजी पाण्याची धार तो; २, ला० काहींएक प्रतिबंधकांतून पार व्हायासाठीं जमून धांवत चाललाजो मनुष्यादि समुदाय तो·

**मुसूस**, ३लिं० काईम; २, स्त्री० हंगाम; ३, न० उंगराचें शेवटचें पीक तें·

**मुस्तकीम**, ३लिं० काईम·

**मुस्ता**, पु० नागरमोथा·

**मुहूर्त**, पु० घटिकाद्वयात्मकजो काल तो; २, लग्नादिकार्याविषयीं योजिलाजो उत्तम समय तो; ३, कांहीं एक कार्यासजो आरंभ तो; ४, मूर्तिशब्दाचा अपभ्रंश·

**मुहूर्तमणी**, पु० विवाहामध्यें नवऱ्ये मुलीचे गळ्यांत जें मंगळसूत्र बांधितात तो·

**मुहूर्तमेढ**, स्त्री० विवाहादिकांच्या मंडपप्रारंभीं, किं० गृहादिबांधायाचे प्रारंभीं जी स्तंभ मुहूर्ताचर मेढ पुरितात ती·

**मुळकंड, मुळखंड**, न० वृक्षादिकांच्या मूलप्रदेश भाग तें·

**मुळखंडी**, स्त्री० लहान मुळखंड·

**मुळमुळीत**, ३लिं० पळपळीतजें भाषण, इ० तो·

**मुळमुळणें**, गुळमुळणें

**मुळमूळ**, स्त्री० दुसऱ्यानें लोकर न समजायाजोगें हळूहळू जें चेंगट भाषण ती; २, पावसाची जी पिरपीर ती; अ० हळूहळू बहूतवेळ रडण्याचें अनु० व वि० ही त्याचेंच·

**मुळव्याध, मुळव्याधि**, स्त्री० अर्शसंपन्नजो रोग ती·

**मुळा**, पु० भाजीचे उपयोगी लाहान झाड आहे तो व त्याचा कंद तो·

**मुळी**, स्त्री० मुळखंडी·

**मुळेमाठ**, पु० माठाचे भाजींतील एक भेद आहे·

मुळ्हारी, पु० मुन्हाळी.

मुक्षूद, स्त्री० मुरवक्रुडीचा अपभ्रंश.

मूक, ३ लिं० ज्यास वाणी नाहीं तो मनुष्य

मूग, पु० एक द्विदल धान्य आहे तो; मूग खाणें, मूग गिळणें, मुगांचें करणें, इ० स्थलीं कोणीं आपल्यास शिव्या दिल्या किं० कांहीं अपराध केला इत्याद्यनेक कारणें झालीं असतांहीं न बोलतां उगीच राहणें.

मूठ, स्त्री० मुष्टि; २, कोणाएकास माराव्याकरितां जो मंत्रप्रयोग करितात ती; ३, घोडा, हत्ती, उंट इ० पशूंस चंदी देतात, त्यांतील कांहीं अंश जे त्याचे त्याचे खासदारादि असतात त्यांस देतात ती; ४, पु० बैल इ०कांचे पाठीवर जो खोगिरासारिखा घालीत असतात तो; ५, आंबणाची जी त्याचेच अग्रानीं बांधून जुडी करितात तो; कों० मूठ पेरणें, टाकणें, म्ह० भात मुठींत घेऊन पेरणें; मूठ चांगली लागणें, म्ह० पेरलेलें भात अविछिन्न पणी चांगलें रुजणें; मूठ दाबणें, चेपणें, इ० स्थलीं कांहींएक कार्यार्थ कोणाएकास गुप्त द्रव्यादि देऊन स्ववश करणें; म्ह० झांकली मूठ सवा लक्षाची.

मूठमरहाई, स्त्री० एकमताचे अनेक मिळून केलीजी दांडगाई ती.

मूठमाती, स्त्री० मेलेल्या मनुष्याची जी जमीनींत पुरणें, इ० रूप क्रिया ती.

मूढ, ३ लिं० अज्ञ जो मनुष्य तो.

मूत, न० गुह्येंद्रियद्वारा जें शरीरांतील उदका सारिखें पडतें तें.

मूत्र, न० मूत.

मूत्रकृच्छ्र, पु० न० मूततेसमयीं वेदना व्हायाजोगा एक रोग आहे.

मूद, स्त्री० ओगराळ्यांत भात इ० घालून चेपून ठोकून पाडिल्यानें प्रकारविशिष्ट होती ती; २, एक स्त्रियांचें शिरोभूषण आहे.

मूर, स्त्री० शेत इ०कांतील कोंडलेलें पाणीं बाहेर झरून जावयाजोगीं जीं बांध, इ०कांस गुप्त छिद्रें पडलीं असतात ती; २, दे० तूप कढून थिजलें म्ह० त्याचे खालीं मळ बसतो ती.

मूर्ख, ३ लिं० मूढ.

मूर्खवाद, पु० कांहींएक गोष्टीविषयीं मूर्खपणानें केलेंजें भाषणादि तो.

मूर्च्छना, स्त्री० पित्तवात इत्याद्यनेक विकृतीमुळें क्रद्धिबुद्धिही न व्हायाजोगी जी मनुष्यादिकांस अवस्था प्राप्त होती ती; २, गाण्यांतीलजे सप्तस्वर त्यामध्यें प्रथम स्वरापासून द्वितीय स्वर होईपर्यंत जे सूक्ष्म तीन स्वरांश होतात ते प्र०

मूर्च्छा, स्त्री० मूर्छना प्रथमार्थी.

मूर्च्छागत, ३ लिं० मूर्छा ज्यास प्राप्त झाली तो.

मूर्च्छित, ३ लिं० मूर्च्छागत.

मूर्त्त, ३ लिं० मूर्तिमत् जो पदार्थ तो.

मूर्ति, स्त्री० देवादिकांची जी प्रतिमा करितात ती; २, ला० प्रसंगविशेषीं मनुष्यावरही व्यवहार होतो.

मूर्तिमंत, ३ लिं० मनुष्याद्याकार विशिष्ट जो पदार्थ तो; उ० त्यास देवी आज मूर्तिमंत येऊन भेटली उ० अरे तुला मूर्तिमंत शंभर रुपये दिले असतां नाकबूल जातोस.

मूर्धन्य, ३ लिं० ऋ, टवर्ग, रेफ, आणि षकार या

वर्णांचें मूर्धास्थान होय ह्मणोन यांस मूर्धन्य असें ह्म०

**मूर्धा**, पु० सं० मस्तक·

**मूर्धाभिषिक्त**, ३ लिं० सं० राज्याच्याठायीं अभिषिक्त जो राजा तो; २, ला० जा व्यवहारांत जो मुख्य तो·

**मूल**, न० सत्तावीस नक्षत्रांतील एकुणिसावें जें नक्षत्र तें; २, ३ लिं० मुलगा, मुलगी, मुलगें, तें; ३, वृक्षादिकांचें जे पाळ तें; ४, कांहींएक व्यवहाराचा किं० पदार्थाचा आदिभूत किं० कारणीभूत जो अवयवादिक तें, जापासून त्याच्या व्यवहाराची व पदार्थाची वृद्धि होती तें·

**मूलक**, पु० सं० मुळा; २, कांहींएक निमित्त मागें लावून एतन्मूलक, तन्मूलक, पापमूलक, दुःख, इ० समास होतात·

**मूस**, स्त्री० सुवर्ण, रुपें, इ० कांचा रस करायाचें एक पात्र आहे तीं; २, ओतींव मूर्तिपात्र, इ० करायासाठीं जें विवक्षित आकारविशिष्ट मृत्तिका, मेण, इ० कांचें करितात ती·

**मूसमारग**, पु० मागमूस·

**मूळ**, न० मूल, द्वितीयार्थावांचून सर्वार्थीं; २, सासरें, माहेर, आजोळ, इ० कांकडील कोणएकास येतें जें बलावणें तें; तो पोर त्याचे मुळावर आला आहे बसला आहे, इ० स्थलीं तो त्याचा संपत्ति, इ० कांच्या नाशास कारण आहे·

**मूळगाँव**, पु० न० विवक्षित मूळपुरुष ह्मनि संपादनपूर्वक जा गांवीं राहात आले तो·

**मूळपत्र**, न० अस्सलपत्र·

**मूळपीठिका**, स्त्री० कांहींएक व्यवहाराचें मूळभूत जें वर्तमान ती; २, कांहींएक व्यवहाराची जी परिभाषा इ० ती; उ० अनुष्ठानाची मूळपीठिका ठाऊक असल्यावांचून करायास येत नाहीं·

**मूळपुरुष**, पु० वंश विस्तारास कारणभूत जो विवक्षित प्रथम पुरुष तो·

**मूळबांध**, पु० शेत बांधण इ० कांस पाण्याचा नेट संभाळायासाठीं मोठा मजबूद जो बांध बांधिता तो·

**मूळचंद**, पु० मूळबांध·

**मूळवास**, पु० वाडीचा जो केवळ पिछाडीकडला प्रदेश तो·

**मृग**, पु० सं० पांचवें जें नक्षत्र तो; २, हरिण; ३, शास्त्रीय व्यवहारांत साधारण पशूंसही ह्म०; ह्म० मृगाचे आधीं पेरावें आणि बोंबेचा आधीं ळावें·

**मृगजल**, न० सूर्यकिरणाच्याठायीं जलाची भ्रांति होती ती·

**मृगतृष्णा**, स्त्री० सं० मृगजल·

**मृगया**, स्त्री० सं० पारध मुख्यार्थीं·

**मृगशितळाई**, स्त्री० मृगाचा पाऊस पडल्यानंतर जो थंडावा होतो ती·

**मृगशीर्ष**, पु० सं० मृग प्रथमार्थीं·

**मृगेंद्र**, पु० सं० सिंह·

**मृणाल**, न० सं० कमलाच्या जो देंट तें·

**मृत**, ३ लिं० सं० मरण पावला जो तो·

**मृतपत्र**, न० शरीर अनित्य हें जाणून आपल्या संप आदिकांची व्यवस्था असुकानें असुकरीतीनें क

वी असें जें पत्र करून ठेवीत असतात तें.

मृतप्राय, ३लिं० मेल्यासारिखा तो.

मृतलेख, पु० मेल्या मनुष्याचे हातच्या प्रमाणार्थ लेख काढितात तो.

मृतवंध्या, स्त्री० मरतवांझ.

मृति, स्त्री० सं० मरण्याचा जो व्यापार ती.

मृत्तिका, स्त्री० सं० माती.

मृत्यु, पु० सं० मरण; २, यम.

मृत्युगोदान, न० ला० रोगादिकानें अत्यंत अशक्त झाला जो मनुष्य, पशु, इ० तें; २, मेलतोंड्या.

मृदंग, पु० पखवाज.

मृदंगी, ३लिं० पखवाजजी.

मृदंग्या, ३लिं० मृदंगी.

मृदु, ३लिं० सं० मऊ.

मृन्मय, ३लिं० मृत्तिकेचें जें पात्रादि तो.

मृषा, ३लिं० सं० मिथ्या.

मेकाड, न० शिरीस इ० भाजीपाल्यावर जो रोगरूप क्षुद्रजंतु उत्पन्न होत असतो तें.

मेकाडा, पु० मेकाड.

मेकी, स्त्री० एक वेल आहे.

मेकूड, न० पु० नाकांतील मळाच्या जा खरपुड्या निघतात तें तो.

मेकें, न० मेकीचें जें फल तें.

मेख, स्त्री० अश्व, राहुटी, डेरा, इ०कांच्या बंधनार्थ जो हात दीड हात काष्ठाचा तुकडा गाथडून तासून करितात ती; २, ला० बलाढ्य मनुष्य, पशु, इ० त्यास म्ह०; खिळा, चुका, इ०कांसही समयविशेषीं मेखा म्ह०; मेखा उपटणें, स्थांच्यावर देणें, इ० स्थलीं कोणाएकास स्थानच्युत करणें; मेख मारणें म्ह० चाललेला किं० चालू होणारा जो व्यापार तो अटकून पडे असें करणें; मेखेवर बसविणें म्ह० कोणाएकाबरोबर नम्रतेनें चालायाचें असतां तें सोडून पाकडा गाष्ट सागणें; म्ह० सोन्याची मेख आणि तमाशा देख.

मेखलणें, अश्वादिक मेखेस गुंतविणें; २, ला० चालते किं० चालू होणारें कार्य कांहींएक प्रतिबंधें करून अटकून पडे असें करणें.

मेखला, स्त्री० सं० कटिसूत्र.

मेखसू, पु० राहुटी, इ०कांचा मेखा ठोकायाचा मोगर असतो तो.

मेख्या, ३लिं० शरीरानें किं० बुद्धिनें ०कानें जो खबरदार तो.

मेंग, स्त्री० सर्पादिकांची जी कात ती.

मेंगा, मेंग्या, ३लिं० अपराक्रमी जो मनुष्यादि तो.

मेंगावणें, सर्पादिकांनी मेंगेस येणें; कांहींएक कार्याचे आरंभीं मोठें शौर्य दाखवून मग मागें सरणें.

मेंग्यामारवाडी, पु० बाहेर गरीबीची मुद्रा दाखवून पोटांत जाचे लबाडी बहुत असती तो.

मेघ, पु० उदकवृष्टि करणारा जलद तो.

मेघमंडल, न० मेघांचा समुदाय तें किं० तो समुदाय जा ठिकाणीं राहतो तें स्थान तें.

मेचट, ३लिं० मिचमिचित.

मेचणें, कांहींएक व्यापारीं प्रवृत्त जो मनुष्य त्याणें भयादि कारणानें कुंठित गति होउन माघार घेणें किं० स्तब्ध राहाणें.

मेज, न० बजनी केली इ० मेजायास साधनभूत

जीं अधोली. मणका. गज. इ० प्रमाणें असतात तीं प्र०;२, धान्यादि मेजण्याचा व्यापार तें व त्या व्यापारानें झालेंजें इयत्तारूप फल तें ·

**मेजणें**, अंकसंख्येनें, किं० अधोली, इ० प्रमाणादि संख्येनें धान्य मनुष्य इ० पदार्थ संख्यात करणें:२ ला० गणणें, यांच्या लाक्षणिकार्थी·

**मेजबान, मेजवान**, ३लिं० मेजवानी करायास योग्य मनुष्य तो·

**मेजबानी, मेजमानी, मेजवानी**, स्त्री० हिं० सोयरे धायरे किं० संपत्तिमंतजे लोक त्यांस आदरपूर्वक जोमिष्टान्नभोजन घालण्याचा व्यापार तें·

**मेट**, न० किल्याचे बाहेर जागोजाग नाक्यानाक्यास जी चौकी असती तें; मेटें बसणें, म्ह० भय, दुर्वार्ता वार्धक्य, इ० कारणामुळें कोणाएकाचें अवसान जाणें; अ० अतिशयित काळोख अंधार याचें वि०

**मेटकरी**, ३लिं० किल्याचे मेटावरील जे चौकीदार ते प्र०

**मेटखुंटी**, स्त्री० दोपरखुंटी·

**मेंडकी**, स्त्री० दे० पायांतील किं० हातांतील जी वेडकी ती·

**मेढ**, स्त्री० प्रायः नांगें असतें जा खांबास ती; म्ह० हातीं लागली चेंड आणि धर मांडवाची मेढ·

**मेंढका**, ३लिं० मेंढरें राखितो तो·

**मेढकी**, स्त्री० लाहानजी मेढ ती·

**मेंढकें**, न० मेटकी·

**मेंढक्या**, ३लिं० मेंढका·

**मेंढरूं**, न० एक पशु आहे; म्ह० मेलें मेंढरूं आगीस भीत नाहीं

**मेंढवाडा**, पु० दे० मेंढराचा जो कळप तो व तो कळप बांधायाचें जें स्थान तो·

**मेंढा**, पु० एडका;२, ३लिं० सरळ रूतांत सांपडाया जोगा नव्हे असाजो काष्ठादिकांचा दबलेला अंश तो व तद्विशिष्ट काष्ठादि तो; ३, बैल इ० कांचीं मागल्ये बाजूस दबलेलीं शिंगें तीं व तद्विशिष्ट बैल, इ० तो·

**मेढा**, पु० कुपणादिकांस जो एरंड, चिकाडा, इ० कांचा डांभा पुरतात तो;२, मनुष्यादिकांच्या प्रतिबंधार्थ जवळजवळ लांकडें उभीं पुरुन कुडासारिखा भारी बळकट करितात तो; ३, ला० कांहींएक गोष्टीविषयीं कोणाएकास जो आश्रयभूत तो त्यास

**मेढावणें**, कुपणादिक मेढयानीं युक्त करणें·

**मेंढी**, स्त्री० मेंढरातील जी स्त्रीजाति ती·

**मेंढीगरवार**, स्त्री० प्रसूतझाल्यानंतर पुनः विटाळशी न होतां जी गर्भिणी झाली ती·

**मेढेकोट**, पु० मेढा द्वितीयार्थी·

**मेढेजोशी**, पु० दाकोला·

**मेढेदाई**, ३लिं० आपल्ये वाडी, शेत, इ० कांचे अंतरवही इ० कांचा जो धनी तो·

**मेढेदाईक**, ३लिं० मेढेदाई·

**मेण**, न० मधीचापोळ्यांत जो चिकट अंश असतो तें २, तरवार, इ० शस्त्र आच्छादनार्थ पोटीं काष्ठ आणि बाहेरुनचर्मादि लावून जें करितात तें·

**मेणकट**, ३लिं० तेल, तूप, इ० कांचे चिकटपणानें. किं० मळानें युक्त जो समयी, इ० पदार्थ तो;२, न० तो मळ किं० चिकटपणा तें·

**मेणकरणें**, तेलादिकांच्या मेणकटानें समयीं इ॰कानीं युक्त होणें.

**मेणकापड**, न॰ मेणानें युक्त करितात जें कापड तें.

**मेणगट**, न॰ केवळ मऊ झालाजो भात तें.

**मेणचोंट्या**, ३ लिं॰ मेंग्या मारवाडी.

**मेणबत्ती**, स्त्री॰ जा वातीच्या सभोंवार मेण बसवून जी दीपलावायाकरितां करितात ती.

**मेणबाजार**, पु॰ प्रा॰ शहरचे रस्त्यांत पालें देऊन जो कापडाच्या बाजार असतो तो.

**मेणवणें**, मेण, तेल, इ॰ कांची बेरी इ॰ कानें सूप, टोपली, इ॰ पदार्थ सर्वावयवी लिप्त करणें.

**मेणवात**, स्त्री॰ मेणबत्ती.

**मेणा**, पु॰ डोलीसारिखें एक वाहन आहे तो.

**मेण्या**, ३ लिं॰ मेणचोंट्या.

**मेण्यामारवाडी**, ३ लिं॰ मेण्या.

**मेतकूट**, न॰ तांदूळ. दोन चार प्रकारच्या दाळी. मोहोर्‍या, मेथ्या, इ॰ अनेक पदार्थ एकत्र करून दळून जें तोंडीलावायाकरितां करितात तें; मेतकूट मिळणें म्ह॰ कोणाएकाचें कोणाएकाशीं सख्य होणें.

**मेथकूट**, न॰ मेतकूट.

**मेथा**, पु॰ मेथीमध्यें एक जाति आहे.

**मेथी**, स्त्री॰ एक उपधान्य आहे व त्याचें जें झाड तें.

**मेथोडा**, पु॰ बाळंत इ॰ कांचे साठीं जे मेथ्यांचे पिठाचे लाडू करितात ते.

**मेद**, पु॰ शरीर संबंधी जा रक्तादिधातू त्यांतील एक धातू आहे.

**मेदगी**, स्त्री॰ मेंद्या शेळ्या यांचा लेंड्या व माती व आणिक किंतिएक पदार्थ घालून करून भिंत, इ॰ कांस साफी याची म्ह॰ करून ठेवितात ती.

**मेदिनी**, स्त्री॰ सं॰ भूमि.

**मेंदी**, स्त्री॰ एक झाड आहे.

**मेंदा**, पु॰ मेंढीतलाजो नर तो.

**मेंदू**, पु॰ अंग ठेचलें असतां त्यांतून मांससारिखा जो अंश निघतो तो.

**मेधा**, स्त्री॰ धारणाशक्ति जा बुद्धिमध्यें आहे ती बुद्धि; २, अभिरुचि; उ॰ त्या मुलावर त्याची मेधा आहे तितकी याजवर नाहीं.

**मेध्य**, ३ लिं॰ सं॰ पवित्र.

**मेना**, पु॰ मेणा.

**मेमण**, पु॰ मनुष्यांत एक जाति आहे.

**मेमणचोट्या**, ३ लिं॰ दे॰ मेणचोंट्या.

**मेमुलगाडा**, पु॰ शरीरानें जो केवल अशक्त तो.

**मेर**, स्त्री॰ शेत, वाडी, डोंगर, इ॰ कांची जी कड तीस धनी नाहीं मेर आणि शेत भरलें बेरें.

**मेरु**, पु॰ पुराणप्रसिद्ध एक पर्वत आहे; २, गुडगुडीचा छिद्रांत मध्यभागीं जें सछिद्र काष्ठ बसवितात तो; ३, माळेचा दोन्ही शेवट जा मण्यांत ओवितात तो मणी.

**मेलतोंड्या**, ३ लिं॰ मुखदुर्बळ.

**मेवा**, पु॰ हिं॰ द्राक्ष, अंजीर, पेरु, अनार, खजूर, खारीक, इ॰ जे मिष्ट पदार्थ ते; म्ह॰ बाजारचा मेवा बापलेकांनी खावा.

**मेवाडी**, ३ लिं॰ मेवाड संबंधी जो मनुष्य, इ॰ तो.

**मेवाती**, पु॰ हिं॰ एक हिंदूत जाती आहे.

**मेशपात्र**, **मेषपात्र**, न॰ अपराक्रमी जो त्यास म्ह॰

मेशा, ३लिं० मेशपात्र.

मेष, पु० सं० बारा राशींतील जो प्रथम राशी तो;२,मेंढा प्रथमार्थीं.

मेस्तक, न० हिं० मुलें, इ०कांस हिशेब शिकायासाठीं तऱ्हेतऱ्हेचे हिशेब ज्या वहींत लिहिले असतात तें.

मेस्तरी, पु० सुतार, गवंडी, इ० जे शिल्पशास्त्र प्रवीण त्यास म्ह०

मेह, पु० एक रोग आहे.

मेहनत, स्त्री० कांहींएक कार्यकरण्याविषयीं श्रम व्हावयाजोगा जो व्यापार ती.

मेहनतमशागत, स्त्री० मेहनत इ०

मेहनती, ३लिं० मेहनत करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

मेहरब, मेहराब, स्त्री० हिं० कोनाडा, भिंत, मरवर इ०कांस शोभेकरितां जी कमान करितात ती.

मेहरबान, मेहरबान,३लिं० हिं० सुप्रसन्न.

मेहरबानी, मेहरबानी, स्त्री० हिं० कृपा.

मेहरबानगी, स्त्री० मेहरबानी.

मेहरी, स्त्री० मेहेरी.

मेहुणा, पु० बायकोचा जो भाऊ, किं० बहिणीचा जो दादला तो.

मेहुणी, स्त्री० बायकोची जी बहीण ती.

मेहूण, न० दादला आणि बायको उभयतां मिळून तें त्या उभयतांस भोजनादिकांस बलावयाचें असतांच प्रा० प्र०

मेहेता, पु० गुजराती लिहिणाराजो कारकुन तो.

मेहेरणें, थंडी, इ० कारणानीं शरीर किं० तदवयव जड होऊन रयरवीनें युक्त होणें, किं० कठिन स्पर्श व्हावयाजोगें बधिर होणें.

मेहेरी, स्त्री० मेहेरायाजोगी जी शरीर किं० तदवयव यांस अवस्था प्राप्त होती ती.

मेळ, पु० वाजंत्र्याचा जो ताफा तो;२, मैथुनासक्त जें सर्पमिथुन तो;३, कों० कळंक, वेळू, इ०कांस जें वीज येतें तो;४, विशेष गुण उत्पन्न व्हायाजोगा जो परस्पर अनेक पदार्थांचा मिलाफ तो;५, हिशेबादिकांचा जो ताळा तो.

मेळघण, न० मिळवण.

मेळवणी, स्त्री० मिळवणी.

मेळवणें, मिळवणें.

मेळा, पु० मनुष्यादिकांचा जो समुदाय तो;२, दे० न्याय: उ० आमचा मेळा निवडा.

मैत्र, ३लिं० मित्र प्रथमार्थी;२, न० अश्विन्यादि नक्षत्रांतील अनुराधा नक्षत्र तें.

मैत्राणी, पु० एक ब्राह्मणांत जाति आहे.

मैत्रिकी, स्त्री० मैत्रपणा.

मैत्री, स्त्री० मैत्रिकी.

मैथिल, पु० एक ब्राह्मणांत जाति आहे.

मैथुन, न० स्त्री पुरुषांचा संगार्थ जो मिथुनीभाव तें.

मैंद, ३लिं० आळशी किं० बुद्धिमंद जो तो;२, पु० एक मनुष्यांत जाति आहे;३, नांगरलेल्या जमीनींत धान्य पेरून मग ती जमीन सारखी व्हावी आणि दाणा लपला जावा म्ह० जो झोंपा फिरवितात तो.

मैदा, पु० ओजवलेली जी कणीक तो.

मैदान, न० डोंगर, झाडी, इ०कांची अडचण ज्या ठिकाणीं नाहीं अशी जी सपाट सारखी जागा तें.

मेदालकडी, स्त्री० एक काष्ठौषधी आहे·

मेना, स्त्री० साळोंखीमध्यें एक भेद आहे·

मेलखोर, ३लिं० कितीही मळ बसला असतां केवळ मलिन दिसत नाहीं असा जो रंग तो किं० तद्विशिष्ट जें वस्त्रादि तो·

मेलागर, पु० एक चंदनांत भेद आहे·

मेलागीर, पु० मेलागर·

मोकलणें, मुख्य लाक्षणिक बंधनानें बांधलेला जो पदार्थ त्याणें स्वेच्छेनें वागावें, ह्म० त्यात्या बंधनापासून त्यास मुक्त करणें; हेल मोकलणें, धाय मोकलणें, ह्म० कंठ संकोच न करितां मोठ्यानें रडणें·

मोकळ, स्त्री० अनेक अवयव एकत्र करून बांधला जो लाड, गोयला, इ० पदार्थ त्याचें जें अवयव वैशाकल्य ती; २, अ० प्रतिबद्ध न करितां अथवा न होतां फीर, सोड, इ० धा० वि०·

मोकळा, ३लिं० विवक्षित जो मुख्य किं० लाक्षणिक प्रतिबंध, इ० त्यानीं गुंतला नाहीं तो; २, परस्पर संयुक्त नव्हत जीं भातांचीं शितें, अक्षर, इ० तो·

मोकळाढाकळा, ३लिं० विवक्षितप्रतिबंध शून्य तो·

मोकळीक, स्त्री० कांहींएक प्रतिबंधापासून जी मुक्तता ती·

मोकाट, अ० मोकळ द्वितीयार्थी·

मोकार, अ० मोकाट·

मोकाशी, ३लिं० हिं० ग्राम, देश, इ० ज्यास इनाम आहेत, किं० चाकरीबद्दल दिल्हीं आहेत, तो मनुष्य. २, गांवांची खोती ज्याणें केली आहे तो त्या गांवांचा·

मोकासा, पु० हिं० इनाम जो ग्राम, भूमि, इ० तो; २ कोणाएकास सर्कारच्याकरीबद्दल देतात जो ग्रामादि तो; ३, एक दोन गांवांचा खोती पत्करितात तीसही ह्म०

मोख, पु० धान्यादिकांचा आंत जो बीजभूत अंश असतो तो; २, कोंवळे नारळादिकांचे शेंड्यास जो अंश खावयाजोगा असतो तो·

मोखर, ३लिं० दे० फुटायास कठीण नव्हे जो पदार्थ तो·

मोगर, पु० मेख, इ० जमीनींत दृढ बसावी ह्म० त्यांजवर मारायासाठीं काष्ठादिकांचा करितात तो; २, सोन्याचे रुप्याचे शेवटास हिरवे कांचेचे वाटोळे बारीक लावितात तो·

मोगरा, पु० एक सुवासिक फुलझाड आहे व त्याचें जें फूल तो·

मोगरी, स्त्री० मोगऱ्याचें झाड; २, लहान जो मोगर ती·

मोगरें, न० मोगऱ्याचें जें फूल ते·

मोगरेल, न० हिं० मोगऱ्याचे पुष्पांचें जें तेल तें

मोगल, ३लिं० हिं० यवनांत एक भेद आहे·

मोगलाई, स्त्री० हिं० मोगलाचीजी कारकीर्द ती; २, ३लिं० मोगलसंबंधी भाषा, वेष, इ० तो·

मोगलाण, न० हिं० मोगलाचा अंमल जा देशांत आहे तें; २, मोगलाचा जो दंगा तें; उठ, मार, इ० धा० योगीं प्र०

मोगली, ३लिं० हिं० मोगलाई द्वितीयार्थी·

मोगलीएरंड, पु० एक एरंडांत भेद आहे·

मोगलीबदाणा, पु० एक औषधोपयोगी पदार्थ आहे·

**मोगलीमिरची**, स्त्री० वांग्यासारिखी आडजी मिरची तीस म्ह०

**मोघस**, ३लिं० ज्याची फोड झाली नाहीं किं० केली नाहीं असेंजें भाषण.व्यवहार, लेख, जमाखर्च. इ० तो ·

**मोघा**, पु० राहाटाचे माळेस बांधायाचे उपयोगी एक आकारविशेषाचें मृत्तिका,इ०कांचें पात्र करितात तो ·

**मोच**, स्त्री० एक भाजी आहे ·

**मोचणें**, प्रे० कांहींएक प्रतिबंधापासून मुक्त करणें ·

**मोचन**, न० कोणएक पदार्थास कांहींएक प्रतिबंधापासून मुक्त करण्याचा जो व्यापार तें ·

**मोचरस**, पु० एक औषधी पदार्थ आहे ·

**मोचा**, पु० पायपोस ·

**मोची**, पु० चर्मकार विशेष तो ·

**मोज**, न० मेज ·

**मोजणें**, मेजणें ·

**मोजदात**, स्त्री० एक,दोन,तीन, इ० रीतीनें मोजण्याचा जो व्यापार तो किं० त्या व्यापारानें झालें जें सिद्ध फळ ती ·

**मोजदाद**, स्त्री० मोजदात ·

**मोजदास्त**, स्त्री० मोजदाद ·

**मोजप**, न० वा० संख्या ·

**मोजबा**, पु० मोसबा ·

**मोजा**, पु० पायांचे पाऊल व हाताचा पंजा झांकायासाठीं तदाकार वस्त्रादिकांचा जो शिवून करितात तो ·

**मोट**, स्त्री० विहीर,नदी, इ०कांतील पाणी काढायासाठीं जें चर्माचें मोठें पात्र करितातजीस बैल,इ० लावून ओढीत असतात ती; २, धान्य.वस्त्र, सूत गोंवऱ्या, इ०कांचें बांधलेंजें मोठें ओझें ती; ३,पदर, इ०कांची प्रकृतिसमयीं जी पाणमोटली बाहेर येत असती ती ·

**मोटकुळें**, न० इुमोटलें ·

**मोटली, मोटळी**, स्त्री० लाहानजी गांठोडी ती ·

**मोटलें**, न० लाहानजी मोट तें ·

**मोटस्फ़ती**, ३लिं० जाडस्फतीजें वस्त्र तो ·

**मोटा,मोठा**, ३लिं० विवक्षित मनुष्यादिकापेक्षां अवयवस्थौल्यानें किं० अधिकवयानेंजो युक्त तो; २, ला० विवक्षितापेक्षां द्रव्य, विद्या, इ०कानीं जो अधिक तो ·

**मोटाधाटा**, ३लिं० लहान मोठाजो पदार्थ तो ·

**मोट्या**, ३लिं० मोटा वाहण्याचें कसब करून उपजीवन पावतो तो ·

**मोड**, पु० पराजय; २, बीजादिकापासून मूलभूत अंशजो उत्पन्न होतो तो; ३, स्त्री० कागद,इ० मोडल्यानें जें रेषारूप चिन्ह होतें ती; ४, फुटकीं मोडकीं,जीं कावलीं भांडीं, अलंकार,इ० तीं; ५, पिशाचलीपी; ६, हिशेब, गुणाक,मेळवणी, पोहणें, झापवळणें, इ०कांची जी रीति ती; ७, पर्जन्योदकाचा जो मोठा पूर तो ·

**मोडकळीस**, अ० कांहींएक गृहादि पदार्थ किं० देणें,घेणें, इ० व्यापार, अथवा तादृश व्यापारकर्ता मनुष्य, इ०कानीं क्षीणदेशेस ये०धा०यो०प्र०

**मोडका**, ३लिं० मोडल्यामुळें निरुपयोगी झाला किं०

किं० अर्धझालाजो पदार्थ तो·

मोडणी, स्त्री० मोड बष्ठार्थी·

मोडणें, उ० कांहीं एक पदार्थ फुटणें, तुटणें, चिरणें, यावांचून इतर व्यापारानें भग्न करणें;२,कांहींएक गोष्ट करूनये,किं० कांहींएक गोष्ट करावी, इ० कांविषयीं जी लोकशास्त्र राजा, इ०कानीं केली जी मर्यादा तिचा उल्लंघ करणें;३, युद्धादिकामध्यें पराजित करणें;४, कलह, दंगा, बंड, अहंकार, गर्व, निद्रा, इ० नाहीं असें करणें;५, रुपया, रवुर्दा, इ० हलकें नाणें घ्यायासाठीं मोहोर, पुतळी, इ० नाणें देणें किं० रवर्च करणें;६, तालुका, माहाल, किल्ला, इ० जे प्रसिद्ध त्याचा नावारवालीं तत्तदासनजे इतर ग्रामादिक त्यांणीं ओढले जाणें;उ० स्वर्णदुर्गारवालीं मुरुड मोडतें;७, देशसंबंधानें किं० स्वतः उत्तमतेंकरून प्रसिद्धजो पदार्थ त्याचें नावारवालीं तत्तजातीय इतरानीं ओढलें जाणें;उ० शिवर्ईनीं स्पारीचे नावारवालीं मुरुडचीही मोडती;८, मोट,पाट,इ०कांचें पाणी विवक्षित वृक्षादिकांस शिंपायासाठीं तत्तत्स्थलीं नेणें;९, शहर. संपत्तिमान्, इ०कानीं त्यांचात्यांची संपत्ति क्षीण झाल्यामुळें त्यांणीं क्षीणत्व पावणें;१०, कोणेएकामनुष्यानें गलत्कुष्ट रोग विशिष्ट होणें;११, कांहीं एक होणारें जें कार्य त्यास कांहींएक प्रतिबंधकरून तें तें कार्य होऊन देणें;उ० त्याचें लग्न त्याणें मोडलें;१२, कांहीं एक कार्याकडेस घटी,मास,दिन,इ०रूप काळ लागला जाणें; गांव,रान,इ० मोडणें, स्म० कांहीं एक कार्यार्थ फिरणें; पाठ मोडणें, बोटें मोडणें, इ० स्थलीं तो तो अवयव कडकडशब्द व्हावयाजोगा ओढणें; नाक, अंग, डोळे, अंख, इ० मोडणें धातूच्यायोगीं संप्रदाय तत्तच्छब्दावर प्रायःगेले आहेत·

मोडती, स्त्री० कांहींएक कार्य होऊन देण्याविषयीं केलाजो भाषणादिव्यापार ती; उ० मी जाणार होतों परंतु त्याणीं मोडती घातली,स्म० राहिलों·

मोडतोड, स्त्री० मोडले तुटलेल्ये दागिन्यांचा जो समुदाय ती;२, कांहींएक देणें,घेणें, इ० व्यवहाराची जी तोड मोड ती·

मोडवशी, स्त्री० मोडशी·

मोडवांक, स्त्री० आकारविशेषाची एक वांक स्म० भूषण आहे·

मोडशी, स्त्री० मनुष्यादिकांस हगओक सरायाजोगा प्रायः अजीर्णामुळें एक रोग होत असतो ती; मोडशी जिरणें जिरविणें स्म० कोणाएकाची रवोड मोडणें·

मोडा, पु० कांहींएक कार्य होउन देण्याविषयीं केलाजो प्रतिबंधक व्यापार तो;२, त्या व्यापारानें झाली जी तत्तकार्याची कुंठितावस्था तो;उ० पर्जन्यानें चारदिवस आंबजेचा मोडा केला·

मोडावणें, श्रम, दुरवणें, इ०कामुळें ग्लान होणें;२, धान्यादिकानीं मोडयुक्त होणें·

मोढ, पु० मोड द्वितीयार्थी·

मोढा, पु०दे० रवोलजोओढा तो·

मोढावणें, मोडावणें द्वितीयार्थानें युक्त होणें·

मोतद्दार, स्त्री०हिं० रवासदार·

मोतरिंगणी, स्त्री० एकरिंगणांत भेद आहे·

**मोताद**, स्त्री० معتاد हिं० इयत्ता·

**मोतादि**, ३लिं० معتادی हिं० मोताद बांधून केलाजो कांहीं एक व्यापार तो·

**मोताळा**, पु० गुजराथी ब्राह्मणांत एक भेद आहे·

**मोतिया**, पु० मोगऱ्यांत एक भेद आहे·

**मोतीं**, न० समुद्रामध्यें शिंपांच्यापोटीं उत्पन्न होतें जें रत्न तें;२, तदाकार कृत्रिम केलेजें पारदादिकांचें तें;३, नथीच्यास्थानीं सुवर्ण मोतीं एकत्र जडून नाकांत घालायासाठीं जो अलंकार करीत असतात तें·

**मोतीचूर**, पु० बुंदीच्या लाडवांत एक भेद आहे;२, धोत्रजोडा, लुगडें, इ० वस्त्रांच्या तऱ्हेवाईक एक कांठ असतो तो·

**मोतीबिंदु**, **मोतीबिंब**, पु० एक नेत्ररोग आहे·

**मोत्याबिंदु**, **मोत्याबिंब**, पु० मोतीबिंदु·

**मोथ**, स्त्री० नागरमोथा·

**मोथा**, पु० मोथ·

**मोद**, पु० आनंद·

**मोदक**, पु० पक्वान्न आहे·

**मोदणें**, ग्रं० आनंदणें

**मोदी**, ३लिं० हिं० सर्कारी खाणें, पिणें, इ० कांचा सर्व सरंजाम ज्याचा स्वाधीन असतो तो;२, ला० सर्व जिन्नस संग्रहीं बाळगतो असा जो वाणी त्यासही म्ह०

**मोदीखाना**, पु० हिं० सर्कारी भोजनादि सर्व सामग्रीचें जें ठिकाण तें किं० तो सर्व सरंजाम·

**मोधळा**, ३लिं० शरीरानें अति पुष्ट असून जो आळशी त्यास निंदेनें म्ह०;२, पु० धनगरादिकांची कवळें न पडावीं म्ह० आश्रयभूत मोठेंशीं च्या ठिकाणीं लां ब झिऱ्यांच्या जुड्या बांधून बांधीत असतात तो; धान्य झोडून घेऊन निराळ्या पेंड्या न बांधितां तृणाचें बांधिलें जें ओझें तो·

**मोधळीपेंढी**, स्त्री० संप्रदायापेक्षां थोरजी तृणाची पेंढी ती·

**मोंधागोळा**, ३लिं० ज्याचे हात पायांच्या खोडा मोडून जो चलनवलनादि व्यापारासमर्थ तो·

**मोनवा**, पु० मुनवा·

**मोना**, पु० मोनवा;२, ३लिं० मुकाजो मनुष्य तो

**मोप**, ३लिं० उमोप, प्र० प्रा० शूद्रभाषेंत;२, न० [illegible] जी वीर ती·

**मोबदला**, पु० हिं० एक वस्तु देऊन त्याचेबदल [illegible] रें वस्तु घ्यावें असे रीतीचा जो व्यापार तो·

**मोबादला**, ३लिं० हिं० मोबदला·

**मोमिनी**, ३लिं० मोमिनानें निर्मित जें वस्त्र तो·

**मोमीन**, पु० हिं० मुसलमानांत एक जाति आहे

**मोर**, पु० न० मयूर; म्ह० मोर नाचतो म्ह० लांडोरा नाचूं नये·

**मोरचंग**, पु० तोंडानें वाजवायाचें चंग म्ह० एक [illegible] आहे·

**मोरचा**, पु० लढाई करायाकरितां लकडकोट, इ० आश्रयभूकरितात तो;२, तरवार इ० कांस जो गंज लागतो तो·

**मोरचूत**, न० एक औषधी खार आहे·

**मोरचेबंदी**, स्त्री० مورچه हिं० मोरच्या बांधण्याचा जो व्यापार ती;२, त्याणे सिद्ध झालाजो मोर्च्या ती·

मोरचेल, न० हिं० देव, राजा, इ० कांचे डोकीवर वारायासाठीं जो मयूरपिसांचा कुंचा करितात तें·

मोरणी, स्त्री० स्त्रियांचे नाकांतील मोतीं ह्मणूनजो अलंकार त्यांत भेद आहे·

मोरली, स्त्री० शाकभाजी चिरायाचें एक शस्त्र आहे·

मोरवा, पु० मोघा; २, गृहादिकांचे माळ्यावर उभे स्तंभ बसवितात जांवर फरेस असतो ते प्र०

मोरविडा, पु० जावर मोराचा आकार केला असतो असा जो विडा करितात तो·

मोरा, ३ लिं० जा घुराचा तोंडावर चित्र विचित्र वर्ण असतो तो·

मोरांगीघार, स्त्री० एक घारींत भेद आहे जिचे आंगावर चित्र विचित्र ठिपके असतात ती·

मोरी, स्त्री० घर, इ० कांतील पाणी बाहेर जावें, इ० कांसाठीं जी नाहाणी करितात ती·

मोर्तब, न० हिं० सर्कारसंबंधी कागद, इ० कांवर चिन्ह करायाचा एक ठसा आहे जांत मोर्तबसूद हीं अक्षरें असतात तें. व त्याणें उठलेलें जें कागद, इ० कांवर चिन्ह तें·

मोल, न० कांहींएक पदार्थ, किं० व्यापार यांस पडती जी किंमत तें·

मोलकरी, पु० या कामास अमुक मोल घेईन असें ह्मणून जो काम करितो तो·

मोलमजूरी, स्त्री० मोलकरी, मजूरकरी, यांचा जो व्यापार ती, किं० त्या व्यापारानें लब्ध जें द्रव्य ती·

मोवा, पु० एक रोग आहे जो प्रायः धान्यादिकांवर पडत असतो·

मोवागी, मोवारी, मोवाळी, स्त्री० मवागी·

मोवागीत, ३ लिं० मंदमंद जो जाळ तो·

मोसबा, पु० ﻣﺤﺴﺒﻪ हिं० कोणाएकास कांहींएक व्यवहारसंबंधी द्यावयाचा जो हिशेब तो·

मोह, पु० सं० पुत्रादिकांची जी ममता तो; २, कांहींएक कार्यामध्यें चित्तास भ्रम व्हायाजोगा धर्मविशेष उत्पन्न होतो तो·

मोहक, ३ लिं० सं० मोह उत्पन्न करणारा जो स्त्री, श्लोक, इ० पदार्थ तो·

मोहगम, ३ लिं० मोघम·

मोहजाल, न० सं० मायाजाल·

मोहटी, स्त्री० माहुटी; २, मोहाचे झाडाचें जें फळ ती·

मोहणें, मोह पडे असें करणें

मोहतर, मोहतूर, पु० शूद्र जातीची जी स्त्री तिचा जो पाट लावितात तो·

मोहतरफा, पु० गवंडी, सुतार, इ० कांस जें त्या त्या कसबासंबंधी सर्कारास देय द्यावें लागतें तो·

मोहतरफी, ३ लिं० मोहतरफा जा कुळांस द्याचा लागतो तीं कुळें तो·

मोहन, ३ लिं० मोहक; २, न० मोह द्वितीयार्थी; ३, कणीक, इ० कांत मार्दवार्थ जो घृतादि स्नेह घालितात तें·

मोहनभोग, पु० एक पक्वान्न आहे; २, एक तांदुळांत भेद आहे·

मोहनमाळ, स्त्री० एक कंठांतील भूषण आहे·

मोहनी, स्त्री० भूल; २, भ्रम उत्पन्न व्हायाजोगा

जो मंत्रादिकृत व्यापार ती, किं० तो मंत्रादिकती; ३, एक स्त्री देवतारूप आहे.

**मोहपाश**, पु० मोहरूपजो पाश तो.

**मोहबद**, स्त्री० हिं० मुरवत.

**मोहर**, पु० ___ हिं० आंबा. इ० कितीएक वृक्षास जो पुष्पगुछ येतो तो; २. स्त्री० एक सोन्याचें नाणें आहे; ३, काजी इ० कांची मोर्तबासारिखी कागदावर मुद्रा करायाची असती ती; ४, रुपया. पैसा, इ० कांवर जें चिन्ह असतें ती; ५, कांहींएक पदार्थावर खुणेकरितां केलेंजें कांहींएक चिन्ह ती.

**मोहरकी**. स्त्री० बैल. घोडा. इ० कांचे मुखास आकारविशेषाची जी दोरी बांधितात ती.

**मोहरक्या**, ३ लिं० कोणेक समाजामध्यें जो अग्रसर तो.

**मोहरपी**, ३ लिं० दे० मोहरक्या.

**मोहरम**, पु० ___ हिं० यवनी महिन्यांतील प्रथम मास तो.

**मोहरा**, पु० सर्पाच्या मस्तकसंबंधी जो मणी तो; २, मृदंगाचे वाजविण्यांत प्रकार आहे; ३, मनुष्यादिकांचा जो चेहरा तो; ४, चेहरेदार, किं० संपत्तीनें अथवा गुणादिकानें जो श्रेष्ठ तो; ५, बुदबळांमध्यें राजा अथवा प्यादा यां वांचून जीं सर्व बुदबळें तीं प्र०; ६, वस्त्र, कागद, इ० कांवर घोटणीनें जी तेजगी येती ती.

**मोहरी**, स्त्री० एक उपधान्य आहे.

**मोहरे**, अ० पुढें.

**मोहरें**, न० बुदबळांतील जो मोहरा तें.

**मोहा**, पु० एक वृक्ष आहे ज्याचे फळास मोहटी म्ह०

**मोहाच्या**, ३ लिं० नारळांत व सुपारींत, एक भेद आहे ज्यांची इतर नारळसुपारीपेक्षां गोडी विशेष असती तो.

**मोहित**, ३ लिं० सं० मोहानें जो व्याप्त तो.

**मोहिनी**, स्त्री० सं० मोहनी.

**मोहीम**, स्त्री० हिं० कांहींएक देशादि ग्रहणार्थ जी राजादिकांची स्वारी ती.

**मोहो**, पु० न० मधुमक्षिका मधुसंचयार्थ जें पोळें करीत असतात तो तें.

**मोहोळें**, न० मोहो.

**मोळ**, न० गवतांत एक भेद आहे; २, गृहादिकांचीं जीं पाखीं तीं प्र०; ३, एक रोग आहे जो प्रायः लाहानपणीं पोरांचे पोटरीवर होत असतो तें.

**मोळविक्या**, ३ लिं० लांकडांची मोळी विकून उदर निर्वाह करितो तो.

**मोळा**, पु० अध्ययन संसारादिव्यवहारांचा कृति, इ० व्यापार करण्याविषयीं कोणएकास संगतीमुळें किं० शिकल्यामुळें लागलीजी रीति तो; उ० लाहानपणीं मुलांस जसा मोळा लाविला तसा लागतो.

**मोळी**, स्त्री० लांकडें, ऊंस, गवत, इ० कांचा जो मोठा भारा ती.

**मोळें**, न० वत्सानें आपल्ये आईस न प्यावें म्हणून त्याचे तोंडास काष्ठादिकांनें करून बांधितात तें.

**मोक्ष**, पु० सं० मुक्ति.

**मौक्तिक**, न० सं० मोती.

**मोज**, स्त्री० संतोषजनक जो व्यापारादिक ती, किं० त्याणें याद्दलाजो आनंद अथवा चमत्कार ती.

मोजा, ३ लिं० नानाप्रकारच्या मौजा करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

मोजा, पु० माहाल, कसबा, इ० विशेषसंज्ञा जास नाहींत असा जो गांव तो.

मोजे, अ० मौजा जो गांव त्याचें नाव लिहितेसमयीं त्या नावाचे मागें हें अव्यय लागतें; उ० मौजे वाडेगव्हाण, मौजे करंजगांव, इ०

मौन, न० विवक्षितकालपर्यंत भाषण न करितां राहाण्याचा जो व्यापार तें; २, ३ लिं० भाषणव्यापारशून्य जो मुका तो.

मौनी, ३ लिं मौन ज्याणें धारण केलें तो.

मौर्वी, स्त्री० सं० धनुष्याची दोरी ती.

म्यान, न० हिं० तरवार, इ० कांचें मेण तें.

म्याना, पु० मेणा.

म्लान, ३ लिं० सं० कोमेजला जो पुष्प, मनुष्य, इ० पदार्थ तो.

म्लेच्छ, पु० सं० यवन.

म्हण, स्त्री० परंपरेनें लोक बोलत आले असें जें नीतिबोधक, किं० दृष्टांतरूपयोगीं जें प्राकृत वाक्य असतें ती; उ० कोणाचें वाईट करूं नये अशी वडिलांची म्हण आहे.

म्हणजे, अ० कांहीं एक शब्दवाक्यादिकांचा अर्थकर्तव्य असतां त्याचापुढें प्रश्नबोधक याचा प्रयोग होतो; उ० अश्व म्ह० घोडा; २ पूर्वोत्तरक्रियांचा कार्यकारणभाव असतां कारणक्रियावाचकापुढें या अव्ययाचा योग होतो; उ० पाऊस पडला म्ह० पीक चांगलें होईल; तुम्ही बोललां म्ह० माझें कार्य होईल.

म्हसासूर, पु० म्हैसासूर.

म्हसोबा, पु० एक पिशाच आहे; म्ह० म्हसोबाला नाहीं बायको आणि सटवाईला नाहीं दादला.

म्हणणें, पढणें; २, शब्दादिकांचा उच्चार करणें

म्हणून, अ० पूर्वोत्तरक्रियांचा कार्यकारणभाव असतां कारणक्रियावाचकापुढें याचा प्रयोग होतो; उ० नदीस पूर आला म्हणून मी आली कडे अडकलों; तो दे म्हणून म्हणाला, घे म्हणून म्हणाला; म्ह० दे असें म्हणाला, घे असें म्हणाला, किं० याप्रकारें करून म्हणाला असे अर्थ म्हणून या अव्ययाचे होतात.

म्हशागुगूळ, पु० एक गुगुळांत भेद आहे.

म्हातारखंड, ३ लिं० निंदेनें म्हाताऱ्यास म्ह०.

म्हातारचळ, पु० म्हातारपणीं जो बुद्धिभ्रंश होतो तो.

म्हातारडा, ३ लिं० म्हातारखंड.

म्हातारा, ३ लिं० वयानें जो वृद्ध तो.

म्हातारी, स्त्री० ला० बोडकी; म्हातारी मेलीसें होणें, म्ह० अतिशयित दुःख होणें.

म्हार, ३ लिं० महार.

म्हारपोर, ३ लिं० महारपोर.

म्हाळुंग, न० महाळुंग.

म्हाळू, पु० महाळू.

म्हेतर, पु० एक वतनदार आहे; २, चांभाराचा नावापुढें याचा प्रयोग होतो; उ० हिरम्हेतर चांगला म्हेतर.

म्हेतरकी, स्त्री० ग्रामादिसंबंधी एक वतनदारी आहे.

**म्हेशा**, ३लिं॰ ज्याचें शरीर पुष्ट असून जो आळशी त्यास निंदेनें म्ह॰

**म्हेस**, स्त्री॰ टोणग्याचे जातीचीजी स्त्री ती·

**म्हेसा**, पु॰ टोणगा·

**म्हेसासुर**, पु॰ एक पिशाच आहे·

---

**यःकश्चन**, ३लिं॰ सं॰ यःकश्चित्·

**यःकश्चित्**, ३लिं॰ सं॰ मुख्यकोटी मध्यें गणनीयनव्हे असाजो साधारण मनुष्यादिक तो; उ॰ त्याचेघरीं कोणी यःकश्चित् आलातरीं सन्मान होतो मग सभ्याचा होईल यांत सांगायाचें काय आहे·

**यकृत्**, न॰ सं॰ मनुष्यांच्या उजव्येकुशींत एक रोग होत असतो·

**यच्चयावत्**, अ॰ सं॰ झाडून; उ॰ आज गांवांतील यच्चयावत् लोक देवापाशीं गेले आहेत·

**यजन**, न॰ सं॰ देवतेचा उद्देशानें अग्नींत होम करण्याचा जो व्यापार तें·

**यजमान**, पु॰ सं॰ स्वर्गादि फल आपल्यास प्राप्त व्हावें म्ह॰ तेंतें यज्ञादिकर्म आपलें म्हणून करणारा जो मुख्य कर्ता असतो तो त्यात्या कर्माचा ठायीं; २, ज्याकडील उपाध्येपण, जोशीपण, इ॰ अधिकार ज्याकडे चालतात तो त्याचा; ३, संसारादि व्यवहाराचा जो मुख्य धनी तो; ४, चाकरी, आश्रितपणा, इ॰ संबंधानें ज्याचे पदरीं जो राहातो तो त्याचा·

**यजमानकृत्य**, न॰ सं॰ यजमानाचे घरीं उपाध्याय, जोशी, इ॰ कामीं विवाह इ॰ ज्याकरिणें, इ॰ जें काम तें; २, तत्संबंधें उपाध्यायादिकांस यजमाना कडून होत्येजी प्राप्ति त्यासही म्ह॰

**यजमानी**, पु॰ श॰ विवाहादि समारंभाचा जो मुख्य यजमान तो; हद्द भाषा हसि·

**यजीतजाणें**, दे॰ अजीतजाणें·

**यजुर्वेद**, पु॰ सं॰ चार वेदांतील दुसरा·

**यजुर्वेदी**, पु॰ सं॰ ज्याचे कुळांत यजुर्वेदानें कर्मे होतात तो; २, विशेषें करून माध्यंजनास म्ह॰

**यजुःशाखी**, पु॰ सं॰ यजुर्वेदी·

**यजू**, पु॰ माध्यंजनास म्ह॰

**यति**, पु॰ सं॰ यती; २, स्त्री॰ पद्याचे चरणामध्यें यत्किंचित् अवसान घ्यावयाच्या जागा असतात त्या प्र॰; उ॰ पृथ्वीवृत्ताचे चरणाचा यति दोन असतात पहिली आठवे अक्षरावर आणि दुसरी चरणांतीं·

**यतिभंग**, पु॰ सं॰ पदाचे अवसानींच यति असावी ती तशी न पडतां पदाचेमध्येंच कदाचित् यति पडत्ये तद्रूपजो काव्यास दोष तो·

**यती**, पु॰ सं॰ सन्यासी·

**यत्किंचित्**, ३लिं॰ सं॰ किंचित्; २, सर्वथा अर्थी·

**यत्न**, पु॰ सं॰ प्रयत्न; यत्नसाध्य, इ॰ समास जाणावे·

**यत्नी**, ३लिं॰ उद्योगी·

**यंत्र**, न॰ सं॰ कालपरिगणन चित्र निर्माण, इ॰ विवक्षित कार्य सोकर्यानें सिद्ध व्हावें म्हणून युक्तीनें करून ठेविलेलें घड्याळ, चक्र, सांचा, इ॰ जें साधन असतें तें; उ॰ दिक्साधनाचें यंत्र मी तुम्हास करून देतों·

**यत्रकुत्रचित्**, अ॰ सं॰ क्वचित् एखादे स्थलीं·

**यंचित**, ३लिं॰सं॰ विवक्षितानुरूपन वर्ते इतस्तत; नहोई असा कोणेक नियमानें नियमितजो कोणेक अर्थ तो ·

**यंत्री**, पु॰सं॰ त्यात्या कर्मांच्याठायीं यंत्रातें वर्तविणारा. जो कोणी तो; उ॰ देह हें ईश्वरनिर्मित यंत्र आहे, ईश्वर यंत्री आहे तो चालवील तसें चालेल ·

**यथा**, अ॰सं॰ जसा; उ॰ यथा राजा तथा प्रजा, याच्या संस्कृत शब्दाशीं समास होतो तेथें याचा अर्थ त्याच्या प्रमाणें त्याचें उल्लंघन न करितां असा प्रायः होतो आणि विशिष्ट शब्द क्रियाविशेषण होतें; यथान्याय, यथारुचि, इ॰ लोकांत विशेष प्रसिद्ध आहेत ते क्रमानें लिहितों ·

**यथाअनुक्रमें**, अ॰सं॰ जो अनुक्रम धरिला आहे तो न सोडितां वांटणें, देणे, घेणें, इ॰ कांचे वि॰

**यथाकथंचित्**, अ॰सं॰ कोणेक अर्थाचा केवळ अभावमात्र जिचा योगानें बोलतां येत नाहीं अशा प्रकारची त्या अर्थाची विद्यमानता वर्णनीय असतां असणें, इ॰ क्रियांचें वि॰ होतें; उ॰ आह्मांला बळणदार अक्षर असावें सांचा, कागद चांगले असावे असें कांहीं नाहीं यथाकथंचित् पोथी असली ह्मणजे झालें; २, नव्याण्णव पक्ष सोडून शेवटले शं भरावे पक्षीं; उ॰ हा प्रायः वांचणार नाहीं यथाकथंचित् वांचला तर वेडा होईल; ३, कार्यसाधनभूत जे प्रयत्नादिक त्यांचे पराकाष्ठेनें कार्याचें होण्याची पराकाष्ठा झाल्यास; उ॰ त्याणें दिवसभर खपोन लिहिलें तर यथाकथंचित् रोन शें ग्रंथ लिहील ·

**यथाकालीं, यथाकाळीं**, अ॰ जा कर्मास जो योग्य काल त्याचा अतिक्रम न होऊं देतां त्याच काळीं तें कर्म करणें, होणें, इ॰ वि॰ उ॰ पेरणी यथाकाळीं झाली ह्मणजे पीक चांगलें येतें ·

**यथाक्रम, यथाक्रमानें, यथाक्रमें**, अ॰सं॰ धरलेला क्रम न सोडितां; उ॰ यथाक्रमें शब्द लिहावे ह्मणजे लौकर सांपडतात ·

**यथातथ्य**, अ॰ ३लिं॰सं॰ वस्तुतः जसें आहे तसें कोणेक गोष्ट सांगणें, बोलणें, इ॰ कांचें वि॰; उ॰ मी तुह्मापाशीं खोटें बोलणार नाहीं यथातथ्य बोलेन; यथातथ्य वर्तमान सांगेन ·

**यथातृप्त, यथातृप्ति**, अ॰सं॰ आतृप्ति ·

**यथानुक्रमे**, अ॰सं॰ यथाअनुक्रमें ·

**यथानशक्ती, यथानशक्त्या**, अ॰ यथानुशक्ति ·

**यथानुशक्ति, यथानुशक्त्या**, अ॰सं॰ यथाशक्ति ·

**यथान्याय**, अ॰सं॰ नीतीनें अनुलक्षून; उ॰ ही मनसुबी त्याणें यथान्याय केली

**यथापद्धत**, अ॰ यथापद्धतीचा अपभ्रंश ·

**यथापद्धति**, अ॰सं॰ कोणेक कर्म करण्याची जी लोकशास्त्र प्रसिद्ध पद्धति आहे तीतें अनुलक्षून ·

**यथापूर्व**, अ॰सं॰ पूर्ववत् प्रमाणें; उ॰ आमचें काम यथापूर्वच चाललें आहे; अपथ्य होतांच दुखणें पुनः यथापूर्व झालें ·

**यथाप्रत**, अ॰सं॰ यथाप्रतीचा अपभ्रंश ·

**यथाप्रति**, अ॰सं॰ लिहायास किं॰ वाचायास घेतलेल्या प्रतीप्रमाणें; उ॰ ही पोथी मी यथाप्रति केली आहे ·

**यथामति**, अ॰सं॰ आपल्या बुद्धीच्या सामर्थ्याप्रमाणें; करणें, बोलणें, सांगणें, इ॰ कांचे वि॰

**यथामार्ग**, अ॰सं॰ नीतीप्रमाणें वर्तणें करणें, इ॰ कांचे वि॰

वि०; उ० तो गृहस्थ यथामार्ग वागतो.

**यथायुक्त**, अ० सं० जसें असावें तसें; उ० तुह्मी चोरास शासन करणें तें यथायुक्त करा.

**यथायोग्य**, अ० सं० यथायुक्त.

**यथारुचि**, अ० सं० आवडीप्रमाणें; उ० रोग्यानें पथ्याचेच पदार्थ खावे यथारुचि खातसुटों नये.

**यथार्थ**, २ लिं० सं० तथ्य; २, अन्वर्थ; उ० काय हो हा सूर्य तापवितो अतएव तपन हें नांव याला यथार्थ आहे.

**यथालाभ**, अ० प्रसंगानुरूप जितकें मिळेल तितक्यानें निर्वाह करणें, कार्य करणें, इ० कांचे वि०

**यथाविधि**, अ० कोणेक कर्माविषयीं शास्त्रानें सांगीतलाजो अनुष्ठानप्रकार त्याप्रमाणें; तें कर्म करणें, होणें, घडणें, इ० कांचे वि०

**यथाविभागें**, अ० सं० यथांशतः

**यथाशक्ति**, अ० सं० आपल्ये शक्तीप्रमाणें.

**यथांशतः** अ० सं० विभागानुरूप वांटणी करून घेणें, देणें, इ० धा० वि०

**यथाशास्त्र**, अ० शास्त्रमर्यादेतें न उल्लंघितां.

**यथाश्रुत**, अ० सं० त्यात्या पदापासून उघडपणें जसा अर्थ दिसतो त्याचप्रमाणें ह्म० व्यंग्य इत्यादिद्वारा अलंकार पूर्वपक्ष समाधान, इ० रूप जो चमत्कारिक कांहीं अंश त्यावांचून श्लोकादिकांचा अर्थ सांगणें, ग्रंथ लावणें, इ० कांचे वि०; उ० मूलावरून यथाश्रुत ग्रंथ लागतो परंतु आंतील भाव, व्यंग्यें इ० पाहाणें तर टीका पाहावी; २, ३ लिं० ग्रंथांत जा युक्ति लिहिल्या असतात, किं० गुरुजा सांगतो तितकेंमात्र जाणतो पदरचे युक्तीनीं अनेक तांडवें करण्यास जाणत नाहीं असा जो पंडित, ज्योतिषी, इ० तो; २, त्याचें तें पांडित्य, बोलणें, इ० तो.

**यथासंख्य**, न० सं० अनेकजे उद्देश्य आणि विधेय, इ० त्यांचें समसंख्यत्व असतां पहिल्याचा पहिल्याशीं, दुसऱ्याचा दुसऱ्याशीं, अशा क्रमानें जो संबंध योजनेचा प्रकार तें.

**यथासंप्रदाय**, अ० सं० संप्रदायानुरूप.

**यथासांग**, अ० सं० जाजा क्रियेला जींजीं अंगें सांगीतलीं आहेत त्यात्या अंगामध्यें यत्किंचित् न्यूनता न पडतां ती क्रिया घडणें, होणें, इ० कांचे वि०

**यथासामर्थ्य**, अ० सं० यथाशक्ति.

**यथासामर्थ्यानें**, अ० यथाशक्ति.

**यथास्थानीं**, अ० सं० जाचें जें स्थान त्या स्थानीं त्याणें जाणें, बसणें, इ० कांचे वि०; उ० भटो पंगतींत उगीच हिंडूं नका यथास्थानीं बसा.

**यथास्थित**, अ० सं० जसें पाहिजे होतें तसें; उ० आज भोजन यथास्थित मिळालें; २, पूर्वकुशलावस्थान पालटतां; उ० आजपर्यंत इकडील वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें; ३, यथायोग्य; उ० पोथी नीट चांगली यथास्थित बांधून ठेव नाहींतर भिजेल.

**यथाज्ञानें**, अ० सं० यथामति.

**यथेच्छ**, अ० सं० इच्छेस येईल तितकें: प्रायः लोकामध्यें वैपुल्य विवक्षा असतां प्र० होतो; उ० रात्रीचा विषय आहे यथेच्छ जेवूं नका कांहीं सुमार पाहा; २ इच्छेस येईल तसें; बोलणें, वर्तणें, इ० कांचे वि०; उ० यथाशास्त्र वर्तावें उगीच यथेच्छ वर्तूं नये.

**यथेष्ट**, अ० यथेच्छ; उ० असे यथाशब्दाचे योगानें

यथेष्ट भणरवीही समास होतील ·

**यद्**, ३लिं॰ सं॰ जो ह्मणूनजें सर्वनाम तदर्थकहें संस्कृत सर्वनाम आहे लोकांत याचा प्रयोग समासीं होतो आणि दकारास पुढील अक्षराचे अनुरोधेंकरून, तकार, चकार, टकार, नकार, इ॰ विकृति होतात; उ॰ यत्कथा ह्म॰ जाची कथा; यदंश ह्म॰ याचा अंश; यत्कृत ह्म॰ जाणें केलेला; यच्चित्त, यन्नाम, इ॰ जाणावे ·

**यंदां**, अ॰ वर्तमानवर्षी ·

**यदाकदाचित्**, अ॰ सं॰ कदाचित् ·

**यदीय**, ३लिं॰ सं॰ यत्संबंधी ·

**यद्यपि**, अ॰ सं॰ जरीं; उ॰ यद्यपि यंदां पाऊस पडला तरीं दीडमणावर धारण होत नाहीं ·

**यद्यपिचेत्**, अ॰ सं॰ यद्यपि ·

**यद्वा**, अ॰ सं॰ अथवा ·

**यःपलाय**, न॰ करणें, ह्मणणें, यांचा योगी प्र॰ अ॰ पळून जाणें ·

**यम**, पु॰ सं॰ मनुष्यादिकांस पापानुसार शिक्षा करणारा देव आहे; २, ला॰ निष्करुण अथवा भयंकर दिसतोजो मनुष्यादिक त्यास आरोपानें ह्म॰; ३, इंद्रिय निग्रह; यमाजीपंत, यमाजीभास्कर, यमाजीबाजी, इ॰ यमासच ह्म॰

**यमक**, पु॰ न॰ सं॰ श्लोकाचे प्रथम चरणाचे अंतीं, किं॰ पूर्वार्द्धाचे अंतीं जीं अक्षरें आलीं असतात तींच एक दोन तीन चार पाहिजे तितकीं अक्षरें दुसऱ्ये चरणाचे किं॰ अर्धाचे अंतीं असतात असा जो शब्दालंकार तो तें; प्रायः त्या अक्षरांचे अर्थ दोन होत असतात ·

**यमदंष्ट्रा**, स्त्री॰ सं॰ आश्वीनमासाचे शेवटचे आठ दिवसांपासून सर्व कार्तिकमास समाप्तिपर्यंत जे दिवस त्या, प्र॰ अ॰ वचनी ·

**यमदूत**, पु॰ सं॰ प्राण्याचे प्राण हरण करायाकरितां नियुक्त जो यमाचा दूत तो; २, उग्र, भयंकर जो शिपाई, प्यादा, इ॰ त्यास आरोपानें ह्म॰

**यमद्वितीया**, स्त्री॰ सं॰ कार्तिक शुद्ध द्वितीया जीस भाऊबीज ह्म॰ ती ·

**यमन**, पु॰ कल्याणरागांतील एक भेद आहे यास यमनकल्याणही ह्म॰

**यमनबिलावर**, पु॰ बिलावररागांत एक भेद आहे ·

**यमनीबिलावर**, पु॰ यमनबिलावर ·

**यमपाश**, पु॰ सं॰ कालपाश ·

**यमयातना**, स्त्री॰ सं॰ पापीजनास जें यमलोकीं नरकवासादि दुःख भोगावें लागतें ती; २, ला॰ मोठें कांहीं सासुरवास, इ॰ जें दुःख भोगावें लागतें त्यासही ह्म॰

**यमरूप, यमरूपी**, ३लिं॰ काळरूपी ·

**यमस्वरूप, यमस्वरूपी**, ३लिं॰ काळरूपी ·

**यमल**, ३लिं॰ सं॰ जावळा ·

**यमलोक**, पु॰ सं॰ जेथें पातकीजन मरणोत्तर पापानुसार यातना भोगायास जातात तो; यमलोकाची वाट धरणें ह्म॰ मरणें; किं॰ मरणोन्मुख होणें ·

**यमुना**, स्त्री॰ सं॰ एक महानदी आहे ·

**यमुनी**, स्त्री॰ अंगठीवर बसवायाचा कृष्णवर्ण खडा आहे जावर सोनेरी अक्षरें करितात ती ·

यव, पु॰ सं॰ एक धान्य आहे जास सातू ह्म॰ तो; २, तदाकार मनुष्याचे हाताचे बोटावर रेषांकित चिन्ह असतें तो.

यवन, पु॰ सं॰ म्लेच्छ.

यवनी, ३ लिं॰ यवनसंबंधी भाषा, वेष, इ॰ तो.

यश, न॰ सं॰ कीर्ति; २, हातीं धरलेलें काम यथास्थितपणें तडीस जात असावें अशीजी कोणेकास दैवानुकूलता असत्ये तें; उ॰ हा वीर आहे पण याला यश नाहीं ह्मणून जेथें जातो तेथें पराभूत होऊन येतो; ३, ज्याची आपण सेवा केली किं॰ ज्यासह वर्तमान साबकारी, इ॰ कांहीं व्यवहार केला असतो त्याणें त्याचे योगानें आपलें कांहीं हित झालें असें मानून सन्मानाचा शब्द बोलल्यानें आपल्यास आनंदजनक जो उत्कर्ष विशेष मिळतो तें; उ॰ तुह्मी याचें कितीबरें करा परंतु हा तुह्मास यश देणार नाहीं भांडून जाईल; ४, कांहींएक दुर्घट कर्म आपले हातून सिद्धीस गलें असतां जो उत्कर्ष प्राप्त होतो तें; उ॰ याला बहुत वैद्यानीं औषधें दिलीं परंतु गोसांव्याचे हातास यश आलें; यशाला भासयेणें ह्म॰ कांहींएक व्यवहार किं॰ गाय, ह्मैस, मूल. इ॰ पदार्थ त्याणें यथास्थितपणें नांदोन ज्याचे पदरीं असतें त्यास तेंतें फल द्यावयाजोगे दशेस येणें.

यशस्वी, ३ लिं॰ सं॰ युद्धादिकांचाठायीं जय होऊन ज्यास यश आलें आहे तो किं॰ दुष्कर कर्म ज्याचे हातून तडीस जाऊन ज्यास यश मिळत असतें असाजो पुण्यवान् असतो तो; २, ज्याचे संबंधानें संबंधकर्त्याचें उत्तरोत्तर कल्याण होत असतें असाजो भृत्य, दासी, अश्व, मणी, धनी, गुरु, द्रव्य, इ॰ तो.

यष्टि, स्त्री॰ सं॰ काठी

यष्टिका, स्त्री॰ सं॰ यष्टि.

यक्ष, पु॰ सं॰ उपदेव विशेष एक जाति आहे.

यक्षिणी, स्त्री॰ सं॰ मंत्रसाध्य एक देवता आहे.

यज्ञ, पु॰ सं॰ अग्निहोत्र्यानें करायाचें असें एक मोठें वेदोक्त कर्म आहे; २, ला॰ ईश्वरपरायण जें कर्म त्यासही ह्म॰ याचे समास यज्ञमंडप, यज्ञशाळा, यज्ञकुंड, इ॰ होतात.

यज्ञवृक्ष, पु॰ सं॰ समिदादिद्वारा यज्ञोपयोगी जे पिंपळ, उंबर, पळस, इ॰ वृक्ष ते प्र॰

यज्ञशाला, यज्ञशाळा, स्त्री॰ सं॰ होमशाळा.

यज्ञोपवीत, न॰ सं॰ ब्राह्मणादिक मुंज झाल्यापासून निरंतर जें सूत्र कंठांत धारण करीत असतात तें.

याकुती, स्त्री॰ भांगेचा रांधा करून एक मादक द्रव्य करीत असतात ती.

याकूत, न॰ माणीक.

याग, पु॰ सं॰ यज्ञ.

याचक, पु॰ धान्य द्रव्य, इ॰ भिक्षायास आलेला जो कोणी भिक्षुक, गोंसावी, इ॰ तो.

याचकवृत्ति, स्त्री॰ सं॰ भिक्षुकी.

याचणें, सं॰ मागणें परंतु ज्यापाशीं मागायाचें त्यासही पष्ठी कर्मता येत्ये.

याचन, न॰ सं॰ मागण्याचा जो व्यापार तें.

याचना, स्त्री॰ सं॰ प्रार्थनापूर्वक विनयानें मागण्याचा व्यापार ती.

याचित, ३ लिं॰ सं॰ ज्याविषयीं याचना केली तो पदार्थ; २, ज्यापाशीं याचना केली तो मनुष्य तो.

**याञ्ञाँ**, स्त्री॰ सं॰ यातना.

**याजक**, पु॰ सं॰ दुसऱ्या यजमानाचें यज्ञादिकर्म करणारा जो उपाध्याय ऋत्विज इ॰ तो.

**याजन**, न॰ सं॰ उपाध्याय ऋत्विज यांचें जें यजमान संबंधानें होमादिकर्म तें.

**याजुष**, पु॰ सं॰ यजुःशाखी; २, ३ लिं॰ यजुर्वेदसंबंधी जो संभावितो.

**यांञ्ञा**, स्त्री॰ यांञ्ञा शब्दाचा अपभ्रंश.

**यात**, स्त्री॰ ब्राह्मण, क्षत्रिय, इ॰ जी जात ती; २, ३ लिं॰ संगत जो काळ इ॰ तो.

**यातना**, स्त्री॰ सं॰ दारिद्र्य, नरक, गर्भवास, इ॰ संबंधी भोगावें लागतें जें तीव्र दुःख ती.

**यातायात**, स्त्री॰ जाणें, येणें, इ॰ रूप क्लेशप्रद जी अनेक प्रकारची खटपट ती.

**याती**, स्त्री॰ सं॰ यात प्रथमार्थी.

**यात्रकरू**, पु॰ यात्रेकरी.

**यात्रा**, स्त्री॰ देवतादर्शन, तीर्थस्नान, इ॰ पुण्यकर्माचा उद्देशानें निघून त्या त्या स्थलीं जाऊन तेथें करावयाचा जो क्षौर, तीर्थस्नान, देवदर्शन, ब्राह्मणभोजन, इ॰ विधि तो सर्व करावा इतकें जें कर्म ती; २, यात्रेकरू जनाचा जो समुदाय ती; ३, कोणेक देशांतरीं किं॰ ग्रामांतरीं जाऊन कांहीं काम न होतां येणें इतका जो फुकट व्यापार ज्याचें फळ तेथें जाऊन आला इतकेंच होतें त्यास म्ह॰; उ॰ ज्या कामाचे उद्देशानें मुंबईस गेलों होतों तें काम कांहीं झालें नाहीं उगीच यात्रामात्र पडली; ४, जत्रा; उ॰ आज त्या देवाची यात्रा आहे म्हणून सारीं दुकानें तिकडे गेलीं; ५, सं॰ देशांतरास, किं॰ ग्रामांतरास जें गमन ती.

**यात्रेकरी**, पु॰ तीर्थादि यात्रेचा उद्देशानें जो बाहेर निघाला तो घरीं येई तों पर्यंत; अनेकवचनीं पक्षीं नपुंसकीं प्र॰ होतो.

**यात्रेकरू**, पु॰ यात्रेकरी.

**याथातथ्य**, न॰ सं॰ वर्तमान इ॰ दिकांचा जो वास्तविक खरेपणा तें.

**याद**, स्त्री॰ ياد हिं॰ स्मरण; २. वर याद अशीं अक्षरें लिहून अनेक मनुष्यादि पदार्थांचा क्रमानें स्मरणार्थ लिहितात जो लेख तो ती, किं॰ तसें ज्यावर लिहितात तो कागद इ॰ ती.

**यादगारी**, स्त्री॰ يادگاری हिं॰ प्रा॰ याद प्रथमार्थी.

**यादगिरी**, स्त्री॰ हिं॰ यादगारी.

**याददास्त**, स्त्री॰ हिं॰ गाणाऱ्या लोकांपाशीं ध्रुपद, ख्याल, इ॰ कांचा जो थोडा बहुत भरणा असतो तीस म्ह॰

**यादवान**, न॰ जन्मकालीन तिथिवारादि ज्या कागदावर लिहिलें असतें तो कागद तें.

**यान**, न॰ सं॰ ज्याजवर, किं॰ ज्यांत बसून जातात असें जें अश्व, पालखी, गाडी, गलबत, इ॰ तें; जलयान, नरयान, इ॰ स॰; २, गमन.

**याम**, पु॰ सं॰ प्रहर.

**यामार्ध**, न॰ सं॰ वारपरत्वें नित्य एक अर्धप्रहरपर्यंत दुर्मुहूर्त पडत असतो तें.

**यायी**, पु॰ कोणेक स्थलीं चिरकाल रहायाचा नव्हे कांहीं कालानें स्थलांतरीं जाणारा जो तो त्या पूर्वींच्या स्थलीचा.

**यार**, पु॰ मित्र; २, धगड मुख्यार्थी.

**यारदा, यारदी**, ३ लिं॰ ओझ्यापाझ्याचे उपयोगी लहानसहान जें घोडें तो; २, ला॰ त्या त्या समुदायांत

अग्रगण्य नव्हेन सरासरी त्यासमुदायाचे भरती-चे उपयोगी असेजे गोण, मनुष्य, बैल, इ० त्यांस ह्म०

**यारी**, स्त्री० परस्परांचाजो अत्यंत सख्यभाव ती.

**यावत्**, अ० सं० यद्ययावत्; उ० आज गावांतील यावत् मनुष्य कथेला गेलें आहे; २, जोंपर्यंत; उ० त्यांचा आमची यावत् मैत्री आहे तावत् कामकरून घ्यावें; यावत् नदी लागे तावत् तुह्मास पाचावयास येईन; ३, जितका; उ० तुह्मीं पुण्यासजा ह्म० यावत् सुवर्ण तुह्मास अपेक्षित असेल तावत् मिळेल, यावत्काल, यावत्संख्याक, इ० स०

**यावत्तावत्**, अ० सं० विशेषसांगायाजोगें नव्हे नितक्यास नितकें होई असें कांहीं एक असणें, बोलणें, इ० वि०; उ० आमचेघरीं दुभतें यंदा यावत् तावत् आहे; २, बीजगणितामध्यें अस्पष्टसंख्येचाजो अंक त्यासही, संज्ञा ठेविली असल्ये; उ० यावत्तावत् ५ रूपें.

**यावनाल**, पु० सं० जोंधळा.

**यावनी**, ३ लिं० सं० यवनी.

**याज्ञिक**, पु० सं० विवाह, मुंज, व्रतोद्यापन, देवप्रतिष्ठा, इ० कर्माचें अनुष्ठान चालवायास जाणतो जो ब्राह्मण तो.

**याज्ञिकी**, स्त्री० सं० याज्ञिकाचें जें कर्म ती; २, ३ लिं० याज्ञिकसंबंधीजो संप्रदायादि तो.

**युक्**, ३ लिं० जो जाशीं युक्त तो तद्युक्, तैलयुक्, जलयुक्, इ० स०

**युक्त**, ३ लिं० ज्याचा जाशीं योग झाला आहे तो तेणेशीं, चिंतायुक्त शर्करायुक्त इ० स० प्र०; २, लोकव्यवहार आणि शास्त्रव्यवहार यांस अनुगुण अतएव त्यास्थलीं चांगला दिसायाजोगा जो कांहीं एक अर्थ तो; उ० गरीबांचा समाचार घ्यावा हें थोरांस युक्त आहे; ३, स्त्री० युक्तीचा अपभ्रंश.

**युक्तायुक्त**, न० सं० ग्रंथादिकांतील विचारणीयवरावाईट अंश तें.

**युक्ति**, स्त्री० कोणेक कार्य जाप्रकारें केलें असतां सिद्ध होतें आणि चांगलें लेकर, इ० विवक्षितानुरूप होतें असाजो करण्याचा प्रकार त्यातें समजायाजोगी कोणेकाचे अंगीं बुद्धि असल्ये ती; उ० याचे अंगांत काम करण्याची युक्ति चांगली आहे; २, कोणेक कार्य करण्यास बळाचा, आणि बुद्धीचा, असे दोन प्रयोग करावे लागतात त्यांतजो बुद्धीचा प्रयोग ती; उ० पायांतील कांटा काढणें हें बळाचें काम नव्हे यास युक्ति पाहिजे; ३, शब्दादिरूपजे कांहीं अर्थ त्यांचे स्वभाव, शक्ति, संयोग, वियोगादिजन्य गुण, इ० जाणून त्या अर्थांची जाप्रकारें विवक्षितकार्यावर योजना केली असतां तें कार्य विवक्षितानुरूप सिद्ध होतें असाजो सूक्ष्मबुद्धीनें बसवायाचा तो योजनाप्रकार ती; उ० घड्याळ करायाची युक्ति मला समजली; कोणेक गोष्ट कोणेकाचे युक्तीस येणें ह्म० युक्त अशी वाटणें; कांहीं एक युक्तियुक्तीनें करणें, घेणे, इ० स्थलीं त्वरा दांडगाई नकरितां सोईनें करणें; युक्तीचा ह्म० जामध्यें युक्ति आहे असें भाषण, कृति, इ० तो; युक्तीचेवाटेनें ह्म० युक्तीचे मार्गानें करणें, इ० कांचें वि०

**युक्तिमान्, युक्तिवान्**, ३ लिं० अनेक युक्ती जाणतो तो.

**युक्तिवता**, अ० कों० युक्तीचावाटेनें ·

**युक्त्या**, अ० युक्तीनें; २, ३लिं० शत्रुपराजयादिरूप स्वकार्याची युक्ति जाणणाराजो तो ·

**युग**, न० सं० कृत, त्रेता, द्वापर, आणि कलि, हे जे चार कालविभाग ते प्र०, किं० चार मिळून एक तें; युगधर्म, युगमाहात्म्य, इ० स० जाणावे; २, द्वय; कर्णयुग, वस्त्रयुग, इ० स० जाणावे; ३. जोखड ·

**युगादि**, पु० कृतायुगाचे प्रारंभ दिवस जे प्रतिवर्षी येतात ते प्र०

**युगुल**, न० द्वय ·

**युगूत**, स्त्री० युक्तीचा अपभ्रंश ·

**युग्म**, न० सं० द्वय; २, स्त्रीपुरुषरूप जें मिथुन तें ·

**युत**, ३लिं० सं० युक्त प्रथमार्थी ·

**युद्ध**, न० सं० झुंज; वाग्युद्ध, द्वंद्वयुद्ध, बाहुयुद्ध, इ० स०

**युद्धकंडू**, स्त्री० सं० वीरपुरुषांचे बाहूंस युद्धाचा उत्कंठेनें जी कंडू ति सदृशव्यथा होत्ये ती ·

**युद्धवीर**, पु० सं० युद्धाविषयीं जो वीर तो ·

**युवति, युवती**, स्त्री० सं० तरुणी ·

**युवराज**, पु० सं० राजा राज्यपदीं असतांच आपल्याहातारवालीं सर्व राज्याचा कारभार करावा आणि आपले पाठीमागें मुख्य राज्यपदीं बसावें ह्मणून जो पुत्रादिक अधिकारी केला असतो तो ·

**युवराजा**, पु० युवराजाचा अपभ्रंश ·

**युवराज्य**, न० यौवराज्याचा अपभ्रंश ·

**युवा**, पु० सं० तरुण; २, साठासंवत्सरांतील नववा जो संवत्सर तो ·

**युष्मद्**, सं० तुह्मी; तुमचें गृह, तें युष्मद्गृह, युष्मत्पुत्र, युष्मद्देश, इ० स० प्र०



**युष्मादिक**, तुह्मी, दुसऱ्यास लावून बोलावें ओंपरोधिक बोलावें असा कांहीं डौल असतां प्र०; एथें क्रियापदाचें रूप तृतीयपुरुषवत् होतें; उ० आतां शौर्याच्या गोष्टी सांगतां पण ते दिवशीं चोर आले तेव्हां युष्मादिकच पळाले ·

**यू**, अ० कुत्र्यास बलावयाचा शब्द आहे ·

**यूका**, स्त्री० सं० ऊ ·

**यूथ**, पु० सं० समुदाय, प्रायः पशुपक्षी एतद्विषि ·

**येऊनजाऊन**, अ० वरकड कांहीं नाहीं कायतें एवढेंच असा अर्थ विवक्षित असतां याचा प्र० करितात; उ० वरकड सारी दौलत संपली आतां येऊनजाऊन वतन राहिलें आहे तेवढें विका म्ह० झालें; तूं येऊनजाऊन मारशील आणखी काय करणार आहेस; कोणेकस्थलीं नेहमी न असतां कधींविधीं याचेजावें अशाप्रकारें असण्याचें वि०; उ० मी येथें नेहमी राहणार नाहीं येऊनजाऊन असेन ·

**येक**, ३लिं० एकशब्दाचा अपभ्रंश; एकशब्दपूर्वक समासादि होऊन जे शब्द व्यवहारांत प्रसिद्ध आहेत ते एकशब्दापुढें लिहिले आहेत ते प्रा० येकशब्द पूर्वकही कोणी उच्चारितात, जसें एकंदर, एकमेक, एकीबेकी, एकुणात, एकत्र, तद्वत् सर्व एथें जाणावे ·

**येडका**, पु० एडका; याप्रकारेंच जे एकारादिक शब्द एकाराचे क्रमांत जितके लिहिले आहेत तितके प्रा० येकारादिक उच्चारितात, जसें येथें, येथला, येवढा, इ०

**येजा**, स्त्री० कोणेकस्थलास जावें, आणि पुनः मागारें यावें, अशीजी खटपट ती ·

**येणी**, स्त्री० दुसऱ्याकडून यावयाची जी गंजीफांची

तळफती.

**येणें**, विवक्षित अवधीपासून आपल्याकडील असा मानलेला जो प्रदेश त्याप्रति कोणेकानें गतिद्वारां प्राप्त होणें; उ० पुण्याहून घरीं येत्येसमयीं त्यास भेटलों; २, वक्त्याचा जो संबोध्य त्याणें अधिष्ठित झालेला, किं० अधिष्ठित होणारा जो प्रदेश तिकडे त्या वक्त्यानें गमन करणें; उ० अरे नाऱ्या जा रामाजीपंतास ह्मणावें मी तुह्मांकडे येतों कोठें जाऊं नका; तुह्मी पुण्यास जात असलां तर मी येतों; ३, कोणेक कालांश, देशांश, किं० अनुक्रमेंकरून स्थित जो ग्रंथ, व्यवहार, इ० त्याचा कोणेक अंश त्याणें गतिविशिष्ट जो कोणी त्याची आपल्यापर्यंत गति झाल्यामुळें त्यास प्राप्त होणें; उ० दोन घरकाजर चांगला वारा लागता तर बंदर आलें असतें; ज्येष्ठमास आला आतां गलबतांतून जाण्याची सोय नाहीं; या तिहीं लक्षणाचा तात्पर्यार्थ किं येणें, आणि जाणें, या दाहों धातूंचा गतिविशिष्ट होणें असा अर्थ परंतु प्राप्य अधिकरणाचे प्राप्तीस जेव्हां प्राधान्य विवक्षित आहे तेव्हां येणें याचा प्र०, आणि जेव्हां अधिष्ठित अधिकरणाशीं जो वियोग त्यास प्राधान्य विवक्षित आहे तेव्हां जाणें याचा प्र० अशी व्यवस्था आहे; ४, कोणेक विद्या, कला, इ० बुद्धीनें धरलें जाणें; उ० याला लिहिणें येतें पण पढणें येत नाहीं; ५, राग, लोभ, दया, ज्वर, स्वरूप, फल, पुष्प, पान, लोणा, वाळवी, इ० याणीं अंतःकरण, शरीर, वृक्ष, भूमि, इ० जीं आपलालीं उत्पत्त्यधिकरणें त्यांचाठायीं उत्पन्न होणें; ६, कांहीं एक प्रमेय वस्तु कोणेक परिमाणाशीं तुल्य भरणें; उ० ही अंगठी तोळाभर वजन येईल, तो गांव एथून चार कोस येईल; ७, कांहीं एक कृतीनें निर्मित जो आकारविशिष्ट भिंत, इ० पदार्थ त्याणें चांगला वांकडा, इ० आकारवैशिष्ट्यें करून सिद्ध होणें; उ० हें पागोटें चांगलें आलें नाहीं अणखी बांध; ८, अवस्थादिरूप जो कोणेक धर्म त्यातें कोणेकानें पावणें, किं० तो अवस्थादिरूप धर्म कोणेकाप्रति प्राप्त होणें; उ० घर अगदीं मोडकळीस आलें आहे; तूं शिवी दिलीस तर तो क्रोधास येईल; तां, आयास, आवयास, एतत्प्रत्ययांत सर्व धातूंपुढें याचा योग होतो तेव्हां तत्तद्धात्वर्थ कर्तृशक्तीनें करायास किं० पडायास शक्य होणें असा अर्थ; उ० ते धनी पडले त्याशीं उत्तर करतां येत नाहीं; प्रसंग पाहून बोलायास येईल; त, इत, एतत्प्रत्ययांत जे सर्व धातु त्यांपुढें याचा योग झाला असतां त्या त्या धात्वर्थाचें कांहीं काळ सतत असणें अशा अर्थाचें द्योतन होतें; उ० वडील वर्तत आले त्याप्रमाणें आह्मी करीत आलों; प्रवासाद्यर्थ कोणी निघाला असतां त्याचें जें जाणें त्या अर्थीं; मंगलाद्यर्थ येणें याचा प्रयोग करितात; उ० आतां आह्मी येतों कृपा असोंद्यावी; ९, न० दुसऱ्याकडे आपलें पावयाचें असतें जें ऋणादि तें.

**येणेंजाणें**, न० कोणेकस्थळीं कोणेकाचा यावें जावें असा असतो जो राबता तें; उ० श्रीमंताकडे त्यांचें येणेंजाणें आहे; तुह्मीं आमचे कडले येणेंजाणें अगदीं सोडलें हें काय; २, घेणेंदेणें; उ०

उ० येथें आमचें येणेंजाणें होतें तें उकळायास आलें होतें.

**येणेंप्रमाणें**, अ० एणेंप्रमाणें.

**येतांजातां**, अ० सर्वदा अनेकवार; उ० तो येतांजातां बायकोस शिव्या देतो.

**येताजाता**, पु० मार्गानुरोधास्तव विवक्षितस्थलीं प्राप्त होणारा जो कोणी वाटसरू, इ० तो; उ० मार्गावरचा आंबा हा येत्याजात्याचा त्याजवर धण्याची सत्ता चालत नाहीं.

**येतापाया**, पु० द्रव्यादि चोंहोंकडून येऊन एकत्र जमून समृद्धि होत असावी अशाविषयीं अनुकूल असतो जो काळ तो.

**येतेकरी**, ३लिं० रा० विद्या, कळा, इ० अनायासानें लोकरजास पाठ येतें तो.

**येरजार, येरझार**, स्त्री० कोणेकस्थलीं कांहीं कार्योद्देशानें जी खेप ती; तद्विषयीं आलस्य, अनादर, इ० असतां प्र०; उ० दहा वेळ गेलों पण गांठ पडत नाहीं आतां माझानें येरझारा करवत नाहींत.

**येरधार**, स्त्री० येरझार.

**येरू**, ३लिं० ग्रं० पूर्ववाक्यांच्याठायीं ज्याचा नामनिर्देश केला असतो त्याचा परामर्शकर्तव्य असतां या सर्वनामानें करितात, याचा प्र० प्रथमांतच आढळतो; उ० सीता ह्मणे लक्ष्मणा धांव, येरू ह्मणे राक्षसी माव.

**येवाजावा**, पु० येणेंजाणें.

**येश**, न० यश शब्दाचा अपभ्रंश.

**येशवंत**, ३लिं० यशस्वी;

**योग**, पु० कोणेक पदार्थ पदार्थांतराशीं लागला असतां त्यांचा परस्परें होतो जो संबंध तो; उ० लोहास परिसाचा योग झाला असतां सुवर्ण होतें; सुंठीस शर्करेचा योग झाला असतां समधात होत्ये; २ कोणेक अर्थाचा कोणेक अर्थाशीं सामीप्यसंबंधादिरूप जो संबंध तो; उ० तो चांगला होता पण त्या दुष्टाचा योगानें नासला; ३, कार्यमात्र होण्यास निमित्तभूत जो ईश्वर संकल्प जो जीवांस कार्यावरून अनुमित होतो तो; उ० तिला नहाण यावें आणि तिचा दादला मरावा असा कांहीं योग होता; हा अर्थ घेउनच कालयोग, दैवयोग, प्रारब्धयोग, इ० स०; ४, कोणेक कार्य सिद्ध्यर्थ कोणेक वस्तूची तत्कार्यसाधक व्यापारीं जी योजना तो; उ० आमचायूवर एरंडेलाचा योग प्रशस्त आहे; ५, प्राणवायूचा निरोधानें अंतःकरणाची एकाग्रता करावी असा एक शास्त्रोक्त ईश्वरप्राप्तीचा उपाय आहे तो; योगसाधन, योगमार्ग, इ० स०; ६, ईश्वरप्राप्त्यादि कार्याविषयीं उपायभूत जें भक्त्यादिक त्यास ह्म० भक्तियोग, कर्मयोग, ज्ञानयोग, इ० स०; ७, पंचांगाचे अवयव विष्कंभादिक जे सत्तावीस ते प्र०

**योगनिद्रा**, स्त्री० ईश्वराची जी निद्रावस्था ती.

**योगमाया**, स्त्री० ईश्वराची जी मायारूप शक्ति ती.

**योगराजगुग्गुल**, पु० एक रसायन आहे.

**योगराजगुग्गुलु**, पु० योगराजगुग्गुल.

**योगरूढ**, ३लिं० प्रकृतिप्रत्ययाचा, कि० इतर अनेक पदांचा परस्पर योग होऊन सिद्ध झाला होत्सातां त्या अवयवार्थानुरोधानें सामान्यार्थीं रूढ नसून अर्थविशेषींमात्र लोकांत रूढ असतो असा जो शब्द तो;

जसें अंगरखा या शब्दापासून अंग राखलें जातें जे-णेंकरून या व्युत्पत्तीनें अंग रक्षणोपयुक्त पदार्थमा-त्राचा बोध व्हावा तो ह्या शब्दयोगरूढ आहे ह्मणून व-स्त्रविशेषाचा मात्र बोध होतो.

**योगशास्त्र**, न० सं० जामध्यें प्राणायामादिद्वारा अं-तःकरणाचे एकाग्रतेचा उपाय सांगितला आहे, असें सहा शास्त्रांतील एक शास्त्र आहे.

**योगक्षेम**, न०पु० सं० अन्नाछादनादिद्वारा आपले प्रपंचाचा जो निर्वाह तो तें; उ० आजपर्यंत त्या सत्पु-रुषाचा आश्रय होता तेणेंकरून योगक्षेम बराच होत होता आतां कठीण.

**योगिनी**, स्त्री० सं० देवताविशेष आहे.

**योगी**, पु० प्राणनिरोधादिद्वारा योग जाला सिद्ध झाला आहे तो.

**योग्य**, ३ लिं० उचित; उ० पालखी जी आहे ही श्रीमंता स योग्य; या स्त्रीस हा नवरा योग्य आहे; २, विद्यादि द्वारा प्रतिष्ठित, सभ्य, असा जो मनुष्य तो; उ० या गा-वांत चार ब्राह्मण योग्य आहेत, चार अयोग्यही आ-हेत; ३, सजातीय पदार्थसमुदायामध्यें तत्तद्गुणवैशि-ष्ट्येंकरून इतर सजातीय पदार्थापेक्षां जो प्रशंस्य आहे तो; उ० अवघ्या मंडळींत बापूजीबायांचें अक्षर यो-ग्य आहे.

**योजक**, ३ लिं० कांहीं एकाची योजना करणारा जो तो.

**योजणूक**, स्त्री० योजना.

**योजणें**, कोणेक अर्थांत कोणेक अधिकारपद, किं० शत्रुपराजयादिरूप काम, इ० कांवर नेमणें; उ० त्या मामलतीवर रामाजीपंतांस योजलें; त्याजकडे तगाददार जर चांगला कणक्या योजाल तर पैं-क्याचा उगावा होईल; २, कोणेक पदार्थ कोणेक पदार्थाशीं संबद्ध करणें परंतु जे पदार्थ परस्पर सं-बद्ध होऊन विवक्षित कार्योपकारक होतात त्यां-चा तो संबंध वाच्य असतां प्र०; उ० रथाशीं घोडे योजले; धनुष्याशीं बाण योजला; ३, कोणेक गो-ष्ट अशी अशी या प्रकारें करावी; इ० रूपें संकल्पि-णें; उ० आह्मी काम योजलें तें जर सिद्ध झालें तर तुह्मासही कांहीं प्राप्त होईल; ४, कोणेक अर्थ को-णेक कार्यावर किं० कोणेक अधिकारपद, इ० कांवर नेमावा अशा प्रकारें अंतःकरणानें धरणें; उ० तु-ह्मीं वर योजला होता त्याचें रासकूट मिळत नाहीं; ५, आठवेनासा, किं० सुचेनासा झालेला जो कां-हीं शब्द किं० अर्थ तो चित्ताचें एकाग्र्य करून म-नांत आणणें.

**योजन**, न० सं० चार कोशरूप जें अध्वप्रमाण तें.

**योजना**, स्त्री० सं० योजण्याचा जो व्यापार ती.

**योजित**, ३ लिं० सं० योजिला तो.

**योद्धा**, पु० सं० युद्ध करण्याविषयीं जो समर्थ तो.

**योनि**, स्त्री० सं० स्त्रीव्यक्तीचें जें उपस्थ ती; २, ला० त्या त्या जातीमध्यें उत्पन्न होणें, वास करणें, इ० विषयीं विवक्षित जी ती ती जाति ती; उ० चवऱ्यांय-शीं लक्ष योनि भोगाव्या तेव्हां नरदेहाची प्राप्ति होते; ३, तत्तत्पदार्थाचें जें समवायिकारण ती; उ० मेघ हा धूमयोनि आहे; ४, जगाचें निमित्तकारण जें ईश्वर, काल, इ० त्यासही ह्म०; उ० ईश्वर हा जगद्योनि होय.

**योनिसंबंध**, पु० विवाहद्वारा जो परस्पर संबंध तो.

**योगिक**, ३ लिं० सं० प्रकृति, प्रत्यय, किं० इतर अनेक

अर्थ

अर्थवंत शब्द यांचा परस्पर योग होऊन अवयव शक्त्यनुरोधानें अर्थ व्हावयाजोगा सिद्ध झालेला जो विशिष्टशब्द तो.

**योनसंबंध**, पु० सं० योनिद्वारकजो परस्परांचा संबंध तो.

**यौवन**, न० सं० तारुण्य.

**यौवराज्य**, न० सं० युवराजाचाजो अधिकार, किं० कर्म.

---

**र**, करणें याचा योगी प्र०; अ० रडणें या अर्थी संकेतानें ह्म०

**रंक**, पु० लोकानीं मानायास कारणभूतजें धन, विद्या, पराक्रम, इ० कृतमहत्व तें जा पाशीं नाहीं अतएव केवळ तुच्छ हलकाजो पुरुषादिक तो; उ० साधुपुरुषास राजा आणि रंक बरोबर दिसतात.

**रकटा**, पु० रा० आगवळ.

**रकटें**, न० जुनें, फाटकें जें कांबळें तें.

**रकत**, न० रक्तशब्दाचा अपभ्रंश, प्रथमार्थी प्र०

**रकतओंढ**, स्त्री० रक्तओंढ.

**रकम**, स्त्री० यावत्संख्याक द्रव्यावर एकदां देणें, घेणें, ठेवणें, इ० व्यापार विवक्षित असतो तावत्संख्याक जें तें रुपये, इ० द्रव्य ती एक; २, हिशेब, इ० करायासाठीं लिहितातजो अंकराशि ती; कोणेकानें रकमेस येणें ह्म० जेर येणें, किं० डबघाईस येणें; उ० तो इतका उद्दाम घोडा होता पण त्याचा चाबुकस्वाराचे हातीं जातांच दोन दिवसांत रकमेस आला: अहो हें तुमचें घर रकमेस आलें आहे आतां मोडून नवें बांधलें पाहिजे.

**रकमाला**, पु० कांहीं एक कारणार्थ अनेक रकमा ज्या कागदावर मांडिल्या असतात तो कागद; प्रायः राजकीय व्यवहारीं प्र०

**रकमी**, ३ लिं० ज्याविषयीं एकवेळ नेम ठरला असतो त्यांत वारंवार अधिक उणें व्हावयाचें नाहीं आणि त्या अधिकाऱ्याकडून एकाएकी निघायाचेंही नाहीं असेंजें शेत, चाकरी, इ० किं० तत्संबंधी धारा, इ० किं० तेंकूळ, चाकर. इ० अधिकारी तो.

**रकाना**, पु० लिहावयाचे कागदास उभ्या मोडी पाडून जे अनेक विभाग पाडितात ते प्र०

**रक्त**, न० सं० शरीरांत एक द्रवरूप धातु आहे ज्याचा रंग तांबडा असतो तें; रक्ताचाजो स्त्राव तो रक्तस्त्राव. इ० स० होतात; २, ३ लिं० रंगानें रंगलेलाजो पदार्थ तो; ३, अनुरक्त; ४, तांबडा.

**रक्तओंढ**, स्त्री० हगतांना रक्त पडतें अशीजी हगवण लागते ती.

**रक्तचंदन**, पु० एक वृक्ष आहे.

**रक्तचंदनी**, ३ लिं० रक्तचंदन संबंधीजो पदार्थ तो.

**रक्तपरमें**, न० रक्तप्रमेह.

**रक्तपित्ती**, स्त्री० एक कुष्ठरोग आहे.

**रक्तपित्या**, ३ लिं० रक्तपित्ती रोग झाला आहे ज्यास तो.

**रक्तप्रमेह**, पु० शिश्नद्वारानें रक्त स्त्रवतें असा एक प्रमेहांत भेद आहे.

**रक्तवाऊ**, पु० रा० एक रोग आहे.

**रक्तबीज**, पु० ढेंकणास ह्म०

**रक्तबोंबाळ**, ३ लिं० कापणें, फुटणें, इ० कारणामुळें

मुळें आंतून रक्त निघून कांहीं त्याला बरबटलें आहे कांहीं खालीं गळतें आहे अशा अवस्थेंतें पावलाजो हस्तपादाद्यवयव तो; २, पु॰ कों॰ त्या अवयवाचीजीती तशी अवस्था तो; उ॰ हाताचा रक्त गोंधाळ झाला·

रक्तबोळ, पु॰ औषधोपयोगी एका वृक्षाचा चीक आहे तो·

रक्तमोक्षण, न॰ सं॰ शरीरांतील रोगांश बाहेर पडावा म्हणून जळू लावणें, फांसण्या, शिराच्छेद, इ॰ द्वाराजें कांहीं रक्ताचें निष्कासन करितात तें·

रक्तरोडा, रक्तरोहिडा, पु॰ एक झाड आहे·

रक्तवान, पु॰ शाई विकून उपजीविका करितो तो; २, श्रीमंत लोकांचे घरीं पानें, द्रोण, आणि शाई, यांचे कामावर जो ठेविला असतो तो·

रक्तवानी, स्त्री॰ रक्तवानाचेंजें कर्म ती·

रक्तसांड, स्त्री॰ कों॰ रक्तमोक्षण·

रक्तांबर, ३ लिं॰ रा॰ रक्तानें भरल्यामुळें लाल झालाजो शरीरावयव, वस्त्रें, भूमि, इ॰ तो·

रक्तावणें, रक्ताळणें·

रक्ताळणें, पोंतगळू, जखम, इ॰ आंतून रक्तस्त्रवे अशा दशेनें पावणें·

रक्ताक्षी, पु॰ साठांसंवत्सरांतील अठ्ठावन्नावा संवत्सर तो·

रक्तिमा, पु॰ सं॰ लालपणा·

रक्त्याबोळ, पु॰ रक्तबोळ·

रखडणें, रा॰ कांहीं एक कार्याचे उद्देशानेंजो प्रवृत्त झाला त्याणें तें कार्य भडपणें नहोई आणि आपलीही सुटका नहोई असें झाल्यामुळें कांहीं काल त्या कार्याखालीं कंठावा येई अशी विपत्ति भोगित असणें; २, कोणेकानें दुखण्यांत खितपत पडणें·

रखमंडळ, न॰ रा॰ चांगल्यें चागल्यावर राख उडविल्यामुळें होतेजी त्याआग्याची घाण तें·

रखरख, स्त्री॰ कांहीं एक रोगादि विकृतीनेंजी कोणाएकास खारवा सुटायाजोगी पोटांत आग होत्ये ती·

रखरखणें, रखरखीनें युक्त होणें·

रखरखाट, पुं॰ ग्रामादिस्थलावर असतो रखरखीतपणा तो; २, पोटांत अतिशयित होत्येजी रखरख तो; पड, हो. धा॰ प्र॰

रखरखीत, ३ लिं॰ वृक्षांची छाया, ओलें तृणादि, पाणी, इ॰ कृतजो थंडावा, आणि स्निग्धपणा तो; जेथें नाहीं असेंजें देश ग्रामादि स्थल तो, किं॰ आर्द्रता स्निग्धांश जामध्यें नाहीं असेंजें रुक्ष अन्नादि भक्ष्य तो·

रखवाली, स्त्री॰ कोणेक अर्थ कोणी नेईल, खाईल, किं॰ जाईल, इ॰ नव्हावें म्हणून त्याचें रक्षण करण्याचेंजें काम ती·

रखा, स्त्री॰ गोवरी, लाकूड, इ॰ जळलें असतां होतेंजें भस्म ती·

रग, स्त्री॰ मनुष्यादिकांचा बलादिकृतजो ताठा ती; २, रोग, विकृति, इ॰ कांची उत्तरोत्तर चढ व्हावी अशीजी बलावस्था ती; प्रा॰ मोड, उतर, धा॰ प्र॰; उ॰ यागळवाचें रक्त काढतांच रग मोडली; ३, हात, पाय, पाठ, इ॰ शरीरावयवांसजी एकसारखी कळ लागत्ये ती·

ग, पु० चक्षुरिंद्रियानेंमात्र आपणांस ज्ञात असे जे नीलत्व, पीतत्व, शुक्लत्व, इ० पदार्थनिष्ठ गुण ते प्र०; २ वस्त्र, चित्र, इ० पदार्थ रंगीवायासाठीं विवक्षित जो हिंगूळ, पेवडी, नीळ, सफेता, इ० पदार्थ ती, किं० तींहींकरून सिद्ध केलें जें द्रव्य तो; ३, गान, कीर्तन, तमाशा, भाषण, इ० कांचा लोकांचीं अंतःकरणें रमायाजोगा पडतो जो शोभाविशेष तो; उ० आजचे गाण्यास रंग चांगला आला; ४, मनुष्य, वृक्ष, बाग, शेत, इ० पदार्थ, किं० संसार, व्यवहार, इ० गोष्ट, इ० कांची मध्यें परिपूर्ण शोभा येत्ये अशी जी दशा तो; उ० युगतास्सा संसार रंगास आला तों बायको मेली; हा बाग चांगली मेहनत झाली तर दोनवर्षांनीं रंगास येईल; ५, कोणेक गोष्ट केली असतां शोभायाजोगा प्रसंगानुरूप त्या गोष्टीचा येतो जो समय तो; उ० शालजोडीची गोष्ट सहजांत निघाली आहे, जरतूं शालजोडी मागशील तर पहा, मागण्याचा रंग आहे; ६, कोणेक परोक्ष गोष्ट, इ० कांची कांहींएक चिन्हावरून एथें पूर्वीं अमुक गोष्ट झाली असावी, किं० अमुक स्थळीं अमुक गोष्ट एव्हां होत असावी, किं० उद्यां प्रा० अमुक गोष्ट व्हावी, इ० रूप, किं० हा चोर असावा, इ० रूप मनांत येत्ये जी संभाव्यता तो; उ० आज गर्मी होत्ये तेव्हां पाऊस पडेलसा रंग दिसतो; हें पोर फार खोड्या करतें आहे आतां मार खायाचे रंगास आलें असें वाटतें; ७, बरेपणा, बाईटपणा, हितावहपणा, इ० प्रयत्न प्रकार येविशीं ध्यानीं ल्या वर्तमान, व्यवहार, इ० गोष्टींचें लक्षण ध्यानांत येतें ते ते प्रकार

कार प्र०; उ० कां, आज तुमचे घरच्या कसा काय रंग आहे; एव्हां तुम्ही चला मग तेथें जसा रंग दिसेल तसें करतां येईल; ८, शिमगा, विवाह, इ० कांचे अंगलें एकमेकाचे अंगावर रंगाचें पाणी टाकावें असा करितात जो समारंभ तो; ९, गंजीफांतील जे राज ते आपल्या आपल्या पानांरूढ़ां प्र०; १०, खेळायाचे सोंगट्यांत जी चार चतुष्ट्यें असतात तीं प्र०; रंग सई होणें, किं० रंग होणें स्त० पक्या रंगाच्या चारी सोंगट्या आपल्या पुढील पटावर येऊन बसणें; ११, सोदेगिरी, मस्तपणा, इ० दिसायाजोग्या मनस्वी जा चेष्टा ती; स्त० भंगकरी रंग अफूकरी चाळा, तंबाखूबापडा भोळा; १२, सं० नृत्य, नाटक, मल्लयुद्ध, इ० पाहायासाठीं करितात जी सभा तो; कोणेकानें रंगांत येणें, स्त० कोणेक विषयस्फुरणाचे ठायीं मग्न होऊन इतर विषयांकडे भान न राही अशा अवस्थेतें पावणें; रंगाची मोर बांधणें, स्त० विवादिकांमध्यें ईषन्मात्र आपला जय झाला असतां आणखी दुसऱ्याचे अधिक पराजयार्थ प्रवृत्त न होतां तितक्यांत आटोपून घेणें; रा० याच अर्थीं रंगाचा मोरा बांधून येतें असा अनेक वचनांत निषेधगर्भित ही प्र० होतो; उ० त्याणें मी चुकलों म्हटलें झालें आतां काय रंगाचा मोरा बांधावयाचा आहेत.

रगड, स्त्री० चंगळ.

रगडणें, कोणेक पदार्थ दोहोंपदार्थांचे दांतींत सांपडवून, किं० वर भार घालून निष्पीडित करणें; २, रपटणें; उ० यागें पंचवीस लाडू रगडले;

भल त्याचेंच पागोटें रगडलेंनी चालला ·

**रगडपट्टी.** स्त्री॰ चंगळपट्टी ; २, रगडमल्लाचें जें कर्मती ; उ॰ नीट विचार करून अर्थ लिहीत जा उगीच रगडपट्टी करूं नका ·

**रगडमल्ल,** पु॰ ज्याचे अंगीं काम करण्याची युक्ति नाहीं आणि काम कोणत्या रीतीनें केलें असतां नीटनेटकें होईल, इ॰ विचार न करितां केवळ आंगबळानें काम करण्याचा स्वभाव ज्याचा त्यास म्ह॰; उ॰ बारीक काम असेल तें यास सांगूं नका हा आपला रगडमल्ल आहे नासून टाकील ; २, ज्याचे आंगीं स्फुरेखपणा, नाजुकपणा, नाहीं आणि सामान्यरीतीपेक्षां आकारानें मोठा असा जो दागिना, पात्र, वस्त्र, भाकर, इ॰ पदार्थ त्यास म्ह॰

**रगडमल्ली,** स्त्री॰ रगडमल्लपणा ·

**रगडा,** पु॰ संकुचित स्थलामध्यें अनेक मनुष्यादि जमले असतां होत्येजी अतिशयित दाटी तो ; २, करणारांचे, किं॰ करायास पाहिजे जो अवकाश त्याचे अल्पत्वामुळें संसारादिसंबंधी कामाची होत्येजी दाटी, जिचे खालीं करणारा थकून जातो तो ; उ॰ सारे कामाचा रगडा एकावरच पडतो त्याणें काय करावें ; आज कामाचा रगडा आहे आह्माला यावयाला फावणार नाहीं ·

**रंगडाव,** पु॰ गंजिफा खेळण्याचा एक प्रकार आहे ·

**रगडून,** अ॰ कडकाऊन ; उ॰ रगडून पाऊस पडेल तेव्हां गर्मी मोडेल ; रगडून दोन जाबसाल करावे म्ह॰

काम

काम होईल ; २, तगटून ; उ॰ रगडून जेव चालायाचें आहे ; रगडून बांध नाहींतर स्फुटेल ·

**रगडया,** ३ लिं॰ दपट्या ·

**रंगडया,** स्त्री॰ नाना प्रकारचे ढंग त्या, अनेक वचनीं प्र॰

**रंगण,** न॰ भोंवरा खेळायाकरितां मंडलाकार रेषेनें आहतजो प्रदेश करितात तें ; रंगणात येणें म्ह॰ कोणेकातें उद्देशून त्याचे परोक्ष निंदा, कज्जा, इ॰ करणारा जो कोणी त्याणें प्रसिद्धपणें तें निंदादि करायास त्याचे समक्ष येणें ; उ॰ पाठीमागें बडबडून फळ काय अवसान असलें तर असा रंगणांत ये मग पाहीन ·

**रंगणें,** वस्त्रादिक विवक्षित रंगानें विशिष्ट होणें ; २, गान, ईश्वरभक्ति, इ॰ कांची गोडी लागून नंतर कोणताच विषय रुचूं नये असा जो सुख संस्कार अंतःकरणावर होतो तद्विशिष्ट अंतःकरणानें किं॰ त्या मनुष्यादिकानें होणें ·

**रगत,** न॰ रकत ·

**रगतओढ,** स्त्री॰ रकतओढ ·

**रगदार,** ३ लिं॰ रगेल

**रंगदार,** ३ लिं॰ ज्याचे आंगीं रंग चांगला आहे तो पुष्पादि पदार्थ ; २, रंगेला ·

**रंगदेवता,** स्त्री॰ गाणें, कीर्तन, पुराण, भाषण, इ॰ कांस जिचा प्रसादानें रंग येतो अशी एक रंगाभिमानिनी देवता मानितात ती ·

**रंगपंचमी,** स्त्री॰ फाल्गुन वद्य पंचमी ·

**रंगबाजी,** स्त्री॰ रंगडाव ·

**रंगमहाल,** पु॰ नाना प्रकारचे विलास करायाकरितां

रितां आरसे, चित्रें, इ० कांनीं स्रुशोभितजी श्रीमंतलोक जागा करितात तो ·

रंगमूर्ति, स्त्री० सं० कीर्तन, गायन, इ० कांस रंग येण्यास कारणभूत जे सभ्य रसिकजन त्यांस स्तुतीनें स्र०

रंगलूट, स्त्री० गंजीफांचे डावांत सर्वांचीं पानें एक रंगाचीं च पडलीं असतां तो हुकूम फुकट जातो आणि पानें सर्वांनीं लुटून घ्यावीं असा एक प्रकार आहे ती ·

रंगविणें, कोणाएकाचे तोंडावर चारवविणें ·

रगाडा, पु० रगडा; २, चरक रस काढायाचा ·

रंगामेजी, स्त्री० दिवाणखाना, इ० स्थलांस नाना प्रकारचे रंगानीं चित्रें, वेलबूट, काढून शोभार्थ चितरण्याचा जो संस्कार ती ·

रंगारी, पु० वस्त्रें रंगवून उपजीविका करितात अशी एक जाति आहे ·

रंगी, ३लिं० रंगेला जो मनुष्य तो ·

रंगीत, ३लिं० कुसुंबा, हिंगूळ, इ० रंगानें रंगविलेला जो वस्त्र, काष्ठ, इ० पदार्थ तो ·

रंगीन, रंगील, ३लिं० दे० रंगेला ·

रंगीला, ३लिं० रंगीन

रंगेल, ३लिं० ज्याचे आंगीं रग बहुत असा जो मनुष्य, अश्व, इ० तो ·

रंगेल, रंगेला, ३लिं० गाणें, तमाशा, स्रक्चंदनादि विषयांचा उपभोग, थट्टा, मस्करी, या विषयांवर ज्याची फार रुचि असा जो आनंदी, रसिक, मनुष्य तो ·

रंगेली, ३लिं० रंगेला ·

रग्या, ३लिं० रगेल ·

रघत, न० दे० रगत ·

रघतरोडा, पु० रक्तरोडा ·

रचणी, स्त्री० दे० रचण्याचा जो व्यापार ती ·

रचणें, दगड, विटा, किं० वाक्यें, पदें, पदार्थ, इ० जे अवयवभूत पदार्थ ते एकावर एक, एकापुढें एक, इ० विवक्षित प्रकारें परस्पर संबद्ध करून भिंत, गंज, श्लोक, मसलत, इ० अवयविभूत पदार्थ निर्मिणें; २, विवक्षानुरूप आकार होई, असें दगड, भांडीं, इ० पदार्थ एकावर एक एकावर एक मांडणें ·

रचना, स्त्री० भिंत, गंज, श्लोक, इ० किं० तदवयव जे दगड, पदें इ० त्यांचा रचण्याचा जो व्यापार, किं० प्रकार ती; उ० मी पदें योजलीं आहेत आतां श्लोकाची रचना मात्र करायाची आहे; अनेक पदांची एकापुढें एक एकापुढें एक अशी रचना केली असतां श्लोक होतो; या किल्ल्याची रचना चांगली आहे; २, अवयव रचून सिद्ध होतो जो अवयवी ती; उ० भिंत, स्र० एक रचनाविशेष आहे ·

रचित, ३लिं० रचलेला जो तो ·

रज, न० सं० धूळ; २, पुष्पसंबंधी जो पराग तें; ३, स्त्रियांचें रुतुसंबंधी जें रुधिर तें; ४, रजोगुण ·

रज, पु० स्रुवर्णादि धातूंचा जो केवळ बारीक कण तो; रजाचा गज करणें, स्र० पोषण पालनादिकें करून कोणएकास लहानाचा मोठा करणें ·

रजई, स्त्री० वस्त्राचे पोटीं कापूस घालून शिंवून निजते समयीं पांघरायास जें पांघरुण करितात ती

रंजक, पु० परीट.

रंजक, ३लिं० भाषणादिद्वारा दुसऱ्याचें अंतःकरण रंजविणारा तो; याचे समास मनोरंजक, सभारंजक, जनरंजक, इ० जाणावे.

रंजक, स्त्री० बंदूक, तोफ, इ० पेटवायाकरितां त्याच्या कान्यावर घालितात जी दारू ती; २, फटाका, तोटा, बाण, इ० कांमध्यें जी दारवेची बातकरून भरित असतात ती; रंजक पिणें स० तोफ, इ० कांचा कान्यावरची मात्र दारू जळून बार न होतां राहणें, रंजक उडणें, झडणें, इ० स्थलीं चकमक झडणें.

रजःकण, पु० सं० धूळ, पराग, इ० कांचा जो बारीक कण तो.

रंजकदाणी, स्त्री० रंजकेची दारू ठेवायाचें जें आकारविशेषाचें पात्र असतें तें.

रंजणें, कोणेक शब्दादिविषय गोड लागल्यामुळें अंतःकरण सुखरूप होत्सातें उद्वेगादि दुःखें विसरून त्या विषयावर लागून राहणें पक्षीं तादृश अंतःकरण विशिष्ट मनुष्यादिकांसही कर्तृत्व होतें.

रजत, न० सं० रुपें प्रथमार्थी.

रंजन, न० गान, सुभाषित, इ० विषय सेवित असतां उद्वेगादि दुःखाचा विसर पडून अंतःकरणास होत्येजी सुखरूपता तें; मनोरंजन, सभारंजन, इ० स०

रजनी, स्त्री० सं० रात्रि.

रजपूत, पु० एक हिंदुलोकात हिंदुस्थानांत जाति आहे.

रजब, पु० [illegible] हिं० यवनी महिन्यांतील सातवा मास तो.

रजस्वला, स्त्री० सं० ऋतुमतीजी स्त्री ती.

रजा, स्त्री० [illegible] हिं० कांहीं एकं कार्याविषयीं जें कोणएकाचें अनुमत ती; २, चाकरास चाकरीवन कांहीं काल किं अगदीं देतात जो निरोप ती; ३ कोणी कोणास आपल्याजवळून इतरत्र जाण्यास देतात जो निरोप ती.

रजावंतीनें, अ० कोणाएकाचा अंतःकरणाचा रतोषानें; उ० त्याचे रजावंतीनें हें वस्तु मी आणिलें.

रंजित, ३लिं० सं० अनुरंजित.

रंजीस, ३लिं० उत्साह, मनोरथ याचा भंग झाल्यामुळें खिन्न झालाजो मनुष्यादि तो; कोणेकानें रंजीस येणें स० मत्यास येणें, उ० या दुखण्यानें मला रंजीस आणलें; हें किडबीड लिहिणें यानें तर मी रंजीस आलों बा.

रजोगुण, पु० सत्वादिक जे प्रकृतीचे तीन गुण आहेत त्यांतील एकजो गुण जाचे योगानें विषयादि प्रीति, काम, इ० उत्पन्न होतात तो.

रजोगुणी, ३लिं० जामध्यें रजोगुण बहुत आहे तो.

रजोदर्शन, न० सं० ऋतुदर्शन.

रज्जब, पु० हिं० रजब.

रज्जु, स्त्री० सं० दोरी.

रझळणें, जा कामास विशेष खेपा, इ० प्रयत्न नको हें मनांत असतां तेथें करावा याचयाजोग्या तादृश प्रयत्नानें युक्त होणें.

रटमट, अ० भात, इ० कानें सशब्द शिजणें, वाजणें इ०

इ० वि० रटमट होणें, करणें, ह्म० भात, इ० कानें शिजतांना रटमट वाजणें

रटमरणें, भात, इ० कानें शिजत्येसमयीं रटमट असें वाजणें.

रटरट, अ० रटमट.

रटरटणें, रटमटणें.

रटाला, ३ लिं० लठ्ठ दांडगा जो मनुष्य, किं० सूत, वस्त्र, भाकर, दागीना, इ० पदार्थ तो.

रट्ट, पु० मनुष्यादिकांचा दाट जमलेला जो समुदाय तो; २, जाडजी भाकर तीस निंदेनें ह्म०

रट्टा, पु० मुष्टि, इ० कांचा जो दट्टा तो; २, रटाला जो पदार्थ त्यास ह्म०; ३, कामाचा रगाडा तो; ४, मनुष्यादिकांचा जो मुसांडा तो.

रड, स्त्री० कांहीं काल सतत रडत असावें अशीजी पोर इ० कांस अवस्था होत्ये ती; ये, लाग, इ० धा० योगीं प्र०; २, शोक, दुःख, इ० संबंधी जा गोष्टी ती; उ० मला अन्न नाहीं, वस्त्र नाहीं, सासू गांजत्ये, अशी रड दिवसभरही लोकांपाशीं सांगत फिरत्ये; ३, कोणेक गोष्टीचे घडगतीचे प्रतिपक्षीचा जो भाव ती; उ० यंदा पावसाची रडच दिसत्ये; रड गाणें, ह्म० रड सांगणें; कोणेकानें रडीस येणें, ह्म० कोणेक कामांत अतित्रासल्यामुळें, किं० थकल्यामुळें, किं० चिरडीस आल्यामुळें, आतां रडेल असें वाटायाजोग्या दशेस येणें.

रडका, ३ लिं० निरंतर रडण्याचा स्वभाव जाचा तो मुलगा, इ० किं० कोणएक कार्याविषयीं जाला उत्साह नाहीं, निरंतर रडगाल असावें अशा स्वभावाचा जो मनुष्य, किं० तसा त्याचा कारभार, बोलणें, इ० तो; २, रडत्येसमयींचे सारखेंजें मुख, ती मुद्रा, तो शब्द, भाषण, इ० तो.

रंडका, पु० विधुर.

रंडकी, स्त्री० विधवा स्त्रीस निंदेनें किं० दुर्बलत्ववर्णन प्रसंगी ह्म०

रंडकीमुंडकी, स्त्री० दे० केवळ निराश्रित अतएव दुर्बळ जी विधवा ती.

रंडकुंडा, ३ लिं० रडण्याचे पूर्वदशेस आल्यामुळें आतां रडेल अशी जाची मुखश्री दिसों लागली तो; किं० त्याचेनें तसें तोंड तो.

रडकुंडीस, अ० येणें, किं० परतणें, यांचा योगीं प्र०; कांहीं कामांत अतित्रासल्यामुळें, किं० कांहीं दुःख सोसवेनासें झाल्यामुळें आतां रडूं लागावें अशा दशेतें पावणें.

रडगाणें, न० रड द्वितीयार्थी.

रंडगोलक, पु० विधवेचा गर्भीं जारापासून उत्पन्न होऊन एक जाति झाली आहे तो.

रडणें, शारीरव्यथा शोक, हर्ष, प्रेम, इ० कांचे योगें अंतःकरण शिथिल झाल्यामुळें बाष्पोद्गम होऊन मुखविकास व्हावा, कंठांतून ध्वनि निघावा अशीजी क्रिया होत्ये तद्विशिष्ट कोणेकानें होणें; २, कोणेक गोष्टीविषयीं रड गाणें; ३, कोणेकानें उद्देशून शोक करणें; उ० सी तुझ्याला कशाला शब्द लावूं आपले कर्मास रडतों; ह्म० सदा मरे त्याला कोण रडे; ४, कोणेक व्यवहार दुर्दशारूप परिणामास पावणें; उ० चार दिवस मामलत होती तीही रडली, आतां लागले भीक मागायाला; ५, उद्योगाची निष्फ

लता वर्णनीयअसतां कांहींएक व्यापार करणें याअर्थी निंदेनें प्र॰ करितात; उ॰ आजपर्यंत मामलत रडत होती तेव्हां काय आम्हाला दिलें त तें आतां देणार; तुम्ही कामकराल रडाल. वाढूक आहे; ६, कोणेक कर्माचा परिणाम अनिष्ट झाल्यामुळें खेदविशिष्ट होऊन राहणें; उ॰ तूं लौकर जा म्हणून तुला सांगतों तूं जात नाहींस मग रडशील; याअर्थी रडत जाणें, बसणें, येणें, असे प्र॰ प्रा॰ होतात; रडतराऊत घोडयावर बसविणें म्ह॰ ज्यास ज्या कामाविषयीं उत्साह नाहीं आणि नाहीं नाहीं म्हणतो त्यास त्या कामाविषयीं प्रार्थनादिकें करून दुसऱ्यानें प्रवृत्त करणें·

**रडतखडत**, अ॰ करणारास जें उत्साहादि असावें आणि कार्यामध्यें जी त्वरा, सत्वरपणा, इ॰ असावें त्यांवांचून मंदपणें सरासरी कांहींएक काम होणें, करणें, चालणें, इ॰ वि॰

**रडतरडत**, अ॰ रडतखडत·

**रडतलक्ष्मी**, स्त्री॰ सर्वकाल ज्यास उत्साह नाहीं आणि रड गाण्याचा स्वभाव ज्याचा असा जो पुरुषादिक त्यास किं॰ रडकें जें पोर, इ॰ त्यास म्ह॰

**रडतोंड्या**, ३लिं॰ सर्वकाल रड गाण्याचा स्वभाव ज्याचा तो; किं॰ रडतोच आहे काय अशी ज्याची मुद्रा दिसत्ये तो·

**रडवा**, ३लिं॰ रडका; रा॰ रडवा परतणें म्ह॰ रडें आल्यामुळें मुखश्री पालटे अशा अवस्थेतें कोणेकानें पावणें·

**रंडा**, स्त्री॰ सं॰ रंडकी·

**रडारड**, स्त्री॰ कोणी मेला, गेला, इ॰ कारणानें मोठें दुःख झालेअसतां अनेकांनीं रडूं लागावें असा जो व्यापार चालतो ती·

**रडारोई**, स्त्री॰ रा॰ शोकादिकानें अतिशयित रडणें, ऊर बडवून घेणें, इ॰ रूप जो आकांत ती·

**रडिवणें**, कोणेकानें कोणेकास दुःख देऊन रडूस आणणें; उ॰ मला या कामानें दोन वर्षें रडिलें तेव्हांएकदां शेवटास गेलें·

**रडी**, स्त्री॰ रा॰ रड्डी; रडीस येणें म्ह॰ रड्डीस यणें

**रंडी**, स्त्री॰ वेश्या, कसबीण, दासी, इ॰ रूप जी सामान्य वनिता ती; २, दे॰ गंजीफांतील जी नार ती; ३, रड्डी·

**रंडीखोर**, ३लिं॰ दे॰ रंडीबाज·

**रंडीबाज**, ३लिं॰ वेश्या, इ॰ रंडीचें व्यसन ज्यास आहे तो·

**रंडीबाजी**, स्त्री॰ रंडीबाजाचें कर्म ती·

**रंडीवाल, रडीवाल**, ३लिं॰ रड्डी खाण्याचा किं॰ रड्डीस येण्याचा स्वभाव ज्याचा तो·

**रडूं**, न॰ रडें

**रडूंरडूं**. अ॰ करणें याचा योगीं प्र॰ कोणेका कामाविशीं कोणेकास प्रवर्तवीत असतां त्याणें अत्साहामुळें अनेकप्रकारची रड गाणें·

**रडें**. न॰ शोक, भय, दुःख, प्रेम, हर्ष, इ॰ कारणें अंतःकरण शिथिल होऊन बाष्पोद्गम, मुखविकास, कंठध्वनि, इ॰ व्हावयाजोगा जो विकारविशेष होतो तें·

**रड्डी**, स्त्री॰ दे॰ खेळामध्यें जो लबाडीनें खोटें खेळण्याचा प्रकार ती; खाणें, घेणें, या धातूंचा योग होतो; रड्डीस येणें म्ह॰ आपल्यावर डाव लागल्य

गल्यामुळें चिरडीस यणें.

रड्डीखोर, रड्डीवाल. ३ लिं० रंडीवाल.

रडया, ३ लिं० सर्वकाल रडण्याचा स्वभाव ज्याचा तो; २, ला० केवळ मंद चालणारा राहाट्या बेल. इ० त्यास म्ह०

रण, पु० सं० युद्ध; रणवीर, रणधीर, रणशूर, रणगंभीर, रणवाद्य, रणतूर्य, रणभूमि, रणांगण, इ० समास जाणावे; रण घुमणें म्ह० पूर्वी ज्या ठिकाणीं रण झालें होतें त्या ठिकाणीं पिशाचादिकांचा शब्द होत असणें.

रणकंदळ, न० रा० परस्पर आवेशानें जें पराकाष्ठेचें युद्ध तें; २, ला० ज्यांत हाणामारी, अरेतुरे, होत्ये असें जें पराकाष्ठेचें कज्जा, भांडण, इ० तें.

रणखांब, पु० युद्ध करायाचें असतां उभय सेनेच्या मध्यें मर्यादार्थ जो स्तंभ पुरितात तो.

रणंग, स्त्री० फोड येतात आणि आग होत्ये असा एक रोग आहे ती.

रणगाडा, पु० ओझें वहायाचे उपयोगीं जो मोठा गाडा तो; २, रा० बेल, घोडें, यानीं ओढायाचा जो तोफेचा गाडा असतो तो.

रणतुंबळ, न० तुमुल जें युद्ध तें; २, ३ लिं० अतिशयित जें भांडण, मारामार, कज्जा, इ० त्यास म्ह०

रणनफरा, पु० जो बाहेर चालला असतां पुढें होलारानीं वाद्यें वाजवीत असावें आणि पागोट्याचे समले फडकले असावेत, इ० डौल बाळगणारा जो शिपाई तो.

रणधीट, ३ लिं० युद्धांत ज्यास भय वाटत नाहीं असा जो शूर, मनुष्यादि तो.

रणरण, स्त्री० मध्यान्हादि समयीं सूर्याचे उन्हाचे संतप्ततेचा होतो जो अतिशय जेणेंकरून बाहेर पहायासही कठीण पडतें ती; रणरण करणें म्ह० मध्यान्ह समय, ऊन, निखारे, ज्वरविशिष्ट शरीर, इ० कानीं स्पर्शन, दर्शनादि करण्यास अशक्य पडायाजोगी अति संतप्तता पावणें.

रणरणणें, मध्यान्हादि समयीं उन्हाची उष्णता अतिशय दशेतें पावणें; उ० ग्रीष्मर्तु लागतांच रण रणूं लागलें; २, ऊन, निखारे, इ० कानीं अतिशयित संतप्त होणें; उ० चुलींत निखारे रणरणतात.

रणरणीत, ३ लिं० अतिशयित संतप्त जें शरीर, निखारे, ऊन, इ० तो.

रणवाद्य, न० रणांत वीरांस ज्याचा नादानें उत्साह प्राप्त होतो अशीं जीं शंख, दुंदुभि, इ० वाद्यें तीं प्र०

रणशिंग, न० वाजवायाचें जें पितळेचें शिंगासारिखें वाद्य असतें तें.

रणस्तंभ, पु० रणखांब.

रणाग, पु० रणंग.

रत, ३ लिं० सं० ज्या विषयावर ज्याची प्रीति तो त्या विषयीं; उ० विषयरत, स्त्रीरत, कामरत, कर्मरत, इ० समास जाणावे; २, न० मैथुन.

रतणें, रमणें प्रथम तृतीयार्थी; उ० चित्तवृत्ति रतली हरिपायीं.

रतन, न० रत्नाचा अपभ्रंश.

रतनजोत, स्त्री० डोळ्यांत घालायाचे उपयोगीं औषध आहे.

**रतनपारखी**, पु० रत्नपारखी.

**रतनबाव**, स्त्री० रा० लहानजें पाटाचें पाणी वाहात असतें तें शिंपायाकरितां सांचवून ठेवायासाठीं जीहवदासारखी खळी करितात ती.

**रतल**, पु० रत्तल

**रताळी**, स्त्री० रताळ्याची जीवेल ती.

**रताळूं,रताळें**, न० एकभक्षणोपयोगी मूळ आहे तें.

**रति**, स्त्री० कांहीं एक विषयाचाठायीं प्रीतिपूर्वक जीआसक्ति ती; २, मैथुन; ३, कामदेवाचीजी स्त्री ती; ४, शृंगाररसाचाजो स्थायी भाव होतो ती.

**रती**, स्त्री० पुं० मोत्यें,हिरे,इ० वजन करण्याचें एक वजन आहे,जा चारगुंजा भार तीन भरतात; २, देवदशा.

**रतीब**, पु० उकाडातूनी यार्थी; २, खुराक.

**रत्तल**, पु० स्रुर्ती छतीसरुपयेभारजें वजन तो.

**रत्न**, न० हिरा,माणीक,मोतीं,इ० तें; रत्नपरीक्षा,रत्नशाला,इ० स०; २, समुद्रमथनापासून उत्पन्न झालेजे चंद्र,अमृत,लक्ष्मी,इ० चतुर्दशपदार्थ ते प्र०; ३, ला० सामान्यरीतीपेक्षां विशेषगुणेंकरून विशिष्टजो त्यास इतरांपेक्षां उत्कृष्टता वर्णनीय असतां आरोपानें स्म०; उ० हा घोडा एक रत्न आहे; ४, संसार,सभा,इ० अधिकरणजाचें योगानें शोभतें आणि जाचे अभावीं विशोभित दिसतें असाजो मूल,पंडित,दीप,इ० पदार्थ तें; उ० संसारांत मूल हें रत्न आहे.

**रत्नखचित**, ३ लिं० हीरकादिक रत्नें अनेक जास जडलीं आहेत असाजो सिंहासन,अलंकारादिक तो.

**रत्नजडीत**, ३ लिं० रत्नखचित.

**रत्नदीप**, पु० सं० दीपकार्य निर्वाहक प्रकाशकजें रत्न तो; पातालादिलोकीं कथाप्रसिद्ध आहे.

**रत्नपारखी**, ३ लिं० रत्नांची पारख आहे जास तो.

**रत्नाकर**, पु० सं० रामेश्वरापासून आलीकडील पश्चिमेचे आंगचाजो समुद्र तो; २, सामान्यसमुद्रासही स्म०

**रथ**, पु० प्रा० घोड्यानीं ओढीन न्यावयाचें चक्रानीं विशिष्ट असें एक राजादिकांचें वाहन आहे.

**रथकार**, पु० शास्त्रप्रसिद्ध एक हिंदूतजाति आहे.

**रथसप्तमी**, स्त्री० माघशुद्ध सप्तमी.

**रथी**, पु० सं० मुख्यस्थानीं रथावर बसलेला असतोजो योद्धा तो; २, रथावर बसून एका रथस्थासहवर्तमान एकदा युद्ध करणाराजो वीर तो.

**रथोत्सव**, पु० सं० वाजतगाजत देवाचारथ मिरवतआवा असाजो उत्सव करितात तो.

**रथोत्साह**, पु० सं० रथोत्सव.

**रद**, ३ लिं० रद्द.

**रदकर्ज**, न० हिं० घेतल्याकर्जाचीजी फेड तें; २, मागील रहात आलेलें जें जुने कर्ज त्यास कोणी स्म०

**रदबदल**, स्त्री० कोणेकानें स्वेष्टकार्याविषयीं प्रवृत्त व्हावें,किं० त्यानिष्ठापासून निवृत्त व्हावें एतदर्थ त्यासभीड घालण्याचाजो व्यापार ती.

**रदबदली**, स्त्री० हिं० रदबदल.

रद्द, ३ लिं० तत्तव्द्यवहारीं अनुपयुक्त कोटींत गणनी-यझालाजो तो; होणें, पडणें, असणें, इ० धा०प्र०; उ० हीचांगली पोथी मिळाल्यापासून ती पहिली रद्द पडली.

रद्दा, पु० दे० माती, रोण, इ० कांचाजो गारा तो.

रद्दी, स्त्री० रद्द झालेलेजे कागद, त्यांचा समुदायतो

रंधणें, लांकूड रंध्यानें साफ करणें.

रंधन, न० भात, इ० शिजविण्याचाजो व्यापार तें.

रंधप, न० कों० रांधप.

रंधपी, पु० रांधपी.

रधवणें, रा० रुधेअसा करणें.

रंधा, पु० सुताराचें लांकूड साफ करायाचें एक आऊत आहे तो व त्याणें करितातजो लांकूड साफ करण्याचा संस्कार तो.

रंध्र, न० सं० छिद्र; रंध्रान्वेषण, रंध्रान्वेषी. इ० स०

रप, कण, कन, कर, दिशीं, दे० अनु० तव्हाताने शरीरावर मारणें; चिखल, इ० कांत पाय, इ० जाणें, भरणें, इ० कांचें वि०

रपका, पु० दे० धपाटा.

रपटणें, दे० रपाटणें.

रपाटखान, पु० सामान्यप्रमाणापेक्षां मोठाअसून नाजूक नव्हे असाजो पदार्थ त्यास स०

रपाटणें, दपटणें प्रथमार्थावांचून.

रपाटा, पु० चपराकेचाजो मोठा प्रहार तो; २, पिशाचबाधा या अर्थावांचून झपाटा तो; ३, रपाटखान; उ० केवढी थोरली रपाटा भाकर; या अर्थी आरोपानें प्रयोग होत असतांही पक्षीं विशेषणवत् लिंगकार्येंही होतात; उ० केवढी रपाटी भाकर.

रपाटून, अ० रगडून.

रफू, स्त्री० पु० वस्त्राचें छिद्रादि बुजवायाकरितां सुईनें सूतें भरून संधान करण्याचा एक प्रकार आहे; २, तेणेंकरून उत्पन्न होतोजो वस्त्रभाग तो तो.

रफूगार, पु० रफूचें कसब करून उपजीविका करितो तो.

रफेदफे, अ० दफेरफे.

रफूत, पु० कोणेक कर्माच्या नेहेमाजो व्यासंग तो; उ० आलीकडे घोडयावर बसण्याचा माझा रफूत मोडला; २, कोणेकस्थलीं कोणेकाचाजावें यावें असा असतोजो परिपाठ तो.

रबक, न० एक ततुवाद्य आहे.

रबकण, रबकन, अ० रपकन.

रबकर, रपदिशीं, अ० रबकण.

रबडगा, पु० अनेक कामाचाजो दबडगा तो.

रबरब, अ० शब्द होई असें चिखल, इ० कांत गमनादिप्रसंगीं पाय जाणें, किं० ते पाय वाजणें, इ० क्रियांचें वि०

रबरबां, अ० रबरब.

रबरबीत, ३ लिं० पिंड करूं गेलें असतां होऊं नये इतका पातळ झालाजो चिखल, पीठ, इ० पदार्थ तो.

रबाब, न० एक ततुवाद्य आहे.

रबिलाखर, पु० ربيع हिं० यवनी महिन्यांतला चवथा मास

रबिलावल, रबिलोवल, पु० ربيع الاول हिं० यवनी महिन्यांतील तिसरा महिना.

रबी, स्त्री० हिं० पर्जन्यकाळ समाप्त झाल्यानंतर पिकणारें जें दिरल गहूं, शाळू, इ० धान्य ती·

रब्बी, स्त्री० ربیع हिं० रबी·

रंभा, स्त्री० सं० एक अप्सरा स्वर्गीं आहे; २, कदली वृक्ष; ३, पु० यवन काठायाचें एक आऊत आहे·

रमजान, पु० رمضان हिं० यवनी महिन्यांतील नवबा महिना तो·

रमण, न० कांहीएक विषयाचाठायीं चित्ताचा रमण्याचा जो व्यापार तें; २, पु० जा स्त्रीचा उपभोक्ता जो पुरुष तो तिचा; उ० राधारमण, सीतारमण, इ०

रमणकद्वीप, न० सं० एक द्वीप आहे·

रमणा, पु० भोंवता कांहीं भिंत, इ० रूप आधारकरून अनेकांस दक्षिणा दियावयाकरितां जें रमणीय स्थल करितात तो·

रमणी, स्त्री० सं० कांता·

रमणीक, ३लिं० रमणीय जें स्थल तो·

रमणीय, ३लिं० दर्शनादिद्वारा ज्याचे साक्षात्कारानें चित्त समाधान पावून ज्याजवर बसतें असा शोभिवंत जो जागा, मूर्ति, देवालयादि रचना, काव्यादि प्रतिपादित अर्थ, इ० तो·

रमणें, कांहींएक विषयाची गोडी लागल्यामुळें तेथें चित्तवृत्तीनें आसक्त होऊन राहणें; उ० पुष्पाचे सुगंधावर भ्रमर रमतो; २, बागबगीचा, चांदणें, इ० उपभोग्य जे विषय तदुपभोगद्वारा कोणेकानें चित्तवृत्तीस विनोद करीत काळ घालविणें; उ० लवकर जा वाटेस रमूं नको; ३, कोणेकानें कोणेकाशीं मैथुनार्थ संगत होणें·

रमतरमत, अ० हिं० बाग, बगीचा, चांदणें, वायु, इ० कांचे उपभोगद्वारा करमणूक करीत करीत जाणें येणें, चालणें, इ० कांचे वि०; उ० एकदा पुढें कशाला जातोस एकमेकांचे सोबतीनें रमतरमत जाऊं·

रमतेरमते, अ० हिं० रमतरमत·

रमल, पु० رمل हिं० पंचरशी फांसे करून तद्द्वारा मुहूर्तादि पाहायाचें एक यवनी शास्त्र आहे तो·

रमली, ३लिं० हिं० रमल जाणणारा तो; किं० रमल संबंधी फांसे, मत, इ० तो·

रमा, स्त्री० सं० विष्णूचीजी स्त्री ती·

रमारम, रमारमी, स्त्री० हिं० परस्पर एकमेकांत वजा करायाची जमा, आणि खर्च, एतद्रूप कोणेक व्यवहारसंबंधी जीं दोन प्रकरणें त्यांची बरोबरी ती; उ० यंदांचे व्यवहारांत तोटा नाहीं, नफा नाहीं, रमारमी झाली; हिशेब केला असतां आमची बाकी त्याजकडे निघणार नाहीं, त्याची आमचेकडे निघणार नाहीं सरासरी रमारमी होईल असें वाटतें·

रम्य, ३लिं० सं० रमणीय·

रयत, स्त्री० हिं० राजा, पाटील, कमावीसदार, इ० जे भूमीचे धनी त्यांचे भूमीची वसती, कृषि, इ० द्वारा वहिवाट करून त्यांचे सत्तेंत राहणारा जो लोक तो त्या राजादिकांची·

रयताचा, पु० रयतपणा; २, कों० रयतेचा जो समुदाय तो; उ० त्या राज्यांतील रयताचा सुखी आहे·

रयाळ, पु० एक रुप्याचें नाणें आहे·

रर, अ० करणें याचायोगीं प्र०; रर करणें·

रव, स्त्री० एकापाठीमागून दुसरा त्याचेमागून तिसरा, अशा क्रमानें गमन करणारे मनुष्यादिकांची

किं० उत्पन्न होणारांची सतत लागलीजी ओळ ती; २, पु० सं० व्यक्ताव्यक्त जो साधारण शब्द तो; कंठरव, मेघरव, इ० स०

**रवका**, पु० रा० कांहींएक रवाळपदार्थाचा जमलेला, किं० तोडून काढलेला जो लहानसा गोळा, तुकडा, तो; उ० कलिंगड चांगलें असलें ह्मणजे त्याचे रवके तोडतोडून खावयास बरे·

**रवरवींब**, पु० रा० घराचे रवीस ज्या रवांबण्या देतात त्या प्र०

**रवण**, न० दे० मुंग्यांचा जो समुदाय तें·

**रवणें, रंवणें**, रोंवणें या अर्थी·

**रवंथ**, न० पु० गोमहिष्यादि द्विशफ पशु एकदां सरासरी चाऊन गिळलेला चारा पुनः बारीक करायासाठीं मुखांत बाहेर आंग्रून चघळण्याचा करितात जो व्यापार तें तो·

**रवंथणें**, रा० रवंथ करणें; २, ला० कोणेक पदार्थ चघळीत चघळीत पुष्कळ वेळ खात बसणें·

**रवँदळणें, रवँदाळणें**, ढवळणें, इ० द्वारा पाणी, इ० तळचा मळ वर येऊन गढूळ होई असें करणें·

**रवँदाळा**, पु० रवंदळण्यामुळें झाली जी पाणी, इ० कांची दुर्दशा तो·

**रवँधें**, न० ग० अनेकप्रकारचें उष्टेंमाष्टें अन्न एकत्र कालवलेलें जें गोमहिष्यादिकांस खायासाठीं ठेविलें असतें तें·

**रवरव**, स्त्री० शैत्यादिकानें शरीरास, किं० अक्कलकारा, पिंपळी, इ० भक्षिल्यामुळें जिव्हेस जो वेदनाविशेष उत्पन्न होतो ती.

**रवरवणें**, शरीर, किं० तदवयव रवरवीनें युक्त होणें·

**रवरवी**, स्त्री० रवरव; २, एक औषधी आहे जीचें पुष्प खाल्लें असतां जिव्हेस रवरव स्फुरते ती·

**रवळनाथाचें कूळ**, न० रा० ज्याचे घरीं धान्यादिकाची आठचार दिवसांची देखील बेगमी नाहीं, असा जो उत्पन्नभक्षी दरिद्री त्यास ह्म०

**रवळी, रॅंवळी**, स्त्री० रोंवळी·

**रवा**, पु० कणीक, तांदळाचें पीठ, इ० कांतील केवळ बारीक अंश निराळा काढिला असतां जो जाडा कणांश राहतो तो; २, गूळ, साकर, कणेदार तूप, इ० जे, तत्संबंधी जो कणांश तो; ३, गुळाची ढेंप, किं० गूळ, साकर, इ० कांचा जो खडा तो; ४, सोनें, रुपें, इ० कांचा जो रज तो; किं० अलंकारादिकांस जोडणें, इ० विषयीं उद्दिष्ट जो त्यांचा तुकडा तो; कोणेकानें रवा काढणें ह्म० तप्त तेलांतील धातूचा तुकडा दिव्यार्थ बाहेर काढणें; ५, कुंकुमाद्यर्थ तासून रंगवितात जें हळकुंड तो; ६, रहाटाचे कणेकडास, किं० गाडी, इ० संबंधी चाकाचे माढ्यास सभोंवताले उभे मारिले असतात जे लांकडाचे तुकडे ते प्र०

**रवानगी**, स्त्री० हिं० पाठवणी; २, विवक्षित कार्योद्देशें करून देशांतरीं फौज, किं० दारूगोळा, इ० द्रव्य गलबत, इ० पदार्थाचें जें प्रेषण ती·

**रवाना**, ३ लिं० हिं० करणें किं० होणें याचा योगीं प्र० अ०; कागद, इ० पदार्थ, किं० मनुष्यादि स्थानस्थलांतरीं जावयाकरितां मार्गस्थ करणें, किं० त्याणी होणें; रवाना चंद्र, रवाना मिती ह्म० ज्या दिवशीं कागद रवाना होतो त्या दिवसाचा चंद्र, मिती, असा अर्थ·

रखास्फदगी, स्त्री० रोरवे, सनदा, चिठ्या, इ० आअ-वरवार करितात तो कागद ती.

रवाळ, ३लिं० दाणेदार जी साकर, गूळ, इ० पदार्थ तो.

रवि, पु० सं० सूर्य; २, रुई ह्मणून झाड तो.

रविवार, पु० आदिनवार.

रविवासर, पु० सं० आदितवार.

रवी, स्त्री० दधि घुसळायाकरितां जें काष्ठाचें यंत्र करितात ती; २, रा० घराचा तुळ्यांवरच इंद करदिलें असतां मांडाबळ वेंगणी होत्ये ह्मणून त्या तुळयांवर हात दोनहात लहान रवाकण्या देऊन जो उंचीकडला भाग वाढवितात ती.

रवेकड, न० रहाट, भाक, यांस रवाळ्या वयाजोगें जें लांकूडतें.

रवेस, पु० स्त्री० संसारादिकां विषयीं उत्तमजी रीति तो ती.

रशीक, ३लिं० रसिकाचा अपभ्रंश.

रश्मि, पु० सं० किरण.

रस, पु० जिव्हेनें ज्याचें प्रत्यक्ष होतें असाजो भक्ष्यादिपदार्थनिष्ठ, खारटपणा, तिरवटपणा, तुरटपणा, मधुरपणा, इ० जो गुण तो; २, ज्याचा अंतःकरणांत संचार होऊं लागला ह्मणजे रति, उत्साह, कारुण्य, विस्मय, हास्य, भय, कंटाळा, क्रोध, हे भाव उत्पन्न होतात, असेजे नायक, नायिका, वीरपुरुष, इ० कांचा हृदयांत अंतःकरणवृत्तीचे भेदक शृंगारादि भाव होतात ते प्र०; ३, भाषणादिव्यवहारामध्यें जी गोडी असत्ये ती; उ० आतां याचा बोलण्यांत अगदी रस नाहीं; आतां या व्यवहारांत कांहीं रस राहिला नाहीं; ४, पदार्थाचा ठायीं जो द्रवांश असतो तो; उ० धोत्र्याचा रस काढून धांवऱ्यास लावावा ह्मणजे बरें होतें; ५, औषधादि कोणेक पदार्थांत मिसळल्यामुळें त्यांतील कांहीं अंश घेऊन निघतें जें पाणी तो; ६, रूप्यादि धातूंचाजो अग्निसंयोगानें द्रव होतो तो; ७, तेल, तूप, गूळ, मीठ, इ० जे शास्त्रपरिगणित आहेत ते प्र०; ८, सं० पारद; ९, गंधक; १०, उदक.

रसकणें, रा० कांहींएक विषयावर लक्ष्य लागल्यामुळें कांहींएक काल तिकडेच रमणें; उ० त्या मुलाला कांहीं खेळणें देऊन अंमळसा रसकीव आणि तूं जेवून घे.

रसकापूर, पु० एक औषधोपयोगी पदार्थ आहे.

रसद, स्त्री० हिं० गांवचा कमाविसदार, महालकरी, इ० अधिकारी प्रजांपासून घेऊन सरकारांत भरितो जें द्रव्य ती, किं० गांव, इ० संबंधी मामलत, इ० अधिकार पतकरून तत्संबंधी पूर्वींचजें सर्कारांत द्रव्य भरितात ती.

रसदभरणा, पु० मामलतीसंबंधी रसदेचा जो भरणा तो; २, फौजेचे बरदास्तीकरितां यामांतरादिकांपासून पाठवितात जें धान्य, दारू, गोळा, इ० सामान ती.

रसदी, ३लिं० हिं० सर्कारांत रसद देऊन पतकरून घेतलेलाजो गांव, महाल, इ० तो.

रसना, स्त्री० सं० जिव्हा रस जाणण्याचा विषय असतां प्र०

रसनेंद्रिय, न० सं० रसनारूपजें इंद्रिय तें.

रसबाळ, रसबेळ, रसबेळी, स्त्री० केळीमध्यें एक

एक जाति आहे, तिचें वि०

**रसबाळ,रसबेळ**, न० रसबेळ केळीचें जें फळ त्याचें वि०

**रसभंग**, पु० गानादिसंबंधी श्रोते, इ० कांचे चित्तवृत्तीनें गृह्यमाण जो प्रवर्तमान रस असतो त्याचा मध्यें कांहीं विषयांतर प्रसक्ति, इ० कारणामुळें होतो जो विघात तो·

**रसभरित**, ३ लिं० रसानें भरलेला जो फल, भाषण, इ० तो·

**रसभरू**, ३ लिं० रसानें भरलेला जो फलादि पदार्थ तो·

**रसभोजन**, न० आम्ररस प्रधान जें ब्राह्मणभोजन करितात तें

**रसरंग**, पु० मकरसंक्रांतीचे दिवशीं कुंकुम आणि गूळ हे दोहों पात्रांत भरून ब्राह्मणास देतात तो·

**रसरसणें**, निखारे, अग्नि, इ० कानीं प्रखरपणें संतप्त असणें, क्रिं० ज्वर, अग्नि, सूर्य इ० कांचे योगानें शरीर, चूल, पाणी, तवा, इ० अग्निवत् तापणें; २, शरीराचाठायीं तारुण्यानें भरावस्थेस येणें·

**रसरशीत**, ३ लिं० रसरसलेला जो शरीर, चूल, निखारे, इ० पदार्थ तो·

**रसवडी**, स्त्री० एक तोंडीं लावाया करितां मसाल्याचे रसानें युक्त हरभऱ्याचे पिठाचा वड्या करितात त्या प्र०

**रसवंती**, स्त्री० एक ओषधी आहे; २, भाषणाचाठायीं जी गोडी तीतें लक्षून वागिंद्रियास स्तुतीनें म्ह०

**रसवांगें**, न० मसालेदार रसानें युक्त जें शिजवून सगळें वांगें करितात तें·

**रसविक्रय**, पु० तेल, तूप, इ० रसांचा जो विक्रय तो·

**रससिंदूर**, पु० एक रसायन आहे·

**रसज्ञ**, ३ लिं० सं० पदार्थमात्राचाठायीं जो रस त्याचें मर्म जाणणारा जो तो; उ० गाणें चांगलें असलें तरी रसज्ञावांचून फुकट जातें; पुष्पाचे मकरंदाचा रसज्ञ भ्रमरासारिखा दुसरा कोणी नाहीं·

**रसा**, पु० भुरका मारून खावयाजोगा तोंडी लावायाकरितां मसालेदार एक रस करीत असतात तो·

**रसाणें**, न० रा० रसरशीत निखाऱ्यांचा जो समुदाय तें·

**रसातल,रसातळ**, न० सप्त पाताळांतील एक आहे; २, कोणेक व्यवहारादि रसातळास नेणें, जाणें, इ० स्थलीं निःशेष होई असा बुडला जाणें; पोट रसातळास जाणें म्ह० क्षुधेनें पाठीशीं लागणें·

**रसाभास**, पु० काव्य, नाटक, भाषण, इ० कांचाठायीं प्रवर्तमान जो शृंगारादि रस असतो तो पुरता न होतां कांहीं विरुद्ध रसाचा आंत संक्रम झाला, इ० कारणामुळें होत्ये जी रसाची दुर्दशा तो·

**रसायण**, न० रसायनाचा अपभ्रंश·

**रसायन**, न० सं० पारद, गंधक, इ० कांचा रांधा, इ० करून जें मात्रादि निर्मितात तें·

रसारसणें, रसरसणें ·

रसाळ, ३लिं० ज्यामध्यें रसपुष्कळ आहे असाजो फलादि पदार्थ तो; २, बरकाजो फणस तो ·

रसिक, ३लिं० गान, काव्य, इ० रसावर प्रीति विशेष असून त्यांतील मर्म जाणतो तो; २, थट्टा मस्करी गोड भाषण, इ० द्वारा दुसऱ्याचें आणि आपल्या अंतःकरणवृत्तीस ज्याप्रकारें विनोद होई त्याप्रकारें वर्तण्याचा स्वभाव ज्याचा तो

रस्ता, पु० मार्ग ·

रस्सा, पु० मोठी जाडजी दोरी तो ·

रस्सी, स्त्री० दोरी ·

रहदारी, स्त्री० हिं० कोणाएकाचा घरीं किं० मार्गादिकाच्याठायीं येण्याजाण्याचीजी वहिवाट चालली असत्ये ती; उ० या मार्गानें मध्यरात्रपर्यंत माणसांची रहदारी चालली असत्ये ·

रहंवर, पु०य०श्रेष्ठजो रथ तो ·

रहवास, पु०दे० रफूत; २, रहिवास ·

रहस्य, न०सं० विवक्षितेनरांस समजूं द्यावयाची नव्हे, अशीजी गुप्त गोष्ट तें; उ० तुमचें कांहीं रहस्य बोलायाचें असलें तर मी पलीकडे जातों; २, परस्परांच्याजो परम सख्यभाव तें; उ० तुमचें आमचें रहस्य जिथवर होतें तो तुह्मीं आमचें काम करीत होतां आह्मीं तुमचें करीत होतों; ३, परस्पर मित्रभावानें मिळून थट्टा, मस्करी, वागउणें, बोलणें, इ०रूप आनंदानें जी क्रीडा, तें, किं० वाक्यादिकांतील जो तात्पर्यांश तें; उ० तुह्मीं बोलतां यांतील रहस्य माझे ध्यानांत आलें नाहीं; ४, कोणएक कार्य केलें असतां त्यापासून विवक्षितानुरूप फलह्मावें असाजो तत्तत्कार्याच्याठायीं योग्यता विशेष असतो तें; निषेध असतांच प्र०; उ० सराफीचे व्यवहारांत आतां कांहीं रहस्य राहिलें नाहीं; रहस्यांत येणें, ह्म० मोठ्या आनंदांत येणें ·

रहा, स्त्री० कोणेक व्यवहारीं वर्तणुकेचीजी रीत ती; उ०चवघांची रहा जशी असेल ती प्रमाणें तुह्मी चाला ·

रहाट, पु० ज्याचे परिभ्रमणानें कूपादिकांतून जलादि निघतें, रूतास पीळ पडतो, दोऱ्या वळल्या जातात, इ० अनेक कार्यें होतात अशींजीं चक्राकार त्यात्या सोईचीं काष्ठादिकांचीं यंत्रें केलीं असतात तीं प्र०

रहाटगाडगें, न० ज्याला लोटे बांधलेली माळ लाविली असत्ये असाजो पाणी काढायाच्या रहाटतें; २, ला० ज्यामध्यें एकवेळ बरें व्हावें, एकवेळ वाईट व्हावें अशी परंपरा चालली असत्ये असाजो हा जन्ममरणरूप प्रपंच, सावकारी, इ० व्यवहार त्यास ह्म०

रहाटणें, कोणेक कामांत कोणेकानें बहुत दिवस पडल्यामुळें अभ्यस्त होणें ·

रहाटवड, स्त्री०कों० बैलरहाट, किं० पायरहाट, एतत्संबंधीजें प्रकरण ज्यांत कणा, रवे, खापेकड, लोटे, तुंबें, इ० सामग्री लागत्ये ती ·

रहाटवणी, न०कों० आगर शिंपणें इत्यादि अर्थ रहाट गाडग्यानें काढिलेलें जें पाणी तें; उ० या एवढे मोठे आगरास पाट असता ह्मणजे ठीक, रहाटवण्यानें किती ह्मणून शिंपाल ·

रहाटागार, पु०न०कों० रहाटवण्यानेंच शिंपला जातो

जातो आगरतो तें.

**रहाटी**, स्त्री० अंबे, बाभळी, करमाड, इ० कांचीजी निबिड राई असल्ये ती; २, कों० पायरहाट; ३. पूर्वीपासून चालत आलाजो कोणेक गोष्टी विषयीं प्रयात ती.

**रहाट्या**, ३ लिं० कों० रहाट वहायाचे उपयोगींजो रोणगा, बेल, इ० तो; २ पु० गोट्या, इटीदांडू, इ० खेळांत उभयपक्षाकडेही खेळत असतो जो गडी तो; ३, ला० दोहों मांडवांचा वऱ्हाडी तो.

**रहाड**, स्त्री० कों० राड.

**रहाण**, न० कों० एखाद्याचे अंगीं पिशाच खेळवायासाठीं अनेक देवभक्त्ये मिळून जो वाद्यादिसमारंभ करीत असतात तें; घालणें, माजविणें इ० कांचा योगीं प्र०; २, ला० कोणी मरूं लागला, किं० कोणी मेला, इ० निमित्तानें अनेक मनुष्य मिळून रडूं ओरडूं लागल्यामुळें जो एकच घोळ पडतो तें.

**रहारास्त**, ३ लिं० न्यायानुरूप जें भाषणादिक तो.

**रहासाळी**, स्त्री० कों० परस्परामध्यें ईर्ष्या मत्सरादि विरुद्धभाव न यावयाजोगी असल्येंजी गोडी ती.

**रहित**, ३ लिं० जा कोणेक अर्थामध्यें जो अर्थ नाहीं तो तेणें करून; प्रा० समासीं प्र०; उ० दशमी भाजायास जलरहित दुग्ध असावें. विद्यारहित पुरुष शोभत नाहीं.

**रहिवास**, पु० कोणेएक मनुष्यादिकांचीजी कोणेएक स्थळीं वसति तो; उ० साधुजन भगवचरणी रहिवास प्रार्थितात.

**रहिवासी**, ३ लिं० जोजा स्थळीं वसति करून राहतो तो तेथील.

**रहू**, पु० कों० पेरायाकरितां भिजवून मोड आणिलेलेंजें धान्य तो.

**रळी**, स्त्री० जापाशीं आपला लडिवाळपणा चालतो त्यापाशीं हें अमुक मला पाहिजेच अमुक मला करून द्या, इ० कोणेक गोष्टीविषयीं लडिवाळपणानें धरितात जो आग्रह ती; २, ग्रं० वक्रोक्त्यादिकें करून जी थट्टा ती.

**रक्षक**, ३ लिं० जोजाचें रक्षण करितो तो त्याचा.

**रक्षण**, न० कोणेक अर्थाचा नाश, अपहार, इ० दुष्ट परिणाम नहोऊं देतां यथास्थितपणें राही असें करण्याचाजो व्यापार तें, किं० तेणें करून त्या अर्थाची नाशादिदुष्टपरिणाम नहोतां यथास्थितपणें होत्येजी स्थिति तें; उ० या समयींजर तूं जागत बसेनासतर आजपर्यंत शेताचें रक्षण केलें स तें फुकट जाईल; तुमचा आश्रयानें आजपर्यंत माझें रक्षण झालें; २, रक्ष्यपदार्थास रक्षण कर्ताजो मनुष्यादि तें; उ० तुह्मी बाहेर जाऊं लागाल तेव्हां घरास कोणी रक्षण ठेवा मग जा.

**रक्षणीय**, ३ लिं० रक्षावयास योग्य जो तो

**रक्षणें**, रक्षित करणें; रक्षरक्ष होणें, स० त्राहित्राहि भगवान् अशी अवस्था होणें.

**रक्षा**, स्त्री० सं० रक्षण प्रथमार्थी; २, राखी; ३, षष्ठीपूजनसमयीं सटीकाजी सूत्रें वाहून मुलाचे आणि बाळंतिणीचे गळ्यांत बांधायास ठेवितात तीं प्र०; रक्षाबंधन; रक्षासूत्र, इ० स० ; ४, राख.

**रक्षित**, ३ लिं० रक्षण केलें जाचें तो.

**रक्ष्य**, ३ लिं० सं० रक्षणीय.

**राई**, स्त्री० मोहरी ह्मणून जें बीज ती; २, आम्रादिकांचे झाडांचाजो निबिड समुदाय ती.

**राऊत**, पु० घोडेराऊत.

**राऊळ**, न० राजाचें किं० देवाचें जें गृह तें; २, पु० शूद्रांत एक जाति आहे.

**राँकट**, ३ लिं० शरीरानें बळकट आणि नाजूकपणा, किं० कांहीं एक कार्याविषयीं बारीक युक्ति, इ० गुण जाचेआंगीं नाहींत असा जो तो; २, घात पात होईल, इ० विचार न करितां अंगधराईनें कोणेक कामाचाठायीं प्रवर्तण्याचा स्वभाव जाचा असा-जो मनुष्यादि तो, किं० त्याचें शरीर तो.

**राँकटाई**, स्त्री० रांकटपणा.

**रारव**, स्त्री० ररवा; २, वस्तुतः सामान्या असतां आपण एकल्यानेंच उपभोगावी ह्मणून कोणेकानें बाळगली असत्ये जी वेश्यादिरूप सामान्या स्त्री ती.

**रारवडी**, स्त्री० एक स्त्रियांचें शिरोभूषण आहे

**रारवण**, स्त्री० न० कों० ररवाली; २, रक्षण द्वितीयार्थीं; ३, पिशाचाद्युपद्रवापासून आपल्यास राखावें ह्मणून जें ग्रामदुर्गादिकांस प्रतिमासीं, किं० प्रतिवर्षीं नारळ, इ० देतात ती; ४, मनुष्यादिकांस जो पिशाचाद्युपद्रव, किं० शेत, इ० कांस जो मूषकाद्युपद्रव त्याचा मंत्र, तंत्र, मानता, इ० उपायानें करितात जो बंदोबस्त ती; लावणें, लागणें. या धातूंचायोगीं प्र०; कोणेक गोष्टीची राखण लागणें ह्म० त्या गोष्टीपासून आपणास उपद्रव न बाधे असा बंदोबस्त होणें; उ० या स्त्रियेची एकदां रुपये भरले ह्म० चार महिन्याची राखण लागली; ५, गुरें, वृक्ष, इ० कांचे रक्षणार्थ नियुक्त जो गुराखी, इ० त्यास रक्षणनिमित्त जें द्रव्य द्यावें लागतें ती; ६, जें गृहाद्यधिकरण धान्यादि द्रव्यानें केवळ शून्य असूं नये ह्मणून अल्पस्वल्प जें त्याचाठायीं तें धान्यादिद्रव्य राखितात त्यास ह्म०; उ० सगळे दाणें खर्चूं नका घरास राखण ह्मणून दोन पायली तरीं राखून ठेवा.

**रारवणदार**, पु० शेत, गृह, इ० कांचे ररवालीकरितां जो कोणी नियुक्त असतो तो.

**रारवणमंडळ**, न० राखमंडळ.

**रारवणा**, पु० रा० गुराखी; ह्म० राखण्यानें गुरें टाकलीं ह्मणून धनी कांहीं टाकीत नाहीं; २, राखणदार; ३, एक क्षुद्रजंतु आहे.

**रारवणावळ**, स्त्री० रक्षणनिमित्त जें गुराखी, इ० कांस देय ती.

**रारवणें**, रक्षणें; २, क्रमाद्यनुरोधानें जा अर्थावर कांहीं क्रिया संस्कारादि होण्याचा प्रसंग आला असतो तो अर्थ ते संस्कारादि न होऊं देतां तसाचे तसाच ठेवणें; उ० कोनाड्याची जागा तेवढी राख आणि अवघी भिंत सारीव; तुझ्या मनांत असेल तें सारें बोल, कांहीं राखूं नको; त्या रानांतील गवत यंदा राखलें आहे; मुसलमान लोक ओंठींचे केंस काढितात आणि दाढीचे राखतात; आज तुजकरितां पोळ्या राखून ठेविल्या आहेत; ३, लांब, आंखूड, मोठा, लहान, इ० रूप जा पदार्थाचा स्थिति त्या स्थितींत कोणेक

पदार्थ स्थित्यंतर न पावूं देतां ठेवणें; ३० ही भिंत फार रुंद राखली ह्मणून जागा अडली; कांहीं इतकी लांब कशाला राखली? त्यारखणांत राहील कशी; ४, स्त्रीनें पुरुषास, किं० पुरुषानें स्त्रियेस, उपभोगार्थ स्त्रीयत्वेंकरून ठेवणें; हुंडीपत्रामध्यें अमुकापासून रुपये घेतले या अर्थीं राखले एतच्छब्दपूर्वक त्याचें नाव लिहावें अशी चाल आहे; त्या हुंडीमध्यें माझी राखले घेतली होती, इ० स्थलीं स्त्रीलिंगत्वेंकरून ही राखले शब्दाचा व्यवहार होतो; राखून करणें, बोलणें, इ० स्थलीं बोलणें, इ० विषयांचा कांहीं अंश शेष राही असें वगळून बोलणें किं० करणें.

**राखरांगोळी**, स्त्री० दे० देश, गांव, घर, मनुष्य, शरीर, इ० कांची जळून राख होई अशी जी अवस्था होत्ये ती.

**राखमंडळ**, न० कों० रखमंडळ.

**राखाडी**, स्त्री० पसरलेली किं० एके ठिकाणीं सांचली अशी बहुत जी राख ती; २, कों० रखा.

**राखांदुळी**, स्त्री० कों० बायका बाळंत आल्या ह्मणजे तिसरे दिवशीं भूतादिबाधानिरसनार्थ दारीं राखेनें भरून एक मडकें ठेवीत असतात ती.

**राखी**, स्त्री० श्रावणी पूर्णिमेचे दिवशीं हस्तादिकांत जो रेशीम, इ० कांचा दोरा गोंडा लाऊन बांधितात ती.

**राखीपुनव**, स्त्री० श्रावणी पूर्णिमा.

**राखीपूर्णिमा**, स्त्री० राखीपुनव.

**राखीपौर्णिमा**, स्त्री० राखीपूर्णिमा.

**राखील**, स्त्री० कों० गुराख्यास जें गुरें, इ० राखण्या निमित्त द्रव्य द्यावें लागतें ती; २, गुरें, शेत, इ० राखण्याचें जें काम तें.

**राखुंडा**, पु० राखेचा जो ढीग तो; २, ३ लिं० जन्मतः वरचा ओंठ ज्याचा विदीर्ण झालेला असतो असा जो मनुष्यादि तो.

**राखुंडी**, स्त्री० गोवरीचा निखारा विझविला असतां जो काळा अंगारा होतो ती; २, गोवरी निःशेष जळून होतो जो राखेचा ढेपसा त्यास दांत घांसण्याविषयीं साधनत्वेंकरून विवक्षा असतां क्वचित् ह्म०; ३, ला० भात, भाकर, भाजी, इ० करपून काळी झाली असतां त्यास ह्म०.

**राखूळ**, स्त्री० राखील प्रथमार्थीं.

**राखोडा**, पु० राखुंडा प्रथमार्थीं.

**राखोंडी**, स्त्री० राखुंडी.

**राखोळ**, स्त्री० राखूळ.

**राग**, पु० अनेक वर्ण पौर्वापर्यादिक्रमानें एकत्र जुळले असतां जसे अनेकप्रकारचे अनेक शब्द होतात तद्वत् षड्जादि स्वरांची परस्पर जुळणी केल्यानें जे गावयास योग्य अनेक रचनाविशेष होतात ते प्र०; २, क्रोध; रागें भरणें ह्म० कोपणें; कोणे काळा रागें भरणें ह्म० क्रोधपूर्वक शिवी गाळ, इ० करणें; रागास येणें, भरणें, पेटणें, चढणें, ह्म० कोपणें; ह्म० अतिरागा आणि भीकमागा; रागखाई आपल्यास आणि संतोष खाई दुसऱ्यास; ३, सं० अनुराग; ४ काळेपणा, पिवळेपणा, इ० रूपजे रूपाचे भेदक रंग ते प्र०; उ० तुझे हृदयांत कांहीं काळजी आहे, हें तुझे मुखरागावरून मी जाणलें.

**रांग**, स्त्री० अनेकपदार्थ एकापुढें एक एकापुढें एक असे लागत गेले असतां होत्येजी ओळ ती.

**रांगडा**, पु० एक देश आहे तो; २, ३लिं० तद्देशीय मनुष्य, भाषा, इ० तो.

**रांगणें**, मूल, इ०कानी भूमीस हात गुडघे टेंकून चालणें.

**रागमाला**, स्त्री० रागमालिका.

**रागमालिका**, स्त्री० अनुक्रमानें थोडे थोडे रागांचे अंश घेऊन बांधिला असतो जो गीतविशेष ती; २, किल्ली दिली म्ह० अनेक रागांचे स्वर निघतात, असें एक यंत्र असतें ती.

**रागमाळा**, स्त्री० रागमाला.

**रागमाळिका**, स्त्री० रागमाळा.

**रागरंग**, पु० पुढें होणार किं० मागें झालेली, किं० देशांतरस्थ, इ०रूप अप्रत्यक्ष जी कोणेक गोष्ट तिचें त्या त्या लक्षणावरून ही गोष्ट या याप्रकारें होईल, किं० असें केलें असतां असें होईल, इ० रूप अनुमित होतें जें बरें वाईट स्वरूप तो; उ० पावसाचा रागरंग पहातसे दिसतो ?. निघा.

**रांगसारांगूस**, स्त्री० रा० स्थलांतरीं जाणार जो कोणी त्याणें, पूर्वस्थलादिकांच्या लोभ किं० जाण्याचा अनुत्साह, इ० कारणामुळें झटकर न जातां अनेक निमित्तें उपस्थित करून तेथचे तेथें घोंटाळण्याचा जो व्यापार ती.

**रागवणें**, रागावणें.

**रागावणें**, क्रोधावणें.

**रागिणी**, स्त्री० मंजुल ज्याचे स्वर असतात असा जो गानांतील राग त्यास म्ह०

**रागीट**, ३लिं० कोपिष्ट.

**रागणें**, रागावणें.

**रांगोळी**, स्त्री० शिरगोळ्या, कुपा, इ० कुटून देवादिकांपुढें चित्रादिक काढायाकरितां करितात जी पूड ती, किं० तदर्थ जी करितात तुसाची राख ती; २, त्यानें काढिलें जें चित्रादिक ती.

**रांगोळें**, न० आंत रांगोळी भरून भूमीवरून ओढिलें असतां अनेक चित्रविचित्र आकार उमटतात असें ताम्रादिकाचें नलिकारूप यंत्र करितात तें.

**राघू, राघो**, पु० पोपट; २, शृंगारी लावणी, इ०कांत नायकास म्ह०

**राजअंबीर**, पु० गंभीर स्वभावाचा सभ्य जो नायक त्यास शृंगारांत म्ह०

**राजकडी**, स्त्री० एक कर्णभूषण आहे.

**राजकारण**, न० दरबारीं प्रवेश व्हावा, परराज्यादि आत्मसात् करावें, इ० कार्य सिध्यर्थ गुप्तपणें अनेक युक्तींनीं बांधितात जी मोठी मसलत ती; २, कोणेक गोष्टीचें प्रयोजक गुप्त असतें जें निमित्त त्यास म्ह०; उ० या भिंतीस किती सारविलें, लिंपिलें, तरी याच जाग्यावर चीर पडत्ये याचें राजकारण कांहीं समजत नाहीं.

**राजकारणी**, ३लिं० राजकारण करणारा जो मोठा आटोकाट मसलती तो.

**राजकी**, ३लिं० राजमाहात्म्यामुळें राज्यांत जें कांहीं बरें वाईट होतें तो; उ० दुसऱ्या राज्यांत गेल्यानें राजकी उपद्रव टाळायास येईल, पण दैवकी उपद्रवापुढें उपाय चालत नाहीं.

राजकीय, ३ लिं० राजसंबंधीजो व्यवहार,कारभार,मनुष्य,इ० तो·

राजकुमर,राजकुँवर, पु० प्रा०ग्रं० राजाचाजो पुत्र तो·

राजकुमरी राजकुँवरी, स्त्री०ग्रं० राजाचीजी कन्यका ती·

राजकेळ, स्त्री० केळींत एक जाति आहे·

राजकेळें, न० राजकेळीचेंजें केळें तें

राजक्रांत, स्त्री०न० राजक्रांतीचा अपभ्रंश·

राजक्रांति, स्त्री० परस्पर राजादिकांचा कलह लागल्यामुळें प्रजांस उपद्रव व्हावयाजोगा होतोजो राज्यांत दंगा ती·

राजगिरा, पु० माठासारखी एक ओषधी आहे तो;२, त्याचेंजें बीज तो·

राजगोंडा, पु० पालखीचे दांडीस मध्यभागींजो मोठाएक गोंडा बांधितात तो·

राजघोळ, स्त्री० घोळींत एक भेद आहे·

राजचिन्ह, न० राजानेंच धारण करावीं, किं० राजानें दिलीं तरच दुसऱ्यानें धारण करावीं,अशीजीं छत्र,चामर, मोरचेल, अबदागीर,इ० तीं प्र०;२,राज्यपद प्राप्त होण्याचीं लक्षणें मनुष्याचे अंगावरजीं अजानुबाहुता,इ० असतात तीं प्र०;३,पत्र,नाणें, इ० कांवरजो राजाचा शिक्का असतो तो·

राँजण, पु० रांझण·

राँजणवाडी, स्त्री० रांझणवाडी·

राँजणी, स्त्री० रांझणी;२.कों० नित्याचें ओयऱ्याचे तांदूळजा मडक्यांत ठेविले असतात त्या मडक्यास नेव्हां मात्र ह्म०;३, एक झाड आहे·

राजतुरा, पु० एक फुलझाड आहे·

राजदंड, पु० अपराधीजनास राजा करितोजो ताडन,द्रव्यापहार, इ०रूप दंड तो;२,अपराधीजनापासून दंडार्थ राजा घेतोजें द्रव्य तें·

राजदरबार, न० प्रजांचा कल्याणार्थ न्यायान्याय विचार,खंडदंड,इ० व्यवहार जेथें चालला असतो असाजो राजसभाक अधिकरण विशेष तें·

राजद्वार, न०रा० राजदरबार·

राजधानी, स्त्री० सं० राजा जेथें नांदत असतो असेंजें नगर ती·

राजनीति, स्त्री०सं० राजादिकानीं राज्यादि व्यवहारीं यायाप्रकारें वर्तावें असाजो शास्त्रकर्त्यानीं लोकव्यवहारमार्ग सांगीतला आहे ती·

राजन्य, पु०सं० क्षत्रिय·

राजपद, न०सं० राज्यकरण्याचाजो अधिकार तद्रूपजें स्थान तें·

राजपसंत, ३ लिं० राजादिसर्व थोरथोर लोकानीं पसंत करायाजोगाजो कांहीं पदार्थ,गोष्ट,इ० तो·

राजपुरुष, पु० राजानें राजकार्याविषयीं कांहीं एक अधिकार ज्यास दिल्हा आहे तो पुरुष·

राजपिंडा, पु० राजबिंडा·

राजबिंडा, पु० शरीरानें अतिशयित सुंदर असून नाजुकजो पुरुष त्यास स्तुतीनें ह्म०

राजमंडल, न०सं० राजाचे ज्यासगीचें प्रकरण तें;२,राजे रजवाडे यांचा एक झालाजो समुदाय तें·

राजमंडळ, न० राजमंडल·

राजमंदिर, न०सं० राजाचेंजें मंदिर तें;२,ला० शृंगा-

शृंगारप्रसंगीं रंगमहाल, इ० क्रीडाभुवनास म्ह०

**राजमान्य**, ३लिं० राजादि महान् महान पुरुषांस माननीयजो पुरुष गोष्ट, इ० तो; २, जालापत्र पादशाहाचें त्याला हें विशेषण सन्मानार्थ कागदोपत्रीं देतात.

**राजमार्ग**, पु० अनेक लोक, घोडे, गाडया, इ० जा मार्गानें जात असतात असाजो मोठा मार्ग तो; २, ला० सर्वलोक प्रचारस्तपणें जारीनीनें चालत असतात अशीजी रीति तो.

**राजमुद्रा**, स्त्री० सं० शिक्का, मोर्तब, इ० रूपजें राजचिन्ह तो.

**राजमोहरा**, पु० विद्या, शौर्य, इ० गुणानें अनेक राज्याचाठायीं प्रसिद्ध असा तेजस्वीजो कोणी पुरुष असतो त्याग म्ह०; उ० या राज्यांत नाना फडणीस एक राजमोहरा होता; २, राजबिंडा.

**राजमोहोरा**, पु० राजमोहरा.

**राजयक्ष्मा**, पु० एक क्षयरोगांत भेद आहे.

**राजयोग**, पु० हठानें प्राण निरोधादि नकरितां भगवत्स्वरूपीं अंतःकरण एकाग्रकरून लावण्याचा एक उपाय आहे तो; २, उपजल्या प्राण्यानें राजा व्हावें असाजो जन्मकालीं ग्रहयोग पडला असतो तो.

**राजरोस**, अ० लपून छपून चोरून नव्हे असें उघडपणीं; उ० मी कांहीं ती वस्तु चोरून नेली नाहीं तुमचे देखत राजरोस नेली.

**राजर्षि**, पु० सं० जातीचा क्षत्रिय असून जो तपस्वी तो.

**राजपटा**, पु० कों० ग्रहसंबंधी मुख्य संसारकर्त्या मनुष्याचीजी कारकीर्द तो; ग्रा० प्रथमांत प्र० नाहीं; उ० मामाजीचा राजवट्यांत आम्हा पंचवीस रुपयां खालीं लुगडें नेसलों नाहीं, तुमचे राजवट्यापासून दोन रुपयांचें मिळतां मुसकील; २, अ० राजवट्यांत; उ० वडिलांचे राजवटा ही गोष्ट घडली नाहीं.

**राजवाडा**, पु० राजाचाजो वाडा तो.

**राजविलाशी**, ३लिं० राजविलास करितो तो.

**राजविलास**, पु० राजांचे विलासा सारिखाजो विलास तो.

**राजविलासी**, ३लिं० राजविलाशी.

**राजवैद्य**, पु० वैद्यशास्त्रज्ञ, यथायोग्य उपचार प्रत्युपचार जाणणाराजो उत्तम वैद्य तो.

**राजश्रन**, ३लिं० रा० बांगडयांत एक भेद आहे त्याचें वि०

**राजश्रियाविराजित**, ३लिं० लक्ष्मीनें राजासारिखा सुशोभित असायाचा अर्थ परंतु बरोबरीचा नात्यानें कोणेक ग्रहस्थास पत्र लिहायाचें असतां मान्यांत हें विशेषण लिहितात.

**राजश्री**, पु० सत्कारपूर्वक बोलायाचें असतां राजासच राजश्री या शब्दानें व्यवहार करितात तो; उ० एव्हां राजश्रीची स्वारी कचेरीस आहे; २, दुसऱ्यास कागदपत्र लिहायाचें असतां राजश्री हीं अक्षरें साधारणासही त्याचे नामापूर्वीं लिहितात, किं० कोणाएकास विनोदानें बोलायाचें असतां त्या पुरुषास या शब्दानें व्यवहार करितात.

**राजस**, ३लिं० रजोगुणविशिष्टजो मनुष्यादि पदार्थ तो, किं० रजोगुणसंबंधी तो.

**राजस**, ३ लिं० प्रा० ग्रं० स्कुमार असून जो सुंदर पुरुषादिक तो.

**राजसवाणा**, ३ लिं० राजस.

**राजसूय**, पु० सं० यज्ञांत एक भेद आहे.

**राजहंबीर**, पु० राजअंबीर.

**राजहंस**, पु० चोंच, आणि पाय, हे ज्याचे तांबडे आणि शरीरानें पांढरा असाजो हंसपक्षी तो; २, आवण्यामध्यें नायकास म्ह०

**राजा**, पु० प्रजांपासून करभार घेऊन त्यांचें पालन करितो असाजो पृथ्वीपति तो; या अर्थी संस्कृत शब्दांशीं समास; उ० राजाचाजोपुत्र तो राजपुत्र, राजकन्या, राजकुमार, राजसभा, राजपत्नी राजाश्रय, राजगुरु, राजपुरोहित, राजोपाध्याय, इ०; कितीएक प्राकृतशब्दांशीं समास होतात; उ० राजकुमर, राजकुंवर, राजकुमरी, राजबाळा, इ० राजदरबार, राजपसंत, इ० पूर्वी कितीएक लिहिले आहेत, एथें संस्कृताशीं समास झाला असतां ग्रंथस्थ तालव्य ज होतो, इतरत्र कदाचित् ज होतो, कदाचित् ज होतो; २, जा समुदायाचा आज्ञाकरणाराजो नायक तो त्यासमुदायाचा; उ० देवांचा राजा इंद्र; ३, सजातीय पदार्थ समुदायांत श्रेष्ठत्वें करूनजो विवक्षित तो; उ० आम्हालाजो चाकर मिळतो तो अळवांचा राजा; तीर्थराज, मृगराज, ग्रहराज, इ० समास जाणावे; ४, जाचा अनुग्रह वरुनानें तोतो शरीरावयवादिपदार्थ समुदाय स्वस्व व्यवहारीं वर्ततो असाजो जीवात्मा, इ० तो त्या समुदायाचा; उ० शरीरामध्यें धातुहा राजा आहे तो नीट आहे तों शरीर यथास्थित चालतें; ५, अन्न, वस्त्र, स्थळ, इ० पदार्थाविषयीं यथास्थिती य आहे तदर्थ कष्ट, काळजी, जाला करावी लांत नाहीं असाजो कोणी त्यास म्ह०; उ० आह्मीं ह्या गळक्या घरांत कसे हाल भोगतों, तुह्मी आपले चारमजल्याचे घरांत राहिलों आहां तुह्मी जे आहां तुह्मास कांहीं काळजी नाहीं; ६, अमुक केलें असतां आपला कांहीं तोटा होईल, घात होईल, इ० विचार जाला समजत नाहीं त्यास म्ह० उ० त्याला काय समजतें तो राजा आहे मी सांगतों तसें करा; आपल्या घरचा राजा म्ह० आपल्या विषयावरमात्र आपण स्वतंत्र, अशी विवक्षा असतां सर्वांस म्ह०; ७, जाग्रहाचेवारीं संवत्सरप्रतिपदा पडते तो ग्रह त्या संवत्सराचा.

**राजांगण**, न० श्रीमंत लोकांचे वाडयापुढें जें मोठें स्थळ रिकामें राखिलें असतें तें; २, चौसोंपीच्या रासजें चतुष्कोणमध्यें अंगण पडतें तें.

**राजांगण**, न० राजांगण.

**राजाधिराज**, पु० अनेक मांडलिक राजांवर जो एक मुख्य राजा असतो तो.

**राजापुरी**, ३ लिं० राजापूर म्हणून एक बंदर आहे तत्संबंधी जो गूळ, हळद, भाषा, इ० पदार्थ तो.

**राजाभिषेक**, पु० राजास राज्यपदीं अधिकृत करते समयीं महानद्या, समुद्र, इ० कांचें पाणी आणून अमात्य पुरोहितादि मिळून विधिपूर्वक त्याजवर करितात जो अभिषेक तो.

**राजावळ**, स्त्री० भातांत एक जाति आहे; २, पंचांगाचे प्रारंभीं राजा, प्रधान, मेघेश, इ० संवत्सरफळ जें लिहितात ती; ३, एक लुगडयांत भेद आहे.

राजा

**राजासन**, न० अधिकारस्थ राजाचें बसायाचें जें सिंहासन तें.

**राजाळूं**, न० अळवांत एक भेद आहे.

**राजाज्ञा**, स्त्री० कोणेक कार्याविषयीं कोणेकास राजाची होत्येजी अनुल्लंघनीय आज्ञा ती; २, ला० सर्वथा अनतिक्रमणीयजें विधिवचनादिरूप प्रमाण ती; ३, पु० राजाज्ञा.

**राजाज्ञा**, पु० अष्टप्रधानांतील एक अधिकारी आहे तो.

**राजी**, ३ लिं० कांहीं एक करणें,देणें,घेणें, इ० विषयीं अंतःकरणापासून कबूल झालाजो तो; २, गंजीफांचे डावांत राजसंबंधीजी तलफ तिचें वि०

**राजीक**, न० राजकांत.

**राजीनामा**, पु० तुह्मीसांगाल तसेंवर्तायास,किं० कोणेक गोष्ट करायास मी राजी आहें,असाजो लेख कोणीकोणास करून देतात तो.

**राजीरजावंतीनें**, अ० हिं० रजावंतीनें.

**राजू**, पु० अनेकपेड एकत्रवळून केलेलाजो फार मोठा दोर तो.

**राजेंद्र**, पु० राजाधिराज; २, राजअंबार.

**राजेरजवाडे**, पु० देशोदेशींचे लहानमोठे जे राजे, आणि देशमुख,देशपांडे, इ० मोठेमोठे लोक ते.

**राजेळ, राजेळी**, स्त्री० केळींत एक जाति आहे तिचें वि०

**राजेळें**, न० राजेळीचेंजें केळें तें.

**राजोपचार**, पु० वरछत्र धरावें,चवरी,मोरचेल, वारावें, इ० राजास उचितजे उपचार ते प्र० ; २, प्रकृतीनें नाजूकजो मनुष्यादि त्यास सोसाया जोगाजो औषधाद्युपचार तो.

**राज्य**, न० प्रजांपासून कर घेऊन त्यांचें पालन करावें असाजो राजाचा अधिकार,किं० कर्म तें,किं० तें करण्याचाजो प्रकार तें; उ० सांप्रतचे राज्यांपेक्षां पहिलीं राज्यें चांगलीं असत; २, एकेका राज्याचे सत्तेखालचे जेजे देश ते प्र०; ३, संसारादि व्यवहारीं दुसराकोणी आपल्यास विचारणार आहे, हें मनांत न बाळगतां स्वातंत्र्यपणें वर्तायाजोगेंजें कोणाएकाचें आधिपत्य असते तें; उ० घरचा पुरुष प्रवासास गेला,आतां त्याचे घरांत सारें बायकाचें राज्य झालें आहे; आतां तुह्मी राज्य करा, इ० स्थलीं खुशाल निर्भयपणें स्वस्थ व्यापारीं वर्ता.

**राज्याभिषिक्त**, ३ लिं० राजाभिषेक झाला आहेजास असाजो राजा तो.

**राज्याभिषेक**, पु० राजाभिषेक.

**राज्यासन**, न० राजासनाचा अपभ्रंश.

**रांझण**, पु० मृत्तिका, इ० कांचें आकारविशेषाचें मोठे पात्र आहे तो.

**रांझणवाडी**, स्त्री० उष्णविकृतीमुळें डोळ्याचे पापण्यास पुटकुळी येत असत्ये ती.

**रांझणी**, स्त्री० लहानजो रांझण ती.

**रांठ**, ३ लिं० ज्याचे अंगी नाजूकपणा,किं० मंजूळपणा नाहीं,असाजो मनुष्य,शब्द, इ० तो.

**राड**, स्त्री० आंत पाणीघालुन चिखलकरून खेळायाकरितां शिमग्यांत मोठी खळी खणतात ती; २, ला० मार्ग,किं० गृहादिकांची भूमि यांवर पाणी, इ० पडल्यामुळें तेथें चिखल व्हावा

अशी

अशी होत्येजी दुर्दशा ती.

**रॉंड**. स्त्री० रंडा; २, दासी; ३, मैथुनवृत्तीनें उपजीविका करणारीजी स्त्री ती; ४, निंदा किं० दुर्बळता वर्णनप्रसंगीं स्त्रीमात्रास ह्म०; ह्म० रांड भांड झेसा बिघडे तोहोय कैसा; ईर्ष्याशून्य नामर्दजो मनुष्य त्यास आरोपानें ह्म०; ५, कोणेक व्यवहार परार्थयाचा बुडणें, इ० कारणामुळें होता, किं० नहोता असें व्हावयाजोगी होत्येजी दुर्दशा ती; होणें, करणें, उडणें, यांचा योगीं प्र०; उ० यंदा शेतें चांगली आलीं होतीं पण आंत पाणी शिरून अवघी रांड झाली.

**रॉंडका**, पु० रंडका.

**रॉंडकी**, स्त्री० रंडकी.

**रॉंडखॉंड**, स्त्री० शिवीद्यावयाकरितां उच्चारितात जो रांड, इ० अभद्रशब्द ती; उ० मी याची कांहीं गोष्ट बोलिलें नसतां उगीच मेला मला रांडखांड ह्मणतो.

**रॉंडगळा**, पु० पुरुषाचे कंठध्वनीहून बारीकपणा, नाजूकपणा, इ० धर्मांनीं विलक्षणजी स्त्रियांचा कंठध्वनि असतो तो; २, तादृश पुरुषाचा असतां त्यास ह्म०

**रॉंडगा**, ३ लिं० रा० रंडीबाज.

**रॉंडगॉंठ**, स्त्री० गांठोडें, इ० कांसजी दुहेरी गांठ देतात त्यांत एक भेद आहे.

**रॉंडछंद**, पु० रांडेचेंजें व्यसन तो.

**रॉंडछंदी**, ३ लिं० रांडगा.

**रॉंडपोर**, न० ग्रामादिकांतील स्त्रिया, पोरें, इ० यद्यावन्मनुष्य समुदाय तें; उ० आज कथेस झाडून रांडपोर आलें होतें; २, कोणेकाचेघरीं बायको मुलें, इ० जें खटलें असतें तें.

**रॉंडबाज**, ३ लिं० रंडीबाज.

**रॉंडबाजी**, स्त्री० रंडीबाजी.

**रॉंडभाषण**, न० मर्दास योग्य नव्हे असेंजें भयादि कारणामुळें दीनवाणें भाषण तें.

**रॉंडमाणूस**, ३ लिं० दुर्बलत्ववर्णनप्रसंगीं स्त्रीमात्रास ह्म०; २, केवल अपराक्रमी ईर्ष्याशून्य असाजो मुरदाड पुरुष त्यास आरोपानें ह्म०

**रॉंडमामी**, स्त्री० कों० रांडकीजी स्त्री तिची गरीबी वर्णावयाची असतां ह्म०

**रॉंडमुंड**, स्त्री० रंडकीमुंडकी.

**रॉंडरळी**, स्त्री० रांडपोर प्रथमार्थी.

**रॉंडरूं**, न० रांडेस निंदेनें ह्म०

**रॉंडलेंक**, **रॉंडल्योंक**, पु० एक शिवी आहे जी पुरुषास देतात तो.

**रॉंडवडा**, पु० गृहादिकांचाठायीं सत्ताधारी पुरुष नाहीसा झाल्यामुळें होतेंजें स्त्रियांचें प्राधान्य तो; २, कों० रांडमुंडे, इ० स्त्रियांचाजो कांहीं एक काल अतिशय तो; गाणें, गाजविणें, उठविणें, इ० कांचा योगीं प्र०

**रॉंडवला**, पु० रांडवडा द्वितीयार्थीं; गाणें याचा योगीं प्र०

**रांडा**, पु० संसारादिसंबंधी निर्वाह्य जीं अनेक कामें त्यांचा पडला असतोजो पसारा तो.

**रॉंडापोरें**, न० घर, गांव, देश, यांतील मुख्य व्यवहार कर्तेजे पुरुष त्यांहून इतरजीं बायका मुलें, इ० सर्व माणसें तीं.

**रॉंडावणें**, स्त्रीनें विधवात्वरूप दुर्दशा पावणें; २,

चांगलेपणीं चालत असतोजो कांहींएक व्यवहार त्याणें मोडकळीस येणें, किं० बुडणें; उ० त्याणीं मागें संसार चांगला थाटला होता पण थोरला भाऊ मेल्यापासून रांडावला.

**रांडेच्या**, ३लिं० रांडलेक. परंतु स्त्री पुरुष साधारण; हाच शब्द संबोधनांत आश्चर्याचा उद्गार होतो; उ० अगरांडेचे पांचावर्षांचा पोर पहा किंग कशी पोथी वाचितो.

**रांडोळी**, स्त्री० रांडमामी.

**रांडया**, ३लिं० रांडबाज; २, बाइलबुध्या; ३, जनानी जो मनुष्य तो; ४, रांडयारायोबा.

**रांडयारायोबा**, पु० दे० सर्वकाल स्त्रियांशीं गोष्टी सांगाव्या, त्यांचीं कामें एकावीं, त्यांचे मागून फिरावें अशा स्वभावाचा जो मनुष्य त्यास म्ह०

**रांढरूं**, **रांढूं**, न० रांदुरूं.

**राण**, न० दे० रान; रानशब्दानें घेऊन जे समास होतात ते याशब्दास घेऊनही होतील असें जाणावें.

**राणा**, पु० ग्रं० राजा; उ० वैकुंठीचा राणा कोणी पाहुनियां आणा.

**राणी**, स्त्री० राजाचीजी स्त्री ती.

**रात**, स्त्री० रात्र; २, पु० कों० उष्णता, इ० विकृतीनें नेत्रांत जी आरक्तता येते असल्ये तो.

**रातंजन**, न० दे० एक ओषधी आहे.

**रातड**, ३लिं० यत्किंचित राता जो तो; प्रा० तांदळावर प्रसिद्ध.

**रातब**, पु० दे० खुराक.

**रातंबा**, पु० कोंकणांतील जें फळ तो; रातंब पिकणें म्ह० गोरे नाजूक मनुष्य उन्हांत गेल्यामुळें त्याचे गाल रक्तवर्ण होणें.

**रातंबाव**, स्त्री० रतनबाव.

**रातबिरात**, स्त्री० गमनादि कोणाक कर्माविषयीं कदाचित् प्राप्त होईल असाजो संभावित रात्र, इ० लहान मोठा विषमसमय तो; उ० रातबिरात आहे चार जिन्नस घरांत बाळगून ठेवावे; २, अ० त्या विषमसमयाचाठायीं; उ० घरांत जिन्नस असलातर रातबिरात उपयोगीं पडेल.

**रातंबी**, स्त्री० रातंब्याचें झाड ती.

**रातंबेल**, न० रातंबीचे बियांचें जें तेल तें.

**राता**, ३लिं० यत्किंचित् काळसर जो तांबडा रंग तो, किं० तद्विशिष्टजो तांदूळ, अंबा, इ० तो; २, पु० एक भातांत जाति आहे.

**रातांधळा**, ३लिं० रातांधळें जास प्राप्त झालें आहे तो.

**रातांधळें**, न० रात्रीं दिसूं नये असाजो मनुष्यादिकांस नेत्ररोग प्राप्त होतो तें.

**रातावणें**, कों० रात्र होणें; उ० रातावलें आतां जाउं दे बाईघरांस.

**राताळी**, स्त्री० रताळी

**राताळूं**, न० रताळूं.

**राताळें**, न० रताळें.

**रातोरात**, अ० दिनापेक्षा न धरितां घाईनें रात्रींचा रात्रींच; जाणें, येणें, कांहीं काम करणें, इ० कांचे वि०; उ० मारुतीनें रातोरात जाऊन द्रोणागिरी आणिला.

**रात्र**, स्त्री० रात्रीशब्दाचा अपभ्रंश; रात्र ओरडणें, इ० स्थळीं राळम्हणून एकइंद्रज जंतु आहेत

रात्रीं शब्द करीत असतो त्या शब्दानें विशिष्ट गर्श्री- नें होणें; म्ह० रात्र थोडी आणि सोंगें बहुत.

रात्रंदिवस, रात्रंदीस, अ० अहर्निशीं या अर्थी.

रात्रि, स्त्री० सं० सूर्यास्तापासून सूर्योदयपर्यंत जो काल ती; एकरात्र, द्विरात्र, इ० स्थलीं रात्रिश- ब्दाचा अर्थ अहोरात्र असा होतो.

रात्रौ, अ० रात्रीचा रात्रीं.

रांधणें, तांदूळ, भाजी, इ० पदार्थ शिजविणें; म्ह० सारीरात्र जागली आणि शेंगावांगीं रांधलीं.

रांधप, न० रांधण्याचा जो व्यापार तें; २, शिजाया- साठीं चुलीवर घातलेला जो तांदूळ, भाजी, इ० द्र- व्य समुदाय तें; उभयत्रही रैंपाकाविषयीं प्र०

रांधपी, पु० स्वयंपाक रांधणारा जो पुरुष तो.

रांधवणी, न० रांधल्येसमयीं रवरकटें मरकटें हात पात्र, इ० विसळलेलें जें पाणी तें

राधा, स्त्री० नाचायासाठीं स्त्रीचा वेष धारण करि- तो जो पुरुष तो.

रांधा, पु० औषध, रंग, इत्याद्यर्थ जो गंधक, इ०कां- चा पाक करितात तो, किं० ती क्रिया तो.

रान, न० अरण्य; २, मळा, शेत, इ०कांत लावाया- चा आणि मनुष्यास उपभोग्य जो भाजीपाला, धान्य, नारळ, पोफळ, वृक्ष, इ० वनस्पति ओष- धी त्याहून इतर जें तृणादिक तें; प्र० किं० त्यांचा स- मुदाय तें; उ० भाजीचे वाफ्यांत कोठें कोठें रान रु- जलें आहे तें उपटून टाक; ३, कोणेक स्थलीं एक जातीय वृक्ष ओषधींचा निबिडपणें स्थित जो समुदाय तें; उ० बंदर किनाऱ्यास सारें नारळींचें रान; ४, हजामत मोठी वाढली असतां ती स म्ह०; ५, जो पदार्थ जा देशीं अनायासें बहुत होतो किं० असतो, मिळतो, तो देश त्या पदार्थाचें; उ० मारवाड देश, म्ह० उंटाचें रान तेथें उंटानां हो काय तोटा; ६, कोणेक पदार्थाचे स्थित्यधिकरणत्वें करून, किं० उत्पत्त्यधिकरणत्वें करून, विवक्षित जो देश त्यास म्ह०; उ० त्या तुमचा रानचें मनुष्य गोरें असतें; कोंकणचा माणसास हें रान मान- तनाहीं; रानखवळणें म्ह० प्रकरणोपस्थित जो कोणेक त्याणें क्रोधावेशानें कावरेंबावरें होणें; रान बदलणें, पारखें होणें, इ० स्थलीं प्रकरणोपा- त्त जो मनुष्य, किं० मनुष्यसमुदाय त्याचा पूर्वीचा वर्तनप्रकार, किं० अंतःकरणस्थिति असा कांहीं अर्थ दिसतो; उ० तो पहिल्यानें आमचे पक्षाचें बो- लत होता पण त्याजकडला लांच खातांच रान ब- दललें; आगोदर गोड गोड गोष्टी बोलत होता, रु- पयांची गोष्ट काढितांच तें रान सोडलें; रानांत शि- रणें किं० रान घेणें म्ह० कोणेकानें बोलण्याचा मा- र्ग सोडून अडरानांत शिरणें; रान काढणें किं० रा- न हाकणें म्ह० पारधी लोकांनीं रानांत शिरून मो- ठ्या मोठ्यानीं शब्द करणें, झाडें हलविणें, इ० व्यापा- रानीं श्वापदें उठविणें; ग्राम्य जे पशु पक्षी वृक्ष, इ० तत्सदृश जे आरण्यक पश्वादि आहेत त्यांचा ग्रा- म्य पश्वादिकांचे नावानेंच व्यवहार होतो तेव्हां भे- दकत्वें करून हा रानशब्द त्यात्या शब्दांचा पूर्वी लागतो, असे जे विशिष्ट शब्द होतात त्यांत जे प्र- सिद्ध आहेत ते किती एक लिहितों; रानतीळ, रानउडीद, रानगांजा, रानघोळ, रानडुकर, रानतूर, रानकेळ, रानतुळस, रानपडवळ, रानमरकी,

रानमसूर, रानमांजर, रानमाठ, रानमाणूस, रानमूग, रानशेण, रानहरभरा, इ० जाणावे.

**रानकरी**, पु० तृण, काष्ट, इ० आणावयाकरितां रानास गेलेला जो मनुष्य तो.

**रानकाढ्या**, पु० पारधीकरितां रान काढण्याविषयीं नियुक्त जे मनुष्य ते प्र०

**रानगोंवरी**, स्त्री० रानशेण.

**रानजेवण**, न० वनभोजन.

**रानट**, ३ लिं० जेंत भात, गहूं, इ० चांगलें शेत होत नाहीं आणि तृणादि भारी उगवतें अशीजी भूमि ती; २, केवल आडगांवांत राहणारा जो शहर, दरबार, इ० कांत वर्तला नाहीं अतएव अडाणी जो मनुष्य तो; ३, रानटी.

**रानटी**, ३ लिं० रानसंबंधी जो वृक्ष, काष्ट, पुष्पें, फळें, भाजी, इ० तो.

**रानभरी**, अ० होणें याचा योगीं प्र० अ० गाय, बैल, इ० कानीं मागील वत्सादिकांचा ओढा न बाळगितां रानोरान फिरूं लागणें, किं० मनुष्यानें बायको, पोर, इ० अनुषंग सोडून कोणेक छंदानें भडकत फिरणें; २, कोणेकानें भयादिकारणामुळें कांहीं सूचेनासें होई असें घाबरें होणें.

**रानभाजी**, स्त्री० रानटी जा कुडयाचा शेंगा, टांकळा, कोला, इ० भाजा त्या प्रत्येकीं.

**रानमाणूस**, न० केवल मनुष्य नव्हे, केवल वानर नव्हे अशी एक उभयमध्यवर्ती एक जीवयोनि आहे; २, रानट जो मनुष्य त्यास म्ह०

**राणवट**, ३ लिं० रानट.

**रानवत**, न० रा० केळ, वड, इ० कांचीं जीं भोजनोपयुक्त प्रसिद्ध पानें तदतिरिक्त जें कुडा, किंजळ, इ० रानवृक्षाचें पान तें

**रानवा**, पु० ग्रामादिस्थलांस तृणकाष्ठ वृक्षादिविशिष्ट जें रान तेणेंकरून असत्येजी विशिष्टता तो; उ० गांवाला रानवा असल्यावांचून तृणकाष्ठाची सोय होत नाहीं.

**रानवाट**, स्त्री० मार्गापासून फुटलेली रानास जावयाची असत्येजी वाट ती; उ० पुढचे अंब्याजवळ वाट उजची फुटली आहे ती रानवट आहे तिणें गेलास तर रानांत जाशील.

**रानशेण**, स्त्री० अरण्यादिकांच्या ठायीं गुरें हगून तसाच जागचेजागीं वाळलेला जो शेणाचा पोहो ती.

**रानोमाळ**, अ० गृहादिक जें रहावयाचें विवक्षित एकस्थल तें सोडून चोहोंकडे; उ० पोथीचीं पत्रें वाऱ्यानें रानोमाळ झालीं; या गांवचीं पूर्वीं गुरें रानोमाळ फिरत होतीं.

**रांप**, पु० फल, पुष्प, पर्ण, इ० कांचे द्रवाचे अंगीं जो कालिमादिरूप रंग विशेष, किं० तत्संबंधादिकारणामुळें येतो तो किं० तद्विशिष्ट जो तो द्रव तो; उ० केळ फूल चिरून फार वेळ ठेवलें म्ह० रांप चढून काळेंमिचकुट होतें; सुपारीचा रांप धोत्रावर पडला तर धोतर खराब होईल.

**रांपणें**, फलादि चिरून फोडून कांहीं काल ठेविलें असतां वात, लोहादिसंबंध झाल्यामुळें त्याणें रांपानें विशिष्ट होणें; २, नीरक्त झालेलें जें शरीर त्याणें आंत रक्त येऊं लागल्यामुळें रंगविशिष्ट होणें; ३, रायतें, लोणचें, इ० पदार्थांत घातलेलें

लेंजें मीठ, मोहरी, मसाला, इ० तो आंत पुरता भिने अशारखोनें विशिष्ट होणें; किं० लोणचें, इ० कांत मोहरी, मीठ, इ० किं० शरीरादिकांत ज्वर, शैत्य. इ० भिनून जाणें; कांहीं एक वर्तमान, बातमी, इ० रांपणें म्ह० सरासरी संशयात्मकत्वें करून विदितपणास आलेलेंजें वर्तमानादि त्यागें स्पष्टपणें लोकांत समजायाजोगें दृढ होणें; ४, रा० कोणेक पदार्थाचे अंतःस्थित जो कठिनांशादि पदार्थ तो स्पर्शानें जाणायाकरितां हस्तादिकानें तो पदार्थ चेपून पहाणें; उ० मीयाचें पोट रांपून पाहिलें, पोटांत कवळू आहे; ५, ला० आंतील गुप्तांशादि सर्व विदित व्हावयासाठीं कोणेक व्यवहारादि विषययुक्तीनें चांचपून पहाणें.

**रांपा**, पु० रा० पोफळें निसायाचें एक आऊत आहे.

**रांपी**, स्त्री० चर्मकाचें एक शस्त्र आहे; २, रा० लहान जो रांपा ती.

**राब**, स्त्री० काकवीपेक्षां कांहीं दाट जो उंसाचे रसाचा रांधा करितात ती; २, पु० कोणेक कर्मानें, किं० गृहादिस्थलाचाठायीं मनुष्यादिसंबंधी जाणें, येणें, निजणें, बसणें, उठणें, इ० क्रियाद्वारा जो वर्तनव्यापार चालला असतो तो; उ० अताशीं घरांत मनुष्यें थोडीं म्हणून पुढला दरवाजा बंद करून मागील दरवाजानेंच राब घातला आहे; तुमचा राब मोठा तुम्हाला एवढें घर पुरणार नाहीं, इ० स्थलीं राबणारे मनुष्यादिकांचें खटलें मोठें म्हणून तदीयतो वर्तनव्यापारही मोठा असा अर्थ; ३, कों० शेताचीजी दाढ तो; ४, रा० शेताची भूमि भाजायाचे उपयोगी जो गोंवर, केर, कचरा, इ० तो; उ० मणाचीदाढ भाजायापुरता घराभोंवता राब पडला आहे.

**राबडी**, स्त्री० दूध आटवून, आंत शर्करादि मसाला घालून, एक भक्षायाचा पदार्थ करीत असतात ती.

**रांबणावळ**, स्त्री० कों० नवेंच आणलेलें गुरूं कळपांत रांबत नाहीं म्हणून तें रांबवायाकरितां जें गुराख्यास द्रव्य द्यावें लागतें ती.

**राबणी**, स्त्री० कों० शेत राबण्याचा जो व्यापार ती; उ० दहा बिघे जमीनीची राबणी करायास शंभर रुपये तरी खर्चास पाहिजेत.

**राबणूक**, स्त्री० कों० राबणी.

**राबणें**, कोणेक मार्गानें किं० गृहादि कोणेकस्थलीं जाणें, येणें, बसणें, उठणें, इ० यथायोग्य क्रियाद्वारा मनुष्यादिकानीं वर्तणें; उ० चोरांचे भयानें त्या घरांत कोणी राबत नाहीं आणि या बाळानेंही राबत नाहीं; २, शेत, घर, इ० संबंधी कामावर शारीरकष्टद्वारा खपणें; उ० पंचवीस माणसें महिनाभर राबत होतीं तेव्हां हा बांध चांगला झाला; ३, रा० राबणें प्रथमार्थी; ४, कों० शेत. वाडी, इ० कांचाठायीं नेतें धान्यादि फल उत्पन्न होण्याविषयीं प्रतिवर्षी जें नांगरणें, पेरणें, शिंपणें, बेणणें, राखणें, इ० क्रियाद्वारा संस्कार करावे लागतात त्या संस्कारानीं तें शेत, इ० संस्कृत करणें; उ० आह्मी वर्षास दहा बिघे शेत परीं राबतों.

**रांबणें**, कों० गोमहिष्यादि पशु, पोर, सासुरवाशीण, इ० कानीं कळप, पंतोजीची साळ, सासरें

सरें, इ० अधिकरणीं न पळतां टिकणें; २, मार्ग जाण्यायेण्याचे वहिवाटीमुळें मळला जाणें, क्रि० खगडें, इ० कागद अनेकवार तोच तोच पुनःपुनः लिहिल्यामुळें शाईनें सारिखल्यासारिखा लिप्त होणें.

**राबता**, पु० मार्ग, गृह, इ० कांचा ठायीं मनुष्यादिकांचीं जाणें, येणें, बसणें, उठणें, इ० जी वहिवाट चालत असल्ये तो; २, दे० महारानें सरकारांत चाकरी करावी असा जो त्यावर कर असतो तो; ३, राबत्या.

**राबत्या**, पु० दे० सरकारांत राबत्याबदल काम करायासाठीं जो महार येत असतो तो.

**रांबडा**, ३ लिं० रा० उनाड जें गुरूं, मनुष्य, इ० तो.

**रांबाडकी**, स्त्री० रा० रांबडपणा.

**राम**, पु० विष्णूचे दशावतारांतील सातवा जो अवतार तो; राम ह्मणणें, क्रि० राम होणें; ह्म० मरणें; दुष्टवार्तादि श्रवण झालें असतां किं० दुसऱ्यानें बोललेल्या दोषादिकांच्या निषेध कर्तव्य असतां या शब्दाचा उच्चार करतात; २, संकेतानें एका रुपयास ह्म०; रामाचें राज्य करणें ह्म० रामराज्य करणें; रामाचें नाव ह्म० रामचर्चा.

**रामकल्ली**, स्त्री० रागिणी आहे.

**रामचर्चा**, स्त्री० कोणेक अर्थाची त्याचें नावही नाहीं अशाप्रकारें अभाव वर्णायाचा असतां याचा प्र० करितात; उ० तो तुह्माला किती सांगोपण मी त्याला रामचर्चा एक अक्षरही बोललों नाहीं.

**रामजन्म**, न० रामनवमीचे दिवशीं रामाचा जन्मरूप जो उत्सव विशेष करितात तें.

**रामजयंती**, स्त्री० सं० रामनवमी.

**रामटेंकी**, ३ लिं० रामटेंक ह्मणून ग्राम आहे, तत्संबंधी जीं नागवेलीचीं पानें इ० तो.

**रामदोला**, पु० रामरट्टा प्रथमार्थी.

**रामदासी**, पु० रामदास ह्मणून एक साधु होता त्याचे संप्रदायानें वागणारे जे हरदास, इ० तो.

**रामदूत**, पु० वानरास ह्म०

**रामनगरी**, ३ लिं० रामनगर संबंधी जो राघू, इ० तो.

**रामनवमी**, स्त्री० चैत्रशुक्ल नवमी.

**रामनामी**, ३ लिं० रामनाम ज्यावर लिहिलें आहे अशी आंगठी, इ० तो.

**रामपहारा**, पु० दिवसाचा जो प्रथम प्रहर त्यास शफन घेणें, इ० विषयीं ह्म०; उ० रामपहाऱ्यांत खोटें बोलूं नको खरें सांग.

**रामपात्र**, न० पाणी प्यावयाचे उपयोगीं प्रा० पितळेचें आकारविशेषाचें एक पात्र आहे.

**रामफळ**, न० एक फल आहे; २, स्त्री० त्याचें झाड ती.

**रामबाण**, पु० प्रतिज्ञावचन, इ० कधीं टळायाचें नाहीं असें वर्णन कर्तव्य असतां आरोपानें ह्म०; उ० त्याचा प्रश्न ह्मणजे रामबाण कधीं खोटा व्हावयाचा नाहीं.

**रामरगाडा**, पु० मोठा जो रगडा तो

**रामरट्टा**, पु० दे० बुकी, सोटा, इ० कांचा जो मोठा तडाखा तो; २, प्रयोजनादिकांचा जो रामरगाडा तो.

**रामरक्षा**, स्त्री० रामाचें एक स्तोत्र आहे ती; २, तीणेंकरून अभिमंत्रित केलेलें जें भस्म त्यास ह्म०; ३, लाह्यांचे पिठास निंदेनें ह्म०

**रामराज्य**, न० जा राज्यांत राजादिकून उपद्रव नाहीं-त आणि सुखानें प्रजा नांदतात असें जें राज्य तें; कोणेकानें रामराज्य करणें ह्म० भयकारण नाहीं-सें झाल्यामुळें निर्भयपणें वर्तणें.

**रामराम**, पु० शूद्रादिक दुसऱ्यास सत्कारार्थ एके हातानें हा शब्द उच्चारून जें वंदन करितात तो.

**रामरामी**, स्त्री० परस्परांचा रामराम करण्याचा जो व्यापार ती; २, परस्परें भेटले असतां एकमेकास रामराम करावा इतकी असल्ये जी ओळख ती.

**रामाठा**, पु० एक औषधी आहे.

**रामानुज**, पु० वैष्णवांत एक भेद आहे.

**रामायण**, न० रामाचे चरित्राची जी कथा तें; २, ती कथा जांत वर्णिली आहे असा जो काव्यपुराणादि प्राचीन ग्रंथ तें; ३, ला० प्रपंचादि व्यवहार संबंधी जी लांबट गोष्ट तीस ह्म०; उ० आमचें एकदां रामायण संपूंद्या मग तुह्मी दुसरी गोष्ट काढा.

**रामेठा**, पु० रामाठा.

**राय**, पु० राव.

**रायआँवळा**, पु० एक फळ आहे.

**रायआँवळी**, स्त्री० रायआवळ्याचें झाड ती.

**रायकेळ**, स्त्री० दे० केळीचे झाडांत एक भेद आहे; २, न० तिचें जें केळें तें.

**रायतें**, न० कालें, आंबे, आवळे, इ० पदार्थांस दहीं, मोहरी, इ० पदार्थ घालून तोंडी लावणें करितात तें.

**रायदिंडा**, पु० दिंडयांत एक भेद आहे.

**रायपुरी साकर**, स्त्री० पिठी साकरेंत एक भेद आहे ती.

**रायपुरीसाखर**, स्त्री० रायपुरी साकर.

**रायभोग**, पु० एक भातांत जाति आहे.

**रायवळ**, ३लिं० साया, शिसव, खैर, फणस या वृक्षांवांचून गृहादि उपयोगी इतर वृक्षांचीं जीं लाकडें तो; २, कोणाचे मतें साया, आणि शिसव, यांवांचून इतर वृक्षांचीं लाकडें तो; ३, लावणीचा नव्हे, इरसाल नव्हे, असा रवळ्याजो आंबा, आंवळा, जांभूळ, इ० तो.

**रायवळी**, ३लिं० रायवळ लाकडाचें जें गृहादिक तो.

**राया**, पु० फक्कड जे पुरुष ते डौलानें आपल्यास ह्मणवितात.

**राव**, पु० राजा; याचा मुख्यार्थी ग्रंथादिकांत प्र०; उ० ह्म० राव नेगें रंक कळ दुकळ; २, लोकांत प्रा० कारकुनी, किं० शिपायगिरी, या गुणानें प्रसिद्ध जे पुरुष त्या पुरुषांचे नामापुढें प्रतिष्ठा नाम हें लागत असतें; उ० बळवंतराव, माधवराव, इ०; कदाचित् केवलाचाही प्र० होतो; उ० कायराव सांगावें तुह्मी काल नवतां मोठी मौज झाली; ३, शूद्रामध्यें मराठे ह्मणून जी जाति आहे तो.

**रावकी**, स्त्री० रावपणा; उ० याला हणमंतराव ह्मणून सारे हाक मारितात याला रावकी कोणी दिली.

**रावखडा**, ३लिं० उपजतच ज्याचा ओंठ विदीर्ण झाला असतो तो मनुष्यादि तो; किं० त्याचा ओंठ; २, ला० मंडळ, चतुरस्र, इ० विवक्षिताकार जें क्षेत्रादिक त्याचा यत्किंचित् अंश कमी झाल्यामुळें जें विशोभित दिसूं लागतें त्यास ह्म०; उ० या पाख्यास कवलें लावलीं तीं चार ओळी कमी आलीं त्यामुळें पाखें रावखंडे दिसतें; सगळें साखून थोडेसा

कींपरा बगळ्यास त्यामुळें गवरवंडें दिसतें.

**रावजी**, पु० पुरुषाचें एक प्रतिष्ठानाम आहे.

**रावटी**, स्त्री० राजादिक मार्गादिकांच्या ठाचीं रहायाक रितां जें वस्त्र निर्मित गृह करितात तें.

**रावण**, पु० पुराणप्रसिद्ध एक राक्षस होता; म्ह०रावणास भिकेचें डोहळे; २, ला० शरीरानें मोठाजो रोणगा, बोका, इ० त्यास निंदेनें म्ह०

**रावणफळ**, न० एक फळ आहे.

**रावणाचीरवाई**, स्त्री० जो पदार्थ मिळवावा तितका खपला जातो आणि पूर्तता होत नाहीं असा जो संसार, इ० त्यास म्ह०; उ० संसार ही रावणाची खाई आहे जो पदार्थ आणावा तो गर्क होतो.

**रांवा**, पु० राघू; २, संकेतानें रावखंड्यास म्ह०

**रांवेरी**, स्त्री० तांबडये रंगाचें एक वस्त्र आहे.

**राव्हटी**, स्त्री० रावटी.

**राश**, स्त्री० राशिशब्दाचा अपभ्रंश.

**राशघटित**, न० राशिघटित.

**राशि**, पु० सं० नक्षत्रचक्राचे मेषादिजे द्वादश ते म्ह०; २, धान्यादिकांचा जो ढीग तो; ३, गुणन, भजन, इ० करण्याविषयीं विवक्षितसंख्याबोधक मांडिलेला जो अंक तो; राशीस लागणें, राशीस बसणें, इ० स्थलीं कोणाएकाचा खणपटीस बसणें, किं० हात धुऊन पाठीस लागणें.

**राशिकूट**, न० घटित पाहण्याचे उपयोगीं जो वधूवरांचे परस्पर राशींचा अनुकूल, प्रतिकूल, भाव तें.

**राशिघटित**, न० वधूवरांचें जें घटित तें.

**राशिचक्र**, न० सं० मेषादि द्वादश राश्यात्मक जें चक्र तें.

**राशी**, ३ लिं० रासवद; पुंजास म्ह०.

**राशीपुंजीस**, अ० गा० येणें याचा अर्थ म्ह०: अकस्मात् येकाचेवर उत्पन्न होतें, मिळतें, जें द्रव्यादि तें एकरून अवश्य कर्तव्य खर्च भागून तें द्रव्यादि कांहीं सांठ्यास पडणें.

**राष्ट्र**, न० राज्यभेदानें किं० कोंकण, मध्यदेश, करनाटक, इ० संज्ञाभेदानें भिन्न भिन्न जे देश ते म्ह०, किं० विवक्षित सीमेनें परिछिन्न जो भूविभाग तो; उ० यंदा आमचा तिकडल्या त्या राष्ट्रांत पाऊस पुष्कळ पडला; पहान्या योगानें सगळ्या राष्ट्रभर खरकटें उडिवलें; नदीपासून डोंगरपर्यंत सारें राष्ट्र आम्हाकडे आहे; २, कोणेक स्थलीं जमलेला सैन्यादिरूप जो संघात तें; उ० साकरेच्या भोंवतीं पहा कसें मुंग्याचें राष्ट्र जमलें आहे.

**रास**, स्त्री० राशि प्रथम द्वितीयार्थी; २, चांगला आणि वाईट असा विभागाची निवड न करितां सरसकट जो कोणेक पदार्थाचा ढीग तो; उ० तुम्ही आंबे निवडून घेणार तर सवा दोन रुपयानीं मिळतील आणि रास घ्याल तर रुपयानें; ३, पु० सं० एका पुरुषानें अनेक स्त्रियांसह वर्तमान करायाची एक शृंगार क्रीडा आहे.

**रासकर्दन**, न० एक रागिना. इ० मोडून दुसरा रागिना, इ० कांहीं केलें असा व्यवहार झाला असतां मोडेलें तें खर्चीं लिहून नवें केलें तें जमेस धरावें असें एकुजमाखर्च लिहिण्याचें प्रकरण आहे तें.

**रासकूट**, न० राशिकूटाचा अपभ्रंश.

**रासघटित**, न० राशघटित.

**रासनाहणें**, न० विवाहामध्यें वरपक्षीय स्त्रियांस

यजें समारंभपूर्वक नखाण गाणीत असतात तें.

**रासन्हाण**, **रासन्हाणें**, न० रास नाहणें.

**रासभ**, पु० सं० गर्दभ.

**रासमाथां**, अ० शेताची मळणी काढून रास सिद्ध झाली म्हणजे त्या अवकाशांतील काळी त्याच काळी, इ० कांहीं अव्यय, इ० देणें, मागणें, घेणें, इ० वि०; उ० तुह्मी आज मला रुपये द्या हे रासमाथां सव्याज देऊं.

**रासमाथ्यास**, अ० रासमाथां.

**रासवट**, ३लिं० केवळ निवडक चांगला असा नव्हे आणि केवळ निकृष्ट नव्हे असा मध्यम प्रतीचा जो पदार्थ तो; उ० केवळ इरसाल आंबे नकोत रासवट असले तरी चालतील; ही मुलगी आपली रासवटच आहे.

**रास्त**, ३लिं० न्याय्य जें भाषण, कृति, व्यवहार, इ० तो. किं० प्रामाणिक जें वजन, माप, इ० परिमाण तो.

**रास्ता**, पु० लुगड्यांत एक भेद आहे.

**रास्ती**, ३लिं० रास्त.

**रास्ना**, पु० एक औषधी आहे.

**राहणें**, मनुष्यादि अर्थानें कोणेक अधिकरण स्वस्थितीनें आक्रमून त्याचा ठायीं स्थिर होणें; उ० असा सांप्रत काशींत राहतों; एका बोटावर काठी कशी राहील; २, पात्रादिरूप जें समावेशस्थान त्याचा ठायीं कोणेक पदार्थानें समाविष्ट होणें; उ० या दौतींत अच्छेर शाई राहील; ३, सतत चाललें जें कांहीं एक त्याणें बंद होणें; उ० पाऊस राहिला स्म० तुझ्या पोटांतील तिडीक राहील; कपाळ राहिलें; पोट राहिलें, इ० स्थलीं त्यांतील वेदना राहिली असा अर्थ; ४, कोणेक कामानें अंशतः होऊन अवशिष्ट अंशानें किं० सर्वांशानें अव्यक्तता च स्थाई स्म० हें आवश्यक आहे अशी जी अवस्था त्या अवस्थेत पडणें; उ० वाड्याचें काम अर्धें झालें अर्धें राहिलें, यंदा त्याचें लग्न होणार होतें पण राहिलें; ५, उरणें; उ० शंभर रुपयांतून चार रुपये राहिले; ६, कोणेक कार्याचे ठायीं प्रवृत्त होण्याचा प्रसंग असतांही कोणेकानें कांहीं कारणामुळें प्रवृत्त न होतां तसेंच तसेंच असणें; उ० तूं शिवी दिलीस तर मी तोंडांत मारल्याशिवाय राहणार नाहीं; हात राहणें, पाय राहणें, तोंड राहणें, इ० स्थलीं तें तें इंद्रियादि स्वस्वव्यापारीं असमर्थ होणें, शक्ति राहणें, इ० स्थलीं शक्तिक्षीण होणें; अन्न राहणें, इ० स्थलीं अन्न जाईनासें होणें.

**राहित्य**, न० रहितपणा.

**राहु**, पु० नवग्रहांतील आठवा जो ग्रह तो; राहुग्रस्त, इ० स० जाणावे.

**राहुटी**, स्त्री० रावटी.

**राहुपर्व**, न० ग्रहणरूप जें पर्व तें.

**राहूनराहून**, अ० एकसारखा सतत नव्हे मध्यें कुंठित होत होत; कोणेक क्रियेचें करणें, होणें, इ० क्रियाचें वि०; उ० या नक्षत्राचा पाऊस एकसारखा लागत नाहीं राहूनराहून पडतो.

**राहोटी**, स्त्री० राहुटी.

**राळ**, स्त्री० डिंकासारिखा एक औषधी पदार्थ आहे जो अग्निसंयोगानें फार त्वरित पेटतो ती; २, एक क्षुद्र प्राणी आहे जो रात्रीस फिरे असा सतत ओरडत असतो ती; ३, फरफजीती.

**राळा**, पु० एक धान्य आहे.

**राक्षशी**, ३ लिं० राक्षसी प्रथमार्थी.

**राक्षस**, पु० देव, मनुष्य, यांचीस्पर्धा करणारा तामस उग्रस्वभावाचा एक देवयोनींत भेद आहे तो; २, क्रूर, भयंकर, साहसिक, फारखाणारा, असाजो मनुष्यादि त्यास आरोपानें ह्म०; ३, साठसंवत्सरांतील जो एकुणपन्नासावा तो.

**राक्षसगण**, पु० जन्मनक्षत्रावरून परिणामउपयोगी गण ह्मणून कांहीं फलविशेष येत असतो त्यामध्यें भरणी. कृत्तिका, आश्लेषा, मघा, चित्रा, विशाखा, ज्येष्ठा, मूल, शततारका, या नऊ नक्षत्रांवर जो जन्मला त्याचा जो गण तो.

**राक्षसगणी**, ३ लिं० राक्षसगण आहे ज्याचा तो.

**राक्षसवेळ**, स्त्री० केवळ तिनसांजाची जी वेळ तीस ह्म०

**राक्षसवेळा**, स्त्री० राक्षसवेळ.

**राक्षसी**, ३ लिं० राक्षससंबंधी जी माया, योनि, इ० तो; २, ला० घोर साहसविशिष्ट जें कर्म, उपाय, तामस जें खाणें, इ० तो.

**राक्षसीवेळ**, स्त्री० राक्षसवेळ.

**राक्षसीवेळा**, स्त्री० राक्षसवेळा.

**राज्ञी**, स्त्री० सं० राणी.

**रिकबी**, स्त्री० रिकिबी

**रिकवणें**, कोणेकपदार्थानें भरल्यामुळें अनवकाश झालेलें पात्रादिक तें त्या पदार्थाचावियोगानें सावकाश करणें.

**रिकामका**, ३ लिं० रिकामा.

**रिकामचावडी**, स्त्री० रिकामचोट मनुष्यांची चकाट्यापिटीत बसायाचीजी जागा ती, अथवा तो समुदाय ती.

**रिकामचेष्टा**, स्त्री० करावयाचा उद्योग सोडून रिकामा कोरडा जो व्यापार त्या.

**रिकामचोट**, पु० निरुद्योगी मनुष्यादिकांस निंदेनें ह्म०; २, कार्याचाठायीं विनियुक्त न होतां उगीच पडलेला जो पदार्थ तो.

**रिकामटवळा**, ३ लिं० रिकामचोट

**रिकामपण**, न० एकाकार्याखालीं न गुंतल्यामुळें कार्यांतरीं अन्वित होण्यास मनुष्यादिकांस जी कालकृत सावकाशता असत्वे तें.

**रिकामपणा**, पु० रिकामपण.

**रिकामवेळ**, स्त्री० अवश्यकर्तव्य कार्याखालीं गुंतलेली नव्हे अशी रिकामी जी वेळ ती.

**रिकामा**, ३ लिं० कोणेक कामावर गुंतलेला नव्हे अतएव कार्यांतरीं लागण्याविषयीं जो मोकळा तो; उ० चोघांला चाकरी लागली मी मात्र रिकामा आहें; तुमचा चाकू रिकामा झाला ह्म० मला अंमलवा; २, आधेयाचा संनिवेशानें गुंतलेलें नव्हे किं० निरवकाशपणें भरलेलें नव्हे अतएव आधेयांतराचा सन्निवेशास उचित जें अधिकरणभूत पात्र, स्थल, वाहन, काल, इ० तो; उ० ही दोन रिकामीच आहेत शाई घाल; विहीर अजून चार हात रिकामी आहे; ३, जा कार्याविषयीं प्रवृत्त झायाचें त्या कार्याचे साधनभूत जे द्रव्यादि पदार्थ तद्रहित जो मनुष्य तो; उ० जवळ पैसा नाहीं रिकामा बाजारांत जाऊन काय करूं; रिकामा जाणें किं० येणें, ह्म० उद्दिष्ट कार्य केल्यावांचून जाणें, येणें; उ० मी तुला न्यायाला आलों तो घेतल्याशिवाय रिकामा जाणार नाहीं;

यजमानाकडे गडी पाठविला होता पण ते भेटले नाहींत तेव्हां गडी रिकामा माघारा आला; ४, प्रयोजन द्रव्य किं० फलद्रव्य, जो भाषणादिव्यापार, खर्च वेच, इ०तो; उ० तूं मध्यें रिकामें कशाला बोलतोस; रिकाम्या हातानें किं० रिकामे हातानें, क्रि०वि० जें कार्य करावें त्यास जें साधन पाहिजे असतें तें हातीं असल्यावांचून तें कार्य करणें किं० कार्यार्थ जाणें, येणें, इ०कांचे वि० किं० रिक्तहस्तपणें राजा, देवता, इ०कांचे दर्शनार्थ जाणें, येणें, इ०कांचे वि०; उ० मी आजपर्यंत रिकाम्या हातीं संसार केला, म्ह० हातीं द्रव्य नसतां; उ० रिकामे हातानें कां देवास जातोस फुलें वा कांहींतरी घेऊन जा रिकामे पोटीं म्ह० भोजन न केल्यामुळें पोट रिकामें असतां कांहीं काम करणें इ०कांचे वि०; उ० जेवल्यावर चालावें यापेक्षां रिकामे पोटीं चालावें हें बरें.

रिकिबी, स्त्री० घोडे किं० सांड, यांजवर बसलें असतां पाय अडकवायासाठीं लोहादिकांचीं आकारविशेषाचीं दोन वलयें दोहींकडे बांधिन असतात तीं प्र०

रिकीब, स्त्री० रिकिबी.

रिकीबदाल, पु० हिं० तंगास रिकिब्या बांधायाचें रज्जुरूप साधन असतें तो.

रिकीबी, रिकेबी, स्त्री० हिं० रिकिबी.

रिक्त, ३ लिं० सं० रिता.

रिक्तकोष्ठ, न० सं० आंत अन्नांश, मलांश, नाहींसा झाल्यामुळें रिकामा जो पोटाचा कोठा तो.

रिक्तपाणि, ३ लिं० सं० ज्याचे हातांत फल, पुष्प, द्रव्य, इ० कांहीं नाहीं असा जो मनुष्य तो, राजा, देवता, इ०कांचे दर्शनार्थ गमनोद्देश असतां प्रा० प्र०

रिक्ता, स्त्री० सं० चतुर्थी, नवमी, चतुर्दशी या तिथी प्र०

रिंगणी, स्त्री० एक औषधी आहे.

रिंगणें, न० रिंगणीचें जें फल तें; २ पोरांचें खेळणें आहे.

रिंगी, स्त्री० रा० रिंग्याचें जें झाड ती.

रिंगें, न० रा० रिंगीचें फळ तें.

रिघणें, मनुष्यादिकांची दाटी, इ० कारणामुळें अडचणीची जी जागा ती मध्यें कोणेक पदार्थानें बलानें अवकाश करून प्रविष्ट होणें; २, रा० सुरण, कोन, रताळें, इ० कंदानीं भूमी मध्यें विस्तरून वृद्धिंगत होणें.

रिघाव, पु० अडचणीचे स्थलीं बलानें किं० युक्तीनें जो प्रवेश तो.

रिचवणें, धान्य, पाणी, इ०कानें भरलें जें पात्र तें धान्यादिक पात्रांतराधिकरणीं ओतून रिकामें करणें; पक्षीं त्या धान्यादिकांसही कर्मत्व; २, कौलें, लांकडें, दगड, विटा, वस्त्रें भांडीं, इ० रूप जो पदार्थ समुदाय तो कोणेक अधिकरणीं राशिभूत होऊन राही असा ठेवणें; उ० घरांतलीं सारीं पांघुरणें गोळा करून बाजेवर नेऊन रिचवलीं.

रिझणें, कोणेक विषय मनास आल्यामुळें तद्विषयीं हा घ्यावा, भोगावा, इ० रूप जो अंतःकरणांत भाव होतो, तद्विशिष्ट कोणेकानें होणें; उ० त्या पागोट्याचा रंग भडक दिसतो त्याजवर च रिझून कांहीं सूतपोत पहा.

रिझाऊ, ३ लिं० दुसऱ्यास रीझ उत्पन्न करणारें जें गान, स्वरूप, गोड भाषण करणारा मनुष्य, इ० तो.

**रिठा**, पु० एक झाड आहे व त्याचें फल तो.

**रिठी**, स्त्री० कों० रिठा म्हणून झाड ती.

**रिठें**, न० रिठीचें जें फल तें.

**रिणकरी**, पु० ऋणकरी.

**रिणानुबंध**, पु० ऋणानुबंधाचा अपभ्रंश.

**रिणायितस्वरूपी**, ३ लिं० ऋणाइतस्वरूपी.

**रिणायीत**, ३ लिं० ऋणायीत.

**रिणी**, ३ लिं० ऋणी.

**रिता**, ३ लिं० रिकामादि समयार्थी; २, प्राकृत ग्रथांत जा अर्थानें रहित जो अधिकरणरूप पदार्थ तो त्या अर्थानें; उ० सरस अरसो निमधुपबहु मतजरि हिरसें करूनि कुंद रितें.

**रिताड**, स्त्री० पेठ, बंदर, इ० कांचा ठायीं बाहेरून आणलेला माल टाकून पुनः तेथील माल न भरितां रिकामे चालले ते बैल, गलबतें इ० ती; २, माल भरून किं० परबीच रिकामे माघारे चाललेले जे बैल, गलबतें, इ० त्यांस म्ह०; ३, कों० रहाटाचे माळेचे रिकामे होऊन पुनः पाणी भरावयास खालीं चाललेले जे लोटे ती; ४, पोटाचा जो अन्नागाचा अभावामुळें रिकामेपणा ती.

**रिपरीप**, स्त्री० दे० पिरपीर.

**रिपार**, पु० न० कों० रिपानी केलेलें गृहादिकांस आमणनें तो.

**रिपु**, पु० सं० अरि.

**रिवरिवणें**, खरखणें.

**रिवरीव**, स्त्री० खरखर.

**रिसालदार**, पु० हिं० रिसाल्याचा जो अधिकारी

**रिसालदारी**, स्त्री० रिसालदारपणा ती.

**रिसाला**, पु० हिं० राजादिकानें चाकरीस ठेऊन एके अधिकाऱ्याचे स्वाधीन केला जो घोडेस्वारांचा समुदाय तो.

**री**, स्त्री० लावणी इ० कांचे स्वरपूरणार्थ पाठीमागून रीहा शब्द उच्चारून जो सूर देतात ती.

**रीग, रीघ**, पु० स्त्री० रिघाव; २, रिघाव व्हावयाजोगा जो अवकाश ती तो; उ० अशी दाटी झाली आहे कीं आंत बोट शिरकायाला देखील रीघ नाहीं.

**रीज, रीझ**, स्त्री० कोणेक विषयावर अंतःकरणाची असल्येजी सादरता ती.

**रीण**, न० ऋणाचा अपभ्रंश

**रीत**, स्त्री० रीतिशब्दाचा अपभ्रंश.

**रीतभात**, स्त्री० रीत, इ० ती.

**रीतरवेस**, पु० स्त्री० रीतभात.

**रीति**, स्त्री० बोलणें, चालणें, इ० व्यापारमात्र करायाचे देशभेद, कर्तृभेदादि प्रयुक्त जे निरनिराळे अनेक प्रकार ते प्र०; २, प्रकारादि भेदें करून भिन्नभिन्न जे वर्तनप्रकार ते प्र०; उ० तूं आल्या मनुष्यास शिव्या देतोस ही रीति वाईट.

**रीप**, स्त्री० आमण करायासाठीं लांकूड चिरून पातळ जी पट्टी करितात ती.

**रीस**, न० आस्वल; २, ला० आळशी, मलिन, असा जो मनुष्यादि त्यास निंदेनें म्ह०; ३, दे० चीड.

**रींस**, न० रीस प्रथम द्वितीयार्थी.

**रुइफल**, न० छींट, इ० वस्त्रावर किं० लुगडें, इ० कांचे काठावर किं० कंगण्या इ० अलंकार, इ० कांवर जे रुईचे फुलासारिखे अलंकार विशेष उठविले अ-

सतात ते प्र०

रुई, स्त्री० एक झाड आहे; २, रू; ३, चाजवीजी गीत नी परंतु या अर्थी प्रथमांत प्र० नाहीं; उ० तुह्मी रुई-ची गोष्ट सांगितली असतां ऐकणें प्रास; तोंजव्हां ज-बरदस्ती करूं लागला तेव्हां सर्कारांत जाणें रुईस आलें.

रुईमांदार, पु० रुईचे झाडासारिखेंच झाड असून जा-चीं फुलें रुईचे फुलांपेक्षां स्वच्छ पांढरीं असतात तो.

रुका, पु० आण्याचा जो द्वादशांश तो; २, भूमि मोजाया-चें एक प्रमाण आहे.

रुकार, पु० कांहीं एक करण्याविषयीं कोणेकाचे अनु-मताचा बोधक जो त्याचें मुखानें हूं, कर, होय, बरें, आ-हे, इ० रूप जो शब्द निघतो तो; याचें तात्पर्य आहे. अ-नुमतावर ह्मणून मानिलें ह्मणजे जरी अनुमताविष-यीं संज्ञा केली तरी त्यास ह्म०; २, जमाखर्चाची अने-क कलमें किं० मनुष्यादिकांचीं नामें, इ० जीं क्रमानें लि-हिलीं असतात त्यांस रुजूवात, इ० संस्कार कर्तव्य असतां जाजा स्थानीं तो संस्कार झाला त्या त्या स्था-नीं तद्बोधक जें रु असें अक्षररूप चिन्ह करितात तो.

रुक्का, पु० रुका.

रुकसत, स्त्री० हिं० रुखसत.

रुखय, स्त्री० कों० एक किडूं आहे जें प्रायः वृक्षावर असतें तो.

रुखरूख, स्त्री० कांहीं एक वस्तु हारवली, इ० कारणा-मुळें कोणेकाचे अंतःकरणास जी चटपट लागती ती.

रुखवत, न० वरप्रस्थानाचे पूर्वी वरास कन्येचा बापा-कडून समारंभपूर्वक फराळाची, इ० सामग्री आ-णितात ते; २, तें फराळाचें, इ० वरापुढें ठेऊन त्या-जकडून फराळ करवितात असा जो समारंभ करि-तात तें; क० तो समारंभ वरप्रस्थानानंतर वधूमंड-पांतही करितात.

रुखा, ३ लिं० कों० रुक्ष जो भक्ष्य पदार्थ, स्थल, भाषण, कंठस्वर, इ० तो.

रुखाडी, ३ लिं० वृक्षावर चढण्याविषयीं जो रुख-ईत तो.

रुखाड्या, ३ लिं० कों० रुखाडी.

रुखाळूं, न० अळ्यांत एक भेद आहे जें वृक्षावर उग-वत असतें तें.

रुख्या, ३ लिं० कों० रुखाडी.

रुखूसत, स्त्री० रजा; परंतु प्रायः प्रथमार्थी चालून

रुगाळा, ३ लिं० शरीरानें कृश जो मनुष्यादि तो.

रुग्ण, ३ लिं० रोगग्रस्त.

रुच्यकर, ३ लिं० रुचिकर याचा अपभ्रंश.

रुचणें, कांहीं एक पदार्थ किं० गोष्ट आवडणें, उ० मी-त त्यजिलें तें तो भूप बळें तुज रुचेल तरि जाणें; २, कोणेक गोष्ट यथायोग्य आल्यामुळें शोभणें; उ० तुह्मी पिढीचे भट तुह्मां प्रसंगीं भिक्षा मागितली तरी रुचेल पण आह्मा ग्रहस्थाला लोक हांसतील; ३, रुतणें.

रुचि, स्त्री० सं० पदार्थनिष्ठ जी गोडी ती; २, रसनेंद्रि-यास असते जी चव ती; ३, कोणेक पदार्थ, कर्म, इ० विषयावर आवड ती; ४, कांति.

रुचिक, पु० रुई ह्मणून जें झाड त्याचा औषधार्थं काढितात जो चीक तो.

रुचिकर, ३ लिं० सं० ज्याचे भक्षणानें रसनेस आल्हा-

अरुचि जात्ये असा जो आंवळा, महाळुंग, सैंधव, इ॰ पदार्थ तो किं॰ भक्षिला असतां चांगला लागतो असा जो मधुराम्ल, क्षाराम्ल, इ॰ पदार्थ तो.

**रुचिर**, ३ लिं॰ स॰ सुंदर.

**रुचीक**, ३ लिं॰ रुचिकर जो पदार्थ तो; २, रुई चा जो चीक तो.

**रुच्य**, ३ लिं॰ रुचिकर प्रथमार्थी.

**रुजणें**, धान्य, कंद, इ॰ रूप जें बीज त्याणें अंकुरविशिष्ट होणें.

**रुजामा**, पु॰ बैठकीचा उपयोगीं पोटीं रू घालून शिवून मोठें जें वस्त्र करितात तो.

**रुजूमुकाबला**, पु॰ हिं॰ उभयतांचें भाषणादिकांचा खरेखोटेपणा किं॰ उभय पदार्थांचा चांगलेपणा, वाईटपणा, इ॰ समजावें ह्मणून ताडून पाहायाकरितां त्यांचें करितात जें संमुखपणें संनिधान तो.

**रुजूवात**, स्त्री॰ विवादविषय किं॰ संशयविषय जो परस्परांचें देणें, घेणें, इ॰ रूप कांहीं अर्थ तन्निर्णयार्थ त्या परस्परांचें तद्विषयीं साक्षात् संभाषण व्हावयाजोगी जी त्यांची समक्षता ती; २, कोणेक कागदपत्राचा लेखाचा खरेपणा, खोटेपणा, इ॰ पाहायासाठीं लेखांतराशीं ताडून पहावें ह्मणून त्यात्या लेखाची करितात जी समक्षता ती; रुजुवात घेणें ह्म॰ यादीवर लिहिलेले किं॰ तोंडानें सांगितलेले जे पदार्थ, कलमें, इ॰ ते समक्ष ताडून पहाणें.

**रुजूवाती**, ३ लिं॰ कों॰ रुजूवात घ्यायाची आहे जाची असें जें कलम, नावनिशी, रकम, इ॰ तो.

**रुजू**, ३ लिं॰ विवक्षित काम करण्याविषयीं जाकडून अनमान नाहीं असा जो तो; उ॰ तुह्मी सांगाल तें करायास मी रुजू आहे; २, चाकरी, इ॰ कामावर किं॰ सर्कार, इ॰ अधिकरणीं जो हजीर तो; होणें, करणें यांचा योगीं प्र॰; उ॰ मी कालच चाकरीवर रुजू झालों; तुह्मी चोर धरलेत ते सर्कारांत नेऊन रुजू करा; तुह्मी एथें निरोप घ्या पण पंधरावे दिवशीं पुण्यांत मजपाशीं रुजू व्हा; ३, कोणेक अधिकरणस्थ जी ग्राह्यकोटी तीमध्यें लेखादिद्वारा गृहीत जो तो; होणें, पडणें, इ॰ कांचा योगीं प्र॰; उ॰ मृग्यावर उपकार केला असतां व्यर्थ ह्मणतां परंतु ईश्वरास तर रुजू पडेल; तुह्मी पन्नास रुपये बाकी आह्माकडे काढलीत पण ती आह्मास रुजू नाहीं; याचें नांव सर्कारचे यादीस रुजू आहे कीं नाहीं तें पहा; तुह्मी जें आज बोलाल तें तेथें रुजू पडेल.

**रुजूगुदस्त**, ३ लिं॰ गुदस्त वहिवाटीस रुजू जो व्यवहार तो.

**रुजूमुकाबला**, **रुजूमोकाबला**, पु॰ हिं॰ रुजूमुकाबला.

**रुझणें**, रुजणें.

**रुझवण**, न॰ कों॰ रुझायाकरितां भूमींत लाविलें जें बीज फलादि तें व तें रुझून झाला जो अंकुरसमुदाय तें.

**रुटुखुटू**, अ॰ केवळ झपाट्यानें नव्हे, केवळ अगदीं स्तब्ध होऊन राहिलें असें नव्हे, अशा प्रकारें सरासरी मंदपणें, कोणेक गोष्ट, मनुष्य, इ॰ कांचें चालणें, इ॰ कांचें वि॰; उ॰ देवळाचें काम आतां रुटुखुटूच चाललें आहे; कोणेकानें रुटुखुटू करणें ह्म॰ सांगायाजोगा मोठा कामधंदा, इ॰ न करितां पोटापुरते अनेक किरकोळ व्यापार करणें

**रुंड**, न॰ मनुष्यादिकांचें तोडलेलें जें शिर तें.

**रुंड**, स्त्री॰ रा॰ उचला; २, न॰ रुंड; एकघाव आणि दोन रुंडें, इ॰ स्थलीं मनुष्यादि शरीराचे दोन जे तुकडे ते प्र॰ असा अर्थ

**रुदणें**, कोणेक गोष्ट कोणेक रूपें लोकप्रसिद्धीस येणें; उ॰ रामशिंगाचे पोरानें चोरी केली असें सगळ्या गांवभर रुदलें.

**रुणझुणणें**, पैंजण, इ॰ भूषणांनीं रुणझुण अशा शब्दानें वाजणें.

**रुणझुण**, अ॰ अनु॰ तोरड्या, पैंजण, इ॰ कांचे वाजण्याचें वि॰

**रुणरुणणें**, रा॰ वेगानें चाललेल्या जो गोफणेचा दगड, बंदुकेची गोळी, इ॰ कानें वाजणें.

**रुणा**, पु॰ को॰ हृद्रोग.

**रुतणा**, स्त्री॰ रुपण.

**रुतणें**, कठिन जो कांटा खिळादि पदार्थ तो शरीरादि मृदुपदार्थांशीं घट्ट संबंध झाल्यामुळें त्यानें फोडून किं॰ चेपून आंत शिरणें; उ॰ पायांत कांटा रुतला; भुईवर निजलें म्हणजे अंगास खडे रुततात; चिखलांत गाय रुतली आहे काढालतर पहा.

**रुतू**, पु॰ ऋतुशब्दाचा अपभ्रंश.

**रुंद**, अ॰लिं॰ रुंदीनें विशिष्ट जो पदार्थ तो.

**रुंदट**, अ॰लिं॰ विवक्षित रुंदीपेक्षां ज्याची रुंदी अधिक तो पदार्थ तो.

**रुदन**, न॰ रडण्याचा जो व्यापार तें.

**रुंदावणें**, शरीरादिक पूर्व रुंदीपेक्षां रुंद होणें किं॰ आकुंचित वस्त्रादिक पसरणें, इ॰ द्वारा रुंद करणें.

**रुंदावा**, पु॰ रुंदपणा.

**रुदित**, न॰ सं॰ रुदन.

**रुंदी**, स्त्री॰ क्षेत्रवस्त्रादि जो साकार पदार्थ त्याचें लांबीचें जें सूत्र त्यावर आडवें सूत्र या पर्यंतापासून त्यापर्यंतापावेतों मारिलें असतां त्या सूत्रानें परिछिन्न होतां जो त्या क्षेत्रादिकांचा परिमाण विशेष ती.

**रुद्रगांठ**, स्त्री॰ लुगडें, दोरखा, इ॰ कांवर विणकरीत चवकडी सारखी चिन्हें उठविलीं असतात ती प्र॰

**रुद्रगांठी**, अ॰लिं॰ रुद्रगांठींनीं विशिष्ट जो दोरखा, स्त्रियांचें लुगडें, इ॰ वस्त्र तो.

**रुद्रपिशाच**, पु॰ काशींत मेलेला प्राणी काशींत केलेलें पाप भोगायासाठीं पिशाचदेह धारण करितो तो, २, ला॰ शीघ्रकोपी, अविचारी, जो मनुष्य त्यास अ॰

**रुद्रभूमि**, स्त्री॰ मसणवटी.

**रुद्रयाग**, स्त्री॰ अकरारुद्रांचा जो याग करितात तो.

**रुद्रविणा**, पु॰ विण्यांत एक भेद आहे.

**रुद्रावतार**, पु॰ फार क्रोध आल्यामुळें भयंकर झालेलें जें स्वरूप त्यास म्ह॰

**रुद्राक्ष**, पु॰ एक वृक्षबीजरूप शिवप्रिय मणि आहे तो, जो माळादिरूपें करून शिवभक्त शरीरावर धारण करितात तो.

**रुंध**, अ॰लिं॰ रुंद.

**रुंधट**, अ॰लिं॰ रुंदट

**रुधणें**, कांहीं आधेयाचे समावेशानें जें अवस्थाधिकरण असून पदार्थ त्या आधेयाकडे गुंतणें किं॰ मनुष्यादि कोणी व्यापारांतराचे उपयोगी न पडे असा कोणेक व्यापाराकडे गुंतणें.

**रुधावणें**, रुंदावणें.

णि अभाव एक मिळून सान पदार्थ; परामध्यें तंतु रूपानें कापूस राहतो; ४, पदार्थमात्राचे अंगीं विद्यमान बरेपणा, वाईटपणा, कुबकेपणा, नासकेपणा, इ० जे विवक्षित यावद्धर्म असतात ताव- द्धर्म वैशिष्ट्य जें त्या पदार्थाचे अंगीं असतें तें; उ० हा अंबा खाऊन पहावा तेव्हां याचें रूप समजेल; ५, कोणेक पदार्थ गोष्ट, व्यवहार, इ० कां पासून व्हावयाचें जें यथायोग्य फलादि तें झाल्यामुळें किं० त्याचे अंगीं यथायोग्य असावें जे सद्गुणादि ते अस- ल्यामुळें जी त्या पदार्थादिकांतें जी शोभा तें; उ० यार रुपये मिळाले तर व्यवहार केल्याचें रूप नाहीं तर काय; यांचे घरीं मनुष्यानें जीव देऊन काम करूं द्या परंतु त्या कामाचें रूप व्हावयाचें नाहीं; लज्जा हें कुलस्त्रियांचें रूप होय; ६, नाम किं० धातु यांपुढें विभक्त्यादि अनेक प्रत्यय होऊन जे अनेक शब्दभेद होतात ते प्र०; ७, गणितामध्यें एक म्हणून जी संख्या त्याची संज्ञा किं० अव्यक्त गणितामध्यें व्यक्त जी संख्या तिची संज्ञा; ८, पु० चंग, कांचन, गंजीफांतील सानवाजो रंग तो.

**रूपक**, न० एक अर्थालंकार आहे.

**रूपवती**, स्त्री० सुंदर जीचें रूप ती.

**रूपवान्**, ३ लिं० सुंदर जाचें स्वरूप तो; २, रूप जास आहे असा जो पदार्थ तो; उ० जेवढा रूपवान् पदार्थ तेवढयाचें चक्षुरिंद्रियानें प्रत्यक्ष होतें.

**रूपी**, ३ लिं० जा अर्थाचें तादात्म्य जा अर्थावर मानिलें तो तद्रूपी; उ० हा पुरुष केवळ पिशाच रूपी आहे.

**रुबरू**, **रुबुरू**, अ० उरुबुरू.

**रूय**, स्त्री० कों० रुई.

**रूरयात**, अ० बाजवी रीतीनें चालणें, वागणें, इ० कांचें वि०

**रूळे**, पु० स्त्रियांचें पादभूषण आहे.

**रे**, अ० अरे या अर्थी: उ० रे मुला हिकडे ये.

**रेंकणें**, म्हैस, रेडी, टोणगा, याणीं स्वजातीय शब्दानें ओरडणें; २, ला० मनुष्यानें घोगरे गळ्यानें गाणें किं० ओरडणें या अर्थी आरोपानें प्र० करितात; चालणें, बोलणें, इ० कांहीं एक काम रेंकत करणें, म्ह० आळसावत आळसावत मंद मंद अशा प्रकारें करणें; कोणेकानें रेंकत जाणें किं० येणें म्ह० कोणेक लालचीचें अगत्य लागल्यामुळें दुसऱ्यानें प्रेरणा न करितां आपस्वरेंच जाणें किं० येणें; उ० अह्मी एव्हां दरिद्री म्हणून अह्मांकडे कोणी येत नाहीं अह्मास श्रीमंत होऊं द्या मग कोण पाहिजे तो रेंकत येईल.

**रेंकला**, पु० गाडींत एक भेद आहे.

**रेंकाड्या**, ३ लिं० कों० म्हशीचे कंठाचे शब्दासारिखा जाचा घोगरगळा त्यास निंदेनें म्ह०

**रेक्ता**, पु० फारशी भाषेवर किं० हिंदुस्थानी भाषेवर केलेला गानोपयोगी कविताविशेष असतो तो.

**रेखटणी**, स्त्री० रेखाटणी.

**रेखटणें**, रेखाटणें.

**रेखणी**, स्त्री० रेखण्याचा जो व्यापार तो; २, रेखाटणी.

**रेखणें**, **रेंखणें**, स्थल, भिंत, कागद, लांकूड, इ० कांवर कोष्टक, चित्र, इ० विवक्षिताकार रंगादिकाचे रेषानीं उत्पन्न करणें, किं० तें स्थलाद्यधिकरण

त्याच क्रियेनें त्या कोष्टकाच्या कारानीं विशिष्ट करणें; २, कपालादिकांवर सरासरी लावलेलें कुंकू, गंध, इ० तें अधिक लागलें असेल तें पुसून किं० लागलें नसेल तेथें नवें लावून स्फरेख दिसे असें करणें; ३, वस्त्राच्या चुण्या, केंसांचा पट्या, इ० स्फरेख दिसाया जोगें बेतानें विवक्षितानुरूप बसविणें

रेखा, स्त्री० सं० कागद, भिंत, इ० कांवर रंगाची लेखणी, खिळा, इ० ओढलें असतां तो रंग लागून किं० त्या ओढण्यानें खरडल्यामुळें जें चिन्ह त्या कागद, इ० कांवर उमटतें तें किं० हस्तादिकांवर तादृशाजें स्वतःसिद्ध चिन्ह असतें तें; २, ग्रहादिकांचे गणितार्थ लंकेपासून मेरूपर्यंत दक्षिणोत्तर सूत्र कल्पित आहे तें.

रेखाटणी, स्त्री० आंकणी म्हणून जें रेखायाचें साधन असतें तें.

रेखाटणें, रेखणें प्रथमार्थी.

रेखांतर, न० विवक्षित देशास दक्षिणोत्तर रेखेपासून कांहींएक योजनात्मक जें मध्यें अंतर असतें तें.

रेंगणें, आळस, अनुत्साह, इ० कारणामुळें हळूहळू मंद मंद चुकवीत चुकवीत असा जो कांहीं काम करण्याचा प्रकार तद्विशिष्ट कोणेकानें तें काम करीत असतां होणें.

रेंगळणें, को० विरंगुळणें; २, कांहीं मोठा परिश्रम पडल्यामुळें थकणें.

रेघ, स्त्री० रेखा प्रथमार्थी; २, कपाळावरील केंस चिमट्यानें किं० वस्त्र्यानें काढून स्फरेख दिसाया जोगा जो शस्त्रधारेप्रमाणें केशसीमेचा सारखा आकार करितात ती; कोणेकास रेघ ओढून देणें, काढून देणें, इ० स्थलीं रेघा काढून देणें, ओढून देणें, असा अर्थ.

रेघेरूपास, रेघेरूपेस, अ० येणें किं० आणणें याचा योगीं प्र० अ० आरब्ध जें कोणेक कार्य तें अनुकूल क्रियासंस्कारादि योगानें आकारास येणें किं० आणणें; २, ढांसळलेलें जें संसारादि त्याणें पुनः कांहीं आश्रय मिळाल्यामुळें स्थिरतावर येणें किं० दुसऱ्यानें आणणें; ३, विद्या, द्रव्यादि संपत्तीचा अभावामुळें अगणनीयत्वें करून स्थित जो कोणी त्याणें त्याच्या संपत्तियोगानें यथायोग्य दर्जित दशेस येणें किं० दुसऱ्यानें आणणें; उ० हा आल्ता नेव्हां याला नेसायास धोतर देखील नव्हतें तो माझा आश्रयानें रेघेरूपास आला आतां उफराटी गोष्ट सांगतो, मी पदरचे पांचशें रुपये खर्चून यांत रेघेरूपास आणलें आतां हा सांगतो यार.

रेंच, पु० भोजनास बसलें असतां कोणी भग्ल्यापायानीं आल्या किं० कोणाची दृष्टि पडली, इ० कारणामुळें अन्नावर अरुचि व्हावी, ओकारी येत असावी, असा जो विकार होतो तो भरणें, उतरणें, याचा योगीं प्र०; रेंच मोडणें, उतरणें, स्त्र० पाठ हलकी व्हाया करितां पाठीचा शिरा मोडून किं० चिमटीनें कानटी ओढून पाठ हलकी करणें किं० गर्व परिहार होई अशी त्याची खोड मोडणें.

रेच, पु० मलद्वारानें जो दाळ होतो तो; २, नग्या दाळव्हाया करितां घेतलें जें औषध तें.

रेचक, न० ढाळक; २, ३ लिं० रेच करण्याची शक्ति ज्याचे अंगीं आहे असा जो हरीतक्यादि पदार्थ तो.

रेचन, न० रेचक प्रथमार्थी; २, मल पातळ होऊन त्याचें मलद्वारानें बाहेर जें निःसरण तें.

**रेंजगण**, न० मोडकीतुटकीबाळी, बुगडी, पानडया, इ० किं० सोनें, रुपें, इ० कांचे चांगले वाईट रज किं० बारीकसारीक माणिक, मोत्यें, इ० जो किरकोळ खिडूकमिडूक जिनसांच्या समुदाय तें.

**रेंजणें**, ग० कोणेकास यत्किंचित्तरी महत्वबुद्धीनें मानणें; निषेधविषयीं प्र०; उ० तीळकी दादल्यालादेखील रेंजीत नाहीं मग सासूला कोठून.

**रेंजा**, पु० फांशावरील जो पगडा तो; २, प्रा० उंची कापडाचा जो केवळ लहान तुकडा तो.

**रेंजीम**, न० पुर्तकाल, चीन, इ० देशांपासून येतात जे वीस दस्ते, चाळीस छकडया, इ० नियत संख्याक कोऱ्या कागदांचे समुदाय ते प्र०

**रेंट**, न० मोठी जाडजी भाकर तीस निंदेनें ह्मणतात; २, नेटया अर्थी ह्म०

**रेंटणें**, कोणेक पदार्थ असतो तेथून पलीकडे सराया किं० आलीकडे येत असतां येऊं देऊं नये ह्मणून त्यास हस्तादिलावून स्वनिष्ठ बळाचे नेटानें विशिष्ट करणें, ज्याचे योगानें तो पदार्थ पलीकडे सराया किं० आलीकडे येऊं नये; २, ला० ज्याचे योगानें आपण पडून दुर्दशा पावावी असें आपल्यावर आलेलें जें दुखणें, इ० रूप कांहीं संकट त्यास आपण जीत न जातां आपल्या सामर्थ्यानें कांहीं काल तसेंचे तसेंच संभाळून धरणें; उ० हा वादप्रसंग आहे मला रेंटेल तोंवर मी रेंटतों मला रेंटेनासें झालें तर तुह्मी आहांच; ३, संसार, सावकारी, इ० कांहीं व्यवहार नपडूं देतां स्वसामर्थ्यानें कसेंतरी चालविणें; रेंटून जा, बसाल, करणें, बोलणें, इ० स्थलीं भीड, भय, इ० नधरितां कडकून बोलणें.

**रेटा**, पु० दे० कोणेकानें पुढें सरावें ह्मणून हस्त, इ० कानीं मागून देतात जो नेट तो.

**रेंटाई**, स्त्री० कांहीं संकटाचा ईषन्मात्र प्रादुर्भाव झाला असतां त्याचा प्रतीकारार्थ तत्काल प्रवर्त्तावें तें न करितां अवगणनेनें ढकलाढकली खालीं नेण्याचा जो प्रकार तो.

**रेंटारेंटी**, स्त्री० रेंटाई.

**रेड**, स्त्री० ग्रा० गिराईक, इ० कानीं पाहिजे तितके घेऊन उरावें जिकडे पहावें तिकडे तेंच असा जो अंबे, फणस, धान्य, इ० कांची अतिशयित समृद्धि होत्ये ती; होणें, पडणें, याचा योगीं प्र०; उ० आज बाजारांत अंब्यांची रेड पडली आहे कोणी विचारीत नाहीं.

**रेडकूं**, न० म्हशीचें जें अपत्य तें.

**रेडा**, पु० दोणगा; ह्म० रेडारेडा आणि धारभर ओढा.

**रेडी**, स्त्री० म्हशीचें जें स्त्र्यपत्य ती.

**रेडूक**, न० रेडकूं; २, ह्मसरूं.

**रेणु**, पु० सं० पित्तपापडा; २, रज.

**रेणें**, न० ग्रा० तृणादि भक्षण करूं लागलें नाहीं केवळ दूधमात्र पिणारें असें जें गो महिष्यादि पशूंचें अपत्य त्याची जी विष्ठा तें.

**रेणेणें**, ग्रा० वासरानें रेणें हगणें.

**रेत**, न० सं० गर्भोत्पादक जी पुरुषशरीरांतील मुख्य धातु तें; रेतस्खलन, रेतःपात, इ० स०

**रेतदाणी**, स्त्री० लिहिलेल्या कागदावर घालायाची रेती वाळगायासाठीं जें पात्र केलें असतें ती.

**रेतदानी**, स्त्री० रेतदाणी.

**रेती**, स्त्री० बारीक खरखरीत स्निग्धांशशून्य असा कणप्राय मृत्तिका विशेष आहे ती.

रेंद, स्त्री० कों० गृहादिकांतील केरकचरा, इ० जें गदळ तें.

रेंदवणी, न० फार गदूळ जें पाणी तें.

रेंदा, पु० पाणी, तेल, तूप, इ० कांत जमलेलें जें मलांश, मृत्तिकांश, इ० कांहीं असतें तो किं० त्याचे मिश्रीभावामुळें दाट गदूळ झालेलें पाणी, इ० तो; २, रेंद; ३, गळूं, इ० कांतून निघतो जो रक्तमिश्रित पू तो.

रेंदाड, ३ लिं० ज्यामध्यें रेंदा बहुत झाल्यामुळें मलिन झालें असें जें पाणी, तेल, तूप, इ० तो.

रेंदावणें, पाणी, तेल, इ० रेंद्यानें मलिन करणें; २, गळूं, जखम, इ० बाहेर पू, रक्त, गळाया जोगें बरबरीत होणें.

रेंपा, स्त्री० हिंवज्वर, भरूं लागला ह्मणजे पाठ, इ० अवयवांतून ज्या विलक्षण कळा येतात त्या.

रेफ, पु० अकारादिस्वर अविवक्षितकरून अर्धमात्राप्रमाण रह्मणून जो वर्ण तो; व्यंजनाचे पूर्वी त्याचा योग असतां त्या व्यंजनावर तद्बोधक चिन्ह जें अर्कुलें दिलें असतें तो.

रेव, स्त्री० कों० समुद्र खवळला ह्मणजे त्याचे तीरीं जो लोण्यासारिखा मृदु गाळ येतो तो.

रेवटणें, रा० रेंमटणें.

रेवटी, स्त्री० रा० रेवडी.

रेवड, स्त्री० कों० घांगल्ये जाग्यावर चिखल, शेण, इ० पडल्यामुळें जी घाण येत्ये ती; उ० गोठ्यांत गुडघाभर रेवड जमली आहे त्यांत गुरें बसतील तरी कशीं.

रेवडी, स्त्री० चिघळून पातळ रबरबीत झालेल्या जो गूळ, पेढा, साकर, इ० ती; २, ला० रा० अतिशयित पिकलेल्यामुळें बिलबिलीत झालेला जो फणस, इ० फल त्यास स०



रेमेडोक्या, ३ लिं० कांहीं कामकरण्याविषयीं उत्साह नाहीं, लग नाहीं, असा केवळ मंद जो मनुष्यादि त्यास ह्म०

रेरेरेरे, अ० अरेरेरे.

रेल, स्त्री० रेळ.

रेलचेल, स्त्री० रेळचेळ.

रेलणें, चिखल, चुना, इ० रचून केलेला जो मूर्त, ईट, भिंत, इ० पदार्थ त्याणें त्या चिखल, इ० कांचे आंगचे आर्द्रतेचा आधिक्यामुळें किं० विसविशीतपणामुळें, खालीं दबून प्रसृत होणें; २, मनुष्यादि जीवानें आपले अवयव केवळ सईल सोडून आपले शरीराचा भार मनुष्यांतरादिपदार्थावर पडे असें तिकडे तोलणें.

रेंव, स्त्री० धान्यादिपदार्थांत जो बारीक खड्याचा समुदाय असतो ती किं० जी रेती असत्ये ती; उ० पायलीभर गव्हांत अदपावरेंव निघाली; रेतीचे देशांत दुधांत देखील रेंव येत्ये ह्मणून सांगतात; २, कों० बारीक खड्याचा समुदाय ती; उ० चुन्यांत घालायाला गाडाभर रेंव घेऊन ये.

रेंवट, ३ लिं० रा० बारीक बारीक दगडाचा समुदाय ज्यांत बहुत असें जें स्थळ तो.

रेवड, स्त्री० कावळें, इ० कांचे दशाचे मुलप्रदेशीं दशा वळून गुंफून किं० दुसरें रेशीम, सूत, इ० भरून जो गोफासारिखा आकार करितात ती.

रेंवडा, पु० कों० रेंव हिनीयार्थीं; २, तन्मय जें स्थल तो.

रेवडी, स्त्री० साकर, इ० कांचा पाक करून तीळ घालून जी वडी करितात ती; २, ला० वचेरा.

रेवण, स्त्री० भुइकोट किल्याचे तटाबाहेर जी मातीचा भर घालितात ती; २, रुतण.

रेवणें, रेलणें, अ॰ कोणेक दुखणें, कफ, इ॰ बहुत काल झाल्यामुळें आंगांत भिनणें; २, कोणेक मनुष्यादिकानें अतिशयित जो चिखल, गाळ, रेवण, इ॰कांत रुपून गर्क होणें.

रेवती, स्त्री॰ सं॰ सत्ताविसावें जें नक्षत्र ती; २, एक चमेली मध्यें भेद आहे; ३, संकेतानें अधेलीस ह्म॰

रेंबसळ, ३लिं॰ रेंबट.

रेंवा, पु॰रा॰ रेंवहितीयार्थीं.

रेवाचिनी, स्त्री॰ औषधोपयोगीं एक औषधीचा चीक आहे ती; रेवाचिनीचा शिरा ह्म॰ रेवाचिनीचा दुधांत गंधाकरून कांड्या बांधिल्या असतात तो.

रेंवाळें, न॰ रा॰ धान्य पाखडून किं॰ चाळून निराळें केलें असतां कांहीं धान्यांशानें विशिष्ट राहत्यें जी रेंवनें.

रेंचापेंची, अ॰ रा॰ कांहीं इकडे सांडलें, कांहीं तिकडे सांडलें, कांहीं गुरांनीं खाल्लें, कांहीं चोरांनीं उडविलें, कांहीं कुजलें, कांहीं गेलें, इ॰प्रकारें अव्यवस्थेमुळें नासधूस होईं असें करणें, होणें, जाणें, इ॰कांचें वि॰

रेशमी, ३लिं॰ रेशमानें निर्मित जें वस्त्रादिक तो; २, ला॰ खरमन्यानंद जो मनुष्य त्यास ह्म॰; ३, रेशिमकांठी जें धोतर, किं॰ पातळ तो.

रेशमीनारिंग, न॰ नारिंगांत एक भेद आहे.

रेशिमकांठी, ३लिं॰ ज्याचे कांठ रेशमाचे आहेत तें वस्त्र.

रेशीम, न॰ एक जातीचे किडे आहेत त्यांपासून वस्त्राद्युपयोगीं जो तंतुसंघात निघत असतो तें; रेशमाची गांठ ह्म॰ वधुवरें, जीवात्मादेह, इ॰कांचा कधींही विनष्ट व्हावयाचा नव्हे असा जो परस्परांचा संबंध त्यास ह्म॰ देणें, पडणें, यांचा योगीं प्र॰

रेषा, स्त्री॰ रेखा; कपाळ, इ॰कांतील रेषा उपटणें ह्म॰ अकस्मात् दैव उदयास येणें; धनी, इ॰ कानें सेवकादिकांस रेषा ओढून देणें, काढून देणें, इ॰स्थलीं वर्तना विषयीं याप्रकारें वर्तावें असी मर्यादा बांधून देणें; २, अंबा, इ॰ कांहीं एक फलांत जो केंसर असतो ती.

रेंस, रेस, पु॰ आण्याचा पंचविसावा अंश तो.

रेळ, स्त्री॰ चंगळ.

रेळचेळ, स्त्री॰ अतिशयित जी चंगळ ती.

रेळणें, रेलणें; २, कों॰ कपाळ, भिंत, इ॰कांवर लावलेलें गंध, कुंकूं, रंग, इ॰ त्याणें पातळ झाल्यामुळें ओघळून खालीं येऊं लागणें.

रेळा, पु॰कों॰ कपाळ, भिंत, इ॰ पदार्थांस सद्रव, गंध, चुना, इ॰कांचा लेप लाविला असतां त्यापासून अथवा जलादिकें करून भरलेला कलशादिक डचमळणें, इत्याद्यनेक कारणानीं त्यापासून वरून खालीं येतो जो ओघळ तो.

रोंक, पु॰ रोख.

रोकड, स्त्री॰ रुपये, होन, मोहरा, इ॰ जें नाणें तद्रूप जें द्रव्य ती; २, सावकारी, व्यवहार, इ॰कांत असतें जें सोनें, रुपें, जवाहीर, एतद्रूप जो ऐवज त्यासही ह्म॰

रोकडा, ३लिं॰ रोकड जो रुपये, सोनें, इ॰ ऐवज तो; २, भीडभाड न धरितां निरवाळसपणें जेव्हांचें तेव्हां जें उत्तर, प्रत्युत्तर, इ॰ भाषण, इ॰ तो; उ॰ त्याकडे कोणी का मागायाला जाईना नाहीं ह्मणून रोकडें उत्तर करतो; ३, अ॰ लागलाच; उ॰ शिवी देतांच त्याणें रोकडी तोंडांत मारली; ४, कों॰ तूर्त; उ॰ तो तुकताच घरीं

दिसतात, आणि पैका खर्चून हा रोग कशाला आण-
लात; ४, भक्षणाद्युपयुक्त जें फल पुष्पादि पदार्थ त्या-
मध्यें विकृतिकारक जो त्याज्यांश असतो तो; उ० अ-
गस्त्याचे फुलांतली मधली कांडी तो रोग आहे ती
काढून टाक; ५, अंतःकरणास व्यथा जेणेंकरून
होत्ये असा जो शोक, चिंता, मत्सर, इ० त्यास प्र० म्ह०;
रोगग्रस्त, रोगनिवृत्ति, रोगनाशक, रोगविकृति,
इ०, कफरोग, वातरोग, हृद्रोग, इ० स०

**रोगट**, ३ लिं० कांहीं एक रोग जडला आहे ज्याला असा
जो मनुष्य, वृक्ष, फल, इ० तो..

**रोगण**, न० तेल, मेण, राळ, इ० किंवा एक पदार्थ एक-
त्र करून जो चिक्कण पदार्थ करितात ज्याचा लेप मे-
णा, इ० कांस केला असतां भिजत नाहीं आणि तक-
तकीत दिसतो तें; २, त्याचा मेणा, इ० कांस करितात
जो लेप तें

**रोगणी**, ३ लिं० रोगण ज्यास दिलें तो पदार्थ.

**रोगणें**, क्रि० कोणेकानें कांहीं रोग लागल्यामुळें अश-
क्त आणि रोड होणें.

**रोगमल्ल**, पु० रोगिष्ठ जो मनुष्यादि त्यास म्ह०

**रोगराई**, स्त्री० लहान मोठा जो रोग ती

**रोगवणी**, न० औषधाच्या उपायानें शरीरांतून मुख, ना-
सिका, इ० द्वारानें किं० पोटानें, रोगांश घेऊन बाहेर
निघतें जें पाणी तें; २, कोणेक पदार्थाचे आंगचें किं०
आंत मिसळलेलें आंतील रोगांश घेऊन निघतें जें
पाणी तें; उ० भांग भिजत घालून धुतली म्हणजे आं-
तलें रोगवणी निघून जातें; ३, ज्याचे योगानें शेत भा-
त, इ० कांवर कीड, इ० नानाप्रकारचे रोग उत्पन्न होता-
त असें जें आश्लेषाचे पर्जन्याचें किं० बारीक बुरगट
पडतें त्याचें उदक तें

**रोंगा**, ३ लिं० रा० रुसलेल्यासारखी स्वाभाविक ज्या-
ची मुखश्री तो.

**रोगाड्या**, ३ लिं० कों० रोंगाळा.

**रोंगाळा**, ३ लिं० कांहीं रोग जडल्यामुळें अशक्त, रोड,
झालेला मनुष्य, वृक्ष, पशु, इ० जो प्राणी तो.

**रोगिष्ट**, ३ लिं० रोगिष्ठाचा अपभ्रंश.

**रोगिष्ठ**, ३ लिं० सं० निरंतर एक ना एक कांहीं तरी रो-
ग ज्यास जडला असतो असा जो मनुष्यादि तो.

**रोगी**, ३ लिं० पंडु, क्षय, दमा, कुष्ट, मेह, इ० जो चिरस्था-
यी रोग तो जडला आहे ज्यास असा जो मनुष्यादि तो;
ज्याचे सेवनानें रोग होतो असें जें धान्य, भाजी, फळ,
इ० तो; उ० अधींहा देश रोगी त्यांत सकाळचें ऊन्ह
घेतां हे रोगी येणेंकरून तुह्मी रोगी व्हाल.

**रोगणें**, कों० रोगणें.

**रोगेला**, ३ लिं० अल्पस्वल्प कांहीं रोग ज्याचे आंगीं नेह-
मी जडलेला आहे असा जो मनुष्यादि तो.

**रोग्या**, ३ लिं० रोगाड्या.

**रोंघणें**, कों० प्रायः लंघणें या अर्थी.

**रोचक**, ३ लिं० सं० रुचिकर; २, न० पादेलोण.

**रोंचणें**, कोणेकाचे शरीरादिकांत कंटक आदिकरून
रुतविणें.

**रोज**, पु० अहोरात्रात्मक जो काल तो; २, दिवसाचे बो-
लीनें कांहीं एक कामाकरितां ठेविला जो मनुष्यादि
त्यास प्रतिदिवशीं जें देणें द्यावें लागतें तो; ३, सर्कार,
सावकार, इ० कांकडील तगाददार आला असतां त्या-
च्या आपल्येकडून खोळंबा होऊन दिवस मोडल्यामु-
ळें त्यास जें द्रव्य द्यावें लागतें तो; उ० रोज देवदर्शन

घ्यावें.

रोजउठून, अ० आलादिवस.

रोजकरी, पु० रोजाचे बोलीनें कांही एक कामावर ठेविला जो गडी तो.

रोजकीर्द, स्त्री० रोज खर्डा; २, ला० आपलें जें कुटुंबादि खटलें आणि आपण एतत्संबंधी जो भोजनादि निमित्त आवश्यक नित्याचा खर्च ती.

रोजखरडा, पु० हिं० संसार, व्यवहार, इ० संबंधी प्रतिदिवशींचा कच्चा जमाखर्च, इ० ज्यावर लिहिला असतो असा जो कागद तो.

रोजगार, पु० द्रव्यादि संपादनार्थ सुभा, मामलत, हवाला, इ० जो धंदा तो; किं० पैका मेळविण्याचा जो यच्चयावत् उद्योग त्यास ह्म०; उ० आतां शेतकीचा रोजगारांत जीव राहिला नाहीं; २, प्रसंग विशेषीं सामान्यतः उद्योगमात्रास ह्म०; उ० याची गोष्ट त्यापाशीं. त्याची गोष्ट यापाशीं, सांगणें असला रोजगार आह्माला होत नाहीं.

रोजगारदार, उ० लिं० मामलत, सुभा, इ० रोजगार ज्यास आहे तो.

रोजगारी, उ० लिं० रोजगारदार.

रोजगुजारा, पु० روزگذارہ रोजकीर्द चालल्यानें आलेल्या दिवसाचा जो निर्वाह तो.

रोजगुदस्त, अ० روزگذشت वर्तमान दिवसाचे अव्यवहितपूर्व दिवशीं जमाखर्चीं लिहिण्यांत प्र०

रोजचा, उ० लिं० नित्याचा.

रोजचेरोज, अ० नित्याचें नित्य.

रोजदार, पु० हिं० रोजकरी.

रोजनामा, पु० हिं० रोजखर्डा.

रोजमजुरी, रोजमजूरी, स्त्री० हिं० रोजाचे बोलीनें करतात जी मजूरी; ह्म० रोजमजूरी बलाय दूर.

रोजमरा, रोजमुरा, पु० روزمرہ चाकरास चाकरीसंबंधी प्रतिमासीं किं० प्रतिवर्षीं देतात जें वेतन तो.

रोजा, पु० روزہ यवनशास्त्रोक्त धर्मार्थ जें उपवास प्रधान व्रत तो.

रोजिना, अ० روزینہ रोजीना.

रोजी, स्त्री० روزی रोजकीर्द लाक्षणी कार्थी; २, रोजच्छिती यार्थी; ३ ला० कोणेकापासून कोणेकास जें नित्य कांहीं मिळत असतें त्यास ह्म०; ४, मोहरमांत फकीरास देतात जी भिक्षा ती.

रोजीना, अ० हिं० प्रतिदिवशीं.

रोट, रोंट, पु० कणीक, इ० कांचा जाड भाकरीचे आकाराचा किं० वरवंट्यासारिखा जो गोळा करून भाजितात तो.

रोटगा, पु० रोट.

रोंटा, पु० रोंठा.

रोटी, स्त्री० भाकर प्रायः कणकेचे भाकरीवर प्र०

रोंटीसुपारी, स्त्री० रा० रोंठीसुपारी.

रोंठा, पु० पिकलेल्या पोफळांतील जी सुपारी तो.

रोंठीसुपारी, स्त्री० रोंठारूप जी सुपारी ती.

रोड, उ० लिं० अंगांत मांसाचें अल्पत्वामुळें उरःस्थलादिसंबंधी हाडें ज्याचीं निरनिराळीं दिसतात अशा कृशजो मनुष्यादि तो किं० त्याचें शरीर. ह्म० कांगबाई रोड तर मला गांवाचा ओढ.

रोडका, उ० लिं० रोड; ह्म० हातीं धरल्या रोडका आणि शेंडी धरिल्या बोडका.

रोडगा, पु० रोटगा.

इ० ह्यांचें असें जें मोठें कउज्ञाचें प्रकरण होतें तें.

रोंरणें, रा० श्वुशीनें रोंरों अशा शब्दानें ओरडणें.

रोंव, पु० रह.

रोंवणदिवळी, स्त्री० रोमणदिवळी.

रोंवणदिवा, पु० रोमणदिवा.

रोंवणदिवी, स्त्री० रोमणदिवी.

रोंवणें, भूमि, भिंत, शरीर, वस्त्र, इ० कांत बीजस्तंभ खिळा, कांटा, सुई, इ० खुपसणें; खुपसल्यावांचून शास्त्रादिकांनें भूम्यादिकांस खळी करून जरी आंत स्तंभादि घातलें असलें तरी त्या क्रियेचें अभिधान या धातूनें होतें; उ० मधें रणस्तंभ रोंवून दोहोंकडे वीर उभे राहिले.

रोंवथ, पु० रवंथ.

रोंवळा, पु० रोवळा प्रथमार्थी.

रोवळा, पु० मोठी जी वेळूची रोवळी तो; २, रा० केलेल्या पीचें पद्यांशरूपजें प्रमाण तो.

रोंवळी, स्त्री० तांदूळ धुणें इत्याद्युपयोगी आकारविशेषाचें एक वंशपात्र आहे ती; २, तळीं अनेक छिद्रें पाडून तांदूळ, भाजी, इ० धुण्याचे उपयोगी जें ताम्रादि धातूचें पात्र करितात त्यासही म्ह०

रोवळी, स्त्री० रोंवळी.

रोशन नाईक, पु० मशालजी.

रोशनाई, स्त्री० कोणेक स्थलीं शोभार्थ अनेक दीप लावून जो प्रकाश करितात ती किं० तत्संबंधी कारखाना ती; २, वृक्ष, मनुष्य, इ० समुदायमूलक जी स्थलादिकांस शोभा येते ती.

रोशेल, न० एका तृणविशेषाचें तेल काढित असतात तें.

रोष, पु० सं० क्रोध.

रोषाविष्ट, अलिं० सं० क्रोधाविष्ट.

रोसनाई, स्त्री० रोशनाई.

रोह, पु० रह.

रोहटी, स्त्री० धान्य पेरल्यानंतर प्रथमतः जो अंकुरसमुदाय बाहेर दिसतो ती.

रोहशेल, न० रोशेल.

रोहिडा, पु० दे० रक्तरोहिडा.

रोहिणी, स्त्री० अश्विन्यादि नक्षत्रांतील चवथें नक्षत्र त्या.

रोहिला, पु० हिं० यवनांत एक भेद आहे.

रोही, पु० मृगांत एक भेद आहे.

रोहो, पु० रह.

रोहोंन, स्त्री० रोथ.

रोहोशेल, न० रोशेल.

रौद्र, पु० शृंगारादि रसांतील एक रस आहे; २, अलिं० क्रोधयें शिक्ष्यादिकारणामुळें अति उग्र जें कोणेकाचें भाषण, स्वरूप, इ० तो.

रौप्य, न० रूपें प्रथमार्थी; रौप्यमुद्रा म्ह० रुपया, इ० स० होतात.

रौरव, पु० एकविंशति महानरकांतील एक नरक आहे.

रौक्ष्य, न० रुक्षत्व.

---

लडलूट, स्त्री० लयलूट.

लई, अलिं० पुष्कळ; शूद्र भाषावृत्ति.

लकटणें, ओढणें; २, लगटणें.

**लकड**, स्त्री० कं० भारीउंच वाढलेला जो माड, पोफळ, फणमाड, ताड, इ० वृक्ष तो; २, ला० शरीरानें कृश असून उंचट असतोजो मनुष्य त्यास म्ह०

**लकडकोट**, पु० हिं० स्थलाचें आवरण करायाकरितां मोटमोटीं लांकडें उभीं भुईंत पुरून भिंताडासारिखी जीरचना करितात तो.

**लकडखाना**, पु० हिं० इमारतीचीं किं० जाळाऊ अशीं लांकडें ठेवायाची एक जागा नेमली असते तो; प्रा० श्रीमंतलोकांचे इथें व्यवहार.

**लकडवाला**, पु० हिं० जाळाऊ लांकडें खरेदी करून त्यांचा उदीम शहरांत करितो तो.

**लकडा**, पु० हिं० सावकार, इ०कांचें देणें किं० शेत, संसार, इ०जीं अवश्य निर्वाह्य त्याजकडून त्यांचा निर्वाह करण्याविषयीं आपणास लागला असतो जो नेट तो; ज्याचे योगानें कांहीं उद्योगांतर करावयास किं० स्वस्थ बसायास सांपडत नाहीं.

**लकडी**, स्त्री० ई० मूळ फार कढवून निवविला असतां लांकडासारखा कठीण त्याचा होतो जो परिणाम तो.

**लकडीपूल**, पु० नद्यादिकांवर मार्गार्थ लांकडाचा जो पूल बांधितात तो

**लकड्या**, ३ लिं० लकड.

**लकपक**, ३ लिं० चकपक.

**लकब**, स्त्री० لقب सहवास, अभ्यास, इ० कारणामुळें बोलणें, चालणें, लिहिणें, वस्त्रादिधारण करणें, इ० व्यापारांविषयीं कांहीं एक तऱ्हेची लागलेली चाल ती; उ० दुसऱ्यास वेडावूं लागल्यापासून त्याला तोतरें बोलायाची लकब लागली.

**लकलक**, अ० कर, हो, याचायोगीं प्र० शस्त्रें, बाज, इ० डोळे दिपायाजोगें तेज पडे असें स्फुरणें; उ० त्याचीं भांडीं पहा कशीं लकलक करतात तीं; २, पित्तक्षोभादि कारणामुळें डोळ्यापुढें काजवे येणें; उ० कालचे उपासानें आज डोळ्यापुढें लकलक करतें.

**लकलकणें**, लकलक करणें.

**लकलकाट**, पु० सूर्य, चंद्र, चंद्रज्योत, दिवे, इ० संबंधी तेजाची दाटजी व्याप्ति तो.

**लकलकी**, स्त्री० चकचकी.

**लकलकीत**, स्त्री० ३ लिं० स्वच्छ निर्मल जो भांडें, अलंकार, वस्त्र, शरीर, स्थल. इ० तो; २, जें अधिकरण ज्या द्रव्यादि पदार्थानें सहित होतें तो पदार्थ तेथून निःशेष नाहींसा झाल्यामुळें एकाकी स्वरूपें करून मात्र राहिलें असें तें अधिकरण तो; उ० दोन दागिने होते ते चोरानें नेले आतां मी लकलकीत झाल्यें; विहिरींत नोळाभर पाणी नाहीं अगदीं लकलकीत झाली.

**लंका**, स्त्री० सं० एक उपद्वीप आहे; म्ह० लंकेस सोन्याचा इटा आहेत पण त्या आह्मास काय होत; २, क्रीडार्थ जाळायासाठीं दारूचीं झाडें राक्षस, वानर, इ० पदार्थांहीं करून जो रचनाविशेष करितात ती; लंकेची पार्वती, म्ह० जीचे अंगावर यत्किंचित्‌ही अलंकार नाहीं अशी जी सौभाग्यवती स्त्री तिला म्ह०

**लकाकणें**, लकलकणें.

**लकाकी**, स्त्री० चकाकी.

**लकारविल्हा**, **लकारविल्हे**, ३ लिं० संकेतानें लबाडास म्ह०

**लकारी**, स्त्री० संकेतानें लबाडीस म्ह०

लर्कार, स्त्री० लकेरी.

लर्कारी, स्त्री० लकेरी; २, पु० लाखेचे चुडे, कंगण्या, इ० पदार्थ करून उपजीविका करणारी एक जाति आहे.

लर्कालक्ष, ३ लिं० लकलकीत द्वितीयार्थी; उ० झाडें तोडून मोडून रान लकीलक्ष करून तेथें किल्ला बांधूं लागले.

लकेरी. स्त्री० सुवर्णादि धातू, हीरकादि रत्नें, रंग, इ० जे चकचकीत पदार्थ त्यांचेठायीं किं० कंठादि ध्वनीचे ठायीं जी झील असत्ये ती; २, रंग, राग, स्वाद, वास, इ० कांमध्ये रंगांतरादिकाची जी छटा मारत्ये ती; ३. वस्त्रादिकांस कलाबतू, रेशीम, रंग, इ० कांची बारीक जी किनारी असत्ये ती; उ० त्या दुपट्याचें सूत चांगलें आहे पण लकेरी चांगली नाहीं.

लंकोदय, पु० सं० लंकेंत मेषादि राशींचे उदयास जे नियमित काळ लागतात ते स्वदेशींचे होतात ते प्र०; उ० मेषाचा लंकोदय चार घटका अडतीस पळें.

लक्ष, ३ लिं० लकलकीत; २, न० वियल्लता, तोफ, इ० संबंधी अकस्मात् जें तेजःस्फुरण होतें तें किं० पित्तशोषादिकामुळें जो डोळ्यांपुढें तादृश भास होतो तें होणें धातुयोगीं प्र०; उ० अकस्मात् वीज चमकतांच माझे डोळ्यापुढें लक्ष झालें.

लक्षड, स्त्री० हिं० लकड.

लक्षण, लक्षन, लक्षर, लक्षदिनी, लक्षदिशीं, अ० लक्षन.

लक्षा, पु० खबूदरांत एक भेद आहे.

लकुख, ३ लिं० केवळ निर्धूत कफल्लक जो मनुष्य त्यास म०

लखलखणें, लकलकणें.

लखलखाट, पु० लकलकाट.

लखलखी, स्त्री० लकलकी.

लखलखीत, ३ लिं० लकलकीत.

लखलाभ, पु० हिं० लक्ष रुपयांचे लाभस्थानीं मानिला जो कांहीं एक अर्थ त्यास म०; उ० तुम्ही जरी कांहीं दिल्हें नाहीं तथापि तुमची भेट झाली हाच आम्हास लखलाभ झाला; २, कापड, इ० पदार्थ विक्रयाद्वारा घेत्येसमयीं तो पदार्थ गिऱ्हाईक इ० कांचे हातीं देत्येवेळेस मंगलार्थ याचा प्रयोग करितात; उ० जा ही शालजोडी तुला लखलाभ असो.

लखाखी, स्त्री० लकाकी.

लखोटा, पु० लाखोटा.

लग, स्त्री० घर, इ० कांचे ओळीनें असतात जे खांब त्यांचे माथ्यावर एक चौरस आडवें लांब लांकूड बसविलें असतें ती; २, पु० स्त्री० काष्ठ शरीरावयव, इ० झिजल्या, तुटल्या असतां केवळ द्विभाग न होतां उभय संबंधमध्यें त्याचा त्याचा जो ईषन्मात्र अंश राहिला असतो तो ती; ३, लगा प्रथम द्वितीयार्थी.

लग, पु० अनेक कलमांचा अनेक रकमा पंक्तीनें लिहून त्यांचा बेरजा करितात त्यामध्यें ज्या पंक्तीस दुसरें स्थान नाहीं त्या पंक्तीस बेरीज करायासाठीं रकमेचे स्थानीं शून्य लिहून कलमाचे स्थानीं हा शब्द लिहितात.

लगट, पु० स्त्री० पळणारा जो चोर, इ० त्याचे किं० कोणेक कामाचे झटून पाठीस लागण्याचा जो व्यापार

तोती.

लगटणें, कोणेक लक्ष्यानें उद्देशून धरायास किं० जिंकायास चाललेलें सैन्यादि त्याणें त्या लक्ष्याशीं जाऊन ठेपणें; उ० फौज येऊन किल्ल्याशीं लगटली नरी तुमची तयारी कांहींच नाहीं पुढें कसें; २, कांहीं एक पदार्थ कांहींएक पदार्थाशीं चिकटणें; उ० पावसाचे योगानें सगळे कागद एकास एक लगटले; ३, कोणेक पदार्थांत परार्थांतर त्याच पदार्थाचे रूपानें लोकांत व्यवहार्यता पावावयाजोगें मिसळून देणें; उ० श्रीवर्धनचे रूपारींत भोंवरगांवची रूपारी लगटतात.

लगड, स्त्री० सोनें, रुपें, इ० धातूंचा रस करून ओतणींत ओतला असतां जो लांबट आकार होतो ती; २, दे० माकण.

लंगडणें, मनुष्य, पशु, इ० कांनीं पाय अधू असल्यामुळें किं० दुखावल्यामुळें त्या पायावर भार येववत नाहीं ह्मणून पाय कादीत एका प्रकारचें वांकडें वांकडें चालणें.

लगडलगड, स्त्री० कोणेक कार्य करण्याची जी सामग्री असावी ती यथास्थित नाहीं, कर्त्यास अवकाश असावा तितका नाहीं, इ० अनुपपत्ति असतां तें झालें सें व्हावें ह्मणून सरासरी तें कार्य सिद्ध करण्याचा जो व्यापार ती; करणें धातुयोगीं प्र०; उ० लांकडें पुरतीं नव्हतीं आणि पर्जन्य तर आला आंगावर तेव्हां लगडलगड करून एकदांचें घर बांधलेंसें केलें.

लंगडशाई, स्त्री० लंगडत जाण्याचा जो व्यापार ती; घालणें धातुयोगीं प्र०; २, एक पाय वरता धरून एका पायानें उड्या मारीत चालण्याचा एक खेळ आहे ती; ३, ३ लिं० लंगड्यासच कदाचित् प्र०.

लंगडा, ३ लिं० जन्मतः किं० मोडल्या दुखावल्यामुळे अधू किं० कांटा मोडला, फोड आला, रूतला, इ० मुळें विकल जो पाय किं० हात तो किं० तद्विशिष्ट मनुष्य, पशु, पलंग, खुरची, इ० तो; २, ला० कांहींएक गर्व केल्यामुळें विकल जो व्यापारादि तो; उ० एकास्वामी जानोच लिहिण्याचें लंगडें पडलें; एक बैल नाहीं याजमुळें नांगर लंगडा झाला.

लंगणें, लंगडणें, लंघणें प्रथमार्थी.

लगत, स्त्री० कोणेकाचा कोणेकावर गुणक्रियादिसंबंध व्हावयाजोगा त्याशीं असतो जो सामीप्यसंबंध ती; उ० या स्थळास नदीची लगत आहे ह्मणून एथें थंडी फार; २, कोणेकाची कोणेकाशीं योनसंबंधामुळें जी जवळीक ती; ३, सहवर्तमान बोलणें चालणें, जाणें, येणें, इ० व्यवहार घडत असतां कोणेकाचा कोणेकाशीं होतो जो सामीप्यसंबंध ती किं० तन्मूलक होतो दाटपरिचय ती; उ० हा लुच्चा आहे याची इतकी लगत आपल्या घरीं कामाची नाहीं, ही गोष्ट त्याजपाशीं बोलायाजोगी इतकी त्याची आमची लगत नाहीं; ४, अ० कोणेक अर्थाचें केवळ समीप प्रदेशीं; उ० त्या गांवचे लगत नदी आहे; दुसरा नदराचे लगत आहे ह्मणून कोणी नदरास्थानच धरतात; ५, नैरंतर्येंकरून एकापुढें एक एकापुढें एक होई असें; उ० लगत तीन चिठ्या पाठविल्या तेव्हां निघून आला; इथून लगत चार कोस तें आमची आहेत.

लगतलाखोटा, पु० हुंडीपत्राचा, इ० मजकूर आंत लिहून त्याच हुंडीपत्रास चिकटवून पाठवितात जो त्या काग

कागदाचा लाखोटा तो; २, जा कागदावर मजकूर लिहितात त्याच कागदाचे शेवटीं कांहीं कोरा अंश राखून तेणेंकरून त्या कागदाचा गुंडाळून करितात जो लाखोटा त्यास कोणी म्ह०

**लगता**, पु० लगत प्रथमार्थी; २, देश, ग्राम, नदी, पर्वत, इ० जें कोणीएक अवधिभूत तत्सामीप्यसंबंधविशिष्ट जो देशविभाग तो; उ० यंदां करनाटकचे लगत्यास चांगलें पीक आलें.

**लगताजाब**, पु० लगतलाखोटा किं० त्याच लाखोट्यांत त्या हुंडीसंबंधी लिहिलेला जो जाब तो.

**लगतालाखोटा**, पु० लगतलाखोटा.

**लगती**, अलिं० योनिसंबंधद्वारा ज्याचा आशीं लगत आहे तो त्याचा; उ० तुम्ही पडलां श्रीमंतांचे लगती ते व्हां तुम्हांस असें कसें बोलावें.

**लगदन**, न० रा० लचका.

**लगदा**, पु० हिं० कांचेचा बांगड्यांत एक भेद आहे; २, लादा.

**लगन**, न० लगीन.

**लगनघटका**, स्त्री० लग्नघटिका शब्दाचा अपभ्रंश.

**लगनघर**, न० लग्नघर.

**लगनचिटी**, **लगनचिठी**, स्त्री० लगीनचिठी.

**लगनचुडा**, पु० लगीनचुडा.

**लगनटका**, **लगनटक्का**, पु० लगीनटका.

**लगनटीप**, स्त्री० लगीनटीप.

**लगनसराई**, स्त्री० लगीनसराई.

**लगबग**, स्त्री० कांहींएक काम लौकर करण्याचा प्रसंग आला असतां अंतःकरणास होत्ये जी घाई ती.

**लगबगां**, अ० प्रा० यं० लगबगजी तत्पूर्वक कांहीं काम करणें, जाणें, धावणें, इ० कांचे वि०; उ० लगबगां धाविन्नला रघुवीर.

**लगम**, स्त्री० पु० लगाम.

**लंगर**, पु० गलबताचा जो लोखंडी नांगर तो; २, लोखंडाची मोठी जी सांखळी तो; ३, ला० साधारण प्रमाणापेक्षां मोठा जो गोठ, सांखळी, सरी, दोर, तुळई, खांब, इ० पदार्थ त्यास म्ह०

**लंगरखाना**, पु० हिं० अन्नी जहांकारखाना.

**लंगरदोर**, पु० दे० गलबताचा लंगर पाण्यांत टाकावयाचा करितां त्यास बांधायाचा जो मोठा दोर केला असतो तो.

**लगलग**, अ० अतित्वरेनें, काम करणें, जेवणें, जाणें, इ० कांचे वि०

**लगा**, पु० थिरा; २, ला० संसारादि निर्वाहोपयोगी जो आश्रय तो.

**लगाबांधा**, पु० कोणकाम चार पैसे मिळावे, संस्कार, इ० खटलें चालावें, इ० कांचे विषयीं कोणी गृहसंबंधी, ग्राम, इ० कांचा लहान मोठा असतो जो आश्रय तो; उ० आम्हास एथें कोणाचा लगाबांधा असतानार भिक्षा कशास मागीतली असतीं; २, लागाबांधा.

**लगाम**, पु० स्त्री० हिं० घोड्यानें मनुष्याचे स्वाधीन रहावें, फिरविलेंनसें फिरावें, म्हणून त्याचे तोंडांत लोखंडाचा श्रृंखलासदृश पदार्थ करून घालितात तो तो; २, तोच अनीतीनें विशिष्ट झाला असतां त्या विशिष्टास कोणी म्ह०; ३, ला० कोणक

व्यवहारादिक विवक्षानुरूप वर्तविण्याचें कोणाकाचें स्वाधीन असतें तें सूत्र त्यास म्ह०; उ० या फौजेच्या लगाम बक्षीचें स्वाधीन आहे त्यास वश करा म्हणजे झालें; पत्रावरून करांस ईकरून दिल्ली म्हणजे ह्यानची लगाम गेली; मनुष्यादिपदार्थ कोणाकाचे लगामी किं० लगामेस लागणें म्ह० धनी पुनः परत येईतोंपर्यंत सर्वप्रकारें त्याणें संभाळावा अशाप्रकारें त्याचें स्वाधीन होणें.

लगावणें, काठी, चपराक, चाबूक, इ० कोणाकाचे अंगावर चांगला प्रहार होई असा मारणें; शिव्या लगावणें म्ह० देणें.

लगिन्याबैल, पु० उत्सर्गकरून सोडलेला जो बैल तो.

लगी, स्त्री० राजादिकांचे स्वारीपुढें जरीचे फडक्यांची निशाणें चालवीत असतात तीं म्ह०

लगीन, न० लग्नाचा अपभ्रंश परंतु प्रा० विवाहार्थी प्र०

लगीनगोष्ट, स्त्री० वऱ्हाडगोष्ट.

लगीनघटका, स्त्री० लग्नघटिका शब्दाचा अपभ्रंश.

लगीनघर, न० लग्नघर.

लगीनचिठी, लगीनचिट्ठी, स्त्री० लग्नचिठी.

लगीनचुडा, पु० लग्नचुडा.

लगीनटक्का, पु० लग्नटक्का.

लगीनदीप, स्त्री० लग्नदीप.

लगीननक्षत्र, न० लग्ननक्षत्र.

लगीनसराई, स्त्री० लग्नसराई.

लंगुटी, स्त्री० लंगोटी.

लंगुटीयार, पु० लंगोटीयार.

लगे

लगे, अ० कांहींएक काम करण्याविषयीं प्रश्न जें कोणी त्याणें तें काम झटून त्वरेनें करावें म्हणून त्याचे प्रोत्साहनार्थ याचा प्रयोग करितात.

लगेनगेकरून, अ० कांहींएक कामास पाहिजे तिकावेळ नाहींसा झाल्यामुळें सगसगी, कसेंतरी शेवटास जाऊ म्हणून त्वरेत्वरेनें करण्याचा जो प्रकार त्याप्रकारें; उ० पाऊस डोईवर आला तेव्हां लगेनगेकरून एकदाचें घर शाकारून घेतलें.

लगेलगे, अ० घाईघाईनें कांहीं काम करण्याचें वि- तुमचें बलावणें आलें तेव्हां लगेलगे जेवलों आणि तसाच आलों; २, स्त्री० कांहींएक काम करण्याविषयीं फारच जी घाई ती; उ० अशी लगेलगे केली तर काम बिघडेल सावकाश करूया.

लगेहात, अ० हिं० कोणेककामाचेठायीं प्रवर्तहोतांना अंगीं घेतला असतो जो वेग त्याचामध्यें विराम नहोऊं देतां त्याचवेगानें कोणेककार्यांतर करण्याचें वि०; उ० तुह्मी बाजारांत जातांच आहां तसेंच लगेहातपुढें जाऊन त्यागृहस्थास बलावून आणा.

लंगोटा, पु० मोठीजो लंगोटी ती.

लंगोटी, स्त्री० केवळ गुह्याचें मात्र आच्छादन व्हावयापुरता जो वस्त्राचा तुकडा करगोट्यानें नेसतात ती; २, चार सहा बोटें रुंद आणि हातदीडहात लांब एवढा जो वस्त्राचा तुकडा त्यास पोतबांधणें, इ० इतरकामाविषयीं विनियोग असतो ही म्ह०; ३, शेत, इ० भूमीचे केवळ अरुंद असून लांब फार असे जे अनेक विभाग पाडिले असतात त्यांस प्र० म्ह०

लंगोटीयार, पु० हिं० बाळमित्र.

लंगोरी, स्त्री० दे० धोंडे, इटा, लांकडाचे तुकडे, इ० पदा-

थांच

र्थाचा चेंडूनें पाडावयाकरितां रचितात जी उतरंड तीं किं॰ तें पदार्थ प्र॰

**लग्न**, न॰ सं॰ विवाह; कोणेकाचें कोणेकाशीं लग्न लागणें ह्म॰ सर्वदा सर्व कर्मांचेठायीं उभयतांचें साहचर्य असावें असा परस्परांचा संबंध बनलेला असणें; लग्नाचा ह्म॰ ज्यांचा परस्पर विवाहविधीनें संबंध झाला आहे अशीं जी दादला आणि बायको तीं परस्परांचीं; लग्नसमारंभ, लग्नमुहूर्त, इ॰ स॰; २, विवक्षितकालीं उदयाचलाशीं संलग्न असतो जो मेषादिराशींतील अन्यतम राशि तें; ३, तदुपलक्षित जो काल तें; मेषलग्न, वृषभलग्न, उदयलग्न, अस्तलग्न, इ॰ स॰; ४, ३ लिं॰ संलग्न.

**लग्नकार्य**, न॰ सं॰ लग्न, मुंज, इ॰ जें मोठें कार्य तें.

**लग्नकुंडली**, स्त्री॰ सं॰ विवक्षितकालींचें लग्नाचा अंक पहिल्या कोष्टकांत मांडून तदनुरोधानें इतरराशींचे अंक ज्यांत मांडले असतात अशी जी राशिचक्राची कुंडली लिहितात ती.

**लग्नगोष्ट**, स्त्री॰ कोणेकाचें विवाहरूप किं॰ इतर कोणेकाचें कार्य घडावें एतद्विषयीं आपण तादृश आंतन सांपडतां हा बहुत भला, योग्य, आहे; सारांश लग्नगोष्ट झाली ह्मणून काय झालें तो मुलीवर पांचशेंरुपये सोनें घालील आमची खातरी आहे, इ॰ रूप किं॰ हा पतीचा मनुष्य आहे याला हजार रुपये कर्ज दिल्हें तरी चिंता नाहीं, इ॰ रूप उपयुक्त जी गोष्ट कोणी बोलतो ती स ह्म॰ प्रा॰ अनेकव॰ प्र॰

**लग्नघटका**, स्त्री॰ लग्नघटिका शब्दाचा अपभ्रंश.

**लग्नघटिका**, स्त्री॰ सं॰ लग्नाचा मुहूर्त साधायाकरितां पाण्यांत घातली असते जी घटिका ती; २, लग्न किं॰ मुंज यांचा मुहूर्त साधायाची जी पूर्ण घटिका घालितात ती; ३, लग्न किं॰ मुंज लावण्याविषयीं ज्योतिश्शास्त्रावरून नियमित केला असतो जो मुहूर्तात्मक समय तो; ४, ईषन्मात्र टळूं देतां कामास नये अशी जी कोणेक कार्याची वेळ तीस आरोपानें ह्म॰; उ॰ ब्राह्मण जेवायास बसले आहेत घरांत तूप नाहीं अशी लग्नघटिका खोळंबली आहे ह्मणून धांवत तुह्माकडे तूप मागायास आलों.

**लग्नघर**, न॰ लग्नसमारंभाची गडबड जेथें चाललीआहे असें जें घर तें; २, ला॰ जेथें माणसें बहुत जमल्यामुळें फार गडबड होत आहे असें जें घर त्यास ह्म॰

**लग्नचिटी, लग्नचिठी, लग्नचिठ्ठी**, स्त्री॰ लग्न लावावें अशा आज्ञेची जी शूद्रांस सर्कार चिठी देतें ती किं॰ अमुक वेळेस लग्न लावावें अशी जी जोशी चिठी लिहून देत असतो ती; २, आपल्या घरीं लग्न किं॰ मुंज व्हावयाची असतां ग्रामांतरस्थित जे सोयरेधायरे, इष्टमित्र, इ॰ त्यास आमंत्रणार्थ कुंकुमादिकें करून रंगवून जीं पत्रें लिहून पाठवितात तीं प्र॰

**लग्नचुडा**, पु॰ लग्नामध्यें जो नवरा मुल, इ॰ कास वागडया भरतात तो.

**लग्नटका, लग्नटक्का**, पु॰ लग्नसंबंधीं जें सर्कारदेय शूद्रादिकांस पडतें तो.

**लग्नदीप**, स्त्री॰ लग्नाचे अनेक मुहूर्त वर्तवून त्यांचा क्रमानें एका कागदावर लेख करितात ती.

**लग्नतीथ**, स्त्री॰ ज्या दिवशीं लग्नास मुहूर्त आहे असा जो दिवस तो.

**लग्ननक्षत्र**, न० सं० लग्न करण्यास योग्य जें दिवसनक्षत्र तें.

**लग्नपत्रिका**, स्त्री० सं० लग्नाचा मुहूर्त ज्या पत्रावर लिहून ठेवितात ती जीची विवाहाचे पूर्वी पूजा करीत असतात.

**लग्नमंडप**, पु० सं० विवाहार्थ घातलेला जो मंडप तो.

**लग्नमास**, पु० सं० लग्न करायास विहित जे मार्गशीर्षादि मास ते प्र०

**लग्नमुहूर्त**, न० सं० लग्नकार्य.

**लग्नशुद्धि**, स्त्री० सं० कोणेक कर्म करण्याविषयीं विवक्षितकालाचे मेषादिलग्नास ज्योतिश्शास्त्रोक्तमार्गानें ग्रहस्थितीवरून असत्ये जी निर्दोषता ती.

**लग्नसराई**, स्त्री० लग्नें करायाचा जो मार्गशीर्षापासून ज्येष्ठपर्यंत काल तो.

**लग्नाळू**, ३ लिं० लग्नाचे उपयोगीं अहेरी, इ० कापडें तीं.

**लंघणें**, दुखणें, उपोषण, किं० शरीर कष्ट झाल्यामुळें मनुष्यादिप्राणी किं० त्यांचें शरीर, जीव, हातपाय, यांणीं केवळ सामर्थ्यहीन होणें; २, प्रायः यो० लंघणें.

**लंघन**, न० सं० आमादिनिरसनार्थ जें उपोषण करितात तें.

**लघाळ**, ३ लिं० दुसऱ्यानें अनेकवार निषेधिलें असतांही कोडगेपणानें पुनःपुनः बोलावें अशा स्वभावाचा जो मनुष्य तो.

**लघाळमावशी**, स्त्री० लघाळ जी स्त्री ती सम्य०

लघि

**लघिष्ठ**, ३ लिं० सं० अतिशयित जो लघु तो.

**लघु**, ३ लिं० सं० भारानें किं० योग्यतेनें विवक्षिताहून जो हलका किं० आकारानें विवक्षिताहून जो हान तो; २, गुरु नव्हे असा जो अकारादि वर्ण ते.

**लघुत्व**, न० सं० कांहींएक कारणामुळें कोणेकाचे योग्यतेस येतो जो उणेपणा तें; उ० ते पिढीचे भिक्षुक त्यांणीं याचना केली म्हणून त्यांस लघुत्व येतें असें नाहीं; २, लघुपणा.

**लघुभोजन**, न० सं० हलक्या पदार्थांचें आणि थोडकें असें जें भोजन तें.

**लघुशंका**, स्त्री० मुतण्याचा जो व्यापार ती किं० मूत्र.

**लघ्वी**, स्त्री० लघुशंका.

**लचक**, स्त्री० पाय, कमर, इ० कोठें लचकल्यामुळें आंत शिरेवर शीर चढून अम्मळ चलन झालें असतां वेधना लागायाजोगा जो विकृतिविशेष कांहीं काल राहतो ती; प्रा० भरणें धातुयोगीं प्र०

**लचकणें**, हस्तपादादि शरीरावयव समविषमस्थलादिकांचे ठायीं वांकडातिकडा पडल्यामुळें आंतील शिरा, इ० कांस धक्का बसे अशा आंचक्यानें विशिष्ट होणें.

**लचका**, पु० मांस; पिष्टादिकांचा गोळा, इ० कांचा कमलाकार हस्तानें किं० मुखानें तोडून काढिला जो मोठा अंश तो.

**लचलालचंगला**, ३ लिं० चालणें, ओझें वाहणें, इ० कर्म करतांना जो थकला, भागला, किं० दुखावला, पडला, किं० दुखणें, इ० कानें जेर झाला तो; २, ला० द्रव्यादिसाधनानें हीन झाल्यामुळें

ल्यामुळें

त्यामुळें विवक्षितव्यापारीं थकलाजो तो.

**लखंड, लखांड**, न० प्रा० कचाट.

**लखंडखोर, लखांडखोर**, ३लिं० नाहींनाहींतीं लखांडें करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**लखंडी, लखांडी**, स्त्री० लखांड; २, ३लिं० कचाट्या.

**लंछन**, न० लांछनशब्दाचा अपभ्रंश.

**लजन**, स्त्री० कोणेकविषयांची कोणेकास लागलीजी खोड ती; २, रंग, राग, भाषा, रीति, रुचि. इ० कांमध्यें रंगांतर, रागांतर, इ० कांची मारल्येजी छटा ती.

लज्जा, स्त्री० सं० लाज; लोकलज्जा, जनलज्जा मनोलज्जा, इ० स०

लज्जायमान, ३लिं० सं० लज्जित.

**लज्जाहोम**, पु० विवाहांत लाह्यांचाजो होम करित असतात तो.

लज्जित, ३लिं० सं० लज्जायुक्तझालाजो तो.

**लटक**, स्त्री० गाणें, बोलणें, चालणें, इ० कांमध्यें इतरांहून विलक्षणजी कोणेकाची निराळीच तऱ्हा असल्येती; उ० त्याचे गाण्याची लटक मी साधायासजातों पण साधत नाहीं; २, लकब या अर्थीही क्वचित् प्रयोग होतो.

**लटकणें**, खालीं लोंबत हालत रहायाजोगें कोणेकपदार्थानें वरचे आधाराशीं संबंध असणें, लटकत चालणें स० नखऱ्यानें ठुमकत चालणें.

**लटकण, लटकन, लटकर, लटदिशीं**, अ० अनु० निजलेला किं० बसलेला जो मनुष्यादि त्याणें मध्येंमध्यें विराम न घेतां एकाच वेगानें तटकन उडण्याचें वि०

**लटका**, ३लिं० बाह्यात्कारीं जारूपानें इंद्रियगोचर होतो वस्तुत; तद्रूप नव्हे असाजो भ्रमविषयसर्परजतादिपदार्थ किं० अनृतजें भाषणादि तो; २, ज्याचे बोलण्याकरण्यांत प्रमाणिकता नाहीं असाजो मनुष्य तो; ३, निरर्थक किं० निष्कारणजो व्यापारादि अर्थ तो; उ० गेलोंखरा पर काम कांहीं झालेंनाहीं लटकीखेप मात्र पडली; मी कांहीं अपराध केला नसतां लटक्याच मला शिव्या कां देतो; ४, वाय्वादिविकृतीनें चलनवलनादि चेष्टाकरायास किं० स्पर्शादिसमजायास कारणीभूतजी चेतना ती गेली ज्याची असेंजें शरीर किं० शरीरावयव तो.

**लटकाफटका**, ३लिं० लटका, इ० तो.

**लटाकावणें**, कोणेकपदार्थावरील आधाराशीं लटके असा संबन्ध करणें.

लटकुरा, ३लिं० रा० लटका द्वितीयार्थीं.

**लटपट**, स्त्री० हिं० कलहवादाया जोगाजो परस्परांचा अरेतुरे, इ० भाषणादिव्यापार होतो ती; उ० कालदेवळांत त्यांचा आमचा लटपट झाली म्हणून मी त्यांजकडे आज जात नाहीं; २, वाद, युद्ध, इ० प्रसंगीं क्रोधावेश, भय, इ० कारणामुळें कोणेकाची घाबरेपणानें जीभ मोडाची, कांहींच स्फुरूं नये, इ० रूप हाल्येजी अवस्था ती; उ० हा पंडित बोलूं लागताच त्या पंडिताची लटपट झाली; ३, अ० अनु० ढिला झालेलाजो खुंटा, खिळा, खांब, इ० त्यांचे ढिलेपणामुळें जें हालणें त्याचें वि० खुंटा. इ० लटपट करणें स० लटपट हालणें

हालणें.

**लटपटणें**, खुंटी, इ॰ कानें लटपट हालणें; २, कोणेकास प्राप्त झालेला किं॰ होणार जो मामलत, इ॰ अधिकार किं॰ आरब्ध अथवा आरंभणीय जो सावकारी, इ॰ व्यवहार त्याणें कांहीं कारणामुळें त्याच्या रूपेंकरून नाहींसा होणें; उ॰ मामलतीचे छंदास पडला तेणेंकरून पहिली सावकारी होती ती लटपटली आणि मामलत होणार होती तीही लटपटली; ३, विवक्षित अधिकाराद्यधिकरणीं तनद्रूपेंकरून संबंध झालेला जो मनुष्यादिपदार्थ, भाषण, लेख, व्यवहार, इ॰ त्याणें दुसरा कोणी वरचढ आल्यामुळें किं॰ निरुपयुक्त झाल्यामुळें अथवा तें अधिकरण नाश पावल्यामुळें रद्द पडणें किं॰ तनदधिकरणीं संबंध होणार जो तो मनुष्यादि त्याणें त्याच्या कारणामुळें लागून पडतां रद्द पडणें; उ॰ पहिला कारभारी येतांच नवे कारभारी झाले होते ते लटपटले; त्याचे वक्तृत्वापुढें आमचीं साऱ्यांचीं वक्तृत्वें लटपटलीं; तो कारखाना मोडतांच सारे कारकून लटपटले.

**लटपटपंची**, पु॰ हिं॰ हा शब्द पोपटास शिकवितात, २, स्त्री॰ ला॰ अंगीं तादृश विद्या सामर्थ्य नसतां मोठें डौलाचें जें बोलणें त्यास निंदेनें म्ह॰; उ॰ एवढे डौलानें कशाला बोलतां तुमची लटपटपंची मजपुढें चालायाची नाहीं.

**लटपटीत**, ३ लिं॰ लटपट हालतो जो स्तंभादिपदार्थ तो; २, ला॰ पक्केपणीं ठरला नाहीं असा जो मामलत, धंदा, मसलत, भाषण, काम, व्यापार, इ॰ तो.

**लटंबर**, न॰ जाणें, येणें, इ॰ प्रसंगीं मनुष्यादिसमुदायात्मक जें मोठें खटलें त्यास म्ह॰

**लटरफटर**, न॰ ज्या समुदायास अमुक असें नांव देतां येत नाहीं असा जो अनेकजातींचे लहानसान अनेक पदार्थांचा समुदाय त्यास प्रतिव्यक्तिनाम निर्देश करावयाविषयीं अप्राधान्यामुळें अविवक्षा असतां म्ह॰

**लटलट**, **लटलटां**, अ॰ अनु॰ हालणें किं॰ कांपणें यांचें वि॰ लटलट करणें म्ह॰ लटलट कांपणें.

**लटांबर**, न॰ लटंबर.

**लटिंगा**, पु॰ कों॰ सरासरी मणगटापासून पायांचे पोटरीपावेतों इतक्या मानाचा जाडा आणि क्रमानें दीडदोन हात लांबीचा गोल असा जो लांकडाचा तुकडा तो.

**लटीक**, ३ लिं॰ लटका प्रथमार्थी.

**लटीकवाद**, पु॰ रा॰ लटकें बोलल्याचा लटकेंपणारूप जो कोणेकावर दोष येतो तो; उ॰ मी देतों म्हणून बोललों आतां जर न दिल्हें तर मजकडे लटीकवाद येईल.

**लदूफदू**, **लदूबदू**, अ॰ लुदूफुदू.

**लदूबदूचा**, ३ लिं॰ लुदूफुदूचा.

**लदूबुदयों**, अ॰ कों॰ लदूफुदू.

**लदूबुदयांचा**, ३ लिं॰ कों॰ लुदूफुदूचा.

**लटोरा**, पु॰ अरगडी ओघळ्यांत एक भेद आहे.

**लठ्ठ**, पु॰ हातांत घ्यावयाचा मोठा जाड जो सोटा तो; २, ३ लिं॰ सामान्य प्रमाणापेक्षां स्थूल जें शरीर, शरीरावयव, सूत, तन्निर्मित वस्त्र, भाकर, अलंकार

अलंकार, मनुष्य, इ० ती.

लठ्ठनिरंजन. पु० निरक्षर होत्साता शरीरानें धष्ट पुष्ट असून जो दांडगा त्यास म्ह०

लठ्ठभारती, पु० लठ्ठनिरंजन.

लठ्ठा, ३ लिं० लठ्ठ द्वितीयार्थी.

लठ्ठाई, स्त्री० दांडगाई.

लठ्ठामिश्र, पु० लठ्ठनिरंजन.

लठ्ठालठ्ठी, स्त्री० सोटे, दांडे, इ० कांनीं जी परस्परांची मारामारी ती.

लठ्ठाश्रम, पु० लोठाश्रम.

लठ्ठेश्वर, पु० लठ्ठनिरंजन.

लठ्ठ्या, ३ लिं० लठ्ठा.

लड, स्त्री० एका सूत्रांत मोत्यें किं० फुलें ओंवून खालीं गुच्छाकार करून जो त्यांचा सर करितात ती.

लंड, ३ लिं० पक्का धूर्त हरामी जो मनुष्यादि तो; २, पु० प्रसंगविशेषीं शिश्नास म्ह०

लडथड, स्त्री० देणें, घेणें, इ० जो कोणेक परस्परांचा व्यवहार त्यामध्यें कोणेक अंशीं परस्परांचा हिशेब, इ० न मिळाल्यामुळें राहत्येजी विवादविषयता ती; २, तन्निमित्तक जो परस्परांचा विवाद ती; उ० त्याचें आमचें वरकड सारें खटलें तुटलें परंतु शंभर रुपयांचे कलमाची लडथड पडली आहे; त्या दागिन्याविषयीं त्यांची त्यांची आज चार वर्षें लडथड पडली आहे.

लडदू, ३ लिं० गबदूल.

लडधू, ३ लिं० गबदूल.

लडबड, स्त्री० लुडबूड; २, कों० निद्रेनें निचेत झाला जो त्याचे किं० दुखणें, उपवास, इ० कानें केवळ अशक्त झाला जो त्याचे शरीराचा ताठपणा जाउन केवळ लबलबीतपणानें विशिष्ट असा तो जो परिणाम ती किं० रहाट, इ० कांचें घट्ट बसलेलें जें सांधें ते सईल झाल्यामुळें ईषत्चलनादि झाले असतां लटपटलटपट हालायाजोगा शिथिलपणा विशिष्ट होतो जो परिणाम ती; खुंटी, इ० कानें लडबड करणें किं० हालणें म्ह० लटपट करणें.

लडबडणें, बरबटणें; २, लटपटणें प्रथमार्थी; ३, लुडबुडणें.

लडबडीत, ३ लिं० चिखल, शेण, इ० कानें लडबडलेला जो हस्तादिक तो; २, लटपटीत.

लडबड्या, ३ लिं० लुडबुड्या.

लंडभारती, पु० सर्व दानागचा असतो असा जो गोसावी, इ० त्यास निंदेनें म्ह०

लंडाई, स्त्री० लंडपणा.

लडिवाळ, ३ लिं० लाडका; २, पु० लाड पुल्लिंगार्थी.

लडी, स्त्री० दे० लड.

लंडी, स्त्री० रंडी, परंतु नामर्दपणामुळें कोणेकाचें हीनत्ववर्णायाचें असतां त्यास आरोपानें म्ह०; उ० युद्धांतून पळणें हें लंडीचें काम; मी कमर बांधल्यावर कोण लंडी पुढें येत्ये पाहूं.

लडु, पु० सं० लाडू.

लडुक, पु० सं० लाडू.

लढ, स्त्री० कों० समुद्रांतून लाटे बराबर चिखलाचे गोळे येउन तीरीं पडत असतात ती.

लढणें, कोणेकानें कोणेकाबराबर झुंजणें; २, ला० कोणेक अर्थानें सजातीय अर्थांतराशीं विवक्षित गुणद्वारा साम्य पावणें; उ० हें पागोटें त्या

पागोट्यावीं लढवून पाहिलेंपण लढत नाहीं; ३, कोणेक अर्थानें लढारूपानें उपस्थित होणें.

लढवई, लढधाई, ३ लिं० लढण्याविषयीं समर्थ किं० लढण्याचे उपयोगीजो शिपाई, घोडा, नौका, इ० यान, वाडा, कुत्रा, शस्त्र, इ० तो.

लढा, पु० प्राय: लडथड प्रथमार्थी; २, रा० कोणेक गतिमंताची सारखेपणेंचालली असत्येजी गति तिचा वेगाचा यत्किंचित् कुंठीभावहोण्यास कारणीभूत मध्यें जें कांहींप्रतिबंधक लागतें तो; उ० या कागदावर घोंटणी नाहीं ह्मणून रेघ ओढतानां मध्यें लढा लागतो; वायूनें जीभ आडखळल्यामुळें अस्खलित ह्मणतां येत नाहीं ह्मणू लागलें असतां मध्यें लढा लागतो.

लढाई, स्त्री० लढण्याचाजो व्यापार तो.

लढाऊ, ३ लिं० लढवई.

लढी, स्त्री० कों० लढ.

लढ्या, पु० लढ; २, चिरवल, इ० कांचाजो गोळा तो.

लतकोडगा, ३ लिं० पराकाष्ठेचाजो कोडगा तो.

लता, स्त्री० ओषधिवनस्पतींत एकभेद आहे जीचा शाखा तंत्वाकार लांबलांब, असतात आणि भूमि किं० इतर वृक्षादि यांस आश्रयून विस्तार पावतात

लत्ता, स्त्री० कोणेकास प्रहारकरण्याविषयीं साधनत्वेंकरून विवक्षितजें पादतल ती; लत्ताप्रहार. इ० स०; कोणेकाचे लत्तेस शनी येणें, असणें, ह्म० जन्मस्थानापासून द्वितीयस्थानीं असणें; २, पु० लगता द्वितीयार्थी.

लथडणें, लथाडणें, कोणेकास लत्तानीं पुष्कळ मारणें; २, ला० वादयुद्धादिकांत प्रतिस्पर्धी जो त्यास पराजयानें केवळ तुच्छकरून टाकणें; ३, प्राप्त झालेलें किं० प्राप्त होणार जें राज्य, धन, इ० त्यातें तुच्छ मानून त्यागणें; ४, सिद्ध व्हायास आलेंजें कोणेकाचें कांहीं एक काम त्यातें कांहीं विघ्नकरून भंगून टाकणें.

लदाव, पु० कोनाडा, इ० कांवर कमानीसारखा किं० देवळाचा गाभारा, इ० कांवर पालथेपाळीसारखा जो विटा, चुना, दगड, इ० कांनी रचनाविशेष करितात तो.

लपका, पु० लबका.

लंपट, ३ लिं० सं० संसार, स्त्री, इ० विषयांचेठायीं जो अतिशयित आसक्त तो; स्त्रीलंपट, विषयलंपट, इ० स०

लपंडाई, स्त्री० दे० लपंडाव.

लपंडाव, पु० कोणी दडावें, कोणी त्यास शोधून काढावें, इ० रूप एक मुलांची क्रीडा आहे; २, ला० सावकार, इ० कांशीं तोंड चुकवून वर्तावें किं० भाषणामध्यें घोंटाळ्यानें, कांहीं विवक्षितांश गुप्त राखून बोलावें किं० आपलें अंग बाहेर न राखवितां ओतून कोणेक व्यवहाराचीं सूत्रें चाळवीत असावें, इ० रूपजो कपटाचार त्यास ह्म०; करणें; खेळणें, इ० धातूंचे योगीं प्र०

लपणें, दडणें; २, तुळई, फळी, कडी, इ० भार पडल्यामुळें मध्यें लवणें.

लपूनछपून, अ० उघडीक न होई असें करणें, राहणें, इ० कांचे वि०

लपेट, पु० स्त्री० लपेटा; २, स्त्री० काष्ठ, पाषाण, इ० कांचा

कांचा जो परिधि तो; ३, आंतील पांचपेंच, इ० दुसऱ्याचे मनांत येऊं नये कांहीं खोटें असलें तथापि खोटेंसें वाटूं नये दुसऱ्यास आकांक्षा घ्यावयास अवसर सांपडूं नये अशीजी भाषणादिकांत कोणेकाची धूर्तपणाची हातोटी असते ती; उ० त्याची अशी कांहीं बोलण्याची लपेट आहे किं वर शंका करायास अवसरच सांपडत नाहीं; कोणेक गोष्ट लपेटीखालीं नेणें, इ० स्थलीं आंतील त्यम्याची उघडीक, दुसऱ्याची शंका, इ० न होऊं देतां लपेटीनें साधून नेणें; ४, उन्हाळ्याचे दिवसांत सूर्यकिरणांनीं संतप्त झालेला मनुष्यादिकांस लागला असतां बाधतो जो वायु तो; ५, पटकी ह्मणून जो उपद्रव त्यास ह्म०

**लपेटणें**, कोणेक पदार्थ वस्त्रादिकानें अंगावरोवर सभोंवता वेष्टित करणें; पक्षीं त्या वस्त्रादिकासही कर्मता, कोणेक गोष्ट लपेटून नेणें ह्म० लपेटीखालीं नेणें.

**लपेटा**, पु० कोणेक पदार्थाचे सभोंवतें लपेटलेलें जें वस्त्र, चर्म, शेण, चिखल, इ० कांचें असतें वेष्टन तो; उ० अडूळशाचा पाला एका पानांत घालून त्याचा पुडा करून त्याचे भोंवता शेणाचा लपेटा देऊन फुपाट्यांत भाजावा; २, तार गुंडाळलेल्या जा वांगड्या तो; उ० अरे कासारा या मुलीचे दोहीं हातांत लपेटाच भर.

**लपोडशंख**, पु० कोणी कांहीं द्रव्यादि मागितलें असतां किं० कांहीं काम करूं सांगितलें असतां देईन, करीन, असें ह्मणत असावें मोठ्यामोठ्या डौलाच्या गोष्टी सांगाव्या परंतु कांहीं करूं नये असा स्वभाव



जाचा तो.

**लप्पंछप्पं**, न० प्रायः गहूंपहूं या अर्थी

**लप्पा**, पु० शेला, पागोटें, इ० कांस मोठा जो जरीचा पदर असतो तो; २, गोल जें लांकूड त्याची कोणेक बाजू सपाट करायासाठीं त्या बाजूचा वरल्या अंगाचा करवतानें जो तकता काढितात तो; ३, स्त्रियांचें कंठभूषण आहे.

**लप्पेदार**, ३ लिं० लप्प्यानें युक्त जें शेला, पागोटें, इ० वस्त्र तो.

**लफणें**, क्रि० लपणें द्वितीयार्थी.

**लफलफणें**, मांसल स्फटलेला जो गोमहिष्यादिकांचा कास, दोंद, इ० अवयव त्याणें थलथल हालणें.

**लफा** पु० लप्पा, प्रथम द्वितीयार्थी.

**लफेदार**, ३ लिं० लप्पेदार.

**लब**, स्त्री० जें नियमित नित्य असें नव्हे प्रसंगाच्यातानें कदाचित उपस्थित होणार असतें एवढें जें कोणेकाच्या करांचे माथीं मारलें असतें असें नाहीं असें जें कोणेकास बलावून आणणें, कोणेकास कांहीं निरोप सांगणें, इ० रूप लहान सहान श्रीमंत लोकांचें जवळचें नैमित्तिक काम तें; लबेचा ह्म० लबेचें काम करायाकरितां बाळगला असतो जो कारकून, शिपाई, इ० तो.

**लंब**, पु० सं० खांब, भिंत, इ० कांचें उभेपणाचा उजूपणा पहावा इत्यादि अर्थं एका दोरास बांधून वरून खालीं सोडितात जो शिसें, दगड, इ० कांचा गोळा तो; २, दीर्घ जो अवयव तो; लंबोदर, इ० स०

**लबई**, स्त्री० लब.

**लंबक**, पु० सं० लंब.

**लबक**, स्त्री० लकब.

**लंबकर्ण**, पु० गाढवास संकेताने म्ह०

**लबका**, पु० मांस, चिखल, शेण, इ०कांचा सरासरी आंबा, कवंठ, एवढा जो गोळा तो.

**लंबन**, न० सं० सूर्यग्रहणी दर्शनाबराबर जादेशीं मध्यान्ह होतो तथेंमात्र तत्समयीं ग्रहण दृग्गोचर होतें त्यादेशाहून पूर्वेकडील देशीं कांहीं पूर्वी ग्रहणाची दृग्गोचरता होत्ये आणि पश्चिमेकडील देशीं कांहीं मागून होत्ये असेंजें देशपरत्वें ग्रहणाचे दृग्गोचरतेस कालकृत अंतर असतें तें.

**लबलब**, अ० अनु० अतित्वरेनें खातांना, बोलतांना जें तोंडाचें हालणें त्याचें किं० तादृश तोंड हालत जें तसें खाणें, बोलणें, त्याचें वि०; निंदाविषयीं प्र०; उ० माझे गोष्टीत तूं बोलूं नको म्हणून दोनचार वेळ सांगितलें तथापि मध्यें लबलब बोलतो.

**लबलबीत**, ३ लिं० ज्याचा गोळा करूं गेलें असतां घट्ट बांधला जात नाहीं इतका पातळ जो शेण, चिखल, पीठ, इ० पदार्थ तो.

**लंबा**, ३ लिं० मृत्यूनें किं० मूर्छेनें जो भुईवर आडवा पडला तो; होणें किं० करणें यांजवर अन्वय; उ० पेठणास अकस्मात् जेव्हां पटकी आली तेव्हां एका दिवसांत हजार माणूस लंबे झाले; माजूम गोड लागल्यानें पाहिजे तितकी खाल्ली आतां अवघे लंबे होउन पडले आहेत; २, ला० खरचल्या, बुडल्यामुळें, नाहींसा झाला जो पैका, धान्य, इ० किं० कोसळल्या पडल्यामुळें जमीनदोस्त झाला जो भिंत, झाड, इ० तो.

**लंबाख्या**, ३ लिं० दे० लंबाडया.

**लबाड**, ३ लिं० व्यवहारीं लोकांबराबर वागण्यांत खोटें बोलूं नये, दुसऱ्यास दुखवूं नये, दुसऱ्यानें कांहीं आपला अपराध केला असतांही सांगावे जे चांगले गुण ते अंगीं असून तद्विरुद्ध गुण ज्याचे अंगीं असतात असा जो मनुष्यादि तो; २, आधुनिक जो मनुष्य, भाषण, लेख, कागद, ग्रंथ, व्यापार, धर्म, इ० तो; लबाड वांचून नव्हे या वाक्यांत कोणकावर लबाडपणाचें विधान कर्तव्य असतां प्रयोग करितात.

**लबाडकी**, स्त्री० लबाडपणा.

**लबाडलुच्चाड**, ३ लिं० लबाड, चोर, इ०रूप जो दुर्गुणी मनुष्यादि तो.

**लबाडलाताड**, ३ लिं० लबाडलुच्चाड.

**लबाडी**, स्त्री० लबाडकी; २, लबाडी जींत आहे त्ये किं० लबाडीनें रचलेली जी गोष्ट, इ० ती; उ० त्यानें लबाडी सांगितली; ही सर्व लबाडी आहे; ३, दे० दगड, इ० उचलायाला किं० उंच करायास लावतात ती तरफ ती.

**लबाडीलुच्चाडी, लबाडीलाताडी**, स्त्री० लबाडी, लुच्चेगिरी, इ० ती.

**लंबाडया**, ३ लिं० सामान्यप्रमाणापेक्षां भारी उंच असून जो पातळ अंग्या मनुष्य त्यास निंदेनें म्ह०

**लंबाण**, पु० चारण प्रथमार्थी; २, न० चारणांचें देवळ, बायका, बिऱ्हाड, इ० जें खटलें तें.

**लंबाणभाऊ**, पु० लमाणभाऊ.

**लंबाणी**, ३ लिं० लंबाणसंबंधी जो माल, बैल, वेष, भाषा, इ० तो.

लंबायमान, ३ लिं० विवक्षितप्रमाणापेक्षां जो दीर्घ तो.

लंबू, पु० बंबू.

लंबे, ३ लिं० लंबा.

लंबेदा, पु० देशांतरादिकास निघालें असतां मार्गी बरोबर असतो जो बायका, मुलें, घोडीं, गुरें, माणसें, इ० खटलें तो.

लंबोदर, पु० सं० गणपति; २, ला० ज्याचें लांब पोट त्यास आरोपानें स्त्र०

लब्ध, ३ लिं० सं० कोणेक व्यवहार, मनुष्य, इ० कांपासून कोणेकास मिळाला जो कांहीं एक अर्थ तो; लब्ध आहे धन ज्यास तो लब्धधन; लब्धाधिकार, लब्धोपदेश, इ० स०; २, शब्दवाक्यादिकांपासून वाच्य व्यंग्यादिमर्यादेनें निष्पन्न झाला जो कांहीं एक अर्थ तो; ३० त्याचांचून मला क्षणभर करमत नाहीं या वाक्यापासून त्याजवर माझा सर्व प्रेमा आहे असा अर्थ लब्ध होतो; ३, न० ३ लिं० भाजकानें भाज्य भागिला असतां तें फल येतें तें.

लब्धप्रतिष्ठ, ३ लिं० सं० विद्यादिगुणलोकांत प्रसिद्ध होऊन एकवार ज्याची प्रतिष्ठा झाली आहे तो; परंतु अधिक विद्यादि संपादून अधिक प्रतिष्ठा मिळवावी एतद्विषयीं त्याचें औदासिन्य वर्णनीय असतांच प्रायः प्र०

लब्धप्रतिष्ठा, स्त्री० सं० अंगीं तादृश योग्यता नसतां उगीच मिरवितात जो प्रतिष्ठेचा डोल तो.

लब्धप्रतिष्ठित, ३ लिं० सं० लब्धप्रतिष्ठ.

लब्धि, स्त्री० सं० कोणेक व्यवहारापासून द्रव्यादिरूप फलाची किं० कोणेकापासून दानादिद्वारा निर्गत

जें

जें द्रव्यादिक त्याची आपलेपणानें आपल्याजवळ होत्ये जी संबद्धता ती; २, लब्ध तृतीयार्थी; ३, लभ्यांश.

लभ्य, ३ लिं० सं० याचनादिद्वारा मिळायाजोगा जो द्रव्यादिपदार्थ तो; २, लब्धप्रथमार्थी कोणी प्रयोग करितात; ३, लभ्यांश.

लभ्यांश, पु० सं० आमांश.

लमाण, पु० न० लंबाण.

लमाणभाऊ, पु० लमाणजातीय जो पुरुष त्यास स्त्र०; २, ला० लबाडयास स्त्र०

लमाणी, ३ लिं० लंबाणी.

लय, ३ लिं० सं० लई; २, स्त्री० मृदंग, वीणा, इ० वाजविल्यानंतर कांहीं काळ बारीक जो नाद रहात असतो तो; ३, पु० कोणेक पदार्थ पदार्थांतरांत मिळाला असतां तद्रूपता पावल्यामुळें होतो जो नाहींसेपणा तो; ४, जगाचा जो प्रलय तो; ५, संपत्त्यादिकांचा जो प्रध्वंसाभाव तो; ६, न० अंतःकरणाची एकाग्रता होऊन कोणेक विषयाकडे लागतें जें लक्ष्य तें.

लयलूट, स्त्री० कोणेक पदार्थांची होत्ये जी रगड ती.

ललकारणी, स्त्री० ललकारून करितात जो शब्द तो; २, ललकारण्याचा प्रकार तो; ३० हा गातो तेंच तो गातो परंतु त्याची कांहीं ललकारणी निराळी आहे.

ललकारणें, दूरवर ऐकायास जावें आणि लांब आणि उंचस्वर असावें असा एक शब्द करण्याचा प्रकार आहे त्याप्रकारानें चोपदार, इ० कांनीं नांवें वाक्यादि उच्चारणें; २, दूरस्थित जो कोणी त्यास

पूर्वोक्त

पूर्वोक्त प्रकारें मोठ्यानें हाक मारणें.

ललकारी, स्त्री० ललकारणी.

ललत, पु० गाण्यांतील एक राग आहे.

ललना, स्त्री० सं० स्त्री.

ललललल, अ० अललललल.

ललाट, न० सं० कपाळ ह्मणून जो नेत्रावरील शरीरावयव तें.

ललित, ३ लिं० सं० सुंदर; २, न० लळीत.

ललितापंचमी, स्त्री० सं० आश्विनशुक्लपंचमी त्या दिवशीं ललिता ह्मणून देवी आहे तिची पूजा करीत असतात.

लव, पु० कों० एक वृक्ष आहे; २, त्याचें जें फळ तें; ३, सं० कोणेक पदार्थाचा केवळ सूक्ष्म जो अंश तो; ४, ज्योतिःशास्त्रादिकांचे ठायीं साधारण अंशास ह्म०; ५, स्त्री० लव.

लँव, स्त्री० दाढी, मिशी, डोकी, इ० स्थानीं जे कठोर केश असतात त्यावांचून पाठपोट, हात, पाय, इ० अवयवांवर जे बारीक कोमळ केस असतात ते; २, पशु-श्वादिकांचे अंगावर असतात जे केश ते; कोणेकाची लंवलंव बोलल्ये, इ० स्थळीं तो अनेकप्रकारें अतिशयित त्वरित बोलतो.

लवकर, अ० सत्वर; २, काळक्रमें विलंब न होऊं देतां पूर्वी; उ० हे रुपये जर लवकर याल तर पुनःपाहिजेत तर देईन; ३, जा कार्याचा जो नियमित काळ तो न लागतां पूर्वी; उ० यंदा लवकर पेरे झाले ह्मणून शेतें लवकर पिकलीं; ४, न० उशीराचा प्रतिपक्षी जो काळनिष्ठ धर्म तें; उ० अजून लवकर आहे एव्हांच करावास जातो.

लवका, ३ लिं० किंचित् भार पडला असतां किंवा कंविला असतां वांकला जातो असा जो काष्ठादि पदार्थ तो.

लवंग, स्त्री० सं० एक झाड आहे; २, त्याचें जें फूल तें जें सुगंधी आहे विड्यांत खातात; ३, ला० त्या पुष्पासारिखें कर्णांत घालावयाचें सुवर्णादिकांचें भूषण करितात तें.

लवंगणें, कों० वाटेनें चालत्येसमयीं पाय वांकडा पडणें, भार अधिक होणें, इ० कारणास्तव शरीर किं० पाय, इ० अवयव दुखावणें.

लवंगीमिरची, स्त्री० लवंगेसारिखी बारीक आणि अतितिखट अशी एका जातीची मिरची आहे ती; आणि तिचें जें झाड तें.

लवंगेल, लवंग्येल, न० लवंगांचें जें तेल तें.

लवचीक, ३ लिं० लवका.

लवंडणें, यथायोग्य स्थितीनें भूम्यादिकांवर स्थित जो पात्रादि पदार्थ त्यानें एका बाजूवर धक्का, इ० कानें पाडणें किं० तसें करून त्यांत स्थित जो जलादि पदार्थ तो बाहेर सांडणें; २, बिछाना, इ० कांचे ठायीं सुखार्थ आडवें पडणें.

लवडा, पु० शिश्न.

लवंडी, स्त्री० बटीक.

लवंडीचा, ३ लिं० शिंची आहे.

लवंडेलूट, स्त्री० ला० धान्यादिकांची अतिशयित जी समृद्धि ती; जेणेंकरून त्या पदार्थास कोणी विचारीना असें होतें.

लवण, पु० सं० क्षार ह्मणून जो रस तो; २, न० मीठ; ३, दोहो बाजूंस उंच बदा असून मध्यें जी निम्न

जागानें.

**लवणभंजन**, न॰ भाषणादि व्यापारांत आपला विशेषपणा दिसायाजोगा साधारणासही लवून नमस्कार करावा, महाराज, इ॰ शब्दानें बोलावें, इ॰ रूपजो प्रकार असतो तें.

**लवणशाक**, पु॰ स्त्री॰ लोणचें.

**लवणें**, शरीर, काष्ठ, इ॰ पदार्थानें वर कांहीं नेट आल्यामुळें अनुक्रमानें संबद्ध होत गेलेलें जे स्वारंभक परमाण्वादि अवयव त्यांचा रोख कांहीं अन्यथा होई अशा स्थितीवर तुटल्या मोडल्यावांचून येणें; वाज, डोळा, यांणीं लवणें म्ह॰ स्फुरणें; मनदेवता, मनपिंगळी. यांणीं लवणें म्ह॰ वाहणें.

**लवंथा**, पु॰ गा॰ कमलाकार हस्तानें कोणेकाचे शरीराचा ओंढिलाजो मांसगोलक तो; येणें, काढणें, धातु योगीं प्र॰

**लवलवणें**, एकत्र स्थित जे अनेक किडे, इ॰ जीव त्यांणीं वळवळत असणें; २, प्रसंगीं कांहीं बोलायासाठीं कोणेकाचे जिव्हेनें स्फुरण विशिष्ट होणें.

**लवलवीत**, ३ लिं॰ लवचीक, कोमल, मृदु, असाजो कोंवळें, पडवळ, दोडका, पोकळा, चांगला शिजलेला भात, मळलेली कणीक, पोटऱ्या, इ॰ शरीरावयव, इ॰ पदार्थ तो.

**लवलक्षण**, न॰ गा॰ मनुष्य, पशु, इ॰ कांचे अंगीं टवटवी, सुरेखपणा, इ॰ गुणनिमित्तक जी दर्शनीयता म्हणून दिसत असत्ये तें.

**लवलाहीं**, अ॰ ग्रं॰ झटकर.

**लवलेश**, पु॰ कोणेक अर्थाचा ईषदंश तो; प्रायः निषेधविषयीं प्र॰; उ॰ घरांत तुपाचा लवलेश नाहीं; त्या गोष्टीचा लवलेश मला ठाऊक नाहीं.

**लवाजमा**, पु॰ हिं॰ डौल दिसायाजोगा समागमें वाळगतात जो कांहीं घोडीं, माणसें, इ॰ रूप खटला तो.

**लव्हा**, पु॰ तृणांतील एक भेद आहे; जो प्रायः नद्यादिकांचे तीरीं असतो.

**लव्हाणा**, पु॰ गुजराथी लोकांत एक भेद आहे.

**लव्हार**, पु॰ लोहार.

**लव्हारकाम**, न॰ लोहारकाम.

**लव्हारसाळ**, स्त्री॰ लोहाराचा लोखंडाचे दागिने घडायाची जी जागा ती.

**लव्हाळा**, पु॰ लव्हा.

**लव्ही**, स्त्री॰ कों॰ लव्ह्यांत एक जाति आहे, जीची कांडी बारीक आणि लहान असत्ये ती.

**लशाकोडया**, ३ लिं॰ गा॰ ज्याचे अंगांतून लस वाहत्ये आहे कोड अंगावर फुटलें आहे असा जो मनुष्य तो.

**लशीरखरूज**, स्त्री॰ ओली जी खरूज ती.

**लश्कर**, **लष्कर**, न॰ हिं॰ सैन्य; २, पु॰ तोफखाना, इ॰ कित्ती एक कारखान्याकडे खटपटीस ठेविलीं असतात जीं मनुष्यें तीं प्र॰ तो.

**लश्करगिरी**, **लष्करगिरी**, स्त्री॰ द्रव्यादि संपादनार्थ लश्करांत राहून त्यांजबरोबर जो प्रवास तो.

**लश्करी**, **लष्करी**, ३ लिं॰ लश्करसंबंधी जो शिपाई, सरंजाम, इ॰ तो.

**लस**, स्त्री॰ क्षत, फोड, इ॰ कांतून उदकासारिखा जो द्रवांश वाहतो तो.

**लसणी**, ३ लिं० लसणीचे बीचे आकारासारिख्या कड्या, इ० करून जोडल्या, तोडा, इ० भूषण कारिताने तो.

**लसण्या**, पु० एक रत्न आहे.

**लसफशीत**, ३ लिं० ज्यामध्यें चापचोपी, घट्टपणा, नाहीं असें जें सईल नेसलेलें वस्त्र, पागोटें, आंगरखा, वेणी, गाठोडें, शरीर, इ० तो.

**लसलशीत**, ३ लिं० रा० लुसलुशीत ; २, लसलसलेलें जें पाणी, इ० तो.

**लसलस**, अ० रा० अनु० क्षत, कुजलेले फळ, इ०कांत पडलेलें जे किडे त्यांचे हालण्याचे चि० ; लसलस करणें क्रि० लसलसणें.

**लसलसणें**, रा० पाणी, दूध, इ० सळसळ शब्द व्हावयाजोगें अतितप्त होणें ; २, क्षत, फळ, इ०कांत किडे, इ०कांनीं वळवळ करीत असणें ; ३, शरीरीं तारुण्य इ०कानें तेज टाकायाजोगें भरावस्थेस येणें.

**लसलसाट**, पु० रा० क्षतादिकांत किडे, इ०कांचा जो बुचबुचाट तो.

**लसूण**, पु० स्त्री० एक वनस्पति आहे ; २, तिचाजो कांदा तो.

**लसूणवी**, स्त्री० कां० लसूणीचे कांद्याचा जो एक अवयव तो.

**लहंगा**, पु० हिं० मोठ्या बायकोंचा जो परकोर तो.

**लहणीहुंडी**, स्त्री० अडत्या, इ०कांकडे लहण्याबद्दल जी हुंडी पाठवितात ती.

**लहणें**, न० अन्यपेठचे सावकार, इ०कांवर हुंडी, इ० देणें केलें असतां त्यास जो मोबदला एवज हुंडी, इ० पाठवितात तें.

**लहर**, स्त्री० लहरीचा अपभ्रंश, परंतु हाच लोकांत विशेष प्रसिध म्हणून इथेंच अर्थ लिहितो ; समुद्रादिकांचे उदकास येतात जा लाटा त्या प्र० ; २, दारू, कैफ, विष, काम, क्रोध, इ० विकार संबंधी शरीरांत उठतात जे वेग ते प्र० ; ३, कांहीं एक करण्याविषयीं येत्ये जी हुकी ती ; ४, सर्पाचे गळ्याखालीं जा रेषा असतात त्या यत्संख्याक असतात तो सर्प डसला असतां तत्संख्याक विषाच्या लहरी येतात अशी लोकप्रसिद्धि आहे, म्हणून त्या रेषासही म्ह० ; ५, जाभळी, अंजिरी, इ० रंगांची वस्त्रें, इ० त्यांवर उजेड प्रकाश, यांचे उपाधीमुळें अनेक प्रकारच्या रंगांच्या छाया दिसतात त्या प्र० ; ६, वस्त्रादिकांवर विणकरीनें किं० रंगानें ज्या नागमोडीसारख्या रेषा उठविल्या असतात त्या प्र० ; कोणेकानें लहरा मारणें म्ह० मौजा मारणें ; लहरीचा म्ह० विणकरीनें किं० रंगानें ज्यावर लहरी उठविल्या आहेत असा जो वस्त्र, खण, कांठ, इ० त्यास म्ह०

**लहरी**, स्त्री० लहर परंतु प्रथमार्थीं लोकांत प्रसिद्धि, ग्रंथादिकांत द्वितीयार्थीं ही प्रयोग होतो ; २, ३ लिं० कोणेक गोष्टीविषयीं दुसऱ्यानें हिताचीही गोष्ट सांगितली असतां ऐकेल असें प्रमाण नाहीं आपल्या मनास येईल तेव्हां कोणी निवारिलें असतांही ऐकायाचा नाहीं अशा स्वभावाचा जो मनुष्यादि तो.

**लहरीदार**, ३ लिं० लहरीचा जो खण, कांठ, वस्त्र, इ० तो ; २, लहर द्वितीयार्थीं.

**लहान**, ३ लिं० विवक्षिताहून आकार प्रमाण ज्यांचें

कर्मा असाजो पदार्थ तो; २, वय, तेज, किंमत, इ॰ कृत योग्यतेनें जो उणा तो.

**लहानगा**, ३ लिं॰ धाकटा.

**लहानथोर**, ३ लिं॰ केवळ एकाच प्रतीचा असा न-द्दे काहीं मोठे, कांहीं लहान, कांहीं मध्यम, असा अनेकप्रतीचा जो पदार्थ तो.

**लहानमाणूस**, पु॰ योग्यतेनें हलका जो मनुष्य तो.

**लहानमोठा**, ३ लिं॰ लहानथोर.

**लहानवी**, स्त्री॰ ग॰ लघुत्व प्रथमार्थी.

**लहानवीथोरवी**, स्त्री॰ एकापेक्षां एक मोठा आणि त्यापेक्षा दुसरा लहान असें जें परस्परामध्यें अंतर असतें ती; परंतु प्रायः तें अंतर वयःकृत असतांच प्र॰

**लहानसर**, ३ लिं॰ सजातीय पदार्थ समुदायाचा लहान आणि मोठे अशाज्या दोनकोटी त्यामध्यें लहान या कोटींत परिगणनीय जो तो; उ॰ हें घर लहानसरच आहे पण चांगलें टुमदार आहे.

**लहानसहान**, ३ लिं॰ लहान, इ॰ तो.

**लहानावणें**, ग॰ लघुप्रमाणविशिष्ट कोणेकानें होणें; उ॰ पाऊस लहानावल्या म्हणजे मग जा.

**लहानाळ**, ३ लिं॰ ग॰ सामान्य प्रमाणापेक्षां ज्याचे अंगाचा बांधा लहान असा जो मनुष्य, पशु, इ॰ तो.

**लहारी**, स्त्री॰ तीन आण्याचें एक नाणें होतें ती; २, प्रस्तुत कोणी तीन आण्यास म्ह॰

**लहीन**, ३ लिं॰ स्वभावेंकरून विनयविशिष्ट जो मनुष्यादि तो.

**लळन्या**, ३ लिं॰ लळित्या.

**लळलळ**, अ॰ करणें धातुयोगी प्र॰; अ॰ जिव्हेनें लळलळणें.

**लळलळणें**, पसरलेल्या तोंडांत लाळ गळत जिव्हेनें हालणें.

**लळा**, पु॰ लेकरूं, गुरूं, पांखरूं, इ॰ कोणी नित्य जो कोणी लालन, पोषण, इ॰ करित असतो त्याचा त्या लेकरूं, इ॰ कोस जडला असतो जो प्रेमा तो; कोणेकाचा लळा कोणेकानें चालविणें म्ह॰ लाड चालविणें.

**लळित्या**, ३ लिं॰ ललीत करण्याविषयीं कुशल जो हरिदासादि तो.

**लळीत**, न॰ नवरात्रादिसंबंधी कीर्तनविशिष्ट जो उत्साह त्याचे अंतिमदिवशीं रात्रीं उत्साह देवता सिंहासनारूढ झाली असें कल्पून चारदेव, टेंडी गाणें, इ॰ ईश्वर भक्तांची सोंगें आणून त्या सोंगांनीं स्वसंप्रदायानुरूप देवापाशीं प्रसाद मागावा आणि तो सर्व सभासदास वांटावा असा जो हरिदास जन कीर्तनविशिष्ट समारंभ करितात तें; २, त्या ललितावेळेस म्हणावयाचा जो अभंग, पदें, इ॰ रूप कर्त्यानें केलेला ग्रंथ असतो तें; ३, ला॰ राज्य, संसार, व्यवहार, इ॰ कोचा दुष्टपरिणामानें जी समाप्ति ती सत्य म्ह॰ कोणेकानें ललनावर येणें; ललितावर येणें म्ह॰ वादप्रतिवादादिप्रसंगीं चिरडीस येऊन निकरावर येणें.

**लक्ष**, पु॰ संख्या आहे १००००० लक्षांश, लक्षगुणित, इ॰ स॰; २, न॰ लाख रुपयांचा लाभ झाला त्यांनंस्थानीं मानावयाचें जें तें काहीं झालें त्यास म्ह॰; उ॰ यांनें स्वारे चांगलें

लुटून घेतलें तर घेऊ परंतु तुम्ही रक्षित घरीं आलों एवढेंच आम्ही लक्ष मोजतों; ३, चित्ताचें जें अनुसंधान तें; ४, बंदूक, शर, नेत्र, अंतःकरण, इ० कोनीं वेधायाविषयीं उद्दिष्ट जो कांहींएक अर्थ तें.

**लक्षक**, पु० कोणेक अर्थानें लक्षणारा जो तो.

**लक्षण**, न० चिन्ह; २, कोणेक अर्थातें वाच्यमर्यादेनें न बोधवितां तन्निष्ठगुणादि निर्देशद्वारा बोधवितो जो पदसमुदाय तो त्या अर्थाचें; ३, साहचर्यादिनियमास्तव ज्या अर्थाचा उपस्थापक जो कोणेक अर्थ होतो तो त्याचें; उ० धूम पाहिला असतां एथें अग्नि आहे असें ज्ञान होतें म्हणून धूम हें लक्षण, आणि अग्नि हें लक्ष्य; ४, मनुष्यादिकांचे अंगीं स्वभावाचें ज्ञापक जे गुण, अवगुण, असतात ते प्र०; उ० फरकत दुसऱ्यास शिवी देतोस हें तुझा अंगीं वाईट लक्षण आहे; रा० कोणेकाचें लक्षण जाणें म्ह० लवलक्षण जाणें.

**लक्षणसमन्वय**, पु० लक्ष्याचे आणि लक्षणाचे जे सर्व अवयव असतात त्यांचा परस्परें यथायोग्य प्रत्येकीं संबंध होऊन विशिष्ट लक्ष्यावर विशिष्ट लक्षणाचा जो अन्वय होतो तो.

**लक्षणा**, स्त्री० वाच्यार्थ सन्निहित किं० वाच्यनिष्ठ जे गुण तद्विशिष्ट जो कोणेक अर्थ तद्विषयीं त्या वाच्यार्थाचा वाचक जो शब्द त्यास वाच्य वाचक भाव संबंध नसताहीं येत्ये जो बोधकता ती; उ० चोराचे भयानें सारा गांव पळाला एथें गांव या शब्दाची लक्षणा गांवांतील लोकांचा जो समुदाय त्याजवर होत्ये; उ० या बैलाला नित्य सांगतों कीं तूं पढत जा पण त्याचें तें गांवींही नाहीं; एथें बैल या शब्दाची मूर्ख, क्रीडाप्रिय, जो मुलगा त्याजवर लक्षणा आहे.



**लक्षपुजा**, स्त्री० लक्षपूजा शब्दाचा अपभ्रंश

**लक्षपुजा**, स्त्री० सं० बिल्वपत्रें, तुलसीपत्रें, पुष्पें, फलें, तीळ, तांदूळ, इ० लक्ष संख्याक देवावर वाहावे असा संकल्प करून त्या त्या द्रव्यानीं जी पूजा करितात ती; २, लाखोली.

**लक्षभोजन**, न० सं० लक्षसंख्याक ब्राह्मणास तृप्त्यर्थ जें भोजन घालितात तें.

**लक्षलाभ**, पु० सं० लखलाभ परंतु त्याचा कया कयात मंगलार्थ जसा प्रयोग होतो तसा या[illegible]चा त नाहीं

**लक्षशः**, अ० लक्ष दोन लक्ष, तीन लक्ष, असें लक्षाच्या संख्येनें मोजलें जाई अशा प्रकारें.

**लक्षाचा मनुष्य**, पु० शहाणा असून परोपकाराविषयीं भला अतएव सत्संगत असा जो मनुष्य त्यास म्ह०

**लक्षाचा माणूस**, पु० लक्षाचा मनुष्य.

**लक्षाधीश**, पु० सं० लक्षावधि रुपये ज्यापाशीं आहेत तो; म्ह० लक्षाधीश किं० कक्षाधीश.

**लक्षानलक्ष**, ३ लिं० अनेक लक्ष संख्याक जो कांहीं एक अर्थ तो.

**लक्षावधि**, अ० सं० लक्षशः.

**लक्षिणें**, मनुष्यादिकानें कोणेक पदार्थाकडे दृष्टि लावून तो पदार्थ लक्ष्यरूपें करून धरणें; २, ज्या अर्थाची साक्षात् इंद्रियगोचरता होत नाहीं तो अर्थ त्याचें ज्ञापक जें कांहीं एक लक्षण त्याजवरून जाणणें; उ० मुलाची वाढ प्रतिक्षणीं पाहूं लागलें असतां दिसत नाहीं परंतु महिन्यानें किं० वर्षानें पाहिलें असतां कांहीं थोर दिसतो तेव्हां प्रतिक्षणीं वाढ आहे असें लक्षावें; ३, वक्त्यानें शब्दाची शक्तीहून इतर लक्षणा

व्यंजनादिरूप ध्वनितद्वारा कोणेक अर्थ उच्चार्यमाण शब्दानें धरणें; उ० भटास दिल्ही ओसरी भरदह्ळ दह्ळ हातपाय पसरी, या वाक्यानें दुसऱ्याशीं व्यवहार करित असतां आपण अंमळ सईल सोडलें ह्म० तो आपलें सर्व घेऊं पाहतो असा अर्थ लक्षिला जो तो; ४, प्रतीक्षणें; उ० चार घटिका तुझा मार्ग लक्षीत बसल्यें आहे.

लक्षित, ३ लिं० लक्षिलातो.

लक्षुमी, स्त्री० लक्ष्मी शब्दाचा अपभ्रंश.

लक्ष्मी, स्त्री० सं० संपत्तीची आणि शोभेची अभिमानिनी विष्णूची स्त्री ह्मणून एक देवता आहे; २ द्रव्याची जी संपत्ति ती; ३, शरीरादिकांचे ठायीं स्वरूपतादिकृत किं० अलंकारादिकृत, गृहादिकांचे ठायीं संपत्यादिकृत शेत, बाग, इ० कांचे ठायीं फलपुष्पादिकृत जी शोभा असल्ये ती; शेत, गृह, इ० कांचे ठायीं लक्ष्मी अवतरणें ह्म० सस्यसमृद्धि, संतति, संपत्ति, इ० संबंधी जी विलक्षण शोभा ती दिसूं लागणें.

लक्ष्मीपूजन, न० सं० विवाहोत्तर वधुप्रवेश समयीं वधूसहवर्तमान वर लक्ष्मीचें जें पूजन करितात तें; २, अश्विन अमावास्येस धनिक लोक, व्यापारी लोक, इ० मोहरा, रुपये, इ० रूप द्रव्याचर लक्ष्मीचें आवाहन करून जें तीचें पूजन करितात तें.

लक्ष्मीवंत, ३ लिं० लक्ष्मीवान्.

लक्ष्मीवान्, ३ लिं० संपत्तिमान.

लक्ष्य, न० लक्ष प्रथमार्थी पाहून; २, ३ लिं० लक्षणायासयोग्य जो अर्थ तो.

लोंक, पु० एक धान्य आहे; २, स्त्री० कों० लोंख.

लोंकड, स्त्री० कों० लकड.

लोंकडी, ३ लिं० लोंकडानें निर्मिलेला जो पदार्थ तो.

लोंकडूं, न० कों० लोंकूड.

लोंकण, स्त्री० कों० लोंख.

लोंकणें, कों० दोरी, सूत, इ० दुसऱ्या दोरी, इ० कांशीं गांठ, पीळ, इ० द्वारा सांधणें; २, गुरूं, मनुष्य, इ० दुसऱ्या गुरूं, मनुष्य, इ० कांशीं लोंखेनें संबध करणें; ३, मनुष्य, पशु, इ० कांस स्तंभ, इ० कांशीं बांधून किं० पतीजी, इ० रक्षकांचे स्वाधीन करून अडकवून ठेवणें; ४, लोंखरूप गो इतीयार्थी.

लोंकुडभाग, पु० कों० लोंकडाची जी मोळी ती.

लोंकूड, न० काष्ठ; लोंकडास माकड जोडणें ह्म० कसेंही करून वरास वधू मिळे असें करणें.

लोंकूडफोंटें, न० घर, इ० बांधायाचे उपयोगी लोंकडें तृण, इटा, इ० साहित्य किं० संसाराचे उपयोगी जाळाऊ लोंकडें, गोंवरी, तृण, इ० जें साहित्य तें.

लोंकेरी, स्त्री० कों० एक झाड आहे.

लोंख, स्त्री० रंगास उपयोगी बोर, पिंपळ, इ० वृक्षापासून निकासारिखा जो पदार्थ उत्पन्न होत असतो ती; २, पु० लक्षरूप जी संख्या तो, ह्म० लाख आणि स्वाक; लोंखरूप याचा ह्म० कोणेक अर्थाचा अतिशयोक्तीनें स्फूर्ति कर्तव्य असतां त्या अर्थास ह्म०; उ० त्याणें काल एक लोंखरूपयांची गोष्ट सांगितली.

लोंख, स्त्री० कों० गमनादिप्रसंगीं गुरूं, शेळी, इ० कांनीं भलतीकडे सजाऊं नये इत्यादि अर्थ त्यांचे गळ्यांत दोरी बांधुन ती दुसऱ्या गुरूं, इ० कांचे

गळ्यांत बांधावी असें उभयतांचें करितात जें संधान तें; २, ला० एका विषयावर अनेकांचा संबंध स्थापिल्यामुळें तन्निमित्तक त्यांची परस्पर होत्ये जी संबद्धता ती; उ० बंधा अर्धेल्या नसल्यावर दोघांदोघांस एकेक रुपया देऊन दोघांदोघांची लाख घालून द्यावी.

लाखट, ३ लिं० पोटीं लाख भरून केलेला जो सुवर्णादिकाचा अलंकारादिपदार्थ तो.

लाखटणें, मडकें इ० लाखेचा लेपानें युक्त करणें; २, ला० शब्द मोठ्यानें न उमटायाजोगा कांहीं कारणानें गळा बसणें.

लाखटबेगड, ३ लिं० लाखट, डांकील, इ० जो दागिना तो.

लांखण, स्त्री० कों० लांख.

लांखणें, कों० लांकणें.

लाखपाड, पु० हीरकादि रत्नें जी आंगठी, इ० कांचे घरामध्यें जडायाचीं असतात त्या घरामध्यें पूर्वी लाख भरण्याचा जो व्यापार तो, आणि ती लाख विशिष्ट घाट; उ० तूं आधीं लाखपाड कर मग मी लाखपाड वजन करून देईन.

लाखलोटा, ३ लिं० हिं० लाखटलेलें जें मडकें तो.

लाखलोटें, न० हिं० लाखटलेलें जें मातीचें भांडें तें.

लाखा, पु० रा० अळू, पोकळा, इ० कांवर एक कृमिरूप रोग पडत असतो तो.

लाखाचा मनुष्य, लाखाचा माणूस, पु० लक्षाचा मनुष्य.

लाखी, ३ लिं० लाखट; २, लाखेचा जो रंग, इ० पदार्थ तो किं० त्या रंगानें रंगविलेलें जें वस्त्र तो.

लाखों, अ० लक्षावधि.

लाखोटा, पु० मोकळा कागद असतां कोणी फोलता वाचील म्हणून त्याची करितात जी घडी किं० गुंडाळी जावर दुसरा कागद लपेटून चिकटवितात तो; २, ला० अनेक कागद, केश, इ० कांचा परस्परांस चिकटून एकच होतो जो रचनाविशेष तो; गळ्याचा लाखोटा होणें म्ह० शब्द बाहेर न उमटायाजोगा गळा बसणें.

लाखोंलाख, अ० लाखों.

लाखोली, स्त्री० लक्षपूजार्थ उद्दिष्ट जें लक्षसंख्याक पुष्पादिद्रव्य तें; २, ला० कोणेकातें उद्देशून कोणेकाचे मुखांतून निघतात ज्या अनेक शिव्या त्या.

लाखोंशा, अ० लाखों.

लाख्या, ३ लिं० उत्कृष्टत्वेंकरून वर्णनीय जो पदार्थ तो; उ० तो लाख्या बोलणारा आहे त्याणें त्यासमयीं लाख्या जाबसाल केला; हा लाख्या डाव पडला.

लाख्यासावकार, पु० लक्षाधीश जो सावकार तो.

लाग, पु० कोणेक गोष्टीचा तत्तद्रूपेंकरून होण्याकडे झालेला असतो जो रोख तो; उ० तुम्ही बाहेर जातां आहां परंतु पाऊस पडण्याचा लाग दिसतो आहे विचार करा; पावसाचा लाग आहे, इ० स्थलीं पाऊस पडण्याचा लाग आहे असा अर्थ होतो तसेंच पैक्याचा लाग आहे, इ० स्थलीं पैका

पैका मिळायाचा लाग आहे असा योग्य क्रियेचा अध्याहारानें अर्थ जाणावा; २, त्या गोष्टीची त्या प्रकारें होण्याकडे रोख धरून जी स्थिति तो; उ० आंबे पिकायाचा लागास आले ह्मणजे काढावे; ३, त्या गोष्टीनें त्या प्रकारें होण्याचें रोखास यावें ह्मणून जो कोणेकाचा प्रयत्न तो; उ० चाकरी विषयीं बहुत लाग केले पण एकही चालला नाहीं; ४, कोणेक गोष्ट सिद्ध करण्याविषयीं चालवायाचा जो प्रयत्न तो किं० तेथें लागू होण्याविषयीं असल्ये जी सोय तो; उ० हा माड बुळबुळीत झाला आहे याचर चढावयाचा लाग दिसत नाहीं; झाडी जेव्हां तोडली तेव्हां किल्ल्याजवळ जायास लाग झाला; ५, डोंबारी, कोल्हाटी, मांजर वाघ, इ० कांनीं उड्डानादि करत्येसमयीं एथून उडून अमुक प्रकारें अमुक लक्ष्यावर पडावें, इ० रूप मनांत धरिलें असतें जें संधान तो; उ० एवढा जर उडीचा लाग साधला तर बक्षीस मिळेल नाहींतर जीव जाईल; ६, ज्याचे योगानें मरणयावें सर्वस्व नाश व्हावा असा जो दुखणें, राजकोप, इ० रूप संकटापात तो; उ० आजपावेतों दोन तीन लाग निभावले आतां हा शेवटला लाग आहेसें दिसतें, या अर्थी जिवावरचा लाग प्राणावरचा लाग असें ह्म०; ७, वृक्ष, वल्ली, इ० कांस जो फळांचा बार येतो तो; उ० प्रा० इरसाल झाडांस बार कमी असतो; ८, वृक्ष, वल्ली, इ० कांस फळें येऊं लागावीं अशी जी वयोवस्था प्राप्त होत्ये तो; उ० नारळ माड लावल्यापासून दहावे वर्षी लागास येतो; ९, चोळीला दुशी खालीं जो तुकडा लावितात तो; १० समुद्र, खाडी, इ० कांत गलबत खालीं लागून धक्का पावायाजोगें जें उंचवट किं० बिकट स्थळ असतें तो; ११, रा० रुपारी ज्याला अपना लागायाजोगा जो निचें अंगी मरांश असतो तो.

लागट, ३ लिं० दुसऱ्यानें अनेकवार निषेधिलें असतांही त्याची लाज न धरितां स्वेष्टसाधनार्थ पुनःपुनः लोभानें डरण्याचा स्वभाव ज्याचा असा जो मनुष्यादि तो; २, ईषन्मात्र कीड लागली आहे जास असा जो काष्ठ, धान्यादि पदार्थ तो; ३, भक्षिला असतां लागतो असा जो रुपारी, हरीक, इ० पदार्थ तो.

लागणें, कोणेक पदार्थ कोणेक पदार्थाशीं संयोगसंबंधानें संबंध होणें; उ० तूं त्याला लागून का विटाळ होईल; २, पशुपक्ष्यादि जातीय जे पुरुष त्यांणीं स्त्रीशीं मैथुनार्थ संबन्ध होणें; या अर्थी निंदा गालिप्रदानाद्यवसरीं मनुष्यांविषयींही प्र० करितात; ३, रोप, कलम, इ० तीं तीं झाडें व्हावीं ह्मणून भूमींत पुरलीं जाणें, अंबा, पडवळ, इ० कांच्या बिया खळी करून आंत पुरल्या असतां तेथेंही प्रयोग करितात, जी भूमीमध्यें रोप, बी, इ० लावितात त्या भूमीसही पक्षीं कर्तृत्व मानून वाफा लागला, अळें लागलें, मळा लागला, इ० प्रयोग करितात; ४, लावलेल्या रोप, कलम, इ० कानें खालीं मूळ धरून जगायाचे पंथास लागणें; ५, शस्त्र, सोटा, गोळी, दगड, इ० कानीं किं० कुशब्दादिकानीं शरीराशीं किं० मनुष्यादिकांशीं प्रहारादि कृत दुःखादि संस्कार चेतनें

लाग

वर किं० अंतःकरणावर व्हावयाजोगें संबद्ध होणें; टोला, घाव, इ० लागणें म्ह० तो टोला, इ० बसायाजोगें शस्त्रादि लागणें असा अर्थ; ६, द्वार, नेत्र, पेटी, फडताळ, इ० कानीं त्यांचीं त्यांचीं आच्छादकजीं कपाट, पापण्या, इ० त्यांहीं करून आच्छादित होणें, पक्षीं त्या आच्छादकासही कर्तृता येत्ये; ७, कोणेक अवयवीस कोणेक अवयव जडला जाणें; ८, श्लोक, वाक्य, किं० त्यांचा अर्थ कुलूप, इ० कानीं त्यांचे अवांतर जे अवयव त्यांचा यथायोग्य संबंध होऊन बसणें; ९, कोणेकस्थलीं विवक्षित फलोद्देशेंकरून विनियुक्त करायाचा जो कोणेक अर्थ त्याणें तत्फलोपधायकत्वेंकरून तेथें अनुरूपसंबंधविशिष्ट होणें; उ० ही आरशी तुम्हाला लागली म्हणून मला लागेल असें प्रमाण नाहीं; १०, चाल, रीत, खोड, वळण, सद्गुण, दुर्गुण, इ० कानीं मनुष्यादिकाशीं संस्काररूपेंकरून रहावया जोगें संबद्ध होणें; ११, ताप, हगवण, खोकला, दमा, रोग, इ० कानीं शरीरीं उत्पन्न होऊन कांहीं काल राहणें किं० क्षुधा, तृषा, उचकी, ठसका, दम, इ० विकारानीं शरीरांत उत्पन्न होणें; १२, क्रमस्थित जे देशकाल विभागादि पदार्थ त्यांनें क्रमानें अन्वित करीत चाललेला जो दर्शन, गमन, भक्षण, इ० क्रिया तीचा ठायीं अन्वित होण्याविषयीं जो कोणेक अवधिपासून आरंभ तद्विशिष्ट त्या देशकाल विभागादि पदार्थानें होणें; किं० तादृश अन्वित होतजावयाजोगें क्रमानें त्यात्या पदार्थानें सन्निविष्ट असणें किं० कोणेक अवधीपासून कोणेक अवधिपर्यंत त्यात्या देशकालादि

कानें

कानें व्यापून असणें; उ० एथून मावळ र लें आणि देश लागला, तेथूनपुढें भरवस्ती गांव लागतील; एथून चार अध्यायपर्यंत थ कठिन लागला आहे; आजपर्यंत खर्चीं गद झाले आतां उंची कागद लागले; १३, कोणेक पदार्थ गोष्ट गोड, कडू, बरी, वाईट, तिखट, आंबट, इ० रूपेंकरून कोणेकास अनुभवविषय होणें; उ० आंबे खाऊन पहा गोड लागले तर घ्या; याला बरी गोष्ट सांगितली तरी वाईट लागत्ये; १४, कोणेकास कोणेक व्यवहारांत तत्तदनुरोधानें कोणेक अर्थ बरा, वाईट, इ० रूपें प्राप्त होणें; उ० घरकड सनगें बरीं आहेत परंतु एवढें पागोटें मात्र महाग लागलें; चार रुपये खोटे लागले; १५, कोणेकास रोजगार, चाकरी, इ० प्राप्त होणें; पक्षीं त्या पुरुषादिकांसही कर्तृता; उ० तो चाकरीवर लागला; १६, कोणेकाशीं कोणेकानें सेव्य, सेवकभाव, योनसंबंध, इ० संबंधानें संबद्ध असणें; उ० तूं त्याचीं कां रे मस्करी करतोस तुझा तो कां मेहुणा लागला आहे; हाच अर्थ धरून तुझा बाप लागला आहे, उरावरचा धगड लागला आहे, इ० प्रयोग आवेशाच दर्शविणें इत्याद्यवसरीं होतात; कोणेकानें कोणेकाचे चार पैसे लागणें, कर्ज लागणें, इ० स्थलीं आधमर्ण्यसंबंधानें विशिष्ट असणें असा अर्थ होतो; १७, कोणेक क्रमानें चाललेला जो कोणी त्यास त्या क्रमाचे ठायीं स्थित जे वृक्ष, नदी, पर्वत, वचन, श्लोक, इ० अर्थ तो एतद्गमनद्वारा प्राप्त होणें; उ० एथून सुरतेस

जातांना

जातांना वाटेनें चार नद्या मोठ्या लागतात; तुह्मी मुळापासून वाचित जा आणि पुढें ह्मणश्लोक लागेल तेथें ठेवा; १८, वृक्ष, लता, इ० कांनीं फलविशिष्ट होणें, पक्षीं त्या फलांसही कर्तृता; उ० त्या प्रांतींचे माड असे लागतात कीं एकाएका माडावर हजारहजार नारळ लागतात; १९, अंबा, महाळुंग, इ० फल, भाकर, इ० डागणें; उ० अंबा लागला असेल त्या अंगचा कापून टाक मग खा; २०, भाकर, पोळी, भाजी, भात, इ० जाळ अधिक लागल्यामुळें ईषन्मात्र करपून पात्रास चिकटणें; २१ सर्प, विंचू, इ० कानें कोणाकास डसणें; २२, धान्य, काष्ठ, इ० कांस कृमिविशेषरूप रोग होत असतां तो जडणें, ज्याचे योगानें तें धान्यादि छिद्रविशिष्ट होतें; २३, काष्ठ, धान्यादिक त्या कृमिविशेषरूप रोगानें विशिष्ट होणें; २४, ज्याचा सेवनानें वात, पित्त, क्षोभादिरूप विकृति होत असल्ये असे जे मदाचा विषबाधादि विशिष्ट मद्य, तमाखू, भांग, पाणी, माशी, हरीक, सुपारी, समुद्र, गलबत, इ० पदार्थ त्याणीं भक्षणादिद्वारा सेविले असतां उक्तविकृतिप्रद होणें, तसेंच केलेला उपवास, द्रव्य, गुरुद्रोह, इ० कांनीं बाधक होणें; उ० ज्याला समुद्र लागतो त्याणें कधींही गलबतांत बसूं नये; ज्याला उपवास लागतो त्याणें करूं नये; २५, गाय, म्हैस, इ० पशूनें पायलाग, तोंडलाग, इ० विकृतीनें विशिष्ट होणें; पक्षीं त्यांचे पायांस, मुखासही कर्तृता; २६, भक्षिलेल्या अन्नादिपदार्थ अंगीं पुष्टिप्रद होणें; २७, कोणेक कार्याकडे कोणेक सामग्री भूत जो अर्थ तो स्वस्थलां जा-

णें

णें; उ० या वाड्याला पंचवीस हजार रुपये लागले; एथून काशीस पोहोंचावयास दोन महिने लागतील; २८, कोणेक अर्थ कोणेकास अपेक्षित होणें; उ० रुपये एव्हां कांहीं मला नकोत लागतील तेव्हां घेईन; हा सर्वदा मला लागत नाहीं; २९, वीणा, कंठ, मृदंग, इ० कांचा स्वर विवक्षितानुरूप उंच नीच होणें; पक्षीं त्या वीणादिकांसही कर्तृता; ३० वीणा, सारंगी, इ० कांनीं ज्या तारेपासून जे षड्जादि स्वर निघावे ते तसे निघत असें होणें; ३१, वीणा, कंठ, मृदंग, इ० कांनीं स्वरद्वारा परस्पर जी जुळणी तद्विशिष्ट होणें; ३२, मशाल, दिवा, नळा, चंद्रज्योत, इ० कांनीं प्रज्वलित होणें; पक्षीं समई, इ० दीपाधाधार पात्रांसही कर्तृता मानितात; लग्न, मुंज, कि० पाट, यांणीं लागणें ह्म० सुमुहूर्तावर करावयाचें जें परस्पर निरीक्षणादि प्रधान कर्म तदनुष्ठानद्वारा झालें असें होणें; ३३, कोणेकास गरज, काम, इ० लागणें ह्म० उपस्थित होणें; ३४, व्यसन, छंद, वेड, खोड, इ० धर्म कोणेकास जडणें; ३५, कोणेकानें कांहीं शब्द उच्चारिल्ये समयीं स्खलद्दीपणा, इ० दोषामुळें मध्येंमध्यें अडणें; इथें पक्षीं शब्द, जिव्हा, इ० कांसही कर्तृता येत्ये; ३६, आयास, आवयास, आवयाला, आयला, एतत्प्रत्ययांत जी धातुरूपें त्यांपुढें लागणें याचा योग झाला असतां विशिष्टाचा अर्थ कर्त्यानें त्याच्या क्रियेचेठायीं प्रवृत्त होणें कि० त्याच्या क्रियेचा आरंभानें विशिष्ट होणें; उ० तो मारूं लागला ह्मणून मी पळालों; चुकतांच मुलगा बसायाला लागला; ३७, वाद, युद्ध, कलह, लढाई, कुस्ती,

कारखाना

कारखाना, इ० जें किती एक व्यवहार त्यास कर्तृत्व असतां होऊं, इ० इनंतादि धातु रूपांचा अप्रयोग असतांही अध्याहार मानून केवलाचा हा प्रयोग होतो; उ० आतांशें त्यांचें युद्ध लागलें ह्म० होऊं लागलें असा अर्थ; कोणेकाचें कोणेकाशीं लागणें, इ० स्थलीं स्पर्धापत्नीव्यजें वादयुद्ध, इ० तें प्रवृत्त होणें; ३९, रहाट, चरक, घडयाळ, इ० कांनीं स्वस्व क्रियेचा ठायीं प्रवृत्त होणें किं० असणें किं० न अडतां स्फुरळीतपणें चालायाजोगें होणें; ३९, सुरी, इ० शस्त्र पाजविलें जाणें; उ० दोन चाकू लागले आहेत हे घेऊन जा बाकीचे लावायाचे आहेत ते मग देईन; ४०, शस्त्रानें छेदनसामर्थ्य विशिष्ट असणें; उ० जंग चढला आहे ह्मणून चाकू चांगला लागत नाहीं; ४१, कोणेक अर्थानें कोणेकाशीं अवश्य भोक्तव्यत्वादिरूपानें संबंध असणें; उ० उपजल्याप्राण्यास मरण हें लागलेंच आहे; संसाराचें कृत्य हें रोज लागलेंच आहे, पण एक दिवस देवदर्शनास तर चल; ४२, स्थल, वृक्ष, इ० पदार्थ सरकारकोठी, पागा, पहाणीखरडा, इ० अधिकरणीं लेखादिद्वारा संबंध होणें; ४३, कोणेक व्यापारीं कोणेक अर्थानें कर्त्रादिकारकरूपेंकरून संबंध होणें; उ० तो सकाळपासून खणतो आहे तो दमला असला तर चार घटका तूं लाग; पाऊस लागणें ह्म० पडणें; थंडी लागणें ह्म० दुःखरूपेंकरून त्वगिंद्रियद्वारा अनुभवास येणें ; घोडे, बैल, इ० किं० त्यांची पाठ, इ० लागणें ह्म० खोगीर, मूठ, इ० कांचे संघर्षणानें क्षतविशिष्ट होणें; कोणेकास व्यवहारीं कूळ असामी, इ० लागणें ह्म० अडीनकुळरूपानें प्राप्त होणें; उ० त्याची सावकारी बरी चालली होती पण आलीकडे चार कुळें लागलीं ह्मणून अगदीं बसली; कोणेकाकडे कोणेक गोष्ट लागणें ह्म० त्या गोष्टीचें बरें वाईट करण्याचा धणी तो होई अशा प्रकारें ती गोष्ट त्याची होणें; हुंडी, चिठी, रोखा, इ० कोणेक मनुष्यास किं० दुकान, इ० अधिकरणीं लागणें ह्म० येऊन संबद्ध होणें; ४४, सोंगटी, इ० कांचे खेळामध्यें फांसे, इ० कानीं पडलेला जो डाव तो; सोंकटी, इ० कांचे पटाचीं मधील स्थानें आक्रमून तितकाव्ये स्थानीं जें गमन तद्विषयीं योजिला जाणें; मेलेली सोंगटी, इ० लागणें ह्म० जिवंत होऊन पुनः पटावर बसणें; कोणेकाचा डाव किं० पानें, काडी, मात, कर्ज, रुपये, इ० कोणेकावर लागणें ह्म० अवश्य फेडलें पाहिजे अशा रूपानें प्राप्त होणें; गाय, ह्मैस, इ० कानीं लागणें ह्म० स्फुरळीतपणें दूध देऊं लागणें; कोणेक धात्वर्थ अवश्य कर्तव्यत्वादिरूपेंकरून प्राप्त होणें या अर्थीं आवा, आया, आवया, आणि, णे, एतत्प्रत्ययांत जी तत्त धातूंचीं रूपें त्यापुढें प्रयोग होतो; उ० याचें हातून न झालें तर तुह्मास जावें लागेल; त्याणें बोलाविलें तर जाणें लागेल; याची ओळख तुह्मी सांगतां परंतु हा गेला तर रुपये तुह्मास द्यावयास लागतील; शौचास लागणें, मुतायास लागणें ह्म० मळमूत्राचा उत्सर्गाचे पूर्वीं जो कलना विशेषरूप विकार होतो तो होणें; कोणेक अर्थाशीं कोणेक अर्थानें यथायोग्यरूपें यथायोग्यप्रकारें संबंध

संबध होणें असा या धातूचा सामान्य अर्थ हो-तो; उ० त्याला ब्रह्मराक्षस लागला ह्मणून वेड लागलें; आधीं सर्कारांत जर परवानगी लागेल तर मग पुढें दाद लागेल; हें काय शहर लागलें आहे, हें काय सोंपें लागलें आहे, मी काश्रीमंत लागलों आहें, सर्वांस शालजोड्या या ह्मणतां तो, मीकाय कोट्यधीश लागलों आहें, इ० स्थलीं तो तो अर्थ नत्रद्रूपें करून स्थित आहे असा अर्थ हो-तो, प्रायः निषेध गम्यमान असतां काकुद्वारा प्र०

लागरा, ३ लिं० भक्षणादिद्वारा सेविला असतां लागतो असा जो मांजरा, हरीक, सुपारी, औ-षध, इ० पदार्थ तो; २, लागलेलें जें धान्य, काष्ठ, इ० पदार्थ तो.

लागलागवड, स्त्री० लागवड प्रथमार्थी.

लागलाच, अ० कोणेक क्रियेचा जो क्षण तदुत्तर अव्यवहितक्षणीं; उ० जेवला आणि लागलाच गेला; मागतांच लागलेंच दिल्हें ह्मणजे बरें वा-टतें.

लागलाच्या, ३ लिं० लाग्या.

लागवड, स्त्री० शेतजमीन, नांगरून, पेरून, पेरावें इतका जो व्यापार तो; कोणेक शेतजमी-न लागवडीस येणें ह्म० बांध, बांधोळी, इ० रूप संस्कार केल्यानें लागवड करायाचे योग्यतेस ये-णें किं० चांगलें पीक यावयाचे योग्यतेस येणें; पानमळा, बाग, पोफळ, माड, इ० कांनीं ला-गवडीस येणें ह्म० पानें, फळें, इ० रूप जें त्यां-पासून फल उत्पन्न होतें तें द्यावयाचे योग्यतेस येणें; २, सिध्द जो कांहीं गृहादि पदार्थ त्यास दागदोजी संबंधें खर्च लागतो तो, उ० हें घर तुह्मी नीट करा मग लागवड काय लागेल ती आह्मी देऊं; ३, कों० पडीत नव्हे अशी जी शे-तजमीन किं० आगरी जमीन, ती; उ० दहा बिघे लागवड होती तिचा धारा दिल्हा आतां हें पडीत आहे.

लागवण, न० कों० दुसरा वृक्ष व्हावा ह्मणून कोणे-क वृक्षाची लावितात जी फांदी तें; २, स्त्री० दे० लावणी अंत्यार्थावांचून.

लागाबांधा, पु० कोणेकाचें कोणेकापासून कांहीं कारण दिसत नसतां जें बरें किं० वाईट होत असतें त्याविषयीं कारणत्वेंकरून मानितात जो त्या-चा त्याचा जन्मांतरीय नसा ऋणानुबंध तो; उ० त्याचें हातून याचें एकही काम होत नसतां उगीच हा त्याला हजारों रुपये देतो तस्मात् याचा त्या-चा कांहीं लागाबांधा आहे.

लागीं, अ० प्रा० ग्रं० जवळ या अव्ययार्थी साठीं, स, ला, या विभक्तीचा अर्थी ही याचा प्रयोग करि-तात; उ० कितीशिकवूं तुजलागि मनारे प्रीति धरीं हरिपाईं.

लागी, ३ लिं० कर्तृकार्यभाव, ग्राह्य, ग्राहकभाव, आधेयाधिकरणभाव, इ० संबंधानें जो जाशीं संबध्द व्हायास योग्य तो त्याचें; उ० हा घोडजो-डा तुमचें लागी आहे तुह्मी घ्या.

लागुनी, अ० ग्रं० लागीं.

लागू, ३ लिं० कोणेकस्थलीं किं० व्यापारीं अथ-वा कोणेकापाशीं जा बेतानें संबध्द होण्याची विवक्षा असत्ये त्या बेताप्रमाणें तेथें संबध्द झाला

जो कोणेक अर्थ ते; पड, दो, इ० धातुयोगीं प्र०

**लागून**, अ० सं० लागुनी.

**लागूभागू**, ३ लिं० कों० योनसंबंधानें किं० देणें घेणें, इ० व्यापारसंबंधानें जो ज्याचा संबंधी तो त्याचा.

**लागोपाठ**, अ० एकापाठीमागून दुसरी, दुसरी मागून तिसरी, अशाक्रमानें अव्यवहितपणें कोणेक सजातीयक्रियेचें जें भवन त्याचें वि०; उ० या बाईला लागोपाठ चार मुली झाल्या; त्याजकडे लागोपाठ चार खेपा घातल्या.

**लाग्या**, ३ लिं० कोणेक कार्याचे साधनाविषयीं लागलावण्याचें कौशल्य ज्याचे अंगीं आहे तो.

**लाघव**, न० लघुपणा; २, कौशल; हस्तलाघव, शब्दलाघव, इ० स०; ३, स्वकार्यसाधनार्थ गोड गोड बोलावें, आर्जव करावें, इ० रूप जी कोणेकाचे अंगीं युक्ति असते तें.

**लाघवी**, ३ लिं० लाघव तृतीयार्थ आहे ज्याचे अंगीं तो.

**लाँच**, पु० स्त्री० कोणेकापासून स्वकार्य ज्याद्वारें करून घ्यावयाचें असतें असा जो पंचाईतदार, मध्यस्थ, इ० कोणी त्यास गुप्तरूपें आशयार्थ जें द्रव्य देतात तें तो; द्व० लांचलुचपत दक्षिणा आणि घेई जे तत्क्षणा.

**लाँचखाऊ**, **लाँचखोर**, ३ लिं० लांच खाण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**लाँचलुचपत**, **लाँचलुच**, स्त्री० लांच इ०

**लाचार**, ३ लिं० कोणेक गोष्टीविषयीं निरुपाय झाला जो तो.



**लाचारी**, स्त्री० लाचारपणा.

**लाँचावणें**, कोणेक गोष्टीपासून एकवार लाभ झाल्यामुळें तीच गोष्ट पुनःपुनः करण्याविषयीं कोणेकानें सवकणें; २, कोणेकास लांच देऊन ओशाळा करणें.

**लांछन**, न० चंद्रास जो कलंक आहे तें किं० दुराचरणादिमूलक कोणेकास लागतो जो कलंक तें; २, कोणेक पदार्थावर कोणेक आकाराचें उठलें असतें जें चिन्ह तें; उ० जो पुरुष चक्रवर्ती होणार त्याचे हातावर कमलाचें लांछन असतें.

**लांछित**, ३ लिं० सं० कोणेक लांछनानें जो विशिष्ट तो.

**लाज**, स्त्री० लोकामध्यें जी प्रतिष्ठेनें वागत असतो त्या प्रतिष्ठेची हानि झाली किं० होईल असें मनांत आल्यामुळें किं० लोकाशीं भाषणादि व्यवहार करण्याचे प्रसंगीं अपनीतपणा, अज्ञान, इ० आपलें वैगुण्य उघडें पडून लोक आपल्यास हांसतील असें मनांत आल्यामुळें भयसदृश जो अंतःकरणांत धर्मविशेष उत्पन्न होतो ज्याचे योगानें अंतःकरणाचा संकोच होऊन प्रवृत्तीचा रोख फिरतो ती; २, आपण आपले वडील, इ० कोणीं जें कांहीं चांगलें केलें असतें आणि लोकोपहासकारक दुष्कर्मों केलें नसतें त्याचे योगानें त्याल्या मनुष्यादिकाचे अंगीं जी योग्यता विशेष असतो जी तनुकूल आचरणानें लोकोपहासापासून रक्षा लागतो ती; उ० या अशा कालांत मनुष्

ची लाज ईश्वर राखील तरच राहील; माझी लाज तुला, इ० स्थलीं माझे लाजेचा अभिमान तुला अ सा अर्थ.

लाजकोंमेंडा, पु० स्त्री०डी, न०डें, को० दुसऱ्याशीं संभाषणादिव्यापार कराायाची इच्छा मनांत असतांही बाह्यात्कारीं लाज दाखविण्याचा स्वभाव ज्याचा त्यास म्ह०

लाजट, ३लिं० ईषत् लाजरा जो तो.

लाजणें, लाज प्रथमार्थानें विशिष्ट होणें; २, लाजाळू म्हणून एक वनस्पति आहे ती मनुष्याचा किं० त्याचे छायेचा स्पर्श झाला असतां संकुचित होत असत्ये त्या संकुचित होण्यावरही प्रयोग करितात.

लाजमर्यादा, स्त्री० लाज विनय, इ० ती.

लाजरा, ३लिं० बहुत लाजण्याचा स्वभाव ज्याचा तो.

लाजवट, ३लिं० लाजट.

लाजवणें, विवक्षित गुणानें स्वसमान जो कोणी त्यास आपल्या उत्कर्षाचा प्रकरनानें लाजायाचे योग्यतेस आणणें; उ० तो असा दाता निघाला कीं जाणें कर्ण लाजविला; २, कोणकाचें वैगुण्य बाहेर काढून तो लाजे असा त्यास करणें; उ० काल तुह्मास बलावायास विसरलों खरा आतां तें काढून मला लाजवूं नका.

लाजाळू, न० एक वनस्पति आहे जी मनुष्याचे स्पर्शादिकानें लाजत असत्ये तें.

लाजाळू, ३लिं० लाजरा; २, स्त्री० रा० लाजाळू.

लाजिरवाणा, ३लिं० दुष्कर्माची प्रसिद्धि होणें. इ० कारणामुळें लाजून मुखश्री उतरायाजोगा खिन्न झाला जो तो; उ० त्याचा मर्माची गोष्ट निघतांच तो लाजिरवाणा दिसूं लागला; २, जी गोष्ट कर्तांना कर्त्यास लाजिरवाणेंपणा याचा अशी जी कांहीं अनुचित गोष्ट ती; उ० ज्याचे सप्तपिढ्यांत कोणी याचना केली नाहीं त्याला याचना करणें ही गोष्ट लाजिरवाणी आहे; त्याचे घरीं जावयास मला लाजिरवाणें वाटतें, इ० स्थलीं ही गोष्ट लाजिरवाणी वाटत्ये हा अर्थ मनांत धरून गोष्ट, इ० शब्दाचा उच्चार न करितांही असा प्रयोग करितात.

लाजिरवाणी, अ० लाजिरवाणेंपणानें बोलणें, जाणें, येणें, इ० कार्चे वि०; उ० करतों ह्मटलें तें काम आमचे हातून झालें नाहीं आतां लाजिरवाणी त्याजकडे काय जावें.

लाजिरवाणें, अ० लाजिरवाणी.

लाजीम, ३लिं० لازم लायक प्रथमार्थी.

लांझा, पु० बाधा; २, दुसऱ्याची अपराधिता आपल्याकडेस याबयाजोगें चोरी, चहाडी, मारामारी, इ० कांहीं कर्म त्याचा आपल्याकडे असतो जो संबंध जेणेंकरून त्या कर्माचा निर्वाह झाल्याशिवाय आपण मोकळा होत नाहीं तो; उ० तुह्माया कर्मांत नव्हतां असा साक्ष पुरवा ह्मणजे तुह्माकडे कांहीं लांझा राहिला नाहीं.

लाट, स्त्री० नदी, समुद्र, इ० कांस येत्ये जी लहर ती; २, बगाड, मोट, इ० कुदायाचा ढंग, इ० कास जें आडवें मोठें लांकूड संबंध केलें असतें ता, ३, तेल्याचा घाणा किं० तन्सदृश जो उसाचा

ग्स काढायाचा घाणा असतो त्यांतजें उभें लांकूड फिरत असतें तें; ४, देवळांत देवापुढें सोंवळ्याओंवळ्याची मर्यादा रहावी, दाटी होऊं नये, इ० कारणार्थ जें आडवें लांकूड लाविलें असतें तें; ५, मार्गादि भूमि सम करायासाठीं वरून फिरवायास वरवंटयाचे आकाराप्रमाणें मोठा दगड केला असतो तो.

**लाटण**, न० पोळी, पापड, इ० लाटत्येसमयीं त्यास खालीं वर लावायाकरितां करितातजें पीठ तें.

**लाटणी**, स्त्री० कों० पोळी, इ० लाटण्याचें उपयोगीं जें गोलकाष्ट करितात तें.

**लाटणें**, पिठाचा किं० कणकेचा गोळा, इ० पोळपाट, इ० कांवर ठेवून पोळी, पापड, इ० विवक्षिताकार होई असा वाटवणें; पक्षीं भाविसंज्ञा श्रयणानें करून त्या पोळी, पापड, इ० कांसही कर्मता येत्ये; २, रहाटगाडगें पाणीवर यावयासाठीं फिरविणें; पक्षीं पाण्यासही कर्मता; ३, जेन, बुरणूस, इ० लाटणें म्ह० लोंकरीस खळ देऊन त्याची गुंडळी करून तो बुरणूस, इ० व्हावयासाठीं भूमीवर ठेवून हातानें मागेंपुढें फिरविणें; ४, दपटणें लाक्षणिकार्थी; ५, न० लाटणी.

**लाटा**, पु० पापड, इ० कांचे पिठाच्या लांबट गोळा जो करितात तो; २, रा० भातणाच्या डोईनें वळावयाजोगा जो भाग बांधितात तो

**लाटालाट**, स्त्री० दपटादपट.

**लाटी**, स्त्री० पापड, करंजा, इ० करायाकरितां चापट जा गोळ्या करितात त्या प्र०

**लाटीव**, ३ लिं० लाटून केलेलाजो पोळी, बुरणूस, इ० पदार्थ तो.

**लाटया**, पु० कों० भिजलेली डाळ, इ० उखळांत घालून घाटायाचे उपयोगीं वरवंटयासारखाजो दगड केला असतो तो; २ ला० तदाकार पापंडाचें पीठ, कणीक माती, इ० कांचें लांबट करितात जे गोळे ते प्र०; ३, ३ लिं० लाटालाट करण्याचा स्वभाव ज्याचा तो

**लाटयागंगाजी**, पु० लाटालाट करण्याचा स्वभाव ज्याचा त्यास म्ह०

**लांठाई**, स्त्री० कों० दांडगाई.

**लाड**, पु० लालन; पुत्र, स्त्री, इ० कांचा लाड चाळविणें म्ह० लाडुकपणामुळें त्यांणी धरलेलीजी हौस तीपुरविणें; २, स्त्री० राड प्रथमार्थी.

**लाडकरणें**, रा० पुत्रादिकांस लालिन करणें.

**लाडका**, ३ लिं० जो पित्रादिक ज्या पुत्रादिकांचें प्रेमानें लाड चाळवितो तो पुत्रादिक त्या पित्रादिकांचा; २, जाजवळ आपला लाडकेपणा चालतो त्यापाशीं जीभ आडवी घालून तोंड वांकडें करून पोर, इ० जें भाषण करितें तो; ३, ला० कोणेक व्यवहारीं हिशेब सोडून स्वार्थसिध्यर्थ पडून कोणी करितोजें भाषण, गोष्ट, इ० तो; उ० आतां यापेक्षा मिळाला म्हण जे देऊं अशा लाडक्या गोष्टी करायला सांगतो.

**लाडकावणें**, पुत्रादिक लाड केल्यामुळें बिगडून टाकणें.

**लांडगा**, पु० कुत्र्यासारिखा एक वन्यपशु आहे जो हरिणादिकांस मारित असतो; २, वस्त्र केंस, इ० कांस लागलें असतां चिकटतें असें एक

एक तृणविशेषाचें बीं आहे आणि आघाडा ह्मणून एक औषधी आहे तीचें बीं आणि कडु ह्मणून एक औषधी आहे तीचें फळ त्यास प्र० ह्म०

लांडन, न० गूळ करायाचे कढईस जें उडदाचें पीठ इ०कांचें लुकण लावितात तें.

लांडा, ३लिं० ज्याचें पुच्छ किं० पुच्छाग्र छेदनादिकेंकरून नाहीसें झालें आहे असा जो पशु, पक्षी, सर्प, मत्स्य, इ० तो किं० निरग्र जें पुच्छ तो; २, थोटा जो हात, लेखणी, चाकू, इ० तो; ३, अवयवावयविभावसंबंधानें किं० संयोगसंबंधानें ज्याशीं जो पदार्थ संबद्ध असतो तो तेथें ओखूडपणामुळें अपुरा दिसूं लागला असतां त्यास ह्म०; उ० हा धोतरजोडा तुह्मास लांडा होतो अथवा चार बोटें रुंद असता तर ठीक दिसता.

लांडाकारभार, पु० कोणी कारभार सांगितला नसतां मधचेमध्यें कोणीएक जो कारभार फार करतो त्या कारभाराची निंदा कर्तव्य असतां त्यास ह्म०

लांडाकारभारी, पु० लांडाकारभार करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

लाडावणें, कों० लाडकावणें.

लाडीगोडी, स्त्री० कोणेकापासून स्वकार्य करून घेण्याकरितां त्याशीं गोड बोलावें, कांहीं लोभ प्रदर्शन करावें, इ०रूप जो त्यास अनुकूल करण्याविषयीं व्यापार करितात ती.

लांडीलबाडी, स्त्री० चहाडी, चुगली, इ० जी लहान मोठी लबाडी ती.

लाडुकपण, न० लाडकेपणा.

लाडुकपणा, पु० लाडकेपणा.

लाडू, पु० बुंदी किं० गहूं, तांदूळ, इ०कांचें पीठ, तीळ, इ० पदार्थांत तूप, साकर, इ० घालून त्याचें करितात जे वाटोळे गोळे ते प्र०; २, एऱ्हवीं तदाकार करितात जे धान्यादिकाचे गोळे ते प्र०

लांडोर, न० स्त्री० मयूर जातीय जी स्त्री तें ती; ह्म० मोर नाचतो ह्मणून लांडोरही नाचते पण शोभत नाहीं.

लाण, स्त्री० कों० भात, इ० शेत कापण्याचा जो व्यापार ती.

लाणी, स्त्री० कों० लाण; २, रा० तृणादि कापायाचे उपयोगीं कोयती सारिखें एक आउत आहे.

लात, स्त्री० लत्ता प्रथमार्थी; संसार किं० कांहीं एक लाभ, इ०कांवर लात मारणें ह्म० अनादरबुद्धीनें त्यागणें.

लातड, ३लिं० कों० लाता मारण्याचा स्वभाव ज्याचा असा जो गोमहिष्यादि पशु तो.

लातडणें, लथडणें.

लातडा, ३लिं० कों० लातड.

लातबुकी, स्त्री० लाथबुकी.

लाताड, ३लिं० लातड.

लाताळणें, लाथाळणें.

लाताळें, न० अनेक घोडीं, गाढवें, इ० परस्पर एकमेकांस आवेशानें लाता मारूं लागले असतां होतो जो एकच गोंधळ तें; २, ल्ला० वाद, पंचाईत, इ० प्रसंगीं त्यात्या व्यवहाराचे एकानें बोलावें, एकानें उत्तर द्यावें, इतरांनीं तटस्थपणें एकावें, इ० रूप जे

संप्रदायिक मार्ग आहेत ते सोडून अनेकांनीं अनेकविषय एकदांच बोलावे त्याजवर अनेकांनीं उत्तर द्यावयास प्रवृत्त व्हावें नंतर परस्पर दुर्भाषणें ही करावीं शेवटीं मारामारीवर यावें अशी अव्यवस्था - झाली असतां होतोजो गोंधळ तें.

लाती, स्त्री० रा० तांदळांचे पिठांत शिजविलेल्या तुरी किं० वाटाणे घालून त्याची वडी बांधून शिजवून जो भक्ष्यपदार्थ करितात ती.

लाथ, स्त्री० लात.

लाथडणें, लातडणें.

लाथबुकी, स्त्री० कोणेकास लाथा, बुक्या, इ० कांनीं जो प्रहार ती.

लाथरा, ३लिं० लातडा.

लाथाळणें, लथडणें अत्यार्थी.

लाथाळें, न० लाताळें.

लाथेरा, ३लिं० रा० लाथरा.

लादणी, स्त्री० घोडें, उंट, गाडा, इ० कांवर कंठाळ, सलिता, कांहीं ओझें, लादण्याचाजो व्यापार ती.

लादणें, घोडें, बैल, गाडा, गलबत, ओझेली मनुष्य, इ० कांवर कंठाळ, गोणी, किं० आणखी कांहीं ओझें चढविणें; २, यानावांचून इतरजें घडोंची, इ० अधिकरण त्याजवर त्याला संभाळेल, किंवा न संभाळेल, किंवा याचा विचार न करितां मनस्वी ओझें होईअसें कांहीं पदार्थ रचणें; ३, कोणेक मनुष्यावर त्याची शक्ति न पाहतां किं० न्याय अन्याय न पाहतां भारभूत जें कर्तव्य काम किं० देयद्रव्य, इ० तें आरोपित करणें; ४, भिंत, जोतें, इ० बांधतेसमयीं दगड, विटा, इ० कांचे थरावर चिखल, चुना, इ० जाड थर बसे असा लावणें.

लादनी, स्त्री० लदाव.

लादा, पु० कालवलेलें पीठ, चिखल, इ० कांचा हातानें घेऊन भिंत, इ० कांवर मारावाजोगाजो गोळा तो; २, पीठ, भात, गूळ, इ० कांचा पातळ चिकट, असा झालाजो परिणाम त्यास ल०

लादी, स्त्री० फरसबंदी, लादनी, इ० कांचे उपयोगी सरासरी घडलेलाजो दगड ती; उ० चार हात नळाला दहा लाद्या असल्या म्हणजे आच्छादला जाईल

लाधणें, ग्रं० द्रव्यादिक लब्ध होणें; २, कोणेक मिळालेली वस्तु आपल्यास उपभोग देत आपल्या जवळ टिकणें; या अर्थी व्यवहारींही प्रयोग होतो परंतु प्रा० निषेधविषयीं; उ० मी आपल्यासाठीं चांगली वस्तु घेतों पण दुसरा कोणी भीड घालून घेऊन जातो मला कांहीं लाधत नाहीं.

लॉपट, ३लिं० झिजल्यामुळें घट्ट बसेना असा झालाजो कुलपाचा कांटा, पेटी, इ० कांचें झांकण, विण्याची खुंटी, मळसूत्र, इ० तो; २, जाचे सांधे शिथिल झाले असाजो गाडा, पेटी, कुलूप, इ० तो; ३, रा० अनेकवार निषेधकेला, मारलें, फजीती केली, तथापि पुनः पुनः निर्लज्जपणानें स्वकार्यसाधनार्थ त्याच व्यापारीं प्रवृत्त होण्याचा स्वभाव ज्याचा तो.

लापणिका, स्त्री० लोकचलोक करावयाचयाजोगीजी प्रपंचादिसंबंधी गोष्ट ती.

लापन, न० सं० श्लोक, वाक्य, कूट, हिशेब, इ० लावण्याचाजो व्यापार तें; ग्रंथलापन, श्लोकलापन, इ० स०

लापनिका, स्त्री० सं० श्लोकादि लावण्याची जी रीति ती; उ० अर्थनर एकच पण त्या टीकाकाराची लापनिका निराळी, याची लापनिका निराळी.

लापशी, स्त्री० लाबशी.

लाफण्णिका, स्त्री० कों० लापण्णिका.

लांब, ३लिं० विवक्षिताहून दीर्घ जो कोणेक अर्थ तो; कोणेकानें लांबलांब गोष्टी सांगणें स्म० पूर्वीची विपदवस्था विसरून उद्दामपणाचा किं० उमेदवारीचा गोष्टी सांगणें; २, कों० लंबा; ३, अ० दूर.

लांबचलांब, ३लिं० अतिशयित लांब तो; २, अ० दूरचदूर.

लांबचेलांब, अ० दूरचेदूर.

लांबट, ३लिं० विवक्षिताहून ईषत् जो लांब तो; उ० या धोत्रापेक्षां हें धोत्र लांबट आहे; २, लांबोडा.

लांबटांग्या, ३लिं० लंबाडुया.

लांबण, स्त्री० पुढील ग्रामादि अवधि पाहिला असतां जवळ दिसतो परंतु चालल्ये समयीं सरता सरत नाहीं असा जो प्रदेश त्यास म्ह०; २, विवक्षितस्थलाहून कोणेक स्थलीं जातांना जे दोन मार्ग त्यामध्यें एका मार्गापेक्षां एका मार्गास असतो जो फेरा तो; उ० पायवाटेपेक्षां गाडीवाटेकडून लांबण आहे खरी परंतु वाट चांगली; ३, कोणेक काम सावकाशीनें करण्याचा किं० करीत असण्याचा जो प्रकार तो; उ० पुढें पावसाचे दिवस आले आहेत या चार महिन्यांत लग्न करून घ्या उगीच लांबण लावूं नका; लौकरलौकर जेव लांबण काय लावली आहेस; ४, भाषणादि कोणेक व्यवहार तद्रूप आवश्यकांश मात्र संगृहीत करून थोडक्यांत आटोपावा तें न करितां तो व्यवहार विस्तृत करण्याचा प्रकार तो; उ० कायतें हेंशील सांगा उगीच लांबण लावूं नका उशीर होतो.

लांबणदिवा, पु० लामणदिवा.

लांबणें, कोणेक अवधिपासून कोणेक पदार्थ दूर देशस्थित होणें; २, कोणेक पदार्थ पूर्वीपेक्षां दीर्घ होणें; ३, कोणेक गोष्ट पूर्वीचे प्रमाणापेक्षां वाढणें; उ० प्रथमतः दहा हजारांत घर बांधावें असा बेत धरून आरंभ केला मग जें लांबलें तें पंचवीस हजारांवर गेलें; ४, लौकर व्हावयाचें जें कोणेक काम त्याणें मध्यें कालकृत व्यवधान घडे अशा दशेनें पावणें; उ० आमचें काम एक दोन दिवसांत झालें असतें पण रूभेदार पुण्यास गेले आतां चार महिने लांबलें; ५, साक, दूध, हिंग, कणीक, इ० पदार्थ त्यांत सामावावयाजोगी जी पाणी, पीठ, इ० पदार्थांशीं मिसळतां घातल्यानें योग्यतेस कमी होऊन प्रमाणानें वाढणें; कोणेक गोष्ट लांबणें म्ह० लांबचे जे लोक त्यांस समजायाजोगी प्रसिद्ध होणें; ६, न० कों० विहिरींतील पाणी बाहेर काढायास साधन म्हणजे दोरी लावून एक पात्र करून ठेविलें असतें तें; प्रायः शूद्र भाषा दृष्टि.

लांबता, अ० धरणें धातुजोगी प्र० अ० कोणेक गोष्ट लौकर न करितां दळदळ करून आरंभास च उशीर लावून लांबे अशी करणें; उ० दोन गृहस्थ येणार आहेत जराशी कथा लांबतीच धरा.

लांबरुंद, ३लिं० प्रशस्त दिसायाजोगी लांबी, रुंदी ज्यामध्यें आहे असा जो वस्त्र, स्थल, इ० तो.

**लॅांबलचक**, ३ लिं॰ लांबी, रुंदी, उंची, इ॰ प्रमाणें असावीं तितकीं ज्यामध्यें आहेत असा जो वस्त्र, स्थल, मनुष्य, पशु, भाषण, इ॰ तो.

**लॅांबवालॅांबव**, स्त्री॰ चोर भयादिकारणास्तव कोणेक वस्तु पूर्वाधिष्ठितस्थलापासून दूर जाई असें करण्याचा जो व्यापार ती.

**लावशी**, स्त्री॰ दूध, ताक, नारळाचा रस, इ॰कांस शिंगाडे, रताळीं, तांदूळ, इ॰कांचें पीठ लावून कढवून जो पेयपदार्थ करितात ती.

**लॅांवा**, पु॰ कों॰ शेतांतील भात कापतेसमयीं गळलेले किं॰ एकूणच पडलेले जे भात गोटे त्यांचें पर्जन्यादिसंबंधानें उगवतें जें रोप तो.

**लॅांबी**, स्त्री॰ दीर्घता; २, दूरता; रा॰ कोणेक गोष्ट लांबीवर पडणें, इ॰ स्थलीं लांबणीवर पडणें असा अर्थ; ३, चौकट, इ॰कांत बसविलेलें भिंग, इ॰ तें तेथून निघून पडूं नये ह्मणून त्याचे संधिप्रदेशीं बसवायाचें उपयोगीं एक मृत्तिकाविशेष आहे.

**लॅांबून**, अ॰ दुरून.

**लॅांबोडा, लॅांबोळा**, ३ लिं॰ वाटोळा, चतुष्कोण, इ॰ जे आकार त्यामध्यें लांबी ह्मणून जें प्रमाण तत्प्रधान जो आकार तो आणि तादृश आकारविशिष्ट जो पदार्थ तो; उ॰ तोफेचे गोळ्यासारखा वाटोळा करूं नको चरवंट्यासारखा लांबोडा गोळा कर.

**लाभ**, पु॰ द्रव्यादिपदार्थांची जी प्राप्ति तो; २, धान्यादिकांचें माप घालतेवेळेस मोजताना बरकत यावी ह्मणून एक या स्थानीं प्रथमतः याचा प्रयोग करितात; ह्म॰ लाभाविणें मैत्री तोडूं नये.

**लाभणें**, लाधणें; २, कोणेकाचें कर्तव्य जे मुंज, लग्न, इ॰ संस्कार ते किं॰ मुहूर्त, इ॰ गुरु, चंद्र, इ॰कांचे बळामुळें विवक्षितकालीं करण्यास शुभप्रद होणें.

**लाभदायक**, ३ लिं॰ ज्याचा संग्रहानें संग्रहकर्त्यास द्रव्यादि लाभ होतो असा जो अश्व, नीळ, इ॰ पदार्थ तो किं॰ शुभकर्म, व्यापार, इ॰ तो.

**लाभलोभ**, पु॰ कोणेक कार्यामध्यें मला कांहीं प्राप्त होईल असा जो लोभ असतो तो.

**लाभालोभा**, पु॰ कों॰ लाभलोभ, इ॰ तो.

**लामणदिवा**, पु॰ दोरी, इ॰कांस टांगून ठेवावया जोगा जो लोखंड, पितळ, इ॰कांचा दिवा करितात तो; २, कों॰ पितळेचा खंदील ज्यास मध्यें सांखळी लावली असत्ये तो.

**लायक**, ३ लिं॰ لايق ज्या कर्मादिकाविषयीं जो योग्य तो त्यास किं॰ जें कर्मादि ज्यास योग्य तें त्यास; २, गंजिफांचे खेळांत उतारी करत्येसमयीं उतरायाजोगा जो हुकूम तो.

**लाल**, ३ लिं॰ तांबडा जो रंग तो किं॰ तद्विशिष्ट जें वस्त्रादि तो; २, वस्त्रादिकांचें तांबडेपणाचा अतिशय वर्णायाचा असतां तांबडा या शब्दापुढें याचा प्रयोग करितात; उ॰ या पागोट्याचा रंग तांबडा लाल आहे; ३, पु॰ माणकासारखें एक रत्न आहे; ४, एक पक्षी आहे; ईश्वर, हरी, इ॰कांचा लाल, इ॰ स्थलीं ईश्वराचा प्रियप्राणी असा अर्थ.

**लालची**, स्त्री॰ कांहींएक व्यापारांत जो लोभ उत्पन्न

उत्पन्न होतो किं० कोणी करितो ती; २, ३लिं० इत्यादिकांचा लोभजास फार तो.

**लालझगडा**, पु० प्रीतिकलह.

**लालझगडें**, न० लालझगडा.

**लालडी**, स्त्री० नथ, इ० कांत घालावयाचें उपयोगींजी माणकी ती.

**लालन**, न० पुत्र, इ०कांस मागितलेला पदार्थ द्यावा, करतील तसें करूं द्यावें, त्याजवर माया करावी, चुंबनालिंगनादि करावें, इत्यादिकें करून त्याचें मन संतुष्ट करण्याचाजो व्यापार तें.

**लालबूझक्कड**, पु० रा० लालभुजःकड.

**लालभडक**, ३लिं० अतिशयित जो लाल तो.

**लालभुजःकड, लालभुजःकण**, पु० केवळ मूर्खअसून चातुर्याचा अभिमान बाळगणारा असा या नावाचा कोणी पुरुष प्रसिध्द होता त्यावरून आतां दीडशाहाणा जो मनुष्य त्यास आरोपानें स०

**लालसा**, स्त्री० सं० अतिशयित जी इच्छा ती.

**लालित**, ३लिं० लालन केलें ज्याचें तो.

**लालित्य**, न० ललितपणा; परंतु भाषण, काव्य, इ०कांचेठायीं अर्थरचनाकृत किं० पदरचनाकृत जें सौंदर्य असतें तद्विषयीं विशेषेंकरून प्र०; अर्थलालित्य, पदलालित्य, शब्दलालित्य, इ० स०

**लाली**, स्त्री० कांहीं एक पदार्थनिष्ठजो लालपणा ती.

**लालूच**, स्त्री० लालची विशेष्यार्थी.

**लांव**, स्त्री० फळें, वस्त्रें, दुभतें, पक्ष्यांचीं पारें, इ०कांस उपद्रव करणारें एक पिशाच आहे.

**लावणी**, स्त्री० शेत, इ०कांची जी लागवड ती; २, भात, इ०कांचें रोप किं० वृक्षाचा डाहळ्या, उसाची कांडीं, इ० शेत, इ०कांत लावण्याचा व्यापार ती; ३, कविताग्रंथाची एक जाति आहे जी तालस्वरांत गात असतात.

**लावणीचा**, ३लिं० आपल्या आपण झालेलें नव्हे लावणी करून केलेलें जें वृक्षादि तो.

**लावणीटुपणी**, स्त्री० शेत, इ०संबंधी जी लावणी, बेणणी, इ० व्यापार ती.

**लावणीबाज**, ३लिं० कसबिणीचे बैठकींत किं० तमाशांत ह्मणायाचे उपयोगीं शृंगार प्रधान ज्या लावण्या त्या गाणारा जो तो.

**लावणें**, लागे असें करणें; २, कोणेकास अधिष्ठितस्थलापासून दुसरेकडे घालविणें; उ० मग त्यें खटलें घराकडे लावलें मग मी निघून आलों; घरांतून गुरूं, इ० हाकून लावणें, इ० स्थलीं बाहेर हा अंश पोटांत असतो, या अर्थी लावून देणें हा प्रयोग फारहोतो; कोणेकास लावून बोलणें ह्म० दुसऱ्याचे अंतःकरणास लागायाजोगाजो कोणेक दंशा तो धरून बोलणें; ३, न० कों० वाडी, मळा, इ० कांत लाविलेला जो वृक्षसमुदाय तें.

**लावण्य**, न० मनुष्यादिपदार्थ निष्ठ जें सौंदर्य तें.

**लांवसट**, स्त्री० लांव.

**लांवसटणें**, फळ, दूध, इ० लांवसटीचे उपद्रवानें युक्त होणें.

**लांवसरणें**, कों० लांवसटणें; परंतु नारळ, ताडफळ, इ०कां विषयीं प्र०

**लाँवा**, पु० एक पक्षी आहे.

**लाँवारणें**, लांवसरणें.

**लावालाव**, स्त्री० परस्परांचा द्वेष कलहादि उत्पन्न व्हावयाजोगा याची गोष्ट त्याजपाशीं, त्याची गोष्ट याजपाशीं सांगावी किं० यदरवेहीं अधिक उणें सांगावें, इ० रूप जो कोणेकाचा व्यापार तो.

**लाँछ**, स्त्री० लोप.

**लाँव्हा, लाव्हा**, पु० लांवा.

**लाँव्हारणें**, को० लांवारणें.

**लाशा**, ३ लिं० लास दिल्यासारिखें चिन्ह जो आम्रादिफलावर असतें तो; २, लासाचे चिन्हानें युक्त जो मनुष्यादि तो.

**लास**, पु० वाय्वादि उपद्रव निरसनार्थ लोहादि तापवून जो शरीरावर डाग देतात तो.

**लाँस**, स्त्री० प्राचीनकथांत प्रसिद्ध अशी एक राक्षसी आहे; २, पु० दे० लास.

**लासणें, लाँसणें**, कोणेक मनुष्यादिकास लासानें युक्त करणें.

**लासा**, ३ लिं० रा० लाशा.

**लाँसूर**, पु० न० दे० एक रोग आहे.

**लासें**, न० रा० आम्रादिफलावर किं० मनुष्यादिकाचे शरीरावर प्रा० कृष्णवर्ण जें चिन्ह असतें तें.

**लाहणें**, ग्रं० लाधणें.

**लाही**, स्त्री० द्विदल धान्यातिरिक्त धान्य, किं० क्षारादि भाजलें असतां फुलून होतो जो परिणाम तो; २, ला० क्रोधादिकानें शरीराची होत्ये जी संतप्तता तो.

**लाहूर**, न० कों० लांचा.

**लाहो**, पु० तृप्त न होतां जितकें घेववेल तितकें घ्यावें च्यावें अशा बुद्धीनें कोणेक अर्थाचा घेतात जो लाभ तो; घेणें धातुयोगीं प्र०; २, कोणेक गोष्ट कितीविद्ध झाली किं० कोणेक वस्तु किती मिळाली तथापि तृप्ति होऊं नये असा जो कोणेकास इच्छातिशय असतो तो; ३, पुं० लाभ; उ० प्रपंच साधुनि परमार्थाचा लाहो ज्यानें केला, तो भला भला.

**लाह्यांचामान**, पु० विवाहामध्यें लाह्यांचा होम करत्येसमयीं लाह्या घालणारा जो कोणी त्या मुलाचा मामा, इ० असतो त्यास वरपक्षीयानीं पागोटें, नारळ, इ० रूप मान द्यावा लागतो तो.

**लाळ**, स्त्री० मुखांतील जो बुळबुळीत द्रव तो; २, तोंडांतून लाळ गळावी, पाय कुजावे, असा एक गुरांस रोग होत असतो तो; कोणेकानें कोणेक वस्तुविषयीं लाळ घोटणें ह्म० अभिलाषानें हें वस्त मला मिळेल तर बरें आहे असा ध्यास करित असणें; लाळेनें चणे भिजवून खाणें ह्म० आपल्यास जाणीं मानावें असें जे पुत्र, सून, इ० त्यांणीं जरी गौरव केलें नाहीं तथापि करतील त्यांतच गौरव मानून घेणें.

**लाळणें**, मूल, इ० कानें मुखांतून लाळ गळे अशा कारानें युक्त होणें.

**लाळें**, न० घोड्याचे सरोसरीस किं० मोरकीस त्याचे बाजूस एक अवयव असतो जास जेरबंद किं० वासन बांधितात तें.

**लाक्षणिक**, ३ लिं० लक्षणेनें जाणायाचा जो अर्थ तो.

**लाक्षा**, स्त्री० सं० लाख प्रथमार्थी.

**लिकंडाव**, पु० कों० लपंडाव.

**लिकण**, स्त्री० किल्ला, डोंगर, इ० कांचेठायीं दडून बसायाजोगी जी आडोशाची जागा असत्ये ती.

**लिकणें**, दडणें.

**लिकलिकणें**, हिऱ्याची चुणी, तिचे खडे, इ० जे बारीक असून चकचकीत पदार्थ त्याणीं तेजःस्फुरण विशिष्ट होणें किं० दीपादिकानीं तेज मंद असून मध्यें मध्यें विराम पावत तेजस्फूर्ति विशिष्ट असणें.

**लिकलिकीत**, ३लिं० लिकलिकायाजोगा जो पदार्थ तो.

**लिकाचोरी**, **लिकीचोरी**, स्त्री० कांहींएक कर्म लिकून चोरून करण्याचाजो प्रकार तो.

**लिकीर**, ३लिं० कों० कांहींएक व्यवहारांत आपण वागत असून आपलें अंग बाहेर दाखवूं नये असा स्वभाव ज्याचा तो.

**लिकूनचोरून**, अ० लपूनछपून.

**लिखणें**, लिहिणें या अर्थी प्रायः ग्रंथीं आणि शुद्ध भाषेंत प्रसिद्धि०

**लिखापुसा**, पु० लेखपत्र.

**लिखित**, ३लिं० लिहिलेंजें अक्षर, ग्रंथ, चित्र, इ० तो.

**लिखितार्थ**, पु० पत्रीं लिहिलेलाजो मजकूर तो.

**लिखी**, स्त्री० डोकीचे केसांतील लिखा काढायाचीजी लांबट फणी असत्ये ती.

**लिखीत**, न० इष्ट, मित्र, धनी, सेवक, इ० कांकडून आलेलीं सल्लामालकीचीं किं० कांहीं कामाकाजाविषयींचींजीं पत्रें संग्रहास पडलेलीं असतात तीं ब०; जीं वाचायास यावें म्हणून सर्वे वाचित असतात.

**लिख्या**, ३लिं० संप्रदायापेक्षां केवळ लहानजो डोळा त्याचें वि०

**लिंग**, न० सं० कोणेक अर्थावर कोणेक धर्मादिकाचें ज्ञापकजें चिन्ह असतें तें; २, शब्दवाच्य जो द्रव्यरूप अर्थ त्याचाठायींशाब्धबोधांत तद्वाचक शब्दानुरोधानें भिन्नभिन्नपणा भासणारा असाएक धर्म आहे तें ज्याचे अवांतर भेद पुंस्त्व, स्त्रीत्व, आणि नपुंसकत्व, हे आहेत; ३, शिश्न; ४, शाळुंकेत स्थितजी हस्तपादाद्यवयवशून्य शिवमूर्ति तें; ५, लिंगाईतलोक शरीरावर शिवमूर्ति लेंकरून जो खडा बाळगीत असतात तें; ६, लिंगाइताचे नामापुढें हा प्रतिष्ठाशब्द लागतो; उ० दादलिंग, सदलिंग, इ०; ७, ला० आपल्यास स्वातंत्र्येंकरून वर्तायास नडणारेंजें कांहीं त्यास किं० आपल्या कर्तव्यकार्यास प्रतिबंधक जें कांहीं त्यास म्ह०

**लिंगडा**, पु० निंदेनें लिंगाइतास म्ह०

**लिंगदेह**, पु० दश इंद्रियें, पंचविषय, आणि मन, मिळून जो संघात तद्रूप जीवाचें सूक्ष्मशरीर तो.

**लिंगशा**, ३लिं० चेंगट्या.

**लिंगाईत**, पु० शिवाचें लिंग शरीरावर बाळगीत असतात अशा मार्गानें चालणारा शैवांत एक भेद आहे.

**लिंगाड**, न० लचांड.

**लिंगाडी**, ३लिं० कचाट्या.

**लिंगिस्ताई**, **लिंगिस्थाई**, स्त्री० कों० चेंगटाई.

लिंग्या, पु० लिंगाईतजो त्यास निंदेनें ह्म०

लिचपिचीत, ३लिं० सामान्य भारपडलाअसतांही पिचापिच लवतो असा घटमूट नव्हेजो वेत, छडी, लेखणीचा टांक, इ० पदार्थ तो.

लिचपीच, अ० को० अनु० लिचपिचीतजो पदार्थ त्याचे लवण्याचे वि०

लिडबिडणें, लडबडणें.

लिडबिडीत, ३लिं० लडबडीत.

लिडया, ३लिं० रा० शरीरानें रोड, अशक्त, जें मुलगें तो.

लिदवळ, ३लिं० को० लीद, विष्ठा, इ० खाण्यास संवकलेलाजो गोमहिष्यादि पशु तो; २, ला० लांच खाऊजो मनुष्य त्यास ह्म०; ३, अल्पद्रव्य लोभानें ही पाहिजे तें कर्म करण्यास अनुकूल होतो त्यास ह्म०

लिदाड, न० कोणेकस्थलीं लीद टाकूनटाकून जमला असतोजो राशि तें.

लिपंडाव, पु० लपंडाव.

लिंपण, स्त्री० न० पात्रादिकांत कांहीं धान्यादिपदार्थ ठेवून त्याजवर तृणादि घालून वरतें शेण, चिखल यांणीं लिंपून जें आच्छादन करितात ती तें.

लिंपणें, फुटलेली भिंत, कुड, बीळ, इ० पदार्थ भोकें, खळग्या, इ० बुजून चांगलें व्हावयाजोगें शेण, चिखल, इ० कांचे लेपानें युक्त करणें; पक्षीं शेण, इ० कांसही कर्मता येत्ये; २, चूल, कोथळी, ओटा, इ० चिखल, चुना, इ० कांचे गोळे मारून मारून रचणें.

लिपणें, को० लिंकणें; २, चिखल, इ० सद्रवपदार्थांनीं शरीरावयवादि लिप्त होणें; शूद्र भाषा द्दचि·



लिपि, स्त्री० सं० लीप.

लिप्त, ३लिं० शेण, चिखल, इ० सद्रवपदार्थांचे लेपानें युक्त जो तो; २, ला० ज्याचा निर्वाह केल्यावांचून आपली सुटका नाहीं असें जें कोणेक कर्म किं० तज्जन्य दोषादि त्याचे संबधांत सांपडलेला जो तो.

लिप्ताळा, ३लिं० दुसऱ्याची ओळखीगत वाटायाजोगें त्यापासून द्रव्यादिघेणें, उपकारकरून घेणें, इ० कर्म तेणेंकरून जो लिप्त तो त्या दुसऱ्याचा.

लिंब, पु० निंबशब्दाचा अपभ्रंश.

लिबलिबीत, ३लिं० लबलबीत; २, चिलचिलीत.

लिंबलोण, न० कोणेकास दृष्टि विकारादि विकार झाला असतां किं० न व्हावा ह्मणून मीठ, मोहऱ्या, इ० पदार्थ ओंवाळून टाकण्याचा जो व्यापार किं० तदर्थ घेतलेले जे ते पदार्थ तें.

लिबा, ३लिं० रा० लेबाडया.

लिंबा, पु० रा० निंबा.

लिंबारा, पु० निंबारा.

लिंबी, स्त्री० निंबी.

लिंबूण, स्त्री० निंबूण.

लिंबूर, पु० निंबूर.

लिंबोटी, स्त्री० निंबोटी.

लिंबोणी, स्त्री० दे० लिंबू ह्मणून जें फळ त्याचें झाड ती; २, बाळंत लिंब आणि बकाणा यांचें जें फळ ती.

लिंबोळी, स्त्री० निंबोळी.

लिभास, पु० तत्तद्देशभेदेंकरून किं० जातिभेदेंकरून जो भिन्नभिन्न वस्त्रालंकारादि धारणा

च्या प्रकार तो; उ॰ हिंदुस्थानी लोकांपेक्षां दक्षणी लोकांचा लिभास निराळा; २, स्त्री॰ लवाजमा.

**लिमचा**, पु॰ निमचा.

**लिलाम, लिलांव**, न॰ कोणेक वस्तु विकायाचें असतां अनेक घेणारांस बलावून अनुक्रमानें किंमत चढवीत चढवीत शेवटीं किंमत ठरेल तीस विकावें असाजो विकयाचा प्रकार तें; २, तशा प्रकारानें विकतातजो माल त्यास क्वचित् स्त्री॰

**लिबका**, ३ लिं॰ रा॰ ज्याचे अंगीं कांहीं बळकरी नाहीं आणि अवयवही फार शिथिल असाजो मनुष्य, त्याचे अवयव, गांठ, इ॰ पदार्थ तो.

**लिबलिबीत**, ३ लिं॰ मृदु शिथिल असाजो पदार्थ तो.

**लिहिणावळ**, स्त्री॰ पुस्तकादि लिहिविलें असतां तत्संबंधी जें त्या लिहिणारास द्रव्य द्यावें लागतें ती.

**लिहिणें**, लेखनी, इ॰ साधनानें अक्षरादि निघे असा व्यापार करणें; एथें अक्षर, चित्र, कागद, ग्रंथ, इ॰ पदार्थांस विवक्षानुरूप कर्मता येत्ये.

**लिहिणेंपुसणें**, न॰ कागद, इ॰ लिहिणें हिशेब करणें, इ॰ जो कारकून, लेखक, इ॰ कांचा व्यापार तें; उ॰ ज्याला लिहिणें पुसणें येत असेल त्याला सुलगीयाची; आह्मी लिहिणें पुसणें करून पोट भरतों; २, लेखपत्र.

**लिहिलेंपुसलें**, न॰ लेखपत्र.

**लिळा**, स्त्री॰ लीलाशब्दाचा अपभ्रंश.

**लिक्षा**, स्त्री॰ सं॰ लीख ह्मणून जो प्राणी ती.

**लीख**, स्त्री॰ उवेचें पूर्वरूप अंडाकार सूक्ष्म असतें ती; २, धोत्रजोडा, इ॰ कांचा रेशमी कांठ किं॰ गजनी, इ॰ कांचे ठायीं रेशीम घट्ट न भरल्यामुळें मध्ये मध्ये जो सुताचा पांढरा अंश दिसत असतो ती.

**लीद**, स्त्री॰ हत्ती, उंट, घोडा, गाढव, खेंचर, यांची जी विष्ठा ती; २, कों॰ एक वेल आहे.

**लीन**, ३ लिं॰ कोणेक अर्थाचे ठायीं लय पावलाजो कोणेक अर्थ तो; उ॰ प्रलयीं सर्व प्रपंच ब्रह्मस्वरूपीं लीन होतो; २, विनयानें नम्रजो कोणेक तो; उ॰ साधूं पाशीं लीन होऊन रहावें.

**लीप**, स्त्री॰ शास्त्र व्यवहारांत किं॰ लौकिक व्यवहारांत उच्चारांत येतातजे वर्ण त्यांचा लिहाचयाजोग्या संकेतानें निश्चित केलेल्याजा रेषा चिन्हरूप व्यक्ति ती; जी संकेतानें भिन्नभिन्न असत्ये.

**लीला**, स्त्री॰ क्रीडा.

**लुकंडा**, ३ लिं॰ लुक्कड.

**लुकण**, न॰ दगड, काष्ठ, इ॰ कांचा सांधा बसावा, देवारिकांचे अंगास कवच करावें, इत्यादर्थ शेंदूर, गळ, चुना, मेण, इ॰ पदार्थ एकत्र करून जें विशिष्ट द्रव्य करितात तें; २, तेणेंकरून त्या संधिप्रदेशादि कांचे ठायीं करितात जो लेप तें.

**लुकलुकणें**, लिकलिकणें.

**लुकलुकी**, स्त्री॰ दीप, अग्नि, हिरा, इ॰ कांचे तेजाची किं॰ देहगत जीवाचीजी स्फुरद्रूपता ती ज्या ग हिलेलाजो ईषदंश ती; २, लकाकी.

**लुकसान**, न॰ स्त्री॰ नुकसान; २, ३ लिं॰ लुसकान.

**लुकसानी**, स्त्री॰ नुकसान.

**लुका**, ३ लिं॰ रा॰ कोणत्याही कामास गेला असतां तें काम न करितां टर करीत माघारा येत असतो

असाजो दैव चातुर्यादिहीन मनुष्य तो; ह्म० समुद्रास गेला लुका तों समुद्र सुका.

**लुकूड**, ३ लिं० शरीरानें केवळ कृश जो मनुष्यादि तो.

**लुक्कण**, न० लुकण.

**लुक्का**, ३ लिं० लुच्चेगिरी, सोधेगिरी, करण्याचा स्वभाव ज्याचा असा जो हलका मनुष्य तो.

**लुगडें**, न० सामान्यतः सोळाहात लांब आणि दोन हात रुंद किं० याहून कांहीं अधिक उणें लांब रुंद या प्रमाणानें प्रायः रंगीत असें स्त्रियांस नेसायाचें उपयोगी जें वस्त्र तें.

**लुगा**, ३ लिं० शरीरानें केवळ अशक्त जो मनुष्यादि तो.

**लुगारणें**, चोरादिकांनीं कोणेकापासून अपहरणाद्विद्वारा संपत्ति, इ० कांचें हरण करून घेणें, पक्षीं जापासून संपत्यादि हरण केलें त्यासही कर्मता.

**लुगारू**, ३ लिं० कोणेकापासून कोणेक वस्तु लुगारण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**लुंगी**, स्त्री० मुसलमान लोकांनीं नेसायाचें एका जातीचें लहानसें वस्त्र आहे ती; २, केवळ लहान जें पंचा, लंगोटी, इ० नेसायाचें वस्त्र त्यास ह्म०; ३, सजगुऱ्याचे दाण्यावर जें बोंड असतें ती.

**लुंघणें**, लंघणें प्रथमार्थी; २, संख्यात किं० परिमित जो कोणेक पदार्थ समुदाय त्यांतील किती एकांनीं चोर्यादिद्वारा गेल्यामुळें नाहीसें होणें.

**लुंघवणें**, कोणेकाचें द्रव्यादि युक्ति प्रयुक्तीनें हरण करून त्यास तद्रहित करणें.

**लुचणें**, **लुंचणें**, गोमहिष्यादिपशूंचे वत्सानें स्तनपान करणें.

**लुचपत**, स्त्री० धनी, इ० कांचे व्यवहारांत वागणारा जो सेवकादि तो त्या धनी, इ० कांस नकळतां त्या व्यवहारांत मिळवितो जें द्रव्यादि ती.

**लुचर**, न० रा० अंबा, इ० फळामध्यें असत्येजीरेषा तें.

**लुचाडुणें**, दे० बुचाडुणें.

**लुच्चा**, ३ लिं० चहाडी, प्रतरणा, इ० असभ्य कर्म करण्यांचा स्वभाव ज्याचा तो.

**लुच्चाई**, स्त्री० लुच्चेपणा.

**लुच्चेगिरी**, स्त्री० लुच्चाई.

**लुच्चेशाई**, स्त्री० लुच्चेगिरी; २, ३ लिं० लुच्चाचें जें भाषण, व्यवहार, इ० तो.

**लुटणें**, कोणेकस्थलीं विद्यमान जे कोणेकाचे धान्यराशि वस्त्रें, द्रव्य, पात्रें, फळें, इ० पदार्थ त्यांतें अनेक जे चोर, पेंढारी, राजदूत, किं० ग्रामस्थ लोक, भिकारी, इ० कांनीं ज्याचे हातास जें लागेल तें उठवावें अशा रीतीनें हरून नेणें; एथें बलात्कारानें हरण असतां त्याविषयाचे धन्यास आणि त्या विषयास आणि त्या अधिकरणास विवक्षानुरूप कर्मता धन्याचे अनुमतानें हरण आहे तर त्याविषयास आणि अधिकरणास मात्र विवक्षानुरूप कर्मता; पदार्थ बाहुल्य असून लुटणारा एक असतांही प्रयोग होतो; २, ला० कोणेकाचा द्रव्यादिविषय कोणेकानें कपटादि निमित्तद्वारा अपहृत करणें; एथें दैवतकर्मता; उ० तो पडला भोळा त्याला कारकून मिळाला तो हरामी त्याणें अवघी दौलत लुटली.

**लुटलुटीत**, ३ लिं० रा० मध्यम रीतीचें पुष्ट, ठेंगणें, वाटोळें, दिसायाजोगें असून जड नव्हे असें जें

कोणेकाचें शरीर किं॰ तदवयव किं॰ तो मनुष्य तो.

**लुटलूट**, अ॰ अनु॰ लुटलुटीतजो मनुष्यादि त्याचें फारलांब पाऊल पडूं नये जवळचेजवळपण लोकरलोकर अशाप्रकारचें चालणें, हालणें, इ॰ काचें वि॰

**लुटाऊ**, ३लिं॰ लुटून आणलेलाजो विषय तो.

**लुटारी, लुटारू**, पु॰ लुटणाराजो मनुष्य तो.

**लुटूफुटू**, अ॰ पाहिजे तो अर्थ वास्तविकनसतां केवळ मनःकल्पनेनें कल्पावा अशाप्रकारें खेळणें, इ॰ कांचें वि॰; प्रायः मुलांचे खेळण्यांत प्र॰

**लुटूफुटूचा**, ३लिं॰ लुटूफुटू अशाप्रकारें कल्पिलेला जो खेळ, पदार्थ, इ॰ तो.

**लुंठण**, न॰ लुंठनशब्दाचा अपभ्रंश.

**लुंठन**, न॰ सं॰ लुटण्याचाजो व्यापार तें; २, ला॰ वृक्ष, लतादिसंबंधी फल, पुष्प, पर्ण, इ॰ जें सर्वस्व त्याचें जें अपहरण त्यास म्ह॰

**लुडबा**, ३लिं॰ रा॰ बोबडा.

**लुडबुडणें**, लुडबूड करणें

**लुडबूड**, स्त्री॰ कोणीकांहीं उद्योग करीत असतां त्याला साहित्य व्हावें म्हणून कोणी मध्येंमध्यें भाषण किं॰ इकडचें तिकडे ठेव, तिकडचें इकडे ठेव, इ॰ व्यापार करूं लागतो तेणेंकरून साहित्य नहोतां उगीच गडबडमात्र होत्ये असें असतां त्या अप्रयोजक व्यापारास म्ह॰

**लुडबुड्या**, ३लिं॰ लुडबूड करण्याचा स्वभाव ज्याचा तो; म्ह॰ लांडेलुडबुडें आणि नाचे पुदपुदे.

**लुडमा**, ३लिं॰ लुडबुड्या.

**लुडारखुडा**, ३लिं॰ कों॰ सरासरी काम चालवायाजोगा जो जुना रूमाराचा मोडका असा नांगर, गाडा, रोडका, म्हातारा बैल, शेणगा, मनुष्य, इ॰ पदार्थ तो.

**लुडाबुचा**, ३लिं॰ दे॰ शाखादिहीन अतएव विशोभित दिसायाजोगा झालेलाजो वृक्षादि तो.

**लुतरा**, ३लिं॰ कों॰ लुबरा.

**लुप्त**, ३लिं॰ ज्याचा लोप झाला तो.

**लुबरा**, ३लिं॰ आपल्यास तादृश ज्ञान नाहीं आणि अधिकारही नाहीं आणि इतर वारणही करितात, असें असतां कोणेक व्यवहारांत पुढेंपुढें बोलण्याचा स्वभाव ज्याचा तो किं॰ टवळाटवळ, खटपट, इ॰ करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**लुबलूब**, अ॰ लुबरेपणाचें जें बोलणें त्याचें वि॰

**लुबाडणें**, लुगारणें.

**लुब्ध**, ३लिं॰ कोणेक विषयावर लोभविशिष्ट झाला जो तो.

**लुब्धक**, पु॰ सं॰ पारधी; २, मृगनक्षत्राजवळ एक तारा आहे तो.

**लुब्धणें**, काहीं एक विषयाचेठायीं लुब्ध होणें.

**लुला**, ३लिं॰ जन्मतः किं॰ रोगादिकामुळें केवळ निर्जीव लडबड लोंबायाजोगा झालेला जो हात किं॰ पाय, किं॰ तद्विशिष्टमनुष्यादि तो; २, ला॰ स्वरूप, उगाणू, इ॰ कामुळें कार्याविषयीं असमर्थ झालेला जो हस्तपादादि त्यासही म्ह॰; ३, कों॰ ताठपणा ज्याचे अंगीं नाहीं असा जो पेळू, वात, दोरी, वृक्षशाखा, इ॰ पदार्थ त्यास म्ह॰

**लुलावणें**, कों॰ कांहींएक व्यापारांत दुसऱ्यास अडचण होई असें अप्रयोजकपणें कोणेकानें मध्येंमध्यें फिरणें.

**लुल्ल**, ३लिं॰ गुल्ल.

**लुवलुवणें**, रा॰ अंगावर ऊ किं॰ मुंगी, किडा, इ॰ कानें कंडूनि सदृश कलनाविशेष व्हावयाजोगें चलनविशिष्ट असणें; २, जिव्हादिकांस भाषणादिव्यापारीं अधीरता उत्पन्न व्हावयाजोगाजो कंडूति सदृशविकार होत असतो तद्विशिष्ट त्या जिव्हादिकानें होणें; उ॰ मी आतां अगदीं बोलणार नाहीं असें मनांतून ह्मणतों पण प्रसंग आला ह्मणजे जीभ लुवलुवल्ये राहवत नाहीं.

**लुसकान**, ३लिं॰ अशक्तजो मनुष्य, पशु, काष्ठ, इ॰ तो.

**लुसलुशी**, स्त्री॰ पदार्थाचेअंगींजो लुसलुशीतपणा असतो तो.

**लुसलुशीत**, ३लिं॰ कोंवळेपणामुळें टवटवी आणि मृदुत्व ज्याचे अंगीं आहे असाजो फल, पर्ण, अंकुर, इ॰ किं॰ मनुष्यादिकांचें शरीर, इ॰ तो.

**लुसलुसणें**, लुसलुशीतपणानें युक्त असणें.

**लुळा**, ३लिं॰ लुला प्रथम द्वितीयार्थी.

**लुळारखुडा**, ३लिं॰ कों॰ लुडारखुडा.

**लुळें**, न॰ क्रयविक्रयादिव्यापाराचा ठराव, तमाशा, कज्जा, मारामार, मैथुन, इत्याद्यर्थ एकत्र जमतातजे अनेक ते सर्व मिळून विशिष्ट जो समुदाय तें.

**लूट**, स्त्री॰ लुटण्याचाजो व्यापार तो; २, त्याव्यापारानें लब्ध जें द्रव्य तें; ३, ला॰ पैका, धान्य, इ॰ संबंधी पांच पांचशाचें त्यास पंचवीस द्यावें, शेरभर द्यावें तेथें चारशेर द्यावें, अशाप्रकारचा वाढणें, देणें, इ॰ चेपुष्ट्यें करून जो व्यापार त्यास ह्म॰; ४, कांहींक पदार्थाची अनिश्चित होत्येजी समृद्धि जीणेंकरून त्यापदार्थास कोणी विचारीनासें होतें ती; लुटीचा ह्म॰ लुटून आणलेला.



**लून**, स्त्री॰ खरजेसारिखा मनुष्यादिकांस एकरोग होत असतो तो; २, क्षरणाचे झाडासारिखें एक औषधोपयोगी झाड आहे तें.

**लेक**, पु॰ स्त्री॰ दे॰ लेंक.

**लेंक**, पु॰ पुत्र; २. स्त्री॰ कन्या.

**लेंकपूत**, पु॰ लेंकबाळ.

**लेंकबाळ**, न॰ पु॰ लेंक, नातू, इ॰ जो कोणी तें तो.

**लेंकरालेंकरीं**, अ॰ पुत्रपौत्रादिवंशपरंपरेनें वृत्ति, इ॰ उपभोगिणें, चालणें, इ॰ कांचें वि॰

**लेंकरूं**, न॰ बालक; २, वडीलजे पित्रादिक त्यांमजें अपत्य किं॰ तत्सदृश अन्य कोणी तें.

**लेंकरूंबाळ**, न॰ पोरबाळ.

**लेंकवळा**, पु॰ आपल्या रखेचापोटीं उत्पन्न झाला जो पुत्र तो; २, रा॰ आपल्यापासून स्वस्त्रियेवांचून इतरस्त्रीचेठायीं उत्पन्न झालीजी संतति ती आपला.

**लेंकुरपण**, न॰ पोरपण.

**लेंकुरपणा**, पु॰ पोरपणा.

**लेंकुरवा**, ३लिं॰ रा॰ लेंकुरपणाचाजो स्वभाव, बुद्धि, समजूत, इ॰ तो.

**लेंकुरवाळा**, ३लिं॰ ज्यास लेंकरूं आहे तो; २, ज्याला आडवा अवयव फुटला असतो असेंजें हळकुंड त्याचें वि॰

**लेंकुरसमजूत**, स्त्री॰ पोरसमजूत.

**लेंकुरस्वभाव**, पु॰ पोरस्वभाव.

**लेंकुरालेंकुरीं**, अ॰ ग्रं॰ लेंकरालेंकरी.

**लेख**, पु॰ लेखनव्यापारानें कागद, इ॰ कांवर जीअक्षरांची रचना तो; याग्रंथकाराचा लेख अचपळ, इ॰

स्थलीं लेख शब्देंकरून लिहिला जातो जो शब्द किं० तद्वाच्य अर्थ त्याचा बोध होतो; २, न० एकादि संख्यांचे जे पाडे मुलें शिकत असतात ते प्र०

**लेखक**, पु० बाळबद, इ० लीपानें ग्रंथ लिहून देऊन तत्संबंधी द्रव्यानें उपजीविका करितो तो; २, सं० लिहिणारा जो कारकून तो; ३, ३लिं० लिहिणारा जो तो; उ० चित्रलेखक. इ० स०

**लेखकप्रमाद**, पु० प्रतीत किं० सांगणाराचे सांगण्यात, चूक नसतां लेखकाचे अनवधानतेमुळें लेखांत जी चूक पडल्ये तो.

**लेखकी**, ३लिं० लेखकानें लिहिला जो ग्रंथ, पुस्तक, अक्षर, वळण, इ० जें लेखसंबंधी तो; २, स्त्री० लेखकपणा.

**लेखण**, स्त्री० लेखणी.

**लेखणी**, स्त्री० लेखनीशब्दाचा अपभ्रंश; त्याची लेखणी खबरदार आहे, तो लेखणीचा पुरा आहे, त्याचे लेखणीस चंग बांधावा, इ० स्थलीं तो लिहिणारा उत्कृष्ट आहे असा अर्थ.

**लेखणीबहादूर**, पु० पुरा जो लिहिणारा त्यास म्ह०

**लेखणें**, कोणेक अर्थानें कोणेक रूपेंकरून मानणें; उ० साधुजन सर्वजनास आत्मवत् लेखतात; २, क्रमानणें; ३, कोणेकानें कोणेकाशीं कोणेक नात्यानें संबध्द असणें; उ० तुह्मी माझे एकीकडून धनी लेखतां आणि एकीकडून जांवाई लेखतां.

**लेखन**, न० लिहिण्याचा जो व्यापार तें; ग्रंथलेखन, चित्रलेखन, इ० स०

**लेखनी**, स्त्री० सं० लिहावयास साधन बरूचें पेर, इ० कांचा जो पदार्थ करित असतात ती.

लेख

**लेखपट्टा**, पु० लेखपत्र.

**लेखपत्र**, न० देणें, घेणें, इ० व्यवहारीं साधनभूत कर्जखत, सनद, ताकीदपत्र, इ० लेखरूप कांहीं एक तें.

**लेखपूस**, पु० लेखपत्र.

**लेखप्रमाण**, न० लेखपत्र.

**लेखा**, पु० हा अनुल्लंघनीय, हा भारी, हा शहाणा, हा दुर्धर, इ० रूपेंकरून कोणेक अर्थाचे अंगीं जी गणनीयता असल्ये तो; निषेधविषयीं प्र०; उ० तो राजास देखील बोलायास भीत नाहीं मग तुझा लेखा किती.

**लेंचापेंचा**, ३लिं० विवक्षितकार्य निर्वाहार्थ जसा खबरदार असावा तसा नव्हे असा जो कोणेक अर्थ तो; प्रायः निषेधविषयीं प्र०; उ० बाराचे कामास लेंचापेंचा मनुष्य कामाचा नाहीं; पाण्याचे जवळचा बांध लेंचापेंचा घालूं नये; लेंचीपेंची गांठ देऊं नको.

**लेंची**, स्त्री० एक झाड आहे.

**लेजीम**, न० स्त्री० सांखळदंडानें संबध्द केलेला सोटा पेलवान लोक पेलायासाठीं करित असतात तें ती.

**लेंड**, न० लेंडूक.

**लेंड कुरवाळस येणें**, रा० आपल्या प्रीतीचें जें मूल, इ० कोणी त्याचें लालन करतां करतां प्रेमानें मूर्छित प्राय होणें.

**लेंडी**, स्त्री० घोडा, उंट, बकरी, घूंस, उंदीर, इ० कांचे विष्ठेचा पडतात जा गोळ्या त्या प्र०; २, घोड्याचें खोगीर पुढें न सरकावें ह्मणून दांडी खालून घ्यावयाच्या त्यास संबध्द केला असतो जो बंद तो; ३,

खोग

खोगरास पुढचेअंगीं जो घोरबंद असतो त्यास कोणी म्ह॰; ४, ताडास जो शेंगेसारिखा लांब एक अवयव येत असतो ती; ५, एकेरी जें मरवमालीचें फुलती.

**लेंडूक**, न॰ मनुष्य, कुत्रें, मांजर, हत्ती, वाघ, आसोल, तरस, इ॰ कांचे विष्टेचे जमलेले लेंजे पडतात गोळे ते प्र॰ तें

**लेंड्याताड**, पु॰ ज्यावर फळें येत नाहींत नुसत्या लेंड्याच येतात असा एक ताडाचे दक्षांत भेद आहे.

**लेणें**, अलंकारार्थ शरीरावर काजळ, कुंकू, भूषणें, इ॰ धारण करणें; २, न॰ शरीरातें शोभा देणारें जें अलंकारादि तें; ३, ग्रा॰ चैत्रमासीं गौरीचा उत्साह करितां भिंतीवर जें गोपुर, इ॰ कादितात तें; ४, डोंगर पोखरून आंत सभामंडप, देवालयें गुहा, नानाप्रकारचीं चित्रें, इ॰ कृत्य कोठें कोठें प्राचीनांनीं केलेलें आहे त्यास म्ह॰

**लेथडणें**, दे॰ माती, शेण, खरकटें, इ॰ कानीं शरीर, अवयव, पात्र, इ॰ लिप्त करणें.

**लेप**, पु॰ चिरवल, कालवलेला चुना, औषधींचा रस, काष्ठाचें उगाळलेलें गंध, इ॰ शरीर, भिंत, इ॰ कांवर सारिवणें, इ॰ व्यापारानें लाविलें असतां जी लागल्यासारिखी त्या चिरवल, इ॰ द्रव्याची रचना होते तें; २, शरीरादिकांवर त्याचा लेप करायासाठीं सिद्ध केलेलें जें द्रव्य तें; परंतु औषधार्थ लेप केलेला असतां प्र॰; ३, ग॰ भात, भाकर, इत्यादिकांचा रूपानें खरकटें तें; ४, लेंप.

**लेंप**, पु॰ न॰ रजई; २, आंथरायाची गादी तो तें.

**लेंपडी**, लेंपडी, स्त्री॰ लहान जी आंथरायाची गादी ती.

**लेपडें**, **लेंपडें**, न॰ लेंपास निंदेनें म्ह॰

**लेपणें**, चंदनादिकांचे लेपानें देवादिकांचें अंग लिप्त करणें; पक्षीं त्या चंदनादिकांस ही कर्मता.

**लेपन**, न॰ सं॰ भिंत, इ॰ कांवर चिरवल, इ॰ कानीं लेप करण्याचा जो व्यापार तें; २, शरीरादिकांवर लेप करण्याविषयीं उद्दिष्ट जें चंदनादि तें.

**लेपघणी**, न॰ रा॰ खरकटीं भांडीं, हात, इ॰ धुतले असतां अन्नांश विशिष्ट होतें जें पाणी तें

**लेपवळ**, स्त्री॰ रा॰ कोणेकस्थलीं खरकटयाचा पला असतो जो पसारा ती.

**लेफंडा**, पु॰ कों॰ कोणेक पदार्थावर चिरवल, शेंदूर, भस्म, गंध, इ॰ कांचा कुठे कुठे लेप झाल्यामुळें त्याचे थें उमटतो जो पट्टा तो; उ॰ सकरेंरव चांगलें कपाळीं गंध लावावें तो लेफंडा काय लावला आहेस.

**लेंभड**, स्त्री॰ कों॰ लडबड.

**लेंभडणें**, कोणेकानें लेंभडरूप होणें.

**लेंभणें**, कों॰ लेंपणें प्रथमार्थी.

**लेलीब**, न॰ हिं॰ लिलांव.

**लेचट**, न॰ कों॰ मैथुनार्थ संयुक्त झालें जें द्वंद्व त्याचे संकेतानें म्ह॰

**लेंघा**, पु॰ कों॰ लेंप प्रथमार्थी.

**[illegible]**, उलिं॰ केवळ कृश दिसत नसतां आंत दम शक्ति नाहीं असा जो मनुष्यादि कि॰ त्याचा अवयव तो.

**लेश**, पु॰ कांहीं एक पदार्थाचा जो ईषदंश तो; उ॰ विहिरींत पाण्याचा लेश नाहीं; विहिरींत पाण्याचा लेश नाहीं, इ॰ स्थलीं ईषदंशमात्रही तें पाणी;

नाहीं असा अर्थ; २, अलिं० लेस.

लेस, अलिं० जाचे तयारीमध्यें लेशमात्रही न्यूनता राहिली नाहीं असा पुरता तयार झालेलाजो कोणेक अर्थ तो.

लेह्य, अलिं० सं० चाटून खावयाजोगाजो पंचामृत, चाटण, इ० पदार्थ तो.

लै, अलिं० लई.

लैलुट, स्त्री० लयलूट.

लोक, पु० मनुष्य, दैत्य, देव, गंधर्व, अप्सरा, इंद्रादि दिक्पाल, ब्रह्मा, विष्णु, महेश्वर, इ० कांचीं रहाण्याचीं जीं भिन्नभिन्नस्थानें आहेत तीं प्र०; परलोक, ऊर्ध्वलोक, अधोलोक, इ० स०; २, जन; या अर्थी प्रायः अनेकवचनीं प्र०; लोकमर्यादा, लोकरीति, लोकलज्जा, इ० स०; ३, कांहीं एक विधानार्थ तो; हा, तूं, मी, इ० निर्देशनानें जो पृथक् करून जीवकिं० जीवसमुदाय त्याहून इतरजे सर्व ते; उ० तूंमात्र शहाणा लोक काय वेडे आहेत; आमचे घरीं धर्म होतो इतका लोकांचे घरीं झाल्यानंतर मग काय पाहिजे; ४, गर्जे, सरदार, इ० कांजवळ किं० किल्ला, शहर, इ० कांचे रक्षणार्थ ठेविले असतात ते, प्र० अनेकव०. ५, परकी जो कोणी मनुष्य तो; ६, जात्यादि भेदकधर्मांनें त्या त्या मनुष्य दैत्यादिसमुदायाचा भेद विवक्षित असतां त्यात्या जात्यादिवाचक शब्दापुढें याचा प्रयोग होतो; उ० ब्राह्मणलोक, गवईलोक, इ० स० तुम्ही देवलोक तुह्मास मृत्युभय कशाचें.

लोकपाल, पु० सं० इंद्रादि जे प्रति दिशेचे स्वामी ते प्रत्येकीं.

लोकपाळ, पु० लोकपाल

लोकप्रवाद, पु० जनप्रवाद.

लोंकर, स्त्री० पशु, मनुष्यादिकांचे शरीरावरील जो केशसमुदाय ती; परंतु मनुष्याचीदाढी, मिशी, डोकी, घोड्याचीआयाळ, दांडी, इ० स्थानचे जे मोठे मोठे जाडे केश त्याविषयीं प्रयोग नाहीं; २, कों० आंब्याचे बाठ्यावर जो काथ्यासारिखा अंश असतो त्यास आरोपानें स०

लोकरंजन, न० जनरंजन.

लोंकरी, अलिं० मेंढा, इ० कांचे लोंकरीनें निर्मिलेंजें कंबल, इ० तो.

लोकलज्जा, स्त्री० जनलज्जा.

लोकलाज, स्त्री० लोकलज्जा.

लोकलोकपाळ, पु० शिपाई, सरदार, इ० तो.

लोकवार्ता, स्त्री० जनवार्ता.

लोकसंग्रह, पु० सं० सर्वलोकांस वर्तनाविषयीं न्याय्यजारीति तदनुसार आपण वर्तलें नसतांही आपल्यास प्रत्यवायादि नाहीं परंतु आपण त्यारीति सोडिल्याअसतां आपल्या दृष्टांतेंकरून लोकही सोडतील आणि बुडतील तसें न व्हावें ह्मणून तच्चदाचरणद्वारा त्यात्यारीतींचा कोणी करितोजो अंगीकार तो; उ० ब्रह्मज्ञानी पुरुषानीं कर्म न केलें तरी प्रत्यवाय नाहीं परंतु लोकसंग्रहार्थ कर्म करितात.

लोकापवाद, पु० जनापवाद.

लोकालोक, पु० सं० सूर्याचे किरणानीं जेथपर्यंत प्रकाश होतो त्यामर्यादादेशीं शास्त्रकल्पित एक पर्वत आहे तो.

लोकालोकीं, अ० प्रत्यक्ष दर्शन नसतां किं० लेखादि प्रमाण नसतां केवळ लोकप्रवादद्वारा कोणेक गोष्ट

आइकणें, इ॰ कांचें वि॰; २, स्वयें आपण किं॰ आपल्येस्थानीं आपला पुत्र, सेवक, इ॰ नसतां केवळ लोकांचे हातून कांहीं काम होणें, करणें, इ॰ कांचें वि॰

**लोकीक**, पु॰ लौकिकशब्दाचा अपभ्रंश.

**लोकेषणा**, स्त्री॰ लोकानीं बरें ह्मणावें, हांसूनये, वाईटह्मणूनये, अशी जी इच्छा ती; २, कर्मेंकरून प्राप्त होतात जे स्वर्गादिलोक तद्विषयक जी इच्छा ती.

**लोकोत्तर**, ३लिं॰ सर्वलोकांपेक्षां उत्कृष्ट जो मनुष्य किं॰ तत्सामर्थ्य, सौंदर्य, इ॰ तो.

**लोकोपकार**, पु॰ वाट बांधणें, वाटेवर पाणी करणें, धर्मशाळा बांधणें, इ॰ कर्मांनीं लोकांवर जो उपकार तो.

**लोकोपचार**, पु॰ सं॰ जें करावया विषयीं शास्त्राज्ञा, आपली हौस, इ॰ प्रयोजक निमित्त तादृश नाहीं परंतु केल्यास लोक आपणास हांसतील, वाईट ह्मणतील. ह्मणून केवळ लौकिक संरक्षणार्थ करावा लागतो जो सदाचरणरूप उपचार तो.

**लोखंड**, न॰ एक धातु आहे ज्याचीं शस्त्रें, खिळे, इ॰ करीत असतात तें

**लोखंडकाम**, न॰ घर, गलबत, इ॰ कांकडे लागतें जें खिळे, पट्या, इ॰ लोखंडी सामान तें; २, लोहारकाम.

**लोखंडी**, ३लिं॰ लोखंडाचा जो शस्त्रादिपदार्थ तो; २, स्त्री॰ लोखंडाची जी कढई ती.

**लोखंडीकेळ**, स्त्री॰ केळीमध्यें एक भेद आहे.

**लोखंडीकेळं, लोखंडीकेळें**, न॰ लोखंडयकेळीचें जें केळं तें.

**लोखंडीचार**, स्त्री॰ कों॰ एक तृणभेद आहे.



**लोखंडीजर**, स्त्री॰ खोरीजी जर ती.

**लोखंडीनगर**, स्त्री॰ तगरीचे झाडांत एक जाति आहे.

**लोंग**, स्त्री॰ भात, सांवा, राळा, इ॰ धान्याचें जें कणीस ती.

**लोंगर**, न॰ केळीस येतो जो केळ्यांचा घड तें; २, मोठीजी लोंग तें.

**लोंगी**, स्त्री॰ लोंग.

**लोंघळावणें**, कों॰ चिखल, गरव, इ॰ कांनीं जिव्हावयाजोगा वस्त्रादिपदार्थ लोळवणें.

**लोंचट, लोंचड**, ३लिं॰ तुटतांतुटत नाहीं असा जो भाकर, पोळी, पापड, काष्ट, इ॰ पदार्थ तो; लां॰ अनेकवार निषेध केला असतांही स्वकार्यसाधनार्थ झटण्याचा स्वभाव ज्याचा असा जो मनुष्यादि त्यास ह्म॰

**लोचन**, न॰ सं॰ नेत्र.

**लोट**, पु॰ अकस्मात् वेग प्राप्त झाल्यामुळें जमानें चाललेला जो उदक, वायु, इ॰ कांचा पुर किं॰ मनुष्यसमुदाय, इ॰ तो; २, धान्यादिकांची अतिशयित जी समृद्धि तो.

**लोटणा**, पु॰ भूमीवर लोटतलोटत जावें अशी जिजास असतें असें जें रवचूटर तो.

**लोटणें**, कोणेक पदार्थानें गाडयाचें चाक जसें आपल्या भोंवतें फिरतफिरत चालतें त्यागतीनें चालविणें; २, प्रायः ढकलणें या अर्थी; ३, कोकस्थळीं कोणेक अर्थानें प्रचुरपणें येणें; इ॰ ळामध्यें आज कथेस लाखों मनुष्य लोटलें हो

**लोटपोट**, स्त्री॰ नृत्य, गीत, नाटक, इ॰ कांचें श्र

णादिकेंकरून अंतःकरणांत पराकाष्ठेच्या चमत्कारयाङून त्यात्यारसानें भरून गेल्या सारिखी श्रोते,इ०कांची होत्येजी अवस्था ती;२, ३लिं० ती अवस्था झाली आहे ज्याची असा जो श्रोता,इ०तो.

**लोटा**, पु० गोंधा;२,ताम्रादि धातूंचें आकार विशेषाचें एक पात्र करित असतात तो;३, मोठा जो लोटी तीस म्ह०

**लोटांगण**, न० ईश्वरादिप्रीत्यर्थ आडवें पडून चक्रासारिखें लोटत जाण्याचा जो व्यापार तें किं० तसें लोटत जात असतां जे शरीराचे फेर होतात ते प्र०; २,ला० पर्वतादिकांवरून खाली गडबडत येतो जो पाषाणादि पदार्थ त्याचे जे आपले भोंवते फेरे होतात त्यास प्र० म्ह०; येणें इ०क्रीचे योगीं प्र०

**लोटी**, स्त्री० ताम्रादि धातूंचें आकार विशेषाचें एक पात्र असतें ती.

**लोट्या**, पु० कों० लोटा.

**लोठा,लौंठा**, ३लिं० शरीरानें जो भारी धष्टपुष्ट तो.

**लोठाश्रम**, पु० गार्हस्थ्यादि चार आश्रमांतील एकही आश्रम ज्यास नाहीं असा जो लट्ठ निरंजन तो.

**लोड**, नं०पु० वस्त्रांत कापूस,इ०भरून शिंवून मृदंगाकार पदार्थ ओठिंगायासाठीं करितात तें तो;२, स्त्री० तुरपून शिवलें असतां जी वातीसारिखी रचना होत जात्ये ती;३, न० दे० कुळव, पाभर, इ० आउतास एक अवयव भरून आडवें लांकूड असतें ज्यांत फणांचा दांडया अडकवितात तें.

**लोडणा**, पु० रा० लोढणें;२,फारच जड जो कडीं तोडे,इ०भूषण, तांब्या,इ० पात्र किं० जीभ त्यास म्ह०

**लोढ**, न० कों० लोडप्रथमार्थी.



**लोढणें,लौंढणें**, न० ओढाळ जें गुरूं, इ०पशु त्याणें पळूं नये ह्मणून त्याचे गळ्यांत बांधितात जें लांकूड तें;२,ला० आपल्यास स्वच्छंदें वागण्यास प्रतिबंधकर्ते बायको,पोर, इ० कांहीं असतें त्यास म्ह०

**लौंढा**, पु० अकस्मात् पाणी,इ० सद्रव पदार्थाचा लोट येतो तो.

**लोण**, स्त्री० कों० एक तृणजाति आहे; जें प्रा० खाऱ्या पाण्याचे आश्रयानें खाडी,इ०कांचे तीर प्रदेशीं रुजतें ती.

**लोणकढें तूप,लोणकढतूप**, न० नुकतें लोणी कढवून केलेलें जें ताजें तूप तें.

**लोणचें**, न० आंबा,निंबू,इ० कितीएक फळांचें किं० गरमर,इ० किती एक मूळादिकांचें मीठ,मोहऱ्या, हिंग,इ०पदार्थ घालून तोंडी लावाया करितां जो पदार्थ करितात तें.

**लोणार**, न० कों० लोणीनें व्याप्त असतें जें स्थळ तें; उ० लोणारावर जाऊन एक पाटीभर म्हशीला लोण घेऊन येजा;२, ३लिं० पक्केंन कढल्यामुळें जो ईषन्मात्र तुपास लोण्याचा वास येतो तो.

**लोणंची**, स्त्री० रा० आंब्याचा करंबुख्या तोंडी लावायाकरितां मिठांत घालून जो खार वितात त्या प्र०

**लोणस**, ३लिं० कों० ज्यामध्ये लोणी निघायाचा संख्यांश अधिक आहे असें जें दूध तें किं० तसें दूध आहे ज्याचें असा जो गाय,म्हैस,इ०पशु तो.

**लोणा**, पु० भातांत एक जाति आहे;२, जमीन,मृत्तिका यांचे अंगीं असतो जो क्षारांश ज्याचे योगानें तेथें निरंतर ओल असत्ये खडरवडीत वाळत नाहीं तो.

**लोणारी**, पु० एक हिंदूंत जाति आहे जे जळाऊ लांकडें, कोळसे, इ० विकून उपजीविका करितात तो.

**लोणी**, न० दूध, किं० दहीं घुसळलें असतां पृथक् निघतो जो तत्वांश तें; लोण्यास दोन फुटणें म्ह० आपल्या आश्रयानें वाढलेलें पोर, इ० त्याणें भाषणादिव्यवहारीं अमर्यादपणें वागूं लागणें.

**लोथ**, स्त्री० माजून भारी पुष्ट झालेलें जें मनुष्यादिकांचें शरीर त्यास म्ह०; २, मरण, निद्रा, आडरबळणें, इ० कारणामुळें खालीं पडलेलें जें शरीर तें साधारण असतांही त्यास म्ह०; उ० आमचे निकडचा शिपाई असतां नर एकदा इतक्यांचा लोथा पाडता; ३, फार मोठें असें जें भोपळा, फणस, भिभृड, इ० फल त्यास म्ह०

**लोद**, पु० गा० लोथ प्रथमार्थी.

**लोध**, पु० लोध्रशब्दाचा अपभ्रंश; २, पांच सहा हात लांबी आणि क्रमानें दीड दोन हात वेढ येई असा जो कडी, इत्याद्युपयोगी गोल लांकडाचा तुकडा तो; ३, स्त्री० लोथ.

**लोधर**, ३ लिं० कों० गोळा घट्ट न जमाया जोगा क्रमाचा पातळ झाला जो गूळ, पीठ, इ० तो.

**लोधडा**, पु० कों० शरीरानें अति पुष्ट जो मनुष्य त्यास ग्रा० निंदावसरीं म्ह०

**लोधा**, पु० शरीरानें भारी मोठा जो मनुष्यादि त्यास म्ह०; २, कों० शरीराचा तोडून काढिला जो लचका तो.

**लोधागूळ**, पु० कों० घट्ट गोळा ज्याचा नसतो असा काकवीसारिखा पातळ जो गूळ तो.

**लोध्र**, पु० एक वृक्ष आहे; २, न० पु० त्याची जी साल तें तो

**लोप**, पु० कांहीं काल प्रवृत्तपणें स्थित जो धर्म, आचार, भाषा, द्रव्यादिपदार्थ, इ० त्यांचा प्रयत्नांनं आढळ न व्हावया जोगा जो अभाव होतो तो किं० प्रसंगानुरोधानें प्रसक्त जो शब्द, वर्ण, इ० कांहीं अर्थ त्याचा जो त्या प्रसंगीं अभाव तो.

**लोपणें**, लुप्त होणें.

**लोंब**, स्त्री० रा० लोंग.

**लोंबकळणें**, लोंबणें या अर्थी, परंतु त्या स्थितीत संकटावस्थात्व वर्णन विवक्षा असतां प्र०; उ० घोड्यावर बसलें असतां जर रिकिब्या नाहींत तर पाय लोंबकळतात.

**लोंबर**, न० दे० राळा, राजगिरा, इ० कांचें जें कणीस किं० तदवयव तें; २, स्त्री० कों० लोंबड.

**लोंबड**, स्त्री० विकत घेणें, देणें, या प्रसंगीं असोली नारळांचे समुदायास म्ह०

**लोंबण**, स्त्री० रा० निबिडपणें बहुत देशानें व्यापून वृक्षादिकास आश्रयून लोंबत स्थित जो पडवळ, इ० फळें, फुलांचे गुच्छ, झडयाघळें, इ० कांचा समुदाय ती; लाग धातुयोगीं प्र०

**लोंबणें**, कोणेक पदार्थानें उपरिस्थ कोणेक आश्रयास आश्रयून खालीं न लागतां अंतरालीं हाल्याया जोगे स्थितीनें असणें; २, ला० कोणेक आरब्धकार्यशेवटास न जातां लोंबणीवर पडून तसेंच राहणें; ३, कोणेक कार्याचे उद्देशानें प्रवृत्त झाला जो कोणी एक त्याणें तें काम हस्तगत न होतां सोडतांनये, धरतांनये, अशी अवस्था पावून क्लेश पावत असणें; उ० चांगेनण कामाकरतां आलों त्यांतून तिघांचें काम होऊन गेलें मी मात्र अजून लोंबत राहिलों आहें.

**लोंबर**, न॰ रा॰ मोटीजी लोंबती.

**लोंबी**, स्त्री॰ लोंगी.

**लोंबीझोंबी**, स्त्री॰ कोणेकापासून कांहींएक पदार्थ घेण्याकरितां किं॰ कांहींकामकरून घेणें, इ॰काकरितां झोंबणें,झटणें,इ॰रूपजो अतिशयित प्रयत्न ती.

**लोभ**, पु॰ कांहींएक पदार्थाचा लाभाविषयीं उत्कट जी इच्छा ती; २, कोणेक वस्तुविषयीं हें मला सुटूं नये अशीजी बुद्धि ती; ३॰ लोकांचें देणें फार होतनचाललें यास्तव घराचा लोभ धरूनका विकून देणें बा; ४, कोणेकाबर हा माझा अशी असत्येजी बुद्धि जीणेंकरून त्याचें सर्वथा बरें असावें असा पक्षपात असतो तो.

**लोभणें**, स॰ लुब्धणें.

**लोभाविष्ट**, ३लिं॰ लोभ प्रथम द्वितीयार्थानें युक्त झाला तो.

**लोभिष्ठ**, ३लिं॰ लोभ प्रथम द्वितीयार्थ फार आहे ज्यास तो.

**लोभी**, ३ लिं॰ लोभिष्ठ.

**लोम**, न॰ सं॰ रोम.

**लोमकळणें**, लोंबकळणें

**लोयली**, स्त्री॰ लहान जो गलबताचा नांगर असतो ती.

**लोलक**, पु॰ खालीं जाड असून वरता बारीक असाजो पाच,कांच,बिलोर, इ॰कांचा भूषणोपयोगी मणी असतो तो.

**लोली**, स्त्री॰ लोयली.

**लोलुप**, ३ लिं॰ सं॰ लुब्ध.

**लोलो**, पु॰ घालणें याचायोगीं प्र॰ अ॰; रा॰ अक्षरोच्चार स्पष्ट व्हावा, मध्यें अवकाश, चुकी, लागूं नये, म्हणण्याची बाणी चांगली असावी, इ॰जे अध्ययनाचे गुण ते नसून उगीच सरासरी ग्रंथ घोकीत किं॰ पढत असणें.

**लोंव**, स्त्री॰ रा॰ लव.

**लोष्ठ**, न॰ सं॰ ढेंकूळ.

**लोह**, न॰ सं॰ लोखंड; लोहभस्म, लोहचूर्ण, लोहशंकु, इ॰ स॰

**लोंहकर**, स्त्री॰ लोंकर.

**लोहकांत**, पु॰ लोखंडांत एकजाति आहे; २, त्याचें जें औषधार्थ भस्मकरितात तें; ३, तिच्याचे भस्मारस म्ह॰

**लोंहचट**, ३लिं॰ कों॰ लोंचट.

**लोहचुंबक**, पु॰ लोखंडातें आकर्षिणारा असा एक पाषाण आहे; २, ला॰ कोणेकापासून द्रव्यादि काढून घेण्याविषयीं आरंभिलें असतां अनेक युक्ति कराव्या, झटावें, चिकटावें, इ॰कें करून द्रव्यादि काढल्याशिवाय सोडायाचें नाहीं असा स्वभाव ज्याचा त्यास म्ह॰

**लोहटणें**, न॰ लोटणें.

**लोहबंदीऊद**, पु॰ ऊद म्हणून जें सुगंधि द्रव्य त्यांत एक भेद आहे.

**लोहभानऊद**, पु॰ लोहबंदीऊद.

**लोहभानीऊद**, पु॰ लोहबंदीऊद.

**लोहमंडूर**, पु॰ मंडूरासच म्ह॰

**लोहार**, पु॰ लोखंडाचीं शस्त्रें, खिळे, इ॰ करून उपजीविका करणारी एक हिंदूंत जाति आहे.

**लोहारकाम**, न० खिळे,शस्त्रें,इ० लोखंडाचे दागिने घडावे असें जें काम तें

**लोहारकी**, स्त्री० लोहाराचें जें कर्म ती.

**लोहाळा**, पु० लव्हाळा.

**लोहित**, ३ लिं० सं० आरक्त.

**लोळ**, पु० दे० सवेग जो अग्नीचा कल्लोल तो.

**लोळकंड**, स्त्री० लोळण.

**लोळकण**, स्त्री० लोळकंड.

**लोळण**, स्त्री० कोणी आपल्यास बलात्कारानें कोठें नेऊं लागला असतां जाऊं नये किं० कोणापाशीं कांहीं हट्टानें मागावें, इ० कारणास्तव भूमीवर लोळत पडावें अशी जी शरीराची स्थिति ती; घेणें, मारणें, इ० कांचें वि०

**लोळणें**, खालचें अंगवर, वरचें खालीं, होई असें भूम्यादिकांवर इतस्ततः चलन विशिष्ट होणें; २, ला० वस्त्र,पात्र, इ० कोणेक पदार्थ कार्यावर विनियुक्त नसतां अव्यवस्थितपणें इतस्ततः पडला असणें किं० मनुष्यादिकानें धंदा,रोजगार, इ० जा कामाचे अधिकारावर असावें तो अधिकार नसल्यामुळें निरुद्योगपणें अंधारांत पडल्याप्रमाणें असणें.

**लोळपट**, स्त्री० गृह,ग्राम, इ० कांचेठायीं अनेकानीं दुखवण्यानें जेरहोऊन लोळत पडावें अशीजी कालानुरोधानें अवस्था प्राप्त होत्ये ती.

**लोळवणें**, ला० लंबा करणें; ड० चोरानीं रात्रीस दोन असामी लोळवले.

**लोळसावणें**, रा० धूळ, इ० त्याचे अंगास लागायाजोगा भूम्यादिकांवर तो पदार्थ लोळवणें.

**लोळा**, पु० घांटचे आंत वाजवायाकरितां जो लोखंड, इ० कांचा खिळ्यासारिखा लांबट पदार्थ सबध्द करित असतात तो; २, जिव्हामूलाचे उपरिभागीं मुखामध्यें जो पडजीभ ह्मणून अवयवविशेष त्यास आरोपानें ह्म०; ३, दे० दंतादिकानीं कोणेकाचे शरीराचा तोडितातजो लचका तो.

**लोळी**, स्त्री० लहानजो घांटेचा लोळा ती; २, ला० नराकार नासिकाद्वाराजो श्लेष्मा येतो ती; ३, गा० लांबट आणि सारखा भरलेला जो फणस त्यास ह्म० ; ४, गर्दभादिकांस लोळायाची जी नलफ येत्ये ती.

**लौकर**, न० अ० लवकर.

**लौका**, ३ लिं० लवका.

**लौकिक**, पु० कीर्ति; २, कोणेक गोष्टीचीजी वाच्यता तो; ३, ३ लिं० लोकांमध्यें प्रसिध्दपणें प्रवर्तमान जीरीति, आचार, संप्रदाय, इ० तो

**लौचीक**, ३ लिं० लवचीक.

**लौंडी**, स्त्री० लवंडी.

**लौंडीचा**, ३ लिं० लवंडीचा.

**लौंडेलूट**, स्त्री० लवंडेलूट.

**ल्यारव**, ३ लिं० लायक.

**ल्याणें**, लेणें; २, न० लेणें.

**ल्योंक**, पु० पुत्र.

**ल्हाव**, पु० रा० लाहो प्रथमार्थी

**ल्होवा**, पु० रा० गिमवा.

व. अ० आणि.

वइरण, स्त्री० न० वेरण.

वइरणें, वेरणें.

वई, स्त्री० कों० वे.

वईल, पु० न० वाईल.

वईलचूल, स्त्री० वाईलचूल.

वक, स्त्री० दे० ओक.

वकटा, ३ लिं० ओखटा.

वकटें, न० संकेतानें चुवडास म्ह०.

वकणें, दे० ओकणें.

वकन, पु० वखत.

वकल, न० धनी, मूलपुरुष, सरदार, इ० कांच्या जो संबंध तद्रूप, किं० जाति गुणादिरूप जो कोणेक सामान्यधर्म तदवच्छेदेकरून भिन्न भिन्न मानिलेलीं जीं मनुष्यादि समुदायरूप अनेक प्रकरणें तीं म०.

वकलात, वकलाद, स्त्री० वकिलाचें जें कर्म किं० अधिकार तो.

वका, ३ लिं० दे० ओका.

वकारी, स्त्री० दे० ओकारी.

वकिली, स्त्री० वकलात.

वकील, पु० राजा, वादिप्रतिवादी, इ० कांनीं इतर राजा, किं० न्यायाधीश, इ० कांपाशीं आपले तर्फेचें बोलणें बोलायाकरितां. किं० तिकडील होईल वर्तमान आपल्यास कळवावें इत्यायर्थ ठेविला असतो जो अधिकारी तो.

वकीलनामा, पु० या कामाविषयीं माझा वकील तूं अशा प्रकारचें वकिलास लिहून देतात जें अधिकारपत्र तो.

वकीलात, स्त्री० वकलात.

वकूब, पु० हिं० मोठा एखादा व्यवहार अंगावर घेऊन संभाळावा, सभा, दरबार, इ० स्थलीं न भितां, न घाबरतां, उत्तर प्रत्युत्तर इ० करावें. इ० विषयीं उपयुक्त जो ज्ञान आणि धैर्य मिळून अंगीं प्रभाव विशेष असतो तो, किं० अंगीं स्वभावसिद्ध जी अक्कल असते तो.

वक्त, पु० वेद प्रथमादि पंचमार्थ पर्यंतार्थी.

वक्तव्य, ३ लिं० सं० बोलायाविषयीं योग्य, किं० योजलेला जो कोणेक अर्थ तो.

वक्ता, ३ लिं० सं० बोलणारा जो तो; २, पु० वादप्रतिवादादि वाग्व्यापार करण्याविषयीं जो कुशल तो.

वक्त्र, न० सं० मुख.

वक्र, ३ लिं० सं० वांकडा; २, वक्री.

वक्रगति, स्त्री० सं० भौमादि ग्रहांची उलटी जी गति तो; २, ३ लिं० वक्री प्रथमार्थी.

वक्रदृष्टि, ३ लिं० सं० जो ज्याजकडे विरुद्ध भावानें पाहातो तो त्याजवर.

वक्री, ३ लिं० सं० मेषाकडून वृषभाकडे उत्तरोत्तर पुढें जात असावें अशी जी गति ती सोडून तद्विपरीत गतीनें म्हणजे मेषाकडून मीनाकडे जाऊं लागलेला जो भौमादि ग्रह तो; २, वक्रदृष्टि.

वक्रीं, अ० वक्रगतीच्याठायीं कोणेक ग्रहानें येणें, जाणें, असणें, इ० कांचें वि०; कोणकानें कोणकावर

कोणेकावर वक्रीहोणें ३अ० वक्रदृष्टिहोणें.

**वक्रोक्ति**, स्त्री० दुसऱ्याचें भाषणाचा अर्थ समजला असतांही लबाडीनें श्लेषादि माहात्म्यानें आपण त्याचा अर्थ दुसराच जमेस धरून संवाद करावा, इ० प्रकारचें सरळरीति सोडून जें भाषण तें; उ० आज माझें फारपोटभरलें असें मी त्यापाशीं बोललों असतां, भरलें असलें तर धुऊनटाक अशी तो वक्रोक्ति बोलला.

**वखटवणी**, न० दे० खरकटेहात, भांडीं, इ० धुऊन ठेवलें असतें जें पाणी तें.

**वखटवाणा**, **वखटवाणी**, ३लिं० दे० ओंगळवाणा.

**वखटा**, ३लिं० ओखटा.

**वखत**, पु० वक्त.

**वखद**, न० ओखट.

**वखदी**, ३लिं० औषधोपयोगी जो पदार्थ तो.

**वखवख**, स्त्री० रोगादिकारणामुळें किंवा खाल्लें तरी तृप्तिहोऊंनये. किं० सारखेंच खावें खावें असें वाटत असावें असा जो क्षुधातिशय होतो तो; २, स्त्री० दारिद्र्य, किं० लोभातिशय इ० कारणामुळें द्रव्यादि संपादनाविषयीं मानापमानादि सोडून सर्वकाळ त्याविषयीं झटत असावें असा जो अभिलाषातिशय कोणेकास सुटतो तो.

**वखवखणें**, वखवखीनें विशिष्ट होणें.

**वखार**, स्त्री० विकावयाचा जो माल तो सांठवून ठेवावयाकरितां बांधिलें असतें जें स्थळ तें.

**वखारदार**, पु० वखारीचा जो धनी तो.

वखारी

**वखारी**, पु० वखारदार.

**वग**, स्त्री० ज्यापासून आपलें कार्य व्हावयाचें त्यासंबंधी जो कोणी त्याला आपलें कार्याविषयीं अगत्यवाद पडावयाजोगी ओळखदेख, स्नेहभाव, शरीरसंबंध, इ० कांहींएक संबंधामुळें त्याशीं आपली असत्येजी जवळीक ती.

**वंग**, न० सं० कथिल; वंगभस्म इ० समास जाणावे.

**वंगण**, न० दे० करकर वाजूंनये, झिजूंनये, हलका यावा इत्यार्थ गाडा, रहाट, इ० कांच कणा इ० अवयवांस लावितात जें तेल तें.

**वगदी**, ३लिं० वखदी.

**वगराळें**, न० ओंगराळें.

**वगवशिला**, पु० वग इ०.

**वंगळ**, ३लिं० दे० ओंगळ.

**वगळ**, स्त्री० को० कोणेक समुदायांतून निवडकनिवडक अंश काढून घेतला असतां राहिली गहनी जो गाळ साळ तो; २, ३लिं० वगळरूप जो पदार्थ तो.

**वगळणें**, कोणेक क्रियेचा संबंधानें संबद्ध होण्याविषयीं क्रमानुरोधेंकरून प्रसक्त झालेला जो कोणेक अर्थ त्यानें त्या संबंधानें संबद्ध नकरितां सोडणें.

**वंगळवाणी**, ३लिं० दे० ओंगळवाणी.

**वंगळसंगळ**, ३लिं० दे० वाईटसाईट.

**वगळसगळ**, स्त्री० को० वगळ इ०.

**वगैरे**, अ० विशेषनामनिर्देशेंकरून पूर्वीं निर्दिष्ट जो कोणेक अर्थ असतो त्याहून इतर आणखीजे तज्जातीय अर्थ विवक्षित असतात

परंतु

परंतु ज्यांची विशेष नामनिर्देशाविषयीं विवक्षा नाहीं, त्या अर्थाचा परामर्श करणारा हा शब्द आहे; उ॰ सुभेदार, फडणीस, वगैरे झाडून सारे आमचे घरीं आले होते·

**वघळ**, पु॰ दे॰ ओघळ·

**वघळणें**, दे॰ ओघळणें·

**वंचक**, ३ लिं॰ सं॰ वंचना करण्याचा स्वभाव ज्याचा तो·

**वचक**, पु॰ कोण्यावेळेस हा काय करील, काय बोलेल, इ॰ रूप जें कोणेकाचें भय कोणेकाचे मनांत असतें तो·

**वचकणें**, कोणेकानें वचक विशिष्ट होणें·

**वचका**, पु॰ वचक·

**वंचणें**, प्रतारणा, कपट, इ॰ कानीं कोणेकास ठकविणें; २, कांहींएक गोष्टीविषयीं क्रमप्राप्त जो कोणेक विधि त्याचा संस्कार त्या विवक्षितास न होऊं देतां त्यानें वगळणें; ३, स्वमृत्यु, किं॰ देशांतरगमन, इ॰ कारणानीं उपभोग्य जे दारादि विषय त्याविषयीं अंतरलें जाणें; इ॰ तो बंदीस पडला त्यामुळें आपल्या सर्वस्वास वंचला·

**वचन**, न॰ सं॰ भाष; २, भाषण, किं॰ कृष्यायुक्त जी श्लोकादिरूप रचना तें, परंतु या अर्थी या शब्दाचा प्रयोग प्रमाणत्वें करून ग्रहणादि प्रसंगीं होतो·

**वंचन**, न॰ सं॰ प्रतारणा·

**वंचना**, स्त्री॰ सं॰ वंचन·

**वचपा**, पु॰ कोणेक कर्माचा ठायीं द्रव्यादि पदार्थ, किं॰ प्रयत्न, काळ, इ॰ कांहींएक परिमाण त्यागावें, करावें, मिळावें, इ॰ विवक्षा असतां तदपेक्षा अधिक, किं॰ उणें आलें असतां त्या प्रमाणाची बरोबरी व्हावयाजोगा तत्सजातीय कर्मांतराचा ठायीं तद्विपरीत न्यूनाधिक भागानें सांपडला जातो जो न्यूनाधिक अंश तो·

**वंचा**, पु॰ ओंचा·

**वंचित**, ३ लिं॰ सं॰ प्रतारित·

**वज**, स्त्री॰ दे॰ ओज·

**वजपा**, पु॰ वचपा·

**वजन**, न॰ पदार्थ मात्राचे अंगीं जो भार म्हणून गुण असतो तें; २, त्याची इयत्ता समजण्यास साधनीभूत जो मासा, तोळा, धडा, मण, इ॰ तीं न॰, कांहीं पदार्थांचें वजन करणें. म्ह॰ याचे वजनाची इयत्ता समजण्याकरितां तोलण्याचा व्यापार करणें; कांहींएक पदार्थ वजन करणें. म्ह॰ तोलणें; ३, ला॰ मनुष्यादिकांचे आंगीं विद्वत्ता, धनिकता, सभ्यता, इ॰ रूप असतें जें गुरुत्व तें·

**वंजन**, न॰ भाजीमध्यें जें हिरवें धान्य. किं॰ त्याची डाळ इ॰ मिश्र करितात तें·

**वजनदार**, ३ लिं॰ सामान्य गुरुत्वरूप जडतेपेक्षां ज्याची विशेष जडता तो; २, ला॰ विद्यादिकरून महत्त्वविशिष्ट जो मनुष्य तो·

**वजनपूर**, ३ लिं॰ शेर, तोळा, इ॰ विवक्षित वजनानें जो पुरा तो·

**वजनशीर**, ३ लिं॰ वजनदार·

**वजनी**, ३ लिं॰ वजनरूप जो शेर, मण, खंडी, इ॰ जो

जी प्रमाणें तो न०;२, वजनानें वजनकरून देणें, घेणें, इ०करायाचा जो तृण, गूळ, इ०पदार्थ तो.

**वजवा**, पु० वचपा.

**वजवर्ण**, द० ओजवर्ण.

**वजा**, अ० मोठ्या संख्येंतून लहान संख्या बाद होई असें, करणें, होणें, पडणें, इ०कांचें वि०;२, सदृशातुल्य या अर्थीं कितीएक शब्दांपुढें या अव्ययाचा योग होतो; उ० खंडेवजा, कुळंबावजा, इ०.

**वजाबाकी**, स्त्री० मोठ्या संख्येंतून लहान संख्या वजा करून बाकी काढण्याचा जो व्यापार तो.

**वंजार**, न० वणजार.

**वंजारा, वंजारी**, पु० वणजारा.

**वजावाट**, स्त्री० परस्परांचें देणें घेणें, परस्परांनीं असतां येणें असेल तें देण्यांत वजा करावें, देणें येण्यांत वजा करावें, बाकी ठरवावी इ०रूप परस्पर हिशेब उलगडण्याचा जो व्यापार तो.

**वजीर**, पु० राजाचा मुख्य प्रधान तो.

**वजीरात**, स्त्री० वजीराचें जें कर्म, किं० अधिकार तो.

**वजीरी**, स्त्री० वजीरात;२, गंजिफांचे खेळांत वजीरास द्यावी लागते जी तलफ ती;३.३लिं० वजीर संबंधी जो डौल, भाषण, रीति, शाह, इ० तो.

**वज्र**, न० सं० इंद्राचें जें आयुध तें;२, हिरा म्हणून जें रत्न तें;३, सत्तावीस योगांतील पंधरावा जो योग तें;४, विद्युल्लता;५, ला० विद्याशौर्यादि गुणानें दुसऱ्याचा पराभव करण्याविषयीं समर्थ जो त्यास म्ह०.

**वज्रचुडेमंडित, वज्रचूडेमंडित**, ३लिं० सौभाग्यवती स्त्रियांस कागदामध्यें हें विशेषण देत असतात.

**वज्रटीक**, स्त्री० स्त्रियांचे कंठभूषणाचा सुवर्णाचा एक अवयव आहे; अनेक वचनांत म्ह०.

**वज्रदेह**, पु० सं० वज्रा प्रमाणें बळकट जो देह त्यास म्ह०.

**वज्रदेही**, ३लिं० सं० वज्रा सारखा आहे देह ज्याचा अतएव परम बलाढ्य जो त्यास म्ह०.

**वज्रपथ्य**, न० सं० रा० जांत लवण देखील नाहीं, किं० एकच धान्य खावें इ०रूप फार अवघड जें पथ्य त्यास म्ह०.

**वज्रपात**, पु० सं० आयुधरूप, किं० विद्युल्लतारूप जें वज्र त्याचें कोणेकस्थळीं जें पतन तो.

**वज्रप्राय**, ३लिं० सं० वज्रासारखा जो कठिन पदार्थ तो, किं० वज्रासारखा आघात ज्याचा असा जो बाण, मुष्टि इ० तो;२, तसाच जें हृदयांत सलाया जोगें भाषणादि तो.

**वज्रवट**, पु० एक वृक्ष आहे;२, न० त्याचें फळ.

**वज्रमहाग**, ३लिं० कों० अतिशयित महाग जो जिन्नस तो.

**वज्रमहागाई**, स्त्री० कों० पराकाष्ठेची जी महागाई ती.

**वज्रमहाग्या**, ३लिं० कों० अतिशयित महाग विकण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**वज्रमुष्टि**, पु० सं० मल्लांचें एक आयुध आहे;२, वज्रप्राय जो मुष्टि तो.

**वज्रमूठ**, स्त्री० वज्रमुष्टि.

**वज्रलेप**, पु॰ चुन्यामध्यें कात, गूळ, इ॰ सरंजाम घातल्यामुळें दृढतारूप गुण विशिष्ट जो चुना तो; २, त्या चुन्याचा करितात जो दगड इ॰ कांचा संधीस लेप तो.

**वज्रशरीर**, न॰ सं॰ वज्रदेह.

**वज्रशरीरी**, ३ लिं॰ सं॰ वज्रदेही.

**वज्रक्षार**, पु॰ सं॰ एक ओषधीक्षार आहे.

**वज्रांबट**, ३ लिं॰ कों॰ अतिशयित जो अंबट तो.

**वज्राळें**, न॰ एक वृक्षबीज आहे जें मुलांचे गळ्यांत बांधित असतात तें.

**वज्री**, स्त्री॰ पाय घांसायाचे उपयोगी दगड, खंगर, इ॰ कांचा पदार्थ करितात ती; २, पु॰ सं॰ इंद्र.

**वझरता**, ३ लिं॰ दे॰ ओझरता.

**वंझळ**, स्त्री॰ दे॰ ओंझळ.

**वझा**, पु॰ रा॰ लोहार.

**वझें**, न॰ दे॰ ओझें.

**वझेल, वझेली**, ३ लिं॰ दे॰ ओझेली.

**वट**, पु॰ सं॰ वड.

**वटक**, पु॰ सं॰ वडा.

**वटपूर्णिमा**, स्त्री॰ सं॰ वडपुनव

**वंटभरण**, न॰ दे॰ ओटभरण.

**वटवट**, स्त्री॰ तादृश प्रयोजन नसतां कंटाळा यावया जोगें जें बहुत भाषण ती.

**वटवटणें**, वटवट करूं लागणें.

**वटसावित्री**, स्त्री॰ सं॰ ज्येष्ठपूर्णिमेस स्त्रियांनीं करायाचें एक व्रत आहे.

**वटसावित्रीव्रत**, न॰ वटसावित्री.



**वटा. वंटा**, पु॰ ओटा

**वटारणें**, क्रोधादि कारणानें कोणकानें दुसऱ्यास भयप्रदर्शनार्थ अतिशयित वासणें.

**वटाव**, पु॰ कों॰ रुपया इ॰ नाण्यास जो बट्टा येतो किं॰ पडतो तो.

**वटावणें**, कों॰ रुपया इ॰ नाणें वटवणें; २, दुःखदायकत्वेंकरून प्राप्त झालेलीं जीं कांहीं संकट, अडचण, मृत्यु, इ॰ त्यांतून कोणकानें पार पडणें, किं॰ त्याणें पार पडणें, अथवा त्या संकटादिकानीं दुःखसंबंधकरून, किं॰ नकरितां अतिक्रांत होणें, किं॰ त्यानें कोणकानें अतिक्रांत करणें.

**वटिका**, स्त्री॰ सं॰ कात, साबण, इ॰ पदार्थांची जी वडी करित असतात ती.

**वटी**, स्त्री॰ सं॰ वटिका; २, दे॰ ओटी; ३, ओंथ.

**वंटी**, स्त्री॰ दे॰ द्वितीय तृतीयार्थक जी वटी ती.

**वठणीस**, अ॰ मर्दन दमनादि व्यापारानें कोणक पदार्थ नरम येई असें, ये, आण, या धातूंचें वि॰; उ॰ घोडा फार दांडगाई करीत होता, जरासा फरफटका देतांच चांगला वठणीस आला.

**वठणें**, दे॰ मर्दनादि व्यापारानें, कोणक पदार्थानें वठणीस येणें; २, मुद्रा, रंग, इ॰ कानीं विवक्षानुरूप उमटणें; ३, ला॰ कोणकानें कोणकास दत्त जो शापादि त्याणें फलद्रूपता पावणें; ४, सजीव जो मनुष्य, वृक्षादि, त्याणें कांहीं एक रोगादिकेंकरून शुष्क होणें.

**वठाण**, न॰ कों॰ भा॰ खोली व्यतिरिक्त जो गृह

संबधी माजघर, स्वयंपाकगृह, इ॰ आवृतस्थलें असतात तीं प्र॰·

**वठार**, पु॰ कों॰ एका गावांत जे अनेक महले असतात ते प्र॰·

**वठ्या**, ३ लिं॰ लठ्या, दांडगा, असा जो मनुष्य त्यास म्ह॰·

**वठ्याचें**, न॰ संकेतानें निंदा कर्तव्य असतां भोजनास म्ह॰ प्रा॰ कर, हो, धातूंचे योगीं प्र॰·

**वड**, पु॰ एक वृक्ष आहे·

**वडपुनव**, स्त्री॰ ज्येष्ठ महिन्याची जी पुनव ती·

**वडवतें**, न॰ नूतन विवाहित स्त्रिया वडपुनवेचे दिवशीं जो वायनदान समारंभ करितअसतात तीं·

**वडवा**, स्त्री॰ सं॰ घोडी·

**वडवाग्नि**, पु॰ सं॰ समुद्रोदरीं जो पुराणप्रसिद्ध अग्नि आहे तो·

**वडवाघूळ**, न॰ एक पक्षी आहे·

**वडवानल**, पु॰ सं॰ वडवाग्नि·

**वडस**, पु॰ देवी इ॰ कारणानें नेत्रावर जो कवडा येत असतो तो·

**वंडा**, पु॰ दे॰ ओंडा·

**वडा**, पु॰ उडीद, इ॰ कांचे पिठाचें तळून एक प्रकारचें करितअसतात तो·

**वडारी**, पु॰ एक शूद्रांत जाति आहे·

**वडिलोपार्जित**, ३ लिं॰ वडिलानीं संपादित जें धन, स्थावर, इ॰ तो·

**वडी**, स्त्री॰ कांहीं एक पिष्टादि भक्षणीय पदार्थांचा जो चापट, लहानसा तुकडा करितअसतात ती; २, ला॰ अळिता इ॰ कांत कापूस भिजवून जी पोळी करितात ती; ३, शेत, जमीन, इ॰ किती एक स्थलीं जाळायाचे उद्देशानें, किंवा कर वाळावें म्हणून विरळविरळ पसरीत असतात जें शेण ती·

**वडील**, ३ लिं॰ माता, पिता, आजा, पणजा, इ॰ जे पूर्वज ते प्र॰; २, वयानें, किं॰ विद्या, नानें याणें जो अधिक तो; उ॰ अरे बाबा तूं मजपेक्षां वयानें लहानखरा पण विद्येनें वडीलना·

**वढ**, स्त्री॰ दे॰ ओढ·

**वढगस्त**, ३ लिं॰ दे॰ ओढगस्त·

**वढण**, न॰ ओढण·

**वढणें**, ओढणें·

**वढवणें**, ओढवणें·

**वढा**, पु॰ ओढा·

**वढाताण**, स्त्री॰ ओढाताण·

**वढाळ**, ३ लिं॰ ओढाळ·

**वढाळकी**, स्त्री॰ ओढाळकी·

**वण**, न॰ पु॰ देवी, गळू, क्षत, इ॰ बरें झाल्यानंतर त्या त्या ठिकाणीं शरीरावर जें डाग सारिखें चिन्ह राहत असतें तें तो; २, कों॰ सर्कार कागदीं पाहणी इ॰ व्यवहारीं म्हैस शब्दाचे मागें याचा योग होतो; उ॰ वण म्हशी चोंदापैकीं मयत तीन बाकी जमा अकरा; ३, स्त्री॰ दे॰ वराई; ४, रा॰ वेताळ, म्हसोबा, या देवास जो पशुवादि जीवांचा बलि देतात ती·

**वणंज**, स्त्री॰ वाणिज्यार्थ जो प्रवास ती·

**वणजार**, न॰ वणजारी लोकांचा बैल इ॰ खटल्या सहवर्तमान जो समुदाय तें·

**वणजारा, वणजारी**, पु॰ एक जाति आहे, जे त्रा॰ बैल इ॰ कांवर ग्रामांतरादि संबंधी धान्यादि आणून विकीत असतात, अथवा गुरेंही विकून उपजीवन करित असतात ते·

**वणवण**, अ॰ बहुत श्रम होत असें निरर्थकपणें. प्रा॰ करणें, फिरणें, या धातूंचेंच वि॰·

**वणवणें**, दे॰ ओणवणें·

**वणवा**, ३ लिं॰ ओणवा; २, पु॰ डोंगर इ॰ कांत जो वन्हि पेटत असतो तो; ३, ला॰ क्रोधादिकानें कोणकाचे शरीराची होते जी आग तो·

**वणिक्**, पु॰ सं॰ नृप, तेल, विकणें इ॰ व्यापार करणार जो वाणी तो·

**वणिज्**, न॰ सं॰ बवादिकांतील सहावें जें करण तें; २, पु॰ वणिक्·

**वत**, अ॰ सं॰ सादृश्यार्थी त॰ स॰; उ॰ तद्वत्, एतद्वत्, ब्राह्मणवत, क्षत्रियवत, वृक्षवत, इ॰

**वत**, पु॰ ऊत·

**वंत**, पु॰ स्थावर, धन, इ॰ कांच्याठायीं दायादादि भागीदारांचे अनेक असतात जे अंश ते स॰; २, वान; उ॰ द्रव्यवंत, धैर्यवंत, भाग्यवंत, इ॰·

**वतणें**, उतणें; २, दे॰ ओतणें·

**वंतदार**, ३ लिं॰ कांहींएक क्षेत्रादि पदार्थांचे वंताचा जो धनी तो·

**वतन**, न॰ कोणेकानें कोणेकास दत्त जें पुत्र पौत्रादि परंपरेनें चालाया जोगें वृत्तिक्षेत्रादि उपजीविका साधन तें·

**वतनदार**, ३ लिं॰ जोशीपणा, कुळकर्ण, ग्राम संबंधी पुराण, इ॰ वतनाचा जो धनी तो·

**वतनदारी**, स्त्री॰ वतनदारपणा·

**वतनपत्र**, न॰ वतनाविषयीं साधनभूत जें पत्र करून देतअसतात तें·

**वतनभाऊ**, पु॰ एकावतनाविषयींचे जे अनेक विभागी ते परस्पर·

**वतनवाडी**, स्त्री॰ वतन, किं॰ तत्संबंधी शेत, वाडी इ॰ ती·

**वतनी**, ३ लिं॰ वतिग्रहामुळें, किं॰ विकत घेतल्या मुळें लब्ध जें ग्राम, क्षेत्र, इ॰ स्थावर वृत्यादिक तो; २, वतना संबंधी जो दस्तऐवजी कागद, पत्र, इ॰ तो·

**वतरणें**, पिशाचादिकानें कोणेकाचा शरीरांत संचार करणें, किं॰ त्या संचारानें कोणेकानें संचलन विशिष्ट होणें·

**वतवतणें**, कोणेकानें क्रोधावेशानें तडफडणें·

**वतारणें**, वतरणें·

**वतारी**, पु॰ ओतारी·

**वतींव**, ३ लिं॰ दे॰ ओतींव·

**वत्स**, पु॰ न॰ सं॰ गोमहिष्यादिकांचा जो बालक तो तें·

**वत्सद्वादशी**, स्त्री॰ सं॰ गोवत्सद्वादशी·

**वत्सर**, पु॰ सं॰ संवत्सर·

**वत्सल**, ३ लिं॰ सं॰ संरक्षणीय जो पुत्र, भक्त, शरणागत, इ॰ त्यांचें अभिमान धरून ममतेनें बरें करण्याचा स्वभाव ज्याचा तो·

**वदणें**, ठाऊक असतांही बोलूं नये अशाबुद्धीनें

हृदयांत ठेवलेलें स्यापराधपरदुर्गुणादि कांहींतें मंत्रप्रयोगादि झाल्यामुळें परवश होऊन अपाप बोलूं लागणें;२. कोणकगोष्ट सर्वांस समजावी म्हणून सभादिकांत मोठ्यानें बोलणें;३,सं॰ सामान्य बोलणें या अर्थी प्र॰.

**वंदणें**, नमस्कारभिसंबद्ध करणें;२,तीर्थ,धूलि, इ॰कांनें भक्तिपूर्वक मस्तकीं धारण करणें.

**वदंता**, स्त्री॰ जनवार्ता.

**वंदन**, न॰ सं॰ वंदण्याचा जो व्यापार तें.

**वदन**, न॰ सं॰ मुखरूप जो शरीरावयव तें याचे स॰ चंद्रवदन, पद्मवदन, म्लानवदन, इ॰.

**वंदनीय**, ३ लिं॰ सं॰ वंदायास योग्य जो तो.

**वदळ**, स्त्री॰ येणें, जाणें, इ॰ व्यापारामुळें कोणेकास मनुष्य,पशु,इ॰ संबंधी लागतो जो उपद्रव तो; २,पु॰ कों॰ पाण्याचे हेलकाव्यामुळें समुद्रतीरीं जे कांहीं उंचवटे, खळ्या, पडतात तो.

**वदान्य**, ३ लिं॰ सं॰ उदार.

**वद्य**, पु॰ सं॰ माससंबंधी जो कृष्णपक्ष तो;२,३ लिं॰ तत्संबंधी जी तिथि त्या सत्यर्की; उ॰ वद्यअष्टमी, वद्यएकादशी, इ॰.

**वंद्य**, ३ लिं॰ सं॰ वंदायास योग्य जीं मातापितरें, देव, गो, ब्राह्मण, इ॰ तो.

**वद्यपक्ष**, पु॰ कृष्णपक्ष.

**वध**, पु॰ सं॰ कोणेकानें कोणेकास जिवें मारण्याचा जो व्यापार तो; जीववध, गोवध, ब्रह्मवध इ॰ स॰.

**वधणें**, कोणेकानें वधानें अभिसंबद्ध करणें.

**वधू**, स्त्री॰ सं॰ स्त्री, परंतु विवाहयोग्य झाल्यापासून प्रौढ होई तों पर्यंतच लोकव्यवहार आढळतो.

**वधूपक्ष**, पु॰ लग्नामध्यें नवरी कडील जो पक्ष तो.

**वधूपक्षीय**, ३ लिं॰ वधूपक्षांतले जे वऱ्हाडी ते.

**वधूवरें**, न॰ विवाहसमारंभ ज्यांचा चालला आहे ती वधू आणि तो वर असीं उभयतां मिळून जीं तीं.

**वधूवस्त्र**, न॰ लग्नलागत्ये समयीं वधूस जें कांहीं रंगविशिष्ट वस्त्र नेसवीत असतात तें.

**वंध्य**, ३ लिं॰ सं॰ फळें यावयाचे योग्यतेचा जातींतला असून ज्यास फळ येत नाहीं असा जो वृक्षलतादि तो;२,ला॰ निष्फळ जो प्रयत्नादि तो.

**वध्य**, ३ लिं॰ सं॰ वधार्ह जो तो.

**वंध्या**, ३ लिं॰ सं॰ जीस अपत्य होत नाहीं असी जी स्त्री ती.

**वंध्यामैथुन**, न॰ सं॰ ला॰ निष्फळ कांहीं एक व्यापार त्यास प्र॰.

**वन**, न॰ सं॰ अरण्य; साधारणही एक जातीय वृक्ष समुदायास प्र॰ वनचर, वनवास, इ॰ स॰ जाणावे.

**वनगाय**, स्त्री॰ एक आरण्यक गो जाति आहे.

**वनचर**, ३ लिं॰ सं॰ ज्यांची उत्पत्ति, स्थिति, लय, हे अरण्यांतच प्रा॰ होतात असे जे सिंहव्याघ्रादि प्राणी ते प्र॰.

**वनचराई**, स्त्री॰ गुरें, इ॰ कांस रानांत चारिल्यामुळें तत्संबंधी जें सर्कारांत द्रव्य द्यायला पडतें ती.

**वनभोजन**, न॰ सं॰ कार्तिकादि किती एक मासांचे

मांचठायीं उद्यानें, अरण्यें, अशास्थळीं जाऊन जो भोजनसमारंभ करितात तें·

**वनमक्षिका**, स्त्री· सं· मक्षिकांत एक जाति आहे·

**वनमाला**, स्त्री· सं· ईश्वराचे कंठांतील पुष्पं, तुळसी इ· कांची जी आपादलंबिनी माळा ती·

**वनवास**, पु· सं· अरण्यवास; २, ला· प्रवासादि संबंधानें भोगावयास प्राप्त होतें जें कांहीं दुःख तें; कोणकानें कोणकास वनवास आणणें, त्याला स अतिशयित दुःख देऊन आतां हें सर्व सोडून वनवासास जावें असें वाटावयाजोगे अवस्थेनें युक्त करणें·

**वनसं**, न· स्त्री· नणंदस त्याचा प्र· अनेक व·

**वनस्पति**, स्त्री· सं· औषधोपयोगी जा लतावृक्ष इ· त्या प्रत्येकीं·

**वनिता**, स्त्री· सं· स्त्री·

**वन्य**, ३ लिं· सं· वनाचेठायीं उत्पन्न होऊन वृद्धि पावतो तो·

**वन्हि**, पु· सं· अग्नि·

**वपणें**, दे· ओपणें·

**वपन**, न· सं· वस्त्रा इ· कानें हजामत करण्याचा जो व्यापार तें·

**वपा**, स्त्री· सं· काळजांत केळीचे कोंवळ्या पानासारिखा जो पापदरा निघत असतो ती·

**वपु**, पु· सं· देह·

**वंबण**, न· दे· ओंबण·

**वंबळणें**, दे· ओंबळणें·

**वंबी**, स्त्री· ओंबी·

**वमण**, न· दे· ओंवण·

**वमणें**, प्र· ओकणें·

**वमन**, न· सं· वांति·

**वय**, न· उत्पन्न झालेल्या प्राण्याचे उत्पत्तीपासून बाल्य तारुण्यादि अवस्थाभेदकरीत अतिक्रांत होत चाललेला जो काल तें, किं· तत्कृत त्याचे अंगीं असतें जी अवस्थांतें; वयांत येणें त्य· तारुण्याचे भरांत येणें; २, स्त्री· कों· कृपण·

**वयरण**, स्त्री· न· वैरण·

**वयर**, पु· ओयर·

**वयवाडा**, पु· कुंपण इ· करून जो गृहादिकांचे भोंवता आवार इ· तो·

**वयस्क**, ३ लिं· विवक्षित पक्षां वयानें जो मोठा, किं· वृद्ध तो·

**वयस्कर**, ३ लिं· बाल्यदशा अतिक्रमून तरुण दशापन्न जो झाला तो·

**वयातीत**, ३ लिं· म्हातारा·

**वयाळा**, पु· रा· जळांत राहणारा असा निर्विष एक सर्प जाति आहे·

**वयाळें**, न· रा· वयाळा·

**वयोवृद्ध**, ३ लिं· वयानें जो वृद्ध तो·

**वर**, पु· अलौकिक सामर्थ्य विशिष्ट जे ऋषि, साधु, इ· कोणी तो कोणावर प्रसन्न होऊन तुला अमुक फळ प्राप्त होईल इ· रूप अवश्य फलदायक शुभफलाविषयीं त्यास देतात जें वचन तो; २, नवरा; ३, ३ लिं· श्रेष्ट; मनुष्यांत श्रेष्ट तो मनुष्यवर, देववर, इ· समास; ४, अ· आधेयतें करून विवक्षित जो पदार्थ व्यवहारादि कोणक अर्थ त्यास खालून आश्रय देणारे अशा प्रकारें विवक्षि-

न जें अधिकरण तन्निष्ठ त्या अधिकरणतेचें वाचक हें अव्यय; उ॰ माडीवर बसला आहे; मजवर दया करा; आजचें काम उद्यांवर गेलें; मी याकसबावर पोट भरतों; ५, कोणेक पदार्थापासून स्व मध्याकडील जो प्रदेश त्याचाठायीं; उ॰ देव्हाऱ्यावर मंडपी बांधावी; ६, जिकडून पाणलोट निम्न प्रदेशाकडे जातो त्या प्रदेशीं अतएव कोंकणांत पूर्वेकडील देशी वर म्हणतात आणि देशांत पश्चिमेकडे वर म्हणतात; ७, अनुक्रमानें स्थित जीं स्थानें त्यांत जिकडे श्रेष्ठत्व वैशिष्ट्य असतें तिकडील प्रदेशीं; उ॰ वर राजा बसला खालीं प्रधान त्याचे खालीं वरकड सारे बसले; सर्व सुभेदारांवर सरसुभेदार, म्हणून अधिकारी असतो; मीच कांहीं घरचा धनी नाहीं मजवर वडील आहेत; ८, विवक्षित, संख्या, किं॰ प्रमाण त्याहून पलीकडे; उ॰ हे अंबे शंभरांवर असतील; इतके काम आटपायास घटकेवर वेळ लागेल; ९, कोणेक अर्थानें लक्ष्य विषय लेंकरून धरून, चालणें, बोलणें, निशाणधरणें, इ॰कांचे वि॰; उ॰ वाघावर एकटा कसा चालला आहे तो पहा; याच विषयावर चार घटिका बोलत होता.

**वरई**, स्त्री॰ एक तृण धान्य आहे, जास कोंकणांत वरी म्ह॰; २, पु॰ होनांत एक जाति आहे.

**वरकट, वरकड**, ३ लिं॰ विवक्षितांहून इतर.

**वरकर्मी**, ३ लिं॰ अंतःकरणपूर्वक नव्हे असें जें भाषणादि, व जाचा आंत प्रवेश नाहीं असा जो रोग, किं॰ तन्नाशक औषध, अथवा बुद्धि इ॰ व जास मुळचा झरा नाहीं असें जें जल, एतत्प्रकारक जे जे पदार्थ त्यांचें तत्तत्प्रतिपादितार्थ बोधकत्वें करून विशेषण होतें; उ॰ याचें असलें वरकर्मी बोलणें तुम्ही जमेस धरूं नका हो; वरकर्मी औषधानें कोठे आंतला रोग मरत असतो.

**वरखडणें, वरखाडणें**, दे॰ ओरखाडणें.

**वरखडा, वरखाडा**, पु॰ दे॰ ओरखाडा.

**वरंगल, वरंगळ**, पु॰ भातांत एक जाति आहे.

**वरघडी**, स्त्री॰ वस्त्राची घडी करतेसमयीं दर्शनी चांगला अंश यावा एतदर्थ अमळसा बारीक विणून केला असतो जो तदेक देश तो.

**वरघोडा**, पु॰ वरात इ॰ अंगत्वें अनेक घोडीं, गाड्या, इ॰ समारंभपूर्वक मिरवत जी नवरा नवरीची स्वारी निघते ती.

**वरचढ**, ३ लिं॰ कोणेकापेक्षां गुणादिकानें श्रेष्ठ तो.

**वरचा**, ३ लिं॰ वर एतत् अव्यय वाच्य जें अधिकरण तेथील जो तो.

**वरचावर**, अ॰ हातचेहातीं; २, वारंवार.

**वरचील**, ३ लिं॰ वरकड.

**वरचेवर**, अ॰ वरचावर.

**वरट**, पु॰ रा॰ वरवंट.

**वरंड**, स्त्री॰ गवताचा जो भारा ती.

**वरड**, स्त्री॰ दे॰ ओरड.

**वरडणें**, दे॰ ओरडणें.

**वरडा**, पु॰ दे॰ ओरडा.

**वरंडी**, स्त्री॰ दे॰ वरवंडी.

**वरडोळ्या**, ३ लिं॰ संप्रदायिक नेत्रांपेक्षां ज्याचे नेत्र गोलक फार वरते असतात, किं॰ ज्याची दृष्टि

दृष्टिवर असल्ये त्यास निंदेनें म्ह०.

**वरदाण**, स्त्री॰ दे॰ कोणेक पदार्थ संबंधी जो दुर्गंधि ती.

**वरण**, न॰ तूर, मूग, इ॰ कांची डाळ, किं॰ सगळाले च मूग, उडीद, इ॰ शिजवून भात, भाकर, यांज बराबर खावयाकरितां जो पदार्थ करितात तें; २, वधूनें वरास, आणि वरानें वधूस वरण्याचा जो व्यापार तें; ३, अनुष्ठानादि विषयीं ऋत्विजादिकांस वरण्याचा व्यापार तें.

**वरणा**, पु॰ कों॰ पावटा म्हणून जें धान्य तो; २, क्वचित् कडवा म्हणून पावटा त्यास म्ह०.

**वरणी**, स्त्री॰ रा॰ वधूवस्त्र; २, आराध्य देवता इ॰ प्रीत्यर्थ कोणेकानें ब्राह्मणद्वारा मास, पक्ष, इ॰ काल नियमानें वरचेवर ब्राह्मण पाळदीन असावे अशा प्रकारें चालविलें असतें जें अनुष्ठान ती.

**वरणें**. स्वकीय अनुष्ठानादि विषयीं तुम्हीं अनुष्ठान करावें असें सांगून तद्विषयीं कोणेक ब्राह्मणातें अधिकृत करणें; २, कन्या आणि वर या परस्परांनीं हा माझा पति, आणि ही माझी भार्या असें निश्चित करणें.

**वरतवळा**, पु॰ वर्नोळा.

**वरता**, अ॰ वर या अर्थी.

**वरतीं, वरती**, अ॰ वरता.

**वरद**, ३ लिं॰ कोणेकास वर देण्यास अभिमुख झाला तो.

**वरदळ**, न॰ रा॰ घरावर कवलें, किं॰ तृण इ॰ घालाया करितां वांसे पांजरण इ॰ पसरून जी रचना केली असती तें; २, स्त्री॰ वदळ; ३, वंजन.

**वरदक्षिणा**, स्त्री॰ कन्यादान सांगता सिध्यर्थ वरास जी दक्षिणा देतात ती; २, ला॰ कोणेक पदार्थ चोरी इ॰ कानें गेला असतां तत्प्राप्त्यर्थ करावा लागतो जो खर्च तो तो पदार्थ न मिळाल्यामुळें विफल झाला असतां त्यास म्ह०.

**वरदहस्त**, पु॰ वर देण्या विषयीं व्यापृत जो ईश्वरादिकांचा हस्त तो.

**वरदान**, न॰ वर शब्द प्रथमार्थ विषयक जें दान तें.

**वरदावरदी**, स्त्री॰ वरावर्दी या अर्थी.

**वरदी**, ३ लिं॰ ईश्वरादिकांपासून ज्यास वर प्राप्त झाला आहे असा जो पुरुष, कुल, इ॰ तो.

**वरदूध**, न॰ बाळकांस मातृस्तन्या निरिक्त जें गो महिष्यादिकांचें दूध घालित असतात तें.

**वरधणी**, पु॰ रा॰ कांहीं पदार्थ शिजत ठेविला असतां जें वर झांकण पात्र ठेवितात तो.

**वरनिश्चय**, पु॰ कोणेक वधू विषयीं वर स्वेंकरून जो कोणेकाचा निश्चय करितात तो.

**वरपणें**, दे॰ ओरपणें.

**वरपक्ष**, पु॰ लग्नामध्यें नवऱ्याकडील जो पक्ष तो.

**वरपक्षीय**, ३ लिं॰ वरपक्षाकडील जे वऱ्हाडी ते म्ह०.

**वरपिका**, ३ लिं॰ वृक्षादिकांवरच पिकला जो फलादि पदार्थ तो; उ॰ वरपिका फणस असला तर मला दे कोन पिका नको.

**वरपीक**, ३ लिं॰ वरपिका.

**वरप्रस्थान**, न॰ स्वगृहांतून, किं॰ जानवसे घरांतून

**वर्खी**, ३लिं० द्वितीयार्थक जो वर्ख तत्संबंधानें संबद्ध जो लवंग, एलदोडा, इ० पदार्थ तो.

**वर्ग**, पु० मनुष्यादि पदार्थांचा जो समुदाय तो; २, अकार, ककार, चकार, इ०कांचे पांच पांच अक्षरांचें जे आठ समुदाय ते प्र०; ३, गुण्यांक आणि गुणकांक एकच कल्पून गुणलें असतां जी अंकसंख्या होत्ये तो; ४, कित्तीएक ग्रंथांतील जीं लहान लहान प्रकरणें त्या प्रत्येकास म्ह०; उ० अमरकोशाचे पहिल्या कांडाचे दाहा वर्ग आहेत; ५, ब्राह्मण शूद्रादि ज्या जाति किं० कुळें तीं प्र०; उ० तुह्मी कोणवर्ग हो आह्मी सोनार, तुह्मी हो कोणवर्ग आह्मी फडके.

**वर्गणी**, स्त्री० समुदायावर समुदितलें करून प्राप्त झालें जें देणें, घेणें, इ० कांहीं त्यांची अवांतर व्यक्तीवर बसविता न जी वांटणी ती.

**वर्गन**, स्त्री० वर्गणी.

**वर्गित**, ३लिं० सं० ज्याचा वर्ग केला असा जो अंकराशि तो.

**वर्चस**, न० वर्चस्व.

**वर्चस्व**, न० सं० विद्यादिगुणेंकरून किं० कांहींएक अधिकारादि परत्वेंकरून कोणाएकाकडे जें महत्व असतें तें.

**वर्चस्वी**, ३लिं० वर्चस्व आहे ज्यामध्यें असा जो तो.

**वर्चील**, ३लिं० वरकड.

**वर्ज**, ३लिं० ज्या प्रकरणामध्यें जो घेऊं नये, ह्मणून सांगितलें तो त्यांत, किं० संकेतानें कांहीं

कांहींएक विवक्षितावाहेर टाकिला तो.

**वर्जणें**, कोणेक पदार्थ वर्ज होई असा करणें.

**वर्जदिवस**, पु० प्रयाणादि प्रसंगीं घानवारास कोणी म्ह०.

**वर्जन**, न० सं० वर्जण्याचा जो व्यापार तें.

**वर्जवार**, पु० वर्जदिवस.

**वर्जित**, ३लिं० सं० वर्जलेला जो तो.

**वर्ज्य**, ३लिं० सं० वर्जायास योग्य जो पदार्थ तो.

**वर्ण**, पु० सं० ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, ह्या चार जाति आणि श्वेत, पीत, नीलादि जे रंग ते व अकारादिक जीं अक्षरें तीं प्रत्येकीं; २, व्रण ह्मणून एक रोग होत असतो त्यास म्ह०.

**वर्णणूक**, स्त्री० नावाजणूक.

**वर्णणें**, कोणकाचे गुणादिकांचें कथन करणें.

**वर्णन**, न० सं० वर्णण्याचा जो व्यापार तें; २, कोणेकाची जी स्तुति तें.

**वर्णना**, स्त्री० वर्णन.

**वर्णनीय**, ३लिं० ज्याचे गुणादिकांचें वर्णन करायास योग्य असा जो पदार्थ तो.

**वर्णनूक**, स्त्री० वर्णणूक.

**वर्णसंकर**, पु० सं० ब्राह्मण क्षत्रियादि वर्णांचा व्यभिचारादिकानीं झाला जो संकर तो.

**वर्णसट**, **वर्णसठ**, स्त्री० श्रावणमास संबंधिनी जी शुक्लपक्षींची षष्ठी ती.

**वर्णी**, पु० सं० ब्रह्मचारी.

**वर्णोच्चार**, पु० अकारादिवर्णांचा जो उच्चार तो.

**वर्तक**, पु० कों० ग्राम संबंधी पाटला सारखा एक

एकवतनदार अधिकारी असतो तो.

**वर्तकी**, स्त्री॰ कों॰ वर्तकाचें जें कर्म. कि॰ अधिकारती.

**वर्तणूक**, स्त्री॰ वर्तण्याचा जो संप्रदाय ती.

**वर्तणें**, कोणेक रीति आश्रयून तदनुसार आचरत असणें; २, कांहींएक गोष्ट घडली जाणें; उ॰ वटवृक्षाखालीं वर्तलें तें सांगेन; ३, कोणेस्थलीं कोणे विद्यमान असणें, याचा प्र॰ प्रा॰ प्र॰

**वर्तन**, न॰ सं॰ वर्तण्याचा जो व्यापार तें.

**वर्तमान**, न॰ बातमी; २, ३ लिं॰ कोणेक काल देश, या अधिकरणीं आहेपणानें विशिष्ट जो तो; ३, विद्यमान कालाचें वि॰

**वर्तमानकाळ**, पु॰ प्रस्तुतकाळ.

**वर्तवणें**, ग्रहण संक्रांति इ॰ कांचें गणितकरून तें तें निश्चितकरणें.

**वर्ताळा**, पु॰ एका शिक्क्याचें नाणें सराफ इ॰ कांस देऊन दुसऱ्या शिक्क्याचें नाणें घेऊन त्याचा जो वरबटा येतो तो, किं॰ विवक्षितप्रमाणानें धान्यादि मोजून वर जो वाढवा येतो तो; २, कों॰ देणें घेणें, इ॰ व्यवहारांत जिकडील निकडे दफे रफे होऊन राहतो जो नफा तो, अथवा तोटा आल्या असतां जो पदर भरावा लागतो तो.

**वर्ति**, स्त्री॰ सं॰ दीपादिसंबंधी जी वात ती.

**वर्ती**, ३ लिं॰ कोणेक स्थलीं वर्ततो तो तद्वर्ती याचा प्र॰ प्रा॰ समासीं; उ॰ अग्रवर्ती, पुरोवर्ती, इ॰.



**वर्तुल**, ३ लिं॰ सं॰ वाटोळा.

**वर्दळ**, स्त्री॰ वदळ प्रथमार्थीं; २, न॰ वंजन.

**वर्दावर्द**, ३ लिं॰ देणें, घेणें, जमाखर्च, नफा, तोटा, इ॰ कांची बरोबरी करावयाजोगा जितक्यास तितका जो पदार्थ, व्यवहार, इ॰ तो.

**वर्दावर्दी**, स्त्री॰ कोणकपदार्थ, व्यवहार, इ॰ कांचा जो वर्दावर्दपणा ती.

**वर्धक**, ३ लिं॰ सं॰ कांहींएकाचें वर्धन करणारा जो तो.

**वर्धणें**, कोणकानें वर्धन पावणें.

**वर्धन**, न॰ सं॰ कोणेक पदार्थादिकांचें पूर्वावस्थेपेक्षां जें आधिक्य तें; २, ३ लिं॰ तें आधिक्य करणारा जो तो; विषवर्धन, वीर्यवर्धन, बलवर्धन, इ॰ समास.

**वर्धमान**, ३ लिं॰ सं॰ वृद्धिदशापन्न जो तो.

**वर्धमानपिंपळी**, स्त्री॰ प्रथमदिवशीं एक भाग, द्वितीय दिवशीं दोन भाग, अशा प्रकारें कांहीं दिवस चढवून तशीच क्रमानें उतरीत आणावी, अशी औषधरूपानें सेवितात जी पिंपळी ती.

**वर्धापन**, न॰ सं॰ वाढदीस.

**वर्धावणें**, कों॰ कांहींएक कार्यार्थ पोरें इ॰ कांस खुळविणें.

**वर्धावा**, पु॰ नवऱ्या मुलीचा भाऊ घोड्यावर बसून समारंभ पूर्वक वरास आणायासाठीं जात असतो तो.

**वर्धित**, ३ लिं॰ सं॰ वृद्धिविशिष्ट केला जो तो.

**वर्बडणें, वर्बाडणें**, दे॰ ओरबाडणें.

**वर्बडा, वर्बाडा**, पु॰दे॰ओरबाडा.

**वर्म**, न॰मर्म.

**वर्मी**, उ॰लिं॰ मर्मी.

**वर्य**, उ॰लिं॰ सं॰ श्रेष्ठ, परंतु द्विजवर्य, गुरुवर्य, इ॰समासीं प्र॰.

**वर्योळी**, स्त्री॰वराळी.

**वर्ष**, न॰ द्वादश मासात्मक जो काल तें; वर्षाचा दिवस प्र॰ प्रतिवर्षी एकेकवार येतो असा जो गणेश चतुर्थी, नारळीपुनव, बलिप्रतिपदा, इ॰ सणाचा दिवस तो.

**वर्षऋतु**, पु॰ श्रावण आणि भाद्रपद, एतन्मास द्वयात्मक जो काल तो. किं॰ कर्क आणि सिंह या राशींचेठायीं सूर्य असतो जो ऋतु तो.

**वर्षघात**, स्त्री॰वर्षधात.

**वर्षण**, न॰सं॰वृष्टि.

**वर्षणें**, मेघानें वृष्टि करणें; २, ला॰ कोणेकावर बाण, अग्नि, इ॰कांची वृष्टि करणें.

**वर्षधान**, स्त्री॰ लोकांस इष्टानिष्ट फलदात्री वर्षरूप कालाची गति ती.

**वर्षफल**, न॰ वर्षप्रतिपदेस या वर्षी अमुक शुभाशुभ होईल असें जें जोशी फल सांगत असतो तें.

**वर्षप्रतिपदा**, स्त्री॰ चैत्र शुक्ल प्रतिपदा.

**वर्षर्तु**, पु॰ वर्षऋतु.

**वर्षल**, स्त्री॰रा॰ वतन इ॰कांचे उपभोगाचे पाळीचें जें वर्ष ती.

**वर्षसण**, पु॰ विवाहास वर्ष भरतें त्या दिवशीं जांवयास भोजनास बलावून समारंभ पूर्वक सण करितात तो.

**वर्षाकाल, वर्षाकाळ**, पु॰ पर्जन्यकाल.

**वर्षाच्यादिवस**, पु॰ सणाचे दिवसास प्रसंग वशात् प्र॰.

**वर्षादिसाचादिवस**, पु॰रा॰वर्षाच्या दिवस.

**वर्षानवर्ष**, अ॰प्रतिवर्षी; २, अनेक वर्षात्मक काल तें व्यापून.

**वर्षाव**, पु॰ पर्जन्यादिकांची जी वृष्टि तो.

**वर्षाशन**, न॰सं॰ ब्राम्हणादिकांचे उपजीविकेसाठीं सर्कार इ॰ प्रतिवर्षी जें नियमानें धन, द्रव्य, देत असतात तें.

**वर्षासन**, न॰ वर्षाशन शब्दाचा अपभ्रंश.

**वर्षावर्ष**, अ॰वर्षानवर्ष.

**वऱ्हा**, पु॰दे॰ गुळाचा रांधा निवावा म्हणून जो तावयाकरितां जो भूमीवर वाफा करितात तो.

**वऱ्हाड**, न॰वर आणि वधू यांचें होतें जें लग्न तें; २, ला॰ मुंग्या इ॰कांचा क्रमानें चालत असतो जो समुदाय त्यास प्र॰; ३ पु॰ एकदेश आहे.

**वऱ्हाडगोष्टी**, स्त्री॰ कोणेकाचें लग्न व्हावें म्हणून तद्विषयीं उपयुक्त ज्या नाना प्रकारच्या अधिकउण्या गोष्टी त्या.

**वऱ्हाडघर**, न॰लग्नघर.

**वऱ्हाडणें**, मुलगा आणि मुलगी या उभतांनीं विवाह संस्कार विशिष्ट होणें; २, ला॰ त्या विवाह समारंभामध्यें वऱ्हाडी लोक इ॰कांनीं निमग्न होणें.

**वऱ्हाडी**, उ॰लिं॰ लग्नामध्यें नवरानवरी या

करील

कडील जे सुद्दत्संबंधी जन मिळतात ते प्रत्येकीं; २, वऱ्हाडदेश संबंधी जें कापड इ० तो, किं० लग्नोपयोगी जें कापडचोपड इ० तो.

**वल**, न० स्त्री० दे० ओल प्रथमार्थी.

**वलंडणें**, दे० ओलांडणें.

**वलंडा**, पु० दे० ओलांडा.

**वलद**. मुसलमान इ०कांचें नाव लिहून संबंधार्थ त्याचे बापाचें नाव पुढें लिहायाचें असतां मध्यें याचा योग होतो; उ० गुलामखान वलद याकुबखान; रामाजीपाटल वलद गोमाजी पाटेल.

**वलय**, न० सं० बांगडीचे आकाराचा जो कंकणादि पदार्थ तें.

**वलवणें**, दे० ओलवणें; २, वल्हावणें.

**वलसर**, ३लिं० दे० ओलसर.

**वला**, ३लिं० ओला.

**वलाटी**, स्त्री० वेलाटी.

**वलांडणें**, दे० ओलांडणें.

**वलांडा**, पु० दे० ओलांडा.

**वलावणी**, स्त्री० वलावण्याचा जो व्यापार ती.

**वलावणें**, वल्हीं हालवून गलबत चाले असें करणें; २, ला० संसारादि खटलें युक्तियुक्तीनें चालविणें.

**वलावा**, पु० ओलावा; २, कों० मनुष्य समुदाय. किं० गलबतांचा समुदाय विवक्षितस्थलीं सुरक्षितपणें पोंहचावा ह्मणून चोराद्युपद्रव निरसनार्थ कोणेकसमर्थ अधिकाऱ्यापासून शिपाई, रामोशी, गलबत, इ०रूप पाठबळ घेतात तो आणि तन्निमित्त त्या अधिकाऱ्यास द्यावें लागतें जें द्रव्य तो; ३, वल्हावणी.

**वलें**, न० गलबत चालवायास साधनभूत एकालाकडाचे दांड्यास फळीचा तुकडा लावून जो पदार्थ करित असतात तें; २, ला० पोंहणें इ० प्रसंगीं हस्त पाद या शरीरावयवांसही आरोपानें ह्म०.

**वलेता**, ३लिं० दे० ओलेता.

**वल्कल**, न० सं० नेसायाकरितां जी वृक्षाची अंतरसाल काढित असतात तें.

**वल्ग**, पु० वल्गना, परंतु प्र० अनेकवचनांत.

**वल्गना**, स्त्री० अंगीं सामर्थ्य नसतां अरे जा, तो काय समजला आहे, एकाक्षणांत त्याचें मी पारिपत्य करीन इ०रूप जो भाषण प्रकार ती.

**वल्ल**, पु० सं० वाल.

**वल्लद**, वलद.

**वल्लभ**, पु० सं० भर्ता. किं० तत्सदृश जो परमप्रिय तो.

**वल्लभा**, स्त्री० सं० प्रियाया अर्थी.

**वल्ली**, स्त्री० लता; २, ३लिं० ला० स्वच्छंदानें वागणारा जो मनुष्य तो.

**वल्हवणें**, वल्हावणें.

**वल्हा**, अ० दे० कोणेकानें कांहींएक आरब्ध जें कार्य तें त्याणें त्वरेनें करावें ह्मणून प्रेरकत्वें करून या अव्ययाचा प्रयोग होतो.

**वल्हांडणें**, ओलांडणें.

**वल्हांडा**, पु० ओलांडा.

**वल्हाणी**, स्त्री० दे० ओलाणी; २, वस्त्रप्रावरण ठेवा

ठेवायाकरितां जी दोरी बांधित असतात ती.

**वल्हावा**, पु॰ वलावा.

**वल्हें**, न॰ वलें.

**वल्हेकरी**, ३ लिं॰ वल्हें मारण्याचे कामावर ठेविला असतो जो मनुष्य तो.

**ववेणें**, दे॰ ओंवणें.

**ववरा**, पु॰ दे॰ ओवरा.

**ववरी**, स्त्री॰ दे॰ ओवरी.

**ववळा**, ३ लिं॰ दे॰ ओंवळा.

**ववा**, पु॰ दे॰ ओंवा

**ववांडा**, पु॰ दे॰ ओंवंडा.

**ववाळणी**, स्त्री॰ ओंवाळणी.

**ववाळणें**, दे॰ ओंवाळणें

**ववी**, स्त्री॰ दे॰ ओंवी.

**वश**, ३ लिं॰ आर्जव, सेवा, द्रव्य इ॰ द्वारा जो जाणें अनुकूल केला तो त्यास.

**वंश**, पु॰ सं॰ कुल; २, पुत्र, नातु, इ॰ रूप जी संतति ती; ३, वेळू.

**वशंगत**, ३ लिं॰ सं॰ कोणकास वश झाला जो तो त्यास.

**वंशपात्र**, न॰ वेळूचा पातळ बारीक कांबी करून त्यांचें विणून करितात जें परडी, रोवळी, इ॰ पात्र तें.

**वंशलोचन**, न॰ वेळूचे पोटीं पिठासारिखा पांढरा असा एक औषधोपयोगी पदार्थ उत्पन्न होत असतो तें.

**वशा**, पु॰ दे॰ जमीवाला.

**वशात्**, अ॰ कांहीं एकानें वश होऊन; परंतु दैववशात्, कालवशात्, इ॰ स॰ प्र॰.

**वंशावळ**, स्त्री॰ बाप, आजा, पणजा, निपणजा इ॰ जी वंशपरंपरा ती.

**वशाळकी, वशाळगत**, स्त्री॰ दे॰ ओशाळगत.

**वशाळणें**, दे॰ ओशाळणें.

**वशाळा**, ३ लिं॰ दे॰ ओशाळा.

**वशिला**, पु॰ वशीला.

**वशी**, ३ लिं॰ इंद्रियें ज्याचे स्वाधीन आहेत तो; २ जो ज्यावश त्या विषयीं तो.

**वशीकरण**, न॰ कोणी आपल्यास वश व्हावा म्हणून जें मंत्रादि साधन करित असतात तें.

**वशीला**, पु॰ वग, २, दे॰ ज्याची वग जाला असेल तो त्याचा

**वशेट**, ३ लिं॰ न॰ ओशट

**वशोळी**, स्त्री॰ को॰ मंगळागौरी इ॰ व्रतांचा वसा जीस असतो ती स्त्री.

**वश्य**, ३ लिं॰ वश; २, न॰ वधूवरें इ॰ कांचे गणींचें जें आनुकूल्य तें

**वश्वी**, स्त्री॰ को॰ वसवी या अर्थी

**वस**, ३ लिं॰ दे॰ ओस.

**वस,-,कन,-कर,-दिशीं**, वसशब्द होई असें ओरडून अंगावर येण्याचें वि॰

**वसणें**, कोणेकस्थलीं कोणेकानें राहणें; असनीं वसे तें स्वप्नीं दिसे; २, ग्रामदेश इ॰ कनीं वसतीनें युक्त होणें; ३, स्त्रियानीं मंगळागौरी इ॰ व्रतें आचरणें.

**वसंत**, पु॰ सं॰ चैत्र आणि वैशाख हे दोन मास मिळून, किं॰ मीन मेष ह्या दोन संक्रांति मिळून जो द्विमासात्मक काल तो ; २, मालिनी वसंतासही कोणी म्ह॰ ; ३, गानोपयोगी एक राग आहे.

**वसंतऋतु**, पु॰ सं॰ वसंत संज्ञक जो ऋतु तो.

**वसंतपंचमी**, स्त्री॰ सं॰ माघमासांतील शुक्लपक्षींची जी पंचमी ती.

**वसंतपूजा**, स्त्री॰ सं॰ वसंतऋतूंत वसंतमाधवप्रीत्यर्थ सभारंभपूर्वक जी ब्राह्मणांची पूजा करितात ती

**वसंतमाधव**, पु॰ सं॰ वसंतऋतु संबंधिनी जी देवता तो.

**वसति**, स्त्री॰ सं॰ ग्राम, देश, इ॰ कांहीं एक स्थळीं जी मनुष्यादिविशिष्ट गृहादिकांची जी स्थिति ती ; २, कांहीं एक स्थळीं एक रात्रादिकाळ जी स्थिति ती.

**वसन**, न॰ सं॰ चिरगूट.

**वसनपुजा**, स्त्री॰ वसंतपूजाशब्दाचा अपभ्रंश.

**वसरणें**, दे॰ ओसरणें.

**वसरी**, स्त्री॰ दे॰ ओसरी.

**वसला**, पु॰ कों॰ फाडूं नये अशी जा वस्त्राविषयीं विवक्षा आहे, त्याचा जो कोणकानें फाडून केला तुकडा तो, परंतु उड, कर, इ॰ किती एक धातूंचे योगीं अनेक वचनांत संकुचित प्र॰ होतो.

**वसलात**, **वसलाद**, स्त्री॰ रा॰ जा मूळपुरुषापासून उत्पन्न झालेला जो वंश विस्तार ती त्याची त्या वंशामध्यें सर्वांनीं चांगलेंच असावें, किं॰ वाईट असावें असें सर्व व्यक्तींवर एक गुण असण्याविषयीं नियामक जो त्या वंशाचा सामान्य स्वभाव असतो ती.

**वसली**, पु॰ वसूल कराया करितां ठेवितात जो शिपाई तो.

**वसल्या**, पु॰ कों॰ वसली.

**वसवस**, अ॰ वसकन.

**वसवसणें**, क्रोधादिकारणानें कोणकानें वसवसशब्द पुरःसर कोणाच्या अंगावर ओरडणें

**वसवसा**, पु॰ मा॰ दरदरा हिंनी यार्थी.

**वसवसां**, अ॰ वसकन.

**वसवा**, पु॰ दे॰ साचट.

**वसवी**, स्त्री॰ कों॰ कायना, मुसळ, इ॰ कांस जी मांडळ बसवीत असतात ती.

**वसवें**, न॰ रा॰ मुसळ इ॰ कांस जें लोखंडाचें वलय घालितात तें.

**वसहान**, स्त्री॰ वसाहत.

**वसा**, पु॰ मंगळागौरी इ॰ किती एक व्रतांचा कोणी धरितात जो नियम तो ; २, स्त्री॰ शरीरांतील एक धातु आहे.

**वसा**, पु॰ वसा प्रथमार्थी.

**वसाड**, उ॰ लि॰ दे॰ ओसाड.

**वसाडी**, स्त्री॰ दे॰ ओसाडी.

**वसात**, स्त्री॰ वसति प्रथमार्थी ; २, ओस पडलेला जो गांव इ॰ तो पुनः वसविण्याचा जो व्यापार

चार तें.

**वसाहत**, स्त्री॰ वसात.

**वसाळी**, स्त्री॰ वशोळी.

**वसू**, पु॰ कुला इ॰ कांवर डाग देऊन सोडित असतात जो गोहरा तो; २, स्वर्गी एक देवतागण आहे, त्यांतील जे आठ देवता त्या प्र॰; ३, न॰ द्रव्य,

**वसुंधरा**, स्त्री॰ सं॰ पृथ्वी.

**वसुधा** , स्त्री॰ वसुंधरा.

**वसुबारस**, स्त्री॰ गोवत्सद्वादशी.

**वसुमती**, स्त्री॰ पृथ्वी.

**वसुसर्ग**, पु॰ वृषोत्सर्ग शब्दाचा अपभ्रंश.

**वसूं**, न॰ गाड्याचें चाक, नांगराचा फाळ, मुसळ, इ॰ कांचा नोंदाकडल्या प्रदेशी मोठ्या मांडलीचे आकाराचा जो पदार्थ संयुक्त करितात तें.

**वसूल**, पु॰ सर्कार, किं॰ सावकार लोक इ॰ कांस कुळांनी क्षेत्र ऋणादि संबंधी देय जें द्रव्य तो. किं॰ त्यांपासून आलें जें द्रव्य तो; २, कूळ इ॰ कांकडील द्रव्याचा जो उगावा तो.

**वसूलदार**, पु॰ वसूल्या.

**वसूलबाकी**, स्त्री॰ वसूल घेणें, घालणें, बाकी काढणें, इ॰ जो व्यापार ती.

**वसूलवासूल**, पु॰ वसूल इ॰ करण्याचा जो व्यापार आणि त्याणें लब्ध जें द्रव्य तो.

**वसूली**, ३ लिं॰ लागवड चांगली असल्यामुळें वसूल यावया जोगा जो गांव, शेत, इ॰ तो; २, पु॰ वसल्या.

**वसूल्या**, पु॰ वसल्या.

**वस्त**, स्त्री॰ सुवर्णादिकांचा जो अलंकार ती; २, जिन्नस अशारूपानें विवक्षित जो पदार्थ ती.

**वस्तभाव**, स्त्री॰ अलंकारादि पदार्थ समुदाय ती.

**वस्तरा**, पु॰ वस्त्रा.

**वस्तवानी**, स्त्री॰ वस्तभाव.

**वस्ता**, ३ लिं॰ ओसाड नव्हे असा जो ग्रामादि तो.

**वस्ताद**, ३ लिं॰ जा विद्याकलादि गुणामध्यें जो पुरा तो त्यामध्यें; २, तें विद्यादि शिकविणारा जो तो, परंतु गान, नृत्य, तालीम, कुस्ती, अशा कलांचा जो शिक्षक त्या विषयींच प्र॰; ३, ला॰ जो जाचा दमन कर्ता तो त्याचा.

**वस्तादगिरी**, स्त्री॰ वस्तादाचें जें कर्म ती.

**वस्तादी**, ३ लिं॰ वस्तादापासून प्राप्त झाली अशी गानादि विद्या ती.

**वस्ति**, स्त्री॰ नाभीचे खालचा आणि उपस्थाचे वरचा जो भाग ती.

**वस्ती**, स्त्री॰ वसतीचा अपभ्रंश.

**वस्तु**, न॰ स्त्री॰ यच्चयावत् जे पदार्थ ते प्र॰.

**वस्तुकथन**, न॰ कांहींएक अर्थाचें वास्तविक रूपानें जें कथन तें.

**वस्तुगत्या**, अ॰ परमार्थतः किं॰ विचारानें पाहतां.

**वस्तुतः**, अ॰ वस्तुगत्या.

**वस्तुशक्ति**, स्त्री॰ पदार्थ मात्राचाठायीं कांहीं असाधारण शक्ति जी ईश्वरें निर्मिली असते ती.

**वस्तुस्थितिकथन**, न॰ सं॰ कोणेक वस्तूचें स्तुत्यर्थ, किं॰ निंदार्थ जें अर्थवादादि त्यातें न आश्रयितां केवळ वास्तविक रूपानें जसें आहे तसें

तसें जें कथन तें.

**वस्तस्वभाव**, पु॰ वस्तुशक्ति.

**वस्तूक**, स्त्री॰ रा॰ लहान मुलांस प्रलोभनार्थ देता-न जें खाऊ इ॰ पदार्थ तो.

**वस्त्र**, न॰ कापूस, रेशीम, लोंकर, इ॰कांचे तंतू विणून नेसणें, पांघरणें, इ॰ उपयोगी करितात जो रचना विशेष तें; कोणेकास वस्त्र होणें, प्र॰ दिवाणगिरी इ॰ अधिकार प्राप्त होणें; अधिका-रावरून दूर होणें, यार्थी विपरीत लक्षणेनें प्र॰क-रितात; वस्त्रांतर होणें प्र॰ पहिलें नेसलेलें वस्त्र सोडून दुसरें वस्त्र नेसणें, प्र॰ वस्त्राआड जग ना-गवें.

**वस्त्रपात्र**, न॰ वस्त्र, भांडेंकुंडें, इ॰ तें.

**वस्त्रप्रावरण**, न॰ वस्त्र, उपवस्त्र, इ॰ तें.

**वस्त्रा**, पु॰ मस्तकादिकांवरचे केंस काढायाचे उपयो-गी एक लोहाचें शस्त्र आहे तो; २, ला॰ कडकडीत जो विद्वान् त्यास, किं॰ निस्पृहपणें बोलणारा जो मनुष्य, किं॰ तत्संबंधी भाषण, जिह्वा, इ॰ त्यांस आरोपानें प्र॰.

**वहट**, पु॰ दे॰ ओहोट.

**वहटी**, स्त्री॰ दे॰ ओहोटी.

**वहटणें**, दे॰ ओहोटणें.

**वहडणें**, दे॰ ओढणें.

**वहन**, न॰ वाहन प्रथमार्थी.

**वहमा**, पु॰ प्रत्यक्ष अनुभव नसतां केवल हेतुदर्श-नावरून याणें अमुक कर्म केलें असेल, यापा-शीं अमुक द्रव्य असेल, इ॰ रूप कोणेकाविषयीं कोणेकाचे मनांत झाला असतो जो निश्चय तो.

**वहळ**, पु॰ दे॰ ओहोळ.

**वहाटूळ**, स्त्री॰ वावटळ.

**वहाडणें**, वाढणें.

**वहाण**, स्त्री॰ नद्यादिकांचा वेगविशिष्ट जो प्रवाह तो; २, चालतांना पायांस कंटकादि न लागावें म्हणून जी चर्माची पादुका केली असते जिला बोटें अडकवायास व टांचेस बांधावयास इ॰ अ-नेक चर्माचे बंद संबद्ध केले असतात ती.

**वहाणी**, स्त्री॰ वहाण प्रथमार्थी.

**वहावट**, ३ लिं॰ न॰ रा॰ आंतील मृत्तिकांश नद्या-दिकांचा जलप्रवाहानें धुवून गेलेला आहे ज्या-च्या अशी जी शेतजमीन तो.

**वहावटळ**, स्त्री॰ वहाण प्रथमार्थी.

**वहावण**, स्त्री॰ वहाण प्रथमार्थी.

**वहावणें**, जलादि प्रवाहांत पडलेल्या पदार्थानें त्या प्रवाहाबरोबर जाणें; २, पात्राद्याधार स्थित जो घृतादि पातळ पदार्थ त्याणें प्रवाहरूपें करून त्या पात्राद्याधारापासून निघून जाणें, पक्षीं त्या पात्रादिकांसही कर्तृता; ३, ला॰ भाषणादि व्यव-हारीं कोणेकानें घसरणें; केलेला मसलत, इ॰ व-हावणें, इ॰ स्थलीं फसणें.

**वहावरा**, ३ लिं॰ रा॰ वातविकृतीनें सुटून फार शि-थिल झालेलें जें मनुष्यादिकांचें शरीर, किं॰ पि-डीभाव न पावावयाजोगा अधिक पातळ झाले-ला जो गूळ, चिखल, पीठ, इ॰ पदार्थ तो; २, ला॰ भाषणादि व्यवहारीं वहावण्याचा स्वभाव ज्या-चा असा जो मनुष्य, किं॰ त्याचें तें भाषणा-दि तो; उ॰ तो केवळ वहावरा आहे, त्यास दर्बा-

गांत पाठऊं नका.

**वहाळ**, पु॰रा॰पाणी वहायाचा जो ओढा तो.

**वहाळी**, स्त्री॰रा॰लहान जो वहाळ ती;२, तेरड्यांत एक जाति आहे.

**वहिनी**, स्त्री॰ वडील भावाचे बायकोस धाकटे भाऊ सन्मानार्थ या नामानें व्यवहार करितात.

**वहिवट**, स्त्री॰ वहिवाट.

**वहिवटणें**, वहिवाटणें.

**वहिवाट**, स्त्री॰ संसार, जकात, दिवाणगिरी, राज्य, इ॰जीं खटलीं तीं लेखन, कृषिकर्म, इ॰ तत्साधनीभूत व्यापारानीं चालविण्याचा जो व्यापार ती; उ॰दिवाणगिरीची वहिवाट आह्मी करूं, आणि जकातीची वहिवाट ते करितील;२, शेत, वाडी, वतन, वृत्ति, वस्त्रालंकार, इ॰जें उपभोग्यवस्तु त्यातें आपल्या भोग्य कोटींत वर्तविण्याचा व्यापार ती; उ॰ शंभर वर्षे या वृत्तीची वहिवाट मीं करीत आलों;३, देणें, घेणें, बोलणें, चालणें, इ॰ ना यथायोग्य क्रियानद्वारा त्या त्या अर्थांचा संबंध घडे असें जें त्या अर्थांशीं वर्तन ती; उ॰ निकडेस आमची जाण्या येण्याची वहिवाट नाहीं मग ते कोठून आढळतील.

**वहिवाटणें**, कोणेक अर्थानें वहिवाटीनें विशिष्ट करणें;२, निभावणें.

**वही**, स्त्री॰ बहुत्याचे भोंवतीं उतरंडी रचाया करितां आणितात जो मडक्यांचा समुदाय ती;२, चोपडी, ३, कृपण.

**वहीन**, ३लिं॰दे॰ लागवड जी जमीन, शेत, इ॰ तो.

**वहीवाडा**, पु॰ चयवाडा.

**वहू**, स्त्री॰ सुनेस म्ह॰; म्ह॰ वहू नाहली आणि वाफा शिंपला.

**वहूमाय**, स्त्री॰दे॰ वधूची जी आई तीस विवाहसमारंभामध्यें म्ह॰.

**वळ**, पु॰ मांड्या, कोंखा, कान, यांचे संधि प्रदेशीं कोबट असें एक उठाणूं होत असतें तो;२, सूत्र, दोरी, इ॰कांस जो पीळ असतो तो;३, पु॰स्त्री॰ यष्ट्यादिकरुन प्रहारानें तदाकार जें शरीरादिकांवर चिन्ह उठतें तो ती;४, हस्तपादाद्यवयवांस वायूचे उपद्रवानें एक विलक्षण व्यथा विशेष उत्पन्न होत असतो तो ती;५, स्त्री॰ ओळ.

**वळई**, स्त्री॰दे॰ भूंस, गुळी, इ॰ पदार्थ ठेवाया करितां जें आवृत स्थल करित असतात ती.

**वळकटी**, स्त्री॰ बिछाना, तट्या, आंथरी, पर्ण, इ॰कांची करितात जी गुंडळी ती.

**वळकंबणें**, दे॰ ओळकंबणें.

**वळकंबा**, पु॰दे॰ ओळकंबा.

**वळख**, स्त्री॰ ओळख

**वळखण**, स्त्री॰ दे॰ रुपया इ॰कांवर खुणे करितां जें चिन्ह करित असतात ती.

**वळखणें**, ओळखणें.

**वळखदेख**, स्त्री॰ ओळखदेख.

**वळखपाळख**, स्त्री॰ ओळखपाळख.

**वळखर**, ३लिं॰ पीळदार जो सूत्र, दोरी, इ॰ पदार्थ तो.

**वळखी**, ३लिं॰ ओळखी.

**वळखीदेखी**, ३लिं॰ ओळखीदेखी.

**वळखीपाळखी**, ३लिं॰ ओळखीपाळखी.

**वळघणें**, स॰ उच्चस्थत्वादिकारणामुळें कष्टसाध्य जो कोणेक अर्थ त्याचे लाभाविषयीं अतिशयित प्रयत्नानें त्याजवर झटून पडणें.

**वळचण**, स्त्री॰ गृहादिकांचे मूळपायाचे बाहेरला पागोळ्यांचे आंतील जो प्रदेश ती; २, दे॰ गृहादिकांचे पाखऱ्याचा जो अग्रप्रदेश ती.

**वळण**, न॰ अक्षर, चित्र, शरीर, किं॰ तदवयव इ॰ पदार्थांचे आकाराचे भेदक जे लांबट, उभार, उंचवट, चापट, थपकट, इ॰ अनेक प्रकार ते प्रत्येकीं; २, संसारादि व्यवहारीं वर्तनाविषयीं लागली असल्ये जी बरी वाईट रीति ते; ३, कोणेक मनुष्यादिकाशीं, किं॰ कोणेकस्थलीं चालत असतो जो देणें, घेणें, जाणें, येणें, इ॰ व्यवहार तद्द्वारा त्या मनुष्यादिकांची आणि आपली असल्ये जी स्वाहजिकपणें व्यवहार संबंधिता ते; ४, मार्ग, कृपण, काठी, इ॰ कांचा सरळपणासुटून धनुष्याकार आली असल्ये जी त्यास वक्रता ते; ५, नद्यादिकांचें पाणी विवक्षितस्थलीं न्यावयासाठीं बांधितात जें धरण ते; ६, ला॰ इष्टप्राप्ति आणि अनिष्टनिरसन एतदुपयोगी दर्बार इ॰ कांचेठायीं बांधित असतात जें साधन ते. स्म॰ पाण्याआधीं वळण बांधावें.

**वळणदार**, ३ लिं॰ चांगलें आहे वळण ज्याचें असें जें अक्षरादि तो.

**वळणशुद्ध**, ३ लिं॰ वळणदार.

**वळणीस**, अ॰ वठणीस.

**वळणें**, स्थितिमान्, किं॰ गतिमान् जो कोणेक मनुष्यादि अर्थ त्याचे स्थितीचा, किं॰ गतीचा कोणेक दिशेकडेस असतो जो रोंक तो तदितर दिशेकडेस होई असें त्या मनुष्यादिकानें फिरणें; २, कोणेक दिशेकडेस रोंक धरून चालले जे मनुष्य, गुरें, इ॰ त्यांस कोणेकानें विवक्षित इतर दिशेकडेस रोंक होई असें फिरविणें; ३, गुरें, ढोरें, इ॰ गुराखी इ॰ कानें चारावयास नेणें, आणणें, इ॰ व्यापारानें रक्षिणें; ४, अक्षर, चित्र, इ॰ कानें विवक्षित वळणानें विशिष्ट होणें; ५, अक्षरादिक वळणशुद्ध निघावयाजोगें त्या व्यापारीं हस्तानें घरलें जाणें; ६, पाल्या, सूत्र, पळवा, वृंदावाक्ष्या, इ॰ तत्तत्कार्यसाधनभूत अवयवांनीं यथायोग्य व्यापारेंकरून ते ते झांर, दोर, सुंभ, व्याद, इ॰ पदार्थ सिद्ध होत असें करणें; ७, हस्तपादादिकांनीं वायूचा उपद्रवानें कांहींएक विलक्षण व्यथा होत असल्ये तद्विशिष्ट होणें; ८, कोणाकास कांहीं द्रव्यादि द्यावयाचा प्रसंग असतां त्याजकडे जर कांहीं आपला ऐवज येणें आहे तर त्या ऐवजांत त्यास द्यावयाचा जो ऐवज तो धरून घेणें.

**वळता**, ३ लिं॰ दे॰ दे, कर, यांचा संगीं प्र॰ अर्थ कोणकाचें द्यावयाचें जें द्रव्यादि ते परस्परें.

**वळती**, स्त्री॰ कों॰ स्वतंत्रपणें इतस्ततः फिरणारें जें मनुष्य, पश्वादि त्यांचें पूर्वीं संभावना नसतां कोणेक स्थलीं साहजिक होतें जें आगमन ती. उ॰ दूध उघडें टाकूं नको मांजराची जर कोणी कडून वळती आली तर खाऊन जाईल; २, दे॰ रानामध्यें इतस्ततः गेलेलीं जीं गुरें तीं वळून आणण्याचा जो व्यापार ती, परंतु प्रायः गुराखी

पारें खेळत असतां जाजवर डाव येतो त्याणें गुरें वळावीं असा संकेत असतो म०;३,जुगारांत बाजूचे किं०समोरचे दान धर्ता,किं०लग्न्य यांचा फांसा पडला असतां संकेतितानीं तें द्रव्य घ्यावें याचा फांसा पडला असतां त्यानीं तितकें द्यावें अशा संकेतें मांडितात जें द्रव्य तें.

**वळंबणें**,दे० ओळंबणें.

**वळँबा**,पु० ओळंबा.

**वळँव**,न०ग० अवडधोबड घडलेला असा शेताचा बांध,पाया,इ०कांस लावायाचे उपयोगी जो मोठा धोंडा तें.

**वळवंजी**,स्त्री०रा० गोम म्हणून जो प्राणी त्यांत एक जाति आहे,जीचे अंगास चिकट मळ असतो तो भूम्यादिकांस लागला असतां रात्रीं लकाकतो ती.

**वळवट**,न० खिरीचे उपयोगी वळून करितात जो बोटवे,शेवया,इ०पदार्थ तें.

**वळवटा**,पु० द्वितीयार्थक जें वळण तो.

**वळवटी**,स्त्री० वळकटी.

**वळवणीं**,न०वळवांचें जें पाणी तें;य०वळवणी आलें आणि नळवणी घेऊन गेलें.

**वळवणें**,क्रिना,खरडा,इ०गिरवणें;२,विळवणें द्वितीयार्थी.

**वळवळ**,स्त्री० सर्प,काटू,इ०जे प्राणी त्यांचे अंगास मोडी पडत असें जें चलनवलन ती;२,ला० मनुष्यादिकांनी याकुशीहून त्याकुशीस वळावें. त्या कुशीहून याकुशीस वळावें,लोळावें,इ०रूप जें त्यांचें चलनवलन ती;३,कोणेक विषयींची अंतःकरणास लागलेली चटपट ती;४,दुसऱ्याचा कोणेक व्यापार पाहणें इ०कारणामुळें अंतःकरणाचेठायीं ते तें करावें,अन्यथा चैन पडूं नये असा उत्पन्न होतो जो कांहीं विकारविशेष तो; ५,वळावळ.

**वळवळणें**,वळवळीनें युक्त होणें;२,कोणकांहीं एक करण्याविषयीं अत्युत्सुक होणें.

**वळवा**,स्त्री०कां० उत्तरपर्जन्याचीं जीं पूर्वापासून पुढलीं नक्षत्रें त्या.

**वळवांचापाऊस**,पु० मेघांची गति पूर्वेकडून पश्चिमेकडेस असून जो पाऊस पडतो तो.

**वळविंच,वळविंज**,स्त्री० मुंगीत एक भेद आहे.

**वळसा**,पु०मा०वेटा या अर्थी.

**वळसावणें**,मडकें इ० मृत्तिकापात्र निरदवणें.

**वळापिळा**,पु०पिशाच संचारादि कारणामुळें आंग वळावें पिळावें इ०रूप जो व्यापार तो.

**वळावळ**,स्त्री०रा० कोणेक कर्माविषयीं बरें होऊ,किं०वाईट होऊ पण कसें करून एकदां लौकर संपो असा जो कर्त्याचे अंतःकरणांत भाव उत्पन्न होत असतो ती.

**वळी**,स्त्री० घोडें,इ०कांचे पाठीस खोगीर इ० नलागावें म्हणून त्याचे खालीं घालावयाकरितां उशी सारिखे दोन अवयव एकत्र शिवून करितात जो पदार्थविशेष ती;२,वळकटी.

**वळींव**,उलिं०वळून सिद्ध केला जो सूत्रादिपदार्थ तो;२,जास विशेष पीळ आहे असा जो दोरइ० पदार्थ तो;३,आटीव घटलेलें असें जें शरीर इ०तो;४,दे०पु० वळवांचा पाऊस.

**वळू**,पु० घोडया काढवायाकरितां नियुक्त केला असतो जो घोडा तो.

वळें

**वळें**, न० बोटांत घालावयाकरितां सरासरी घडून जोडल्या च्या आकाराचें सुवर्णादिकांचें भूषण करितात तें.

**वळ्या**, पु० ग्रा० शंखासारखें अस्थिरूप एक प्राण्यंग आहे.

**वळ्हई**, स्त्री० दे० वळई.

**वक्ष**, न० सं० वक्षस्थल.

**वक्षस्थल**, न० सं० उरस्थल.

**वक्षोज**, न० सं० स्तन.

**वाँईसा**, ३ लिं० थोडासा.

**वाँईच**, ३ लिं० ईषन्मात्र.

**वाईट**, ३ लिं० विवक्षित जे गुण असावे ते ज्यामध्यें नाहींत, आणि अविवक्षित जे गुण नसावे ते ज्यामध्यें आहेत, असा जो पदार्थ तो.

**वाईटबरा**, ३ लिं० बरावाईट.

**वाईटवाँकडा**, ३ लिं० दे० वाईट इ० तो.

**वाईटवाणा**, **वाईटवाणी**, ३ लिं० दे० वाईट अशा रूपानें ज्याचा ग्रह होतो तो.

**वाईटसाईट**, ३ लिं० वाईट इ० तो.

**वाईन**, न० कों० कांडावयाचें जें उखळ तें.

**वाईल**, पु० न० अंवल.

**वाउगा**, ३ लिं० ग्रं० वावगा.

**वाक्**, स्त्री० सं० वाणी प्रथमार्थी.

**वाँक**, स्त्री० स्त्रियांचें बाहु भूषण आहे; २, न० रहाट, गाडा, इ० कांचे वक्र जे अवयवविशेष असतात ते प्रत्येकी; ३, पु० न० पदार्थ, भाषण, इ० कांचे ठायीं जी वक्रता असल्ये तो तें; ४, पु० कोणकाचा कोणकाशीं असतो जो विरुद्ध भाव तो.

**वाक**, पु० नाग, आंबाडी, घायाळ, इ० कांचा त्वगादि संबंधी कांढित असतात जो ततु समुदाय तो.

**वाँकडकोँका**, ३ लिं० ग्रा० वांकडमुसका द्वितीयार्थी.

**वाँकडणें**, थंडी लागल्यामुळें कांकडणें.

**वाँकडमुसका**, ३ लिं० वांकडें आहे मुसकें ज्याचें असा जो पदार्थ तो; २, ला० वांकडानिकडा जो काष्ठादि पदार्थ तो.

**वाँकडा**, ३ लिं० विशेषणार्थक जो उजू त्याचा प्रतिपक्षी तो; कोणकाचें कोणकाशीं वांकडें पडणें, असणें, इ० स्थलीं त्याचा त्याचा विरुद्ध भाव पडणें, असणें, किं० त्या परस्परांनीं विरोधी असणें, कोणकाचें वांकडें पाऊल पडणें; य० त्याचे हातून कदाचित परदारागमनादि एखादें दुष्कर्म घडणें.

**वाँकडानिकडा**, ३ लिं० वांकडा इ० तो.

**वाँकडीलैस**, स्त्री० संकेतानें चिंचेचा वृक्षास य०

**वाँकण**, न० मार्ग, नदी, काष्ठ, इ० पदार्थांस मनुष्याकार असल्ये जी वक्रता तें.

**वाँकणें**, वृक्ष, शरीर, इ० पदार्थांनीं वक्रता विशिष्ट होणें; २, मनुष्यादिकानें औद्धत्य सोडून नम्र होणें.

**वाकनी**, स्त्री० ग्रा० पांगडी, धोतर, इ० वस्त्रांची घडी करून तीचे पोटीं दाणे इ० घ्यावयाकरितां करितात जो पात्ररूप अवकाश तो.

**वाँकनिशी**, स्त्री० वाकनिसाचें जें कर्म किं० अधिकार तो.

**वाँकनीस**, पु० श्रीमंत लोकांचे घरीं पाकाकडेस जो मुख्य अधिकारी नियमित केला असतो तो.

**वाकब**, ३ लिं० माहित द्वितीय तृतीयार्थी.

**वाकबगार**, ३ लिं० माहितगार.

**वाकबगारी**, स्त्री॰ माहितगारी.

**वाकबदार**, ३ लिं॰ माहितगार.

**वाँकस**, न॰ तासणी म्हणून जें सुतारांचें आऊत तें.

**वाँकमाळ**, स्त्री॰ रा॰ भातांत एक जाति आहे.

**वाकळ**, स्त्री॰ गोदडी; २, फाटकें जें वस्त्र त्यास म्हणतात.

**वाका**, पु॰ सर्कार, पंच, इ॰ कांस निवेदनीय जें स्वस्थ व्यवहार संबंधी इत्थंभूत वर्तमान तो.

**वाँकाड, वाँकाण**, न॰ वांकण.

**वाँकाळा**, पु॰ कों॰ म्हातारास वांकाचीं नपूर, किंवा नह आली असतां तत्स्थानीं दोरीनें जो बंध बांधितात तो.

**वाँकी**, स्त्री॰ दे॰ वांक म्हणून जें भूषण तीं.

**वाँकीमिस**, स्त्री॰ वांकडी मिस.

**वाँकुडणें**, वाकडणें.

**वाँकुडा**, ३ लिं॰ ग्रं॰ वांकडा.

**वाकुदणें**, ग॰ मनस्वीपणें नाचणें, उडणें, हंसणें, इ॰ व्यापारीं वर्तणें.

**वाँकुल्या**, स्त्री॰ कोणेकानें खिजावें म्हणून त्याचे पुढें हात नाचविणें, किं॰ वेडीं वांकडीं तोंडें विचकणें अथवा त्याचा कांहीं वांकडें चालणें तोंचें बोलणें, इ॰ रूप जा खोडी असतील त्यांचीं अनुकृति करणें. इ॰ जा चेष्टा त्या.

**वाकेनिवीस**, पु॰ राजा कचेरीस बसल्यानंतर त्याचे मुखांतून जीं वाक्यें निघतात तीं सर्व लिहून ठेवावीं म्हणून त्याविषयींचा जो अधिकारी असतो तो.

**वाँकेरी**, स्त्री॰ एक औषधी झाड आहे.

**वाँकोल्या**, स्त्री॰ वांकुल्या.

**वाक्चापल्य**, न॰ सं॰ भाषणाविषयीं कोणेकाचे अंगीं असलेली जी चपलता तें.

**वाक्पारुष्य**, न॰ सं॰ कोणेकानें उद्देशून जें शिवी, गाळी, इ॰ रूप दुर्भाषण तें.

**वाक्य**, न॰ सं॰ एका क्रियेशीं क्रियाकारक भावादि संबंधानें अन्वित होणारीं जीं अनेक पदें त्यांचा जो त्या क्रियापदानें विशिष्ट समुदाय तें; २, धर्मशास्त्रादिसंबंधी शास्त्रार्थबद्ध जो गद्यपद्यात्मक पदसमुदाय तें; वाक्यपद्धति, वाक्यरचना, इ॰ स॰ जाणावे.

**वाक्यार्थ**, पु॰ वाक्यनिष्ठ पदांपासून निष्पन्न होतो जो विशिष्ट वाक्याचा अर्थ तो.

**वाक्यालंकार**, पु॰ तेंतें किं नाहीं, जे आहेत आपला, इ॰ शब्दांचा अर्थ तात्पर्यावांचून तो कोणेकाचे भाषणामध्यें केवल वाक्य शोभार्थ प्रयोग असतो तो.

**वाक्सरणि**, स्त्री॰ सं॰ अस्खलितपणें त्वरेनें चालला असतो जो वाणीचा प्रवाह तो.

**वाक्सिद्धि**, स्त्री॰ सं॰ वाणींतून जीं अक्षरें निघतात तीं खरीं होत असावीं एतद्विषयीं कोणेकास सिद्धि असते ती.

**वाक्स्तंभ**, पु॰ गडिवर इ॰ कारणामुळें भाषणव्यवहारीं वाणीचा जो कुंठी भाव होतो तो.

**वाख**, पु॰ वाक.

**वाखंडी**, स्त्री॰ एक औषधीलता आहे; २, पायाळ, अननास, यांचा जो वाख ती.

**वाखबट**, स्त्री॰ दे॰ वाखाची जी बट ती.

**वाखल**, स्त्री॰ कों॰ क्षुधा इ॰ कारणानें पोटास पडते जी खळी ती.

**वाखलणें**, मनुष्यादिकानें वाख्यानें युक्त होणें.

**वाखा**, पु॰ मोडशी, हगवण, पोटशूळ, इ॰ रोगानीं प्रकृतावस्था पालटून जी कांहीं विकृति होते ती.

**वाखाणणी**, स्त्री॰ नावाजणी.

**वाखाणणें**, नावाजणें.

**वाखाळणें**, दे॰ वाखलणें.

**वाग**, स्त्री॰ जाणें, येणें, बसणें, उठणें, इ॰ व्यापारानीं सव्यापारपणें जें कोणेकाचें कोणेकस्थळीं वर्तन तें.

**वांग**, पु॰ मांसें, रुपें, इ॰ कांस मारखून, शिरें, इ॰ कांचा संबंध असल्यामुळें त्याजवर जो काळा डाग मारितो तो; २, मनुष्यांचे मुखादिकांवर जो जन्मतांच असतो, किं॰ कालांतरानें उठतो जो काळसर डाग तो; त्स॰ येतील वांग तर फेडतील पांग; ३, धातुमय पात्रादिकांवर जे हातोड्यांचे ठोके असतात ते प्रत्येकीं.

**वागटी**, स्त्री॰ मत्स्यांत एक जाति आहे.

**वागणूक**, स्त्री॰ वाग; २, कोणेकस्थळीं कोणेकानें वागवून घेतल्यामुळें जी कोणेकाची नांदणूक ती.

**वागणें**, कोणेक मनुष्यादिकानें गृहादिस्थलरूप, किं॰ राज्यकारभार इ॰ व्यवहाररूप जें अधिकरण त्याचेठायीं निजणें, बसणें, उठणें, हिंडणें, बोलणें, चालणें, लिहिणें, इ॰ यथायोग्य स्वस्व्यापार करीत वर्तत असणें; २, अंतःकरणांत काम क्रोधादि, किं॰ कोणेक वर्ग वाईट गोष्ट, किं॰ जनांत कोणेक धर्म, किं॰ चाल इ॰ अर्थांनीं तत्तदधिकरणीं वर्तत असणें. हा सर्व पहिल्या लक्षणाचाच प्रपंच; उ॰ तुम्हीं सांगितलें तें माझे मनांत वागतें आहे विसरलें नाहीं; आपले हात पाय वागताहेत तों दुसऱ्यास काम सांगूं नये.

**वागबारस**, स्त्री॰ गोवत्सद्वादशी.

**वागवणें**, गर्भ, ओझें, इ॰ कांनीं त्यांचा भार सभाळून वाहणें; भृत्य, अधमर्ण, इ॰ कांस वागवून घेणें, त्स॰ त्यांपासून कार्यादिकांत कांहीं अंतर पडलें असतां त्याविषयीं क्षमा करून निभावणी होई असें संभाळून घेणें.

**वांगी**, स्त्री॰ एक झाड आहे.

**वांगीभात**, पु॰ वांगी, मसाला, इ॰ द्रव्यें आंत घालून जो भात करितात तो.

**वागुऱ्या**, स्त्री॰ कों॰ जें वस्त्र फाटूं नये अशी विवक्षा आहे तें फाटून त्याच्या झाल्या जा चिंध्या त्या; उ॰ पर्वां नुगती नवी साडी घेतली तिचा दहा दिवसांत पोरीनें वागुऱ्या करून टाकल्या.

**वांगें**, न॰ वांगीचें जें फळ तें.

**वाग्दत्त**, ३ लिं॰ वाचादत्त.

**वाग्दान**, न॰ वाग्निश्चय.

**वाग्निश्चय**, पु॰ मी आपली मुलगी तुमचे मुलास देतों आणि तुमची मुलगी आपल्या मुलास करितों एतन्निश्चयप्रधान एक विवाहांग कर्म आहे.

**वाग्बाण**, पु॰ दुसऱ्याचे अंतःकरणास बाणासारिखें

रिखें भेदणारें जें वचन त्यास म्ह०.

**वाग्मी**, ३ लिं० सं० भाषण व्यापाराविषयीं जो परमपटु तो.

**वाग्वल्लरी, वाग्वल्ली, वाग्विलासिनी**, स्त्री० ग्रं० सरस्वती म्हणून जी देवता तीस म्ह०.

**वाघ**, पु० आरंण्यक एक प्रबल पशु आहे; २, ला० शूर, विद्यादिगुणानें जो प्रखर त्यास म्ह० त्या राज्यांत वाघ आणि मेंढी एकत्र पाणी पिताआहेत, एथें राजाचे प्रभावानें परस्पर जे शत्रु त्यांचानें समीप असतांही एकमेकाचें वांकडेंकरवत नाहीं असा अर्थ.

**वाघनवडा**, पु० उठाणरूप एक रोग आहे जो प्रा० तळहातास होत असतो.

**वाघट**, न० ग० लहान जातीचा जो वाघ तें.

**वाघंटी**, स्त्री० दे० एक लता आहे.

**वाघंटें**, न० वाघंटीचें जें फल तें.

**वाघनख**, न० वाघाचें नख जें सुवर्णानें संबद्धकरून मूलांस भूषण करीत असतात तें.

**वाघबीळ**, न० ग० वाघानें रहावयाचें जें पर्वतादिकांस बीळ असतें तें.

**वाघमाऱ्या**, ३ लिं० वाघास मारलें आहे ज्याणें असा जो शिपाई इ० त्यास म्ह०; २, ग० हरीक, लागरी सुपारी, इ० जे कितीएक पदार्थ त्यांचे लागरेपणाचा अतिशय वर्णावयाचा असतां त्यास म्ह०.

**वाघमेंढी**, स्त्री० कितीएक खड्यांस वाघ अशी संज्ञा ठेवितात आणि कितीएकांस मेंढी अशी संज्ञा ठेवितात अशा संकेताचा बुदबळांसारिखा एक खेळ आहे, प्रा० अनेक व० प्र०.

**वाघर**, स्त्री० दे० आरंण्यक जे हरिणादि पशु त्यांस धरायाचे उपयोगी जें जाल असतें तें.

**वाघरूं**, न० वाघास निंदेने म्ह०.

**वाघवें**, न० कोणेकस्थलीं व्याघ्रकरून उपद्रवाचा जो कांहीं काल अतिशय होतो तें; २, ला० चोरादिकृत उपद्रवाचें जें कोणेकस्थलीं बाहुल्य असतें त्यासही जाणें, येणें, इ० प्रसंगीं म्ह०.

**वाघळ**, स्त्री० दे० वाघूळ.

**वाघा**, पु० वा० वाघ्या.

**वाघांटी**, स्त्री० वाघंटी.

**वाघांटें**, न० वाघंटें.

**वाघावें**, न० वाघवें.

**वाघी**, स्त्री० भंडार ठेवायाकरितां वाघ्येलोक व्याघ्रचर्माची जी पिशवी करितात ती; २, व्याघ्रमुखाचे चिन्हानें युक्त असून त्वरेनें चालणारी अशी एक नौका असत्ये ती; ३, पिंवळ्यारंगाचे वस्त्राची आणि वर काळे पट्टे अशी व्याघ्रचर्मासारिखी जी घोड्यास झुरकी करितात ती; ४, लांकूड तासत्ये समयीं आश्रयार्थ त्याजखालीं घालायासाठीं जो लांकडाचा तुकडा घेतात त्यास म्ह०.

**वाघीकवडी**, स्त्री० कवडींत एक भेद आहे, जीचा वर्ण व्याघ्रचर्मासारिखा असतो ती.

**वाघीतंबाखू**, स्त्री० व्याघ्रचर्मासारिखा रंग असून जीचें पान दळदार असतें अशी एक प्रकारची तंबाखू आहे.

**वाघूळ**, न० वडवाघूळ.

वाघेंटी

**वाघंटी**, स्त्री॰ को वाघंटी.

**वाघंटें**, न॰ वाघंट.

**वाघोबा**, पु॰ समयविशेषीं वाघ आणि वाघ्या यां-स त्य॰.

**वाघ्या**, पु॰ एक खंडोबाचा भक्त आहे, जो गळ्यांत भंडाराची वाघी घालून देवाचे नांवावर भिक्षा मागत असतो.

**वाङ्नियम**, पु॰ सं॰ कोणेक कर्मांत अमुक कालपर्यंत बोलूं नये असा धरिलेला जो नियम तो.

**वाङ्निश्चय**, पु॰ वाग्निश्चय.

**वाचक**, ३ लिं॰ जा अर्थातें शक्तीनें बोधवितो ओश-ब्द तो त्या अर्थाचा; २, पुराणादि ग्रंथ वाचणारा जो पुरुष तो.

**वाचणी**, स्त्री॰ पाटीवर लिहिलेलीं अक्षरें वाच-ण्याचा जो व्यापार तो, सांग, शिक, इ॰ धा॰ ना॰ प्र॰.

**वाचणें**, लिहिलेला ग्रंथ, अक्षरें. इ॰ पाहून तीं त्या प्रमाणें उच्चारणें.

**वांचणें**, जगणें.

**वाचनिक**, ३ लिं॰ सं॰ आर्थिकार्थसिद्ध, ज्ञापकसि-द्ध, असा नव्हे साक्षात् वचनानेंच प्रतिपादित अ-सा जो विधिनिषेध इ॰ रूप कोणेक अर्थ तो.

**वाचस्पति**, पु॰ सं॰ बृहस्पति.

**वाचा**, स्त्री॰ वाक्; २, रा॰ अवसरणी; तुझी वाचा सा-रवरेनें भरो, एथें तुझें तोंड साखरेनें भरो, असा अ-र्थ; वाचा विटाळणें, त्य॰ कोणेक कार्यार्थ शब्दख-रचणें; वाचा फोडणें, त्य॰ कोणेकातें उद्देशून हा मरेल, याचें निसंतान होऊ, इ॰ अभद्र शब्दोच्चा-र करणें.

**वाचादत्त**, ३ लिं॰ वाचेनें कोणेकास दिल्हा जो अर्थ-तो.

**वाचाल**, ३ लिं॰ अप्रयोजकपणें मनस्वी भाषण क-रण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**वाचाशक्ति**, स्त्री॰ पुस्तकादि अस्खलितपणें ख-रेनें वाचावें अशी जो कोणेकाचे वाणीविषयीं शक्ति असते ती; २, को॰ वाचालपणा; उ॰ तुम्ही अमळसें तोंड आटपून धरीत जा भारी वाचाश-क्ति करूं नका.

**वाचाळ**, ३ लिं॰ वाचालशब्दाचा अपभ्रंश.

**वाचिक**, ३ लिं॰ सं॰ वाणीचे व्यापारानें घडलें जें पात-क पुण्यादि तो.

**वाची**, ३ लिं॰ वाचक प्रथमार्थी परंतु ना॰ समासीं प्र॰; उ॰ शुक्ल, कृष्ण, इ॰ शब्द कदाचित् गुणवा-ची होतात, कदाचित् गुणीवाचीही.

**वांचून**, अ॰ जा अर्थाचा राहित्येंकरून, तेथें त्यावां-चून असा प्र॰; उ॰ रुपये घेतल्यावांचून आऊं न-को.

**वाच्य**, ३ लिं॰ सं॰ जें पद उच्चारिलें असतां जा अ-र्थाचा बोध होतो तो अर्थ त्या पदाचा; २, न॰ को॰ वाच्यता या अर्थी.

**वाच्यता**, स्त्री॰ कांहींएक गुप्त गोष्टीची जी प्रसिद्धि ती.

**वाच्यवाचकभाव**, पु॰ सं॰ वाच्य अर्थाचा आणि वाचक शब्दाचा असतो जो परस्पर संबंध तो.

**वांछा**, स्त्री॰ सं॰ इच्छा.

**वांछिणें**, इच्छिणें.

**वाजणें**, वाद्यादिकानें शब्द युक्त होणें; २ ना॰ कां-हीं

ही एक गुप्त गोष्ट प्रसिद्धीस येणें; ३, ग० काठी, वांसा, इ० भार पडणें, इ० कारणामुळें केवळ द्विभाग न होतां ईषत भग्न होणें; त्याजवरोवर सारादिवस तोंड वाजवावें लागतें इ० स्थलीं तोंडानें बडबड बोलावें लागतें असा अर्थ; वाजत ढोलानें येणें, जाणें इ० स्थलीं अपराधादि निरसन करून, अथवा कोणास न भितां जाणें, येणें, इ० अर्थ होतो; थंडी, हीव वाजणें, त्य० लागणें.

**वाजणेंगाजणें**, को० पर्जन्यानें विद्युत्, स्फुरण, गर्जना, इ० चिन्हांनीं विशिष्ट होणें; २, ला० गुप्त गोष्ट प्रसिद्ध होणें.

**वाजतगाजत**, अ० वाद्य, गर्जना, प्रधान समारंभानें जाणें, येणें, मिरवणें, इ० कांचें वि०.

**वाजंत्र**, न० मंगल कार्यादिकांच्या ठायीं वाजवायाचा सूर, सनई, इत्यादि प्रधान जो वाद्यांचा जोड त्यांतील जीं वाद्यें तीं प्र०.

**वाजंत्री**, पु० वाजंत्र वाजवून त्याजवर उपजीविका करितो तो.

**वाजपुर्शी, वाजपूस**, स्त्री० को० विचारपूस.

**वाजबासिती**, स्त्री० कांहीं एक व्यवहार पूर्वी होऊन गेला आणि त्याचा कागदपत्र करायाचा असतां ज्या मितीचा व्यवहार झाला ती जी मांडितात मिती ती.

**वाजवी**, ३ लिं० वाजवी.

**वाजवी**, ३ लिं० न्याय्य.

**वाजावाजवी**, ३ लिं० को० वाजवी.

**वाजी**, पु० सं० घोडा.

**वाजीबासिती**, स्त्री० वाजबासिती.

**वांझ**, स्त्री० वंध्या; २, पु० ज्याचे वीर्यापासून अपत्योत्पत्ति होत नाहीं असा जो पुरुष तो; त्य० वांझेस कानबोळ कडशाला.

**वांझखडा**, पु० पोर न व्हावें म्हणून औषध घेत असतात त्यास त्य०.

**वांझट**, ३ लिं० वांझा.

**वांझटोळी**, स्त्री० रा० वांझेस निंदेनें त्य०.

**वांझा**, ३ लिं० वंध्य प्रथमार्थी; २, जो पुष्पाच्या फलरूप परिणाम होत नाहीं असें जें तोंडलीं, दोडकीं, इ० कांचें पुष्प तें; ३, आंत असायाचा जो गर, दाणे, कण, इ० रूप अंश तद्रहित जें फळ, शेंग, धान्य, इ० तें; ४, ज्यामध्यें गर, दाणे, फार थोडे असा जो फणस, शेंग, इ० तो.

**वांझा**, पु० वांधा.

**वांझापुनव, वांझापूर्णिमा**, स्त्री० पौषीपूर्णिमा.

**वांझोटा, वांझोडा**, ३ लिं० वंध्यप्रथमार्थी; २ पु० वांझ जो पुरुष तो.

**वांझोटी**, स्त्री० वांझ जी स्त्री ती.

**वाट**, स्त्री० मार्ग; ग० वाट वावरणें, त्य० ज्या कामाचे उद्देशें कोठें गेला तेथून तें काम न होतां हलपटा खाणें; २, कांहीं एक गोष्टीचा होत्य जी गति तीस प्रसंगविशेषीं त्य०, उ० या पंचाइतीची काय वाट होईल ती पाहू आतां; कोणेक द्रव्यादि पदार्थांची वाट लागणें, त्य० विरुद्ध वाट लावणें; कोणेक मानस झालें अडचण संकट इ० कांची वाट करणें, त्य० तन्निहित पर्यायें निर्वाहाचा उपाय करणें; कोणाकानें कोणाची वाट पाहणें, रु० मार्गप्रतीक्षा करणें; वाट मारणें त्य० वाटेनें जाणारा जो मनुष्य, त्यास

तो विवक्षितस्थळीं न आऊं देतां मध्येंमध्यें लुटून घेणें: कांहींएक वाटेवर पडणें. त्य॰ फुकाचें लागणें, निषेधविषयीं प्र॰.

**वाटकाढू, वाटकाढ्या**, पु॰ वाटाड्या.

**वाटकाळ**, अ॰ बहुतकाळपर्यंत; बसणें, वाटपाहणें इ॰ कांचें वि॰; २, पु॰ बहुतजो वेळ तो.

**वाटखर्ची**, स्त्री॰ वाटेंत खर्च करायाकरितां घेतात जें द्रव्य तें.

**वाटखोळ**, अ॰ पु॰ वाटकाळ.

**वाटगा**, पु॰ वाडगा.

**वांटच्या**, अ॰ कों॰ वारच्या.

**वाटचाचोर, वांटेचाचोर**, पु॰ अमुक वस्तूची अमुकप्रमाणाची किंमत भलता कोणी एक देईल असें बोलायाचे प्रसंगीं त्या भलत्या कोणास त्य॰. उ॰ या पागोट्याचे दाहा रुपये वाटचाचोर देखील देईल.

**वाटचावाटसरू, वांटेचावाटसरू**, पु॰ जो स्थळाचा, किं॰ जो व्यवहाराचा ज्यास संबंध नाहीं आणि माहितगारही नाहीं असा जो कोणी वाटेनें जात असतो त्यास तेथें त्य॰.

**वाटण**, न॰ वाटायाकरितां घेतलें जें द्रव्य तें; २, वाटण्यानें होतो जो त्या पदार्थावर संस्कार तें.

**वाटणा**, पु॰ वाटाणा.

**वांटणी**, स्त्री॰ कांहीं द्रव्यादि पदार्थ वांटण्याचा जो व्यापार तो; २, त्या व्यापारानें आले जे पृथक्पृथक् विभाग ते प्र॰.

**वांटणीपत्र**, न॰ कों॰ कोणेक पदार्थाचे वांटणीच्या पुढें माग विवाद नपडावा इत्याद्यर्थ तद्विषयींचें जें पत्र करित असतात तें.

**वांटणें**, द्रव्यादिरूप कोणेक अर्थाचे अनेक विभाग अनेक विभाग्यांशीं संबद्ध होत अशा प्रकारें तो अर्थ विभक्त करणें, किं॰ कोणेक अर्थ अंशतः अंशतः अनेक विभाग्यांशीं संबद्ध करणें: उ॰ ही जागा वांटलेली आहे; ब्राह्मणास दक्षणा वांटली.

**वाटणें**, पाटा इ॰ कांवर कांहीं पदार्थ घालून तो वरवंटा इ॰ कांचे फिरविण्यानें विवक्षानुरूप बारीक करणें; २, त्य॰ कोणेक गोष्टीचा निर्णय व्हावा म्हणून ती गोष्ट अनेकांनीं मिळून विचारपूर्वक घोळणें: त्य॰ वेद्याचें वाटलें आणि संन्याशाचें मुंडलें कोणास समजत नाहीं; ३, कोणेक अर्थ हा बरा, हा वाईट, हा होईल, हा जाईल, हा अमुक, इ॰ कोणेकरूपेंकरून मनोवृत्तीनें घेतला जाणें; उ॰ आज पाऊस पडेलसा वाटतो; या रंगाचें पागोटें मला चांगलें वाटतें; ४, हें म्या करावें, यास हें द्यावें, अमुकस्थळीं जावें इत्यादिप्रकारें कोणेक गोष्ट इच्छाविषय होणें; उ॰ संसार सोडावासें वाटतें; मला काशीस जावेंसें वाटतें.

**वाटनीट**, स्त्री॰ जी मध्यें खडतरपणा, व्याघ्र, चोरादिभय, इ॰ अनेक शंका संभावना आहे अशी अनेक प्रकारची देशांतरादिकांस जावयाची जी वाट ती, प्रथमांत प्रयोग प्रा॰ नाहीं; उ॰ वांटनिटेनें संभाळून जा.

**वांटप**, न॰ गो॰ वांटणी प्रथमार्थीं.

**वांटपपत्र**, न॰ गो॰ वांटणीपत्र.

**वाटपाडू**, अ॰ लि॰ मार्गांतील रहदारी बंद व्हावया जोगें कोणकास मारावें, लुटावें, असें कर्म कर-

णारा जो तो.

**वाटपाड्या**, ३ लिं॰ वाटपाडू.

**वाटपिठाच्या**, ३ लिं॰ रा॰ डाळ, तांदूळ, इ॰ भिजवून, वाटून त्याचा करितात जो वडा, उंडा, इ॰ तो.

**वाटमार्गी**, पु॰ वाटसरू.

**वाटमाऱ्या**, ३ लिं॰ वाटपाडू.

**वाटवणी**, स्त्री॰ वाटवण्याचा जो व्यापार तो; २. न॰ संकेतानें सूत्रास म्ह॰.

**वाटवणें**, ग॰ गतीनें अतिक्रांत होत चालले जे देश, काल, इ॰ त्यांचे पूर्वापार भागामध्यें अवधिलेंकरून मानिलेला जो पर्वत, पर्व, इ॰ काहीं त्यानें अतिक्रांत करणें: उ॰ ही खांदेरी वाटवली म्हणजे मुंबई दिसूं लागेल.

**वाटवा**, पु॰ सराफ इ॰ कांची द्रव्यादि ठेवायाची आकार विशेषाची एक पिशवी आहे.

**वाटशेक**, अ॰ रा॰ या शेवटापासून त्या शेवटपर्यंत सगळ्या वाटेनें व्यापून वृक्षादिकांचें असणें, कांहीं एक मांडत जाणें, इ॰ कांचें वि॰.

**वाटसरू, वाटसारू, वाटसुरू, वाटसूर**, पु॰ स्वकीय गृहादिस्थलापासून निघून देशांतरास, किं॰ ग्रामांतरास जावयास मार्गी लागला आहे जो तो, अनेकवचनी नपुंसकींही प्रयोग होतो.

**वाँटा**, पु॰ एका पदार्थाचे जे अनेक अंश ते प्र॰

**वाटाडी, वाटाड्या**, पु॰ मार्ग दाखवायासाठीं वगैरे जो कोणी माहितगार येत असतात तो.

**वाटाणा**, पु॰ एक द्विदल धान्य आहे: कोणेकास वाटाण्याची अक्षत देणें, किं॰ लावणें, म्ह॰ त्याणें नाथिलेल्या अर्थाविषयीं स्पष्ट नाहीं म्हणून सांगणें.

**वाटांदुळा, वाटांदूळ**, पु॰ को॰ सडीक तांदुळामध्यें माठी आडजी कणी निघते तो.

**वाटारणें**, वटारणें.

**वाटावाट**, स्त्री॰ कोणेक गोष्टीतील तात्पर्यार्थ समजावा इ॰ कारणार्थ अनेक शंका तर्कादिपूर्वक घोळ घालून जी चौकशी तो.

**वाटिका**, स्त्री॰ सं॰ फुलझाडें इ॰ कांचा जो बाग तो; वृक्षवाटिका, पुष्पवाटिका, इ॰ समास.

**वाटी**, स्त्री॰ रुपें इ॰ धातूचें नरोटीचे आकाराचें जें पात्र असतें तें; २. नारळ मधोमध फोडिला असतां जे दोन अर्धे होतात ते प्र॰; ३. गुडघ्यावरचें जें वर्तुल अस्थि तें; ४. सं॰ वाटिका.

**वाँटेकरी**, पु॰ विभागी.

**वाँटेदार, वाँटेलदार**, पु॰ विभागी.

**वाँटेली**, पु॰ विभागी.

**वाटोळा**, ३ लिं॰ मध्यकेंद्रापासून सभोंवतान्यापरिधीशीं अंतर सारखें असतें अशा आकाराचा जो दगड, स्थल, इ॰ पदार्थ तो, किं॰ तो त्याचा आकार, २. लांबट असून गोल असा काठी, नळ, कांडें, इ॰ जो पदार्थ तो; कोणेकाचें वाटोळें होणें, म्ह॰ नाश व्ययादि होऊन कांहीं राहिलें नाहीं अशी अवस्था होणें.

**वाटोळागोटा, वाटोळाधोंडा**, पु॰ भाषणादि व्यवहारीं दुसरा पगीं धरूं म्हणेल तर सांपडायाचा नाहीं असा पंजाबी जो मनुष्य त्यास म्ह॰.

**वाँठ**, स्त्री॰ महिष जातीय जें स्त्र्यपत्य तें.

**वाँठरूं**, न॰ को॰ वांठीसच निंदेनें, किं॰ लघुत्ववर्णनप्रसंगीं

प्रसंगीं त्य॰.

**वाँठीं**, न॰कों॰ तृणादिकांनें धान्यादिपदार्थांचा बांधितात जो मुडा तें.

**वाँठीचापिता**, पु॰कों॰ संकेतानें मूर्खास म्ह॰.

**वाँठयें**, न॰कों॰ वांठीं.

**वाड**, न॰रा॰ वाढें.

**वाडकर**, पु॰कों॰ वाडीचा वतनदार जो धनी तो.

**वाडकुलें**, न॰कों॰ आवाड.

**वाडगा**, पु॰ मोठी जी धातुमय वाटी तो.

**वाडगें**, न॰दे॰ वाडकुलें.

**वाडणें**, रा॰ वाढणें प्रथमार्थी.

**वाडप**, न॰रा॰ वाढप.

**वाडया**, पु॰रा॰ सुताराचे नावापुढें प्रतिष्ठार्थ याचा प्रयोग करितात.

**वाडवळ**, पु॰ हिंदूंत एक जाति आहे.

**वाडा**, पु॰श्रीमंत लोकांचें जें मोठें घर तो; राजवाडा सर्कारवाडा, इ॰स॰; २, एका गांवाचे पाटी जे अनेक पाडे असतात ते प्रत्येकीं; या अर्थी देऊळवाडा, ब्राह्मणवाडा, गोळवाडा, इ॰स॰; ३, आंत कांहीं माल सांठवून ठेवावा, किं॰ कांहीं कारखाना ठेवावा इत्यादि अर्थ सभोंवतें वांसे इ॰ पुरून आवृत केलें असतें जें स्थळ तो; ४, गुरें, शेळ्या, मेंढया, इ॰ बांधावयाकरितां जें वेगळें घर केलें असतें तो.

**वाडी**, स्त्री॰कों॰ बागायती जमीनीचे आवारादिरूप सीमाचिन्हांनीं जे अनेक विभाग केले असतात ते प्रत्येकीं ती; २, मूळगांवाचे ठाजारी ज्ञानभात इ॰कांचे सोईनें गृहादि बांधून जी वसति होते ती त्या गांवची; ३, रा॰ पित्रादिकांस द्यावयाकरितां थोडकेंसें अन्न वाढून सिद्ध करितात जें पात्र ती.

**वाढ**, स्त्री॰पु॰ मनुष्यादिकांचे शरीराची उत्पन्न झाल्यापासून तारुण्य येई तों उत्तरोत्तर होत चालली असते जी वृद्धि ती तो; २, स्त्री॰ जो धान्यद्रव्यादि पदार्थांचें संख्या प्रमाण निर्णीत असतें तें धान्यादि पुनः मोजिलें मापिलें असतां मापाचा कर्मीपणा इ॰ कारणांनी पहिल्यापेक्षां कांहीं अंशानें होतें जें आधिक्य ती, किं॰ तो अंश ती; ३, वाढी प्रथमार्थी; ४, न॰ वाढें; ५, न॰स्त्री॰कों॰ अंकुर यावयाचा डोळा ज्यास असतो असा जो कोनफळाचा अवयव तें ती.

**वाढण**, न॰पात्रादिकांवर परिवेषण करायासाठीं चेतलें जें भाकर, भात, इ॰ द्रव्य तें, किं॰ तें परिवेषण करण्याचा जो व्यापार तें; २, ब्राह्मणवर्गास भोजनार्थ सोयरे धायरे, किं॰ ठाजारी पाजारी यांजकडून पक्वान्नादि अन्न विशिष्ट जें पात्र येतें तें; ३, अन्यत्र जाऊन भोजन करायाकरितां अन्न वाढलेलें जें कोणाकास पात्र देतात तें.

**वाढणी**, स्त्री॰दे॰ भात इ॰ वाढायाचे उपयोगी परडीचे आकाराचें धातुमय एक पात्र आहे.

**वाढणें**, भक्ष्य भोज्यादि पदार्थ भोजन करायाचे पात्रांत घालणें, पक्षीं त्या भोजन पात्रासही कर्मता; भिक्षा, तेल, पाणी, इ॰ पदार्थ ओळी, समर्ड, पात्र पात्र, इ॰कांत घालणें या अर्थी ही क्वचित प्रयोग करितात; २, कोणेक अर्थानें पूर्व प्रमाणापेक्षां अधिक प्रमाण विशिष्ट होणें, किं॰ विवक्षित प्रमाणाशीं तुल्यता होऊन कांहीं अतिरिक्त होणें;

३. जसें जसें वय वाढतें तसें तसें ज्ञान वाढतें; वा-जागेंतून मणभर दाणे आणले ते घरचे मापानें मोजले तों दोनपायल्या वाढले; ३, युद्धाद्यर्थ को-णेकानें स्वाधिष्ठित स्थान सोडून प्रतिपक्ष्याचे अंगावर जावयाकरितां पुढें होणें; ४, काजळ, कुंकू, धान्य, इ० पदार्थांविषयीं संपलें हा शब्द अभद्र अ-से मानून त्या अर्थीं या धातूचा प्रयोग प्रा० स्त्रि-या करितात; ५, कोणेकाचे आंगीं पिशाचादि वा-रे संचरल्यामुळें मान, हात, इ० शरीरावयव थर-थर हालून अंगाचे स्थानीं विशिष्ट होणें. पक्षीं त्या पिशाचादिकांस करूंन; ६, न० वाढण द्वितीया-र्थीं.

**वाढता**, ३ लिं० वाढत्या अंगाचा; २, वाढत्या चुड्याची जी बांगडी तिचें वि०.

**वाढताचुडा**, पु० ग० कांसारापासून बांगड्या भरि-त्या असतां बोलीपेक्षां अधिक जी एक बांगडी कांसार भरीत असतो तो.

**वाढती**, स्त्री० ग० मुलास जी उचकी लागते तास मंगलार्थ स्त्र०.

**वाढते अंगाचा, वाढत्या अंगाचा**, ३ लिं० अंग कांहीं वाढलें असतांही उपयोगी पडावा म्हणून अंगापेक्षां कांहीं मोठा केला असतो जो आंगर-खा, चोळी, इ० तो.

**वाढदिवस, वाढदीस**, पु० मनुष्य जन्मला म्हण-जे वर्ष होई तों पर्यंत प्रतिमासीं जन्म तिथीस नं-तर प्रतिवर्षी जन्म तिथीस स्नान पूजनादि पूर्वक करावयाचें एक संस्कार कर्म आहे तो.

**वाढप**, न० वाढण प्रथमार्थी.

वाढपी

**वाढपी**, पु० अन्नादि परिवेषण करणारा जो मनुष्य तो.

**वाढलें**, न० कों० वाढण द्वितीय तृतीयार्थी.

**वाढवणें**, स्त्रियांचें सौभाग्य भूषण जें बांगडी, मंग-ळसूत्र, इ० त्यांतें फोडणें, किं० तोडणें.

**वाढवा**, पु० वाढ द्वितीयार्थी.

**वाढवीस**, पु० वाढदिवस.

**वाढवेळ**, पु० अ० दे० वाटकोळ.

**वाढा**, पु० गोमहिष्यादिकांचा संततिरूप जो विस्तार तो.

**वाढावा**, पु० वाढवा

**वाढाळ, वाढाळू**, ३ लिं० संप्रदायापेक्षां थोडक्या वयांत अधिक वाढण्याचा स्वभाव ज्याचा असा जो मनुष्य, पशु, वृक्ष, इ० तो.

**वाढी**, स्त्री० सावकारापासून आपले गरजेस्तव धा-न्यादि कर्ज घेतलें असतां त्या बद्दल व्याजाचे स्था-नीं मूळ द्रव्यापेक्षां अधिक जें धान्यादि बोलीप्रमा-णें द्यावें लागतें तें; २, दे० कढी, वरण, इ० पातळ प-दार्थ इ० वाढावयाचें उपयोगी आकार विशेषाचें मृत्तिकेचें पात्र आहे, प्रा० गृहभाषावृत्ति.

**वाढीदिढी**, स्त्री० वाढीचे बोलीनें कोणी करितो जो व्यवहार तो

**वाढें**, न० खावयाचे उपयोगी नव्हे असा जो ऊसाचा शेंड्याकडील भाग तें.

**वाढोळ**, पु० अ० वाटकोळ.

**वाण**, न० व्रताचरणेंकरून नारिकेलादि फळें किं० सौभाग्य द्रव्यें, किं० पक्वान्न इ० द्रव्यें नेत्रादिकां-चे पात्रांत घालून ब्राह्मणास, किं० सुवासिनीस

जें

जें देतात तें; २, पु० न० शरीर, वस्त्र, इ० संबंधी जो काळा, पिंवळा, इ० वर्ण तो तें; ग्र० दवळ्याचे शेजा- रीं बांधला पांवळा वाण नाहीं पण गुण लागला; ३, स्त्री० संसारादिकांत कोणेक पदार्थाची जी न्यू- नता ती; ग्र० मिठाची केली वाण आणि लोण- चाला पडली घाण. इतरत्र प्रा० निषेधविषयी प्र०.

**वाणक**, न० सं० वाण शब्दार्थी.

**वाणका**, ३ लिं० धडवतीचे उपयोगी टिकाऊ जें धोत- जोडा, पासोडी, इ० वस्त्र तो.

**वाणकूट**, **वाणगट**, न० पु० वाणगंड.

**वाणगंड**, पु० न० वाण्यास निंदनें ग्र०.

**वाणगी**, स्त्री० वानगी.

**वाणजिन्नस**, पु० वाणसवदा.

**वाणणें**, ग्र० वर्णणें.

**वाणवसा**, **वाणवंसा**, पु० नियमानें स्त्रिया ईश्वर प्रीत्यर्थ व्रतादिकर्म करितात तो.

**वाणसवदा**, पु० हिंग, जिरें, मिरें, तूप, गूळ, इ० जो वाण्याचे दुकानावरील जिन्नस तो.

**वाणा**, पु० वस्त्राचें आडवें जें सूत तो.

**वाणानाणा**, पु० वस्त्राचा आडवा उभा जो तंतुसमु- दाय तो.

**वाणिज्य**, न० सं० उदीम व्यापाररूप जें कर्म तें.

**वाणी**, स्त्री० शब्दाचे उच्चारास साधनभूत जिह्वानि- ष्ठशक्तिविशेषात्मक जें कर्मेंद्रिय, किं० तदधिष्ठा- त्री जी देवता ती, किं० तिजपासून उत्पन्न होतो जो वर्णात्मक शब्दसमुदाय तो; २, पु० हिंदूंत एक जा- ति आहे; ३, हिंग, जिरें, मिरें, गूळ, इ० जिन्नस विकणारा जो दुकानदार तो; ४, अ० कोणेक अर्थी- जी मदत होईं असें होणें, असणें, इ० कांचे वि०; इ० वेड्यावाणी काय बोलतास.

**वाणीउदर्मा**, पु० वाणीतांबोळी इ०.

**वाणीबकाल**, पु० वाणीउदमी.

**वात**, स्त्री० दिवाळावणे इत्यादि अर्थ कापूससूत, वस्त्र, याचा पीळ घालून जो ततू म्हणजे पदार्थ करिता- त ती, फुलवात, वेलवात, इ० स०; २, केवळ कांवळे अनएव वारीक जें पदचळ, रोगव्याचीरोग, इ० कांस ग्र० ३, गलवताचे ओजार गुंडाळून जी लांबट गुंडळी क- रितात ती; ४, ग० समर्दुस जो वाती लावायाची पर असतात ती प्र०; ५, पु० सं० वायु; आमवात, धनुर्वा- त, इ० स०.

**वांत**, स्त्री० वांतिशब्दाचा अपभ्रंश.

**वातज्वर**, पु० वात प्रधान जो ज्वर तो.

**वातट**, **वातड**, ३ लिं० ज्याचे आंगी खुसखुशीतपणा इ० नाहीं, अनएव तुटतानुटत नाहीं, असा जो भा- कर, पोळी, फणसपोळी, इ० पदार्थ तो; २, ला० दु- सऱ्यानें कितीही धिक्कारिलें, निषेधिलें, असा तरी अवमान न मानितां, त्याशीं ततुटता निर्लज्जपणें भाषणादि व्यवहार करण्याचा स्वभाव ज्याचा तो म- नुष्य, किं० त्याचें तदनुरूप जें भाषण तो.

**वातबद्ध**, ३ लिं० बद्धतकरून पोट फुगावें, मलशुद्धि साफ होऊं नये मेदोवृद्धीनें स्थूलतायावी, इ० रूप वातविकृति विशिष्ट जें शरीर, किं० त्याची प्रकृति तो.

**वातविध्वंस**, पु० वातनाशक एक रसायन आहे.

**वाना**, पु० को० कवाडाचे फळीस जी कुसे असतात ती स०

**वाताहत, वाताहात**, स्त्री॰ जमलेल्या जो संसार, व्यवहार, फौज, गांव, इ॰ त्यांचे अवयव लुटणें, नागवणें, वाऱ्यानें उडणें, पळणें, मरणें, इ॰ कारणानें चहोंकडे झाल्यामुळें होतो जो त्या संसारादिकांचा विध्वंस तो.

**वांति**, स्त्री॰ भक्षिलेल्या पदार्थाचें पित्तक्षोभादि निमित्तानें जें मुखाकडून उलटें बहिःपतन होतें तें; २, तिणेंकडून पडतें जें तें अन्नादि तें.

**वातूल, वातूळ**, ३ लिं॰ वातबद्ध; २, ज्याचे भक्षणानें पोट फुगावें इ॰ वात विकृति होत्ये असा जो पावटा, हरभरा, उडीद, देवडांगर, पोपया, इ॰ पदार्थ तो.

**वातेरें**, न॰ वाती करायाचे उपयोगी जो वस्त्राचा तुकडा असतो तें; २, ला॰ केवळ झिरझिरीत जीर्ण झालें जें वस्त्र त्यास म्ह॰; ३, दे॰ वाना.

**वात्या**, पु॰ वाना.

**वात्सेरें**, न॰ को॰ वातेरें नूर्तायार्थी वात्सून

**वात्रट**, ३ लिं॰ दे॰ वानर.

**वात्सल्य**, न॰ सं॰ वत्सलत्व.

**वाथंग**, पु॰ दे॰ वाधंग.

**वाथंग्या**, ३ लिं॰ वाधंग्या.

**वाथ्या**, पु॰ दे॰ कुटणें याचा योगीं प्र॰; अर्थ, जांत कांहीं लाभ नाहीं, आणि रसही नाहीं, उगीच कंटाळा मात्र येणार, असा भाषणव्यापार करणें.

**वाद**, पु॰ कोणेक विषयाविषयीं उभयतां परस्पर विप्रतिपन्न होऊन स्वस्वपक्षस्थापनाविषयीं वाग्व्यापारानें करितात जें भांडण तो; २, कोणेक अर्थाचे निर्णयाद्यर्थ परस्परांचें जें प्रश्नोत्तरादिरूप भाषण तो; ३, अमुक गोष्ट अमुक काळीं होणार, किं॰ अमुकानें अमुक कर्म केलें, किं॰ अमुक गोष्ट अमुक प्रकारची आहे, इ॰ रूप कोणेक अर्थाविषयीं लोकांमध्यें चालला असतो जो भाषणव्यवहार तो; उ॰ त्या लढाईंत त्याणें तरवार मारली असा वाद लोकांत आहे आणि तुह्मी ह्मणता तो पळाला; ४, को॰ कहाणेस जो अनेक वाद्या असतात त्या प्रत्येकीं.

**वादग्रस्त**, ३ लिं॰ सं॰ जो वृत्यादि विषयांविषयीं वादिप्रतिवादी यांचा तंटा आहे, तो वृत्यादि विषय.

**वादणा**, पु॰ गा॰ वाधणा.

**वादन**, न॰ सं॰ वाद्यादि वाजविण्याचा जो व्यापार तें.

**वादप्रतिवाद**, पु॰ एकानें पूर्वपक्ष करावा, एकानें समाधान करावें, एतद्रूप परस्परांचा चालतो जो भाषणव्यापार तो.

**वांदर**, पु॰ वानरशब्दाचा अपभ्रंश.

**वांदरखट**, न॰ वानरखट.

**वांदरतेल**, न॰ वानरतेल.

**वादविवाद**, पु॰ वादप्रतिवाद.

**वादळ**, न॰ वृक्ष मोडावे, गल्बतें बुडावीं, घरें पडावीं, धुरळा उडावा, इ॰ अनर्थ व्हावयाजोगा होतो जो वायूचा अतिशय तें.

**वादळणें**, क्रि॰ कोणेकानें क्रोधावेशादि कारणामुळें आपल्याला, दुसऱ्याला, शिवी गाळ इ॰ करीत रुकसारखें मनस्वी बडबडणें.

**वादा**, पु॰ को॰ गोमहिष्यादि पशूंस लाळ यावी, पाय धरावे, इ॰ रूप विकृतीची जी धाम येत्ये तो.

**वादित**, ३ लिं॰ सं॰ वादन केलें ज्याचें तो वाद्यादिक.

**वादी**, स्त्री॰ बंधनाद्युपयोगी दोरासारिखा लांबट जो चर्माचा तुकडा तो; २, पु॰ कोणेक अर्थाविषयीं

र्थी विप्रतिपन्न होऊन वादकरणारे जे उभयतां ते प्रत्येकी; ३, अग्रवादी; ४, कांहींएक निमित्त कल्पून वाद मांगण्याचा स्वभाव ज्याचा तो, किं० वाद सांगण्याविषयीं जो कुशल तो; ५, वादानें जो अर्थ सिद्ध करण्याविषयीं अभिमान धरिला आहे ज्याणें तो तद्वादी; उ० द्वैतवादी, अद्वैतवादी, कर्मवादी, स्वभाववादी, इ० समासीं प्र०.

**वादें**, न० को० वादा.

**वाद्य**, न० वाजवायाचे उपयोगी जो मृदंग, वीणा, सनई, नगारा, इ० पदार्थ ते प्रत्येकीं; चर्मवाद्य, तंतुवाद्य, रणवाद्य, मंगलवाद्य, इ० समास, वाद्यघोष इ० समास०.

**वाद्या**, पु० वादी द्वितीयार्थी

**वाधंग**, पु० दे० गेली गतली अशी जी कांहींएक गोष्ट तिजविषयीं तूं असेंच कां केलेंस असेंच कां बोललास इ० रूप कोणेकास पुनःपुनः बोलण्याचा व्यापार तो.

**वाधंग्या**, अलिं० वाधंग लावण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**वाधणा**, पु० अवधणा.

**वांधा**, पु० देणें, घेणें, इ० व्यवहारीं उलगडा नहोतां राहत्ये जी वाद विषयिता तो.

**वाधी**, स्त्री० दे० वादी प्रथमार्थी.

**वान्**, अलिं० जो अर्थ आहे ज्यास, किं० ज्याचाठायीं तो तद्वान; उ० भाग्यवान्, दैववान्, धूमवान्, हिमवान्, इ०.

**वान**, पु० वाण द्वितीयार्थी.

**वानगी**, स्त्री० जा पदार्थाची परीक्षा चाखून होत्ये त्या विशिष्ट पदार्थाची परीक्षा करायाकरितां त्यांतून घेतात जो थोडा अंश तो; २, हुंगून, ऐकून जा विषयांची परीक्षा होत्ये असे जे अत्तर, गुलाब, गाणें इ० विषय तद्विषयींही प्र० होतो; ३, जकातदार इ० कांस उदमी लोक तसेंच ज्याचा मळा, बाग, इ० आपण खंडानें केला आहे, त्या धन्यास ते माळी इ० जकात, सारा, यां शिवाय ऐन जिनसाचा थोडा प्रमाणें देतात जो अंश तो.

**वानणें**, स० वाणणें.

**वानप्रस्थ**, पु० गृहस्थाश्रम सोडून अरण्यांत जाऊन तप करावें असा एक आश्रम आहे त्यांत जो विद्यमान तो.

**वानर**, पु० न० मा० झाडावर राहणारा असा काळ्या तोंडाचा एक पशु आहे.

**वानरखट**, न० वानरांचे शरीरास क्षत पडलें असतां अनेक वानर मिळून तें चिचकून पाहूं लागतात तणें करून तें मनस्वी मोठें होतें तद्वत पूर्वी अल्प असतां अनेकांनीं आंत चिवडाचिवड केल्यामुळें अधिकावस्थेस पावलें जें दुखणें, कांहीं व्यावहारीक संकट, इ० त्यास त्य०.

**वानरतेल**, न० कोणेक सबळाचा आश्रय इ० कारणानें आपणास मी सर्वांहून अकुतोभय सुखी असें मानून निश्चिंतपणें राहिलेला जो कोणी त्याचें कांहींकारणामुळें एकाएकीं सर्वांहून निकृष्ट व्हावया जोगें मोठें जें कांहीं होतें पारिपत्य त्यास त्य०.

**वानरक्षत**, न० वानरखट.

**वानवा**, पु० स्त्री० कांहींएक गोष्टी विषयीं होईल य. किं० नाहींच होणार, इ० एकरूपेंकरून निश्चय नहोता असतें जें द्वैविध्य तो ती; उ० आमचे जाण्याचे

ण्याचें ठरलें नाहीं, अजून वानवाच आहे; २, त्याहेवि-
ष्याचा निगम होऊन होय, किं० नाहीं असा कोणेक
गोष्टीविषयीं एकरूपतेचा जो निश्चय तो ती; उ० तो
देतो कीं नाहीं याचा संशय ठेवूनका काय ती वानवा
करून या; ३, वर्णणूक.

**वाना**, पु० कों० काढा, चूर्ण, इत्याद्युपयोगी जे सुंठ, मिरीं,
पिंपळी इत्याद्यनेक पदार्थ ते प्र०.

**वाप**, स्त्री० रा० धान्य पेरल्यानें रुझून आलेलें जें शेत ती.
परंतु तें शेत कोवळें आहे तों पर्यंत प्रयोग.

**वापरणें**, वस्त्र, शस्त्र, पात्रादिपदार्थ पांघरणें, तोडणें,
धान्यादि सांठवणें, इ० जो तत्तद्योग्य व्यापार त्याचे
ठायीं लावणें; २, वागणें प्रथमार्थी.

**वापसा**, पु० दे० पर्जन्यकाळीं कांहींकाल पाऊस उघड-
ल्यामुळें शेतांचे पेरे व्हावयास जी त्या कालावर
योग्यता येते ती.

**वापा**, पु० रा० वाफा.

**वापी**, स्त्री० सं० विहीर; २, रा० मेथा, कोथिंबीर, इ० को-
चा लहान जो वाफा ती.

**वाफ**, स्त्री० अग्नि, सूर्यकिरण, इ० तेजःसंयोगानें त-
प्त जो आर्द्र पदार्थ त्यापासून जो धूम सदृश अंश
निघतो ती; कोणेक फलादि पदार्थास वाफ देणें म्ह०
ती वाफ उत्पन्न व्हावयाजोगा ईषन्मात्र शिजवि-
णें; २, न० कों० बैल इ० कोणेकास नांगर इ० कांस
वाहयास देऊन तत्संबंधी जें धान्य, किं० द्रव्य घे-
तात तें.

**वाफणें**, दे० धान्य मुठींत घेऊन उडवून चहूंकडे पस-
रून पडे असें पेरणें.

**वाफरें**, न० कों० क्रोध, थंडी, पिशाच, इ० शरीरांत सं-
चारिली असतां भरलें जी कांपरी ती म्ह० भा-
णें, येणें, धातूंचे योगीं प्र०.

**वाफा**, पु० वांग्या, मिरच्या, कोथिंबीर, ऊंस, खपला,
सांठ, इ० जिरव करायाकरितां पाणी लावायाचें
इचीं चतुष्कोणाद्याकार करितात जीं अनेक स्थानें
प्र०.

**वाफारा**, पु० कांहीं औषधी पदार्थ शिजवून त्याचे
फेचा जो शरीरास, किं० तदवयवांस शेक घेतात.

**वाँबळ, वाँबाळ**, स्त्री० वामळ.

**वाभळ**, स्त्री० कों० वाभळलेलें जें भात ती.

**वाभळणें**, कों० भात अतिशयित माजल्यामुळें
वर कणरहित पाटल्या कणशा उत्पन्न व्हाव्या अशा
अवस्थेतें पावणें; पक्षीं त्या भूमीसही कर्तृता.

**वाभा**, पु० ग० वाभारा.

**वाभारा**, पु० धस लागणें इ० कारणामुळें वस्त्राचा
निघतो जो फाळा तो.

**वाम**, ३ लिं० डावा जो हस्त, पाद, इ० तो, वामबाहु, वा-
महस्त, वामांग, इ० समास०.

**वामकुक्षि**, स्त्री० दिवसास भोजनोत्तर अन्न परि-
णाम चांगला व्हावा म्हणून प्रा० डाव्या अंगावर
आडवें पडून कांहीं काल करितात जी स्थिति ती;
कों० कोणकानें वामकुक्षि होणें, म्ह० वामकुक्षि क-
रणें.

**वामन**, ३ लिं० शरीरानें जो ठेंगणा तो प्रा० मनुष्या
विषयीं प्र०; २, पु० ईश्वराचे दशावतारांतील पा-
चवा जो अवतार तो; ३, वामनद्वादशीचे दिवशीं
भोजनार्थ बलावितात जो बटु तो.

**वामनजयंती**, स्त्री० भाद्रपद शुक्ल द्वादशी.

**वामनद्वादशी**, स्त्री० वामनजयंती.

**वामनमूर्ति**, स्त्री० शरीरानें जो ठेंगणा त्यास म्ह०.

**वाममार्ग**, पु० मंत्रशास्त्रोक्त देवताराधनाचा एक मार्ग आहे.

**वाममार्गी**, ३ लिं० वाममार्गानें देवतेचें उपासन करणारा जो मनुष्य तो.

**वामळ**, स्त्री० आभाळें यावीं त्यामुळें तीटऊन पडूं नये कांहीं गारेंडा पडावा अशी जी एकाद्या दिवशीं कालावस्था होत्ये ती.

**वामांग**, न० प्रसंगविशेषीं वायकोस दाटल्याचें वामांग असें म्ह०.

**वामाळ**, स्त्री० वामळ.

**वामी**, ३ लिं० वाममार्गी.

**वायकळ**, ३ लिं० ज्यामध्यें जमेस धरायाजोगा अंश नाहीं असें जें भाषणादि तें.

**वायकळणें**, वायचळणें.

**वांयगणा**, ३ लिं० रा० उन्हाळ्यांत पिकतें जें भात, नांदूळ, इ० तो.

**वांयगणें**, न० रा० उन्हाळ्यांत पिकवायाचें जें भात तें.

**वायगमन**, न० रा० एक पोटामध्यें रोग उत्पन्न होत असतो तें.

**वांयगी**, स्त्री० कों० वांगी.

**वांयगीभात**, पु० कों० वांगीभात.

**वांयगें**, न० वांगें.

**वांयगेंभात**, पु० रा० वांगीभात.

**वायगोळा**, पु० पोटाची केवळ रिक्तता इ० कारणामुळें पोटांत जो गोलाकार वायु उचलतो तो.



**वायचळ**, पु० कों० वायु झाल्यामुळें कोणेकानें मनस्वी बडबडूं लागावें असा जो त्यास चळ म्हणतात तो.

**वायचळणें**, कों० शोक, दुःख, भय, इ० कारणामुळें भाषणादि व्यवहारीं उपयुक्त जें पूर्वापरानुसंधान तद्रहित होऊन वेड्या सारिखें होणें.

**वांयडा**, ३ लिं० रा० वांवडा.

**वायदा**, पु० मी तुला अमुक देईन, तुझें अमुक काम करीन, इ० रूप जें कोणेक गोष्टीविषयीं दुसऱ्याशीं नियम वचन करितात तो, परंतु देणें, घेणें, इ० व्यवहारीं कालावधि विषयीं जर नियम कर्तव्य आहे तर विशेषें करून प्रयोग; कोणेकानें वायद्यावर येणें, मरणें, इ० स्थळीं आपल्या गुणावर येणें.

**वायदेचिटी**, **वायदेचिठी**, **वायदेचिट्ठी**, स्त्री० देण्याघेण्याचे व्यवहारामध्यें मूळचे मुदतीस अंतर पडल्यास पुनः दुसरी मुदत ठरवून जी चिटी लिहून देतात ती.

**वायदेरवा**, पु० वायदेचिटी.

**वायधूळ**, स्त्री० वायूचें मंडलाकार भ्रमणामुळें जी नदाकार धूळ उडत्ये ती.

**वायन**, न० सं० वाण प्रथमार्थी; २ रा० वाईन.

**वायबार**, पु० आंत गोळा इ० न घालितां जो नुसता दारू घालून तोफ इ० कांचा बार काढितात तो.

**वायला**, ३ लिं० वेगळा, शूद्र भाषावृत्ति.

**वायवर्णा**, पु० ओषधीपयोगी एक झाड आहे.

**वायवी**, स्त्री० पश्चिमेची आणि उत्तर या दोहों दिशांचे मधली जी दिशा ती.

**वायव्य**, स्त्री० वायवी शब्दाचा अपभ्रंश.

**वायस**, पु० सं० कावळा.

**वायसपिंड**, पु॰ उत्तर क्रियेंत दश पिंडांचे दिवशीं कावळ्यानें भक्षावयाकरितां एक पिंड करीत असतात तो.

**वांयसा**, ३ लिं॰ डवळासा; २, अ॰ अंमळसा.

**वायु**, पु॰ रूपरहित असून ज्याचा स्पर्श होतो असें पंचमहाभूतांतील एक भूत आहे, तोच स्थानोपाधिभेदेंकरून प्राणापानादि संज्ञा पावतो; २, त्याचाच अंश दोषरूपी शरीरांत असतो तो; ३, त्याचे क्षोभानें होत्ये जी विकृति तो.

**वायुबद्ध**, ३ लिं॰ वातबद्ध.

**वार**, स्त्री॰ जरायु म्हणून जें गर्भवेष्टन तें; २, क्रीं॰ भात भरडलें असतां त्याचे निमेनिम करडे तांदूळ होऊन जी कांहीं अधिक वाढ येत्ये ती; ३, पु॰ तरवार इ॰ शस्त्राचे प्रहारानें शरीरावर होतो जो छेद तो; ४, सूर्योदयापासून सूर्योदयपर्यंत अहोरात्रात्मक जें दिवस ते प्र॰ ज्यास आदित्य, सोम, मंगळ, इ॰ सप्तग्रहांचे नामाच्या संज्ञा अनुक्रमानें चालतात; स्त्रीया अर्थाचे वाचक जे युवती, अंगना, वधू, इ॰ संस्कृत शब्द त्यांचा एतच्छब्दपूर्वक समास झाला असतां वेश्येचीं नांवें होतात; उ॰ वारयुवती, वारवधू, इ॰ समास॰; ५, कोणेक भिक्षुक इ॰ कांचीं एकाचेच घरीं भोजनाची सोई होत नाहीं म्हणून अनेकांचे घरीं भोजनाविषयीं नियमित केलेला असतो जो एकेक दिवस तो प्र॰; ६, अ॰ वेळा, प्रा॰ संस्कृत शब्दांपुढें योग होतो; उ॰ आम्ही एकवार भोजन करितो आणि त्रिवार स्नान करितो; ७, तो तो अर्थ आहे ज्यामध्यें या अर्थी, उमेद, नफा, सरिफा, इ॰ कितीएक शब्दांपुढें तसेंच त्याच्या अर्थानें धरून इ॰ अर्थी बयाद, तपशील, नावनिशी, इ॰ कितीएक शब्दांपुढें याचा योग होतो; उ॰ उमेदवार, बयादवार, इ॰

**वारकरी**, पु॰ दुसऱ्याचे घरीं भोजनास जावयाचा वार जाणें लाविला आहे तो; २, पंढरपूर इ॰ महास्थानचे वारीचा नियम जाणें धरिला असतो तो.

**वारंग**, पु॰ क्रीं॰ विळा, कोयता, सुरी, इ॰ कितीएक शस्त्रांचा मुठींत अडकवायाचा तीं घडत्ये समयींच त्यांचे मागें जो निमोळता बारीक अवयव राखिला असतो तो.

**वारगीपारगीनें**, अ॰ पारगीवारगीनें.

**वारगोळें**, न॰ रा॰ नांगर, गाडी, इ॰ वहाया करितां बैल, टोणगा, इ॰ कांची जोडी असावी तीतसून एकच बैल, किं॰ टोणगा, आपले पदरीं आहे तर दुसऱ्याचा बैल, किं॰ टोणगा इ॰ पाहून त्या जोत इ॰ कानें काम उभयतांचें पाळीपाळीनें करावें अशा संकेतानें आपला आणि दुसऱ्याचा जो बैल, इ॰ त्यांची परस्पर करितात जी योजना तें.

**वारचा**, अ॰ विवक्षित कर्मादिकाचे ठायीं जो विवक्षित असावा तदभावीं नसल्यानीं; उ॰ मला न फावलें तर माझे वारचा मुलगा येईल वरें.

**वारण**, न॰ कोणेक कर्माविषयीं प्रवृत्त जो कोणीएक त्यास त्या कर्मापासून मागें फिरविण्याचा जो व्यापार तें; आणि तेणेंकरून त्याची होत्ये जी परावृत्ति तें; २, पु॰ सं॰ हस्ती.

**वारणें**, निवारणें; २, हस्तादिकेंकरून मक्षिकादि हाकणें; ३, ऋण फेडणें; ४, मनुष्यानें मरणें या अर्थी संकेतानें प्र॰; ५, मोरचेल, चंवरी, इ॰ देवता, राजा इ॰ कांवर

इ॰ कांवर धरून हालविणें.

**वारवणें.** धान्यादिक सूप इ॰ पात्रांत घेऊन आंतील भुसकट, फोल, इ॰ हलका अंश वाऱ्यानें उडून जाई असें उंचून ओतीत ओतीत वाऱ्याशीं संबद्ध करणें.

**वारवा**, पु॰ कों॰ घेवडा.

**वारंवार**, अ॰ पुनःपुनः

**वारसा**, पु॰ स्थावरादि द्रव्यावर जो कोणकाचा स्वत्व संबंध असतो तो.

**वारसेदार**, ३ लिं॰ वारिसदार.

**वारा**, पु॰ वायु प्रा॰ प्रथमार्थी; वाऱ्यावर सरणें त्य॰ मनुष्यादिकानें वेताल वागूं लागणें, किं॰ कोणीएक प्रकरणीं भाषण करित असतां त्या भाषणांत आपलें अनिष्ट असें जाणून प्रकारांतरचें भाषण बोलूं लागणें; वासरूं इ॰ कानें वारा घेणें, पिणें, इ॰ स्थलीं, त्याणें मोकळें सुटल्यामुळें मनस्वी धावूं लागावें अशा रीतीचा वायुसंबंधानें युक्त होणें; कोणीएक वाऱ्यावर टाकणें, इ॰ स्थलीं संरक्षणाद्यर्थ कोणकाचें स्वाधीन न करितां तसेंच मोकळें सोडणें; त्य॰ वाऱ्यावर वरात आणि दर्यावर हवाला; धान्यादिक वाऱ्यास देणें त्य॰ वारविणें; कोणकानें कोणकाचा वारा न घेणें, न पडूं देणें, इ॰ स्थलीं त्याचा दर्शनादि संबंधही न करणें; वारा वाहील तसें करणें, इ॰ स्थलीं समयीं जसा डोल दिसेल तसें वर्तणें; कोणकानें वाऱ्याबराबर भांडणें, त्य॰ त्याणें सर्वदा सर्वांबरोबर भांडत असावें अशा स्वभावाचा असणें.

**वारांगना**, स्त्री॰ वेश्या.

**वारागुंळें**, पु॰ कोणीएक धान्यादि पदार्थांचा आटोप न झाल्यामुळें उडवाउडव व्हावयाजोगी जी अव्यवस्था ते

ते.

**वाराणसी**. स्त्री॰ काशीक्षेत्र.

**वारापाणी**, न॰ आपल्यास प्रतिबंधक जें कर्ज, जामीनगत, इ॰ खटलें त्याची जिकडील तिकडे भागाभाग करून जी निःशेषता तें; २ आगलगाय जो दोष, लचांड, इ॰ काहीं त्यास युक्तिप्रयुक्तीनें अनेक निमित्तें योजून विभागशः विभागशः उडवून त्यांत काहीं नाहीं असा जो त्याचा परिणाम करितात तें.

**वारावणें**, वारवणें; २ आर्द्र जो वस्त्र, काष्ठ, इ॰ पदार्थ त्याणें वायु संबंधानें काहींसें दडकणें.

**वारावार**, स्त्री॰ ऋणकरी, सकार, देवता, इ॰ कांचें जें देणें घेणें, इ॰ खटलें उरकायाचें असतें तें जिकडील तिकडे देऊन, घेऊन, तोडून, टाकण्याचा जो व्यापार ती.

**वारासार**, स्त्री॰ गृहादिकांत पडलेला जो पात्रादिकांचा पसारा तो व्यवस्थेनें जिकडल्या तिकडे ठेवण्याचा व्यापार ती; २, वारावार.

**वारित**, ३ लिं॰ वारण केलें जातें तो.

**वारिसदार**, पु॰ जो स्थलादि पदार्थांवर ज्याचा वारसा आहे तो त्या स्थलादिकांचा.

**वारी**, स्त्री॰ स्वदेवाचेच नावानें जी भिक्षा मागतात ती; २, पंढरी, मोरेश्वर, इ॰ क्षेत्रीं प्रतिमासीं एकादशी चतुर्थी इ॰ दिवशीं, किं॰ प्रतिवर्षीं यात्रेचे दिवशीं स्वग्रामाहून जाऊन यात्रा करून यावें, असा जो त्या त्या देवाचे भक्तानें धरिला असतो नियम ती.

**वारीं**, अ॰ कोणक कर्माविषयीं कोणक अर्थास असत्ये जी करणता तीचें वाचक हें अव्यय, तत्करणवाचक शब्दांपुढें याचा प्र॰ होतो परंतु ती करणता प्रा॰ निमित्तकारणतारूप असावी; उ॰ चोर आला तर

त्याला

त्याला आमचे घरचा बायका केरसुणी वारीं मारती-
ल;२,कोणेकाशीं तुल्य योग्यतेनें मानणें, खरचणें
इ०कांचें वि०;उ० मला तो तृणावारीं मोजतो; अशा
कामाला पाण्यावारीं पैका खरचला पाहिजे;३,
कोणेक अर्थाचें स्वकीयजें नामरूप जें गौण पडून
अर्थांतराचें नामरूप व्यवहारीं पुढें होई अशा प्र-
कारें त्या अर्थानें खरचणें,जाणें, येणें, इ०कांचें वि०;
उ० मी बोललों तें मस्करी वारीं घालविलें; पाटी-
भर आंबे आणिले तितकेही प्रसादावारीं ग-
ले.

**वारीस**,पु० वारिसदार.

**वारीस**, अ० येणेंयाचा योगीं प्र० अर्थ; कोणेक अर्था-
चे क्रम जे इतर विभागी त्यांचे विभागावरून तोअ-
र्थ कांहीं उर्वरित होऊन आपले वांट्यास येणें;उ०
आज बाजारांत आंबे पुष्कळ आले होते परंतु सा-
रे लोकांनीं घेतले माझे वारीस आले नाहींत.

**वारू**,पु० घोडा, लोकव्यवहारीं प्रा० स्तुतिविषय अस-
तां प्र० करितात.

**वारूळ**,न० कों० भोम;२, एक व्रणरोग आहे;३,वा-
ळा प्रथमार्थी.

**वारें**,न० गतिमान जो वायु तो; कोणेकाचे शरीरावयवावरू-
न वारें जाणें त्य० वायु विकृतीनें तो तो अवयव ल-
टका पडणें;२,कोणेकाचे अंगीं कोणेक देवतेचें
खेळत असतें जें अंशतः स्वरूप तें;३, ला० को-
णेकाचे अंगीं विद्या,कला,किं० सरकारी अधिका-
र,इ०कांचें प्रवृत्तिप्रयोजक वागत असतें जें स्व-
रूप तें;उ० तुमचे अंगीं कारकुनीचें वारें आहे,म्ह-
णून हिशेब देण्यास भिणार नाहीं, म्हणतां आ-
म्ही

म्ही भटानीं काय करावयाचें आहे;४, वारें, वाईट
इ० होण्यास कारणभूत जें देशकालादि सामान्य
कारणाचें स्वरूपभेद तें प्र०;उ० पहिलें विघ्यास
पांचखंडी भात पिकत होतें तें वारें आतां गेलें हो.

**वारेमाप**,न० कोणेक प्रमेयाचें अटकळीनें केलें जें प्र-
माण त्यास वास्तविक प्रमाणाशीं फारच अंतर अ-
सतां त्य०;२,३ लिं० जास ताळतंत नाहीं अशा ज्या
गोष्टी,भाषण,इ० तो.

**वारेळूं**,न० ग्रा० वाळा प्रथमार्थी.

**वार्ता**,स्त्री० अमुकस्थळीं अमुक झालें,अमुक दिवशीं
अमुक होणार, अमुकस्थळीं अमुक होतें आहे,
इ० रूप जो कोणेक व्यवहार त्याची वाचक जी गो-
ष्ट ती; कोणेकस्थळीं कोणेक अर्थाची वार्ताही नस-
णें,त्य० त्या अर्थाचा पुनराम अभाव असणें प्र-
मा अर्थ.

**वार्धक्य**,न० सं० वृद्धपणातें.

**वाऱ्याचीमोट**,स्त्री० युक्त्यादिरूप जें एक साधन ते-
णेंकरून अनेकांचें विवक्षित कार्यांसाठीं आकल-
न होण्याविषयीं साहित्यभूत जें त्या अनेकांस
कांहींतरी एक बंधारण असावें ते तत्याच्यामुळें अ-
नेकप्रकारें आकलन करण्याची इ० आकलना करण्या-
चे प्रसंगीं त्या अनेकात्मक अर्थास त्य०;उ० मो-
ठी म्हणजे वाऱ्याची मोट एक येतां तो एक जातो,
हे सारे मिळतात कधीं आणि आमचें काम हो-
णार कधीं.

**वाऱ्याचेंघोडें**,न० गलबताचे गतीस वारा येतनाक-
र्णीयाचे प्रसंगीं त्या गलबतास त्य०.

**वार्षिक**,३ लिं० प्रतिवर्षी कर्तव्य जें उत्साहादि,किं०
प्रति

प्रतिवर्षी द्यावा लागतो जो पिशाचादिकांस बलि इ० तो;२,सं० वर्षाकाल संबंधी जो मासादि तो.

**वाल**,पु० द्विगुंजात्मक जें प्रमाण तो,कचित तोळ्याचा चाळिसावा जो भाग त्यास ह्म०;२,त्या वजनाची वृक्षविशेषाची बी असत्ये तो;३,पावट्यांतील अवांतर भेद एक धान्य आहे.

**वालखिल्य**,पु० अतिसूक्ष्म देहाचे यानावाचे पुराण प्रसिद्ध साठ सहस्र ऋषि आहेत;२,न०एकत्रमिळालेलीं जीं लहान लहान मुलें,त्यांस प्रसंग विशेषीं ह्म०.

**वालथर**,३लिं०रा० कांहीं कारणानें सईल पडलें जें भापण,लेख,इ०तो.

**वालदाणी**,स्त्री०दे०रेतदाणी.

**वालपापडी**,स्त्री०घेवड्यांत ला एक भेद आहे.

**वाला**,३लिं० जा कोणेक अर्थाचा संबंधित्वे करून कोणेक अर्थाचें नाम घेण्याची विवक्षा जेव्हां असत्ये तेव्हां त्या अर्थाचे वाचक शब्दापुढें याचा योग होतो,आणि विशिष्टशब्द तत्संबंधी अर्थाचें विशेषण होतें: उ०पेंकवाला,दारूवाला,बंदूकवाला,बाळंणवाला,घेणेवाला,दोनशेरवाला तोव्या.चारुपयेवाले पागोटें;२,राजू.

**वालीप,वालीफ**,३लिं० ततूंचा बारीकपणा,निर्बलपणा,इ०कारणा मुळें घटमूट नव्हे असें जें वस्त्र इ० तो.

**वालुकायंत्र**,न०सं०कांचेचा पात्रांचे वाळू घालून काल साधनार्थ जें यंत्र करितात तें.

**वालोवालनिसंतान**,न०रा० द्रव्यादिकोणेक पदार्थाचा अंशतः अंशतः अनेक प्रकारें नाश होऊन शेष कांहीं नाहीं असा जो अभाव होतो त्यास ह्म०.

**वांव**,स्त्री०न० दोन हात पुर्ते पणी पसरले असता जें प्रमाण होत असतें तो तें.

**वाव**,पु० वारा,शूद्र भाषावृत्ति;२,कोणेक आधेयाकडे न रुधल्या मुळें आधेयांतराचा निवेश व्हावयाजोगा असतो जो देश कालादिरूप अवकाश तो;उ० या गाडींत पांचव्या माणसाला बसायास वाव नाहीं;३,उपयुक्त निमित्त सांपडल्या मुळें कर्तव्य गोष्टी विषयीं होत्ये जी जागा तो;उ० तुला फावलें तरचे असें तुमचें वचन सांपडलें ह्मणजे त्याला घरीं बसायास वाव झाला;४,३लिं०ग्र० भाषण,प्रयत्न,इ०कांचे ठायीं जो अभिधेय फल इ०रूप तत्वांश असावा तद्रहित जें भाषणादि तो;उ० जरी अनुकूल नसे दैव तरी केले उपाव होतो वाव.

**वावकळ**,३लिं० वायकळ.

**वावगा**,३लिं० अयोग्यता प्रयोजक जो कोणेक दुर्गुण तेणेंकरून विशिष्ट जो मनुष्य,पात्र,वस्त्र,इ०पदार्थ तो,किं०त्याव्यवरीत नाम विरुद्ध जें आचरण,भाषण,इ०तो;२,ज्याचें कांहीं काम नाहीं असा केवळ निरर्थक जो कोणेक अर्थ तो.

**वावझड**,स्त्री०ग० गृहादिकांत वाऱ्यामुळें पावसाची जी झड येत्ये तो.

**वावझडी**,स्त्री०ग० अतिशयित वारा,पाऊस,यांचे योगानें शरीरांत भरत्ये जी हुडहुडी ती.

**वावटळ**,स्त्री० मंडलाकार भ्रमण पावतो जो मोठा वारा तो;ह्म० वाऱ्यानें आलें आणि वावटळीनें गेलें.

**वावडंग**,स्त्री०एक वन्य झाड आहे;२,न०तीचें बी.

**वावडा**, ३ लिं० पावटा, ठांक, काळाभोंपळा, इ० वातूळ जो पदार्थ तो; २, ला० जा रोगास अपथ्यभूत जो अर्थ तो त्या रोगास; ३, जा व्यवहारादिकांविषयीं प्रतिकूळ जो भाषणादि कोणेक अर्थ तो त्या व्यवहारादिकांस; उ० तुमचे पंचाइतीस हा एवढा लेख वावडा आहे, बरकड बरेच आहे.

**वांवडा**, ३ लिं० कोणेक क्रियादिकांचा जो क्रमस्थित अर्थावर अनुक्रमानें संबंध होत चालला असतो तो संबंध न होतां त्या क्रियादिकानें अतिक्रमला गेला जो कोणेक अर्थ तो; उ० नित्य मला थोडा बहुत पैका मिळतो, एक दिवस कांहीं वांवडा जात नाहीं.

**वावडिंग**, न० वावडंगीचें बीं तें.

**वावडी**, स्त्री० खेळायाचे उपयोगी एक कागदाचा पदार्थ करित असतात जास दोर बांधून आकाशांत उडवीत असतात ती; २, वर उभें राहून दाणे वारवाया करितां तिवई सारिखा उंच काष्ठाचा पदार्थ करितात ती; कोणेकाची वावडी करणें, इ० स्थलीं फावडीकरणें असा अर्थ.

**वावडें**, न० शरीरावयव, सांधे, इ० धरावे, दुखावे, इ० रूप जी मनुष्यादिकांचे शरीरीं वातविकृति होत्ये ते.

**वावदळ**, न० दे० वादळ.

**वावदूक**, ३ लिं० सं० फार बोलावें असा स्वभाव जाचा तो.

**वावधूळ**, स्त्री० वायधूळ.

**वावर**, न० शेत, मळा, इ० कराया जोगी जी जमीन तीचा विवक्षित मर्यादेनें मानिला जो विभाग तें; २, पु० को० झाडणें, सारवणें, भांडीं घांसणें वस्त्र पात्रादि जिकडीचें तिकडे ठेवणें, इ० रूप जो गृहकृत्य संबंधीं व्यापार तो; ३, कोणेक स्थलीं कोणेकाचा हें काढ, तें ठेव, तें उचल, हें भर, इ० रूप चालला असतो जो उद्योग तो; उ० दिवा मालिवला म्हणजे घरांत सत्रभर उंदरांचा वावर चालला असतो

**वावरणें**, घर, शेत, इ० कांचे ठायीं करायाचे असतात जें झाडणें, सारवणें, वेणणें, खणणें, इ० उद्योग ते करित त्या त्या अधिकरणीं असणें; शेत इ० कांत वावरणें, इ० स्थलीं शेत इ० वावरणें असा प्रयोग होतो

**वांवसें**, न० को० मा० तीन कोपऱ्यांचे मानाचें जें सुंभाचें गुंडाळें करून ठेवित असतात तें; उ० दोन वांवशीं सुंभ असलें म्हणजे एका बाजेची बेगमी होत्ये

**वाहूण**, स्त्री० दे० वहाण प्रथमार्थीं.

**वाहूणें**, दे० वहावणें.

**वांशीक**, न० को० गृहादिकांवर वांस टाकून केलेली असत्ये जी रचना तें.

**वाशेरा**, ३ लिं० ग० वाशेळा.

**वाशेळा**, ३ लिं० जास घाईट वास येतो असें जें तृणादिक, इ० तें.

**वास**, पु० पुष्पादि पदार्थ निष्ठ बरा, किं० घाईट जो गंध तो; कोणेक गोष्टीचा वास आला इ० प्रयोग, गोष्ट इ० कांस वास नसतांही कल्पून करितात. जाचा ईश्वराचे तरीं संबंध जास आहे, तो त्याचे वासाचा असा त्या संबंधामुळें त्यास आदरणीयता वर्जनीयता इ० कोणेक विशेष प्रतिपादन कर्तव्य असतां प्रयोग करितात; २, ला० कोणेक अर्थाचा जो लेश तो; उ० विहिरींत पाण्याचा वास नाहीं; ३, वसतिस्थान; ४, कोणेक स्थलीं कोणेकाची कांहीं काळ राहून जी स्थिति ती; ५, न० वस्त्र.

**वांसकटी**, स्त्री० को० लहान जो वांसा तो; तिदावमरी मोठ्या

माट्या वांशासही त्य०.

**वासट**, ३ लिं० वासोळा.

**वांसटी**, स्त्री० ग० वांशास निंदार्थवसर्ग त्य०.

**वासणें**, मिटलेलें जें तोंड, डोळे, नगाड्या, इ० तें पसरणें; कोणेकाचें वासणें, त्य० दिवाळें निघणें, रोजगार बुडणें, इ० दुर्दशा होणें.

**वासन**, न० कापडाचें दिंड जा वस्त्रांत बांधितात तें वस्त्र.

**वासना**, स्त्री० सर्वांचें बरें व्हावें, किं० वाईट व्हावें, किं० इतरांचें कांहीं होऊ, आपलें मात्र बरें व्हावें इ०रूप निरंतर वाटत असण्याविषयीं कारणभूत जे पृथक् पृथक् चित्त स्वभाव ते प्र०; उ० वासनेसारखें फळ; २, अमुक करावें, अमुक पदार्थ भोगावा, अमुक स्थळीं जावें, अमुक पदार्थ आपल्यास असावा, इ०रूप इच्छेनें परिणाम पावलेली जी अंतःकरण वृत्ति ती; उ० चित्तीं धरिलीं वासना सिद्धी न्यावी नारायणा; वासना फजीत करणें, त्य० जा विषयाची वासना झाली असेल त्या विषयाचें ईषन्मात्र उपभोगादिद्वारा ती वासना दूर करणें; ३, शास्त्र व्यवहारादि विषयांचा अंतःकरणास निरंतराभ्यासामुळें होतो जो संस्कार तो; उ० कांहीं शास्त्राची वासना असली म्हणजे बोलणें नीट पडतें; शास्त्रवासना, गणितवासना, इ०स०.

**वासनी**, ३ लिं० वासन केलेलें जें वस्त्र तो; उ० हा वासनी खारवा पेतांपण टिकणार नाहीं.

**वासर**, पु० सं० वार चतुर्थार्थी.

**वासरूं**, **वांसरूं**, न० गाय, म्हैस, यांचा जो वत्स तें; २, गा० गलबतावर यानामेंकरून एक दोरी असते ते.

**वासलात**, स्त्री० वसूल, खर्च, इ० मांडाया करितां एक प्रकारची रेघ काढितात ती; कोणेक गोष्टीस वासलात लागणें त्य० तपशील लावणें; उ० त्याजपाशीं अमर रुपये दिल्हे होते त्यांस कांहीं हिकडे वेचले तिकडे खर्चले, असें बोलून त्याणें वासलात लावली.

**वासवारा**, पु० रा० कोणेक अर्थाचा ईषन्मात्र तरी जो अंश तो, निषेधविषयीं प्र०.

**वासळणें**, फळादि पदार्थांनें वास प्रसार व्हावा अशा अवस्थेनें युक्त होणें.

**वांसा**, पु० घरावर अढ्यापासून वळचणीपर्यंत वर ओवण आस्त्ररायासाठीं घालितात जीं लांकडें तीं प्र० तेथें घालायाचे उपयोगी पडाया जोगें लांकूड असून तेथें विनियोग न सतांही त्य०; २, पाठीचा कणा आणि नाकाचें हाड ते प्र०.

**वासी**, ३ लिं० जो जेथें रहाणारा तो तद्वासी; उ० वैकुंठवासी, कैलासवासी, वनवासी, परदेशवासी.

**वासुदेव**, पु० मयूरपिच्छांचा टोप डोकीवर घालून भिक्षा मागत असतो अशा संप्रदायाचा एक भिकारी आहे तो.

**वांसोळी**, स्त्री० ग० वांसकटी.

**वास्त**, स्त्री० कोणेक विषय प्रयत्नानें साध्य होईना, किं० साध्य असतांही कांहीं कांहीं त्याजवर दोष दर्शन झालें इ० कारणामुळें औदासिन्य पावून त्या विषयाची अगदीं सोडितात जी आस्था ती; सोडणें, टाकणें, इ० धातुयोगीं प्र०; उ० याजकडे माझें कर्ज येणें आहे, पण तो दंडेली करून वादास प्रवृत्त होतो म्हणून मी त्याची वास्त सोडली.

**वास्तपुस्त**, स्त्री० वास्त, किं० तत्पूर्वक प्रयत्न इ० ती; उ० घरीं जाऊन कांहीं बंदोबस्त करावा तो निकडली वास्तपुस्तच तुम्ही सोडून दिल्ही हें हो काय.

**वास्तव**, ३ लिं० म० वास्तविक.

**वास्तविक**, ३ लिं० यथार्थ जो अर्थ तो.

**वास्तव्य**, न० कोणेकस्थलीं कोणेकाची कांहीं काळ राहून जी स्थिति तें.

**वास्ता**, स्त्री० वास्त.

**वास्तु**, न० स्त्री० रहायासाठीं केलें जें गृह तो,तें; वास्तुप्रवेश, वास्तुनिर्माण, वास्तुदेवता, इ० स०.

**वास्तुपुरुष**, पु० शास्त्रप्रसिद्ध गृहाभिमानिनी एक देवता आहे

**वास्तुशांत**, स्त्री० वास्तुशांति शब्दाचा अपभ्रंश.

**वास्तुशांति**, स्त्री० नवें घर बांधिलें असतां, किं० ओसाड घरांत वसति करायाची असतां जी शांति करित असतात ती.

**वाहक**, ३ लिं० पालखी, डोली, रथ, इ० कांनें वाहून नेणार जे मनुष्य, अश्व, इ० ते प्र०; शववाहक, भारवाहक, रथवाहक, इ० स०.

**वाहणें**, पालखी, रथ, गाडें, इ० जें कांहीं एक स्थलांतरीं न्यावयाचें ओझें त्यानें तदीय भार आपण संभाळून आपले गतीनें गतिविशिष्ट करणें; २, कोणेक पदार्थ, गोष्ट, इ० कांचा भार आपणावर घेऊन त्यास पडूं न देतां विवक्षित स्थितींत धरणें; उ० शेष पृथ्वीनें आपल्या मस्तकावर वाहतो, त्यासही इतका अभिमान नाहीं, मग तुम्ही लहानसा दगड उचलला त्यणून अभिमान कशाला वाहतां; ३, शेत, झाड, घोडे, बैल, गाडी, गलबत, इ० जीं कृषिकर्मादि व्यवहाराचीं कारकें यांनें त्या त्या व्यवहाराचा निर्वाहक आपण होऊन त्या त्या व्यवहारीं चालविणें; ४, पूजार्थदेवतामूर्ति, ब्राह्मण, इ० कांचे अंगावर गंध, पुष्प, अक्षता, इ० पूजार्थ उचलून ठेवणें; आण, आपत, इ० वाहणें, त्य० करणें; ५, कोणेक मनुष्य, किं० गोमहिष्यादिपशु, वृक्ष, शेत, देवता, धर्म, इ० उद्देशून हें मत्स्वीं त्यांचें अशा बुद्धीनें त्यागणें; लिखणी, घागोट, इ० काढणें, अशा स्थलीं तत्तत्पदार्थ साध्य जें लेखनादि कर्म त्या विषयीं तत्तज्जातीय पदार्थांचा पुनः अंगीकार करायाचा नाहीं अशा बुद्धीनें सोडणें; ६, ला० कोणेक मनुष्य, पदार्थ, इ० कोणेक व्यवहारादि उद्देशून हा सर्वस्वी निकडचा, निकडून सुटला तर आपला अशा बुद्धीनें अर्पिणें; ७, जलादि सद्रव पदार्थ, किं० वायु, काल, मेना, बैलांचा तांडा, इ० याणीं अनुक्रमें पुढचा अवयव पुढें ढकलिला म्हणजे मागचे अवयवानें तेथें येत असावें अशा प्रकारें उत्तरोत्तर चालत असें करणें, यथ पक्षी नदी, भांडें, गळूं, नाक, दिशा, मार्ग, घाट, इ० जलादिकांचीं अधिकरणें, यांसही कर्तृता येते; ८, वहाणें; ९, शस्त्र, हात, गाडा, नांगर, इ० कांनीं तोडणें, टणें, मारणें, मार्गअतिक्रमणें, नांगरणें, इ० त्यत्तद्योग्य व्यापारीं चालणें; कोणेकानें वाहत्ये गंगेंत हात धुणें त्य० आपला कांहीं तोटा न होतां, यजमान इ० कांवर अधिक ओझें न पडतां, जर कांहीं परोपकार इ० पुण्य घडतें आहे तर तें मन घालून करणें; उ० श्रीमंतांनीं तुला धर्मार्थ खर्चेल तितकें मजुरा देऊं असें सांगितलें आहे, मग वाहत्ये गंगेंत हात धुवायला तुमचें काय जातें, किं० चालते काळांत दानधर्मादि सत्कर्म कायघडलतें करून घेणें.

**वाहतीकूस**, स्त्री० जिला मुलें होऊं लागलीं अशी स्त्री नित्य कुशीस त्य०; उ० एकदां वाहती कूस झाली म्हणजे पाहिजे तितकीं मुलें होतील.

**वाहन**, न० सं० रथ, शिबिका, अश्व, इ० जी यानें ती प्र०; गरुडवाहन, नरवाहन, इ० स० ; २, उखळास त्य०.

**वाहवा**, अ० जसा असा असावा तसा, अतिशयित चांगला, जो कोणेक विषय त्याचें साक्षात्कारानें होतो जो अंतःकरणांत विकास ह्मणजे योग्य आनंद त्याचा हा उद्गार निघतो; २, स्त्री० कोणेकाचा विद्या कलादिरूप उत्कृष्ट गुण तो लोकांस अनुभूत झाल्यामुळें त्याची वाहवा एतदुद्गार प्रधान लोकांचे मुखें होते जी प्रशंसा तीस, किं० कोणेकास दुसऱ्यापासून मिळती जी वाहवा इ० प्रशंसाशब्द त्यास त्य०

**वाहीत**, ३ लिं० दे० वर्षोंचे वर्षास राबती जी मळा, वावर, शेत, इ० जमीन ती.

**वाहीम**, न० कों० गाडा, रहाट, नांगर, इ० वाहयाचे उपयोगी जे दोणगा, बैल, इ० तें.

**वाहील**, न० वांझा जो नांगरलें; २, स्त्री० शेत इ० करावयाचे जमीनीस नांगरण्याचे स्वेप गणीक होतो जो कर्षण संस्कार ती; घालणें इ० कांचे योगी प्र०.

**वाळ**, स्त्री० रुपया इ० नाण्यास त्याचा कांहीं दोष प्रकट झाल्यामुळें त्याची व्यवहारांत चलन सोडावी असें येतें जें, हीनत्व ती; २, रा० वाळीत. याचा प्रयोग प्रथमांत नाहीं; उ० तो गृहस्थ त्या दोषामुळें वाळीत राहिला.

**वाळका**, ३ लिं० रोगादिकामुळें कृश झालेला जो मनुष्य, किं० तदवयव तो.

**वाळकी**, स्त्री० वाळकाचा वेल ती.

**वाळकुंजा**, ३ लिं० वाळका.

**वाळकुडा**, ३ लिं० कों० वाळका.

**वाळगणें**, खीर, दूध, भाजी, इ० करपट घाण यावया 

जोगें करणें.

**वाळणें**, [illegible] जलादिकानें भिजल्यामुळें, किं० [illegible] नीळ रस, रक्त यांचे योगानें आर्द्र जो पदार्थ त्याचा अग्नि, वायु, सूर्य किरण, रोग, इ० कांचा योगानें आर्द्रता रहित होणें; २, खिळा इ० द्रव्य गाबा त्याचा [illegible] विवक्षित अंगास वळविणें.

**वाळंबा**, पु० रा० चांचड ह्मणून मुंगळ्या सारिखा एक प्राणी आहे; २, वाळवीचा जो प्राणी तो.

**वाळवंट**, न० नदी, समुद्र, ओढा, यांचे पाण्या बाहेर [illegible] वालुकामय भूमि असते तें.

**वाळवट**, न० कों० वाळवंट; २, ३ लिं० जा स्थळीं वाळू दाट आहे, अशी जी जागा तीचें वि०; उ० वाळवट जमीनीचे झाड भल्लें जोरदार होतात.

**वाळवण**, न० धान्यादि उष्णांत वाळत घातलें असतां वाळल्यामुळें पूर्व प्रमाणापेक्षां कमी होतो [illegible] त्याचा अंश तें; आणि धातु देखील [illegible]; २, [illegible] यासाठीं उष्णादिकांत पसरून ठेवलेलें जें धान्य, पापड, सांडगे, पत्रवा, इ० तें

**वाळवन**, स्त्री० कों० केळीचें वाळलेलें जें पान, चिरडा, ती.

**वाळवी**, स्त्री० वस्त्र काष्ठादिकास खाऊन नाश करणारी अशी एक क्षुद्र जीव जाति आहे; २, रा० तद्रूप जो काष्ठ, वस्त्र, इ० कांस रोग लागतो ती; ३, उत्तरोत्तर क्षीणता येण्यास कारणभूत जें शरीरास रोग चिंता, इ० किं० राज्यादिकांस शत्रु संबंधादि जडतें त्यास त्य० लागणें धातु योगीं प्र०.

**वाळवणें**, रा० काष्ठ, वस्त्र, इ० कानें वाळवीचे विकारानें विशिष्ट होणें.

**वाळा**, पु॰ सुगंधि मूलाचें तृण आहे; तो, किं॰ त्याचा सुळ्या तो; २, पायांत, किं॰ हातांत घालावयाचें वलयाकार गोल एक भूषण आहे तो, किं॰ पायांत अडकवायाचें जे वलयाकार बिडीस अवयव असतात ते न॰; किं॰ कांहीं कारणास्तव पायांत घालायाचें जें लोहादिकाचें वलय असतें तोव्, तांब्या, तंबू, इ॰पात्राचे बुडीं जें वलय बसविलें असतें तो; ३, कों॰ एक जिवाणू आहे; ४, रा॰ खोबऱ्याचे वाटीची कड समोंवती कापली असता निघतो जो वलयाकार तुकडा तो, किं॰ नशा तुकड्यांचे अनेक खंडांचा जो समुदाय तो.

**वाळी**, स्त्री॰ कान, नाक, इ॰कांत घालायाकरितां सोनें, रुपें, इ॰कांचे सुनाचें जें वलय करितात ती.

**वाळीत**, न॰ कोणी व्यभिचारादिक दुष्कर्म केलेलें प्रकट झालें असतां स्वजातीय मिळून त्यास घालितात जो बहिष्कार तें; २, ३ लिं॰ कों॰ व्यभिचारादि दोषामुळें जाति बहिष्कृत केला जो तो.

**वाळींत**, न॰ रा॰ वाळीत प्रथमार्थी.

**वाळू**, स्त्री॰ नदी, समुद्र, इ॰ कांचें तीर इ॰स्थलीं असतो असा केवल स्निग्धता रहित एक मृत्तिका विशेष आहे; २, वाळवंटांतील बारीक बारीक खड्यांचा जो समुदाय तो; ३, वाळवी.

**वाळूक**, न॰ खिऱ्या सारिखें एक फळ आहे तें व त्याचा जो वेल तें; २, अवाळू.

**वि**, अ॰ हा उपसर्ग आहे, हा कोणेक शब्दाचे मागें लागतो तथें विशेषेंकरून, किं॰ विगत, विरुद्ध, इ॰ अर्थाचा द्योतक होतो. कचित् निरर्थकपणें ही असतो.

**विकणें**, कांहीं एक पदार्थाचें मूल्य घेऊन तो पदार्थ जाणें मोल दिलें त्याचा करणें; तो त्याचा विकलेला आहे, इ॰स्थलीं अनेक उपकारामुळें ओशाळा आहे असा अर्थ; एथें तुमचें शहाणपण विकणार नाहीं इ॰स्थलीं शहाणपण चालणार नाहीं असा अर्थ.

**विकत**, अ॰ विक्रयरूप व्यापारानें घेणें, देणें, आणणें, इ॰कांचें वि॰; विकत कज्जा, विकत खोकला, इ॰येणें इ॰स्थलीं उगेंच एखादें लचांड बळेंच गळ्यांत घेणें.

**विकता**, अ॰ विकत.

**विकतेकरी**, ३ लिं॰ रा॰ जो शेतभात करीत नाहीं, धान्यादि विकत घेऊन प्रपंच निर्वाह करितो तो.

**विकरा**, पु॰ कांहीं एक पदार्थ विकण्याचा जो व्यापार तो; २, त्या व्यापारानें त्या पदार्थाचा होतो जो विकलपणा तो.

**विकराल, विकराळ**, ३ लिं॰ ज्याचें स्वरूप अति भयंकर वाटतें तो.

**विकरी**, स्त्री॰ विकरा; २, त्याणें लभ्य जें द्रव्य त्यासही म्ह॰.

**विकल**, ३ लिं॰ जो हस्त पादाद्यवयव वाय्वादि विकृतीनें, किं॰ मोडल्या मुळें अधू झाला तो; २, तद्विशिष्ट जो मनुष्यादि तो; ३, ला॰ विवक्षित साधनादि जें अवश्य असावें, तदभाव झाल्या मुळें हीनदशा पावला जो व्यवहारादि तो.

**विकला**, स्त्री॰ सं॰ मेषादि राशींचे जे अंश त्यांचे कलेचा जो साठावा अंश ती.

**विकलांग**, ३ लिं॰ विकल आहे अंग ज्याचें तो.

**विकल्प**, पु॰ कांहीं एका शास्त्रार्थादि विषयीं जें मतद्वय असतें तो; २, कोणा एका विषयीं जी कोणा एकाचे मनांत विरुद्ध कल्पना आली ती; ३, कांहीं एक कार्याविषयीं

कार्याविषयीं नानाप्रकारच्या कल्पना मनांत येतात त्या प्र०.

**विकसन**, न०सं० विकसित होण्याचा जो व्यापार तें.

**विकसित**, ३लिं० प्रफुल्लित जें पुष्पादि तें.

**विकळ**, ३लिं० विकल.

**विकळणें**, को० पित्तक्षोभादिकारणामुळें कोणेकानें मनस्वी बडबड करूं लागणें; उ० तो त्यानंतर आल्याकडे विकळला त्या बरोबर तुम्ही कशास बोलतां.

**विकळा**, स्त्री० विकला.

**विकाऊ**, ३लिं० विकण्याचे उद्देशानें ठेविला जो पदार्थ तो.

**विकार**, पु० कोणेकास कामादिकांचा, किं० रोगादिकांचा होतो जो उपद्रव तो; २, कांहींएक कारणानें पदार्थ मात्राची पूर्वप्रकृति पालटायाजोगें होतें जें रूपांतर तो, किं० रूपांतरहोण्यास जो मध्यें कांहीं व्यापार होतो तो; उ० दहीं हा दुधाचा विकार; ३ ज्या उपादानकारणापासून जो पदार्थ उत्पन्न झाला तो पदार्थ त्याचा; उ० सुवर्णाचा विकार अलंकार; मृत्तिकेचा विकार घट; क्रोधविकार, कामविकार, मनोविकार, मृद्विकार. इ० समास.

**विकारी**, पु० तेहतिसावा जो संवत्सर तो; २, ३लिं० विकार झाला, किं० होतो जास तो.

**विकास**, पु० विकसितपणा.

**विकासणें**, विकसित होणें.

**विकासित**, ३लिं० विकसित.

**विकृत**, ३लिं० विकार पावला जो पदार्थ तो; २, स्त्री० विकृति शब्दाचा अपभ्रंश; ३, विकृती हिचे ठायीं.

**विकृति**, स्त्री० विकार; २, चोविसावा संवत्सर.

**विकृती**, ३लिं० को० विकत घेतलेला जो पदार्थ तो; २, स्त्री० दे० कांहीं कारणानें कोणेक भोग्य पदार्थाचा येतो जो तिटकारा तो.

**विकोपास**, अ० जाणें याचा योगीं प्र० अ० कज्जा, रोग, इ० कांहीं अपथ्यादि विरुद्धोपचार पोंचल्यामुळें अतिशयित विषमदशा पावणें.

**विक्रम**, पु० एक शककर्ता प्रसिद्ध राजा झाला होता ज्याचा शक नर्मदेचा उत्तर तीरीं अद्यापि चालत आहे; २, सं० पराक्रम; ३, चवदावा जो संवत्सर तो.

**विक्रय**, पु० सं० विकरा.

**विक्रीत**, ३लिं० सं० विकला जो पदार्थ तो.

**विक्रेय**, ३लिं० सं० विकाऊ.

**विखंड**, न० को० विळा, खोरें, कुदळ, इ० जीं आउतें तीं प्र०.

**विखम**, ३लिं० रा० विषम परंतु संख्येविषयीं प्र०.

**विखमोगरी**, स्त्री० एक लता आहे.

**विखरणें**, को० धान्य, केश, कागद, इ० पदार्थ अस्ताव्यस्त पसरणें.

**विखरा**, पु० पदार्थाची विखरण्यानें जी अवस्था होते ती.

**विखार**, पु० सर्पादिकांचे ठायीं जो विषांश असतो तो; २, त्याचा होतो जो कोणेकास उपद्रव तो; ३, पं० सर्पासही म्ह०.

**विखारणें**, कोणेकानें सर्पादि विखाराचा उपद्रवानें युक्त होणें.

**विखारा**, **विखारी**, ३लिं० ज्या सर्पादिकांस विष आहे तो सर्पादि.

**विखुरणें**, विखरणें.

विखोपास

**विखोपास, विखोप्यास**, अ॰ जाणें याचाबोगीं प्र॰ अर्थ; विकोपास जाणें.

**विखर**, न॰ विषशब्दाचा अपभ्रंश; २, अतिशयित जो कडूपदार्थ त्यास आरोपानें त्य॰.

**विख्यात**, ३ लिं॰ प्रख्यात.

**विगत**, ३ लिं॰ नाहींसा झाला जो तो, याचा प्रा॰ समासीं प्र॰; उ॰ विगतैश्वर्य, विगतमत्सर, इ॰.

**विगलित**, ३ लिं॰ गलित जें पुष्पादि तो.

**विंगळ**, पु॰ दे॰ इंगळ.

**विंगळी**, स्त्री॰ दे॰ इंगळी.

**विगुण**, ३ लिं॰ अनुगुण नव्हे तो; २, कांहीं एक गोष्टींतजें कांहींएक विकल असते तो.

**विग्रह**, पु॰ सं॰ समासादिरूपकरून विशिष्ट जें पद त्यांचें अवयवार्थ प्रदर्शकजें वाक्य तो; २, देह; ३, युद्ध.

**विघटन**, न॰ सं॰ कांहीं एक सुघटित जो पदार्थ, किं॰ गोष्ट त्याचें अवयव वियोजन द्वाराजें विध्वंसन तें.

**विघटित**, ३ लिं॰ सं॰ विघटन झालें आहे ज्याचें तो.

**विघड**, पु॰ अनेक अवयवांचा योगानें, किं॰ पदार्थांचा योगानें जो गाडा, रहाट, संसार, इ॰ सिद्ध होतो त्यांतील कांहीं पदार्थांचा नाशादि झाल्यामुळें जी मुख्य पदार्थास विकलता प्राप्त होत्ये ती; २, स्त्री, पुरुष, मित्र, इ॰ कांचा जो परस्पर वियोग होतो तो.

**विघडणें**, विघटित करणें.

**विघरणें**, तूप, गूळ, मीठ, साखर, कथाल, इ॰ पदार्थ अग्नि, जल, इ॰ कांचे योगानें पातळ होणें.

**विघात**, पु॰ सं॰ हननादिकें करून कोणेकाचा होतो जो नाश तो.

**विघातक**, ३ लिं॰ कांहींएक कार्याचा विघात करणारा जो तो.

**विघुरणें**, विघरणें.

**विघ्न**, पु॰ न॰ कांहींएक कार्यास प्रतिबंधक जें निमित्त किं॰ त्याची उपस्थिति तो तें.

**विंच**, स्त्री॰ कों॰ जमीन, काष्ट, इ॰ कांस जी फट असत्ये ती.

**विचकट**, ३ लिं॰ बीभत्स जें भाषणादि तो; २, तें करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**विचकटणें, विचकडणें**, चिवडणें; २, उचकटणें

**विचकणें**, वासणें.

**विचका**, पु॰ चिवडा प्रथमार्थी.

**विंचकुरणें**, कोणेकास विंचकुऱ्यानें विशिष्ट करणें

**विंचकुरा**, पु॰ हातांचे पंजाची नखाग्रें शरीरत्वचेवर ठेऊन त्या नखांचे करवें ती त्वचा घट्ट धरून ओढण्याचा व्यापार तो; २, तेणें करून होतो जो नखव्रण तो; ३, कों॰ दोहों बोटांनीं घेतात जो चिमटा तो.

**विंचडा**, पु॰ कों॰ मोटा जो विंचू त्यास त्य॰.

**विंचरणी**, स्त्री॰ कों॰ केशादि विंचरायाची जी फणी ती.

**विंचरणें**, गुंतलेले केशादिक फणीनें मोकळे करणें

**विचक्षण**, ३ लिं॰ सं॰ शास्त्रादि ज्ञान पूर्वक जो व्यवहार, चतुर, तो.

**विचक्षणा**, स्त्री॰ सं॰ कोणेक गोष्टीचें परिज्ञान व्हावें म्हणून अवयवशः फोड करून जी पुरतेपणी चौकशी ती.

**विचार**, पु॰ कोणेक विषयीं हें असें असा एकरूपें करून

रून निश्चय होण्याकरितां हें बरें, कीं वाईट, हें करावें कीं नकरावें, असें करावें कीं तसें करावें, इ० रूप जो अंत:करण व्यापार होतो तो ;२, तेणेंकरून हें असें इ० रूप निश्चयात्मक होत्ये जी कल्पना तो ;३, करावें कोणतें, नकरावें कोणतें, इ० रूप जी व्यवस्था तत्परिपालनात्मक जी वर्तनास मर्यादा तो; उ० लग्नामध्यें सोंवळ्या ओंवळ्याचा विचार राहत नाहीं ;४, विचारणा.

**विचारणा**, स्त्री० कोणेक गोष्टीचे निर्वाहाची तोड नि-घनाशी झाल्यामुळें कसें करावें, काय करावें, करावें कीं नकरावें, इ० रूप चिंतात्मक जी संकटावस्था प्राप्त होत्ये ती ;२, विचार प्रथमार्थी.

**विचारणीय**, ३लिं० विचारानें जाणायास योग्य जो अर्थ तो ;२, प्रष्टव्यरूप जो अर्थ तो.

**विचारणें, विचारणें**. कोणेक गोष्टीविषयीं कोणाएकास प्रश्न करणें ;२, द्रव्यादि दानानें, किं० मधुर भाषणादिकानें कोणेकाचा परामर्श घेणें ;३, कोणेकास पदार्थ बुध्या गणणें, प्रा० निषेधविषयीं प्र० ; उ० जेथें इरसाल अंबे आहेत, तेथें असल्यांखट्यास कोण विचारतो.

**विचारपूस**, स्त्री० कांहींएक पदार्थाचा शोधार्थ कोणाएकास विचारणें, पुसणें, इ० चवकशी करण्याचा जो व्यापार ती ;२, आला, गेला, इ० कांस कुशल प्रश्नादिक विचारणें, परामर्श घेणें असा जो व्यापार ती.

**विचारवंत, विचारशील**, ३लिं० विचारी.

**विचारी**, ३लिं० सदसद्विचारपूर्वक कांहींएक कार्य करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**विचित्र**, ३लिं० चित्रविचित्र दिसायाजोगा जो पदार्थ तो ;२, दुसऱ्यास आश्चर्यकारक जो मनुष्य, किं० भाषण, आचरण इ० तो ; ३, प्र० अनेक प्रकारचा, उ० विचित्र अन्नें वाढिलीं पात्रीं.

**विंचुरणें**, विचरणें

**विंचू**, पु० एक क्षुद्र प्राणी आहे, ज्याचे नांगड्यास विष असतें ;२, तदाकार सदा तारकांचें जें कृत्तिका नक्षत्र आकाशांत दिसतें त्यास त्य० ;३, कां० पलंग, बाज, इ० विणल्यें समयीं त्या दोरीचे पदर सरूं नयेत म्हणून अडकणासाठीं जो एक दोन गांठी देऊन वीत दीडवीत दोरीचा तुकडा येत असतात तो.

**विचूक**, अ० वात पित्तादि क्षोभानें, किं० भांग, अफू, इ० कांचा कैफ आल्यामुळें पूर्वापर संधान सुटें असें बोलणें, इ० कांचें वि० ;२, ३लिं० तादृश जें भाषण इ० तो.

**विच्छिन्न**, ३लिं० सं० छिन्नभिन्न झाली जी मूर्ति इ० तो ;२, कांहींएक कारणानें ज्याचा भंग झाला असा जो कोणेकाचा नियम, किं० संसारादिग्रवटलें, किं० वृत्ति इ० तो.

**विच्छेद**, पु० सुतन चाललेल्या वृत्ति अनुष्ठानादिकांचा कांहीं निमित्तानें मध्यें होतो जो खंड, किं० लोप तो.

**विजणवारा**, उ० दे० विझुणवारा.

**विजणा**, पु० दे० विझुणा.

**विजय**, पु० सं० युद्धादिकांत जो कोणेकाचा होतो जय तो ;२, सत्ताविसावा जो संवत्सर तो ;३, श्रीविष्णूचा एक द्वारपाळ आहे, ज्याची काष्ठादिमय मूर्तिकरून देवद्वारीं, किं० देवाजवळ स्थापित असतात तो.

**विजयादशमी**, स्त्री॰ आश्वीनशुक्लदशमी, जा दिवशीं सीमोल्लंघनादि विधि करीत असतात.

**विजयाभिनंदन**, पु॰ पुढें शास्त्रप्रसिद्ध एक शककर्ता होणार आहे तो.

**विजयी**, ३ लिं॰ युद्धादिकांत ज्याचा जय झाला तो.

**विजवटा**, ३ लिं॰ हाड गुणाचा जो मनुष्यादि त्यास म्ह॰

**विजात**, स्त्री॰ स्वजातीहून इतर जी जाति ती.

**विजात**, ३ लिं॰ कों॰ विजवटा.

**विजातीय**, ३ लिं॰ सं॰ विवक्षित जात्याकांत नव्हे असा जो मनुष्य, रत्न, इ॰ पदार्थ तो; २, लोकविलक्षण जो मनुष्य, किं॰ सामर्थ्य, रत्न, किं॰ कांहींएक व्यापार तो; ३, एकजातीय नव्हेत असे जे अनेक पदार्थ ते परस्पर.

**विजायली**, ३ लिं॰ कों॰ गयबळ जें लांकूड तो, किं॰ तन्निर्मित जो पाट, चौकट, इ॰ पदार्थ तो.

**विजार**, स्त्री॰ इजार.

**विजारदार**, ३ लिं॰ इजारदार.

**विजारा**, पु॰ इजारा.

**विजितजाणें**, इजितजाणें.

**विजोड**, ३ लिं॰ कोणेक जोडास, किं॰ जोडीस अनेक अवयव असतात त्यांतील जो अवयव अल्पत्वमहत्वादिरूप वैलक्षण्यामुळें त्या जोडास, किं॰ जोडीस मिळत नाहीं तो, किं॰ तद्विशिष्ट तो जोड, जोडी तो.

**विंझणवारा**, पु॰ विंझुणवारा.

**विंझणा**, पु॰ विंझुणा.

**विझणें**, पेटलेला अग्नि, जाळ, मशाल, चूल, इ॰ कानीं शांत होणें; २, ला॰ प्रवृत्त जो कज्जा, युद्ध, क्रोध, इ॰ त्याणें शांत होणें.

**विंझुणवारा**, पु॰ विंझणयानें घेतात जो वारा तो.

**विंझुणा**, पु॰ पंखा.

**विटकर**, स्त्री॰ न॰ इटकर; २, ३ लिं॰ विटावया जोगा जो लुगडें, सुगटा, इ॰ कांचा रंग तो, किं॰ तद्विशिष्ट तें लुगडें इ॰ तो.

**विटकरी**, ३ लिं॰ विटकरेचा रंगासारखा जो रंग तो. किं॰ तद्विशिष्ट जें वस्त्र इ॰ तो.

**विटणें**, वस्त्रादिकांवरचा पूर्वीचा जो तांबडा, पिंवळा, इ॰ रंग त्याणें उष्णादिकांमुळें, कांहीं काळानें मलिन होणें, पक्षी वस्त्रादिकांसही कर्तृता; २, अन्नादि शिळें झाल्यामुळें त्याणें दुर्गंधीनें विशिष्ट होणें; ३, कोणेक पदार्थाचें बहुत सेवन झाल्यामुळें, किं॰ कोणेक पदार्थाचा सेवनकाळीं कांहीं अमंगलादिकांचें दर्शनादि, किं॰ तद्विषयीं कांहीं दोषबुद्धि इ॰ कारणामुळें तत्तत्पदार्थाचे उपभोगाविषयीं कंटाळा पावणें; कोणेकाचें कोणेकाशीं विटणें म्ह॰ परस्परें असतें जें सोरस्य तें नाहींसें होणें; त्याणें त्याणें विटणें म्ह॰ परस्परानीं सोरस्य रहित होणें.

**विटंबणें**, स॰ विटंबनेनें युक्त करणें.

**विटबंदी**, ३ लिं॰ पक्क्या विटानीं बांधिली जी भिंत इ॰ तो.

**विटंबना**, स्त्री॰ नाक, कान, कापणें, धिंड भोंवडणें, छी, थू, करणें, इ॰ रूप जी कोणेकाची लोकांत फटफजीती ती.

**विटा**, पु॰ इटा.

**विटाळ**, पु॰ धर्मशास्त्रांत ज्यास स्पर्श करूं नये म्हणून सांगितलें आहे, असे जे आशौची, रजस्वला, चांडाल

चांडाळ, यवन, गाढव, कुत्रें, इ० जीव, किं० अस्थि, वि-ष्ठा, इ० अमेध्य पदार्थ त्यांचे अंगीं असतो जो अशु-चितारूप दोष तो जाचे योगानें त्या पदार्थांस स्पर्शादि झालें असतां स्नान, वस्त्रांतर, इ० करावें असें शास्त्रांत सांगितलें आहे; २, तादृशदोष विशिष्ट पदार्थांस स्पर्श झाला असतां स्नानादि करावयाजोगी स्पर्श कर्त्याचे अंगीं येत्ये जी अशुचिता ती; ३, सोंवळा जो त्यास ओंवळ्याचा स्पर्श झाल्यामुळें भोजनादि कर्मांविषयीं जी अशुचिता प्राप्त होत्ये ती; ४, स्त्रि-यांचे शरीरापासून प्रतिमासीं स्रवतें जें रज तें.

**विटाळचंडाळ**, पु० विटाळ इ० तो.

**विटाळणें**, कोणेक पदार्थ, किं० मनुष्य इ० कांस विटाळा-नें विशिष्ट करणें; २, ला० कोणेक पदार्थ कोणेक व्या-पारीं प्रवर्तवून कांहींएक व्यापार संस्कार संबंधानें यत्किंचित् संबद्ध करणें; उ० जेवायास बसल्यापण अन्न पोटांत गेलें नाहीं उगीच तोंड मात्र विटाळ-लें.

**विटाळशी**, स्त्री० योनिद्वारा रज स्राव होऊं लाग-ल्यापासून तीन दिवस पर्यंत अशुचि झाली जी स्त्री तिचें वि०.

**विटाळशीचंडाळशी**, स्त्री० विटाळशी इ० रूप जी स्त्री ती.

**विटाळें**, न० दे० इटाळें.

**विटी**, स्त्री० दे० इटी.

**विटीदांडू**, पु० दे० इटीदांडू.

**विटेकरी**, पु० दे० इटेकरी.

**विटेबंदी**, ३ लिं० दे० विटबंदी.

**विट्ट**, पु० मनुष्य, किं० कांहीं पदार्थ, गोष्ट, इ० कांची जी फटफजीती तो.

**विठी**, स्त्री० दे० इटी.

**विठीदांडू**, पु० दे० इटीदांडू.

**विठ्ठल**, पु० एक देव आहे.

**विठ्ठलपंतीनोंच्या**, पु० आकार विशेषाचें एक धातु-मय पात्र आहे.

**विठ्ठलसवाशीण**, **विठ्ठलसवाष्ण**, स्त्री० संके-तानें विधवेस म्ह०.

**विडलिंबू**, न० ईडलिंबू.

**विडा**, पु० भक्षणाचे, किं० कोणेकास द्यावयाचे उद्दे-शानें एकत्र केलीं जीं नागवेलीचीं पानें, सुपारी, चु-ना, एतत्प्रधान अनेक द्रव्यें तीं विशिष्ट मिळून तो; २, नागवेलीचे पानांत सुपारी इ० पदार्थ घालून गुंडाळून जो आकार विशेष विशिष्ट रचना वि-शेष करितात तो; कोणेकानें विडा उचलणें, म्ह० कांहींएक दुर्घट कार्याविषयीं हें मी करतों असी प्रतिज्ञा करणें; कोणेकास विडा देणें, म्ह० अधि-कारावरून दूर करणें.

**विडी**, स्त्री० ओढावयाकरितां आपटा इ० कांचें पान, कागद, इ० कांत तंबाखू, ओवा, इ० घालून जी गुंडा-ळी करितात ती; २, भक्षणार्थ नागवेल तंबाखू, इ० कांचे पानाची जी गुंडळी करितात ती; ३, मुस-ळ, सोटा, इ० कांस जी लोहादिकांची मांडळ ब-सवितात ती.

**विणकर**, स्त्री० ततूंनीं वस्त्रादि विणण्याचे जे अनेक प्रकार आहेत, त्या प्रकारांनीं विणलें असतां जे अनेक प्रकारचे त्यांचे रचना विशेष होतात ते प्र०.

**विणणावळ**, स्त्री० विणण्या संबंधी जी मजूरी ती.

विणणें

**विणणें**, वस्त्र, आंथरी, गोप, इ॰ पदार्थ निर्मिले आन असे तंतु, साच्या, इ॰ त्या त्या प्रकारानें परस्पर गुंतविणें पक्षी निर्मिले आनात जे वस्त्रादि पदार्थ त्यांसही कर्मता; २, पलंग, माचा, इ॰ नवार, सुंभ, इ॰ कांनी वस्त्र, जाळी, इ॰ कांचा आकार होई असें वेष्टणें.

**विणती**, स्त्री॰ कों॰ कांहीं एक कार्याचे उद्देशानें देवादिकांस लाविला जो कौल. किं॰ त्या देवादिकानीं दिला जो कौल ती.

**विणवणें**, दुखणें इ॰ कामुळें कोणेकानें कन्हणें.

**विणा**, पु॰ वीणाशब्दाचा अपभ्रंश.

**विणें**, गाम्हिष्यादि कितीएक पशूनीं, किं॰ पक्षी, कीटक इ॰ कानीं अपत्यातें प्रसवणें; अशवाविषयीं याचा प्रयोग करीत नाहींत; मनुष्य स्त्रीविषयीं निंदेनें प्र॰ करितात; २, केळ, चवेण यांणीं प्रसवणें.

**वितंडवाद**, पु॰ आपला पक्ष वस्तुतः खोटा असें जाणत असताही खोट्या युक्तीनें आपला पक्ष सिद्ध करण्याविषयीं आग्रहानें कोणी करितो जो वाद तो.

**वितणें**, कों॰ वितुळणें.

**वितल**, न॰ सप्तपातालांतील दुसरें जें पाताल तें.

**वितवितणें**, कों॰ चरफडणें.

**वितस्ति**, पु॰ सं॰ वीत मुख्यार्थी.

**वितळणें**, विघरणें; २, ला॰ जमलेलें जें आभाळ, राजकारण, पंचाईत, इ॰ त्याणें फाटाफूट पावून नाहींसें होणें; ३, करुणादिरसानें अंतःकरण द्रवणें.

**वितीगाभती**, स्त्री॰ विणें गाभणी होणें, अशयोग्यतेंत विद्यमान जी गाय, म्हैस, इ॰ तीचें वि॰.

**वितुष्ट**, न॰ कांहीं एक कारणामुळें परस्परांचें पडतें जें वांकडें तें.

**वितुळणें**, वितळणें.

**वित्त**, न॰ पैसा अडका इ॰ रूप जें द्रव्य तें.

**वित्तविषय**, पु॰ वित्त इ॰ तो.

**वित्तेषणा**, स्त्री॰ वित्त विषयिणी जी इच्छा ती.

**वित्पत्ती**, स्त्री॰ व्युत्पत्तिशब्दाचा अपभ्रंश.

**वित्पन्न**, ३ लिं॰ व्युत्पन्न शब्दाचा अपभ्रंश.

**विथर**, पु॰ कों॰ जमलेला जो संसार इ॰ पदार्थ याचा जो विसकळीतपणा तो.

**विदगुडणें**, कों॰ पाय, हात, इ॰ शरीरावयवांनीं मुरगळणें.

**विदविदणें**, कों॰ चरफडणें; २, दे॰ फल, गळू, इ॰ कानीं अतिशयित पिकल्यामुळें बिलबिलीत होणें.

**विदविदा**, ३ लिं॰ दे॰ विदविदला जो फल, गळू, इ॰ पदार्थ तो.

**विदारण**, न॰ सं॰ हस्तादिकानें फल, वस्त्र, पोट, काष्ठ, इ॰ पदार्थाचे दोन अवयव, दोहोंकडे ओढून मध्यें फाडण्याचा जो व्यापार तें.

**विदारणा**, स्त्री॰ विदारण; २, ला॰ कोणेकाची पुरती फजीती होई असें त्याचे गुप्त दोषादिकांचें जें उद्घाटन ती.

**विदारणी**, स्त्री॰ कों॰ विदारणा द्वितीयार्थी.

**विदारणें**, विदीर्ण करणें.

**विदारित**, ३ लिं॰ सं॰ विदारण केलें जाचें तो.

**विदित**, ३ लिं॰ सं॰ परिज्ञात जो अर्थ तो.

**विदिशा**, स्त्री॰ आग्नेयी, नैर्ऋती, वायव्य, ऐशानी

त्या आचार दिशा त्या म०.

**विदीर्ण**, ३लिं० विदारण झालें ज्याचें तो.

**विदेश**, पु० स्वदेशाहून इतर जो देश तो; विदेशगमन, विदेशवास, इ०स०

**विदेशी**, ३लिं० विदेशीय.

**विदेशीय**, ३लिं० विदेशसंबंधी जो मनुष्य, पदार्थ, इ० तो.

**विदेही**, ३लिं० परमार्थदृष्टीनें ज्याचा देहाभिमान सुटला तो.

**विद्यमान**, ३लिं० आहेपणानें जो विशिष्ट तो; २, वर्तमान जो काळ तो; ३, स्त्री०न० गुजारत; ४, अ० दृष्टिदेखतां; उ० माझे विद्यमानें या गांवचे हाल करूं नका.

**विद्या**, स्त्री० पुराण, शास्त्र, इ० जीं चतुर्दश ज्ञानसाधनें तीं प्र०, किं० तत्तत्प्रतिपाद्य जीं ज्ञानें तीं प्र०; २, गान, चित्र लेखन, इ० जा कला त्यास ही स्प०.

**विद्याधन**, न० विद्यारूप जें धन तें; उ० सर्वधनापेक्षां विद्याधन श्रेष्ठ आहे.

**विद्याधर**, पु०सं० उपदेवामध्यें एक भेद आहे.

**विद्याभ्यास**, पु० कांहीं एका विद्येचा जो पठन, अवलोकन, इ० अभ्यास तो.

**विद्यार्थी**, पु० गुरुपाशीं विद्याभ्यास करणारा जो तो; २, कोणाकाजवळ शागिर्दीचें काम करावयास राहिला जो त्यास ल०.

**विद्युत्**, स्त्री०सं० वीज; विद्युत्पात, इ०स०.

**विद्युल्लता**, स्त्री०सं० विद्युत.

**विद्रा**, ३लिं०दे० विद्रूपया अर्थी.

**विद्रुम**, न०सं० प्रवाल.

**विद्रूप**, ३लिं० नासिकादिराहित्य, किं० कांहीं एक अवयवाचें आधिक्य इ० कारणामुळें विशोभित जो मनुष्यादि तो.

**विद्वान्**, ३लिं० वेदशास्त्रादि जाणतो तो, या शब्दाचा समासादिस्थलीं पूर्वी प्रयोग होतो तेथे विद्वत् असें रूप होतें; उ० विद्वज्जन, विद्वत्सभा, विद्वत्ता, इ०.

**विद्वेष**, पु० द्वेष.

**विद्वेष्टा**, ३लिं० द्वेष्टा.

**विंध**, न० कांहीं एका पदार्थास पडलें जें आरपार छिद्र तें.

**विंधणें**, तीर, सामता, इ० कानें शरीर, मोतीं इ० कांहीं एक पदार्थ सच्छिद्र करणें; २, न० किंकरें.

**विंधकाम**, न०कों० काष्ठादिकांस विंध्या पाडण्याचा जो व्यापार तें; २, तेणेंकरून झालें जें तें काम त्यासही समयविशेषीं ल०.

**विधवा**, स्त्री० गतभर्तृका जी स्त्री ती.

**विधा**, स्त्री० प्रकारवाचक हा शब्द, याचा प्रयोग समासीं संख्यावाचकापुढें होतो; उ० द्विविध, त्रिविध, बहुविध, इ०.

**विधाता**, पु०सं० ब्रह्मदेव

**विधान**, न० कोणेक अर्थानें उद्देशून कोणेक धर्मादिकाचें वाक्यकरून जें संबंधन तें; उ० हा घट लघु आहे, एथें घटानें उद्देशून लघुत्वाचें विधान आहे; गुरूचें वचन पाळावें, एथें पालनरूप व्यापाराचें विधान; २, आज्ञा इ० अनुष्ठान अमुक प्रकारें करावें, इ० रूप जें वाक्यनिबंधन तें, किं० तदनुरूप

नुरूप जें अनुष्ठान तें.

**विधायक**, ३ लिं॰ कोणेक विधीचा बोधक जो श्लोक, वाक्य, इ॰ तो, किं॰ तत्कर्ता ऋषि, राजा, इ॰ तो.

**विधि**, पु॰ सं॰ विधान; २, ब्रह्मदेव; ३, दैव.

**विधिनिषेध**, पु॰ कोणेक गोष्टीविषयीं हें बरें हें वाईट, हें करावें हें न करावें, इ॰ रूप जो भिन्नभाव तो, जो मानिला असतां वर्तनास कांहीं अडचण घडल्ये; उ॰ वेडा तो त्याला बोलावें काय, न बोलावें काय, याचा विधिनिषेध नाहीं.

**विधिनिषेधातीत**, ३ लिं॰ ब्रह्मज्ञान, पातित्य, इ॰ कारणामुळें शास्त्रोक्त विधिनिषेधाचा प्रतिबंध ज्याचा सुटला आहे, तो.

**विधिभंजक** ३ लिं॰ औत्सर्गिक विधिला गृ होण्याची योग्यता असून जाजवर लागू होत नाहीं असा जो कोणेक विषय तो.

**विधिविशेषण**, न॰ विधीवर ज्याचा अन्वय होत असतो असें जें विशेषण तें; उ॰ कुमाईत घोडा बळकट असतो एथें बळकट हें विधिविशेषण. आणि कुमाईत हें उद्देश्य विशेषण.

**विंधी**, स्त्री॰ कों॰ प्रा॰ काष्ठास जें विंधण्यानें भोक पाडिव असतात ती.

**विधु** पु॰ सं॰ चंद्र.

**विधुर**, पु॰ ज्याची स्त्री मेली असतां, ज्याणें दुसरें लग्न केलें नाहीं असा जो तो; २. मं॰ कांहींएक साधनानें जो विकल तो.

**विधेय**, ३ लिं॰ विधीचा विषयभूत जो अर्थ तो.

**विध्युक्त**, ३ लिं॰ वेदशास्त्रादि स्थित विधिवाक्यानीं सांगितलें जें प्रायश्चित्तादि तो.



**विंध्रुका, विंध्रू**, पु॰ कों॰ वस्त्रपर्णादिकांस पडलें असतें जें छिद्र तो.

**विध्वंस**, पु॰ कांहींएका पदार्थाचा फुटणें, मोडणें, कानीं जो नाश तो.

**विध्वंसित**, ३ लिं॰ विध्वंस पावला जो कोणेक अर्थ व्यवहार इ॰ तो.

**विध्वस्त**, ३ लिं॰ विध्वंसित.

**विनत**, ३ लिं॰ सं॰ नम्र.

**विनति**, स्त्री॰ विज्ञापना प्रथमार्थी.

**विनंती**, स्त्री॰ विनति शब्दाचा अपभ्रंश; कागदीं आपल्या बरोबरीचास, किं॰ सेवकास जो न। लिहितात त्यांत याचें लेखन करितात.

**विनय**, पु॰ अहंकारादिकांचा नाश न मल्यामुळें जी नम्रता असल्ये तो.

**विनवणी**, स्त्री॰ कांहीं एक कार्याकरितां कोणेकाची करितात जी प्रार्थना ती.

**विनवणें**, कांहीं कार्याकरितां कोणाएकास प्रार्थिणें.

**विना**, अ॰ सं॰ वांचून या अर्थी; विनापराध, विनारण, इ॰ स॰

**विनायकीचतुर्थी**, स्त्री॰ शुक्लपक्षींची जी चतुर्थी ती; व्रत विषय असतां प्र॰.

**विनाश**, पु॰ कोणेक पदार्थाचा विशेष करून जो नाश तो.

**विनाशकाल, विनाशकाळ**, पु॰ द्रव्य हानिरूप अनेक प्रकारचा नाश होण्यास कारणभूत जी प्रतिकूल काल दशा येत्ये तो; वा॰ विनाशकाले विपरीत बुद्धिः.

**विनिमय**, पु॰ सं॰ अदलाबदल.

**विनियुक्त**, ३ लिं॰ कोंहीं एका कर्मादिकाकडे जाची योजना झाली तो.

**विनियोग**, पु॰ कोणेक अर्थाची कोणेक गोष्टीकडे जी योजना तो.

**विनोद**, पु॰ सं॰ थट्टा; २. अनेक प्रकारे मन रमविण्याचा जो व्यापार तो.

**विनोदी**, ३ लिं॰ विनोद करण्याचा स्वभाव ज्याचा तो; २. विनोदानें केलें जें भाषण इ॰ तो.

**विन्मुख**, ३ लिं॰ विमुख शब्दाचा अपभ्रंश.

**विपत**, स्त्री॰ सं॰ विपत्ति; विपद्ग्रस्त. विपत्काल. विपद्धर्म, इ॰ स॰.

**विपत्ति**, स्त्री॰ सं॰ आपदा.

**विपत्तिकाल**, पु॰ आपत्काल.

**विपत्य**, पु॰ हाल. अनेक वचनीं प्र॰; २. स्त्री॰ विपत्ति शब्दाचा अपभ्रंश.

**विपरीत**, ३ लिं॰ शास्त्रसंप्रदायसिद्ध, किं॰ लोकसंप्रदायसिद्ध जे क्रमरीतिमार्ग आहेत, ते उलटे ज्याचे तो पदार्थ, किं॰ क्रिया तो; २. प्रतिकूल जो काल इ॰ तो.

**विपरीतलक्षणा**, स्त्री॰ कोंहीं वाक्य. किं॰ पद याचा प्रयोगीं तद्विपरीत अर्थी. जें वक्त्याचें तात्पर्य. किं॰ तात्पर्यकल्पना ती; उ॰ तुम्ही शहाणे आहां. एथें विपरीतलक्षणेनें तुम्ही मुर्ख आहां असा अर्थ होतो.

**विपर्यय**, पु॰ सं॰ विपर्यास.

**विपर्यस्त**, ३ लिं॰ विपर्यास झाला ज्याचा तो.

**विपर्यास**, पु॰ विपरीतपणा तो; २. कोंहीं एक गोष्टीचे पूर्वस्थितीमध्यें यत्किंचित् जें अंतर तो.

**विपल**, **विपळ**, न॰ पळाचा जो साठावा अंश तें काळवृत्ति.

**विपलाप**, **विपळाप**, पु॰ कोंहीं एक दुःख प्राप्त झाल्यामुळें, रडणें, आरडणें, इ॰ रूप जो व्यापार करितात तो.

**विपक्ष**, पु॰ सं॰ शत्रु; २. अनुमानसाध्य जें वन्ह्यादि त्याचा निश्चयेंकरून अभाव जेथें आहे असा जो ह्रद इ॰ पदार्थ तो.

**विपाक**, पु॰ सं॰ परिणाम. परंतु सा॰ कर्माचे परिणामा विषयीं प्र॰.

**विपुल**, **विपुळ**, ३ लिं॰ पुष्कळ.

**विप्र**, पु॰ सं॰ ब्राह्मण.

**विप्रतिपत्ति**, स्त्री॰ सं॰ कोंहीं एक कार्याविषयीं मनद्वयाचा जो परस्पर विरोध तो, किं॰ मतद्वयाचा अंगीकार करून जो परस्परांचा विवाद लागतो तो.

**विप्रतिपन्न**, ३ लिं॰ जो अर्थाविषयीं परस्परांची विप्रतिपत्ति आहे तो अर्थ; २. विप्रतिपत्ति धरून विवाद करणारे जे परस्पर ते प्र॰.

**विप्रिय**, ३ लिं॰ सं॰ अप्रिय.

**विफल**, **विफळ**, ३ लिं॰ निष्फळ.

**विबुध**, पु॰ सं॰ इंद्रादिक जे देव ते प्र॰; २. पंडित.

**विभक्त**, ३ लिं॰ सं॰ समुदायापासून पृथक् केला, किं॰ मानिला जो अंशरूप पदार्थादि तो; २. गृह, धन, भूमि इ॰ पदार्थ वांटून घेऊन परस्पर निराळे निराळे झाले जे बंधु, पिता, पुत्र, इ॰ तो.

**विभक्ति**, स्त्री॰ सं॰ शब्दापुढें कर्त्रादिकारक बोधक, किं॰ संबंधबोधक जे प्रत्यय होतात ते प्र॰; २. कोणकाचा

काचा बोलण्यांतील जो नासर्थार्थ त्यास म्ह०.

**विभव,** पु० दुसरा जो संवत्सर तो; २, ऐश्वर्य.

**विभत्स,** ३ लिं० बीभत्स शब्दाचा अपभ्रंश.

**विभाग,** पु० परस्पर संबद्धपणे स्थित जे अवयवादि त्यांचा छेदनादिकें करून होतो जो पृथक्‌भाव तो; २, एका पदार्थाचे अनेक जे अंश ते, म्ह०.

**विभागणें,** धनादि विभक्त करणें.

**विभागित,** ३ लिं० विभागिला जो पदार्थ तो.

**विभागी,** पु० भागीदार.

**विभावना,** स्त्री० कोणेक विषयाचें तत्व समजावें म्ह-णून त्या विषयावर अवयवशः बुद्धि फिरवून पा-हण्याचा जो व्यापार तो.

**विभास,** पु० गानांतील एक राग आहे.

**विभित्स,** ३ लिं० विभत्स.

**विभु,** ३ लिं० व्यापक.

**विभू,** पु० व्यूह शब्दाचा अपभ्रंश.

**विभूत,** स्त्री० विभूति शब्दाचा अपभ्रंश. परंतु सम-मार्थी.

**विभूति,** स्त्री० सं० गोमय काष्ठ इ० कांचें जें भस्म तें; २, ऐश्वर्य; ३, विद्या धनादि कारणानीं लोका-सरखें करून कोणकाचें वर्णन कर्तव्य असतां त्यास म्ह०.

**विभ्रम,** पु० सं० स्त्रियांचा जो शृंगाररूप विलास तो.

**विमन,** ३ लिं० सं० असंमत.

**विमनस्क,** ३ लिं० कांहींएक कारणामुळें ज्याचें अं-तःकरण खिन्न झालें असा जो तो.

**विमर्द,** पु० कों० विलंब. कालवृत्ति.



**विमल,** ३ लिं० सं० निर्मल.

**विमा,** पु० ही तुझी वस्तु विवक्षित स्थलीं सुरक्षित पोहचेल, किं० विवक्षित कालपर्यंत सुरक्षित राहील असें न झालें तर त्याची किंमत भरून देईन तसें झालें तर तूं मला अमुक द्यावेंस अशी बोली नें त्या वस्तूचा संभावित भयाचा कोणी रितीं जो निरास तो, करणें, भरणें, उतरणें, म्ह०; २, तदर्थ विमेकरी यास द्यावें लागतें जें द्रव्य त्या सही म्ह०.

**विमान,** न० आकाशमार्गीनें जाणारें असें देवादि-कांचें यान आहे.

**विमुख,** ३ लिं० सं० पराङ्मुख.

**विमेकरी,** ३ लिं० विम्याचा व्यवहार करितो तो.

**विमेदार,** ३ लिं० विमेकरी.

**वियत्,** न० सं० आकाश; वियद्गंगा, वियच्चर इ० समास.

**वियुक्त,** ३ लिं० विवक्षित अर्थाशीं वियोग पाव-ला जो अर्थ तो.

**वियुत,** ३ लिं० कोणेक अंकराशींतून उणा केला जो अंक तो.

**वियोग,** पु० संयुक्त पदार्थांचा जो पृथक्‌भाव तो.

**वियोजन,** न० वियोग करण्याचा जो व्यापार तें.

**विरका,** ३ लिं० कों० विरणा.

**विरक्त,** ३ लिं० सं० ज्या विषयावरून ज्याची प्रीति उठली आहे तो त्याविषयीं, किं० आत्मस्वरूप निरिक्त पदार्थांवर ज्याची प्रीति राहिली नाहीं असा जो मनुष्यादि तो.

**विरक्ति,** स्त्री० कांहींएका कारणामुळें कोणेक वि-

पयाविषयीं, किं॰ आत्म स्वरूपातिरिक्त पदार्थ मात्राविषयीं जी हृदयांत अप्रीति उत्पन्न होत्येती.

**विरखंड**, न॰कों॰ सुपारीचें विरीचा जो तुकडा तें.

**विरंगुळणें**, कांहींएक काम करताना मध्यें मध्यें गमणें.

**विरंगुळा**, पु॰ सुखेंकरून काल अतिक्रमायास साधनभूत जो कोणेक व्यापार, किं॰ पुत्रादि पदार्थ तो.

**विरघळणें**, विघरणें; २, वस्त्र जीर्णत्वादिकारणामुळें जागजागीं फाटे अशा अवस्थेनें युक्त होणें; ३, ला॰ लज्जाभय, शोक, इ॰ कांहीं कारण अकस्मात उत्पन्न झाल्यामुळें कोणेकानें धैर्य उत्साहादि भंगपूर्वक केवल गलितप्राय होणें.

**विरचित**, ३ लिं॰ सं॰ रचित.

**विरजण**, न॰ दुधाचें दहीं व्हावें म्हणून त्यांत जो कांहीं तक्रादि अंबट पदार्थ घालितात तें; २, एकाएका भाड्यांत, किं॰ एकएक वार विरजलेलें जें दूध तें प्र॰; ३, ला॰ तपश्चर्या, विद्या, इ॰ कांस कलंक लागाया जोगें जें कोणेकाचें वाईट आचरण असतें त्यास म्ह॰; रा॰ कोणेकानें कोणेकास विरजण घालणें, म्ह॰ कोणी कांहीं कार्यार्थ उद्युक्त झाला जो त्यानें अनुत्साहादि पावून निवृत्त व्हावें, किं॰ कलहादिकाविषयीं जो अनुयुक्त त्याणें तद्विषयीं मवृत्त व्हावें म्हणून त्यास कांहीं युक्ति प्रयुक्तीची गोष्ट सांगणें.

**विरजणी**, स्त्री॰ दूध विरजावयाचें जें पात्र ती.

**विरजणें**, दहीं व्हावें म्हणून दूध तक्रादि मिश्रित करणें; २, त्या दुधानें दधिरूप परिणाम पावणें; ३, ला॰ परस्पर विवदमान जे त्याणीं कज्जा इ॰ मोडाया जोगें आंतचे आंत समजणें; ४, न॰ कों॰ विरजणी.

**विरजा**, पु॰ दे॰ इरजा.

**विरजीक**, स्त्री॰ दे॰ इरजीक

**विरड**, स्त्री॰ इरड; २, रा॰ वरंड; ३, कामकरी इ॰ कानीं रानांत जाऊन तृण, काष्ठ, इ॰ कांची डोईवर वाहून आणली जी खेप ती.

**विरडणें**, कों॰ खरूज इ॰ कानें शरीर, किं॰ तदवयव व्याप्त होणें

**विरढा**, पु॰ रा॰ तुळस इ॰ कांचा जो माडा तो.

**विरढी**, स्त्री॰ कों॰ विरढी.

**विरढें**, न॰ कों॰ विरढा.

**विरणा**, ३ लिं॰ रा॰ अधिक विरण्याचा स्वभाव जाचा असें जें भात इ॰ तो.

**विरणें**, विरघळणें; २, वस्त्राचे तंतु इतस्ततः सरल्यामुळें त्या वस्त्रानें विरळपणानें विशिष्ट होणें; ३, कों॰ दाट आळावयासाठीं शेण विरळविरळ पसरणें; ४, रा॰ भात इ॰ कांडल्ये समयीं, किं तुरी इ॰ भरडल्ये समयीं त्याणीं विवक्षितानुरूप न होतां चूर्णता पावणें.

**विरत**, ३ लिं॰ सं॰ विराम पावला जो तो.

**विरति**, स्त्री॰ सं॰ विराम.

**विरथ**, ३ लिं॰ सं॰ युद्धामध्यें ज्याचा रथ शत्रूनें मोडून टाकिला अतएव जो रथ विहीन झाला तो.

**विरधाळें**, न॰ दे॰ जननाशौचास म्ह॰.

**विरपल**, स्त्री॰ रा॰ शेतांतील दाढ इ॰ नांगरल्ये समयीं त्या भूमीवर जो कांहीं तृणाचा काड्या, काट्याकुट्या, इ॰ कांचा समुदाय पडला असतो ती

नी जी वेंचून काढावी लागते.

**विरमणें**. चाललेला जो कांहीं एक व्यापार तो समाप्त न होतां मध्येंच कांहीं काळ राहणें, किं॰ तो व्यापार करणारा जो त्याणें तो व्यापार न करितां कांहीं काळ राहणें; २, वरमणें प्रथमार्थी.

**विरल**, ३ लिं॰ सं॰ मध्यें मध्यें विवक्षित प्रमाणाहून अंतर अधिक राहीं अशा प्रकारें संनिविष्ट जे अनेक अर्थ ते, किं॰ तादृश संनिवेश विशिष्ट अर्थानीं आरब्ध जो समुदाय तो; उ॰ ज्याचे दांत विरल ते प्रा॰ मूर्ख असत नाहीं; विरलवस्त्र धडवतीचे उपयोगी नाहीं; २, सर्वकाळीं, सर्वदेशीं असत नाहीं, क्वचित् कदाचित मात्र असतो, असा जो कोणेक पदार्थ तो; उ॰ गोड असून हितकर अशी गोष्ट सांगणारा मनुष्य विरल.

**विरलागत**, ३ लिं॰ विरल द्वितीयार्थी.

**विरलें**, न॰ इरलें

**विरवदी, विरवली**, स्त्री॰ स्त्रियांचा पायांचे बोटांत घालायाचें एक रुप्याचें भूषण आहे.

**विरविरणें**, खरखवणें.

**विरविरी, विरवीर**, स्त्री॰ खरखव.

**विरविरीत**, ३ लिं॰ केवळ झरझरीत जें वस्त्रादि तो.

**विरस**, ३ लिं॰ रस जोंत नाहीं असें जें भाषण, फल इ॰ तो; २, पूर्वी उत्साहानें प्रवृत्त असतां कांहीं अप्रिय प्राप्त झाल्यामुळें ज्याचा मनोभंग झाला तो; उ॰ मोठ्या हौशीनें वाडा बांधीत होता परंतु पटकन स्थानांतरी निवर्तला यामुळें तो गृहस्थ विरस झाला.

**विरह**, पु॰ स्त्रीपुरुष, मित्रमित्र, पितापुत्र, इ॰ कांचा जो परस्पर वियोग होतो तो; २, तादृश वियोगाः होतें जें दुःख तो; विरहानल, विरहज्वर, इ॰ स॰ ३, सं॰ कोणेक अर्थाचें कोणेक अर्थास जें राहित्य तो.

**विरहिणी**, स्त्री॰ प्रियपुरुषाचे विरहानें विशिष्ट जी स्त्री ती.

**विरहित**, ३ लिं॰ रहित जो तो.

**विरही**, पु॰ सं॰ स्त्रीचे विरहानें विशिष्ट जो पुरुष तो; २, ३ लिं॰ कोणएका अर्थाचा विरह ज्यास आहे तो.

**विरळ**, ३ लिं॰ विरल शब्दाचा अपभ्रंश.

**विरळा**, ३ लिं॰ विरळागत; २, अ॰ क्वचित् कदाचित; उ॰ सर्वदा वीज पडत्ये असें नाहीं विरळा पडत्ये.

**विरळागत**, ३ लिं॰ विरलागत.

**विराकत, विरारवत**, स्त्री॰ इरारवत.

**विराग**, पु॰ सं॰ विरक्ति

**विरागी**, ३ लिं॰ सं॰ विरक्त.

**विराजणें, विराजणें**, य॰ विशेषंकरून शोभणें

**विराजमान**, ३ लिं॰ अलंकारादिकानें शोभायुक्त जो तो.

**विराजित**, ३ लिं॰ विराजमान.

**विराट्**, पु॰ जगदाकार जो ईश्वराचा देह पुराणादिकांत वर्णिला आहे तो, विराट्देह, विराट्स्वरूप, इ॰ स॰.

**विराम**, पु॰ कोणेक चालत्ला जो व्यापार त्याची गति राहून कुंठितपणें जी स्थिति तो, २, कांहीं

कांहींएक कार्य करित असतां त्या मध्यें कांहींकाळ येतात जो विसांवा तो.

**विरी**, स्त्री० चुना, पीठ, औषध, इ० पदार्थांचा अंगीं जो सत्वांश असतो तो; उ० एकदां चुना वाळला ह्मणजे त्याची विरी जात्ये; २, कों० पोफळीचे अंगास वेष्टित असतो जो झावळीचा बुंधाकडला भाग तो.

**विरुद्ध**, ३ लिं० प्रतिकूल जें भाषण, गति, मनुष्य, वायु, इ० तो.

**विरूप**, ३ लिं० विद्रूप.

**विरूळ**, ३ लिं० कों० विरल शब्दाचा अपभ्रंश; परंतु प्रा० प्रथमार्थी.

**विरोदी**, स्त्री० विरवली.

**विरोध**, पु० कोणेक अर्थाचा कोणेक अर्थाशीं जो विरुद्धभाव तो.

**विरोधी**, ३ लिं० ज्याचा ज्याशीं विरोध आहे ते परस्पर; २, पु० साठ संवत्सरांतील तेविसावा जो संवत्सर तो.

**विरोधीभक्त**, पु० ईश्वराचा निरंतरध्यासअसावा ह्मणून त्याशीं द्वेष मांडितो असा जो कोणेक भक्त तो.

**विरोळी**, स्त्री० विरवली.

**विरोळा**, पु० एक निर्विषसर्पजाति आहे, जो नेहमी पाण्यांत राहतो.

**विलग**, न० कोणेक व्यापारीं, किं० पदार्थी यथास्थितपणें वर्तण्याविषयीं जी साधनसंपत्ति असावी त्या मध्यें कांहीं उणें असल्यामुळें जें वैकल्य तें, किं० तें उणें; उ० संसार चांगला थाटला होता पण बायको मेली इतक्यानें विलग झालें; ह्यो नवरें विलग रवरें; २, ३ लिं० तें विलग आहे ज्यामध्यें असा जो संसार, व्यवहार, किं० गाडया, घडयाळ, इ० तो; उ० बायको मेली ह्मणून संसार विलग झाला.

**विलंघणें**, य० उल्लंघणें.

**विलपणें**, य० विलाप करणें.

**विलंब**, पु० कांहींएक कार्यास जो कालरूप अवकाश असतो, किं० लागतो तो.

**विलंबित**, ३ लिं० विलंबविशिष्ट जो कार्यादि तो.

**विलंबी**, पु० साठ संवत्सरांतील जो बत्तिसावा संवत्सर तो.

**विलय**, पु० सं० मोडणें, बुडणें, इ० कानीं जो कांहीं पदार्थाचा नाश तो.

**विलसणें**, य० विराजणें.

**विलसित**, ३ लिं० विराजित.

**विलक्षण**, ३ लिं० लोकोत्तर, किं० लोक संप्रदाया पेक्षां विपरीत जो मनुष्य, किं० सामर्थ्य, स्वभाव, इ० तो; २, कोणका पेक्षां कांहींएक विशेषण विशिष्ट जो तो; उ० या दोन्ही नळ्या सारख्या ह्मणतां खऱ्या पण इजवर तांबडा पट्टा आहे तेव्हां तिजहून ही विलक्षण आहे.

**विलाप**, पु० कोणीएक मृत झाला असतां, किं० कांहीं हानि झाली असतां, रडणें, ओरडणें, इ० रूप जो व्यापार करितात तो.

**विलायत**, स्त्री० ज्या लोकांचा जो मूळभूत देश ती त्यांची, परंतु इंग्रज लोकांचा जो मूळ देश त्याविषयीं विशेष प्रसिद्धि; २, ला० ज्या वृक्ष, पशु, इ० पदार्थांनें

पदार्थाचें मुख्यत्वेंकरून जें उत्पत्तिस्थान तें त्याचें असें ह्मणतात.

**विलायती**, ३लिं॰ इंग्रज लोकांची जी विलायत-तत्संबंधी जो शस्त्र, वस्त्र, झाड, पशु, इ॰पदार्थ तो.

**विलास**, पु॰ स्त्रिया, पुष्प, गीत, नृत्य, इ॰ जे शृंगारप्रधानविषय तद्रुप भोगद्वारा जो अनेक प्रकारचा क्रीडा तो, किं॰ कांहीं विषय नसतांही केवल अंतःकरण रमवायासाठीं इच्छानुरूप जें वर्तन तो; स्त्रीविलास, राजविलास, बुद्धिविलास, इ॰स॰.

**विलासी**, ३लिं॰ अनेक प्रकारचे विलास करण्याचा स्वभाव ज्याचा तो

**विलेपन**, न॰ सं॰ शरीर, शरीरावयव, इ॰कांस चंदनादि पदार्थांचा करितात जो लेप तें, किं॰ तो लेप करण्याचा जो व्यापार तें, किं॰ तदर्थ सिद्ध केलेंजें तें चंदनादि द्रव्य तें.

**विलोकणें**, प्र॰ अवलोकणें.

**विलोकन**, न॰ अवलोकन.

**विलोकित**, ३लिं॰ अवलोकित.

**विलोम**, ३लिं॰ अनुलोमाचा प्रतिपक्षी जो तो.

**विलोल**, ३लिं॰ सं॰ लोल.

**विल्हय**, स्त्री॰ कों॰ एक मूळपुरुषापासून झालेला जो वंश तो; २, विल्हेवाट.

**विल्हा**, पु॰ विल्हे.

**विल्हे**, स्त्री॰ अकारादिवर्ण अनुक्रमानें लिहून तत्तद्वर्णादिनामें त्या त्या वर्णाखालीं लिहावीं ह्मणून जीं अनुक्रमानें प्रतिवर्णाचीं स्थानें केलीं असतात तीं प्र॰; अकारविल्हे, सकारविल्हे, लकारविल्हे, इ॰; २, कांहींएक पदार्थांचीं जाति गुणादि भेदकेंकरून भेदकरून पृथक् पृथक् करितात जीं प्रकरणें तीं प्र॰; उ॰ कोणत्याही पदार्थाचा विल्हेलाविलेल्या असल्या ह्मणजे पाहिजे तो पदार्थ लवकर सांपडतो.

**विल्हेवाट**, स्त्री॰ द्रव्यादि पदार्थांचा अनेक प्रकारें खर्चवेचकरून जी निःशेषता ती.

**विल्हेवार**, अ॰ जा विल्हेंतील त्या विल्हेंत अशा प्रकारें; उ॰ सारे कागद विल्हेवार लावून ठेव; विल्हेवार नावें लिही.

**विवंचना, विवंचना**, स्त्री॰ कांहींएक संकट, किं॰ अवघड गोष्ट, इ॰ प्राप्त झालें असतां तन्निर्वाहार्थ पडतो जो विचार ती.

**विवर**, न॰ सं॰ बिल.

**विवरण**, न॰ सं॰ थोडया शब्दांत गूढरूपेंकरून स्थित जो श्लोकवाक्यादिकांचा अर्थ त्यास शब्दांतरानीं व्याख्याद्वारा जें स्पष्टीकरण तें.

**विवर्ण**, ३लिं॰ सं॰ शुक्ल, गौर, इ॰ जो पूर्वस्थित रंग तो भिन्न झाला ज्याचा असें जें शरीरादि तो.

**विवश**, ३लिं॰ पराधीन जो मनुष्यादि तो.

**विवशी, विंवशी**, स्त्री॰ दुर्दशेची अभिमानिनी एक देवता आहे, जिचेयोगानें अनर्थकारक कर्माचेठायीं प्रवृत्ति हितकारक व्यापारापासून पराङ्मुखता इ॰ होत असावें; उ॰ मुळचा सुखीहोता पण घरांत विवशी शिरतांच किमयेचे छंदास लागून बुडाला; २, द्वाड, किं॰ वाईट, पायगुण जीचा अशी जी स्त्री तीस आरोपानें ह्म॰; ३, कों॰ मनुष्य, किं॰ वंश, किं॰ इतर कांहीं पदार्थ यांस प्रा॰ अनिवार्य असा

सा जो दुर्व्यसन, महारोग, इ॰ कांहीं दोष जड-
तो त्यास म्ह॰.

**विवक्षा**, स्त्री॰ सं॰ वक्त्याची कोणेक अर्थ विषयक
प्रतिपादन करण्याविषयीं जी इच्छा ती.

**विवक्षित**, ३ लिं॰ सं॰ जा अर्थाविषयीं विवक्षा आ-
हे तो अर्थ; २, ग्राम, राज्य, इकामधें शिष्टत्वेंक-
रून जे कोणी गणनीय असतात त्यांस प्र॰ म्ह॰

**विवाद**, पु॰ वाद प्रथम द्वितीयार्थीं.

**विवाह**, पु॰ जाचे योगानें स्त्रीपुरुषांचा दांपत्य संबं-
ध होतो, असा उभयतांचा मिळून एक संस्कार
आहे तो.

**विवाहणें**, पुरुषानें विवाहधर्मानें स्त्री अंगीकारणें;
२, स्त्रीस, किं॰ पुरुषास विवाह संस्कारानें संस्कृ-
त करणें.

**विवाहित**, ३ लिं॰ विवाह झाला जाचा तो पुरुष.
किं॰ स्त्री ती.

**विविक्त**, ३ लिं॰ सं॰ विवेचन केलें जाचें तो अर्थ; २,
न॰ एकांत स्थल तें.

**विविध**, ३ लिं॰ नानाविध.

**विवेक**, पु॰ विचार प्रथमार्थीं; २, काम, क्रोध, लो-
भ, इ॰ रूप जा अंतःकरणवृत्ति उठतात तदधी-
न आपण न होतां विचारानें त्या वृत्तींचें आ-
वरणकरून जी चित्ताची दृढता तो, किं॰ तत्साध-
क जो व्यापार तो; उ॰ अतांशे अन्नाचा निटका-
रा आला आहे. पण विवेकानें खातों.

**विवेकी**, ३ लिं॰ विवेक जास आहे तो.

**विवेचन**, न॰ सं॰ कोणेक समुदायांतून अवयवांचें
विवक्षित धर्मेंकरून जें पृथक्पृथक् करण तें.
किं॰ कोणेक अव्यवविभूत अर्थाचें अवयवशः
परिज्ञान व्हावें म्हणून अवयवशः जें मनानें
विषयीकरण तें.

**विवेचना**, स्त्री॰ सं॰ विवेचन.

**विशकल**, ३ लिं॰ सं॰ फुटणें, मोडणें, इ॰ कामुळें
भिन्नभिन्न अवयव झाले जाचे तो.

**विंशति**, ३ लिं॰ सं॰ वीस, २०.

**विशद**, ३ लिं॰ गूढांश संक्षेप इ॰ कामुळें अस्पष्ट-
ता इ॰ जांत नाहीं असें जें भाषण, लेख, इ॰ तो;
२, अडचण व्हावयाजोगें नव्हे असें जें प्रसृत
मोकळें स्थल, पात्र, इ॰ तो.

**विशाखा**, स्त्री॰ सोळावें नक्षत्र त्या.

**विशाल, विशाळ**, ३ लिं॰ लांब रुंद आकारानें
मोठा जो पदार्थ तो; विशालभाल, विशालने-
त्र, इ॰ समास.

**विशिख**, ३ लिं॰ शेंडी राखावी हा धर्म जांचे आ-
तीत नाहीं, असेजे म्लेन्छादिक त्यांस म्ह॰;
२, पु॰ सं॰ धनुष्यानें सोडावयाचा जो बाण तो.

**विशिष्ट**, ३ लिं॰ कोणेक विशेषणाचे संबंधामुळें
सामान्यापेक्षां कांहीं भेद पावलेला जो कोणे-
क अर्थ तो; उ॰ शुद्राचा निषेध केला असतां.
विशिष्टाचा सहजच होतो; २, जा कोणेक अ-
र्थानें युक्त जो कोणेक अर्थ तो तद्विशिष्ट; उ॰
घटविशिष्ट भूतल, जलविशिष्टपात्र, इ॰ प्रा॰
समासीं प्र॰; ३, जाचे पोटीं अवांतरभेद अ-
नेक आहेत, असा जो कोणेक अर्थ तो; उ॰
अवांतर पदांचे अर्थ समजले म्ह॰ विशिष्ट
वाक्याचा अर्थ ध्यानांत येतो.

**विशी**, स्त्री॰ वीस मनुष्यादिकांचा, किं॰ वीस वर्षांचा जो समुदाय ती.

**विशीर्ण**, ३ लिं॰ आरंभक अवयवांचे संधि मोकळे झाले आहेत ज्याचे, असा जो अवयविभूत पदार्थ तो; उ॰ कागद कुजून अगदीं विशीर्ण झाला.

**विशेष**, पु॰ जेणेंकरून एक सामान्याक्रांत अनेक पदार्थांचा परस्पर भेद उपलभ्यमान होतो असा जो पदार्थनिष्ठ जात्यादि धर्म तो; उ॰ मनुष्यत्वेंकरून पाहिलें असतां, सर्व एकच परंतु ब्राह्मणत्व, शूद्रत्व, इ॰ विशेषांनीं अनेक व्यवहार होतात; २, ज्या सामान्य धर्माचा पोटचा धर्मानें विशिष्ट जो अर्थ तो तद्विशेष; उ॰ फणस हा वृक्षविशेष आहे; ३, ३ लिं॰ विवक्षित प्रमाणापेक्षां, किं॰ सामान्य प्रमाणापेक्षां जो अधिक तो; उ॰ याचा अध्ययनापेक्षां याचें अध्ययन विशेष आहे.

**विशेषण**, न॰ सं॰ कोणेक अर्थावर स्ववाच्य गुणादि धर्मांचा संबंध बोधवितो असा जो शब्द तें; २, शब्दबोधांत ज्या अर्थाचा अन्वय ज्या अर्थावर असतो तो त्याचें; उ॰ राजाचा सेवक एथें राजा या शब्दाचा अन्वय सेवक शब्दावर होतो म्हणून राजा हें विशेषण सेवक हें विशेष्य.

**विशेषणविशेष्यभाव**, पु॰ विशेषण आणि विशेष्य यांचा जो परस्पर संबंध तो.

**विशेषात्कार**, पु॰ कोणेक अर्थास जें सामान्यापेक्षां आधिक्य वैशिष्ट्य तो.

**विशेषात्कारेंकरून**, अ॰ विशेषेंकरून.

**विशेषेंकरून**, अ॰ सामान्यतः जीं कोणेक विधीचीं लक्ष्यें त्याहून कोणेक लक्ष्यीं विधिकराशाचें आधिक्य पडे अशा प्रकारें; उ॰ अतिभोजन सर्वदा वर्ज्य शरदतूंत तर विशेषेंकरून.

**विशेष्य**, न॰ विशेषणाचा ज्याजवर अन्वय होतो असा जो शब्द, किं॰ अर्थ तें.

**विंशोपक**, पु॰ सं॰ विश्वा प्रथमार्थीं.

**विशोभित**, ३ लिं॰ चांगला शोभत नाहीं असा जो पदार्थ तो.

**विश्रांत**, स्त्री॰ विश्रांति शब्दाचा अपभ्रंश; २, ३ लिं॰ विश्रांतिपावला जो तो.

**विश्रांति**, स्त्री॰ विसांवा; २, कोणेक विषयाचे योगानें शोकादि दुःख विसरून सुखेंकरून जें कालक्रमण ती; ३, तत्साधनीभूत जो पुत्रक्रीडनक इ॰ विषय ती; ४, विवक्षित अधिकरणीं कोणेक व्यापार राहिल्यामुळें जी शून्यता ती; उ॰ एकच दोन आहे ही तुम्हीं घेऊन गेलां म्हणजे इकडे विश्रांति झाली म्हणून समजा; ५, कोणेक विध्यादिकांची कोणेक लक्ष्यातें धरून पर्यवसानीं जी स्थिति ती; उ॰ प्रथम सर्वांस चोर म्हणून ठरविलें होतें, मग चौकशी करतां करतां त्या दोघांवर मात्र चोरपणाची विश्रांति झाली.

**विश्राम**, पु॰ सं॰ विश्रांति चतुर्थार्थीं वांचून.

**विश्रुत**, ३ लिं॰ सं॰ लोकांत जो प्रसिद्ध तो.

**विश्व**, न॰ यच्चयावत् जें भावाभावात्मक अर्थजात तें; विश्वकर्ता, विश्वनाथ, इ॰ सं॰.

**विश्वकर्मा**, पु॰ देवजातिमध्यें शिल्प जाणता

एक देव आहे; २, ला॰ कला कुशलता यामध्यें अतिचतुर जो मनुष्य त्यास आरोपानें त्य॰; ३, नवीन काहीं एखादी गोष्ट उत्पन्न करण्याचें सामर्थ्य ज्याचें त्यासही आरोपानें त्य॰.

**विश्वकुटुंबी**, ३ लिं॰ ईश्वर; २, ला॰ बहुतांचा संसारची पोटग करणारा असा जो कोणी मनुष्य असतो त्यास त्य॰.

**विश्वसनीय**, ३ लिं॰ ज्याविषयीं लोकांनीं विश्वास धरावा, असा जो मनुष्य, भाषण, इ॰ तो.

**विश्वस्त**, ३ लिं॰ कोणेक गोष्टीविषयीं कोणेकावर विश्वास ठेवून राहिला जो तो.

**विश्वा**, पु॰ पदार्थजातिमात्राचें जें पराकाष्ठाचें प्रमाण त्याचा क्रम जो विसावा अंश तो; उ॰ यदा वृष्टि सवा विश्वे आहे; २, रुक्याचा जो विसावा अंश तो.

**विश्वामित्रसृष्टि**, स्त्री॰ विश्वामित्र म्हणून महातपस्वी एक ऋषी होता त्याणें ईश्वर सृष्टीची प्रतिरूप जी सृष्टि उत्पन्न केली आहे ती; उ॰ ताड, गर्दभ, वनगाय, म्हैस, इ॰ हे विश्वामित्रसृष्टींतील पदार्थ.

**विश्वामित्री**, स्त्री॰ संकेतानें म्हशीस त्य॰.

**विश्वावसु**, पु॰ एकुणचाळिसावा जो संवत्सर तो.

**विश्वास**, पु॰ कोणेक गोष्टीविषयीं हें अमुकप्रकारेंच होईल, अन्यथा होणार नाहीं, असा अंतःकरणांत धरिला असतो जो निश्चय तो; २, कोणेक मनुष्यादिकावर हा सर्वथा प्रतारणादिकेंकरून आपल्याशीं प्रतिकूल वर्तन करणार नाहीं, असा जो भाव धरिला असतो तो.

**विश्वासघात**, पु॰ कोणेकानें कोणेक गोष्टीविषयीं आपल्यावर धरिला असतो जो विश्वास त्याचा आपल्या तत्प्रतिकूल वर्तनानें होतो जो घात तो.

**विश्वासघातकी**, ३ लिं॰ विश्वास घात करण्याचा स्वभाव ज्याचा तो: किं॰ तो घडला ज्यापासून तो; त्य॰ विश्वासघातकी आणि महापातकी.

**विश्वासणें**, कांहींएक कार्याविषयीं कोणेकास विश्वास विषयकरणें; २, कोणेका कार्यादिक कोणेकाचे विश्वासावर टाकणें.

**विश्वासू, विश्वासूक**, ३ लिं॰ कांहींएका गोष्टीविषयीं ज्याजवर विश्वास ठेवणें योग्य आहे, असा जो मनुष्यादि जीव तो.

**विश्वेदेव**, पु॰ स्वर्गी एतत्संज्ञक एक देवता समुदाय आहे ते.

**विष**, न॰ ज्याचा शरीरादिकांस संपर्क झाला असतां प्रतिकूल विकृति होत्ये. किं॰ मृत्यु येतो, असा जो सर्प सुरव्यादिकांचा ठायीं, किं॰ सोमल, बचनाग, इ॰ कांचा ठायीं दुष्ट कांही अंश असतो तें; नखविष, दंतविष, इ॰ स॰; २, पदार्थ निर कडूपणाचा अतिशय वर्णायाचा असतां त्या पदार्थास आरोपानें त्य॰; ३, ज्याचा संग्रहानें आपल्यास मृत्यु इ॰ संकट संभावना आहे, असा जो द्रव्यादिपदार्थ त्याचा ठायीं आरोप करितात; विषाची परीक्षा पाहूनये घेऊनये, इ॰ स्थलीं ज्या कर्मामध्यें नाश संभावना आहे, ते

तें कर्म करून पाहूं नये.

**विषघटी**, स्त्री॰ अश्विन्यादि नक्षत्रांचा कोणेकाचा मधल्या, कोणेकाचा पहिल्या, कोणेकाचा शेवटल्या, अशा चार चार घटिका ज्योतिःशास्त्रांत सांगिल्या आहेत त्या.

**विषप्रयोग**, पु॰ कोणेकास मारण्याविषयीं भोज्यादि पदार्थांचा ठायीं गुप्तरूपें मिसळून जी विषाची योजना ती.

**विषम**, ३लिं॰ तुल्यार्थावांचून समाचा आणि अनुकूलाचा प्रतिपक्षी तो; विषमकाल, विषमदशा, इ॰ स॰.

**विषमकाल**, पु॰ प्रतिकूल जो काल तो.

**विषमज्वर**, पु॰ येण्याजाण्याची वेळ ज्याची नियमित नाहीं आणि सर्वदा सारखा असत नाहीं असा जो ज्वर तो.

**विषमपाचन**, न॰ शत्रुपाचन.

**विषमभाव**, पु॰ एक कमी एक अधिक, किं॰ एकास थोडें, एकास फार, इ॰ रूप जो अंतःकरणांत असतो भाव तो.

**विषमभोजन**, न॰ विषमाशन.

**विषमान्न**, न॰ नित्याचें जें भक्षायाचें अन्न त्याहून जड, किं॰ हलकें उष्ण, किं॰ शीत, इ॰ रूप मेक्षिलें जें अन्न तें.

**विषमाशन**, न॰ नित्याची जी भोजनाची वेळ तिचा आलीकडे, किं॰ पलीकडे, किं॰ नित्याचे प्रमाणापेक्षां अधिक उणें जें भोजन तें, ज्याचे योगानें पित्तादि क्षोभ होतो.

**विषय**, पु॰ चक्षुरादि बाह्येंद्रियानीं, किं॰ अंतःकरणानें जाणायाचा जो रूपादि, किं॰ सुखदुःखादि अर्थ तो त्याचा त्याचा, किं॰ त्याणीं स्ववृत्तीनें आकलित केलेला जो अर्थ तो तो त्याचात्याचा; उ॰ खारट, तुरट, हा सर्व रसनेचा विषय; ती स्त्री माझा नेत्रास विषय जेह्मां होईल तेह्मां काळी आहे कीं गोरी ती सांगेन; चक्षुर्विषय मनोविषय, ज्ञानविषय, इ॰ स॰; २, शस्त्रादिकानें आपली जी छेदकतादिरूप वृत्ति तिणें करून आकलन करायास योग्य, किं॰ आकलित केलेला जो लक्ष्यादि कोणेक अर्थ तो; उ॰ शरीर जों रोगविषय झालें नाहीं, तों पथ्यापथ्य विचारही तुह्मास मस्करीशी वाटती; ३, जा इंद्रियादिकानें जें कर्म करायास योग्य, किं॰ शक्य तें तें कर्म त्यात्या इंद्रियादिकांचा; उ॰ बोलणें हा वागिंद्रियाचा विषय; मामलतकरणें हा भिक्षुकाचा विषय नव्हे; रफूकरणें तर, बारीक सुई घ्या हा दाभणाचा विषय नव्हे; ४, इच्छा, क्रोध, लोभ, संकल्प, इ॰ मनोवृत्ति जा अर्थातें उद्देशून उठतात तो अर्थ त्या इच्छादिकांचा; ५, शास्त्रादि संबंधी जो शब्द, व्यवहार, त्यामध्यें प्रतिपाद्यत्वेंकरून विवक्षित जो अर्थ तो; उ॰ शब्दसाधनरूप विषय ज्यांत असतो त्याला व्याकरण ह्मणावें; ६, कोणेक गोष्टीचें जें उद्देश्य तो त्या गोष्टीचा; उ॰ तुह्मी जो हा उद्योग करिता याचा विषय कोण; ७, विक्रयादि द्वारा जापासून पैका उत्पन्न होण्याची योग्यता आहे, अतएव पैक्याशीं अभिन्नत्वेंकरून विवक्षित जो सोनें, रुपें, घरदार, भांडेंकुडें,

इ॰

इ० पदार्थ तो; उ० त्या भटजीबावांस केवळ रोख शंभर रुपये पोहंचत नाहींत परंतु सारेवर्षात शंभर रुपयांचा विषय पोहंचतो.

**विषयी**, ३ लिं० मैथून, गायन, स्रक्चंदनाद्युपभोगाविषयीं जो अत्यासक्त तो; २, जो विषय ज्याचा तो त्या विषयाचा.

**विषयीं**, अ० कोणेक अर्थास विषय लेंकरून धरून; उ० मी घराविषयीं प्रयत्न करितों; मला स्वर्गाविषयीं इच्छा नाहीं.

**विषयीकरण**, न० सं० इंद्रियांनीं स्वस्वविषयभूत अर्थाचें स्वस्ववृत्तीनें जें स्वीकरण तें.

**विषाद**, पु० कोणेक गोष्टीविषयीं उत्साहानें प्रवृत्त असतां तेथें कांहीं प्रतिकूल झाल्यामुळें तो उत्साह भंगून तद्विषयीं उलटी द्वेषबुद्धि व्हावी असा जो अंतःकरणांत भाव विशेष होतो तो.

**विषादी**, ३ लिं० अल्प निमित्तावरून ज्यास विषाद येत असतो अशा स्वभावाचा जो तो.

**विषार**, पु० विखार.

**विषारणें**, विखारणें.

**विषुव**, न० सं० मेष आणि तुळा यांचे आरंभींचे जे नक्षत्रचक्राचे प्रदेश ते प्र०; विषुवचक्र, विषुवमंडल, इ० स०.

**विषूचिका**, स्त्री० सं० मोडशी.

**विष्कंभ**, पु० सत्तावीस योगांतील जो पहिला योग तो.

**विष्कंभक**, पु० नाटकामध्यें पूर्वकथा संदर्भपूर्वक भाविकथेचा संदर्भ, संक्षेपानें कोणेक पात्र बोलतें तो ग्रंथ.

**विष्टि**, स्त्री० सं० कल्याणी.

**विष्ठा**, स्त्री० गुदद्वारापासून निघतो जो मल ती.

**विष्णु**, पु० सृष्टिस्थितिलय करणार जे ईश्वराचे तीन अवतार त्यांतील स्थितीचा अधिकारी जो ईश्वर तो.

**विष्णुक्रांता**, स्त्री० एक औषधी झाड आहे ती.

**विष्णुपद**, न० गयाक्षेत्रीं प्रतिमारूप जें विष्णूचें पाऊल आहे तें.

**विष्णुबलि**, पु० सोळा संस्कारांतील एक संस्कार आहे.

**विसकटणें**, जुळून, किं० रचून स्थित जे पानें, काष्टें, इटा, इ० पदार्थ त्यांचे अवांतर अवयव इतस्ततः केल्यामुळें अस्ताव्यस्त करणें; २, यथायोग्य संबंधानें अनेक अंगें परस्पर संबद्ध होऊन यथायोग्य रचनेनें स्थित जो संसार, सावकारी, इ० कांहीं व्यवहार त्यांतें त्यांतून कांहीं अंगाचें राहित्य करून पूर्व रचनेचा भंगानें विशिष्ट करणें.

**विसकटाविसक**, स्त्री० संसारादिकांचा अतिशयित जो विसकळीतपणा ती; उ० चौघे भाईं कडेगले या मुळें संसाराची विसकटाविसक झाली.

**विसकणें**, ग० गाय, म्हैस, इ० कानीं दुभतेपणा सोडून उडणें.

**विसकळ**, ३ लिं० एकमेकाची दाटी एकमेकास न होई अशाप्रकारें संनिविष्ट जें वृक्ष, पात्रें, गृहें, इ० पदार्थ तो; २, ज्यामध्यें विवक्षित कर्माविषयीं अडचण होऊं नये असा प्रशस्त जो पात्र,

आल्या, स्थल, इ० पदार्थ तो; २, संक्षिप्तपणा, काठिन्य, इ० रहित जें मोकळें भाषण, वाक्य, इ० तो.

**विसकळणें**, विसकटणें.

**विसकळीत**, ३ लिं० विसकटला गेला जो पोथी, संसार, इ० तो.

**विसंगत**, ३ लिं० पूर्वापर संगति जास नाहीं असा जो ग्रंथ, भाषण, इ० तो.

**विसनखीचा**, ३ लिं० उपद्रव, पीडा, बाधा, इ० प्र० स्त्री संभोगानें भरतें जें कोणेकास दुःख त्यास संकेतानें म्ह०.

**विसण**, न० पाहिजे तितकेंच उष्ण रहावें म्हणून अति उष्ण पाण्यांत घालितात जें थंड पाणी तें.

**विसंधित**, ३ लिं० संधि मोकळे झाले आहेत जाचे तो.

**विसपगोल**, पु० इसपगोल.

**विसब**, पु० इसब.

**विसंबणें**, रक्षणाद्यर्थ निरंतर लक्ष्यानुसंधानांत बाळगायाचें जें लेंकरूं, अलंकार, वस्त्र, संसार, इ० कांहींएक त्यानें कांहींकाल लक्ष्या निराळा करून असणें; उ० या विहिरीवर क्षणभर जर पोहरा विसंबाल तर त्यागळाच जाईल.

**विसर**, पु० कोणेक विषयाचा अंतःकरणास संस्कार झाल्यामुळें तद्विषयक असतें जी अंतःकरणांत स्फूर्ति तीचा कालातिक्रम, वृत्त्यंतराचा उदय इ० कारणामुळें होतो जो अभाव तो; २, स्मृत्य कालातिक्रमानें अवगत झालेल्या अर्थाची विस्मृति पदार्थी असा कोणेकाचा बुद्धीस असतो जो दोष तो.

**विसरणें**, कोणेक विषय स्मृतींतून सोडणें; २, धारणेनें धरलें असतें जें श्लोकवाक्यादि तें सोडणें; ३, तत्तत्प्रसंगीं मनांत आणून करावयाचीजी कांहींएक गोष्ट ती करावयास चुकणें.

**विसराळू**, ३ लिं० विसरण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**विसर्ग**, पु० एक वर्ण आहे जो क, ख, प, फ, श, ष, स, हे वर्ण पुढें असतां, किं० अवसान असतां स्वरापुढें होत असतो; २, सं० कोणेक अर्थाचा जो त्याग तो.

**विसर्जणें**, विसर्जित करणें.

**विसर्जन**, न० सं० आपल्याशीं संबद्ध होऊन राहिलेला जो कोणेक अर्थ तो आपल्यापासून वियुक्त होई असा त्यास सोडून देण्याचा जो व्यापार तें; प्राण विसर्जन, बाण विर्जन, मल विसर्जन, इ० स०; २, प्रतिमा, सभा, इ० अधिकरणातें आश्रयून स्थित जें देवता, मनुष्यसमुदाय, इ० त्यातें तेथून उठून जावयास निरोप देण्याचा जो व्यापार तें; देवता विसर्जन, सभाविसर्जन, इ० स०.

**विसर्जित**, ३ लिं० विसर्जन केलें ज्यांचें तो.

**विसर्पिका**, स्त्री० सं० एक क्षयरोग आहे

**विसवटा**, पु० रा० विसांवा.

**विसवणें**, रा० विसावणें.

**विसवाविसवी**, अ० रा० धारगीपारगीनें.

**विसवीशीत**, ३ लिं० मिसमिशीत.

**विसळणें**, पात्रास लागलेलें जें विटाळाचें पाणी, मृत्तिका, इ० तें जावें म्हणून पाणी घालून

लून तें पात्र धुणें.

**विसळवणी**, न॰ दहीं, ताक, दूध, इ॰कांचें पात्र विसळून तदंश युक्त काढिलेलें जें पाणी तें.

**विसाण**, न॰ विसण.

**विसार, विसारा**, पु॰ इसार.

**विसावण**, न॰ रा॰ विसण.

**विसावणें**, क्रि॰ कढत पाण्यांत विसण घालून पाहिजे तितपत उष्ण करणें; २, रा॰ करावयास धरलेल्या कामापासून विरत होऊन राहणें.

**विसांवा**, पु॰ कोणेक कर्माचेठायीं व्यापृत असल्यामुळें होतात जे श्रम तत्परिहारार्थ कांहीं काल तें कर्म सोडून मोकळेपणें जी स्थिति ती; २, कोणेक विषयांचे योगानें चित्ताचा उद्वेग जाऊन समाधानवृत्तीनें जी कांहीं काल झालेली स्थिति ती; ३, ज्या विषयाचे योगानें चित्तास विसांवा होतो तो पुत्रादि विषय.

**विस्तर**, पु॰ सं॰ श्लोक, वाक्य, ग्रंथ, इ॰रूप शब्द जातीचा जो विस्तार तो.

**विस्तरणें**, ग्रंथादिकानें विस्तार विशिष्ट होणें.

**विस्तव**, पु॰ अग्नि; त्याचेयाचे मधून विस्तव नेतां नये, इ॰ स्थलीं त्याचा याचा फार दावा आहे असा अर्थ; विस्तवपडणें त्य॰ परस्परें अरेतुरे करूं लागावें, इ॰ व्हावयाजोगा कज्जाचा अतिशयहोणें.

**विस्तवणें**, रा॰ जाळणें, प्रा॰ लाक्षणिकार्थी.

**विस्तार**, पु॰ कोणेक पदार्थाचे शरीराची लांबी, रुंदी, उंची, या धर्मानें जी व्याप्ति असते ती; २, अल्परूपेंकरून स्थित जो जीव, बीज, द्रव्य, ग्रंथ, इ॰रूप मूलभूत कोणेक अर्थ त्याचा पुत्रपौत्रादिद्वारा, किं॰ वृक्षशाखापल्लवादिद्वारा, किं॰ व्याजबट्टा इ॰ द्वारा, अथवा व्याख्याविवरणादिद्वारा वृद्धीनें होतें जें बाहुल्य तो; ३, लांबी रुंदी आणि उंची हे जे क्षेत्रधर्म त्यांमध्यें रुंदी म्हणून जो क्षेत्रधर्म तो; ४, वृक्षलता यांचे कांडास फुटून विस्तारला असतो जो स्कंध शाखा इ॰रूप अंश तो; उ॰ त्या अंब्याचा विस्तार तोडून नेला आतां मधला सोटमात्र राहिला आहे.

**विस्तारणें**, विस्तृतकरणें.

**विस्तारित**, ३लिं॰ कोणेकानें विस्तारिला जो ग्रंथादिक तो.

**विस्तीर्ण**, ३लिं॰ विस्तृत.

**विस्तू**, पु॰ विस्तव.

**विस्तृत**, ३लिं॰ विस्तारविशिष्ट जो तो.

**विस्तृति**, स्त्री॰ सं॰ विस्तार अंत्यार्थावांचून.

**विस्फुलिंग**, पु॰ सं॰ अग्नीची ठिणगी.

**विस्मय**, पु॰ कांहीं एक लोकविलक्षण व्यापार किं॰ पदार्थ पाहिला असतां जें आश्चर्य होतें तो.

**विस्मरण**, न॰ विसर.

**विस्मित**, ३लिं॰ विस्मय पावला जो तो.

**विस्मृत**, ३लिं॰ विसरला गेला जो ग्रंथ इ॰ तो.

**विस्मृति**, स्त्री॰ विस्मरण.

**विस्वर**, पु॰ ३लिं॰ अपसूर.

**विस्वा**, पु॰ विश्वा.

**विहंगम**, पु॰ सं॰ पक्षी.

**विहरण**, न॰ क्रीडा करण्याचा जो व्यापार तें.

**विहरणें**, क्रीडाकरणें.

**विहार**, पु॰ सं॰ क्रीडा.

**विहारी**, ३ लिं॰ क्रीडाकरणारा, किं॰ निरंतर क्रीडेंतच असण्याचा स्वभाव ज्याचा तो; राधाविहारी, यमुनातीरविहारी, इ॰ स॰.

**विहित**, ३ लिं॰ हें करावें, हें रवावें, इ॰ रूप शास्त्रादि वचनानीं ज्या विषयीं विधि झाला आहे असा जो कोणेक अर्थ तो; उ॰ वेदाध्ययन हें द्विजातीस विहित आहे; २, तत्तद्व्यवहारानुरोधानें वर्तत असतां, करणें, देणें, घेणें, इ॰ विषयीं ज्या अर्थास औचित्य दिसतें असा जो कोणेक अर्थ तो; उ॰ प्रथमतः त्याणें शिवी दिल्यावर तुम्ही द्यावी हें विहितच आहे; ३, कोणेकातें उद्देशून ज्या गुणादिकाचें विधान झालें आहे असा जो कोणेक अर्थ तो; उ॰ ही स्त्री सुंदर आहे, या वाक्यानें सुंदरत्वरूपगुण विहित होतो.

**विहिरा**, पु॰ नदीचे तीर इ॰ स्थळीं रवाणितात जो मोठा डोहरा तो.

**विहीण**, स्त्री॰ आपले मुलाची. किं॰ मुलीची जी सासू, ती आपली.

**विहीत**, स्त्री॰ कों॰ वीत.

**विहीन**, ३ लिं॰ विरहित.

**विहीर**, स्त्री॰ वाव.

**विहू**, पु॰ विभू.

**विह्वल**, **विह्वळ**, ३ लिं॰ दुःरवादिकानें जो व्याकुल तो.

विळरवा

**विळरवा**, पु॰ मनुष्य, सर्प, इ॰ कानीं भुजादिकें करून कोणेकास घातला जो वेढा तो.

**विळचण**, न॰ कों॰ विसण.

**विळवणें**, दुरवणें इ॰ कामुळें कोणेकानें कन्हणें; २, रा॰ कोणेक ओझें दुसरा उचलून आपल्या डोकीवर घेत असतां, किं॰ बैल इ॰ कांवर चढवीत असतां त्यास उचलायास लागून तें ओझें त्या त्या स्थळीं चढविणें; ३, ला॰ कोणेकदोषादिक कोणेकास मान्य नसतां, किं॰ न्यायतः त्याजवर लागू नसतां बळेंच त्याचे डोकीवर ठेवणें.

**विळविळणें**, विळविळीत जो सर्प, किडा, इ॰ पदार्थ त्याणें शरीराशीं संबद्ध होऊन विजातीयस्पर्शाविदित झावया जोगें वळवळणें.

**विळविळीत**, ३ लिं॰ कोमेजलेला जो कमळाचा देंठ त्या साररवा मृदु ज्या मध्यें ताठरपणा नाहीं असा जो गांडवळ. किं॰ निर्बळ मनुष्याचें शरीर इ॰ पदार्थ तो.

**विळा**, पु॰ इळा.

**विळारिवळा**, पु॰ इळारिवळा.

**विळी**, स्त्री॰ इळी.

**विक्षिप्त**, ३ लिं॰ मंत्रबळ इ॰ कारणानें सुमाराचा वेडा झाला जो तो.

**विक्षेप**, पु॰ कोणेक विषयाचें वास्तविक रूप चित्तांत न स्फुरतां अवास्तविक रूपाचे आकारानें जो त्या विषयावर चित्ताचा पात होतो तो; उ॰ भ्रमज्ञानास आवरण आणि विक्षेप हें कारण आहे; २, कोणेक विषयावर लागलेलें

जें

जें चित्त त्याचें तेथून उत्थान होऊन भलती कडेस जी त्याची गति होत्ये ती;उ० जवळ गडबड असली म्ह० चित्त एकाग्र होत नाहीं वि- क्षेप होतो;३, पित्तवायुपद्रवानें चित्तास हो- तो जो चळ तो.

**विज्ञप्त**, ३लिं० विज्ञापित

**विज्ञप्ति**, स्त्री०विज्ञापना.

**विज्ञान**, न० शास्त्रादिकांत जी गोष्ट सांगित- ली आहे,तीचा जो त्या प्रमाणें अनुभव तें; २,कोणेक अर्थ विषयक जें साधारणज्ञान तद्विषयकही कचित् प्रयोग होतो.

**विज्ञापणें**, विज्ञापितकरणें.

**विज्ञापन**, न० विज्ञापण्याचा जो व्यापार तें.

**विज्ञापना**, स्त्री० थोर जे गुरु,राजा,इ० त्यांस कोणेक अर्थाचें नम्रपणें भाषणद्वारा जें बो- धन,तें,आणि तदर्थ जें तें भाषण तें;२,व- डील,गुरु,धणी, यांस पत्र लिहिलें असतां त्यांत याचा लेख करितात.

**विज्ञापित**, ३लिं० कोणेक अर्थाविषयीं जा रा- जादिकांस विज्ञापना केली आहे,तो राजा- दिक,किं० तो अर्थ.

**विज्ञाप्य**, ३लिं०राजादिकांस विज्ञापायास उ- द्दिष्ट जो कोणेक अर्थ तो,किं० तो राजादि तो.

**वीख**,न० विषशब्दाचा अपभ्रंश.

**वीज**, स्त्री० मेघ संघर्षणानें जो अग्नि उत्पन्न होतो ती.

**वीट**, स्त्री० ईट;२,पु०विट्ट;३, भक्ष्यादि पदार्था- चें,किं० कोणेक गोष्टीचें अतिसेवन झाल्या मुळें,किं० त्यामध्यें कांहीं दोष आठळल्यामुळें तद्विषयक येतो जो कंटाळा तो.

**वीटिका**, स्त्री० विड्याचे पानाची जी भक्षणार्थ विडी करितात तीस संस्कृताचे डोलानें कोणी म्ह०.

**वीड**,न० ईड.

**वीण**, स्त्री० पशु,पक्षी,सर्प,क्षुद्रजंतु, यांची अ- पत्यरूपेंकरून विऊन होत्ये जी उत्पत्ति ती;२, कों० गोमहिष्यादिकांची व्यावयाची जी सराई ती;३,वस्त्रादिकांची जी विणकर ती.

**वीणा**, स्त्री० सं० गानादि साधनभूत एक तंतुवा- द्य आहे.

**वीत**, स्त्री० आंगठा आणि करंगळी अशीं दोन विस्तृत केलीं असतां जें द्वादशांगुल परिमित प्रमाण होतें ती; रा० वीत काढणें म्ह० शेत इ०- कांस आग लावल्येसमयीं त्या आगीनें बाहे- र पसरूं नये म्हणून भोंवताल चे तृणादिकां- चा आणि त्याचा संबंध तोडणें; आपल्यापुर- ती,किं० आपल्या भोंवती वीत काढणें म्ह० स- र्वांवर आलेलें जें संकट त्यापासून आपण मा- त्र कसेंतरी मोकळें होणें.

**वीतराग**, ३लिं० विरक्त.

**वीतरागी**, ३लिं० विरागी.

**वीधवाट**, स्त्री० विल्हेवाट.

**वीर**, पु० युद्ध कलहादि प्रसंगीं अभियोग कर- ण्याविषयीं,किं० दुसऱ्याची आपत्ति पाहून ती दूर करण्याविषयीं,किं० याचक पाहून दा- न करण्याविषयीं उत्साह पूर्वक जो प्रवृत्त होतो

होतो तो मनुष्यादि; २, त्या उत्साहानें अंतःकरणांत जो रस उत्पन्न होतो तो, वीरश्री, वीररस, इ० स०; ३, ज्याचा कोणी पूर्वज युद्धांत मेला असतो तो फाल्गुनवद्य प्रतिपदेस शिपायाच्या वेषधरून नागवी तलवार हातांत घेऊन समारंभपूर्वक देवाचा दर्शनार्थ जात असतो जो कोणी पुरुष त्यास त्या काळीं म०.

**वीरासन**, न० दोन्ही गुडघे अथवा एक गुडघा भूमीस टेकून वीरादिकांचा बसण्याचा एक प्रकार आहे तें.

**वीर्य**, न० पुरुषेंद्रियापासून उत्पन्न होतें जें रेत तें; २, पदार्थमात्राचे अंगीं जो तत्तत्कार्य संपादक शक्तिविशेष असतो तें; ३, वीरपणा.

**वीस**, ३ लिं० संख्या आहे; २०.

**वीळ**, स्त्री० कों० समुद्र, खाडी, यांस लागतेजी भरती ती; २, पु० दे० कालवाचक जो वेळ शब्द त्या अर्थीं कितीएक प्र० होतात.

**वीक्षण**, न० सं० अवलोकन; २, तत्साधन जें नेत्र तें.

**वीक्षणें**, भा० ग्र० अवलोकणें.

**वीक्षित**, ३ लिं० अवलोकित.

**वृक**, पु० सं० लांडगा.

**वृंत**, न० सं० पुष्प, किं० फल ज्याशीं संबद्ध होऊन राहिलें असतें असा जो वृक्षादिकांचा अवयव तें.

**वृंताक**, न० सं० वांगें.

**वृत्त**, न० कोणेकाचें जें आचरण तें; २, देशांतरादिकापासून आलेलें, किं० स्वग्रामांतच झालेलें कोणेकास कथनीय जें वर्तमान तें; ३, आर्या, अनुष्टुप, यावांचून श्लोकांचे जे जगत्यादि अनेक छंद सांगितले आहेत ते प्र०; ४, कर्कटादिकानें काढिलें जें वाटोळें मंडल तें; ५, ३ लिं० तदाकार, किं० गोलाकार जो पदार्थ तो.

**वृत्तश्लोक**, पु० जगत्यादि वृत्ताचा जो श्लोक तो.

**वृत्तांत**, पु० वृत्त हितीयार्थी.

**वृत्ति**, स्त्री० मनुष्यादि चेतनाचेतन पदार्थांचा स्वस्व व्यापारीं वर्तण्याचा जो प्रकार ती; उ० साधूशीं सहवास पडला म्हणजे वृत्ति चांगली होत्ये; उ० तांदूळ इ० अग्नीवर शिजायास ठेविले असतां अग्नि, पाणी, इ० त्या तांदूळ इ० कांशीं स्वस्ववृत्तीनें वर्तले म्हणजे पाक होतो; २, उपजीविका, किं० तत्साधनीभूत जोशीपणा, उपाध्यपण, इ० नियत, किं० भिक्षा चाकरी उंछशीळ इ० अनियत जें ती; ३, अर्थाचाठायीं शब्दाचें वाचकत्वें करून जे वर्तित असतें ती; ४, वाचकता, व्यंजकता, लक्षणा इ० रूप शब्दानें अर्थबोधयायाचे अनेक प्रकार आहेत ते प्र०; ५, क्रोधादिरूप किं० विषयरूप जे अंतःकरणाचे आकार ते प्र०; ६, कोणेक वाक्यावर किं० ग्रंथावर व्याख्यारूप जो वाक्य, किं० ग्रंथ असतो ती; ७, ज्या शब्दादिकाची ज्या अर्थादिकाचाठायीं वाचकत्वादि संबंधानें विद्यमानता असत्ये तो शब्दादि नहुत्ति.

**वृत्तिमंत**, ३लिं० उपजीविका साधन जी जोशीपणा इ० नियत वृत्ति ती आहे ज्यास तो.

**वृत्तिमान्**, ३लिं० वृत्तिमंत.

**वृत्तिवंत**, ३लिं० वृत्तिमंत शब्दाचा अपभ्रंश.

**वृत्त्यंशी, वृत्त्यांशी**, ३लिं० वृत्तिमंत.

**वृथा**, अ० निष्फल होई असें, जाणे, येणें, इ० कांचें वि०.

**वृथापुष्ट**, ३लिं० कोणत्याही कामाचे उपयोगी पडत नाहीं आणि व्यर्थ खाऊन पुष्ट झालेला तो.

**वृंद**, न० सं० मनुष्यादिकांचा जो समुदाय तें; २, मोठा विद्वान्, किं० सावकार इ० रूप जीं गांवांत प्रस्थें असतात त्यांस प्रसंगविशेषीं म्ह०.

**वृंदावन**, न० तुळशीचें झाड लावावयाकरितां दगड, विटा, चुना, माती; इ० कानीं चतुष्कोणाद्याकारविशिष्ट जी बंदिस्त करितात तें; २, तदाकार धातूचें, किं० काष्ठाचें केलें असतां त्यासही म्ह०.

**वृद्ध**, ३लिं० अतिवयस्क जो मनुष्य, पशु, वृक्ष, इ० तो; २, जाजा गुणादिकानें जो मोठा तो त्या त्या गुणादिकानें; उ० तुम्ही आम्हापेक्षां वयानें लहान, परंतु विद्येनें वृद्ध आहां; विद्यावृद्ध, वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध, इ० स०; ३, वृद्धिपावला जो कोणेक अर्थ तो.

**वृद्धपरंपरा**, स्त्री० मागेंपासून होत आले जे वृद्धवृद्ध त्यांची जी परंपरा; आचारादिकाविषयीं प्रामाण्यत्वेंकरून त्यांचे वर्तणुकेचा विचार कर्तव्य असतां प्रयोग.

**वृद्धाचार**, पु० वृद्धपरंपरेनें चालत आला जो कांहींएक गोष्टीविषयीं आचार तो.

**वृद्धापकाळ**, पु० वार्द्धक्यास म्ह०.

**वृद्धि**, स्त्री० कांहींएक पदार्थादिकांचें पूर्वावस्थेपेक्षां प्रमाणादिकेंकरून जें आधिक्य ती, किं० त्या पदार्थादिकांची उत्तरोत्तर आधिक्य होण्याची दशा ती; २, तिथि, नक्षत्र, योग यांचें वारत्रयास स्पर्श व्हावयाजोगें जें आधिक्य होतें ती; ३, सं० रुपये, धान्य, इ० संबंधीं जें व्याज, काढा, इ० येतें ती; ४, कोणेकाचे कुळांत मुलगें उत्पन्न झालें असतां त्यास जें आशौच प्राप्त होतें ती; ५, पु० अकरावा जो योग तो.

**वृद्धिंगत**, ३लिं० उत्तरोत्तर वृद्धिपावत चालला जो कोणेक अर्थ तो.

**वृश्चिक**, पु० सं० विंचू म्हणून जो प्राणी तो; २, द्वादशराशींतील आठवा जो राशि तो.

**वृष**, पु० सं० पंधरावा जो संवत्सर तो; २, बैल.

**वृषण**, पु० सं० आंड.

**वृषभ**, पु० सं० बैल; २, द्वादश राशींतील द्वितीय जो राशि तो.

**वृषल**, पु० सं० शूद्र.

**वृषली**, स्त्री० सं० कुणबीण.

**वृषलीपति**, पु० सं० ज्या ब्राह्मणानें मैथुनार्थ शूद्रस्त्री ठेविली असते तो.

**वृषोत्सर्ग**, पु० उत्तर क्रियांगत्वेंकरून अथवा इष्टकामना सिद्ध्यर्थ गोऱ्हा आणि पाडी यांचा करितात जो उत्सर्ग तो.

**वृष्टि**, स्त्री० मेघ निर्मुक्त जलाचें जें पतन ती; २,

२, बाण, पुष्प, पाषाण, इ॰ कांचें जें पर्जन्या सारखें पुष्कळ पतन ती; ३, ला॰ श्लोक, दृष्टांत, वाक्यें, शिव्या, इ॰ कांचा जो भडिमार त्यास म्ह॰.

**वृक्ष**, पु॰ झाड ग्रथमार्थी.

**वेंकावल्या**, स्त्री॰ कों॰ वाकुल्या.

**वेखंड**, न॰ मूलप्रधान एक ओषधी आहे.

**वेंग**, स्त्री॰ मनुष्य, वृक्षादि पदार्थ, दोहों हातांत धरावयाकरितां केली जी कव ती; रा॰ मूल, इ॰ कांस वेंगेवर घेणें म्ह॰ कडेवर घेणें.

**वेग**, पु॰ पदार्थाचें गुरुत्व आणि गतित्वरा एतदुभय प्रयुक्त पदार्थाचे आंगीं असतो जो सामर्थ्य विशेष तो; २, विष, वायु, इ॰ संबंधी कचित् अवयवीं विदित होऊन क्रमानें शरीरांत संचरित होत जाते जी दुःखरूप वेदना ती; वेगानें चालणें इ॰ स्थळीं त्वरेनें असा अर्थ होतो.

**वेंगटणें**, वेंगाटणें.

**वेंगडणें**, कोणेकापाशीं माझें एवढें काम करून द्याहो पहा कृपा कराल तर, इ॰ रूप याचनार्थ तोंड पसरणें.

**वेंगणें**, उपोषण, दुखणें, इ॰ कामुळें, किं॰ अनेक संकटें एककालीं प्राप्त झालीं असतां कोणेकानें केवळ थकलें आणि.

**वेंगलण**, स्त्री॰ रा॰ पोटाशीं पोर बळगलें आहे जीणें अशी जी वानरीण. किं॰ माकड ती.

**वेगळ**, अ॰ वांचून या अव्ययार्थी.

**वेगळणें**, रा॰ कांहींएक पदार्थादिक पृथक्पृथक् करणें; २, वगळणें.

**वेगळा**, २ लिं॰ निराळा.

**वेगळाला**, ३ लिं॰ निरनिराळा; उ॰ वेगळालें अक्षर वाचावयास सोपें.

**वेगळीक**, स्त्री॰ रा॰ बंधु इ॰ कांचा जो विभक्तपणा ती.

**वेगळेचार**, पु॰ बंधु इ॰ कांचा जो परस्पर विभक्तपणा ते; २, तसा विभक्तपणा होण्यास कारणभूत जें त्यांचे वर्तन प्रकार ते.

**वेंगाटणें**, कांहीं एक पदार्थातें वेंगेत धरणें.

**वेंगाडणें**, कों॰ वेंगडणें.

**वेगीं, वेगें**, अ॰ ग्रं॰ त्वरेनें.

**वेंघणें**, दे॰ मनुष्यादिकानें वृक्ष, पर्वत, जिना, इ॰ उच्च प्रदेशीं आरोहण करणें; २, वेंगणें.

**वेच**, पु॰ द्रव्यादिकांचा जो व्यय तो, प्रा॰ खर्चशब्दाचे योगीं याचा प्रयोग होतो.

**वेचणें**, खरचणें.

**वेंचणें**, भूम्यादिकांवर प्रसृतपणें स्थित जे धान्य, रुपये, खडे, फळें, पुष्पें, पर्णे, इ॰ पदार्थ ते हस्तादिकानें एकएक दोनदोन असे उचलून घेणें; २, ला॰ कोणेक समुदायांतून विवक्षित जो अंश तो वेगळा निवडून काढणें; उ॰ त्याणें भारतांतील श्लोक वेंचून काढले.

**वेंचा**, पु॰ ग्रंथ, भाषण, इ॰ संबंधी जे विवक्षित कार्योपयुक्त निवडक अंश ते प्रत्येकीं प्रा॰ अनेक वचनीं प्र॰.

**वेज**, न॰ मोतीं, लालडी, माणीक, इ॰ कांस पाडिलें जें छिद्र तें; मोतीं इ॰ कानीं वेजीं उतरणें, घर्षणानें

वर्षणादिकारणानें योग्यता कमी व्हावयाजोगें वेजीं झिजलें आहे.

**वेंट**, पु॰ पेंढा, गवत, यांचा वळला जो दोर तो; २, ला॰ वायु, इ॰ कांचे उपद्रवामुळें पोटांत होतो जो दोरीसारिखा वायूचा आकार तो; वेंट वळणें, ग्र॰ कोणेक कार्यार्थ अनेकांचें ऐकमत्य होणें, किं॰ गुरें, मनुष्यें, इ॰ कांची भयादिकारणानें पळायनावसरीं एकावर एक एकावर एक पडत अशी अवस्था होणें; ३, रा॰ एक वेल आहे ज्याचा पाला गुरें खातात तो.

**वेंटली**, स्त्री॰ रा॰ वेंटाळी.

**वेंटळी**, स्त्री॰ कों॰ वेंटाळी.

**वेंटावणें**, कोणेकास चिरड यावी म्हणून त्याचे क्रियेचें अनुकरण करून दाखविणें.

**वेंटावण्या**, स्त्री॰ वाकुल्या.

**वेंटाळणी**, स्त्री॰ दे॰ शेतांत पिकाचे कापून ठेविले जे कवळे ते जमा करण्याचा जो व्यापार ती.

**वेंटाळणें**, कों॰ सर्पादिकांनीं स्व शरीरादिकें करून, किं॰ मनुष्यादिकानें रज्वादिकें करून कोणेकातें वेष्टित करणें, किं॰ कोणेक पदार्थास रज्जु इ॰ गुंडाळणें.

**वेंटाळी**, स्त्री॰ मुलांची विष्ठा काढायाकरितां तृणाचे काड्यांची सरासरी गुंडाळून केलेली हातीं घेतात जी गुंडाळी ती.

**वेंटाळें**, न॰ सर्पानें केला जो स्वशरीराचा वृत्ताकार तें; २, तदाकार जें रज्वादिकांचें गुंडाळें करितात तें.

**वेंटी**, स्त्री॰ रा॰ मुडा इ॰ बांधायाकरितां भातेणास पीळ घालून पेळूसारिखी करितात जी दोरी ती; २, कों॰ बारीक जो रज्जुरूप वेंट ती.

**वेंटोळें**, न॰ वेंटाळें.

**वेठ**, स्त्री॰ बिगार.

**वेंठ**, पु॰ दे॰ वळलेल्या वऱ्हाटाचे अनेक जे पेढ असतात ते प्र॰; २, वेंट प्रथम द्वितीयार्थी; वेंठ वळणें ग्र॰ वेंटवैळणें.

**वेठबिगार**, स्त्री॰ वेठ इ॰ ती.

**वेठविरळा**, पु॰ स्त्री॰ वेठ बिगार.

**वेठ्या**, पु॰ बिगारी.

**वेड**, न॰ पिशाच, वायु, इ॰ कांचे उपद्रवानें भलभलतेंच बोलावें, भलभलतेंच करावें, इ॰ व्हावयाजोगा होतो जो बुद्धीस विकार तें; २, कोणेक विषयाची कोणेकास अतिशयित असत्ये जी आसक्तता जीणेंकरून त्या विषयावांचून चैन पडूनये तें; ३, अविचाररूप जें अज्ञान तें; उ॰ तो बलावित होता तेव्हां गेलों नाहीं हें वेड केलेंत; कोणेकानें कोणेकास वेड भरणें, किं॰ भरविणें, ग्र॰ अनेक प्रकारचे उपद्रव, किं॰ चेष्टा इ॰ करून सुचेनासें करून टाकणें; वेड पिकणें, वेडाचा पाऊस पडणें, इ॰ स्थलीं राज्यादि व्यवहारीं, किं॰ कोणे मनुष्यादिकांचे ठायीं असमंजसपणा, अविचार यांची समृद्धि होणें.

**वेडगळ**, ३ लिं॰ वेड्यांत गणायाजोगा जो तो.

**वेडझंवा**, ३ लिं॰ ज्यास व्यवहारचातुर्य नाहीं तो; २ भयादिकारणानें कांहींएक कर्तव्याविषयीं युक्ति सुचेनाशी होऊन केवळ भ्रमांत पडला जो तो.

**वेडुण**, न॰रा॰ सोन्याचें, किं॰ रूप्याचें हाताचे, किं॰ पायांचे बोटांत घालायाकरितां सरासरी अंग-लय करितात तें.

**वेडदुल्ली, वेडधुल्ली**, ३लिं॰ मूर्खत्व द्योतनार्थ कोणेकास निंदेनें म्ह॰.

**वेडपा**, ३लिं॰ वेडगळ.

**वेडसर**, ३लिं॰ कांहींसा जो वेडा तो.

**वेडा**, ३लिं॰ जास वेड लागलें आहे तो, किं॰ वेड लागलेल्यासारिखा व्यवहारचातुर्यशून्य जो तो; २, पूर्वापरानुसंधानादि रहित जें भाषण, लेख, इ॰ त्यास म्ह॰.

**वेडाऊंस, वेडाऊस**, पु॰ खुळाऊंस.

**वेडाखुळा**, ३लिं॰ वेडापिसा.

**वेडापिसा**, ३लिं॰ इष्टविरहादि कारणानें वेड्यासारिखा पिशासारिखा झाला जो तो.

**वेडापीर**, पु॰ वेडगळ, छांदिष्ट, असा जो मनुष्य त्यास म्ह॰.

**वेडावागडा**, ३लिं॰ वेडावांकडा.

**वेडामधुरा**, पु॰ ज्वरामध्यें शीतोपचार झाला असतां ज्वर विकोपास आऊन एक प्रकारचा वायु होत असतो जेणेंकरून वेडलागल्यासारखी प्रकृति होत्ये तो.

**वेडावणें**, कोणेकानें वेडें होणें; २, कोणेकास वेडावण्या दाखविणें.

**वेडावांकडा**, ३लिं॰ वांकडातिकडा; २, जसें असावें तसेंच नव्हे अंशतः विपरीत, अंशतः मध्यम, अंशतः चांगलें, अशा प्रकारचें जें भाषण, आचरण, इ॰ तो; ३॰ लेंकुरपणा आहे तों वेडें वांकडें बोललें तरी शोभतें.

**वेडाळणें**, खुळावणें.

**वेडीहळद**, स्त्री॰ कों॰ वेडदुल्ली याचे अर्थी प्रयोग करितात

**वेडेचार**, पु॰ वेडेवेडेचार.

**वेडेंपीक**, न॰ येऊं लागलें म्हणजे पुष्कळच येतें नाहीं तर कांहींच नाहीं असें जें कितीएक वृक्ष लता शेत यांचें पीक तें; २, ला॰ वळलातर सर्वस्व देईल, जें म्हटलें तें करील, असा जो दाता इ॰ त्यास म्ह॰.

**वेडेवेडेचार**, पु॰ वेड्यासारिखें जें आचरण तें.

**वेढ**, न॰ स्त्री॰ पायांचे बोटांत घालायाकरितां करितात जें रौप्यादिकाचें वलय तें ती; २, कों॰ किल्ला, गृह, कमर, इ॰ कांचा जो घेर तो.

**वेढणी**, स्त्री॰ दे॰ उडीद इ॰ कांचे पिठांत मीठ, तिखट, इ॰ घालून तोंडी लावाया करितां जो धिरड्यासारिखा पदार्थ करितात ती.

**वेढणें**, सूत्र, मनुष्यादिपंक्ति, इ॰ कानें कोणेक पदार्थ त्याचा विवक्षित कोणेक परिधि व्याप्त होई असा आवृत करणें; २, घेरणें; ३, रुधणें; वेढून घेणें म्ह॰ स्नान, वस्त्रांतर, इ॰ करावयाचें असतां मध्यें कांहीं काल लहान सहान वस्त्र नेसणें.

**वेढा**, पु॰ किल्ला, गृह, मनुष्य, इ॰ कांचे भोंवतां सैन्य, उदक, रज्जु, इ॰ कांचा पडतो जो घेर तो; २, काष्ठादि पदार्थां भोंवते रज्ज्वादिकांचे फेरे गुंडाळितात ते प्रत्येकीं; ३, कोणेक पदार्थ आपल्या भोंवतां फिरला असतां; किं॰ कोणेका भोंवता

भोंवता मंडलाकार फिरला असतां होतात जे फेरे ते प्र०; या मळसूत्राचे चार वेढे फिरविले असतां बाहेर पडतें; फिरत्या भोंवऱ्याचे वेढे मोजतां येत नाहींत; रहाटाचा बैल चार वेढे फिरला ह्मणजे दोण भरल्ये.

वेढें, न० वळें.

वेण, स्त्री० प्रसूतिसमयीं, किं० बहुत आमांश झाला असतां पोटांत कळा येतात त्या प्र०; जांचा निर्गम कुंथून करावा लागतो, प्रा० दे, कर, या धातूंचे योगीं प्र०.

वेणा, ३ लिं० कों० असडी जो तांदूळ, कणी, इ० तो.

वेणी, स्त्री० मस्तकादिस्थित केश, किं० ताग, आंबाडी, इ० कांचे प्रा० तीन, पांच असे पेढ करून ते परस्पर गुंफून सर्पाद्याकारक जो रचनाविशेष करितात ती.

वेणु, पु० सं० वेळू; २, त्याचे काष्ठाचा जो पांवा करितात तो.

वेत, पु० चिंच्या सारिखा एक वृक्ष आहे, जाचा तांती काढून खुरच्या इ० विणीत असतात तो; २, त्याची करितात जी छडी ती; ३, न० पत्रवादिकांची विण्याची जी खेप तें.

वेतन, न० कोणेकास चाकरीस ठेवून त्या चाकरी संबंधें जें त्यास देय देतात तें, परंतु पुराणीक, फडणीस, पोतनीस, इ० जे प्रतिष्ठित चाकर त्यांस जें प्रतिवर्षी देतात तद्विषयीं लोकांत विशेष प्रसिद्धि.

वेतनी, ३ लिं० वेतन ठरवून ठेविला जो सेवक तो, किं० वेतना ऐवजीं कोणेकास लावून देतात जी ग्रामादिभूमि ती.

वेंतस, न० रक्त काढावयाची जी तुंबडी तें.

वेतसरी, स्त्री० पलंग विणणें इत्यार्थ वेत चिरून त्याचा काढितात जो तंतु ती.

वेताटी, स्त्री० वेताची जी काठी ती.

वेताळ, पु० सर्व पिशाचांचा राजा ह्मणून एक शिवाचा गण आहे; ल्य० वेताळ आहे तेथें भूतावळ आहे.

वेंतूस, न० कों० वेंतस.

वेत्ता, ३ लिं० जाणणारा; वेदवेत्ता, शास्त्रवेत्ता, इ० स०.

वेत्र, न० सं० वेताटी; २, छडीदार, चोपदार, इ० जे राजा इ० कांजवळचे अधिकारी त्यांचे हातीं जी काठी असत्ये तें.

वेत्रधर, वेत्रधारी, पु० सं० राजादिकांपाशीं जे छडीदार, चोपदार, इ० असतात ते प्र०.

वेद, पु० ब्रह्मदेवाचे चोहों मुखांतून प्रकट झालेले ऋगादि संज्ञक चार ग्रंथ आहेत ते प्र०; ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, वेदघोष, वेदपारायण, इ० समास.

वेदना, स्त्री० सं० तिडीक, ठणका, इ० रूप जें दुःख ती.

वेदमूर्ति, स्त्री० वेदविद्यासंपन्न, किं० केवल भिक्षुक वृत्तीनें उपजीवन करणारा जो ब्राह्मण त्याचें नाव कागदोपत्रीं लिहावयाचें असतां एतच्छब्द पूर्वक लिहितात.

वेदशास्त्रसंपन्न, ३ लिं० शास्त्रपुराणादिवेत्ता प्रतिष्ठित जो ब्राह्मण त्याचें नाव कागदोपत्रीं लिहावयाचें

लिहावयाचें असतां एतत्शब्दपूर्वक लिहितात.

**वेदांत**, पु॰ न॰ सकल प्रपंचास मिथ्यात्व बोधवून सच्चित्स्वरूप जो ईश्वर त्याचे स्वरूपाचें कथन करणारें असें शास्त्र आहे तो तें; २, सर्व प्रापंचिक विषयांस मिथ्यात्व बोधनाविषयीं जा गोष्टीचें तात्पर्य असतें अशी जी हरिदासादि गोष्ट सांगतात तीस म्ह॰.

**वेदांती**, ३ लिं॰ वेदांतशास्त्राचा जाणे अभ्यास केला आहे, आणि तदनुरूप वर्तणारा जो तो.

**वेदि, वेदी**, स्त्री॰ सं॰ यज्ञ, विवाह, होम, इत्याद्यर्थ ओटा इ॰ घालून नियमित करितात जी भूमि ती.

**वेदोनारायण**, पु॰ वेदविद्या संपन्न ब्राह्मणास सुत्यवसरीं म्ह॰.

**वेद्य**, ३ लिं॰ जाणायास योग्य जो तो; ज्ञानवेद्य, तर्कवेद्य, मनोवेद्य, इ॰ स॰.

**वेध**, पु॰ शस्त्रादिकानें मौक्तिकादिकांचे आंत तदवयवांतें विसंधित करीत करीत शिरून त्या मौक्तिकादिकांस स्वप्रवेशानें विवक्षित प्रदेशपर्यंत छिद्रविशिष्ट करण्याचा जो व्यापार तो; २, तेणेंकरून त्या मौक्तिकादिकांस होतें जे छिद्र तो; ३, दृष्टि, बाण, गोळी, इ॰ कानीं स्वस्वलक्ष्यावर केलेंजें स्वपात वैशिष्ट्य तो; ४, सूर्यग्रहणाचे पूर्वी चार प्रहर आणि चंद्रग्रहणाचे पूर्वी तीन प्रहर अशी जी धर्मशास्त्रप्रसिद्ध ग्रहणसंबंधी दोषाची व्याप्ति असते तो, जींत भोजनादिविषयीं निषेध सांगितला आहे; ५, जा दिवशीं माध्यान्हेंकरून जे तिथिनक्षत्रादि असतें त्यास त्याच दिवशीं प्रातःकाल, सायंकालादिसमयीं असतो जो पूर्वोत्तर तिथिनक्षत्रादिकांचा अंश त्याचा गुण दोष प्रयोजक असतो जो संबंध तो; उ॰ आज मंगळवारीं दशमी दोन घटिका आणि एकादशी पडली सत्तावन्न घटिका तस्मात् या एकादशीस दशमीचा वेध आहे; ६, सप्त शलाकादि चक्राचे ठायीं एक शलाकादिगत जीं नक्षत्रादिक असतात त्यांतून एकीकडचे नक्षत्रादिकावर जो कोणी ग्रह असतो त्याचा दुसऱ्याकडचे नक्षत्रादिकावर जो दृष्टिपात असतो तो; ७, कोणेक मनुष्यादिकास स्वतंत्रपणें वर्ततां जा मुळें येत नाहीं असा जो अवश्य निर्वाह्य कोणेक कार्याचा त्याचे पाठीशीं संबंध असतो त्यास म्ह॰; उ॰ प्रपंचाचा वेध जाचे पाठीमागें आहे त्याला खेळ, तमाशे, कोठून सुचतील; ८, तळें, विहीर, इ॰ कांचा जो खोलपणा तो; ९, व्याक्षेप या अर्थींही याचा क्वचित्प्रयोग करितात.

**वेधक**, ३ लिं॰ वेधणारा जो तो.

**वेधणें**, वेधयुक्त करणें.

**वेधन**, न॰ सं॰ वेधण्याचा जो व्यापार तें.

**वेधना**, स्त्री॰ वेदना शब्दाचा अपभ्रंश.

**वेधित**, ३ लिं॰ वेधिला जो तो.

**वेधी**, ३ लिं॰ बाणादिकानें वेधण्याविषयीं जो कुशल तो; लक्ष्यवेधी, शब्दवेधी, इ॰ समासींच प्र॰.

**वेध्य**, ३ लिं॰ वेधायास योग्य जें लक्ष्यादि तो.

**वेरझार, वेरधार**, स्त्री० एरझार.

**वेरीं**, अ० कों० पर्यंत या अर्थी; काल देश वाचक शब्दांपुढें याचा योग होतो; उ० आजवेरीं, कालवेरीं, तेथवेरीं, एथवेरीं.

**वेल**, पु० स्त्री० लता; २, कों० नागवेल; ३, कुडूक, काप, इ० कर्ण भूषणास मौक्तिक विशिष्ट जी सुवर्णाची सांखळी लावितात ती; कोणेकाचा वेल वाढणें. ह्म० वंश वाढणें.

**वेलची**, स्त्री० एलची.

**वेलदोडा**, पु० एलदोडा.

**वेलबुटी, वेलबुट्टी**, स्त्री० भिंत, कागद, छीट, इ० कांवर रंग इ० कानें लिहिलेले जे द्राक्षादिकांचे वेल अनेक तऱ्हांचे जे बूट ती.

**वेलबूट**, पु० वेलबुटी.

**वेलबोंड**, न० वेलबोंडीचें जें फल तें.

**वेलबोंडी**, स्त्री० एक लता आहे.

**वेलमिरची**, स्त्री० मिरचींत एक जाति आहे; जीचा शाखा लते सारिख्या असतात ती.

**वेलवांगी**, स्त्री० वांगींत एक जाति आहे.

**वेलवांगें**, न० वेलवांगीचें जें फल तें.

**वेला**, स्त्री० समुद्राचें पाणी पराकाष्ठा येण्याचा जो अवधि प्रदेश ती.

**वेलांटी, वेलांडी**, स्त्री० अक्षरास जें इकाराचें चिन्ह करितात ती; उ० कला वेलांटी दे, ह्मणजे कीहोईल.

**वेल्याकरंज**, पु० करंजांत एक जाति आहे, जाचा शाखा वेला सारिख्या लवचीक असतात ती.

**वेल्यांहळवें**, न० साळींत एक जाति आहे.

**वेल्हांटी**, स्त्री० कों० वेलांटी.

**वेल्हाळ**, पु० ग्रं० परम प्रीतिपात्र जो भर्ता इ० त्यास प्रीतीने ह्म०.

**वेल्हाळी**, स्त्री० ग्रं० परम प्रीतिपात्र जी नायिका इ० कोणी स्त्री तीस प्रीतीनें ह्म०

**वेवसाय, वेवसाव**, पु० व्यवसाय शब्दाचा अपभ्रंश; प्रथमार्थी प्र०.

**वेंवें**, न० भयादिकारणानें कोणेक घाबरला असतां मुखानें कांहींच स्पष्ट शब्द न निघतां जे अस्पष्ट शब्द निघतात त्यांचें अनु०; उ० बाळू ह्मणतो आह्मां पण विचार करा, नाहींतर तेथें गेलों ह्मणजे वेंवें होईल.

**वेव्हार**, पु० व्यवहार शब्दाचा अपभ्रंश; २, कोणेकानें कोणेक गोष्ट सांगितली असतां त्याजवर उलटून कोणेक करितो जो प्रतिवाद तो.

**वेव्हारी**, ३ लिं० पु० व्यवहारी याचा अपभ्रंश; २, ३ लिं० हुजतखोर

**वेश**, पु० वेष.

**वेश्या**, स्त्री० कळवांतीण.

**वेष**, पु० जातिदेशादिभेदेंकरून वस्त्रालंकारादि धारण करण्याचे जे प्रकारभेद तीहींकरून होतात जे पुरुषादिकांचे रूपभेद ते प्र०.

**वेषधारी**, ३ लिं० राजा इ० कांचा वेष जाणें घेतला आहे तो; २, ला० आंगीं साधुत्वादि नसता साधुत्वादि मिरवितो त्यास ह्म०

**वेष्टण**, न॰ वेष्टन शब्दाचा अपभ्रंश.

**वेष्टणें**, कोणेक पदार्थ सूत्र, वस्त्र, इ॰ कानें त्याचे सर्व परिधि व्याप्त होत असा सभोंवार आवृत करणें, पक्षीं त्या सूत्र वस्त्रादिकासही कर्तृता; २, वेढणें प्रथमार्थी.

**वेष्टन**, न॰ कोणेक पदार्था भोंवतालें वस्त्रचर्मादिकाचें जें आवरण तें; २, पुस्तकादि वेष्टायास साधन जें वस्त्रचर्मादि असतें तें; ३, वेष्टण्याचा जो व्यापार तें.

**वेष्टित**, ३ लिं॰ वेष्टिलेला तो.

**वेस**, स्त्री॰ गांवकुसास जो दरवाजा ठेवित असतात ती; २, गृहादिकांचे भोंवतालचा आवारास असतें जें दार ती.

**वेसकट**, स्त्री॰ कों॰ कुपणास जें द्वार राखिलें असतें त्या ठिकाणी जी कवाडी करितात ती.

**वेसकर**, पु॰ गांवचे वेशीवर संरक्षणार्थ जो महार असतो तो.

**वेसण**, स्त्री॰ बैल, रेडा, इ॰ कानीं स्वाधीन रहावें त्यणून त्यांचे नाकांत जी दोरी ओंविली असत्ये ती.

**वेसन**, न॰ व्यसन शब्दाचा अपभ्रंश; परंतु प्रथमार्थीच प्र॰; २, स्त्री॰ वेसण.

**वेसनी**, ३ लिं॰ व्यसनी शब्दाचा अपभ्रंश.

**वेसवा**, स्त्री॰ जी स्त्री गरत असून निर्लज्जपणें व्यभिचारादि करूं लागली तीस त्म॰.

**वेसवार**, पु॰ दोन तीन प्रकारच्या डाळी, धणें, हळद, मिरचा, मिऱ्यें, इ॰ पदार्थ तळून, किं॰ भाजून भाजी इ॰ कांवर घालावयाकरितां जें पिष्ट करितात तो.

**वेसवाराचें लोणचें**, न॰ रा॰ मोहऱ्या, मेथ्या, हिंग, हळद, इ॰ कांचें चूर्ण आंत घालून जें आंब्याचें लोणचें करितात तें.

**वेहळा**, पु॰ बेहडा त्यणून जो वृक्ष तो आणि त्याचें फल तो.

**वेळ**, पु॰ अखंड दंडायमान जो काल त्याचा विवक्षित जो विभाग तो; उ॰ मी एवढावेळ निजलों होतों; आज कांहीं काम झालें नाहीं सारावेळ फुकट गेला; त्याला काम करायास वेळ लागतो, इ॰ स्थलीं विवक्षित प्रमाणापेक्षां अधिक काल असा अर्थ; कोणेकाचा वेळ आणें त्म॰ सुखानें काळ आणें; २, कांहीएक कार्य होण्यास, किं॰ कार्यी तरी प्रवृत्त होण्यास मध्ये काल विभागरूप जो अवकाश असतो तो; उ॰ पेरे होण्यास अजून वेळ आहे, त्यणून आधीं घरें शाकारून घ्या; माझे पाठीशीं काम आहे वेळ सांपडल्यास येईन; ३, अ॰ वेळां; उ॰ तो दिवसास तीन वेळ जेवतो; ४, स्त्री॰ कालरूप जो समय ती; वेळ वाहणें, त्म॰ बरें, किं॰ वाईट होण्यास समय अनुकूल होणें; ५, मध्यान्हाहून पूर्वापर दिवसाचे जे दोन विभाग ते प्र॰; ६, वेला शब्दाचा अपभ्रंश; ७, स्त्रियांचे कोंपरांत घालायाचें एक भूषण आहे; ८, वेलबोंडी.

**वेळअंवस**, स्त्री॰ कार्तिकी अमावास्या ती.

**वेळअवेळ**, स्त्री॰ विवक्षित कर्माविषयीं उचित, किं॰ अनुचित, अथवा अनुकूल, किं॰ प्रतिकूल असा

असा द्विविधलें करून आणायाचा जो काल तो; उ॰ हा आतांरा निळ उठून शिव्या देतो, कांहीं वेळ अवेळ पहात नाहीं; वेळअवेळ आहे चार रुपये अवळ अधिक असूंद्या; वेळआहे अवेळ आहे, इ॰रूप व्यस्त ही प्रयोग होतो.

**वेळकूट**, न॰ रा॰ कळंकाचा तुकडा तें.

**वेळणी**, स्त्री॰ भातवेळणें इत्याद्युपयोगी तव्यासारिखें एक धातुमय पात्र आहे.

**वेळणें**, भात, भाजी, इ॰ शिजवून त्यांतील त्याज्य जें पाणी तें युक्तिनें काढावें असा जो संस्कार तद्विशिष्ट करणें; २, हात, पाय, मान, इ॰ अवयव केवळ सईल सोडून इतस्ततः हालविणें.

**वेळणेवारचा, वेळणेवारी**, अ॰ रा॰ अभद्र कांहीं बोलणें, आचरणें, यास अयोग्य जो काल त्याचेठायीं त्याचा प्रतिषेध कर्तव्य असतां प्रयोग; उ॰ वेळणेवारचा उगाच तूं बोंबलतोस कांय म्हणून.

**वेळबोंड**, न॰ दे॰ वेलबोंड.

**वेळबोंडी**, स्त्री॰ दे॰ वेलबोंडी.

**वेळवणी**, न॰ भाजी, दाळ, तुरण, इ॰ पदार्थ वेळून त्याचें काढितात जें पाणी तें.

**वेळवारीं**, अ॰ वेळेवारीं.

**वेळा**, स्त्री॰ वेला; २, एळा; ३, कालरूप जोसमय तो; ४, अ॰ वेळां.

**वेळां**, अ॰ कोणेक क्रियेचे आवृत्तीची गणना कर्तव्य असतां संख्यावाचक शब्दांपुढें, किं॰ जितका, इतका, इ॰ शब्दांपुढें याचा योग होऊन विशिष्ट अव्ययाचा प्रयोग होतो; उ॰ एकवेळां सोडीन दोनवेळां सोडीन तिसऱ्यानें बोलशील तर तोंडांत खाशील.

**वेळू**, पु॰ इक्षुदंडा सारिखीं जास पेरें असतात अशी एक वृक्ष जाति आहे, जीचे कळक किंवा इ॰ अनेक भेद आहेत; कोणेक स्थलीं बाराहात वेळू फिरतो आहे, म्ह॰ तेथें मूर्तिमंत दारिद्र्य नांदतें आहे असा अर्थ होतो.

**वेळेनसार**, अ॰ समयानुसार.

**वेळेवारीं**, अ॰ कोणेक कर्मकरायास वेळ प्रयुक्त जी सोय असल्ये ती आहे तों, म्हणजे अर्थात् ती वेळ नलागतां, किं॰ तीचा अतिक्रम न होतां पूर्वीं; उ॰ तुला चाकरी सोडणें असल्यास मला वेळेवारींच सांग, नाहींतर आइत्येवेळेस फसवशील.

**वेळोवेळां**, अ॰ ग्र॰ वारंवार.

**वें**, स्त्री॰ कुपण.

**वेकल्य**, न॰ विकलता.

**वेकल्पिक**, ३ लिं॰ जा विषयीं विकल्प सांगितला आहे तो विध्यादि.

**वेकुंठ**, न॰ पु॰ श्री विष्णूचें निवासस्थल आहे तें तो

**वेकुंठचतुर्दशी**, स्त्री॰ कार्तिक शुद्ध चतुर्दशी.

**वेकुंठवासी**, ३ लिं॰ मृत्यु पावलेला जो कोणी त्याचें कागदोपत्रीं नाम लिहावयाचें असतां एतच्छब्द पूर्वक लिहितात हा संप्रदाय प्रायः वेण्यांत आहे.

**वैरवरी**, स्त्री॰ चतुर्विध जा वाणी आहेत त्यांतील चवथी जी ती. जीणेंकरून शब्द स्पष्ट बाहेर पडतात.

**वैगुण्य**, न॰ विगुणता.

**वैंचणें**, सुपाचे व्यापार विशेषानें तांदूळ, कणी, किं॰ कणीक, सांजा, इ॰ भिन्नभिन्न होत अशीं करणें.

**वैचित्र्य**, न॰ विचित्रता.

**वैजात्य**, न॰ विजातीयता.

**वैडूर्य**, न॰ वैदूर्यशब्दाचा अपभ्रंश.

**वैतरणी**, स्त्री॰ यमलोकीं जाताना मार्गीं एक नदी लागत असत्ये ती; २, तदुत्तरणार्थ उत्तर क्रियेंत ब्राह्मणास गाय देत असतात ती.

**वैदिक**, पु॰ वेद विद्येनें जो प्रख्यात ब्राह्मण तो; २, ३ लिं॰ वेद संबंधी, किं॰ वेदानें उक्त जें कर्मादि तो.

**वैदिकी**, ३ लिं॰ वैदिक संबंधी जो आचार, कर्म, इ॰ तो; २, स्त्री॰ वैदिकपणा.

**वैदूर्य**, पु॰सं॰ एक रत्न आहे.

**वैद्य**, पु॰ औषधादिद्वारा रोगञांनीचा उपाय जाणतो तो.

**वैद्यक**, न॰ रोग निरास होऊन आरोग्य व्हावें एतदर्थ औषधोपचार, रोगपरीक्षा, रोगनिदान, इ॰ रूप ज्ञेय जो विषय तें; २, तत्प्रतिपादक जें शास्त्र तें.

**वैद्यकी**, स्त्री॰ वैद्याचें कर्म ती.

**वैद्यक्रिया**, स्त्री॰ वैद्यशास्त्रोक्त रसायन निर्माणादि कारणीभूत जें वैद्याचें कर्म ती.

**वैद्यराज**, पु॰ वैद्यास सन्मानानें म्ह॰.

**वैद्यशास्त्र**, न॰ वैद्यक द्वितीयार्थीं.

**वैध**, ३ लिं॰ वेदवाक्यादिबोधित जें कर्मादि तो.

**वैधर्म्य**, न॰ दृष्टांत दार्ष्टांतिकत्वादिरूपानें उपात्त जे ससंबंध अनेक धर्मी त्यांची परस्पर जी विरुद्ध धर्मता तें.

**वैधव्य**, न॰ विधवापणा.

**वैधृति**, पु॰ सत्ताविसावा जो योग तो; २, पोटांत एक शूळ होत असतो तो.

**वैधृत**, पु॰रा॰ वैधृति द्वितीयार्थीं; २, स्त्री॰न॰ वैधृति प्रथमार्थीचा अपभ्रंश.

**वैनसें**, न॰ वनसें.

**वैपरीत्य**, न॰ विपरीतपणा.

**वैपुल्य**, न॰ विपुलता.

**वैफल्य**, न॰ विफलता.

**वैभव**, न॰ ऐश्वर्य.

**वैमनस्य**, न॰ विमनस्कता; २, परस्परांचे अंतःकरणांत परस्परांविषयीं जो विरुद्धभाव तें.

**वैयधिकरण**, न॰ व्यधिकरणत्व.

**वैयर्थ्य**, न॰ व्यर्थत्व.

**वैयाकरण**, पु॰ व्याकरण अध्ययन केलें आहे जाणें तो; २, व्याकरण संबंधी जी प्रक्रिया इ॰ तो.

**वैर**, न॰ कोणेकाचा कोणेकाशीं असतो जो प्रतिकूल भाव तें.

**वैरण**, स्त्री॰ घोडें, गाय, इ॰ कांस भक्षणार्थ घालायाचे उपयोगी जें तृण, कडबा, इ॰ ती २, क्रि॰ गुरें इ॰कांस चारा घालणें इत्या-

ग्रर्थ गाताडीपुढें जी ओयरण ह्मणून जागा ठेवितात ती; ३, न॰ स्त्री॰ दळाया करितां आं- त्याचे पाळींत; किं॰ भाजायाकरितां खापर इ॰ कांत एक एक वेळ घालितात जें धान्य तें ती.

वैरणें, शिजवायाचे जे तांदूळ, दाळ, पीठ, इ॰ पदार्थ ते शिजायाकरितां सजल जें तपेलें इ॰ पात्र त्यांत ओतणें; २, रा॰ जातें, खापर इ॰ कांत दळणें, भाजणें, इत्याद्यर्थ हस्तादिकानें वैरणवैरण घालणें.

वैरा, पु॰ ओयरा.

वैरागर, पु॰ ग्रं॰ हिऱ्यांची जी खाण ती.

वैरागी, ३ लिं॰ ज्यास वैराग्य झालें तो.

वैराग्य, न॰ विरागित्व.

वैरी, ३ लिं॰ ज्याशीं ज्याचें वैर असतें तो त्याचा.

वैरूप्य, न॰ विरूपत्व.

वैल, पु॰ न॰ वाईल.

वैलंडी, स्त्री॰ रा॰ वेलांटी.

वैलचूल, स्त्री॰ वाईलचूल.

वैलक्षण्य, न॰ विलक्षणता.

वैलाटी, वैलाठी, स्त्री॰ समुद्रापासून सह्या- द्रिपर्यंत जो देश त्यामध्यें पूर्वपूर्व जो प्रदेश तो त्याहून पश्चिमेकडील प्रदेशास ती.

वैलोम्य, न॰ विलोमता.

वैवर्ण्य, न॰ विवर्णता.

वैवस्वतमनु, पु॰ सांप्रत चाललेल्या मन्वं- तराचा अधिकारी सातवा जो मनु तो.

वैवाडा, पु॰ कों॰ वयवाडा.

वैवाहिक, ३ लिं॰ विवाहसंबंधी जें कर्मादि तें.

वैशद्य, न॰ विशदपणा.

वैशाख, पु॰ चैत्रापासून दुसरा जो चांद्रमास तो.

वैशाखी, ३ लिं॰ वैशाखसंबंधी जी तिथि ती.

वैशिष्ट्य, न॰ विशिष्टत्व.

वैशेषिक, पु॰ पदार्थांचे तत्व निर्णयाविषयीं एक मत आहे त्या मतातें अनुसरून चाल- णारा जो तो.

वैश्य, पु॰ ब्राह्मणादि चार वर्णांतील तिसरा जो वर्ण तो.

वैश्वदेव, पु॰ नित्यशः करायाचें एक होम प्रधा- न कर्म आहे.

वैश्वानर, पु॰ एक ओषधींचा पाक आहे; २, सं॰ अग्नि.

वैषम्य, न॰ विषमता.

वैषयिक, ३ लिं॰ विषयसंबंधी जें सुखादि- क तें.

वैष्णव, पु॰ विष्णूचा जो भक्त तो; २, ३ लिं॰ वि- ष्णुसंबंधी जें पुराण, कथा, व्रत, इ॰ तें.

वैष्णवी, ३ लिं॰ वैष्णवसंबंधी आचार इ॰ तो.

वो, अ॰ ओ; ओकारादिक जे शब्द ओकारप्र- करणीं लिहिले आहेत ते देशभेदेंकरून को- णी वोकारादिक ही ह्मणतात, जसें वोकणें, ओकणें, वोकटा, ओकटा, वोझें, ओझें, वो- मणें, ओमणें, असेंच इतरही जाणावे.

वौंळ, स्त्री॰ बकुळवृक्ष; २, न॰ बकुळपुष्प.

वौंळदोडा, पु॰ वोंळीचें जें फळ तें.

**व्यंकटेश**, पु० एक देव आहे.

**व्यक्त**, ३ लिं० इंद्रिय गोचर होण्याविषयीं योग्यता ज्याचे अंगीं आहे असा जो कोणेक अर्थ तो; उ० अव्यक्त ब्रह्मापासून हा व्यक्त प्रपंच झाला; २, ककारादिवर्ण ज्यांत आहेत असा जो शब्द तो; ३, चांगलें समजाया जोगें जें भाषण, लेख, इ० तो; ४, अंक राशींचा विशेषेंकरून निर्देश करून त्रैराशिकादि युक्तीनें साधायाचें जें गणित तो.

**व्यक्ति**, स्त्री० एक एक एक अशा रूपानें गणायास योग्य असे भिन्न भिन्नत्वें करून स्थित जे अर्थ ते प्रत्येकीं, जे अनेक मिळून जाति, समुदाय, द्वित्वादि संख्या, इ० घडतें; २, कोणेक पुरुषादिकाची गुणेकरून, किं० अवगुणेकरून असा धारणता वर्णायाची असतां त्या पुरुषादिकास व्य०; ३, अभिव्यक्ति; उ० हें पोर तुगतें बोलूं लागलें, अजून वर्णाची व्यक्ति होत नाहीं; ४, व्यंजक शब्दादिकेंकरून व्यंग्यार्थाचें जें प्राकट्य ती.

**व्यंग**, ३ लिं० विकलांग; २, न० विकलत्व.

**व्यंगुल**, न० अंगुलाचा जो साठावा अंश तें.

**व्यंगोक्ति**, स्त्री० व्यंग्योक्तीचा अपभ्रंश.

**व्यंग्य**, ३ लिं० वाच्यमर्यादेनें बोध होत नसतां नन्तपद सान्निध्यादि माहात्म्यामुळें बोधविषय होत असतो जो वाच्यार्थाहून इतर अर्थांतरांश तो.

**व्यंग्योक्ति**, स्त्री० व्यंग्यरूप अर्थ ज्या मध्यें भासतो असें जें भाषण ती; २, तादृश जो भाषणप्रकार त्यास कोणी व्य०.

**व्यग्र**, ३ लिं० शोकादिकांमुळें कांहीं सुचेना अशा अवस्थेतें पावलें जें अंतःकरण इ० किं० तद्विशिष्ट पुरुषादि तो.

**व्यंजक**, ३ लिं० सं० कोणेक अर्थाची वाच्य मर्यादेवांचून अभिव्यक्ति करणारा जो शब्द किं० इतर कांहीं चिन्हभूत तो.

**व्यजन**, न० सं० विंझणा.

**व्यंजन**, न० अकारादि स्वर वर्जिव करून जे ककारादि वर्ण ते प्रत्येकीं; २, अक्षरावर जे अनुस्वाराचें, किं० अनुनासिकतेचें चिन्ह करितात तें; ३, सं० चटणी कोशिंबीर, इ० जें तोंडी लावणें तें; ४, व्यंग्यार्थाचें जें व्यक्तीकरण तें.

**व्यतिक्रम**, पु० आज्ञादिकांचा जो उल्लंघन तो.

**व्यतिरिक्त**, ३ लिं० ज्याचा व्यतिरेक ज्याचाठायीं आहे असा जो अर्थ तो तद्व्यतिरिक्त; उ० ज्ञानव्यतिरिक्त देह काष्ठोपम जाणावा; २, अ० विवक्षितावांचू; उ० मी तुला घेतल्याव्यतिरिक्त जाणार नाहीं

**व्यतिरेक**, पु० सं० कोणेक अर्थाचे ठायीं कोणेक अर्थाचे अन्वयाचा जो अभाव तो; उ० ईश्वरीं अज्ञानाचा सर्वथा व्यतिरेक आहे; २, जें नसतां जें नसतें असा जो हेतु साध्यभूत अर्थांचे अभाव सत्तेचा नियम तो; उ० जेथें ईश्वर भक्ति नाहीं तेथें भूतदया नाहीं असा व्यतिरेक आहे.

**व्यतिरेकमुखें**, **व्यतिरेकमुखेंकरून**, अ०

व्यतिरेकरूप जी व्याप्ति तीतें अवलंबून कोणेक अर्थातें प्रतिपादणें इ॰ कांचें वि॰.

**व्यतीपात**, पु॰ सत्तावीस योगांतील सत्रावा जो योग तो; २, ला॰ भारी चंचल द्वाड जो पोर इ॰ त्यास त्य॰.

**व्यत्यय**, पु॰ कांहीं एक कर्मांमध्यें होतो जो विपर्यास तो; २, व्याक्षेप.

**व्यत्यस्त**, ३ लिं॰ विपर्यस्त.

**व्यत्यास**, पु॰ विपर्यास.

**व्यथा**, स्त्री॰ आधिरूप, किं॰ व्याधिरूप अनुभूयमान जें दुःख ती.

**व्यथित**, ३ लिं॰ व्यथा झाली आहे जास तो.

**व्यथिष्ट**, ३ लिं॰ दमा, अर्श, इ॰ चिरस्थायी जे रोग ते जडले आहेत जास तो.

**व्यधिकरण**, ३ लिं॰ एका अधिकरणीं रहाणारे नव्हत असे जे अनेक धर्मादि अर्थ ते परस्पर; २, जा मध्यें सरळ युक्ति नाहींत असें जें वितंड वादाचें भाषण इ॰ तो.

**व्यपदेश**, पु॰ कांहीं एक अर्थाचेठायीं शब्दाचा संज्ञारूप जो व्यवहार तो.

**व्यभिचरित**, ३ लिं॰ व्यभिचार पावलेला जो नियम, हेतु, इ॰ तो.

**व्यभिचार**, पु॰ कोणेक विधिविषयीं मानलेल्या नियमाचा लक्ष्यविरोधी असतो जो भंग तो; उ॰ जितके बुद्धिमान् तितके आळशी, असें म्हणतां येत नाहीं, कांकीं क्वचित् व्यभिचार दिसतो; कितीएक बुद्धिमान् असून उद्योगी ही आढळतात; २, पुरुषानें स्व स्त्रीहून इतर स्त्रीशीं, किं॰ स्त्रीनें पुरुषाशीं रतल्यानें जो नियमातिक्रम होतो तो.

**व्यभिचारी**, ३ लिं॰ व्यभिचार आहे जास असा जो नियम, हेतु, इ॰ तो; २, द्वितीयार्थक जो व्यभिचार तो घडला आहे जापासून, किं॰ निरंतर करण्याचा स्वभाव जाचा तो.

**व्यय**, पु॰ खर्च; २, विसावा जो संवत्सर तो.

**व्ययशील**, ३ लिं॰ बहुत किं॰ सर्वदा व्यय करण्याचा स्वभाव जाचा तो.

**व्यर्थ**, ३ लिं॰ निरर्थक; २, अ॰ वृथा.

**व्यवकलन**, न॰ सं॰ कांहींएक अंक राशींमध्यें कांहींएक अंकराशि उणा करण्याचा जो व्यापार तें.

**व्यवच्छेद**, पु॰ सं॰ सामान्य वाचक शब्दानें सामान्य रूपें करून बोधविषय होऊं लागला जो अर्थ त्याचे एकदेशाची विशेषणादिव्यवच्छेदकानें होत्ये जी पृथक्क्रिया ती.

**व्यवच्छेदक**, ३ लिं॰ सं॰ व्यवच्छेद करणारें जें विशेषणादि तो.

**व्यवधान**, न॰ सं॰ कोणेक पदार्थाशीं कोणेक पदार्थाचें संनिधान, किं॰ साक्षात्संबंध न होण्यास कारणीभूत जें मध्यवर्ति अवकाश स्थितिरूप, किं॰ तृतीय पदार्थ स्थितिरूप असतें जें अंतर तें, किं॰ ती तत्कारणीभूत अवकाश आणि तृतीय पदार्थ तें; २, कोणकाचे गतीमध्यें कांहीं एक पदार्थाचे स्थितीमुळें होतो जो प्रतिबंध तें, किं॰ तो प्रतिबंधक पदार्थ तें; उ॰ भिंतीनें वायुचें व्यवधान होतें, पण दृष्टिचें व्यवधान

वधान होत नाहीं; ३, सतत चाललेल्या व्यापारामध्यें कांहीं कारणानें यत्किंचित् पडतो जो कालखंड तें.

**व्यवधायक**, ३ लिं० व्यवधान होण्यास कारणीभूत जो पदार्थ तो.

**व्यवसाय**, पु० क्रयविक्रयादिरूप जो व्यापार तो; २, सं० निश्चय.

**व्यवस्था**, स्त्री० कांहीं पदार्थांचा, किं० क्रियांचा यथायोग्य, किं० विवक्षितानुरूप संबंध होई असा जो विनियोग ती; २, याची पुढें गविकाय, परिणामकाय, अशाविषयीं गतिपरिणाम या शब्दांचा अर्थी व्यवस्था शब्दाचा प्रयोग कोणी करितात.

**व्यवस्थापक**, ३ लिं० व्यवस्था करणारा जो मनुष्य, शास्त्र, इ० तो.

**व्यवस्थापन**, न० व्यवस्था करण्याचा जो व्यापार तें.

**व्यवस्थित**, ३ लिं० व्यवस्थेनें युक्त जो व्यवहार धर्म, इ० तो, किं० ज्याचे भाषणादि व्यवहारामध्यें व्यवस्था आहे असा जो मनुष्यादि तो.

**व्यवहर्ता**, ३ लिं० व्यवहार करणारा जो तो.

**व्यवहार**, पु० अर्थांवर कांहीं क्रिया उत्पन्न झाल्यानें तद्द्वारा परस्परें अर्थांचें संयोग वियोग आकर्षण, प्रसारण, उच्चारण, इ० जें कांहीं घडतें तें सर्व मिळून जी एक विशिष्ट क्रिया तो; लोकव्यवहार, शास्त्रव्यवहार, अंकव्यवहार, इ० स०; क्रयविक्रयादिरूप जो वाणिज्यव्यापार त्या विषयीं विशेषेंकरून प्रसिद्ध.

**व्यवहारणें**, व्यवहृत करणें.

**व्यवहारी**, पु० क्रयविक्रय व्यवहार करणारा जो तो.

**व्यवहार्य**, ३ लिं० व्यवहृत करण्याविषयीं योग्य जो शब्द, नाणें, मनुष्य, इ० तो.

**व्यवहित**, ३ लिं० सं० व्यवधान झालें आहे ज्यास तो.

**व्यवहृत**, ३ लिं० व्यवहार विषय केला जो तो.

**व्यष्टि**, स्त्री० विराट् देहादिक जे विशिष्ट अवयवी त्यांचे अवयवभूत जे अस्मद्देहादिरूप अवांतर अवयवी ते प्र०.

**व्यसन**, न० कोणेक विषयाची एकवेळ गोडी लागल्यामुळें तद्वियोगीं चित्तास चैन पडूं नये असा जो त्याचा संबंध आपल्यास जडतो तें; २, संकटावस्था तें.

**व्यसनी**, ३ लिं० व्यसन आहे ज्यास तो प्रा० दुर्व्यसनाविषयीं प्र०.

**व्यस्त**, ३ लिं० सं० समुदाय रूपेंकरून एकरूपता पावला नव्हे पृथक्पृथक् रूपेंकरून स्थित असा जो कोणेक अर्थ तो; २, ज्याचा पूर्वस्थित क्रम उलटा झाला, किं० बिघडला असा जो कोणेक अर्थ तो.

**व्यस्ताव्यस्त**, ३ लिं० अस्ताव्यस्त.

**व्याकरण**, न० सं० प्रकृति प्रत्यय विभागादि प्रकारानें शब्दांची सिद्धि ज्यांत प्रतिपादिली असते असें जें शास्त्र तें.

**व्याकरणी**, पु० व्याकरण जाणणारा जो तो.

**व्याकुल, व्याकुळ**, ३ लिं० शोक, हर्ष, इ० कानें

अतिव्याप्त झाल्यामुळें कांहींच सुचेना अशी अवस्था पावलें जें अंतःकरण, किं० तद्विशिष्ट मनुष्यादि तो; २, कोणेक अतिशय दुःख झाल्यामुळें ज्ञानशक्ति आणि शारीरशक्ति जामध्यें कांहींच राहिली नाहीं, असा झालेला जो मनुष्यादि तो; उ० हरिणास एक बाण लागतांच व्याकुल होऊन पडला.

**व्याख्या**, स्त्री० श्लोक, वाक्य, इ० कांची अर्थ वर्णनद्वारा जी परिस्फुटता ती; २, गुप्त गोष्टीचा कोणी करितो जो बोभाटा ती; ३, कोणेक अर्थातें प्रतीकरूपें करून धरून लक्षण, शक्ति, स्वभाव, प्रयोजन, इ० रूप जो तत्संबंधी सर्व विषय तन्निरूपणद्वारा जें त्या अर्थाचें वर्णन ती; ४, कोणेक पुरुषाची, किं० गोष्टीची कोणी करितो जी हेटाळणी ती.

**व्याख्यात**, ३ लिं० व्याख्या झाली आहे ज्याची असा ग्रंथ, वाक्य, इ० तो.

**व्याख्याता**, ३ लिं० श्लोकादिकांची व्याख्या करणारा तो.

**व्याख्यान**, न० ग्रंथ, वाक्य, इ० कांची व्याख्या करण्याचा जो व्यापार तें; २, गुरूनें शिष्यास काव्यशास्त्र इ० कांचा अर्थ समजावून देण्याचा व्यापार तें.

**व्याघात**, पु० सतत चाललेल्या व्यापारामध्यें कांहीं विघ्नामुळें जो खंड तो; उ० तुह्मी एथें गोष्टी सांगून का आमचे अध्ययनांत व्याघात होतो; २, सत्तावीस योगांतील तेरावा जो योग तो.



**व्याघ्र**, पु० वाघ.

**व्याघ्रमुख**, न० आरंभीं मात्र परम कठिन असें जें शास्त्रादि त्यास ह्म०.

**व्याघ्रांबर**, न० वस्त्रस्थानीं योजिलें जें व्याघ्रचर्म तें.

**व्याज**, न० सं० मिष.

**व्याज**, न० उत्तमर्णापासून कांहीं पैका ऋण घेतला असतां शंभरांस प्रतिमासीं एक इ० रूप बोलीनें अधमर्णानें उत्तमर्णास वरद्यावयास केलें असतें जें द्रव्य तें.

**व्याजकटावणी**, स्त्री० तुटमितीनें व्याजाचा आकार करण्याचा जो प्रकार ती.

**व्याजनिंदा**, स्त्री० आंत निंदा असून बाहेर स्तुति दिसावी असा जो व्याज स्तुतीचा एक भेद आहे त्यास कोणी ह्म०.

**व्याजफेलावण, व्याजफेलावणी**, स्त्री० जमेचे रकमाचें व्याज वेगळें करावें, आणि नावाकडील व्याज वेगळें करावें, आणि कमी असेल तें अधिकांत वजा करून बाकी काढावी असें व्याज करण्याचा जो प्रकार ती.

**व्याजबट्टा**, पु० कर्जाऊ रुपये देणें, नाणीं बटावणें, हुंडया पाडया करणें, इ० सराफीचा जो व्यवहार त्यास ह्म०.

**व्याजस्तुति**, स्त्री० पोटीं स्तुति असून बाहेर निंदा दिसावी, किं० पोटीं निंदा असून बाहेर स्तुति दिसावी. अशा प्रकारचा जो श्लोक, वाक्य, इ० कांचे ठायीं अर्थालंकार असतो ती.

**व्याजाऊ**, ३ लिं॰ व्याजी

**व्याजाव**, ३ लिं॰ व्याजी.

**व्याजी**, ३ लिं॰ व्याजाचे बोलीनें दिल्हें, किं॰ घेतलें जें द्रव्य तो.

**व्याजू**, ३ लिं॰ व्याजी.

**व्याजोक्ति**, स्त्री॰ मनांत बोलावयाचा जो विषय तो स्पष्ट नकरितां निमित्तांतरानें भाषण करीत असावें आणि त्यापासून स्वाभिप्रेत अर्थाचें ध्वनन होत असावें अशा प्रकारें जी उक्ति ती.

**व्याध**, पु॰ सं॰ पारधी; २, स्त्री॰ व्याधिशब्दाचा अपभ्रंश.

**व्याधि**, पु॰ स्त्री॰ शरीरास उपद्रव कारक जे रोग, क्षत, इ॰ ते प्र॰; २, ला॰ आपल्यास उपद्रवकारक पाठीमागें कांहीं लागतें जें लचांड त्यास त्र्प॰; ३, अवोच्य जें पोर त्यास त्र्प॰

**व्याधिष्ट**, ३ लिं॰ व्याधिष्ठ शब्दाचा अपभ्रंश.

**व्याधिष्ठ**, ३ लिं॰ रक्तपिती, क्षय, शूळ, इ॰ कोणेक मोठा व्याधि जडला आहे जास असा जो मनुष्य इ॰ तो.

**व्यान**, पु॰ सर्व शरीरास व्यापून राहिला आहे जो प्राण वायु तो.

**व्याप**, पु॰ देश, ग्राम, राज्य, दरबार, इ॰ जीं व्यवहाराधिकरणें त्यांचे ठायीं कोणक व्यवहर्त्याची जाणें, येणें, देणें, घेणें, इ॰ व्यवहारद्वारा असत्ये जी व्याप्ति तो; २, उपद्व्याप; त्र्प॰ व्यापतित का संताप.

**व्यापक**, ३ लिं॰ व्यापितो तो; २, कांहीं एक पदार्थानें, किं॰ गोष्टीतें पोटीं घेऊन राहाणारा जो अधिक देश वृत्ति पदार्थ, किं॰ गोष्ट तो; उ॰ मनुष्यत्वजाति ब्राम्हणत्वजातिपेक्षां व्यापक.

**व्यापणें**, कोणेकानें कोणेक पदार्थादिक आपल्या बाहेर न उरे असा करणें, किं॰ त्याचे सर्व अवयव स्वरूपानें, किं॰ स्वशस्त्रादिकानें अन्वित होत असा करणें, किं॰ तशा प्रकारें आपण पसरणें; उ॰ विष जों सर्वांगीं व्यापलें नाहीं तों पर्यंत उपाय चालतो.

**व्यापन**, न॰ व्यापण्याचा जो व्यापार तें.

**व्यापार**, पु॰ करणें, मारणें, इ॰ धातूंचा जो अर्थ तो; २, क्रय विक्रयरूप जो व्यवहार तो.

**व्यापारणें**, स्वनिष्ठ जो हनन चालनादि व्यापार तद्द्वारा त्या त्या शस्त्रादिकरणातें, किं॰ हस्तादिकर्मातें चेष्टारूप जो त्यांजवर चलन गमनादि यथायोग्य व्यापार होत असतो तद्दिष्ट करणें.

**व्यापारी**, पु॰ उदमी.

**व्यापी**, ३ लिं॰ कोणेक अर्थातें व्यापणारा जो तो; प्रा॰ सर्वव्यापी, जगद्व्यापी, इ॰ समासीं प्र॰

**व्यापून**, ३ लिं॰ व्यापारिला तो.

**व्याप्त**, ३ लिं॰ व्यापला गेला जो तो.

**व्याप्ति**, स्त्री॰ कोणेक अर्थाची कोणेक अर्थातें व्यापून जी स्थिति ती; २, अनुमानस्थलीं हेतुसाध्याचा सामानाधिकरण्येंकरून स्थितीचा जो नियम ती.

**व्याप्य**, ३ लिं॰ व्यापकानें व्यापायाजोगा अल्पदेश वृत्ति जो अर्थ तो.

**व्याप्यकोटि**, स्त्री० विद्यादिरूप मोठें व्यापक जें सामर्थ्य तेणेंकरून व्याप्य म्हणजे पराभूत करायास योग्य असें जें अल्प सामर्थ्य तद्विशिष्ट मनुष्यादिकांची कोटि ती; व्याप्यकोटिप्रविष्ट, व्याप्यकोट्यंतर्गत इ० स०.

**व्याप्यव्यापकभाव**, पु० एक व्याप्य आणि एक व्यापक अशा उभयतांचा जो संबंध तो.

**व्यामोह**, पु० कर्तव्य विचार विसरून भलतेंच करायास कारणीभूत जी चित्तास भ्रांति उत्पन्न होते तो.

**व्यायाम**, पु० गमनकरणें, दंडकाढणें, इ० केंकरून शरीरावयव ओढले, ताणले, आत असा शरीरास होतो जो संस्कार तो, किं० तदर्थक केला जो गमनादि व्यापार तो.

**व्याल**, पु० सं० सर्प.

**व्यावर्तक**, ३ लिं० व्यावृत्ति करणारा जो विशेष धर्मादि तो.

**व्यावर्त्य**, ३ लिं० कांहीं एक व्यावर्तकानें ज्याची व्यावृत्ति करायास योग्य आहे तो.

**व्यावहारिक**, ३ लिं० व्यवहार संबंधी जें नाम. भाषा, लिपि, इ० तो.

**व्यावृत्त**, ३ लिं० ज्याची व्यावृत्ति झाली आहे तो.

**व्यावृत्ति**, स्त्री० कोणेक लक्ष्य विशेषीं प्रसक्त झालेला जो दोषादि कोणेक अर्थ तो विशेषणादि सामर्थ्यानें त्या लक्ष्यीं लागूनहोतां त्याचा तेथून जो पृथक्भाव ती; उ० चक्षूस दिव्य हें विशेषण दिल्यानें चर्मचक्षूंची व्यावृत्ति होते; २, कोणेक धर्मी इ० कांचेठायीं कोणेक धर्मादिकांचा जो व्यतिरेक ती; उ० घटादिकार्योचेठायीं मृत्तिकात्वाची अनुवृत्ति आहे परंतु मृत्तिकेचेठायीं घटत्वादिकार्य धर्मांची व्यावृत्ति.

**व्यास**, पु० वेदांचे विभाग अष्टादश पुराणें, इ० ज्याणें केलें असा एक ईश्वराचा अवतार चिरजीवि ब्राह्मण आहे तो; २ पुराणसांगणारा जो व्यास म्ह०; ३, गोलाकार, किं० वृत्ताधाकार जो पदार्थ त्याचे गर्भाचें जें प्रमाण तो.

**व्यासंग**, पु० विद्याकलादिरूप जें साध्य तद्विषयीं तदनुकूल पठनादि व्यापार करीत नेहमी त्याचेठायीं जी स्थिति तो.

**व्यासंगी**, ३ लिं० व्यासंगकरण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**व्यासज्यवृत्ति**, ३ लिं० धर्मी इ० रूप जे अनेक अर्थ त्या सर्वांवर मिळून एक राहतो पृथक्पृथक् विश्रांति पावत नाहीं असा जो संयोग पृथक्त्व इ० अर्थ तो.

**व्यासपीठ**, न० पुराण सांगावयाकरितां ब्राह्मणाचें जें आसन तें.

**व्यासपूजा**, स्त्री० पुराण समाप्तीचा वेळेस पुराणिकाची, किं० संस्थानिक जे पुराणिक असनात त्यांची कार्तिसंबंधी पौर्णिमेस जी पूजा करितात ती; २, आषाढमासीं पौर्णिमेस जी गुरु, संन्यासी, यांची पूजा करितात ती.

**व्यासासन**, न० व्यासपीठ.

**व्याहत**, ३ लिं० व्याघात झाला ज्याचा तो.

**व्याही**, पु० विहिणीचा जो नवरा तो.

**व्याहीभोज**, पु० व्याह्यासाठीं जो भोजन समारंभ करितात तो.

**व्याक्षेप**, पु० चाललेल्या व्यापारामध्यें जें कांहीं विघ्न होतें तो, किं० तेणेंकरून होतो जो खोळंबा तो.

**व्युत्क्रम**, पु० विपरीत जो क्रम तो.

**व्युत्पत्ति**, स्त्री० कांहींएक शास्त्रादि व्यवहाराचे जे तत्तत्पारिभाषिक संकेत असतात ततुज्ञानपूर्वक तत्तद्व्यवहाराचें जें ज्ञान ती; संस्कृत भाषेचें जें ज्ञान तेथें विशेषेकरून प्र०; २, विशिष्ट पदाचीं अवयवभूत जीं अवांतर पदें, किं० प्रकृतिप्रत्यय त्यांचेठायीं विशिष्ट पदार्थास अनुगुण जी अर्थकल्पना असते ती; उ० वैदिक याशब्दीं वेदातें जो आणणारा ब्राह्मणादिक, किं० वेदानें सांगितलें जें कर्म अशा दोनही व्युत्पत्ति संभवतात.

**व्युत्पन्न**, ३ लिं० शास्त्रादि व्युत्पत्ति आहे ज्यास तो, किं० ज्याचे अवयवीं अर्थकल्पना आहे असा जो शब्द तो.

**व्युत्पादक**, ३ लिं० शास्त्रादि व्युत्पत्ति जेणेंकरून होते असा जो ग्रंथादि तो.

**व्यूह**, पु० शत्रूचा आंत प्रवेश नहोतां आपला मार शत्रूवर चालावा म्हणून शकटाद्याकारक सैन्याचा रचनेचे प्रकार आहेत ते प्र०; २, ला० शत्रुपराजयादिरूप जें साध्य तत्साधनार्थ अनेक युक्तींनीं दुसऱ्याचे मनांत एकाएकीं नयावयाजोगी मोठी कोणी रचिती जी मसलत ती.

**व्योम**, न० सं० आकाश.



**व्रज**, पु० केवळ गोळ्यांचीच वस्ती जेथें असते असा जो गांव तो.

**व्रण**, पु० मनुष्य वृक्षादिकांचे शरीरास शस्त्रादि लागल्यामुळें, किं० रोगादिकांमुळें जो छेद पडतो तो.

**व्रणित, व्रणी**, ३ लिं० व्रणविशिष्ट जो तो.

**व्रत**, न० ईश्वरप्रसादद्वारा पापक्षय, किं० इष्टफलप्राप्ति ज्यांपासून होते अशीं नत्तन्नियम पूर्वक करायाचीं कर्मे आहेत तीं प्र०; २, ला० कोणेक शुभाशुभ कर्म करण्याविषयीं सतत धरिला जो नियम तें; उ० स्वभक्तपालन करणें हें ईश्वराचें व्रत आहे.

**व्रतबंध**, पु० मुंज म्हणून जो संस्कार तो.

**व्रतस्थ**, ३ लिं० कांहींएक व्रतादि कर्मांगभूत जो ब्रह्मचर्यादि नियम तो धारण केला आहे ज्याणें तो.

**व्रती**, ३ लिं० व्रतस्थ.

**व्रात्य**, पु० ज्याची मुंज नहोतां गौणकालही अतिक्रांत झाला तो ब्राह्मणादिकाचा पुत्र; २, ३ लिं० अवाच्य.

**व्रीडा**, स्त्री० सं० लज्जा.

**व्रीडित**, ३ लिं० लज्जित.

**व्रीहि**, पु० स्त्री० भात म्हणून जें धान्य तो ती.

**व्हेळा**, पु० रा० वेहळा.

**शक**, पु॰ लोकोत्तर पराक्रम करून जाणें प्रा॰ समुद्र वलयांकित पृथ्वीचें राज्य संपादन केलें असा जो राजा त्याचे राज्याची वहिवाट त्याचाच सत्तेनें होत असावी. अशा प्रकारें किं॰ त्याला राज्य ज्या संवत्सरीं प्राप्त झालें त्या संवत्सरातें आरंभून संवत्सर गणना लोक व्यवहारांत चालते अशा प्रकारें जें कांहीं काल प्रमुख चालतें तो; उ॰ नर्मदेचा अलीकडे शालिवाहन शक चालतो पलीकडे विक्रम शक चालतो; २, ला॰ आपण प्रवर्त्तविला जो धर्म, चाल, इ॰ तें मान्य करून तदनुसार लोकांनीं वर्तावें अशा प्रकारें लोकांवर आपली चालत्ये जी नियंतृत्व शक्ति ती; ३, सं॰ म्लेच्छामध्यें एक भेद आहे.

**शककर्ता**, पु॰ शकप्रवर्तक जे पुराण प्रसिद्ध युधिष्ठिरादि राजे ते प्र॰; २, ला॰ ज्याचें नवेंच प्रवर्तविलेलें धर्मादि कांहीं एक तें लोकांत मान्य होऊन प्रवृत्त होतें असा जो कोणी त्यास हा॰.

**शकट**, पु॰ गाडा प्रथमार्थी; २, रोहिणी नामक जीं पांच नक्षत्रें त्यांची जी तदाकार रचना दिसत्ये ती.

**शकटभेद**, पु॰ रोहिणीच्या शकटाचे मधून चंद्रादि ग्रह गेल्या मुळें त्या शकटाचा होतो जो भेद तो; २, ला॰ **छकडभेद**.

**शकटव्यूह**, पु॰ शकटाकार रचितात जो सेनासंनिवेश तो.

**शकणें**, कांहीं एक करण्या विषयीं कोणाकानें समर्थ होणें.

**शंकणें**, आशंकणें.

**शंकर**, पु॰ महादेव.

**शंकरपाळा**, पु॰ एक पक्वान्नांत भेद आहे.

**शंकरपाळें**, न॰ शंकरपाळा.

**शंकरा**, पु॰ गायनांत एक राग आहे.

**शंकराचार्य**, पु॰ कलियुगामध्यें पाखंड मताचा विध्वंस करून वेदोक्त अद्वैत मार्ग चालवायासाठीं धर्म प्रवर्त्तक शंकराचा अवतार झाला होता ते प्रा॰ अनेकवचनांत प्र॰; २, जागोजाग ज्यांचे मठ आहेत तेथें धर्म चालवाया करितां अधिकृत संन्यासी असतो तो.

**शंकराभरण**, पु॰ गाण्यांत एक राग आहे.

**शकल**, न॰ पाषाणादिकांचें जें खंड तें; २, कोणेक गोष्टीचा आंतील जो मर्मांश जो बाहेर निघाल्या शिवाय इदमित्थं ज्ञान होत नाहीं तें; ३, स्त्री॰ अडला जो कोणेक व्यवहार तो चालू करण्या विषयीं बुद्धि चालवून काढितात जी युक्ति ती.

**शंका**, स्त्री॰ कांहीं एक कर्म करण्या विषयीं या कर्मानें मला लोक हांसतील किं॰ शास्ता जो राजा इ॰ त्यापासून शासन घडेल किं॰ मी बुडेन, फसेन, इ॰ संभावनेनें अंतःकरणाचा संकोच व्हावया जोगी जी अंतःकरणांत वृत्ति उत्पन्न होत्ये ती; उ॰ देवदास रांडेच्या घरीं जातोस लोक आपल्यास हांसतील ही कांहीं शंका बाळगीत जा; उ॰ काल रुपये त्यास देतों म्हणाला आणि आज नाहीं म्हणतो तेव्हां कांहीं तरी त्याचे मनांत शंका आली; २, कोणेक अर्थ यात्याकारीं यद्रूपें करून बोधविषय होत असतां तद्विरुद्धांश संभावना घेऊन जें त्याच अर्था विषयीं तें द्वैतंतर ती; उ॰ आजपर्यंत हा विश्वासू असें या-

टन होतें परंतु कालचें त्याचें तसें कर्म पाहिल्या मुळें माझे मनांत शंका उत्पन्न झाली; ३, शास्त्रार्थादि रूप जो कोणेक ज्ञेय विषय त्याजवर कांहीं विरुद्धांश संभावना घेऊन जो तद्विषयीं प्रश्न तो.

**शंकासूर**, पु॰ राजतुरा.

**शंकित**, ३ लिं॰ शंका प्रथम द्वितीयार्थ प्राप्त झाला आहे ज्यास तो; २, कोणेकानें शंकिला जो कोणेक विषय तो.

**शंकु**, पु॰ सं॰ लोहादि धातु, काष्ठ, इ॰ कांचा प्रा॰ वाटोळा आणि लांबट असा खिळा इ॰ रूप तुकडा तो, परंतु छाये वरून कालादि प्रमाण समजाया साठीं जो द्वादशांगुल हस्तिदंतादिकांचा तुकडा मांडितात त्याजवर प्रसिद्धपणें प्र॰; २, एक संख्या आहे. १०००००००००००००

**शकुन**, पु॰ गमनार्थ प्रवृत्त होते समयीं सुशब्द कुशब्दादिकांचें श्रवण किं॰ मंगलामंगल पदार्थाचें दर्शन, इ॰ रूप जें कांहीं साहजिक होतें तेंच शास्त्रानुरोधानें मानितात जें होणारें शुभाशुभाचें लक्षण तो; २, प्रश्न तृतीयार्थीं.

**शकुनउंडा**, पु॰ एक पक्वान्न आहे.

**शकुनगांठ**, स्त्री॰ कालांतरीं होणारें किं॰ देशांतरीं झालेलें इ॰ रूप परोक्ष जें कांहीं एक वर्तमान त्याविषयीं सांगीतला जो कांहीं शकुन किं॰ आढळलें जें तत्सूचक कांहीं लक्षण त्याचें स्मरण त्या गोष्टीचें प्रत्यक्ष होईतों पर्यंत रहावें म्हणून जी पदरास गांठ बांधितात ती जेणें करून त्या शकुनाचें संमानन केलें असें होतें.

**शकुनवंती**, स्त्री॰ शकुन पहाण्याचे उपयोगीं ठोक जोशी इ॰ कांजवळ जी लहान शीव ही, पोथी, इ॰ असती ती.

**शकुनि**, पु॰ सं॰ पक्षी; २, बवादि करणांतील जें आठवें करण तो.

**शके**, अ॰ इष्ट शकाचा संवत्सर संख्या वाचक जो शब्द किं॰ अंक त्याचे पूर्वीं याचा प्र॰ करितात.

**शक्त**, ३ लिं॰ शक्ति प्रथम द्वितीयार्थ आहे ज्याचे अंगीं तो; २, स्त्री॰ शक्ति शब्दाचा अपभ्रंश परंतु प्रथम द्वितीयार्थीं.

**शक्ति**, स्त्री॰ सं॰ अर्थमात्राचे अंगीं नत्कार्य निर्वाहक जो बल म्हणोन धर्म विशेष असतो ती; द्रव्यशक्ति, शरीरशक्ति, ज्ञानशक्ति, पचनशक्ति, दहनशक्ति, शक्त्यनुसार, इ॰ स॰; २, अमुक शब्द उच्चारिला असतां अमुक अर्थाचा नियमें करून बोध व्हावा असा जो शब्दाचा ठायीं संकेत चालला आहे ती; ३, ईश्वराची जी योगमाया ती जिचे पार्वती, लक्ष्मी, इ॰ हे अवतार; ४, स्त्री पुरुष मिळून जें मिथुन त्यांतील जी स्त्री तीस प्रसंग विशेषीं म्ह॰; ५, एक आयुध विशेष आहे.

**शक्तिग्रह**, पु॰ या शब्दाची शक्ति या अमुक अर्थीं आहे असें जें वृद्धव्यवहार, कोश, व्याकरण, इ॰ कांवरून ज्ञान होतें तो; २, अर्थांचे ज्ञापक जे शब्द, लक्षण, इ॰ त्यां वरून कोणेक अर्थाचा कोणेक रूपें करून जो बोध होतो तद्विषयीं कोणी प्र॰ करितात; उ॰ याचे वेषावरून हा साधु असा मला शक्तिग्रह झाला होता.

**शक्तिग्राहक**, ३ लिं॰ शब्दाचा शक्तिग्रह जेणें करून होतो असा जो वृद्धव्यवहार, व्याकरण, कोश, इ॰ तो.

**शक्तिपात**, पु॰ रोग, भय, इ॰ कारणांमुळें हातपाय इ॰ अवयव उचलायास कठिन पडायाजोगी जी शरीरशक्तीची हानि होते ती.

**शक्तिमंत**, ३ लिं॰ शक्तिमान्.

**शक्तिमान्**, ३ लिं॰ शक्ति आहे जास तो.

**शक्तिक्षीण**, ३ लिं॰ रोग, उपवास, जरा, इ॰ कारणानें ज्याची शरीरशक्ति क्षीण झाली तो.

**शक्य**, ३ लिं॰ कर्त्याचे शक्तीनें करणें, घडणें, इ॰ विषयीं श्रेंपायाजोगा जो कोणेक कर्मभूत अर्थ तो; २, शब्दापासून शक्तीनें ज्याचा बोध होतो तो अर्थ त्याचा.

**शक्र**, पु॰ इंद्र.

**शंख**, पु॰ सं॰ समुद्रादिकांत राहाणारा एक जलजंतु आहे; २, त्याचें जें अस्थिरूप शरीरावर आवरण असतें तो जेणें करून देवावर पाणी घालितात जो युद्धादिकांत मुखानें वाजवितात इ॰ शंखवादन, शंखवाद्य, इ॰ स॰; ३, तदाकार जें अंगुल्यादिकांवर रेषाचिन्ह असतें तो; ४, शंखोबा; ५, नवनिधींतील एक निधि आहे; शंख करणें ह्म॰ बोंबलणें; धान्य उदक इ॰ कांचा शंख वाजणें ह्म॰ त्याचा त्याचा खडखडाट पडणें.

**शंखद्राव**, पु॰ औषधार्थ शंखाचा द्रव काढित असतात तो.

**शंखध्मा**, पु॰ शंखोबा.

**शंखध्वनि**, पु॰ शंखाचा जो ध्वनि तो; २, बोंबलण्याचा जो शब्द तो.

**शंखपाळ**, पु॰ एक जिवाणू आहे; २, पालीमध्यें एक भेद आहे.

शंखमणि.

**शंखमणि**, पु॰ दिसण्यामध्यें मात्र गोरागोमटा दिसतो परंतु ज्यामध्यें विद्या कलादिकांहीं एक गुण नाहीं तो.

**शंखळा**, स्त्री॰ रा॰ शृंखलेचा अपभ्रंश.

**शंखासुर**, पु॰ एक दैत्य होता; २, दे॰ राजतुरा.

**शंखिनी**, स्त्री॰ स्त्रियांमध्यें लक्षणवेद्य एक जाति आहे; २, केवळ थोडें दूध देणारी जी गाय तिला संकेतानें ह्म॰.

**शंखोबा**, पु॰ केवळ निरक्षर ठोंब्या जो मनुष्य त्यास निंदेनें ह्म॰

**शंख्या**, पु॰ शंखोबा; २, करंटा जो मनुष्य त्यास ह्म॰.

**शंख्यासोमल**, पु॰ सोमलांत एक भेद आहे.

**शठ**, पु॰ शहाणा असून दुसऱ्यास वंचावें ह्मणून व्यवहारीं सकपटपणें वर्तण्याचा स्वभाव ज्याचा असा जो हरामी तो; २, कदर्यु जो मनुष्य तो.

**शंड, शंढ**, पु॰ नपुंसक तो.

**शण**, पु॰ सं॰ ताग, शणसूत्र, शणवस्त्र, इ॰ स॰.

**शत**, न॰ एक संख्या आहे १००; शतधा, शतावधि, शतसंख्याक, शतस्थान, इ॰ स॰.

**शतक**, न॰ सं॰ श्लोकादि जे शंभर अर्थ त्यांचा जो समुदाय तें.

**शतकृत्य**, न॰ शतक्रतु लाक्षणिकार्थी; २, चटणी सारिखा एक पदार्थ करित असतात तें.

**शतक्रतु**, पु॰ सं॰ इंद्र; २, इंद्रपद प्राप्त होण्याविषयीं करावे लागतात जे शंभर क्रतु ते; ३, ला॰ घडायास फार अवघड आणि घडलें असतां लोकांनीं वाहवा ह्मणावी अशा रूपानें विवक्षित जें कोणेक कर्म त्यास ह्म॰; उ॰ जन्मास आल्यापासून एक तळें बांधलें

एवढा

एवढा काय तो शतक्रतु केला, घरचें काम होई-
नातें बाहेर आऊन मोठा शतक्रतु करणार आहां.

**शतघृत**, न० सं० औषधार्थ शतवेळ धुऊन सिद्ध केलें जें घृत तें.

**शतघ्नी**, स्त्री० एक काळीं शतावधि मनुष्यादिकांस मारायाचे उपयोगी एक आयुध आहे जास लोकांत कारलें असें म्ह०.

**शतचिंध्या**, स्त्री० रा० कांहीं एक वस्त्र पुष्कळ ठिकाणीं फाटून चिंध्यारूप होतो जो परिणाम ती.

**शतचूर्ण**, न० कोणेक पदार्थ फुटून त्याचा केवळ होतो जो चुराडा तें; २, ३लिं० तादृश परिणाम पावला जो तो पदार्थ तो.

**शतच्छिद्र**, ३लिं० शतशः भोंकें जास पडलीं आहेत असा जो वस्त्र, कागद, इ० त्यास म्ह०.

**शतंजीव**, अ० शंभर वर्षें वांचहा अर्थ याचा प्र० कोणास शिंक आली असतां आशीर्वादार्थ करितात.

**शततारका**, स्त्री० चोविसावें नक्षत्र त्या०

**शतपत्र**, न० शंभर पांकळ्या जास असतात असें जें कमल तें.

**शतपत्रिका**, स्त्री० शेवंतीस म्ह०.

**शतपावली**, स्त्री० भोजनोत्तर भक्षिलेल्या अन्नाचा परिपाक चांगला व्हावा म्हणून प्रा० शंभर पावलें चालावें असा जो व्यापार करितात ती.

**शतंभीष्म**, पु० विद्यापराक्रमादिकें करून एकापेक्षां एक अधिक असे जे असंख्यात पृथ्वीवर पडले आहेत त्यांस म्ह० परंतु त्यांची विद्यमानता दाखवून प्र० कूरून जो कोणी त्याची क: पदार्थता वर्णनीय असतां प्र०; उ० तूं आपली एवढी प्रतिष्ठा कशास सांगतोस तुझ्या सारिखे असे शतंभीष्म पडले आहेत.

**शतमर्दी**, स्त्री० रा० शतमर्दी.

**शतमूर्ख**, पु० केवळ जो मूर्ख त्यास म्ह०.

**शतशः**, अ० शंभर शंभर अशा संख्येनें मेजले जात असे.

**शतावरी**, स्त्री० एक औषधी आहे.

**शत्रु**, पु० वैरी.

**शनवार**, पु० शनिवाराचा अपभ्रंश; म्ह० नदे त्याचा वार शनवार.

**शनवाऱ्या तेली**, पु० तेल्यामध्यें एक जाति आहे जे शनवारीं तेल काढीत नाहींत विकीत नाहींत.

**शनि**, पु० नवग्रहांतील जो सातवा ग्रह तो; २, आपल्यास उपद्रव देणारा असा जो सावकार इ० कांकडील तगाददार, वैरी, इ० पाठीस लागला असतां त्यास म्ह०; ३, रा० केवळ मंद बुद्धि, अंगांत कांहीं उद्योग नाहीं, असा जो पोर इ० त्यास म्ह०.

**शनिप्रदोष**, पु० शनवारीं त्रयोदशी असतां जो प्रदोष तो.

**शनिवार, शनिवासर**, पु० सातवा जो वार तो.

**शनेश्वर**, पु० शनैश्चर शब्दाचा अपभ्रंश.

**शनैः शनैः**, अ० मंद मंद गतीनें; जा, ये, बोल, इ० कांनें वि०.

**शनैश्चर**, पु० शनि.

**शपणें**, ग्रं० शापणें.

**शपत**, स्त्री० पु० शपथाचा अपभ्रंश.

**शपथ**, पु० स्त्री० आण, शपथ पुरस्कर, शपथपुरस्स-

र, शपथपूर्वक, इ० स०.

**शाम,** ३लिं० शापिला तो, किं० शिवी गाळी, इ० दुरुनरा-नें निर्भर्त्सित केला जो तो.

**शफ,** पु० गाय, म्हैस, घोडा, इ० पशूंचें पायांचा जो खुर तो; एक शफ, द्विशफ, असे समास.

**शबर,** पु० सं० भिल्ल ह्मणून मनुष्यांत जाति आहे.

**शबल,** ३लिं० सजातीय अनेक अर्थींचें आंत मिश्रण झाल्यामुळें ज्याची शुद्धरूपता गेली असा वर्ण, रंग, उदकादि द्रव्य, इ० कोणेक अर्थ तो; २, न० तसा झाला जो त्या अर्थाचा परिणाम तें; मायाशबल, भावशबल, इ० स०.

**शब्द,** पु० श्रोत्रेंद्रियानें ज्याचें प्रत्यक्ष होतें असा एक विषय आहे; २, भाषणांतील जीं वाक्यें किं० पदें तीं प्र०; ३, प्रथमादि विभक्ति ज्यावरून होतात अशी जी वर्णानुपूर्वी तो; ४, तूं असें कां केलेंस तूंहि बिघडलेंस इ० रूप दोषाधायक जें कोणेकाला उद्देशून कोणेकाचें वचन तो, लागणें, येणें, ठेवणें, इ० धातुयोगीं प्र०; उ० नविचारतां गेलोंतर धन्याचा शब्द लागेल.

**शब्दचातुर्य,** न० भाषणामध्यें जे गुण असावे ते असल्यामुळें अनुमित होतें जें वक्त्याचें चातुर्य तें.

**शब्दजाल,** न० अनंत शब्दांचा जो समुदाय तें.

**शब्दपांडित्य,** न० बोलण्यासारखें ज्याचे हातून कांहीं एक व्हावयाचें नाहीं त्याचें उगीच जें कोरडें बोलाचें वाक्पाटव त्यास ह्म०; उ० याचें शब्दपांडित्य मात्र ऐकून घ्यावें हातानें कांहीं एक व्हावयाचें नाहीं.

**शब्दवेधी,** ३लिं० कोणेक पदार्थ प्रत्यक्ष दिसत नाहीं त्याचा शब्दमात्र ऐकूं येतो त्या शब्दानुसंधानानेंच त्या पदार्थाचा बाणादिकानें वेध करितो तो.

**शब्दशास्त्र,** न० व्याकरणशास्त्र.

**शब्दशुद्धि,** स्त्री० व्याकरणप्रक्रियेचा ज्ञानानें भाषणादिकांत येणारे शब्दांची होत्येजी अशुद्ध राहित्यरूप शुद्धता ती.

**शब्दालंकार,** पु० काव्यादि प्रबंध रचनेचा ठायीं अनुप्रास, यमक, इ० अलंकार असतात ते प्र०.

**शब्दित.** ३लिं० शब्दानें युक्त केला जो वाद्यादि तो.

**शंभर,** ३लिं० शतसंख्याक जें तें.

**शंभु.** पु० शंकर.

**शम,** पु० काम, क्रोध, मोह, अग्नि, वायु, रोग, मांत, इ० जे त्यांचा क्षोभ होण्यास कारणभूत जो वेग विशेष उत्पन्न होत असतो तो न्यून झाल्यानें किं० नसल्यानें त्या त्या अर्थाची प्रकृति रूपानें धरून, जी स्थिति तो; २, अनःकरणामध्यें कामक्रोधादि किं० संकल्पविकल्पादिरूप जा अनेक वृत्ति उठत असतात तद्राहित्यें करून स्वस्थपणें जी अंतःकरणाची स्थिति तो.

**शमणें,** शमविशिष्ट होणें.

**शमन,** न० शम; २, शमण्याचा व्यापार, ३, ज्याचा शम जेणेंकरून होतो तें त्याचें; उ० पित्ताचें शमन सुंठसाखर.

**शमी,** स्त्री० एक सकंटक वृक्ष आहे; २, त्याचा दशावर वहायास आणितात जो पाला ती.

**शयन,** न० निजण्याचा जो व्यापार तें; २, तदुपयोगीं जें आंथरूण किं० माचा, पलंग, इ० तें; शय्यादान, करपशय्या, मृतशय्या, इ० स०.

शयनी, स्त्री॰ आषाढ शुद्ध एकादशी.

शय्या, स्त्री॰ शयन, परंतु द्वितीयार्थी मात्र योजून, प्र॰.

शय्यादी; पु॰ स्त्री॰ सत्यादि शब्दाचा अपभ्रंश.

शर, पु॰ सं॰ धनुष्यानें सोडायाचा जो बाण तो; शरजाल, शरसंधान, शरवृष्टि इ॰ सं॰; २, सूर्याभिमुखजो मार्ग त्यापासून चंद्रादि ग्रहांचें जें याम्योत्तर अंतर येतें तो.

शरड, पु॰ सं॰ सरडा.

शरण, न॰ सं॰ संकटापासून कोणेकाचे हातानें कोणेकाचें होतें जें संरक्षण तें; २, तादृश संरक्षण करणारा जो तें; ३, धि॰ वि॰ या संकटापासून माझें तूं संरक्षण कर अशी प्रार्थना करीत कोणेक समर्थाचा आश्रयास गेला जो तो जाणें, येणें, असणें इ॰ योगीं प्र॰; उ॰ ह्म॰ शरण आल्यास मरण देऊं नये.

शरणागत, ३ लिं॰ रक्षण कर्त्या प्रति रक्षण व्हावें ह्मणून गेला जो तो; शरणागतवत्सल इ॰ स॰.

शरणार्थ, पु॰ लिंगाईत लोक लोकांस नमन करते समयीं हा शब्द उच्चारितात; अतएव हा शब्द त्या नमनाची संज्ञा.

शरण्य, ३ लिं॰ शरणागताचें रक्षण करण्या विषयीं स्वभाव ज्याचा ते

शरत्, शरद्, स्त्री॰ षड्‌ऋतूंतील जो चवथा ऋतु ती; २, वर्षात्मक जो काल ती.

शरत्काल, पु॰ शरदृतु संबंधी जो काल तो.

शरदृतु, पु॰ शरत्संज्ञक जो ऋतु तो.

शरपंजर, पु॰ कोणेकाचे शरीरास सभोंवताले अनेक बाण टोंचिले असतां जें पंजराकार आवरण होतें तो; २, कोणेकानें शरपंजरीं पडणें ह्म॰ रिवतपत पडणें किं॰ आंतून बाहेर निघायास कोणताच उपाय सुचत नाहीं अशा एखाद्या संकटांत पडणें.

शरभ, पु॰ एक पक्षी आहे

शरम, स्त्री॰ लाज, प्रा॰ प्रथमार्थी.

शरमणें, लाजणें.

शरमिंदा, शरमिंधा, ३ लिं॰ दुबेल; २, आपले हीं एक मर्माची उघडीक होणें इ॰ कारणानें लज्जित झाला जो तो.

शराव, पु॰ सं॰ परळ ह्मणून जें मृत्पात्र तो.

शरासन, न॰ बाण सोडायाचें जें धनुष्य तें.

शरीर, न॰ देह; २, स्त्री पुरुषांच्या गुह्यावयवास संकेतानें ह्म॰.

शरीरदंड, पु॰ देहदंड.

शरीरभोग, पु॰ शरीरानें भोगूनच सारायाचें असे उपस्थित होतें जें कांहीं दुखणें, किं॰ जखम इ॰ त्यास ह्म॰; २, देवताक्षोभ किं॰ पिशाच इ॰ जाल निमित्त नाहीं केवळ प्रारब्ध योगानेंच मात्र झालें असतें जें कांहीं एक दुखणें त्यास ह्म॰.

शरीरसंपत्ति, स्त्री॰ बलाढ्य, निरोगी, असें जें शरीर तद्रूपच जी संपत्ति ती.

शरीरसंबंध, पु॰ आपली मुलगी दुसऱ्याकडे दिली किं॰ त्याची आपण केली अशा प्रकारें साक्षात् किं॰ परंपरेनें होतो जो परस्परांचा संबंध तो; २, दुसऱ्यास त्रास द्यावयाजोगा जो त्याचा शरीराशीं आपले शरीराचा स्पर्श संबंध त्यास ह्म॰;

कोणेकानें शरीर संबंधावर येणें म्ह॰ मारामारी वर येणें.

**शरीरसंबंधी**, ३लिं॰ ज्याज्याशीं शरीर संबंध आहे ते परस्पर.

**शरीरी**, पु॰ देही.

**शर्करा**, स्त्री॰ साकर; २, रेती.

**शर्त**, स्त्री॰ प्रायः पराकाष्ठा या अर्थी.

**शर्तमर्दी**, स्त्री॰ कोणेक कार्य सिध्यर्थ पराकाष्ठेच्या जो प्रयत्न ती

**शर्थ**, स्त्री॰ शर्त.

**शर्म**, न॰ सं॰ सुख; २, प्रसंग विशेषीं ब्राह्मणाचे नावा पुढें याचा प्र॰; उ॰ सोमशर्मा ब्राह्मण आला होता.

**शर्यत**, स्त्री॰ पैज.

**शलभ**, पु॰ सं॰ टोळ म्हणून जो प्राणी आहे तो.

**शलाका**, स्त्री॰ सं॰ तृणाची किं॰ तत्सदृश बोरू, किंवा; इ॰ कांची पिंजून केलेली किं॰ तदाकार धातु, काष्ठ, इ॰ कांची केलेली काडी ती.

**शलाकापरीक्षा**, स्त्री॰ कोणेकानें म्हटला असतो जो कोणेक ग्रंथ त्या ग्रंथाची पोथी त्यापुढें ठेवून पोथीचा पत्रांत पाहिजे तेथें काडी घालावी ती काडी जेथें शिरेल तेथले पत्राचा अर्थ त्याला लावूं सांगावा अशा प्रकारची जी त्याचे अध्ययनाची परीक्षा घेतात ती.

**शल्य**, न॰ शरीरामध्यें सलाया जोगा राहिलेला जो आंत शिरलेल्या बाण, कंटक, इ॰ कांचा अंशतें; २, सं॰ स्त्रियांचे पोटांत राहतें जें सलतें; ३, सूड न घेतां राहिलेला जो दुसऱ्यानें केलेला अपकार इ॰ रूप जें कांहीं अंतःकरणांत सलत असतें तें.

**शव**, न॰ मढें.

**शववाहक**, पु॰ शवातें श्मशानी नेणारे जे मनुष्य ते प्रत्येकीं.

**शश, शशक**, पु॰ सं॰ ससा.

**शशविषाण**, न॰ सं॰ सशाचें जें शिंग तें, हा अर्थ अप्रसिद्ध आहे म्हणून अप्रसिद्ध पदार्थास दृष्टांत देणें इ॰ विषयीं याचा प्र॰; उ॰ भगवत् गुणाचा अंत शशविषाण प्राप्त आहे.

**शशशृंग**, न॰ शशविषाण.

**शशांक, शशी**, पु॰ चंद्र मुख्यार्थी.

**शष्प**, न॰ सं॰ कोमल जें तृण तें; २, उपस्थस्थित जे केंस ते प्रत्येकीं.

**शस्त्र**, न॰ आयुध, शस्त्रपाणि, शस्त्रधारण, शस्त्रविद्या इ॰ स॰; २, ला॰ जा रोगादिकांचें नाशक जें औषधादि तें त्याचें असें आरोपानें म्ह॰; ३, दुसऱ्याचे पराभवाविषयीं किं॰ आपल्या उत्कर्षाविषयीं साधन भूत जें विद्या, पराक्रम, तप, पोथी, पुस्तक, रवत, पत्र, इ॰ कांहीं त्यास म्ह॰; कोणेकानें कोणेकावर शस्त्र धरणें म्ह॰ त्याचें वाईट करण्याविषयीं कंबर बांधणें.

**शस्त्रवैद्य**, पु॰ शस्त्रानें शरीर कापून आंतील रोग काढून आरोग्य करणारा असा जो वैद्य तो.

**शह**, पु॰ बुदबळांचे खेळांत ज्या पगापासून आपल्या गतीनें राजावर दृष्टी पडावी त्या पगीं दुसऱ्याचें मोहरें किं॰ प्यादें आलें असतां त्याच्या जो राजास वेध येतो तो; २, ला॰ जिंकावें, मारावें, धरावें, इ॰ उद्देशानें राजा, राज्य, ग्राम, किल्ला, इ॰ कांतें लक्षून शत्रु इ॰ कानें तिकडे रोख धरून स्थिति केली

असतां जो त्याचा त्या राजादिकांवर वेध येतो तो; ३, रा॰ कोणेक अर्थ आपल्या कडे यावा इ॰ कारणास्तव याचनादि द्वारा तद्विषयीं संधान करून ठेवलें असतां त्या अर्थानें आपल्या अनुमतावांचून दुसऱ्या कडे जाऊं नये असें व्हावया जोगा त्या अर्थावर आपला होतो जो संबंध तो; कोणेकानें शहास गुंतणें इ॰ स्थलीं कोणेक गोष्टी विषयीं आपलें वचन गेलें, लेख गुंतला, किं॰ कांहीं एक करायास हातीं धरिलें असें कांहीं एक झाल्यामुळें त्या गोष्टीचा निर्वाह न होतां आपली सुटका नाहीं अशा संकटावस्थेंत पडणें.

**शाहन**, अ॰ जवाहिरी दागिन्याचे पोटचे अवयव लिहायाचे प्रसंगीं त्या दागिन्याचे नावा पुढें हें अव्यय लिहित असतात.

**शाहनिशाह**, पु॰ कों॰ शानिशा.

**शाहर**, न॰ नगर.

**शाहरपन्हा**, पु॰ चौकी पहारा इ॰ कें करून सर्कारानें करायाचा जो शहरचा बंदोबस्त त्या कामाचें जें प्रकरण तो.

**शाहरबट्टाऊ**, पु॰ शहरांत राहणारा अतएव प्रशाशागमनी जो त्यास म्ह॰

**शाहरा**, पु॰ शहारा

**शाहरी**, ३ लिं॰ शहर संबंधी जो मनुष्य, भाषा, वेष, रीति, इ॰ तो.

**शाहागडी**, ३ लिं॰ शाहागड म्हणून पेंठ आहे तत्संबंधी जें पागोटें शेला इ॰ वस्त्र तो.

**शाहाजादा**, पु॰ पादशाहाचा जो पुत्र तो

**शाहाजानी**, ३ लिं॰ शाहाजान म्हणून पादशाह होता तत्संबंधी जो रुपया इ॰ नाणें, अम्मल इ॰ तो.

**शाहाजिरें**, न॰ जिऱ्यांत एक भेद आहे.

**शाहाजोग**, ३ लिं॰ पतीचा जो मनुष्य तो; २, हुंडीमध्यें ज्याची राखले असले त्या वांचून दुसरा जरी कोणी रुपये घ्यावयास मेला तथापि तो पतीचा आहे तर त्यास त्या हुंडीचे रुपये द्यावे अशा संकेतानें एतत् शब्द विशिष्ट जी हुंडी लिहितात तीस म्ह॰; ३, विनदिकत पावयाचें, द्यावयाचें, जे रुपये इ॰ त्यांस कोणी म्ह॰; उ॰ तुमचें शाहाजोग रुपये देणें, त्याचा कोणी तंटा सांगेल.

**शाहाणपण**, न॰ चातुर्य.

**शाहाणा**, ३ लिं॰ चतुर.

**शाहाण्णव**, ३ लिं॰ संख्या आहे ९६.

**शाहादानी**, ३ लिं॰ शाहाजानी.

**शाहानिशा**, पु॰ शानिशा.

**शाहापुरी**, ३ लिं॰ शाहापुर म्हणून ग्राम आहे तत्संबंधी धोतरजोडा इ॰ वस्त्र तो.

**शाहामत**, स्त्री॰ कोणेक मोठें काम ज्यातानें पार पडे असा कोणेकाचे अंगीं असतो जो प्रभाव तो.

**शाहामृग**, पु॰ एक पक्षी आहे.

**शाहारा**, पु॰ हिमज्वर, हेमंतींचा वायु, धैर्य भंगादि व्हावया जोगें साहस कर्मादिकाचें दर्शन इ॰ संबंधानें अंगीं थंडीची विकृति भरूं लागली असतां अंगावर रोमांच उठावें अंग थरारावें अशा ज्या विकृतीच्या लहरी येतात त्या म्ह॰

**शाहारें**, न॰ रा॰ शाहारा.

**शाहाळें**, न॰ कोंवळा जो नारळ तें.

**शाई**, स्त्री॰ अक्षरादि लिहाया करितां लाख काजळ

हिरडे इ० कांचा जो काळा, तांबडा, इ० किं० सुवर्णादिकांचे वरखे पाण्यांत घोंटून त्यांचा करितात जो रंग तो; २, मृदंगाचे एका तोंडावर बसवितात जें लोखंडाचे किटाचें चूर्ण इ० तो; ३, राज्य, गांव, सेनास्थान, इ० कांमध्यें राहणारे जे अनेक लोक, फौज, इ० विवक्षित ते सर्व मिळून जो समुदाय तो; उ० सगळ्या शाईंत या सारखा शूर दुसरा कोणी नाहीं; ग्राम, शहर, एतद्वाचक शब्दांपुढें तत्तत्संबंधी या अर्थी या शब्दाचा प्र० होतो; उ० पुणेशाई, मुंबईशाई, इ०; कांहीं एका व्यवहाराचे प्रवर्त्तक अतएव लोकांत प्रसिद्ध जे राजा प्रधान इ० नामांकित किती एक मनुष्य त्यांचे नामापुढें ही तत्तत्संबंधी संप्रदायादि वाच्य असतां प्र० होतो; उ० शिंदेशाई, अपाशाई, इ०; जाति गुणादि वाचक किती एक शब्दांपुढें ही याचा प्र० होतो, ब्राह्मणशाई, सोदेशाई, इ०.

**शाईशिरस्ता,** पु० साधारण जीजनरीति तो.

**शाक,** स्त्री० भाजी; संस्कृतांत हा शब्द पुंलिंगी आणि नपुंसकीं आहे.

**शाकबेशाक,** न० नवें सिद्ध केलें जें लेख किं० कांहीं मजकूर किं० गृहादि पदार्थ इ० त्यामध्यें विवक्षित बेतापेक्षां असतो जो कांहीं न्यूनाधिकपणा तें; २, ३ लिं० दे० तो न्यूनाधिकपणा आहे ज्यामध्यें असा जो लेखादि त्याचें विशेषण ही पक्षीं होतें.

**शाकंभरी,** स्त्री० एक देवी आहे; २, तीचा प्रीत्यर्थ पौषी पूर्णिमेचे दिवशीं अनेकविध शाका मेळवून त्यांचा नैवेद्य करावा, पूजन करावें, इ० रूप व्रत करितात तो.

**शाकभाजी,** स्त्री० भाजी पाला इ०.

**शाकव्रत,** न० चातुर्मास्यांत भाजी, दहीं, दूध, आणि द्विदल हे चार पदार्थ अनुक्रमें करून प्रतिमासीं वर्ज करावे खाऊ नयेत असें जें करितात व्रत तें.

**शाकार,** पु० घर इ० कांचे वाशांवर ओंबण घालून कवलें तृण, झांप, इ० कांनीं करितात जें पर्जन्यादि निवारणार्थ आच्छादन तो; २, कों० घराचे ओंबणावर आच्छादनार्थ घालावा करिता उद्दिष्ट जें तृण झांप इ० तो; या शब्दानें कवलें नळ्या जवर व्यवहार होत नाहीं.

**शाकारणी,** स्त्री० शाकारण्याचा जो व्यापार तो.

**शाकारणें,** गृहादिक शाकारानें आच्छादित करणें पक्षीं तो नळा कवलें इ० कांसही कर्मता येते.

**शाकाव्रत,** न० शाकव्रत शब्दाचा अपभ्रंश.

**शाकाहार,** पु० केवल शाकांचाच जो आहार तो.

**शाकिनी,** स्त्री० पिशाच्च गणांतील स्त्रीरूप एक पिशाच्च जाति आहे.

**शाक्त,** पु० देवीचा उपासक जो तो; २, ३ लिं० देवी संबंधी जो पूजाविधि इ० तो.

**शाख,** स्त्री० शाक शब्दाचा अपभ्रंश.

**शाखभाजी,** स्त्री० शाकभाजी.

**शाखा,** स्त्री० वृक्षाची जी खांदी तो; २, ला० ग्रंथादि कोणेक अर्थाला वृक्षरूप लें करून मानून त्याचे जे प्रकरणादिरूप अनेक अवयव त्यास प्र० सं०.

**शाखाचंक्रमण,** न० या शाखेवरून त्या शाखेव

र त्या शाखेवरून त्या शाखेवर असा कोणी वानरादि फिरतो तद्वत् भाषणादि व्यवहारीं जा विषयावर जी युक्ति पाहिजे ती सोडून ही युक्ति लागू होते किं नाहीं, ती युक्ति लागू होते किं नाहीं, असें पहाया करितां अनेक विषय धुंडीत फिरण्याचा व्यापार तें.

**शाखाचंद्रन्याय**, पु॰ वस्तुतः शाखेचा चंद्राचा किमपि संबंध नसतां चंद्र पहावयाची खूण समजावा सांठीं त्या शाखेवर चंद्र आहे असें कोणी कोणास सांगतो म्हणून एतत्सजातीय कोणेक विषयाच्या ठायीं दृष्टांत त्वें करून प्रमाणार्थ घेतात जो ह्या लोक व्यवहार तो; उ॰ समुद्रांत सूर्य बुडतो ही शाखा चंद्रन्यायें करून उक्ति आहे.

**शागिर्त**, पु॰ शागिर्द.

**शागिर्तपेशा**, पु॰ शागिर्दपेशा.

**शागिर्ती**, स्त्री॰ शागिर्दी.

**शागिर्द**, पु॰ जो ज्याचा विद्यार्थीपणा करितो तो त्याचा प्रा॰ गवई लोकांत किं॰ तालिमखान्यांत याची प्रसिद्धि आहे; २, कोणएका पाशीं देवपूजेस मांडावें, धोवें म्हणून यावीं, इ॰ कामावर जो ब्राह्मण वेतन देऊन ठेविला असतो तो.

**शागिर्दपेशा**, पु॰ शिपाई वर्जे करून जीं चाकरीचीं माणसें तो.

**शागिर्दी**, स्त्री॰ शाग्रितानें जें कर्म ती.

**शाग्रिती**, स्त्री॰ शागिर्दी.

**शाग्रीत**, ३लिं॰ शागिर्द प्रा॰ द्वितीयार्थी प्र॰.

**शाग्रीतपेशा**, पु॰ शागिर्दपेशा.

**शाट**, पु॰ छाट, प्रा॰ प्रथमार्थी.



**शाटणें**, छाटणें प्रा॰ प्रथमार्थी.

**शाटाशाट**, स्त्री॰ छाटाछाट.

**शाटी**, स्त्री॰ सं॰ नेसावयाचें किं॰ पांघरायाचें जें वस्त्र ती, परंतु संन्याशाचें भगवें वस्त्र असतें तद्विषयीं लोकांत प्र॰.

**शाठ्य**, न॰ सं॰ शठपणा.

**शाडू**, स्त्री॰ खडू प्रथमार्थी.

**शाण**, पु॰ सं॰ सहाण.

**शाणव**, ३लिं॰ शहाण्णव.

**शाण्णो**, ३लिं॰ शहाण्णव.

**शांत**, ३लिं॰ दुसऱ्यास सहन होण्यास कठीण पडतात असे जे उग्रता, क्रूरता, जलदपणा, इ॰ गुण ते ज्यामध्यें विशेष नाहींत असा जो सत्वगुणप्रधान मनुष्य, प्रकृति, औषध, अग्नि, वायु, नदी, इ॰ तो; २, मरणें, विझणें, इ॰ कारणानें, धरलेलें उद्भूतरूप सोडून स्वप्रकृतिरूपीं लीन झाला जो मनुष्य, दिवा, इ॰ तो; ३, अंतःकरणास उद्वेगादिकें करून क्षोभ होण्यास कारणभूत जे द्वेष, क्रोधादिक, तद्रहित जें स्थलादि तो; ४, स्त्री॰ शांतिशब्दाचा अपभ्रंश प्रा॰ द्वितीयार्थी प्र॰.

**शांतवन**, न॰ सांत्वन शब्दाचा अपभ्रंश.

**शांति**, स्त्री॰ शम, क्रोध, शांति, रोग शांति, इ॰ स॰; २, रोग, अद्भुत सूचित अरिष्ट, इ॰ जें कांहीं उपद्रवकारक तन्निरसनार्थ होम जपादि प्रधान जें कर्म करितात ती; ज्वरशांति, अरिष्टशांति, इ॰ स॰; ३, मरणें, आणें, इ॰ कारणानें उद्भूत रूपता सोडून पूर्वप्रकृत्यवस्थेच्या ठायीं जी स्थिति ती; उ॰ जो गृहस्थ दुखण्यास पडला होता त्या गृहस्थाची काल शांति

ति झाली.

**शांतिक**, न॰ आपल्यास अनिष्ट जें प्राप्त झालें कांहीं रोग दारिद्र्यादि तन्निरसनार्थ शास्त्रोक्त शांत्यादि कर्म तें.

**शांतिकपुष्टिक**, न॰ शांतिक पौष्टिकाचा अपभ्रंश. परंतु यज्ञयागादि मोठ्या कर्मांहून इतर जीं लहान सान कर्मे तद्विषयीं प्र॰.

**शांतिकपौष्टिक**, न॰ अद्भुत शांति षोडश संस्कार इ॰ रूप इष्ट प्राप्त्यर्थ किं॰ अनिष्ट निरसनार्थ जीं कर्मे तें.

**शांतिब्रह्म**, न॰ बाहेर शांत दिसून आंत जाचें कपट बहुत असतें असा जो त्यास म्ह॰.

**शांतिरस**, पु॰ नवरसांतील एक रस आहे.

**शान**, स्त्री॰ छान द्वितीय तृतीयार्थी.

**शानदार**, ३लिं॰ छानदार.

**शानदारी**, स्त्री॰ छानदारी.

**शानशुकी, शानशोकी**, स्त्री॰ छानछुकी.

**शानशूक, शानशोक**, ३लिं॰ छानछूक.

**शानिशा**, पु॰स्त्री॰ होतें किं॰ नाहीं होत, मिळतें किं॰ नाहीं मिळत, इ॰ रूप संदेह विषय जो कोणेक अर्थ तद्विषयीं होतेंच किं॰ नाहींच होत इ॰ एकरूपतेचा जो निश्चय जेणें करून संदेह विषयता ईषन्मात्र ही राहात नाहीं तो ती.

**शानें**, अ॰ ऊन ही आनुपूर्वी जाचे अंतीं असते अशीं जीं अव्ययें त्याचे पुढें वाक्यालंकारार्थ याचा प्रयोग कोणी करितात; उ॰ तिथून शाने कशाला दारवर्धितोस हिकडे कां घेऊन शाने येईनास.

**शाप**, पु॰ कोणेकातें उद्देशून त्याचें कांहीं एक अकल्याण ह्यावें असें मनांत आणून तुझें निसंतान हो ओ तुला दारिद्र्य ये ओ तुला दुष्ट योनि प्राप्त हो ओ इ॰ रूप जो वाक्य प्रयोग करितात तो; शापग्रस्त, शापमोक्ष, इ॰ स॰.

**शापगुण**, पु॰ जाति कुल इ॰ समुदाय गत जा अनेक व्यक्ति त्या सर्वांवर जो कांहीं एक दोष स्वभासिद्ध असतो त्यास पुरातन ऋष्यादिकांचें हें फल अशी संभावना करून म्ह॰; उ॰ बापजानी उलटें टाकून घ्यावें असा आपला त्यांस शापगुण आहे.

**शापणें**, कोण एकातें शापानें अभिसंबद्ध करणें.

**शापदग्ध**, ३लिं॰ कोणेकाच्या शापानें जो कांहीं एक दुर्दशा पावला आहे तो.

**शाबर**, न॰ दृष्टिबंधादि गुण जांत आहेत अशी जी मंत्र विद्या तें.

**शाबरी**, ३लिं॰ शाबर संबंधी जो मंत्र, विद्या, इ॰ तो.

**शाबान**, पु॰ यवनी महिन्यांतील सातवा जो महिना तो.

**शाबास**, अ॰ कोणेकाचें चांगलें कर्म पाहून आनंद झाला असतां तत्प्रशंसार्थ हा उद्गार निघतो. २. स्त्री॰ धन्य स्त्रीलिंगार्थी.

**शाबासकी**, स्त्री॰ शाबास या शब्दप्रयोगापासून कोणेकास मिळतो जो सत्कार तो.

**शाबुडी**, स्त्री॰ कों॰ साबणी म्हणून जी मिठाई ती.

**शाबूत, शाबूद**, ३लिं॰ तुटणें, फुटणें, मोडणें, मरणें, कुजणें, इ॰ कांहीं करून नाशादि संभावना असतां तें नाशादि न होतां जसाचें तसा राहिलेला जो तो; चोरीचहाडी इ॰ कोणेक दोष किं॰ त्याचा मुद्दा

मुद्रा इ॰ कोणेकावर शाबूत करणें स॰ साक्ष्यादि प्रमाणानें खरा करणें.

**शाब्द**, ३लिं॰ शब्द संबंधी जी प्रक्रिया शास्त्र इ॰ कांहीं एक तो.

**शाब्दबोध**, पु॰ शब्द समुदायापासून लिंग, वचन, काल, इ॰ जे भेदक विशेष तत्पुरस्कारें करून तसेंच प्रकृत्यर्थ प्रत्ययार्थ इ॰ अर्थांचा परस्पर संबंध यत्प्रकारक असतो तत्प्रकार पुरस्कारें करून जी विशिष्ट अर्थाची उपस्थिति होत्ये तो.

**शाब्दिक**, पु॰ सं॰ वैयाकरण.

**शांभवी**, स्त्री॰ संकेतानें भांगेस स॰.

**शाम**, ३लिं॰ श्याम शब्दाचा अपभ्रंश.

**शामकर्ण**, पु॰ श्यामकर्णाचा अपभ्रंश.

**शामकल्याण**, पु॰ श्याम कल्याणाचा अपभ्रंश.

**शामशबल**, पु॰ श्यामशबल शब्दाचा अपभ्रंश.

**शामाठ्या**, ३लिं॰ माठ्यासच स॰.

**शायदी**, स्त्री॰ साक्षी प्रथमार्थी; २, पु॰ साक्षी द्वितीयार्थी.

**शायदीदार**, पु॰ साक्षीदार.

**शायशी, शायशीं**. ३लिं॰ एक संख्या आहे ८६.

**शायी**, ३लिं॰ जो जेथें निजणारा किं॰ ज्या प्रकारें निजणारा तो तच्छायी; जलाच्या ठायीं निजणारा तो जलशायी, शेषशायी, भूशायी, इ॰ सुखें करून निजतो तो सुखशायी, उत्तानशायी, इ॰.

**शारंग**, न॰ शार्ङ्ग शब्दाचा प्रथमार्थी अपभ्रंश.

**शारदा**, स्त्री॰ वागिंद्रियाची अधिष्ठात्री सरस्वती म्हणून देवता आहे ती.

**शारदीयनवरात्र**, न॰ सं॰ आश्वीन शुक्ल प्रतिपदेपासून नवमी पर्यंत जें नवरात्र तें.

**शारीर**, ३लिं॰ शरीर संबंधी जें बल, तप, कष्ट, इ॰ तो, २, न॰ शारीरक; ३, गाताना कंप घ्यावया जोगें कोणेकाचे गळ्यांत असतें जें कौशल्य तें.

**शारीरक**, न॰ शरीरामध्यें धातु किती, नाडी किती, कशा आहेत, रोग किती, दोष किती, शरीराची रचना कशी, इ॰ रूप शरीरसंबंधी जाणायाचा जो विषय ज्याचें निरूपण वैद्य शास्त्रादिकांत केलें असतें तें.

**शार्ङ्ग**, न॰ विष्णूचे धनुष्याचें नाव; २, शृंगाचें जें धनुष्य तें; शार्ङ्गधर, शार्ङ्गपाणि, इ॰ स॰.

**शार्दूल**, पु॰ व्याघ; २, एक वृक्ष आहे.

**शार्दूलविक्रीडित**, न॰ श्लोकाचें एक वृत्त आहे ज्याचे चरणाचीं अक्षरें एकोणीस असतात तें.

**शाल**, स्त्री॰ एक प्रतिष्ठित उर्णावस्त्र आहे; २, पु॰ सं॰ एक वृक्ष आहे.

**शालक**, पु॰ श्यालक शब्दाचा अपभ्रंश.

**शालग्राम**, पु॰ शालिग्राम.

**शालजोडी**, स्त्री॰ शालांचे दोन फर्द मिळून जी जोडी ती.

**शालनामा**, पु॰ ज्याचे सर्वांगावर बूट असतात अशी जी शाल ती.

**शाला**, स्त्री॰ अग्निहोत्र, विद्यार्थ्यांचें अध्ययन, सयंपाक, नृत्य, वस्त्रादिकांचें निर्माण, इ॰ व्यवहारार्थ किं॰ गाई, घोडीं इ॰ जीव, किं॰ शस्त्रें, रत्नें, इ॰ पदार्थ आंत रहाया करितां जें गृह केलें असतें ती; होमशाला, पाकशाला, गोशाला, रत्नशाला, इ॰ स॰; २, विद्याकलादि शिकविण्याचा जो कोणे

क स्थळीं आखाडा असतो तो; ३, अनेक मनुष्यादिकांस एक सारखी वरी, वाईट, रीति लागण्याविषयीं कारण भूत जी संभावना विषय त्या अनेकांस एक सारखी शिक्षा तो जेथून होते त्या अधिकरणास म्ह०; उ० त्याचे घरीं कोणाही मनुष्य राहिला असतां त्याला चांगली रीति लागते याचें कारण त्यांची शाळाच चांगली

**शालागुरु**, ३ लिं० चांगले संप्रदायाचे शाळेतला अतएव चांगला जो विद्यार्थी गवई इ० किं० त्याचें तें अध्ययन, गान, इ० तो.

**शालि**, पु० सं० व्रीहि म्हणून जें धान्य तो; शालिक्षेत्र इ० स०

**शालिग्राम**, पु० गंडकींतील एके जातीच्या काळा पाषाण आहे ज्याची विष्णु प्रतिमा त्वें करून पूजा करितात तो

**शालिवाहन**, पु० एक पूर्वी शक कर्ता राजा झाला ज्याचा शक अद्यापि चालत आहे

**शालू**, पु० बायकांस नेसायाचे उपयोगी एक उंच बारीक वस्त्र आहे.

**शाल्मली**, स्त्री० सं० एक वृक्ष आहे.

**शाल्योदन**, पु० साळीचे तांदळाच्या शिजवून करितात जो भात तो.

**शावक**, पु० सं० बालक; २, ३ लिं० शवसंबंधी जें तो.

**शाश्वत**, ३ लिं० नश्वर नव्हे जो पदार्थ तो; २, स्त्री० शाश्वती; उ० याचा बोलण्याची शाश्वत नाहीं, यादेहाची शाश्वत नाहीं म्हणून पहिल्यापासूनच ईश्वर भजनीं लागावें.

**शाश्वती**, स्त्री० शाश्वतपणा.

**शासणें**, स० शासनानें कोणेकास युक्त करणें.

**शासन**, न० पारिपत्य; २, सेवकादिकांस धनी इ० कानी कांहीं एक गोष्ट करण्याविषयीं केली जी आज्ञा तें; ३, राजादिकानें आपलेकडे धनीपणा घेऊन प्रजादिकांस अनुकूळ मार्गांत वर्तवावें असा जो व्यापार तें.

**शासनीय**, ३ लिं० शासन करायास योग्य जो अपराधी, सेवक, प्रजा, इ० तो.

**शास्ता**, पु० शासन करणारा जो राजा गुरु इ० तो.

**शास्त्र**, न० कोणेक विद्या विषयानें अधिकृत करून प्रवृत्त झालेलीं जीं ईश्वराचीं किं० इतर कोणेक ज्ञात्यांचीं विधायक वचनें तद्रूप जे विषय भेदें करून भिन्न भिन्न शब्द प्रपंच ते म०, न्यायशास्त्र, वेदांतशास्त्र, धर्मशास्त्र, इ० स०; शास्त्रमार्ग, शास्त्रवासना, शास्त्रज्ञ, इ०, कोणेक अर्थ शास्त्रास असणें नसणें इ० स्थळीं शास्त्रविधिमात्र यथाकथंचित निर्वाहित होई इतका किं० अशा प्रकारें, म्हणजे ईषन्मात्र, किं० जे गुण असावे ते नसतां केवळ नाम धारीरूपानें असणें नसणें इ०; उ० आज घरांत शास्त्रास साखर नाहीं मग शेरभर देऊं कुठली; हा आपला उगीच शास्त्रास चाकू आहे याणें बोट देखील कापणार नाहीं; ह्याच प्रकारे घेऊन शास्त्रापुरता शास्त्राचा इ० प्र० करितात.

**शास्त्रव्युत्पत्ति**, स्त्री० न्यायशास्त्रादि शास्त्रग्रंथ लावण्याचे उपयोगी शास्त्राध्ययनें करूनच झालेली जी व्युत्पत्ति तो; उ० पुराण सांगण्यास केवळ शास्त्रव्युत्पत्ति नको काव्यव्युत्पत्ति असली म्हणजे

शालें

**शास्त्रार्थ**, पु॰ प्रवृत्ति निवृत्ति विषयीं नियामक जें धर्मशास्त्रादि शास्त्र तत्प्रतिपादित जो कोणेक कर्माविषयीं विधिरूप किं॰ निषेधरूप अर्थ तो; कोणेक गोष्टीचा शास्त्रार्थ करणें म्ह॰ ती गोष्ट यथाकथंचित केली ऐसी करणें; शास्त्रार्थास म्ह॰ शास्त्रास.

**शास्त्री**, पु॰ शास्त्राध्ययन केलें जाणें तो; २, जें शास्त्राचें अध्ययन जाणें केलें तो तच्छास्त्री; न्यायशास्त्री, धर्मशास्त्री, इ॰ स॰; शास्त्रज्ञ ब्राह्मणाचे नावापुढें हा प्रतिष्ठार्थ शब्द लागतो; रामशास्त्री, कृष्णशास्त्री इ॰.

**शास्त्रीय**, ३ लिं॰ शास्त्रसंबंधी जो विषय परिभाषा, व्यवहार, ज्ञान, इ॰ तो.

**शास्य**, ३ लिं॰ सं॰ शासनीय जो तो

**शाहत्तर**, ३ लिं॰ संख्या आहे ७६.

**शाहिर्दी**, स्त्री॰ पु॰ शायर्दी.

**शाहिरी**, ३ लिं॰ शाहीर जो तत्संबंधी जो वेष लावणी इ॰ तो.

**शाहीद**, पु॰ साक्षीदार.

**शाहीर**, पु॰ पोंवाड्याचा तमाशा करून उपजीविका करणारा जो लावण्याचा कवी तो; २, दुसऱ्याच्या लावण्या म्हणून तमाशावर उपजीविका करणारा जो त्यासही म्ह॰.

**शाळ**, स्त्री॰ शाला शब्दाचा अपभ्रंश, यज्ञशाळ, पाकशाळ, इ॰ प्रा॰ स॰ प्र॰.

**शाळक**, पु॰ रा॰ श्यालक.

**शाळंका**, स्त्री॰ शाळुंखा.

शाळंकृत.

**शाळंकृत**, ३ लिं॰ सालंकृताचा अपभ्रंश.

**शाळंखा**, स्त्री॰ शाळुंखा.

**शाळग्राम**, पु॰ शालिग्राम.

**शाळसूद**, ३ लिं॰ रा॰ साळसूद.

**शाळा**, स्त्री॰ शाला.

**शाळाशुद्ध**, ३ लिं॰ शालाशुद्ध.

**शाळुंका, शाळुंखा**, स्त्री॰ महादेवाचें लिंग बसवायासाठीं पाषाणादिकांची योन्याकार जी बैठक करितात ती.

**शाळू**, पु॰ जो धान्यांत एक जाति आहे; २, हेमंत ऋतूंतील लवकर आणारे जे दिवस त्यांस म्ह॰.

**शाळूसोबत**, स्त्री॰ शाळूसोबत्याची जी सोबत ती.

**शाळूसोबती**, पु॰ शेवटपर्यंत सोबत देणारा नव्हे मध्येंच सोडून जाणारा असा जो सोबती त्यास म्ह॰.

**शाळें**, न॰ शहाळें.

**शाळोंका, शाळोंखा**, स्त्री॰ शाळुंखा.

**शाळोत्री**, पु॰ अश्वाची परीक्षा आणि चिकित्सा ज्यांत सांगीतली आहे असें जें शालिहोत्र शास्त्र तें ज्यास येतें म्हणून त्याजवर उपजीविका करणारा तो.

**शिऊळ**, स्त्री॰ बैल इ॰ कांची मान अडकायासाठीं जो कडाचे कडेस भोंकें पाडून ज्या त्यांत घातलेल्या खुंट्या केल्या असतात त्या प्र॰; २, मुखछिद्राचें आकुंचन करून पाव्यासारिखा जो मुखानें शब्द करितात तो.

**शिंक**, स्त्री॰ शैत्यादिकामुळें नाकांतून सशब्द वायूचें निःसरण व्हावयाजोगी जी वायूची चेष्टा ती

त्ये ती.

**शिककाई**, स्त्री॰ शिकेकाई.

**शिकजी**, स्त्री॰ गुलाबाचें फूल इ॰ कांचा वास लावून जो साखरेच्या पाक करितात ती.

**शिकणाऊ**, ३ लिं॰ त्या त्या विद्या कला यांचें ने पुण्य यावें ह्मणून त्या त्या कामावर लागलेला जो तो; उ॰ लिहिणें पुष्कळ पडलें कोणी शिकणाऊ कारकून असले तर लिहायास आणून बसवा ह्मणजे दोघांचीं हीं कामें होतील, २, गुरुपासून शिकून साध्य केलेलें जें गाणें बोलणें इ॰ तो.

**शिंकणी**, स्त्री॰ एक औषधी आहे, जी हुंगली असतां शिंका येतात ती.

**शिंकणें**, कोण एकानें शिंकेनें युक्त होणें.

**शिकणें**, विद्या कलादि आपणास यावें ह्मणून तद्विषयक जी शिक्षा तद्विशिष्ट होणें आणि तद्द्वारा तो विषय तद्विषयक आंगीं भाविण्य यावया जोगा बुद्धीत घेणें.

**शिकंदर**, पु॰ पक्का हरामी सोदा असा जो मनुष्य त्यास ह्म॰.

**शिकरण**, स्त्री॰ शिखरण.

**शिंकरणें**, वायुवेगानें शब्द पुरःसर नासिकेंतील श्लेष्मा बाहेर पाडणें किं॰ तादृश व्यापारानें नासिका श्लेष्म्यानें वियुक्त होई अशी करणें.

**शिकरी**, स्त्री॰ कों॰ रहाटाचे माळेस लोटा बांधायाचे उपयोगी जो दोरीचा तुकडा असतो ती.

**शिकल**, स्त्री॰ जंगलेलीं जीं तरवार इ॰ शस्त्रें त्यांचा जंग जाऊन जिल्हे यावी ह्मणून त्यांजवर करितात जो घर्षण संस्कार ती.



**शिकलकर, शिकलगार**, पु॰ शिकल करण्याचें कसब करितो तो.

**शिकवणी**, स्त्री॰ कोण एकास कांहीं एक गोष्टी विषयीं बुद्धिवाद सांगण्याचा जो व्यापार ती; प्रथमांत प्रयोग प्रा॰ नाहीं.

**शिकस्त**, ३ लिं॰ वि॰ पराभव पावला जो तो

**शिका**, पु॰ शिक्का

**शिकाऊ**, ३ लिं॰ शिकणाऊ.

**शिकार**, स्त्री॰ पारध.

**शिकारखाना**, पु॰ अरण्य संबंधि धरून आणलेले अनेक पशु पक्ष्यादि ठेवायाची जागा असते ती; किं तोफारखाना.

**शिकारबंद**, पु॰ घोड्याचे खोगरास वर पायबंद दप्तर इ॰ बांधावया करितां जे जे मागें पुढें बारीक दोरीचे बंद लावले असतात ते प्र॰

**शिकारी**, ३ लिं॰ शिकारीचे उपयोगी जो कुतरा बंदूक इ॰ तो; २, स्त्री॰ लांकडाची बैठक जास असत्ये असें जें शिंकें ती.

**शिकाळी, शिंकाळी**, स्त्री॰ जी दोरी धरून उचलें असतां पात्र समान उचललें जावें अशी जी त्यापात्राचे गळ्यास दोरी बांधली असत्ये ती; २, तद्विशिष्ट जें तें पात्र ती.

**शिकी**, स्त्री॰ गळबताचें शीड गुंडाळून काठास बांधायाचे उपयोगी शिडास संबंध केलेले जे दोरीचे तुकडे असतात ते प्र॰.

**शिकील**, स्त्री॰ शिकल.

**शिकीलकर, शिकीलगार**, पु॰ शिकलगार.

**शिकें, शिंकें**, न॰ पाटीं भांडीं इ॰ पदार्थ घालून टांगायाचे

याचे उपयोगी दोरीचा विणून पाश विशेष करितात तें.

**शिकेकटार**, स्त्री॰ शिका दौत इ॰ सरंजाम विशिष्ट जी राजादिकांची कटार ती; २, प्रेत दाहार्थ तिकट्यावर अग्नि विशिष्ट पात्र ठेवून नेत असतात त्यास संकेतानें ह्म॰

**शिकेकाई**, स्त्री॰ एक वल्ली आहे व तिचा जा शेंगा ती.

**शिकेदौत**, स्त्री॰ शिका करायाची शाई ठेवायाकरितां जी दौत केली असते ती.

**शिकेबरदार**, पु॰ शिकेकटार बाळगाया करितां नियुक्त जो अधिकारी असतो तो.

**शिक्कल**, स्त्री॰ शिकल.

**शिक्का**, पु॰ मोहोर पुतळी इ॰ नाणें किं॰ सनद इ॰ पत्र इ॰ कांवर प्रभूच्या नावाचें चिन्ह असावें ह्मणून त्यांजवर माराया करितां प्रभूचे नामाक्षराचा जो ठसा केला असतो तो किं॰ त्याणें नाणें पत्र इ॰ कांवर उमटतें जें चिन्ह तो; २, चिन्हार्थ काहीं एकावर मारितात जो कोणेक ठसा त्यास ह्म॰; ३, कों॰ देवी यावया करितां शरीरावर जो व्रण करून घेतात त्यास ह्म॰; ४, शरीर, फळ, वस्त्र, इ॰ कांहीं पदार्थावर कांहीं एक संबंध बोधक जें चिन्ह असतें त्यास ह्म॰

**शिक्केकटार**, स्त्री॰ शिकेकटार.

**शिखणाऊ**, ३ लिं॰ शिकणाऊ.

**शिखणें**, शिकणें.

**शिखर**, न॰ वृक्ष, पर्वत, घर, इ॰ कांचा जो शिरोभाग तें; २, देवाळयादिकावर शृंगाकार उंच जी रचना केली असते तें; कोणेक गोष्ट शिखरास जाणें इ॰ स्थलीं त्या त्या गोष्टीच्या कळस होणें.

**शिखरण**, स्त्री॰ पिकलेलीं केळीं, खरबुजें, इ॰ पदार्थ कुसकुरून आंत दूध, दहीं, इ॰ घालून भुरकून खाया जोगा पातळ पदार्थ करितात ती.

**शिखरिणी**, स्त्री॰ एक श्लोकाचें वृत्त आहे जाचे चरणाचीं अक्षरें सत्रा असतात.

**शिखवणी**, स्त्री॰ शिकवणी.

**शिखा**, स्त्री॰ मस्तकावर भोंवताल चे केस काढून मध्येंच जो केश समुदाय राखितात ती; २, मोर, कोंबडा, चंडोल, अश्व, इ॰ कांचे मस्तकावर मध्यें जो केशादिरूप अवयव वाढला असतो ती; ३, तलहश अरबादिकाचे मस्तकावर जें कलगी इ॰ लाविलें असतें ती; ४, अग्नीची जी ज्वाला ती.

**शिखानष्ट**, पु॰ संकेतानें यवनास ह्मणतात.

**शिखामणि**, पु॰ मुकुटमणि.

**शिखासूत्र**, न॰ द्विजाति चिन्हरूप जें शिखा आणि जानवें तें; कोणेकानें शिखासूत्रावर येणें ह्म॰ क्रोधावेशानें वेतागून शिखासूत्र टाकायाचे लागास येणें.

**शिंग**, न॰ कितीएक जातीचे पशूंचे मस्तकास जें अस्थिरूप अवयव फुटतात ते म॰; २, तत्प्रकार वांकडें पितळ इ॰ कांचें जें मुखवाद्य करितात तें.

**शिंगट**, न॰ नळ्याची दारू भरून उडवाया करितां जें पशूनें टाकळ शिंग घेतात तें; २, निंदाद्यर्थ सरीं शिंगासच ह्म॰.

**शिंगडा**, पु॰ बंदुकेची दारू ठेवाया करितां कंबरेस

स बांधायाचें उपयोगी शृंगाचें किं॰ तदाकार पितळ, इ॰ धातु, किं॰ चर्म, इ॰ कांचें पात्र करितात तो.

**शिंगडी**, स्त्री॰ कों॰ पावटा, तूर, इ॰ कांचे वाळलेल्या शेंगांचा जो समुदाय ती.

**शिंगडी**, स्त्री॰ कों॰ लहान जो शिंगा ती.

**शिंगडें**, न॰ कों॰ शिंगडी.

**शिंगरट**, न॰ शिंगरूं जें त्यास निंदेनें म्ह॰.

**शिंगरवट**, ३लिं॰ पुरता शिंगरूंपणा ज्याचा गेला नाहीं असें जें घोडें तो.

**शिंगरूं**, न॰ घोडें, खेचर, गाढव, यांचें जें लहान पोर तें.

**शिंगलोटा**, ३लिं॰ आंतील धान्यादिकांची शींग लोटून सपाट केलें जें दोर इ॰ माप किं॰ पंचपात्री इ॰ पात्र तो.

**शिंगशिंगोटी**, स्त्री॰ गाय, बैल, म्हैस, इ॰ जे पशु तत्संबंधी जें शिंग इ॰ माण्यंग भूम्यादिकांत पडलें असतें ती; उ॰ जेथें मेलेलीं गुरें ओढून टाकितात तेथें शिंगशिंगोटी पडत असत्ये; २, ला॰ गाय, म्हैस, इ॰ जें लहान मोठें गुरूं, ढोर, इ॰ त्यास प्रसंग विशेषीं म्ह॰.

**शिंगळद्दीप**, न॰ सिंहलद्दीपाचा अपभ्रंश.

**शिंगा**, पु॰ कों॰ माडाचे झांवळीचा जो अग्रभाग तो.

**शिंगा**, पु॰ अल्पवयस्क जो घोडा तो.

**शिंगाडा**, पु॰ तळें इ॰ कांचा ठायीं एक वेल असतो त्याचें जें फळ तो; २, मत्स्यांत एक जाति आहे; ३, ३लिं॰ रा॰ मोठीं लांब शिंगें ज्यास आहेत असा जो गाय म्हैस इ॰ तो.

**शिंगाड्या**, पु॰ वाद्यरूप जें शिंग तें वाजविणारा जो मनुष्य तो; २, ३लिं॰ ज्याचीं शिंगें मोठीं असतात असा जो टोणगा, बैल, इ॰ तो.

**शिंगाळ**, ३लिं॰ कों॰ शिंगानीं मारण्याचा स्वभाव ज्याचा असा जो पशु तो; २, ला॰ गांवकुटारास निंदेनें म्ह॰; ३, शिंगाड्या द्दितीयार्थी.

**शिंगाळीकेळ**, स्त्री॰ रा॰ केळींत एक जाति आहे.

**शिंगाळू**, ३लिं॰ शिंगें फुटून बोडकेपणा ज्याचा गेला असा जो एडका काळवीट इ॰ तो; २, शिंगाळ.

**शिंगाळेंकेळें**, न॰ शिंगाळ केळीचें फळ तें.

**शिंगाळ्या**, ३लिं॰ रा॰ शिंगाड्या द्दितीयार्थी.

**शिंगी**, स्त्री॰ अल्पवयस्क जी घोडी ती.

**शिंगेळ**, स्त्री॰ कों॰ शिंगाळी केळ.

**शिंगेळीकेळ**, स्त्री॰ शिंगाळी केळ.

**शिंगेळेंकेळें**, न॰ शिंगाळें केळें.

**शिंगोटी**, स्त्री॰ गाय, म्हैस, इ॰ पशूचें जें शिंग त्यास प्रसंग विशेषीं म्ह॰; २, तद्दिशिष्ट जी ती पशुजाति तीसही प्रसंग विशेषीं म्ह॰; उ॰ दोन शिंगोट्या होत्या त्याही सर्कारांत नेल्या; आम्हीं यंदा शिंगोटीची जरबाद केली आहे.

**शिग्रु**, पु॰ सं॰ शेगवा.

**शिजणें**, तांदूळ, दाळ, भाजी, इ॰ पदार्थ जलाग्नि संयोगानें पक्क होणें; २, ला॰ कोणक गोष्ट कोणेक प्रकारचे परिणामावर ज्यावया करितां घाटत असणें; उ॰ तुमचे कडे मुलगी द्यावी असें शिजतें आहे निश्चय होईल तेव्हां खरें; कोणेका-

चें कोणेक स्थळीं शिजणें ह्म० त्याणें हटलेलें चाकणें; ३, ऊषा होणें.

**शिजवक,** न० ग्रा० संग्रहीं राहिलें असतें जें भात, भाकर, इ० शिजलेलें अन्न तें.

**शिजाळू,** ३ लिं० सजाती यापेक्षां लवकर शिजायाजोगा जो डाळ, अळू, इ० पदार्थ तो.

**शिझणें,** कों० शिजणें.

**शिझाळू,** ३ लिं० शिजाळू.

**शिंट,** स्त्री० कों० कोणेक पदार्थावर पर्जन्यादिसंबंधी उदकाचा येतो जो तुषार ती.

**शिटणें,** पक्ष्यानीं हगणें; २, घोडीनें उनाड सुटून लहान सहान घोड्या पासून मैथुन करून घेणें.

**शिटवा,** पु० रा० वाघळांची विष्ठा जीचें वांगी इ० कांस खत घालतात तो.

**शिटा,** पु० शिंतोडा.

**शिटाऊ, शिटाव,** ३ लिं० घोडी शिटल्या मुळें तिजपासून उत्पन्न झाला जो वाईट साईट घोडा इ० तो; २, पक्का हरामी नेपन्न मंगळीचा जो मनुष्य इ० त्यास ह्म०.

**शिटी,** ३ लिं० छिटी.

**शिडकणें,** शिंपडणें.

**शिडकाठी,** स्त्री० गलबतावर जा काठीस शिड बांधलें असतें ती काठी.

**शिडकाव,** पु० छिडकाव.

**शिडंब,** पु० एक वन्य वृक्ष आहे.

**शिडशिडणें,** कों० पर्जन्यानें शिडशिड पडणें.

**शिडशिडी,** स्त्री० कों० हां हां ह्मणतां येऊन जाणारी अशी पर्जन्याची केवळ लहान जी सर ती.

**शिडशिडीत,** ३ लिं० रा० सडसडीत.

**शिडशीड,** अ० अनु० शिडशिडी रूप जो पर्जन्य त्याचे पतनाचें वि०.

**शिडा,** ३ लिं० रा० सडा विशेषणार्थी.

**शिडाइती,** ३ लिं० शिडाईत केल्यानें झालेलें जें अंबा इ० झाड तो.

**शिडाईत,** न० अंबा इ० कांचे झाडावर दुसऱ्या अंबा इ० झाडाची डाळी लावून करितात जें कमल तें.

**शिडासोटा,** ३ लिं० सडासोटा.

**शिडिशिडी,** अ० शिडशीड.

**शिडी, शिढी,** स्त्री० लांब लांब दोन लांकडें हात सवा हाताचे अंतरानें उभी मांडून त्यांस मध्यें पाय ठेवायास हात सवा हात लांबीचे लांकडांचे अनेक तुकडे अडवे संबद्ध करून जें माडी इ० कांवर चढायायास साधन करितात ती.

**शिणाक,** स्त्री० वाय्वादुपद्रवानें पोटांत किं० हस्तपादावयवयास वारंवार येत असते जी तिडीक ती.

**शिणकणें,** शिणकानी व्यथित होणें.

**शिणगार,** पु० शृंगार प्रथमार्थी.

**शिणगारणें,** शृंगारणें.

**शिणणें,** मनुष्यादिकानें शिणानें विशिष्ट होणें.

**शितकण,** पु० न० शिजलेल्या भाताचें जें एक शीत तो तें.

**शितकूण,** पु० रा० शितकण.

**शितडणें**, रा॰ शिंपडणें; २, कों॰ शितोडणें.

**शितडा**, पु॰ शितोडा.

**शितडी**, स्त्री॰ दहीं नासल्यानें जो भाताच्या शिता सारिख्या गोळ्या होतात त्या प्र॰.

**शितवड**, स्त्री॰ कों॰ कोणेक स्थळीं पडला असतां जो शितांचा पसारा ती.

**शितळ**, ३ लिं॰ शीतळाचा अपभ्रंश; २, कों॰ खर नव्हे असा जो नांगर इ॰ तो.

**शितळशिमगा**, पु॰ आपले घरीं लहान मुलें असतां रंग पंचमीचे दिवशीं किं॰ वर्षप्रतिपदेस इतरांचीं मुलें बोलावून त्यास सर्वांस वसंती रंगाचीं आंगडीं टोपडीं साकरेच्या गाठ्या इ॰ द्यावें असा जो समारंभ करितात तो.

**शितळाई**, स्त्री॰ थंडावा.

**शितळादेवी**, स्त्री॰ शीतलादेवीचा अपभ्रंश.

**शितागौर**, स्त्री॰ रा॰ शतावरी.

**शिताचँवरी**, स्त्री॰ रा॰ शितागौर.

**शितापी**, स्त्री॰ शिताबी.

**शिताफळ**, स्त्री॰ एक झाड आहे; २, न॰ त्याचें जें फळ तें.

**शिताफळी**, स्त्री॰ दे॰ शिताफळ प्रथमार्थी.

**शिताबी**, स्त्री॰ कोणेक कर्म त्वरेनें करून चांगलें करावें असें जें अंगीं सामर्थ्य असतें त्याचा जो त्या कर्मावर प्रयोग करितात ती.

**शितेचाकानवला**, पु॰ एक आरण्यक झाड आहे त्याचे पानास ह्म॰.

**शितैन**, न॰ साठ या संख्येचें अरबी नाव, परंतु यवनी शकाचे संवत्सरसंख्येविषयीं मात्र प्र॰.

शितोडणें,

**शितोडणें**, कों॰ पर्जन्यानें थेंब थेंब गळे असे प्रकारें पडणें.

**शितोडा**, पु॰ आघातादिकामुळें आधारापासून सुटून उडतो जो उदकादिकाचा बिंदु तो; २, वरून पर्जन्यादिकाचा पडतो जो थेंब त्यास ही ह्म॰; ३, उदकादिकाचा जो सेक तो.

**शिथकण**, पु॰ कों॰ शितकण.

**शिथवड**, स्त्री॰ कों॰ शितवड.

**शिथिल**, ३ लिं॰ ज्याचे आरंभक, अवयवांचा संयोग दृढ नव्हे असा जो पदार्थ तो; शिथिलांग शिथिलावयव इ॰ स॰.

**शिंद**, स्त्री॰ खजुरी सारिखें एक झाड आहे; २, केवळ अरुंद भिंत टिकणार नाहीं म्हणून लांकडाचे तुकडे एकास एक संबद्ध करून जी भिंत्याकार रचना करितात ती जिला चुना माती यांचा बरून लेप केला असतां भिंती सारखी दिसते ती.

**शिंदळ**, **शिंदळ**, ३ लिं॰ व्यभिचारी जो पुरुष किं॰ स्त्री तो.

**शिंदळकी**, **शिंदळकी**, स्त्री॰ शिंदळाचें जें कर्म ती.

**शिंदळचार**, **शिंदळचाळे**, पु॰ नटावें मुरडावें गंध कुंकू रेखून लावावें चट्टी पट्टी करावी इ॰ जो शिंदपणाच्या अभिव्यंजक चेष्टा ते.

**शिंदळदेव**, पु॰ रा॰ शिंदळचार.

**शिंदळवडा**, **शिंदळवाडा**, पु॰ कोणापाशीं कोणी जावें कोणी नजावें हा ताळतंत कांहीं जेथें नाहीं असा जो कोणेक गृही त्याचीं व्यभिचाराचें बाहुल्य प्रवृत्त असतें तो.

शिंदळसोन,

**शिंदळसोव**, पु० रा० कोणेक गोष्टी विषयीं कळत असलें तरीं नेणतेपणा घेऊन विचारीत असावें मनांतून करायाचें असतांही नको नको ह्मणत असावें इ० रूप जो व्यभिचारिणी सारखा वर्त्तन प्रकार ते.

**शिंदा**, पु० दासीचे पोटीं उत्पन्न झाली जी संतति तद्रूप जी जाति तो.

**शिंदापोरगा**, पु० दे० आपले दासीचा पुत्र असून आपले घरीं चाकरी करून असतो तो.

**शिंदेशाई**, ३लिं० महादजी शिंदा ह्मणून पेशवे सरकारचा सरदार होता त्यापासून प्रसिद्ध झाले त्या जा वस्त्रालंकारादिकांचा तद्रा किं० त्या तद्रेचे वस्त्रालंकारादि तो.

**शिदोरी**, स्त्री० अरण्य शेत मार्ग इ० कांचा ठायीं भोजनार्थ न्यावयाकरितां शिजलेल्या अन्नाची वस्त्र, पात्र, इ० कांत बांधिली असल्ये जी गाठोडी ती.

**शिद्दी, शिद्धी**, पु० यवनांत एक जाति आहे.

**शिधा**, पु० भोजनार्थ पाक करायाकरितां घेतात जो तांदूळ, डाळ, पीठ, तूप, लांकडें, इ० पाकसामग्री तो.

**शिधापाणी, शिधासामान**, न० शिधा इ०.

**शिधासामग्री**, स्त्री० शिधा इ०.

**शिधोरी**, स्त्री० शिदोरी.

**शिनक**, ३लिं० शिंदक.

**शिनळकी**, स्त्री० शिंदळकी.

**शिंप**, स्त्री० समुद्रादि स्थितजल जंतूचीं आवरक शूर्पाकार दोन हाडें असतात तीं प्र०; २, काठीबोरूचें पेर इ० कांचे अग्र भागीं, लेखणी, इ० करायासाठीं सुरी इ० कानें निरकस लासलें असतां जो तत्सदृश आकार होतो ती.

**शिंपट**, न० कों० सुपारीचे झाडास फळें यावयाची जी अवयव फुटत असतो तें.

**शिंपटी**, रा० शिंपट.

**शिपटी**, स्त्री० अश्वादिकास मारायाकरितां जी वृक्षादिकाची बारीक काठी घेतात ती.

**शिंपडणें**, स्थलादि कोणेक पदार्थावर बिंदुशः सेक होई असें जळ, रंग, गंध, इ० टाकणें.

**शिंपणें**. खळी इ० पात्र स्थित जें पाणी इ० सद्रव पदार्थ तो स्थलादिकावर सेक होई अशा प्रकारें हस्तादिकानें त्याजवर उडविणें; पक्षीं त्या स्थलादिकास ही कर्मता; २, न० शिमग्याचे खेळाचे समाप्तीस जो रंगाचा सेक अंगावर करितात तें; ३, रंगपंचमीस ह्म०.

**शिपतर, शिपतर**, न० एक वंशपात्र आहे.

**शिंपला**, पु० जी मध्यें मोतें उत्पन्न होतात अशा जातीची किं० जिचा पाठीवर रेषा असतात अशी जी शिंप तिला ह्म०; २, ला० गंध इ० ठेवायाकरितां आकार विशेषाचें धातुमय पात्र करीत असतात त्यास ह्म०.

**शिंपली**, स्त्री० रा० सुपली.

**शिंपा**, पु० माडास नारळ यावयाचा जो पोगींतून अवयव बाहेर येतो तो; २. रा० शिंप्यास ह्म०.

**शिपाई**, पु० सैन्यामध्यें युद्ध करणारे जे योद्धे ते प्र० ;२, वसूल, वासूल, चौकी, पहारा, इ० कामावर ठेविला असतां जो तरवार, सोटा, इ० शस्त्र बाळगणारा

णारा राजादिकांच्या दूत तो; ३.ला० युद्धवाद प्रतिवाद इ० कर्मांचे ठायीं न भितां धीटपणें उत्साहानें प्रवृत्त होण्याचा स्वभाव ज्याचा असा जो त्यास ह्म०,४,डोली,पालखी,इ० कांची दांडी जें जाल दिवटी इ० कांस आधारभूत केंची सारिखीं दोन दोन लांकडें एकत्र संबद्ध केलीं असतात तीं दोन दोन मिळून एक किं०प्र०.

**शिपाईप्यादा**, पु०रा०शिपाई खिजमतगार जासूद इ० तो.

**शिपाईराणा**, पु०कों०शिपाईप्यादा.

**शिपायगिरी**, स्त्री०शिपायाचें जें कर्म ती; २,३लिं० शिपाई लोक संबंधी जो वेष,बाणा,बोलणें,इ० तो.

**शिपायडा,शिपायडें**, पु०न० शिपायास निंदेनें ह्म०.

**शिपार**, स्त्री० गलबतास खालून पाण्याचा उपद्रव होऊंनये ह्मणून डांबर रोगण इ० कें करून जो बाहेरून लेप करितात ती.

**शिपारशी**, ३लिं० शिफारशी.

**शिपारस**, स्त्री० शिफारस.

**शिंपी**, पु० वस्त्र शिंवणें, विकणें, इ० व्यापार करणारी एक जाति आहे; २,स्त्री०शिंपप्रथमार्थी; ३, उराचे मध्यभागीं पोटाकडे उतरत गेलेली जी खळी असल्ये ती;४, गवतांत एक जाति आहे.

**शिंपुरडा**, पु०शिंप्यास निंदेनें ह्म०.

**शिंपूट**, न० कों० शिंपट.

**शिफारशी**, ३लिं० हिमाइती.

**शिफारस**, स्त्री० राजा इ० कोणेक थोराजवळ कोणेकाची मानमान्यता व्हावी ह्मणून त्याचे शिपा शौर्यादि गुणाची कोणी करितो जी प्रशंसा ती; तूं यांत काय मोठी शिफारस केलीस इ० स्थलीं प्रशंसा करायाजोगें काय कर्म केलेंस असा अर्थ होतो; २, हिमाईत.

**शिबंदी**, स्त्री० किल्ला शहर इ० कांचे संरक्षणार्थ ठेविले असतात जे पायचे शिपाई ती.

**शिबाड**, स्त्री० गलबतांत एक भेद आहे.

**शिबिका**, स्त्री०सं० पालखी.

**शिबिर**, न०सं० सैन्यांत राजा सेनापति इ० कांचे पृथक् पृथक् असतात जे गोट ते.

**शिबुटलें**, न०कों० शिंपतर.

**शिबें**, न० पांसाळें दोडका निबर झाला असतां आंत जें तंतुमय जाळ होतें तें; २, मनुष्याचे आंगावर एकत्वयोग होत असतां तें किं० त्याचीं जीं ठिकें पडतात तीं प्र०; ३, गुळ साकर इ० कांचे रांध्यावरचा मळ काढणें इत्यादर्थ काठीस बांधलेलें शिंपतर इ० रूप जें साधन करितात तें; ४, वेळणी ह्मणून जें पात्र तें.

**शिमगा**, पु० फाल्गुन मास जो तो; २, त्या मासांत जो होलिकोत्सव होत असतो तो; शिमगा करणें ह्म० बोंबलणें; ह्म० शिमगा जाई आणि कवित राही.

**शिमटी**, स्त्री० कों० शिपटी.

**शिमरा**, ३लिं० कों० विशोभित दिसाया जोगें बसकट जें नाक आणि नहिंशिय जो मनुष्य त्यास निंदेनें ह्म०.

**शिमशेजारी**, पु०रा० शिंवशेजारी.

**शिमा**, स्त्री० सीमा शब्दाचा अपभ्रंश.

**शिर**, न० मस्तक, शिरोभूषण, शिरोवेष्टन, शिरःकंप इ० स०; २, अ० मांजरास हाकतें समयीं याचा कोणी उच्चार करितात.

**शिरकणें**, शिरणें, परंतु, शिरणार जो अवयवी तो विशिष्ट रूपेंन शिरतां त्याचे कोणेक अवयवाचे ईषन्मात्र शिरण्याचें किं० अवयवाचें जें शिरणें तेणेंच करून अवयवीचे शिरण्याचें जेव्हां वर्णन आहे तेव्हां याचा प्र०; उ० या दाटीमध्यें माझें एक बोट शिरकतें स्त्र० मग वाट केली असती; २, रा० कापूस, लोंकर इ० कांतील सरक्या, केर इ० हातानें काढून तो कापूस इ० मोकळा करणें.

**शिरकमळ**, न० कमलाचें रूपकें करून शिरासच स्त्र०.

**शिरकावणें**, शिरके असा करणें.

**शिरकी**, स्त्री० सरकी.

**शिरखंड**, न० श्रीखंड प्रथमार्थी.

**शिरगोळा**, पु० रांगोळी करायाच्या उपयोगीं एक जातीचा दगड आहे.

**शिरघोंसाळी**, स्त्री० शिर घोंसाळ्याचा वेल ती.

**शिरघोंसाळें**, न० रा० शिराळें.

**शिरजोर**, ३लिं० नियम्यकोटींत असून नियामक जे राजा, धनी, पति, इ० त्यांची तादृश सत्ता आपल्यावर न चालाया जोगा वरचढ झाला जो सेवक, बायको, इ० तो.

**शिरच्छेद**, पु० शिरश्छेदाचा अपभ्रंश.

**शिरड**, स्त्री० रा० घरावर ओंवण घालणें कूड बांधणें इत्याद्युपयोगीं पाला झडलेल्या शिर्यांचा समुदाय ती.

**शिरडी**, स्त्री० रा० लहान जें शिरडें ती.

**शिरडें**, न० रा० शिरें प्रथमार्थी.

**शिरणें**, कोणेकाचें बाह्यप्रदेशीं स्थित जो कोणेक अर्थ त्याणें त्याचे आभ्यंतर प्रदेशीं प्रविष्ट होणें.

**शिरदें**, न० चिपटें.

**शिरपाव**, पु० चाकर, तमासगीर, इ० कानी तादृश कांहीं कृत्य चांगलें केलें असतां त्याजवर प्रसन्न होऊन सत्कारार्थ त्यास जें पागोटें इ० बक्षीस देतात तो.

**शिरपुटणें**, शिरपुटीनें मारणें.

**शिरपुटी**, स्त्री० जाळायाचे उपयोगी जी लांकडाची बारीक वाळलेली काटकी ती; २, कों० शिपटी.

**शिरपेंच**, पु० पुरुषांचे पागोट्यावर बांधायाचें जडावाचें एक भूषण असतें तो.

**शिरभारी**, स्त्री० डोकीवर वाहून न्यावयाजोगें कापड इ० कितीएक पदार्थांचें जें ओझें ती.

**शिरशिरणें**, रा० कोणेकानें शिरशिरीनें युक्त होणें.

**शिरशिरी**, स्त्री० रा० थंड वाऱ्याचा स्पर्श किं० हिंवज्वर याचा प्रादुर्भाव इ० निमित्तानें यत्किंचित् आंग थरारावें अशी जी विकृति अनुभूत होत्ये ती.

**शिरशी**, स्त्री० शिरसा सारखें एक भाजीचे उपयोगी झाड आहे.

**शिरशेल**, न० शिरसांचें जें तेल तें.

**शिरश्छेद**, पु० तरवार इ० शस्त्रानें कोणेकाचे मस्तकाचा

लकाचा जो छेद तो.

**शिरस,** पु॰ एक उपधान्य आहे.

**शिरसा,** अ॰ मस्तकें करून हा अर्थ परंतु प्रतिकूल भाव न धरितां परम विनय पूर्वक आदरानें कोणेक गोष्ट मानायाची असतां मान्य, वंद्य, मानणें, वंदणें, इ॰ कांचे योगीं प्र॰; उ॰ तुह्मी आमचे वडील त्यापेक्षां तुह्मी सांगाल तें आह्मास शिरसामान्य आहे.

**शिरसाष्टांगनमस्कार,** पु॰ वडील इ॰ कांस विनयानें कागदो पत्रीं असा नमस्कार लिहितात तो.

**शिरस्ता,** पु॰ व्यवहारीं वर्तनाचा जा भिन्न भिन्न चाली त्या प्र॰; प्रांत शिरस्ता, जाई शिरस्ता, जनशिरस्ता, सर्कार शिरस्ता इ॰ स॰.

**शिरस्तेदार,** पु॰ मामलत, न्यायाधिशी, इ॰ अधिकारांवर जे मुख्य अधिकारी असतात त्यांचे हाता खालीं जे त्या विषयाचे माहितगार मुख्य कारभारी असतात ते प्र॰.

**शिरस्नान,** न॰ डोकी वरून जें स्नान.

**शिरा,** पु॰ गव्हांचे रव्याचें मोहन भोगा सारिखें एक पक्वान्न करित असतात तो; २, रेवाचिनी, ज्येष्ठमध, इ॰ किंवा एक पदार्थांचा तत्वांश घेऊन त्याचा जो औषधार्थ रांधा करून ठेवला असतो तो; ३, खजराचे आंगचा जो द्रवांश सांठविला असतो तो, किं॰ खडी साखर कराया करितां करितात जो रांधा त्यांत खडीसाखर जमतां जमतां वेगळा निघतो जो द्रवांश तो; ४, स्त्री॰ शरीर पान इ॰ संबंधीं जा शिरा असतात त्या प्र॰.

**शिरां,** ३लिं॰ अवि॰ विवक्षित तत्तद्गुणांनी अतिशयित जो उत्तम तो.

**शिराजी,** ३लिं॰ खबूदरांत वर्णकृत एक भेद आहे.

**शिरांटा,** पु॰ कों॰ अनेक शिरीं एकत्र संबद्ध करून प्रस्तृत तृणादि गोळा कराया करितां जें साधन करितात तो.

**शिराणी,** स्त्री॰ प्रं॰ कोणेकाचे अंतःकरणास असतें जें कौतुक ती; उ॰ जाला हरीचे चरणीं शिराणी.

**शिरापुरी,** स्त्री॰ शिरा आणि पुऱ्या मिळून जें पक्वान्न ती.

**शिराळ,** ३लिं॰ जाचे आंगास दिसाया जोगत्या मोठ्या मोठ्या शिरा आहेत असें जें शरीर इ॰ तो.

**शिराळशेट,** पु॰ पूर्वीं यानावाचा कोणेक वाणी राजा झाला होता त्याची आतां श्रावण शुद्ध षष्ठीस सपरिवार मृन्मय मूर्ति पूजार्थ करितात तो जाचा त्या दिवशीं उत्सव करीत असतात.

**शिराळी,** शिराळ्याचा जो वेल ती; २, एक रानवटी वेल आहे.

**शिराळें,** न॰ दोडका ह्मणून जें फल तें.

**शिरिशिरी,** अ॰ रा॰ शिड शीड.

**शिरीद,** न॰ शिरदें.

**शिरीस,** पु॰ शिरस.

**शिरिस्ता,** पु॰ शिरस्ता.

**शिरिस्तेदार,** पु॰ शिरस्तेदार.

**शिरें,** न॰ पांजरण, कुंपण, पडवळ, इ॰ कांचे मांडवावर आस्तरण इ॰ कामाचे उपयोगीं धायटी निगडी

निगडी, करवंदी, इ॰ कांचा जा दाब्या तोडून आणितात त्या प्र॰; २, शाई कराया करितां लाखेचें शिजवून किं॰ नाचण्या, मजगुरे, इ॰ धान्य जाळून त्याचें मिश्रण करून तत्तांशा विशिष्ट पाणी करितात तें; ३, बाळंतीण, इ॰ कांस पाजाया करितां आहळींव, बोळ, नारळाचा रस, इ॰ द्रव्यांचा औषधी पदार्थ करितात तें.

**शिरोभाग**, पु॰ शिरोरूप जो भाग तो; २, ३ लिं॰ गुण दुर्गुणादि करून योग्यतेनें जो विवक्षित समुदायामध्यें उत्तम तो.

**शिरोमणि**, पु॰ मुकुटमणि; पंडित शिरोमणि, मूर्खशिरोमणि, इ॰ स॰.

**शिरोळी**, ३ लिं॰ शिरोळ ह्मणून एक ग्राम आहे तत्संबंधी जो चर्मी जोडा इ॰ पदार्थ तो.

**शिलक**, स्त्री॰ आंतून कांहीं खर्च होऊन अंशतः अवशिष्ट राहिली जी पैका, धान्य, इ॰ अर्थाची जमा ती; २, पत्रावळ, इ॰ कांस लावायाचे उपयोगी जी चोय ती; ३, वाख्यादि विकृतीनें पाठ इ॰ कांत भरल्ये जी उसण किं॰ येल्ये जी तिडीक ती.

**शिलकझाडा**, पु॰ जमा आणि खर्च यांचा ताळा पहाया करितां शिलकेचा काढितात जो झाडा तो; २, सर्व खर्च होऊन जी शिलकेची निःशेषता तो.

**शिलकबंद**, पु॰ दिवसांत किं॰ महिन्यांत झाला जो व्यवहार तत्संबंधी जमेकडे जमा खर्चाकडे खर्च लिहून शेवटीं शिलक आजवर काढितात असा जो कागद तो.

शिलक

**शिलकसांखळी**, स्त्री॰ मतिमार्गीं अशीक्रमानें उतरत उतरत गेली अशी जी शिलकेची परंपरा ती; २, द्रव्याचें पोतें आणि तत्संबंधी जी झाडाझडती इ॰ मिळून जें शिलकेचें प्रकरण तें.

**शिलकणें**, दे॰ बंदुकीचा तोडा, काष्ठ, इ॰ पदार्थानीं पेटणें.

**शिलकावण, शिलकावणी**, स्त्री॰ कोणी अपराधी जो त्याजकडे त्याला बोलावायास किं॰ नगाघास सर्कारांतून शिपाई पाठविला असतां तो शिपाई त्या कुळापासून दर्शनीच घेतो जें कांहीं द्रव्य ती.

**शिलकावणें**, तोडा, काष्ठ, इ॰ शिलके असें करणें.

**शिलकी**, ३ लिं॰ शिलकरूपानें राहिला जो पदार्थ तो; २, बहुत दिवस न खरचतां संग्रहीं पडोन राहिलेला जो वस्त्र, पात्र, अलंकार, इ॰ पदार्थ तो.

**शिलंगण**, न॰ दसऱ्याचे दिवशीं करितात जें सीमोल्लंघन त्याचा अपभ्रंश. ह्म॰ शिलंगणाचें सोनें पाहिजे त्याणें लुटावें.

**शिलगणें**, शिलकणें.

**शिलगावण, शिलगावणी**, स्त्री॰ शिलकावण.

**शिलशिला**, पु॰ कोणेक व्यवहार इ॰ कांची पूर्वापर अनुक्रमानें कोणत्याही एका प्रकारें चालत चालली असते जी परंपरा तो.

**शिला**, स्त्री॰ सं॰ पाषाण.

**शिलाई**, स्त्री॰ शिंवणावळ, परंतु वस्त्राविषयीं

प्र॰

प्र॰.

**शिलाजीत**, पु॰ औषधोपयोगी एक पदार्थ आहे.

**शिलारस**, पु॰ एक चिका सारखा सुगंधि पदार्थ आहे.

**शिलेदार**, पु॰ आपले पदरचें घोडें घेऊन त्यासुद्धां जो सरकारांत चाकरीस राहातो तो.

**शिलेदारी**, स्त्री॰ शिलेदाराचें कर्म ती; २, ३लिं॰ शिलेदार संबंधी जो डौल इ॰ तो.

**शिलेपोस, शिलेपोस्त**, ३लिं॰ ज्याचे योगानें म्हटले वेळेस धांवणें, उडी मारणें, इ॰ क्रियांविषयीं अडचण होत्ये असें जें लोंबत सुटलेला पोषाख, ओझें, पोरें, बाळें, इ॰ खटलें तें ज्याशीं संबद्ध नाहीं किं॰ ज्याचे तयारीमध्यें गुंतून पडाया जोगें कांहीं वैकल्य नाहीं असा अतएव जेव्हां म्हटलें तेव्हां जसा पाहिजे तसा तो तो पलायनादि व्यापार कराया जोगा सिद्ध जो मनुष्य घोडें, महागिरी, इ॰ तो.

**शिलोक**, पु॰ श्लोक शब्दाचा अपभ्रंश.

**शिलोंच्छवृत्ति**, स्त्री॰ तपस्वी लोक, शेत, इ॰ स्थलीं पडलेले धान्याचे कण एकेक वेंचून आणून तेणें करून करितात जी जीविका ती; २, ३लिं॰ त्या जीविकेनें वर्तणारा जो कोणी तपस्वी तो.

**शिल्प**, न॰ धातु, काष्ठ, पाषाण, रंग, इ॰ कांचें यंत्र, शस्त्र, अलंकार, नाव, घर, वाडा, भिंत, चित्र, इ॰ ठोकणें, तासणें, फोडणें, जोडणें, रेखणें, इ॰ क्रियाद्वारा तो तो पदार्थ निर्मिण्याचें जें कौशल तें; शिल्पविद्या, शिल्पशास्त्र, इ॰ स॰.

शिल्पी,

**शिल्पी**, पु॰ शिल्पानें उपजीविका करणारे जे सुतार, लोहार, गवंडी, सोनार, इ॰ ज्या जाति त्या प्र॰.

**शिव**, पु॰ महादेव; २, सत्तावीस योगांतील विसावा जो योग तो; ३, सं॰ कल्याण; ४, अ॰ शोक किं॰ खेद इ॰ व्हावया जोगें वाईट जें कांहीं मनांत येतें तत्समयींचा हा उद्गार आहे; कदाचित् इच्छानुरूप याचें आम्रेडित ही होतें.

**शिवटणें**, शेवटणें प्रथमार्थी.

**शिवण, शिंवण**, स्त्री॰ एक वृक्ष आहे; २, वस्त्र इ॰ कांस साधावें इत्यादर्थ दोरा घालीत गेलें असतां जो रचना विशेष होतो ती; ३, गुदद्वारापासून शिश्नाया पर्यंत जो दोरा घातल्या सारखा रेषाकार दिसतो ती; ४, न॰ कों॰ शिवायाचे उद्देशानें घेतलें जें कापड तें; ५, घर इ॰ कांवर घालायाचा जो तृणादिरूप आकार तें.

**शिंवणाकर**, पु॰ रा॰ घर शिवाया करितां आणिलें असतात जे गडी ते प्र॰.

**शिवणावळ, शिंवणावळ**, स्त्री॰ वस्त्रादिक शिंवविलें असतां त्या शिवणारास द्यावें लागतें जें मूल्य ती; २, रा॰ वस्त्रादि शिवण्याचें जें काम ती.

**शिवणें**, वस्त्र, पर्ण, चर्म, जखम, इ॰ दोरा घालून विवक्षानुरूप परस्पर सांधले जात असें करणें; २, स्पर्श संबंध होई असें कोणीक जीवानें मनुष्य वस्त्र इ॰ कांहीं एकास लागणें; परंतु परस्पर स्पर्शानें विटाळ, ओंवळपणा इ॰ होतें असा विषय असतां प्र॰.

**शिंवणें**, कों॰ शिवणें प्रथमार्थी; २, तृण झांप इ॰ कांनी

कामी गृहादि आकारणें; नका कवलें याविषयीं प्र॰ नाहीं.

**शिंवघडी**, पु॰ दे॰ शिंवशेजारी.

**शिवधार**, स्त्री॰ कों॰ वादलें समयीं केवळ वारीक जी तुपाची धार वाढितात तीस संकेतानें स॰.

**शिवनक**, पु॰ भातांत एक जाति आहे.

**शिवनिर्माल्य**, न॰ पु॰ शिवावरील जो निर्माल्य तें तो; २, ला॰ शपथार्थ शिवस्वा सारिखा याचा ही प्रयोग होतो.

**शिवरस**, पु॰ कांजिका सारखा कालवणाचे उपयोगी एक पदार्थ करीत असतात तो.

**शिवरा**, ३लिं॰ दुसऱ्यास सर्वदा शिव्या देत असावें असा स्वभाव ज्याचा तो.

**शिंवरा**, पु॰ रा॰ भूम्यादिकांवर उदकादिकांचा पातळ गालव करितात जो सेक तो.

**शिवराई**, पु॰ प्रथमतः शिवाजी राजानें पाडलेला असा एक पैसा आहे.

**शिवरात्र**, स्त्री॰ शिवरात्रि शब्दाचा अपभ्रंश.

**शिवरात्रि**, स्त्री॰ शिवप्रीत्यर्थ उपवास जागरण प्रधान व्रत करायाविषयीं विहित जी प्रतिमासींची कृष्ण चतुर्दशी ती; माघ कृष्ण चतुर्दशी विषयीं विशेषेंकरून प्र॰.

**शिवर्धनी**, ३लिं॰ श्रीवर्धनी.

**शिवशरणार्थ**, पु॰ शरणार्थ, विशेष विनय प्रदर्शन कर्तव्य असतां याचा प्र॰.

**शिवशिवणें**, शैत्यादि विकृती मुळें कांहीं तरी कडकडां चावावें डसावें असा कांहीं कल्पना विशेष दांतांस होवो तद्विशिष्ट दांतांनी होणें.



**शिवशिवशिमगा**, पु॰ दे॰ शितळ शिमगा याअर्थी.

**शिंवशेजारी**, पु॰ ज्या गावच्या शींव ज्या गांवाचे शिंवेस लागली आहे असे अनेक जे जवळजवळ गांव त्यांच्याठायीं राहणार जे लोक ते परस्पर.

**शिंवसर**, पु॰ सिंह राशीस सूर्य असतां जो काळ तो ज्याच्याठायीं गाय व्याली असतां धन्यास कांहीं अनिष्ट फल शास्त्रांत सांगीतलें आहे.

**शिंवसरणें**, गाईनें सिंह संक्रांतींत प्रसवणें.

**शिंवसुरणें**, कों॰ शिवसरणें.

**शिंवसूर**, पु॰ रा॰ शिंवसर.

**शिंवसोयरा**, पु॰ कों॰ शिंव शेजारी.

**शिवस्व**, न॰ शिवास अर्पित झाला जो द्रव्यादि कोणेक विषय तें, ज्याचें ग्रहण केल्यास मोठें पाप लागतें, अतएव तुझें द्रव्य म्हणजे मला शिवस्व आहे असे असे शपथार्थ याचे प्र॰ करितात.

**शिवळ**, स्त्री॰ शिऊळ.

**शिवळणें**, कों॰ शिवशिवणें.

**शिवामूठ**, स्त्री॰ श्रावणांत प्रति सोमवारीं विवाह होतांनर पांचवर्षें पर्यंत स्त्रिया सांबावर गोधूमादि धान्याची जो मुष्टि वाहतात ती; २, तत्कर्म प्रधान जें व्रत ती.

**शिवाय**, अ॰ खेरीज, परंतु तो खेरीज ह्या खेरीज या अर्थी प्रा॰ प्र॰ नाहीं.

**शिवायजमा**, स्त्री॰ शेतसारा, वेतन, इ॰ रूपजी ऐन जमा त्याखेरीज इतरजी खंड गुनेगारी जर

र इ॰ रूप जमा साधलें ती.

**शिंवार,** न॰पु॰ ग्रामाकडे गृहसमुदाय बाग बगीचा यांखालीं रुधलें असतें जें स्थल त्याचे बाहेर त्या गांवचे शिंवे पर्यंत शेतें, तृणें, काष्ठें, इ॰ जेथें होत असतें असें जें स्थल तो तें; २, कों॰ गृहाद्युपयोगी जो वांसे इ॰ लांकडी सरजाम तो तें.

**शिंवारसैंपाक,** पु॰ शेतांत जाऊन भोजन स्थानीं भक्षणास कुरडा, ओंब्या, इ॰ भाजून जें अन्न स्थानीं कल्पितात त्यास म्ह॰.

**शिवालय,** न॰ शिवाचें जें देऊळ तें.

**शिवाशीव, शिंवाशींव,** स्त्री॰ सोंवळें, ओंवळें, ब्राह्मण, शूद्र, इ॰ कांचा परस्परें संपर्क झाल्यामुळें होतो जो भ्रष्टाकार ती; २, रा॰ दुष्टस्पर्श, आशौच, इ॰ कें करून होतो जो विटाळ ती.

**शिवाळ,** स्त्री॰ शिउळ प्रथमार्थी.

**शिवी,** स्त्री॰ क्रोधाद्यवसरीं कोणेकाला उद्देशून प्रयुक्त करितात जे पातकादि दोषारोपक रांडेचा, बोडकीचा, शिंदळीचा, लबाड, लुच्चा, इ॰ शब्द किं॰ अक्कमार तोस इ॰ वाक्य ती.

**शिवीगाळ, शिवीगाळी,** स्त्री॰ शिवी इ॰ रूप जी दुरुक्ति ती.

**शिवीळ, शिवूळ,** शिवळ.

**शिवूंनयेशी, शिवोंनयेशी,** स्त्री॰ विटाळशी.

**शिवेरा,** ३लिं॰ रा॰ शिवरा.

**शिंशपावृक्ष,** पु॰ एक वृक्ष आहे.

**शिंशपाशोध,** न॰ रावणानें लंकेस सीता नेली ती कोठें तरीं ठेवायाची ती शिंशपा वृक्षा खालीं ठेविली होती तद्विषयीं ती शिंशपावृक्षाखालींच कां ठेविली अशी जी कोणेकाची व्यर्थ शंका असते तद्वत् जी कोणेकाची कोणेक गोष्टी विषयीं शंका असते तीस म्ह॰.

**शिशिर,** पु॰ शिशिर ऋतु.

**शिशिरऋतु, शिशिरर्त्तु,** पु॰ मकर आणि कुंभ एतद्राशिस्थित सूर्य असतां जे दोन सौरमास किं॰ माघ आणि फाल्गुन हे जे दोन चांद्रमास तदात्मक जो ऋतु तो.

**शिशी, शिंशी,** स्त्री॰ लहान जो शिसा ती.

**शिशु,** पु॰ बालक.

**शिश्न,** पु॰ न॰ पुरुषाचा प्रजोत्पादक जो अवयव तो तें.

**शिश्नोदरपरायण,** ३लिं॰ मैथुन आणि भक्षण या दोहों विषयांचा सर्वदा पाठीस लागला जो तो.

**शिष्ट,** पु॰ यथाशास्त्र वर्तणारा ज्याची रीति, आचार, इ॰ लोकानीं प्रामाण्यें करून घेत असावें अशा योग्यतेचा किं॰ विद्या, तप, इ॰ गुण वैशिष्ट्यास्तव पूजाद्यवसरीं साधारण जनापेक्षां उत्कृष्ट कोटींत गणायाचा जो ब्राह्मणादि तो; शिष्टसंप्रदाय, शिष्टमंडळी, इ॰ स॰; २, ३लिं॰ अवशिष्ट; कृतशिष्ट, यज्ञशिष्ट, इ॰ स॰.

**शिष्टसंभावना,** स्त्री॰ विवाह यज्ञादि समारंभीं इतर जनापेक्षां विशेषें करून दक्षिणा वस्त्रादि दान पूर्वक सभ्य जनाचा करितात जो सत्कार ती, किं॰ तत्समयीं त्यास देतात जें तें दक्षिणा वस्त्रादि ती.

**शिष्टाइकी**, स्त्री० शिष्टपणा.

**शिष्टाई**, स्त्री० शिष्टाइकी; २, ग्रं० परस्परांच्या विवाहादि व्यवहार जुळावा म्हणून एकाकडून दुसऱ्याकडे जाऊन त्याला बधवाया करितां चार गोष्टी अधिक उण्या सांगाव्या त्यास राजी करावा इ० रूप जो मध्यस्थपणें कोणी भाषण व्यापार करितो ती.

**शिष्टाचार**, पु० शिष्ट परंपरेनें चालत आला जो आचार तो. ज्याला इतर जन आपल्या वर्तनास शास्त्रा सारिखें प्रमाण मानितात, शिष्टाचार करणेंस; शिष्टाचारानें पाळून होई असें यथाकथंचित त्या त्या गोष्टीचें अनुष्ठान करणें; २, विवाहादि प्रसंगीं यजमानास करितात जें अहेरानें दान तो, शास्त्रीय विधाना वांचून केवळ शिष्टाचार प्रामाण्यानें चालतात जीं विवाहादिकांच्या ठायीं पाय घड्या, विड्या तोडणें, इ० कितीएक कर्में तीं प्र०.

**शिष्टायकी**, स्त्री० शिष्टाइकी.

**शिष्टावणें**, क्रि० कोणेकानें आपल्या अंगीं शिष्टत्व मानूं लागणें, निंदा विषय असतां प्र०.

**शिष्य**, पु० जो जा गुरूपासून विद्या कलादि कांहीं शिकतो तो त्या गुरूचा, शिष्यवर्ग, शिष्यपरंपरा, इ० स०.

**शिष्यशाखा**, स्त्री० कोणेक गुरूचे साक्षात् शिष्य किं० परंपरागत शिष्य त्यांचा जो विस्तार ती.

**शिष्यसंप्रदाय**, पु० संत, गोसावी, इ० कांची जी शिष्य शाखा तो.

**शिष्यसंप्रदायी**, ३ लिं० शिष्य संप्रदायांतर्गत जो मनुष्य मनुष्य तो.

**शिष्या**, पु० शिष्य; २, शागिर्द.

**शिसकारी**, स्त्री० शिंसारी.

**शिसफूल, शिंसफूल**, न० स्त्रियांचें एक शिरो भूषण आहे; २, ज्याचे पाठीमागें फळ आहे असें जें तोंडली, दोडकी, भोंपळी, इ० कांचें फूल तें.

**शिंसव, शिसव, शिसवा**, पु० एक वृक्ष आहे.

**शिसवी**, स्त्री० शिंसव; २, ३ लिं० शिसवी.

**शिंसवी**, ३ लिं० क्रि० शिंसवाच्या जो पाट, खुंटी, इ० पदार्थ तो व तें काष्ठ तो.

**शिसा, शिंसा**, पु० आंवळ गळ्याचें उभार आकाराचें कांचेचें पात्र असतें तो; २, मधुमक्षिका ज्यामध्यें मधाचा संचय करीत असतात असा जो त्या मोहळाचा एक विभाग तो; ३, शिसव.

**शिंसाबासा, शिसाबासा, शिसाभासा**, पु० कांहीं कारणानें दुसऱ्याचे स्वाधीन कर्तव्य जो अश्वादि पशु किं० कांचेचा पेला, आरसा, इ० पदार्थ त्याचा दुखणें, बहाणें, पडणें, धक्का लागणें, इ० कारणानें जो संभावित नाश तो; उ० हा आरसा तुह्मी एथें ठेवितां पण शिसाबासा तर मजकडे दोष नाहीं.

**शिसारी, शिंसारी**, स्त्री० अति कडू किं० अति उग्र ज्यांचा गंध असे जे कुटुकी, एरंडेल, बोळ, इ० पदार्थ त्यांचे भक्षणानें किं० वास आल्यामुळें वमन व्हावया जोगें जें कळमळून येतें ती; २, कोणेक पदार्थाचे अतिसेवनामुळें किं० त्याचा

त्याचा ठायीं कांहीं अमंगलादि दोषाचा दर्शना दिकामुळें त्या पदार्थाचा आला असतो जो वीट.

**शिसें, शिँसें**, न॰ कथलीं सारिखी एक धातु आहे.

**शिस्त**, स्त्री॰ कुळांकडील वसूल करायासाठीं जी कुळारगवार याद तयार करितात ती; २, ३लिं॰ विवक्षित संप्रदायानुरूप जो आवसाल, व्यवहार, इ॰ ती; ३, स्त्री॰ बाणादिकें करून कोणेक लक्ष्य वेधाया करितां धरितात जें संधान ती.

**शिस्तवार**, ३लिं॰ शिस्तीस अनुगुण जो भाषण, व्यवहार, उत्तर, प्रत्युत्तर, इ॰ कांहीं एक ती.

**शिळक**, स्त्री॰ रा॰ चोय, पोट, इ॰ कांत शिळका भरणें त्त॰ आंत काड्या टोंचल्याशा वाटाया जोगी व्यथा होणें.

**शिळट**, स्त्री॰ कों॰ पर्जन्य काळीं एखादे दिवशीं पडतो जो गारोंडा ती.

**शिळटणें**, कों॰ फार शिळट पडल्या मुळें आँवण इ॰ कानें विकृत होणें.

**शिळटी**, स्त्री॰ दे॰ शिळट.

**शिळबुडा**, ३लिं॰ रा॰ अग्न्यादि संयोगानें आंगचा गारठा मोडला आहे ज्याचा असें जें पाणीं, दूध, ताक, इ॰ ती.

**शिळवड**, स्त्री॰ शिळें राहिलें जें भात, भाकर, इ॰ अन्न ती.

**शिळवडें**, न॰ रा॰ शिळवड.

**शिळा**, ३लिं॰ पर्युषित; २, शिजविणें, भाजणें, इ॰ संस्कार करते समयीं आंत प्रविष्ट झाला असतो जो अग्न्यंश तो किं॰ पर्ण पुष्प इ॰ कांचे आंगीं तीं झाडावर असतां असतो जो तेजोंश तो कांहीं कालातिक्रम झाल्यामुळें निःशेष विमुक्त झाला आहे ज्यापासून असा जो अन्न, फल, पुष्प, इ॰ पदार्थ तो; ३, रा॰ थंड जें पाणीं तो; ४, ला॰ फार थंड जो कारभार किं॰ तसा कारभार करणारा जो मनुष्य इ॰ तो; ५, स्त्री॰ शिला.

**शिळापाका**, ३लिं॰ शिळा इ॰ जो पदार्थ तो; त्त॰ शिळें पाकें खाल तुह्मी बांगडीसे व्हाल.

**शिळाविद्या**, पु॰ रा॰ एखादे कामांत पडला असतां तें काम लवकर संपवायाचा नाहीं आणि लवकर सोडायाचा नाहीं कोणी बोललें तरीं राग येऊं नये असा फारच धिमा, मंद, वेंगट, जो त्यास त्त॰.

**शिळारस**, पु॰ शिलारस.

**शिळावेळ**, पु॰ स्त्री॰ रा॰ कों॰ शिळोपा.

**शिळासप्तमी**, स्त्री॰ श्रावण शुक्ल सप्तमी व्रतदिवस आहे.

**शिळोपा**, पु॰ चार सहा घटका दिवस आल्यापासून चार सहा घटका दिवस राहीपर्यंत प्रा॰ सूर्य जनित संताप होत असतो त्या काळास सोडून इतर जो मार्गक्रमणा सुपयोगी पूर्वापर काल ती.

**शिक्षक**, पु॰ विद्यादि शिकविणारा जो गुरु ती; २, चोरादिकांस शिक्षा करणारा जो राजादिक ती.

**शिक्षण**, न॰ शिक्षा करण्याचा जो व्यापार तें.

**शिक्षणें**, सं॰ कोणेकास शिक्षित करणें.

**शिक्षा**, स्त्री॰ अविदित जो विद्या कलादि कोणेक अर्थ तद्विषयींचें ज्ञान व्हावया जोगा ह्या विषय असा

असा आहे ही गोष्ट अमुक प्रकारें करावी असें केलें असतां असें होईल इ॰ रूप गुरुवचनादिक जें ज्ञापक तेणेकरून अंतःकरणास होतो संस्कार ती, आणि तादृश संस्कारजनक जें गुरु इ॰ कर्तृक कर्म ती; २, पारिपत्य.

**शिक्षित**, ३लिं॰ शिक्षाविशिष्ट केला जो शिष्य; चोर, इ॰ तो; २, कोणेकाचे शिक्षेनें शिकला गेला जो ग्रंथ, विद्या, इ॰ तो.

**शीक**, पु॰ एक हिंदूत जाति आहे.

**शींक**, स्त्री॰ शिंक.

**शीख**, पु॰ शीक.

**शीग**, स्त्री॰ अधोली, पायली, इ॰ माप किं॰ इतर कांहीं पात्र त्यांत कांठोकांठ धान्यादि भरून अणखींवर धान्यादि घातलें असतां जो कांठावर राशि होतो ती, किं॰ भूम्यादिकांचा ठायीं स्थितक्रमानें वर बारीक होत गेलेला जो धान्यादिकांचा राशि त्याचा जो अग्रभाग ती; २, रा॰ भूम्यादिकावर मन्कादिकाचे थरावर थर यसून भूम्यादिकांपेक्षां वर दिसाया जोग्या जाउंच आकृति वहाडतात त्यांस प्र॰स॰.

**शीघ्र**, ३लिं॰ त्वरित; शीघ्र ग्रहण करणारा जो तो शीघ्र ग्राही शीघ्र भोजन करणारा तो शीघ्र भोजी इ॰ शीघ्र गामी इ॰स॰.

**शीघ्रकवि**, पु॰ कांहीं एक आश्रय पाहून अति त्वरेनें कवन करणारा जो कवि, तो.

**शीघ्रकोपी**, ३लिं॰ यत्किंचित् निमित्तावरून जाम तत्काल कोपयेतो असा स्वभावाचा जो तो.

**शीघ्रबुद्धि**, ३लिं॰ कोणेक विषयाचें अतित्वरेनें ग्रहण करण्याविषयीं पटु आहे बुद्धि ज्याची तो.

**शीट**, स्त्री॰ पक्ष्यांची जी विष्ठा ती; २, न॰ छीट.

**शीड**, न॰ गलबत इ॰ कांचें जें अवजार तें; कोणेकाचें शीड चढणें, उतरणें, इ॰ स्थलीं संपत्ति इ॰ कांचे मदानेंमान चढणें उतरणें असा अर्थ.

**शीण**, पु॰ शक्तीपेक्षां अधिक कांहीं श्रम केल्यामुळें अवयव वैशाकल्य होऊन उरीं फुटून शक्ति क्षीण व्हावया जोगा जो विकृति विशेषरूप संस्कार शरीरांत राहतो तो; २, पु॰स्त्री॰ वयोवस्था उ॰ तो आणि मी एका शिणेचे आहों.

**शीणभाग**, पु॰ शीण, भागवटा, इ॰ तो.

**शीत**, न॰ शिजलेल्या भाताचे जे भिन्न भिन्न अवयव ते प्र॰; २, कों॰ ग्राम संबंधी जा क्षुद्र देवता पिशाचें यांस प्रा॰ प्रतिवर्षी रात्रौ त्या त्या स्थानीं जाऊन अन्नादिकांचा बलि देतात तें; ३, पुष्याची जी दोरी तें; ४, सहा म्हणून जी संख्या तीचें वाचक परंतु यवनी साला विषयीं प्र॰; ५, स्पर्शादिवेय उष्णतेचा प्रतिपक्षी जो जलादिनिष्ठ गुण तें; ६, ३लिं॰ तादृश गुणविशिष्ट जो उदकादि पदार्थ तो; शीतवायु, शीतोपचार, इ॰स॰.

**शीतकाल, शीतकाळ**, पु॰ हेमंत आणि शिशिर एतदृतुद्वयात्मक जो काल तो.

**शीतज्वर**, पु॰ शीत प्रधान जो ज्वर तो.

**शीतल, शीतळ**, ३लिं॰ शीत षष्ठार्थीं.

**शीतलादेवी**, स्त्री॰ देवी म्हणून जा अंगावर फोड्या येत असतात तदुपद्रव शांत्यर्थ जीचें आराधन

राधन करितात अशी एक देवी आहे.

शीम, स्त्री॰ रा॰ शींव.

शीर, स्त्री॰ शरीर, पर्ण, फळ, काष्ठ, इ॰ कांचे आं- गीं त्यांचे उपजीव्य जे अन्नादि रस ते जिकड चे तिकडे पोंहचायास मार्गभूत जे अनेक तं- त्वाकार बारीक मोठे अवयव असतात ते प्र॰; शिरा काढणें, शिरा घेणें, इ॰ स्थळीं रोग परिहा- रार्थ शरीरांतील स्थूल शिरांपैकी शिरा तोडू- न त्यांतील रक्त काढणें; चतुष्कोणाद्याकार वि- शिष्ट जे काष्ठ, पाषाण, धातु, इ॰ कांचे पदार्थ त्या- स जे धारे सारखे आकार असतात ते प्र॰.

शीर्ष, न॰ सं॰ मस्तक.

शील, न॰ स्वभाव; २, उत्तम मार्गानें वर्तावें कुमा- र्गानें सवर्था वर्तूं नये असा जो कोणेकाचे अंतः- करणाचा स्वभाव असतो तें.

शींव, स्त्री॰ सीमा शब्दाचा अपभ्रंश, परंतु गांव, ठिकाण, इ॰ स्थळ विभाग संबंधी जी सीमा त- द्विषयीं प्र॰.

शीस, शींस, न॰ ओंपळी, पडवळी, तोंडली, इ॰ कांस नुगतें धरलेलें जें फळ तें.

शीळ, स्त्री॰ शिळा, परंतु स्नान करणें, वस्त्र धुणें, शस्त्र घांसणें, इत्याद्युपयोगी सपाट अंगाची जी शिळा असत्ये तद्विषयीं प्रा॰ प्र॰; २, शिऊ- ळ द्वितीयार्थी; ३, न॰ शील.

शुक, पु॰ सं॰ पोपट.

शुकुरवार, पु॰ शुक्रवाराचा अपभ्रंश.

शुक्क, अ॰ मार्जारादिकांस हाकते वेळेस याचा उच्चार करितात; कोणेकास शुक्क करणें किं॰ ह्मणणें ह्मणजे यथेच्छपणें कोणेकस्थळीं प्र- वेश किं॰ कांहीं वस्तूंचें ग्रहण इ॰ विषयीं जरंन जो त्यास तूं कोण कोणाचे आज्ञेनें चालल्यास इ॰ रुप ईषन्मात्र तरी कोणेकानें प्रतिरोध आपण करणें; निषेध विषयीं प्र॰; कोणेक स्थळीं शुक्क असणें ह्म॰ हाल्ल्चाल किं॰ मनुष्यादिकांची व- स्ती इ॰ कं करून शून्य प्राय असणें.

शुक्ति, स्त्री॰ सं॰ शिंप प्रथमार्थी.

शुक्र, पु॰ दैत्यांचा उपाध्याय एक ऋषि आहे ज्याचें नवग्रहांमध्यें सहावे स्थानीं परिगणन करिता- त ज्याचा तारा सूर्यापासून फार दूर जात नाहीं तो; शुक्रास्त, शुक्रोदय, इ॰ प्र॰; २, न॰ रेत.

शुक्रवार, पु॰ रविवारादि सात वारांतील जो सहा- वा वार तो.

शुक्राचार्य, पु॰ शुक्र प्रथमार्थी; २, ला॰ एकाक्ष जो मनुष्य त्यास थट्टेनें ह्म॰.

शुक्री, ३ लिं॰ शुक्राचे ताऱ्या सारखा जो मोत्यांचा र- ग तो किं॰ तद्विशिष्ट जें तें मोतीं तो.

शुक्ल, ३ लिं॰ पांढरा स्वच्छ जो वर्ण किं॰ तद्विशिष्ट पदार्थ तो; २, मासाचे जे दोन पक्ष त्यांमध्यें जा- त प्रतिदिवशीं चंद्रकलेची वृद्धि होत असत्ये असा जो पक्ष तो किं॰ तद्गत जो तिथि तो; ३, पु॰ केवळ ब्राह्मणापासूनच धान्य द्रव्याद्युपार्जन करून उपजीविका करणारा जो ब्राह्मण तो; ४, सत्तावीस योगांतील जो चोवीसावा योग तो.

शुक्लकाष्ठ, न॰ आपण कोणी कडे गेलें तरीं आप- ल्यास सोडीत नाहीं असें जें कांहीं एक पाठी- शीं लागलें असतें प्रद त्यास ह्म॰.

ला ओ तो; उ०, एका कामाकडे सक्त असलें ह्मणजे दुसरें काम नीट यडत नाहीं; २, सखृत.

**सकु**, पु० सं० यव ह्मणून जें धान्य तो.

**संक्रम**, पु० सं० संक्रांति.

**संक्रमण**, न० सं० भान्वादिग्रहांचें जें राश्यंतरीं गमन तें, परंतु लोकांत सूर्याविषयीं प्रसिद्धि; २, देशादिकांचें जें आक्रमण तें.

**संक्रांत**, स्त्री० संक्रांतिशब्दाचा अपभ्रंश; २, ३लिं० जाणें संक्रमण केलें तो आणि ज्याचें संक्रमण केलें तो.

**संक्रांति**, स्त्री० सूर्यादिकांचा अधिष्ठित राशीचा अतिक्रम करून राश्यंतरीं जो प्रवेश तो; कोणेकावर संक्रांति बसणें ह्म० अनुत्पत्ति अभाव इ० कारणामुळें त्यात्या पदार्थाची क्षीणता होणें.

**सख**, पु० सक; २, सं० ज्याचा जो सखा तो तत्सख; इंद्राचा सखा तो इंद्रसख, मरुत्सख, इ० स० प्र०.

**संखजिरें**, न० शंखजिरे.

**सखरेजा**, पु० दुफांशी खेळांत एक फांशावर डाव आहे.

**सखल**, ३लिं० उंचा ह्मणून जें प्रमाण तें न्यून आहे ज्याचें असा जो शरीर, गृह, विहीर, स्थल इ० पदार्थ तो; २, न० रा० भोंवताला उंचवटा असून मध्यें निम्न जें स्थल तें.

**सखलवट**, ३लिं० कों० ईषत् जो सखल तो २; न० रा० शरीर, भूमि, काष्ठ, इ० कांवरील जो निम्न विभाग तें.

**सखलात, सखलाद**, स्त्री० एक उंचें ऊर्णावस्त्र आहे.

**सखलाती, सखलादी**, ३लिं० सखलादीचा जो अंगरखा, टोपी, बंडी, इ० पदार्थ तो.

**सखल्याफणस**, पु० कों० सकल्याफणस.

**सखा**, पु० ज्यापरस्परांचा स्नेह आहे ते एकमेकाचे; २, ३लिं० सखूखा.

**सखार**, ३लिं० रा० सामान्य प्रमाणापेक्षां क्षारांश यत्किंचित् ज्यामध्यें अधिक असा जो भाजी इ० पदार्थ तो.

**सखासोद्दरा, सखासोयरा**, पु० मित्रत्व, यौनसंबंध इ० योगानें जो संबंधी तो.

**सखी**, स्त्री० मैत्रीण; २, कांहीं एक बिभत्स अर्थ वर्णून शिमगा इ० प्रसंगीं ह्मणायाकरितां रचिला असतो जो प्राकृत श्लोक तो.

**सखोल**, ३लिं० दूरवर विचार ज्यामध्यें आहे एकाएकीं उतावळा व्हावयाचा नाहीं असा गंभीर जो मनुष्य किं० त्याची बुद्धि किं० गूढ ज्याचा अभिप्राय अशी कल्पना, भाषण इ० तो.

**सखूखा**, ३लिं० बहीण, भाऊ, चुलता, मामा, सासू, सासरा, इ० जे आपले संबंधी तत्समान स्थानिक जे त्यांजवर हा बहीण इ० व्यपदेश होतो तद्व्यावृत्यर्थ बहीण इ० शब्दांस हें विशेषण लागतें.

**सखूत**, ३लिं० पराकाष्ठेच्या, नगादारद, बदला,

बदली, मेहनत, इ० किती एकांचें विशेष-
ण;२, गंजिफांचे खेळांत अवश्य यावया
ची जी मिरी किं० तवानी इ० तलफ तिचें वि०.
सख्य, न० मैत्री.
संख्या, स्त्री० एकप्रमाण आहे जाचे योगा
नें अर्थव्यक्तींची इयत्ता समजली जात्ये;२,
एकत्वादि जे तीचे अवांतर भेद ते प्र०.
संख्याक, ३लिं० जी संख्या जास आहे तो त
त्संख्याक, शतसंख्यांक, सहस्रसंख्या
क, इ० स०.
संख्यात, ३लिं० एक दोन अशा प्रकारें मो
जला गेला जो तो.
संख्येय, ३लिं० संख्येच्या अन्वय जाजवर
होतो तो; २, गणनीय.
संग, पु० गन्यादि क्रियांचा ठायीं सहवर्तमा
न असावें असा जो कोणेकास कोणेका-
चा संबंध असतो; साधुसंग, अंगसंग,
सत्संग, खलसंग, इ० स०; २, मैथुनसंब
ध.
संगजिरें, न० शंखजिरें.
सगट, अ० सकट.
सगडी, स्त्री० दे० शेगडी.
संगणमत, न० संगनमत.
संगणमती, पु० संगनमती.
संगत, ३लिं० संगति ह्या तीयार्थानें विशिष्ट जो
ग्रंथ भाषणादि कोणेक अर्थ तो; २, स्त्री०
संगति शब्दाच्या अपभ्रंश; ३, क्रियेचा ठा
यीं अन्वित होणारा जो त्याचे अंगीं जें एका
कित्व असतें त्याचा परिहार जाचे योगा-
नें होतो असें जें त्यास दुसऱ्या कोणेकाशीं
सहितत्व तीं आणि जाशीं सहितत्व अस-
तें असा जो कोणी दुसरा तो.
संगतवार, ३लिं० संगत प्रथमार्थी.
संगतसोबत, स्त्री० सोबतसंगत.
संगति, स्त्री० संग; २, पद, वाक्य, पदा-
र्थ, वाक्यार्थ, इ० कोणेक अर्थानें अन्वित
होण्याविषयीं आकांक्षित असतें जें अर्थ
तर तें यद्रूपेंकरून आकांक्षित असतें तद्रू
पेंकरूनच मिळालें असतां त्यांचा परस्पर
यथायोग्य होतो जो संबंध तो; ३, संगत
तृतीयार्थी.
संगतिक, ३लिं० असंगतिकाचा प्रतिपक्षी.
संगतिदोष, पु० कोणेकाचे संगतीनें त्या
कोणेकास लागतो जो दुर्व्यसनादि दुर्गुण
तो.
संगती, पु० सोबती.
संगतीं, अ० एका की दुसऱ्या अशा रूपेंकरू
न क्रियेचा ठायीं जो अन्वितपणा होत अ
सतो तो न व्हावयास कारणीभूत जें को
णेकाचें सहितत्व त्यातें आश्रयून; ये, बोल,
इ० कांचें वि०; २, एककालीं जा, ये, इ० कां
चें वि०; स्त्रीपुरुषादिकांनीं संगतीं जेवणें
इ० एकपात्रीं भोजन करणें, कोणेक स्त्री
नें कोणेक पुरुषासंगतीं जाणें किं० पुरुषा
नें कोणेक स्त्रीसंगतीं जाणें इ० मैथुनार्थ
संगत होणें.

**संगतीसोबती**, पु० सोबती संगती.

**संगतें**, अ० संगतीं.

**संगनमत**, न० दुसऱ्यास कपटानें वंचून कां हांएक कार्यसाधायाकरितां तूं असें बोल, मी असें बोलेन, तूं असेंकर. मी असेंकरीन, इ०रूप अनेकांचा परस्पर केलेला असतो जो संकेत तें.

**संगनमती**, पु० कोणेककार्य साधनार्थ ज्या परस्परानी संगनमत केलें आहे ते परस्पर.

**संगम**, पु० अनेकदिशांकडून येणारे जे नद्या. वाटा, इ० अनेक त्यांचा एकत्र होतो जो संयोग तो, आणि एकेच दिशेकडून येणारे जे त्यांचा गतीच्या शैघ्यमांद्यामुळें कचित् जो संयोग होतो तोही.

**संगमरवर**, पु० पांढऱ्या दगडांत एक जाति आहे.

**संगमरवरी**, ३लिं० संगमरवर संबंधाजो पाषाण, त्याचीमूर्ति, इ० पदार्थ तो.

**संगर**, पुं० सं० युद्ध.

**सगर**, न० धोतर, पातळ, इ० कांचे कांठास पुढील रेशमाचे आणि तव्याचे संधीस विजातीय रंगाच्या रेशीम इ० कांचा तंतुसमुदाय घालितात तें.

**सगरी**, ३लिं० सगरह्मणून पेंठ आहे, तत्संबंधा जें वस्त्रादि तें.

**सगर्भ**, ३लिं० गर्भसहित जोजीव तो.

**संगव**, पु० पंचधा विभक्त जें दिनमान त्याचा जो दुसरा भाग तो.

संगवई,

**संगवई, संगवयी**, पु० लहानपणापासून एकेठिकाणी सहवर्तमान खेळलेले कोणेक व्यवहारीं वर्तलेले असे जे अनेक ते परस्पर; २, कोणेका व्यवहारांचे जे सोबती ते परस्पर.

**संगसंगा**, पु० रा० तो करीत नाहीं आणि मी कां करीन, किं० त्याणें अमुक केलें, मग मीच कां करूं नये, असा कोणेकानें कोणेका बरोबर धरिला असतो जो भाव तो.

**सगळा**, ३लिं० सकल प्रथम द्वितीयार्थी.

**सगळाला**, ३लिं० सगळा सगळा असा जो तो; उ०, सगळाले अंबे असतील ते उद्यालाठेव अर्धाले असतील ते आज खर्चकर.

**सगा**, पु० आप्तविषयी.

**संगाती**, पु० संगती.

**संगातीं**, संगातें, अ० संगतीं.

**सगासोद्रा, सगासोयरा**, ३लिं० सख्खासोद्रा.

**संगी**, ३लिं० ज्याचा संग जाला निरंतर आहे तो त्याचा; साधुसंगी, गुणसंगी, स्त्रीसंगी इ० स०.

**संगीत**, न० गाणा, मृदंगादिवाद्यें, सूरदेणारें, इ० कांचे योगानें सांग जें गायन तें; २, गाणेंजमायास साधनभूत जे मृदंगादि वाद्यें सूरदेणारे इ० सर्व मिळून तें, संगीतशास्त्र, संगीतकला, इ० स०.

**सगीन**, ३लिं० भारी जड जो ओझें इ० पदार्थ

दार्थ तो शुद्रभाषावृत्ति.

**संगीन**, ३ लिं० दगडानी केलेली जी पक्की किल्लाकोट देवालय, नळ, भिंत, इ० कोणेक इमारत तो; २, कीं० जाचेजवे द्दव शिवले आहेत असें पक्कें केलेलें काष्ठ, धातु, चुना, इ० कांचें गाडा, हौद, इ० कामत्यास ह्म०; ३, न० कोणेक वाद पंचाईत इ० विषयींचा जसा असावा तसा पक्का जो कागदपत्र, भाषण, इ० तो; ४, स्त्री० कटारीचे शैलाचें एकशास्त्र आहे जें बंदुकीचें अग्नभागीं लावीत असतात.

**सगुण**, ३ लिं० निर्गुणाच्या जो प्रतिपक्षी तो, सगुणोपासक, सगुणोपासना, सगुणमूर्ति, इ० स०.

**संगू**, पु० कीं० प्रा० सोंगट्या किं० कवड्या यांचे खेळांत परस्पर अविरोधी जे गडी ते परस्पर.

**संगूमंगू**, पु० कीं० एकमेकाचे जे संगू ते.

**संगृहीत**, ३ लिं० संग्रह केला जाचा तो.

**संगें**, अ० संगती.

**संगेंमंगें**, अ० एकामेकाचे सोबतीनें जाणें, येणें, इ० वि० प्रा० शद्रभाषावृत्ति.

**संगोपन**, न० यथायोग्य जो पेनेउत्तमरीतीनें जें कोणेकाचें संरक्षण तें.

**संगोपित**, ३ लिं० संगोपन केलें जाचें तो.

**सगोत्र**, पु० एकागोत्राचे ते परस्पर.

**सग्रह**, ३ लिं० ग्रहांसहितजें पंचांग, लग्न, इ० तो.

इ० तो.

**संग्रह**, पु० कोणेकअर्थ तेथचे तेथेंच राही अशाप्रकारें कोणेक अधिकरणीं घेतल्यानें तेथें त्या अर्थाची होत्ये जी जमा तो; धान्यसंग्रह, द्रव्यसंग्रह इ० सं०.

**संग्रहण**, न० कोणेक अर्थाचा संग्रह करण्याचा व्यापार तें.

**संग्रहणी**, स्त्री० एकदोन दिवस पोटांत मलाचा संग्रह व्हावा आणि एकदोन दिवस ढाळ व्हावे असे नेहमी जेणेकरून होतें असा एक रोग आहे.

**संग्रही**, ३ लिं० अनेक वस्तूंचा संग्रह करण्याचा स्वभाव जाचा असा जो मनुष्यादि तो.

**संग्राम**, पु० संगर.

**संग्राहक**, ३ लिं० संग्रह करणारा जो तो.

**संग्राह्य**, ३ लिं० संग्रह करायाचा जाचा तो.

**संघ**, पु० सं० समुदाय.

**संघटण, संघट्टण**, न० परस्परें भाषण, थट्टा, मस्करी, हास्य, विदोन, इ० करावें एकमेकाचे घरीं जावें; नित्यांत एके ठिकाणीं बसावें उठावें इ० रूपजें कोणेकाचें कोणेकाशीं वर्तन तें.

**संघट्टन**, न० एकमेकाचे अंगानें एकमेकाचें अंग रगडलें जाई असा जो एकमेकास घट्टलागण्याचा व्यापार तें; २, संघट्टण.

**सघन**, ३ लिं० दाट आणि पातळ याजा दोन कोटी त्यामध्यें दाटयाकोटींत गणायाचा तो.

तो.

**संघर्षण**, न॰ अतिशयेंकरून जें घर्षण तें.

**संघात**, पु॰ सं॰ समुदाय.

**संच**, पु॰ कोणेककार्यसिद्धीस जी जितकी जशी उपकरण सामग्री लागत्ये ती सर्वमिळून जो जोड तो; २. सचकार.

**सचकार**, पु॰ श॰ विसार.

**संचणी**, स्त्री॰ को॰ ग्राम, देश, आगर, इ॰ ह्यांची पाहणी करून अमुकापासून अमुक संबंधी अमुक सर्कार देय घ्यावें एतद्विषयीं सर्कारांतून करितात जो ठराव तो.

**सचंत्र**, ३लिं॰ कों॰ स्वतंत्र शब्दाचा अपभ्रंश.

**संचय**, पु॰ कोणाएक अधिकरणी कोणेक अर्थाचा थोडा थोडा सांचून होतो जो जमाव तो: द्रव्यसंचय, पुण्यसंचय इ॰ स॰.

**संचरणें**, कोणेक अधिकरणीं कोणेकानें संचार विशिष्ट होणें.

**संचरणें**, पिशाच, अग्नि, विष, इ॰ कानें शरीर, अरण्य, इ॰ अधिकरणीं संचार द्वितीयार्थानें विशिष्ट होणें

**संचरित**, ३लिं॰ कोणेक अधिकरणीं संचरला तो.

**सचवटी**, स्त्री॰ सचोटी.

**संचळ**, **संञ्चळ**, न॰ पादेलोण.

**संचळखार**, **संञ्चळखार**, पु॰ पादेलोण.

लोण.

**सञ्चार**, पु॰ कोणेक अधिकरणीं इतस्ततः फिरण्याचा जो व्यापार तो; २. कोणेक अधिकरणीं शिरून त्या अधिकरणाचे सर्वांशीं व्याप्ति होई अशी जी त्याचा ठायीं कोणेक अर्थाची गति तो, भूतसंचार, विषसंचार, वातसंचार, इ॰ स॰; ३. स्मरणें, बोलणें, किं॰ कांहींएक कामकरणें यांचें जाक्रमातें धरून अनुसंधान धरलें असतें त्या क्रमांत अन्यक्रमगत जें शब्दादि तत्सदृश शब्दादि आल्यामुळें भ्रांतीनें तें संधान सटून त्या अन्यक्रमाकडे जें संधान जातें तो; ४. जेथें ती भ्रांति होऊन संचार जातो तें जें स्थल त्यासही स॰.

**संचार**, पु॰ संचाराचा अपभ्रंश परंतु प्रा॰ प्रथमार्थावांचून.

**संचारणें**, संचरणें; २. कोणेक अधिकरणीं कोणेकातें संचरितकरणें.

**सञ्चारणें**, संञ्चरणें.

**संचित**, ३लिं॰ सांचलेला जो उदक, धान्य, इ॰ पदार्थ तो; २. न॰ जीवाचे पदरीं जो सुकृत दुष्कृतात्मक कर्माचा राशि असतो त्यांतून प्रकृत देहारंभ कर्त्वेंकरून प्रारब्धता पावला जो विभाग त्याहून इतर जो शेष सांठ्यास राहिलेला कर्मविभाग असतो तें, पूर्वसंचित, जन्मांतरसंचित, इ॰ स॰.

**सचिंत**, ३लिं॰ कोणेक विषयीं चिंता ज्याला प्राप्त झाली आहे तो.

संचितोदक,

**संचितोदक**, न० सांचवणी.

**सचिव**, पु० राजाचाजो प्रधान तो; २, अष्टप्रधानातील एका प्रधानाची संज्ञा आहे.

**संची**, स्त्री० चंची.

**सचेतन**, ३लिं० चेतना ज्याचे अंगीं आहे असा जो मनुष्य पश्वादि तो.

**सचेल**, अ० आंगावरील जें वस्त्रप्रावण त्यासुद्धां; स्नानकरणें, भिजणें, इ० कांचेंवि०; उ०, अंगावर पाल पडली असतां सचेल स्नान करावें.

**सचोटी**, स्त्री० भाषण, देणें, घेणें, इ० व्यवहारीं सप्रमाण वर्तणारा जो त्याचे अंगीं आली असल्ये जी प्रामाणिकता रूप योग्यता ती.

**सच्चिदानंद**, पु० सत्यज्ञान आणि आनंद एतत्स्वरूप जें ईश्वर स्वरूप तो.

**सज**, पु० संच प्रथमार्थी; २, साज प्रथमार्थी.

**सजगणी, सजगाणी**, स्त्री० पैशाचें जें द्रव्य ती; २, सहारुके रूप जें क्षेत्रप्रमाण ती.

**सजगुरा**, पु० बाजरी.

**सजण**, पु० ग्रं० सज्जनाचा अपभ्रंश परंतु लावणी, पद, इ० कवितेंत मित्र नायक यांवर प्र०.

**सजणी**, स्त्री० ग्रं० लावणी, पद, इ० कांत सखी किं० नायिका यांस प्र०; २, मृदंगादि सजण्याचा जो व्यापार ती.

**सजणें**, अनेक अंगें परस्पर असंबद्धपणें जिकडे तिकडे असतां जें अंगीचें रूप असतें त्यारूपानें स्थित जो कोणेक अंगी त्याणें तीं अंगें एकत्र यथायोग्य संबद्ध झाल्यामुळें व्यवहार्यरूपेंकरून सिद्धावस्थे सपेणें २, केवळ मुळचे रूपाने स्थित जो कोणी त्याणें युद्धनृत्यादि व्यवहाराविषयीं योग्य जें शस्त्रालंकारादि विशिष्टरूप त्यारूपानें सिद्ध होणे, या अर्थी पक्षीं सकर्मक ही प्र० होतो; उ०, आह्मी मसुदा सजिवतों आहों परंतु अद्याप सजत नाहीं, मीतालदार घोडा सजून आणी तों तुह्मी ही पोषाख टालतरवार घेऊन सजा; ३, साजणें.

**सजा**, पु० बंगला, वाडा, इ० कांचाठायीं वरचे मजल्यावर क्रीडार्थ बसायाचे उपयोगीं सर्वत्र दृष्टि पोंहचायाजोगें लहानसें उंच जें बंदिस्तीचें स्थल केलें असतें तो; २, मध्यें खंडन पडतां क्रमानें लागत गेलीं जीं अनेक शेताचीं क्षेत्रें तीं सर्व मिळून जो भूविभाग तो.

**संजाइती, संजाईत**, ३लिं० खपला तर खपवूं, न खपला तर परत करूं, अशी बोलीनें घेतात जो वस्त्रादि जिन्नस ती.

**सजातीय**, ३लिं० एकाजातीचे जे अनेक ते परस्पर.

**संजाप, संजाब, संजाब**, पु० अंगरखा, दुलई, छत, इ० वस्त्राचे कडेस प्रा० विजातीय रंगाचे वस्त्राची शोभार्थ

र्थ जी पट्टी जडतात तो ; २, शेंडी भोंवता जो घेर राखितात त्यास ह्म०.

**संजाबदार, संजाबदार**, ३लिं० संजाब आहे ज्यास असा जो दुलई, शेंडी, इ० पदार्थ तो.

**संजाबी**, ३लिं० संजाबदार.

**सजीव**, ३लिं० सचेतन.

**संजीवन**, न० मेलेला जो कोणी त्याचें पुनः जीवंतपणारूप अवस्थेंत जें गमन ; उ०, सर्पदंशानें मेलेल्यावर हा मंत्र घातला असतां त्याचें संजीवन होईल, कोणेका नें संजीवन होणें ह्म० जीवंत होणें ; २, मेलेल्यानें जीवंत होण्याविषयीं मंत्र, औषधि, इ० रूप जें साधन तें.

**संजीवनी**, स्त्री० मृतास जीवंत करणारी अशी एक विद्या आहे ती आणि एक औषधि आहे ती.

**संजुगता**, ३लिं० व्यवस्थित नेमस्त जितक्यास तितका आटोपसार असा जो संसार, राज्य, कारभार, घर, इ० तो.

**संजोग**, पु० संच.

**संजोगणी**, स्त्री० रा० जा व्यवहारादिकांस जो संजोग पाहिजे असतो तत्संपादनद्वारा त्या व्यवहारास त्या संजोगाविषयीं होते जी परिपूर्णता ती.

**सज्ज**, ३लिं० कोणेक कार्याचाठायीं प्रवृत्त होण्याविषयीं शस्त्र, भूषण, गुणाधायक संस्कार, इ० विशिष्ट जें रूप असावें सें असतें त्यारूपानें सिद्ध होऊन राहिलेला जो कोणेक अर्थ तो.

**सज्जन**, पु० कोणाचा घातपात करूं नये बरें होईल तितकें करीत असावें कज्जा, भाषण, इ० करूं नये असे जे चांगले गुण तद्विशिष्ट जो मनुष्य. पशु, इ० कोणाजीवतो.

**सज्जा**, पु० सजा.

**सज्जारवार, सज्जीरवार**, पु० क्षारांत एक भेद आहे.

**सट**, स्त्री० षष्ठीशब्दाचा अपभ्रंश.

**सटकण, कन, कर, दिन, दिशीं**, अ० अनुकरण. फलादिकांतून बी उडणें निसरड्यावरून पाय निसटणें इ० कांचें वि० ; २, झटकन.

**सटकणें**, कोणेकानें हौं हौं ह्मणतां निघून जाणें.

**सटरफटर**, न० लटरफटर.

**सटवणी**, न० चंपाषष्ठीचे सुमारास जो पर्जन्य पडतो त्यास ह्म०.

**सटवणें**, सटावणें.

**सटवाई**, स्त्री० षष्ठी ह्मणून जी देवी ती ; २, स्त्रियांस याशब्दानें शिवी देतात.

**सटवी**, स्त्री० सटवाई.

**सटसट, सटसटां**, अ० अनुकरण. खडे, उदकाचे बिंदु, इ० कानीं वेगानें उडणें. कोणाचे अंगावर प्रहार होई असें बसणें इ० कांचें वि०.

**सटसटीत**, ३लिं० ज्यामध्यें मार्दव नाहीं अत एव ज्याचे शितकण निरनिराळे असतात असा जो भात, घुगऱ्या. इ० तो.

**सटाटां**, अ० सटसटां.

**सटावणें**, उपजलेल्या मुलानें सटवीचे बाधेनें युक्त होणें किं० तेणें करून मरणें.

**सटासट**, अ० सटाटां.

**सटीक**, ३लिं० टीकेसहित जो ग्रंथ तो.

**सटीप**, ३लिं० टीप ह्मणजे जोडणी तीणेंकरून सहित जी गंजिफांतील तलफ तीचें किं० तलफ घेणें इ० क्रियांचें वि०.

**सटींसामाशीं**, अ० सठींसामाशीं.

**सट्टा**, पु० जी हुंडी किं० जें नाणें देऊन दुसरें हुंडी नाणें घ्यावें अशी एकास गरज आणि ती हुंडी तें नाणें देऊन ती दुसरी हुंडी नाणें घ्यावें अशी दुसऱ्यास गरज असतां तें जे गरजवंत त्यांचा परस्पर तें तें देऊन घेऊन होतो जो व्यवहार तो.

**सट्टाबट्टा**, पु० बट्टासट्टा.

**सठ**, स्त्री० सट.

**सठवाई**, स्त्री० सटवाई.

**सठवी**, स्त्री० सटवी.

**सठळणें**, क्रों० सटावणें.

**सठी**, स्त्री० क्रो० षष्ठी ह्मणून जी देवी ती; २, षष्ठीपूजन; ३, कचोरा ह्मणून औषधी कंद आहे ती.

**सठींसामाशी, सठीसामाशीं**, अ० वर्षांसहा महिन्यांतून एखादे वेळेस भेटणें, कोठें जाणें, इ० वि०; उ०, त्याचे घरीं आमचें नेहमी जाणें नाहीं कधीं सठींसामाशीं गेलों तर जातों.

**सड**, पु० गोमहिष्यादि पशूंचा जो आंचळ तो; २, जोंधळा, सजगुरा, ऊंस, बोरू, किं० आडीतृण इ० कापून घेतल्यावर खालीं भुईवर जे बुडखे राहतात ते प्र०; ३, रानडुकराचे मान इ० कावरचा कठिण जो केश तो किं० तत्सदृश जो मनुष्यादिकाचे अंगावरचा कठीण केश किं० तत्सदृश कठीण काडी इ० त्यास ह्म०; ४, स्त्री० विवाद विषय झालेला जो कोणेक वृत्त्यादि अर्थ तन्निर्णयार्थ प्रमाण लेंकरून पाहतात जें त्या अर्थाचें पूर्वकालीन वृत्त तो; ५, तांदूळ, डाळ, इ० कांस जो सडण्याचा संस्कार तो.

**सडक**, स्त्री० दोरी. परंतु गाडा इ० कावरील ओझें कसणें स्थलादिकाचें ऋजुत्व पाहणें इ० विषयीं गृहीत असतां विशेषें करून प्र०; २, सरखलाद इ० कांचा पट्या किं० त्याणीं मढविल्लेल्या दोऱ्या यांड्याचे ग्वोगराम्र शोभार्थ अनेक लावितात त्या प्र०; ३, वरून गाडा, गाडी, इ० अस्खलित चालाया जोगी सारखी बांधली असते जी वाट ती; ४. जिचें पान उजू असतें अशी तरवारीत एक जाति आहे ती ५, ज्यास पोंक, फुगा, इ० कांहीं नाहीं असें नीट जें मनुष्यादिकाचें शरीर किं० त मा

सा तो मनुष्यादि तो; ५, भीड, मुरवत, भय, इ० जें वाग्व्यवहाराविषयीं प्रतिबंधक तद्राहित्यामुळें स्पष्ट जो आबसाल, शिवी इ० त्याचें वि०; ६, विवक्षितस्थलीं नीट- चाललेली जी वाट किं० मनुष्यादिकांचें नीट जें जाणें, निघणें, इ० त्याचें वि०.

**सडकणें**, पर्जन्य, मनुष्य, इ० कानें मोठे थेंब, गारा, खडे, इ० कानीं कोणेकास ताडणें किं० दोरी, छडी, इ० कानीं अनेक प्रहारहोत असें कोणेकास ताडणें, पक्षीं थेंब, गारा, दोरी, इ० कांसही कर्मता; २, कोणेकानें- लाथ, दुगाणी, इ० कोणेकावर झाडणें; ३, लांकूड, दगड, इ० कुऱ्हाड, सुतकी, इ० कानीं केवळ साफ न करितां सुमाराच्या आकार येई असें सरासरी तासणें; ४, धुवायाचें वस्त्र इ० दगड इ० कांवर बळानें आपटणें; ५, वाटाया मळ निघून जावा इत्याद्यर्थ धातूच्या पत्रा इ० बळानें घण इ० कानें ठोकणें; ६, आंतील अंश बारीक, मोठा, सरासरी, निराळा होई असें मोठ्यानें पाखडणें किं० उभळणें; ७, कोणेक स्थलापासून कोणेकानें सडक निघणें.

**सडकपातळ**, ३लिं० सडपातळ.

**सडका**, ३लिं० रोगादिविकृतीमुळें ज्याचे अवयव सडले असा जो फल, पान, शरीर, इ० पदार्थ तो.

**सडकांव**, ३लिं० सडकून सरासरी नीट केलेला जो दगड, लांकूड, इ० तो किं० तेणें करून केलेलें जें जोतें इ० कांचें काम तो.

**सडकून**, अ० रगडून.

**सडण**, न० कांडायाकरितां घेतलेलें जें धान्य तें; २, तें कांडण्याचा जो व्यापार तें.

**सडणावळ**, स्त्री० तांदूळ इ० सडणारास जें मोल द्यावें लागतें ती.

**सडणें**. तांदूळ, डाळ, इ० मुसळाचे आघातांनीं निस्तुष करणें; २. फलपर्णशरीरावयव इ० कोणेक पदार्थानें कुजून कांहीं अवयव गळत एतदवस्थापन्न होणें.

**सडपातळ**, ३लिं० विशेष मांसल ज्याचें- अंग नव्हे असा जो मनुष्यादि तो.

**सडसड**, अ० अनुकरण शब्द होई असें मोठे थेंबानीं पर्जन्यपतन, छडी इ० कानीं- मारणें, इ० वि०.

**सडसडां**, अ० सडसड.

**सडसडीत**, ३लिं० सटसटीत; २, सडपातळ; ३, पल्लवादिसमृद्धीनें परिपुष्ट नव्हे असें- जें झाड तो.

**सडा**, ३लिं० बायकोंपोरें, ओझें पाशें, इ०- गुंतून पडायाजोगें ज्याचे मागें नाहीं असा जो गृहस्थ, संसारी, मार्गस्थ, इ० तो; २, पु० वावडीस लावणें इत्याद्युपयोगी बारीक लांब जी दोरी तो; ३, शेणखळा, चंदनोदक, रंगोदक, इ० कें करून संस्कारार्थ भूमीवर करितात जो सेक- तो; ४, शेणसडा लासणि कार्थः; ५, ग० डोंगरावरचा सपाट जी माळासारखी जमीन

जमीन असतां तो.

**सडाई**, स्त्री० सडणावळ.

**सडाका**, पु० सडसड शब्द होई असा दोरा. इ० कांनीं केलाजो प्रहार तो; २, पर्जन्य वायु, इ० कांचा जो तडाका तो.

**सडाडां**, अ० सडसडां.

**सडाफटिंग**, पु० केवळ सडाजो मनुष्य त्यास म्ह०.

**सडासंमार्जन**, न० स्थलशुध्यर्थ झाडणें, सडाघालणें, इ०रूपजो संस्कार तें.

**सडासोंटा**, ३लिं० जाचेमागें विशेषरवटलें नाहीं तो.

**सडासोट**, पु० सडाफटिंग.

**सडी**, स्त्री० शरीरावयव झडून जावयाजोगा जो मनुष्य, गुरें, इ० कांस रोग होन असतो तो; २, दे० क्षेत्रावर पडत्येजी अंसडा तो; ३, गं० सड चतुर्थार्थी.

**सडीक**, ३लिं० सडून निस्तुष स्वच्छ केलेजे तांदूळ, इ० धान्य तो; २, सडलेलें वांपेरून केलेली गोंवाऱ्याचीजी रांग ती जी लवकर शिजते; ३, त्वचेसुद्धां शिजणारीजी वालपापडी, मेहेंदळ, इ० कांची शेंगतीस म्ह०; ४, भीड, मुरवत, सभ्यपणाची मर्यादा एतत्संरक्षणार्थ गुप्तसंकेतानें बोलावें इ०जे बोलावयाचे प्रकार असतात ते प्रकार सोडून स्पष्टजी शिवी, उत्तर, प्रत्युत्तर, इ० कांहीं तो.

**सडेमुंडली**, स्त्री० गं० एक औषधी कंद आहे.

**सडेल**, ३लिं० सडका.

**सडेसोंट**, ३लिं० सडासोंटा.

**सडेसोट**, पु० सडासोट.

**सडेहुपट, सडेहुप्या**, पु० गं० जामध्यें बायका पोरें हीं नाहींत असाजो धानगरांचा कळप त्यांतील जो धानगर तो.

**सड्या**, ३लिं० झड्या.

**सढळ**, ३लिं० उदारस्वभावाचा जो मनुष्य किं० त्याचा तादृश कारभार हस्त इ० तो.

**सण**, पु० दसरा, दिवाळी, शिमगा, इ०जे वार्षिक दिवस ते आणि विवाहोत्तर आठवा, सोळावा, किं० मास वर्ष यांचे समामीच्या दिवस ते म्ह०; २, त्यात्यादिवशीं पोळी, पक्कान्न, इ० मिष्टान्न करून इष्टमित्र, सोयरेधायरे, इ० कांसहवर्तमान भोजन करावें वस्त्रालंकारादि धारण करावें इ०रूपजो उत्सव करितात तो; २, शणाचा अपभ्रंश.

**सणकण, कन, कर, दिनी, दिशीं**, अ० वेगानें जाणारी गोळी, किं० कांहीं एकास बसणारी छडी इ० कांचा शब्दाचें अनुकरण, वेगानें गोळी जाणें, छडी मारणें, शरीरांत अकस्मात् तिडीक उठणे, इ० कांचें वि०

**सणका**, पु० कों० वाय्वादिविकृतीनें किं० मुंगी इ० डसल्यानें शरीरांत सणकर

निघत्ये

निघत्यें जी तिडीक ती.

**सणकाडी, सणकाँडी**, स्त्री० तागाचें आंगच्या बारिक काढून घेऊन राहत्येंजी काडी ती ; २. तत्सदृश जी आंबाडी. में डी. इ० कांची काडी निघत्ये तीसही ह्म०.

**सणंग**, न० सनंग.

**सणगर**, पु० कांबळीं विणून उपजीविका करणारी अशीएक जाति आहे.

**सणणण**, अ० तोफेचा गोळा, बाणाचा तोटा. गोफणीचा धोंडा. इ० वेगानें जात असतां जो शब्द होतो त्याचें अनुकरण.

**सणवार**, पु० सण इ० जो उत्साहाचा दिवस तो.

**सणसणणे**, अतितप्त जें उदक. तेल.- इ० कानीं किं० वेगानें जाणारी जी गोळी, बाण. इ० कानीं सणसण शब्द होई असें वाजणें ;२, टणक पदार्थ मृदु असेंस मजून त्याजवर बळानें कुऱ्हाड चोपणें इ० कांचा आघात केला असतां हाताला जो सणकन वेग येतअसतो तत्सजातीय वेगविशिष्ट कोणेक शरीरावयवानें - होणें.

**सणसणाट**, पु० अतिशयित जो सणाण तो.

**सणसणीत**, ३लिं० सणसण शब्द होई असें अतितप्त झालेलें जें उदक, दूध. इ० तें ;२. झणझणीत जो भाजी. इ० पदार्थ तो ;३. विसविशीत नव्हे असें सणसर जें सूत्र किं० तन्निर्मित वस्त्र तो ;४. खडखडीत वाळलेलें जें वस्त्र, काष्ठ, इ० किं० खणखणीत - जो जाबसाल, उत्तर. इ० तो.

**सणसर**. ३लिं० ताठ, बळकट. असें जें सूत. वस्त्र, व मनुष्य. ओझें. इ० तो.

**सणसुदी**, स्त्री० रा० सणवार.

**सणसुदीस**, पु० कों० सणवार.

**सणसूद**. पु० सणसुदीस.

**सणाण**, पु० बाण इ० संबंधी अतिशयित जो सणसण शब्द तो.

**सणाणणे**, सणसणणें.

**सणी**, स्त्री० सजगणी.

**सत्**. ३लिं० आहे अशारूपेंकरून ज्याची प्रतीति आहे असाजो अर्थ तो ;२, चांगला जो कोणेक अर्थ तो ; सत्कर्म. सत्पुरुष, सद्विद्या. सद्वासना. इ० स० ;३, पु० संत; सत्समागम. सत्सेवा. इ० स०.

**संत**. पु० विषयासक्ति सोडून ईश्वरभजनीं लागला जो पुरुष तो, परंतु जे पागोटें - घालीत नाहींत रुमाल बांधतात तुळशीचा माळा गळ्यांत घालतात असा वेषकरून ईश्वराचें भजन कीर्तन करून भिक्षावृत्तीनें उपजीविका करणारे जे, त्यांजवर विशेषेंकरून प्रसिद्धि. संतमार्ग, संतमंडळी, इ० स० ;२, ३लिं० संथ.

**संतकी**, स्त्री० संतपणा.

**संतडा**, पु० संतास निंदेनें ह्म०.

**सतत**. अ० संतत प्रथमार्थ.

**संतत**, अ० निरंतर; २, स्त्री० संततीचा अपभ्रंश.

**संततधार**, स्त्री० देवावर मध्यें खंड न पडों देतां अभिषेकार्थ उदकादिकांचा धरितात जी धारा ती; २, ला० पर्जन्य किं० सच्छिद्र भांडें इ० संबंधी कांहीं काल चालते जी धारा ती सम०.

**संतति**, स्त्री० पुत्रपौत्रादि किं० कन्यादौहित्रादि रूपेंकरून होतो जो जीवाचा विस्तार ती.

**सततीस**, ३ लिं० एक संख्या आहे. ३७

**सतंत्र**, ३ लिं० स्वतंत्राचा अपभ्रंश.

**संतप्त**, ३ लिं० अतिशयें करून जो तप्त तो.

**सतम**, स्त्री० न० पर्जन्य, वायु, पोर, इ० संबंधी आपतन, वाहाणें, रडणें, इ० क्रिया यांचा जो दुसऱ्यास कंटाळा यावया जोगा अतिशय ती तें.

**संतमार्ग**, पु० संतजन ईश्वरप्राप्त्यर्थ ज्या मार्गानें वागतात तो मार्ग.

**संतमाळिका**, स्त्री० गुरुशिष्यादि परंपरेनें चालत आली जी संतपरंपरा ती.

**सतरंजी**, स्त्री० सत्रंजी.

**सतरा**, ३ लिं० सत्रा.

**संतर्पण**, न० अन्नदानादिकेंकरून ब्राह्मण, अग्नि, इ० कांस तृप्त करण्याचा जो व्यापार तें.

**संतर्पणे**, अन्नदानादिकेंकरून ब्राह्मण, अग्नि, इ० कांस तृप्त करणें.

**सतसय**, अ० कों० रा० मध्यें खंड न पडतां या शेवटापासून त्या शेवटापर्यंत एकसारखें ओळीनें कोणेक स्थळीं वृक्षादि लागत जाणें जसा, तुळई, इ० पुरणें, इ० वि०; उ०, या वेशीपासून त्या वेशीपावेतों सतसय घरें लागत गेलीं आहेत मध्यें एकही बखळ पडली नाहीं.

**सतसल**, अ० सपसल.

**सतसष्ट**, ३ लिं० एक संख्या आहे. ६७

**सताड**, ३ लिं० रा० स्थितीचा उगर्या तीर्यकत्व किं० अंगीं वक्रत्व हें ज्यास नाहीं असा नीट उभा जो मनुष्य, स्तंभ, इ० तो.

**संतान**, न० संतति, पुत्रसंतान, धर्मसंतान, इ० स०.

**सताप**, पु० एक औषधी आहे.

**संताप**, पु० अग्नि, सूर्य, काम, क्रोध, ज्वर इ० संबंधी अतिशयित जो ताप तो; २, क्रोधावेश; ३, कांहींएक प्रतिकूल संबंधानें कोणेकास येतो जो उद्वेग तो.

**संतापणे**, कोणेकानें क्रोधाविष्ट होणें; २, त्रासणें.

**सतार**, स्त्री० न० एक तंतुवाद्य आहे.

**सतावणे**, छळणें, गांजणें, चेष्टा करणें इ० व्यापारानीं कोणेकास त्रासविशिष्ट करणें.

**संतावणे**, संथावणे.

**संतावें, संताळें**, न० एकानें संत व्हावें अनेकांनीं शिष्य होऊन त्याच्या-

कविधिनिषेधादि न गणितां त्याचें भजनीं लागावें इ० रूप प्रसृत झाला असतो जो संतपणा त्याला ह्म०.

**सती**, स्त्री० परम पतिव्रता जी स्त्री ती;२, भर्तृमरणोत्तर तदुद्देशानें परलोकप्राप्त्यर्थ अग्निप्रवेश करित्ये जी स्त्री ती: सतीजाणें ह्म० भर्तृ मरणोत्तर सतीनें अग्निप्रवेश करणें.

**संती**, ३ लिं० संतसंबंधी जी रीति, वेष, इ० ती.

**सतीचें वाण**, न० ज्याचा एकवार अंगीकार केला असतां सर्वस्वापहार होओ, जीव जाओ, परंतु सोडतां येत नाहीं असा जो कोणेक व्यवहारादि विषय त्यास ह्म०; कोणेकानें सतीचें वाण घेणें ह्म० प्राणहानि होओ, सर्वस्वनाश होओ, जें होणार असेल तें होओ, परंतु मागें सरणार नाहीं अशा संकल्पानें कोणेक कर्मी प्रवृत्त होणें.

**सतीर्थ्य**, पु० एका गुरूचे जे अनेक शिष्य ते परस्पर.

**संतुष्ट**, ३ लिं० संतोषानें युक्त जो तो.

**संतुष्टाई**, स्त्री० संतुष्टपणा.

**सतूप**, न० रा० स्त्रिया, नट, इ० मुख्यावर तकतकी दिसायाकरितां लावितात जी सवारी तें.

**सतेल**, न० आकारविशेषाचें पाणी तापविणें इ० उपयोगी एक धातुमय पात्र आहे.

**सतोटी**, स्त्री० दे० सचोटी.

**संतोष**, पु० कांहीं इष्टानुरूप झाल्यामुळें उद्वेगादि जाऊन बरें वाटतें अशी जी सुखरूप आत्म्याची वृत्ति ती.

**संतोषणें**, कोणेकानें संतुष्ट होणें.

**संतोषित**, ३ लिं० कोणेकानें संतोषविला जो तो.

**संतोषी**, ३ लिं० निरंतर संतोषवृत्तीनें असावें असा ज्याचा स्वभाव तो.

**सत्कण्या**, स्त्री० रा० भात, तांदूळ, कांडून विरून त्यांचा अगदीं कण्या झाल्या असतां त्यांस ह्म०.

**सत्कर्म**, न० ईश्वराला जें आवडतें असें जें दान, यज्ञ, परोपकार इ० कर्म तें.

**सत्कार**, पु० कोणेक अर्थानें महत्वबुद्धीनें मानून नमस्कारादि यथायोग्य उपचार केल्यानें त्याचा होतो जो आदर तो.

**सत्कारणें**, प्र० कोणएकानें सत्कारविशिष्ट करणें.

**सत्कारित**, ३ लिं० सत्कृत.

**सत्कालक्षेप**, पु० सत्कर्माकडे होतो कालक्षेप तो.

**सत्कृत**, ३ लिं० सत्कारिला तो.

**सत्तर**, ३ लिं० संख्या आहे, ७०

**सत्ता**, स्त्री० अस्तित्व, वस्तुसत्ता, व्यावहारिकसत्ता, इ० स०; २, कोणेक अर्थाविषयींचा राजा, इ० जो धणी त्याजकडे जो स्वामित्व संबंध असतो तो, राजसत्ता

ना. शास्त्रसत्ता, इ० स०. सत्तेच्या स० ज्याची सत्ता ज्यावर आहे तो त्याचा ; उ०. हें घर माझे सत्तेचें आहे. अ० सत्तान सत्ताहीस सत्ता आहे असें मानून कोणेक पदार्थ त्या वयाभयेणें. नेणें, इ० वि०; कामाचे वेळे स पहावा तों कोठें नाहीं जेवायला मात्र नेत्र्वदा सत्तेचा येतो : ३. पु० फांशावर जो सातया संख्येचा डाव असतो तो : ४. स त्या.

**सत्ताधारी**. पु० सत्ताधीश.

**सत्ताधीश**, पु० देशादिकांचा अधिकारी जो राजा, मोकाशी, देसाई, इ० तो.

**सत्तानिवृत्ति**, स्त्री० स्वत्वनिवृत्ति.

**सत्तापुरुष**, पु० सत्ताधीश.

**सत्तावन्न**, ३ लिं० संख्या आहे. ५७

**सत्तावीस**, संख्या आहे. २७

**सत्तेचाळ, सत्तेचाळीस**, ३ लिं० संख्या आहे. ४७

**सत्तेताळ, सत्तेताळीस**, ३ लिं० सत्तेचाळीस. ४७

**सत्य**, ३ लिं० वास्तविक ; सत्यभाषा, सत्य संकल्प, सत्यवक्ता, इ० स० : २. न० प्रामाणिकता : उ०, कशीही विपत्ति झाली तरी सत्पुरुष आपलें सत्य सोडित नाहीं : ३, दिव्य जें प्रमाण तें.

**सत्यनाश**, पु० कोणेक अर्थाचा सर्वस्वीं होतो जो नाश तो.

**सत्यनास**, पु० सत्यनाशाचा अपभ्रंश.

**सत्यलोक**, पु० सप्तलोकांतील एक लोक आहे.

**सत्यवादी**, ३ लिं० कदापि असत्य बोलूं नये असा स्वभाव ज्याचा तो.

**सत्यसंध**, ३ लिं० कोणेक गोष्ट अशी करावी असें एकदां मनानें धरलें असतां त्या नियमास टळत नाहीं असा जो पुरुष तो.

**सत्या**, पु० सप्तसंख्या चिन्ह ज्यावर आहे असें जें गंजिफेचें पान तो.

**सत्याण्णव**, ३ लिं० संख्या आहे. ९७

**सत्यानास**, पु० सत्यनाशाचा अपभ्रंश.

**सत्यायशीं. सत्त्यांयशीं**, ३ लिं० संख्या आहे. ८७

**सत्याहत्तर, सत्याहात्तर**, ३ लिं० संख्या आहे. ७७

**सत्येचाळ, सत्येचाळीस, सत्येताळ, सत्येताळीस**, ३ लिं० सत्तेचाळीस.

**सत्योत्तर**, न० शपथादि रूप जें दिव्य करितात तें ; २, अ० सत्योत्तरें.

**सत्योत्तरें**, अ० मी जर खोटें आचरेन तर मला पाप लागेल ईश्वराचा अपराधी होईन असें मनांत आणून प्रामाणिकपणें काहीं बोलणें. लिहून देणें. इ० कांचें वि०.

**सत्पात्र**, न० कोणेक दान देण्याविषयीं योग्य जें पात्र तें.

**सत्याळ**, ३ लिं० रा० लोणस जी हैस. गाय. इ० तो.

**सत्पुत्र**, पु० मातापित्रें इ० जे वडील त्यांचें

चे आज्ञेंत वर्तणारा आणि विद्यादिकें करून आपले कुलाची कीर्ति वाढविणारा-असा जो पुत्र तो.

**सत्पुरुष**, पु० कामक्रोधादि ज्याणें वश केले आहेत, आणि सदाचरण करणारा, ज्याचे हातानें अनेक लोकांचीं हितें होत असावीं, असा जो पुण्यात्मा पुरुष तो.

**सत्र**, न० अनेक मिळून पाळीपाळीनें एकानें यजमान व्हावें इतरानीं ऋत्विज व्हावें तसेंच एकानें वक्ता व्हावें इतरानीं श्रोते व्हावें अशा प्रकारें जें यज्ञरूप किंवा भगवद्गुणकीर्तनरूप इ० कर्म चालवितात तें; २, यज्ञविशेषाची संज्ञा आहे; ३, अन्नसत्र.

**सत्रंग, सत्रंज**, पु० बुदबळें.

**सत्रंजी**, स्त्री० आस्तरणाद्युपयोगी सुताचें जाडें एक वस्त्र आहे.

**सत्रा**, ३ लिं० संख्या आहे, १७; सत्रा पंधरा गोष्टी मांगणें ह्म० तीन तेरा गोष्टी सांगणें.

**सत्व**, न० मायेच्ये तीन गुणांतील एक गुण आहे ज्याचे उत्कर्षानें शांति, क्षमा, दया, इ० गुणाची वृद्धि होत्ये तें; २, अस्तित्व; ३, पदार्थ मात्राचे आंगीं तत्तत्कार्यकरण शक्तिरूप जो तत्वरूप गुण असतो तें, आणि त्या गुणाचा आश्रयभूत जो दहीं, गहूं, गुळवेल, इ० कांचे आंगीं नवनीतादिरूप सारांश असतो तें; ४, ज्या गुणाचा योगानें ज्या अर्थाची लोकांत प्रसिद्धि असत्ये त्या गुणाचा ठायीं त्या अर्थाची अव्यभिचरितपणें जी स्थिति तें; ५, दाता जो आहे तो प्राणही देईल परंतु सत्व सोडणार नाहीं. -कोणे कानें सत्वास जागणें ह्म० प्रसंगीं सत्व संभाळणें; ६, न० पु० प्राणी.

**सत्वगुणी**, ३ लिं० सत्वगुणानें युक्त जो -तो.

**सत्वधीर**, ३ लिं० एका एकीं आपलें सत्व सोडीत नाहीं असा जो दाता, पतिव्रता, इ० तो.

**सत्वर**, अ० लौकर; २, ३ लिं० त्वरा ज्याचे अंगीं आहे तो.

**सत्वरी**, अ० ग्रं० लवकर.

**सत्वशील**, ३ लिं० पाप होईल हें सर्वदा मनांत धरून उच्छृंखलपणें न वागतां मर्यादेनें वागणारा आणि क्रोध, मत्सर, इ० दुर्गुण ज्याचे अंगीं नाहींत अशा स्वभावाचा जो तो; २, सत्वधीर.

**सत्वस्थ**, ३ लिं० सत्वशील प्रथमार्थः; २, सात्विक जें अन्न, धान्य, इ० तो.

**सत्वान्न**, न० सात्विक जें अन्न तें.

**सत्संग**, पु० **सत्संगति**, स्त्री० **सत्समागम**, पु० साधुजनाचा जो संग.

**संथ**, ३ लिं० अतिशयित वेगानें धरितां हलक्या गतीनें वाहणारें जें उदक, वायु, इ०

इ० किं० जळणारा जाळ, तेल, दिवा, इ० बाधणारा जो महामारी इ० रोग इ० जेंग तिविशिष्ट कांहीं एक तो ;२. प्रकृतीनें ग्रां त जो मनुष्य, किं० स्वभाव, इ० तो.

**संथळ**, न० समथल.

**संथा**. स्त्री० थोडा थोडा अंश घेऊन घोका वा अशा प्रकारें कोणेक ग्रंथविभागा-च्या करितां तजो पाठ तो.

**संथावणें**. कोणेकानें संथ करणें; उ०. या वाऱ्यास जर घटकाभर ईश्वर संथावी ल तर हें गलबत सोईनें तडीस आईल.

**सदतीस**, ३लिं० सततीस.

**सदन**, न० सं० गृह.

**सदर**, न० व्यावहारिक लिहिण्यामध्यें जा प्रकरणाचे पोटचे अनेक भेद विशेषरू पें करून खालीं लिहावयाचे असतात त्या प्रकरणाच्या सामान्यरूपें करून वर करितात जो उल्लेख तें;२, सदररूप जो अ र्थ त्याचा उल्लेख करावयाचें जें मुख्य वर चें स्थान तें;३. भाषणादिकांत ही अवां तर विशेषादि प्रतिपादनार्थ त्या त्या प्रक रणाच्या सामान्यरूपें करून जो प्रथमतः उल्लेख करितात त्यासही म्ह० ;४, अ०- अमुक असतां करावें, अमुक नसतां क रूं नये, इ० रूप जें कोणेक विधीचें संकोच क विशेष त्यांस न धरितां सामान्यरूपें क रून कोणेकास कांहीं मागणें, परवान गी देणें, इ० कांचें वि०, उ०, महाराज कचेरीस अस. असतील तेव्हांच यावें नाहींतर येऊं नये. असें नाहीं केव्हां पाहिजे तेव्हां यावें अशी आह्मास सदर परवानगी आहे, तुला सदर सांगून ठेवतों तो कोणी आपला इष्ट असो अथवा पैका मिळो पण कोणा स जामीन राहूं नको; सदर, ताकीद, सदर परवानगी, इ० स०;५, स्त्री० सर्का रचे कचेरीची जी जागा ती.

**सदरघडणी**, स्त्री० जमाखर्ची लिहिण्यां त एक एक जातीचा पदार्थींचा अनेक व्यहारीं अनेक मितींनी विनियोग झा ला असतो त्या पदार्थांची झडती लागा वी ह्मणून निराळीं निराळीं प्रकरणें क रायासाठीं त्याचीं त्याचीं सदरें सांध ण्याचा जो व्यापार ती.

**सदरबारगीर**, पु० राजादिक सदरेस बसले असतां रक्षणार्थ त्याणी सदरे सच येऊन बसावें एतद्विषयीं नियुक्त जे शिपाई ते प्र०;२, ला० ज्याचा इतर कां हीं उपयोग नाहीं केवळ सभेंत शोभा र्थ बसायाचे मात्र उपयोगी असा जो अप्रयोजक पुरुषादिक त्यास ह्म०.

**सदरमुखी**, ३लिं० कों० ग्रहद्मुखी.

**सदरहू**, अ० लेखामध्यें वर लिहिला जो कोणेक अर्थ त्याचें परामर्शक हें अव्य य, व्यवहारी लिहिण्यांत प्र०.

**संदर्भ**, पु० कथा, गोष्ट, भाषण, इ० संबं धी वाक्यें, पदें, इ० अर्थ परस्परें अवि

त,

त होऊन त्यांचा पूर्वापर संबंध लागतगे ला असतो तो ;२, वधूवरांचा विवाहद्वा रा परस्पर योग घडावा ह्मणून तद्विषयीं कोणी कोणाकडे आणि तोजें संधान त्या सह्म॰

**संदला**, पु॰ दरजा भरणें भींत, गच्ची, इ॰ साफ करणें इत्याद्यर्थ आंत कात, ताग, इ॰ मसाल्याचीं द्रव्यें घालून वाटून सिद्ध केला जो चुना तो ;२, त्या चुन्यानें भित, गच्ची, इ॰ कांवर करितात जो लेपरूप संस्कार तो.

**सदसद्विचार, सदसद्विवेक**, पु॰ कोणेक गोष्टीविषयीं सत् कोणतें, असत् कोणतें, इ॰ रूप जो विचार तो.

**सदलाबदल**, स्त्री॰ अदलाबदल.

**सदसष्ट**, ३लिं॰ सतसष्ट.

**सदा, सदाँ**, अ॰ निरंतर, कालवृत्ति प्र॰

**सदागुलाब**, पु॰ एक फुलझाड आहे.

**सदाचरण**, न॰ लोकशास्त्रानुसार उत्तम जें आचरण तें.

**सदाचार**, पु॰ उत्तम जो आचार.

**सदाफुली**, स्त्री॰ एक फुलझाड आहे.

**सदावर्त्त**, न॰ आल्यागेल्यास अन्न घालावें, किं॰ शिधा द्यावा, असें जें कोणेकानें धर्मार्थ मच घातलें असतें तें.

**सदावर्ती**, ३लिं॰ सदावर्त संबंधी जें भोजनादि तो.

**सदाशिव**, पु॰ शंकर.

**सदासर्वदा**, अ॰ नेहमी.

**संदिग्ध**, ३लिं॰ संदेह विषय जो ग्रंथ, अक्षर, भाषण, इ॰ तो.

**संदिसा**, अ॰ अत्तांसा.

**सदी**, स्त्री॰ कों॰ सद्दी.

**सदीं**, अ॰ ग॰ सदीस.

**सदी**, ३लिं॰ सनदी.

**सदीस**, अ॰ सदायाचा अपभ्रंश शब्द भाषावृत्ति.

**सदुसष्ट**, ३लिं॰ सतसष्ट.

**संदूक**, स्त्री॰ काष्ठादिकांची जी मोठी पेटी

**सद्दढ**, ३लिं॰ दढत्व विशिष्ट जो तो.

**सदृश**, ३लिं॰ गुणादिकें करून जो जागीं तुल्य तो त्याशीं ; उ॰, पितृसदृश, पशुसदृश, मत्सदृश, इ॰ प्रा॰ स॰ प्र॰.

**संदेश**, पु॰ कोणाएकाबरोबर कोणेकास कांहीं एक कार्याविषयीं सांगून पाठविली जी आज्ञा किं॰ निरोप तो.

**संदेसा**, पु॰ ग्रं॰ संदेशशब्दाचा अपभ्रंश, उ॰, संदेसा सजणाला सांगा.

**संदेह**, पु॰ होय किं॰ नाहीं असें किं॰ असें नव्हे, इत्याकारक उभयकोटय वगाही जें ज्ञान तो.

**संदेही**, ३लिं॰ संशयी.

**सदैव**, अ॰ सदा.

**सदोदीत**, अ॰ सदैव.

**सद्गत**, स्त्री॰ सद्गतिशब्दाचा अपभ्रंश ;२, कर्त्यानुरयार्थ निषेधविषयीं प्र॰ ; उ॰,

कारकुनास चाकरी केल्यावांचून सद्द नाहीं.

**सद्गति**, स्त्री० सत्कर्मादिकें करून जीवास उत्तमलोकप्राप्ति, सत्कुलीं जन्म, विद्याधनादियोग, इ० ह्मणजे अशाजी उत्तम अवस्था प्राप्त होत्ये ती.

**सद्गदित**, ३लिं० दुःखानें किं० आनंदानें अश्रु केल्यानें भरल्यामुळें दाटून येतो जो कंठ तो, किं० तशी अवस्था झाली आहे ज्याची तो मनुष्य.

**सद्गुण**, पु० विद्या, कला, शौर्य, उपकारकता, सहिष्णुता, इ० रूप कोणेकाचे अंगीं असतो जो उत्तम गुण तो.

**सद्गुरु**, पु० ईश्वरप्राप्तीचा मार्ग दाखविणारा असा जो गुरु तो.

**सद्गृहस्थ**, पु० घातुक, लबाड, असा नव्हे भला, प्रमाणिक, जो गृहस्थ तो.

**सद्दी**, स्त्री० जें केलें तें पारपडावें, साजरें दिसावें, असा कोणेकास अनुकूल काल असतो तो.

**सद्धर्म**, पु० उत्तमप्रकारचा जो धर्म तो. सद्धर्मास येणें ह्म० उचितास येणें.

**सद्या**, **सद्यां**, अ० सद्यां.

**सद्भाव**, पु० साधुत्व; २, अस्तित्व.

**सद्म**, न० सं० सदन.

**सद्यः**, अ० वर्तमानकालीं; २, ३लिं० कों० साजूक या अर्थः याचा प्रयोग करितात.

सद्यःपक्ष,

**सद्यःपक्ष**, पु० कोणेक कर्माचीं अंगें आदिपश्चात् करून तें कर्म मुख्यकालीं करावें असा एक पक्ष आहे तो सोडून जेव्हां चे तेव्हांच अंगें उपांगें कायकरायाचें असेल तें करून कर्म करावें असा जो करण्याचा प्रकार तो.

**सद्यस्क**, ३लिं० सं० सद्यः उत्पन्न झाला किं० आणिलेला जो पदार्थ तो.

**सद्यस्कालीन**, ३लिं० सद्यस्क.

**सद्यां**, अ० दे० सद्यः प्रथमार्थी.

**संध**, स्त्री० संधिशब्दाचा अपभ्रंश.

**संधान**, न० सांधण्याचा जो व्यापार तें; २, नेत्रादिइंद्रियें, बाण, गमनादिक तीं, इ० जे त्यांणीं स्वस्ववृत्तीनें आकलित करायाचे जे इंद्रियार्थ, वेध्यलक्ष्य, कर्तव्यकार्य, गंतव्यस्थल, इ० विषय, त्यांस अनुलक्षून जो त्या इंद्रियादिकांचा रोख झाला असतो तो; ३, कोणेक कार्य विवक्षानुरूप होण्याचा जो मार्ग किं० युक्ति तें आणि तो मार्ग करण्याचा व्यापार तें.

**संधानी**, ३लिं० काहीएक गोष्टीचें संधान लावण्याविषयीं जो कुशल तो.

**संधि**, पु० स्त्री० भिन्नभिन्न जे दोन अर्थ त्यांचा कोणेएके अंगीं जो एकमेकाशीं मीलितपणा होतो तो; २, त्याचा अर्थ-मीलितपणा होतो तो तो त्यांचा मध्यप्रदेश तो; ३, विचारास कार्या विषयीं अनुकूल

नुकूल जो देश, कालक्रम, एतत्संबंधी प्रतिकूल विभागाचे मधला अंश तो त्या विवक्षित कार्याचा; ४, समेट; ५, दोहों शब्दस्वरूपांची अव्यवहितपणें स्थिति झाली असतां जो मध्यें कांहीं विशेष होतो तो.

**संधिवात, संधिवायु**, पु० आमांशादिकांचे योगानें मनुष्याचे हस्तपादाद्यवयवांचे सांधे धरतात, आखुडतात, असा जो वायु होत असतो तो.

**संध्या**, स्त्री० ब्राह्मणांनीं प्रतिदिनीं त्रिकाळ आचरायाचें एक कर्म आहे; २, सं० संध्याकाल.

**संध्याकाल, संध्याकाळ**, पु० स्त्री० सूर्यास्तमय किं० तत्संनिहित जो काळ तो ही.

**संध्याकाळी**, स्त्री० गुलबाशीस म्ह०.

**संध्यापात्र**, न० संध्या करत्ये समयीं पाणीं सांडावयास घेतात जें ताम्हन तें.

**सन**, न० यवनी सालाचा वाचक प्रा० लेखांत प्र०; उ०, सन १८२३.

**सनई**, स्त्री० वाजंत्री लोकांचें मुख्यानें वाजवायाचें एक वाद्य आहे.

**सनकाडी, सनकांडी**, स्त्री० सणकाडी.

**सनंग**, न० वस्त्र, परंतु क्रयविक्रयादि प्रसंगीं प्र०; २, स्त्री० क्रयविक्रय विवाह इ० प्रसंगीं पशु, स्त्री, इ० कांस म्ह०.

**सनद**, स्त्री० कोणाएक व्यवहाराविषयीं कोणाएकाचा अधिकार चालावा म्हणून त्यास सर्कारांतून करून देतात जें प्रा० शिक्याचें पत्र तें; २, स्त्री० कोणाएक गोष्टीविषयीं प्रमाणार्थ करून मानितात जें कोणे काचें वाक्य, ग्रंथ, इ० त्यास प्रसंगविशेषीं म्ह०.

**सनदी**, ३ लिं० ज्याजवळ सनद आहे असा जो कोणीएक व्यवहारस्थ, इ० तो; २, रोजमरा ठेवजी जागीर सनद करून जमा न दिल्हा असतां असा जो शिपाई इ० तो.

**सनय, सनयी**, स्त्री० सनई.

**सनवद बाकी, सनवाद बाकी**, स्त्री० ग्रामादिकांकडे मागील सालची राहिली असत्ये जी सर्कारसंबंधी सारा इ० कोंची बाकी ती.

**सनातन**, ३ लिं० सं० अनादिसिद्ध शाश्वत जो ईश्वर, धर्म, इ० तो.

**सनाथ**, ३ लिं० अनाथाचा प्रतिपक्षी

**सनाभ**, ३ लिं० मध्यें मूळग्रंथ आणि दोहों बाजूंस टीका अशाप्रकारें लिहिला जो ग्रंथ, पुस्तक, इ० तो.

**सन्निकृष्ट**, ३ लिं० सं० जवळचा पदार्थ किंवा जो कोणेक अर्थ तो; २, अ० सन्निकृ तीचा अर्थी.

**सन्निध**, अ० सन्निकृष्ट अव्ययाचा अर्थी.

**सन्निधान**, न० सं० कोणाएकाचें कोणाएकाशीं जें विवक्षित सामीप्य तें

सन्निपात.

**सन्निपात**, पु० वात, पित्त, कफ, यांचा क्षोभ झाल्यामुळें जो विकृति विशेष होतो-तो.

**सन्निहित**, ३लिं० संनिकृष्ट.

**सन्मान**, पु० सत्कार.

**सन्मानणें**, ग्रं० सत्कारणें.

**सन्मानित**, ३लिं० सत्कारित.

**सन्मार्ग**, पु० उत्तम रीतीचा जो मार्ग तो.

**सन्मुख**, ३लिं० संमुख शब्दाचा अपभ्रंश.

**सनला**, पु० संदला.

**संप**, पु० कों० कांहीं एक व्यवहाराविषयीं अनेकानीं केलें जें ऐक्यमत्य तें; उ०, गांयकऱ्यांचा जर का संप असता तर तेव्हांच धुडकावून दिल्हा असता.

**सपक**, ३लिं० पाहिजे तितकें मीठ किं० मासाखर न पडल्यामुळें रुचीस कमी झाला जो भाजी, लाडू, इ० पदार्थ तो.

**संपच्छनवार**, पु० श्रावण मास संबंधी जो शनिवार तो.

**संपच्छुक्रवार**, पु० श्रावण मास संबंधी जो शुक्रवार तो.

**संपणें**, द्रव्यादि कोणेक अर्थाचा कांहीं एक कार्याकडे व्यय होऊन तो निःशेष होणें; २, ला० आरब्ध कार्य तत्तत्क्रिया द्वारा समाप्त होणें; ३. कोणेकानें मरणें.

**संपत्**, स्त्री० सं० संपत्ति.

**संपत्ति**, स्त्री० कोणेकापाशीं आपल्यासत्तेंत असतो जो पैका आदिकरून हत्ती, घोडे, रत्नें, वस्त्र, पात्र, गृह, भूमि, दास, दासी, इ० यच्चयावत् भोग्यपदार्थांचा-जो समुदाय तो; २, संपादला गेला जो कोणेक अर्थ त्यावरील जो धर्म तो.

**संपत्तिमान्**, ३लिं० संपत्ति आहे जास-तो.

**संपत्तिवान्**, ३लिं० संपत्तिमान् याचा अपभ्रंश.

**सपत्न**, पु० सं० शत्रु.

**सपत्नी**, स्त्री० सं० सवत.

**सपत्नीक**, ३लिं० पत्नी जास आहे तो पत्नीसहित जो तो.

**संपत्शनवार**, पु० संपच्छनवार

**संपत्शुक्रवार**, पु० संपच्छुक्रवार.

**संपदा**, स्त्री० संपत्ति.

**सपन**, न० पु० स्वप्न शब्दाचा अपभ्रंश.

**संपन्न**, ३लिं० जो द्रव्य, विद्या, गुण, इ० केंकरून जो युक्त तो तत्संपन्न; उ०, शास्त्रसंपन्न, धनसंपन्न, पुत्रसंपन्न, इ० स० प्र०; २, पु० धनिक; उ०, ते कांहीं आह्मासारिखे दरिद्री नाहींत संपन्न आहेत.

**संपर्क**, पु० कोणेकाचा कोणेकास स्पर्शादिरूप जो संबंध तो.

**सपसप**, अ० वारंवार कोणेकाचे घरीं जाणें, बोलणें, इ० कांचें वि० प्रा० निषेधविषयीं प्र०.

सपसल, अ॰ आकुंचनादिद्वारा अवयवां चे पतनप्रवाहास प्रतिकूल नहोतां को. णेकानें पडणें, आपटणें, इ॰ कांचें-धि॰.

सपाट, ३ लिं॰ खळगा, किं॰ उंचवटा, इ॰ ज्याचे अंगीं नाहीं असा जो प्रदेश तो आ-णि तद्विशिष्ट भूम्यादिपदार्थ तो; २, शि गल्होटा; ३, अ॰ झपाट, सं॰ पुढें पाठ आणि मागें सपाट.

सपाटणें, झपाटणें.

सपाटा, पु॰ कडाखा.

सपाटी, स्त्री॰ भुम्यादिकांचा जो सपाट पणा ती.

संपात, पु॰ मार्गसूत्र इ॰ किती एक पदा-र्थ दोहींकडून तिर्यक् किं॰ संमुख येऊ न झाला जो त्यांचा संयोग तो.

संपादक, ३ लिं॰ विद्या. धन. इ॰ कोणेक अर्थातें संपादणारा जो तो; २. पु॰ रा॰ विवाहादि जें कोणेक कार्य त्यास पाहि जे काय, नको काय, इ॰ विषयक देख रेख राखून त्या कार्याचा भार आपले अंगावर घेऊन तें कार्य शेवटास नेणा रा जो कोणी कारभारी असतो तो.

संपादणी, स्त्री॰ कांहीं आणलें जें सोंग तद्विषयीं किं॰ घसरली अथवा खोटी जी कोणेक गोष्ट तद्विषयीं भाषणादिकें करून तें तें वास्तव्यत्कारीं नीटनेटकें करू-न दाखविण्याचा जो व्यापार ती.

संपादणूक, स्त्री॰ संपादणी.

संपादणें, विद्याद्रव्यादि मिळविणें; २, को णेक कार्य करून येणें; ३. कोणेक गोष्ट सं पादणीनें विशिष्ट करणें.

संपादन, न॰ संपादण्याचा जो व्यापार तें.

संपादनी, स्त्री॰ संपादणी.

संपादनूक, स्त्री॰ संपादणूक.

संपादित, ३ लिं॰ संपादिलेला जो द्रव्यादि पदार्थ तो.

सपासप, अ॰ अनुकरण, तरवार इ॰ कानें अनेकास मारणें, तोडणें, इ॰ कांचें वि॰.

सपासपी, स्त्री॰ तरवार, इ॰ कानें सपास प ओकीं इ॰ तोडण्याचा जो व्यापार ती.

सपिठी, स्त्री॰ सपीठ.

सपिंड, पु॰ मूळपुरुषापासून सातपिढ्यां पर्यंत जी संतति तीचे ठायीं उत्पन्न जे ते परस्पर.

सपिंडी, स्त्री॰ मेल्यामनुष्याचें प्रा॰ बारा-वे दिवसीं एकपार लौकिक कर्म करिता त ती.

सपीठ, न॰ प्रा॰ गहूं ओलवून दळून, गा-ळून बारीक करितात जें पीठ तें.

सपील, अ॰ कों॰ गाय, म्हैस, इ॰ कांचें दू धन काढितां, वासरूं सोडणें, वासरानें पिणें, इ॰ कांचें वि॰.

संपुट, पु॰ सं॰ दोन पुडें ज्यास असतात अ सा जो करंडक इ॰ तो.

संपुटीकरण. न॰ सं॰ कोणेक अर्थ मध्ये

सांपडला जाई असें त्यास कोणेक अर्थ दे हो करून जोडण्याचा व्यापार.

**सपुरता**, ३लिं॰ अपुरत्याचा प्रतिपक्षी.

**संपुष्ट**, पु॰ संपुट शब्दाचा अपभ्रंश ;२, आकार विशेषाचें धातु इ॰ कांचें पात्र आहे, कोणेकाचें संपुष्टांत येणें इ॰ गोकर्णांत येणें.

**संपूर्ण**, ३लिं॰ सकल प्रथम द्वितीयार्थ ;२, पूर्ण द्वितीयार्थ ;३, करतां करतां समाप्तीस पावली जो पारायण, व्रत, इ॰ अर्थ ते ;४, न॰ व्रतादिकांचे सांगतार्थ जें उद्यापन, ब्राह्मण भोजन, इ॰ रूप कर्म करितात तें.

**संपूर्णता**, स्त्री॰ ग्रंथ, कार्य, इ॰ कांची समाप्ति ती ;२, व्रतादिकांची जी सांगता ती.

**सपोट, सपोटी**, अ॰ रा॰ चाकरी इ॰ कां बद्दल द्यावयास केलें जें कांहीं द्रव्य त्यांतच त्याणें आपले पोटास खावें निराळें मागूं नये असा जो बोलीचा प्रकार त्या प्रकारें, चाकर ठेवणें, त्याची बोली करणें इ॰ कांचें वि॰.

**सप्त**, ३लिं॰ सं॰ संख्या ७. याचे समास, सप्तसागर, सप्तपर्वत, सप्तपाताल, इ॰.

**सप्तऋषि**, पु॰ कश्यपादिक सात ऋषि ते ज्यांचे तारे आकाशांत आहेत.

**सप्तक**, न॰ एकजातीय सप्तपदार्थांचा जो समुदाय तें.

**सप्तगोदावरीतीर**, न॰ जा देशांत गोदावरी नदी सप्तधा होऊन समुद्रास मिळावयास गेली तो देश.

**सप्तग्रही**, स्त्री॰ कोणेक कालीं एकाराशीस जो सात ग्रहांचा समुदाय होतो ती.

**सप्तति**, स्त्री॰ सं॰ संख्या. ७०.

**सप्तपदी, सप्तपदीक्रमण**, न॰ विवाहांतील लाजा होमोत्तर एक कर्म आहे.

**सप्तम**, ३लिं॰ सात या संख्येचा जो पूरक तो.

**सप्तमी**, स्त्री॰ पंधरा तिथींतील सातवी जी तिथि ती ;२, सातवीजी विभक्ति ती.

**सप्तमृत्तिका**, स्त्री॰ गज, अश्व, जास्त्रीं बांधित असतात तें स्थल, चवाठा, वारूळ, इ॰ संबंधी सातां ठिकाणचा कोणेक कार्यार्थ आणितात ज्या मृत्तिका त्या.

**सप्ताह**, पु॰ **सप्ताहपारायण**, न॰ सात दिवसांत भागवत इ॰ पुराणाचें जें पारायण करितात तो तें.

**सप्न**, न॰ पु॰ सपन.

**सप्पा**, पु॰ मारणें, खाणें, इ॰ कानीं जो सत्यानास तो, वळणें, होणें, करणें, उडणें, इ॰ कांचे योगीं प्र॰.

**संप्रति**, अ॰ सं॰ सांप्रत.

**संप्रदान**, न॰ कर्तास्वनिष्ठ क्रियेचे कर्मानें किं॰ स्वनिष्ठ क्रियेनें जो कारक रूप अर्थातें अभिसंबद्ध करितो असें जें कारक तें ;उ॰, ब्राह्मणाला गाय दिली एथें ब्राह्मण हें संप्रदान, मुलासाठीं रडते एथें

एथें मूल हें संप्रदान.

**संप्रदाय**, पु॰ रीति, संप्रदायानुरूप इ॰ स॰ २, पदशक्तीचा अनुरोधानें जो अर्थ तो त्याप्र थं जोचें तात्पर्य असतें नाहीं विशिष्टाचें कोणेंक विशिष्ट अर्थांतरीं तात्पर्य असतें अशीं जीं नाकानें कांदे सोलणें, अंगावर तुटून पडणें, इ॰ लोकसंप्रदाय सिद्ध या क्यें भाषेंत चालतात तीं प्र॰.

**संप्रदायशुद्ध**, ३लिं॰ पायाशुद्ध.

**सफई**, स्त्री॰ सफाई.

**सफर**, पु॰ यवनी महिन्यांतील जो दुसरा महिना तो; २, स्त्री॰ गलबतसुद्धां जी विवक्षित रक्कलीं सफरीलोकांची खेप ती; आणि त्यांस तत्संबधी देतात जें वेतनादि ती, सफर साधणें इ॰ शिकार साधणें.

**सफरी**, पु॰ गलबतावर तांडेलावांचून जे वलिवणें इ॰ त्याद्यर्थ कारणी मनुष्य ठेविले असतात ते प्र॰.

**सफल, सफळ**, ३लिं॰ विवक्षित फलानें युक्त जो वृक्षादि, व्यापार, मनोरथ, इ॰ तो.

**सफाई**, स्त्री॰ काष्ठपाषाणादि पदार्थांवर घोटणें, तासणें, साफ करणें, इ॰ संस्कारानें जो गुळगुळीतपणा, नीटनेटकेपणा, इ॰ रूप धर्मविशेष उत्पन्न होतो ती; २, जामध्यें नीटनेटकेपणा असा कानसा आहे आणि व्यंग सहसा दुसऱ्यास दिसूनये असा जो भाषण लेखनादि कांविषयींचा कृतिप्रकार तो; ३, भाषणादि कोणेक कार्याविषयीं जो शिताफी ती.

**सफांशी**, ३लिं॰ जो सफांसा जोडला आहे असी जी पुतळी, मोहर, इ॰ ती.

**सफेजंगी**, स्त्री॰ लुटणें, मारणें, खाणें, इ॰ कारणानीं देश इ॰ कांचा जो सत्यानास तो.

**सफेत**, ३लिं॰ स्वच्छ जो पांढरा तो, पांढरेपणाचा अतिशय वर्णायाचा असतां पांढरा एतत्समभिव्याहारीं हें विशेषण ही तें; उ॰, हा कागद पांढरा सफेत आहे.

**सफेतमुसळी**, स्त्री॰ एक औषध आहे.

**सफेता**, पु॰ रंग इ॰ करायाचे उपयोगी खडासारिखा एक पांढरा पदार्थ आहे.

**सफेती**, स्त्री॰ भिंत इ॰ सफेत करायासाठीं जो चुना इ॰ कानीं त्यांस लेपरूप संस्कार करितात ती; २, सफेतपणा.

**सफ्फर**, पु॰ स्त्री॰ सफर.

**सबजा, सबजा**, पु॰ एक झाड आहे.

**सबजी**, स्त्री॰ पदार्थ निम्नरंग करून जो हिरवेपणा ती; २, प्राशनाद्यर्थ भांगेचें जें पाणी करितात ती.

**सबंद**, ३लिं॰ सबंध.

**संबंध**, पु॰ परस्परें भिन्न स्वरूप जे अर्थ त्यांचा कोणेक प्रकारें करून एक मेकाशीं जो लागूपणा असतो तो, जाचेंजन्यजनकभाव, सेव्यसेवकभाव, इ॰

आणि संयोग समवायादि अवांतर भेद आहेत; शरीरसंबंध, यौनसंबंध, परंपरा संबंध, इ० स०; २, ब्राह्मण मरून जो पिशाच झाला तो.

**सबंध**, ३लिं० अवांतर अवयव इतस्ततः न व्हावे इत्याद्यर्थ जो कांहींएक बंध करून जा रचनेनें रचित केला असतो तो बंधनसुटतां त्या रचनेनें विशिष्ट जो तो पदार्थ तो; उ०, फुटकळ सनगें घ्यायीं त्यापेक्षां सबंध गांठोडें घ्यावें तें बरें, गुळाची ढेंप सबंध जर वजन केली तर अधिक भरेल.

**संबंधन**, न० परस्परांचा संबंध करण्याचा जो व्यापार तें.

**संबंधी**, ३लिं० ज्याचा संबंधानें जो युक्त तो त्याचा; तत्संबंधी, ग्रामसंबंधी, इ० स० ;२, पु० शरीरसंबंधी.

**सबनिशी**, स्त्री० सबनिसाचा जो अधिकार तो.

**सबनीस**, पु० शागीर्दपेशा इ०कांस रोजमुरा वांटावा ह्या कामावर जो अधिकारी ठेविला असतो तो.

**सबब**, स्त्री० कोणेका गोष्टीस लाविलें जें कांहींएक कारण तें; उ०, प्रभूचे मनांत लुटावें असें असल्यास कोणतीतरी सबब लावून लुटील; २, अ० कोणेक कारणास्तव; उ०, त्याणें शिव्यादिल्या सबब मी तोंडांत मारली.

**सबर**, ३लिं० सगर्भ परंतु घोडी, गाढवी, खेचरी, यांविषयीं प्र०.

**सबल, सबळ**, ३लिं० निर्बलाचा प्रतिपक्षी तो.

**सबसणीस**, अ० (बसणें) रा० एकदेशी भारादि पडलें असतां ही उलटून ये अशा प्रकारें भूम्याद्या धारावर पाषाणादिकांनीं पुरतेपणीं बसणें.

**सबसब**, अ० वारंवार.

**संबळ**, पु० गोंधळी इ० कांचें एक चर्मवाद्य आहे.

**संबळी**, स्त्री० वेत, वंश, इ० कांचें देव इ० ठेवायासाठीं एक पात्र करितात ती.

**सबळी**, ३लिं० बळसहित जें बुदबळ त्यासही मारावें असा बुदबळें खेळण्याचा एक प्रकार आहे त्या प्रकारचा जो डाव तो.

**संबळ्या**, पु० संबळ वाजविण्याचें कसब करितो तो.

**सबा**, न० सातया संख्येचा संज्ञा परंतु यवनी सालाविषयीं प्र०.

**सबाह्याभ्यंतर**, न० बाह्यात्कारीं लोकांत वर्तायाची जी वृत्ति त सह वर्तमान जी कोणेकाची अंतःकरण वृत्ति तें; उ०, या पुरुषाचें सबाह्याभ्यंतर मला समजलें आहे; २, अ० तादृश जी अंतःकरणवृत्ति तीणें करून; उ०, सबाह्याभ्यंतर जर हरीस भजाल तर तो पावेल.

**सबुरी**, स्त्री० कांहीएक कर्तव्य गोष्टीविषयीं घाई, उतावळी, नकरितां कांहीं काल दम धरून उगेंच राहाण्याचा जो व्यापार तो; उ०, यालग्नसराईंत कापड घेतलें असतां महाग पडेल याजकरितां दोनमहिनें सबुरी करा.

**सबूर**, स्त्री० सबुरी.

**सबेन**, न० यवनी सालांत नायकीचें एक साल आहे.

**संबोधणें**, कोणेकास संबोधन विशिष्ट करणें.

**संबोधन**, न० कोणेकास कांहींएक अर्थ बोधवायाकरितां हाक मारण्याचा व्यापार तें आणि तदर्थ उच्चारितात जीं रामा, कृष्णा, इ० रूप प्रथमांत नामें किंवा अरे हे इ० शब्द तें; २, स्तुत्याद्यवसरीं कोणेकास देतात जें विशेषण त्यास कोणी ह्म०; उ०, तो सुज्ञ आहे. थोर आहे. धीट आहे, हीं एवढीं त्यास संबोधनें करशाला देतां तो कसा तो मला ठाऊक आहे.

**संबोधिल**, ३ लिं० संबोधिला जो तो.

**सब्बा**, न० सबौं.

**सब्बेन**, न० सबेन.

**सभर**, ३ लिं० सबर; २, भारादि विशिष्ट होत्सातां पुरतेपणें, कोणेकावर पायपडणें. टोला बसणें, काठीमारणें, इ० कांचें वि०.

**सभर्तृका**, ३ लिं० जीचा भर्ता जिवंत आहे अशी जी स्त्री तीचें वि०; २, भर्त्यासह वर्तमान जी स्त्री ती.

**संभव**, पु० अर्थानें असायास किंवा व्हावयास जी साधनसामग्री अपेक्षित असत्ये ती असल्यामुळें त्या अर्थाचे अंगीं असण्याविषयीं किं० होण्याविषयीं जी योग्यता असते ती; २, होइलच होईल अ सेलच असेल. असा निश्चय नहोतां असेल तर असेल, झालें तर होईल, असें कोणेक अर्थाविषयीं जें अंतःकरणांत ज्ञान होतें तो; उ०, तिकडचें पाणी हवा कसें आहे ह्मणून तूं जेव्हां विचारतोस तेव्हां तूं तिकडे रहावयास जाणार असा मला संभव होतो; ३, उत्पत्ति, गर्भसंभव, रोगसंभव, कफसंभव, इ० स०; ४; ३ लिं० ज्यापासून ज्याची उत्पत्ति तो त त्संभव, कुंभापासून संभव ज्याचा तो कुंभसंभव, पद्मसंभव, योनिसंभव. इ० स० प्र०.

**संभवणें**, कोणेक अर्थानें संभवविषय होणें; २, कोणेक अर्थानें उत्पन्न होणें.

**सभोंवता, सभोंवताला, सभोंवती.** अ० भोंवताला.

**सभा**, स्त्री० कांहीं कारणास्तव राजा, राजलोक किंवा विद्वान, पंडित, गुणी. इ० कांचा समाज व्हावयाकरितां निर्मिलें असतें जें स्थळ ती; २, त्या स्थळीं किं०

किं॰ कोणेकस्थलीं त्याच्या झाला जो समाज तो, राजसभा, ब्रह्मसभा, इ॰ स॰.

**सभाकंप**, पु॰ सभादिकांचा ठायीं भयादिकारणानें भाषणादि व्यापाराविषयीं शरीरास कंपसुटावा, घामयावा, भलताच शब्द तोंडांतून यावा, इ॰ रूप कोणेकास प्राप्त होते जी अवस्था तो.

**सभागी**, ३ लिं॰ सभाग्य शब्दाचा अपभ्रंश.

**सभाग्य**, ३ लिं॰ भाग्यवान्; २, ज्याचे हातून बहुतांवर उपकार होत असावे, ज्याचे योगानें बहुतांचें हित होत असावें, असा जो कोणी पुरुषादि त्यास म्ह॰; उ॰. कोणा सभाग्याचा हातानें वोहणी झाली माझा जिन्नस लौकर विकला.

**सभाचातुर्य**. न॰ सभादिकांचाठायीं यथायोग्यपणें वागण्याचें जें चातुर्य तें.

**सभादीप**, पु॰ श्रावणीचें दिवशीं सभेंत ब्राह्मण, अग्नि, यांचे संन्निध ब्राह्मणास दान देतात जो दिवा तो.

**सभाधीट**, ३ लिं॰ सभादिकांचे ठाईं भयादि नधरितां भाषणादि व्यापारीं धीटपणें प्रवृत्त होतो जो तो.

**सभानायक**, पु॰ सभेचे ठायीं मुख्य-जो विद्वज्जन इ॰ अधिकारी तो.

**सभापांडित्य**, न॰ तादृश अांगीं विद्यादि असो किं॰ नसो परंतु सभा इत्यादिकांचे ठायीं भाषणामध्यें पांडित्य करण्याविषयीं जें कोणेकास सामर्थ्य असतें तें.

**सभामंडप**, पु॰ देवालयापुढें च कथा, कीर्तन, पुराण, इ॰ कांसाठीं जो लाकडी, दगडी, असा केला असतो मंडप तो.

**संभार**, पु॰ यज्ञ युद्ध इ॰ कार्यांचा जो सामग्री समुदाय तो. याचे स॰ पूजासंभार, सेनासंभार, इ॰

**सभारंजन**, न॰ सभादिकांचे ठायीं स्थित जे लोक त्यांस गायन, नृत्य, पांडित्य, कीर्तन, इ॰ गुणें करून रंजिवण्याचा जो व्यापार तें.

**संभावणें**, कोणेक अर्थ संभावनाविषयीं यार्थविषय करणें.

**संभावना**. स्त्री॰ संभव प्रथम द्वितीयार्थी; २, हा पदार्थ बहुत करून अमुक स्वरूप असेल, किं॰ या स्थलीं अमुक-अर्थ असेल, किं॰ अमुक स्थली अमुक पदार्थ असेल काय, इ॰ रूप जो मनो व्यापार तो; ३. पंडित, वैदिक, पुराणीक, हरिदास, इ॰ कोणी प्रतिष्ठित जो भिक्षुक तो कांहीं निमित्तानें आपले घरीं आला असतां त्यास निरोप देते समयीं दक्षिणादि दानें करून त्याचा करितात जो गौरव तो आणि तें देतात जें दक्षिणादि तो.

**संभावित**, ३ लिं॰ संपन्निमत्ता, विद्वत्ता इ॰ कानीं जो प्रतिष्ठित तो; २, संभावना विषय जो अर्थ तो.

**संभाव्यमान**, ३लिं० संभावना ह्मिती यार्थ विषय केला जातो आहे जो कोणेक अर्थ तो.

**संभाषण**, न० कोणएकाचें कोणएकासं गतीं जें भाषण तें.

**सभासद**, पु० सभेमध्यें प्रतिष्ठितपणेंव सलेअसतात जे लोक ते प्र०:२, दे० सभेच्याठायीं बसून न्यायमनसुबी. वादविवाद. इ० व्यापार करणारें जें मनुष्य तें प्र०.

**संभाळ**. पु० प्रतिपाळ.

**संभाळणें**, अन्नदानादिकें करून कोणेकास प्रतिपाळित करणें;२. कांहीं एक व्यापार, पदार्थ, इ० स्वशक्ति, सावधपणा, इ० कानें आटोपून धरणें;३. अपथ्य, कांहींएक अरिष्टप्राप्त होईल-ह्मणून तद्विषयीं सावधपणें असणें;उ० संभाळ अपथ्यकेलेंसतर दुखणें वाढेल;४. रा० सुखकारक, दुःखकारक. जो कोणेकाचा स्पर्श तो विदित होणें; उ०, माझें शरीर बधिर असें झालें आहे त्यास डाग दिल्हा तरीं संभाळत नाहीं मगचिमटा कोठला संभाळायला.

**सभीज**, अ० कों० सकलावयवीं पुर्तेपणी भिजे असें भिजणें होणें इ० कांचें वि०.

**संभूत**, ३लिं० संभवविषय झाला जो तो; २. उत्पन्न झाला जो तो; ३, स्त्री० संभूतवार्ता.



**संभूतवार्ता**. स्त्री० संभावना होतअसो वी, गोष्टी तरी नियत असाव्या, इतक्यानें तरीं जें कोणेक अर्थाचें अस्तित्व तो. निषेधविषयीं प्र०:उ०. यागावांत सर्पाची संभूतवार्ता नाहीं मग तुला डसेल कोठून :२, कोणेक अर्थाची ज्ञापक तत्संबंधी यत्किंचित् तरी जो गोष्ट तो निषेधविषयीं प्र०:उ०, तुमचे घरीं लग्न होणार याची आह्माला संभूतवार्ता ठाऊक नव्हती मग आह्मी कशावरून यावें.

**संभूति**, स्त्री० सं० संभव;२. संभूतवार्ता.

**संभोग**, पु० विषयाच्या जो उपभोग तो परंतु स्त्रीचे उपभोगाविषयीं विशेष प्र०.

**संभोगणें**. स्त्र्यादिविषयानें संभोग विशिष्ट करणें.

**सभोंवता.सभोंवताला.सभोंवती**, अ० भोंवताला.

**सभोंवर.सभोंवार**, अ० भोंवताला.

**सभ्य**, ३लिं० सभासद;२, संभावित प्रथमार्थः.

**संभ्रम**, पु० भयलाभादिकांचा किं० थोराचे आगमनाचा इ० प्रसंग आलाअसतां त्याकाळीं कर्तव्य जें कृत्य त्याविषयीं कांहीं सुचूं नये, घाबरें व्हावें. अंतःकरणास त्वरा व्हावी. इ० रूपजी

अवस्था होत्ये ती; २, कोणी कास कोणे
क गोष्टीविषयीं प्रीतिपूर्वकउद्योग करी-
त असावा अशी असत्ये जी हौस ती;
उ०, कांहीं नवा पदार्थ पाहिला ह्मणजे
त्याचें संपादन करावें हा संभ्रम यापो
रास फार आहे; ३, कोणेक पदार्थ नी
टनेटका दिसावा ह्मणून त्यासकरितात
जे अनेक उपचार ते प्र०: उ०, चक्रीदा
रपागोटें घालावें, गंधरेखून लावावें,
डौलानें चालावें, असे हा दिवसभर-
आपले जीवाचे संभ्रम करीत असतो.

**संभ्रांत**. ३ लिं० भ्रांतीनें युक्त जो अंतः
करण, मनुष्य, इ० तो; २, संभ्रमप्रथ
मार्थानें युक्त जो तो.

**सम्**, अ० हा संस्कृत उपसर्ग आहे हा-
जाचे मागें लागतो त्याचें प्राशस्त्यबो
धितो, संलग्न, संमोहित, संजात,
इ०स०प्र०.

**सम**, ३ लिं० तुल्य; २, यांकडेतिकडेपणा
किं० उंचसखलपणा इ० अविवक्षित
गुणरहित जो भूम्यादिकांचा प्रदेश-
तो आणि तद्विशिष्ट भूम्यादिपदार्थ तो,
; ३, दोन चार, सहा, इ० रूप जी युग्मसं
ख्या ती; ४, सर्व अर्थास तुल्य रूपानें प
हाणारा जो साधु इ० तो; उ०, जे साधुपु
रुष आहेत ते सर्व भूतांच्याठायीं सम-
असतात; ५, कोणे कांचा शत्रु नव्हे आणि
मित्र हा नव्हे केवल उदासीन जो ग्रह
इ० तो.

**समई**, स्त्री० मध्यें खांब आणि खालीं वर
दोन वाडी असतात हेचें एक दीप लावा
याचें पात्र आहे.

**समईक**, ३ लिं० समाईक.

**समकणें**, श० संचकणें.

**समकक्ष**, ३ लिं० विद्वत्ता शौर्यादि गुणां
नीं परस्पर जे तुल्य ते प्र०.

**समकोण**, ३ लिं० वृत्तामध्यें मधोमध आ
डवी, उभी, रेषा काढली असतां जो कोण
होतो तत्सदृश आहे कोण ज्याचा असा-
जो क्षेत्रादि तो.

**समग्र**, ३ लिं० सं० सगळा.

**समज**. स्त्री० पु० तत्तद्विषयांचें जें परिज्ञा
न ती तो.

**समजणें**, विवक्षित कांहीं एक गोष्ट को
णाएकास परिज्ञात होणें व तज्ज्ञान वि-
शिष्ट आपण होणें; २, रुसलेला किं०
कोणेक गोष्टीविषयीं अडून बसलेला
जो कोणी त्याणे रुसवा, अड, इ० सो
डून अविरुद्धभाव विशिष्ट होणें

**समजदार**. ३ लिं० ज्याचे बुद्धीत चांग
लास मज असतो तो.

**समंजस**, ३ लिं० कांहीं एक गोष्ट करणें ता
तारतम्यानें विचारपूर्वक. चौघांसब
रोबर सेलती करणारा असा चांगल्या
स्वभावाचा जो तो; २, समजदार; ३,
न्याय्य जें भाषणादिक तें.

**समजस**, ३लिं० समंजस शब्दाचा अपभ्रंश परंतु ना० प्रथमार्थी प्र०.

**समजावणें**. कोणेकास कोणेक गोष्ट समजे असें करणें ;२, रुसला जो त्यास मजे असें करणें.

**समजाविशी, समजावीस, समजी.** स्त्री० रुसलेला किं० अडून बसलेला किं० विवदमान जो कोणी त्याणें समजावें ह्मणून तदनुकूल करितात जो व्यापार तो आणि तेणेंकरून त्याचा होतो जो समजलेपणा तो.

**समजीक**, ३लिं० समजस.

**समजूत**, स्त्री० समजी ;२, समज.

**समजूतदार**, ३लिं० समजदार.

**समंतात्**, अ० आसमंतात.

**समतोल**, ३लिं० गुणादिद्वारा जें तुल्य तें परस्पर ;२, वातपित्तादिकांचें विषमभावेंकरून रहित अशी जी कोणेकाची समान प्रकृति ती ;३, अ० शरीर, ओझें, इ० कांचा ईषन्मात्रही इतस्ततः तोल न जाऊं देतां, तर इ० कांत बसणें, ठेवणें, इ० कांचें वि० ;उ०, होडीमध्यें समतोल बसावें ह्म० डळमळत नाहीं.

**समंध, समंध**. पु० संबंध शब्दाचा अपभ्रंश.

**समधात**, ३लिं० शीत, उष्ण, जो तसम आहेत असें जें औषध, शरीर, प्रकृति, देश, इ० तो.

**समंधी**, ३लिं० दे० पिशाचा सारिख्या स्वभावजाचा तो ;२, ३लिं० संबंधी शब्दाचा अपभ्रंश.

**समन्वित**, ३लिं० कोणेक भ[illegible]नें जो अन्वित तो दन्वित, याचे समास पात्रसमन्वित, क्रियासमन्वित, इ०.

**समभाग**, ३लिं० कोणेकाचे भागासमान आहे भाग ज्याचा असा जो औषधादिपदार्थ तो.

**समय**, पु० कोणेक कार्य करण्याचा, होण्याचा जो कालावयव तो. कोणेकावर समय पडणें किं० येणें ह्म० परदुःखदायक प्रसंग त्यास प्राप्त होणें, समयास उपयोगी पडणें समयीं उपयोगी पडणें ह्म० प्रसंगीं कामास येणें. प्रसंग शब्दावरील संप्रदाय प्रा० एथें होतील असें जाणावें ;२, स्त्री० समई.

**समयस्फूर्ति**, स्त्री० जा विषयाचा जो प्रसंग त्या प्रसंगीं त्या विषयाची स्फूर्तिद्वारा अशी जी कोणेकाची बुद्धीमध्यें शक्ति असत्ये ती.

**समयानसार, समयानुसार**, अ० प्रसंगानुसार.

**समयी**. स्त्री० समई.

**समयोचित**, ३लिं० विवक्षित त्या समयीं योग्य जें भाषण इ० तो.

**समर**, पु० सं० युद्ध.

**समरंगण**, न० समरांगण शब्दाचा अप-भ्रंश.

**समरस**, ३ लिं० सर्वांशीं मिळून रहावें, कोणाशीं विरुद्ध कधींही होऊं नये अशा स्वभावाचा जो पुरुष इ० तो.

**समरांगण**, न० युद्धार्थ नेमितात जें स्थल तें; २, युद्धादिकांचा जो प्रसंग त्यास ह्म०.

**समरास**, स्त्री० धान्यादिकांची जी अनेक विभाग न करितां उभी रास ती.

**समरासमोर**, अ० रा० समोरासमोर.

**समर्घ**, ३ लिं० सं० सवंग.

**समर्थ**, शरीर, द्रव्य, विद्वत्ता, इ० कांचे बलानें तत्तत्कार्याविषयीं जो शक्तिमान् तो.

**समर्थन**, न० कोणेक ग्रंथ किं० मत किं० पूर्वपक्ष, समाधान, इ० कांवर कोणी दोष दिला असतां त्याचें निवारण करून त्या ग्रंथादिकांचें जें अनेक युक्तींनीं स्थापन तें.

**संमर्द**, पु० युद्ध, यात्रा, इ० कांमध्यें अनेक मनुष्यादिकांची जी दाटी होत्ये ती.

**समर्पक**, ३ लिं० कोणेकाचा प्रश्नादिकांवर यथायोग्य असावें तसें जें उत्तरादि तो.

**समर्पण**, न० देव, ब्राह्मण, इ० कांस कांहीं कांहीं एक पदार्थाचें केलें जें अर्पण तें.

**समर्पिणें**, देव, ब्राह्मण, इ० कांस कांहीं एक पदार्थ अर्पित करणें.

**समर्पित**, ३ लिं० समर्पण ज्याचें केलें तो.

**समला**, पु० पाठीवर लोंबाया जो गाडी ईवरचे पागोठ्याचा शोभार्थ बाहेर सोडितात जो पदर तो.

**समवयस्क, समवयी**, ३ लिं० तुल्यवयाचे जे ते परस्पर.

**समवाय**, पु० सं० गुण गुणी, क्रिया क्रियावान्, जाति व्यक्ति, यांचा जो परस्पर संबंध तो; २, समुदाय.

**समवायिकारण**, न० ज्यावर समवाय संबंधानें कार्य उत्पन्न होतें त्या कार्याचें तें.

**समवेत**, ३ लिं० समवायसंबंधानें कोणेकानें अन्वित जो कोणेक तो; २, अ० कोणे एकासह वर्तमान जा, ये, हो, इ० कांचें वि०.

**समशेर**, स्त्री० तलवार; २, पु० चंगकांचन गंजिफांतील जो आठवा रंग तो.

**समशेरबहादर, समशेरबहादूर**. ३ लिं० तरवारबहादर.

**समशेरी**, ३ लिं० ज्या पुतळीचा दोहों अंगचा बाहुल्यांचीं डोकीं एकादिशेकडे होतात अशी झालेली जी पुतळी ती; २, ३ लिं० समशेर ह्मणून जो गंजिफांतील रंग तत्संबंधी पान, तलव, इ० तो.

तो.

**समष्टि**, स्त्री॰ अनेकव्यष्टि मिळून जा ला जो विराट् देहादि एक अवयवी तो.

**समसका**, ३ लिं॰ रा॰ प्रतिवर्षीं यांत अ सतो जो गोमहिष्यादि पशु तो.

**समसमान**, ३ लिं॰ विद्वत्ता, शौर्य, आ कार, संख्या, इ॰ कानीं तुल्य जे ते प रस्पर.

**समस्त**, ३ लिं॰ सर्व; २, अनेक पदांचा स मास होऊन झालें जें एक पद तें.

**समस्या**, स्त्री॰ विवक्षितार्थ प्रतिपादक श्लोकादिकांचा एकदेश उच्चारला असतां त्यास सर्वार्थाचें पूर्तिविषयीं अवशिष्टांशाची असती जी आकां क्षा ती आणि तो उच्चारित जो एकदे श तो, कविजन एकमेकाचें ज्ञानपरि क्षार्थ कांहीं अंशाचें निगरण करून कांहीं अंश दुसऱ्यास आकांक्षापूर णार्थ विचारितात त्या व्यवहारीं प्र॰; २, जाचें उत्तर एकाएकीं ध्यानांत ये त नाहीं असा जो कोणेक विषयावर कोणेकाचा कठिण प्रश्न असतो तो: उ॰, त्याणें मला अशी समस्या घातली कीं गणपति पूजना वांचून लग्न होत नाहीं ह्मणतां तर महादेवाचें लग्नांत कसें केलें, कोणेकानें कोणेकाचीस मस्या पुरविणें ह्म॰ शौर्यादिजन्य द र्पादिकांचा परिहार व्हावयाजोगी स्वकीय शौर्यादि प्रदर्शनद्वारा त्याला उत्तर जमा करून देणें.

**समळी**, स्त्री॰ कों॰ संबळी.

**समक्ष**, अ॰ कोणेकाचे देखत; २, गा- शीं भाषणादि व्यवहार करायाचा त्या शीं आणि आपणाशीं साक्षात् संबंध घडे असें बोलणें, पहाणें, गांठ पडणें सांगणें, इ॰ कित्ती एक धातूचें वि॰, उ॰, त्याची माझी समक्ष गांठ पडेल तेव्हां काय तें सांगू तुझापाशीं सांगत नाहीं जा.

**समक्षता**, स्त्री॰ समक्षपणा.

**समक्षा**, स्त्री॰ समस्या शब्दाचा अपभ्रं श; २, देवादिकांचा साक्षात्काराविष यीं कोणी प्र॰ करितात.

**समक्षासमक्ष**, अ॰ स्त्री॰ उरूबुरू.

**समा**, पु॰ कों॰ एक पिशाच देवता आ हे; २, समुद्रास नित्यशः भरती येते तीचीजी पूर्णावस्था तो; ३, रा॰ तत्त्व व्यवहाराचा किं॰ धान्यादि उत्पन्न हो ण्याचा जो मुख्य समय तो; ४, संप.

**समाईक**, ३ लिं॰ अनेक स्वामिक अ- सून अविभक्त जो क्षेत्र धनादि पदा र्थ तो.

**समाकुळपोटर**, स्त्री॰ ग्रामसंबंधी जे पाटील, कुळकर्णी, मेहमनी, इ॰ समस्त लोक ती किं॰ गृहादि संबंधी जी समस्त मनुष्यें ती परंतु कांहीं का

रणास्तव

णास्तव अवघ्यानीं एकत्र होण्याचा प्रसंग असतांच प्रा० प्र०.

**समागम**, पु० परस्परांचा जो विवक्षित संयोग तो.

**समाचार, समाचार**, पु० परामर्श प्रथमार्थी; २, कोणेकाचें बरें वाईटपणाचें जें वर्तमान तो; उ०, घरच्यासमाचार आलीकडे समजत नाहीं, परामर्श शब्दावरचे संप्रदाय एथेंही जाणावे.

**समाज**, पु० मनुष्यादि एकजाती यांचा जो समुदाय. तो.

**समाजीक**, ३लिं० कों० समाईक.

**समाध**, स्त्री० समाधिशब्दाचा अपभ्रंश.

**समाधान**, न० इष्टानुरूप घडल्यामुळें उद्वेगादि जाऊन बरें वाटाया जोगा सुखरूपें करून जी अंतःकरणाची स्थिति तें; २, पूर्वपक्षाच्या निरासकरणारें जें वाक्यादि तें, कोणेकाचें शरीरी समाधान नाहीं किं० त्यास समाधान वाटत नाहीं इ० स्थलीं त्यास बरें वाटत नाहीं तो दुखणेकरी आहे असा अर्थ.

**समाधि**, स्त्री० पु० अंतःकरण, विषयांपासून निवृत्त होऊन ईश्वराचे ठायीं लागावें ह्मणून प्राणायामादि साधनानीं करितात जी त्या अंतःकरणाची एकाग्रता ती ती; २. संन्यासीजलांत बुडवून घेऊन किं० स्थलांत पुरून घेऊन जो प्राण त्याग करितो तो ती; ३, सन्यासी मरण पावल्यानंतर त्याचे देहास जलांत बुडियणें किं० स्थलांत पुरणें असा जो संस्कार करितात तो ती; ४, संन्यासी जा स्थलीं पुरतात तेथेंच वृंदावनादि बांधितात तो ती.

**समाधिस्थ**, ३लिं० समाधि प्रथमार्थीनें युक्त जो तो, सन्याशानें समाधिस्थ होणें ह्म० मरण पावणें.

**समान**, ३लिं० सपाट प्रथमार्थ; २. तुल्य; ३, न० यवनी सालांतील आठवें साल तें.

**समानकक्ष**, ३लिं० समकक्ष.

**समानवयस्क**, ३लिं० समवयस्क.

**समानशील**, ३लिं० तुल्यस्वभावाचे जे मनुष्यादि ते परस्पर.

**समानाधिकरण**, ३लिं० एका अधिकरणाचे ठायीं जे विद्यमान ते परस्पर; २, विशेषणविशेष्यरूप असून एकविभक्तिजी पदें तीं परस्पर.

**समानीन**, न० यवनी सालांत नायकीचें एक साल आहे.

**समानोदर**, ३लिं० सोदर.

**समापत्र**, न० संमतिपत्र शब्दाचा अपभ्रंश.

**समाप्त**, ३लिं० संपला जो तो; २, स्त्री० समाप्ति

समाप्ति शब्दाचा अपभ्रंश.

समाप्ति, स्त्री० संपलेपणा.

समारंभ, पु० लग्न, मुंज, यज्ञ, कीर्तन, सण, वार, ब्राह्मणभोजन, इ० कार्याचा अनेक सामग्रीनें शोभायाजोगा करितात जो उत्साह तो; २, तदर्थ संपादित जी उपयुक्त सामग्री तो; उ०, आमचे घरीं लग्न आहे याजकरितां तुमचे घरचा सर्व समारंभ अह्मास द्या.

समाराधन, न० समाराधना.

समाराधना, स्त्री० व्रत, विवाह, इ० संबंधी जें ब्राह्मणभोजन करितात ती.

समावणें, मावणें; २. कोणेक पदार्थाचें स्वरूप न बिघडायाजोगें त्यांत कोणेक पदार्थानें समाविष्ट होणें; उ०, शेर दुधांत पावशेर पाणी समावेल शेरभर घातलें तर दूध नासेल; ३. जा प्रमाणाशीं तुल्य असावा अशा रूपें करून विवक्षित जो कोणेक अर्थ त्याची त्या प्रमाणाहून अतिरिक्तता दिसण्यांत न येतां त्यांत कांहीं अर्थांतर समाविष्ट होणें; उ०, शंभर पात्रांचे सैंपाकांत पांच पात्रें समावतील, तुमचा कंठाळीत त्या ओझ्यांत माझें सोंवळें भांडें का सामावणार नाहीं.

समावर्तन, न० सोडमुंज.

समाविष्ट, ३ लिं० विवक्षित अधिकरणीं किं० विवक्षित कोटींत समावेश झाला ज्याचा तो.

समावेश, पु० विवक्षित प्रकरण कोटीमध्यें कोणा एकाचा जो संग्रह तो; उ०. शंभर ब्राह्मणामध्यें या एका ब्राह्मणाचा समावेश करा; २. विवक्षित अधिकरणीं कोणेक अर्थाचा विवक्षानुरूप प्रवेशपूर्वक जी स्थिति; उ० या लहान शाळेंत पन्नास मनुष्यांचा समावेश कसा होईल.

समास, पु० परस्पर अन्वित जीं अनेक पदें त्यांची एकमेकाशीं जुळणी होऊन होतें जें विशिष्ट एक पद तें, २. समासाचा अर्थ दाखवायासाठीं करितात जो विग्रह त्यास कोणी म्हणतात; ३. लिहावयाचे पत्रास मध्यें लिहून भोंवताली जी वेतानें रिकामी जागा राखतात ती.

समिध, स्त्री० सं० समीध.

समीचीन, ३ लिं० उत्तम; २, विपुल.

समीध, स्त्री० होमार्थ पळस, खैर, उंबर, इ० यज्ञिय वृक्षांचा जाग्येचा वितस्तिमात्र जा काटक्या करितात त्या प्र०.

समीप, अ० सन्निध.

समीपता, स्त्री० चतुर्विध मुक्तींतील एक मुक्ति आहे जी मध्यें ईश्वराचें सान्निध्य. (नि

निध्य पडतें ती.

**समुच्चय**. पु० समुदाय;२, समुदाया-चा विचारानें कोणेक गोष्ठीविषयीं करितात जो कांहींएक निर्णय त्यास कोणी म्ह०.

**समुदाय**, पु० एकत्रस्थित जा अनेक व्यक्ति त्यांस अवयवत्व कल्पून त्यां चा मानिला जो वैशिष्ट्यें करून निराळा अवयवी तो.

**समुदित**, ३लिं० समुदायरूपानें एकत्रस्थित जो तो.

**समुद्र**, पु० बहुतेक पृथ्वीचा प्रदेश व्यापून राहिला आहे असा जो अपार उदकराशि तो जाचें उदक क्षार आहे. म्ह० समुद्रांत जाऊन कोरडा जोंचा अंत पारनाहीं असें जें ईश्वर गुण, माया, शब्दसमूह, जन्ममरणरूप संसार, इ० यांस आरोपानें म्ह० या अर्थी गुणसमुद्र, शब्दसमुद्र, भवसमुद्र, इ० स०.

**समुद्रकांठा**. पु० कों० समुद्राचे कांठचा जो प्रदेश तो.

**समुद्रफळ**, न० एक औषधी वृक्षाचें फळ आहे.

**समुद्रफेण, समुद्रफेन, समुद्रफेंस**, पु० समुद्राचे तीरीं मत्स्याकार पांढरें फुसफुशीत असें औषधीपयोगी एक प्राण्यंग येऊन पडत असतें तें.

**समुद्रमाणकी**, स्त्री० समुद्रफेन.

**समुद्रवलयांकित**, ३लिं० समुद्ररूप वलयानें अंकित अशी संपूर्ण जी पृथ्वी तीचें वि०.

**समुद्रशोक, समुद्रशोष**, पु० एक वेल आहे.

**समूल, समूळ**, ३लिं० मूलासहित जो वृक्ष इ० तो;२, जास आधारभूत मूल आहे असा जो वाक्य, ग्रंथ, इ० तो.

**समूह**, पु० समुदाय.

**समृद्ध**, ३लिं० समृद्धि झाली जाची तो.

**समृद्धि**. स्त्री० कोणे कार्थीची जी विपुलता ती.

**समेट**. पु० झाला असतो जो रुसवा, गवुल, इ० तो जाऊन परस्परांचा होतो जो अविरुद्ध भाव तो.

**समेटणें**. स० प्रवृत्त जें युद्धादि इ० तें कोणेकानें मिटे असें करणें.

**समेत**, ३लिं० समवेत.

**समेतबाबती**, अ० कों० देखील बाबती.

**समेळ**, पु० कों० संबळ.

**समेळ्या**, पु० कों० संबळ्या.

**समोर**, ३लिं० सूत मारल्यासारखा अग्र लागत गेलेला जो नदी, मार्ग, वृक्ष, पंक्ति, रेषा, जातें, काष्ठ, इ० तो;२, अ० कोणेक अवधीपासून समान सूत्रानें अन्वित जो प्रदेश त्याचा ठायीं

या किं० कोणकाचे विवक्षित पुढल्या प्रदेशीं.

**समोरच्या**. ३लिं० समोरील.

**समोरासमोर**, अ० परस्पर संमुख होत असें; उ०. दोघे समोरासमोर उभेराहून बोलत होते.

**समोरी**. स्त्री० समोरपणा.

**समोरील**, ३लिं० समोर प्रदेश जो तेथील.

**समोरून**, अ० कोणकाचे पुढून.

**सम्मत**. ३लिं० अभिमत; २, न० अनुमत.

**सम्मति**, स्त्री० सम्मत द्वितीयार्थीं.

**सम्मान**, न० समान.

**सम्मार्जन**, न० शेणखळा, उदक, इ० कानीं शुध्यर्थ सडा घालणें, सारवणें, इ० रूप जो व्यापार तें.

**सम्मार्जनी**. स्त्री० सं० केरसुणी.

**सम्मुख**. ३लिं० अभिमुख.

**सम्यक्**, अ० उत्तम प्रकारें करून.

**सय**, स्त्री० आठवण.

**सयतान**, न० सैतान.

**सयँपाक**, पु० सैंपाक.

**सयँपाकघर**, न० सैंपाकघर.

**सयँपाकी**, पु० सैंपाकी.

**सयँपाकीण**, स्त्री० सैंपाकीण.

**सयली**. स्त्री० सैली.

**सयसद**, अ० ग० सतसय.

सयसमार.

**सयसुमार**. पु० सईसुमार.

**संयुक्त**. ३लिं० कोणकाशीं संयोग संबंधानें संबद्ध जो तो.

**संयोग**, पु० पदार्थांचा परस्परें एकमेकास लागलेपणारूप जो संबंध तो.

**संयोगी**. पु० जाणें लग्न करून घेतलें असतें असा जो गोसावी, किं० वैरागी, तो.

**संयोजक**. ३लिं० उत्तमरीतीनें योजना कर्ता जो तो.

**संयोजन**. न० उत्तमरीतीनें अनेकांच्या-संयोग करण्याचा जो व्यापार तें.

**संयोजित**. ३लिं० संयोजन केलें ज्याचें तो.

**सय्यद**. पु० महंमदाचा वंशांत जे उत्पन्न यवन ते प्र०.

**सर**, पु० ज्यामध्यें मोत्यें, पोवळीं, फुलें, इ० ओंवली आहेत असें जें सूत्र तें; २. मंडपाद्युपयोगी सरळ लांब मोटा जो वांसा तो; ३. सजातीय अधिकारविशिष्ट जे अनेक अधिकारी यांजवर केला असतो जो एक मुख्य अधिकारी तो, हा शब्द अधिकार व अधिकारी यांचे मागें लागतो; उ०, सरदेशमुखी, सरदेशमुख, सरसुभेदारी, सरसुभेदार, इ०; ४, विवक्षित सजातीय समुदाया मध्यें गुणादिकें करून जो अधिक तो; ५, मध्यें मध्यें कांहीं काळ कोणकास जी वेड लागल्यासारखी अवस्था हो

त्ये

त्येतो :६, रा० मुसळसळई ;७, स्त्री० कांहीं काळ राहून जावा असा येतोजो पर्जन्याचा झपाटा तो ;८, कोणे काची कोणे कास गुणादिकें करून जी बरोब री तो ग्रा० निषेधविषयीं प्र० :९, गजिफां तील जी तलफ तो ;१०, अ० पाचे तो ;उ० भांडेंबरसरभरूनकी :११, लेखन प्रसं गीं गाय, हैस, बैल, टोणगा, वांसरें, यांची संख्या लिहायाची असतां त्या चा त्याचा नावापुढें या शब्दाचा प्र० करितात ;उ०, गायसर दोन, हैसस रएक, किल्ला, राज्य, इ० सरकरणें- ह्म० युद्धादिकें करून स्वायत्त करणें.

**सरकट**, न० रा० पर्जन्याची लहान जी सर पडतो तीस निंदेनें ह्म०.

**सरकटणें**. कों० पाय इ० निसरणें ;२, रा० वस्त्रानें सऱ्यानीं विशिष्ट होणें.

**सरकटा**, ३लिं० कों० निसरडा प्रथमार्थं ;उ०, माडसरकटा झालेला आहे संभा ळून चढ.

**सरकटें**. न० कों० निसरडें.

**सरकणें**, कों० सरकटणें प्रथमार्थी ;२, विवक्षित स्थलापासून पलाकडे होणें; उ०, अमळ सरकूनबसा ह्म० जागा होईल.

**सरकत**, स्त्री० कृषिवाणिज्यादि रूप जो कोणेक व्यवहार त्यामध्यें तोटा नफा यांचें अधिकारित्वें करून अनेकांचा अस- असतो जो स्वामित्व संबंध तो.

**सरकतदार**, पु० सरकती.

**सरकतनामा**, पु० सरकतीचे ठरावाः केला असतो जो कागद तो.

**सरकती**, पु० जा व्यवहारांत जाणी स रकत ठेविली आहे ते त्या व्यवहारावि षयीं परस्पर.

**सरकत्या**, पु० सरकती.

**सरकन, कर, दिनी, दिशीं**, अ० अ नुकरण, निसरड्यावरून पाय इ० निसरणें इ० कांचें वि०.

**सरकफांस**, पु० गांठ सरकावली अ सतां पाहिजे तेवढा लहान मोठा व्ह वा असा जो फांस करितात तो.

**सरकावणें**. सरके असें करणें ;२, कं णेक व्यवहारीं पुढें सरणें.

**सरकाळ, सरकाळी**, स्त्री० ओंधळ सजगुरा, याचे तांटाचें जें अग्रभाग पेरें जास कणीस असतें तें परंतु क णीस नसतां ह्म०.

**सरकी**, स्त्री० कापशीची जी बी ती.

**सरखत**. न० कों० अनेकवार घ्यायाचें जें कारचें देयतें त्यात्या वेळेस देऊन एका क गदावर मांडून घेत असावें अशी जी सव रातून पावती लिहून घेतात तें ;२, स्त्री० रा० सरकत.

**सरखेल**, पु० राजाजवळचा एक अधिक री आहे.

**सरखेली**, स्त्री॰ सरखेलाचा जो अधिकार तो.

**सरचश्मा, सरचष्मा**, पु॰ कोणेक समुदायामध्यें मुख्यत्वें करून वागणारा, कामकारभार, व्यवहार, पाहणारा असा जो कोणी असतो तो.

**सरजा**, पु॰ नथेस मुख्य मोत्यांचे वर त्या गाडयास जीं कलिकाकार मोत्यें ओळीनें लावितात तें.

**सरजा**, पु॰ बंदुकीस तोडा अडकवायाचे उपयोगी जो लोखंडाचा आंकडयासारिखा अवयव असतो तो.

**सरंजाम**, पु॰ तत्तत्कार्योपयोगि जी सर्व सामग्री तो; २. सर्कारांतून जास घोडें, पालखी इ॰ देतात किं॰ फौज ठेवायास सांगतात त्यांचे खर्चाबद्दल जो ग्रामादि नियमित करून देत असतात तो.

**सरंजामी**, ३ लिं॰ सर्कारांतून ग्रामादिरूप सरंजाम जास दिला आहे तो; २, सरंजामाबद्दल दिल्हेला जो ग्रामादि तो.

**सरड, सरडा**, पु॰ पालीच्या आकाराचा एक क्षुद्र जंतु आहे, म्ह॰ सरडयाची धांव कुंपणापर्यंत.

**सरडोका**, पु॰ कों॰ सरडा.

**सरण**, न॰ मृत मनुष्यास जाळायाकरितां रचितात जी चिता तें.

**सरणि**, स्त्री॰ सं॰ मार्ग; २. ला॰ कोणेकाची

काची भाषण, कविता, इ॰ संबंधी रीति तो.

**सरणें**, सरकणें; २, व्ययादिद्वारा द्रव्यादि निःशेष होणें; ३. रा॰ कोणेक गोष्ट कोणेकास योग्य दिसणें; उ॰, याचे यांत हें बोलणें तुला सरत नाही, त्यावांचून त्याचें सरत नाहीं म्ह॰ चालत नाहीं असा अर्थ; उ॰, म्ह॰ शेजी विण सरेना आणि घडीभर पडेना.

**सरता**, ३ लिं॰ अनुक्रमानें स्थित जे अनेक अर्थ त्यामध्यें जो शेवटला तो.

**सरतेशेवट**, अ॰ भाषणादि कोणेक व्यवहाराची जी चरमावस्था तीचे ठायीं; उ॰ सरते शेवट रुपये द्यावे असें ठरलें.

**सरतेशेवटीं**, अ॰ सरतेशेवट; २. शेवटल्या विभागीं.

**सरद**, ३ लिं॰ सर्द; २, स्त्री॰ विवक्षित जो दिक्प्रदेश किं॰ देशप्रदेश तो; उ॰, यंदा दक्षिणचे सरदेस पर्जन्य पडला नाहीं म्हणून ती सरद बुडाली.

**सरदणें**, कोणेक पदार्थ सरदानें युक्त होणें.

**सरदावणें**, सरदणें.

**सरदी**, स्त्री॰ सर्दी.

**सरदेणें**, ग॰ सरदणें.

**सरद्गर्म**, स्त्री॰ सरदानें मिश्रित जो गर्मता हें शिष्ट्य जें कोणेक देशाचे ठायीं किं॰ त्याचे ठायीं असतें तें; २. सरदा आणि गर्म हा मिश्र झाल्यामुळें शरीरांत होतो जो

निकाल

विकृति विशेष ती.

**सरधोपट**, ३ लिं० ज्यामध्यें थोंकडे तिकडेंपणा नाहीं असा जो सरळ मार्ग, भाषण इ० तो, अ० अर्थ सांगणें. मनन करणें, इ० कांकडे न गुंतता सरळरीतीनें वाचणें, लिहिणें. इ० कांचें वि०.

**सरनौबत, सरनौबद**, पु० हवालदारांचे हातास्वाली चा एक अधिकारी आहे.

**सरपण**, न० जाळावयाचे उपयोगी जी लांकडें. गोंवऱ्या. इ० तें.

**सरफळी**, स्त्री० मुलांचे कमरेस बांधायाचें एक सर्पाकार भूषण आहे ;२, सुवर्णादिकांची एक प्रकारची सांखळी आहे.

**सरबर**. स्त्री० बराबरी या अर्थ.

**सरबरा**. स्त्री० सरबर.

**सरबरीत**, ३ लिं० फार दाट नव्हे. आणि फार पातळ नव्हे, असा जो अंब्याचा रस. कालवलेला. भात. पीठ, चिखल, भाजी. इ० पदार्थ तो.

**सरबसर**. ३ लिं० केवळ बरोबरीचे नव्हत प्रमाणादि गुणानें एकमेकाशीं यत्किंचित् अंतरानें विशिष्ट जो कोणेक अर्थ तो ;उ०, सगळीं मोत्यें एकसारखीं नाहींत सरबसर आहेत.

**सरम**, नं० बाजराचे तोराचा जो समुदाय तें

**सरमाड**, न० सरम.

**सरळ**, ३ लिं० उजू तीट, असा जो काठ, मार्ग. इ० पदार्थ तो ;२, स्त्री० अतिशयित गूढाशय. कठिनपदप्रक्षेप, वक्रता, इ० दोषजत नाहींत अशी जी कविता. भाषण, इ० ती.

**सरवट**, न० सरकट ;२. रा० सरचा करायाचे उपयोगी जी जमीन तें.

**सरवजा**, पु० रा० सरवाधा.

**सरवदा, सरवद्या**, पु० दाकोला.

**सरवा**, पु० पर्जन्याची जी एक सर तो ;२, रा० प्रथम वर्षे भाजून तयार केलें जें डोंगरी, शेत, त्यास पुढें प्रा० दोन वर्षे पर्यंत म्ह० ;३, जोंधळा, मजगुरा, इ० कांचें शेत कापून घेतल्यानंतर खालीं राहतात जे त्यांचें सउपाचोळा तृण इ० नदिविशिष्ट जी भूमि ती.

**सरवेभात**, न० रा० सरव्यामध्यें पिकतें जें भात तें.

**सरस**, पु० बकऱ्याचें मांसापासून एक पदार्थ उत्पन्न होत असतो जो चपडाला खेसारिखा दिसतो आणि जो डकवायाचें उपयोगी पडतो ;२, विवक्षित गुणानें जो उत्तम तो ;३, विवक्षित प्रमाणापेक्षां जो कांहीं अधिक तो. शरीर त्यांचें गापेक्षां सरस आहे कमी म्हणतो हें काय.

**सरसंदा**, ३ लिं० रा० सरसोंदा.

**सरसकट. सरसगट**, अ० सकट प्रथमार्थे.

**सरसर**, अ० अनुकरण असा शब्द होईअसें सर्पादिकानीं गमन करणें, काष्ठादिकांवरून पाय इ० फिरणें, इ० कांचें वि०.

**सरसरणें**, सरसर शब्द होई असें सर्पादिकानीं गतिविशिष्ट होणें.

**सरसरां**, अ॰ सरसर.

**सरसा**, अ॰ सन्निधप्रदेशीं किं॰ संनिधप्रदेशानें आश्रयून बस, ठेव, इ॰ कांचें वि॰; २. कोणेक कार्यार्थ पदार्थावर उत्पन्न झाला जो वेग त्याच वेगबळानें; ३॰, फौजेवर गोळा टाकला त्या सरसें वृक्षही उडाले.

**सरसाल**, न॰ विवक्षित जें सर्व वर्ष तें; उ॰ यंदाचें सरसालांत एक पैसा मिळाला नाहीं; २. अ॰ अवधें जें एक वर्ष त्याच पर्यंत; उ॰, आह्मास संसारास सरसाल हजार रुपये खर्चास लागतात.

**सरसाळा. सरसाळी**, ३ लिं॰ सरसाल संबंधी जी बाकी, हिशेब, इ॰ तो.

**सरसावणें**, दूरस्थित जो कोणेक पदार्थ तो सरसा करणें; २. कोणेक पदार्थ अधिष्ठितस्थळाहून विवक्षितस्थळीं सरकें असा करणें; ३, युद्धवादादि प्रसंगीं कोणेकानें तत्तद्विषयीं सिद्ध होऊन प्रा॰ आवेशपूर्वक पुढें होणें; ४, मनुष्य, पशु, वृक्ष, याणीं अकस्मात् वृद्धिंगत होणें; उ॰, पूर्वेंही मुलगी एवढीशी दिसत होती पहा एका वर्षांत कशी सरसावली आतां चांगली मोठी बायको दिसत्ये.

**सरसुमार**, पु॰ सईसुमार.

**सरसोंदा**, ३ लिं॰ कीं॰ जास परस्पर वयः कृत अंतर फार नाहीं अशीं जीं त्या पुरुषें भिन्न भिन्न ओनाचे बैल, इ॰ ते परस्पर.

**सरस्वती**, स्त्री॰ वाणीची अधिष्ठात्री एक देवता आहे; २, जिजपासून झाली जी गीर्वाणभाषादिरूप आणि वेदशास्त्र पुराणादिरूप शब्दप्रपंच ती; ३, जो प्रपंच जींत लिहिला आहे असें जें पुस्तकादि ती; ४, पाटीवरचें लिहिणें लिहिणारीं जीं मुलें पूजनीं देशानें त्या पाटीवर एककादित असतात जें रेषादिरूप चिन्ह ती.

**सरस्वतीअनध्याय**, पु॰ आश्विनमासीं शुक्लपक्षीं मूळनक्षत्रीं सरस्वतीचें आवाहन करितात त्या दिवसापासून श्रवणनक्षत्रपर्यंत जे अनध्याय दिवस ते.

**सरस्वतीदान**, न॰ कोणेकापासून द्रव्यादिक घेऊन किं॰ एरवींच त्यास जें ज्ञान इ॰ दक्षिणे वर्ज करून देतात त्यास प्रसंगविशेषीं ह्म॰

**सरस्वतीपूजन**, न॰ आश्विनमासीं घरोघर मूळनक्षत्रावर पुस्तकांचा ठायीं सरस्वतीचें आवाहन करून दुसरे दिवशीं तिचें पूजन करितात तें.

**सरळ**, ३ लिं॰ सरल.

**सरळणें**, सरसावणें द्वितीय तृतीयार्थी.

**सरळव्याज**, न॰ चक्रवाढीचा हिशेबानें व्याज न करितां केलें जें व्याज तें.

**सरळी**, स्त्री॰ कीं॰ एकदाच आंगामध्यें वेग घेऊन मध्यें हातपाय न हालवितां सर्पासारिखें पाण्यामध्यें सरळ शरीरानें पोंहनजावें अशा प्रकारें जी गति ती, मार धातुयोगीं ह्म॰

सरक्षक,

**संरक्षक**, ३ लिं० उत्तमरीतीनें रक्षण करणारा तो.

**संरक्षण**, न० उत्तमरीतीनें जें रक्षण तें.

**संरक्षिणें**, उत्तमरीतीनें रक्षिणें.

**संरक्षित**, ३ लिं० संरक्षण केलें ज्याचें तो.

**सरा**, पु० यंत्रादिसंस्कारानें संस्कृत जो माडी, ताडी, इ० तो; २, कों० सरद्वितीयार्थः ; ३, दुसरा.

**सराई, सराँई**, स्त्री० फलधान्यादि जो तो पदार्थ सिद्ध होण्याचा जो मुख्य समय तो; २, ला० लग्न इ० तीतो व्यवहार होण्याचा जो मुख्यसमय तो. यवनादिकांनीं मार्गामध्यें मार्गस्थांस उतरायाकरितां जी शाला बांधली असत्ये ती, प्रा० हिंदुस्थानांत व्यवहार.

**सराईत**, ३ लिं० पोहणें, गाणें, घोड्यावर बसणें, निशाणमारणें, इ० विद्येमध्यें लहानपणापासून अभ्यस्त झालेला जो तद्विषयी.

**सरांटा**, पु० एक औषधी लहान झाड आहे तो आणि त्याचें फल तो; २, रा० माड, पोफळ, इ० काष्ठाचे अंगीं असतात जे हिरके ते प्र० परंतु हातपाय इ० काल बोचण्याचे प्रसंगीं प्र०; ३, सकंपजी लांबतान गाण्यांत घेतात तिला म्ह०.

**सरानसरा**, अ० सरासरी.

**सरानसरीस**, अ० सरासरीस.

**सराफ**, पु० हुंडा, नाणें, रोकड, याचा देघेकरावी असा व्यापार करून उपजीविका करतो तो; २, ला० खर्चवेंच करण्याविषयीं बारीक कसर पाहणारा असा जो कृपण त्यास निंदेनें म्ह०.

**सराफडा**, पु० निंदेनें सराफास म्ह०.

**सराफी**, स्त्री० सराफाचें जें कर्म तें; २, ३ लिं० सराफसंबंधी जी रीति इ० ती.

**सरारणें**, सरसरणें.

**सरारों**, अ० सरसरां.

**सराव**, पु० घोड्यावर बसणें, चालणें, पोहणें, इ० कांहीं एकगोष्टीचा जो अभ्यास तो.

**सरावलें**, न० कों० परवळ म्हणून मृत्पात्र आहे तें.

**सरासर**, अ० सरसर.

**सरासरी**, अ० यथाकथंचित्; २, पुरतेपणीं निर्णय न होतां अजमासानें; उ०, एवढें घर बांधलें असतां यास सरासरी हजार रुपये लागतील.

**सरासरीस**, अ० सरासरी.

**सराळी**, स्त्री० कों० सरळी.

**सरिगम**, स्त्री० सप्तस्वरांची बोधक जी सरिगमपधनी, हीं सात अक्षरें इहींकरूनच कोणेक रागावर केला असतो जो निबंध तो.

**सरित्, सरिता**, स्त्री० सं० नदी.

**सरिफा**, पु० फायदा.

**सरिफेवार**, ३लिं० क्रयविक्रय व्यवहारींआं त सरिफा होतो असाजो पदार्थ तो.

**सरी**, स्त्री० सुवर्णाचा किं० रुप्याचा तारा दोरीसारख्या वळून स्त्रियांचें एक कंठभूषण करितात असतात ;२, सुवर्णादि धातूची अलंकारादि कराया करितां कादितातजी तारती ;३, पाटी, छत्री, इ० कांस लावाया करितां किंवा, वेत, इ० पिंजून त्याचा लांब लांब कादितात जा काड्या त्या प्र० ; ४, वांग्या, मिरच्या, खरबुजें, रताळीं, इ० कांस पाणी लावाया करितां त्यांच्या दोन दोन पंक्तीमध्यें जी एकेक लांबट खळी करितात ती किं० तिच्या दोहीं बाजूस मिरचा, रताळीं, इ० जिच्यानें विशिष्ट होतातजे दंड ते प्र० ; ५, वस्त्राचें सूत विरल्या मुळें त्यास लांबट पडतो जो दुरसा ती.

**सरीसर्वत्र**, अ० सर्वत्र.

**सरू**, पु० सुरू म्हणून जो वृक्ष तो.

**सरूदार**, ३लिं० सुरूदार.

**सरूप**, ३लिं०सं० समान आहे रूप जांचें ते परस्पर.

**सरूपता**, स्त्री० चतुर्विध मुक्तींतील एकमुक्तिआहे जीचेठायीं ईश्वरसदृश रूप प्राप्त होतें ;२, सरूपपणा.

**सरोता**, पु० अडकिता.

**सरोबरी**, स्त्री० कों० बरोबरी ;२, अ० कोणेक प्रमाणानें तुल्य होई असें कोणेक पदार्थांत कोणेक पदार्थ मिसळणें, असणें. इ० कांचें वि०.

**सरोरुह**, न०सं० कमल.

**सरोवर**, न० मोटें जें तटाक जांत मा० कमलादिक असतात तें, सरोवर न्हाणें म्ह० सती निघाली जी स्त्री तिणें समारंभपूर्वक एकस्थानें करायाचें आहे तें करणें.

**सरोसर**, स्त्री० पु० मोहोरकी सारिखा चर्मादिकांचा सरवलाद इ०कानें मढविलेला किं० नुसता चर्माचाच अश्वाचे मुखावर गोंभार्थ घालायासाठीं जो पदार्थ करितात तो ती.

**सर्कार**, न० ज्याचा योगानें प्रजापालन, दुष्टनिग्रह, इ० कार्यें होतात असें जें सत्तारूप अधिकरण ज्याचा अधिकारी राजा असतो तें ;२, त्या अधिकरणाच्या अधिकारी जो राजा इ० तो.

**सर्कारखराब**, ३लिं० कों० जी वतनदार इ० कोणाचे दुमाल्यास लागलेली नव्हे सर्कारांतच राहिलेली पडजमीन ती.

**सर्कारधारा**, पु० शेत, वाडी, इ० कांवर सर्कारानें बसविलाजो धारा तो.

**सर्कारमहशूर**, ३लिं० दर्बारमहशूर.

**सर्कारवाडा**, पु० सर्कारचा जो वाडा तो.

**सर्कारी**, ३लिं० सर्कार संबंधीजो संप्रदाय, शिरिस्ता, घोडा, कारकून, पंडित, इ० तो.

**सर्ग**, पु० काव्यादिकांचें अध्याय स्थानापन्न जें प्रकरण तो ;२, सृष्टाची जी उत्पत्ति तो.

**सर्द**, ३लिं० जामध्यें सर्दी बहुत आहे असाजो देश.

देश, औषध, हवा, इ॰ ती, कोणेकानें ममी तर्क होणे स॰ कोणी मर्म काटल्यामुळें किं॰ उगीच दोषठेवल्यामुळें अशा कांहीं एक कारणामुळें खिन्न होणें.

**सर्दार**, पु॰ ज्याचे हाताखालीं अनेक शिपाई लोक असतात असाजो मोठा शिपाई राजादिकांपाशीं असतो तो.

**सर्दारी**, स्त्री॰ सर्दाराचा जो अधिकार ती; २, घोड्याचे लगामास घोड्याचे डोक्यांत अडकवाया करितां जो चर्मादिकांचा बंध आवितात ती; ३, २लिं॰ सर्दाराचा जो वेष, डौल, रीति, इ॰ ती.

**सर्दी**, स्त्री॰ वायु, पृथ्वी, चुना, जल, औषधादिपदार्थ इ॰ कांमध्यें विकारकारी जो ओलेपणा किं॰ थंडपणा असतो ती; २, तणें करून होतोजो शैत्यविकार ती.

**सर्प**, पु॰ ज्याला बाहेर पाय दिसत नाहींत सरतसरत चालणारा रज्जूसारखा लांब असा एक प्राणी आहे, तत्सदृश दर्शकचिन्हित सविष असाजो असतो त्यास विशेषें करून स्प॰.

**सर्पटणें**, मनुष्यादिकानें भुईवर पालथें पडून भुईशी पोटलागत लागत पुढें सरावें अशी किं॰ फेंकलेला दगड इ॰कानें भुईशी फार अंतर नराहतां भुईस लागत पुढें जावें अशी गति धरणें; २, सरकटणें प्रथमार्थें.

**सर्पटोळी**, स्त्री॰ सापटोळी.

**सर्पटर्यां**, अ॰ फरफर्यां.

**सर्पाण**, स्त्री॰ घोड्याचे शरीरावर एक दुर्लक्षणाचें चिन्ह असतें ती.

**सर्पोस**, पु॰ झांकण परंतु कोणेकास नजर किं॰ अहेर न्यावयाचा असतां त्याचे आच्छादनार्थ जें वस्त्र केलें असतें त्याविषयीं किं॰ कितीएक पात्रांवर घालायाचें जें झांकण केलें असतें त्याविषयीं प्रसिद्धि.

**सर्फराजी**, स्त्री॰ कोणी शौर्यादि केलें असतां त्याची सर्कारांत मोठी करितात जी प्रतिष्ठा ती.

**सर्फेवार**, २लिं॰ सरिफेवार.

**सर्बत**, न॰ निंबू, चिंच, अंबा, यांचा रसांत शर्करा घालून पानार्थ जो पदार्थ करितात तें.

**सर्बती, सर्वत्ती**, स्त्री॰ एकसमयावच्छेदें करून अनेक तोफा, बंदुका, यांचा होतोजो आवाज ती.

**सर्व**, २लिं॰ जात्यादिरूप जें अवच्छेदक त्याचा आश्रयभूत जितक्या व्यक्ति असतील तितक्यांतून एकही व्यक्ति वगळूं नये अशा रूपानें विवक्षित जो कोणेक अर्थ तो; २, विवक्षित अर्थाचे अवांतर जितके विभाग असतात तितक्याही विभागानीं विशिष्ट अशा रूपानें विवक्षित जो कोणेक अर्थ तो; ३, सर्वमूळ या एकट्यानें ग्याला सर्व मनुष्यें गेलीं इ॰ स्थलीं व्यक्तिगत अनेकत्व घेऊन अनेकवचन ही होतें.

**सर्वकाल, सर्वकाळ**, अ॰ विवक्षित सर्व

कालाचे ठायीं.

**सर्वतः**, अ॰ सं॰ सर्वत्र या अर्थी.

**सर्वतोभद्र**, न॰ देवतास्थापनार्थ किं॰ ग्रहादि वेधार्थ रेखांकित चक्र करीत असतात तें.

**सर्वतोमुख**, ३ लिं॰ सर्व दिशेकडे आला मुख कल्पिलें असतां संभवे असा जो ईश्वर किं॰ वर्तुल पाषाणादि किं॰ उदक इ॰ तो.

**सर्वत्र**, अ॰ विवक्षित सर्वां ठायीं; उ॰, ईश्वर सर्वत्र आहे; हा शब्द सर्वत्र बोलतात; २, याचा प्रयोग सर्व या अर्थी कोठें कोठें शाकृतजन करितात; उ॰, सर्वत्रांस दक्षिणादिली.

**सर्वथा**, अ॰ सर्वप्रकारें.

**सर्वदा**, अ॰ सर्वकाळ.

**सर्वनाम**, न॰ शब्दांमध्यें एक जाति आहे जे शब्द कोणेकाची संज्ञा नसून प्रकरणा प्रमाणें उपस्थित जें अर्थमात्र त्याचा परामर्श करितात असे जे तो, जो, हा, मी, तूं, भलता, इ॰ शब्द ते प्र॰.

**सर्वनामा**, पु॰ सर्वनाम.

**सर्वपित्रीअमावास्या**, स्त्री॰ भाद्रपदमास संबंधी जी अमावास्या ती.

**सर्वभक्ष**, ३ लिं॰ खावें काय, न खावें काय, हा विधिनिषेध ज्यास नाहीं किं॰ कोणता ही थाईट बरा पदार्थ असला तरी तो खावा, खाऊन जिरवावा, असा जो अग्नि, शेळी, कावळा, इ॰ किं॰ कोणी मनुष्य तो.

सर्वभक्षक,

**सर्वभक्षक**, ३ लिं॰ सर्वभक्ष.

**सर्वशाक, सर्वशाख**, स्त्री॰ अनेक भाज्या एकत्र शिजवून करितात जी एकच भाजी ती; २, आलें ह्मणून जो कंद त्यास प्रसंगविशेषीं म्ह॰.

**सर्वसाक्षी**, ३ लिं॰ सर्वभूतमात्राचा ठायीं साक्षीरूपानें राहणारा जो ईश्वर, वायु, आकाश, अग्नि, इ॰ तो.

**सर्वसोंवळा**, ३ लिं॰ जन्मसोंवळा.

**सर्वस्व**, न॰ स्वसत्ताकांत जें सर्व धनादि तें; २, जें ज्याचें सारभूत मुख्यरूप तें त्याचें; सर्वस्वापहार, सर्वस्वनाश, इ॰ स॰.

**सर्वस्वीं, सर्वस्वें**, अ॰ सर्वप्रकारें; उ॰, सर्वस्वीं मी लबाड ठरलों; २, सर्वस्वसुद्धां; उ॰, मी सर्वस्वें तुमचा आहें.

**सर्वज्ञ**, ३ लिं॰ अर्थमात्रातें जाणणारा जो ईश्वर, योगी, इ॰ तो.

**सर्वात्मना**, अ॰ सर्वस्वीं.

**सर्वाबद्ध**, ३ लिं॰ सर्वांशीं जो अबद्ध तो.

**सर्वाशुद्ध**, ३ लिं॰ ज्यांत बहुत अशुद्धें आहेत असा जो ग्रंथादि तो.

**सर्वोत्तम**, ३ लिं॰ सर्वांमध्यें उत्तम जो ईश्वरादि तो; २, कोणी कांहीं एक गोष्ट सांगीतली असतां तीचे अंगीकारार्थ जसें फार बरें आहे, उत्तम आहे, याचा प्रयोग करितात तद्वत् याचाही करितात.

**सर्वोपरी**, अ॰ सर्वप्रकारें.

**सर्वौषधि**, स्त्री॰ सं॰ शतावरी ह्मणून एक वनस्पति आहे ती.

सर्षप.

**सर्षप**, पु॰ सं॰ शिरस ह्मणून एक उपधान्य आहे.

**सल**, पु॰ न॰ नपादतां बहुतदिवस पोटांत राहिला असतो जो गर्भ तो तें; शरीरावयवादिकांत कांटा इ॰ भरल्यामुळें त्यांत राहतो जो त्यांचा अंश तें; २, स्त्री॰ पाठ इ॰कांत भरत्येजी उसण ती; ४. पु॰ तरवार इ॰ कांपासून मेण पडूनयें ह्मणून परजासबांधायाकरितां त्यामेणास संबद्ध केली असती दोरी तो.

**सलक**, स्त्री॰ कों॰ उसण; २,३ लिं॰ सलग द्वितीयार्थ.

**सलकडें**, न॰ जेथें उसण भरलीअसते तेथें फिरविलें असतां ती उसण उतरावी ह्मणून धातूचें एक मंतरलेलें कडें करून ठेवितात तें.

**सलग**, स्त्री॰ जाणें, येणें, इ॰ कारणानीं कोणेकाचा झालाजो विशेषपरिचय ती; २, ३ लिं॰ मध्यें खंडित नहोतां किं॰ सांधा नसतां विवक्षित लांबीनें किं॰ रुंदीनें युक्तजो काष्ठ, वस्त्र, इ॰ पदार्थ तो..

**सलगी**, स्त्री॰ सलग प्रथमार्थ.

**सलगीचा**, ३ लिं॰ कोणेकाची जाशीं सलगपडली असत्ये तो त्याचा.

**सलज्ज**, ३ लिं॰ निर्लज्जाचा प्रतिपक्षी.

**सलणें**, शरीरावयवांत प्रविष्ट जो कंटकादि त्याणें खुपणें; २, ला॰ वाक्‌ किं॰ दुर्भाषण इ॰ नेत्रमन, इ॰ कांत खुपत असणें.

सलतान,

**सलतान**, न॰ राजा रखुणगें लढाईचा सरंजाम एतत्सहित फौजेचा जो समुदाय तें.

**सलदें**, न॰ कों॰ शिरीं इ॰ कांचें जें तटकें कशिलात तें.

**सलम**, ३ लिं॰ को॰ सलग द्वितीयार्थ.

**सलाबत**, स्त्री॰ जाचे योगानें जें केलें तें मारपडावें, लोकानीं वचकत असावें असाजो दैवानुकूल्यानें कोणेकाचे अंगी प्रताप असतो ती.

**सलाम**, पु॰ यवन लोक दुसऱ्यास सत्कारार्थ अभिवंदन करायाचें असतां रामराम या शब्दस्थानीं या शब्दांचा प्र॰ करितात.

**सलामत**, अ॰ फुटणें, तुटणें, इ॰ कारणानीं नाशादि न होतां यथास्थितपणें कोणेक पदार्थ असणें, जाणें, येणें, इ॰ कांचें वि॰ परंतु प्रा॰ नाशसंभावना असतां प्र॰; उ॰, आह्मी गलबतांत बसून गेलों तें सलामत घरीं पोंहचलों.

**सलामालकी**, स्त्री॰ परस्परानीं एकमेकाचे घरीं कदाचित्‌ जात असावें वाटेंत गांठ पडली असतां रामराम नमस्कार इ॰ करावा परगांवीं असतां कुशलवृत्त लिहून कळवीत असावें असाजो कोणेकाचा कोणेकाशीं सुमाराचा सख्यभाव असतो- तो.

**सलामी**, स्त्री॰ रामरामी.

**सलामीचाहात**, पु॰ डाउपटा खेळते समयीं आरंभीं मंगलार्थ एक प्रकारचा हात करीत

त असतात तो

**सलिता, सलिदा**, पु० उंटावर लादायाचें जें ओझें तें बांधायाकरितां गोणपाटाचें तुकडे जोडून एक साधनभूत वस्तुविशेष केला असतो तो.

**सलिल**. न० सं० जल.

**सलींव**, ३ लिं० यत्किंचित् सैल जो तो.

**सलूक, सलूख**. पु० समेट प्रथमार्थ; २, रा० परस्परांची जी मैत्री तो.

**सलोकता**, स्त्री० चतुर्विधमुक्तींतील एकप्रकारची मुक्ति आहे जीणें करून ईश्वराचें लोकीं वास होतो.

**सलग्न**. कोणेक पदार्थाशीं लागून राहिला जो तो त्याशीं.

**सल्ला**, पु० समेट प्रथमार्थ परंतु प्रा० युद्ध प्रसंगीं प्र०; २, कोणेक कार्याविषयीं कोणेकाचें घेतात जें अनुमत तो; ३, करांगुलीत घालायाचें एक भूषण आहे.

**सल्लास**, न० यवनी सालांतील तिसरें जें साल तें.

**सल्लासीन**, न० यवनी सालांत एक नायकीचें साल आहे.

**सव**, स्त्री० दे० संवय; २, रा० कोणेक पदार्थास असते जी चव ती.

**सवई**, स्त्री० रा० सँवय.

**सँवकणें**, कोणेक व्यापारापासून कांहीं लाभ झाला असतां त्याची गोडी लागून पुनः पुनः तोच लाभ व्हावा ह्मणून तो तो व्यापार करण्याविषयीं जी चट लागते तद्विशिष्ट कोणेकानें होणें; उ०, एकवेळ याकुतन्यास घरांत आणून भाकर चारलीतर: ह्मणजे तो तसाच संवकेल.

**सवंग**, ३ लिं० महागाचा प्रतिपक्षी; ह्म०स वंगसवदा हगवण लावी.

**सँवगडा**, पु० संवगडी.

**सँवगडी**, पु० कोणेकाचा जो खेळगडी तो त्याचा.

**सवंगणें**, धान्यादिकानीं सवंगाईनें युक्त होणें.

**सवंगाई**, स्त्री० महागाईचा प्रतिपक्षी.

**सवघड**, ३ लिं० अवघडाचा प्रतिपक्षी.

**सवड**, स्त्री० कर्मद्रव्यादि अर्थीं हां करून रुद्ध झालेला जो देश, काल, इ० त्यांचा ठायीं तत्सजातीय अर्थांतराचा समावेश व्हावयास असतो जो कचित् अवकाश तो; उ०, मला सागदिवस काम आहे त्यांत येण्यास सवड सांपडली तर येईन; धन्याची आज्ञा झाली तर येईन अशी नाहीं ह्मणाचा सवड उठवा; सगळी जागा भरली एक मनुष्य बसायास देखील सवड नाहीं; २, रा० सवड्यां.

**सवडें, सवड्यां**, अ० रा० समस्त.

**सवणें**, क्रीं० विवक्षित गृहकृत्य आटोपणें.

**सँवत्**, पु० शक, परंतु विक्रमशकाविषयीं

यीं प्र०.

**सवत**, स्त्री० एकपतिक जा दोन स्त्रिया त्याप रस्पर.

**सवतमत्सर**, पु० परस्पर सवतींचा जो मत्स र तो; २, ला० एकस्वामिक जे अनेक भृत्यादि त्यांचा जो मत्सर त्यास प्र०.

**सवतळा**, पु० एक्या स्त्री पाशीं जाणारे जे दो न ते परस्पर.

**सवतवळा**, स्त्री० कों० परस्परजा सवती त्या सर्वमिळून त्या.

**सवता**, ३लिं० निराळा. प्रा० शूद्रभाषेंत प्र०.

**सवतों**, अ० कों० स्वतः या अर्थी. शूद्रभाषेंत प्र०.

**सवताळा**, पु० सवतळा.

**सवतिमत्सर**, पु० सवतमत्सर.

**संवत्सर**, पु० द्वादश मासात्मक जो काल तो; २, पर्यायें करून होत असतात जीं प्रभवादि साठ वर्षांचीं नामें तीं प्र०.

**संवत्सरप्रतिपदा**, स्त्री० चैत्रशुक्ल प्रतिपदा जा दिवशीं चांद्रसंवत्सराचा आरंभ होतो.

**सँवथळ**, ३लिं० गा० सपाट जी भूमि ती.

**सवँदड**, स्त्री० शमी म्हणून जो वृक्ष ती.

**सँवदरफल**, न० रा० समुद्रफल.

**सवदा**, पु० कोणेक जिनसाचा क्रयविक्रयरूप जो व्यापार तो; २, तादृश व्यापारानें घेतला जो जिनस तो.

**सवदागर**, **सवदागीर**, पु० इकडील जिन्न स तिकडे नेऊन विकावा, तिकडील इकडे आणून विकावा असा व्यापार करणारा जो मोठा व्यापारी तो.

**सवदागरी**, **सवदागिरी**, स्त्री० सवदागरा चें जें कर्म ती; २, ३लिं० सवदागरसंबंधी मा ल इ० तो.

**सवदासूत**, न० सवदा इ० तें.

**सवन**, स्त्री० न० गातें, पढतें समयीं चें जें उच्च, मध्य, नीचरूप स्वर मान ती, तें.

**सँवय**, **सवय**, स्त्री० कोणेक गोष्टीचें अनेक वार आचरण झाल्यामुळें कर्ता इ० कांचें अं गीं तत्संबंधी जडतो जो संस्कार ती जेणें क रून ती गोष्ट स्वाभाविक वृत्तिप्राय होत्ये. अ तएव तद्दिरहीं दुःखव्हावें ती सहनांत केली आर्या इ० होतें.

**सँवरणें**, **सवरणें**, याव धातुमात्राचा रूपा पुढें तत्सदृश याचीं रूपें होऊन उपशब्दासा रिखीं लागतात; उ०, मी देऊन संवरून की हो चोर झालों; झालें संवरलें आतां त्याची गोष्ट कशास पाहिजे.

**सवर्णन**, न० सं० सावयव अंकांचा सूक्ष्म जो अवयव असेल तत्सजातीय अवघे अवय व करून त्यांचें जें एकीकरण तें.

**सवर्णित**, ३लिं० सं० सवर्णन ज्याचें केलें असा जो अंकराशि तो.

**सवा**, ३लिं० एककिं० एकत्वें करून विवक्षित जो पंचविशी, पन्नाशी, शें, हजार, इ० अंकरा शि त्यांचा चतुर्थांशानें युक्त जो एक अंकक्रि० अंकराशि तो; उ०, आठ आणि पावला मिळून

सवा

सवा आठ; शें आणि पंचवीस मिळून सवा शें.

**सवाई**, २लिं॰ कोणेकाचे चतुर्थांशानें युक्त जो कोणेक तो त्यापेक्षां; उ॰, कोंकणचे मापापेक्षां देशाचें माप सवाई आहे; २, स्त्री॰ द्रव्यादिरूप जो कोणएक अवयवी त्याचा जो चतुर्थांश तत्तुल्य अंशानें जी त्या अवयवीची अधिकता ती, हो, कर, इ॰ योगीं प्र॰; ३, प्राकृत कवितेंत एक छंद आहे; ४, ग॰ सवई.

**सवाकीं**, न॰ दे॰ एक सवें सवें वेसवें अडीच अशी प्रकारची मुलांस शिकवायाचे उपयोगीं एक अंक परिपाटी आहे ती, प्र॰ अनेकव॰.

**सवागी**, स्त्री॰ पु॰ एक स्वार आहे.

**सवाणणें**, स॰ स्वोबाचें नेम, बंदूक, इ॰ कांत माती, दारू, इ॰ घालून घट्ट बसवावी-ह्मणून पहार, गज, इ॰ कांचे अग्रानें अनेक वार ठोकणें, पक्षीं तें नेम त्यांत बसवायाचा स्वोब, इ॰ कांस ही कर्मता.

**सवाणा**, पु॰ चिमट्या सारिखें सोनाराचें एक आऊत आहे.

**संवाद**, पु॰ कोणएक विषयांचें प्रश्नोत्तरादि रूप जें परस्पराचें भाषण तो.

**सवायकें**, न॰ सवाकीं याचा एकवचनीं ही प्र॰ होतो; उ॰, मला सवायकें पाठ आहे.

**संवारी**, स्त्री॰ कों॰ समुद्राचें नित्यशः भरती ची परिपूर्णावस्था ती.

**सवारी**, पु॰ गानसंबंधी तालांत एक भेद आहे; २, ३लिं॰ नहिंशिष्ट जो ख्याल इ॰ तो.

**सवाल**, पु॰ विवादादि प्रसंगीं वादिप्रतिवादी इ॰ कांस कोणेक गोष्टीविषयीं जो प्रश्न करितात तो; २, यवनी महिन्यांतील जो दहावा महिना तो.

**सवाशा**, पु॰ कांहीं एक दोषानें पृथक्कृत पावली अशी एक ब्राह्मण जाति आहे.

**सवाशीण**, स्त्री॰ **सवाष्ट**, स्त्री॰ **सवाष्ण**, स्त्री॰ सुवासिनी शब्दाचा अपभ्रंश.

**सविस्तर**, ३लिं॰ विस्तारें करून युक्त जें वर्तमान, गोष्ट, लेख, इ॰ तो.

**सवें**, **संवे**, स्त्री॰ दे॰ संवय.

**सवें**, अ॰ग्रं॰ कोणएकासह वर्तमान, आ, ये, उड, घे, इ॰ कांचें वि॰.

**सवेंच**, **सवेंचि**, अ॰ग्रं॰ कांहीं एक कार्याचे अव्यवहित उत्तरक्षणीं कांहीं एक करणें, होणें, इ॰ कांचें वि॰; उ॰, ऐसें बोलून अगस्तिमुनि, सवेंचि गेला निजस्थानीं.

**सवेण्या**, स्त्री॰ कों॰ रासन्हाणें ह्मणून जो समारंभ त्या; प्र॰ अनेकव॰.

**सव्य**, न॰ पदार्थमात्राचा जो डावा भाग इ॰ तो; २, प्रदक्षिण जें भ्रमणादि तो; ३, लोकामध्यें जो उजवा भाग त्यास ह्म॰.

**सव्यगत**, अ॰ कों॰ ईषन्मात्र ही उणेपणादि सण्यांत न यावयाजोगा व्यक्तपणें कोणेक पदार्थ दृष्टीस पडणें भूम्यादिकांवर प्रति

बिंबि

बिंबित होणें इ० कांचें वि०.

**सव्यसाची**, पु० दोहींहातानीं सारखें बाणमारणारा असा एक पुराण प्रसिद्ध पांडवांत अर्जुन म्हणून होता त्याची ही संज्ञा आहे त्यावरून आतां जो कोणी दोहीं हातानीं सारखें काम करितो त्यास आरोपानें म्ह०.

**सव्याज**, ३ लिं० व्याजासहित जें मुद्दल इ० तो.

**सशा**, ३ लिं० ससा.

**सबाल**, पु० सवाल हिती यार्थः.

**सव्वीस**, ३ लिं० एक संख्या आहे २६.

**संशय**, पु० संदेह.

**संशयग्रस्त**, ३ लिं० संदेहविशिष्ट जो तो.

**संशयात्मक**, ३ लिं० ज्यापासून संशय उत्पन्न होतो पुरतेपणीं एकाचें ज्ञान होत नाहीं असा जो ग्रंथ. भाषण. इ० तो.

**संशयी**, ३ लिं० भलत्याच गोष्टीविषयीं ज्याचे मनांत अनेक संशय पदोपदीं येत असावे अशा स्वभावाचा जो मनुष्य तो.

**सष्टम**, ३ लिं० कों० ठळक जो दागिना इ० पदार्थ तो.

**ससकर**, ३ लिं० ग० धान्यादि पदार्थांत त्याचे बरोबरीनें मिश्रित झालेला असतो जो गेंतो, पाकड. खडे, विजातीय धान्य इ० पदार्थांतर तो.

**संसक्त**, स० ३ लिं० आसक्त.

**ससगणी**. **ससगाणी**. स्त्री० स० सजगणी प्रथमार्थः.

**संसर्ग**, पु० पदार्थाचा पदार्थाशीं जो स्पर्शादि

दि संबंध तो.

**संसर्गी**, ३ लिं० कोणेकाचा संसर्ग ज्यास आहे तो त्याचा.

**संसर्प**, पु० ज्यापक्षें क्षयमास येतो त्यापक्षें क्षयमासाचे पूर्वी जो अधिक मास पडतो तो.

**ससा**, पु० एक चतुष्पद पशु आहे.

**ससाणा**, पु० एक पक्षी आहे.

**संसार**, पु० प्रपंच प्रथम हिती यार्थः.

**संसारी**, ३ लिं० घरदार, बायकापोरें, इ० रूप संसार ज्याचे पाठीशीं आहे तो.

**संसारीक**, ३ लिं० द्रव्योपार्जन करून व्यवस्थेनें खर्च करावा, कुटुंब पोषणादि करावें, इ० रूप संसार करण्याविषयीं जो दक्ष तो.

**ससाक्ष**, ३ लिं० साक्षीनें विशिष्ट जो लेख, भाषण इ० तो.

**संसृति**, स्त्री० सं० प्रपंच प्रथमार्थः.

**संस्करण**, न० संस्कारण्याचा जो व्यापार.

**संस्कर्ता**, ३ लिं० संस्कार करणारा जो तो.

**संस्कार**, पु० कोणेक अर्थावर क्रियेचा संबंध झाला असतां तेणें करून त्या अर्थावर कांहीं एक नवा विशेष गुण उत्पन्न होऊन कांहीं राहतो तो, ज्याचे योगानें त्या अर्थाचे स्वरूपाचा पूर्वावस्थेपेक्षां कांहीं भेद होतो; २, गर्भाधानादिक जे संस्कार कर्में ती प०.

**संस्कारणें**, विवक्षित संस्कारानें विशिष्ट करणें.

**संस्कारित**, ३ लिं० संस्कारिला जो तो.

**संस्कार्य**, ३ लिं० ज्याचा संस्कार करावयाचा आ

**संस्कृत**, ३लिं० संस्कारित ;२, एक भाषा आहे तीचें आणि तत्संबंधी जो शब्द, ग्रंथ, भाषण, इ० त्याचें वि०.

**संस्कृति**, स्त्री० सं० संस्कार.

**सस्ता**, ३लिं० सवंग.

**सस्ताई**, स्त्री० सवंगाई.

**सस्तावणें**, स्वस्तावणें.

**संस्थ**, ३लिं० जो जेथें स्थित तो तत्संस्थ ;उ०, जलसंस्थ, वृक्षसंस्थ, इ० समासी प्र० ;२, जा दिशेकडे जाची समाप्ति तो तत्संस्थ ;उ०, दक्षिणेकडे संस्था जाची तें दक्षिणसंस्थ, प्राक्संस्थ, उदक्संस्थ, इ० स० प्र०.

**संस्था**, स्त्री० सुखरूपें करून राहण्यास अन्नोदकादिकांची जीजी जशीजशी सोय असावी तसें तसें तिचें आनुकूल्य असल्यामुळें जी यथास्थितपणें स्थिति होते ती ;२, स० कोणेक अर्थाची समाप्तिरूप जी दशा ती.

**संस्थान**, न० राजाचा राजकीय व्यवहार जेथें मुख्यत्वें करून होत असतो असें जें नगरादिस्थान तें ;२, जाचे खर्चाचे सरंजामाकरितां राजादिकांनीं ग्रामादि दिल्हें असतें असा जो कोणी देव, सत्पुरुष, विद्वान्, मांडलिक, राजे, इ० यांचें जें आपआपल्या व्यवहार करण्याचें मुख्य ग्रामादि स्थान तें ;३, मोठा विद्वान् इ० जो कोणी त्यास ह्म०.

**संस्थानिक**, ३लिं० वंशपरंपरादि संबंधी जी स्थानें तीं समान आहेत ज्यांचीं ते परस्पर.

संस्थानी

**संस्थानी**, ३लिं० स्थलरूप संस्थानाचा जो अधिकारी तो.

**संस्थापणें**, उत्तम रीतीनें देव, राजा, धर्म, इ० स्थापणें.

**संस्थापन**, **संस्थापना**, न० स्त्री० संस्थापण्याचा व्यापार तें, ती.

**संस्थापित**, ३लिं० संस्थापना केली ज्याची तो.

**संस्थित**, ३लिं० उत्तम प्रकारें जो स्थित तो.

**सस्य**, न० सं० वृक्षादिकांचें जें फल तें परंतु धान्याविषयीं विशेषेंकरून प्रसिद्ध.

**सह**, अ० विवक्षित अर्थातें घेऊन जाणें, येणें, आणणें, इ० कांचे वि०.

**सहगमन**, न० स्त्रीचें सती जाण्याचें जें कर्म तें.

**सहचर**, ३लिं० कोणेक कर्माविषयीं जो ज्याचे बरोबर वागणारा तो त्याचा परंतु मित्रपणानें जो वागणारा त्याविषयीं प्रा० प्र०.

**सहज**, ३लिं० सं० एकोदरोत्पन्न जे बंधुभगिनी इ० ते परस्पर ;२, मनुष्यादि पदार्थ जेव्हां उत्पन्न होतो तेव्हां त्याचे बरोबर त्याचा शरीरीं उत्पन्न झाला जो केश काम क्रोधादि तो.

**सहज**, अ० तादृश कार्योद्देश न धरितां किंवा तादृश प्रयत्न न करितां जा, ये, कर, हो, इ० कांचें वि० ;उ०, सहज कोणाचे घरीं जाऊन ये ; दरबारांत जात असतां ह्मणजे सहजच चार मंडळींचा परिचय होतो.

**सहजगतीनें**, **सहजगत्या**, अ० ना० सहज या अर्थी.

सहजगतीनें

सहजगतीनें. सहजरीत्या, अ॰ सहजगतीनें.

सहजाखालीं. अ॰ सहजगतीनें

सहजांत, अ॰ सहज.

सहजानसार, अ॰ सहजांत.

सहजावारीं, सहजावृत्या, अ॰ ग्रा॰ सहजगतीनें.

सहजासहजीं, अ॰ सहजगतीनें

सहदेवी, २लिं॰ सहदेव ह्मणून एक शूद्रांत ज्योतिषी झाला होता त्याणें पोक्त जें ज्योतिष प्रकरणी ठोके, शकुनें, मन, इ॰ ती;२, स्त्री॰ एक औषधी झाड आहे.

सहन, न॰ सं॰ प्रतिकूलत्वें करून संबद्ध होणार जो दुःख, संकट, शीत, उष्ण, अन्यकृत अपराध, भार, इ॰ कांहीं एक अर्थ त्यांचे संबंधानें होणारी जी क्षोभभंगादि विक्रिया तिला आत्मप्रभावानें न होऊं देतां किं॰ झाली असतां न गणितां त्या अर्थाचें जें आत्मसंबंधांत धारण तें.

सहनशक्ति, स्त्री॰ शीतोष्णादि सहन करण्याची जी शक्ति ती.

सहनशील, ३लिं॰ अन्यकृत अपराधादि सहन करण्याविषयीं आहे शील ज्याचें तो.

सहनीय, ३लिं॰ ज्याचें सहन करणें योग्य ते.

सहल, स्त्री॰ व्यायामार्थ मौजेनें इतस्ततः फिरण्याचा जो व्यापार ती;२, अ॰ कोणी एक गोष्ट कोणे एक कारणानें सुलभ होई असें पड. धा॰ प्र॰;उ॰, देणें जें आहे तें थोडें थोडें देत गेलें ह्मणजे सहल पडतें एकदांच थोर रकम द्यायास अवघड.

सहवर्तमान, अ॰ सह.

सहवास, पु॰ एकत्र स्थिति इ॰ रूप जो कोणे काशीं कोणेकाचा संबंध तो;२, एकत्र स्थिति संभाषण इ॰ कारणानें कोणेकाचा होतो जो विशेष परिचय तो; कोणेक व्यवहारादि सहवासाखालीं पडणें ह्म॰ अभ्यासाखालीं पडणें.

सहवासणें, क्रि॰ सहवासादि कारणामुळें कोणेक स्थल किं॰ मनुष्यादिक ह्यांचा गुण किं॰ चाईट अशा रीतीनें अनुभूत करणें.

सहवासी, ३लिं॰ ज्याचा सहवास ज्यास आहे तो त्याचा.

सहसा, अ॰ एकाएकीं लोकांत निषेधविषयीं प्र॰;उ॰, तुह्मी सांगता खरें पण त्याचे हातून सहसा अशी गोष्ट घडणार नाहीं.

सहस्र, न॰ पु॰ एक संख्या आहे १०००.

सहस्रघृत, न॰ सहस्रवेळ धुऊन औषधार्थ सिद्ध करितात जें घृत तें.

सहस्रनाम, न॰ विष्णु, शिव, इ॰ देवांचा सहस्र नामांचा जो समुदाय तें;तुलसी इ॰ कांचें सहस्रनाम वाहणें इ॰ स्थलीं ईश्वर नामोच्चारपूर्वक सहस्र तुलसीदल इ॰ वाहणें.

सहस्त्रभोजन, न० सहस्त्र ब्राह्मणास भोजन द्यावें असें जें धर्मकृत्य करितात तें.

सहस्त्रशः, अ० हजारों.

सहस्त्रावधि, अ० हजारों.

सहा, ३ लिं० संख्या आहे ६; २, स्त्री० साय ह्यितीयार्थः.

सहाकार, पु० कोणेकाचें साहाय्य करण्याचा जो व्यापार तो.

सहाकारी, ३ लिं० जो जाचा सहाकार करितों तो त्याचा.

सहाण, स्त्री० वरचंदनादि उगाळणें इ० यार्थ प्रा० कुरंदाचे दगडाचा एक आकारविशेषाचा पदार्थ करितात ती; २. शस्त्रास धार लावणें, हीरकादि घांसणें, इत्यार्थ जो त्याचे तळी सारिखा एक पाषाणादिकांचा पदार्थ करित असतात ती.

सहाध्यायी, पु० बरोबर अध्ययन करणारे जे अनेक ते परस्पर.

सहामहिन्याचीजांभई, स्त्री० जाचे हातून लौकर काम होत नाहीं असा आळशी, चेंगट, जो कोणी त्यापाशीं कांहीं काम दिल्हें असतां हें काम लौकर होणार नाहीं अशा संभावनेनें या शब्दाचा प्रयोग करितात; उ०. या सोनारापाशीं दागिना करायास दिल्हा ह्मणजे सहामहिन्यांची जांभई. आज देतों ह्मणेल आणि वर्ष सहा महिनें लावील.

सहाय, ३ लिं० कोणेक मनुष्यादि कांहीं एक कार्य करीत असतां तत्कार्य सिद्धी विषयीं अनुकूलपणें त्याशीं वागणारा जो मनुष्यादि तो त्याचा; २, न० साहाय्य शब्दाचा अपभ्रंश.

संहार, पु० सं० प्रकृत स्वरूपसोडून विशेषनामरूपानें प्रसिद्धीस आलेला जो कोणेक अर्थ त्याचा तें नामरूप सोडून पुनः आपल्या प्रकृत स्व स्वरूपीं जो लय तो; २. खाणें, जाळणें, मारणें, तोडणें, इ० केंकरून कोणेक अर्थाचा निःशेष जो नाश तो; ३. कौ० संवारी.

संहारणें, कोणेकाच्या संहार होई असें करणें.

सहासष्ट, ३ लिं० एक संख्या आहे ६६.

सहित, ३ लिं० कांहीं एका पदार्थानें युक्त तो तत्सहित; २. अ० सहवर्तमान.

संहिता, स्त्री० अनेक जे वर्ण पदें इ० त्यांची अतिशयित सान्निध्यें करून जी स्थिति ती; २. ऋष्यादि प्रोक्त जे वैद्यक, धर्मशास्त्र, ज्योतिष, वेदांत, इ० विषय प्रतिपादक मूलग्रंथ ते प्र०; सूतसंहिता, वाराहसंहिता, गर्गसंहिता, इ० स०; ३, वेदामध्यें एक विभाग आहे ती.

सहिलावणें, रा० सैलावणें.

सहिष्ण, ३ लिं० सहिष्णु शब्दाचा अपभ्रंश.

सहिष्णु, ३ लिं० सहनशील.

सही, स्त्री० सई ह्यितीयार्थः.

सहील, ३ लिं० रा० सैल.

**सहंला**, स्त्री॰ सहल प्रथमार्थ.

**सहोदर**, ३ लिं॰ एकोदरोत्पन्न जे बंधुभगिनी इ॰ ते परस्पर.

**सह्याद्रि**, पु॰ मुख्य जें सात पर्वत त्यांतील एक पर्वत आहे.

**सळ**, पु॰ सल चतुर्थार्थ; २, नव्यासन गास जा घडीचा मोडी असतात त्या प्र॰.

**सळई**, स्त्री॰ उगणू, गळू, इ॰ फोडणें किं॰ नेत्रांत अंजन घालणें, इ॰ कांहीं एक कारणास्त व धातु, कांबीट, इ॰ कांची केली असत्येजी शलाका सारिखी काडी ती; २, कडधान्य, गवत, फळें यांची संख्येनें किं॰ लोकडांची वजनानें इयत्ता कर्तव्य असतां विवक्षित संख्यार्थ जी नत्त दशा काढून ठेवितात ती; ३, विडा वसविल्या वांचून जें मुसळाचें लांकूड ती; ४, ननानी मुगटयावर जाउभ्यारेषा असतात त्या प्र॰.

**सळणूक**, स्त्री॰ छळणूक.

**सळणें**, दे॰ सा॰ छळणें याअर्थ.

**सळंप-सळप**, न॰ गा॰ लहान पातळजी लांकडाची ढलपी तें.

**सळपा**, पु॰ गा॰ उसळपा.

**सळय**, स्त्री॰ कों॰ सळई हिती या अर्थावांचून.

**सळसळ**, अ॰ अतिनम्र जें जलादि त्याचा शब्दाचें अनुकरण; वाजणें, करणें, इ॰ कांचें वि॰.

**सळसळणें**, उदकादिकानें विशेषता पल्यामुळें सळसळ शब्दानें विशिष्ट होणें.



**सळसळां**, अ॰ सळासळ.

**सळा**, स्त्री॰ कों॰ सळई प्रथमार्थी.

**सळाथी**, कों॰ स्त्री॰ केरसुण

**सळासळ**, अ॰ सळसळ

**सळाळां**, अ॰ सळासळ.

**संक्षिप्त**, ३ लिं॰ संक्षेपविशिष्ट जो ग्रंथ, भाषण इ॰ तो.

**संक्षेप**, पु॰ अवांतर विशेषादि योगानें विस्तार पावलेली जी कोणेक गोष्ट ती आंतील सारांश न जातां जितका अंश कमा होईल तितका कमी करून थोडक्यांत आणण्याचा जो प्रकार तो.

**संज्ञक**, ३ लिं॰ ती ती आहे संज्ञा ह्मणजे नाम ज्याचें तो तो तत्तत्संज्ञक, द्रव्यसंज्ञक, गुणसंज्ञक, विष्णुसंज्ञक, इ॰.

**संज्ञा**, स्त्री॰ व्यवहारामध्यें त्यात्या अर्थाचें तत्तद्रूपें करून ज्ञान व्हावें ह्मणून अर्थमात्रास जें संकेतित नाम असतें ती; २, कोणं कास कांहीं एक विषयानें नेत्रसंकेतादिद्वारा करितात जी खूण ती; ३, संमूर्च्छित झाला जो कोणी त्यास येत्ये जी शुद्धि ती.

**संज्ञी**, पु॰ जा संज्ञेचा अभिधेय जो अर्थ तो तिचा.

**संज्ञीक**, ३ लिं॰ जाजा अर्थाचा जाजा प्रसिद्ध संज्ञा आहेत त्या सोडून लाघवार्थ तेतें अर्थ खुणेनें समजावे ह्मणून नवेंच कांहीं तद्विषयीं संकेत केले असतात त्या संकेतानीं जाणायाचा जो ग्रंथ,

भाषण, लेख, अर्थ; इ०.

संङ्गु, ३लिं० सं० चालताना गुडघ्यास गुडघाजा चा लागत असतो असाजो मनुष्यादि तो.

सा, ३लिं० सदा ह्मणून जी संख्या तो.

साई, स्त्री० सायंदिनाया० थ.

साउली, स्त्री० प० सावली.

साऊळ, स्त्री० रा० माड, पोफळी, इ० कांची आवळी.

साकू, स्त्री० साख.

साँकटण, न० रा० सफोटण.

साँकटणें, स० कांही एक पदार्थ साँकटणाव र धरून खंडशः होई असें तोडणें; २, न० सां कटण.

साँकड, ३लिं० संकुचित जें स्थळ, पात्र, गृह, इ० तो; ह्म० घर साँकड बाईल माकड, पा० ह्मणांत प्र०.

साँकडें, न० प० कोणेकास प्राप्त होतें जें संकट तें.

साँकणें, स० सांखणें.

साकर, स्त्री० साखर; साखर शब्द पूर्वक जे शब्द पुढें आहेत ते साकर शब्दपूर्वक ही हो तात, साखरनिंबू एथें साकरनिंबू; साख रपारा एथें साकरपारा, इ०.

साँकर, पु० रा० प्राणी वहावयाचा जो पाट, मोरी, इ० मार्ग त्यामध्यें प्रवाहाचा प्रतिबं ध करणारा जो केर, पातेरा, इ० जमतो तो ;२, गातेवेळेस; क्रि० ह्मणतेवेळेस, क्रि० बो लतेवेळेस, शब्दप्रवाहाचा प्रतिबंधक जो गळ्यामध्यें कफांश जमतो तो.

सांकल्पिक, ३लिं० अंतःकरणाचे संकल्पानेंच केलेला इत्यादिकिं संकल्प संबंधी जो कोणेक अर्थ तो.

साकल्य, न० सकलपणा; साकल्यवर्तमान, साकल्यवृत्त, साकल्यार्थ, इ० स्थलीं सकल या अर्थीच कोणी ह्म०.

साँकव, पु० रा० साकू.

साँकशी, स्त्री० वरीळीचा आकाराची जी करंडी तो.

साकसुरत, ३लिं० नीटनेटका, यथास्थित जें थील तेथें जसा असावा तसा जो लेख, भाषण, इ० पदार्थ तो.

साँकळ, स्त्री० साखळ.

साँकळणें, स० सांखळणें प्रथमार्थ.

साँकळी, स्त्री० रा० साकळ.

साँका, पु० सांखारा.

साँकाटा, पु० रा० सांगाडा; २, मांपडा.

साकार, ३लिं० आकृति आहे जास असा- जो ईश्वर मूर्ति, इ० पदार्थ तो.

साकी, स्त्री० साक.

साँकुळणें, स० सांकळणें.

साँकू, पु० कों० नद्यादिकांतून पार जाण्याक रिता आडवीं लांकडें, टाहाळ, इ० टाकून जो सरासरी पूल करितात तो.

सांकेतिक, ३लिं० ज्याज्या अर्थीचा ज्याज्या प्र- सिद्ध संज्ञा आहेत त्या सोडून लाघवार्थ त्या त्या अर्थीचा नव्याच केल्या असतात

तात आशाब्दरेषा, इ० रूप मज्ञात नधान जें भाषण, लेख, ग्रंथ, शास्त्र, व्यवहार, इ० तो.

**साख**, स्त्री० पत; २, सचोटी.

**साँखणें**, घृतादि पदार्थांनें थिजणें.

**साखर**, स्त्री० अग्निसंयोगादि कृतिविशेषानें इक्षुरसाचा रेतीसारखा एकपरिणाम होत असतो ती; साखरपेरणें, पसरणें, इ० स्थलीं कांहीं एक आपला मतलब साधायासाठीं कपटानें कोणास द्रव्य देणें, कोणाशीं गोड बोलणें, इ० रूप गोडीचा डौल दाखविणें: म्ह० हातावर साखर आणि मानेवर कातर; साखरेची सुरी म्ह० आंत कपट असून बाहेर गोड दिसावें असें जें भाषण किं० तादृश भाषण कर्ता इ० त्यास म्ह०.

**साखरजांब, साखरजांभ**, पु० गुळाचा जांब.

**साखरझोंप**, स्त्री० पहांटेच्या वेळेस थोडी बहुत निद्रा येतात तीस म्ह०.

**साखरनिंबी, साखरलिंबी**, स्त्री० एक फलप्रधान झाड आहे.

**साखरनिंबू, साखरलिंबू**, न० साखरनिंबीचें जें फळ तें.

**साखरपाणी**, न० अंतस्ताप निवारणार्थ आंत साखर आणि कागदी निंबाचा रस घालून प्यायाकरितां जें पाणी करितात तें.

**साखरपारा**, पु० तूप साखर यांत सपीठ घालून एक भक्ष्य पदार्थ करीत असतात तो.

**साखरपुडा**, पु० वधूवरांचा विवाह निश्चय दिवशीं वधूच्या हातांत साखरेचा पुडा देऊन सर्वांस पानसुपारी वांटणे इ० रूप जो समारंभ करितात तो.

**साखरफुटाणा**, पु० पांढरी इलायची दाणे किं० भाजलेले हरभरे घालून वर साखरेचा थर चढवून पांकलावून जाकर वगैरा एखाद्या गोळ्या करितात त्या म्ह०.

**साखरफेणी**, स्त्री० साखरेच्या मोगरूदट जो बनवितात ती.

**साखरबोंड**, न० एकप्रकारचें आहे.

**साखरभात**, पु० केशरीभात.

**साखररंगी**, ३लिं० गुळीसारखे साखरे रंगाचें जें वस्त्र, कागद, इ० तो.

**साखरलाडू**, पु० एकप्रकार आहे.

**साखरवडी**, स्त्री० एकप्रकार आहे.

**साखसुरत**, ३लिं० साफसुरत.

**साँखळ**, स्त्री० कों० लोहादिकांची मोठी जी सांखळी ती.

**साँखळणें**, नासणें इ० विकृतीनें मा० रक्तानें घट्ट होणें; २, ला० व्याघ्रादिकांनीं इतस्ततः जाऊं नये इत्यार्थ विवक्षित स्थलीं त्यांस सांखळीनें संबद्ध करणें; ३, मनुष्यादिकांनीं स्वतंत्रपणें वागूं नये म्हणून विवक्षित उद्योगीं गुंतविणें.

**साँखळदंड, साखळदंड**, पु० धातुमय अनेक कडया एकत्र गुंतवून दंडाकार जी मोठी जाडी

ते परस्पर.

साडे, पु० लग्नानंतर प्रा० चतुर्थादि दिवशीं गं शिणी पूजन वरास वधूस वस्त्रदान इ० जें कर्म करितात तें; कोणाकाचें साडे करणें ह्म० खरडपट्टी काढणें. २, लिं० हा शब्द सार्ध शब्दाचा अपभ्रंश परंतु निराळा असून पुढील जी संख्या तीचें विशेषण होऊन समासीच प्र० होतो. इ०, अर्धानें सहित जे तीन ते साडे तीन, साडेपांच, इ०; शिनळीचा, रांडकीचा, इ० कितीएक शिव्यांचे ठायीं शब्दाधिक्य द्योतकत्व करून या शब्दाचा प्र० करितात, उ०, हा साडेशिनळीचा, साडे माचागमनी, इ०.

साडेभावार्थी, ३लिं० आंतऊबाड असून बाहेर भावार्थ दाखविण्याचा स्वभाव ज्याचा त्यास प्रसंग विरोधी ह्म०.

साढ, पु० ओं० साड.

साणे, स्त्री० रा० सहाण.

साणा, पु० रा० निसणा; २, शेत, गुन्हाळ, इ० कांचे रात्रीं सर्कीती इ० कांहीं चोरून काढून नेईल ह्मणून आपल्या पक्षाचा जो कोणी रक्षणार्थ बसवितात तो.

साणें, न० रा० गृहादिकातीक धूरजावा ह्मणून किं० आंतउजेड यावा ह्मणून किंवा कांहीं कारणास्तव भिंत इ० कांस राखितात जें दार तें.

सात, ३लिं० एक संख्या आहे; १; २, स्त्री० साथ.



सांत, स्त्री० धाम; २, एक मत्स्य जाति आहे.

सातत्य, सांतत्य, न० कांहीं एक व्यापार इ० कांचा जो सततपणा.

सातपानी, ३लिं० रा० उगवल्यापासून सात पानें आलीं ह्मणजे ज्याला फूल येतें अशा जातीचा जो दुधभोपळा, काकडी, इ० कांचा वेल तो.

सातपुती, स्त्री० पडघोसाळी; २, सातपुत्र जीस आहेत ती; याचा प्रयोग ह्मणींत, ह्म० एकपुती रडती आणि सातपुती रडती.

सातपुतें, न० पडघोसाळें.

सातरणें, क्रि० वृक्षानें वगैरे अंगून सारख्या विस्तारानें युक्त होणें.

सातरूस, पु० ऐशानी दिशीकडून वहात असतो जो वारा तो.

सातरें, न० सात अहोरात्रें पर्यंत जी पर्जन्यादिकांची स्थिति तें; २, सहा दिवस मध्यें जाऊन सातवे दिवशीं हीं व्हावें असा जो होंव येण्याचा प्रकार तें; ३, ला० ज्याची नित्यांत मातिनाहीं कधीं मधीं प्राप्त होणार असा जो मिष्टान्न भोजन, इत्यादि लाभ, इ० कांचें कांहीं दिवस चालतें जें सातत्य त्यास ह्म०; उ०, पंधरा दिवस सारभोजनाचें सातरें लागलें होतें.

सांतवण, पु० एक वृक्ष आहे.

सांतवन, न० सांत्वन शब्दाचा अपभ्रंश.

सातवळा, ३लिं० सातव्या मासीं जन्मलें जें अपत्य तो, किं० ती बाळंतीण.

सांतविणें, सं० कोणेकास उपदेशादि द्वारा-

केशिवाय फकीर, गोसावी, बैरागी, मंजवानि संबंधी जो जाजता होतो खर्च त्याचे आणि त्या बद्दल करितात जी गांवावरपट्टी तिचें तत्संबंधी जमालिहिणें इ॰ कांचें वि॰.

सोंदीकोंदी, स्त्री॰ सांद, कोंपरा, इ॰ रूप जे गुदे ड्रा त्या प्र॰ अनेकव॰

सादृश्य, न॰ सदृशपणा.

सांदोरी, स्त्री॰ सोंठी जी सोदता.

साद्यंत, ३लिं॰ आद्यंतानें सहित असा अथवा जो ग्रंथ, वर्तमान, इ॰ तो.

सांद्र, ३लिं॰ सं॰ निबिड.

सांध, स्त्री॰ सांद.

साधक, ३लिं॰ मोक्षादि कार्य साधण्याविषयीं प्रवृत्त तो; २, विवक्षिततत्तत्कार्य सिद्धिविषयीं उपयुक्त जो लेख, वचन, पदार्थ इ॰ तो.

सांधण, न॰ कों॰ सांदण.

सांधणतारली, स्त्री॰ कों॰ सांधणपात्र.

साधणूक, स्त्री॰ मंत्रयंत्रादिकें करून कांहींएक कार्य साधण्याचा जो व्यापार ती; २, कोणेक कार्य सिद्ध करण्याविषयीं करून ठेवलें असतें जें कृत्य इ॰ रूप संधान ती.

साधणें, तत्तदुपयोगि व्यापारानीं तें तें कार्य सिद्ध होई असें करणें; २, तादृश व्यापारानें तें कार्य सिद्ध होणें; कालादि साधणें स॰ तत्तत्कार्यास उक्त जो काल त्या कालीं तें तें कार्य करून त्या कार्यास तो काल संबद्ध होई असें करणें.

सांधणें, वस्त्र, कागद, पत्रा, सूत्र, काष्ठ, इ॰ पदार्थाचे फाटणें, तुटणें, मोडणें, इ॰ कारणानें भिन्न झाले जे विभाग ते कि॰ मुळचेच पृथक् जे विभाग ते तो तो वस्त्रादि पदार्थ सलग एकरूप दिसावा जोगे परस्पर एकास एक जडणें.

साधन, न॰ विवक्षित कार्यादि साधण्याचा जो व्यापार तें आणि तदुपयुक्त जो लेख, पत्र, कुगार, इ॰ कारणभूत पदार्थ तें प्र॰.

साधनद्वादशी, स्त्री॰ पूर्वदिवशीं एकादशी नयुक्त उपवास करून उत्तरदिवशीं द्वादशी कांहीं राहतेत्यांत पारणा साधावी अशी विवक्षा असतां त्या द्वादशीस म्ह॰.

साधनसूत्र, न॰ द्दलगेवजी कागद, पत्र, इ॰ रूप जें साधन इ॰ तें.

साधनी, स्त्री॰ गवंडी, सुतार, इ॰ कांचें उंच, नीच, वांकडें, तिकडें, इ॰ पहायाचें उपयोगीं एक आऊत आहे; २, ३लिं॰ कोणएक कार्य साधण्याविषयीं अनेक युक्ति प्रयुक्ति द्वारा झटणारा जो मनुष्य तो; ३, कांहीं एक कार्य साधनास उपयोगीं पडायाजोगा जो मतलबी कागद, पत्र, इ॰ तो; ४ मुख्यत्वें करून साधनोपयोगीं जें खत, पत्र, इ॰ त्यास प्रसंगविशेषीं म्ह॰.

सांधप, न॰ रा॰ कार्यादि साधण्याचा जो व्यापार तें.

साधर्म्य, न॰ सादृश्य.

साधलाद, स्त्री॰ कोणेकापासून बरें वाईट फल होण्यास प्रयोजक जी दैवगतता ती; इ॰ आम्ही दीर्घ सारखी चाकरी करीत असतां यजमानानें त्यास हजार रुपये बक्षीस दिले मला कांहीं नाहीं ही साधलाद आहे.

**साधा**, ३लिं० नकशी, जर, रेशमी कांठ, आंत कोरूप णा, अफूड, अन्योक्ति, वक्रता, इ०रूपजे त्यात्या पदार्थास विशेष शोभादि देणारे गुणादि तेज्या चे आंगीं नाहींत असाजो स्तंभ, पागोटें, धोत जोडा, मनुष्य, भाषण, इ० तो.

**सांधा**, पु० सांधलेल्या अनेक पदार्थांचा जो संधिप्र देश तो कि० अवयविरूपजो पदार्थ त्यास अवयवनें करून- सांधला जो सजातीय तुकडा तो; उ०, बादोरीस दहा हात सांधा लाविला तेव्हां पाणी काढायाचे उपयो गीं झाली कोणएक व्यवहाराचा सांधा बसणें म्ह० जम बसणें.

**साधारण**, ३लिं० विवक्षित जे अनेक अर्थ त्यांजव रजाचा समान संबंध असतो असाजो कोणेक धर्मादि तो; उ०. मनुष्य हें साधारणनाम त्यांत ब्राह्मण, शूद्र हीं विशेनामें, साधारण धर्म, सा धारणरीति, साधारणसंज्ञा, सर्वसाधारण, उभयसाधारण, इ०स०; २, केवळ उत्कृष्ट नव्हे, केवळ निकृष्ट नव्हे, असा मध्यम मतीचा जो अर्थ तो; ३, पु० चवेचाळिसावा जो संवत्सर तो.

**साधारणपक्ष**, पु० कोणेक कार्याविषयीं उत्त मपक्ष, आणि निकृष्टपक्ष सोडून स्वीकारता त मध्यम जो पक्ष तो.

**साधारण्य**, न० सं० साधारणपणा.

**साधित**, ३लिं० युक्तिप्रयुक्तीनें साधिलाजो तो.

**सांधींव**, ३लिं० सांधून सिद्ध केला जो पदार्थ तो.

**सांधीकोंदी**, स्त्री० सांदीकोंदी.

**साधु**, पु० शमादि गुणें करून युक्त आणि काम क्रोधादि दोषानें रहित असा असून परोपकार करावा आणि ईश्वराचे ठायीं निष्ठा असावी असा जो तो; साधुसमागम, साधुसंगति, इ०स०; २, ३लिं० विवक्षित दोषरहित असून विवक्षित गु- णानीं विशिष्ट असाजो शब्द, भाषण, ग्रंथ, कर्म इ० तो; ३०, साधुजो पक्ष असेल त्याचें आ श्रमण करावें.

**साध्य**, पु० सं० एक देवजाति आहे; २, ३लिं० सत्ता वीस योगांतील जो बेविसावा योग तो; ३, त्या- त्या व्यापारानें साधायास शक्य जो तो कि० सा धायाचा जो तो; रोग, शत्रु, इ० साध्य आहेत इ० स्थळीं त्यांचा प्रतीकार साध्य आहे असा अर्थ.

**साध्वी**, स्त्री० पतिव्रता जी स्त्री ती.

**सान्निध्य**, न० सन्निधपणा.

**साप**, पु० सर्प.

**सांपई**, ३लिं० रा० कुबट.

**सापकंद**, पु० सापकांदा.

**सापका**, पु० पडणें क्रि० कांहींएक संकटादि प्रसं गानें प्राण जीव याजवर बितणें.

**सापकांदा**, पु० एक कंद आहे ज्याचे भक्षणानें वि षापासारिखी बाधा होते.

**सांपट, सापट**, स्त्री० सांधा इ० कांस असती जी फट ती.

**सांपटणें**, क्रि० सांपडणें.

**सापटोळी**, स्त्री० सर्पजातीय एक जिवाणू आहे.

**सांपड**, पु० रा० शेत इ० संबंधी लावणी, वेणणी, इ० काम लौकर व्हावें म्हणून एकामें पुष्कळ काम करी मिळून त्यांत एकानें वायवाज बीत असावें

आणि त्या नाशावर सर्वांनी इर्ष्येनें तें तें काम त्वरेनें करीत असावें असा काम करण्याचा जो प्रकार तो.

**सांपडणें**, अर्थाचें आकलन करणारे जे इंद्रियादिक त्यांचें तो तो अर्थ आकलित करायास साधनभूत जें नृत्यादिक त्याचा गयीं कोणेक अर्थ पडणें.

**सांपडा**, पु॰ कों॰ अनेक काठ्या, वांसे, इ॰ माळा, मंडप, इ॰ कांवर घालून प्रायः त्याचे वर खालीं दोन सांपडी घालून काठ्या, वांसे, इ॰ पोटीं सांपडवून त्यास अनेक बंध घेऊन जो तो विशिष्ट बंध करितात तो.

**सापत्न**, ३ लिं॰ सावत्र.

**सापत्नभाव**, पु॰ सवती, सापत्नबंधु, इ॰ कांचा परस्परजो वैरभाव तो.

**सापसंद**, **सापसंध**, स्त्री॰ एक औषधी आहे.

**सांपसारणी**, कों॰ स्त्री॰ मा॰ भाषण करते समयीं घसरलेली जी गोष्ट ती सुधारण्याचा जो व्यापार तो.

**सांपसारणें**, कों॰ अ॰ अव्यवस्थितपणें इकडे तिकडे पडलेले जे अनेक पदार्थ ते यथायोग्य स्थलीं आवरून ठेवणें; २, सांपसरणीचा व्यापारानें घसरलेली गोष्ट सुधारणें.

**सापसुरखी**, स्त्री॰ चौपय.

**सांपळा**, पु॰ घूस, वाघ, उंदीर, इ॰ प्राणी धरणें इ॰ कारणा करितां जो यंत्रविशेष करितात तो; ला॰ अस्थिपंजरास स्न॰.

**सांपालें**, न॰ रा॰ जेथें मनुष्यादिकांची विशेषेंकरून वहिवाट नाहीं आणि जेथें बिळें पडलेलीं, पातेरा पडलेला, तृणरुजलेलें, इ॰ असावें अतएव सर्पादिक किरडूं एथें रहात असेल अशी संभावना करवयाजोगें जें स्थल तें.

**सापिका**, पु॰ शिवराई पैशाचा जो अर्धभाग तो.

**सापिंड्य**, न॰ सपिंडपण.

**सांपूड**, स्त्री॰ कों॰ कुंपण इ॰ कांस बंधार्थ आडवीं-किं॰ उभी बांधायासाठीं जी वांबू इ॰ कांची काठी, वांसकटी, इ॰ घेतात ती.

**सापेक्ष**, ३ लिं॰ जाविषयीं जास अपेक्षा आहे तो त्या विषयीं सा॰ स॰ प॰; उ॰, कालज्ञान यंत्र सापेक्ष आहे.

**सांप्रत**, अ॰ वर्तमानकाळीं.

**सांप्रतकाळीं**, अ॰ सांप्रत.

**सांप्रदाय**, पु॰ संप्रदाय शब्दाचा अपभ्रंश.

**सांप्रदायिक**, ३ लिं॰ संप्रदाय संबंधी जी रीति इ॰ ती.

**साफ**, ३ लिं॰ वांकडेतिकडेपणा, खरखरीतपणा, उतारचारवीरपणा इ॰ दोष ज्याचे आंगीं नाहींत असा नीटनेटकेपणा गुळगुळीतपणा इ॰ गुणानीं विशिष्ट जो पाषाण काष्ठादि पदार्थ तो; २, ज्यामध्यें गूढार्थ, वक्रोक्ति, संदेहविषयता, इ॰ दोष नाहींत असें सरळ जें भाषण, लेख, इ॰ तें; ३, रोगांश, मलांश, इ॰ जापासून निःशेष झालें असा जो, पात्र शरीर इ॰ ती; ४, अ॰ आभागोंभा भीड, मुरवत, इ॰ नधरतां निरालसपणें बोलणें, उत्तर करणें, इ॰ कांचें वि॰; ५, पुरतेपणीं; जळणें, भिजणें, दिसणें, इ॰ कांचें वि॰; ऊ॰, मी पावसानें साफ भिजलों.

णें; मला साफ दिसत नाहीं.

**साफल्य**, न० सफलता.

**साफी**, स्त्री० सफाई; २, भांग गाळायाचें जें फडकें तें.

**सांब**, पु० महादेव; २, ३लिं० भोळा जो मनुष्य त्यास ह्म०.

**सायका**, पु० ग० कांहीं एक कर्म केल्यामुळें हा आमच्या कर्माचा अमुक गुणविशिष्ट आहे अशी जी कोणे-काची लोकांत एकवेळ ख्याति पडोन गेली असते ती; पड, अस, धातुयोगीं प्र०

**साबडा**, ३लिं० साभडा.

**साबण**, पु० मलिन वस्त्रें निर्मळ करणें इत्यादुपयोगी गोधा केलेला एक पदार्थ आहे.

**साबणी**, स्त्री० एक मिठाई आहे.

**सांबर**, पु० न० मृगामध्यें एक जाति आहे.

**साबर**, न० शाबर.

**सांबरभोंपळी**, स्त्री० एक लता आहे जीचा पाला सांबरास पोट दुखा लागला असतां तच्चिरसनार्थ चारितात.

**सांबरमीठ**, न० एक क्षार आहे.

**सांबरशिंग**, न० सांबराचें जें शिंग तें.

**सांबरशिंगी**, ३लिं० सांबरशिंगाचा जो आंकडा इ० पदार्थ करितात तो.

**सांबरी**, ३लिं० सांबराचें चर्म किं० त्याचर्माचा जो जोडा इ० तो; २, स्त्री० रा० सांबराचें जें सकलचर्म तें; ३, रा० दारू, गोळ्या, चकमक, नाचकण, इ० ठेवायाचें उपयोगी सांबर इ० कांचे चर्माची आकारविशेषाची एक पिशवी करीतात ती.

**साबरी**, ३लिं० शाबरी.

**साबान**, पु० शाबान.

**सांबार**, पु० रा० सांभारें, भाजी, इ० कांत घालाया करितां अनेक प्रकारचीं धान्यें मेथ्या, मिरच्या, मसाला, असें एकत्र करून, भांड्यांत भाजून, त्याचें पीठ करावें असा एक पदार्थ करीत असतात तो.

**सांबारें**, न० तकादिकांत फळादिकांचा फोडी, दाणे, इ० घालून पीठ लावून जें पातळ कालवण करीत असतात तें.

**साबीत**, ३लिं० शाबूत या अर्थं.

**साबू**, पु० साबूण.

**साबूण**, पु० साबण.

**साबूत**, **साबूद**, ३लिं० साबीत.

**साभडा**, ३लिं० साधी वृत्तिजाची असा जो भोळा मनुष्य तो.

**साभण**, पु० साबण.

**साभणी**, स्त्री० दे० साबणी.

**साभळा**, ३लिं० साभडा.

**सांभारें**, न० सांबारें.

**सांभाळ**, पु० संभाळ.

**सांभाळणें**, प्रा० यं० संभाळणें.

**सांभाळीं**, अ० कीं० (करणें) कोणेक पदार्थ कोणेकानें रक्षावा ह्मणून त्याचे स्वाधीन करणें.

**साम**, न० एक वेद आहे त्याचीं जीं अवांतर खंडें आहेत तीं प्र०; २, शत्रु इ० कांबरोबर गोडी गुलाबीचीं भाषणें करून सख्य करण्यासाठीं आर्जवरूप जो उपाय तें.

**सामका**, अ० रा० समोर.

**सामग्री**, स्त्री० तत्तत्कार्योपयोगी जो साधनभूत

पदाचा समुदाय तो.

**सामंत**, पु॰ सं॰ मुख्य राजास करदेणारा जो मांडलिक राजा इ॰ तो.

**सामता**, पु॰ रुकलार इ॰ कांचें वारीकें भोंकपाडाया चें एक शस्त्र आहे.

**सामदाम**, न॰ भियदहन करितां कांहीं गोडीगुलाबीचा गोष्टी सांगून किं॰ कांहीं द्रव्यादि देऊंकरून आर्जव करण्याचा जो उपाय तें.

**सामर**, पु॰ सांबर.

**सामरिक**, ३लिं॰ सं॰ समरसंबंधी जो वाद्य, शस्त्र, इ॰ पदार्थ तो.

**सामरी**, ३लिं॰ स्त्री॰ सांबरी.

**सामर्थ्य**, न॰ विवक्षित कार्य करण्याविषयीं शारीरादि किं॰ द्रव्यादिरूप जी शक्ति तें.

**सामवणें**, स॰ सामावणें.

**सामवेद**, पु॰ एक वेद आहे.

**सामवेदी**, पु॰ ज्याचे कुलांत सामवेदें करून संस्कारादि कर्में होत आलीं असा जो तो.

**सामसूम**, न॰ स्त्री॰ कांहीं एक व्यवहाराचा जागरूकलें करून स्थितीचा जो अभाव तें ती; उ॰, तेथें कथा होऊं लागली नाहीं अजून सामसूमच आहे; २, अ॰ तत्तद्व्यवहारादिकांची जागरूकलें करून स्थिति न दिसे असें; उ॰, त्याचे घरीं गेलों तों सारे सामसूम निजले आहेत.

**सामाजिक**, ३लिं॰ सं॰ समाजसंबंधी जो तो; २, पु॰ सभासद प्रथमार्थी.

**सामान**, न॰ सामग्री.

**सामानसुमान**, न॰ सामान इ॰.

**सामान्य**, न॰ अनेक जा अर्थ व्यक्ति त्यांमध्यें [illegible] जो एकधर्म राहतो तें जो जाति म्हणतात; उ॰, अंबा, पिंपळ, ताड, माड, इ॰ सर्व वृक्षांवर वृक्ष [illegible]पून एक सामान्य राहतें; २, ३लिं॰ साधारण प्रथम द्वितीयार्थी.

**सामान्यतः**, अ॰ साधारण पक्षातें आश्रयून.

**सामान्यपक्ष**, पु॰ साधारण पक्ष.

**सामान्या**, सं॰ स्त्री॰ परतीहून इतर जी बटीक, वेश्या, इ॰ स्त्री ती.

**सामायन**, न॰ सामान.

**सामावणें**, समावणें.

**सामाशा**, **सामासका**, ३लिं॰ समस्का.

**सामीप्य**, न॰ समीपपणा; २, समीप राहणें म्हणून जी मुक्ति तें.

**सामील**, ३लिं॰ सहाय प्रथमार्थी.

**सामुग्री**, स्त्री॰ सामग्रीशब्दाचा अपभ्रंश.

**सामुदायिक**, ३लिं॰ सं॰ समुदायसंबंधी तो.

**सामुद्र**, ३लिं॰ सं॰ समुद्रसंबंधी जें लवण इ॰ पदार्थ तो.

**सामुद्रिक**, सं॰ न॰ मनुष्यांचे हस्तादि गात्रावयवांचे शीलरेखादि चिन्हें पाहून शुभाशुभ फल सांगायाचें उपयोगी एक शास्त्र आहे; सामुद्रिकलक्षण, सामुद्रिकचिन्ह इ॰ स॰.

**सामेणें**, स॰ सामावणें.

**सामोग्री**, स्त्री॰ सामुग्री.

**सामोपचार**, पु॰ शरीरारोग विशेष दुःख न देतां भयपथ्य इ॰ न करितां जो औषधादि उपचार करितात तो; २, द्वितीयार्थक जें मानन द्रुत जो उप

चार ह्मणजे प्रकार तो, परंतु याचा प्रयोग सामोपचारें सामोपचारानें असा बहुत होतो प्रथमांत समयविशेषीं होतो.

**सामोपाय**, पु॰ सामोपचार.

**सामोरा**, अ॰ आपल्या गृहादिकांचे ठायीं येणारा जो मनुष्य त्याचा सत्कार करावा ह्मणून तत्संमुख प्रदेशीं जा, ये, इ॰ कांचें वि॰

**साम्य**, न॰ गुणादि द्वारा परस्पराचें जें तौल्य तें.

**साम्यता, साम्यत्व**, स्त्री॰ न॰ साम्यशब्दाचा अपभ्रंश.

**साम्राज्य**, न॰ केवल निष्कंटक जें राज्य तें; २, जा राज्यांत चोरी, चाहडी, गोंजणूक, इ॰ नाहींत मुग्यें करून प्रजा नांदत्ये असें जें राज्य तें.

**साय**, पु॰ साग; २. स्त्री॰ दुग्ध, दधि, इक्षुरसादि कितीएक पदार्थांवर अग्निसंयोगादि कारणानीं पोळीसारखा जो घट्ट अंश जमतो तो.

**सायक**, पु॰ सं॰ धनुष्यास लावून मारायाचे उपयोगी जो बाण तो.

**सायंकाल, सायंकाळ**, सं॰ पु॰ सूर्यास्तसमय; २. पंचधाविभक्त दिनमानाचा पांचवा भाग संबधी जो काल तो.

**सायटें**, न॰ कों॰ दुग्धादिकांवर जी अल्पस्वल्प साय येती तें.

**सायरा**, पु॰ कों॰ उदक, नेत्र, इ॰ कांवर जो तवंग येत असतो तो.

**सायरी**, स्त्री॰ एक झाड आहे.

**सायरेल, सायंन्येल**, न॰ सायरीचें जें तेल काढितात तें

**सायला**, पु॰ ग्रा॰ साग.

**सायली**, १ लिं॰ सागवानी.

**सायबान**, न॰ मंडपादिकांचे बाजूस जो पडवीचे ऐसा उतरता विभाग करित असतात तें; २, पु॰ न॰ सागवान.

**सायवानी**, १ लिं॰ सागवानी; २, जास सायवान उतरतें आहे असा जो मंडप इ॰ तो.

**साया**, पु॰ साग.

**सायास**, पु॰ कांहीं एक कार्याविषयीं अतिशयित जो आयास तो.

**सायान्ह**, पु॰ सं॰ सायंकाळ.

**सायाळ**, स्त्री॰ एक पक्षी आहे.

**सायुज्य**, न॰ चतुर्विध मुक्तींतील एक मुक्ति आहे जीमध्यें ईश्वराशीं आणि जीवाशीं अभेद होतो.

**सायुज्यता**, स्त्री॰ सायुज्यशब्दाचा अपभ्रंश.

**सार**, न॰ चिंच, आमसोल, इ॰ जे अंबट पदार्थ ते पाण्यांत कोळून त्यांत मीठ, हिंग, इ॰ घालून जें कालवण करितात तें; २, पु॰ न॰ पदार्थ मात्रांतील विवक्षित जो तत्वांश तो तें.

**सारक**, न॰ कों॰ रूरमाडाची जी झावळी तें व त्यास जो फळें यावयाचा दोंगरासारिखा अवयव उत्पन्न होत असतो जाचे तंतु बांधायाचे उपयोगी पडतात तें; २, १ लिं॰ रेचकता शक्ति जाचे आंगीं असा जो औषधि पदार्थ तो.

**सारखवट**, न॰ स्त्री॰ मनुष्य, वृक्षादिक जे पदार्थ त्यांचें जें प्रा॰ आकार द्वारा परस्पर सादृश्य तें ती.

**सारखवटा**, पु॰ सारखवट.

**सारखा**, ३लिं० समान यथमद्दितीयार्थः ;२, सर्वा वयीं विवक्षानुरूप जो सम तो ;३, अ० मध्येंन्यूनाधिकभावादिन होतां एकरूपानें कांहीं एकक्रियेचें वि० उ०, हें पीर चार पदका सारखें रडतें आहे.

**सारखावणें**, तासणें इ० संस्कारानें काष्ठादि पदार्थ सारखा होई असें करणें.

**सारंग**, पु० एक राग आहे.

**सारंगपाट**, पु० मे० क्रीडासाधन भूत जो सोंगट्या, फांसे, पट, मिळून खेळ तो.

**सारंगा**, ३लिं० केवळ तांबडा नव्हे कांहीं आंत काळसरपणा असावा अशा रंगविशेषानें विशिष्ट जो अश्व तो.

**सारंगी**, एक तंतुवाद्य आहे.

**सारंग्या**, पु० सारंगी वाजविण्याचें कर्म करितो तो.

**सारजा**, स्त्री० शारदा शब्दाचा अपभ्रंश.

**सारण**, स्त्री० फो० सुरी तृतीयार्थः.

**सारणी**, स्त्री० ग्रह, पंचांग, इ० सिद्ध करायाचे उपयोगी जें अंकजाल लिहिलें असतें तें.

**सारणें**, सरके असें क्रि० कोणेक पदार्थ व्ययादि द्वारा निःशेष होई असें करणें ;२, यं० कांहीं एक व्यापार करून संपविणें ; उ०. सारुनियां घरधंदा सेविले पतिपदारविंदा.

**सारथी**, पु० रथाचा अग्रभागीं बसून घोड्यांचें नियमन करून पाहिजे तसा रथ चालवावा त्याचें रक्षण करावें अशा कामावर जो नियुक्त तो ;२, ला० कोणेकाचें कांहीं एक कार्याविषयीं जो साहाय्य करितो तो त्याचा.

**सारथ्य**, न० सारथ्याचें जें रथ चालविणें इ० रूप कर्म तें.

**सारपा**, पु० कों० काष्ठ तासलें असतां तो छिले असतां लहान लहान ढलप्यांचा जो समुदाय जमतो तो.

**सारफा**, पु० दे० सरिफा.

**सारफेवार**, ३लिं० सरिफेवार.

**सारमंडळ**, न० एक तंतुवाद्य आहे.

**सारल्य**, न० सं० सरलपणा.

**सारवण**, न० भूमि इ० सारवायाकरितां तयार केलेलें जें शेण इ० तें व त्याणें केला जो भूमि इ० कांस संस्कार तें व तो संस्कार करण्याचा जो व्यापार तें.

**सारवणें**, भूमि इ० सारवण संस्कारानें संस्कृत होई असें करणें.

**सारवत**, न० कों० जुन, कडकडीत जें नागवेलीचें पान तें.

**सारवान्**, पु० उंटाची चाकरी करावी, पिवळ्विल्या त्याची ने आण करावी, एतदर्थ जो नियुक्त मनुष्य तो.

**सारस**, पु० सं० एक पक्षी आहे ;२, न० कमल ;३, रा० सुरमाडाचें आवळीचें बुंध्याकडला जो पन्हळासारिखा अवयव असतो तें जो पाणी उडवण्यास साधनभूत होतो.

**सारस्य**, न० स्वारस्य शब्दाचा अपभ्रंश ;२, कोणेक पदार्थाचे अंगीं गुणादिकरून असतो जो चांगलेपणा तें.

सालकरी, पु॰ ओंपुषण, कुळकरण, इ॰ वृत्तींचें अनेकजे विभाग त्यांत ज्या सालची वहिवाट करण्याचा जो अधिकारी, विभागी तो त्या सालचा.

सालंकृतकन्यादान, न॰ विवाहविधीनें वरास अलंकारसहित कन्येचें जें दान करितात तें.

सालगुदस्त, न॰ चालत्या वर्षाचे पाठिमागील जें अव्यवहित साल तें.

सालगुदस्तां, अ॰ गतवर्षी.

सालट, ३लिं॰ को॰ थोडेंबहुत सालजाचे अंगीं आहे असा जो डाळ, कणीक, तांदूळ, इ॰ किं॰ जळाऊ लांकडें इ॰ पदार्थ तो.

सालटी, स्त्री॰ मा॰ शरीरावरील त्वचेस प्रसंग विशेषीं हा॰.

सालटें, कों॰ न॰ सालटी.

सालडें, न॰ सालद्वितीयार्थं.

सालटोल, स्त्री॰ सालफळ.

सालदरसाल, अ॰ प्रतिवर्षं.

सालपट, न॰ वृक्ष, मनुष्य, धान्य, इ॰ संबंधी सालतें.

सालपा, इ॰ सारपा.

सालफळ, स्त्री॰ एक वृक्ष आहे.

सालबंदी, स्त्री॰ कौल, ठरावबंद, हप्तेबंदी, खत, इ॰ कांवरचदना चददेणें किं॰ प्रतिवर्षं हप्ता अमुक घ्यावा इत्यादि अर्थ त्या कौलइ॰ कांवर अमुकवर्षं अमुक द्यावें, घ्यावें, अमुकवर्षं अमुकच्यावें द्यावें. इ॰ रूप ठरावाचा वर्षक्रम लिहिला असतो ती; २, रा॰ वृत्यादिकांचे वहिवाटी विषयीं अमुकानीं अमुक सालीं वहिवाट करावी असा जो साल कऱ्यानीं सालांचा ठराव केला असतो ती.

सालभेंडा, ३लिं॰ कों॰ ज्याचें साल मात्र फार जाड असतें आणि तादृशतत्वांश आंत कांहीं नाहीं असा जो नारळ, पोफळ, केळें, इ॰ फल आणि त्याचें तें झाड तो.

सालभेंडी, स्त्री॰ एक झाड आहे.

सालमजकूर, न॰ वर्तमान जें वर्ष तें.

सालमिश्री, सालमिश्री, स्त्री॰ एक औषधीपदार्थ आहे.

सालवणी, न॰ ग॰ सालवणा.

सालस, ३लिं॰ ओलबाड, लचाड, खोडकर, नव्हे असा जो सज्जन, मनुष्य, पशु, इ॰ तो.

सालसाई, स्त्री॰ सालसपणा.

सालसूल, न॰ स्त्री॰ साल. इ॰ तें ती.

साला, पु॰ शालक.

सालाबाद, अ॰ प्रतिवर्षं.

सालाबादी, ३लिं॰ सालाबाद होत असतो किं॰ चालत असतो असा जो देणें, घेणें. इ॰ व्यवहारादिक तो; २, स्त्री॰ प्रतिवर्षं करणें किं॰ घडत असतो असा जो कांहीं एक व्यवहारादि ती.

साली, स्त्री॰ बायकोची जी बहीण ती.

सालीना, अ॰ सर्वसाल मिळून अशा प्रकारें प्रतिवर्षं; उ॰, आह्मास सालीना हजार रुपये वेतन मिळतें.

सालोसाल, अ॰ प्रतिवर्षं; २, वर्षोवर्ष.

साव, पु॰ सावकार; २, चोराचे प्रतिपक्षि तें करून

करून जो विवक्षित तो.

सांँच. स्त्री० फ्रीं० बकरा इ० कांचा आंतड्याचा जो लांब तंतु असतो ती, जी पिंजाऱ्याची कमान सारंगी इ० कांचे उपयोगी पडते.

सावकार, पु० जापासून लोक इत्यादिक कर्ज घेतात असा जो धनवान् तो; २, जो ज्याचा उत्तमर्ण तो त्याचा; ३, सामान्य उदीम व्यापार करणारा जो कोणी त्यास कोणी ह्म०.

सावकारा, पु० कोणेक ग्रामादिकाचे ठायीं सावकारांचा जो समुदाय तो; २, ग्रा० मोठी जी सावकारी ती.

सावकारी, स्त्री० सावकाराचा जो दुसऱ्यास कर्ज देणें इ० व्यापार ती; २, ३लिं० सावकारसंबंधी जें द्रव्य, खातें, चाळ, शिरिस्ता, इ० ती.

सावकाश, अ० कोणेक कार्याविषयीं त्वरा न करितां स्वस्थपणें किं० विवक्षित कालांतरीं जाणें, येणें, भोजन करणें, इ० काचें वि०; उ, तुह्मी सावकाश जेया; अह्मी यंदा लग्न करीत नाहीं सावकाश करूं घाई काय आहे.

सावकाशी, स्त्री० सावकाशपणा.

सावकास, अ० सावकाश याचा अपभ्रंश.

सावचित, ३लिं० प्र० सावधानपणें जो स्थित तो.

सावज, न० ससा, व्याघ्र, हरण, इ० जी आरण्यक चतुष्पदें ती प्र०, सावज पाडणें ह्म० वादविवादादिकांमध्यें दुसऱ्यास पराजित करून आपल्या हातांखालीं येई असें करणें.

सावजी, पु० ग्रं० सावकार.

सावट, न० स्त्री० जा स्थलावर निरंतर वृक्षादिकांचें आच्छादन असतें अतएव जेथें जिन्नस होत नाहीं असें जें स्थल तें ती, परंतु जिन्नस वळण्याचे प्रसंगी प्रा० प्र०, २, न० रा० पाण्यांत दूर दिसतें जे गलबत त्यास ह्म०.

सावटी, ३लिं० सावटाची जी जमीन, शेत, इ० ती.

सावडणें, इकडे एक तिकडे एक अशा प्रकारें चहूंकडे पडलेले किं० पसरून पडलेले जे अर्थ ते जमा करणें.

साँवडणें, स० सावरणें तृतीयार्थ; २, सावडणें.

सावत्र, ३लिं० सावत्र आईचे संबंधानें जे भाऊ मामा, सासरा, चुलता, इ० नातेवाईक ते प्र०, सावत्र भाऊ, सावत्र मामा, सावत्र सासरा, सावत्र चुलता, इ०.

सावत्रआई, स्त्री० कोणएकाचे आईची जी सवत ती त्याची.

सांवत्सरिक, ३लिं० सं० प्रतिवर्ष नियमानें करायाचें जें श्राद्धादिक तो.

सावंबाई, ३लिं० कों० गृहाचे डोलांत एक भेद आहे त्या डोलाचें जें गृह तो.

सावद, न० रा० सावज.

सावध, ३लिं० मूर्छा, कैफ, निद्रा, इ० कारणानें देहभान जाचें गेलें नाहीं असा जो तो; २, दक्ष; ३, ला० दारिद्र्य जाऊन उर्जित दशा पावला जो त्यास ह्म०.

सावधगिरी, स्त्री० सावधपणा.

सावधान, ३लिं० अवधानानें सहित तो; २,

लग्न, आणि मुंज लावल्यावेळेस मंगलाष्टक म्हणून याशब्दाचा प्रयोग करितात तेथें अभिप्राय असाकीं सावध असा; ३. प्रसंगविशेषांविवाह संस्कारास म्ह०.

**सावन**, ३लिं० सं० तीसदिवसांचा एक महिना या मानानें जें वर्ष, मास, दिवस, इ० काल तो.

**सावधा**, ३लिं० कों० मूर्छादि जाऊन जो सावध झाला तो.

**सावयव**, ३लिं० अवयवविशिष्ट जो तो.

**साँवर**, स्त्री० कों० एक वृक्ष आहे.

**सावरणें, साँवरणें**, इतस्ततः जो बणारा किं० पडणारा असा जो वस्त्र काष्ठादि कोहीं एक पदार्थ त्यातें आवरून धरणें; २. क्षीणावस्थापन्न जें शरीर किं० शरीरी त्याणें विवक्षित शारीर शक्तीनें अथवा द्रव्यशक्तीनें युक्त होणें; ३. घसरलेलीजी काहीं एक गोष्ट किं० व्यापार इ० त्यांतें युक्तिप्रयुक्तीनें संभाळणें.

**साँवरी**, स्त्री० साँवर.

**सावर्णि**, पु० पुढें होणारा आठवा जो मनु तो.

**साँवऱ्या**, पु० कों० गृहावर घालणें इत्याद्यर्थ आणितात जो सांवरीचा वांसा तो.

**सावली**, स्त्री० मनुष्य, वृक्षादिकांची जी छाया ती.

**सावसावकारा**, पु० सावकार, सावकारी, इ० तो; उ०, पहिलें राज्य बुडाल्यापासून आल्हीकडेस सावसावकारा बुडाला.

**सावळा, साँवळा**, ३लिं० केवळ गोरा नव्हे आणि केवळ काळाही नव्हे असा जो मनुष्य वर्ण तो वन तद्वर्णविशिष्ट जो मनुष्य तो; २. केवळ काळा

काळा नव्हे, तांबडा नव्हे, असा जो पक्ष, इ० कांचा रंग व तद्विशिष्ट जो गाय, बैल, वांसरूं, तो.

**साँवळगोंदें, साँवळगोंधें**, न० साँवळें गोंधळें.

**साँवळी**, स्त्री० गोफळीची जी आवळी ती.

**सावळें गोंधळें**, न० दंगा, घोंगें, वाद, पचाईत, इ० रूप जें खटलें त्याचा धड एक परिणाम न होतां त्याणें गोंधळत राहावें अशी जी त्या खटल्याची अवस्था तें किं० त्याणें काहीं दिवस मग मग निर्विवाद रहावें अशी जी त्याची गति करितात तें; २. सोंवळें, ओंवळें, आचार, अनाचार, पंक्तिविचार, शरीरसंबंध, इ० विषयीं जी व्यवस्था असावी ती न राखितां आतल्या आंत जो गोंधळ असतो तें.

**साँवा**, पु० एक तृणधान्य आहे.

**सावी**, स्त्री० गा० सांवी.

**सावीज**, न० गा० सावज.

**साँवी, इ० साबी**, कों० स्त्री० स्त्री प्रसूत झाली असतां सहावे दिवशीं षष्ठी पूजन समारंभ करितात ती.

**साशंक**, ३लिं० आशंकेनें युक्त जो तो.

**साष्टांग**, ३लिं० अष्टांगानीं सहित जो तो, प्रणाम, नमस्कार, इ० कांचें वि०.

**सासट**, ३लिं० सहासष्ट.

**साँसपणें**, चोंचपणें; २. गा० कुरवाळणें; ३. दुखिन जो कोणी त्यास स्वस्थ व्हावें म्हणून त्याचें अंगावरून हात फिरविणें.

**सासर**, न० दे० सासरें.

**सासरा**, पु० दादल्याचा किं० बायकोचा जो बाप तो; २. तत्स्थानीं मानला जो त्याचा बंधु आदि तो;

हा

ह्या अर्थ घेऊन चुलत सासरा, मामेसासरा, इ०.
सासरें, न० नवऱ्याचें बापाचें जें गृह तें.
सासरेंवास, पु० रा० सासुरवास.
सासवडी, ३लिं० सासवड ह्मणून ग्राम आहे त्यांत संबंधी जें धोत्रजोडा, जोठ, इ० तो.
सासष्ट, ३लिं० सहासष्ट.
सासुरवड, स्त्री० कों० सासुरवाडी.
सासुरवाडी, स्त्री० बायकोचा बापाचें जें गृह ती.
सासुरवास, पु० सुनेस श्वशुर गृहीं सासू, सासरा, इ० करितात जो जाच तो; २, ला० स्वतंत्रेच्छेनें न वागण्याविषयीं कोणेकाचा जो कोणेकास जाच असतो तो.
सासुरवाशी, ३लिं० सासुरवासानें युक्त जी सून इ० तो; २, मातापितर, सासू, सासरा, धनी, इ० कांचे धाकामुळें जास स्वतंत्रपणें वागतां येत नाहीं असा जो कोणी तो त्याचा.
सासुरवाशीण, स्त्री० सासऱ्यांस वास करणारी जी स्त्री तिची संज्ञा; २, दे० सासुरवाशी जी स्त्री ती.
सासुरें, न० ग्रं० सासरें.
सासू, स्त्री० सासऱ्याचीजी स्त्री ती.
साहचर्य, न० अनेक मनुष्यादि पदार्थांचा जो एकवस्थितिरूप संबंध तें; उ०, धूमाचें आणि वन्हीचें साहचर्य आहे.
साहजिक, ३लिं० सहज इत्यादि तीयार्थी; २, अ० सहज
साहटें, न० कों० सायटें.
साहणें, सोसणें प्रथमार्थी; २, न० कों० गृहादिकांचे गरव्यास अथवा भिंतीस आंत प्रकाश पडावा इत्याद्यर्थ जें गवाक्ष सदृश द्वार राखिलेलें असतें तें.
साहरा, पु० कों० सायरा.
साहरी, स्त्री० कों० सायरी.
साहय्येल, न० सायम्येल.
साहस, न० जा व्यापारांत मरण संभावना आहे असा जो युद्धांत उडी घालणें, दुसऱ्याचे घरास आग लावणें, कोणेकास जिवें मारणें, इ० रूप व्यापार तें.
साहसिक, ३लिं० साहस कर्म करण्याचा स्वभाव ज्याचा तो.
साहसी, ३लिं० साहसिक.
साहाय्य, न० सहायाचें जें कर्म तें.
साहित्य, न० सामग्री; २, साहाय्य.
साहित्यपत्र, न० कोणेकाचें कार्य कर्तव्य असतां त्याचें हस्तें परहस्तें कार्य करावें अशा अर्थाचें त्यापाशीं कोणेकाचे नावें कोणेक लिहून देतो जें पत्र तें.
साहित्यशास्त्र, न० काव्य, नाटक, इ० कांचीं अलंकार लक्षणादि ज्यांत सांगितलीं आहेत असें जें शास्त्र तें.
साहित्यसुहित्य, न० साहित्य इ० तें.
साहुकार, पु० सावकार.
साहुकारी, स्त्री० सावकारी.
साहेब, पु० हें प्रतिष्ठातिशय बोधक नाम आहे परंतु बापू, नाना, राव, दादा, बाबा, इ० जी सामान्य प्रतिष्ठा नामें त्यांचे पुढें याचा योग होतो; उ०, बापूसाहेब, रावसाहेब, इ०; २,

स्त्रियांचे प्रतिष्ठा नामापुढें याचा योग झाला असतां पश्ची नपुंसकीं बहुवचनी प्र० होतो, बाईसाहेब आलीं, ताईसाहेब गेलीं, राजा, धनी इ० कांविषयीं केवलाचाही प्र० होतो, इंग्रेज आदिकरून जे टोपीवाले त्यांची संज्ञा त्यांचे नावापुढें किं० केवलाचाही प्र० होतो.

**साहेबनौबत**, स्त्री० राजादिकांचे स्वारी बरोबर हत्तीवर घालून जी नौबत चालवीत असतात ती.

**साहेबी**, स्त्री० देशग्रामादि संबंधी कोणेक अधिकार किं० कांहीं संपत्त्यादिक प्राप्त झाल्यामुळें सर्वांनीं त्यास साहेब ह्मणत असावें असा जो कोणकास मोठेपणा प्राप्त होतो तो; २, ३लिं० टोपकरजे साहेब तत्संबंधी जो वेष, रीति, इ० तो.

**साहोत्रा**, पु० प्रतिमासीं किं० प्रतिवर्षी शेंकडा सहा रुपये द्यावे असा जो व्याजाचा संकेत तो; २. कोण एक ग्रामादि स्थळीं कोण एकाचा जो शेंकडा सहारुपये प्रमाणें जो अंश असतो तो.

**साह्य**, न० ३लिं० सहाय या अर्थी ह्म०.

**साह्यटें**, न० कों० सायटें.

**साह्यरा**, पु० कों० सायरा.

**साह्यरी**, स्त्री० कों० सायरी.

**साह्यरेल, साह्यल्येल**, न० कों० सायरेल.

**साह्या**, पु० कों० साग.

**साळ**, स्त्री० वेतन घेऊन मुलांस लिहिणें शिकविणें किं० सुतार, लोहार, इ० किती एक शिल्पकारांचें लांखंडी काम घडणें, लांकडी काम करणें, इ० व्यवहाराचें जें अधिकरण तो आणि तो कारखाना; २, शालि ह्मणून जें धान्य तो; जिरेसाळ, घोडसाळ, इ० स०; ३, सायाळ; ४ रेशीम, सूत, इ० कांची साळ घालणें ह्मणजे जितकें लांबसन गविणायाचें असेल तितक्या अंतरावर भूम्यादिकांस खुंट्या मारून त्यांचे भोंवती तें सूत्र गुंडाळून तितका लांब ताणा होईल असें करणें.

**साळकेगोळके**, पु० साळकोजी माळकोजी.

**साळकोजीमाळकोजी**, पु० ज्यांचे विशेषरूपें करून नाम घ्यावयाची विवक्षा नाहीं असे सामान्यकोटींत परिगणनीय जे मनुष्य त्यांस निर्देशें स्त्र० अनेकवचनी प्र०.

**साळणें**, चाकू, वांकस, इ० शस्त्रानें काष्ठ इ० कांचा उखिरवाखीरपणा इ० अविशिष्टांश काढायाकरितां तें तें काष्ठादि तासणें.

**साळढाळ**, ३लिं० ज्यांचे अंगीं अक्कडदाखवायाची, अटघरायाची, छांदसपणा करायाचा, इ० नाहीं व्यवहारांत चवघांशीं मिळून चवघांचे रीती प्रमाणें वर्तणारा असा साळस जो मनुष्य तो आणि त्याचा तसा व्यवहार, भाषण, इ० तो.

**साळपीस, साळपींस**, न० साळ ह्मणून जो पक्षी त्याचें अंगावर जे कंटकाकार रंध्र अवयव असतात तें प्र०.

**साळवट, साळवटी**, ३लिं० साळ्यांनें विणलेला जो धोत्रजोडा, पंचे, इ० वस्त्र तो.

**साळशीट, साळशीत, साळशीद**, न० साळ

पीस. २, साखाळ.

**साळसूद, साळसूध.** अलिं० सालसजो मनुष्य पशु, इ० तो

**साळा.** पु० मेहुणा.

**साळाऊ.** अलिं० इ० साळ्यानें विणलेलें जें वस्त्र तें.

**साळाभोळा,** अलिं० विशेष छक्केपंजें ज्याचे अंगीं नाहींत निष्कपट असा जो मनुष्य तो किं० तसा जो त्याचा व्यवहारादि तो

**साळिंद्र.** इ० न० सायाळ; २, साळपीस.

**साळी,** पु० ना० कार्पास वस्त्रें विणणारी एक हिंदूमध्यें जाति आहे; २. स्त्री० सायाळ; ३, मेहुणी.

**साळुंकी,** स्त्री० एकपक्षी आहे.

**साळुंखी.** स्त्री० साळुंकी.

**साळू.** स्त्री० सायाळ.

**साळोंखी.** स्त्री० साळुंकी.

**साक्ष,** स्त्री० साक्षा; २, स्त्री० पु० साक्षी.

**साक्षर.** अलिं० जाणें थोडें बहुत अध्ययन केलें आहे असा जो ब्राह्मण तो.

**साक्षा.** स्त्री० देव, मंत्र, प्रश्न, शकुन, इ० कांचीजी प्रतीति ती.

**साक्षात्.** अ० स्वरूपेंकरून शब्द मात्राचें अर्थाचे दोन अंश असतात एक मुख्य आणि जाणें केलें असतां आपण केलेंसें होतें जाला पोंहच लें असतां आपणास पोंहचलेंसें होतें ह्मणून किं० स्नादृश्यादि कारणास्तव तत्स्वरूपत्वें करून मानायाजोगा असा जो पुत्र भृत्य प्रतिमादि कोणी तत्स्थानिक तो दुसरा गौण त्यांत केवळ त्या मुख्यांशीच जेव्हां तात्पर्य आहे तेव्हां गौणांच्या व्यावृत्यर्थ हें विशेषण लागतें; उ० दुसऱ्या कोणास पाठऊन का तुह्मी साक्षात् जाऊन पहा; हा ब्राह्मण साक्षात् सूर्य आहे.

**साक्षात्कार,** पु० साक्षा; कोणेकास साक्षात्कार होणें ह्म० स्वप्नादिकांत ईश्वराचें प्रत्यक्ष दर्शन होणें.

**साक्षी.** पु० कर्तृत्वाद्यभिमान नसतां कोणेक व्यवहारातें प्रत्यक्ष पाहणारजो तो त्याचा; २ स्त्री० साक्ष्य.

**साक्षीदार,** पु० साक्षी प्रथमार्थ.

**साक्षेप,** पु० विद्या, पदार्थ, इ० कांचा संग्रह किं० कांहीं एक व्यापार अगत्य धरून करावा असाजो कोणेकाचा स्वभाव असतो तो.

**साक्षेपी,** अलिं० साक्षेप आहे जास तो.

**साक्षोप,** पु० साक्षेप.

**साक्षोपी,** अलिं० साक्षेपी.

**साक्ष्य,** न० कोणेक व्यवहाराचा जो साक्षी त्याचें त्या व्यवहाराविषयीं याचा मी साक्षाद्रष्टा आहें अशा अर्थाचें प्रमाणत्वें करून ल्हिनजें लेख, भाषण, इ० तें.

**सिकता,** स्त्री० सं० वाळू प्रथम द्वितीयार्थ.

**सिकलगर, सिकलगार,** पु० शिकलगार.

**सिक्कल,** स्त्री० शिकल.

**सिक्कलगार,** पु० शिकलगार.

**सिक्का,** पु० शिक्का.

**सिक्रण,** स्त्री० शिकरण.

**सिपाई**, पु० शिपाई.

**सिपायगिरी**, स्त्री० शिपायगिरी.

**सिपारस**, स्त्री० शिपारस.

**सिबंदी**, स्त्री० शिबंदी.

**सिरस्ता**, पु० शिरिस्ता.

**सिरस्तेदार**, पु० शिरिस्तेदार.

**सिलसिल्ला**, पु० शिलशिल्ला.

**सिलेखाना**, पु० तलवारी, बंदुका, इ० हत्यारें ठेवायाचीजी जागा तो; व तोसर्व कारखाना.

**सिसफूल**, न० शिसफूल.

**सिसा**, पु० शिसा.

**सिसें**, न० शिसें.

**सिंह**, पु० सकल चतुष्पदामध्यें श्रेष्ठ असा एक आरण्यक पशु आहे; २. सजातीय समुदायामध्यें गुणादिकेंकरून विशेष श्रेष्ठ्य पावला त्यास ह्म०; याचा प्र० समासीं; उ०. पुरुषसिंह, पंडितसिंह. इ०; ३. बाराराशींतील जो पांचवा राशि तो.

**सिंहनाद**, पु० अरण्यांत सिंहाच्या जसा मोठा गर्जनाशब्द होतो त्याप्रमाणे रणादिकोचाठायीं शूरांचाजो सावेश मोठा शब्द तो; २. देवालयादिकांमध्यें मनुष्यादिकांचा संबंध नसतां समयविशेषीं देवापासून जो ध्वनि उत्पन्न होतो तो.

**सिंहलद्वीप**, न० एक द्वीप आहे जामध्यें सिंह बहुत आहेत आणि स्त्रिया फारचांगल्या आहेत इ० ख्याति आहे तें.

**सिंहस्थ**, पु० सिंहराशीस जी बृहस्पतीची स्थिति किं० तदुपलक्षित जो काल तो.

**सिंहावलोकन**, न० लेखन पठनादिउत्तरोत्तर पुढें करीत जात असतां मध्यें मध्यें जें उलटून मागें करितात जें अवलोकन तें.

**सिंहासन**, न० देव, राजा, इ० कांचें मुख्य बसायाचें आसन तें.

**सीग**, स्त्री० शीग.

**सीमंतपूजन**, न० सीमांतपूजा शब्दाचा अपभ्रंश.

**सीमंतोन्नयन**, न० स्त्री गर्भिणी झाल्यानंतर चतुर्थादि कोणत्या एका मासाचाठायीं एक गर्भसंस्कार करितअसतात तें.

**सीमा**, स्त्री० देश, ग्राम, काल, इ० कांचा जो अवधि तो; २. आचार, व्यवहार, इ० कां विषयीं लोक शास्त्रकृत जी मर्यादा ती; ३. कांहीं एक व्यवहार, भाषण, इ० कांची जी पराकाष्ठा ती; उ०. त्यावर्षों पर्जन्यानें मोठी सीमा केली.

**सीमांतपूजन, सीमांतपूजा**, न० स्त्री० ग्रामांतराहून कन्यावरणार्थ आलाजो वर त्याची जी स्वग्राम सीमांता, किं० देवालयादिकांचेठायीं पूजा करितात तें ती, स्वग्रामस्थ वराची ही नाही शास्त्रों पूजाकरितात तीसही ह्म०.

**सीमोल्लंघन**, न० स्वग्रामसीमेचें जें उल्लंघन तें परंतु विजयादशमीचे दिवशीं अपराजितापूजनार्थ अवश्य करावें इ० विधि किं० श्राद्ध दिवसादिकाचेठायीं करूं नये इ० निषेध असतां विशेष

सु, अ॰ हा संस्कृत उपसर्ग आहे, याचा जा शब्दाचे मागें योग होतो, त्याचा उत्तमत्वाचा किं॰ अतिशयाचा वाचक, द्योतक, होतो, समासीं प्र॰; उ॰ उत्तम जो पुत्र तो सुपुत्र, सुशब्द, सुशील, इ॰ अतिशय जो दूर तो, सुदूर, सुदुर्लभ, सुदुःसह, इ॰.

सुई, स्त्री॰ वस्त्रादि शिवायास साधन भूत एक कंटकाकार लोहादिकांचा पदार्थ करित असतात ती; २, माड, पोफळ, केळ, गहूं, इ॰कांचा झाडांतून जें साग्र कोमलपर्ण विकसित नहोतां तुकतें बाहेर पडतें ती.

सुईण, स्त्री॰ प्रसूत होणारी जी स्त्री तिचा प्रसूति समयीं करावयाची खटपट ती करून पुढें बाळंतपणाची खटपट करीत असते ती.

सुईणपण, सुईणपणा, पु॰न॰ सुईणीचें जें प्रसूति संबंधी शुश्रूषा करणें इ॰ रूप कर्म तें.

सुएर, पु॰न॰ वृद्धि तृतीयार्थी.

सुएरतुला, ३लिं॰ सुएर आहे जास तो, स्वर्गादि संबंध विषय असतां प्र॰.

सुकट, स्त्री॰ एक मत्स्य जाति आहे जो वाळवून शुष्क करून ठेवित असतात ती; २, ३लिं॰ रोगादि विकृतीनें शुष्क जें शरीर, शरीरी, इ॰ तो; ३, यत् किंचित् शुष्क झालें जें काष्ठ, फळ, इ॰ तो.

सुकट्या, ३लिं॰ कों॰ सुकट द्वितीयार्थी.

सुकड, स्त्री॰ जून होऊन वाळलेला जो चोडांसकट नारळ ती; २, दे॰ सुकट द्वितीयार्थी.

सुकणें, शुष्क होणें; २, कों॰ समुद्रादिकांचें पाणी ओहोटणें.

सुकताव, पु॰ सोनें, रुपें, इ॰ तावून पाण्यांत नबुडवितां तसेंच निववून राखिला जो त्याचा तावलेपणा तो.

सुकर, ३लिं॰ करण्याविषयीं तादृश कठिन नव्हे असें जें कार्य तो.

सुकर्म, न॰ कुकर्माचें प्रतिपक्षी.

सुकर्मा, पु॰ सत्तावीस योगां तील सातवा जो योग तो.

सुँकलें, सुंकलें, न॰ कर्णादिकांत अलंकारार्थ सुवर्णादिकांचें बारीक लहानसें वलय घालीत असतात तें.

सुकवण, न॰ कों॰ वाळवण.

सुकवत, स्त्री॰ कों॰ वाळवत.

सुकवशी, स्त्री॰ कों॰ सुखवशी.

सुकवें, न॰ कों॰ पर्जन्याभावादि कारणामुळें नपिकतां वाळलें जें शेत तें.

सुकळ, पु॰ सुकाळचा अर्थींच समय विशेषीं प्र॰.

सुका, ३लिं॰ आर्द्रपणा जाऊन शुष्क झाला किं॰ जोंत आर्द्रपणा मुळींच नाहीं असा जो पदार्थ तो.

सुकाण, न॰ चिवक्षानुरूप गलबत फिरवावें म्हणून जो त्यास अवयव विशेष मागल्ये भागास केला असतो तें.

सुकाणदार, पु॰ गलबतावरील सुकाणू धरणारा जो मनुष्य तो; २, ला॰ कोणेक व्यवहार चालविणारे जे अनेक त्यांत जो मुख्य त्यास प्र॰.

सुकाणू, न॰ सुकाण.

सुकाण्या, पु० सुकाणदार.

सुकादुकळ, पु० पर्जन्य नपडल्यामुळें पडतो जो दुकळ तो.

सुकाळ, पु० दुकळाचा प्रतिपक्षी.

सुकाला, ३लिं० सुखार्थ वारंवार दुसऱ्या पुरुषा पासून मैथुन करून घेत असावें अशा स्वभावाचा जो पुरुष, स्त्री, नपुंसक, तो.

सुकींकेळ, न० दे० सोलून वाळविलेलें जें पक्क केळें तें.

सुकीखरूज, स्त्री० मोटे फोड येऊन आंत पू होत नाहीं केवळ बारीक, बारीक, फोड येतात, आणि कंडू मात्र होतो, अशी एक प्रकारची खरूज होत असत्ये ती.

सुकुमार, ३लिं० नाजूक जो मनुष्यादि पदार्थ तो.

सुकृत, न० ईश्वर प्रीति जनक जीं यज्ञादिकर्में तीं प्र०; २, तज्जन्य जो आत्म्याचाठायीं धर्म विशेष राहतो तें.

सुकृती, ३लिं० सुकृत आहे ज्याचे पदरीं तो.

सुकेळ, सुकेळें, न० सुकीकेळ.

सुकखरूज, स्त्री० रा० सुकीखरूज.

सुकखा, ३लिं० रा० सुका.

सुख, न० अनुकूल रूपेंकरून जो जीवाचाठायीं अनुभव घडतो तें, आत्मसुख, विषयसुख, रतिसुख, इ० स०, कोणेकास सुखासपडणें, वाटणें, कि० येणें, ल० चैन पडणें.

सुखट, ३लिं० कों० सुकट द्वितीयार्थी.

सुखड, स्त्री० कों० सुकड प्रथमार्थी.

सुखढाळ, पु० विशेष दुःखद नव्हे असें जें ढाळक तो.

सुखणें, सुकणें.

सुखताव, पु० सुकताव.

सुखती, स्त्री० रा० समुद्रादि संबंधी जी ओहोटी ती.

सुखप्रसव, पु० विशेष दुःख न होतां जो प्रसव तो.

सुखरूज, स्त्री० कों० सुकीखरूज.

सुखरूप, ३लिं० दुखणें बाहणें, इ० दुःख किंवा कांहीं संकटादि न प्राप्त होतां सुखेंकरून युक्त जो तो; २, अ० सुखेनैव; उ० मला वाटतें असें कर्म करूनये तुह्मी करीनच ह्मणतां तर सुखरूप करा.

सुखवत, स्त्री० कों० सुकवत.

सुखवशी, स्त्री० उत्तरोत्तर शरीर शुष्क होत जावें असा जो रोगादि कारणानें मनुष्यादिकास अवस्था विशेष प्राप्त होतो ती.

सुखवस्तू, ३लिं० वतन, वाडी, इ० रूप आश्रय नसून तृण काष्ठादि संबंधी सोईचें कांहीं एक सुख मानून कोणेक ग्रामादिस्थलीं राहिलो जो तो.

सुखशयन, न० शृंगारादि वर्णन प्रसंगीं निजायाचें जें चांगलें आंथरूण, पलंग, इ० त्यास ह्म०

सुखशय्या, स्त्री० सुखशयन; २, आपण जीवंत असतां आपल्यास जन्मांतरीं सुख व्हावें एतदर्थ जी ब्राह्मणास शय्या देतात ती.

सुखशेज, स्त्री० ग्रं० सुखशयन.

**सुखसंतोषें**, अ० कोणी बलात्कार, शिवी, गाळ, इ० न करितां आपले संतोषें करून लिहून देणें, भोजन करणें, जाणें, इ० वि०

**सुखसोहळा**, पु० विवाह, मुंजी, गर्भाधान, इ० कांचे ठायीं न्हाण, माखण, अलंकार धारण, मिरवणें, इ० रूप जो सोहळा करितात तो.

**सुखा**, ३ लिं० सुका.

**सुखांगणें**, क्रिं० जा जा सुखादिकाचे लोभानें जे जे व्यापार पूर्वी करीत असतो ते ते सुख किं० तदधिक सुख अनायासें करून प्राप्त झालें असतां पूर्वीचे व्यापारां विषयीं उपेक्षा बुद्धि विशिष्ट होऊन त्या सुखादिकांतच निमग्न होऊन राहणें; प्र० निंदा असतां.

**सुखानंद**, पु० प्रपंचादि निर्वाहाची जो काळजी बाळगीत नाहीं आणि यथेच्छपणें वर्ततो तो.

**सुखापुरी**, ३ लिं० प्रपंचादि निर्वाहा विषयीं जास कधींही यातायात करावी लागत नाहीं, सुखानें निर्वाह होत असतो असा जो मनुष्य किं० त्याचें शरीर तो.

**सुखावणें**, कोणेकास कांहीं एक विशेष सुख प्राप्त झालें असतां पूर्वीचें सुख सोडून त्या विशेष सुखाचेच ठायीं आसक्त होणें.

**सुखासंतोषानें, सुखासमाधानानें**, अ० सुखसंतोषें.

**सुखासन**, न० सुखावह जें आसन तें, ग्रं०; उ० रायेंचे सविला सुखासनीं; २, मेणा, डोळी, इ० रूप सुखानें बसायाचें जें यान तें.



**सुखासुखीं, सुखासुखी**, अ० सुखसंतोषानें.

**सुखी**, ३ लिं० सुख आहे जास तो; २, प्रपंचाचे निर्वाहाची यथास्थित सोय आहे जाची असा जो गृहस्थ तो; उ० जाचे घरीं आम्ही मुलगी देऊं तो गृहस्थ आपले घरचा सुखी आहे.

**सुगड**, न० एक आकार विशेषाचें लहान मडकें आहे; २, ३ लिं० सुगर.

**सुगणें**, दुगणी.

**सुगति**, स्त्री० दुर्गति शब्दाचा प्रतिपक्षी.

**सुगंध**, पु० दुर्गंधाचा प्रतिपक्षी.

**सुगंधराज, सुगंधराव**, पु० सुगंध विशिष्ट एक तेल आहे.

**सुगंधि**, ३ लिं० सुगंध विशिष्ट जो पदार्थ तो.

**सुगंधिक**, ३ लिं० सुगंधि.

**सुगंधी**, पु० गंधी हितीयार्थी

**सुगम**, ३ लिं० सोपारा.

**सुगर**, ३ लिं० जा जा कसबामध्यें किं० व्यवहारादिकांमध्यें जो कुशल तो त्याविषयीं.

**सुगरण**, ३ लिं० पाकक्रियादि कर्मांमध्यें कुशल जो तो, परंतु प्रा० स्त्रीविषयीं प्र०; २, सुगर.

**सुगराई**, स्त्री० सुगरपणा; २, गानातील एक रागिणी आहे.

**सुगरावा**, पु० सुगरपणा.

**सुगरीण**, स्त्री० सुगरण जी स्त्री ती.

**सुगावणें**, कोणेकास कांहीं याव किं० कांणक कार्य करावें, इ० विषयीं अंतःकरणाचा उल्लास झाल्यामुळें कोणेकानें अनुकूल होणें.

णें.

**सुगावा**, पु॰ सुदावा.

**सुगी**, स्त्री॰ सराई प्रथमार्थी, स्म॰ सरली सुगी आणि राहिली उगी.

**सुग्रास**, पु॰उत्तम प्रकारचें जें अन्नादि भोज्य त्यास समय विशेषीं स्म॰.

**सुघटित**, ३लिं॰ अघटित शब्दाचा प्रतिपक्षी.

**सुघड**, न॰कों॰सुगड;२,३लिं॰ सुगर.

**सुचणें**, ततत्प्रसंगीं उपयुक्त कांहीं एक गोष्ट,कल्पना,श्लोक,वाक्य,कर्तव्यांश,इ॰ अंतःकरणांत अकस्मात् आविर्भूत होणें.

**सुचना, सुचना**, स्त्री॰ सूचना शब्दाचा अपभ्रंश.

**सुचिन्ह**, न॰ दुश्चिन्हाचें प्रतिपक्षी.

**सुचें**, न॰ कों॰ सुचना.

**सुजट**, ३लिं॰कों॰ ईषत् सुजलेला जो हस्तपादावयवादि तो.

**सुजणें**, मनुष्यादिकानीं सुजीनें युक्त होणें,तो त्यापदार्थासाठीं सुजला नाहीं,इ॰स्थलीं त्यावांचून त्याचें कांहीं खोळंबलें नाहीं असा अर्थ.

**सुजन**, ३लिं॰ सज्जन.

**सुजनी**, स्त्री॰ गर्भसुती एक रेशमी वस्त्र विशेष आहे.

**सुजमिरणें**, रा॰ हस्तपादावयवानीं ईषत् सुजणें.

**सुजमीर**, ३लिं॰रा॰ सुजमिरलेला जो हात,पाय,इ॰ तो.



**सुजाण**, ३लिं॰ सुज्ञ.

**सुजीर**, ३लिं॰ सुजट.

**सुटकण**, अ॰ सुटकन.

**सुटकणें**, कों॰ सटकणें.

**सुटकन, सुटकर, सुटदिनीं, सुटदिशीं**, अ॰ सुटकन.

**सुटका**, स्त्री॰ विवक्षित ततत्प्रतिबंधापासून होत्येजी मोकळीक ती.

**सुटणें**, ज्याशीं संबद्ध होऊन राहिलेला जो कोणेक अर्थ त्याणें त्यापासून वियुक्त होणें;२, कोणेक प्रतिबंधानें प्रतिबद्ध जो त्याणें त्याप्रतिबंधापासून मुक्त होणें;३,अंतःकरण,शरीर,शरीरावयव, अन्न,मीठ,मांस,इ॰कितीएक अर्थरूपजीं अधिकरणें त्यांचाठायीं,भय,कंप,खाज,वास,पाझर,घाण,इ॰कितीएक अर्थ उद्भवणें; तोफ,बंदूक,इ॰ सुटणें स्म॰ त्यांपासून आवाज होणें; इतांत सर्व धातुरूपांपुढें तो तो व्यापार एकसारखा करूं लागणें या अर्थीं योग होतो;उ॰ तो मारीत सुटला, खात सुटला, पळत सुटला, इ॰.

**सुटसुटीत**, ३लिं॰ कांहीं काम करण्याविषयीं ज्याचे आंगीं मंदत्व नाहीं असा चपल जो तो; २,बोजड नव्हे असें जें शरीर, ओझें इ॰ तो; ३,फारज्याचा पसारा नाहीं असा आटोपसर जो संसार,व्यवहार,इ॰ तो.

**सुटा**, ३लिं॰ कोणेक अवयवीपासून पृथक्त्व पावला जो त्याचा अवयव तो किं॰ अवयवीच्या अवयवत्वेंकरून मानिला जो पदार्थ तो.

तो; उ० शेला फाडूनको एकादें सुटें पट्ट असलें तर दे; बंदा रुपया पाहिजे तर घे सुटा अधली मजवळ नाहीं; २, कोणेक व्यवहारीं गुंतला नजातां मोकळेपणें स्थित जो मनुष्य, पदार्थ, इ० तो; उ० होते वांसे तितके मांडवाकडे गुंतले एकदेखील वांसा सुटा नाहीं देऊं कोठून.

**सुटी**, स्त्री० विद्याभ्यास, चाकरी, कृषिकर्म, इ० व्यापार करणारे जे शिष्य, चाकर, बैल, इ० त्यांस त्या त्या व्यापारीं संबद्ध नकरितां विश्रामार्थ कांहीं काल देतात जी मोकळीक ती.

**सुट्टा**, न० कों० देणें, घेणें, इ० व्यवहार संबंधी जो तुटलेपणा तें, फरहो इ० यांशीं प्र०; उ० कापडवाल्यापासून कापड आणीत असें त्याचा हिशेब करून रुपये देऊन त्याचें सुट्टा करून टाकिलें.

**सुंठ**, स्त्री० शुंठी शब्दाचा अपभ्रंश, साठांवर्षी सुंठ फुलणें, त्न० कांहीं एक चांगली गोष्ट कधीं नवत घडणें; कोणेकानें कोणेकाचे गांडीत सुंठ फुंकणें, त्न० त्यास कांहीं एक गोष्ट सांगून त्याचें अंतःकरण फिरविणें.

**सुंठरूं**, न० दे० गळवा सारिखें एक उठाणें होत असतें तें.

**सुंठवडा**, पु० बाळंतीण, इ० कास भक्षणार्थ द्यावया करितां सुंठ, गूळ, शर्करा, आदिकरून अनेक औषधें एकत्र करून एक पदार्थ करीत असतात तो.

**सुंठसाखर**, स्त्री० पित्तोपद्रवादि निरसनार्थ भक्षाया करितां शर्करा मिश्रित जें सुंठीचें चूर्ण करितात तो.

**सुटका**, पु० कों० प्रा० जुनें वस्त्राचा जो फटका तो; २, दे० सुटकें; ३, एकादशी आहे.

**सुटकें**, न० वस्त्राचा निढळ [illegible].

**सुटसुटीत**, अलि० सुटसुटीत.

**सुटावणें**, ज्याचा ठायीं धरून होण्याचा प्रकार कीं धीर होत नाहीं असें जें वाद युद्ध टिकाऊ धकणें, कुदान घेणें, इ० दुष्कर कर्म नाहिंपयी काय होईल तें होऊ पण करावेंच असें धैर्य धरून तें करण्याविषयीं कोणकानें पुढें होणें.

**सुडी**, स्त्री० दे० सकाळिचा जो पळा, गज गुग इ० धान्याचा रचून ठेवितात जो गंज तो.

**सुत**, पु० सं० पुत्र.

**सुतक**, न० सूतक शब्दाचा अपभ्रंश, [illegible] कोन भुनाशांच्यास त्न०.

**सुतकतुटा**, अलि० कों० सुतकाचे दिवस [illegible] क जो तो.

**सुतकाळा**, **सुतकाळ्या**, अलि० सुतकतुटा.

**सुतकी**, स्त्री० पाथरवट, इ० लोकांचें धोंडे फोडा याचें उपयोगी एक आऊत आहे तो. २, अलि० सुतकतुटा जो मनुष्य तो.

**सुतकील**, अलि० दे० सुतकतुटा जो मनुष्य तो.

**सुतरनाळ**, स्त्री० दे० दोरा धरून मारायाची जी तोफ ती.

**सुतरस्वार**, पु० सांडणी स्वार.

**सुतराम**, अ० प्रा० सर्वथा या अर्थी.

**सुतळ**, न० सप्त पाताळांतील तिसरें जें पाताळ तें.

सुतळ, न० सुतळ २, स्त्री० कों० सुतळी.

सुतळी, स्त्री० तागाची जी बारीक दोरी करितात ती.

सुता, स्त्री० सं० पुत्रिका.

सुंता, स्त्री० सुनता.

सुताडा, पु० आस्तरणाउपयोगी सतरंजी सारिखें एक जाड वस्त्र आहे; २, नागपुरी लुगड्यांत एक भेद आहे; ३, निंदेनें मोटें जाड जें वस्त्र त्यासही म्ह०.

सुताडें, न० प्रथमार्थक जो सुताडा त्यास निंदेनें म्ह०; २, ला० कोणाएकाची योनसंबंधद्वारा अनेक कुळांचे ठायीं जी व्याप्ति असते तीस प्रसंगविशेषीं म्ह०.

सुतार, पु० लाकडें तासून त्याचें विवक्षितानुरूप आकार विशिष्ट पदार्थ करणारी आणि गृहादि बांधण्याचें कसब करणारी एक जाति आहे; २, पु० एक पक्षी आहे जास काष्ठकुट्ट, म्ह०.

सुतारकाम, न० सुताराचें जें लाकडें घडणें, इ० काम तें; २, सुतारानें घडून तयार केलेलें जें लाकडी सामान त्यासही प्रसंगविशेषीं म्ह०.

सुतारकी, स्त्री० सुताराचें जें कर्म ती किं० कोणे-कग्रामीं जो सुतारपणाचा अधिकार असतो तो.

सुतारनाळ, स्त्री० सुनरनाळ.

सुताळ, स्त्री० या० भातांत एक जाति आहे.

सुतिवणें, संक्रांतीचीं मडकीं, रुखवताचे लाडू, पिंपळ, इ० सुतानें वेष्टणें.



सुती, ३ लिं० सुताचा जो दोरी इ० पदार्थ तो; २, सूत मारून पाहिलें असतां ईषन्मात्र ही जासवकता नाहीं असा जो कृत्रिमी भिंत, स्तंभ, इ० पदार्थ तो, किं० स्वतः सिद्धच जो यष्टी, इ० पदार्थ तो; ३, सूचक, एक दोन तीन, इ० संख्याक सुतें आहेत ज्यामध्यें असा जो दोरा, इ० तद्विषयीं एक दोन, इ० संख्यापूर्वक प्र० होतो तसेंच बारीक, मोठें, इ० सूत आहे ज्याचें असा जो वस्त्रादि पदार्थ तद्विषयीं बारीक, मोठा, इ० शब्द पूर्वक प्र० होतो; उ० ही दोरी तीन सुती आहे, हें वस्त्र बारीक सुती आहे.

सुतींव, ३ लिं० कों० सुती द्वितीय तृतीयार्थी.

सुतेरा, पु० कोळी ह्मणून एक क्षुद्र जंतु आहे तो; २, त्याचे गुदापासून उत्पन्न जो तंतु तो.

सुत्रा, ३ लिं० सूत्रा.

सुथारणें, कों० सुधारणें.

सुंदडणें, कों० नुडविणें.

सुंदर, ३ लिं० चांगला जो पदार्थ तो.

सुंदरा, स्त्री० यं० सुंदरीचा अपभ्रंश.

सुंदरी, स्त्री० सुंदर जी स्त्री ती; २, सतार, रुद्रवीणा, इ० वाद्यांस विवक्षित स्वरानुसंधानानें त्यांचे दांडीस जे बंध बांधीत असतात ते प्रत्येकी.

सुदर्शन, न० विष्णूचें जें चक्र ह्मणून आयुध आहे तें; २, ला० कोणा एकाचे पाठीशीं लागलें जें लचांड तें; ३, शाळग्राम शिळा फुटली असतां तीचें जें चक्रविशिष्ट शकल निघतें तें.

**सुदर्शनचूर्ण**, न० औषधार्थ अनेक औषधी एकत्र कुटून एकचूर्ण विशेष करित असतात तें.

**सुदामत**, अ० खराबी, नाश, इ० न होतां सुरक्षितपणें, असणें, पोंहोंचणें, पावणें, इ०कांचें वि० उ० कांचेंचीं भांडीं कावडींत घालून पाठवा ह्मणजे सुदामत पोंहचतील; २, उच्छृंखलपणा, दांडगाई, इ० न करितां सुरळीतपणें, वागणें, नांदणें, देणें, बोलणें, इ०कांचें वि० उ० ही गाय सुदामत दूध देती तर मग बहाल्या, अडचा, हे कशाला पाहिजे होते; दोहीं अर्थीं नाशादिकांची किं० उच्छृंखलपणा, इ० कांची संभावना असता प्रा० प्र०

**सुदामपुरी**, स्त्री० अतिशयित दारिद्र्य जास्थळीं वसतें अशी जी नगरी, ग्राम, इ० त्यास ह्म०.

**सुदामदेवाचेंवस्त्र**, न० अतिशयित फाटलेलें जें वस्त्र त्यास ह्म०.

**सुदामपोहे**, पु० कोणास सत्कारार्थ देतात जें द्रव्यादि त्यास अति अल्पत्व मानून लीनतेनें ह्म०.

**सुदामे**, पु० संकेतानें पृथुकांस ह्म० प्र० अनेकव०.

**सुदावा**, पु० गत नष्ट जो पदार्थ त्याचा किं० गुप्तरूपें स्थित जी कांहीं एक गोष्ट तीचा लाविताात किं० लागतो जो शोधतो, लाग, काद इ० योगीं प्र०

**सुदिन**, न० पु० व्यतीपात, भद्रा, इ० दोषरहित किं० सणाचा जो दिवस तें, तो; २, इष्टवस्तूचा लाभ, साधु, इ० कांचें दर्शन, संकटापासून मुक्ति, इष्टचानीं श्रवण, इ० आदिकरूनीं जास घडतें तो दिवस त्याला.

**सुदीस**, अ० सदीस.

**सुद्धां**, अ० सकट द्वितीयार्थी, उ० जो द्रव्या सुद्धां मला शिवला; २, देखील; उ० वरकड येतील तर नवल काय, राजा सुद्धां येईल.

**सुद्धा**, ३लिं० कों० केवल तृतीयार्थी.

**सुधा**, स्त्री० सं० अमृत; २, चुना; ३, ३लिं० विवक्षित तत्तद्गुणानीं जो बरा तो, प्रा० निषेधविषयीं प्र०; उ० त्याचें बोलणें सुधं नाहीं ह्मणून त्याजवळ कोणी टिकत नाहीं.

**सुधारणें**, कोणकाचे हातून घसरलेली जी कांहीं एक गोष्ट ती, किं० करतांना बिघडली किं० मुळींच सरासरी केली जो पदार्थ तो यथास्थानुरूप नीट करणें.

**सुधारस**, पु० अमृतरूप जो रस तो.

**सुधांशु**, पु० चंद्र मुख्यार्थी

**सुधी**, ३लिं० उत्तम प्रकारचा ज्ञानानें युक्त जो पंडित तो; २, स्त्री० त्याची जी बुद्धि ती

**सुनका**, ३लिं० सुना.

**सुनत, सुनता**, स्त्री० यवन लोकांत जन्मला जो मूल त्याचा शिश्नाग्र च्छेदरूप संस्कार करित असतात तो.

**सुनबाहिरा**, स्त्री० भेगा व्यथा ह्मणून जो रोग तो.

**सुनमूख**, न० विवाहानंतर सांसवेनें सुनेचें मुख पाहण्याचा जो समारंभ करित असतात तें.

**सुना**, ३लिं० ओंकारिमाया जोगे कोणाक. त्यथा

तें शून्य झालें जें कोणाक अधिकरण तो, दिवस, डाव, इ॰ सुना जाणें, त्र॰ त्या त्यामध्यें घडावाचें जें जें फळ तें तें न होतां तो तो दिवसादि व्यर्थ जाणें.

**सुपरीत**, ३लिं॰ विपरीताचा प्रतिपक्षी.

**सुपली, सुपळी**, स्त्री॰ केवळ लहान जें सूप तें.

**सुपाऊस**, पु॰ कों॰ उत्तम प्रकारें जी पर्जन्याची वृष्टि ती.

**सुपात्र**, न॰ कुपात्राचा प्रतिपक्षी.

**सुपारी**, स्त्री॰ एक फळ आहे, जें विड्याचें मुख्य साधन होय तें; २, त्याचें जें झाड तें; कोणाकास सुपारी देणें त्र॰ अनुष्ठाना करितां ब्राह्मणास, किं॰ गोंधळ. वाजविणें, इत्याद्यर्थ गोंधळी, वाजंत्री, इ॰ कांस सुपारी देऊन निश्चित करणें.

**सुपिंड**, ३लिं॰ कों॰ ज्याचें शरीर चांगलें पुष्ट बळकट असा जो प्रा॰ मनुष्य तो व त्याचें शरीर.

**सुपीक**, न॰ कों॰ पर्जन्य चांगला पडल्यामुळें उत्तम प्रकारचें आलें जें पीक तें.

**सुपुत्र**, पु॰ कुपुत्राचा प्रतिपक्षी.

**सुपेती**, स्त्री॰ निजावयाची जी गादी तीस त्र॰.

**सुप्त**, ३लिं॰ सं॰ निद्रित जो तो.

**सुप्रभात**, न॰ प्रभात समय; २, अ॰ प्रभात समयीं.

**सुप्रयुक्त**, ३लिं॰ उत्तम प्रकारें यथायोग्य ज्याची योजना केली तो; उ॰ आम्हीं तें कर्म सुप्रयुक्त केलें होतें परंतु ईश्वर इच्छेनें विपरीत झालें त्यास काय उपाय; २, अ॰ सुदामत द्वितीयार्थी.

**सुप्रसन्न**, ३लिं॰ अतिशयित जो प्रसन्न तो.

**सुफराटा**, ३लिं॰ उफराट्याचा प्रतिपक्षी.

**सुफल, सुफळ**, ३लिं॰ उत्तम प्रकारें फळ झालें आहे ज्याचें तो कर्मादि.

**सुंब**, न॰ पु॰ सुंभ.

**सुबक**, ३लिं॰ सुटसुटीत द्वितीयार्थी; २, सुरेख.

**सुबकणें**, चुबकणें.

**सुंबरखंड, सुंबरखंडी**, स्त्री॰ सुंभरखंडी.

**सुबत्ता**, स्त्री॰ धान्यादि पदार्थांची सवंगाई, राजकीर्ति, चोर, महामारी, इ॰ कृत उपद्रवांचा अभाव, इ॰ कारणानें देशादिकांच्या ठायीं असते जी स्वस्थता ती.

**सुबत्ताकाळ**, पु॰ कोणाकास असतो अनुकूळ काळ तो; उ॰ चार दिवस सुबत्ताकाळ आहे तों एवढें देवालय करून घ्या.

**सुंबा**, पु॰ सुंभा.

**सुंबाडी**, स्त्री॰ सुंभाडी.

**सुबारा**, पु॰ दे॰ गुंगारा, देणें, धातु योगीं प्र॰

**सुबुद्ध**, ३लिं॰ बुद्धिमान जो तो.

**सुबोध**, ३लिं॰ दुर्बोधाचा प्रतिपक्षी.

**सुंभ**, न॰ पु॰ काथ्याची वळून करितात जी दोरी तें, तसद्दश अंबाडी ताग, इ॰ कांची जी दोरी करितात तीसही कोणी त्र॰; २, पु॰ घोडें, गाढव, इ॰ कांचा जो खूर तो.

**सुंभरखंड, सुंभरखंडी**, न॰ स्त्री॰ कों॰ सुंबाडी.

सुभग,

सुभग, ३ लिं॰ दुर्भगाचा प्रतिपक्षी.

सुभणें, स॰ माचा, बाज, इ॰ सुभानें विणणें.

सुभत्ता, स्त्री॰ सुबत्ता.

सुभा, पु॰ खडक, दगड, हे फोडायाचें एक मोठें लोहाचें आऊत आहे; २, सुभ द्वितीयार्थी.

सुभा, पु॰ विवक्षित परिमाणानें परिमित जो देश, तालुका, इ॰ त्यांची जमाबंदी करण्याचा जो सर्कारी अधिकार तो व तो देश, तालुका, इ॰ तो; २, ला॰ तादृश अधिकार विशिष्ट जो त्यासही प्रसंग विशेषीं स॰, उ॰ मं॰ कोण देशींचा सुभा मुशाफर पानवथ्यावर उभा; ३, विटाळशीपणास संकेतानें स॰.

सुभा, अ॰ प्रथमार्थक जो सुभा त्याकडेस, एवज, इ॰ जमा करणें, जाणें, इ॰ कार्यें वि॰.

सुभाजन, ३ लिं॰ कों॰ पुरतेपणीं भाजला जो पापड, धान्य, इ॰ कांहीं भक्ष्य पदार्थ तो.

सुभाडी, स्त्री॰ सुभाचा जो बंधना द्युपयोगी तुकडा ती.

सुभानु, पु॰ साठ संवत्सरांतील सत्राचा जो संवत्सर तो.

सुभावणा, ३ लिं॰ आकाशादिकें करून शोभिवंत जो पदार्थ तो.

सुभाषित, न॰ लौकिक व्यवहारा द्युपयोगी दृष्टांत दार्ष्टांतादिरूप जो श्लोक, वाक्यादिकांचा समुदाय तें.

सुभिक्ष, न॰ धान्यादि पदार्थांची जी सवंगाई तें.

सुभेकरी, पु॰ सुभ्यानें दगड फोडण्याचें काम करितो तो.

सुभेदार, पु॰ सुभ्याचा जो अधिकारी तो; २, पलटणांतील जमातदारांवर जो अधिकारी असतो तो.

सुभेदारी, स्त्री॰ सुभेदाराचें जें कर्म किं॰ अधिकार ती.

सुमंत, पु॰ अष्टप्रधानांतील एक प्रधान आहे तो.

सुमन, न॰ सं॰ पुष्प मुख्यार्थी; २, पु॰ इंद्रादि देवांची संज्ञा.

सुमनुष्य, पु॰ भला सज्जन जो मनुष्य तो.

सुमार, पु॰ हें इतकेंच आहे, अमुकें हेंच, हें अमुकेंच आहे, अशा प्रकारें निश्चित न होतां किंचिदंतर विशिष्ट जें कोणेक अर्थाचें मनांत स्वरूप येतें तो, सुमारानें सांगणें, बोलणें, इ॰ स्थलीं त्या त्या अर्थाचा सुमार अनुलक्षून बोलणें, सांगणें, असा अर्थ; २, कोणेक अर्थाचें उपलक्षक केलें करून विवक्षित जो वृक्ष, पर्वत, श्लोक, इ॰ कोणेक अर्थ तो आपल्या आसपासचे प्रदेशासुद्धां; उ॰ त्या आंब्याचे सुमारास त्याचें घर आहे; ३, सरस्या, परंतु, सुमारी जिन्नस लिहिण्याचे प्रसंगीं भ॰ उ॰ अंबे सुमार शंभर.

सुमारमाफक, ३ लिं॰ सुमाराचा.

सुमाराचा, ३ लिं॰ विवक्षानुरूप चांगला नव्हे किं॰ विवक्षानुरूप पुरता असला नाहीं असा मध्यम प्रतीचा जो तो; उ॰ हें सोनें कांहीं चांगलें म्हणायाचें नव्हे सुमाराचें आहे; उ॰ मान

त सुमाराचा शिजला ह्मणजे खालीं उतरावा मग अपाप पुरता शिजतो.

**सुमारी**, ३लिं॰ व्यक्तींची संख्या करून घावयाचा घ्यावयाचा असा जो फळें, गुरें, इ॰ पदार्थ तो; २, स्त्री॰ सुमार प्रथमतृतीयार्थी.

**सुमार्ग**, पु॰ कुमार्गाचा प्रतिपक्षी.

**सुमुहूर्त**, पु॰ प्रयाणाद्युपयोगी ग्रहबलादिकें करून उत्तम प्रकारचा जो मुहूर्त तो.

**सुयटा, सुयटी**, पु॰ स्त्री॰ द्वितीयार्थक जी लहान सुई ती.

**सुयरणें**, कों॰ केळीचा सूय बाहेर न पडवयाजोगा तीस एक विकार होत असतो तद्विशिष्ट तीणें होणें.

**सुयरा**, पु॰ कों॰ सुयटी.

**सुयारणें**, कों॰ सुयरणें.

**सुयुक्त**, ३लिं॰ उत्तम प्रकारचें यथायोग्य जें भाषण, लेख, इ॰ व्यापार तो; २, तादृश भाषणादिकर्ता जो मनुष्य तो.

**सुर**, पु॰ सं॰ देव.

**सुरई**, स्त्री॰ तलवारे सारिखें एक हत्यार आहे; २, प्यावयाचें पाणी ज्यामध्यें थंडर हावें कोठें बरोबर नेतां यावें ह्मणून ठेवीत असतात असें प्रा॰ जस्ताचें चंबुसारखें उंचगळ्याचें एक पात्र आहे; ३, ३लिं॰ उकडे नव्हेत असे जें तांदूळ ते, उकडे तांदळांचा प्रतिपक्षित्वें करून प्र॰; ४, लवंगा, वेलदोडे, जायफळ, जायपत्री, केशर, इ॰ रूप उंची जीं औषधें तीं प्र॰.

सुरकण,

**सुरकण, सुरकन, सुरकर, सुरदिन, सुरदिनी, सुरदिशीं**, अ॰ नळा, चिचोंद्री, इ॰ कांचा जळणें, इ॰ शब्दाचें अनुकरण; नळा उडणें, चिचोंद्री जळणें, पाण्यांत सुरकांडी मारणें, इ॰ कांचें वि॰.

**सुरकांडी**, स्त्री॰ मत्स्याकार शरीर करून वेगानें पाण्यांत मारितात जी सरळी ती; शाटी इ॰ कामध्यें शिराया करितां मुखावयव कांहीं पुढें करून शरीराकुंचनपूर्वक धरिली जीस वेगगति ती; २, मारणें, प्र॰.

**सुरकुतणें**, वस्त्र, चर्म, इ॰ कानें सुरकुत्यानी विशिष्ट होणें.

**सुरकुती**, स्त्री॰ वस्त्र, चर्म, शरीर, इ॰ कांची विवक्षित सफाई बिगडायाजोगें त्यांजवर आकुंचनादि कारणानें जे चुणी सारखे आकार होतात ते प्र॰.

**सुरख्या**, पु॰ गंजिफा खेळत्ये समयीं ज्याचित्रापासून खेळाचा प्रारंभ होतो तें चित्र तो; २, रा॰ वाजंत्र्यांतील जो सूर वाजविणारा तो.

**सुरखाई**, स्त्री॰ वस्त्रादि निष्ठ जो तांबडा रंग त्यामध्यें शोभादायक जो तेजोंश असतो ती.

**सुररव्या**, पु॰ सुरख्या.

**सुरंग**, पु॰ सुरुंग; २, स्त्री॰ रा॰ एक झाड आहे.

**सुरंज**, पु॰ रंगाचे उपयोगी एक पदार्थ आहे.

**सुरंजी**, ३लिं॰ सुरंजाचे रंगानें रंगिवलेलें जें खारवा, इ॰ वस्त्र तो.

सुरंट,

**सुरंट, सुरट**, न० दे० सुरवेंट.

**सुरण**, पु० सूरण.

**सुरत**, स्त्री० रूपा द्वितीयार्थी; २, न० सं० मैथुन.

**सुरती**, ३ लिं० सुरत ह्मणून शहर आहे तत्संबंधी जो मोती, रुपया, मोहोर, वस्त्र, शस्त्रादि, पदार्थ तो.

**सुरतीएरंड**, पु० एरंडाचे झाडांत एक भेद आहे.

**सुरदास**, पु० हरिदास, इ० कांचे मागें स्वर देणारा असतो जो त्यास ह्म०.

**सुरनदी**, स्त्री० भागीरथी.

**सुरनीस**, पु० राजकीय एक अधिकारी आहे; २, रा० सुरदास.

**सुरपणें**, कों० सांठवून ठेवलेलें भात आंत भुरळीं पडल्या मुळें फोला सारखें हलकें होणें.

**सुरपारंब्या**, स्त्री० वृक्षावर चढून खेळायाची एक मुलांची क्रीडा आहे; अनेकवचनीं प्र०.

**सुरफाटणें**, उरफाटा झाला जो कोणेक अर्थ त्यास सुरफाटा करणें.

**सुरफाटा**, ३ लिं० सुफराटा.

**सुरबंद**, स्त्री० औषधोपयोगी एक झाड आहे.

**सुरमा**, पु० शरीरावर शिबें ह्मणून रोग होत असतो तो; २, डोळ्यांत घालायाचें उपयोगीं एक अंजन आहे तो.

**सुरमाड**, पु० ताडा सारखा एक वृक्ष आहे जास भेरळ, ह्म०.

**सुरमी**, स्त्री० अन्न आम्लरस, इ० आतृप्त भक्षिलें असतां त्याचा मद शरीरांत चढूं लागला ह्मणजे निजावेंसें वाटाया जोगा जो विकृति विशेष होतो ती.

**सुरवंट**, पु० सुरवेंट.

**सुरवा**, पु० दे० केळ, इ० झाडांची जी सुई ती.

**सुरवात**, स्त्री० कोणेक कर्मांचा जो आरंभ ती.

**सुरवार**, स्त्री० पायजम्यांत एक भेद आहे.

**सुरवारीहिरडा**, पु० हिरड्यांत एक भेद आहे.

**सुरवेंट**, पु० एक क्षुद्र प्राणी आहे ज्याचे अंगावर केंस वकून असतात जे केंस कोणाचे शरीरास लागले असतां गांधी येऊन खाज सुटत्ये ती.

**सुरस**, ३ लिं० उत्तम आहे रस ज्यामध्यें असें जें काव्य, भाषण, गाणें, इ० तो.

**सुरसा**, पु० खिळ्यांत एक भेद आहे, ज्यास दोहों बाजूनें अण्या असतात.

**सुरसुरणें**, चिचोंद्री, नळा, इ० दारवेचा पदार्थांनीं अग्निसंयोगानें सुरसुर वाजणें; २, वाय्वादि विकृती मुळें शरीरावयवांनीं सुरसुरीनें युक्त होणें.

**सुरसुरी**, स्त्री० सुरमी; २, दे० दारवेचें चिचोंदरींत एक भेद आहे.

**सुरसूर**, स्त्री० वाय्वादि विकृतीनें शरीरांत मुंग्या आल्या सारखें वाटाया जोगा एक विकृति विशेष

विशेष होत असतो तो; २, अ० चिंधोटी, इ० उडणें, इ० शब्दाचें अनुकरण.

**सुरमोटा**, पु० शुद्ध मोट्याचे आकारा सारिखा एक विणा करित असतात तो.

**सुरळी**, स्त्री० कागद, वस्त्र, इ० कांची जी केली वळकटी तीस प्रसंग विशेषीं ह्म०.

**सुरळीत**, ३ लिं० जामध्यें खचखरटपणा नदी, नाले, इ० अडचणी नाहींत असा जो मार्ग तो; २, रीति वक्रोक्ति, गूढार्थ, दांडगाई, इ० जांत नाहींत असा जो श्लोक, वाक्य, भाषण, ग्रंथ, मनुष्य, इ० तो; ३, अ० मध्यें कांहीं विघ्नादि नहोतां किं० व्यवहाररीति, इ० नमोडितां यथास्थितपणें, कांहीं एक वृत्यादि चालणें, किं० कोणाकानें वर्तणें, इ० कांचें वि०.

**सुरक्षित**, ३ लिं० विवक्षित नाशादि नहोतां यथास्थितपणें विद्यमान जो तो.

**सुरा**, स्त्री० सं० मद्य; २, पु० मोठी जी सुरी तो.

**सुराखार**, पु० सुऱ्याखार.

**सुरी**, स्त्री० फळादि कापणें, चोया करणें, पानें कापणें, इ० उपयोगी एक शस्त्र आहे; ह्म० घे सुरी आणि घाल उरीं.

**सुरुंग**, पु० खडक फुटावा ह्मणून दारू भराया साठीं त्यास जें भोंक पाडितात तो; २, भूमींतून गुप्तपणें आण्या येण्या करितां जो मार्ग करितात तो.

**सुरू**, पु० एक झाड आहे; २, ३ लिं० आरंभ विशिष्ट झाला जो कोणेक व्यापार तो; उ० गाणें सुरू झालें; ३, दे० सुरूखुरू.

**सुरूच**, पु० दे० सुरक्या.

**सुरूखुरू**, ३ लिं० चोरी, चहाडी, लबाडी, इ० वाईट कर्में करून तीं कर्में आपण केलीं नाहींतच असें दाखवून अलिप्तपणें लोकामध्यें वागणारा जो मनुष्य तो, ह्म० सुरूखुरू सापिका आणि नकटा निरूका.

**सुरूचा**. ३ लिं० सुरूचे वृक्षाचे आकाराचा जो स्तंभ समयी इ० पदार्थ तो.

**सुरूदार**, ३ लिं० सुरूचा.

**सुरूप**, ३ लिं० कुरूपाचा प्रतिपक्षी.

**सुरेख**, ३ लिं० नीट नेटका सुंदर जो पदार्थ तो.

**सुरेखाई**, स्त्री० सुरेखपणा.

**सुरेखी**, स्त्री० दे० सुरेखाई.

**सुऱ्याखार**, पु० सोरा ह्मणून जो खार तो.

**सुलटा**, ३ लिं० उलट्याचा प्रतिपक्षी.

**सुलतानी**, स्त्री० राजादि कृत जो देशादिकांस उपद्रव होतो तो, याचा, प्र० कागदो पत्रीं.

**सुलभ**, ३ लिं० दुर्लभाचा प्रतिपक्षी; २, करणें जाणणें, इ० कां विषयीं कठिन नव्हे जो तो.

**सुलक्षण**. न० दुर्लक्षणाचा प्रतिपक्षी; २, ३ लिं० तद्विशिष्ट जो मनुष्यादि तो.

**सुलक्षणिक**, ३ लिं० सुलक्षणी.

**सुलक्षणी**, ३ लिं० दुर्लक्षणीचा प्रतिपक्षी.

**सुलाख**, पु० सोनें, रुपें, इ० कांचे खरे खोटेपणाचे परीक्षे करितां त्यांस जी खिळा मारून खळी पाडितात तो.

सुलाखणें, सोनें, रुपें, इ० सुलाखानें युक्त करणें.

सुलाखी, ३लिं० सुलाखानें युक्त जो रुपया इ० पदार्थ तो.

सुँवरा, पु०रा० सुयरा.

सुवर्ण, न०सं० ताम्रादि सकल धातूंमध्यें श्रेष्ठ एक धातु आहे तें; २, पु०न० सुवर्णाचें जें ऐंशी गुंजा रूप मान तो तें.

सुवर्णकार, पु०सं० सोनार.

सुवर्णपुष्प, स्त्री०न० स्वर्णपुष्प.

सुवर्णमालिनीवसंत, पु० एक रसायन आहे.

सुवर्णमाक्षिक, न०सं० सतेजस्क एक पाषाण आहे जो सोन्यासारिखा चकाकतो.

सुवर्णमुखी, स्त्री० सुवर्णमाक्षिक.

सुवर्णस्तेय, न० सुवर्णाचीजी चोरी तें.

सुवर्णस्तेयी, ३लिं० सुवर्णस्तेय ज्याणें केलें आहे तो, जो पंचमहापातकी जे त्यांत गणित आहे.

सुवर्णाभिषेक, पु० विवाहामध्यें सुवर्णयुक्त जलानें वधूवरांस जो अभिषेक करितात तो.

सुवाच्य, ३लिं० भ्रांतिकर नव्हे आणि मोकळें अतएव वाचायास सुलभ असें जें अक्षर तें किं० तसें अक्षर आहे ज्याचें असा ग्रंथ, पुस्तक इ० तो.

सुवास, पु० केशर, कस्तुरी, इ० पदार्थनिष्ठ जो उत्तम प्रकारचा वास तो.

सुवासिक, ३लिं० सुवासविशिष्ट जो पुष्पादि पदार्थ तो.

सुवासित, ३लिं० सुवासानें युक्त केला जो तो.

सुवासिनी, ३लिं० जीचा पति विद्यमान आहे अशी जी स्त्री ती.

सुवाळा, पु० एक गलबतांत भेद आहे.

सुवेन, न० पूर्णमास होउन स्त्रियांचा होतो जो प्रसव तें.

सुवेर, पु०रा० सुएर.

सुवेरणें, रा० सुवेरानें युक्त होणें.

सुवेरतुला, ३लिं०रा० सुएरतुला.

सुशाक, ३लिं० दुःशकाचा प्रतिपक्षी.

सुशिक्षित, ३लिं० कोणेक कर्म करण्याची ज्यास शिक्षा चांगली आहे असा जो तो.

सुशी, स्त्री० एक प्रकारचें वस्त्र आहे.

सुशील, ३लिं० उत्तम प्रकारचें आहे शील ज्याचें असा जो मनुष्यादि तो.

सुशोभित, ३लिं० उत्तम प्रकारचे शोभेनें युक्त जो तो.

सुश्राव्य, ३लिं० ज्याचे श्रवणानें आनंद होतो असें जें गाणें, भगवत्कथाश्रवण, इ० तो.

सुषुप्ति, स्त्री०सं० जागृति आणि स्वप्न या दोन अवस्थांहून तिसरी जी अवस्था जीमध्यें अंतःकरणवृत्तीचा अज्ञानांत लय झाल्यामुळें कोणत्याच विषयाची स्फूर्ति असत नाहीं ती.

सुषुम्ना, स्त्री० शरीरांतर्गत इडा आणि पिंगला या दोहों नाडींमध्यें एक नाडी आहे ती.

सुष्ट, ३लिं० दुष्टाचा प्रतिपक्षी.

सुसकार, पु० सुसकारा.

सुसकारणें, कोणेकानें सुसकाऱ्यानें युक्त होणें.

सुसकारा, पु० सशब्द सवेग जो मुखानें बाहेर सोडि

ला उच्छास तो.

सुसंग, पु० सुसंगति, स्त्री० सुजनादिकांची जी संगति ती.

सुसंबद्ध, ३ लिं० असंबद्धाचा प्रतिपक्षी.

सुसर, स्त्री० मनुष्यादिकांस मारणारा एक जलजंतु आहे; २, ३ लिं० वि० कों० वेडयावांकडया मार्गानें वागत असतां शासनादियुक्तींनीं मार्गावर आणिला जो मनुष्यादि जीव तो.

सुसह्य, ३ लिं० दुःसह्याचा प्रतिपक्षी.

सुसाट, पु० सुसाटा; २, अ० सशब्द सवेगपणें वायु, अश्व, इ० कानीं जाणें, येणें, इ० कांचें वि०.

सुसाटा, पु० वारा, जल, इ० कांचा जो झपाटा तो; वेगानें चालणारा जो वायु, जल, इ० त्यांचा जो शब्द तो.

सुसाध्य, ३ लिं० दुःसाध्याचा प्रतिपक्षी.

सुस्त, ३ लिं० सुस्ती प्रथम द्वितीयार्थानें विशिष्ट जो तो; २, कोणेक कार्य सुस्तीनें करण्याचा स्वभाव ज्याचा तो किं० त्याचा तो कारभार इ० तो; सुस्त निजणें, सुस्त बसणें, इ० स्थलीं असमाधाना दिकारणामुळें जी हालचाल तद्रहित निजणें इ०.

सुस्ता, ३ लिं० दे० सुस्त द्वितीयार्थी.

सुस्ताई, स्त्री० सुस्तपणा.

सुस्तावणें, कोणेकानें सुस्तीनें युक्त होणें.

सुस्ती, स्त्री० आलस्य; २, दहीं, आम्ररस, इ० पदार्थ भक्षिल्यानें शरीरांत शैत्य होउन उद्योगाविषयीं हस्तपादादिक त्वरेनें न उठायाजोगी जी जडतारूप विकृति होते ती; ३, कोणेक कामाविषयीं आलस्यादि कारणानें त्वरा न करितां मंदपणें करण्याचा जो प्रकार ती.

सुस्थल, न० उत्तम जें स्थल तें.

सुस्वर, ३ लिं० कार्कश्य, अपस्वर, इ० दोषरहित असें जें गाणें, म्हणणें, इ० तो; २, स्त्री० रा० सुसर प्रथमार्थी.

सुह्यागी, स्त्री० स्वागी.

सुहृत्, पु० सखा.

सुहृत्संबंधी, पु० सखा सोयरा.

सुहेर, पु० सुएर.

सुहेरणें, रा० सुवेरणें.

सुहेरतुला, ३ लिं० सुएरतुला.

सुळ, —, कण, —कन, —कर, —दिन, —दिनी, दिशी, अनु० सुळसुळीत पदार्थावरून पाय इ० सरणें किं० सुळसुळीत पदार्थ हस्तादिकांतून गळणें, निसटणें, सुटणें, उडणें, इ० वि०.

सुळका, पु० क्रमानें सूच्यग्र होत गेलेला जो पर्वतादिकांचा श्रृंगादिरूप अवयव तो; आडवा विस्तार ज्याला फार नाहीं असा फार उंच जो वृक्ष त्यास म्ह०.

सुळकी, स्त्री० खुंटी, मेख, इ० कांस बारीक जें सूच्याकार अग्र असतें ती.

सुळकंबा, सुळकुंबा, पु० बेलगड्याचे कोणेक डावेंखालीं आंत तुंब भरून जो सूच्यग्र स्तंभ फिरायाजोगा उभा केला असतो तो; २, सुळका.

सुळखांब, सुळखुंबा, पु० सुळकंबा.

सुळा, पु० ज्याला अणी असते असा जो मनुष्य. हत्ती, डुकर, व्याघ्र, मार्जार, सर्प, इ० कांचा दंत

तो; २, गमन करण्यास समर्थ पायांस खुपायाओंग जेखडे, खुंटाप्रे, इ० ते प्र०; ३, एक क्षुद्र प्राणी आहे जो महिष्यादि पशूंचे अंगावर गोचिडासारखा पडत असतो तो; ४, कसई म्हणून एक जातीचें तृण आहे त्याचें जें बीज तो; ५, मोटचेंचाक ठेवायासाठीं जे विहिरीचे कांठावर दोन खांब झुकते उभे केले असतात ते प्र०.

सळावरची पोळी, स्त्री० यथास्थित पणें निभावलें असतां बरें नाहीं तर सर्वस्वनाशादिक मोठ्ये संकटाची संभावना जांत आहे असें जें कांहींएक अवघड कर्म त्यास म्ह०; उ० मृगसाळीं गलबतांत बसून आणें हें सळावरची पोळी.

सज्ञ, ३ लिं० शास्त्रादि परिचयें करून जें विशेषज्ञान येत असतें तें आहे ज्यास तो.

सू, स्त्री० सुई; २, ३ लिं० जातें जो प्रसवतो तो तत्सू उ०; वीरांतें प्रसवते ती वीरसू किं० विश्वसू.

सूकर, पु० सं० डुकर.

सूक्त, भाषणादि अर्थाविषयीं बरें आणि वाईट अशा जा दोन कोटी त्यामध्यें बरें ही जी कोटि ती विषयीं प्र०.

सूचक, ३ लिं० सं० कोणक अर्थातें सुचविणारा जो मनुष्य किं० कांहीं चिन्ह इ० तो; २, पु० चहाडखोर.

सूचन, न० सूचना, स्त्री० कोणेकाला कोणेक अर्थ सुचविण्याचा जो व्यापार तें ती.

सूचवणें, सुचवणें.

सूचित, ३ लिं० सुचविला जो तो.

सूची, स्त्री० सं० सुई प्रथमार्थी; २, अमुक पत्रावर अमुक पंक्तीस अमुक प्रकरण आहे हें समजायाकरितां केली असते जी अनुक्रमणिका ती; ३, जो जो अर्थातें सुचवितो तो तत्सूची; उ० हर्षातें सुचवितो तो हर्षसूची, भाग्यसूची, इ०.

सूचीकटाहन्याय, पु० केवळ लहान आणि अति मोठें अशीं दोन कामें युगपत्प्राप्त झालीं असतां लहान काम आगोदर करून टाकावें अशा अर्थाविषयीं दृष्टांतत्वें करून घेतात जें सुई आणि कढई हीं दोन घडायाचीं असतां सुई आधीं घडतात असें जें एक लोकव्यवहाररूप प्रमाण तो.

सूच्यग्र, ३ लिं० सुईचे अग्रासारिखा क्रमानें बारीक होत गेलेला जो खिळा, इ० पदार्थ तो.

सूज, स्त्री० जलोदरादि रोगामुळें किं० आघातादि कांहीं निमित्तानें रक्तास विकार होउन शरीरास किं० शरीरावयवांस येतो जो विलक्षण जाडेपणा ती.

सूट, स्त्री० देणें घेणें, इ० व्यवहारांत न्यायतः कुळ, इ० कांकडून घ्यावयाचें जें द्रव्यादि तें देणाराचे नातवानी इ० कारणामुळें सर्व न घेतां त्याचे कांहीं अंशाविषयीं करितात जी माफी ती; आणि न घेतां सोडितात जो तो द्रव्यांश ती; २, स्वत्वसंबंधांत जे दागिने, दाग, इ० त्यांवरील स्वत्व निरास करून त्यांस स्वतंत्रपणें वागण्याविषयीं देतात जी मोकळीक ती; ३, कोणाक पंक्त्यादिकांचा दाटीं सन्निविष्ट जे अनेक पदार्थ त्यांस परस्परें मध्यें असतें जें अंतर ती.

सूटसाट, सूटसोड, स्त्री० सूट, इ०.

सूड, पु० चुकलेला, हारवलेला, इ० रूप जो कोणेकअर्थ त्याचा त्यात्या प्रकरणादिकांचें अनुक्रमानें चालन केल्यानें लागतो जो शोधतो; सूड घेणें उगवणें म्ह० कोणेकानें आपला केला जो अपकार तो प्रतिक्रिया द्वारा फेडणें; २, रा० दोल, इ० वाद्य वाजवूं लागल्यापासून मध्यें अवसान घेई तोंपर्यंत वाजविण्याचा जो व्यापार तो, मारणें धातू० योगीं प्र०; ३, मध्यें अवसान किं० कार्यांतर नघेतां सतत कांहीं एक काम करण्याचा जो प्रकार तो.

सूडबंद, पु० अनेक कलमाचे सूड आजवर लिहिले असतात असा जो कागद तो.

सूत, न० वस्त्रादिकाचें उपयोगी कापुस, रेशीम, लोंकर, इ० रूवर्णादि धातु किं० लारन, इ० कांचा जो तंतु तें, परंतु कापसाचे तंतूवर विशेषेंकरून प्र०; उ० रेशमाचे सनगापेक्षां रूताचे सनगास उबफार असते; २, ला० कांहीं एक कार्यसाधनार्थ कोणेकाचें कोणेकाशीं असतें जें संधान तें; ३, फलादिकांचाठायीं बारीक पडतात जे कृमि ते प्र०; कोणेकानें रूतानें स्वर्गास जाणें म्ह० कोणेक विषयाचा यत्किंचित अंशसमजल्यानें बुद्धिबळेंकरून त्यासर्व विषयातें जाणणें; कोणेक मनुष्य व्यवहार इ० कानें रूतास लागणें म्हणजे स्वाधीनपणें चालायाजोगें सोईस लागणें; ४, पु० राजादिकांपुढें स्तुतिपाठ, सारथ्यकर्म, इ० करणारी अशी एक पुराणप्रसिद्ध मनुष्यांत जाति आहे; ५, सारथि; ६, पारद.

सूतक, न० सं० सुहेर; २, ग्रहणसंबंधी जें आशौच त्यास म्ह०.

सूतकी, ३लिं० सं० सूतक आहे ज्यास तो.

सूतरनाल, स्त्री० रूतरनाल.

सूतरस्वार, पु० सांडणिस्वार.

सूतिका, स्त्री० बाळंतीण.

सूतशेखर, पु० एक रसायन आहे.

सूत्र, न० कार्पासादिकांचा जो तंतु तो; २, यंत्रादिकाचाठायीं त्याचा चलनादि व्यवहार विवक्षानुरूप व्हावयासाठीं युक्तीनें लाविले असतात जे सूत्रादिरूप अवयव ते प्र०, आणि त्याय आदि व्यवहारास उपजीव्य जा युक्ति त्या प्र०; ३, कोणेक कार्य विवक्षानुरूप सहज अनायासें व्हावें म्हणून त्यात्या अधिकरणीं युक्तीनें जो पूर्वीं योजना विशेष करून ठेविला असतो तें; ४, शास्त्रप्रवर्तकाचार्य जे त्याणीं त्यात्या शास्त्रविषयावर जो मूलग्रंथ रचिला असतो तें, आणि त्यांचीं जीं अवांतर वाक्यें तीं प्र०.

सूत्रक, ३लिं० कोणेक काम सूतमारून केल्यासारखें नीटनेटकें सहज ज्याचे हातून घडतें असा जो मनुष्य आणि त्याचा हात लेखणी, इ० तो; २, सुतीजें यंत्र, भिंत, इ० काम तें.

सूत्रधार, पु० नाटकाची नांदी झाली म्हणजे नाटक कथेच्या प्रसंग आणायाकरितां जें सोंग येतें तो; २, सूत्रधारी.

सूत्रधारी, पु० कळसूत्री बाहुलीं, इ० कांचा चलनवलनादि विषयीं कारण जीं गुप्त सूत्रें असतात तीं हातीं धरून चालन करितो तो; २, ला०

**सूत्रा**, ३लिं॰ सूत्रक.

**सूत्री**, ३लिं॰ सूत्रा.

**सूदकल्याण**, पु॰ गानाचे रागांत एक भेद आहे.

**सूने**, स्त्री॰ पुत्र किं॰ पुत्रस्थानी जो पुतण्या, इ॰ त्याची जी स्त्री ती.

**सूना**, स्त्री॰ सं॰ झाडणें, कांडणें, दळणें, चूलपेटवणें, पाणीभरणें, हीं जीं गृहकृत्यें त्यांचाठायीं प्रत्येकीं कीटपतंगादिक जीवांचा हिंसा घडतात त्या प्र॰.

**सूनु**, पु॰सं॰ पुत्र.

**सूप**, न॰ (शूर्प॰) धान्य पाखडणें इत्याद्युपयोगी वंशादिकाचें पात्र आहे; विवाहादिकांत सूप फडफडणें किं॰ वाजणें ह्मणजे मंडपोद्वासन होउन त्यासमारंभाची समाप्ति होणें.

**सूय**, स्त्री॰ सुई.

**सूर**, पु॰ स्वर प्रथम द्वितीयार्थी; २, सनई, पोवा, इ॰ वाद्यें सप्तस्वरांवर वाजत असतां त्यास्वरांचें सामान्यस्वरूप धरून जें सतत एकसारखें वाद्य वाजत असतें तो; ३, स्त्री॰ कों॰ सुराशब्दाचा अपभ्रंश.

**सूरकरी**, पु॰ गाणारांचे मागून स्वरपूरण करणारा जो तो.

**सूरण**, पु॰ सं॰ एक कंद आहे.

**सूरसन्न**, पु॰न॰ हिं॰ वर्तमान कालीन जो शक तो तें, परंतु यवनी शकाविषयीं कागदोपत्रीं प्र॰.

**सूर्य**, पु॰ ज्याचे उदयास्तानें दिवसरात्र होतात असा जो सर्वग्रहांत श्रेष्ठग्रह आहे तो; सूर्यकिरण, सूर्यप्रकाश, सूर्यमंडल, इ॰ स॰; ह्म॰ सूर्यापुढें काजवा; सूर्यापोटीं शनैश्चर.

**सूर्यकन्या**, स्त्री॰ संकेतानें भागीरथी सह्म॰.

**सूर्यकमळ**, न॰ कमळांत एक जाति आहे.

**सूर्यकमळी**, स्त्री॰ एक फुलझाड आहे.

**सूर्यकांत**, पु॰ एक तेजस्वी स्वच्छ पाषाण आहे जो सूर्यस्थानीं पूजित असतात आणि सूर्यकिरणाचे संयोगानें ज्यापासून अग्नि उत्पन्न होतो तो.

**सूर्यकांती**, ३लिं॰ सूर्यकांत पाषाणाचा आरशी इ॰ जो पदार्थ तो.

**सूर्यखार**, पु॰ सुर्याखार.

**सूर्यग्रहण**, न॰ सूर्यास लागतें जें ग्रहण तें.

**सूर्यनक्षत्र**, न॰ सूर्यानें अधिष्ठित जें सत्तावीस नक्षत्रांतील नक्षत्र तें.

**सूर्यनारायण**, पु॰ देवताबुद्धीनें सूर्यास ह्म॰.

**सूर्यपर्व**, न॰ सूर्यग्रहण, व्यतीपात, सूर्यसंक्रांत, अमावास्या, इ॰ जीं पर्वें तीं प्र॰.

**सूर्यपुट**, न॰ औषधादि पदार्थ कांहीं दिवस उन्हांत तापत ठेवावा असा जो त्यास तापनसंस्कार करितात तें.

**सूर्यपुटी**, **सूर्यपुठी**, ३लिं॰ सूर्यपुटानें संस्कृत जो औषधादि पदार्थ तो.

**सूर्यपूठ**, न॰ सूर्यपुट.

**सूर्यफूल**, न॰ सूर्यकमळीचें जें फूल तें.

**सूर्यवंश**, पु॰ सूर्यापासून झालेला असा एक पुराणप्रसिद्ध राजवंश आहे.

**सूर्यवंशी**, ३लिं॰ सूर्यवंशांत उत्पन्न जे ते प्र॰; २, ला॰ सूर्योदयोत्तर जागृत होउन उठण्याचा स्वभाव ज्याचा असा जो मनुष्य त्यास ह्म॰.

सूर्यविकासी, ३ लिं॰ दिवसास विकसित असावें आणि रात्रीं मिटावें अशा स्वभावाचें जें कमलादि तें.

सूर्यसंतान, न॰ कोणेकाचे पोटीं उत्पन्न होतें जें कुसंतान तें.

सूर्याचें झाड, न॰ सूर्यकमळी.

सूळ, पु॰ शूळाचा अपभ्रंश; चढायास कठिण असा कारउंच जो डोंगर, वृक्ष, इ॰ त्यास म्ह॰.

सूक्ष्म, ३ लिं॰ बारीक; सूक्ष्मदृष्टि, सूक्ष्मबुद्धि, इ॰ म॰.

सूक्ष्मदर्शी, सूक्ष्मदृष्टि, ३ लिं॰ कोणेक विषयाचा बारीक विचार, मर्मांश, इ॰ पाहाण्याविषयीं समर्थ आहे दृष्टि ज्याची तो.

सूक्ष्मदेह, पु॰ लिंगदेह.

सूक्ष्ममान, न॰ यत्किंचित ही ज्यांत अंतर नाहीं असें स्पष्ट जें कालादिकांचें मान तें.

सृक्किणी, स्त्री॰ ओष्ठप्रांताचा वाचक संस्कृत सृक्कि न शब्द नपुंसकीं आहे त्याचें हें द्विवचन, हा शब्द त्याच अर्थी स्त्रीलिंगीं अनेकवचनीं लोकांत प्र॰.

सृगाल, पु॰ सं॰ कोल्हा.

सृष्ट, ३ लिं॰ कोणेकानें उत्पन्न केला जो कोणेक अर्थ तो.

सृष्टि, स्त्री॰ अस्मदादिकानीं केली जी सर्वजगाची किं॰ जगदंतःपाति पदार्थांची उत्पत्ति ती; आणि त्या उत्पत्तीनें उत्पन्न झालें जें जग किं॰ तदंतःपाति पदार्थ ती; मनुष्यसृष्टि, भूतसृष्टि, इ॰ स॰.

सेक, पु॰ भूम्यादिकांवर जलादि सद्रव पदार्थ शिंपडल्यानें त्याचा बिंदुशः होतो जो पात तो.

सेकणें, शेकणें.

सेकाटा, पु॰ शेकाटा.

सेंग, स्त्री॰ शेंग.

सेगडी, स्त्री॰ शेगडी.

सेचन, न॰ सिंचन.

सेज, स्त्री॰ न॰ शेज.

सेट, पु॰ शेट.

सेटजी, पु॰ शेटजी.

सेट्या, पु॰ शेट्या.

सेण, न॰ शेण.

सेत, न॰ शेत.

सेतु, पु॰ पूल.

सेंदणें, शेंदणें.

सेंदाड, न॰ शेंदाड.

सेंदूर, पु॰ शेंदूर.

सेंदेलोण, न॰ शेंदेलोण.

सेना, स्त्री॰ राजादिक जो नायक त्याचे पदरीं स्वार, पायदळ, इ॰ जो योधसमुदाय असतो ती.

सेनापति, पु॰ राजादिकानें आपल्ये सर्वसेनेवर जो अधिकारी करून ठेविला असतो तो.

सैंपाक, पु॰ कों॰ सैंपाक.

सैंपाकघर, पु॰ सैंपाकघर.

सैंपाकी, पु॰ कों॰ सैंपाकी.

सैंपाकीण, स्त्री॰ सैंपाकीण.

सेपु, स्त्री॰ शेपू.

**सेंपूट**, न० शेंपूट.

**सेंबूड**, पु० शेंबूड.

**सेर**, पु० शेर.

**सेरा**, पु० शेरा.

**सेवक**, पु० चाकर; २, लिं० कोणेक अर्थातें सेवणारा जो तो.

**सेवट**, पु० शेवट.

**सेवणें**, कोणेक अर्थानें सेविन करणें.

**सेवन**, न० जा अर्थाचा जो उपयोग तो त्यापासून आपणास घडे असें त्या अर्थाचें तत्त योग्य क्रिया द्वारा आत्मसंबंधांत जें धारण तें.

**सेवा**, स्त्री० चाकरीरूप जें कर्म ती; २, सेवन द्वारा घडतो जो अर्थाचा संबंध ती.

**सेवाधर्म**, पु० पिता, धनी, इ० कांची सेवा करावी हाच जो पुत्र, भृत्य, इ० कांचा धर्म तो.

**सेवित**, ३ लिं० सेवन केलें आहे तो.

**सेवी**, ३ लिं० जो जातें सेवितो तो तत्सेवी; उ० तीर्थातें सेवितो तो तीर्थसेवी, अरण्यसेवी, औषधसेवी, इ० स० प्र०.

**सेवेकरी**, पु० देवाच्या सेवेकरितां देवस्थानीं आवुन राहिला असतो जो तो.

**सेव्य**, ३ लिं० सेवावयास योग्य जें ईश्वर औषधादि पदार्थ तो.

**सेव्यसेवकभाव**, पु० सेव्य आणि सेवक यांचा जो परस्पर संबंध तो.

**सेळी**, स्त्री० शेळी.

**सै**, स्त्री० सई.

**सैतान**, पु० हिं० सर्व कर्मफलदाता जो ईश्वर त्याचा विरोधी असा एक कोणी आहे म्हणून यवन लोक मानितात तो; २, पु० न० घोरकर्मा घोररूपी असा जो मनुष्य, पर्जन्य, वारा, इ० त्यास आरोपानें स्म०

**सैती**, स्त्री० हिं० एक आयुध आहे.

**सैंधव**, न० एक क्षार आहे जास सेंधेलोण म्ह०; २, ३ लिं० सिंधुदेश संबंधी जो अश्वादि पदार्थ तो आणि समुद्र संबंधी जो जलमौक्तिक, इ० पदार्थ तो.

**सैनापत्य**, न० सं० सेनापतीचा जो अधिकार तें.

**सैनिक**, पु० सेनासंबंधी जे सरदार, शिपाई, इ० ते प्र०.

**सैन्य**, न० सेना.

**सैंपाक**, पु० भोजनार्थ भात, भाकर, पोळी, वरण, भाजी, इ० पदार्थ सिध्यर्थ करितात जी पाकक्रिया ती आणि त्या क्रियेनें सिद्ध झाला जो तो पदार्थ समुदाय तो.

**सैंपाकघर**, न० गृहामध्यें सैंपाका कडे योजिलेलें जें स्थल असतें तें.

**सैंपाकी**, पु० सैंपाक करणारा जो पुरुष तो.

**सैंपाकीण**, स्त्री० सैंपाक करणारी जी स्त्री ती.

**सैयद**, पु० हिं० सय्यद.

**सैरट**, ३ लिं० अंतःकरणांत जशी लहर येईल तसें वर्तावें अशा स्वभावाचा छांदिस जो तो; २, ज्याचे अंगीं लौकिक तारतम्य नाहीं अतएव काम करावें कोणतें, न करावें कोणतें, बोलावें काय, न बोलावें काय, इ० रूप जें संधान तें ज्याचे बुद्धीस नाहीं अशा स्वभावाचा जो तो; उ० कोण हा सैरटपणा अरे वाट चुकून चार कोस भलतीकडे गेला तरी जाला समजलें नाहीं.

सैरंध्री, स्त्री० गरतअसून श्रीमंत लोकांचे घरीं बा यकांची वेणीफणी, वस्त्रालंकारादिरचना, इ० रू प काम करायासाठीं वेतन घेउन राहत्येजी स्त्री ती.

सैरावैरा, अ० ग्रं० जाला जिकडे वाट फुटेल तिकडे; सैन्यादिकानें भयादिकामुळें अनेक मार्गानें सं भ्रांतपणें जें पळणें, धांवणें, इ० त्यांचें वि०.

सैल, ३ लिं० शिथिल.

सैलावणें, बंधादिक पूर्वीपेक्षां सैल होईअसें करणें.

सैली, स्त्री० गळ्यांत घालणें इत्याद्यर्थ सूत इ० कां चा दाला सारिखा पदार्थ विणून त्याचा एक माळे सारिखा पदार्थ विशेष करीतअसतात ती.

सैंवर, न० स्वयंवर शब्दाचा अपभ्रंश.

सैसद, अ० रा० सनसय.

सोइरगत, स्त्री० कोणेकाच्या कोणेकाशीं असतो जो यौनसंबंध ती.

सोइरा, पु० सोयरा.

सोइराधाइरा, पु० सोयराधायरा.

सोइरी, स्त्री० सोयरी.

सोइरीक, स्त्री० सोयरीक.

सोई, स्त्री० सोय.

सोईवार, ३ लिं० जामध्यें असावी तशी सोय आहे असाजो पदार्थ, व्यवहार, इ० तो.

सोईसार, ३ लिं० कों० सोईवार.

सोईस्कमार, पु० सोयस्कमार.

सोईसोईनें, अ० जशीजशी सोय होईल तसें त नें, देणें, घेणें, करणें, इ० कांचें वि०

सोएर, पु० सुएर.

सोएरतुला, ३ लिं० स्कएरतुला.

सोंकटी, सोकटी, स्त्री० सोंकटें.

सोंकटें, सोकटें, न० प्रा० लांबट स्कपागीचे आका राचे क्रीडार्थ जे हस्तिदंत, काष्ठ, इ० कांचे पदार्थ करितात ते प्र०; २, सभादिकांचे ठायीं उदकाड्या खोंचाया करितां तदाकार जे काष्ठादिकांचे पदा र्थ करितात ते प्र०.

सोंकणें, सोकणें, सवकणें.

सोकरा, पु० मुलगा.

सोकरी, स्त्री० मुलगी.

सोकरें, न० मुलगें.

सोंकावणें, सोकावणें, सोंकणें.

सोंकील, सोकील, ३ लिं० कोणएक विषयीं जो सवकलेला असतो तो.

सोक्त, ३ लिं० गंजिफाचे खेळांत बारापानांतून ए कहीपान दुसऱ्याचे हातांत राहिलें नाहीं असा जो रंग होतो तो.

सोख, पु० शोष.

सोखणें, शोषणें.

सोंग, न० तमाशा इ० कांमध्यें कोणएकाचा धरि तात जो वेष तें आणि तादृशवेषविशिष्ट जो मनुष्य तें; २, कपटानें धरिलें जें दरिद्री, दुखणे करी, इ० कांचें सोंग तें; स्न० वेडीचें सोंग घेतलें ह्मणजे पाटोव फाडला पाहिजे; ३, लोकविल क्षण आचार, वेष, इ० कानीं युक्त जो मनुष्यादि त्यास तसेंच विशेषशोभा, डौल, इ० दिसावें हें मात्र कदाचित् प्रयोजन असेल तर असो वरकड ज्याचें कांहीं प्रयोजन नाहीं ज्याचे योगानें उगीच अडचण घालगील इ० मात्र होतें असें अविवक्षित

जें कांहीं त्यास ल०.

सोंगटी, स्त्री० सोंकटी.

सोंपटें, न० सोंकटें.

सोंगसंपादणी, सोंगसंपादणी, स्त्री० जें सोंग आणलें त्याची यथायुक्त जी संपादणी.

सोंगळा, १ किं० मलिन [illegible], दुसऱ्यानें उच्छिष्ट भक्षण [illegible] स्पर्श, इ० कांविषयीं जास [illegible] असते [illegible] भावाचा जो तो.

सोंगा, पु० नेसलेल्या किं० आंगावर घेतलेल्या धोतर, शाला, इ० वस्त्राचा जो वनऊटला असतो जो अवयव तो.

सोंगाडी, पु० तमाशा, इ० कांत अनेक सोंगें घेतो तो; २, २ लिं० आंगीं तादृश दुःख दारिद्र्य इ० नसतां बाहेर लोकांस सोंग दाखविण्याचा स्वभाव ज्याचा तो.

सोंगाड्या, पु० ३ लिं० सोंगाडी.

सोंगाड्या, ३ लिं० सोंगाडी द्वितीयार्थीं.

सोंगी, ३ लिं० सोंगाड्या.

सोंग्या, ३ लिं० सोंगी.

सोजी, स्त्री० भांड्यांत तांदूळ फोडणीस टाकून किं० भाजून शिजवून जो उपहारार्थ पाक करितात तो.

सोज्वळ, सोज्वळ, ३ लिं० स्वच्छ निर्मळ जो कोणेक अर्थ तो.

सोट, पु० आडवा विस्तार [illegible] होतां एकाकांडानें नीट उंच वाढत गेलेला जो मोठा झाड वृक्ष तो किं० त्या झाडासारखें मोठें लांब सरळ जें लांकूड तो; २, ला० बरनीट उभा अतएव चढायास कठीण असा जो पर्वत, मनोरा, इ० तो; ३, शरीरानें धष्टपुष्ट असून विद्यादिगुणहीन किं० मुलें, बाळें, इ० ज्याचें आगें मागें नाहीं असा जो पुरुष किं० स्त्री० त्यास ल०.

सोटगें, न० लहानसा जो हातीं धरायाचा सोटा तें.

सोटा, सोठा, पु० गळवंताची काठी, इ० ज्याच्याजोगें आड गोल जाड असें जें लांकूड तें; २, आयुधस्थानीं हातीं बाळगायाचें उपयोगी म्हणगटा एवढा सरासरी जाड दोनतीनहात कमार लांब असें घाटोळें जें लांकूड तें; ३, गोमहिष्यादिकांचा प्रसवाचा पूर्वकाळीं योनींतून शेंबडाचे लोळी सारखा जो धातुविशेषाचा अंश बाहेर पडतो तो.

सोटादुपट्टा, सोटादुपेटा, पु० एखादें वस्त्र, एखादें पात्र, इ० रूप थोडेंच जें कोणाचें खरटलें असतें त्यास ल०.

सोटेपान्हवण, न० पान्हवण घातलें तरी पान्हवतनाहीं उभें रहातनाहीं असें जें गुरूं त्याणें पान्हवावें उभें रहावें म्हणून त्यास देतात जो सोटा, इ० कानें मार त्यास ल०.

सोटेबारदार, पु० आयुधरूपानें हातीं सोटा बाळगतो तो

सोटबाजी, स्त्री० सोट्यानीं जी मारामारी ती.

सोड, स्त्री० सूटद्वितीयार्थीं; २, शिष्य, पुत्र, इ० प्रतिकूल वागूं लागला असतां त्यास शिक्षा करावी ती न करितां किं० आपणाशीं भांडूं लागला जो दायादादि कोणी त्याबरोबर भांडावें तें न करितां उपेक्षादि कारणामुळें त्याशीं त्याणीं पाहि

जें

सोड्याळ, २लिं० ग्रा० कोणेकविषयावर अमंगल
वा, इ० रोष आदळल्यानें एकाएक आला जो वीट
तो जीचे [illegible] नाहीं
[illegible] करणें नो
[illegible] जो तो.

सोत, स्त्री० को० गोफणीइत्यादिकांचें जें निरण ती.

सोतरणें, सोबाडणें, सोतारणें, क्रि० कोणएका
नें कोणाएकास थाप, इ० कानें ताडिन करणें.

सौती, स्त्री० ग्रा० सौत.

सोदणें, ग्रा० सोधणें.

सोदर, २लिं० सहोदर.

सोदा, पु० साधुपणा, धनिकपणा, प्रामाणिक
ता, इ० रूप डौल बाहेर दाखवाया इ० अनेक
कपटयुक्तीनीं दुसऱ्यास ठकवून आपलें कार्य
करून घेणारा जो तो क्रि० गंडबाजी, ख्यालत
माशा, इ० रूप असभ्यकर्मावर ज्याची निष्ठा
असा जो तो.

सोदेगिरी, स्त्री० सोदेपणा.

सोदेशाई, स्त्री० सोदेगिरी; २, ३लिं० सोद्यासं
बंधी जें भाषण, रीति, डौल, इ० तो.

सोद्या, पु० सोदा.

सोधणें, शोधणें; परंतु पुस्तकादि शुद्धकरणें
या अर्थीवांचून; २, न० जलादि सद्रवपदार्थ
गाळण्याचे उपयोगीं जें वस्त्र केलें असतें तें.

सोधनें, न० सोधणें द्वितीयार्थी.

सोधा, पु० सोदा.

सोधेगिरी, स्त्री० सोदेगिरी.

सोधेशाई, स्त्री० सोदेशाई.

सोध्या, पु० सोदा.

सोनकळी, स्त्री० चांपकळी म्हणून जें भूषण ती.

सोनकाव, स्त्री० कावेंत एकभेद आहे.

सोनकावळा, पु० को० भारद्वाज म्हणून जो प
क्षी त्यास म्ह०.

सोनकुला, २लिं० आवडीनें बोलायाचें असतां
लहान मुलांस म्ह०.

सोनकेतक, स्त्री० केतकींत एक जाति आहे जी
चे पुष्पाचा वर्ण सोन्यासारिखा असतो ती; २.
न० तीचें जें पुष्प तें.

सोनकेतकी, स्त्री० सोनकेतक प्रथमार्थी.

सोनकेवडा, पु० सोनकेतकीचें जें पुष्प तो.

सोनकेळ, स्त्री० एक केळींत जाति आहे; २, ती
चें जें फल तें.

सोनकेळें, न० सोनकेळ द्वितीयार्थी.

सोनक्या, पु० सोनकुला.

सोनखत, न० शेत इ० कांस घालितात जें मनु
ष्यविष्ठाप्रधान खत तें.

सोनखात, न० पु० सोनखत.

सोनचेडी, स्त्री० सोनचिडी.

सोनचांपा, सोनचांफा, पु० एक पुष्पवृक्ष आ
हे तो.

सोनचांपें, सोनचांफें, न० सोनचांप्याचें जें फू
ल तें.

सोनचिडी, सोनचेड, सोनचेडी, स्त्री० कोल्हा
ट्याचे तमाशांत उड्या मारणें, नाड्यांवर ना
चणें, इ० खेळ करणाऱ्या जातीच्या असतात
त्यास म्ह०.

**सोपस**, ३लिं॰ रा॰ आघात, उपोषण, श्रांत, उष्ण, इ॰ जें प्रतिकूल त्याचा ईषन्मात्र संबंध प्राप्त असतां तत्काल म्लान होतो, मरतो, अशा देह स्वभावाचा जो प्राणी तो.

**सोपस्कर**, ३लिं॰ मुख्य अन्न गृह, इ॰ त्यास विशेष रुचि, विशेष शोभा, इ॰ गुणाधायक जें त्याचें अंगभूत साहित्य भूत उपचारादि तद्विशिष्ट जो अन्नादि पदार्थ तो.

**सोपस्कार**, पु॰ अन्न, शरीर, गृह, इ॰ कांस विशेष रुचि यावी, विशेष शोभा यावी, ह्मणून जे अनेक प्रकारचे उपचार करितात ते.

**सोपा**, पु॰ घोडी, गुरें, इ॰ बांधणें, तृणकाष्ठादि ठेवणें इत्यादि उपयोगी लांबट जो गृहास अवयव बांधलेला असतो किं॰ तत्सदृश पृथक् बांधिलें असतें जें घर तो; २, ३लिं॰ सोपारा.

**सोपाट**, न॰ सोपट.

**सोपान**, न॰ सं॰ जिना, शिडी, घाट, इ॰ संबंधी जा पायऱ्या त्या न॰ ते.

**सोपारा**, ३लिं॰ करणें, जाणणें, इ॰ विषयीं अवघड नव्हे तो.

**सोबकणें**, धुवावयाचें वस्त्रादि तें एके अंगें धरून पाषाणादिकावर धाडधाड आपटणें; २, तद्वत् मनुष्यादिकांस आपटलें असतांही ह्म॰.

**सोंबट**, ३लिं॰ दे॰ कोमट.

**सोबणी**, स्त्री॰ दे॰ भोजन करतेसमयीं थाळ्यांत घेतलेला जो प्रावकपदार्थ तोच इकडे न पसरावा ह्मणून थाळ्याखालीं एके अंगें लावायाकरितां आकारविशेषाचा काष्ठाचा पदार्थ केलाअसतो तो.

**सोबत**, स्त्री॰ संगत ह्मणायाचा अर्थी.

**सोबतसंगत**, स्त्री॰ कोणत्याही प्रकारची लहान मोटी, वरी वाईट, जी सोबत ती.

**सोबती**, पु॰ गमनादि कोणेक क्रियेचा गार्यीं ज्याची ज्यासी सोबत असते तो त्याचा.

**सोबतीसंगती**, पु॰ कोणत्याही प्रकारचा जो सोबती तो.

**सोभत**, स्त्री॰ सोबत.

**सोभतसंगत**, स्त्री॰ सोबतसंगत.

**सोभती**, पु॰ सोबती.

**सोम**, पु॰ चंद्र ह्मणायाचा अर्थी; २, एक लता आहे; ३, सोमयाग; ४, एक रोग आहे.

**सोमकांत**, पु॰ एक पाषाण आहे.

**सोमकांती**, ३लिं॰ सोमकांताचा जो आरशी, इ॰ पदार्थ तो.

**सोमट**, ३लिं॰ सोमाळा जो तो.

**सोमयाग**, पु॰ सोम ह्मणून जी लता तीचें हवन ज्यांत होतें असा जो यज्ञविशेष तें प्र॰.

**सोमयाजी**, पु॰ सोमयाग ज्याणें केला आहे तो.

**सोमल**, पु॰ एक विषरूप पदार्थ आहे.

**सोमलखार**, पु॰ सोमल.

**सोमली**, ३लिं॰ सोमलाचा किं॰ सोमलाचे योगानें निर्मिलेला जो मात्रा, औषध, इ॰ पदार्थ तो.

**सोमवती**, स्त्री॰ इंदुवारानें युक्त जी अमावास्या ती; आदिवशीं स्त्रिया अश्वत्थाचें पूजन फलादि पदार्थ अश्वत्थमूलीं वाहून प्रदक्षिणा करीत असतात ती.

सोमवंश, पु० चंद्रापासून उत्पन्न झालेला असा एक पुराणप्रसिद्ध क्षत्रियवंश आहे.

सोमवंशी, ३लिं० सोमवंशसंबंधी जो पुरुषादिक तो.

सोमवार, पु० सातावारांतील दुसरा जो वार तो.

सोमवाऱ्या तेली, पु० तेल्यांत एक जाति आहे जे सोमवाराचे दिवशीं घाणा लावीत नाहींत.

सोमसूत्र, सं० न० शिवाचे स्नानाचें पाणी बाहेर येउन जेथें सांचतें तेथे केली असते जी न्हाणी तें.

सोमसूत्रीप्रदक्षिणा, स्त्री० सोमसूत्र न उल्लंघितां उलटें फुलटें फिरून पुरती करावी अशा प्रकारें शिवास घालायाची जी प्रदक्षिणा ती.

सोमळ, ३लिं० दे० कोमट जो पदार्थ तो; २, कों० सोपस.

सोमाळा, ३लिं० कों० कोमट जो पदार्थ तो.

सोय, स्त्री० कोणेक कार्य विवक्षानुरूप होण्याविषयीं त्यास जें जें जसें जसें अपेक्षित असतें तें तें तसें तसें सर्व अनुकूल असल्यामुळें त्या कार्याची गति होण्यास मार्गवत् उपकारक जें संधान म्हणून कांहीं असते ती; २, द्रव्य मिळावें संसारनिर्वाह व्हावा, इ० विषयीं आश्रयभूत जें चाकरी, वतन, शेतभात, इ० कांहीं असतें त्यास म्ह०.

सोयरा, पु० वरपक्षीय आणि वधूपक्षीय जे लोक ते परस्पर; २, ज्यांचा परस्पर योनिसंबंध झाला आहे ते परस्पर; याचा प्रयोग क्वचित् कदाचित् आहे; ३, वेश्या, बटीक, इ० जी सामान्य स्त्री तीणें मैथुनार्थ नेहमी आश्रयले ला असतो जो पुरुष तो.



सोयराधायरा, पु० सोयरा, इष्ट, मित्र, इ० तो.

सोयरी, स्त्री० कोणएकानें मैथुनार्थ राखिली असते जी वेश्यादि सामान्य वनिता ती.

सोयरीक, स्त्री० कोणएकाचा कोणएकाशीं जो योनिसंबंध तो.

सोयवार, ३लिं० सोईवार.

सोयस्कमार, पु० सईस्कमार.

सोर, स्त्री० श० आकारविशेषाचें एक मृन्मय पात्र आहे.

सोरट, पु० दांडगेपणानें वागणारा जो हलक्या स्वभावाचा मनुष्य तो; २, गानांतील एक राग आहे.

सोरटाई, स्त्री० सोरटपणा.

सोरटी, ३लिं० सोरट म्हणून एक देश आहे तत्संबंधी जें मनुष्य, गुरूं, इ० तो.

सोरठ, पु० सोरट.

सोरठाई, स्त्री० सोरटाई.

सोरठी, ३लिं० सोरटी.

सोरमीठ, न० सुर्याखार.

सोरा, पु० एक क्षार आहे जो दारू इ० करायाचे उपयोगीं पडतो; २, कों० काष्ठाचे पदार्थास सांधा पडूं नये या इत्याद्यर्थ खिळ्यासारिख्या काष्ठाच्याच तुकड्या करून मारितात तो.

सोल, पु० [illegible]; २, न० कोकंबसोल.

सोलणें, कोणेक पदार्थ [illegible] अंश शस्त्रादिकें करून काढून [illegible] करणें.

सोलवणी, न॰ कालवण इत्यादार्थ आमसोलें भिजवून त्याचें काढितात जें पाणी तें.

सोला, पु॰ हरभरा, पावटा, इ॰ द्विदल धान्याच्या ओल्या शेंगा घांटे सोलून त्यांतील काढिलेला जो दाणा तो; भा॰ प्र॰ अनेकव॰.

सोलाणा, पु॰ सोला.

सोलापुरी, ३ लिं॰ सोलापुर ह्मणून गांव आहे तत्संबंधी जो पासोडा, तपकिरीची डबी, इ॰ पदार्थ तो.

सोलींव, ३ लिं॰ सोललेला जो दाणा, डाळ, फळ काष्ठ, इ॰ तो; २, ला॰ कोणेकाचे सोदेपणा, लुच्चेपणा, आत्रागमनीपणा, इ॰ किंवा एक असभ्य गुणाचा अतिशय वर्णावयाचा असतां त्या मनुष्यास विशेषण देतात.

सोंवळ, ३ लिं॰ कों॰ सोमकाढितीयार्थी.

सोंवळा, सोवळा, ३ लिं॰ संध्या, देवपूजा, भोजन, इ॰ कर्माविषयीं जितकी शुद्धता असावी तितकी स्नानादिकेंकरून ज्याचे आंगीं आली आहे तो मनुष्य आणि त्याणें स्पर्शावयास योग्य ह्मणजे ज्याला स्पर्श केला असतां आपण ओंवळा होत नाहीं असा जो वस्त्र, अन्न, इ॰ पदार्थ तो; २, कोणेक कर्मसंबंधानें विटाळले गेले नव्हे जो त्यास ह्म॰; उ॰ वरकड सा ज्यानीं त्यांच खाल्ला मी मात्र अजून सोंवळा आहें; ३, जेथील जनसमर्द अगदीं मोडला असा जो मार्ग, ग्राम, इ॰ त्यास किं॰ ज्याचे पाठीशीं कामकारभार, बायका, पोरें, इ॰ खटलें नाहीं त्यास ह्मणजे विधवेनें सोंवळें होणें ह्मणजे सवाशीणपणांतील जे केश ते काढून विधवाधर्मास शुद्ध होणें; ४, पु॰ आकारविशेषाचें एक गवत आहे.



सोवळें, सोंवळें, न॰ सोंवळ्यानें नेसावयाचें उपयोगी रेशमी वस्त्रविशेष आहे; २, सोंवळेपणा.

सोव्हाळा, पु॰ग्रा॰ सोहळा.

सोशा, ३ लिं॰ वेगानें सोंसों असा शब्द करीत अकस्मात् येतो जो वारा त्याचें वि॰.

सोशीक, ३ लिं॰ रोग क्षुधादिजन्य दुःख जालें असतां किं॰ कोणी दुर्भाषण, इत्यापहार, इ॰ काहीं आपला अपराध केला असतां तें सोसून उगेंच राहण्याचा स्वभाव ज्याचा तो.

सोस, पु॰ सोरव; २, आपल्याला हें असावें तें असावें मिळालें असतांही इतकें पुरणार नाहीं अधिक असावें असें सर्वदा वाटावयाजोगा कोणेकास असतो जो तृष्णातिशय तो.

सोसक, ३ लिं॰ सोशीक.

सोसणें, प्रतिकूलत्वें करून संबंध होणार जो दुःख, संकट, शीतोष्ण, अन्यकृत अपराध, भार, इ॰ कांहीं एक अर्थ त्याचे संबंधानें होणारी जी क्षोभभंगादि विक्रिया तिला आत्मप्रभावानें नहोऊं देतां किं॰ झाली असतां नगणितां त्या अर्थातें आत्मसंबंधांत धरणें; २, अन्न औषधादि कोणेक अर्थ प्रतिकूल विकाराबद्दल तें करून प्रतिकूल असें नहोणें.

सोंसाटा, सोसाटा, पु॰ सुसाटा.

सोहनी, पु॰ गानांत एक राग आहे.

सोहलत, स्त्री॰ कों॰ सोलत.

सोहळा, सोहाळा, पु० जन्म,गर्भाधानादि जे शोभन संस्कार ते म०; २. ला० सुखदुःखादि कारक जे जे देहास संस्कार होतात ते म०.

सोहेर, पु० सुएर.

सोहेरगत, स्त्री० सोइरगत.

सोहेरतुला, ३ लिं० सुएरतुला.

सोह्यरा, पु० सोयरा.

सोह्यरी, स्त्री० सोयरी.

सोह्यरीक, स्त्री० सोयरीक.

सोळकी, स्त्री० ग्रा० काष्ठादि जडपदार्थ नेणें, आणणें, इ० प्रसंगीं मिळालाजो सोळा मनुष्यांचा समुदाय तो.

सोळकीचा, ३ लिं० सोळकीनें उचलाया जोगा मोठा जो दगड, तुळई, इ० तो.

सोळन्हाण, सोळन्हाणें, विवाहदिवसापासून सोळावे दिवशीं जांवयास आपले घरीं आणून त्यास स्त्रीसहवर्तमान न्हाउं घालावें, मिष्टान्नभोजन द्यावें, वस्त्रालंकारादि अर्पावे, इ० रूपजो सोहळा करितात तें.

सोळभोंक, पु० जातेमध्यें विद्यादिगुण कांहींनाहींत आणि कोणी आपले घरीं आला असतां आगतस्वागत करावें, संसाराची काळजी बाळगावी, इ० सांसारिक जनाचे धर्म जाचे अंगीं नाहींत असा वृथा पुष्ट जो मनुष्य तो.

सोळवंड, स्त्री० नारळ, इत्यादि फळें, चांपा, इ० कांचीं पुष्पें, इ० पदार्थांचे सोळा सोळा व्यक्तींचे समुदाय जे सोळा ब्राह्मणास दान देतात ते म०.

सोळवदण, न० ग० सोळन्हाण.

सोळा, ३ लिं० संख्या आहे १६.

सोळासंस्कार, पु० गर्भाधान, पुंसवन, इ० शास्त्र परिगणित सोळा जे द्विजातीस संस्कार आहेत ते कोणेक अर्थानें सोळा संस्कार होणें ह्मणजे बरे वाईट, सर्व जे संस्कार ते होणें.

सोळुला, ३ लिं० सोळा पायल्यांचा एक मण अशा संकेतानें जें मण, खंडी, इ० माप तो.

सोक्षमोक्ष, पु० कांहीं एक सुरू होऊन पडलेल्या व्यवहाराचा बरा किं० वाईट परिणाम होउन कसातरी जो उलगडा तो.

सौकर्य, न० सुकरपणा तें.

सौकुमार्य, न० सुकुमारपणा तें.

सौख्य, न० सुखीपणा.

सौगंध्य, न० सुगंधिपणा तें

सौजन्य, न० सुजनपणा तें.

सौंदर्य, न० सुंदरपणा तें.

सौदा, पु० सवदा.

सौदागर, सौदागीर, पु० सवदागर.

सौदागरी, सौदागिरी, ३ लिं० स्त्री० सवदागिरी.

सौदामनी, सौदामिनी, स्त्री० विद्युल्लता.

सौदासूत, न० पु० सवदासूत.

सौध, पु० न० राजादि श्रीमंत लोकांचा जो चुनेगच्ची मोठा वाडा तो.

सौभाग्य, न० सुभगपणा; २. सवाशीणपणामुळें काजळ, कुंकू, मंगळसूत्र, बांगड्या, इ० धारण करण्याविषयीं जो स्त्रियांचे अंगीं योग्यताविशेष असतो तें; ३. ला० ज्याचे योगानें आपणास मान्यता, शोभा, प्रतिष्ठा, तेज, इ०

काहीं असतें असें जें विद्या, तनन, अधिकार, सामर्थ्याचा आश्रय, इ० त्यास म्ह० ; ४, सत्ताबीस योगांतील जो चवथा योग तो.

**सौभाग्यचिन्ह**, न० स्त्रियांचें सौभाग्यज्ञापक जें कुंकूं, मंगलसूत्र, इ० तें.

**सौभाग्यतंतु**, पु० मंगलसूत्रास म्ह०.

**सौभाग्यद्रव्य**, न० सुवासिनीनें धारण करायाचें जें हरिद्रा, कुंकुमादि पदार्थ तें प्र०.

**सौभाग्यवती**, स्त्री० सुवासिनी जी स्त्री ती.

**सौभाग्यवाण**, **सौभाग्यवायन**, न० सौभाग्यवृध्यर्थ स्त्रिया सौभाग्यद्रव्ययुक्त वायन देतात तें.

**सौभाग्यशुंठी**, स्त्री० सुंठप्रधान एक औषधोपयोगी पाक करितात असतात ती.

**सौभाग्यसुंठ**, स्त्री० सौभाग्यशुंठी.

**सौमनस्य**, न० वैमनस्याचा जो प्रतिपक्षी भाव तें.

**सौम्य**, ३ लिं० क्रूर, उग्र, यांचा प्रतिपक्षी; २, पु० साठ संवत्सरांतील त्रेचाळिसावा संवत्सर तो: ३. बुधम्हणून जो ग्रह तो.

**सौम्यग्रह**, पु० शुभ जो ग्रह तो.

**सौम्यवार**, **सौम्यवासर**, पु० बुधवार.

**सौम्या**, स्त्री० सं० उत्तरदिशा.

**सौर**, ३ लिं० सूर्यसंबंधी जें व्रत, मंत्र, पूजा, भक्ति, भक्त, उपासना, इ० तो; २, सूर्यानें एकराशीचा भोग केला म्हणजे एकमास झाला अशा संकेताचा जो दिवस, ऋतु, वर्ष, इ० कालमान तो.

**सौरभ्य**, सं० न० [illegible].

**सौरस्य**, न० एकमेकानें केलेलें एकमेकास विरुद्ध वाटूं नये, एकमेकाविषयीं एकमेकाचें मनांत कपट असूं नये, इ० रूपु जो परस्परांचा भाव असतो तें; २, सुरसपणा.

**सौरहस्य**, न० सौरस्याचा अपभ्रंश परंतु प्रथमार्थी.

**सौरी**, स्त्री० स्त्रीवेषधारी जो नपुंसक तो; २, आरोपानें निर्लज्ज जी स्त्री तीस म्ह०.

**सौलत**, स्त्री० हिं० सौरस्य प्रथमार्थी.

**सौलभ्य**, न० सुलभता.

**सौवर्ण**, ३ लिं० सुवर्णसंबंधीजो अलंकारादिक.

**सौशील्य**, न० सुशीलपणा.

**सौष्टव**, **सौष्ठव**, न० उत्तमपणा.

**सौहार्द**, न० सख्य.

**सौहृद**, न० सौहार्द.

**सौक्ष्म्य**, न० सूक्ष्मपणा.

**स्कंध**, पु० मनुष्यादिकांचा ग्रीवेपासून बाहुमूळापर्यंत जो विभाग तो; २, वेल, वृक्ष, इ० कांचे ग्रीवेचें मूळ चा जो प्रदेश तो; ३, वृक्षाचे मूळकास जे मोठे मोठे अवयव फुटले असतात ते प्र०.

**स्खलद्गी**, ३ लिं० तोतरा जो तो.

**स्खलन**, न० सं० चालणें, बोलणें, इ० व्यापारीं जो अडखळलेपणा होतो तें; २, आधारापासून रेत, जल, इ० कांचें बिंदुरूपें चळून आंपतन तें; रेतस्खलन, इ० म्ह०.

**स्खलित**, ३ लिं० स्खलनपावला जो तो; २, रेतस्खलन झालें ज्याचें तो.

**स्तन**, पु० ज्यामध्यें दूध उत्पन्न होत असतें असें जे मनुष्य, वानर, इ० कांचे स्त्रियांचे उरस्थलावर दोन दोन आणि गोमहिष्यादि पशुस्त्रियांचे पोटावर योनिभेदें करून दोन चार साहा आठ इ०

नियतसंख्याक अवयव असतात ते प्र०; आणि अश्वआमीयांचून ततज्ज्ञानीय जे पुरुष त्यासही त्यात्यास्थानी ततत्संख्याक जे अवयव असतात ते प्र०; स्तन संबंधी दुग्धाचें जें पान तें स्तनपान स्तनआशन, स्तनांदुद, इ० स०

**स्तन्य**, न० स्तनास मुखलावून आशयांचें जें दुग्ध तें.

**स्तबक**, पु० स० पुष्पादिकांचा जो गुच्छ तो.

**स्तब्ध**, ३लिं० धरलेला जो गतिभाषणादि व्यापार तो कुंठितकरून ग्वोळंबून राहिलाजो तो.

**स्तंभ**, पु० सं० खांब; २, कोणेक अर्थाची गति कुंठित झाल्यामुळें तेथचे तथेंच जी स्थिति ती; वीर्यस्तंभ, गतिस्तंभ, इ० स०.

**स्तंभन**, न० वीर्य, भाषण, इ० कांचा स्तंभ करण्याचा जो व्यापार तें; २, वीर्यादिकांचा स्तंभ जेणेंकरून होतो असें जें औषध, मंत्र, इ० तें.

**स्तंभित**, ३लिं० स्तंभन केलें आहे तो.

**स्तव**, पु० कोणाचीगुणवर्णन द्वारा जीप्रशंसा तो; २, अ० हेतुत्वाचें वाचक हे अव्यय हेतुभूत जो कोणेक अर्थ तद्वाचक शब्दापुढें याचा प्रयोग होतो; उ० या दोषास्तव मीतें सोडिलें.

**स्तवणें**, कोणाएकाचें स्तवविषयकरणें.

**स्तवन**, न० स्तवण्याचा जो व्यापार तें.

**स्तवनीय**, ३लिं० स्तुत्य.

**स्तावक**, ३लिं० स्तोता; २, विधिनिषेधकिं० वस्तुनिष्ठगुणाचें याथार्थ्य याकडे ज्याचा कटाक्ष नाही असें जें कर्मादिवस्तूचें प्रशंसार्थमात्र प्रवृत्त जें श्लोक, वाक्य, ग्रंथ, इ० तो; उ० सत्य बोलण्याएवढा दुसरा धर्म नाहीं हें स्तावक वाक्य आणि सत्य बोलावें हें विधिवाक्य; उ० हें औषध सेविलें असता लोखंडासारखें बळकट शरीर होईल या स्तावकवाक्यापासून हें औषध शरीर बळकट करण्याविषयीं फार चांगलें असा बोध होतो.

**स्तिमित**, ३लिं० कोणेक कार्य करण्याविषयीं मंद जो मनुष्यादि व त्याचा कारभार, इ० तो.

**स्तिमिताई**, स्त्री० स्तिमितपणा.

**स्तुत**, ३लिं० स्तविलाजो तो.

**स्तुति**, स्त्री० स्तव प्रथमार्थी.

**स्तुतिप्रिय**, ३लिं० आपली कोणी स्तुति केली असतां अतिशय फार आवडते अशा स्वभावाचा जो मनुष्य तो.

**स्तुतिवाद**, पु० स्तुतिपर जें भाषण तो.

**स्तुत्य**, ३लिं० ज्याचा स्तव करायास योग्य तो.

**स्तूत**, स्त्री० स्तुति शब्दाचा अपभ्रंश.

**स्तेन**, पु० स० तस्कर.

**स्तेय**, न० चौर्य.

**स्तेयी**, ३लिं० स्तेय केलें आहे जेणें तो; स्वर्णस्तेयी, द्रव्यस्तेयी, इ० स०.

**स्तोतव्य**, ३लिं० स्तुत्य.

**स्तोता**, ३लिं० स्तवनकर्ता.

**स्तोत्र**, न० स्तव; देवता, गुरु, इ० जे स्तुत्य त्यांचें स्तवानें घटित असा रचला असतो ग्रंथ तें.

**स्तोम**, पु० सं० कोणेक अर्थाचा जमलेला जो समुदाय तें; २, न० साधु, संत, गोसावी, राजा, विद्वान्, इ० अर्थी तद्रूप जे मनुष्य समुदायादि तद्विशिष्ट पृथक् पृथक् रूपें करून गणनीय जी प्रकरणें ती न०; ३, धाम.

**स्त्री**, स्त्री० पुरुषापासून बीजग्रहण करून सगर्भ व्हावें अशी संभावना जेथें आहे अशा जा मनुष्यादि व्यक्ति त्या प्र०; स्त्रीचरित्र, स्त्रीलंपट, स्त्रीजित, इ० स०; २, जा वृक्षलतादिकांनी मध्यें फळें येतात आणि फळें येत नाहींत अशा भेदें करून दोन प्रकार असतात त्यामध्यें जिला फळें येतात ती व्यक्ति; ३, ती जातीची बाईल तीस्याची; ४, स्त्रीलिंग नामानें वाच्य जो अर्थ तो; उ० लेखणी ही स्त्री आणि चाकू हा पुरुष.

**स्त्रीपुरुषें**, न० नवरा आणि त्याची बायको मिळून उभयतां ती.

**स्त्रीबुद्धि**, ३ लिं० बाइलबुध्या.

**स्त्रीलिंग**, न० नामाचीं तीन लिंगें आहेत त्यामध्यें जी, ती, ही, अशा सर्वनामरूपांनी जा नामार्थाचा परामर्ष होतो त्या नामाचें जें लिंग तें; २, ३ लिं० तद्विशिष्ट नाम किं० त्याचा अर्थ तो.

**स्त्रीसंग**, पु० स्त्रीशीं जो मैथुनार्थ संग तो

**स्त्रैण**, ३ लिं० स्त्रीचे ठायीं जो लंपट तो; २, स्त्रीसंबंधी जो व्यवहारादि तो.

**स्थ**, ३ लिं० जा अधिकरणीं जो राहिला आहे तो तत्स्थ; पात्रस्थ, गर्भस्थ, मार्गस्थ, जन्मस्थ, इ० स० प्र०.

**स्थंडिल**, न० हवनार्थ भूमीवर मृत्तिका घालून भूमीपेक्षां कांहीं उंच जो रचनाविशेष करिता तें.

**स्थल**, न० जागा, प्रथमार्थी वापून; २, समुद्रादिकांचे उदकानें अवरुद्ध झालेलें नव्हे असें जें भूतलतें.

**स्थलचर**, ३ लिं० भूतलरूप स्थलावर चालणें उत्पत्तिस्थित्यादि वर्तन असा जो मनुष्य पश्वादि जीव तो.

**स्थलदेवता**, स्त्री० विवक्षित भूतलरूप स्थलाची अभिमानिनी जी देवता ती.

**स्थलमार्ग**, पु० खुशकीचा जो मार्ग तो.

**स्थलशुद्धि**, स्त्री० जा स्थलावर पाक, गृह, यज्ञ, इ० कांहीं करायाचें असतें त्या स्थलाचा अमेध्य पदार्थ काढणें किं० सडा संमार्जन करणें इ० यथायोग्य व्यापारानें करितात जी शुद्धि ती; २, तक्ट शोधणी.

**स्थलांतर**, न० अन्य जें स्थल तें; स्थलांतर करणें, म्हणजे अधिष्ठित स्थलापासून कांहीं कारणास्तव अन्य स्थलीं गमन करणें.

**स्थळ**, न० स्थल.

**स्थळचर**, ३ लिं० स्थलचर.

**स्थळदेवता**, स्त्री० स्थलदेवता.

**स्थळमार्ग**, पु० स्थलमार्ग.

**स्थाणु**, पु० सं० वरजा ग्यादि विस्तार अगदा नाहीं असा केवळ काष्ठरूप जो वृक्ष तो.

**स्थातव्य**, न० कोणकाचा कोणएक स्थलीं कांहीं एक काल घडायाची ती स्थिति तीस म्ह०; उ० आतां एथें कांहीं काल आपलें स्थातव्य आहे किं० लवकर गंतव्य आहे.

**स्थाता**, ३ लिं० स्थितिविशिष्ट होणारा जो तो.

**स्थान**, न० सं० स्थल प्रथमार्थी; स्थानमाहात्म्य, स्थानभेद, इ० स०; २, प्रसंग प्रथमार्थी.

**स्थानच्युत**, **स्थानभ्रष्ट**, ३ लिं० पदच्युत.

स्थानिक, ३ लिं० जो आस्थानींचा किं० आचे स्थानींचा तो तत्स्थानिक; शिरस्थानिक, पितृस्थानिक, इ० स०.

स्थानापन्न, ३ लिं० कोणेकस्थानातें पावलाजो तो; २, यथाविधिलेंकरून जो मानिला तो तत्स्थानापन्न; गुरुस्थानापन्न, पुत्रस्थानापन्न, इ० स०.

स्थानीय, ३ लिं० स्थानिक.

स्थापक, कांहींएक अर्थातें स्थापणाराजो तो; धर्मस्थापक, मतस्थापक, इ० स०.

स्थापणें, कोणेकअर्थ कोणेकअधिकरणीं स्थित होईअसें करणें.

स्थापन, न० स्थापण्याचा जो व्यापार तें; घटस्थापन, दोषस्थापन, देवतास्थापन, इ० स०.

स्थापना, स्त्री० स्थापन.

स्थापनीय, ३ लिं० स्थाप्य.

स्थापित, ३ लिं० कोणेकानें स्थापिलाजो तो.

स्थायिक, पु० उपरीपणें राहणाराजो त्याचा प्रतिपक्षी.

स्थायी, पु० स्थायिक; २, ३ लिं० कोणेकस्थलीं कांहींकाल राहणाराजो तो.

स्थायीभाव, पु० शृंगारादिरसांचे तोतोरस समाप्त होई तोंपर्यंत राहणारे जे रति, उत्साह, इ० भाव ते त्यात्यारसाचे

स्थाली, स्त्री० सं० भात, वरण, इ० पदार्थ शिजवायाचें जें पात्र तें.

स्थालीपाक, पु० गृहस्थाश्रमी जो त्याचें एक कर्म आहे.

स्थावर, ३ लिं० ज्याचे अंगीं संचारशक्ति ईश्वरानें ठेविली नाहीं असे जे वृक्ष, पर्वत, काष्ठ, पाषाण, इ० पदार्थ ते प्र०; २, ज्याचाउपभोग आगचेआगीं करावा लागतो जो पाहिजे तिकडे नेतां येत नाहीं असाजो गृह, शेत, वतन, इ० तो.

स्थित, ३ लिं० स्थितिपावला तो.

स्थिति, स्त्री० द्रव्यक्रियादिरूप अधिकरणातें धरून जी अर्थाची विद्यमानता ती; जी प्रकारादिभेदकानीं भिन्नभिन्न होत्ये; कोणेकानें स्थितीवर येणें, असणें, इ० स्थळीं अशी अशाची तशी योग्यजी स्थिति ती असा अर्थ होतो; २, जगाचीउत्पत्ति झाल्यापासून विनाश होई तोंपर्यंत जी मधली अवस्था ती.

स्थिर, ३ लिं० जी एक धरलेली स्थिति तेथून इतस्ततः चलित न होतां त्याच स्थितीवर कांहींकाल विद्यमानजो तो; २, होणें, जाणें, करणें, इ० विषयीं प्रयोजक जो वेग तो ज्याचे अंगीं अल्प आहे असा जो तो; ३, स्थावर; ४, ज्याचाठायीं कार्य आरंभिलें असतां लवकर होत नाहीं व झालें असतां लवकर नाश पावत नाहीं अशीं जीं रोहिण्यादि नक्षत्रें, वृषभादिराशि, रविवार, यांस ज्योतिःशास्त्रांत हीसंज्ञा आहे.

स्थिरवेळ, स्थिरवेळा, स्त्री० ज्यावेळेवर आरंभिलेलें कार्य लांबणीस पडतें त्यावेळेस म्ह०.

स्थिरस्थावर, ३ लिं० राजक्रांति, क्रोध, संभ्रम, इ० कारणामुळें जी गडबड असते ती जाऊन एके स्थितीवर आलाजो राज्य, मनुष्य, अंतःकरण, इ० तो; २, न० तीगडबडजाऊन जी स्वस्थता तें.

**स्थिरावणें**, कोणकानें स्थिर करणें: उ॰ तो आयाला निघाला आहे त्यास दोन गोष्टी सांगून चार दिवस स्थिरावा; उ॰ अंमळ पाउस स्थिरावला ह्मणजे म ग जाउं.

**स्थीत**, स्त्री॰ स्थिति शब्दाचा अपभ्रंश.

**स्थूल**, ३ लिं॰ सूक्ष्माचा प्रतिपक्षी.

**स्थूलदेह**, पु॰ प्रतिजन्मास गर्भी निरनिराळा होतो जो हा दृश्य देह तो.

**स्थूलमान**, न॰ सूक्ष्म नव्हे असें जें मान तें.

**स्थूळ**, ३ लिं॰ स्थूल.

**स्थैर्य**, न॰ स्थिरपणा.

**स्थौल्य**, न॰ स्थूलपणा.

**स्नात**, ३ लिं॰ स्नान केलें जाणें तो; तीर्थस्नात, इ॰ स॰.

**स्नातक**, पु॰ ब्रह्मचर्य समाप्त करून विवाह करण्यास जो सिद्ध झाला तो.

**स्नाता**, ३ लिं॰ स्नान करणारा जो तो.

**स्नान**, न॰ देहशुध्यर्थ जलादिकें करून शरीर धुवावें किं॰ तदभावीं भस्म गोमयादि शुद्धिकारक पदार्थांनी लिप्त करावें, इ॰ रूप जो शरीरास संस्कार करितात तें; गंगास्नान, जलस्नान, भस्मस्नान, कंठस्नान, इ॰ स॰.

**स्नानसंध्या**, स्त्री॰ स्नान आणि संध्या एतत्पूर्वक जें देवपूजा, जप, जाप्य, इ॰ कर्म तें.

**स्नायी**, ३ लिं॰ जो जेणें करून स्नात तो तत्स्नायी; तिलस्नायी, तीर्थस्नायी, इ॰ स॰ प्र॰.

**स्नायु**, न॰ शरीरांतील एक धातु आहे.

**स्निग्ध**, ३ लिं॰ ज्याचे आंगीं स्नेह असा जो पदार्थ तो.



**स्नुषा**, स्त्री॰ सं॰ सून.

**स्नेह**, पु॰ चूर्णादि पदार्थांचा गोळा व्हायास कारणभूत जो तत्तत्पदार्थनिष्ठ गुणविशेष असतो तो; २, पार्थिव जें धान्य काष्ठादि पदार्थ त्यांचे आंगीं जो तैलांश असतो तो; ३, कोणएकाचा कोणएकाशीं मित्रभाव तो.

**स्नेहभाव**, पु॰ स्नेह नतीयार्थी.

**स्नेहाळू**, ३ लिं॰ मायाळू.

**स्नेही**, ३ लिं॰ ज्यांचा परस्पर स्नेहभाव आहे ते परस्पर.

**स्पर्धणें**, स्पर्धाविशिष्ट होणें.

**स्पर्धा**, स्त्री॰ आपल्या उत्कर्षानें याला अपकृष्ट करीन किं॰ याची बरोबरी करीन असा जो कोणकानें कोणकाशीं भाव धरिला असतो तो: उ॰ तुला रागयेतांच तुझीं तेजस्कोत्पाशीं स्पर्धा करु लागलीं.

**स्पर्धी**, ३ लिं॰ एकमेकाशीं स्पर्धा करणारे ते परस्पर.

**स्पर्श**, पु॰ कोणएक पदार्थ कोणएक पदार्थाशीं लागल्यानें जो त्याचा त्यास संबंध होतो त्याचें जें आरंभावस्थेतील रूप तो; स्पर्शवेध, स्पर्शकाल, मध्य, स्पर्श, अस्पृश्यस्पर्श, इ॰ स॰; २, त्वगिंद्रियानें ज्याचें प्रत्यक्ष होतें असा जो पदार्थनिष्ठ गुण तो; ३, लेशमात्र अर्थी प्र॰ करितात; उ॰ याचें हृदयांत दयेचा स्पर्श नाहीं; ४, ककारापासून मकारापर्यंत जे पंचवीस वर्ण ते प्र॰; ५, परीस ह्मणून जो पाषाण तो.

**स्पर्शणें**, कोणकानें स्पर्श प्रथमार्थानें युक्त करणें किं॰

कोणेक अर्थाचा जो स्पर्श तद्विशिष्ट आपण होणें; इ॰ मी यावर्षांत अद्याप स्पर्शला दरविला नाहीं; मी अस्पृश्य पदार्थास स्पर्श केला म्हणून स्नान करतो.

**स्पर्शन**, न॰ स्पर्शण्याचा जो व्यापार तें; २. सं॰ पु॰ वायु.

**स्पर्शनीय**, ३ लिं॰ ज्याचा स्पर्श करण्यास योग्य तो.

**स्पर्शमणि**, पु॰ परीस म्हणून जो मणि तो.

**स्पर्शस्थान**, न॰ ग्रहणाचें आरंभीं जें स्थान कल्पिलें जातें.

**स्पर्शास्पर्श**, पु॰ परस्पर स्पर्शाने हें जें कांहीं सोवळें, ओंवळें, इ॰ त्यांचा जो परस्पर संबंधानें संभवता विषय स्पर्श तो.

**स्पष्ट**, ३ लिं॰ आहे किं॰ नाहीं, असें कीं नसे, हा अमुक कीं अमुक, इ॰ रूप संदेह उठण्यास कारण भूत जें त्या त्या अर्थाची आवृतपणें स्थिति, थोरकपणा, अर्थांतरसादृश्य, गूढमुळीनपणा, इ॰ तें ज्यामध्यें नाहीं असा अभिव्यक्तरूपें करून स्थित जो कोणेक अर्थ तो; २. ज्यामध्यें यत्किंचितही अंतर नाहीं असा जो गणितागत ग्रह, अहर्गण, संक्रांति, इ॰ तो.

**स्पष्टप्रतिपत्ति**, स्त्री॰ कोणएक अर्थाचें स्पष्टरूप करून जें ज्ञान ती.

**स्पष्टवक्ता**, ३ लिं॰ भीड मुरवत न धरितां मनांत येईल तें स्पष्ट बोलण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**स्पष्टीकरण**, न॰ कोणेक अर्थ स्पष्ट करण्याचा जो व्यापार तें.

**स्पष्टीकृत**, ३ लिं॰ स्पष्टीकरण केलें ज्याचें तो.

**स्पार्शन**, न॰ त्वगिंद्रियानें अनुभूत होतें जें स्पर्श संबंधी ज्ञान, सुख, इ॰ तो.

**स्पृहणीय**, ३ लिं॰ ज्याचें दर्शनादि झालें असतां हा आपल्यास असावा अशी ज्याजवर इच्छा होती असा मनोरम जो कोणेक अर्थ तो.

**स्पृहा**, स्त्री॰ कोणएक अर्थाविषयीं जी इच्छा ती.

**स्फटिक**, पु॰ पांढरा एक पाषाण आहे.

**स्फाटिक**, ३ लिं॰ स्फटिक संबंधी जो पदार्थ तो.

**स्फीत**, स्त्री॰ स्फीति शब्दाचा अपभ्रंश.

**स्फीति**, स्त्री॰ प्रा॰ प्रशंसा या अर्थी.

**स्फुट**, ३ लिं॰ स्पष्ट; २. मोठ्या ग्रंथांत बांधला गेला नाहीं असा जो श्लोक, वाक्य, कथा, इ॰ तो.

**स्फुटित**, ३ लिं॰ फुटला जो पात्र फलादि पदार्थ तो.

**स्फुंदणें**, रडण्याचा वेग आवरून गेले असतां तो आवरेनासा होउन श्वासाची गति विलक्षण होत्ये असा जो कांहीं विकार होतो तद्विशिष्ट कोणेकानें होणें.

**स्फुरण**, न॰ विद्युल्लता, रत्न, अग्नि, इ॰ संबंधी जें तेज त्याचें किं॰ नेत्र, बाहु, इ॰ शरीरावयव संबंधी कातडीचें जें कंपन तें; २. युद्ध, वाद, दान, इ॰ कांविषयीं जो उत्साह, क्रोधावेश, यांचा हृदयांत आविर्भाव होउं लागला म्हणजे त्याबराबर कंपत्वरादि कारक जो विकार विशेष शरीरांत होतो तें; ३. बुद्धीच्या ठायीं संस्काररूपें करून स्थित जो विषय त्याचें तत्तत्समयीं जें आविर्भवन तें.

**स्फुरणें**, कोणेक अर्थाचें स्फुरण प्रथम तृतीयार्थानें विशिष्ट होणें.

**स्फुरद्रूप**, ३ लिं॰ वर्तमानकालीं स्फुरतो आहे असा

जो विद्युल्लतादि संबंधी तेज किं॰ तद्विशिष्ट विद्युल्लतादि किं॰ विद्याशास्त्रार्थादिरूप कोणेक विषय तो.

स्फुलिंग, पु॰ अग्नीची ठिणगी; २, आपल्याचा देवतांशं उपन्नावाजो अंशतो, गुणन भजनादिप्रसंगीं प्र॰.

स्फूर्त, ३ लिं॰ स्फूर्तिविशिष्ट झाला जो तो.

स्फूर्ति, स्त्री॰ स्फुरण प्रथम तृतीयार्थी.

स्फोट, पु॰ शरीरादिकांवर येतो जो फोड तो; २, फलपात्रादिकांचा जो स्फुटितपणा तो; घटस्फोट, ब्रह्मांडस्फोट, इ॰ स॰.

स्फोटन, न॰ फल, पात्र, शरीर, इ॰ फोडण्याचा जो व्यापार तें.

स्मर, पु॰ सं॰ मदन; २, कोणेक विषयाची जी स्मृति ती.

स्मरण, न॰ अनुभूत होउन संस्काररूपें करून अंतःकरणांत राहिलेला असतो जो कोणेक विषय त्याचें पुनः उद्बोधक कांहीं झाल्यामुळें होतें जें ज्ञान तें; २, अनुभूत जो अर्थ तो संस्काररूपें राखून ठेवण्याची जी अंतःकरणशक्ति तें; ३, अनुभूत अर्थ संस्काररूपें करून ज्याचा ठायीं राहतो असें जें अंतःकरणवृत्तिरूप अधिकरण तें; उ॰ तुह्मी बोलला तें माझे स्मरणांत राहिलें नाहीं; ४, ईश्वरादिकांचें जें नामसंकीर्तन त्यास ह्म॰; ५, असन्निहित राहणारा जो मित्रादिक त्यास आपलें स्मरण रहावें ह्मणून जें त्यास अलंकारादि वस्त देतात त्यास ह्म॰.

स्मरणी, स्त्री॰ नाममंत्रादि जपाची संख्या राखायासाठीं प्रा॰ तेरामण्याची जी माला हातांत कोणी नेहमी राखित असतात ती; कोणेक गोष्टीची स्मरणार्थ घेणें ह्म॰ ध्यास घेणें.

स्मरणीय, ३ लिं॰ ज्याचें स्मरण करायास योग्य असा जो ईश्वरादि तो.

स्मरणें, आठवणें.

स्मर्ता, ३ लिं॰ स्मरणारा.

स्मशान, न॰ श्मशानशब्दाचा अपभ्रंश.

स्मशानवैराग्य, न॰ श्मशानशब्दाचा अपभ्रंश.

स्मारक, ३ लिं॰ कोणेक विषयातें स्मरणविषय करून देणारा जो पुरुष, शब्द, लेख इ॰ तो.

स्मार्त, ३ लिं॰ स्मृतीनें विहित जें व्रतादि कर्म इ॰ तो; २, पु॰ स्मृत्युक्त मार्गानें वर्तणारा जो तो.

स्मित, न॰ सं॰ मुखाचा फार विकास न करितां मुख्यांतल्या मुखांत किंचित जें हास्य तें.

स्मृत, ३ लिं॰ स्मरणविषय केला जो अर्थ तो.

स्मृति, स्त्री॰ स्मरण; २, धर्मशास्त्र प्रतिपादक जे मन्वादि ऋषींचे ग्रंथ ते किं॰ तत्संबंधी वाक्य ती प्र॰; स्मृतिप्रणीत, स्मृत्युक्त, स्मृतिविहित इ॰ स॰.

स्मृत, स्त्री॰ स्मृतिशब्दाचा अपभ्रंश.

स्यंदन, पु॰ सं॰ रथ.

स्रक्, स्त्री॰ सं॰ पुष्पादिकांची जी माला ती.

स्रव, पु॰ सं॰ स्राव.

स्रवण, न॰ स्रवण्याचा जो व्यापार तें.

स्रवणें, जलानें भरलेली घागर, गुळाचा रवा, इ॰ निष्ठ जो द्रवांश त्याणें स्वाधारापासून वियुक्त होउन थोडथोडें गळणें; त्या घागर इ॰ आधारास कर्तृता मानून द्रवांशास कर्मता मानली असतां सकर्मक ही प्र॰ होतो.

**स्रस्त**, ३ लिं॰ जेथें संबद्ध होता तेथून सईल झाल्यामुळें खालीं किं॰ इकडे तिकडे सरला जो कोणेक अर्थ तो.

**स्राव**, पु॰ कांहीं एकापासून स्रवतो जो द्रवांश तो; २, पांचवा मास लागायाचे पूर्वी जो गर्भाचा होतो पात तो.

**स्रावी**, ३ लिं॰ जा द्रवांशातें जो स्रवतो तो तत्स्रावी; मदातें स्रवतो तो मदस्रावी गज, अमृतस्रावी चंद्र, जलस्रावी मेघ मकान.

**स्व**, न॰ मीपणतच्छद्वाच्य जो आपण तें; २, पैका किं॰ तद्रूप करून मानिलेलें जें अलंकार, वस्त्र, पात्र, गृह, वतन, इ॰ तें; ३, आपला जो पुत्र, मित्र, सेवक, गृह, धन, इ॰ तो.

**स्वक**, ३ लिं॰ स्वीय

**स्वकपोलकल्पित**, ३ लिं॰ मूलभूत प्रमाण नसतां केवल आपल्याच कल्पनेनें रचित जो ग्रंथादि तो.

**स्वकर्म**, न॰ जाजा प्राण्यास जें जें विहित कर्म हें तें तें त्याचें त्याचें; उ॰ क्षत्रियानीं युद्ध करावें हें त्याचें स्वकर्म; सर्पानें डसावें हें त्याचें स्वकर्म.

**स्वकष्टार्जित**, ३ लिं॰ स्वतः कष्ट करून संपादिलेला जो इत्यादि पदार्थ तो.

**स्वकीय**, ३ लिं॰ स्वीय; २, आपला आस जो कोणी तो.

**स्वकीया**, स्त्री॰ स्वीया.

**स्वच्छंद**, पु॰ प्रवृत्तिनिवृत्तिविषयीं प्रयोजक जो आपल्याचें अंतःकरण वृत्तींचा संकल्प तो; प्रथमांत प्रयोग प्रा॰ नाहीं; उ॰ त्याचे स्वच्छंदास आलें तर तो करील, दुसऱ्याचे सांगण्यानें करायाचा नाहीं; २, ३, स्वच्छंदी; ३, अ॰ स्वच्छंदानुरोधानें वागणें, वर्तणें, इ॰ कांचें वि॰.

**स्वच्छंदी**, ३ लिं॰ आपल्याच छंदानें वागण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**स्वजन**, पु॰ आत्मीय जो जन तो.

**स्वजात**, स्त्री॰ स्वजाति शब्दाचा अपभ्रंश.

**स्वजाति**, स्त्री॰ आपली जी जात ती.

**स्वजातीय**, ३ लिं॰ आपले जातीचा जो कोणी तो.

**स्वतः**, अ॰ भृत्यादिद्वारा नव्हे खुद्द आपण; उ॰ मुलाचे हातून होणार नाहीं स्वतः तुह्मालाच गेलें पाहिजे; २, दुसरा कोणी प्रवर्तक नसतां आपल्या आपण; उ॰ मला कोणी सांगीतलें नाहीं मीं स्वतः गेलों; ३, दुसरें कांहीं निमित्त नसतां स्वभावें करून; उ॰ आधीं दूध स्वतः गोड त्यांत साकर पडल्यावर मग काय विचार तो.

**स्वतंत्र**, ३ लिं॰ परतंत्र नव्हे आपल्याच आधीन जो तो.

**स्वतःप्रमाण**, ३ लिं॰ प्रामाण्यार्थ इतर प्रमाणाची जास अपेक्षा नाहीं असा जो वेदशास्त्रादि पदार्थ तो.

**स्वतःसिद्ध**, ३ लिं॰ मनुष्यादिकांचे कृतीनें झालेला नव्हे असा आपल्या आपणच सिद्ध झालेला जो कोणेक अर्थ तो.

**स्वतां**, अ॰ स्वतः याचा अपभ्रंश.

**स्वत्व**, न॰ घर, दार, वतन, द्रव्य, इ॰ जो आपला ह्मणून कोणेक अर्थ त्याजवर असतो जो आपलेपणा ह्मणून धर्म तें.

**स्वत्वनिवृत्ति**, स्त्री॰ दान, क्रय, उत्सर्ग, इ॰ क्रियानी

नीं आपल्यापदार्थावर जें आपलें स्वत्व असतें त्याची होत्येंजी निवृत्ति ती.

**स्वदस्तूर**, न॰ कोणेकखत, पत्र, इ॰ कांवर असती जी आपल्या हातानें लिहिलेली लेखतें; २, ३ लिं॰ आपल्या हातानें लिहिलेलें जें खत, पत्र, इ॰ तें.

**स्वधर्म**, पु॰ ब्राह्मणादि जातीचेठायीं वर्णाश्रमाद्यनुरोधानें शास्त्रानें जोज्यास विहित धर्म असतो तो त्याचा किं॰ अर्थमात्राच्येठायीं जें अव्यभिचारि गुणादिक असतें तें.

**स्वन**, पु॰ सं॰ ध्वन्यात्मक जो शब्द तो.

**स्वनित**, ३ लिं॰ स्वनविशिष्ट केला जो भाषादि तो; २, न॰ वस्त्र, पर्णादिक, वारा, इ॰ कानें हालतें असतां होतो जो शब्द तें.

**स्वपरभाव**, पु॰ आपपरभाव.

**स्वप्न**, पु॰ न॰ जागृतींतील इंद्रियांचा लय झाला असतां एकलें अंतःकरणच इंद्रियादि सर्वप्रपंचरूपी होऊन प्रपंचाचा अनुभव घेत असतें अशी जी मनुष्यादि जीवास अवस्था प्राप्त होते ती तें किं॰ त्या अवस्थेंत तो भासतो जो प्रपंच तो तें, स्वप्नप्रपंच, स्वप्नप्रकरण, स्वप्नसृष्टि, स्वप्नवत्, इ॰ स॰.

**स्वप्नावस्था**, स्त्री॰ स्वप्नरूपजी अवस्था; २, स्वप्नामध्यें जो वीर्यपात होतो तो.

**स्वप्रकाश**, ३ लिं॰ स्वयंप्रकाश.

**स्वप्रख्य**, ३ लिं॰ हा अमक्याचा पुत्र किं॰ अमक्याचा जांवई इ॰ रूपेंकरून प्रसिद्ध असा नव्हे केवळ आपल्याच विद्यादिगुणेंकरून सर्वत्र प्रसिद्ध जो तो.

**स्वभाव**, पु॰ अर्थमात्राच्या ठायीं अर्थनिष्ठवृत्तीचा नियामक जो त्या त्या अर्थाचे बरोबर धर्मविशेष उत्पन्न झालेला असतो तो; स्त्रीस्वभाव, देहस्वभाव, वस्तुस्वभाव, इ॰ स॰.

**स्वभावतः**, अ॰ स्वभावरूप जें निमित्त तेणेंकरून, उ॰ उदक हें स्वभावतः मधुर मग उपाधिकरून रसभिन्न होतें.

**स्वभावसिद्ध**, ३ लिं॰ त्या त्या अर्थाचा जो स्वभाव त्याच कारणानें त्या अर्थावर सिद्ध झाला असतो जो गुणादिक तो.

**स्वभाववादी**, पु॰ या प्रपंचाचें वस्तुमात्राच्या स्वभावेंकरूनच उत्पत्तिस्थित्यादि सर्व होतें ईश्वराचे सत्तेनें होतें असें नाहीं असें एक मत आहे तदनुयायी जे ते.

**स्वभाविक**, ३ लिं॰ स्वाभाविकाचा अपभ्रंश.

**स्वयं**, अ॰ सं॰ स्वयें; उ॰ स्वयंकृत, स्वयंपाक, इ॰ समासीं प्र॰.

**स्वयंज्योति**, ३ लिं॰ स्वयंप्रकाश.

**स्वयंदास**, ३ लिं॰ आपाशीं दुसरा दास कोणी नाहीं आपला आपणच दास असें मानून सर्वसेवाकर्म आपलें आपणच करून घ्यावें असा जो कोणी तो.

**स्वयंपाक**, पु॰ भोजनार्थ आपल्या हातानें करितात जो भात, भाजी, भाकर, इ॰ अन्नाचा पाक तो; २, सैंपाक.

**स्वयँपाक**, पु॰ स्वयंपाकशब्दाचा अपभ्रंश.

**स्वयँपाकघर**, न॰ सैंपाकघर.

**स्वयँपाकी**, पु॰ सैंपाकी.

उरणें, इ० स्वर्ली संपत्यादिकामुळें गर्वित होणें. स्वर्गसहातपोंचणें ह्मणजे कांहीं मोठा लाभ झा ल्यामुळें किं० आपलेहातून कांहीं मोठी गोष्ट घड ल्यामुळें आपल्यास कृतकृत्य मानणें.

**स्वर्गीय**, ३लिं० स्वर्गसंबंधीजसेंसुखपदार्थ,इ० तो.

**स्वर्ण**, न० सं० सुवर्ण.

**स्वर्णपुष्प**, स्त्री० सोनटकाह्मणून जें फूल झाड ती; २, न० त्याचें फूल.

**स्वल्प**, ३लिं० अल्प.

**स्ववश**, ३लिं० परवशनव्हे तो.

**स्वसंतोषें**, अ० कोणी बलात्कार,आग्रह, इ० नक रितां केवल आपल्याच संतोषानें कांहींएकक रणें, आणें, लिहूनदेणें, इ० कांचें वि०.

**स्वसत्ताक**, ३लिं० आपलास्वामित्व संबंध आज वर आहे असाजो कोणेक अर्थ तो.

**स्वसत्तात्मक**, ३लिं० स्वसत्ताक.

**स्वसंवेद्य**, ३लिं० जो दुसऱ्यास सांगतां येत नाहीं केव लमनानेंच जाणावाचा असाजो आत्मानुभव, शरी रांतउठलेलाशूळ, कांहींएकपदार्थाची गोडी, इ० तो.

**स्वसा**, स्त्री० सं० भगिनी.

**स्वसाक्ष**, अ० कोणेकाचे साक्षीनें; कांहींएक कर्म करणें, बोलणें, इ० कांचें वि०.

**स्वस्त**, ३लिं० सवंग; २,स्वस्थ शब्दाचा अपभ्रंश.

**स्वस्ता**, ३लिं० सवंग.

**स्वस्ताई**, स्त्री० सवंगाई.

**स्वस्तावणें**, धान्यादिस्वस्तें करणें.

**स्वस्ति**, अ० सं० कल्याणार्थक हें अव्यय आहे; आ शीर्वाद देणें, इ० प्रसंगीं याचा प्र० होतो; उ० राजा तुला स्वस्ति असो; या० रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति.

**स्वस्तिक**, न० भूम्यादिकांवर रेखावी एकआकार विशेषाचें मंडल कादिलें असतात तें.

**स्वस्तिक्षेम**, नाश, उपद्रव, इ० न होतां यथास्थि तपणें असणें, पोहोंचणें, इ० कांचें वि०.

**स्वस्थ**, ३लिं० क्षोभ,विकार, घाई, गडबड, इ० राह त होत्साता समाधानवृत्तीनें किं० प्रकृतिरूपवृत्ती नें स्थित तो; २, सवंग.

**स्वस्था**, ३लिं० सवंग.

**स्वस्थाई**, स्त्री० सवंगाई.

**स्वस्थावणें**, गडबड, शोक, इ० कानें क्षुब्ध झाला जो त्यास स्वस्थ करणें; २, स्वस्तावणें.

**स्वहित**, न० आपलें जें हित तें.

**स्वागत**, न० आपले घरीं जो कोणी आला त्याचा नु स्तीं आलांहें बरें झालें, यावें, बसावें, इ० रूप स त्कार करितात तें.

**स्वागी**, स्त्री० पु० सवागी.

**स्वाच्छंद्य**, न० स्वच्छंदपणा.

**स्वातंत्र्य**, न० स्वतंत्रपणा.

**स्वाती**, स्त्री० सत्तावीस नक्षत्रांतील जें पंधरावें नक्ष त्र त्या.

**स्वाद**, पु० त्यात्यापदार्थाचे आंगीं जीरुचि असती तो; २, पदार्थाचे आंगीं जो वास असतो त्याविष यींही प्रयोग करितात; उ० गुलाबाचे फुलाचा स्वाद दुसऱ्या फुलास नाहीं.

**स्वादिष्ट**, ३लिं० स्वादिष्टाचा अपभ्रंश.

**स्वादिष्ट**, ३लिं० स्वादविशिष्ट जो पदार्थ तो.

**स्वादु**, ३ लिं० सं० मधुर जो पदार्थ तो.

**स्वाधीन**, ३ लिं० आपल्या अधीन जो तो; मी धन्या चे स्वाधीन आहें, इ० म्हणजे धन्या चे अधीन आहें असा अर्थ होतो.

**स्वाधीनपतिका**, स्त्री० पति जिचा अधीन आहे अशी जी प्रौढ स्त्री ती.

**स्वाध्याय**, पु० प्रतिपदादि अनध्याय सोडून आदि करून अध्ययन करण्याची योग्यता आहे तो दिवस.

**स्वाध्यायी**, पु० सहाध्यायी शब्दाचा अपभ्रंश.

**स्वाभाविक**, ३ लिं० स्वभावसिद्ध; २, अ० विशेष रूपें करून कोणेक उद्देश न धरितां एरवीं कांहीं एक बोलणें, करणें, इ० कामीं वि०; उ० मीं तुला ला स्वाभाविक बोललों राग याचा म्हणून बोललों नाहीं.

**स्वाम**, पु० आपला जो स्वामी त्याशीच कांहीं भाषण करण्याचे प्रसंगीं गौरवानें स्वामी म्हणून; उ० स्वाम आज्ञा करतील त्याप्रमाणें मी चालेन.

**स्वामित्व**, न० धनीपणा; शेत, वाडी, ग्राम, देश, इ० संबंधी जो मामलत, अकार, इ० कोणेक व्यवहार सर्कारांतून जाणें मनुष्यानें आपणाकडे करून घेतला असतो त्यामालकापासून तो व्यवहार कोणेक निम्हाइतानें आपणाकडे पतकरून घेतला असतां सर्कारचे देणें बांधून निराळें जें त्यामालकास कांहीं द्रव्य द्यावें लागतें तें.

**स्वामी**, पु० ज्याचा जो धनी तो त्याचा; २, देव, गुरु, राजा, सन्यासी, तपस्वी, इ० मोठे त्यांस गौरवानें म्ह०.

**स्वाम्य**, न० सं० कोणएक पदार्थ याचा यीं कोणएकाचा जो धनीपणा तें.

**स्वायत्त**, ३ लिं० सं० स्वाधीन.

**स्वार, स्वार**, पु० घोडा इ० अश्वादिकांवर स्वार होणें म्हणजे आरूढ होणें.

**स्वारबी**, ३ लिं० को० बकरी, गुरें, घोडे इ० पशु भाषा संबंधाचा जो शब्द, आवाज, त्याचे वि०.

**स्वारसिक**, ३ लिं० स्वरस प्रथमार्थानें सिद्ध जो ग्रंथादिकांतील अर्थादि तो.

**स्वारस्य**, न० भाषणादिकाचे अंगीं असतें जें स्वरस वेशिष्ट्यतें; २, कोणेक व्यवहारांत असावी जी गोडी जिचा योगानें कर्त्यानें आस्थापूर्वक मन घालावें तो; उ० आतां सावकारीचा व्यापारांत स्वारस्य राहिलें नाहीं.

**स्वॉरी, स्वारी**, स्त्री० क्वचित् म्हणतात गमनार्थ अश्वादिकांवर जी आरूढता ती; २, अश्वादिकांवर बसून जाणारी जी मनुष्यव्यक्ति ती; उ० हातात रूमाल घेऊन कंठाळ आणि एक स्वारी घेऊन चालतो; ३. राजा, इ० कोणी श्रीमंत लोक बाहेर जात असतां त्यांचे बरोबर चालणारे जें घोडीं, पालख्या, इ० वाहनें, वाद्यें, स्वार, पायदळ, मनुष्यें, इ० खटलें तें; उ० राजा शिकारीस जाणार आहे म्हणून अवघी स्वारी तयार झाली; तादृश खटल्यानिशीं गमनागमनें करायाचे योग्यतेचा जो राजा कि० सरदार इ० थोर लोक त्या एकाव्यक्तीस ही म्ह०; उ० मी वाड्यांत गेलों तों स्वारी निजली होती; ४, अपराधी लोकांस धरून आणावें किं० दरवडा इ० कांचा बंदोबस्त राखावा इत्याद्यर्थ सर्कारांतून

पाठविलेले जे शिपाई लोकांचा समुदाय तो; ५, असें निंदेनें बोलायाचें असतां मनुष्यादिकांच्या रथिंड याशब्दाचा प्रयोग करितात नसें प्रशंसेने बोलायाचें असतां या शब्दाचा प्रयोग करितात; उ० आपली स्वारी जर पुण्यास आली तर आमचे घरी पायधूळ झाडावी.

**स्वारीशिकारी**, स्त्री० स्वारी करणें, शिकारीस जाणें, इ० रूप जो राजादिकांचा गमनव्यापार तो.

**स्वार्थ**, पु० कोणेक व्यापारीं आपलें जें हित तो; स्वार्थपर, स्वार्थबुद्धि, इ० समास आणावे; कोणेकास स्वार्थ करणें म्हणजे द्रव्यादिविषयक लोभ उत्पन्न होणें; २, ग्रंथ, भाषण, इ० कांतील आपद वाक्य, इ० कांचा जो वाच्यार्थ तो त्याचा.

**स्वार्थी**, ३ लिं० दुसऱ्याचें अहित झालें तरी होओ परंतु धनादिकेंकरून आपला स्वार्थ होईल तें करीत असावें असा स्वभाव ज्याचा तो.

**स्वास्थ्य**, न० स्वस्थपणा; २, प्रपंच निर्वाहोपयोगी राजादिकांपासून संपादिलें असतें जें ग्राम, भूमि, वर्षाशन, इ० कोहीं उपजीविकासाधन त्यास म्ह०.

**स्वीकरण**, न० अंगीकार.

**स्वीकार**, पु० अंगीकार.

**स्वीकारणें**, अंगीकारणें.

**स्वीकृत**, ३ लिं० अंगीकृत.

**स्वीय**, ३ आत्मीय.

**स्वीया**, स्त्री० विवाहादिकेंकरून आपली बायको झाली अशी जी नायिका ती.

**स्वेच्छ**, ३ लिं० आपल्याच इच्छेनें वर्तणारा जो तो; २, त्याचें जें वर्तनादि तो.

**स्वेच्छाचारी, स्वेच्छाविहारी**, ३ लिं० स्वेच्छ.

**स्वेद**, पु० घर्म.

**स्वेदज**, ३ लिं० स्वेदापासून उत्पन्न होणारी जी ढेकूण, ऊवा, इ० रूप जीवजाति तो.

**स्वेदित**, ३ लिं० स्वेदानें युक्त जो तो; २, आंत पाणी न घालितां अग्नीचे योगानें घर्म उत्पन्न होतो त्याचे योगानेंच शिजविला जो शाक, इ० पदार्थ तो.

**स्वेंपाक**, पु० स्वयंपाक.

**स्वेंपाकघर**, न० स्वयंपाकघर.

**स्वेंपाकी**, पु० स्वयंपाकी.

**स्वेंपाकीण**, स्त्री० स्वयंपाकीण.

**स्वैरगति**, स्त्री० आपल्या इच्छेस येईल तसें चालावें अशी जी गति तो; २, ३ लिं० स्वैरगामी.

**स्वैरगामी**, ३ लिं० आपल्या इच्छेस येईल तसें गमन करणारा जो मनुष्यादि तो.

**स्वैरिणी**, स्त्री० व्यभिचारिणी.

## ह

**हं**, अ० हां.

**हईक**, अ० हेक.

**हउद**, पु० हौद.

**हउस**, स्त्री० हौस.

**हउसदार**, ३ लिं० हौसदार.

**हक**, पु० न० ग० हक्क.

**हकदक**, पु० देशगत्य, इ० कांस हक्कसंबंधी द्यावें लागतें जें द्रव्य तो; उ० हें इनाम शेत आहे यास हकदक पडत नाहीं; कोणेकगांव कोणेकाचे

हकारकांत येणें ह्म० आटोक्यांत येणें.

**हकणें**, हाकणें.

**हकदार**, पु० हक्कदार.

**हकदारी**, स्त्री० हक्कदारी.

**हकनहक, हकनहाक**, अ० नाहक.

**हकनाक**, अ० हकनाहक.

**हकनाहक**, अ० नाहक.

**हकम**, पु० हाकीम.

**हकमाई**, स्त्री० हकिमी.

**हकमाल**, पु० हक्कमाल.

**हकमी**, स्त्री० हकिमी.

**हकलणें**, दे० हाकलणें.

**हकहलाल**, ३लिं० हक्कमाल जो पदार्थ तो.

**हकाचा**, ३लिं० हक्काचा.

**हकाटा**, पु० दे० हाकाटा.

**हकाटी**, स्त्री० दे० हाकाटी.

**हकारणी**, दे० स्त्री० गलबत हाकारण्याचा जो व्यापार तो.

**हकारणें**, दे० हाकारणें; २, नावपाण्यांत वल्हें, इ० कांचे योगानें चालू करणें; ३, अतित्वरेनें पोंचावें ह्मणून आरूढ, घोडें, इ० कांतें पिटणें.

**हकालणें**, दे० हाकलणें.

**हकाहाक**, स्त्री० हाकाहाक.

**हकिमाई**, स्त्री० हकीमपणा.

**हकिमी**, स्त्री० हकिमाई.

**हकीकत**, स्त्री० कांहीं एक प्रकरणाची जो वाकाती.

**हकीकतनामा**, पु० कोणेकाची हकीकत ज्यांत लिहिली असते असा जो कागद तो.

**हकीगत**, स्त्री० हकीकत.

**हकीम**, पु० हिं० वैद्य, परंतु हा शब्द यवनी ह्मणून यवनजातीय वैद्यांविषयींच रूढ; २, हाकीम.

**हक्क**, पु० न० हिं० देश, ग्राम, गृह, इ० कोणेक अर्थाचा जो स्वामी त्याचें त्या देशादिकांवर असतें जें स्वत्व तो तें; २, देशादिकांचे जे देशमूख, देशपांड्ये, शेट्ये, महाजन, इ० स्वामी त्यांस प्रतिवर्षी कि० त्या त्या व्यवहाराचे निमित्तानें जें नियमित द्रव्यादि द्यावें लागतें तो तें; ३, अभ्यासादि योगानें ह्मणेन तसें करीन अशी कोणेकाची सत्ता च्या लायाजोगें झालें असतें जें विद्याकलादि तो त्याचा असें ह्म०; उ० झाडावर चढणें हा वानरांचा हक्क आहे.

**हक्कदार**, पु० हिं० देशादि संबंधी हक्क घेणारे जे देशमूख, देशपांड्ये, इ० ते प्र०.

**हक्कदारी**, स्त्री० हक्कदारपणा.

**हक्कमाल**, पु० हिं० जा अर्थावर ईश्वर इछेनें जाचे स्वत्वाचा नियम झाला असतो तो अर्थ त्याचा; उ० पदार्थ रस्त्यांत पडला ह्मणून चिंता काय आपला हक्कमाल असला तर त्यास कोणी नेणार नाहीं; २, जा अर्थावर ज्याचें न्यायतः स्वत्व आहे असा जो द्रव्यादि अर्थ तो त्याचा; उ० नक्षीस कांहीं देणार होतां तें न द्याल तर न द्या पण चाकरीचा पैसा तो तर माझा हक्कमाल आहे तो मी नाहीं सोडणार.

**हक्काचा**, ३लिं० हक्कमाल रूप जो अर्थ तो; २, जें विद्याकलादि ज्याचा हक्क तो त्याचा.

**हग**, पु० मनुष्य, मार्जार, डुकर, इ० कितीएकांची

जी विष्ठा तो.

**हगओक**, स्त्री॰ मोडशी, इ॰ झाल्यामुळें वारंवार हगावें ओकावें अशी जी विकृति होत्ये ती.

**हगणें**, भक्षिल्या अन्नादि पदार्थांचा पोटांत जमतो जो मल तो; गुदद्वारानें बाहेर टाकणें किं॰ गुदद्वारानें जो मलविसर्ग तद्विशिष्ट कोणेकानें होणें; डोळा हगणें ह्मणजे पुवासारखा जो मल डोळ्यांतून बाहेर येत असतो तद्विशिष्ट त्याणें होणें; समुद्रानें हगणें ह्मणजे पाणी गढूळ व्हावें, घाण सुटावी, अशा अवस्थेतें पावणें; जोतें, इ॰ कानें हगणें ह्मणजे मधल्या खुंटा कांहींसा ढिल झाल्यामुळें दळतांना त्या छिद्रानें आंतील पिष्ट खालीं गाळणें.

**हगंदरी**, **हगंदारी**, स्त्री॰ गुरखाडी.

**हगरड**, स्त्री॰ १॰ हगवण; २, हगंदरी, इ॰ स्थलीं जी विष्ठा, इ॰ रूप घाण पडली असत्ये ती.

**हगरा**, ३ लिं॰ वारंवार हगत असावें अशा स्वभावाचा जो तो; कांहीं एक कार्य करण्याविषयीं जाला धैर्य नसतें यत्किंचित् भय संभावना असतां जाचें अवसान सुटतें आशा स्वभावाचा जो त्यास निंदेनें ह्म॰.

**हगरी**, स्त्री॰ शेतखान्यांत वर बसून हगायाचे सोईची सच्छिद्र पाषाणादिकांची जी रचना केली असत्ये ती; २, गलबतांत हगायास बसायाचे सोईचें जें चवकट, इ॰ साधन केलें असतें ती.

**हगवण**, स्त्री॰ वारंवार हगत असावें अशी जी कोणएकास विकृति प्राप्त होती ती; २, ला॰ कांहीं एक पदार्थ कोणएकापासून पुनःपुनः तोच तोच उत्पन्न होऊं लागला असतां त्याचे उत्पत्तीस निंदेनें ह्म॰; उ॰ हिला एक जात पोरींची हगवण लागली आहे.

**हगवणकर**, **हगवणकरी**, ३ लिं॰ हगवण ज्यास लागली आहे तो.

**हगवणें**, प्रा॰ कोणेकाचे मनांत द्रव्यादि द्यावयाचें नसतां बलात्कारादिकानें तें त्यापासून काढणें.

**हगाड**, स्त्री॰ कों॰ गुरखाड.

**हंगाम**, पु॰ धान्यादि पदार्थ किं॰ कोणेक व्यवहार, इ॰ त्यांणीं प्रचुरपणीं उत्पन्न होत असावें, विकावें, चहूंकडून येत असावें, सर्वत्र होत असावें, इ॰ विषयीं त्यांचा त्यांचा मुख्य जो समय तो.

**हंगामशीर**, अ॰ कों॰ हंगाम न जाऊं देतां त्यांतच जिन्नस घेणें, इ॰ कांचें वि॰.

**हंगामा**, पु॰ कोणेकानें घाबरून पराजित व्हावें ह्मणून प्रा॰ अनेकांनीं मिळून एकदा आवेशानें शिव्या द्याव्या, नाना प्रकारें अधिक उणें बोलावें, शस्त्रें उगारावीं, अशा प्रकारें तुटून पडण्याचा जो व्यापार तो.

**हगिरडा**, ३ लिं॰ हगल्यावर जें गुदप्रक्षालनादि करायाचें शौच तें होईपर्यंत असती जी अशुचिता ती ज्याचे ठायीं विद्यमान जो तो; २, ला॰ पुरतेपणीं शेवटास न जातां अधुरें राहिलें किं॰ ज्यामध्यें उसानीट नेटकेपणा, घटमूटपणा, इ॰ असायाचा नाहीं असें जें कोणक काम तो.

**हगीरमुतीर**, ३ लिं॰ ला॰ अकस्मात् कांहीं भय वाटल्यामुळें किं॰ दुःसह कांहीं शरीरास पीडा

झाल्यामुळें हगमूतमुदे अशा अवस्थेतें पावला जो तो.

**हगुटणें**, कोहींकठिन भयंकर दृष्टीस पडल्यामुळें धरलेला उत्साह, धैर्य, सोडून केवळ भयविव्हळ होणें.

**हगुरडा**, ३लिं० दे० हगिरडा.

**हगूट**, पु० आधारबंधापासून सुटून पतनोन्मुख झालेली जी विष्ठा तो आणि त्यासमयीं हगावें असें वाटायाजोगा होतो जो कलनाविशेष तो.

**हंगें**, हंगे, अ० अत्तां; २; इकडे; हा शब्द शूद्रभाषावृत्ति.

**हंगेतंगें**, अ० (लावणें करणें) कोणेककर्तव्य गोष्टीविषयीं इदरतिदर करणें.

**हगेरा**, ३लिं० हगोला.

**हगेरें**, न० हगोलें.

**हगोला**, ३लिं० हगानें लिसजें वस्त्र तो.

**हगोलें**, न० हगोलें जें वस्त्र तें.

**हग्या**, ३लिं० हंगायास गेलेला जो मनुष्य त्यास म्ह०; हगायास जातेसमयीं बरोबर न्यावयाकरितां नियमित करून ठेविला असतो जो जोडा, तांब्या, इ० त्यांचें वि०.

**हंचलंच**, न० अहंचलंच याचा अपभ्रंश.

**हजरती**, स्त्री० हसवी.

**हजर**, ३लिं० वि० हजीर.

**हजरमजालस**, ३लिं० अ० हजीरमजालस.

**हजरी**, स्त्री० हजीरी.

**हजाम**, पु० हि० नापित.

**हजामत**, स्त्री० वस्त्रा, कात्री, एणेंकरून डोकीदाढी, मिशी, एतत्संबंधी केश काढण्याचा जो व्यापार ती; २, तें काढायाचे जे केश त्यांस म्ह०; ३, ला० गालिप्रदानादिद्वारा जी कोणेकाची घेडती ती; कोणेकाची हजामत करणें म्हणजे त्याचें सर्वस्व हरण करून उघडा बोडका करणें.

**हजार**, पु० सहस्र.

**हजारा**, पु० तिफांशीं सोंग त्यांचे जे कांत त्यांचा किं० भातांचा जोडाव पडतो त्यास म्ह० सोंगट्या उठायाचे प्रसंगीं म्ह०.

**हजारीकारंजें**, न० जापासून हजारों धारा एक समयावच्छेदें करून निघाव्या असें जें कारंजें केलें असतें तें.

**हजारीघर**, न० रा० घराचे आकाराचा एक प्रकार आहे त्याप्रकारचें जें घर तें.

**हजारीपान**, न० जाचे दोहों बाजूंचे कडांसमध्यें एकएक लवण आलें असतें असें पान तें; म्ह० नागवेलीचे पानाविषयीं विशेष प्र०.

**हजारीमाड**, पु० रा० वर्षांत जा माडावर म्ह० हजार नारळ येतात असा जो माड तो.

**हजारों**, ३लिं० एकहजार दोनहजार अशाप्रकारें हजार या संख्येनें मेजायाजोगा जो कोणेक अर्थ तो.

**हजारोंहजार**, ३लिं० हजारों.

**हजीर**, ३लिं० कोणेककार्याचाठायीं विनियोग करण्याचा जेव्हां प्रसंग पडेल तेव्हां विनियुक्त होण्याविषयीं सिद्ध अशारूपानें सन्निहित विद्यमान जो तो; कोणेकास कोणेक अर्थ हजीर करणें म्हणजे हा त्यालागून जवळ आणून देणें

**हजीरजबाब**, पु॰ हिं॰ प्रसंगीं समयोचित जें उत्तर तो.

**हजीरजबाबी**, ३ लिं॰ हिं॰ हजीरजबाब करण्याविषयीं कुशल जो तो.

**हजीरआमीन**, पु॰ हिं॰ चोर, इ॰ अपराधी किं॰ अधमर्ण यास मोकळें सोडायाचें असतां तो आपणास सुख भेटव्यावर नाहीं ह्मणून करारा प्रमाणें हजीर करून देणार असा घेतात जो आमीन तो.

**हजीरनीस**, पु॰ फौज इ॰ दिकांची हजीरी घेण्याविषयीं नियुक्त केला असतो जो कारकून तो.

**हजीरबिगार**, स्त्री॰ हिं॰ यागांवचे मनुष्यानें त्यागावांस ओझें, इ॰ पोंचवावें त्यागांवचे मनुष्यानें पुढल्या गावांस पोंचवावें अशा प्रकारची जी बिगारती.

**हजीरबिगारी**, पु॰ हजीरबिगार वाहणारा जो बिगारी तो.

**हजीरमजालस**, ३ लिं॰ जाकचेरीस पंचाईत, इ॰ कोणीक व्यवहार होत असतो त्याकचेरीस त्यासमयीं विद्यमान जो मनुष्य तो; २, अ॰ चौघांसमक्ष, कांहींएक करणें, इ॰ क्रियांचें वि॰; उ॰ याचें उत्तर तुला मी घरांत सांगणार नाहीं हजीरमजालस कायतें सांगेन.

**हजीरी**, स्त्री॰ जाकर्मादिकाच्याठायीं असायाचे जे मनुष्य, पशु, शस्त्र, भांडें, इ॰ पदार्थ त्यांची हे हजीर आहेत अशा रूपेंकरून जी तेथें तेथें गणती ती; कोणेकाची कोणेकापाशीं हजीरी लावणें स॰ विवक्षित रूपेंकरून त्यास त्यापाशीं विदित करणें.

**हज्जार**, पु॰ हजार.



**हट**, पु॰ हठशब्दाचा अपभ्रंश; २, कों॰ कोणेकाचा कोणेकाशीं असतो जो द्वेष तो.

**हटकणें**, कोणेकास हाकेनें अभिसंबद्ध करणें; २, तुह्मी कोण कोठील कोठे जातां काय करतां किं॰ हें मी करूं, मी हें करतों, तुह्मी अमुक कराल काय, इ॰ रूप भाषणानें कोणेकास अभिसंबद्ध करणें.

**हटकून**, अ॰ प्रतिज्ञापूर्वक; २, हींएक करणें, बोलणें, सांगणें, इ॰ कांचें वि॰; उ॰ त्याणें हटकून निशाण मारलें; ३, आवर्जून; उ॰ आह्मी गावांस आवयास निघालों ह्मणजे हटकून पाउस येतो.

**हटखोर**, ३ लिं॰ हटकरण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**हटणें**, कोणेकानें मागें सरणें; मागें हटणें यास्थळीं मागें याशब्दाचा अर्थ निराळा होत नाहीं; २, दे॰ वरण, पुरण, इ॰ अहाटणें.

**हटयोग**, पु॰ हठयोगाचा अपभ्रंश.

**हटवाद**, पु॰ अतिशयित जो हट तो.

**हटवादी**, ३ लिं॰ हटखोर.

**हटहटणें**, कों॰ हडहडणें.

**हट्ट**, पु॰ कोणेकगोष्टी विषयीं हें करावें किं॰ हें न येकरूं असें जें एकवार मनांत आलें असतें तद्विषयीं अर्थनाशादि काय होईल तें हो परंतु करीनच किं॰ न करीन किं॰ नाहींच करणार असा धरिला असतो जो आग्रह तो; २, सं॰ बाजारमुख्यार्थीं.

**हट्टी**, ३ लिं॰ हटखोर.

**हठ**, पु॰ सं॰ हट्टप्रथमार्थीं.

**हठयोग**, पु॰ प्राणवायूचा निरोध करून तद्द्वारा अंतःकरण वृत्ति एकाग्र करण्याचा शास्त्रोक्त एक उपाय आहे तो; २, मनन एकापायावर उभें राहावें, अधो

**हडळ. हडळी**, स्त्री॰ दे॰ अरवीण.

**हंडा**, पु॰ आकारविशेषाचें धातुमय एकपात्र आहे; २, लुगड्यांत एक जाति आहे.

**हडि**, अ॰ फो॰ हड शब्दाचार्थी.

**हंडी**, स्त्री॰ दुभतें, संपाक, इ॰ व्यवहाराकडे जीं मडकीं असतात त्यांची सामान्यतः संज्ञा परंतु प्रसंगविशेषाम॰; दह्यांडी, उकडहंडी, इ॰ कांबर विशेषें करून म॰; कोणेकाचे डोईवर हंडी फुटणें ह्मणजे खापर फुटणें; २, गंगाळ, कासंडी, यांचे आकाराचें सभादिकांचा शयीं टांगायाचें जें बिलोरी दीपपात्र असतें ती.

**हंडीबाग**, पु॰ घरांत स्वयंपाक, दूध, दुभतें, इ॰ संबंधी जे भक्ष्य पदार्थ त्यांवर सर्वदा लक्ष्य ठेवून त्याभोंवतालें फिरत असावें अशा स्वभावामुळें या नामानें प्रसिद्ध झालेला एक पुरुष होता त्याचे आरोपानें तादृश स्वभावाचें जें पोर, इ॰ त्यास म्ह॰; २, गारुड्याचे खेळांत धीटपणें नकलेचें भाषण बोलणारा असा एक पोर असतो त्यास म्ह॰; आणि त्याचे आरोपानें धीट बाडगा जो पोरगा त्यास म्ह॰.

**हंडीमडकी**, स्त्री॰ हंडेंमडकें.

**हडूक**, न॰ दे॰ हाडूक.

**हंडेंभांडें**, न॰ हांडेंभांडें.

**हंडेंमडकें**, न॰ हांडेंभांडें.

**हंडेसाडी**, स्त्री॰ हंडा हेती यार्थी.

**हडया**, अ॰ दे॰ कावळ्याचें निवारण करण्याचा शब्द आहे.

**हडयावर्ण**, पु॰ हाडास छिद्र पडून त्यापासून दुरक्त वाहतें असा जो व्रणरोग होतो तो.

**हणगोबा**, पु॰ हनुमंतास कोणी म्ह॰; कोणेकाम हणगोबा करणें ह्मणजे खंडेराव करणें.

**हणणें**, हाणणें.

**हणमंत**, पु॰ हनुमान् शब्दाचा अपभ्रंश.

**हणवटी**, स्त्री॰ हनुवटी.

**हणवंत**, **हणुमंत**, पु॰ हणमंत.

**हणू**, स्त्री॰ हनुशब्दाचा अपभ्रंश.

**हत**, ३ लिं॰ काठी, इ॰ कानें ताडिला जो तो; २, कोणेकानें ठारमारला कि॰ मेला जो तो.

**हतकरवत**, पु॰ दे॰ हातकरवत.

**हतकरवती**, स्त्री॰ दे॰ हातकरवती.

**हतगूण**, पु॰ दे॰ हातगूण.

**हतघाई**, स्त्री॰ दे॰ हातघाई.

**हतचरक**, पु॰ दे॰ हातचरक.

**हतचलाखी**, स्त्री॰ दे॰ हातचलाखी.

**हतचा**, ३ लिं॰ दे॰ हातचा.

**हतचाळा**, पु॰ दे॰ हातचाळा.

**हतचाहती**, **हतचेहती**, अ॰ दे॰ हातचेहातीं.

**हतझोंबी**, स्त्री॰ दे॰ हातझोंबी.

**हतदैव**, ३ लिं॰ दैवहीन जो तो.

**हतधोंडा**, पु॰ दे॰ हातधोंडा.

**हतनळा**, पु॰ दे॰ हातनळा.

**हतपा**, पु॰ हातपा.

**हतभाग्य**, ३ लिं॰ हतदैव.

**हतभाता**, पु॰ दे॰ हातभाता.

**हंतरणें**, हांतरणें.

**हतरखी**, स्त्री॰ हातरखी.

हतखाट, पु० दे० हातखाट.

हतरी, हँतरी, स्त्री० हातरी.

हतरुमाल, पु० हातरुमाल.

हँतरूण, हतरूण, न० आंथरूण.

हतरूणपाँघरूण, न० आंथरूण इ० तें.

हतरूड, न० दे० हत्तीलानिंदेनें म्ह०.

हतलावणी, स्त्री० दे० हातलावणी.

हतवटी, स्त्री० हातवटी.

हतवडा, पु० दे० हातवडा.

हतवळा, पु० दे० हातवळा.

हतवीर्य, ३ लिं० ज्याचे आंगीं वीर्य राहिलें नाहीं अ साजो मनुष्य, औषध, इ० तो.

हतसर, पु० दे० हातसर.

हता, ३ लिं० हननकरणाराजो तो.

हताखालीँ, अ० हाताखालीं.

हतानिराळा, ३ लिं० अ० हातानिराळा.

हतावेगळा, ३ लिं० अ० हातानिराळा.

हतासरसा, अ० हातासरसा.

हताळ, ३ लिं० दे० हाताळ.

हताळणें, हातळणें याअर्थी.

हतेर, न० हत्यार.

हतेरबंद, ३ लिं० हत्यारबंद.

हतोटी, स्त्री० हातवटी.

हतोडा, पु० दे० हातोडा.

हतोडी, स्त्री० दे० लाहानजो हतोडा ती.

हतोहात, अ० दे० हातोहात.

हतोळा, पु० हातवळा.

हत्त, अ० कोणी पशुपक्षी इ० जवळ आले अस तां त्यांचे [illegible]विषयीं यांचा प्र० करितात; २, [illegible] धिक्कार, तिरस्कार, इ० कर्तव्य असतां [illegible] किं० शिवी, इ० [illegible] होते; उ० हत्तवेड्या [illegible], हत्तुत्याचा, हत्तत्याचीच [illegible] इ० प्र०.

हत्ता, पु० दंड कादत्येसमयीं हाताखालीं धरायाक रितां [illegible] आकाराचें लाकूड, दगड, इ० कांचे किं० भुईवर ओढ्यासारखे साधनभूत पदार्थ करितात ते म्ह०.

हत्ती, पु० सर्व पशूंपेक्षा आकारानें मोठा असा एक वन्यपशु आहे ज्याला गजादिक वाहनातें करून बाळगीत असतात तो; म्ह० हत्तीचे पायांत सा र्यांचे पाय; म्ह० हत्तीचे दाखवायाचे दांत वेग ळे आणि खावयाचे वेगळे; २, हस्त म्हणून जें महानक्षत्र त्यास म्ह०.

हत्तीचापाय, पु० ज्याचे आश्रयानें उत्तमरीतीनें आपला निर्वाह होउन आणखी लोकांचा होत असावा असें मोटें जें राज्य, देश, शेत, वतन, इ० तें.

हत्तीचेमडें, न० ला० मोठेपणामुळें दुर्निर्वाह जें कांहीं एकसंसारादि खटलें त्यास म्ह०.

हत्तीमहाल, पु० हत्ती बांधावयाकरितां जी जागा केली असते ती.

हत्या, स्त्री० सं० मनुष्यादिकांचा जो वध तो आ णि तज्जन्य जें पातक तो; २, ला० केवळ मर तुकडा जो मनुष्यादि त्यास निंदेनें म्ह०; स्त्री० हत्या, गोहत्या, ब्रह्महत्या, इ० स०.

हत्याण, न० घोडे, गाढव, खेचर, एतज्जातीय स्त्रियांस मैथुन करून घ्यावें अशी जी अवस्था प्राप्त होते ते; घोडी इ० कानें हत्याण करणें म्हणजे त्यांणीं हत्याणास येणें.

हत्यार, न० शस्त्र.

हत्यारबंद, ३ लिं० ज्याचे जवळ तरवार, इ० हत्यार आहे असा जो प्यादा, स्वार, इ० शिपाई तो.

हत्यारा, ३ लिं० ज्यास हत्या घडली आहे तो; प्रा० समासीं प्र०; उ० बाळहत्यारा, ब्रह्महत्यारा, इ०.

हद, स्त्री० हद्द.

हदगा, पु० अगस्ता.

हदरणें, एकास्थलीं आघातादि झाल्यामुळें त्याचे आसमंतात् प्रदेश रूक्ष्यां त्याभूमि, इ० कोनीं कंपविशिष्ट होणें.

हदहदणें, दे० हदरणें; २, को० अनेक दुःखें इ० प्राप्त होउन कोणेकानें बहुत गांजलें जाणें.

हद्द, स्त्री० सीमा.

हनन, न० सं० तरवार, इ० केंकरून कोणेक पदार्थ तोडण्याचा जो व्यापार तें; २, काठी, इ० केंकरून जें ताडन तें; ३, शस्त्रादिकेंकरून कोणेकास ठार मारण्याचा जो व्यापार तें.

हननीय, ३ लिं० सं० ज्याचें हनन करणें योग्य तो.

हनवट, पु० स्त्रियांचें एक पादभूषण आहे.

हनवटी, स्त्री० हनुवटी.

हनु, स्त्री० सं० हनवटी.

हनुमज्जयंती, स्त्री० चैत्री पूर्णिमा रूप जो हनुमंताचा जन्मदिवस ती.

हनुमंत, पु० हनुमान्.

हनुमान्, हनूमान्, पु० वानररूपी एक ईश्वराचा अवतार आहे.

हनुवटी, स्त्री० खालचे ओंठाचे खालीं जो उंचवट अवयव आहे ती.

हपका, पु० अपका.

हपटणें, आपटणें.

हपशी, पु० एक यवनांत जाति आहे.

हपसाण, न० हपशाचें जें राज्य तें.

हपसाणी, ३ लिं० हपसाणसंबंधी जो पैसा, चाल, इ० तो.

हपाप, पु० प्रा० तळतळाट या अर्थी, दे, घे, धा० योगीं प्र०; ल० हपापाचा माल गपापा गेला.

हप्ता, पु० सर्कार किं० सावकार यांचें द्यावयाचें जें द्रव्य तें एकदांच द्यावयास अनुकूल पडत नाहीं म्हणून अंशतः अंशतः द्यावयाचे जे कालावधि नियमित केले असतात ते प्र० आणि त्यात्या अवधीस द्यावयास ठरविला असतो जो द्रव्यांश तो.

हप्तेबंदी, स्त्री० हप्त्यांचा जो ठराव केला असतो ती.

हबकणें, कोणेकास हबका प्रथमार्थानें विशिष्ट करणें.

हबका, पु० पदार्थास आघात झाल्यामुळें किंवा गतीचा जो आरब्धवेग तो नसेपर्यंत अकस्मात् दुसरा विरुद्ध वेग प्राप्त झाल्यामुळें जो त्यास विलक्षण चलनात्मक संस्कार प्राप्त होतो तो; उ० गाड्यावर बसून चाललें म्हणजे अंगास हबके बसतात; २, हपका.

हंबरडा, पु॰ गाय, बैल, यांचाजो स्वजातीय मोठा शब्दतो.

हंबरणें, गाय, बैल, यांणीं स्वजातीय शब्द करणें.

हंबा, अ॰ गोजातीय पशूंचे शब्दाचें अनुकरण; २, स्त्री॰ बालांचे भाषेनें गोजातीय पशूस ल्ल॰.

हंबां, अ॰ हंबा प्रथमार्थी; न॰ हंबा द्वितीयार्थी.

हंबारणें, हंबरणें.

हंबेतुंबे, स्त्री॰ न॰ अरेतुरे.

हबेलंडी, स्त्री॰ रा॰ हलबेलंडी.

हमखास, अ॰ चोरून, मारून, लपून, छपून, असें नव्हे सर्वत्र प्रसिद्धपणें; उ॰ अडल्याचेळेस कोणी कम जाजती देतुपण हमखास दरल्पणा लनर बारा रुपये खंडी आहे; मी हमखास रुपये दिले आणि तो नाहीं ल्लणतो; २, खामाखाय.

हमजात, स्त्री॰ मनुष्यादिकांचीजी जाति ती.

हमरस्ता, पु॰ सर्वजा मार्गानें जातयेत असतात असाजो राजमार्ग तो.

हमरहा, पु॰ हमरस्ता.

हमरा, पु॰ कों॰ जेथें सोंवळें ओंवळें, नाजुकपणा, नीटनेटकेपणा, इ॰ कांची व्यवस्था गहतनाहीं असेंजें कार्यप्रयोजन संबंधी भोजनाचें मोटें खटलें त्यास ल्ल॰.

हमरानुमरी, हमरीतुमरी, स्त्री॰ हंबेतुंबे.

हमरूद, पु॰ एक वस्त्रविशेष आहे.

हमा, अ॰ स्त्री॰ न॰ हंबा.

हमामखाना, पु॰ हिं॰ स्नान, जलक्रीडा, इ॰ अर्थ बांधून जें जलस्थान करितात तो.



हमामा, पु॰ गुजराती, इ॰ पोरांचा एक खेळ आहे; २, त्या॰ धिंगाणा.

हमाल, पु॰ पेठ, बंदर, इ॰ कांचा ठायीं भ्रान्यादि कांचे ओझें आपल्या अंगें इकडचें तिकडे तिकडचें इकडे अशा प्रकारें मजूरीनें वाहून उपजीविका करितोजो पुरुष तो; २, मेणा, डोली, इ॰ वाहणाराजो भोई त्यास क्वचित् ल्ल॰.

हमाली, स्त्री॰ हमालपणा; २, हमालास द्यावी लागते जी मजूरी ती.

हमिणी, स्त्री॰ कमा द्वितीयार्थी; २, ला॰ को॰ डबोलें.

हमी, स्त्री॰ देणें, घेणें, इ॰ व्यवहारीं याणें तुला द्यावयाचें तें न दिल्यास मी आतीनिशीं देईन किं॰ याणें करायाचें तें न केल्यास मी आतीनिशीं करीन या प्रकारचें जें आपले खातरीसाठीं तिसऱ्याचें वचन घेतात तीं.

हमीदमी, स्त्री॰ हमी, इ॰ ती.

हमीदार, पु॰ कोणेक विषयीं ज्याणें हमी दिली आहे तो.

हमीश, अ॰ हमेश.

हमीर, पु॰ कल्याणरागाचा एक भेद आहे.

हमेणी, स्त्री॰ कों॰ हमिणी द्वितीयार्थी.

हमेश, हमेश, हमेशा, हमेशा, अ॰ नित्यशः.

हय, पु॰ सं॰ अश्व.

हयगई, हयगय, हयगयी, स्त्री॰ कोणेक कर्तव्य कार्याविषयीं अगत्य धरून जेव्हांचें तेव्हां करावें तें न करितां आज करूं उद्यां करूं

एव्हां ना हीं केलें तर काय होतें, इ० रूप करितां त्या अनादर बुद्धि दी.

**हयता**, ३ लिं० रा० अंगुलीनें निर्देश्य असून केवळ जवळ आहे परंतु दृष्टीनें वेधलेला असा जो कोणेक अर्थ त्याचें परामर्शक हें सर्वनाम: उ० याचीसी तुला गोष्ट नाहीं सांगीतली हयता शेवटास बसला आहे तो त्याची गोष्ट; तो शब्दापासून जसे तिकडच्या, तिकडे, तसा, तेव्हां, तिथे, इ० होतात तसे या शब्दापासून हा, हयतिकडचा, हयतिकडे, हयतसा, हयतेव्हा, हयतिथे, इ० शब्द होतात तथें तो शब्दाचे अर्थाचे स्थानीं हयता या शब्दाचा अर्थ संबद्ध करून विशिष्ट शब्दाचा अर्थ तद्वत् आणावा.

**हयराण**, ३ लिं० हेराण.

**हयराणगत**, स्त्री० हेराणगत.

**हयवान**, ३ लिं० दुखणें किं० उपास किं० मजल चालणें, इ० श्रम, इ० यत्किंचित् त्रास झालें असतां थकतो कामें जातो अशा स्वभावाचा जो मनुष्यादि जीव तो.

**हयहाय**, अ० दे० हायहाय.

**हयास**, अ० (येणे०) मटयास येणें.

**हयासा**, पु० घोडयाचा तंग आवळणें इ० उपयोगी रूमार बोटभर रुंद आणि दोन तीन हात लांब जी वादी असते तो.

**हर**, पु० सं० महादेव; २, भाजक; ३, चोर; ४, जो जा अर्थाचें हरण करणारा तो त हर: पित्तहर, कफहर, ज्वरहर, वातहर, इ० स०; ५, अ० प्रत्येकीं हा या अव्ययाचा मूळचा अर्थ हर या अव्ययास रवा इत्यादि शब्दांनें मागोमाग होऊन त्याप्र० होतो परंतु अ० संकुचित; उ० हरघडी, हरवख्त, इ० या भाषेत भक्त पुस्तयांवर अनेकरूप असे कांहीं इतर ही अव्ययांसतात त्या अर्थास धरून जे शब्द विशेष प्रसिद्ध आहेत ते क्रमानें त्यात्या स्थळीं लिहिले.

**हरउपाय**, पु० नानाप्रकारचे अनेक उपाय ते.

**हरएक**, ३ लिं० जो जो कोणी तो तो; उ० हरएक मनुष्याचे समागमें फार भूल जावोषधीन असावें; ही गोष्ट हरएक मनुष्याला ठाऊक आहे.

**हरकत**, स्त्री० दंगा, धंगा, चाकरी, इ० व्यवहारी चालण्याची जी सरळ रीति ती मोडून विपरीतीनें जें प्रतिकूल वर्तन ती; २, होणारे कार्यास प्रतिकूल वर्तनानें कोणी करितो जें विघ्न तें.

**हरकतखोर**, ३ लिं० हरकत करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**हरकती**, ३ लिं० हरकतखोर.

**हरकल**, पु० भातांत एक जाति आहे.

**हरकलपटणी**, स्त्री० गा० हरकल;

**हरकसबी**, ३ लिं० अनेक प्रकारचीं कसबें ज्याचे अंगीं आहेत तो; २, पु० हरकामी प्रथमार्थी.

**हरकाम**, न० प्रसंगवशात् उपस्थित होणारें जें जें काम तें.

**हरकामी**, पु० जें पडेल तें काम करावें अशा बोलीनें ठेवितात जो मनुष्य तो; २, ३ लिं० जें म्हटलें तें काम ज्याचे अंगीं आहे असा जो मनुष्य तो आणि अनेक कामावर उपयोगी पडाया

डायाजोगा जो शस्त्र, वस्त्र, पात्रादि पदार्थ तो.

हरकाम्या, ३लिं० पु० हरकामी.

हरकारा, पु० क्वचित्स्थलीं कागद, निरोप, इ० पोहोंचवावा किं० कोणेकास बोलावून आणावें, कोणेकास कांहींएक गोष्टीविषयीं ताकीद करावी, इ० कामावर नियुक्त केलेला जो राजा, सरदार, इ० कांपाशीं सेवक, मनुष्य, असतो त्याचे हातीं गोंडाला बिलेली काठी असते तो.

हरकी, स्त्री० वादी किं० प्रतिवादी यांतून ज्याचा वाद स्वश होतो तो आपल्यास हर्ष झाल्यामुळें जें सर्कारास कांहीं द्रव्य देतो ती; २, हारवलेली वस्तु सापडली किं० मोठा कांहीं लाभ झाला, इ० कारणानें आपणास हर्ष झाला असतां हारवलेली वस्तु देणार, किं० ज्यापासून लाभ होतो तत्संबंधी चाकरमाणसें, इ० किं० आपले इष्ट मित्र, इ० त्यांस जें कांहीं द्रव्यादि देतात ती.

हरकेंड, न० श० कंड; निंदेनें प्रसंगविशेषीं हरकास म्ह०.

हरकेण, न० श० हरकांचें जें तृण तें.

हरकोणी, ३लिं० भलता कोणी.

हरकोल, पु० हरकल.

हरघडि, अ० वारंवार.

हरजिनशी, ३लिं० अनेकप्रकारचे किं० अनेक जातीच्या अवांतर भेदानीं विशिष्ट जो सामान्यरूप कोणेक अर्थ तो; उ० त्याचे दुकानीं लहानमोठे गोड अंबट असे हरजिनशी अंबे आहेत; त्याचे बागेंत हरजिनशी झाडें आहेत; हरजिनशी लिहिणें लिहावें लागतें.

हरजिन्नस, पु० अनेकप्रकारचा जो जिन्नस तो.

हरडा, पु० कों० एक झाड आहे व त्याचें फळ तो; २, जा० त्या फळाचे आकाराचें जें निशाणाची काठी, पेढी, इ० कांस बोंड असतें त्यास म्ह०.

हरडी, स्त्री० श० बालहरीतकी.

हरण, पु० न० हरिणशब्दाचा अपभ्रंश; २, स्त्री० हरणी; ३, ऐरण; ४, न० कोणेकाचे द्रव्यादिकांचा जो अपहार तें; उ० वाटेनें चोरानीं माझे वस्त्रालंकारांचें हरण केलें; ५, कोणेक अधिकरणापासून कोणेक अर्थ नेण्याचा व्यापार तें.

हरणकाळजी, स्त्री० कोणेक वस्तु गेलें हारवलें असतां तद्विषयींची लागते जी काळजी ती.

हरणटोळ, स्त्री० सापटोळी.

हरणी, स्त्री० हरिणीशब्दाचा अपभ्रंश.

हरणें, कोणेकानें कोणेकाचा द्रव्यादि अर्थ अपहरन करणें किं० पाप, दुःख, संकट, इ० परिहरन करणें; २, वाद, युद्ध, द्यूत, उपदेश, दमन, इ० व्यापारीं तीती आपली शक्ति दुसऱ्यावर चालवावी अशी इच्छेनें प्रवृत्त असतो जो कर्ता त्याणें ती शक्ति चालेनाशी झाल्यामुळें थकणें; या अर्थी त्याची शक्ति, बुद्धि, इ० कांसही विवक्षानुरूप कर्तृत्व येतें; ३, द्यूतादिव्यवहारीं पणभूत जें द्रव्यादि तें आपण जिंकणें; उ० त्याणें पहिल्या डावास शंभर रुपये मांडले होते ते मी हरलें; मी रुपया हरलों, इ० स्थलीं रुपयारूप जें पणभूत द्रव्य तें

णेक कारणानें गमावणें; २, वाद, युद्ध, इ० कांत प्रतिपक्षी जो कोणी तो हरे असा करणें.

**हरवाळ**, ३ लिं० हळवार.

**हरहमेश**, अ० हमेश.

**हरहरमहादेव**, पु० भोजनास बसल्येवेळेस किं० युद्धादिकाचेठायीं एकदम हल्ला करणें असतां अनेक जण एकसमयावच्छेदेंकरून याचा उच्चार करितात; २, कांहीं एक पदार्थाचा एकाएकी नाश झाला असतां त्यास ल०.

**हरहुनर**, **हरहुन्नर**, पु० न० नाना प्रकारचे जे हुनर ते तीं.

**हरहुनरी**, ३ लिं० हरहुनर ज्याचे आंगी आहेत तो.

**हरळ**, पु० वांग्या, मिरच्या, इ० कांचें रोप लावाया करितां किं० कांहीं अन्य कार्यार्थ चरासारिखी लांबट करितात जी रवळी तो.

**हरळा**, पु० सं० हरला.

**हरळी**, स्त्री० तृणामध्यें एक जाति आहे; २, अशेळी, शूद्र भाषा वृत्तिः.

**हरळीचीमुळी**, स्त्री० हरळी मुळास कष्टहीं उपटली असतां तीचा बीज भूतमूळांश यत्किंचित् तरीं भुईत असतो तद्वत् एकाएकी नाहींसा व्हावयाचा नाहीं असा जो कोणेक स्थलचा वतनदार त्यास प्रसंगविशेषीं ल०.

**हरा**, पु० दे० वेळूचे कांबीची मोटी जी पाटी तो.

**हराम**, ३ लिं० लबाडी, लच्चाडी, फंद, फितूर, इ० रूप जे कशास्त्र विनिंद्य असें अन्याय्य जें कर्म किं० तादृश कर्म करणारा जो मनुष्य तो.

**हरामखोर**, ३ लिं० हराम कर्म केल्यामुळें जो दोषी तो.

**हरामखोरी**, स्त्री० हरामखोराचें जें कर्म ती.

**हरामजादा**, ३ लिं० हिं० हराम; २, दुसऱ्यास ठकावें आपण एकाएकी ठकूं नये असा धूर्त जो मनुष्यादि तो.

**हरामाचा**, ३ लिं० मेहेनत न करितां लबाडी, लच्चाडी, इ० कांनी संपादिला जो पैसा, इ० माल तो.

**हरामी**, ३ लिं० हरामजादा; २, स्त्री० हरामपणा.

**हराष**, **हरास**, पु० वाणिज्यादि व्यवहारीं कांहीं एक कारणानें होत्ये जी हानि तो.

**हराषकाळ**, **हरासकाळ**, पु० संपत्ति, इ० कांचा उत्तरोत्तर ऱ्हास होउं लागावा असा जो कोणेकास प्रतिकूल काल प्राप्त होतो तो.

**हरि**, पु० सं० विष्णु म्हणून जो देव तो; हरिसत्ता, हरिकथा, हरिकीर्तन, हरिभजन, इ० स०; २, अश्व, इंद्र, सिंह, वानर, बेडूक, सूर्य, इ० कित्येकांची संस्कृतांत संज्ञा आहे.

**हरिण**, पु० एक वन्य पशु आहे जो गानाविषयीं बहुत लुब्ध असतो.

**हरिणी**, स्त्री० हरिणजातीय स्त्री ती.

**हरित**, ३ लिं० सं० हिरवा जो रंग तो; २, तद्विशिष्ट जो वस्त्रादि पदार्थ तो.

**हरिताल**, सं० पु० न० एक पीतवर्ण उपरस आहे तो तें.

**हरितालिका**, स्त्री० भाद्रपद शुक्ल तृतीया; २, त्या दिवशीं पूजनार्थ जी देवीची मूर्ति करितात ती.

**हरिदास**, पु॰ ईश्वरापुढें वीणादि घेउन उभ्यानीं जो ईश्वराचा किं॰ तद्भक्तांचा गुणांचें कीर्तन करीत असतो तो.

**हरिदिनी**, स्त्री॰ एकादशीस म्ह॰.

**हरिद्र**, न॰ दे॰ हरद्र.

**हरिद्रा**, स्त्री॰ सं॰ हळद.

**हरिवासर**, पु॰ द्वादशीचा जो प्रथम पाद तो, ज्यांत भोजन करूं नये असें सांगीतलें आहे; २, आषाढ, भाद्रपद, कार्तिक, एतत्संबंधी शुक्लपक्षीय द्वादशी तिथींचा आणि अनुराधा, श्रवण, रेवती, या नक्षत्रांचा जो योग त्यास ही म्ह॰.

**हरीक**, पु॰ कोद्रू म्हणून जें धान्य तो; २, हर्ष शब्दाचा अपभ्रंश.

**हरीख**, पु॰ हर्ष शब्दाचा अपभ्रंश.

**हरीतकी**, स्त्री॰ हरडा.

**हरीप**, **हरीफ**, पु॰ शौर्यादि गुणांनीं कोणेकाचें दमन करण्याविषयीं जो समर्थ तो.

**हरूष**, पु॰ ग्रं॰ हरीख.

**हर्ख**, पु॰ ग्रं॰ हरीख.

**हर्तकी**, स्त्री॰ हरीतकी शब्दाचा अपभ्रंश.

**हर्ता**, ३ लिं॰ हरण करणारा जो तो.

**हर्ष**, पु॰ इष्टलाभ किं॰ अनिष्टाचा नाश झाल्यामुळें सुख होउन अंतःकरणाचा जो प्रफुल्लितपणा होतो तो.

**हर्षण**, पु॰ सत्तावीस योगांतील चौदावा जो योग तो.

**हर्षणें**, कोणेकानें हर्षानें युक्त होणें.

**हर्षवायु**, पु॰ अतिशयित द्रव्यादि लाभामुळें हर्ष होउन जो वायु होतो तो.

**हर्षामर्ष**, **हर्षामर्षा**, पु॰ दे॰ कोणेक कारणास्तव होतो जो परस्परांचा अरेतुरे, गालिप्रदान, इ॰ रूप व्यापार तो.

**हर्षित**, ३ लिं॰ हर्षला जो तो.

**हल**, पु॰ सं॰ नांगर.

**हलक**, ३ लिं॰ दुखणें, श्रम, इ॰ कारणामुळें जो निःशक्त झाला तो वस्त्याची प्रकृति इ॰ तो; २, स्त्री॰ गाणाराचे गळ्यांत जी फिरक असते ती.

**हलकडी**, स्त्री॰ कों॰ नथीस खालीं जो वाया जोड्या जातो त्यांचा झिळमिळ्या लाविताात त्या सर्व मिळून जो समुदाय ती; २, दुकांशीं न घेमरे मोत्यें जो वाया सारीं जो दुसरा तुकडा जडवीत असतात ती.

**हलकथील**, न॰ दे॰ चित्रें, इ॰ काम रंग देण्याचें उपयोगी एक पदार्थ आहे.

**हलकलणें**, दगाधोपा, अग्न्युत्पात, इ॰ भयजनक कारणामुळें देश, ग्राम, जनसमुदाय, इ॰ कानीं गडबडणें.

**हलकल्हई**, स्त्री॰ दे॰ हलकथील.

**हलका**, ३ लिं॰ जडाप्रतिपक्षी जो अर्थ तो; २, ज्यामध्यें वेगादिजन्य बल किं॰ प्रमाण न्यून असा जो द्रव्य क्रियादि रूप कोणेक अर्थ तो; उ॰ अमलाविषयीं अफूपेक्षा भांग हलकी; कोंकणचें माप देशचे मापाहून हलकें आहे; बळानें तोडून को हलकें तोड; ३, पु॰ झोंपाळा, पाळणा, इ॰ कांचा दोऱ्या, इ॰ अडकावयाचे

चे उपयोगी जे लोखंडाचे दशांकासारखे आं
कडे करितात ते प्र॰.

**हलकारत**, स्त्री॰ रा॰ हलकारती.

**हलकारती**, स्त्री॰ आंत दीप लावून देवास ओं
वाळायाचे उपयोगी लांबट आणि चापट
असें एक धातुमय पात्र आहे

**हलकारा**, पु॰ हरकारा.

**हलकावणें**, कोणेकानें हलकें करणें.

**हलक्यानें**, अ॰ लघुप्रमाणानें; कोणेक क्रि
या करण्याचें वि॰; उ॰ मोठ्यानें बोलूं नको,
हलक्यानें बोल, हलक्यानें चाल.

**हलकी**, स्त्री॰ एक चर्मवाद्य आहे.

**हलख**, ३ लिं॰ हलक.

**हलगती**, ३ लिं॰ हलगत ह्मणून एक पेंठ आहे
तत्संबंधी जें कापड, इ॰ तो.

**हलगी**, स्त्री॰ हलकी.

**हलचाल**, स्त्री॰ हालचाल.

**हलणें**, हालणें.

**हलबेलंडी**, स्त्री॰ कांहींएक संकट, दुखणें, इ॰ का
रणामुळें कोणेकाची होतीजी दुरवस्था ती.

**हलमस्त**, ३ लिं॰ हालमस्त.

**हलवई**, पु॰ हलवाई.

**हलखूद**, ३ लिं॰ अवजडाचा प्रतिपक्षी जो श
रीर, ओझें, इ॰ पदार्थ तो.

**हलवा**, पु॰ वर थोडा थोडा साखरेचा पाक घालू
न हलवून अग्निसंयोगानें वर त्यासाखरेचा
कांटा उभारा ही असे सिद्ध केलेले जे तीळ, वेल
दोड्यांचे दाणे, लवंगा, इ॰ पदार्थ तो; २, मि
ठाई

ठाईसारखा एक पदार्थ आहे; ३, एक मत्स्यांत
जाति आहे.

**हलवाई**, पु॰ पेढे, बर्फी, गांठ्या, हलवा, इ॰ मि
ठाई आपण करून विकावी आशा व्यापारावर
उपजीवन करितो तो.

**हलवान**, न॰ चौहांश शालजोडीचाओ एक फर्द
तें.

**हलहलीत**, ३ लिं॰ लवटल्या वेळेस उपयोगीं
पडायाजोगें जें पदरीं कांहीं द्रव्य राखित अस
तात तें जापाशीं नाहीं तो.

**हलाक**, ३ लिं॰ हलक प्रथमार्थी.

**हलाकी, हलाखी**, स्त्री॰ उपास, दुखणें, इ॰
कारणामुळें जो हलकपणा येतो ती; २, ला॰
खर्चावेचाची ओढ असल्यामुळें जी संकटा
वस्था होत्ये ती.

**हलाल**, ३ लिं॰ ग्रहण करणें, भक्षिणें; इ॰ विष
यीं विहित जो कोणेक अर्थ तो; बकरा, इ॰ प
शु, इ॰ कांस हलाल करणें ह्मणजे यवन शा
स्त्रोक्त विधीनें संस्कारपूर्वक मारणें; २, हय
गय, कपट, इ॰ न करितां शरीरास कष्ट देउन
करितात जें सेवादिरूप काम त्याचें किं॰ ताद
श कष्ट करून संपादिलेलें जें द्रव्यादि त्याचें वि॰.

**हलालखोर**, पु॰ वेतन मजूरी घेउन शेतखा
ना, इ॰ कांतील विष्ठा काढून बाहेर टाकावी
या कर्मावर उपजीवन करणारी अशी एक
मनुष्यांत जाति आहे.

**हलालखोरी**, स्त्री॰ हलालखोराचें जें कर्म ती;
२, ला॰ केवल कुनिष्ठ जी चाकरी, इ॰ त्यास ह्म॰;
३,

२, ३ लिं० हलालखोरसंबंधी जीभाषा, वेष, इ०ती.

**हलालाचा**, ३लिं० वास्तविकरीतीनें चाकरी, कष्ट, इ० करूनसंपादित जें द्रव्यादि तो.

**हलाहल**, न० सं० हालाहल.

**हलोहाल**, अ० हालोहाल.

**हल्या**, पु० रेडा.

**हल्ल**, पु० हाल.

**हल्लक**, ३लिं० हलकप्रथमार्थे.

**हल्ला**, पु० शत्रु, किल्ला, इ० जिंकून आत्मसात करावया करितां सेना, सैनिक, इ० कानीं आवेशपूर्वक त्यावर एकदम चालून जाण्याचा जो व्यापार तो; २, कोणेक अर्थावर तत्तत्क्रियेचा संबंध करण्याविषयीं किं० तत्तत्क्रियाद्वारा कोणेक कार्य करण्याविषयीं जो आवेशपूर्वक झटण्याचा व्यापार; उ०, सरकारनें जेव्हां त्याविहिरीवर हल्ला केला तेव्हां तें काम लौकर संपलें; तुह्मी सोपन लिहिण्यावर फारच हल्ला मांडला हें काय.

**हल्लाहरकत**, स्त्री० हरकत, तंटा, बखेडा, इ० ती; उ०, हा गृहस्थ बरा आहे रुपये दिल्हे असतां कांहीं हल्ला हरकत करणार नाहीं; यावांटेनें तुह्मी खुशाल जा कोणी हल्ला हरकत करणार नाहीं.

**हल्लीं**, अ० प्रस्तुतकालीं.

**हवई**, स्त्री० भा० मोठी जी चंद्रज्योत ती.

**हवदा**, उ० हौदा.

**हवन**, न० देवतोद्देशानें भात, घृत, इ० पदार्थ अग्नींत टाकण्याचा जो व्यापार तें.

**हवरा**, ३लिं० उ० हावरा.

**हवरी**, स्त्री० दे० जातीचाच पांढरा जो तीळ तो अनेकवचनी प०.

**हवलदार**, पु० हवालदार.

**हवलदील**, ३लिं० हि० वि० अकस्मात कांहीं मोठें संकट प्राप्त झालें किं० कांहीं मोठी हानि झाली इ० कारणामुळें घाबरें व्हावें कांहींच सुचूं नये चित्त व्यग्र व्हावें भ्रांत व्हावें एतदवस्थापन्न झालेला जो तो.

**हवळा**, पु० हुळा.

**हवा**, स्त्री० फा० १ स्त्री० पंचमहाभूतांतील जें वायु महाभूत ती; २, पर्जन्य, धुकें, थंडी, उष्ण यांच्या अतिशय, किं० स्वच्छता, इ० भेदक निमित्तानें भिन्नभिन्न होते जी दिक्कालावस्था ती.

**हवाई**, स्त्री० हवई.

**हवाल**, उ० स्त्री० देश, ग्राम, मनुष्य, इ० कांची बरी, वाईट, जी स्थिति ती ती प्रथमादिप्रसंगीं प०.

**हवालणें**, कोणे कामें आपण द्यावयाचें जें द्रव्यादि तें दुसऱ्याचे हवाल्यानें संबद्ध करणें; उ०, एका तुमचे पाशीं रोख रुपये नसल्यास दुसऱ्या कोणाकडे हवालून द्या; २ लो० आपण करावयाचें जें कोणेक कार्य तें करण्याविषयीं दुसऱ्या कोणे कायरटा करणें.

**हवालदार**, पु० सुभ्याचे पोटचे जे अनेक महाल त्यांचे जे अनेक अंमलदार ते प०; २, किल्ला इ० संबंधी कामाचा बंदोबस्ता करितां त्यांजवर जो मुख्य तें करून ठेविला असतो तो; ३, जमातदार, नाईक, यांसारख्या अनेक मनुष्यांवर जो अधिकारी केला असतो तो.

**हवालदारी**, स्त्री० हवालदाराचा जो अधिकार ती.

**हवालदिल**, ३लिं० हवलदिल.

**हवाला**, पु॰ हवालदाराचा जो अधिकार तो; २, आपण सर्कार, सावकार, इ॰ कांचें द्यावयाचें जें द्रव्यादि किं॰ कोणेकाचें करावयाचें जें कांहीं काम तें आपल्यावरचें दुसऱ्या कोणेकानें द्यावें, करावें, म्हणून त्यास मान्य करून तद्विषयींचा अधिकार जो त्याजकडे देतात तो.

**हवालीं, हवालीं, हवालें**, अ॰ रक्षणाद्यर्थ कोणेकाचे अधीन तें त; कर, हो, अस, धा॰ योगीं प्र॰.

**हवालाकपाला**, पु॰ हवालाटवाला.

**हवालाटवाला**, पु॰ हमीदमी.

**हवावी**, स्त्री॰ कों॰ डोंगर इ॰ कांवर चढणें किं॰ धांवणें इ॰ कारणानीं श्रम झाल्यामुळें कोणेकास लागतो जो दम तो.

**हवाशीर**, अलिं॰ पुष्पादिकांचा सुगंध, भ्रमर, कोकिल, इ॰ संबंधी मंजुल मंजुल शब्द शीतल मंद असा सुखकारक वायु. इ॰ योगानें रमणीय जें बाग, वाडा, ग्राम, इ॰ रूप कोणेकस्थल तो.

**हवि**, न॰ हवनोपयोगी जें घृतादि द्रव्य तें; हविर्भाग, हविःशेष, इ॰ स॰.

**हविष्य**, न॰ व्रतादिदिवशीं भक्षणाविषयीं प्रशस्त म्हणून जे धर्मशास्त्रांत गोधूम गोदुग्धादि पदार्थ परिगणित आहेत ते प्र॰; २, तेच पदार्थ भक्षून रहावें असा धरला जो नियम तें; ३, ला॰ लोकशास्त्रविरुद्ध असून आवश्यकत्वें करून कोणेकाचे परिपाठांत पडलें असतें जें कोणेक कर्म त्यास म्ह॰; उ॰, यागावांत सर्वलोकांस तोंडबाजी हेंतर हविष्य आहे.

**हविष्यान्न**, न॰ हविष्य; लाक्षणिकार्थ वांचून.

**हवेली**, स्त्री॰ दुमजला तिमजला असें मोठें जें उंच गृह तो; २, एके प्रांतांत अनेक कसबे किं॰ अनेक संमता असतात त्यामध्यें जाचे नावानें प्रांत प्रसिद्ध असतो तो कसबा किं॰ ती संमत ती.

**हव्य**, न॰ देवतोद्देशानें होमार्थ स्वीकृत जे घृतादि तें.

**हव्यकव्य**, न॰ होमहवन, श्राद्धपक्ष, इ॰ कार्यप्रस्थ, इ॰ कर्म तें; उ॰, त्याचे घरीं कांहीं हव्यकव्य झालें असतां नलाच बोलवितात.

**हव्याशी**, अलिं॰ कोणी एक गोष्टीविषयीं हव्यास आहे ज्यास तो.

**हव्यास**, पु॰ कोणेक गोष्टीविषयीं अनेक प्रकारचे उद्योग करावे, तें तें कार्य सिद्ध करावें, असा कोणेकास असतो छंद तो; उ॰, या जोशीबावांस पुस्तकसंग्रह करण्याचा हव्यास फार.

**हशम**, न॰ पादचारी शिपायांचा समुदाय तें.

**हशमनीस**, पु॰ हशम प्रकरणी लिहिणें लिहिणारा जो कारकून तो.

**हंशा, हशा**, पु॰ शालजोडी, दुपट्टा, गालिचा, दुलई, इ॰ कांस तव्याहून विजातीय तव्याचे दोहों अंगें किं॰ सभोंवता अंगचा असतो किं॰ लावितात जो अरुंद अवयव तो; २, हास्यास म्ह॰.

**हंशील, हशील**, न॰ ग्रामदेश, जकात, इ॰ संबंधी सर्कार, इ॰ कांस द्यावें लागतें जें देय तें; २, लेख, भाषण, इ॰ कांतील जें तात्पर्य तें; ३,

**हंस**, पु॰ एक पक्षी आहे; हंसगति, हंसगामिनी, हंसस्वर, इ॰ समास.

**हसडणें**, हालवणें, ओढणें, इ॰ क्रियानीं कांहीं एक पदार्थ आंचक्यानें युक्त करणें; २, ला॰ युक्तिप्रयुक्तीनें कोणेकापासून द्रव्यादि काढून घेणें; कोणेकास

शिव्या इ० हसडणें ह्मणजे देणें.

**हँसडा**, पु० आसडा.

**हँसणें, हसणें**, कोणेकानें हास्यविशिष्ट होणें; २. कोणेकानें कोणेकास हसणें ह्मणजे त्याचें वाईट कर्म पाहून त्यास खोडयानावें, इ० ठेवणें; उ०, तूं असें जर वाईट कर्म करशील तर तुला लोक हसतील आमचें काय गेलें; करंज्या, गुरवळ्या, इ० कानी हंसणें ह्मणजे उलणें; रा० चुलीवर ठेवलेल्या खापरानें हसणें ह्मणजे वर जमलेल्या मशीनें पेट घेणें.

**हसबी**, स्त्री० रुपये, इ० भरून घोडयावर घालून गावास न्यावयाचे उपयोगी पडशीसारखी लहान एक पिशवी आहे ती.

**हँसरा**, ३ लिं० विशेष हांसण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**हँसळी, हसळी**, स्त्री० सुवर्णादिकांचें एक कंठभूषण आहे.

**हँसाबाजी**, स्त्री० कों० हास्यविनोदरूप जो व्यापार ती.

**हसूं, हँसूं**, न० हसें.

**हँसें, हसें**, न० विस्मय, आनंद, इ० अंतःकरणांत झाल्यामुळें किं० शरीरास गुदगुली, इ० झाल्यामुळें अंतःकरण विकसित होऊन मुखादिकांचा विकास व्हावा असा जो विकारविशेष होतो तें; २, उपहास.

**हँसोळी**, स्त्री० हंसळी.

**हस्त**, पु० जेणें करून पदार्थांचें दान, ग्रहण, इ० घडतें असें मनुष्यादि जीवास कर्मेंद्रिय आहे तद्रूप जें शरीरास दोन अवयव असतात ते प्र०; २. वरपाखाडी, इ० टेंकायाकरितां खांबणीचे वरचे टोकास जो लांकडाचा चापट तुकडा बसवितात तो; ३, हत्तीची जी सोंड ती; ४, चोवीस अंगुलें रूप जें प्रमाण तो; ५, सत्तावीस नक्षत्रांतील तेरावें जें नक्षत्र तो; मा० अनेकवचनांत प्र०.

**हस्तक**, पु० हस्त प्र० १ ला अर्थ; २, जो ज्याचे हाताखालीं कामकाज करावयास असतो तो त्याचा असें ह्म०.

**हस्तकौशल**, न० चित्र लेखनादि कांहीं एक कार्य करण्याविषयीं हस्ताचा ठायीं असतें जें कौशल तें.

**हस्तकौशल्य**, न० हस्तकौशल.

**हस्तक्रिया**, स्त्री० अनुष्ठान प्रसंग, रसायन, इ० कोणेकविषयींचा हातानें करायाची जी कृति ती.

**हस्तगत**, ३ लिं० वि० कोणेकाचे स्वाधीन झाला जो कोणेक अर्थ तो.

**हस्तगुण**, पु० हातगुण.

**हस्तचापल्य**, न० कांहीं एक कार्य करण्याविषयीं हस्ताचे ठायीं जें चापल्य असतें तें.

**हस्तदोष**, पु० लेखामध्यें अशुद्ध किं० चुकी पडायास कारण भूत जो लेखकाचे हाताचा दुर्गुण तो आणि तेणें करून लेख्यांत पडतें जें अशुद्ध किं० चुकी ती.

**हस्तपगदस्त**, अ० पुरुषांचे खेळांत जा मोहऱ्या संबंधायाचे उद्देशानें हात लावला तेंच मोहरें खेळावें आणि तें मोहरें जापर्गा ठेविलें ते थून उचलूं नये अशी नियमानें खेळण्याचें वि०.

**हस्तमूर्ख**, ३ लिं० हास्यमुख.

**हस्तलाघव**, न० हस्तकौशल; २, हस्तचापल्य.

**हस्तागोर, हस्तागौरी**, स्त्री० हस्त नक्षत्रीं सूर्य असतां जीचें स्थापन करितात अशी जी हत्तीवर बसलेली

**हा**, ३लिं० अव्यवहित सन्निहितजो कोणेक अर्थ त्याचें परामर्शक हें सर्वनाम; २, कालकृत विलंबाचें अभावद्योतनार्थ अर्थाचें वर्तमान क्षणिकजें स्वरूप त्यास्वरूपेंकरूनच कोणेक क्रियेच्यागायीं अन्वय विवक्षित असतां त्या अर्थाचें परामर्शक हें सर्वनाम; उ० तुह्मी पुढें चला हामी मागून येतो; २, अ० प्रा० हन् या अर्थी.

**हां**, अ० कोणेकानें कांहींएक गोष्ट सांगितली असतां ती आपण ऐकिली किं० अंगिकारिली ह्मणून जें उत्तर द्यावयाचें त्यास्थानीं याचा प्र० करितात; उ० जाशील का ह्मणून विचारिलें तेव्हां हां ह्मणालास आतां कां नाहीं ह्मणतोस; २, कोणेक गोष्टीविषयीं मनांत समजूत पडली किं० कोणेक गोष्ट आठवली असतां जें समाधान होतें त्याचा हा उद्गार आहे; उ० हां आतां श्लोक लागला; हां ही कल्पना बरी रुचली; ३, कोणेकास कोणेक गोष्टीविषयीं इशारा करावयाचा असतां किं० दटावयाचें असतां याचा प्र० करितात; उ० हां चालूंद्या काम पुढें बसूं नका; हां खबरदार पुढें बोललास तर तोंडावर मारीन.

**हाक**, स्त्री० साद; २, हाकाटी; ३, किंमत, इ० हांकण्याविषयींचा अतिशयोक्ति दिसायाजोगा जो शब्द तो; ४, हाक ऐकूं जायाजोगेंजें मार्गप्रमाण ती; उ० या वाटेनें हाकेहाकेवर चवक्या ठेविल्या होत्या; कोणेक काम हाका मारणें ह्म० रडणें चतुर्थ्यर्थी; कोणेकानें हाका मारणें ह्म० रडणें पंचम्यर्थी; कोणेकानें कोणेकाचे नावें हाका मारणें ह्म० त्याचे नावें चडफडणें.

**हांकणें, हाकणें**, तोंडानें शब्द यष्ट्यादिकानें प्रहार इ० द्वारा अधिष्ठितस्थल सोडून लवकर जावें असें वाटायाजोगा लागतोजो नेट तद्विशिष्ट पशु पक्ष्यादिकास करणें; २, संसार, इ० खरलें कसेंही करून चालिवणें; किंमत बातमी, गप्प, इ० हांकणें ह्म० अतिशयोक्ति दिसायाजोगें सांगणें.

**हांकलणें, हाकलणें**, हाकणें.

**हांकवणें**, रा० हाकणें प्रथमार्थी.

**हाकहूल**, स्त्री० चोर, राजक्रांति, इ० संबंधी हाकाटी, दंगा, इ० ती.

**हाकाटणें**, कों० बोभाटणें; २, कांहींएका कार्यार्थ प्रा० अनेकांस हाकांनीं अभिसंबद्ध करणें.

**हाकाटा**, पु० अनेक हाकांचा जो गलबा तो; २, बोभाटा.

**हाकाटी**, स्त्री० हाकाटा.

**हाकाटयाचा**, ३लिं० अस्फुटाचा.

**हाकारणी**, स्त्री० हाकारण्याचा तो व्यापार ती.

**हाकारणें**, शीळ उभारून गलबला चालू करणें; पक्षी शिकारशरा कर्मता; २, कोणेकाम हाकारणें; उ० ह्म० आषाढी आणि

उळ.

**हांडा**, पु॰ कों॰ हंडा प्रथमार्थी.

**हांडी**, स्त्री॰ हंडी.

**हांडीबाग**, पु॰ कों॰ हंडीबाग.

**हाडुक**, न॰ कों॰ हाडकी.

**हांडूल**, न॰ कों॰ लहान जो हांडा त्यास म्ह॰

**हांडेंभांडें**, न॰ कों॰ भांडें कुंडें.

**हांडोरें**, न॰ कों॰ हांडूल.

**हाड्यावर्णी**, पु॰ हड्यावर्णी.

**हाणणें**, शस्त्रादिकानें तोडणें. पक्षीं शस्त्रादिकासही कर्मता; २, तरवार, इ॰ शस्त्रानें कोणेकास साफ तोडणें. एथेही तरवार, इ॰ कास पक्षीं कर्मता.

**हाणमार, हाणामार, हाणामारी**, स्त्री॰ मनुष्यादिकानीं एकमेकास किं॰ कोणेकानें कोणेकास हाणावें, मारावें, इ॰रूप जो व्यापार तो.

**हात**, पु॰ हस्तप्रथमचतुर्थार्थी; २, गृहादि कोणेक पदार्थाचा वाम दक्षिण जो बाजू त्याप्र॰; उ॰ आमचें घर सरकारवाडयाचा उजवे हातास आहे; ३, कार्यमात्राविषयीं साधनभूत कोणेक कर्त्याचे अंगची जी कर्तृत्वशक्ति तो त्या कर्त्याचा; उ॰ अपराधावांचून शिक्षा देणें हे माझे हातानें घडणार नाहीं मा; झा हात चालेल तेव्हां मी तुझे रुपये देईन; ४, कोणेक अर्थ जेथें राहिला असतां आपलेस्वाधीन राहतो म्हणजे म्हटला तसा वर्तावयास सांपडतो; असेंजें आपलें स्वातारूप अधिकरण तो; याअर्थी प्रथमांत प्र॰ मा॰ नाहीं; उ॰ आमचें काम करणें हें तुमचे हातांत आहे; सांप्रत माझे हातीं पैसा नाहीं; ५, हातानें वाजवायाचें मृदंग, डफ, इ॰ वाद्य किं॰ खेळायाचें दांडपट्टा, इ॰ त्यांचा जा निरनिराळ्या गति त्याप्र॰; ६, चित्रें काढणें, तासणें, विणणें, इ॰ जें हस्तक्रियासाध्य कर्म त्याचेंजें कौशल तो; उ॰ याला चित्रें काढण्यांचा हात चांगला आहे; ७, कुलपाचीजी किल्ली तो; ८, या शब्दाचा त्यांकयाचे खेळांत एक अर्थ प्रसिद्ध आहे. कोणेकानें कोणेकावर हात टाकणें किं॰ करणें, म्ह॰ केवळ हातानें किं॰ शस्त्रादिकानें मारणें, द्रव्यादिकावर किं॰ लाडू इ॰ भक्ष्यपदार्थांवर हात मारणें म्ह॰ लाब मारणें; कोणेक कर्मास हात घालणें म्ह॰ करायाकरितां अंगिकारणें; कोणेकानें कोणेकास हात देणें म्ह॰ उठावणीविषयीं आश्रयभूत होणें; खाणें, खरचणें, काम करणें, इ॰ विषयीं हात राखणें म्ह॰ त्यात्या व्यापारीं हाताला मनस्वीपणें वर्तूं नदेतां आटोपता धरणें; कोणेकाचा हात चेपणें, दाबणें, म्ह॰ त्याणें स्वकार्याविषयीं अनुकूल व्हावें म्हणून त्यास गुप्तरूपें द्रव्यादि देणें; हात गुंतणें, मोकळा होणें, गमावणें, इ॰ स्थलीं ममता शरीराचे अवयवभूतजें आपलें धन, पुत्र, वतन, लेख, मतलब, इ॰ कांहींएक हा हातशब्दाचा अर्थ होतो; कोणेकानें हात टेकणें

पोहचला, इतक्या अंतरावर स्थित जो पदार्थ तो. २, ज्याची फळें, पुष्पें, इ० भुईवर राहून हातानें तोडतां येतात इतका उंच जो वृक्ष तो किं. तीं फळें, पुष्पें, किं० ज्यांतील पाणी वरून हातानें येतें इतकी खोल जी विहीर ती.

**हातपिटी**, स्त्री० कलहप्रसंगीं परस्परांची जी हातानीं मारामार ती.

**हातभाला**, पु० भुईवर नटेकितां हातांत उचलून फेंकायाचा असा जो लहान भाला असतो तो.

**हातभुरकणा, हातभुरका**, ३लिं० हातामें भुरकून खावयाजोगा जो कोंवळा नारळ तो; नपुंसकीं विशेष्यलोपकरूनही याचा प्र० होतो.

**हांतर**, पु० रा० वेळवाची मांडी जी हांतरीं बसायासाठीं करितात ती.

**हातरगाडा**, पु० रा० हातचरक.

**हांतरणें**, आंथरणें.

**हातरवी**, स्त्री० घुसळखांब मोजरी यांवांचून हातानेंच फिरवून दहीं, इ० घुसळायाचे उपयोगीं जी लहानशी रवी केली असते ती.

**हातरहाट**, पु० केवळ हातानेंच ओढून पाणी काढायाचा जो लहान रहाट तो.

**हांतरी**, स्त्री० आंथरी.

**हातरुमाल**, पु० नित्याचे लिहिण्याचे उपयोगी जो कागद पत्राचा चालता रुमाल केला असतो तो; २, तोंड पुसणें इत्यादि उपयोगीं जो वस्त्राचा तुकडा बाळगतात तो.

**हांतरूण**, न० आंथरूण.

**हांतरूणपांघरूण**, न० आंथरूणपांघरूण.

**हातलावणी**, स्त्री० वेश्यादि सामान्यस्त्रियांचा शिरउतरण्याचा जो संस्कार ती.

**हातलाघा**, ३लिं० वा० हाताळ जो मनुष्य तो.

**हातघटी**, स्त्री० भाषणादि कोणेक व्यवहार करण्याविषयीं कर्तृभेदेकरून जे भिन्नभिन्न कृतिप्रकार असतात ते प्र०

**हातवडा**, पु० सोनार, कांसार, इ० कांचें ठोकायाचें एक आऊत आहे.

**हातवडी**, स्त्री० लहान हातवडा

**हातवल्हें**, न० केवळ हातानेंच धरून वल्हवायाचे उपयोगीं जें होडी, इ० कांवर लहानसें वल्हें असतें तें.

**हातवळा**, पु० लेखनादि कोणेक कर्माचा अभ्यास झाल्यामुळें तद्विषयीं हाताचे ठायीं येतें जें प्रावीण्य तो.

**हातविरजा**, ३लिं० रा० प्रसंगीं आपलें काम यथाकथंचित् कांहीं काळ संभाळी किं० आपल्यास कांहीं काम करायास हात लावी अशा योग्यतेस आलेला जो आपला पुत्र, शिष्य, कन्या, सून, इ० कोणी असतो तो.

**हातशिंपणें**, न० रा० सोडपणी नदेतां चाळणें, इ० साधनानें उडवून जें भाजीपाला, केळी, इ० कांस पाणी देतात तें.

**हातसर**, पु० स्त्रियांचें एक हातभूषण आहे.

**हातसारवण**, न० खराटा, पोतेरें, इ० साधन न घेतां केवळ हातानेंच जें भूम्यादिकांस सार-

वण देतात तें.

**हातरफ़रव**, न० ज्यावर द्वेष असतां त्यास हस्ते-रिकें करून मार द्यायास सांपडलें असतां तितक्यानेंच मानून घेतात जें स्फ़रव तें.

**हातळ**, अलिं० कों० हाताळ.

**हातळणें**, फलादिपदार्थ हस्तव्यापारानें चोळवटणें; २, ग० हातळ मनुष्यानें कोणाचें वस्तु चोरून नेणें.

**हाता**, पु० कों० कैनकीचें जें कणीस तो; २, फलपुष्पादिकांचा मोजण्यासमयीं एकएकवार हातांत जी पंचकडी, छकडी, इ० रूप समुदाय तो.

**हाताखालीं**, अ० जें कर्म करण्याविषयीं मुख्यत्वेंकरून जो अधिकारी त्याजवळ त्या कर्माचीं अंगभूत कर्में करायाकरितां त्या अधिकाऱ्याचे नियम्य करितात; २, कोणेकाचे स्वाधीन.

**हातानिराळा**, अलिं० ज्याविषयींच्या कर्तव्याचा किमपि राहिला नाहीं अतएव झाला हात ज्याचा त्याला न लागे असा सिद्ध झाला जो गृहादि अर्थ तो; उ० हें लिहिणें एकदां हाता निराळें झालें म्हणजे दुसरें काम घेईन; २, अ० जेथें मनुष्याचे हाताचीं नेहमीं वहिवाट असत्ये त्या स्थलाहून इतरत्र एकीकडे; उ० कामापुरतीं भांडीं वहिवाटींत ठेवा वरकड हातानिराळीं ठेवा.

**हाताफळी**, स्त्री० हातझोंबी.

**हातावेगळा**, अलिं० अ० हातानिराळा.

**हातासरसा**, अ० कोणेक कार्य करण्याविषयीं हाताचे ठायीं धरिला जो वेग त्याच वेगानें, कांहीं एक इतर कार्य करण्याचें वि०; उ० उर्वी काढतो आहेस तो हातासरशीं भांडीं घासून मग हात धू.

**हाताळ**, अलिं० कोणकाची वस्तु हातीं लागली असतां चोरण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**हाताळणें**, हातळणें.

**हातेर**, न० हतेर; २, कों० ग्रामसंबंधी कुळांस जो पाटील, खोत, इत्यादि अधिकाऱ्यांचें शेत लावणें इ० कामें करण्याविषयीं करावी लागत्ये जी बिगार ते.

**हातेरबंद**, अलिं० हतेरबंद.

**हातोटी**, स्त्री० हातवटी.

**हातोडा**, पु० हातवडा.

**हातोडी**, स्त्री० हातवडी.

**हातोपा**, पु० ग० हातपा.

**हातोपात**, अ० कांहीं एक ओझें वहायाचें असतां एकानें दुसऱ्याचे हातीं, दुसऱ्यानें तिसऱ्याचे हातीं, अशा प्रकारें नेणें, वाढणें, इ० कांचे वि०

**हातोफळी**, स्त्री० हाताफळी.

**हातोहात**, **हातोहाती**, अ० हातचे हातीं.

**हातोळा**, पु० हतवळा.

**हात्यार**, **हात्येर**, न० हत्यार.

**हात्यारबंद**, **हात्येरबंद**, अलिं० हतेरबंद.

**हांदा**, पु० कों० हरजीक.

**हांदुळणें**, आंदुळणें; २, फळें, इ० पडणें;

इत्यादर्थ वृक्षादिक ओचक्याने हालविणें.

**हांदेकरी, हांदेलकरी,** पु॰ कों॰ परस्परें जाणीं हांदा केला आहे ते परस्पर.

**हानि,** स्त्री॰ सं॰ नाश.

**हापटणें,** कों॰ आपटणें.

**हाबकणें,** हबकणें.

**हायका,** पु॰ रा॰ हबका प्रथमार्थी.

**हार्मी,** स्त्री॰ हर्मी.

**हार्मादार,** पु॰ हर्मादार.

**हाय,** अ॰ खाज, संताप, इ॰ जन्यजें अंगीं दुःख असतें त्याचा खाजविणें, वारा घेणें, इ॰ संबंधानें प्रतीकार होऊंलागल्यास्मणजें जो सुखानुभव होतो त्याचा उद्गार; २, शरीरास किं॰ अंतःकरणास कांहीं दुःसह वेदना झाली असतां त्या दुःखाचा हा उद्गार आहे; ३, स्त्री॰ मुलांचें भाषेनें तिखट, अग्नि, शस्त्र, श्वान, इ॰ कांस म्ह॰; कोणेकानें हाय खाणें किं॰ घेणें, म्ह॰ धास्त घेणें.

**हायसा,** ३लिं॰ रा॰ संसार, इ॰ संबंधी ओझें, दारी, कारागृह, इ॰ रूप दुःखदायक जें प्रतिबंध त्यांपासून सुटल्यामुळें सुखरूप झाला जो तो; उ॰ त्या दारींतून अंमल बाहेर आलों तेव्हां हायसा झालों; कोणेकास हायसें वाटणें म्ह॰ त्याणें हाय असा सुखोद्गार निघायाजोगें दुःखप्रतिकारद्वारा सुखानुभव विशिष्ट होणें.

**हायहाय,** अ॰ कांहींएक झालेलें पाहिलें असतां किं॰ ऐकिलें असतां किं॰ मनांत आलें असतां हा उद्गार निघतो.

**हायहूय,** स्त्री॰ शरीरास कांहीं असह्य वेदना यास झाली असतां जे कांहीं हायहूय, इ॰ अनेक प्रकारचे दुःखोद्गार निघतात तीं.

**हाया,** अ॰ रा॰ हाय प्रथम द्वितीयार्थी.

**हायाहूया,** अ॰ रा॰ हायहूयरूप जो दुःखोद्गार त्याचें अनुकरण.

**हार,** पु॰ रत्नें, पुष्पें, इ॰ कांचा भूषणार्थ गळ्यांत घालावयाकरितां जी माळा करितात ती; २, रेशमाच्या नाड्या एकत्र ओंवून माळसारिख्या करितात जो आकार तो, ३, सं॰ नाशक; ४, स्त्री॰ एका ठाणानें लागलगलेली जी अनेक पदार्थांची पंक्ति ती; ५, पु॰ द्व, वाद, खेळ, इ॰ कांचे ठायीं येतो जो पराजितपणा तो; कोणेकानें हार खाणें म्ह॰ जिंकला जाणें.

**हारक,** ३लिं॰ सं॰ हरण कर्ता जो तो; दुःखहारक, रोगहारक, पित्तहारक, इ॰ रा॰

**हारणें,** हरणें.

**हारपणें,** हरपणें.

**हारवणें,** हरवणें.

**हारसरणें,** अ॰ रा॰ हारसडीस आणणें

**हारसडीस,** अ॰ रा॰ हें शेवटास कसें जाईल, हें कसें आटोपेल, याचा निर्वाह कसा होईल, असें वाटायास कारण असें जें कोणेक गोष्टीचे अंगीं अफाटपणा, मंदत्वपणा, इ॰ धर्म असतांत ते क्रमें करून कर्मी होत गेल्यामुळें आतां हें आटोपांत आलें असें

असें वारावाजोगे अवस्थेस येणें, आणणें, इ० धातूंचे योगीं प्र०; उ० एक वर्षाचें लिहिणें तुंबलें आहे सारा गोंधळ झाला आहे एथडें हारसडीस आणून दे मगमी शेवटास नेईन.

हारा, पु० हरा.

हाराष, पु० हराष.

हारास, पु० हराष.

हारीं, अ० कों० कडे; शूद्रभाषारीति; उ० तो शेताहारीं गेला: त्याहारीं माझे दहा रुपये आहेत.

हारी. ३लिं० सं० मनोहर; २, जो जातें हरितो तो नहारी; पापानें हरितो तो पापहारी, दुःखहारी, इ० स०प्र०

हारेमोहरे, हारेमोहरेस, हारेझोरे, हारेझोरेस, अ० मनुष्यादि कोणेकाचे समोरचे किं० आजूबाजूचेप्रदेशीं उभें राहणें, टिकणें, इ०क्रांचेयोगीं निषेधविषयीं प्र०; उ० मी एकवेळ त्या पोरास मार दिला तेव्हांपासून तोमाझे हारेमोहरे उभाराहत नाहीं; त्याशीं व्यवहार करूं म्हणतां पर तो सोदा आहे त्याचे हारेझोरेस तुम्ही उभे राहूं नका.

हारोहार, अ० मध्यें विजातीयानें व्यवधान किं० विच्छेदन होतां एक सारख्याक्रमानें, कोणेक क्रिया होत जाणें किं० कोणेकानें असणें, इ० क्रांचें वि०; उ० या षायकोस हारोहार चारखेपा मुलीच झाल्या.

हार्द, न० सं० कोणेकाचे आंतीलजो अभिप्राय तें.

हार्द्द, न० हार्दशब्दाचा अपभ्रंश.

हाऱ्यामोऱ्यास, अ० हारेमोहरे.

हाल, पु० आपदा; प्र० अनेक व०; २, अ०हली.

हालअपेष्टा, स्त्री० नानाप्रकारचे हालती.

हालचाल, स्त्री० चळवळ.

हालणें, कोणेक पदार्थानें एके विभागेंकरून आधाराशीं संबधअसून इतरविभागीं इतस्ततः चलित होणें; २, अधिष्ठितआधारापासून कोणेक अर्थानें इतस्ततः चलित होणें; ३, हलकलणें.

हालतानारळ, पु० कों० हालविलाअसतां आंतील पाणी वाजतें असा जो नारळ तो.

हालमस्त, ३लिं० दारिद्र्यमूलक आपत्तिअसूनही जाचेआंगीं ताठा बहुतअसतो असा जो मनुष्य तो; ह्य० हालमस्त कीं मालमस्त.

हालवा, पु० हलवा प्रथमार्थी.

हालवेंद्रा, ३लिं० रा० ज्याचेअंगीं आवरशाक्ति नाहीं असा जो मनुष्य तो.

हालहवाल, पु० हालअपेष्टा; फोज, इ०कानें हालहवाल होणें म्ह० हालहवालानें विशिष्ट होणें.

हालहूल, स्त्री० रोगदुःपद्रव, राजक्रांति, इ० कारणानें होत्येजी गडबड ती.

हालाहल, न० सं० देवदैत्यांनीं पूर्वीं समुद्रमंथन केलें तेव्हां त्यापासून उत्पन्न

झालेंजें विषतें; २, सर्पादिकांचें उग्रजें विष त्यास ह्म०

**हालीं**, अ० हल्लीं.

**हालीमाजी**, स्त्री० राजादिकांचे कारकीर्दींचें होतेंजें नवेंजुनें तें.

**हालोहाल, हालोंहाल**, अ० हातचेहातीं.

**हाल्या**, पु० हल्या.

**हाल्लीं**, अ० हल्लीं.

**हाव**, पु० सं० श्रृंगाररसाच्या अंगीं आवेश झाल्यामुळें जा चेष्टा होतात ते.

**हांव**, स्त्री० हवाशी; २, खर्चवेच करणें, इ० विषयीं कोणेकास असतो दम तो; उ० हजार रुपये खर्चीत अशी त्याची हांव आहे; हांवेस भरणें ह्म० तवंगास भरणें.

**हांवभरीहोणें**, दे० रानभरीहोणें.

**हावभाव**, पु० अभिनय आणि नेत्रेंकरून व्यंजित होतात जे रसाचे भाव ते.

**हावर**, पु० कों० गळ, फांड, इ० कास धरतो जो दोर तो.

**हावरा**, ३लिं० कितीही मिळालें तथापि अणखीं हवेंच असें इच्छिण्याचा स्वभाव ज्याचा तो; २, पु० पांढरा जो तीळ तो.

**हावा**, ह्वावा.

**हांशा**, पु० कों० दशाप्रथमार्थी; २, एक झाड आहे.

**हांशील**, न० हशील.

**हांसडणें**, रा० हंसणें.

**हांसडा**, पु० रा० प्राणोत्क्रमणाचेसमयीं सर्वांगास हिसके बसायाजोगा लागतो जो मोठा श्वास तो; २, आंसडा.

**हांसणें**, हसणें.

**हांसरा**, ३लिं० हंसरा.

**हांसळी**, स्त्री० हंसळी.

**हांसूं**, न० हंसूं.

**हांसें**, न० हसें.

**हास्य**, न० सं० हंसें; २, एतद्रूपच नवरसांतील एक रस आहे; ३, मुखविकसित व्हावयाजोगा जो कोणेकाचे अंगीं विकारविशेष होतो तें; ४, उपहास.

**हास्यमुख, हास्यवदन**, ३लिं० ज्याचें निरंतर हास्ययुक्त मुख असतें असा जो तो किं० कांहीं कारणानें हास्ययुक्त झालें मुख ज्याचें तो.

**हांहां**, अ० कांहींएक कार्याविषयीं प्रश्न जो कोणी त्याला मागेंसर असेंजें ह्मणायाचें त्या अर्थाचें द्योतक हें अव्यय; हांहां ह्मणतां हांहां ह्मणें तों, इ० स्थलीं हातचेहातीं असा अर्थ.

**हाहाकार**, पु० सं० कांहीं महासंकट प्राप्त झाल्यामुळें किं० शोकादिकारणामुळें हाहा असा दुःखोद्गाररूप शब्द करितात तो; कांहींएक पदार्थाचा हाहाकार होणें, पडणें, ह्म० तो तो पदार्थ दुर्मिळ झाल्यामुळें हाकार पडणें; उ० दोन महिने पावसानें ओढ दिल्यानें चोहोंकडे पाण्याचा हाहाकार पडला.

हाहा:कार, पु॰ हाहाकार शब्दाचा अपभ्रंश.

होंहूं, न॰ कोणेकानें भय मानावें किं॰ कर्तव्य कार्य त्वरेनें यथास्थित करावें किं॰ मी जागृत आहें असावध नाहीं, इ॰ जाणावें इत्याद्यर्थ थोडा बहुत जो शब्दव्यापारादि व्यापार तें.

हाळ, पु॰ दे॰ अनेक गुरांनीं पाणी प्यावें एतदर्थ चुना, दगड, इ॰ कांनीं बांधून करितात जी लांबट टांकी ती.

हिंकुणें, रा॰ अन्नादि भक्षणें. निंदार्थनिष॰

हिकडचा, हिकडला, हिकडील, ३लिं॰ इकडचा.

हिकडणें, अ॰ इकडणें.

हिकडून, अ॰ इकडून.

हिकडूननिकडून, अ॰ इकडूननिकडून.

हिकडे, अ॰ इकडे.

हिकडेतिकडे, अ॰ इकडेतिकडे.

हिकमत, स्त्री॰ कोणेक कर्मकरण्याविषयींची जी युक्ति ती.

हिकमती, ३लिं॰ अनेकहि कमती ज्याचे अंगीं आहेत तो.

हिकमत्या, ३लिं॰ हिकमती.

हिंका, पु॰ रा॰ हुंका.

हिंकेखोर, ३लिं॰ हुंकेखोर.

हिक्का, स्त्री॰ सं॰ कोणेकास लागत्येजी उचकी ती; २, पु॰ दे॰ हुंका.

हिकेखोर, ३लिं॰ हुंकेखोर.

हिंग, पु॰ मसाला; फोडणी, इ॰ कांत घालायाचे उपयोगी एक झाडाचा चीक आहे, ज्याला विलक्षण वास येत असतो तो; हिंगाचें पातें म्ह॰ जवळ तादृश द्रव्य नसतां हा द्रव्यवान् असा ज्याचा लोकांत भ्रम आहे त्यास म्ह॰; कोणेकानें हिंग हगणें म्ह॰ दुखण्यामध्यें पचत पडणें; हिंगातुपास, हिंगाधुपास, हिंगाधुपारी, हिंगाधुपारवाली जाणें, उडणें, इ॰ स्थलीं हिंग, धूप, इ॰ किरकोळ जिनसांकडे कांहींएक द्रव्यादिकानें खरचलें जाणें.

हिंगडा, पु॰ एक हिंगामध्यें जाति आहे; २, वाईट जो हिंग त्यास कोणी म्ह॰

हिंगण, पु॰ ग्रं॰ एक वृक्ष आहे; उ॰ कल्पतरु आणि बाभूळ हिंगण आणि मयलागर.

हिंगणबेर, न॰ हिंगणबेरीचेंजें फल तें.

हिंगणबेरी, स्त्री॰ एक झाड आहे.

हिंगरूड, न॰ रा॰ हिंगुरडें.

हिंगपाणी, न॰ हिंगाचेंजें पाणी करित असतात तें.

हिंगु, पु॰ सं॰ एक वृक्ष आहे; २, त्याचा जो चीक तो ज्यास हिंग म्ह॰

हिंगुरडें, न॰ शरीरावर कांहीं क्षत झालें असतां हिंग खाल्ला किं॰ क्षतास हिंगाचा स्पर्श झाला असतां त्या क्षताचे अंगीं जो मांसग्रंथि होतो तें.

हिंगुळी, ३लिं॰ हिंगूळसंबंधी जो रंग, रसायन, पारा, इ॰ तो.

हिंगुळूक, हिंगळूक, पु॰ रा॰ हिंगूळ.

हिंगू, पु॰ हिंगो.

हिंगूळ, पु॰ पाऱ्याचा एक संधा आहे.

**हिंगे**, अ॰ हंगे.

**हिंगेतिंगें**, अ॰ हंगेनंगे.

**हिंगो**, पु॰ दारवविणें धातुचेयोगी म॰; कोणाका-स चोदी देणें.

**हिंचमिचणें**, रा॰ एक लक्ष्य लावून कांहीं एक काम करीत असतां किं॰ दाटीनबसलें अ-सतां विसांवा येणें, आंग मोकळें करणें, इत्याद्यर्थ इलरलल; जें चलनवलन नहि-शिष्ट होणें; उ॰ यादाटीत कसेंबसावें अम-ळ हिंचमिचें नसरलेंतर जागा नाहीं.

**हिंचुटा**, ३ लिं॰ कों॰ हिमटा.

**हिजडा**, पु॰ अनेक नपुंसक मिळोन एक जाति सारिखा समुदाय सजल्या आहे त्या समुदायांतला झालेला जो पुरुष वेष धारी नपुंसक तो; २, ला॰ बीभत्सभाषण कर-णारा निर्लज्ज असा जो मनुष्य त्यास आ-रोपानें म्ह॰

**हिजडी**, स्त्री॰ हिजड्यानें स्त्रीवेश धारण केला असतां त्यास म्ह॰

**हिजडें**, न॰ रा॰ हिजडा आणि हिजडी यांस सामान्यतः म्ह॰

**हिजरी**, ३ लिं॰ यवनी सनाचें चि॰

**हिडगा**, ३ लिं॰ टचाळ.

**हिंडणवारे**, पु॰ लों॰ उद्योग सोडून रिकामप-णें हिंडण्याचा जो व्यापार तो.

**हिंडणें**, मनुष्यादिकांनीं इकडून तिकडे, तिकडू-न इकडे, अशा रीतीनें फिरणें.

**हिडशा**, ३ लिं॰ कों॰ हिडीस प्रथमार्थी.

**हिडसणें**, कोणेकानें कोणेकास धिक्कारणें.

**हिडसा**, ३ लिं॰ रा॰ हिडशा.

**हिडसावणें**, हिडसणें; २, कोणेक पदार्थ हिडिस करून टाकणें; उ॰ थोडी सारी हिडसावून टाकली किंवा वेत्यानें.

**हिडीस**, ३ लिं॰ ओंगळ; २, न॰ कों॰ कोणेक स्थलीं मल, मूत्र, केरकचरा, उष्टें माष्टें, इ॰ रूपजी घाण पडली असल्ये तें.

**हिडूस**, ३ लिं॰ रा॰ हिडीस.

**हिंडोल**, पु॰ गानांतील एक राग आहे.

**हिणकर**, ३ लिं॰ रा॰ हिणकसजें रूपें तो आ-णि तन्निर्मित पदार्थ तो.

**हिणकस**, ३ लिं॰ धात्वंतरमिश्रभावानें बीघ-डला गेला जो रूपें किं॰ सोनें एतद्रूप धातु तो आणि त्याचा केला जो अलंकारादि पदार्थ तो.

**हिणगें**, न॰ कों॰ शिपनगरसारखें एक जंगपा-त्र आहे.

**हिणचट**, ३ लिं॰ रा॰ हिणकर.

**हिणवणें**, हिणावणें.

**हिणवर**, पु॰ बायकोपेक्षा दिसण्यांत अधीर असा दिसतो जो दादला तो; २, न॰ बायको-पेक्षा दादला अधीर दिसूं लागला असतां त्यां-चे दांपत्यसंबंधास दिसतें जें वैषम्य तें.

**हिणावणें**, कोणेकाचे अंगीं जो उणेपणा अस-तो तो भाषणादिद्वारा बाहेर काढून त्यास ल-जविणें.

**हिण्यावणें**, रा॰ हिणावणें.

**हित**, न० कांहींएकापासून द्रव्यलाभ, दुःखनिरास, इ०रूप आपलें होतेंजें बरें तें; २, ज्याचे योगानें तें बरें होतें तो; हितकारक. हितकारी, हितावह, इ०स०

**हितचा**, ३लिं० इथचा.

**हितनें**, अ० इथनें.

**हितपर्यंत**, अ० इथपर्यंत.

**हितला**, ३लिं० इथला.

**हितवर**, अ० इथवर.

**हितून**, अ० इथून.

**हितें**, अ० इथें.

**हितोपदेश**, पु० कोणकास कोणी हितविषयक जो उपदेश करितो तो.

**हिदकळणें**, हिसळणें.

**हिंदवानी**, ३लिं० हिंदवी.

**हिंदवी**, ३लिं० हिंदुसंबंधीजी भाषा, रीति, वेष, गान, इ० तो.

**हिदहिदणें**, हिदहिदीत होणें.

**हिदहिदा**, ३लिं० हिदहिदीत.

**हिदहिदीत**, ३लिं० बिलबिलीत झालेंजें गर्भ, इ० उदाण किं० आंबा, इ० फल तो.

**हिंदुस्थान**, न० ज्यामध्यें पूर्वापर हिंदूलोक रहात आले असा पश्चिमेकडे सिंधुनद, उत्तरेकडे हिमाचल, पूर्वेकडे आणि दक्षिणेकडे समुद्र, या अवधीचे मधला जो देश तें परंतु नर्मदेचे उत्तरेस ऐशान्यी पूर्वापश्चिमजो मथुरा, वृंदावन, दिल्ली, आगरें, इ० ग्राम ज्यामध्यें असा जो देश तद्विषयीं विशेषेंकरून म०

**हिंदुस्थानी**, ३लिं० हिंदुस्थानसंबंधी जो मनुष्य, भाषा, वेष, इ० तो.

**हिंदुळा**, पु० चोपाळा.

**हिंदू**, पु० पुरुषव्यक्तिमात्रास शेंडी आणि कर्णवेध हे धर्म ज्याजातींत नियत आहेत अशीजी ब्राह्मण शूद्रादि अनेक अवांतर जातीनीं विशिष्ट मनुष्यजाति तो.

**हिंदोळा**, पु०को० चोपाळा; २, ग्रं० झोंपाळा, इ०संबंधीजो झोंका तो.

**हिम**, न० बर्फ; २, हींव; ३, पु० न० औषधि पदार्थ भिजत घालून तदंश विशिष्ट औषधार्थ घेतातजें पाणी तें; ४, थंडजो स्पर्श किं० तद्विशिष्ट पदार्थ तो.

**हिमज्वर**, पु० प्रथमतः थंडीभरून अनंतर जो ज्वर येतो तो.

**हिमरा**, ३लिं० भक्ष्यादिपदार्थ ज्याचानें कोणासहीपाहिजे तितका घालवत नाहीं किं० देववत नाहीं अशोस्वभावाचा जो मनुष्य तो.

**हिमट्या**, ३लिं० हिमरा.

**हिंमत**, स्त्री० कोणक कार्य करण्याविषयीं कोणाचे अंतःकरणांत असतीजी धमकनी; स० हिंमत मर्दा तर मदत खुदा.

**हिंमतदार**, ३लिं० ज्याचे अंतःकरणांत मोठी हिंमत आहे तो.

**हिमती**, ३लिं० हिंमतदार.

**हिमतीचा**, ३लिं० हिमती.

**हिमवंत**, पु० हिमालय.

**हिमवान्**, पु० हिमालय.

**हिमळ**, ३लिं० मिष्टनाह्मणूनजी गोडी ती ज्याचे अंगीं थोडी असाजो अंबा, फणस, इ० फळ, पाणी, इ० पदार्थ तो; उ० पाणी मुळचें गोड जरी असलें तरी तापवून निवविलें ह्मणजे हिमळ लागतें.

**हिमाइति**, ३लिं० हिमाईतदार.

**हिमाईत**, स्त्री० लोकांनीं मानावें, भय वागवावें, असें वजन पडायास कारणीभूत कोणेकास कोणेक समर्थाचा असतो आश्रय तद्रूपजें बळ ती.

**हिमाईतदार**, ३लिं० कोणेकाची हिमाईत आहे जास तो.

**हिमाचल**, पु० हिमालय.

**हिमायत**, स्त्री० हिमाईत.

**हिमायतदार**, ३लिं० हिमाईतदार.

**हिमायती**, ३लिं० हिमाईतदार.

**हिमालय**, पु० या भरतखंडाचे सीमेवर उत्तरेस एक मोठा पर्वत आहे.

**हिय्या**, पु० कोणेक अवघड कार्याचेठायीं प्रवृत्ति नहोण्यास प्रयोजक जीं भय, लज्जा, निर्बलता, इ० प्रतिबंधकें तीं नगणितां त्याकार्यीं प्रवृत्तिहोण्याविषयीं अंतःकरणाची करितातजी दृढता ती.

**हिय्येदार**, ३लिं० ज्याचेअंगीं हिय्या आहे तो.

**हिय्यो**, अ० ग्रा० नांगरास बांधलेले बैल समोर चालत असतां त्यांस वळणघेऊन फिरायाचे इशाऱ्याचा हाशब्द आहे.

**हिरकणी**, स्त्री० लहानजो हिरा ती.

**हिरका**, पु० कों० कांद्याचे अंगीं जो कांहीं स्वाभाविक अपक्व असतात ते प्रत्येक; २, ग्रा० एकाद्या वस्तूवर पोळी, इ० कांचा पांढरा रंग ज्यांनी भिन्नभिन्न झाले असतात जे अवयव ते प्र०

**हिरकूट**, न० हिराळा निंदेनें ह्म०; २, पु० कों० हिराळा ह्म०

**हिरडा**, पु० हरडा.

**हिरडी**, स्त्री० जेथें दांत उगवतात असें जें मुखांत दोन अवयव आहेत ते प्र० किं० त्यामध्यें दांत उगवायाचीं जीं निरनिराळीं स्थानें तीं प्र०

**हिरण्य**, न० सं० सुवर्ण ह्मणून जो धातु तें.

**हिरमुसणें**, कोणेक कर्माचेठायीं होशीनेंजो पावत असतां त्यास कोणी दुर्भाषणादि केल्यामुळें त्याणें तो होस सोडून विरस होणें.

**हिरमुस**, ३लिं० कांहीं कारणानें हिरमुसलाजो तो.

**हिरमोड**, पु० स्त्री० कांहींएक कार्याविषयीं धरिला असतोजो उत्साह त्याचा कांहीं कारणामुळें होतोजो भंग तो; २, ३लिं० ग्रा० एकभागाचाजो हिरवा तो.

**हिरळी**, स्त्री० ग्रा० विरळी.

**हिरळें**, न० ग्रा० विरळें.

**हिरवट**, ३लिं० ग्रा० एकभागचाजो हिरवा तो.

**हिरवटाण**, स्त्री० हिरवटजी घाण ती.

**हिरवंडा**, ३लिं० इषत हिरवाजो मडकें इ० पदार्थ तो; २, कोणेक पदार्थास येतोजो हिरवट वास त्याचें वि०

**हिरवस**, ३लिं० पुरता परिपक्व झालेला नव्हे

जो कोणेक पदार्थ तो आणि तत्संबंधीजो वास किं॰ रुचि तो.

हिरघळ, स्त्री॰ कों॰ हिरव्या लहान तृणादिकां चा जो समुदाय ती; उ॰ पाऊस पडूं लागला ह्मणजे आषाढांत सर्वांकडे हिरघळ होत्ये.

हिरवा, १लिं॰ पाच, शेवाळें, कोमल तृण, इ॰ कांचे रंगासारिखा जो रंग तो आणि त्या रंगानें विशिष्ट जें पर्ण, फूल, काष्ठ, वस्त्र, इ॰ पदार्थ तो; २, परिपक्क झालेलें नव्हे असें जें फल, पर्ण, धान्य, भांत, भाकर, भाजी, इ॰ अन्न, मडकें, बुद्धि, तद्विशिष्ट मनुष्यादि इ॰ तो; ३, तत्संबंधीजो वास किं॰ रुचि तो; ४, संकेतानें भांग, गांजा, घांस किं॰ त्यांनें सेवणारा जो त्यास ह्म॰; ५, कोणाशीं मिळून रहावाचा नव्हे, शीघ्रकोपी, तुरक, जो मनुष्य त्यास ह्म॰

हिरवें, न॰ गुरें, इ॰ कांस भक्षायाजोगें हिरवेंजें तृणादिक तो.

हिरंहिरी, स्त्री॰ हिरिरी.

हिरा, पु॰ एक शुक्लवर्ण महारत्न आहे.

हिराकस, पु॰ रंगास उपयोगीं एक पदार्थ आहे

हिरामण, पु॰ पोपटांत एक भेद आहे.

हिरावणें, कोणेकापासून, द्रव्य, वस्त्रादिपदार्थ कपटानें किं॰ बलात्कारानें घेणें.

हिराहिंग, पु॰ चकचकित असतो असाजो फार चांगला हिंग त्यास ह्म॰

हिरिरी, स्त्री॰ कोणेक कार्य करण्याविषयीं कर्त्याचे अंगीं एकेक प्रयत्नानें उत्पन्न झाला असतोजो वेग ती; उ॰ एथून श्री फौज निघाली तीणें पहिल्या हिरिरीसरसें किल्ला घेतला. कोणाचे हिरिरीबरोबर मी एखादा वाईट शब्द बोललों असेन.

हिरीरी, स्त्री॰ हिरिरी.

हिरून, अ॰ हिरावून.

हिरेखाण, स्त्री॰ हिरे जेथें उत्पन्न होतात ती खाण.

हिरेदिवे, पु॰ मकरसंक्रांतीचे दिवशीं स्त्रिया ब्राह्मणांस दोनदीप व दोन आदर्श मिळून जें दान करितात ते.

हिलगड, स्त्री॰ कों॰ देणें, घेणें, इ॰ व्यवहारांतली भानगड ती.

हिलगडणें, कों॰ कोणेक कार्य सिद्धीस न जाऊं देतां अडथळून पाडणें.

हिलगणें, कों॰ हिलगडणें; २, दोर, काष्ठ, इ॰ कांहीं एक पदार्थ कोणेक आधाराशीं सरासरी गुंतवून ठेवणें.

हिलणें, को॰ हालणें.

हिलारी, स्त्री॰ दे॰ प्रा॰ हिरिरी.

हिलाल, पु॰ उत्साहादिकांचे ठायीं प्रकाशार्थ भींत पलिते, इ॰ पाळून पाजळायासाठीं एका काठीचे अग्रास जें पणतीसारिखें लोखंडाचें पात्र संबद्ध केलें असतें तो.

हिलालत्या, पु॰ हिलाल जाणें धरिला आहे तो.

हिल्ला, पु॰ धनी, सावकार, इ॰ कांहीं सोईनें मागावें तें न मागतां डाऊगाई, कांगावे, कुभांडें,

इ० रूप जा लबाडया कोणी करितो तो; २, प्रपंचा-दिकार्य निर्वाहाविषयीं कोणेकास कोणेकाचा अ-सतोजो आश्रय तो.

**हिल्लाहरकत**, स्त्री० हिल्ला-हरकत, इ० ती.

**हिँवज्वर**, पु० हिमज्वर शब्दाचा अपभ्रंश.

**हिँवडणें**, कों० हुडहुडणें.

**हिँवडी**, स्त्री० कों० हुडहुडी.

**हिँवणें**, कों० हिंवानें व्यथित होणें.

**हिँवताप**, पु० हिमज्वर.

**हिँवर**, पु० एक झाड आहे.

**हिँवर**, स्त्री० रा० पर्जन्य पडत असतां वायूचे झपा-ट्यानें गृहादिकांत प्रविष्ट होतोजो तुषार समुदाय ती.

**हिँवसणें**. हिरमुसणें. प्र० संकुचित, १, कोणेक पदा-र्थानें हिंवसेचा योगानें सरदणें.

**हिँवसा**, त्रलिं० संतप्तता ज्याचे अंगीं नाहीं अतए-व थंड जो तो.

**हिँवसाण**, स्त्री० रा० सरदीचे योगानें बिगडलाजो वस्त्रादिपदार्थ त्यासजो एकप्रकारचा वाईटवा-स येतो ती.

**हिँवाडी**, स्त्री० हिंवडी.

**हिँवाळा**, पु० हेमंत, शिशिर, एतत्संबंधी थंडीचेजे दि-वस तो.

**हिँवाळी**, स्त्री० कों० हिंवाळा.

**हिशेब, हिँशेब**, पु० एक जी विशिष्ट संख्या तीतू-न अवांतर संख्या निरनिराळ्या काढाव्या किं० अनेक जा पृथक् पृथक् संख्या त्या एकत्र करून विशिष्ट संख्या करावी असा जो संख्या व्यवहार त्याची सिद्धि सोकर्येकरून व्हावी म्हणून गुणाका-र, इ० अनेक युक्ति बुद्धिमंतानी करून ठेविल्या-आहेत तो आणि त्यांकरून सिद्ध होतें तें संख्ये-ची इयत्ता म्हणून फल तो; २, ला० न्याय मार्गाची रीति तो; ३, गणती द्वितीयार्थी.

**हिशेबकितेब**, पु० हिशेब, इ०

**हिशेबी**, त्रलिं० हिशेब करण्याविषयीं कुशल जो का-रकून, इ० तो; २, हिशेब संबंधी जो कागदपत्र, इ० तो; ३, ज्यामध्यें अधिक उणें यत्किंचित ही नाहीं असा बेताबाताचा जो करणें, इ० व्यवहार तो.

**हिशोब**, पु० हिशेब.

**हिशोबी**, त्रलिं० हिशेबी.

**हिँसक**, त्रलिं० सं० हिंसा करण्याचा स्वभाव ज्या-चा तो.

**हिसकणें, हिँसकणें**, दोर, वस्त्र शस्त्र मनुष्या-दिकांचा हस्तादि अवयव इ० ओढक्यानें वि-शिष्ट करणें; २, कोणेकानें कोणेक काम फिस-कटे असें करणें; ३, कोणाएकापासून द्रव्यादि हिसडणें.

**हिँसका**, पु० ओढका; २, हबका प्रथमार्थी; ३, झ-लपटा; ४, घडायास आलेलें जें कोणेक काम त्यास कोणेक विघ्नसंबंधानें पडतोजो अडथळा ता.

**हिसकावणें**, कोणेकापासून वस्त्रालंकारादि पदा-र्थ बळानें हिसका देऊन किं० कपटानें ओढणें.

**हिँसडणें**, हिसकणें.

**हिँसडा, हिसडा**, पु० हिसका प्रथमार्थी.

**हिँसडी**, स्त्री० कों० हिंसडी.

**हिसणें, हिँसणें**, अश्वानें खंकाळणें.

**हिंसणें**, प्र० कोणेकास जिवें मारणें.

**हिसळणें, हिँसळणें**, पात्रस्थित जो उदकादि पदा-र्थ त्याणें धक्का, इ० बसल्यामुळें वर उसळणें;

पक्षीं त्या पात्रास कर्तृता.

**हिसा, हिंसा**, पु॰ कोणेक अर्थाचे अनेकजे वांटे ते प्र॰

**हिंसा**, स्त्री॰ सं॰ मनुष्यादि जीवांचाजो वध ती; २, ३ लिं॰ हिंवसा.

**हिंसाडणें**, हिंसडणें.

**हिंसाडा**, पु॰ हिंसडा.

**हिंसाडी**, स्त्री॰ हिंसडी.

**हिसाब**, पु॰ हिशेब.

**हिसाबकिताब**, पु॰ हिशेबकिताब.

**हिसाबी**, ३ लिं॰ हिशेबी.

**हिंसेदार, हिसेदार**, पु॰ वांटेली.

**हिसेरशी, हिंसेरशी**, स्त्री॰ विभागायाचा अर्थ आणि विभागांचीं संख्या तेच भाज्य आणि भाजक कल्पून त्रैराशिकरीतीनें विभाग करण्याचा जो प्रकार ती व त्याप्रकारानें झालीजी एकएकाची भिन्नभिन्न वांटणी ती.

**हिंस्त्र**, ३ लिं॰ हिंसा करण्याचा स्वभाव ज्याचा असा जो व्याघ्र, सिंहादि प्राणी, किं॰ व्याध, हालदी, इ॰ कोणी तो.

**हिस्सा**, पु॰ हिसा.

**हिस्सेदार**, पु॰ हिसेदार.

**हिहिही**, अ॰ हंसण्याचे शब्दाचें अनु॰; निंदेविषयीं प्र॰

**ही**, अ॰ कोणेक विधानार्थ कोणेक अर्थाचा निर्देश करून तत्सहवर्तमानच अर्थांतराचा निर्देश करावा असाजो विवक्षेचा विषय त्याचें द्योतक हें अव्यय; त्या अर्थांतरांपुढें किं॰ प्रत्येकीं सर्व अर्थांपुढें याचा प्र॰ होतो; २, देखील.

**हीड**, स्त्री॰ कों॰ वळवण.

**हीण**, न॰ सुवर्णादि धातूंमध्यें ताम्रादिकांचाजो मिश्रितांश असतो तें; २, लोकांनीं हिणवाया जोगेंजें हीनत्व येतें तें; ह्म॰ हीण फिटेलपण हीण फिरत नाहीं.

**हीन**, ३ लिं॰ सं॰ विवक्षित तद्गुण धर्मादिकांनीं रहित किं॰ विवक्षितापेक्षां न्यून तो; २, नीच हलकेंजें कर्मादि तो.

**हीर**, पु॰ माड, पोफळ, इ॰ कांचे पातीचेमध्येंजी काडी असते ती; २, हिरका.

**हीरक**, पु॰ सं॰ हिरा.

**हींव**, न॰ स्पर्शवेद्य जी थंडी तें; २, हिमज्वर.

**हुंऊं**, अ॰ ऊंहूं याचा प्रतिपक्षी.

**हुकणें**, विवक्षित पदार्थावर मारायाचा जो गोटा, धोंडा, इ॰ पदार्थ त्याणें त्यात्या पदार्थीं न लागता असा चुकणें किं॰ तो न लागल्यामुळें त्या प्रहारानें व्हायाचीजी कांहींएक संज्ञा तीणें न होणें आणि प्रहारकर्त्यानें ही त्या चुकीनें विशिष्ट होणें.

**हुकमत**, स्त्री॰ कोणकाचा हुकूम कोणकावर चालावा असें जें कोणकाचे अंगीं स्वामित्व असतें ती.

**हुकमती**, ३ लिं॰ ज्याचे हुकमतींत वागणारा जो तो त्याचा.

**हुकमा**, अ॰ हुकूम केला असतां जसें व्हावें. करावें तसें; होणें, करणें; इ॰ कांचें वि॰; परंतु त्या होण्याकरण्यास अनिच्छा असतां प्र॰; उ॰ पाऊस नको असें ह्मटलें असतां हुकमा पडतो.

**हुकमी**, ३ लिं॰ हुकमती.

**हुकमें**, अ॰ हुकमा

**हुकार**, पु० यवनी संप्रदायानें कागदपत्र इ० लिहावयाचें असतां प्रथम वरजी थी लिहायाची त्या स्थानीं हू असें जें अक्षर काढितात तो; २, हुंकार.

**हुंकार**, पु० कोणी काहींएक गोष्ट सांगत असतां किं० विचारली असतां करितात जो हूं असा शब्द तो.

**हुंकार**, पु० कोणेकास दटावत्येसमयीं जो हूं असा शब्द करितात तो.

**हुंकारा**, पु० कों० कोणी काहींएक गोष्ट सांगत असतां जो मध्यें मध्यें हूं असा शब्द ऐकणारे करितात तो.

**हुकी**, स्त्री० कोल्ह्याचा जो स्वजातीय शब्द ती; २, काहींएक कार्य करण्याविषयीं कोणेकास येत्ये जी उत्कलिका ती.

**हुकूम**, पु० हिं० आज्ञा; २, गंजिफांचे पानांत चोरनव्हे असें खरें जें पान तो.

**हुकूमनामा**, पु० हिं० वादी प्रतिवादी यांचे वादाचा निर्णय झाल्यानंतर जो खरा ठरतो त्यास सर्कारांतून जें निर्णयपत्र करून देत असतात तो.

**हुकूमबंदा**, पु० हिं० जो आज्ञा हुकमती तो त्याचा.

**हुकेरी**, ३ लिं० हुकेरी ह्मणून एक गांव आहे तेथें उत्पन्न झालेला जो रुपयाचा शिक्का तो आणि त्या शिक्क्यानें पडलेला जो रुपया इ० नाणें तो.

**हुक्का**, पु० गुडगुडी.

**हुक्की**, स्त्री० हुकी प्रा० द्वितीयार्थी.

**हुक्केबरदार**, पु० हिं० हुक्का संभाळणें, भरून देणें, या कामावर ठेविला असतो जो मनुष्य तो.

**हुक्केबाज**, ३ लिं० हुक्का ओढायाचें व्यसन ज्यास लागलें असतें तो.

**हुंगणें**, कोणेक पदार्थ किं० तन्निष्ठ गंध आघ्रात करणें; २, ला० कोणेक गुप्त गोष्ट काहींएका लक्षणादिकावरून आणणें.

**हुंगाड्या**, पु० दे० हुंग्या.

**हुंग्या**, पु० कोणेक गोष्टीची बातमी गुप्तरूपें करून घेणारा जो राजदूतादिक तो.

**हुचमल्ली**, स्त्री० बुदबळाचे खेळांत प्यादेमातीचा एक भेद आहे

**हुचभाई**, पु० हुच्चा जो त्यास ह्म०

**हुच्चा**, ३ लिं० प्रपंचाचे खटल्याकडे ज्याचें अगदीं चित्त नाहीं खेळणें, बाना डाटणें, तमाशा पाहणें, दुसऱ्याचा कुचेष्टा करणें, इ० विषयांवर ज्याचें सर्वदा लक्ष्य अशा स्वभावाचा जो तो.

**हुजत**, स्त्री० कोणेकाशीं बोलण्याची सरळ रीति सोडून वांकड्यारीतीनें उगीच कोणी करितो जो वाद ती; २, शेतसारा इ० संबंधी कुळांस सर्कारांतून देतात जी पावती ती.

**हुजतखोर**, ३ लिं० हुजत करण्याचा स्वभाव ज्याचा तो मनुष्य.

**हुजती**, ३ लिं० हुजतखोर.

हुजरात, स्त्री० सरदाराचे दिमतीस न चा-विता सर्कारानें आपले खासगीकडे ठेवि-ली असत्ये जी फौज ती; २ ला० कोणापा-शीं असतात जीं दासदासी, शिष्य, खिज-मतगार, कुतरीं, मांजरें, इ० त्यांस म्ह०.

हुजराहुजूर, अ० समक्षासमक्ष.

हुजऱ्या, पु० राजा इ०कांजवळ जो खिजमतगार असतो तो.

हुजूर, अ० समक्ष; उ० माझे हुजूर तो असें बोलला; २, मुख्य सर्कारांत; उ० महालींचे कर धरले असतील ते हुजूर पाठवून द्यावे.

हुजूरपागा, स्त्री० खासपागा.

हुजूरपाग्या, पु० खासपाग्या.

हुजूरमामला, पु० सरदार इ०कांस सर्कारां-तून जे ग्रामादिक देतात त्यांत जो काहीं अंशतः सर्कारचा अंमल असतो तो.

हुजूरसनदी, ३ लिं० सर्कारसनदी.

हुटहुटणें, कोणेकानें हुटहुटीनें विशिष्ट हो-णें.

हुटहुटी, स्त्री० हुरहुर.

हुटहूर, स्त्री०पु० कोणेक गोष्टी विषयीं के-व्हां करीन, केव्हां होईल, केव्हां पाहीन, के-व्हां जाईन, इ०रूप जो भाव अंतःकरणां-त होतो जेणेंकरून ती गोष्ट तशी होईतों चित्त उद्विग्न असतें ती तो.

हुसाटणें, हुटहुटणें.

हुंड, पु० सुवर्णाचें अंगचा डाक इ० संबंधी मळ जावा म्हणून विटकर, मीठ, इ० द्र-व्यांचा त्या सुवर्णास लेप करून अग्नीची आंच द्यावी असा जो संस्कार करितात तो आणि तें मीठ, विटकर, इ० जें संस्कारक द्रव्य ती.

हुडकणें, धुंडणें.

हुडका, हुंडका, पु० रडें यावयाचे पूर्वी मोटां-नें रडूयाचा येतो जो उमडतो तो; २, गोमहि-ष्यादिकांचें अपत्य आपल्या आईस पि-ण्यास मर्यादा दुग्ध द्यावें म्हणून कांसेस करि-तें जो मुखानें प्रहार तो; ३, डोकी, बाहुमू-ळ इ०कें करून कोणेकास कोणी करितो जो प्रहार तो.

हुडकावणें, धुडकावणें.

हुंडकी, हुंडकी, स्त्री० हुंडका द्वितीयार्थीं.

हुंडणावळ, स्त्री० रुपये इ०कांची हुंडी घे-तली असतां त्याबद्दल बट्टा, खर्च, इ० सं-बंधीं जें सावकारास द्रव्य द्यावें लागतें ती.

हुंडया, पु० कों० मक्का प्रथमार्थीं.

हुडहुडणें, हुडहुडीनें युक्त होणें.

हुडहुडाजर, हुडहुडाताप, पु० कों० हिमज्वर.

हुडहुडी, स्त्री० जीचा योगानें शरीरास कं-प सुटावा, दांतखिळी वाजावी, हातपाय कांकडावे, असें ज्याचा योगीं जी शरीरांत अतिशयित थंडी भरत्ये ती.

हुडा, पु० ग्रं० किल्ला इ० संबंधी जो बुरूज तो; उ० मेरू ऐसे लंकेचे हुडे कैसा जा-ईल तया पुढें.

**हुंडा**, पु० मक्ता मथमार्थी; २, लग्नामध्यें वरा-डी, वरपक्षीयांस, जें वस्त्रालंकारादि याव-याचें त्या बद्दल उक्ती बोली ठरावून जें रो-कड द्रव्य मुलीचा बाप देतो तो; ३, भुंडा जो बैल इ० तो.

**हुंडाभाडा**, पु० कोणेक व्यवहारीं भाडें, जका-त, सारा, इ० खर्चीची निरनिराळी बोलीन करितां तो व्यवहार पत्करून घेण्याविष-यीं एकंदर करितात जी मक्ता तो.

**हुंडारणें**, दे० गो महिष्यादि पशूनीं आपल्या मस्तकें करून कोणेक मनुष्यादिकास-प-लीकडेस ढकलणें; २, जवळ प्राप्त झालेला जो मनुष्यादि कोणेक पदार्थ किं० कोणेक गोष्ट ती खिसगणतींत न आणतां आप-ल्यापासून दूर घालविणें.

**हुंडी**, स्त्री० कोणेक स्थलीं कोणेक सावकारा-पाशीं ऐवज भरून त्यापासून स्थलांतर-चे सावकारावर अमुक प्रतीचें अमुक सं-ख्याक नाणें द्यावें अशी जी चिठ्ठी घेतात ती; २, ला० देशांतरीं मरण पावला जो आ-पला कोणी गोवज त्याचें लेखादि येतें जें वर्तमान त्यास म्ह०; ३, एका स्थलीं रुजले-लें जें अंबा, तुळस, इ० कांचें झाड तें दुसरें स्थलीं लावायाचें असतां तें खणून काढते समयीं त्याचे मूळास आधारभूत जो मृत्पिं-ड राखित असतात ती आणि तद्विशिष्ट तें झाड ती; ४, बुधल्याचे तोंडास झोळी सा-रखी दोरी बांधून त्यावर फडकें घालून त्या-त मातीं, शेण, इ० टांसून घसवावी असा जो दड्या बसवितात ती; ५, जोंधळ्यांत ए-क भेद आहे या अर्थी मा० अनेकवचनी प्र०.

**हुंडीचिठ्ठी**, स्त्री० हुंडीपत्र.

**हुंडीपत्र**, न० हुंडी मथमार्थी.

**हुंडीपाडी**, स्त्री० हुंडी चिठ्ठी इ० ती.

**हुडुकहुडूक**, अ० खुडुकखुडूक.

**हुडुम्**, अ० हम्.

**हुडूक**, न० एक चर्मवाद्य आहे जें सर्व देजोशी इ० हातांत बाळगीत असतात तो; २, कोर-डें गास आमगी सारिखा एक पदार्थ करीत असतात तें.

**हुंडेकरी**, पु० हुंड्या भाड्याचा व्यापार करीत अ-सतो जो तो; २, हुंडा घेतल्यावांचून कोणाची मुलगी करीत नाहीं असा प्रतिज्ञित जो व-र तो.

**हुंडेंभाडें**, न० हुंडा भाडा.

**हुत**, ३ लिं० अग्नीचे ठायीं होमिलें जें द्रव्य तें किं० ज्यामध्यें होम केला असा जो अग्नि तो; २, अग्निसंयोगानें जळून खाक झाला जो पदार्थ तो.

**हुताशनी**, स्त्री० होळी मथमार्थी.

**हुतुतू**, पु० एक मुलांचा खेळ आहे; २, ला० पोरें अध्ययनादि व्यापार सोडून ओरडणें, उड्या मारणें, इ० रूप करितात जी दांडगाई तीस म्ह०.

**हुदका**, पु० हुंदका.

**हुंदकी**, स्त्री० हुंदकी.

हुंदडणें, हुडारणें, प्रा० प्रथमार्थी.

हुंदडा, हुँदडा, पु० हुंडका, प्रा० प्रथमार्थी, न; २, जरीमरीसारखा एक रोग आहे तो आणि तदभिमानिनी जी देवता ती; ३, मार्गादिकांचा ठायीं काहीं अडवण असो अनुलंघनीय असो परंतु त्यास न गणतां जोरें ख धरला असतो त्या जोरखानें धडकजाणारा जो मनुष्य, पशु, इ० त्यास आरोपानें स०; ४, सोंगट्याचे खेळांत एकच जी फिरती सोंगटी राहत्ये तीस स०.

हुंदडी, स्त्री० हुंदकी.

हुंदाडणें, हुंदडणें.

हुंदाडा, पु० हुंदडा.

हुडुकहुडूक, अ० खुडुकखुडूक.

हुद्दा, पु० हवालदारी, सुभेदारी, इ० रूप जो कोणेकाकडे असतो अधिकार तो; २, ताशा, मर्फा, आणि ढोल हीं तीन वाद्यें तीं व त्यांचे जे वाजविणारे ते प्र०.

हुद्देदार, पु० सुभेदारी इ० रूप हुद्दा ज्याकडे स आहे तो.

हुदुकहुदूक, अ० हुडुकहुडूक.

हुनर, पु० स्त्री० न० कोणेक कार्य सिद्ध करण्याचा अनेक प्रकारचा अनेक ज्या युक्ति त्या प्र०.

हुनरी, ३लिं० अनेक हुनर ज्याचे ओंगीं आहेत तो.

हुनेर, पु० न० स्त्री० हुनर.

हुनेरी, ३लिं० हुनरी.

हुन्नर, पु० स्त्री० न० हुनर.

हुपट, पु० हुंडका प्रथमार्थी.

हुप्या, पु० वानर जातीचा जो कोणी पुरुष व्यक्ति तो; २, ला० एका ठिकाणीं ज्याचा पाय ठरत नाहीं असें एवं ज्याच्यानें काही एक कार्य निश्चयास नेववत नाहीं असा जो मनुष्य त्यास निंदायुक्त स०.

हुंबणें, प्र० कन्हणें; ड० आधींच हुंबत घायें करून हृदयीं पडिला पाषाण.

हुंबर, स्त्री० दे० गुराखी पोरांचा एक खेळ आहे, हुंबरी, तुंबरी वगैरे प्रो स० अरेतरेवर येणें.

हुंबरणें, हंबरणें.

हुंबरी, स्त्री० हुंबर.

हुबहू, अ० कोणेक अर्थाशीं सर्व धर्मीं ही करून सादृश्य असल्यामुळे केवळ तोच हा अशी प्रतीति होई असें; कोणेक अर्थानें असणें, दिसणें, बोलणें, इ० क्रि० वि०.

हुबेहुब, अ० कों० हुबहू.

हुमण, न० पु० एक पक्षी आहे.

हुमरी, स्त्री० हुंबर.

हुमा, ३लिं० हुम्या.

हुम्मा, पु० एक पक्षी आहे जो कधींही भूम्यादिकांवर बसत नाहीं.

हुम्या, ३लिं० मोठें काहीं अडणीचें काम आल्यामुळें दुसऱ्यानें किती जरी घाई केली तरी ज्याचें आसनही ढळू नये कोणी काहीं विचारलें पुसलें असतां झटकर उत्तर ज्याचे मुखांतून निघत नाहीं फारच झालें तर

कदाचित् हूं मात्र म्हणेल अशा स्वभावाचा केवळ मंद जो त्यास निंदेनें म्ह०.

**हुरडणें**, को० हुरपळणें.

**हुरडफुंक्या**, पु० तोंडझा लढाईचे उपयोगीं नव्हे सरासरी नावाचा मात्र शिपाई त्यास निंदेनें म्ह०.

**हुरडभूज**, स्त्री० को० काटकवळ इ० सामग्रीचा माति कूत्यामुळें शेत जमीनीस यथाकथंचित् जो भाजण्याचा संस्कार करितात ती.

**हुरडा**, पु० जोंधळ्याचीं ओलीं कणसें अग्नींत भाजून त्याचे खावयासाठीं काढितात जे दाणे तो; २, तशीं भाजून खायाचे योग्यतेस आलेलीं जीं जोंधळ्याचीं ओलीं कणसें तो; जोंधळा मका गुरा इ० कानें हुरड्यास येणें म्ह० दाणा भाजून खायास येई अशा दशेस येणें.

**हुरण**, न० मुंग्यांचा जो समुदाय तें; २, ला० मनुष्यांचा एकत्र जमला जो समुदाय त्यास प्रसंगविशेषीं म्ह०; ३, रा० मुंग्यांत एक जाति आहे.

**हुरपळणें**, **हुरफळणें**, अग्नि किं० तत्सदृश मस जो फुंपाटा, धुरळा, इ० तेणें करून कोणेक पदार्थ वरवर दग्ध करणें.

**हुरमुजी**, ३लिं० हुरमुजेचा जो रंग तो किं० त्याणें रंगविलेला जो भिंत इ० पदार्थ तो; २. हुरमुजेसारिखा आहे रंग ज्याचा असें जें मोतीं तो किं० तसा जो त्याचा रंग तो.

**हुरमूज**, स्त्री० काचेसारिख्या एक मृत्तिकाविशेष आहे.

**हुरमोज**, स्त्री० हुरमूज.

**हुरमोजी**, ३लिं० हुरमुजी.

**हुररेवडी**, स्त्री० कोणी चालतांना पडला, बोलतांना कचरला, इ० काहीं उपहासास कारण झालें असतां अनेक पोरें इ० हुर्र करून जी त्याची बचेरी करितात ती.

**हुरली**, स्त्री० को० हुररेवडी.

**हुरवावडी**, स्त्री० दे० हुररेवडी.

**हुरशी**, स्त्री० रा० हुरूप.

**हुरहुरणें**. हुटहुटणें.

**हुरहूर**, स्त्री० काहीं एक गोष्ट आपल्या हातून गेल्यामुळें जीवास लागती जी चटपट ती.

**हुरळणें**, आपलें अवमान किती, ही गोष्ट केवढी, ही आपले हातून होईल किं० न होईल, हिचा परिणाम बरा होईल किं० वाईट होईल, इ० विचार न करितां प्रवृत्त होण्याविषयीं एकाएकीं मोठ्या उत्साहानें विशिष्ट होणें.

**हुरा**, पु० रा० शेरम्हणून झाड आहे तो; २, दुसरें एक कुड्याचे झाडासारिखें झाड आहे.

**हुरूप**, पु० स्त्री० कोणेक कार्य करण्याविषयीं अंतःकरणाचा ठायीं उद्भवन होतो जो उत्साह तो ती.

**हुरूम**, स्त्री० को० मी हें अमुक काम करीन असें कोणी आपल्या आंगीं बाळगतो तें अवमान

वसानती.

हुर्मत, स्त्री० अबरू.

हुर्मतदार, ३ लिं० अबरूचा जो मनुष्य तो.

हुर्मती, हुर्मतीचा, ३ लिं० हुर्मतदार.

हुर्र, अ० कोणेकाची अप्रतिष्ठा व्हावी ह्मणून चेष्टा करायाची असतां याचा प्रयोग करितात.

हुलकट, स्त्री० रा० लोकांनीं तजावजा व्हावयाजोगा जो चोर, परचक्रादिसंबंधी दंगा ती.

हुलकटणें, कों० लोकांनीं तजावजा व्हावया जोगा दंगा प्रसृत होणें; उ० गंगातीराकडे अतांशीं हुलकटलें आहे तुह्मी तिकडे जाऊं नका.

हुलकावणी, स्त्री० हा अमुक करणार आहे किं० अमकेकडे जाणार आहे इ० रूप आपले कर्तृत्वाचा गैरख दुसऱ्याचे ध्यानांत यावयाजोगें चेष्टा, भाषण, इ० जें कांहीं करितात ती.

हुलगा, पु० कुळीथ ह्मणून जें धान्य आहे तो.

हुलड, स्त्री० कों० हुलकट.

हुलवळा, पु० दे० हुलगा.

हुलोळा, पु० दे० हुलगा.

हुल्लड, स्त्री० हुलड.

हुशार, ३ लिं० प्रा० सावधपणा अर्थी.

हुशारणें, हुशार होणें.

हुशारी, स्त्री० हुशारपणा.

हुश्शा, अ० हुस्स प्रथम द्वितीयार्थीं.

हुसकटणें, हुसकटणें; २, हुशारणें द्वितीयार्थीं; ३. कों० गोमहिष्यादिपशूनीं आम्रादिकांस पाहून बुजणें.

हुसकणें, हुसकटणें द्वितीय तृतीयार्थीं.

हुस्स, अ० अतिशयित ऊष्मा झाल्यामुळें वारा घ्यावा अशी इच्छा झाली असतां हा उद्गार निघतो; २, पांखरांस हाकायाचा हा शब्द आहे; ३, कों० कोणेकास हुस्सकरणें ह्म० विवक्षित कोटींतून दूर करणें.

हुळवाजणें, श० धिंडावणें.

हुळहुळणें, अंगावर केश फिरविला असतां किं० मुंगी इ० कीटक चालला असतां जो कंडूतिविशेष होतो तत्सजातीय कंडूतिविशेषानें कोणेक शरीरावयव विशिष्ट होणें; २, तादृश कंडूतिविशेष व्हावयाजोगें केश किं० मुंगी इ० कानीं संचरित होणें; ३, ला० तोंड, हात, पाय, इ० अवयवांनीं बोलणें, मारणें, चालणें, इ० स्वस्व व्यापारीं उत्कंठा लागायाजोग्या कंडूतिविशेषानें विशिष्ट होणें.

हुळहुळा, ३ लिं० घर्षणादिकारणानें इतर पदार्थस्पर्शाविषयीं असहिष्णु झाला जो हस्तपादाद्यवयव तो.

हुळहुळाट, पु० हुळहुळीचा जो आतिशय तो.

हुळहूळ, स्त्री० हुळहुळण्यास कारणभूत जो कंडुविशेष प्राप्त होतो ती.

हुळा, पु० भक्षणार्थ ओल्या हरभऱ्याचे भाजलेले जे घांटे तो.

हुळूम, पु० कों० वांगी, मिरची, इ० कितीएक

झाडानीं प्रा० मेलें जावें असा जो त्याचेमूळस्थदेशीं रोगविशेष होत असतो तो.

**हूँ**, अ० प्रा० हां या अर्थी.

**हूक**, स्त्री० उसण; २, कोल्ह्याचा जो स्वजातीय शब्द ती; ३, ला० कोणएक गोष्टीविषयींची उठती जी बातमी ती.

**हूड**, ३लिं० युद्धादिप्रसंगीं मागला पुढला विचार न पाहातां उडी घालण्याचा स्वभाव ज्याचा असा जो तो.

**हूप**, अ० वानरांचे स्वजातीय शब्दाचें अनुकरण.

**हूल**, स्त्री० हुलकावणी; २, हुलकट; ३, दुर्काशी सोंकट्याचे खेळांत कदलल्या जुगापुढें पक्की व्हावयास आणारी जी सोंगटी ती.

**हूळ**, स्त्री० कों० दुसऱ्यानें तत्काल यावरलें जावें काहीं एक सुचूं नये अशी अवस्था व्हावयाजोगी त्यास कोणेक गोष्टीविषयीं कोणेक करितो जी याई ती; प्रा० भोंवडणें धातुयोगीं प्र०; रा० कोणेकानें आपली हूळ घेऊन जाणें, नेणें, वाजविणें, इ० स्थळीं त्याणें हुळ वाजणें.

**हृत्**, न० सं० हृदय; याचे स० हृत्कमल, हृद्रोग, इ०; २, ३लिं० जा अर्थाचें जो हरण करतो तो तद्हृत्; दुःखहृत्, प्राणहृत्, पापहृत्, जलहृत्, इ० स० प्र०.

**हृत**, ३लिं० सं० हरून घेतला जो कोणेक अर्थ तो.



**हृदय**, न० सं० वक्षःस्थल; २, अंतःकरण; ३, कोणेकाचे मनांतील किं० भाषणादिकांतील जो आशय तें.

**हृदयंगम**, ३लिं० सं० हृद्य.

**हृद्गत**, ३लिं० हृदयस्थ जो कोणेक अर्थ तो; २, न० हृदयांतील जो अभिप्राय तें.

**हृद्य**, ३लिं० अंतःकरणास प्रीति उत्पन्न करावयाजोगा जो कोणेक अर्थ तो.

**हृद्रोग**, पु० कोणेक गोष्टीविषयीं निरंतर जी अंतःकरणास काळजी लागली असते ती.

**हृष्ट**, ३लिं० सं० हर्षित जो तो; याचे स० हृष्टरोमा, हृष्टमानस, इ०.

**हे**, अ० संबोधनाचें द्योतक हें अव्यय आहे संबोध्यपदाचे मागें याचा योग होतो; उ० हे राजा तुझें कल्याण असो.

**हेंकट**, ३लिं० दुसऱ्यानें बरी गोष्ट सांगितली तथापि ती न ऐकतां आपलेंच हेका नें वर्तण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**हेंकड**, **हेकड**, ३लिं० हेंकट.

**हेंका**, **हेका**, पु० कोणेक गोष्टीविषयीं प्रबळ जी इच्छा किं० कोणेक तऱ्हेची समजूत होऊन तीचा भार अंतःकरणावर पडल्यामुळें तदनुरोधें करून निकडें अंतःकरणाचा दृढ झाला असतो जो श्रोकतो तद्विषयीं अनेक दोष दिसत असले किं० असें करूं नये, हें ठीक नव्हे, असें लोक सांगत असले तरी आवरला जात नाहीं; उ० पाऊस जवळ आला जाईल तर अन्य मार्गानेंच जाईन

ह्मणतोस पण असा हेंका कामाचा नाहीं तूं आपला पायवाटेनें आ; त्याला किती सांगितलें तरीं त्याची समजूत पडायाची नाहीं आपला हेंका घेऊन भांडत बसेल.

हेंकेखोर, हेकेखोर, ३लिं० हेंकट.

हेंगडा, ३लिं० हेंगाडा.

हेंगडावणें, कोणेकाचें करणें, बोलणें, इ० क्रियांस कोणेकानें अनेक प्रकारें खोड्या ठेवून त्यास हेंगाडासा ठरविणें.

हेंगडूमेंगडू, ३लिं० कों० कोणेकाचें अस्पष्ट हेंगाडें हेंगाडें सें जें भाषण, लेख, इ० तो.

हेंगाडा, ३लिं० लिहिणें, बोलणें, नासणें, उचलणें, टाकणें, इ० यांचा यावत् कर्मांविषयीं जी युक्ति असावी ती ज्याचे अंगीं नाहीं, दुसरा सांगत शिकवीत असतां ही ती मनांत येऊ नये, आणि हस्तपादाद्यवयव तदनुरूप वळूं नये, अतएव कर्ममात्राचा ठायीं ज्याचा अडाणीपणा दिसण्यांत येतो अशास्वभावाचा जो तो किं० त्याचें तदनुसार करणें, बोलणें, इ० कर्म तो; २, आपल्यापेक्षां ज्याचा रीति, भाषा, इ० अगदीं वेगळ्या अतएव आपल्या संप्रदायास मिळत नाहीं असे जे देशांतरस्थ लोक त्यांस आणि त्यांची भाषा, रीति, इ० त्यांस ह्म०

हेट, अ० खालच्या प्रदेशीं; गलबताचे व्यवहारीं जे कोळी इ० लोक त्यांत विशेषें करून प्र०; उ० गलबत हेट आतें आहे; ओझें पाझें असेल तें हेट ठेवा आणि वरती मागासें

णसें बसवा; २, प्रा० सावित्री नदीस अवधि करून जो तीचे दक्षिणेकडील देश तिकडे; उ० यंदा हेटमांत चांगला पिकला.

हेटकरी, ३लिं० हेटमांतीं राहाणारे जे मनुष्य ते प्र०; २, पु० हेटप्रांतीचा प्रा० घरकंदाज जो शिपाई तद्विषयीं देशांत विशेषें करून प्रसिद्धि.

हेंटाळणी, स्त्री० हेलना.

हेंटाळणें, कोणेकास किं० कोणेकाचे भाषणादिकांस हेंटाळणीनें युक्त करणें.

हेड, स्त्री० वणजारी इ० लोक विकाया करितां नेतात किं० आणितात जो गोमहिष्यादि पशूंचा समुदाय ती.

हेडंबा, स्त्री० हिडिंबा ह्मणून पुराण प्रसिद्ध एक राक्षसी होती तिला आणि तिचे आरोपानें विरूप दिसायाजोगी शरीरानें फार मोठी जी स्त्री तिला ह्म०.

हेडली, स्त्री० कों० बोडकी बायको मरून पिशाच झाली असल्ये ती.

हेडसरी, स्त्री० एक वृक्ष आहे.

हेडसावणें, हिडसणें.

हेड्या, पु० हेडीचा व्यापार करणारा जो मनुष्य तो; २, ला० कोणेकास काहींएक वस्तूची गरज लागली असतां ती वस्तु अमुक ठिकाणी आहे अमुक उपायानें हस्तगत होईल असें आणत असतो असा जो पुरमाहितगार त्यास ह्म०

हेत, पु० कोणेक गोष्टीविषयीं कोणेकाचे अंतः

अंतःकरणांत उत्पन्न होऊन राहिली असत्ये जी इच्छा तो; उ॰ आपल्या डोळ्यां देखत मुलाचें लग्न व्हावें एवढामात्र हेत राहिला आहे.

**हेतु**, पु॰ सं॰ कार्यमात्राचें जें समवायिकारण, असमवायिकारण, निमित्तकारण, आणि उद्देश तें प्र॰; २, हेत.

**हेतुक**, ३ लिं॰ सं॰ जो ज्याचा हेतु तो तद्धेतुक; ज्ञान आहे हेतु ज्याचा तें ज्ञानहेतुक, अध्ययन, तंतुहेतुक पट जलहेतुक, पुत्रहेतुक, इ॰ समासीं प्र॰.

**हेतुगर्भ**, ३ लिं॰ सं॰ ज्या कार्यावर कोणेक अर्थाःचा कर्तृत्वादि अन्वय विवक्षित असतो त्याचा जो हेतुभूत अर्थ त्याचा ज्याचे पोटीं संग्रह झाला असतो असें जें विशेषण विशेष्यादि पद तो; उ॰ अरे दांडेवाल्या तो अंबा पाड या वाक्यांत दांडेवाल्या हें पद हेतुगर्भ आहे.

**हेतुमान्**, ३ लिं॰ सं॰ हेतु आहे ज्यास असें जें कार्य तो.

**हेतुहेतुमद्भाव**, पु॰ सं॰ हेतु आणि हेतुमान यांचा परस्पर जो संबंध तो.

**हेद**, स्त्री॰ एक झाड आहे.

**हेंदर**, स्त्री॰ न॰ पु॰ विष्ठा, केरकचरा, इ॰ रूप जी कोणएक स्थळीं पडलेली घाण ती, तें, तो.

**हेंदरा**, ३ लिं॰ असंगळ जो तो; २, रा॰ ज्याचे आंगीं आळस, ठाकठीकपणा, इ॰ नाहीं असा जो मनुष्य किं॰ त्याचें भाषण, आचरण, इ॰ तो.

**हेटी**, ३ लिं॰ हेट संबंधी जो फळी, खुरशी, इ॰ पदार्थ तो.

**हेडु**, पु॰ हेड.

**हेपसलिंगा**, **हेपुसलुंगा**, पु॰ पादरफुसका.

**हेबाळणी**, स्त्री॰ पोर इ॰ कांस इकडून तिकडे नेलें, तिकडून इकडे आणलें, उचललें, ठेवलें, इ॰ झालें असतां त्याचे शरीरीं चोळटा चोळट, ओढाताण, होती ती.

**हेबाळणें**, हेबाळणीनें युक्त करणें.

**हेम**, न॰ सं॰ सुवर्ण म्हणून जो धातु तें.

**हेमगर्भ**, पु॰ ज्यांत सोनें पडत असतें असें एक रसायन आहे.

**हेमटी**, स्त्री॰ कों॰ हुडकी.

**हेमंत**, पु॰ सं॰ मार्गशीर्ष, पौष, हे दोन मास मिळून जो काळ तो किं॰ वृश्चिक, धन, या दोहों राशींस सूर्य असतां जो काळ तो.

**हेमंतऋतु**, पु॰ हेमंत संज्ञक जो काळ तो.

**हेमलंबी**, पु॰ साठां संवत्सरांतील एकतिसावा संवत्सर तो.

**हेमाडपंती**, ३ लिं॰ पूर्वी हेमाडपंत म्हणून एक गृहस्थ होता त्याणें प्रसिद्ध केली ती लिपि शाचलीपि, देवालय, इ॰ तो.

**हेय**, ३ लिं॰ सं॰ त्याज्य.

**हेर**, पु॰ कोणेक गोष्टीचें वर्तमान आणून विवक्षित स्थळीं कळवावें म्हणून ज्या कामावर राजादिकानीं नियुक्त असतो तो दूत तो.

२, स्त्री॰ कोणेक पदार्थ हेराया करितां त्यावरून दृष्टीचें जें परिवर्तन ती; ३, अक्रि॰ रा॰ एर.

हेरणें, कोणेक पदार्थ सूक्ष्म दृष्टीनें पाहणें; २, कोणेक पदार्थ कोणेकास पुरतेपणें स्पष्ट दिसणें; ३, टेहेळणें.

हेरफेर, पु॰ स्त्री॰ कोणेक अर्थाचें कोणेक अर्थाशीं मूल्य, प्रमाण, गुण, इ॰ करून जें अंतर असतें तो.

हेरवां, अ॰ रा॰ एरव्हां.

हेरवीं, अ॰ रा॰ एरवीं.

हेरून फेरून, अ॰ फारून फेरून.

हेरें, न॰ काहीं कारणास्तव गलबताचें शीड फिरवून जो काहीं वांकडा पेंतात घेरातें.

हेऱ्या, पु॰ टेहेळ्या.

हेर्‍यें, न॰ हेरें.

हेल, पु॰ स्त्री॰ कोणेकाचें ओझें आपल्या अंगावर घेऊन गांवांतल्या गांवांत किं॰ दोन चार कोसांवर स्थलांतरीं नेऊन पोंचवण्याचें जें कर्म व तें ओझें व तत्संबंधी जी मजूरी तो ती; २, पु॰ कोणास पुत्र, कन्या, झाली असतां त्याचे घरीं शूद्रस्त्रिया इ॰ दहा दिवसांचे आंत आणून घालितात जो जल, दुग्ध, इ॰ पदार्थ तो; ३, वाहून नेण्या करितां गाड्यावर रचलेला जो कडबा, गवत, यांचा ढीग ती; ४, आड्या पाड्यांचे रवैवांत हावाचे समासीस हा शब्द उच्चारितात; ५, गाणें, रडणें, ओरडणें, संबंधी जो मोठा दीर्घस्वर त्यास स॰; उ॰ तूं हेल काढून असा मोठ्यानें रडूं नको.

हेलकरी, पु॰ हेल वाहून उपजीविका करितो तो; २, कोणास अपत्य झालें असतां हेल घालणारा जो तो.

हेलकावणें, जल, नौका, इ॰ कानीं हेलकाव्यानें विशिष्ट होणें.

हेलकावा, पु॰ समुद्र, तटाक, इ॰ संबंधी उदक, वृक्षाची लांब डहाळी, इ॰ कांस वाय्वादिकांचे धक्क्यानें किं॰ हस्तादिकें करून हालविल्यानें बसतो जो झोका तो आणि त्या योगानें त्यांचा आश्रयें करून स्थित जे नौका मनुष्य इ॰ त्यांस जो झोका बसतो तो.

हेलगा, पु॰ कों॰ रेडा.

हेलना, स्त्री॰ सं॰ मनुष्यादि कोणेक अर्थाची हा कः पदार्थ, यांत काय आहे, याला कोण विचारतो अशा भावानें जी गणना ती.

हेलपटणें, कोणेकास हेलपट्यानें युक्त करणें; २. ला॰ वादी किं॰ शत्रु. किं॰ कोणेकाचें काम, भाषण, इ॰ लटपटलें जाईं असें करणें.

हेलपटनिशी, स्त्री॰ कों॰ तादृश फल नसतां उगीच हेलपटे खाण्याचा जो व्यापार ती.

हेलपटा, पु॰ क्लेशरूपें करून मानिला जो विवक्षित स्थलपर्यंत चालण्याचा व्यापार तो; २, कोणेक मार्गास ऋजुसूत्रापेक्षां दीर्घता यावयास कारणीभूत जी वक्रता असते ती आणि त्या मार्गानें चालणारा जो त्यास अधिक चालण्यानें श्रम पडतो तो;

२, फिरकाडामधमार्थी.

हेलपाटणें, हेलपटणें.

हेलपाटा, पु० हेलपटा.

हेलपाटी, स्त्री० हेलवाहणें, मोलमजूरी करणें, इ० रूप जो व्यापार ती.

हेलपाचकी, स्त्री० वा० हेलपटनिशी.

हेलसांड, स्त्री० कोणेकानें काहीं एक कार्यार्थ काहीं एक गोष्ट सांगितली असतां ऐकलें न ऐकलेंसें करून तद्विषयीं करितात जी असास्था बुद्धि ती.

हेला, पु० दे० हेलगा.

हेवा, पु० दे० स्पर्धा; २, संगसंगा; ३, कों० द्रव्यादिविषयक कोणेकास असतो जो सोस तो.

हेंस, स्त्री० कों० वायु, धका, इ० कारणानीं समुद्र संबंधी किं० नद्या, कुंभ, इ० संबंधी जलतैलादिपदार्थीचा उसळून भरता येतो जो अंश ती.

हेंसणें, कों० हिंसणें.

हेंसळणें, कों० हिसळणें.

हेळणें, रा० कोणेकास हेळणेनें विशिष्ट करणें.

हेळणा, स्त्री० हेलना शब्दाचा अपभ्रंश.

हैक, अ० गोमहिष्यादिपशूंस मार्गादिकाचा ठायीं हाकण्याचे प्रसंगीं याचा प्रयोग करितात.

हैकोल, पु० स्त्रियांचे कंठांतील एक भूषण आहे.

हैगई, हैगय, हैगयी, स्त्री० हयगई.

हैम, ३ लिं० सं० हेमसंबंधी जो अलंकारादि तो.

हैला, ३ लिं० रा० हयला.

हैराण, ३ लिं० दुखणें, वहाणें, श्रम, इ० योगानें जाचे अंगीं ईषत्‌ही सामर्थ्य राहिलें नाहीं अतएव थकला, व्याकुळ झाला, जो तो.

हैराणगत, स्त्री० हैराण व्हावयाजोगी जी अवस्था होत्ये ती.

हैवा, पु० ब्राह्मणांत एक जाति आहे.

हैवान, ३ लिं० कों० हयवान.

हो, अ० होय; २, कोणेक प्रवृत्तिविषयीं कोणेकाचे अंगीं आरब्ध असतो जो वेग तो आटोपून स्तब्ध रहा अशी जी त्या दुसऱ्यास करावयाची प्रेरणा तीचें वाचक हें अव्यय; ३, अहो; ४, कोणेकास काहीं एक गोष्ट हटकून सांगायाची असतां त्या वाक्यापुढें किं० त्यांतील क्रियापदापुढें याचा योग होतो; उ० मुला, उ० केला आहेस जेव हो; काम सांगितलें आहे तें कर हो विसरशील.

होईक, न० भं० होष्यमाण.

होऊन, अ० इतराचे प्रेरणेवांचून आपले आपण; तत्तदर्थवाचक शब्दापुढें याचा प्र०; उ० तो होऊन अर मुलगी द्यायास आला तरकरीन मी होऊन काहीं मागणार नाहीं.

होका, पु० मार्गादिदिक्साधनाचे उपयोगीला हचुंबकाचें एक यंत्र आहे.

होकार, पु० काहीं एक गोष्ट करण्याविषयीं कोणेकास कोणेक देतो जो रुकार तो.

**होकारणें**, कोणेकास बोलावणें.

**होगडणें**, रा० संपत्ति,द्रव्य, वतन,प्रतिष्ठा, इ० जें काहीं आपले पदरीं असतें किं०जें मिळेल अशी संभावना असल्ये तें अव्यवस्थित पणें वर्त्तन इ०द्वारा आपले हातून जाई असें करणें.

**होगा**, ३लिं० रा० अंगीं तादृश आवरशक्ति नाहीं मंद,आळशी, असा जो मनुष्य तो;२, कों० दांडगा जो मनुष्य त्यास म्ह०.

**होगाडणें**, कों० कोणेकास अधिकारादिका वरून घालविणें;२,रा० हारवणें.

**होट, हौंट**, पु० ओठ.

**हौंटाळी, होटाळी**, स्त्री० ओंगळी.

**होड**, स्त्री० पेज.

**होडकी**, स्त्री० **होडकें**, न० लहान जी होडी ती; २,प्रसंगीं लघुत्व मानून होडी,मचवा,यांस हीं म्ह०.

**होडंगणें**, रा० होडंगा किं० तत्सदृश लांबट पदार्थ तो एके शेवटास धरून दूर कोणेकावर फेंकणें.

**होडंगा**, पु० रा० होलपटा.

**होडगें**, न० होडकी.

**होंडा**, पु० खळगा;२,३लिं० हुंडा तृतीयार्थीं.

**होडी**, स्त्री० मोठें एक लांकूड खोदून त्याचें जें जलयान करितें असतात तीं.

**होणें**, कोणेक अर्थ उत्पत्तीस पावणें;उ० तुझे बायकोस पुत्र झाला;२,विवक्षित रूपें करून जी सिद्धि नव्हती ती त्यातें कोणेक अर्थ पावणें;उ० आंबा पक्क झाला,तूं स्त्रवीहोशील;३, व्यापारिद्वारा कोणेक अर्थानें संपणें;उ० मजपाशीं रुपये होते ते तितके झाले आतां कोठून देऊं.

**होतकर, होतकरू**, ३लिं० विद्वत्ता,पुष्टी,इ० जे गुण ते थोडथोडे कोणेकाचे अंगीं प्रकट होऊं लागल्यामुळें हा त्या त्या गुणानीं उत्तरोत्तर वाढत वाढत विवक्षित योग्यतेस पावेल असें वाटायाजोगा मनुष्य,पशु, वृक्ष, इ० तो.

**होतव्य**, न० भवितव्य या अर्थीं कोणी म्ह०.

**हौतीवस्त**, स्त्री० दे० मिळती वस्त.

**होत्सातां**, अ० कोणेक अर्थ विवक्षित गुणादिरूप जो विशेषणार्थ तद्विशिष्ट असतां; उ० विक्रमराजा राज्य करित होत्सातां कोणीही दरिद्री नव्हता.

**होन**, पु० सुमारें चार रुपयांचे किमतीचें सोन्याचें एक नाणें आहे, त्याचे धारवडी, एकेरी,इ० अवांतर भेद अनेक आहेत.

**होबासा**, पु० होय तूं म्हणतोस हें तुझें काम मी करीन असा कोणी कोणेकास देतात जो भरंवशाचा शब्द तो.

**होम**, पु० हवन; होम देणें म्ह० हवन करणें.

**होमणें**, हुतकरणें.

**होमशाळा**, स्त्री० अग्निहोत्रादि संबंधी अग्नि ठेवायाकरितां केलें असतें जे गृह ती.

**होमहवन**, न० होम इ० जें कर्म तें.

**होय**, अ० कोणेकानें काहीं एक गोष्ट सांगितली

तरी असतां तद्विषयींचें मान्यतेचें जें उत्तर किं० कोणेकानें कांहीं एक गोष्ट विचारली असतां ती गोष्ट म्हणतोस तशीच आहे म्हणून सांगावयाचें जें उत्तर त्याचें बोधक हें अव्यय.

**होयकार**, पु० होकार.

**होयबा, होयाबा**, पु० कोणी कांहीं गोष्ट सांगितली असतां त्यांतील गुण दोष न पाहतां होयहोय म्हणण्याचा स्वभाव जाचा तो.

**होर**, स्त्री० कों० विवक्षित शेत इ० स्थल होरलें जावयाजोगा पर्जन्यानें धुपून येऊन बसतो जो खळमळ इ० ती.

**होरट**, स्त्री० पु० आपणास दुष्कर अतएव इतरांस असंमत जी कोणेक गोष्ट तीविषयीं हें मी करीनच करीन किं० हें असेंच इ० रूप धरिला जो कोणेकानें दुराग्रह ती, तो.

**होरणी**, स्त्री० कों० खच्ची, शेत, इ० होरावयाकरितां तेथें घालितात जी मृत्तिका इ० कांची भरती ती.

**होरणें**, कोणेक स्थळचा खळगा, विहीर, किं० वारीरावरील क्षत, छिद्र, मृत्तिका, इ० कानीं भरे असें करणें; २, अलंकार, केश, इ० कानीं शरीर किं० तदवयव इ० व्याप्त करणें.

**होरपळणें, होरपाळणें**, हुरपळणें.

**होरा**, स्त्री० मेषादि लग्नावरून किं० रविशशादि वारांवरून साधावाचे असे प्रतिदिवशींचे चोवीस मुहूर्त ज्योतिःशास्त्रोक्त आहेत.

आहेत ते प्र०; २, पु० कोणेकास प्रत्यय यावयाजोगी होणारी किं० झालेली कोणी सांगतो जी गोष्ट ती; ३, होणारी किं० परोक्ष जी कांहीं एक गोष्ट तद्विषयीं ही अशी अशी अमुक अमुक रीतीनें होईल किं० असेल अशी कोणेकाची धांवती जी कल्पना ती.

**होराबारी**, स्त्री० कों० परस्परांचें जें स्वस्वपक्ष स्थापनाविषयीं दुराग्रहाचें भांडण ती.

**होरी**, स्त्री० प्रा० वसंतोत्सवसंबंधी वर्णन जांत असतें असा गानामध्यें हिंदुस्थानी भाषेंत एक कविता विशेष आहे जी प्रा० शिमग्याचे उत्साहांत गातात.

**होलगड**, न० होला म्हणून जो पक्षी तें.

**होलपटणें**, रा० फलपाडणें इत्यादि अर्थ वृक्षादिकांवर होलपाटा इ० लांबट पदार्थ एके शेवटास धरून फेंकणें किं० तद्द्वारा आम्रफलादि प्रहार विशिष्ट करणें; २, न० होलपाटा.

**होलपटा**, पु० रा० होलपाटा.

**होलपाटणें**, होलपटणें; २, रा० हेलपटणें द्वितीयार्थी.

**होलपाटा**, पु० वृक्षावरील फलादि पाडणें इत्यादि अर्थ वर मुगारण्याकरितां बनतात जो हात दोन हात लांब लांकडाच्या तुकडा तो.

**होला**, पु० एक पक्षी आहे.

**होलार**, पु० अंत्यज जातीचा जो वाजंत्री न० जांचा बरोबर प्रा० डफहें वाजत असतें.

होलिका, स्त्री० स० हुताशनी.

होष, पु० काहीं एक कर्तव्य गोष्टीविषयीं जो कोणेकास उत्साहविशेष असतो तो; २,कोणेकप्रसंगीं कोणेक कर्म करण्याविषयीं बुद्धीच्याठायीं असतें जें अवसान तो, परंतु संकटप्रसंगीं म०; उ० गांवावर पेंढारी आले असें ऐकतांच माझा होष गेला काहीं सुचेनासें झालें.

होष्य, न० होतव्य.

होष्यमाण, न० होतव्य

होहोरवरेंच, अ० कोणेक गोष्टीची अकस्मात् होत्येजी स्मृति तीचा उद्गार आहे; उ० होहो खरेंच आज मला तिकडे जायाचें आहे नव्हे.

होळकर, पु० शिमग्याचे महिन्यांतील होळीचे जे खेळ्ये ते म०.

होळणें, कों० ओहोळणें; २, रा० धुणें या अर्थीं.

होळपणें, कों० हुरपळणें

होळी, स्त्री० फाल्गुनी पौर्णिमेचे दिवशीं घर देवतेचें आवाहन करून पूजा करावी, आगलावावी, म्हणून जो तृणकाष्ठादिकांच्या रचित राशि करितात ती; २, माघशुद्ध पौर्णिमेस किं० फाल्गुन शुद्ध प्रतिपदेपासून किं० पंचमीपासून पौर्णिमेपर्यंत प्रतिदिवशीं देवाच्या सत्रुरूपमुळें तसेच तृणकाष्ठादिकांचे ढीग करून जाळतात त्यास म० म०; ३, कों० होळीचेमध्यें पोफळ, केळ, इ० यांचें जें खांब लाविंतात त्यास म०; ४, फाल्गुनी पौर्णिमेस म०; यामादिकांची होळी करणें म्हणजे त्यांतें जाळणें असा अर्थ; आगीची होळी होणें म्ह० क्रोधज्वरादिकें करून अतिबाधित तप्त होणें.

हौद, पु० उदकादिपदार्थ सांठवून ठेवायाकरितां दगड, विटा, चुना, इ० कांचें चतुष्कोणाकार जें पात्र करितात तो; २, पाणी तापवायाकरितां किं० ठेवायाकरितां जें तदाकार धातुमय पात्र करितात त्यास म०.

हौदा, पु० हत्तीचे पाठीवर ठेवून आंत बसावयाकरितां हौदासारिखें आकारविशेषाचें काष्ठादिकांचें आसन करितात आवरछाया नसत्ये तो; २, ला० तालिमखान्यांत कुस्ती खेळणें इत्यार्थ हौदासारिखी खळी करितात तीस म०.

हौर, पु० रा० नदीस जो पूर येतो तो.

हौशा, ३लिं० पाहिजे तशी ख्याली खुशाली किं० वस्त्र प्रावरण अथवा गाणें बजावणें, इ० कानीं आपल्ये मनाची हौस पुरविण्याचा स्वभाव ज्याचा तो.

हौशी, ३लिं० हौशा.

हौशोणें, रा० कोणेकविषयीं जी हौस तिणें करून विव्हळ होणें.

हौस, स्त्री० कोणेक गोष्टीविषयीं या मध्यें [illegible] आहे असी भावना अ

सत्यामुळें हें पाहावें, हें करावें, हें घ्यावें, हें भोगावें, इ० वासना जोगा जो अंतःकरणांतउत्साहविशेष असतो तो.

हीसणें, क्रि० हीशीनें युक्त होणें.

हीसदार, ३लिं० हीशा.

हीसी, ३लिं० हीशी.

हीळा, पु० हुळा.

ह्रद, पु० सं० डोह प्रथमार्थी.

ह्रस्व, ३लिं० सं० विवक्षित प्रमाणापेक्षां लांबी किं० उंची जाची कमी तो; २, जांचा उच्चारणांस एकमात्रात्मक काल लागतो असे जे अ, इ, उ, ऋ, ऌ, हे स्वर ते प्र०.

ह्रस्वमूर्ति, ३लिं० ठेंगणा जो मनुष्यादि त्यास म्ह०.

ह्रास, पु० सं० काहीं एक गोष्ट किं० पदार्थ यांचा जो उत्तरोत्तर कमीपणा तो.

ह्रावा, पाहिजे या अर्थी हें क्रियापद. परंतु जो अपेक्षाविषय अर्थ असतो त्याचा लिंगानुरोधें करून याला लिंगकार्य होतें.

---

क्ष

क्षण, पु० सं० मुहूर्तात्मक कालाचा बारावा जो अंश तो; २, केवळ सूक्ष्म जो कालविभाग तो.

क्षणभंगुर, ३लिं० सं० या क्षणीं आहे पण असाच उत्तरक्षणीं असेल असा ज्याविषयीं विश्वास ठेवितां येत नाहीं असा जो संपत्ति, आयुष्य, देह, इ० नाशवंत पदार्थ तो.

क्षणक्षणीं, क्षणाक्षणीं, अ० प्रतिक्षणीं.

क्षणिक, ३लिं० सं० क्षणभरमात्र ज्याची स्थिति असे जें सुख, दुःख, ज्ञान, मति, इ० तो.

क्षणोक्षणीं, अ० क्षणक्षणीं.

क्षत, न० सं० व्रण; २, ३लिं० शस्त्रादि लागल्यामुळें व्रणविशिष्ट झाला जो तो.

क्षति, स्त्री० सं० द्रव्यनाशादि झाल्यामुळें कोणेकाची होत्ये जी हानि तो; २, आपणास कोणी काहीं वाईट बोललें किं० अस्पृश्याचा स्पर्श, अभक्ष्याचें भक्षण, इ० आपल्याहातून घडलें किं० इत्यादिकांचा नाश, अपहार, इ० झालें इ० काहीं वाईट झालें असतां चित्तास वाईट वाटावें असा जो अंतःकरणांत विकारविशेष होतो तो; प्रा० निषेधविषयीं प्र०.

क्षत्र, न० सं० क्षत्रिय म्हणून जी जाति ते.

क्षत्रिय, पु० सं० ब्राह्मणादि चारवर्णांतील दुसरा जो वर्ण तो.

क्षत्री, पु० क्षत्रियशब्दाचा अपभ्रंश.

क्षम, ३लिं० सं० विवक्षित कार्य करण्याविषयीं शक्त जो कर्त्रादि तो किं० शक्य जें कार्य तो.

क्षमा, स्त्री० सं० कोणेकापासून आपलें अपराधादि अप्रिय झालें असतां तेणेंकरून होत असती जी चित्तास क्षोभ तो नाहीं उद्देतां त्या अप्रियाचें करितात जें सहन ती; कोणेकाचा अपराध क्षमा करणें; क्ष०

क्षमाविशिष्टकरणें, २, सहिष्णुता; ३, इथी.

क्षमापन, न० सं० अपराधादिकेंकरून क्षुब्ध झालेला जो कोणी त्यास थोडें भाषण, आर्जव, इ० केंकरून क्षमाविशिष्ट करण्याचा जो व्यापार तें.

क्षमी, ३ लिं० क्षमाशील.

क्षय, पु० सं० मरणें, जळणें, इ० कारणानें कोणेक अर्थाचा सर्वस्वीं किं० अंशतः होतो जो नाहींसेपणा तो; धातुक्षय, पापक्षय, पुण्यक्षय, कुलक्षय, इ० स०; २, सूर्योदयानंतर येऊन जे तिथि, नक्षत्र, योग, त्यांणीं दुसऱ्या सूर्योदयाचेपूर्वींच संपावें असा जो त्यांचा होतो ह्रास तो; ३, क्षयरोग; ४, साठ संवत्सरांतील शेवटला जो संवत्सर तो.

क्षयगामी, ३ लिं० सं० उत्तरोत्तर ज्याचा ह्रास होत चालला आहे असा जो तिथि, नक्षत्र, आयुष्य, संपत्ति, इ० तो.

क्षयतिथि, स्त्री० सं० ज्या तिथीस जो कोणी मरण पावला असतो तीच प्रतिमासीं किं० प्रतिवर्षीं ची तिथि ती त्याची.

क्षयदिवस, पु० ज्या दिवशीं जो मेला तो त्याचा; २, क्षयतिथि.

क्षयमास, पु० सं० ज्यामध्यें दोन संक्रांति होतात असा जो अमावास्यांत मास कदाचित् येतो तो.

क्षयरोग, पु० ज्याचे योगानें शरीरांतील सर्व धातु उत्तरोत्तर क्षीण होत जातात असा एक रोग आहे.

क्षयरोगी, ३ लिं० क्षयरूप रोग ज्यास झाला आहे तो.

क्षयिष्णु, ३ लिं० ज्या क्षय अवश्य व्हावयाचा असा स्वभावाचा जो आयुष्य, संपत्ति, इ० कोणेक अर्थ तो.

क्षयी, ३ लिं० सं० क्षयरोगी.

क्षर, ३ लिं० सं० अवयवशः क्षरून क्षरून नाहींसा व्हावा असा स्वभावाचा जो कोणेक अर्थ तो.

क्षरण, न० सं० अवयविभूत पदार्थानें अवयविस्वरूपापासून अवयवशः गळून जाण्याचा जो व्यापार तें.

क्षरणें, क्षरणविशिष्ट होणें.

क्षांत, ३ लिं० सं० ज्याविषयीं क्षमा केली असें जें अपराधादि तो.

क्षांति, स्त्री० सं० क्षमा.

क्षात्र, ३ लिं० क्षत्रियसंबंधी जें कर्म, वेश, रीति, इ० तो; क्षात्रकर्म, क्षात्रधर्म, क्षात्रतेज, इ० स०.

क्षार, पु० मीठ, समुद्रोदक, यांचे रसासारिखा साहा रसांतील एक रस आहे; २, नाहक्षाररसविशिष्ट जे सैंधव, पादेलोण, पापडखार, टांकणखार, इ० किं० केळीचें सोप, आघाडा, हळदीचें पान, इ० यांचा रस इ० पदार्थ ते म०; ३, ३ लिं० नाहक्षार रसविशिष्ट जो समुद्रोदक, मीठ, इ० किं० भोज्यपदार्थ इ० तो; क्षारोदक, क्षारसमुद्र,

इ० स०

**क्षालणें**, प्रक्षालणें.

**क्षालन**, न० प्रक्षालन

**क्षालित**, ३ लिं० प्रक्षालित.

**क्षाळण**, न० क्षालन शब्दाचा अपभ्रंश.

**क्षाळणें**, क्षालणें.

**क्षिणणें**, कोणेकानें क्षीण होणें.

**क्षिति**, स्त्री० सं० पृथ्वी; क्षितिप, क्षितिपाल, क्षितीश, क्षितिज, इ० स०.

**क्षिती**, स्त्री० क्षति ह्गितीयार्थी.

**क्षिप्त**, ३ लिं० सं० प्रक्षिप्त; २, शिव्या, गाळी, इ० दुःशब्दानीं निर्भर्त्सिला जो तो.

**क्षिप्र**, अ० सं० लौकर; क्षिप्रकारी, क्षिप्रभोजी, इ० स०.

**क्षिप्रा**, स्त्री० खिरीसस्र०

**क्षिरापत**, स्त्री० खिरापत.

**क्षीण**, ३ लिं० क्षय होऊन नाहींसा झाला जो तो किं० अंशतः क्षय झाल्यामुळें अल्प शेष राहिला जो तो; २, कृश.

**क्षीत**, स्त्री० क्षति शब्दाचा अपभ्रंश, परंतु याचा प्रयोग ह्गितीयार्थी; २, रवातर प्रथमार्थी.

**क्षीब**, ३ लिं० सं० मद्यपानादिकें करून झाला जो उन्मत्त तो.

**क्षीर**, न० सं० दुग्ध; क्षीरसमुद्र, क्षीरसागर, इ० स०; २, उदक; ३, अर्क, वट, इ० वृक्षांचा पोटरा निघतो जो चीक तें; ४, स्त्री० खिरीसस्र०.



**क्षीरोदक**, न० रेशिमाचें वस्त्र पांघरणेस लायाचे उपयोगी एक उंचें वस्त्र आहे तें मा० प्र० थीं प्रसिद्ध.

**क्षुण्ण**, ३ लिं० सं० पायांनीं तुडविलें, पाषाणादिकें करून ठेंचलें, इ० द्वारा चुरडलें जो कोणेक पदार्थ तो.

**क्षुत्**, स्त्री० सं० शिंक; २. क्षुधा.

**क्षुत**, न० सं० शिंक.

**क्षुद्बोध**, पु० सं० क्षुधेची जी प्रतीति ती.

**क्षुद्र**, ३ लिं० आकारानें किं० योग्यतेनें लहान जो पदार्थ, मनुष्य, इ० तो; क्षुद्रमत्स्य, क्षुद्रप्राणी, क्षुद्रग्राम, इ० स०; उ० केरकारणें, जोडाघुसणें, हीं क्षुद्र कर्में नुसासारिख्यानीं आतीनें करून येत; २, न० क्षुद्रक.

**क्षुद्रक**, न० जाचें उद्घाटन झालें असतां लज्जा प्राप्त व्हावी हीनत्व यावें असे जे कोणेकाचे अंगीं दोष असतात ते प्र०.

**क्षुद्रघंटिका**, स्त्री० रुपें, सोनें, कांसें, इ० धातूंचे भूषणादिकांस लावायाकरितां वाजायाजोगे हरभरा, करवंद, इ० प्रमाणाचे मण्याचे आकाराचे पोकळ जे पदार्थ विशेष करितात ते प्र०.

**क्षुधा**, स्त्री० सं० भूक; याचे स० क्षुधातुर, क्षुधार्त्त, क्षुधाक्रांत, इ०.

**क्षुधित**, ३ लिं० सं० क्षुधा जास लागली आहे तो.

**क्षुब्ध**, ३ लिं० सं० क्षोभ पावला जो तो.

**क्षुर**, पु० सं० वस्तरा मुख्यार्थी.

क्षेम, ३लिं० सं० कल्याण नपुंसकार्थी; आम्ही क्षेम आहों इ० स्थळीं क्षेमविशिष्ट आहों असा अर्थ; २, क्षेमालिंगन.

क्षेमालिंगन, न० यं० मित्रादिकां समीतीनें देतात जें आलिंगन तें.

क्षोणी, स्त्री० सं० पृथ्वी.

क्षोभ, पु० प्रकृत्यवस्थेच्या ठायीं स्थित जो कोणेक अर्थ त्यास कोणीक उपाधिसंबंधानें काहीं वेग प्राप्त झाल्यामुळें त्याचे त्या अवस्थेचा होतो जो अन्यथाभाव तो; २, क्रोधावेशानें अंतःकरणाचा होतो जो अन्यथाभाव तो.

क्षोभणें, कोणेकानें क्षोभानें युक्त होणें.

क्षोभित, ३लिं० क्षोभविला जो तो.

क्षोभ्य, ३लिं० क्षोभ द्यायास योग्य जो कोणेक अर्थ तो.

क्षौद्र, न० सं० मध.

क्षौर, न० सं० वस्त्र्यानें मस्तकादिसंबंधी केश काढण्याचा जो व्यापार तें.

क्ष्मा, स्त्री० सं० पृथ्वी.

---

ज्ञ

ज्ञ, पु० बुध; २, ३लिं० जो जा अर्थातें जाणतो तो तज्ज्ञ; जो ज्यातें जाणतो तो शास्त्रज्ञ, रसज्ञ, व्यवहारज्ञ, किंचिज्ज्ञ, सर्वज्ञ, इ० स० प्र०.

ज्ञप्ति, स्त्री० सं० जाणीव.

ज्ञात, ३लिं० सं० जाणला जो पदार्थ अथवा व्यवहारादि तो; २, स्त्री० ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, सोनार, शिंपी, इ० किं० गाय, बैल, पक्षी, इ० आ जाति त्या प्र०.

ज्ञातव्य, ३लिं० ज्ञेय.

ज्ञाता, ३लिं० कोणेक अर्थातें जाणणारा जो तो; २, पु० सुज्ञ.

ज्ञाति, पु० गोत्रज.

ज्ञान, न० जाणीव; २, तद्द्वारा कोणेक विषयाचें होतें जें ग्रहण तें; ३, त्या विषयग्रहणाचा आणि येथा ठायीं स्थलित झाला असतो जो संस्कार तें; ४, चातुर्य; ५, ब्रह्मज्ञान.

ज्ञानचक्षु, न० बाह्येंद्रियांचा विषय नव्हे असा जो आत्मस्वरूपादि कोणेक अर्थ तो जाणण्याविषयीं समर्थ जें कोणेकाचें ज्ञान तें; २, ३लिं० तद्विशिष्ट जो मनुष्यादि तो.

ज्ञानदृष्टि, ३लिं० ज्ञानचक्षु.

ज्ञानमार्ग, पु० ईश्वरप्राप्तीच्या वेदांत शास्त्रोक्त जो मार्ग तो.

ज्ञानमार्गी, ३लिं० ज्ञानमार्ग जाणें अवलंबिला आहे तो.

ज्ञानवल्ली, स्त्री० भांगेस म्ह०.

ज्ञानवायु, पु० एक वातरोग आहे जो झाला असतां अनेक प्रकारचा वाशीक मोठ्या कल्पना नियमात तो.

ज्ञानी, ३लिं० शास्त्रव्यवहारादिसंबंधी ज्यास ज्ञान आहे जास तो; २, पु० ब्रह्मज्ञानी.

ज्ञानेंद्रिय, न० कर्ण, नेत्र, घ्राण, रसना, त्वचा,

हीं पांच आणि मन हीं जीं इंद्रियें तीं म०

**ज्ञानोपदेश**, पु० आत्मज्ञानविषयक जो कोणेकास उपदेश करितात तो.

**ज्ञापक**, ३लिं०सं० कोणेक अर्थातें जाणविणारा जो शब्द, लेख, शास्त्र, चिन्ह, इ०तो.

**ज्ञापन**, न० ज्ञापविण्याचा जो व्यापार तें.

ज्ञापविणें,

**ज्ञापविणें**, ३लिं० जाणविणें.

**ज्ञापित**, ३लिं० जाणविला जो तो.

**ज्ञाप्य**, ३लिं० जाणवायाचा जो कोणेक अर्थ तो.

**ज्ञाप्यज्ञापकभाव**, पु० ज्ञाप्य, आणि ज्ञापक यांचा जो परस्पर संबंध तो.

**ज्ञेय**, ३लिं० जाणायास योग्य जो कोणेक विषय तो.

**धान्य**, न० भात, ओंधळा, गहूं, हरभरा इ० तें.

**धान्यदेश**, पु० जा देशांत बहूत धान्य पिकतें तो देश.

**धान्यभिक्षा**, स्त्री० धान्य पिकलें ह्मणजे त्या त्या समयीं कोणी भिक्षुक गांवोगांव फिरून त्या त्या धान्याची भिक्षा मागतात ती. धान्यसंग्रह, धान्यविक्रय, इ० समास आणावे.

**धाप**, स्त्री० दमा; २, धांवणें इ० कारणामुळें श्वास गतीचें जें प्रमाणाधिक्य होतें ती; ३, धापा देणें ह्म० परिश्रमामुळें किंवा दम्यामुळें त्वरेनें मोठे श्वासोछ्वास करणें.

**धापकरी**, ३ लिं० दम्याचा उपद्रव जास होत असतो तो.

**धापट**, स्त्री० दे० फिरायासाठीं टाकलेला जो भोंवरा तो न फिरतां राहाण्याची जी अवस्था ती; २, न० भात कांडलें असतां विरून केवळ चूर्ण जें होतें तें; ३, पु० सरड्यासारखा एक जीव आहे.

**धापड**, ३ लिं० कों० केवळ उखारजी शेताची जमीन तो.

**धापणें**, धापेनें युक्त होणें.

**धापलणें**, धापणें.

**धापाळू**, ३ लिं० धापकरी.

**धाप्या**, ३ लिं० धापाळू.

**धाबडधिंगा**, पु० रा० धांगडधिंगा प्रथमार्थ.

**धाबळ**, स्त्री० ऊर्णावस्त्र आहे; २, दे० खबुतरें ठेवायाकरितां जें घर करितात ती.

**धाबळी**, स्त्री० धाबळ प्रथमार्थ; २ कों० पेळू.

**धाबें**, न० गृहावर केवल मातीचा पेंड घालून आच्छादन करितात तें; २, तद्विशिष्ट गृहासही ह्म० ३, सं० कोणे कास धाब्यावर बसविणें ह्म० त्यापासून द्रव्यादिक घेऊन हिंगो दारवविणें किं० सर्वस्व हरण करून भिकेस लावणें, कोणेकाचें धाबें दणाणणें ह्म० त्यानें भयानें घाबरणें.

**धाम**, स्त्री० सहस्रावधि मनुष्य, किं० पशू इ० कांस एक समयावच्छेदें करून ज्वर, अतिसार, इ० रोगोपद्रव व्हावा अशी जी तत्तद्देशीं कोणे कालीं त्या त्या रोगाची व्याप्ति होती ती; २, ला० स्त्रियांस गर्भधारण किं० विवाह इ० बहूत एक समयावच्छेदें करून होऊं लागलीं असतां त्यासही ह्म०.

**धामण**, स्त्री० सर्पांत एक भेद आहे; २, एक वृक्ष आहे.

**धामण्या**, पु० धामणीचे पोटीं नागापासून जी संतति होती तो.

**धामधूम**, स्त्री० लोकांस उपद्रव व्हावयाजोगी परचक्रादि रूप जी गडबड ती.

**धामा**, पु० कों० धमाटा द्वितीयार्थ.

**धाम्या**, पु० माध्यंजनास निंदेनें ह्म०.

**धाय**, स्त्री० रडण्याची जी मोठी आरोळी ती. मोकल, फोड, इ० योगीं प्र०.

**धायटी**, स्त्री० एक झाड आहे.

**धायटीफूल**, न० धायटीचें जें फूल तें.

**धार**, स्त्री० जलादि पातळ पदार्थ वरून पडत असतां त्याचा जो दोरीसारिखा आकार दिसतो ती; २, जास वेग बहूत असा जो नद्यादिकांचा प्रवाह तो ती; ३, शस्त्रानें जिंकून काषायाचें

निकडील

तिकडील जो शस्त्राचा भाग ती,४,ला०तत्सदृश चौरस काष्ठादिकाचा जाशिरा तो;५,केवल स्वल्प तेल,तूप,इ० कांस देण्याचा प्रसंगीं ह्म० ६,पर्वताची मस्तक प्रदेशाची जी कडती;उ०, त्या धारेवरून पाण्याचा धोधा खाली पडतो आहे. धार काढणें ह्म० महिष्यादिकांचें दूध-काढणें, धार मारणें ह्म० तलवार मारणें. धारें वरधरणें वागणें ह्म० मोठ्या कदरेंत धरणें-किं० वागणें.

धारभर,३लिं० केवलस्वल्पजें तेल तूप इ०देणें, वाटणें, इ० प्रसंगीं प्रयोग याचअर्थी तेल तूप इ० कांची धार असें ही ह्म०.उ० गवळ्यानें दूध मापून दिलें असतां वर धार घालीत असतो. धारधरणें ह्म० विषार किं० मोडशी उतराया करितां मस्तकावर शीतोदकाची धार सतत पडे असें करणें, धारपडणें ह्म० किती पाहिजे तितकें द्रव्य किं०धान्यादिक गृहादिकांत आकाशांतून पडणें;उ०, तुह्मी फार खर्च करायास सांगतां तर माझे घरीं कांहीं पैक्याची धार-पडत नाहीं, धारेवरचा वाघ ह्म० जंबरा एतल योगविषयीं याचा प्रयोग करितात;उ०, हें काम तूं नकरीस तर कोण धारेवरचा वाघकरील.

धारक,३लिं०सं० धारण करणारा जो तो आज्ञाधारक, वस्त्रधारक इ० समासीं प्रयोग जाणावे.

धारकरी, पु० युद्धकरी.

धारजिणा,३लिं० जो मनुष्य, पशु, व्यवहार, देव, शीव, किं० कांहीं एक पदार्थ जा मनुष्यादिकांस सेविला असतां फलद्रूप होतो तो त्यास उ०. हें शेत आह्माला धारजिणें नाहीं असें पाहून सोडून दिलें ह्म० कसाबास गाय धारजिणी ह्म० मेसादेवी चोरास धारजिणी.

धारजणें, धारजिणें, न० मनुष्यादिक सेविलें असतां आपल्यास त्यानें फलद्रूप व्हावें असा जो कांहीं दैवयोग असतो तें.उ०, लोकांकडे एक ह्मैस असली ह्मणजे दुसें होतें आणि मी पांच बाळगल्या तरी ताक मिळत नाहीं तस्मात् मला गुरांचें धारजिणें नाहीं. धारजिण्यास येणें ह्म० धारजिणा होणें.

धारण. न० धरण्याचा व्यापार तें.उ० मी बुद्धीनें तितकें अर्थाचें धारण करीन, शरसंधान समयीं वामहस्तानें धनुष्य धारण करावें लागतें. धारणकरणें ह्म० धरणें;२,स्त्री० धान्यादि विक्रयीं अमुकप्रमाण धान्यादिकास अमुकद्रव्य पडतें असा जो नियम चालता असतो ती पांचांवर धारण बसणें ह्म० भय विव्हळ-होणें;३,पु० कों० धरणखांब;४.ला० राज्याचा किं० संसाराचा ज्जावर भार असतो त्या पुरुषास ह्म०.

धारणपारण. न०सं० धरणेंपारणें.

धारणा, स्त्री० पाठकेलेला ग्रंथादिक किं० समजलेला अर्थ नविसरतां धरण्याविषयीं जी बुद्धिशक्ति असती ती;२,दे० गृहस्थिति.

धारणी, स्त्री० कों० लाहानसा जो धरणखांब ती

धारणेंपारणें, न० कों० धरणें पारणें.

धारबंद,

धारबंद, स्त्री० शस्त्राची धार बंदकरण्याची एक विद्या आहे; २, ३ लिं० ती विद्या जाणतो तो.

धारबोळ, पु० स्त्री० कोणेक व्यवहार अमुक-अमुक प्रकारानेंच व्हावा इ० जो नियम तो, प्रायः निषेध विषयीं प्र०; २, अ० रा० कांठोकांठ जलादि सद्रव पदार्थानें भरण्याचे विषयीं प्र०.

धारमेर, स्त्री० पा० धरबंद.

धारराव, पु० धारकरी जो त्यास म्ह०.

धारवणी, न० दूध तापवायाचें असतां यत्किंचित् जें आंत पाणी घालितात तें; २, धार इ० कांची जी धार पडती ती खालीं भांडें धरून जें पाणी घेतलें तें, उ० डोणींतील पाणी आणू नको चांगलें धारवणी आण.

धारा, पु० शेत, आगर, एतत्संबंधी जें राजकीय देय तो; २, भाडें, विक्रय, चाकरी, इ० व्यवहारां विषयीं अमुकास अमुक द्यावें, अमुकानीं अमुककरावें इ० जो संप्रदाय पडला असतो तो; उ० दाहाकोशांस एकरुपया द्यावा असा आमचा गांवांत भाडयाचा धारा पडला आहे; विवाहांत स्वर्णाभिषेक संबंधी जें द्रव्य ती.

धारातीर्थ, न० शस्त्रानीं चाललेलें जें युद्ध त्यांत शूर मेला असतां स्वर्गास जातो म्हणून त्याला तीर्थत्वारोपानें म्ह०.

धारावाहिकबुद्धि, स्त्री० एक विषयाकारें करून कितीएक क्षणराहिलेली जी अंतःकरण वृत्ति ती.

धारिष्ट, न० भय, लज्जा, इ० कामीं योजित कार्यापासून पराङ्मुखता न होण्याविषयीं प्रयोजकीभूत अंतःकरण निष्ठदृढतारूप, जो गुण विशेष तें; उ० सर्प हातीं घेण्याचें मी धारिष्ट करीन पण दुसऱ्यास मारदेण्याचें मला धारिष्ट होत नाहीं.

धारी, स्त्री० धोतर, पातळ, इ० कांस रंगीत रेशीम, सूत, यांचा कांठ घातला असतो ती.

धारुष्ण, न० धातु पुष्ट्याद्यर्थ कासेंतून काढतांच तसेंच ऊनऊन पितात जें दूध तें.

धारें, न० उजेड पडावा किं० धूर बाहेर जावा म्हणून घराचेवर दळास किं० भींतीस जें द्वार ठेविलें असतें तें.

धारेएहसान, न० सर्कार धारा घ्यावयाचे शिरस्त्यांत कुळास कमी पडायाजोगा ठराव करून देतात तें.

धारेएहसानी, ३ लिं० जा शेताविषयीं धारेएहसान करून दिलें आहे तो.

धारेकरी, ३ लिं० जाला सरकारचा धारा द्यावा लागतो असें जें कुळ तें.

धारेबंदी, ३ लिं० जा शेताचा धारा बांधून कुळानीं घेतला आहे तें शेत व तीं कुळें.

धारेमाप, न० सर्कारी धान्याचा दाणा मोजून घ्यावयाचें जें माप तें.

धारोष्ण, न० धारुष्ण.

धार्मिक, ३ लिं० धर्मात्मा.

धार्ष्ट्य, न० धटपणा.

धाव, पु० रा० माकडें तोंडास तांबडा रंग लावित असतात

असतात ती.

धॉंव, स्त्री० त्वरेनें चालण्याचा जो व्यापार ती ठोक, मार, इ० कांचा योगीं प्र०; २, गाड्याचे चाकाभोंवताली जी लोखंडाची पट्टी मारली असती ती; ३, दे० मोटेचे बैलास मोट वाहातांना जो प्रदेश चालावा लागतो ती; ४, ला० कांहीं एक खर्चवेच इ० करण्याविषयीं आपले-शक्तीची किं० संकल्पाची कोणेक अवधिपर्यंत जी गति ती; उ०, या लग्नास हजार रुपये खर्चूं इतकी आमची धांव आहे; ५, साधारण रीतीनें तर्कित होती जी मूल्यादिकाची इयत्ता तीतें उल्लंघून अतिरिक्त दिसायाजोगें जें कथनादिक ती; उ०, आमचामतें या सनगास पांच रुपये पडावे पण तूं फार धांव मारतोस.

धॉंवचाल, स्त्री० कों० कांहीं सवेगगति कांहीं साधारणगति असा चालण्याचा जो व्यापार ती.

धावड, पुं० एक लोखंड उत्पन्न करणारी जाति आहे.

धॉंवड, स्त्री० धांवण्याचा परिश्रम ती; उ०, आज मला दाहा कोशांची धांवड पडली त्यामुळें मी थकलों.

धॉंबडणें को० धांवत चालविणें.

धावडी, ३लिं० धावडांनीं निर्मित लोखंडी, तवा, इ० ती.

धॉंवण, स्त्री० कों० धांवड.

धॉंवणें, अतिशयित वेगानें चालणें; २, न० चोरधरणें, आग विझविणें, इत्याद्यर्थ राजभृत्यादिकांचें धांवत जें आगमन किं० धांवत येणारे जे राजभृत्यादिक तें; उ०, चोर पळत आहेत तों सरकारचें धावणें आलें; ३, धांवा; उ०, भक्तांचें धावण्यास ईश्वर धांवतो.

धॉंवती, स्त्री० कों० रोगी इ० कास मूर्च्छा पडाया म्हणून वैद्य, देव, भक्ते, औषधें इ० मिळवून उपाय करावा लागतो ती.

धावन, न० सं० धांवण्याचा व्यापार तें; २, धुण्याचा व्यापार तें, दंतधावन, अंगधावन, इ० समास आणावे.

धॉंवरा, ३लिं० अतिशय धांवण्याचा स्वभाव ज्याचा तो, मनुष्य पश्वादिक; २, गुणाकारांत कृतिभेद प्रयुक्त एक भेद आहे.

धॉंवरें, न० एक रोग आहे.

धावशी, स्त्री० एक वृक्ष आहे.

धॉंवा, पु० स्वसंकट निवृत्त्यर्थ ईश्वरादिकांस धांवत यावें अशी जी प्रार्थना तो; २, तदर्थ प्रतिपादक जीं गाणीं रचलीं असतात तो.

धॉंवाधॉंव, स्त्री० अग्नि, रोग, इत्याद्यनेक उपद्रव संबंधी पीडानिरसन व्हावयाकरितां तदुपयुक्त अनेक उपाय त्वरेनें केले पाहिजेत म्हणून इकडे धांव तिकडे धांव इ० रूप जी खटपट करावी लागती ती.

धॉंवाडा, पु० रा० धांवड.

धॉंवाड्याचावाय, पु० नेहेमी गांवांत राहाणारा नव्हे असा जो फिरस्ता वाय तो.

धाविन्नणें, गं० धांवणें.

धास्त, स्त्री० एकवार घेतलेल्या भयाचा किं० शोकाचा वारंवार धस्स धस्स व्हावयाजोगा

अंतःकरणांत

अंतःकरणांत जो संस्कार राहतो ती; उ० आम च्यें गलबत अद्याप येत नाहीं ह्मणून मला मोठी धास्त लागली आहे, या पोरानें आई मेल्यापासून धास्त घेतली ह्मणून झिरणीस लागला; २, कों० दहशत.

धास्तावणें, धास्तीनें युक्त आल्यामुळें बुद्धिभ्रंशादि विकृतीतें पावणें.

धास्ती, स्त्री० धास्त.

धिक्, अ० व्यर्थतादिमूलक तिरस्कार विधानाचें द्योतक; उ० ईश्वर भजनीं ज्याचें लक्ष्य नाहीं त्यांचें जिणें धिक्.

धिक्कार, पु० कोणेक गोष्टीची किं० पदार्थाची धिक्, थाईट, छिः, इ० शब्दानीं जी निंदा तो; उ०, मूर्खांनीं विद्वज्जनाचा धिक्कार केला ह्मणून ते निंद्य होत नाहींत.

धिंग, ३लिं० रा० उदार.

धिंगड, न० रा० विरूप दिसायाजोगी अत्यंत उंच अशी जी स्त्री किं० वस्त्र नेसायाचें योग्य तेस आलेली असून नागवी राहती अशी जी मुलगी तिला ह्म०.

धिंगडणें, कों० इतस्ततः उड्यामारणें, नाचणें, इ० उनाड क्याकरणें.

धिंगा, पु० कों० धिंगाणा.

धिंगाई, स्त्री० रा० धिंगपणा.

धिंगाणा, पु० धिंगडण्याचा जो व्यापार तो, धाल, मांड, इ० कांचा योगीं प्र०.

धिंगामस्ती, स्त्री० दांडगेपणानें मारणें, उड्यामारणें, इ० व्यापार ती.



धिंड, स्त्री० चोरादिकांस अप्रतिष्ठार्थ गाढवावर बसवून पांचपाट काढणें इ० कानें विशोभित करून ग्रामादिकांत वाद्यादि पूर्वक फिरवितात ती वस्तुतः एक असतां त्या नियमप्रकारातें पावल्यामुळें अवतारवत् भिन्नत्वें करून मानिला जो तोच पुरुष असें अर्थाचें पर्यवसान होतें, फिरविणें, काढणें, इ० कांचा योगीं प्र०; २, ला० शिव्या, गाळी, इ० कानीं जी अप्रतिष्ठा करितात ती; ३, ला० मनुष्यास तिरस्कारानें बोलायाचें असतां गमन आगमन स्थिति, एतद्विशिष्ट जो तो त्यालाह्म०; उ०, या दुष्टाची धिंड बाहेर निघेल तेव्हां मी घरांत येईन ह्मणजे हा जेव्हां घरांतून बाहेर आईल तेव्हां.

धिंडवडा, पु० कों० शिवीगाळी देऊन जी अप्रतिष्ठा किं० कोणेकाचे कुकर्मांचा जो सर्वत्र बोभाटा तो, उ० ती गोष्ट तुह्मीं मजवळ कशास चोरितां तिचा गांवभर धिंडवडा आला आहे.

धिंडावणें, कों० तिरस्कारानें बोलायाचें असतां जें आणें तेंच धिंडावणें, उ०, जेवायाचें होतांच आला कामाचेवेळेस कोणीकडे मसणांत धिंडावला होता.

धिपाड, धिप्पाड, ३लिं० साधारण रीतीपेक्षां विशेष उंच जो मनुष्य, पशु, पर्वत, वृक्षादि तो.

धिमा, धिम्मा, ३लि० क्रोधादिकानें उतावळा होत नाहीं असा स्वभाव ज्याचा तो; २, फार उंच नसून भरपूर जो मृदंगादिकांचा स्वर तो; ३, ज्यामध्यें विशेष त्वरा नाहीं असा जो पुरु

पादिक त्यास स्तुति प्रसंगीं धिम्मा ह्म० आणि निंदा प्रसंगीं मंद ह्म० ;४, त्वरारहित सावकाश जें गाणें, ह्मणणें, इ० तो.

धिमाई, धिम्माई, स्त्री० धिमेपणा.

धिरा, पु० तुळई, इ० कांस स्तंभसदृश जो टेंका देतात तो ;२ ला० कोणेकानें कोणेक-व्यापारीं प्रवृत्त होण्याविषयीं किं० धरलेला व्यापार न सोडण्याविषयीं दुसऱ्यानें धैर्यावह जो शब्द दिला तो ;३, अ० उतावळा होऊं नको थांब असा अर्थ ;उ०, केवळ घाई करून कां जरासे धिरा.

धिरें, अ० धिरा.

धिरे धिरे, अ० अतित्वरा न करितां कर, चाल, इ० कांचे वि०.

धी, स्त्री० सं० बुद्धि.

धीट, ३ लिं० धट्ट.

धीमान्, ३ लिं० सं बुद्धिमान्.

धीर, पु० धारिष्ट ;२, कर्तव्यकार्य, प्राप्तव्यलाभ, इत्याद्यर्थ उतावळेपणा न होण्याविषयीं प्रयोजक जो अंतःकरण निष्ठधर्म विशेष तो, उ०, तुह्मीं दोन वर्षें रुपये नाहीं दिले तरी मला धीर आहे, ३, ला० कोणेक संकट आपल्यास प्राप्त आलें असतां त्याचा परिहार अमुकापासून होईल असा धैर्यास अवष्टंभरूप जो विश्वास तो, उ०, दुसऱ्याचे धिरावर कोणतेंही काम आरंभूं नये ;४, गंभीर, धिराचा ह्म० मोठें धारिष्ट ज्याचें तो.

धीवर, पु० एक कोळी ह्मणून जाति आहे.

धुई, स्त्री० थंडीचे दिवशीं किं० पर्जन्यकालीं धुरासारिखें जें येतें ती.

धुकट, न० धुई, २, पु० रा० धूस.

धुकटावणें, रा० धूर लागल्यामुळें व्याकुळ होणें.

धुकटी, स्त्री० धुरी.

धुकें, न० धुई.

धुगधुगी, स्त्री० अन्यावयव निश्चेष्टित पडून केवळ कंठदेशीं मात्र अवशिष्ट जो प्राणांश ती.

धुगधूग, स्त्री० धुगधुगी.

धुडका, पु० वस्त्रादिक फाटून जाल्या जागीं कचिंध्या तो त्या प्र० याचा प्रयोग तादृश वस्त्रादिकांची दुर्दशा वर्णायाची असतां ;२, ला० वादी, प्रतिवादी, शत्रू इ० कांची जी दुर्दशा ती उडविणें, करणें, या धातूंवर अन्वय.

धुडकावणें, वादी इ० कांस पराभूत करून टाकणें.

धुडकी, स्त्री० धुडका.

धुडकूस, धुडगूस, पु० वस्त्रादिक चुरून मळून दुर्दशा पावे असा त्याजवर नाचणें, उडणें, लोळणें, इ० जो व्यापार तो घाल, मांड, धातुयोगीं प्र०.

धुडगुसला, पु० गा० धुडकूस.

धुंडणें, पदार्थ ठायीं पाडायासाठीं तें तें अधिकरण अवयवशः पाहणें एथें ज्या ठायीं पाडायाचे पदार्थास कर्मता जाणावी उ०, मी आपुलें पत्र धुंडायासाठीं सगळी पोथी धुंडून पाहिली.

धुंडावणें, धुडकावणें.

धुंडाळणें, धुंडणें.

धुणावळ, स्त्री० रा० वस्त्रें धुण्याचा जो व्यापार ती; २, वस्त्राचे धुण्यानिमित्तक जें रजकादिकांस देतात जें मोल ती.

धुणी, स्त्री० शरीर, शेत, इत्यादिकांतील मल, रोगांश, खत, इ० कांचा निःशेषपणें जाण्याचा जो प्रकार ती; उ०, अतिसारामुळें शरीराची धुणी जाली; उ० पावसानें शेताची धुणी जाली यापोरानें रांडछंदास लागून घराची धुणी केली; २, गोसांवी, बैरागी, इत्यादिक क्वचित्स्थलाचा ठायीं नेहेमी अग्नि बाळगीत असतात ती; धुणी याळून बसणें म्ह० द्रव्यादि उगवावें इत्याद्यर्थ हटानें अडून बसणें.

धुणें. जलादिकानें वस्त्रादिक निर्मल करणें पक्षीं मलासहिकर्मता; २, कांहीं एक पदार्थांतील कांहीं एक अंश निःशेष काढणें किं० तो काढून तो पदार्थ तद्वियुक्त करणें; उ०, अतिसारानें कोठा धुतला, पोरानें शरीरांतील रोग धुवून काढला, या पोरानें सर्व घर धुतलें; ३, ला० अपयश, पाप, इ० तत्तदुपायानें दूर करणें; ४, न० धुवायास उद्दिष्ट जें वस्त्र तें; उ०, माझीं आजून पांदीभर धुणीं धुवायाचीं आहेत, धुतलेला विस्तव म्ह० कोळसा संकेतानें अतिशयकाळा जो मनुष्य त्यास म्ह०.

धुतरा, पु० रा० धोतरा.

धुतरें

धुतरें, न० रा० सूर, सनई, इ० कांचे दांड्यास खालीं पितळेचा फुलासारिखा अवयव मारिला असतो तें.

धुतवस्त्र, न० सामान्य सोंवळ्याचे उपयोगीं धुवून वाळविलें जें वस्त्र तें.

धुताडा, पु० दुताडा.

धुलारा, ३ लिं दे० लोकांस भोंदून ठकवितो तो.

धुंद, ३ लिं० मद्यादि मदानें ज्याची शुद्धि गेली आहे तो किं० त्याचे डोळे; २, दूरवर स्वच्छ न दिसाया जोगें धूळ, धूर, इ० कांमुळें आलें जें आकाश, दिशा, इ० ती.

धुंदाई, स्त्री० राजादि धन्याचें भय न बाळिगतां ज्यास बळ होईल त्यानें मारावें, लुटावें, जें पाहिजे तें करावें, असा जो राज्यादिकांचा ठायीं वर्त्तन प्रकार ती.

धुंदावें, न० धुंदाई.

धुंदी, स्त्री० मद्यादिकांचा जो उन्माद ती.

धुंदूकमुंदुक, अ० अस्वच्छपणें दिसण्याचें विशेषें नेत्रविकृति किं० प्रकाशाचें अल्पत्व इ० अस्वच्छतेस कारण जाणावें; उ० तुह्मांस सूर्यास्तसमयीं जसें धुंदूकमुंदूक दिसतें तसें दिवसा हीमला चाळिशीमुळें दिसतें; २, न० सूर्यास्ता नंतर किं० सूर्योदया आकू तसें दिसावयाजोगी जी कालावस्था तें; उ०, मी धुंदूक मुंदूक होतांच निघालों तो प्रहर दिवसास घरीं आलों.

धुंदूसमुंदूस, ३ लिं० न० धुदूकमुंदूक.

धुनी.

धुनी, स्त्री० दे० धुमी.

धुपट, ३लिं०कों० धुवट.

धुपटणें, न० दे० धुपाटणें.

धुपणी, स्त्री० स्त्रियांस किं० पुरुषांस नित्यशः धातुक्षय व्हावा अशी जी विकृति होती ती.

धुपणें, धुतलें जाणें;२, पर्जन्य, नदी, इ०कांचा उदकानें दरड, शेत, इ० कांचा मृत्तिकांश निघून जाणें;३, अग्निसंयुक्त काष्ठादिक नपेटतां धूमयुक्त होणें;४, ला० क्रोध, मत्सर, इ० अंतःकरणांत रोधल्यामुळें कांहींएक व्यथाविशेषातें मनानें पावणें;उ०, मोठ्या सवतीस मुलगा होतांच धाकटी धुपूं लागली.

धुपवणें, कांहींएक पदार्थ धुपाचे धुरानें सुगंधित करणें.

धुपा, पु० कों० एक गवतांत भेद आहे;२. एक लोहाळ्यांत भेद आहे.

धुपांगारा, पु० देवादिकांपुढें धूप जाळायासाठीं आणिलाजो निखारा तो.

धुपाटणें, न० धूप जाळायासाठीं पितळ इ० कांचें पात्र केलें असतें तें.

धुपारती, स्त्री० देवाची धूप, दीप, नैवेद्य, आरती, इत्यादुपचारयुक्त पूजा करितात ती.

धुबकन्, धुबकर, धुबदिशीं, अ० मृदुपदार्थ मृदुपदार्थावर पडलाअसतां जो शब्द होतो त्याचें अनु० पड, वाज, इ० कांचें वि०

धुमक, पु० कों० वायुविकृतीनें पोटांत गोळा उचलतो तो.

धुमकणें, कों० बुकलणें.

धुमका, पु० कों० बुकीचा जो प्रहार तो.

धुमड, स्त्री० कों० झिंबड, उ०आज लाडवांची धुमड उडाली, आज पावसानें धुमड आविली आहे.

धुमणें, अग्निसंयुक्त काष्ठादिकानीं नपेटतां धूमयुक्तावस्थेनें पावणें;२, ला० अंबे इ० कांचीं केसरें खारपडल्यामुळें करपणें.

धुमधाम, स्त्री० धामधूम.

धुमरा, ३लिं० नपेटतां धुमण्याचा स्वभावजाचा असें काष्ठादि जळण तें.

धुमश्चक्री, धुमाश्चक्री, स्त्री० झिंबड;२, एकमेकास मारणें, नाचणें, इ० रूपजी दांडगाई ती.

धुमा, पु० मृदंगादिकांचा जो मागला पुडा तो २, कों० चोर, गुरें, इ० कृत ग्राम, शेत, इ० कांची जी दुर्दशा ती.

धुमाडा, पु० कों० वृक्षाचा सबळ जो कोंब किं० वाढाळूजें झाड तो;२.ला० अकस्मात् जो शरीरावर फोड उठतो तो.

धुमाधार, ३लिं० कों० सतत चिरकाल मोठ्या धारेंनें पर्जन्याचें पडणें, बसणें, इ० कांचें वि०.

धुमारा, उ० धुमाडा.

धुमाळ, स्त्री० मृदंग वाजिवण्याची एक गति आहे

धुमाळी, स्त्री० कों० धुंदाई;२, झिंमड.

धुमी, स्त्री० गोसांवी, बैरागी, इ० आपण राहा यांचे स्थलीं नेहेमी जो विस्तव राखिताती किं तें विस्तवाचें आयतन ती ला० धुमी घालून बसणें म्ह० करणादि उगवायाकरितां हठानें अडून बसणें.

धुमें, न० धुकें.

धुरकट, ३लिं० धुराचे योगानें विरूत झाला जो रंग, किं० वास, अथवा तद्विशिष्ट पदार्थ ती; २, न० धुकें; ३, चूल इ०कांचे उपरि प्रदेशीं धुराचा मळ जो बसला असतो तें.

धुरकटणें, रंग, वास, किं० तद्विष्ट पदार्थ धुरकट होणें.

धुरकटाण, स्त्री० धुरकट जो वास ती.

धुरखीळ, स्त्री० गाड्याचे दांडीचे शेवटास लांकडाची खीळ घालितात ती.

धुरट, ३लिं० कों० धुरकट.

धुरटणें, कों० धुरकटणें.

धुरटाण, स्त्री० कों० धुरकटाण.

धुरंदळ, न० धुराडी.

धुरंधर, ३लिं० राजकार्यादि व्यवहाराचा भार मुख्यत्वेंकरून आजवर असतो तो; २, ला० जा कार्यामध्यें जो पुराप्रवीण तो त्या कार्याविषयीं.

धुरवणीं, न० धुरानें मलिन झालेलें जें पाणी तें.

धुरला, धुरळा, उ० मार्गादिकांवर केवळ बारीक झालेली जी मृत्तिका असती ती; धुरळा मरणें म्ह० पर्जन्यादि उदक पडल्यामुळें भूमीशीं बसणें.

धुरा, पु० वा० उपहास किं० निंदा कर्तव्य असतो मनुष्यादिकांस म्ह०.

धुराडी, स्त्री० अतिशयित जो धूर ती.

धुराडें, न० चूल इ० कांचे उपरिप्रदेशीं धूर बाहेर जावा म्हणून घरास गवाक्ष राखितात तें.

धुराणी, स्त्री० कों० ओकडाचे शेवटाकडील विंधांतली जी शिवळ ती.

धुराणें, न० धुराडें.

धुरावणें, धुकटावणें.

धुरी, स्त्री० कांहीं कारणास्तव विवक्षित औषधादिक अग्नींत घालून धूर करितात ती.

धुरीण, ३लिं० कोणेक विद्या, कला, व्यवहार, यांचेठायीं जो पुरा प्रवीण तो.

धुरोळा, पु० धुरळा.

धुलाई, स्त्री० वस्त्रें धुतल्यामुळें रजकास जें देयती.

धुवट, ३लिं० धुतल्यामुळें कोरेपणा जाचा गेला असें नुकतें धुवून ठेवल्यामुळें मलीन झालेलें नव्हे असें जें वस्त्र तो.

धुवडी, स्त्री० रा० ध्वाडी.

धुवण, न० धूण.

धुंवा, पु० धुमाद्वितीयार्थी.

धुवासाकर, धुवासाखर, स्त्री० धुवून स्वच्छ केलेली साखर असती ती.

धुशा, पु० एक ऊर्णावस्त्र आहे.

धुश्श, ३लिं० ठुस्स.

धुसधुसणें, ठुसठुसणें; २, चुरमुरणें, उ० त्याणें

णें तुला शिव्यादिल्या नसतां तूं उगाच कां धुसधुस तोस.

**धुसधूस**, स्त्री० ठुसठूस.

**धुसमणें**, धुसमुसणें.

**धुसमुसणें**, आंतचे आंत फुंदून फुंदून रडणें

**धुळपट**, स्त्री० कोणेक मनुष्याची किं० संपत्यादिकांची केवळजी दुर्दशा ती. उडणें, होणें, करणें, इ० कांचा योगीं प्र०; उ० यापंडितानें सर्व पडितांची धुळपट करून दिली.

**धुळवड**, स्त्री० फाल्गुनवद्य प्रतिपदेस एकमेकाचे अंगावर धूळ टाकितात असा खेळ करितात ती.

**धुळवरा**. **धुळवडणें**, कोणेक मनुष्यादिकास धुळीनें मारणें.

**धुळवाड**, स्त्री० धुळवड.

**धुळवाफ**, स्त्री० पर्जन्यानें धुरळा मेलानाहींत पूर्वीच जो पेरा करितातती.

**धुळारा**, पु० वातादिकानें उडाली जी धूळ तो.

**धुळाक्षर**, न० पोरें शिकायाकरितां पाटीवर लिहितात जें श्रीपासून अक्षरें, अंक, इ० तें.

**धुळोरा**, पुं० दे० धुरळा.

**धूड**, न० बृहच्छरीर जो मनुष्यादि त्यासह्म०

**धूण**, न० तांदूळ धुवून काढिलें जें पाणी तें; २, डाळ, इ० कांचे पाण्यासही कचित ह्म०

**धून**, स्त्री० रागज्ञापक ध्वनीचा जो यत्किंचिदंश ती; उ० हा शुद्धसारंग नव्हे यांत किंचित् मल्लाराची धून मारती.

**धूप**, पु० झाडाचा चीक आहे; २, सुगंधि धूरयावा ह्मणून जाळितात जें ऊद इ० तो; ३, तोचीक किं० दतरऊद इ० सुगंधिद्रव्यें अग्नींत घातलीं असतां येतो जो सुवासिक धूर तो, धूपदाखवणें ह्म० भक्ष्यादि पदार्थ तृप्ति न व्हावयाजोगा थोडथोडा देणें किं० वाटणें इ०, उ०, भाराभर गवतानें शंभर गुरांस धूप दाखवून आलों, धूपघालणें ह्म० बोलेना त्यास बोलवायाकरितां अनेक आर्जवादि उपाय करणें

**धूम**, पु० अग्नीस आर्द्रेंधन संयोग झालाअसतां त्या आर्द्रतेचा परिणाम होऊन जो ऊर्ध्वगति पावत असतो तो; २, स्त्री० धांवप्रथमार्थी; ३, कांहीं एक व्यवहाराचा किं० पदार्थाचा अतिशयितपणें होण्याचा जो प्रकार ती; उ० यंदा उदमाची धूम उडाली आहे, आमचे गावीं आंब्याची धूम झाली असेल; ४, सैन्यादिकृत दंग्यास ह्म०; उ० शत्रूनें देशांत धूम मांडली आहे, क्षणभर पंतोजी गेला ह्मणजे पोरें धूम मांडितात; ५, अ० मध्यें मध्यें विसांवा न घेतां करावें नकरावें असें करावें कीं असें करावें इ० विचार नकरितां सातिशयपणें कोणेक व्यापार करण्याचें वि०; उ०, सकाळीं उठला तो धूम चालूं लागला, प्रत सांपडली ह्मणजे धूम लिहितो शुद्ध अशुद्ध कांहीं पाहात नाहीं, थोड्यांत मजकूर आणून पत्र लिहावें तें कागद संपे तों धूम लिहितोस कशास, अरीमरीनें धूम माणसें मरूं लागलीं इ०

**धूमकेतु**, पु० शेंडें नक्षत्र.

**धूम्र**, पु० धूम प्रथमार्थी.

**धूम्रपान**, न० गोसावी इ० तपश्चर्यार्थ अग्नीवर उलटें टांगून घेऊन धूमभक्षण करीत असतात; २, संकेतानें गुडगुडी पिण्याला ह्म०.

**धूर**, पु० धूम्र; २, रौप्यादिकांचे पदार्थावर कांहीं युक्तीनें सुवर्णाचा रंग देतात त्यास ह्म०. कोणेकास धूर देणें ह्म० चोंदी देणें, कोणेकास धुरावर धरणें ह्म० अतिशयित जाच करणें; ३, स्त्री० जोकडाचीं दोन जीं शेवटें तीं प्र०; ४, गाडा, गाडी, इ० कांचे दांडीचा जो अग्रभाग ती; ५, पायाचे आंगठ्याचे पाठीमागें उंच जो पावलाचा पृष्ठभाग असतो ती; ६, त्यास्थानावर यावयाचा जोडा, वाहाण इ० कांचा जो भाग ती.

**धूरकरी**, ३ लिं० गाडा इ० कांचे धुरेवर बसून जो बैल हांकणारा तो.

**धूर्त**, ३ लिं० नबोलतां आकारादिकांवरून दुसऱ्याचें इंगितादि जाणणारा जो चतुर तो; २, दुसऱ्यास फसवून आपला पगडा पाडण्याविषयीं अनेक कपट युक्ति जाणणारा जो लबाड तो; ३, शृंगार प्रकरणीं एक नायिकेस ठकवून दुसरे नायिकेस भोगणारा जो नायक तो.

**धूर्ताई**, स्त्री० धूर्तपणा.

**धूलि**, स्त्री० सं० धूळ.

**धूळिवंदन**, न० फाल्गून वद्य प्रतिपदेस होळीखालची राख, मृत्तिका, यांचा जो कपाळ इ० अवयवांवर लेप करितात तें.

**धूव**, स्त्री० कन्या; उ०, ह्म० बोले सुनें आणि लागे धुवे.

**धूळ**, स्त्री० बारीक झालेली जी मृत्तिका ती; २, ला० कोणेक मनुष्यादि पदार्थ किं० व्यवहार यांची झाली जी दुर्दशा तिला ह्म०. धुळीस मिळणें ह्म० संपत्ति, व्यवहारादिक केवळ दुर्दशेस पावणें, धुळीचे दिवे खात जाणें ह्म० पूर्वस्थित संपत्यादि नष्ट होऊन भीक मागत जाणें.

**धूळदर्शन**, न० देवालयास गेलें असतांच उभे उभ्यानीं पादप्रक्षालनादि करायाचे पूर्वीच दूरून देवाचें दर्शन घेतात तें; २, ला० कोणेकाचें कोणेकास बोलणें, चालणें, इ० व्यवहार नघडतां नुकतें झालेलें जे केवळ दर्शनमात्र त्यास ह्म०; उ०, मासें वृत्त समजून नयेतां धूळ दर्शनीच शिव्या देऊं लागला.

**धूळदशा**, स्त्री० धुळपट.

**धूळधमासा**, पु० कोणेक पदार्थाचा अनेक प्रकारें नास धूस जाल्यामुळें आंत कांहीं तत्वांश राहिला नाहीं अशी जाली जी दशा तो; उ०, पोरापाशीं सावकारीस हजार रुपये दिले होते त्यांचा यानें धूळधमासा करून टाकिला.

**धूळधाणी**, स्त्री० धुळपट.

**धृत**, ३ लिं० धरलेला तो.

**धृतराष्ट्र**, पु० जन्मांधास ह्म०.

**धृतव्रत**, ३ लिं० जें कर्म करण्याविषयीं जाणें संकल्प

कल्प केला आहे तो त्या कर्मा विषयीं.

**धृति**, स्त्री० सत्तावीस योगांतील आठवा योग तो; २, सं० धैर्य.

**धेड**. पु० महारास निंदा प्रसंगीं म्ह०.

**धेंड**, न० विद्या, पराक्रम, इ० गुणानें. मान्यतेनें ओजड पुरुषादिकतें; उ०, त्यासभेस भवदेव मिश्रादिक मोठमोठीं धेंडें असत म्हणून ती सभा शोभे.

**धेडगा**, पु० धेड.

**धेडगुजरी**, ३ लिं० अनेक भाषांचे शब्दांच्या संकर जामध्यें आहे असें जें भाषण तें.

**धेंडशी**, स्त्री० एक वेल आहे.

**धेंडसें**, न० धेंडशीचें फळ तें.

**धेंडा**, पु० या० विवाहांत वरास मधुपर्क करितेसमयीं त्याचे शेजारीं दुसरा कोणिएक मुलगा बसवितात तो; २, सुरख्या बरोबर जें खोटेंपान हुकूम होत असतो तो.

**धेंडा**, पु० दे० वरातेचा दिवशीं नवरीच्या दारापुढें कोणेक पुरुष वधूवरांस कडेवर घेऊन देवांचीं नावें घेऊन नाचत असतो तो.

**धेंडाळणें**, पातळ हागणें.

**धेंडाळी**, स्त्री० मळतापळ होऊन वारंवार हगायास व्हावें असा जो मनुष्य, गुरूं, इ० कांस उपद्रव होत असतो ती.

**धेडी**, स्त्री० तानवड म्हणून स्त्रियांचें कर्णभूषण आहे.

**धेंडूं**, न० धेंड; उ०, अनंत ब्रह्मांडें एके रोमी ऐसें धेंडें.



**धेंडोली**, **धेंडोळी**, स्त्री० दे० बळिप्रतिपदेचे दिवशीं गुराखीलोक गवताचे चुडीनें गुरांस ओंवाळितात ती.

**धेडया**, पु० धेडगा.

**धेनु**, स्त्री० सं० गाय.

**धैर्य**, न० धीर प्रथमद्वितीयार्थी, धैर्याचा म्ह० मोटें आहे धैर्य ज्यास तो.

**धैर्यवान्**, ३ लिं० धैर्याचा.

**धैवत**, पु० सप्तस्वरांतील साहवा जो स्वर तो.

**धोक**, ३ लिं० शरीरानें लठ्ठ जो मनुष्य तो.

**धोकडा**, पु० रा० शरीरानें बळकट, लठ्ठ, जो पुरुष, बायको, इ० त्यांस निंदेनें म्ह०.

**धोंका**, पु० कांहीं एक अनिष्ट प्राप्त होईल अशी भयविषयक जी संभावना असती ती; उ०, यामार्गानें तुह्मी खुशाल जा कांहीं धोंका बाळगूं नका; २, कांहीं एक व्यवहारादिकाचा ठायीं जी चपट बसती ती.

**धोकाळ**, पु० कों० मोठा प्रज्वलित जो अग्नि तो.

**धोंगटी**, स्त्री० न्हावी, वस्तरा इ० डोकी करायाचें साहित्य जांत बाळगीत असतो असें चर्मपात्र आहे ती; २, पडशी.

**धोंगडा**, पु० दणकट वस्त्रास म्ह०.

**धोटणें**, मध्यें विसावा, मंदत्व, नकरितां उदक, दूध, इ० एकसारिखें वेगानें पीत सुटणें.

**धोटा**, पु० जलादिक धोट असा पिण्याच्या ओघ कार तो. लाव धातुयोगीं प्र०.

**धोटें**, न० बैल इ० कांस औषधादि रस पाजा

या करितां वेळू इ॰ कांची जी नळी केली असतीतें; २, दे॰ वस्त्रविणणारे जांत सुताची कांडी भरितात असें शिंगाचें यंत्र असतें तें.

**धोंड**, स्त्री॰ मोठा जो धोंडा ती; २, कोणेकावर धोंड पडणें क्रि॰ येणें ह्म॰ अतिशयित द्रव्य नाश होई असें दरवडा इ॰ संकट प्राप्त होणें; उ॰, याव्यापारांत पांचहजारांची मजवर धोंडपडली, कोणेकाचे डोकीवर धोंड देणें ह्म॰ बलात्कारानें कोणेक व्यापारीं प्रवृत्त करणें, दुर्निर्वाह असून अवश्य निर्वाह्य जें कार्यादिक त्यास आरोपानें ही गळ्यात धोंड आहे ही उरावर धोंड आहे इ॰ ह्म॰.

**धोंडगळ**, ३लि॰ जाभूमींत धोंडे बहूत अशीजी भूमि ती.

**धोंडदिवस**, पु॰ रा॰ अव्यवहित दोन तिथींची प्रसिद्ध जीं दोन कृत्यें तीं पूर्वोत्तरदिवशीं होतात आणि मध्यें फुकट जो एकदिवस अप्रयोजक तिथीचे वृद्धीमुळें पडतो तो.

**धोंडफोड्या**, पु॰ पाथरवट.

**धोंडभट्टी**, स्त्री॰ जलस्नान नकरितां स्नान केल्यासारिखें दिसावें ह्मणून भस्म, गंध, इ॰ कांचें जें धारण करितात ती.

**धोंडमहिना**, पु॰ अधिकमास.

**धोंडवण**, न॰ दे॰ अधिकमासांत तन्निमित्तक ब्राह्मण भोजनादि समारंभ जो करितात तें.

**धोंडवणी**, न॰ ठिकरीच्या वास लावलेल्या ताकाची निंदा कर्त्तव्य असतां ह्म॰.

**धोंडवण**, न॰ अधिकमहिन्यांत पक्कान्नाचें ब्राह्मणास वाण देत असतात तें.

**धोंडवायन**, न॰ धोंडवाण.

**धोंडशीर**, टांचेचावरची जी शीर ती.

**धोंडा**, पु॰ दगड; २, अधिकमास; ३, अधिकमासांत जें कणकीचें पक्कान्न वाण द्यावयाकरितां करितात तो, धोंडे मारूं लागणें ह्म॰ केवल वेडावळणें, धोंड्यावर धोंडा घालून कांहींएक कार्य करणें ह्म॰ द्रव्यादि नसतां अनेक प्रकारचे युक्तिप्रयुक्तीनें करणें, हातीं धोंडे घेणें ह्म॰ अतिशयित चिरडीस येणें, पायांवर धोंडा ओढून घेणें ह्म॰ एखादें लचांड अगत्यपूर्वक आपले पाठीशीं लाऊन घेणें, पायांवर धोंडा पाडून घेणें ह्म॰ आपले अंन्नांत माती पाडून घेणें, चारठिकाणी धोंडे टाकून पाहणें ह्म॰ स्वकार्यसाधनार्थ अनेक प्रकारचे प्रयत्न अनेक स्थलीं करून पाहणें, ह्म॰ धोंडा टाकून पाहवा पडला तर आंबा नाहीं तर धोंडा, वाटोळा धोंडा ह्म॰ दुसऱ्याचे पेंचांत कधीं सांपडायाचा नाहीं असाजो धूर्त त्यास ह्म॰. कोणेकाचे नावें धोंडे फोडणें ह्म॰ आपलें अनिष्ट केल्याचें निमित्त त्याजवर घालून याचें निसंतान होऊ इ॰ शापणें, कोणेकावर धोंडे घालणें, लोटणें, इ॰ स्थलीं अनेक कचाटें घालणें, कोणेकाचे धोंडे खणून काढणें ह्म॰ त्यानें देशत्याग करून जावें असें त्याचे हात धुवून पाठीस लागणें, कोणेकाचे कामामध्यें धोंडा घालणें ह्म॰ कांहींएक विप्रकरणें, ह्म॰ धोंड्यापेक्षां वीट मऊ, धोंड्याचे दोर काढणें ह्म॰ निर्दयास दया किंवा कृपणास दा

दानोत्साह इ० दुर्घट कामकरणें.

धोंडावणें, धा० आपल्यास आज्ञापनीय जो म नुष्य त्यास कोणेक कार्याविषयीं वारंवार टों चणी लाऊन प्रवृत्त करणें.

धोत, पु० दे० पाण्याचा किं० अग्नीचा जोर तो.

धोतर, न० पुरुषाचें नेसावयाचें किं० उपवस्त्रा र्थ घ्यावयाचें वस्त्र आहे.

धोतरजोडा, पु० सबंधजीं दोन धोतरें विणले लीं असतात तो.

धोतरबडव्या, पु० धोतें धुणें इत्याद्यर्थ जो ब्रा ह्मण ठेविलाअसतो त्यास निंदेनें ह्म०.

धोतरा, पु० एकफुलझाड आहे;२,त्याचें जें बीं तो.

धोत्र, न० धोतर.

धोत्रजोडा, पु० धोतरजोडा.

धोत्रा, पु० धोतरा.

धोत्र्या, ३लिं० चोळणा नेसणारे जे मऱ्हाटे इ० क ते धोतर नेसणारे जे ब्राह्मणादिक त्यांस निंदे नें ह्म०.

धोदरणें, दे० सुजणें.

धोदरा, पु० दे० सूज.

धोंदराट, पु० धोकाळ.

धोदया, पु० तादृश बळकट नसून अतिशयितमो ठें ज्याचें शरीर असाजो मनुष्यादि त्यास ह्म०.

धोधा, पु० उंचप्रदेशावरून मोठी जी पाण्याची धा रपडत असती ती.

धोधाटा, पु० दे० धोत.

धोधाणी, स्त्री० कों० धोधा;२,अतिशयोक्तीनें क्षतादिकांतून चालती जो रक्तप्रवाह त्यास ह्म०.

धोधोधो, अ० मोठ्याप्रवाहानें पाणी वाहणें. किं० मोठ्याधारेनें पर्जन्य पडणें इ० कांचें वि० ह्म०.

धोनशा, ३लिं० कों० थोंथील.

धोनशी, स्त्री० कों० थोंथली.

धोप, स्त्री० लांब सरळ अशी तलवार असती ती;२, कों० धोपाटी;३, रा० धडधोपजें वस्त्र त्यास ह्म०.

धोपट, ३लिं० लहान माठे सर्व जातात येतात जानें असा जो लाक्षणिकार्थ रुंद्या सरळ- मोठा मार्ग तो.

धोपटणें, काठी, दांडा, इ० कांनें कांहीं एकप दार्थ किं० मनुष्यादिक यांस पुष्कळ बडवि णें.

धोपणें, अतिशयित तृषित होणें;२, ला० कांहीं एकपदार्थाविषयीं आशाविष्ट होऊन केवळ आर्त्त होणें.

धोपाटी, स्त्री० दे० दोहोंहातानीं काठी उचलून बळानें जो गुरूं इ० कांवर तडाखा देतात ती.

धोबड, ३लिं० विवक्षितकार्यास अननुगुण होईअसें मोठें आड जें लांकूड, वस्त्र, चूर्ण, इ० तो; उ०, लेखणी धोबड ह्मणून अक्षर धोबड येतें.

धोबी, पु० परीट.

धोरण, न० कोणेक कार्यादिक यायाप्रकारें हो ईल यायाप्रकारें असेल इ० रूप अनुमाना दिकांवरून जो तर्क मनांत येतोतें किं० तो तर्क क रण्याविषयीं उपयुक्त जें बुद्धिपाटव तें; उ०,

हें

हें बोलचाल चारखंडी पिकावें असें आम्हास धोरण दिसतें; उ०, याचे बोलण्या चालण्यावरून हा चोर असेल असें माझ्या धोरणांत येतें; २, पूर्वापराद्यनुसंधानरूप जी अंतःकरण वृत्ति तें; उ०, पूर्वी बोललों काय आणि आतां बोलतों काय हें धोरण यास राहत नाहीं; ३, भाषणादि व्यापारांनीं साध्य जो कार्यादि अर्थ तिकडे जो अंतःकरण वृत्तीचा झोंक असतो जो प्रायः उघड दिसत नाहीं रीति स्थितीवरून इतरांस तर्कवेद्य होतो तें; उ०, हा बोलण्यांत साधुत्व दाखवितो पण याचें धोरण निराळें आहे; उ०, हे गडी काम करितांना जोगयतील तर तुमचें धोरण तिकडे असूंद्या; ४, कोणेकाचे अंगीं कांहीं एक काम करण्याची हातवटी किं० रीति असती तें; उ०, नानाफडनीसाचें राज्य करण्याचें धोरण दुसऱ्यास येणार नाहीं; उ०, हीकशाची पतिव्रता पतिव्रतेचें धोरणच निराळें; ५, अमुक वेळेस अमुक करायचें इ० प्रकारें जे सकल्पित त्याचें तावत् पर्यंत जें स्मरण राहातें तें.

**धोरणी**, २लिं० धोरणविषयक बुद्धि आहे जासतो.

**धोरणें**, गं० मैथुन द्वारा स्त्रियेस उपभोगणें.

**धोशा**, पु० कांहीं एक कार्यावर झटून प्रवृत्त होण्याचा जो प्रकार तो, उ०, चार दिवस लढाईचा धोशा लावला तेव्हां किल्ला सही आला.

**धोष्ट**, २लिं० कों० प्रकृतीचा आर्ष आणि जाचीं वस्त्र प्रावरणें अतिमलीन असावीं अशास्वभावाचा जो मनुष्य तो.

**धोष्ट्या**, २लिं० कों० धोष्ट.

**धौत**, २लिं० धुतलेला.

**धौर्त्य**, न० सं० धूर्ताई.

**ध्याणें**, ईश्वरादिकांचें स्वरूप मनांत आणून कोंहीं एकवेळ पाहणें; उ०, ध्यावें बरें हरिचिया पदपंकजातें.

**ध्याता**, २लिं० ध्यानकर्त्ता.

**ध्यान**, न० ध्याण्याचा व्यापार तें, २, ईश्वरमूर्त्यादिकांचें आयुधभेद किं० वीरासनादि स्थितिभेद किं० उग्रत्वसौम्यत्वादि गुणभेद इ० प्रयुक्त जे आकारभेद होतात ते प्र०; ३, विषयग्रहणाविषयीं अवहित झालें जें अंतःकरण तें; उ०, हीगोष्ट आझून माझे ध्यानांत येत नाहीं; मी नुकता निजून उठलों आहें आझून पुरता ध्यानावर आलों नाहीं; तुमचें ध्यान तिकडे असूंद्या; हीगोष्ट मी ध्यानांत ठेवली आहे; ४, यावत्पदार्थ मात्रावर किं० व्यवहार मात्रावर इतरभेदक जो धर्मविशेष किं० प्रकारविशेष राहतो तें; उ०, दोघेजण सावकारी करितात परंतु तें ध्यान-निराळें हें ध्यान निराळें; आजचे गाण्यांचें कांहीं ध्यानच निराळें; ध्यानास येणें इ० कोंहीं एक पदार्थ किं० गोष्टवरी अशी वाटणें.

**ध्याननिष्ठ**, २लिं० ईश्वर स्वरूपाचें ध्यान करण्याविषयीं जाची निष्ठा तो.

**ध्यानमुद्रा**, स्त्री० कोणेक पदार्थादि आठवावा इ० कारणार्थ केवळ सूक्ष्म अंतःकरण केलें

केलें असतां भृकुटी वांकडया होतात इ० रूप जो शरीराचा आकार होतो ती.

**ध्यानयोग**, पु० ईश्वरप्राप्ती विषयीं ध्यानरूप जो शास्त्रोक्त उपाय तो.

**ध्यानस्थ**, ३लिं० कांहींएक गोष्टीच्या विचार करण्याविषयीं एकाग्रत्वानें चित्त केलें आहे तो; उ० तुह्मीं गोष्ट सांगीतली तेव्हां मी ध्यानस्थ होतों ह्मणून ऐकिली नाहीं.

**ध्यानीमनी**, अ० अंतःकरणाचा अवस्थादि भेदेंकरून असंख्यात होण्याचा ज्या वृत्ति त्यांतील एकाही वृत्तींत, नसणें योगीं प्र०; उ०आजपाउस पडेल हें माझे ध्यानीमनीं नव्हतें ह्मणून मी छत्रीवांचून बाहेर पडलों; २, अवस्थादि भेदेंकरून जीजी अंतःकरण वृत्तिउठती त्या सर्व वृत्तीतें व्यापून, उ०, याचे ध्यानींमनीं सर्वदा खेळ ह्मणून स्वप्नांत चावळला तरी बारा तिरपगडें इ० बोलतो.

**ध्यास**, पु० कांहींएक गोष्टीचा किं० पदार्थाचा क्षणमात्रही विसर पडत नाहीं असाजो अंतःकरणास भाव होतो तो, उ०, यापोरानें आईचाध्यास घेतला आहे; लग्नकरावें असायास दोनवर्षें ध्यास लागला आहे परंतु होतनाही.

**ध्येय**, ३लिं० ध्यावयासजें योग्य तो.

**ध्रुपद**, न० पालोपद; २, गाण्यांत एकचीज आहे

**ध्रुव**, पु० पृथ्वीचे उत्तरेस एकतारा आहे; २, ३लिं० चंचलनव्हे असें जें सपत्यादिक तो; उ०, कोणी लक्ष्मीला ध्रुवमानूंनये.

**ध्रुवक**, पु० ज्या अंकास कांहीं संस्कार करून विवक्षित तिथ्यादि किं० ग्रहादि विवक्षित कालींचे होतात असे जे अंक गणित ग्रंथीं सांगितले असतात ते.

**ध्वज**, पु० देवालय किं० राजद्वार इ० कांपुढें उंचस्तंभ पुरून चिन्हविशेषांकित त्याजवर वस्त्र लावितात तो त्यास्तंभासुद्धां अन्यचही राजादिकांचा स्वारीपुढें यशश्चिन्ह ह्मणून घालतअसतो इ० जो पूर्वोक्ताकार लहानमोठा तो सर्वही, ध्वज लावणें ह्म० विपाशौर्यादिकानें मोठी कीर्तिसंपादनकरणें विपरीतलक्षणें पाजीपणा, अपकीर्ति इ० मिळविणें.

**ध्वजस्तंभ**, पु० ध्वजाचाजो स्तंभ तो.

**ध्वजा**, स्त्री० ध्वज.

**ध्वजाय**, पु० गृहाचा भूमीची लांबी रुंदीवरून आठप्रकारचे आय सांगीतले आहेत त्यांतील एक तो.

**ध्वनन**, न० कोणेक अर्थवाच्य मर्यादेनें तत्तद्वाचक शब्दानीं नबोलतां अर्थापत्यादि द्वारा तत्तदर्थाचें जें ज्ञापन तें; उ०, अंब्यांस मोहर आला, कोकिला ओरडूं लागल्या असें बोलल्यावरून वसंत प्राप्तीचें ध्वनन आलें.

**ध्वनि**, पु०स्त्री० ककारादि वर्ण व्यक्ति अविवक्षित करून श्रोत्रेंद्रियग्राह्यजें शब्दसामान्य तो; उ०, यानेंश्लोक ह्मटला तोच त्यानें ह्मटला परंतु दोघांचे ध्वनि वेगळे दिसतात, समुद्राचा ध्वनि गंभीरजालानर पाऊस लागतो; २, वाच्यार्थाहून इतरार्थाचें ध्वननकरण्या विषयीं

यीं कारणी भूत वाक्यादिकांचाठायीं जो योग्यता विशेष असतो तो; २, स्पष्टपणी ऐकलेलें नव्हे असें जें वाक्यादि त्यास म्ह०; उ०, हा चोर आहे असा आह्मीं ध्वनिमात्र कर्णोपकर्णी ऐकतों परंतु आमचा निश्चय होत नाहीं; ४, जापासून कर्त्तव्य प्रतिज्ञेचा निश्चय होत नाहीं असें कोणेकानें इषन्मात्र प्रयुक्त जें वाक्यादि त्यास म्ह०; उ०, आजपर्यंत सर्कारांत दादच नव्हती पण आतां चोरांचें पारिपत्य करितो असा तुकता ध्वनिनिया ला आहे होईल तेव्हां खरें.

ध्वनित, ३लिं० ध्वनीनें ज्ञापित जो अर्थ तो.

ध्वन्यर्थ, पु० ध्वनित जो अर्थ तो.

ध्वंस, पु० मोडणें, फुटणें, जळणें, इ० कारणामुळें त्यात्या पदार्थाचा जो अभाव होतो तो; उ०, घटाचा ध्वंस घटप्रतियोगिक, मी गेलों तर मागें संसाराचा ध्वंस होईल.

ध्वस्त, ३लिं० ध्वंस झाला ज्याचा तो.

ध्वाडी, स्त्री० पुरुषास बंधूची आणि स्त्रियांस दिराची जी कन्या ती.

**न**, अ० निषेधार्थक प्रा० विधीचे संधानानेंच प्र०,उ० आम्हीं आपल्येकडून सांगितलें,आतां जा किं नजा, सं० नच्या पादा पाठ आहे,एथें त्यास जें काम सांगावें तें करीत नाहीं,असें ह्मणतो नच्या पादा वाचणें;ह्म० कार्य नाहीं करीत असें ह्मणणें.

**नई**, स्त्री० गंगा आदिकरून नदी ती,ह्म० इकडे नई,तिकडे वई.

**नउ**, ३ लिं० ९ एक संख्या आहे.

**नकटा**, ३ लिं० ज्याचें नाक कापलें आहे,किं० आखूड आहे,किं० बसकें आहे तो;२,ला० किंचिदंशींन्यून राहिलें जें काहीं एक कार्य त्यास ह्म०; ह्म० नकटीचे लग्नास हजार विघ्नें,नकटें व्हावें परंतु धाकटें होऊं नये,सुरूखुरू सापीका आणि नकटा निरुका.

**नकल, नक्कल**, स्त्री० نقل हिं० दस्ता ऐवजीं कागद ग्रंथादिकाची जी प्रत लिहून केली ती;२, चमत्कारजनक,किं० हास्यजनक जो भाषणादि व्यापार ती;३, काहीं एका सारिखा दिसे असा केला,दुसरा पदार्थ,किं० भाषणादिक ती; ४, न० स्त्री० निर्वेश.

**नकली**, स्त्री० अस्सल लुगड्या सारिखें दिसाया जोगें जें लुगडें ती;२, ३ लिं० अस्सला सारिखा दिसायाजोगा केला जो दुसरा पदार्थ तो;३,चमत्कार वाटायाजोगें जें भाषणादिक तो,किं० तें भाषणादि करितो तो.

**नकल्या**, ३ लिं० नकली तृतीयार्थीं.

**नकशा**, पुं० गृहादिकाचा आकार कागद इ० कावर काढितात तो;२,सर्वांनीं चांगलें ह्मणावया जोगें जें काहिं एक कर्म तो;उ० त्यांनीं प्रयोजनाचा नकशा केला;३,दुसऱ्याचे ईर्ष्येनें केलें जें अधिक कर्म तो,उ० तूं शंभर रुपये खर्च करिशील तर मीं दोनशें खर्च करून तुजवर नकशा करीन;४, विद्यादि गुण प्राप्त जें महत्व तो; उ० सभेंत आतां परंतु नकशा गमावूं नका.

**नकशी**, स्त्री० نقش हिं० काष्ठ,वस्त्र,कागद इ० कांवर वेल,बूट,जाळी,इ० क जें बारीक काम करितात ती;२, ३ लिं० तद्विशिष्ट तो.

**नकशीदार**, نقشدار ३ लिं० हिं० नकशी आहे ज्याजवर तो पदार्थ.

**नका**, अ० निषेधार्थक काहीं एक क्रियेविषयीं अनेक वचनांत कर्त्याचा निषेध कर्तव्य असतांच प्र०,उ० नका जाऊं लष्करा भिझुरझुर मरेन.

**नकार**, पुं० नाहीं ह्मणणें असा जो व्यापार तो,उ० मी त्याजवळ रुपये मागीतले परंतु त्यानीं नकार केला.

**नकारणें**, स्वीकृत नकरणें;उ० कुंडा नकारला.

**नकाशा**, पुं० نقاش हिं० नकशा प्रथमार्थीं.

**नकासकाम**, न० نقاشکام हिं० नकाशाची कृति, किं० नकशीचें जें काम तें;उ० या दिवाणखान्याचें नकास काम चांगलें आहे.

**नकी, नक्की**, ३ लिं० نقی हिं० अंतर नठेवितां निखालस सांगायाची जी किंमत इ० ती;२,स्त्री० गायनामध्यें जो नाकानें स्वर ओढितात ती.

**नकीबंदी**, स्त्री० हिं० दुसऱ्याचे स्वाधीन केलेल्या अश्वादिकास व्यथा,किं० मृत्यु,किं० खोड,इ० जें वाईट ती,दुसऱ्याचे स्वाधीन कर्तव्य विषय असतांच

सतांच प्रा॰प्र॰; उ॰ तुह्मास घोडा देतों परंतु नकी बंदी झाली असतां भरून घेईन·

नकील, स्त्री॰हिं॰ उंटाचे नाकांतील जी वेसण ती·

नकुल, पुं॰सं॰ मुंगस·

नको, अ॰ कोणेक पदार्थाचें, किं॰ व्यापाराचें प्रयोजन नाहीं, किं॰ इच्छा नाहीं अशा अर्थाचें द्योतक, परंतु याचा प्र॰ क्रियापदा सारिखा होतो ह्मणून याचें नांव क्रियावाचक अव्यय, यद्विषयीं निषेध त्या प्रथमांताचा, किं॰ आय, आवया, आया, एतत् प्रत्ययांत क्रियापदांचा योग होतो; उ॰ मला कोणताही पदार्थ नको. त्याला काम करावयास नको; २, द्वितीय पुरुषास कांहीं एक क्रियेचा निषेध कर्तव्य असतां प्र॰ होतो; उ॰ तूं जाऊं नको·

नक्त, न॰हिं॰ रोकडें नाणें तें; २, सं॰, रात्र; ३, दिवसभर उपोषण करून रात्रीस जेवावें असें एक व्रत आहे·

नक्तबाब, नक्तीबाब, स्त्री॰हिं॰ कुळांवर ठराविलेला जो सर्कारांत घ्यावयाचा पैका ती·

नक्र, पुं॰सं॰ घोरपड सुरव्यार्थी·

नख, न॰पुं॰ बोटांचे अग्रभागीं असतें, जें शस्त्रानें कापिलें असतां पुनः वाढतें व त्याचे कापण्यानें दुःख होत नाहीं तें तो, तसेंच जें पशू पक्षी यांचे पादाग्रीं असतें तें तो; २, पुं॰ एक सुगंध पदार्थ आहे ह्म॰ जेथें नखानें काम होई असें आहे तेथें कुह्राड लावूं नये·

नखजीन, न॰रा॰ नह्राणी·

नखतेल, न॰ औषधी तेल आहे·

नखरा, पुं॰हिं॰ शृंगार चेष्टा प्रदर्शक जो नेत्रादि शरीरावयवांचा हावभाव, किं॰ शरीरावरील वस्त्र भूषणादिकांचा रचना विशेष ती·

नखरू, न॰या॰ नखुरडें·

नखरूड, न॰ बहुत वाढलेल्या नखांची निंदा कर्तव्य असतांच या शब्दाचा प्र॰·

नखरेदार, ३लिं॰हिं॰ नखरा आहे ज्यांत तो·

नखरेबाज, ३लिं॰हिं॰ नखरेदार·

नखला, पुं॰ खीर करायासाठीं सपिठाच्या नखानें बारीक गोळ्या करितात तो; २, जनावराचें सुगंधिक नख आहे; ३, बाळकांचा अलंकार आहे·

नखविष, न॰ नख संबंधी जें विष तें; उ॰ खाजवूं नको नखविष बाधेल·

नखशिखपर्यंत, अ॰ पायांचे नखां पासून शिखेपर्यंत; उ॰ वाघास पाहातांच नखशिखपर्यंत कंप सुटला·

नखशी, स्त्री॰हिं॰रा॰ नखजीन; २, नखरू·

नखसू, नखसूप, स्त्री॰ नखरू·

नखी, स्त्री॰हिं॰ सारमंडळ, सतार, इ॰ वाजविते वेळेस तारेचें वलय करून बोटांत अडकवितात ती; २, सं॰३लिं॰ व्याघ्र, सिंह, इ॰ मोटे नख ज्याचे जे प्राणी तो; ३, त्याचा जो नख ती; ४, नकली प्रथमार्थी; ५, धोतर जोडा इ॰ कांचे कांठास रेशीम इ॰ कांची धारी असती ती

नखुरडा, ३, लिं॰ नखानें खरवडून काढायाजोगा जो कोंवळा नारळ तो; उ॰पु॰दे॰ नखसूथ·

नखुरडें, न॰ नखांत एक रोग होत असतो तें·

नरवूट, न॰ नरव·

नरवोरा, पुं॰ नरवानी शरीरादिकावर ओढिली जी रेषा तो·

नग, पुं॰ हिं॰ सुवर्णादिकांच्यीं स्त्रियांचीं डोकींत घालायाचीं भूषणें आहेत तीं; २, अलंकारमात्रासही ह्मणतात; ३, वस्तुत्वें करून च वस्तूंच्या निर्देश कर्तव्य असतां गणनादि प्रसंगीं सकल वस्तुमात्रास नग ह्म॰; ४, लेखन प्रसंगीं हत्तीची संख्या त्याहाययाची असतां संख्यावाचकाचे पूर्वीं याचा प्र॰ होतो; उ॰ हत्ती नग दाहा·

नगद; ३, लिं॰ नक्त प्रथमार्थीं

नगदमाल, पुं॰ हिं॰ अनेक पदार्थ समुदाया मधला चांगला निवडक जो पदार्थ त्यास प्रसंगविशेषीं ह्म॰

नगदा, पुं॰ हिं॰ बांगड्यांत भेद आहे·

नगदा, नगदी, ३ लिं॰ नगदमाल·

नगदी, स्त्री॰ हिं॰ ऐन जिन्नस न देतां नक्ताचीच हि वाटजा शेंल इ॰ कांची सर्कारांत होती ते शेत इ॰ ती; २, नक्त प्रथमार्थी

नगननारायण, पुं॰ मोटा पुरुष असून जो नग्न तो·

नगनगोटा, पुं॰ नगनगोटें, न॰ लाहान मोटे जे नग तें·

नगर, न॰ मोठी वस्ती असून प्रसंगीं प्रायशः सर्व पदार्थ जा स्थलीं मिळतात तें·

नगरप्रदक्षिणा, स्त्री॰ देवाच्या छबिना इ॰ कांसहित याात्रार्थ जी नगरा भोंवती प्रदक्षिणा करितात ती; २, ला॰ रिकामपणी गांवभर फिरण्याच्या जो व्यापार ती परंतु त्यापासून कांहीं एक लाभ झाला असतांच ह्म॰·

नगवज, पुं॰ नग नगोटें इ॰ ती; उ॰ त्याजपाशीं रोकड विशेष नाहीं परंतु हजार पांचशांच्या नगवज आहे·

नंगा, ३ लिं॰ हिं॰ गुह्याच्छादक वस्त्रादि रहित जो मनुष्य तो; २, ला॰ निर्द्रव्य मनुष्य त्यास ह्म॰·

नगारजी, ३ लिं॰ نقارچی हिं॰ नगारा वाजविण्याचें कसब करितो, किं॰ त्याजवर उपजीवन करितो तो·

नगारखाना, पुं॰ نقارخانه हिं॰ चौघडा नगारे इ॰ ठेवायाची जी जागा तो. व तो कारखाना तो

नगारा, पुं॰ نقاره हिं॰ एक थोर चर्मवाद्य आहे कोणेक गोष्टी विषयीं नगारे वाजणें ह्म॰ तिनें सर्व लोकांत प्रसिद्ध होणें; ह्म॰ नगाऱ्याची घाई तेथें टिमकीचें काय आई·

नगोटें, न॰ नग प्रथमार्थी

नग्गा, ३ लिं॰ नंगा·

नग्न, ३ लिं॰ नंगा·

नजर, स्त्री॰ نظر हिं॰ दृष्टि लाक्षणिक अर्थ सुध्दां; २, राजादिकांची जी कृपा किं॰ तत्संपादनार्थ त्यास मागितल्या वांचून पादार्थ नेऊन देतात ती·

नजरगुजारत, स्त्री॰ نظرگذارت हिं॰ दृष्टादृष्टि; उ॰ त्याच्या व आमच्या नजरगुजारत होईल तेव्हां काय बोलणें तें बोलूं·

नजरगुजारा, पुं॰ نظرگذار हिं॰ नजरगुजारत

नजरनजराणा, पुं॰ نظرانه हिं॰ द्वितीयार्थ कनजर इ॰ ती·

**नजरबंद**, ३ लिं॰ نظربند हिं॰ नजरबंदी विद्या जाणतो तो; २, फा॰ नजरबंदी

**नजरबंदी**, स्त्री॰ نظربندی हिं॰ कोणेक पदार्थ पाहाणारास अन्यरूपें करून भासवावा अशीजी दृष्टीस विकार करणारी गारुडी इ॰ कां पाशीं विद्या असती ती; २, तिच्या प्रयोग करण्याच्या व्यापार ती

**नजरबाग**, पु॰ हिं॰ श्रीमंत इ॰ कांचे घरा पुढें शोभार्थ जो समोर दृष्टीस पडावया जोगा बाग करितात तो

**नजरबाज**, ३ लिं॰ نظرباز हिं॰ कांहीं एक वस्तूची सूक्ष्म नजरेनें परीक्षा करण्या विषयीं जो कुशल तो

**नजराणा**, पु॰ نظرانه हिं॰ नजर ह्मणून अर्थीं

**नजीरव**, अ॰ نزدیک हिं॰ जवळच्या प्रदेशीं

**नट**, पु॰ स्त्रिया इ॰ कांच्या वेष धारण करून नाचतो, किं॰ अनेक प्रकारचे खेळ करून उपजीवन पावतो तो; २, मनुष्यांत एक जाती आहे; ३, नटण्याचा स्वभाव ज्याचा त्यास ह्म॰; ४, हराम्यास ह्म॰

**नटणें**, ॰ अलंकार, वस्त्र इ॰ कानीं, हाव भावानीं, सुशोभित बनणें; २, कोणेकाच्या वेष धारण करणें; उ॰ पुष्पवर्णनटला पळसाच्या पार्थसाच धनसे पळसाच्या

**नटबाज**, ३ लिं॰ हिं॰ नटण्याचा स्वभाव ज्याचा तो

**नटबाजिंदा**, ३ लिं॰ हिं॰ नटबाज

**नटवा**, पु॰ नट प्रथमार्थीं; २, नृत्य करण्याचे कसबानें उ-

प-

पजीवन करितो तो; ३, ला॰ नटण्याच्या स्वभाव ज्याचा त्यास ह्म॰

**नटी**, स्त्री॰ सं॰ सूत्रधाराचीजी स्त्री ती

**नटू नथटून**, अ॰ अलंकारादिकांनी सुशोभित बनून, चाल, बस, इ॰ क्रि॰

**नड**, स्त्री॰ कांहीं एक कार्या विषयीं जें प्रतिबंधक ती; २, वा॰ पाकुणे इ॰ कांच्या उपद्रव ती; उ॰ त्याचे घरीं पाकुण्याची नड फार आहे

**नडगी**, स्त्री॰ पायांची नळगुडी

**नडघा**, पुं॰ दे॰ नडगी

**नडघें**, न॰ नवल्यांचें एक परडें

**नडणी**, स्त्री॰ वा॰ पेरलेलें शेत इ॰ कांत विजातीय तृणादि होतें; २, ती नडणी काढण्याच्या व्यापार ती; उ॰ या शेताची नडणी करावयाची आहे

**नडणें**, कोणेकानें कांहीं एक कार्या विषयीं प्रतिबंधक होणें; २, रा॰ शेतांतील नडणी उपटून तें स्वच्छ करणें

**नणंद**, स्त्री॰ दादल्याची जी बहीण ती

**नणदया**, पु॰ वा॰ नणदेच्या नवरा

**नणदवडा**, पु॰ को॰ नणंद आपले भावाचे बायकोला अनेक निमित्तानी जाच करिती तो

**नणदावा**, पु॰ वा॰ नणदवडा

**नणदुली, नणदोली**, स्त्री॰ पं॰ नणंद

**नत**, ३ लिं॰ सं॰ नम्र; २, न॰ खमध्या पासून इष्ट प्रदेश पर्यंत उतरते जे चक्रांश तें

**नतद्रक्ष**, ३ लिं॰ अति कृपण

**नथ**, स्त्री॰ स्त्रियांचे नाकांतील एक भूषण आहे; २, मस्तकादिकांतील रोग जावा ह्मणून

ना-

नासिकाद्वारा जें घृतादि ओतितात ती.

**नथडा**, पु॰ मोठी जी नथ ती.

**नथणी**, स्त्री॰ नथ प्रथमार्थी; २, बैल इ॰ कांचें नाक टोंचून त्यांत दोरी घालितात ती; ३, दरवाजास कुलुपाच्या अभावीं कोंयड्यांत कडी अडकवून ती कडी न निघावी म्हणून त्यांत खिळा इ॰ कांची वाळी करून घालितात ती.

**नद**, पु॰ सं॰ शोणभद्र इ॰ तीन आहेत ते प्र॰; यांचा आकार नदी सारखाच आहे.

**नंद**, पु॰ सं॰ लग्न समयीं अंतःपटाचे शेल्यावर रंगाचें चिन्ह काढितात तो; २, रा॰ बाळंतिणीस वायु होतो तो; उ॰ त्या बाळंतिणीस वाऱ्यांत बसवूं नका नंद होईल; ३, ला॰ केवल जो मूर्ख त्यास म्ह॰; ४, दलालीचें जें फल त्यास संकेतानें म्ह॰.

**नंदन**, न॰ सं॰ स्वर्गीं देवांचा बाग आहे; २, सव्विसावा संवत्सर; ३, पुत्र.

**नंदा**, स्त्री॰ सं॰ प्रतिपदा, षष्ठी, एकादशी, ह्या तिथी प्र॰.

**नंदाचापासोडा**, पु॰ नंद प्रथमार्थ विशिष्ट जें अंतःपटाचें वस्त्र तो.

**नंदाचाशेला**, पु॰ नंदीचाशेला.

**नदी**, स्त्री॰ भागीरथी, यमुना, इ॰ त्या प्र॰; म्ह॰ नदीचें मूळ आणि ब्राह्मणाचें कूळ यांचा थांग लागणार नाहीं.

**नंदी**, पु॰ सं॰ महादेवाचें वाहन जो बैल तो; २, ला॰ मूर्ख; ३, अंतःपटाचे शेल्यावर जो कुंकुमाचा आकार काढितात तो.

**नंदीचाशेला, नंदाचाशेला**, पु॰ नंदी तृतीयार्थ विशिष्ट जो शेला तो.

**नदीपति**, पु॰ सं॰ समुद्र.

**नंदीबैल**, पु॰ जा बैलास शुभाशुभ चिन्हाचे संकेत शिकवून त्याजवर वस्त्र अलंकार इ॰ क घालून घरोघर फिरवून उपजीविका करीत असतात तो बैल.

**नदीमातृक**, ३ लिं॰ सं॰ जा देशादिकांचा ठायीं नदीचेच उदकेंकरून धान्यादि पिकतें तो देशादिक तो.

**नंपटी**, स्त्री॰ वा॰ वेळूचे नळींत जाई असा किंचित् आंखूड दांडा करून तिचा तोंडीं आसणा इ॰ कांचें फळ घालून आवाज काढायाचें यंत्र करितात ती.

**नपड**, स्त्री॰ रा॰ परस्परांचा अंतःकरणाचा जो विरुद्ध भाव ती.

**नपुत्रोनपुत्री**, अ॰ सं॰ संदिग्धावस्थेचें द्योतक; उ॰ आमचे कार्याचा निश्चय होत नाहीं अद्यापि नपुत्रोनपुत्री दिसतें.

**नपुंसक**, ३ लिं॰ सं॰ जो स्त्री नव्हे आणि जो पुरुष नव्हे तो प्राणी; २, शब्दांचीं लिंगें तीन असतात त्यांत एक आहे; ३, तद्विशिष्ट तो; ४, ला॰ पराक्रमहीन पुरुषास म्ह॰.

**नफर**, पु॰ हिं॰ घोड्यांची चाकरी इ॰ हलके कामासाठीं ठेविला जो चाकर तो; २, प्रसंगविशेषीं जीव मात्रास म्ह॰; उ॰ दरनफरास एकेक रुपया दिला; उंटाची संख्या लिहावयाची असतां संख्या वाचका पूर्वी प्रयोग होतो.

**नफा, नफ़ा**, पु॰ हिं॰ दुकान इ॰ व्यवहारांत खर्चवेच फिटून व व्याज मुद्दल सुद्धा एवज उगवून वर जो पैका मिळतो तो; २, ला॰ लाभमात्राचें नाम; उ॰ व्यर्थ श्रम केल्यांत काय नफा आहे.

**नबळा**, ३ लिं॰ निर्बल सजीव मनुष्यादि तो.

**नभ**, न॰ सं॰ आकाश.

**नमणें**, मजपेक्षां तूं उत्कृष्ट हें जें ज्ञान तज्ज्ञापक हात जोडणें, नम्र होणें, इ० व्यापार तज्जन्य जें उत्कृष्टतारूप फल त्याणें युक्त करणें; उ० भावें नमितों पंचवटीच्या रामाला; २, क्रोध, गर्व, औद्धत्यादिक तत्कृत उपद्रव तसेंच कलहादिक कमी होणें, किं० शांत होणें; ३, क्रोध, गर्व, इ० शमल्यामुळें तो प्राणी शांत होणें; ४, काष्ठादिपदार्थांवर भार पडणें इ० कारणामुळें वांकडें होणें.

**नमन**, न० सं० नमणें प्रथमार्थाचा जो व्यापार तें; २, पुराणादिकाचे आरंभीं ईश्वराचा स्तुतीचे श्लोकादिक म्हणतात तें; नमन करणें म्ह० कांहीं एक कार्याचा आरंभ करणें.

**नमस**, स्त्री० वा० देवास नैवेद्यार्थ दिल्ही जी जमीन ती.

**नमस्कार**, पु० सं० नमन प्रथमार्थी; २, ब्राह्मण परस्पर सत्कारार्थ हात जोडणें. इ० व्यापार करितात तो: अशा बोलणारांस, करणारांस, नमस्कार असो म्ह० त्याचें नांवही घेऊं नये.

**नमाज**, स्त्री० نماز हिं० मुसलमान लोकांचें नित्यशः पढायाचें पढणें आहे; २, गळ्यांत पडलेला जो कांहीं एक व्यवहार, किं० अन्नवादि पदार्थ त्यांस कंटाळा, निर्वाहा विषयीं आलस्यभाव इ० कारणामुळें म्ह०; उ० ती मामलत आणि पांच घोडे हा दोन नमाजी गळ्यांत पडतांच दिवाळें वाजलें, पड, याल, इ० धा० प्र०.

**नमुना, नमोना**, पु० हिं० नकशा प्रथमार्थी; २, विवक्षित वस्तु परिज्ञानार्थ जो केवळ तत्सदृश पदार्थ पाहातात तो किं० समुदित पदार्थाचें स्वरूप समजाया साठीं तदेकदेश पाहातात तो.

**नम्र**, ३ लिं० सं० भारादिकानें जो नमला तो; २, उद्धत नव्हे तो.

**नयन**, न० सं० डोळा मुख्यार्थी.

**नये**, अ० अनौचित्य मूलक कांहीं एक गोष्टीचा निषधकर्तव्य असतां, तां, प्रत्ययांत, ऊं प्रत्ययांत धातूंचा योगीं प्र०; उ० त्यानें करूं नये, म्ह० त्या कर्त्यास वाईट आहे म्हणून त्यास तें अनुचित असा अर्थ, किं० त्याचा व्यापार इतरास वाईट असा अर्थ; त्यानें, मीं, तो, तेथें बसूं नये, म्ह० त्यास तें करण्यास अधिकार नाहीं, किं० त्याचा व्यापार इतरास इष्ट नाहीं असा अर्थ; त्यानें अशी गोष्ट करूं नये म्ह० ती गोष्ट तो करावया जोगा नव्हे असा अर्थ.

**नर**, पु० सं० मनुष्य; २, सर्व जातीय पुरुष व्यक्ति मात्र; ३, घोडा; ४, रा० नरवाचे मूळावरचें उचकटलेलें जें चर्म तो; ५, तुंबओड इ० क जे जोडीचे पदार्थ त्यामध्यें किंचित् मोठा जो पदार्थ तो; ६, मळसूत्री खिळा व बिजागिरी अडकवायाचा खिळा त्यांस म्ह०; नरतनु, नरपाल, इ० समास आणावे.

**नरक**, पु० सं० यमनगरीचाठायीं पूय, विष्ठा, रक्त, इ० कांचा समुदाय आहे तो ज्यामध्यें पातकी जनास यम टाकितो; २, विष्ठा.

**नरककुंड**, न० सं० नरकाचें जें कुंड तें; २, ला० गर्भ राहाण्याची जागा तें; उ० नऊमास पर्यंत प्राण्यास नरककुंडांत वास घडतो.

**नरकपाल**, न० सं० अस्थिमात्रावशिष्ट जें मृत मनुष्याचें डोकें तें

**नरकपाणी**, न० कुत्सित आणि दुर्गंधियुक्त जें पाणी तें.

**नरकवास**, पु० सं० नरकाचाठायीं जो वास तो; २, ला० नाना

नानाप्रकारचे अधर्म, किं० दुःखें जा स्थलीं भोगावीं लागतात त्या स्थलीं जो वास तो·

**नरकाड**, स्त्री० गुरवाडी·

**नरटी**, स्त्री० करवंटी; २, नरकपाल·

**नरड**, पु०वा० जेणेंकरून गुरें फार मरतात असा एक रोग आहे·

**नरडी**, स्त्री० दाढीच्या खालच्या जो गळ्याचा मध्य प्रदेश ती; त्याणें नरडी धरली एथें भोजनादिकाविषयीं कांहीं एककाल खोळंबा केला असा अर्थ·

**नरडें**, न० नरडी·

**नरणी**, स्त्री० नऱ्हाणी·

**नरतनु**, स्त्री०सं० मनुष्यदेह ती·

**नरद**, स्त्री० सोंकटी·

**नरदेह**, पु०सं० नरतनु·

**नरपति**, पु०सं० मनुष्यांचा जो राजा तो·

**नरपशु**, ३लिं०सं० ईश्वरभजनादिरूप स्वहित जाणत नाहीं असा जो मूर्ख त्यास ल०·

**नरम**, ३लिं० कठोर, कडक, तडक असा जो मनुष्य, काष्ठ, वस्त्र, इ० तो; २, जाजा पदार्थामध्यें जेंजें तेज असावें तें न्यून जांत आहे त्यास ल०· उ० या शस्त्राचें पाणीं नरम आहे, हा रुपया नरम आहे·

**नरमणें**, कठोर पदार्थानें नरम होणें; उ० वारा नरमला, पाऊस नरमला·

**नरमाई**, स्त्री० नरमपणा ती·

**नरमादि**, स्त्री० जोड्याचे जे दोन पदार्थ त्या मध्यें एक लाहान एक मोठा असा असण्याचा प्रकार ती·

**नरमिना**, पु०दे० रेशमाची संज्ञा; २, तद्गत जो वस्त्रादि तो·



**नरयोनि**, स्त्री०सं० मनुष्ययोनि·

**नरवर**, ३लिं०सं० मनुष्यामध्यें श्रेष्ठ तो; २, न० एक शहर आहे·

**नरवरी**, ३लिं० नरवर म्हणून शहर आहे तत्संबंधी जो अडकित्ता इ० तो·

**नरवेल**, पु० एक वृक्ष आहे·

**नरशा**, पु० नरशियां·

**नरशियां**, पु० नरसिंह शब्दाचा अपभ्रंश·

**नरसिंह**, पु०सं० दशावतारांतील चवथा जो अवतार तो; २, ला० सिंहासारिखा पराक्रमी जो मनुष्य त्यास ल०·

**नरसें**, न०रा० आपले छंदानेंच चालण्याविषयीं निमित्तभूत जें वेड तें; उ० याची खोडी काढूं नको याचें नरसें चळलें तर तो कोणाचें ऐकणार नाहीं·

**नरहरदेवाचीपालखी**, स्त्री० जा कर्मावर एकाची सत्ता नाहीं बहूतजण कृपाकरून करतील तरच होईल असें जें कर्म ती·

**नराणी**, **नऱ्हाणी**, स्त्री० नखें काढावयाचें शस्त्र आहे·

**नरी**, **नऱ्ही**, स्त्री० जोडे इ० करावयासाठीं रंगविलेलें जें चर्म ती·

**नरोटी**, स्त्री० करोंटी·

**नर्तक**, ३लिं०सं० नाचतो तो·

**नर्तन**, न०सं० नाचण्याचा जो व्यापार तें·

**नलगे**, अ० कांहीं एक क्रियेचें किं० पदार्थाचें प्रयोजन नाहीं अशा अर्थाचें द्योतक; या अव्ययाचा प्रयोग क्रियापदासारिखा होतो; अतएव हें अव्यय क्रियावाचक याचा प्रयोग प्रथमांत पदार्थाचायोगीं न-

साथ आयला, आयाला, अवयाला, तसाच आया, आवया, आया, एतत्पर्यंत क्रियेच्या योगीं होतो; उ० मला खावर नलगे, करायला नलगे, जेवाया, जेवावया, जेवावें नलगे.

**नलिन**, न० सं० कमल.

**नव**, ३ लिं० नऊ; २, नूतन.

**नवका**, ३ लिं० नवखा.

**नवकोटीनारायण**, ३ लिं० असंख्य द्रव्य ज्या पाशीं आहे तो; २, ला० परमदरिद्री जो त्यास विपरीत लक्षणेनें म्ह०.

**नवखंड**, न० पृथ्वीचे नऊ खंडांचा जो समुदाय तें.

**नवखंडपृथ्वी**, स्त्री० नऊ आहेत खंडें जीचीं ती पृथ्वी.

**नवखा**, ३ लिं० पूर्वी अपरिचित असून प्रथमता ज्याचें दर्शन झालें तो; २, ज्या व्यवहारांत जो नव्यानेंच पडला तो, त्या व्यवहाराविषयीं कित्येक दिवस.

**नवग्रह**, पु० आदित्यादि नवसंख्यांक जे ग्रह ते म्ह०; २, ला० एककार्य प्रवृत्त जे मनुष्य त्यांची निंदा कर्तव्य असतां ते.

**नवघड**, ३ लिं० नवट जें भांडें तो.

**नवघण**, स्त्री० न० दोन चार आसामींनीं उचलून न्यावया जोगें जें ओझें त्यास उचलायासाठीं वांशाचा तुकडा बांधितात तें ती; त्या तुकड्यास त्यावेळेस मात्र व्यवहार.

**नवचांद**, पु० रा० शुद्ध द्विती येचा जो चंद्र तो.

**नवज्वर**, पु० जो ज्वर एकसारखा नऊ दिवस बसतो त्या नऊ रोजांत प्रायः मनुष्य मरतें असा एक ज्वर आहे.

**नवट**, ३ लिं० ज्याचें नवेपणाचें चिन्ह व गुण गेला नाहीं तो.

**नवटकें**, न० शेराचा अष्टमांशाचें जें माप तें.

**नवटांक**, ३ लिं० अदपाव.

**नवतारणें**, फार जुनें झालें जें गृहादिक त्यास थोडें बहुत नवें सामान घालून नवें दिसे असें करणें.

**नवती**, स्त्री० तारुण्य दशा ती; २, वसंत ऋतू मध्यें नागवेलीस नवीं पानें फुटण्याची जी अवस्था ती; उ० नवतीचीं पानें खावयास चांगलीं.

**नवथर**, अ० विवक्षित संन्निहित भूतकालीं: उ० मीं एथें नवथर आलों; २, ३ लिं० कांहींएक संन्निहित भूत कालोत्पन्न जी गोष्ट, पदार्थ, इ० तो.

**नवधान्य**, न० ज्यास उत्पन्न होऊन बहुत दिवस झाले नाहींत असें जें धान्य तें; २, रा० त्याचे भक्षणाचा जो प्रथम संस्कार तें; ३, एक भातांत जाति आहे.

**नवनवती**, स्त्री० तारुण्याची जी आरंभ दशा ती; उ० नवनवती आलीरसा.

**नवमी**, स्त्री० पंधरा तिथींतील नवम जी तिथि ती.

**नवरकळा**, स्त्री० नवऱ्याचे शरीरावर लग्नामध्यें अभ्यंग इ० कांनीं जो तेजो विशेष येतो ती.

**नवरंगी**, ३ लिं० नऊ आहेत रंग ज्यामध्यें तो पदार्थ.

**नवरत्नराजमृगांक**, पु० एक रसायन आहे.

**नवरत्नें**, न० हिरा, पाच, माणीक, मोतीं, पोंवळीं, इ० नव संख्याक जीं रत्नें तीं; उ० नवरत्नाची अंगठी.

**नवरदेव**, पु० लग्नामध्यें स्तुतीनें वरासच म्हणतात.

**नवरा**, पु० विवाह योग्यता आल्यापासून विवाह होई पर्यंत तो; २, ज्या स्त्रीचा जो पति तो तिचा: तो आलीकडे नवरा झाला आहे म्ह० फारच चढला आहे; म्ह० नवरा मरो कीं नवरी मरो दक्षिणेशीं कारण.

**नवरात्र**, न॰ नऊ अहोरात्रांचा जो समुदाय तें, परंतु रूढिनेंच शुद्ध प्रतिपदेपासून नवमीपर्यंत तसेंच आश्विनांत होतें तें; २. त्या दिवसांत देवाचा उत्साह करितात तें.

**नवरी**, स्त्री॰ विवाह योग्यता आल्यापासून विवाह होई तों पर्यंत जी स्त्री ती; २, जा नवऱ्याची जी बायको ती त्याची परंतु प्रायः नाहाण येई तों पर्यंत व्यवहार.

**नवल**, न॰ आश्चर्य; २, सांगायाजोगी, किं॰ ऐकायाजोगी जी कांहीं नवी गोष्ट तें.

**नवलअद्भुत**, न॰ नवल द्विती यार्थीं.

**नवलविशेष**, न॰ नवलअद्भुत.

**नवलख**, ३ लिं॰ ग्रं॰ नवलक्ष: उ॰ आकाशामध्यें नवलख तारे आहेत.

**नवलपरी**, स्त्री॰ आश्चर्य प्रकार ती; २, खणाळ्यांत एक प्रकार आहे.

**नवलाई**, स्त्री॰ नवल.

**नवलाख्या**, ३ लिं॰ जाजवळ नऊलक्ष रुपये, किं॰ असंख्यात द्रव्य ज्याजपाशीं आहे तो.

**नवली**, स्त्री॰ उत्तम भक्षणादिक मिळाल्या मुळें, किं॰ विशेष सुख झाल्या मुळें जी शरीरावर तजगी येते ती; उ॰ पाऊस लागतांच शेताची नवली पालटली.

**नवशिका**, **नवशिखा**, ३ लिं॰ जाजा विद्येविषयीं किं॰ जाजा व्यापाराविषयीं नूतनच प्रवृत्त, किं॰ शिकणारा तो; २, बा॰ प्रथम गरोदर झाली जी स्त्री; किं॰ जें प्रथमतः लागास आलें फणस, इ॰ झाड.

नवशीक

**नवशीक**, **नवशीख**, ३ लिं॰ नवशिका प्रथमार्थीं; २, न॰ नवस संबंधी जी समाराधना इ॰ तें.

**नवस**, पु॰ कांहीं एक कार्य सिद्ध व्हावें म्हणून देवादिकांची प्रार्थना करून त्यास कांहीं एक पदार्थाचा अर्पणाविषयीं, किं॰ सेवनादि विषयीं प्रतिज्ञा करितात तो; किं॰ अर्पणविषयत्वें करून उद्दिष्ट जो पदार्थ तो; नवस फळास येणें म्ह॰ कांहीं एक मनोरथ सिद्धीस जाणें: नवस पुरणें एथें आपले शत्रूचा परस्पर देवादि योगें करून, किं॰ सामान्य स्वप्रयत्नानें त्याचें अनिष्ट झालें असतां संतोष युक्त होणें.

**नवसणें**, नवसाविषयीं यात्रादिक किं॰ पदार्थ प्रतिज्ञान करणें.

**नवसर**, ३ लिं॰ नऊ आहेत सरं ज्यास असा जो हार. इ॰ तो.

**नवससायास**, पु॰ कांहीं एक कार्या साठीं जो नवसादिक प्रयत्न तो.

**नवसागर**, पु॰ एक क्षार आहे.

**नवसाचा**, ३ लिं॰ नवसानें प्राप्त झाला तो.

**नवसारणें**, दे॰ कांहीं एक सांगितलेली गोष्ट नविसरावी म्हणून पुनः पुनः सांगणें; उ॰ तुमची गोष्ट तो विसरला असेल तरी नवसारून द्या.

**नवसुती**, स्त्री॰ जानवें करायासाठीं एकत्र नऊसुतें करून वळून केला जो दोरा ती.

**नवा**, ३ लिं॰ जाचे उत्पत्तीस बहुत दिवस झाले नाहीं तो; २, जा कार्या विषयीं जो योग्य तो त्या कार्यांत निपुण नाहीं तों पर्यंत तद्विषयीं तो, आणि त्यासनें कार्यही; उ॰ या कामांत तो नवा आहे आणि

हें

हें कांमही त्यास नवें आहे; ३,जो पदार्थ उपभोगादिकें करून शिथिलावयवक,किं० संमर्दित नव्हे तो; उ०ही शालजोडी नवी आहे; जाणें जो पदार्थ अमुकपूर्व,किं० अदृष्टपूर्व,किं० अश्रुतपूर्व तो त्यास;उ०ही स्त्री अझून नवी आहे कोणी भोगिली नाहीं; आज नवें झाड पाहिले; आज याणि नवाच श्लोक म्हटला; ४, अल्पकाल झाला आहे ज्यास असा जो कारभारी इ०व त्याचा कारभार इ०तो; म्ह० नवें नवें जेवीसवे,नवें नवें निरखावल्या भवते भवे.नवी विटी नवा डाव,नवा नो घांवेल त्यांच्या,नवा दिवशीं नवें पाणी,नवे नवतार बसले गवतार,जुने डोळे आणि नवे तमाशे; नवांदिवशीं नवी विद्या·

**नवाट**, ३लिं० नवट·

**नवाटकें**, न०नवटकें·

**नवाठ**, ३लिं० नवट;२,स्त्री० घर इ०कांसाठीं जो काष्ठ समुदाय तोडितात ती·

**नवानवशाचा**, ३लिं०जा पोरा करितां बहुत नवस केले तो;२,ला०जो बहुत प्रयत्नानें मिळाला जो पदार्थ त्यास म्ह०·

**नवान्नपूर्णिमा**, स्त्री० आश्विनी पौर्णिमा,त्या दिवशीं प्राय: नवें अन्न खावयास आरंभ करितात, ती·

वार, स्त्री० तीन चार बोटें रुंदीचें आणि लांब बहुत असें वस्त्र आहे जाणे पलंग विणितात ती·

**नवारणें**, स०पलंग इ०नवारीनें विणणे·

**नवाळ**, स्त्री०स० नवीनवाळ·

**नवाळी**, स्त्री० नेवाळी·

**नविनवती**, स्त्री० नवनवती·

**नवीन**, ३लिं० नवा·

**नवीनमत**, न०नवीन जे पंडित त्यांचें जें मत तें·

**नवीनवाळ**, स्त्री० प्रतिवर्षी उत्पन्न जे पदार्थ त्यांचे प्रथमत: भक्षणाचा जो व्यापार ती,किं० अपरूपपणें भक्षणीय जे पदार्थ ती; उ०हे पेरू पाठवाया जोगे नव्हेत परंतु नवी नवाळ म्हणून पाठवावे·

**नवें**, न० प्रतिवर्षी उत्पन्न जे धान्यादि पदार्थ त्याचा प्रथम भक्षण संस्कार तें;२,नवान्न पौर्णिमेचा दिवशीं भात इ०कांचीं कणसें आंब्याचे पानांत बांधून,काठी चिरून त्यांत घालून दरवाजा इ०कांवर बांधितात तें·

**नवें जुनें**, न० राज्यादिकामध्यें कारभारी इ०कांचा अदलाबदलीचा प्रकार तें;२,नवें जुनें परस्पर बदलण्याचा प्रकार तें·

**नवेताण्याचा**, ३लिं० जा वस्त्रास उत्पन्न होऊन बहुत दिवस झाले नाहीं तो;२,तसें त्याचें सूत तें·

**नवोढा**, स्त्री० जिला पुरुषप्राप्ति झाली नाहीं अशीजी तरुण स्त्री ती उपभोगाविषयीं·

**नव्याची पुनव**, स्त्री० आश्विनी व मार्गशीर्ष पौर्णिमा ती·

**नव्यांणव**, ३लिं० ९९·

**नव्यांशी**, ३लिं० ८९·

**नव्वद**, ३लिं० ९०·

**नव्वा**, ३लिं०नवम·

**नव्हे**, अ०होय याचा प्रतिपक्षी·

**नश्वर**, ३लिं० सं० जाचा अवश्य नाश व्हावयाचा तो;उ० जेवढा दृश्य पदार्थ तेवढा नश्वर·

**नष्ट**, ३लिं० सं० दुसऱ्याचा नाश,किं० वाईट करण्याचा स्वभाव ज्याचा तो;२,जो नाश पावला,किं० हारवला

नवीन

इ॰ कारणानीं नाहींसा झाला तो·

**नष्टचर्य**, न॰ दुर्दैव·

**नष्टोळा**, ३ लिं॰ वा॰ दुष्टस्वभावाचा जो मनुष्य तो·

**नस**, पु॰ पोटांतील एक अवयव आहे, जो वायूचा योगानें फुगतो··

**नसकोणा**, ३ लिं॰ वा॰ ज्याचे आंगीं गुण नसून ठेंगणा आणि अशक्त तो·

**नसणें**, नअसणें·

**नसरड**, स्त्री॰ रा॰ अशक्त असून हड्डी कोडगें जें पोर ती·

**नसराणी**, ३ लिं॰ दुसऱ्यास अनेक युक्तीनें फसवून आपला अर्थ साधणारा, किं॰ दुसऱ्यास न फसणारा असा जो मनुष्यादि त्यास निंदेनें म्ह॰·

**नसरूड**, ३ लिं॰ शरीरांत पराक्रम नसून ज्याला बोलल्या चालल्याची लाज नाहीं अशा तऱ्हेचे गुणाचा जो मनुष्य त्यास निंदेनें म्ह॰·

**नसीब**, न॰ हिं॰ मनुष्यादिकांचें जें दैव तें·

**नसीबवंत**, ३ लिं॰ दैववंत·

**नसीबवान**, ३ लिं॰ दैववान्·

**नस्त**, न॰ समुद्रांत गलबत चालण्याविषयीं जी खडकामुळें, किं॰ खाडीचे संगमामुळें कठीण अशी जागा तें·

**नस्ता**, ३ लिं॰ सेवकाभावासच सेवकत्वारोप कर्तव्य असतां या शब्दाचा प्र॰; उ॰ अरे नस्त्या गुडगुडी भरून आण, राव बसले आहेत; २, कांहीं संबंध नसतां निष्कारण पाठीशीं लागला जो उपद्रव किं॰ उपद्रव कारक पदार्थ, व्यापार, इ॰ त्याचें वि॰·

**नस्य**, न॰ सं॰ नाकामध्यें जें औषध घालितात किं॰ ओढितात तें·

**नहर**, पु॰ शहर, इ॰ कांत बाहेरचें पाणी आंत आणाव्यासाठीं, किं॰ आंतलें पाणी बाहेर न्यावयासाठीं भूमींतून दांडा बांधून काढितात तो·

**नही**, स्त्री॰ नई·

**नळ**, पु॰ नहर; २, नस प्रथमार्थीं; ३, जमीनींतून पाणी बांधून आणायासाठीं माती, तांबें, इ॰ कांचा कुंकणीचे आकारासारिखा करितात तो·

**नळकंडें, नळकांडें**, न॰ एक बाजू बंद एका बाजूस भोंक अशी जी वेळू, काष्ठ, इ॰ कांचें, किं॰ धातुमय, लेखणी इ॰ ठेवायाकरितां पोकळ नळी करितात तें·

**नळकूट**, न॰ वा॰ नळकांडें·

**नळगुडी**, स्त्री॰ गुडघ्या खालचें पाऊलपर्यंत जें हाड ती·

**नळगूद**, न॰ एक रोग आहे जो झाला असतां बेंबीपासून उरापर्यंत सूज येती तें·

**नळनळीत**, ३ लिं॰ डिळडिळीत·

**नळपटनारायण**, ३ लिं॰ दे॰ नग्ननारायण·

**नळवायु**, पु॰ पोटांतील नळांत विकृतीनें उत्पन्न होतो जो वायु तो·

**नळसंग्रहणी**, स्त्री॰ पोटांतील नळसंबंधी एक रोग आहे·

**नळा**, पु॰ गृहादिकांवर आच्छादनार्थ जीं कवलें करितात त्यांत आकारविशेषाची जाति आहे; २, दारूचीं फुलें उंच उडावीं म्हणून, मृत्तिका इ॰ कांचें पात्र दारू भरून करितात तो; ३, दे॰ नळगुडी; ४, तैलादि ठेवायासाठीं वेळूचें पात्र करितात तो; ५, रा॰ नळकांडें; ६, नळ तृतीयार्थीं·

नळी, स्त्री० दोन तोंडें मोकळीं असून मध्यें पोकळ असाओ वेळू, धातू, इ०कांचा तुकडा ती; २, बंदूक; ३, नळ गुडी; ४, कुत्रा मनुष्यादिकांचीं हातापायांचीं हाडें ती.

नक्षत्र, न०सं० निरभ्र आकाशांत चंद्रावांचून जा तारका तें; २, सूर्यचंद्राधिष्ठित चक्राचा सत्तावीस अंशांतील जो एक अंश तें; ३, भूचक्राचे सत्तावीस अंश ते प्रत्येकीं; याचे हातावर, पायांवर, तोंडावर, इ०स्थलीं नक्षत्र पडलें आहे, ह्म० कर्मेकरून हा चोर, हा निरंतर चालणारा, हा बहुत बोलणारा. इ०अर्थ जाणावे.

नक्षत्रनाथ, पु० चंद्र.

नक्षत्रमाळ, नक्षत्रमाळा, स्त्री० विवाहामध्यें समारंभार्थ वधूवरें मिरवत असतां कागद इ०कांचीं फुलें करून त्याचा माळा करून काठीस बांधून पुढें चालविनात ती; २, रा० देवाचापुढें शोभार्थ मांडून ठेवितात जीं पात्रें ती.

नक्षत्रसूचि. ३ लिं० सं० गणितादि ज्ञान नाहीं आणि आपणास ओशी ह्मणवितो कदाचित् नक्षत्रमात्र समजतें असा जो मूर्ख तो.

नाइठा, पु० एक लग्नरोग आहे; ह्म० भवानी तुळजापुरीं आणि नाइटे पृथ्वीभर.

नाईक, ३ लिं० आपले हाताखालीं दाहापांच मनुष्यें घेऊन सर्कार इ०कांचें काम करितो तो; २, भाड्याचा डोल्या, घोडीं, मजूर, इ०कांचा अड्डयाचा जो धनी तो; ३, ब्राह्मणजातीय असून जो सराफीचें काम करितो त्यास मोठेपणाचा द्योतक त्याचा नावापुढें हा शब्द लावितात; उ० बाळोबा नाईक, त्र्यिंबक नाईक.

कोठें नामा वांचूनही प्र० होतो.

नाक, न० मुखावरील एक अवयव आहे. व नलिष्ठ जें गंधग्राहक इंद्रियतें; २, ला० धान्यास ज्या प्रदेशीं मोड येतो तो प्रदेश; ३, सुई, दाभण, इ०कांचें आंत सूत इ० ओंवाया साठीं जें छिद्र करितात तें; ४, माह्यारास मोठेपणा द्यावयाचा असतां त्याचा नावापुढें हा शब्द लावितात; उ० भागनाक, रामनाक, इ०; ५, देशादिक जे अवयवी त्यांतील जो मुख्य अवयव तें; उ० पुणें हें देशाचें नाक आहे; ६, मनुष्यादि समुदायांत जो गुणादिकें करून उत्कृष्ट त्यासही ह्म०; नाकावर निंबू घांसणें, नाकावर पाय देणें, नाकास चुना लावणें, इ०स्थलीं स्वकार्यप्रतिबंधक जो पुरुष त्याजवर जबरी पोंचवून अथवा त्याला न गणितां, किं० त्याला न कळूं देतां स्वकार्य साधणें; त्याचे नाकावर राग किं० रडें आहे इ० स्थलीं स्वल्प निमित्तानें त्यास राग व रडें, येतें; नाकावर माशी बसूं न देणें ह्म० दुसऱ्याचें उणें उत्तर, किं० दुसऱ्यानें लाविलेला दोष त्याचें सहन करणें; उंचे नाकानें बोलणें, वागणें, फिरणें, इ० आपण केलेला जो दोष त्याची लाज मनांत न आणितां वागणें, बोलणें, इ० करणें; नाकीं वेसन घालणें, टोंचणें, ह्म० एखादे व्यापारीं तिरस्कार इ०कानें अप्रवृत्त जो मनुष्य त्यास त्या व्यापाराविषयीं बलात्कारानें प्रवृत्त होई असें करणें; नाकीं नऊ येणें, ह्म० कांहीं एक कार्य सिद्धीस नेतां थकणें, किं० क्लेश पावणें; नाकानें दुराही काढणें, ह्म० कांहीं एक स्वकार्य सिध्यर्थ देवादिकांस शरण जाणें; मुठींत नाक धरून जाणें, एथें जेथें आपला मान भंग झाला आहे, किं० तद्विषयीं संभावना आहे त्या स्थलीं आपण होऊन अ-

भिमान सोडूनआणणें; नाकधरूनबसणें, म्ह० सर्वदा स्नानसंध्यादिकांत निमग्न असणें; नाक घांसणें म्ह०स्वकार्य साधनार्थ दुसऱ्याचे पाय धरणें; नाकनसणें,म्ह० नासिकायवर्ती जी गंधग्राहक देवता ती नसणें, किं० ज्या स्थळीं आपण अपराध केला आहे त्यास्थळींआण्या विषयीं लज्जापावणें; नाकखालींपडणें, म्ह०स्वाभिमान सिद्धीसन गेल्यामुळें लज्जा पावणें; आपलें नाककापून दुसऱ्यास अपशकुनकरणें, म्ह० दुसऱ्याचें वाईटकरण्यासाठीं प्रथम आपलें वाईट करणें; नाकानें कांदे सोलणें, म्ह०आपण वाईटकर्म करून तें कर्म आपण न केलें असें दाखवून आम्ही अमुककर्म करीत नाहीं अशी प्रतिष्ठा भोगणें; नाक तुटणें, पळणें, बुजणें, इ०स्थळीं नाक म्ह०नथ घालायाचें छिद्र; नाक गमावणें म्ह० प्रतिष्ठा गमावणें; नाक पिंजारणें, नाकपुड्या पिंजारणें, नाक फुगविणें, नाक फुरफुरविणें, इ०स्थळीं क्रोधानें नाकाचीं द्वारें फुगविणें, नाकबंद होणें, म्ह० नाकपुड्याचीं छिद्रें बंद होणें; नाक वाहाणें, किं० गळणें, म्ह० नाकांतून पाणी श्लेष्मा इ० बाहेर येणें; नाक ओरबाडणें, म्ह० नाकांतील भूषण इ०जबरीनें काढून घेणें; नाकझाडणें, म्ह० कोणेएक गोष्टी विषयीं तिरस्कार करणें; नाकांत काड्या घालणें, मुक्यापुढें नाक खाजिवणें एथें बहुत चीड येई असा व्यापार करणें; नाकतोडून कडोस्वीस खोवणें, म्ह० वारंवार धिक्कारिला असतां कोडगेपणानें मागावें बोलावें, असा स्वभाव धरणें; नाकावर पदर घेणें, म्ह० ज्याचा पक्षपात धरावा त्याचें कांहीं एक वाईट झाल्यामुळें लज्जित होणें; नाक कापून पाटावानें पुसणें, म्ह० एखाद्याची मोठी अप्रतिष्ठा करून नंतर किंचित् सन्मान करणें; म्ह० नाकीं नाहीं कांटा आणि कोरडाच ताठा; म्ह० नाकापेक्षां मोती जड.

**नाकखाबाल**, ३ लिं० मोठ्याचे परम प्रीतीचा जो दुर्जन तो त्यांचा.

**नाकटा**, ३ लिं० नग्न.

**नाकतोडा**, पु० क्षुद्रजंतु आहे.

**नाकपुडी**, स्त्री० नाकाचे जे दोन भाग ते प्र० रा.

**नाकबूल**, ३ लिं० कांहीं एक गोष्टी विषयीं जो अमान्य तो.

**नाकशिंकणी**, स्त्री० एक औषधी आहे जिचा वास घेतला असतां बहुत शिंका येतात ती.

**नाकसवी**, ३ लिं० ज्या कसबामध्यें जो आडाणी तो त्या कसबा विषयीं.

**नाकसर**, न० गारुड्याचें नळीचें वाद्य आहे.

**नाका**, पु० आण्या येण्याचे रहदारीचे अनेक मार्ग एकच मिळाले असतात असा जो जागा तो.

**नाकाड**, न० मोठें जें नाक तें; २, निंदेनें नाकास म्ह०; ३, अंब्याचे फळास मागले बाजूस उंच नाकासारिखें असतें तें; ४, डोंगरास जो नाकासारिखा आकार असतो तें; उ० या नाकाडाचे पलीकडे आपला गांव आहे.

**नाकार**, पु० कांहींएक गोष्टीचा जो अस्वीकार, किं० निषेध तो; उ० तुम्ही माझे गोष्टीचा नाकार करूं नका.

**नाकारणें**, कोणेक पदार्थास किं० व्यापारास खोटा ठेवणें; २, कांहींएक व्यापार निषेधणें.

**नाकारा**, ३ लिं० तनज्जातीयत्वेंकरून अभिमत जें त्यांत जो निकृष्ट तो.

**नाकीदे**, ३ लिं० ज्या जमीनींत लागवड नाहीं अशी जी तो

तो.

**नाकील**, ३ लिं॰ सुरेख सरळ लांब नाक ज्याचें तो.

**नाकूस**, ३ लिं॰ ज्या व्यापाराविषयीं जो अप्रयोजक तो.

**नाकें**, न॰ ज्या ठिकाणीं जकात घेतात तें; २, रा॰ नाका.

**नाकेदार**, ३ लिं॰ नाक्यावर ठेविला जो अधिकारी. किं॰ रक्षक तो.

**नाकेबंदी**, स्त्री॰ हिं॰ प्रतिनाक्याचाठायीं विवक्षित मनुष्याव्यतिरिक्त मनुष्यादिकांस जाण्यायेण्याविषयीं जो प्रतिबंध ती; उ॰ मीं आज जाणार होतों परंतु नाकेबंदी झाली आहे.

**नाकेशर**, न॰ नागकेशर.

**नाकोडा**, पु॰ बा॰ नाकरूप जो अवयव त्यास निंदेनें म्ह॰.

**नाखवा**, पु॰ कोळ्यामध्यें श्रेष्ठ जो महागिरीचा तांडेलपणा करितो, किं॰ ज्याचा घरचीं गलबतें एकदोन आहेत तो.

**नाखूश**, ३ लिं॰ हिं॰ खुश नाहीं तो.

**नाग**, पु॰ सं॰ सर्पविशेष तो; २, बचनाग; ३, गज; ४, शिसें; ५, दाहावें करण.

**नागकन्या**, स्त्री॰ पुराणादिप्रसिद्ध नागाची जी मनुष्याकृति कन्या ती; २, ला॰ परमसुंदर स्त्रीस उपमेनें म्ह॰.

**नागकुंडल**, न॰ नागाचा वेंटाळ्याचे आकृतीचें जें कुंडल तें.

**नागकूळ**, न॰ प्रा॰ नागपंचमीचे दिवशीं जो सर्प निघत असतो तें; २, नागाचें जें कुळ तें; उ॰ नागपंचमीचे दिवशीं शेण, गंध, इ॰ कांचीं नागकुळें काढून पुजा

**नागकेशर**, न॰ एक औषधी पदार्थ आहे.

**नागचंद्रकोर**, स्त्री॰ स्त्रियांचे डोकींतील एक भूषण आहे.

**नागचंपक, नागचांपा**, पु॰ एक पुष्पवृक्ष आहे.

**नागटा, नागडा**, ३ लिं॰ नग्न; २, ला॰ म्यान उडविलें ज्या तलवारीचें तिलाव सुईचे नेढ्यांत दोरा नाहीं अशा कितेक पदार्थांस म्ह॰.

**नागदवण**, स्त्री॰ एक वृक्ष आहे.

**नागदिवाळी**, स्त्री॰ मार्गशीर्ष शुद्ध पंचमी ती; त्या दिवशीं पिठाचे नाग करून देवाचें पूजन करितात.

**नागपंचमी**, स्त्री॰ श्रावण शुद्ध पंचमी त्या दिवशीं नागाची पूजा करितात.

**नागपाश**, पु॰ एक पुराणप्रसिद्ध नागाकार बंधन साधन आहे.

**नागफणा**, स्त्री॰ सर्पाची जी फडा ती.

**नागफणी**, ३ लिं॰ नागाचा फणासारिखें ज्या खिळ्यास चिन्ह असतें तो

**नागफणीचांपा**, पु॰ एक पुष्पवृक्ष आहे.

**नागमोड**, स्त्री॰ नागाचा मोडीसारखा बांगडी इ॰ कांचा जो वक्रआकार ती; ह्या मुलगी नागमोडीचा पिंताबर नेसली आहे; म्ह॰ नागवी आहे.

**नागमोडी**, ३ लिं॰ नागमोड ज्यास आहे, किं॰ ज्यावर आहे असा जो बांगडी, वस्त्र, इ॰ पदार्थ तो.

**नांगर**, पु॰ भूमि उखळायाचें काष्ठाचें फाळानें संबद्ध आऊत आहे; २, गलबत इ॰ पाण्यावर स्थिर राहावें म्हणून लोखंड इ॰ कांचा करून गलबतां खालीं टाकायासाठीं लांब दोरी बांधून गलबतावर ठेवितात तो; म्ह॰ जेथें आवें तथें नांगरास पाळ.

**नागर**, पु॰ ब्राह्मणांत जाति आहे; २, न॰ सुंठ.

**नांगरकी**, स्त्री॰ नांगरानें जमीन उखळण्याचा जो व्यापार ती.

**नांगरट, नांगरठ**, ३ लिं॰ नांगरलेला जो जागा तो.

**नांगरडा**, पु॰ वा॰ नांगर जुंपते समयीं नांगरास जी मध्यें दोरी बांधितात तो.

**नांगरणी**, स्त्री॰ नांगरकी; २, गलबत नांगरायाचा जो व्यापार ती.

**नांगरणें**, नांगरानें जमीन उखळे असा व्यापार करणें; २, गलबताचा नांगर पाण्यांत टाकून गलबत स्थिर करणें.

**नागरमोथा**, पु॰ एक औषधी सुवासिक मूळ आहे तो.

**नांगरवट**, ३ लिं॰ नांगरट.

**नांगरवाडा**, पु॰ खुसकीचा आश्रयानें गलबतें नांगरायाची जी जागा तो; २, गलबत नांगरण्याचा व्यापार तो.

**नागरथा**, ३ लिं॰ नांगराचे उपयोगी जो बैल, गडी, इ॰ तो; २, जाजकडे पाटीलकीचा अधिकार तो.

**नांगरेंकोनफळ**, न॰ कोनफळांत एक जाति आहे.

**नागलकुडा**, पु॰ रा॰ कुडा ह्मणून एक वृक्ष त्यांतील एक भेद आहे.

**नागला**, पु॰ रा॰ एक पुष्पवृक्ष आहे.

**नागली**, स्त्री॰ एक धान्य आहे.

**नागवण**, स्त्री॰ चोरोपद्रव, सर्कार संबंधी खंड, दंड, किं॰ व्यापारांत तोटा इ॰ प्रयुक्त जी द्रव्यादिकांची हानी ती.

**नागवणूक**, स्त्री॰ नागवण.

**नागवणें**, चोर, राजा, इ॰ कांनीं लुटणें इत्याद्युपद्रवानें कोणेकास द्रव्यादि हीन करणें.

**नागवा**, ३ लिं॰ नग्न.

**नागवापाऊस**, पु॰ ऊन पडलें असतां जो पाऊस पडतो तो.

**नागवें**, न॰ ला॰ नग्नपदार्थ इ॰ कांचें जें ईषद्दर्शी अंगवैकल्य तें; उ॰ आमचा कोणी सर्कारांत बोलणारा नाहीं हें नागवें पाहून त्यानीं आह्मावर फिर्याद केली; नागवें कोल्हें इ॰ भेटणें, इ॰ स्थलीं कार्यार्थ बाहेर पडलें असतां तें कार्य होऊन विशेष फल झालें असतां तदनुमित जे सुशकुन त्यांस नागवें कोल्हें इ॰ ह्म॰.

**नागवेल**, स्त्री॰ विड्याचे उपयोगी जिचीं पानें पडतात अशी एक वेल आहे ती.

**नागा**, पु॰ रवाडा द्वितीय तृतीयार्थी

**नांगा, नांगाडा**, पु॰ विंचवाचा मागें ऊर्ध्व कंटका सारिखा अवयव असतो तो, ज्याचा प्रहारानें बहुत वेदना लागतात; २, खेंकड्याचा आंकड्या सारखा जो अवयव असतो तो आणि दुसऱ्यास धरितो; कार्यामध्यें नांगडा मारणें, ह्म॰ कार्य नाश होई असा भाषणादि व्यापार करणें.

**नांगाळी**, स्त्री॰ एक वेल आहे.

**नांगी**, स्त्री॰ गोमहिष्यादिकांचा रपुरास शेंटा सारिखा अवयव असतो ती; २, नांगडा; ३ शेर ह्मणून वृक्ष आहे त्याचा जा डिच्या त्या प्र॰; त्याचे घरीं गुरांची नांगी राहिली नाहीं. ह्म॰ गुरें राहिलीं नाहींत कोणेकाची नांगी लागणें रुतणें, इ॰ स्थलीं कोणेकानीं दर्बार इ॰ विवक्षित स्थलीं पुरतेपणीं प्रविष्ट होणें.

**नांगें**, न० नेत्र, इ०कांचें जें दुबाळकें तें·

**नागोत्र**, न० स्त्रियांचा नगांतील एक भूषण आहे·

**नागोस**, पु०ग० जा मध्यें दरवाजाचीं वरचीं कुसें अडकिवलेलीं असतात असा जो उंबरा, किं० उंबऱ्या जवळची फळी असत्ये तो

**नागोसा**, पु० राहाटाचा गुलकंब्याचें टोंक अडकाव्यासाठीं ओंक डावा करून मारितात तो; २, नागोस·

**नाघाणी**, अ० दे० नाहक·

**नाच**, पु० वेश्यादिकांचा हावभाव गानासहित तालावर जो पाद विक्षेपरूप व्यापार तो; लग्नादि कार्यांमध्यें नाच नाचणें म्ह० ततत्कार्य सिध्युपयोगी अनेक प्रकारची खटपट करणें·

**नाचकंड, नाचकण**, न० नरवजिन·

**नाचण**, ३ लिं० दे० पुरुषानें मोहित व्हावें म्हणून व्हानीनें हावभाव दाखविण्याचा स्वभाव जीचा तो. या० स्त्री० विशेषण होतें·

**नाचणकोंडा**, न० नाचणीचें गवत तें·

**नाचणघुगरी**, स्त्री० दे० नाचण·

**नाचणा**, पु०रा० नाचणी·

**नाचणी**, स्त्री० नागली·

**नाचणें**, वेश्यादिकांनीं हावभाव गानादिसहित तालावर पादविक्षेप करणें; कोणेकाचे पुढें पुढें नाचणें, इ० स्थळीं त्याला जो जो पदार्थ जा जा वेळेस पाहिजे त्या त्या वेळेस त्वरेनें देणें; म्ह० लग्नामध्यें रखरखण्यापेक्षां नाचणें फार; म्ह० नाचतां येईना म्हणून अंगण वांकडें; मोर नाचतें म्हणून लांडोरही नाचतें·

**नाचरा**, ३ लिं० आपलें विशेष कांहीं चालत नसतां पुढेंपुढें बोलणें, किं० अनेक प्रकारची खटपट करणें, अज्ञानदेनें डोल मिरवितो तो; म्ह० अर्धांच बाई नाचरी तिचा पायांत बांधली घागरी·

**नाचरी**, स्त्री०रा० नाचण·

**नाचा, नाचापोऱ्या**, पु० स्त्रीचा वेष घेऊन नाचतो जो पोऱ्या तो·

**नाजकाई**, स्त्री० नाजूकपणा·

**नाजागीर**, ३ लिं० हिं० जीर्णत्वादि दोषामुळें जो पदार्थ अनुपयुक्त होतो तो·

**नाजुकखर्च**, पु० केवल स्वसंवेद्य जो व्यभिचार इ० कांकडेस खर्च तो·

**नाजुकमसलत**, स्त्री० गुप्तपणेंच केली पाहिजे अशी जी मसलत ती·

**नाजूक**, ३ लिं० जास उष्ण, शीत, धकाधक, इ० सोसत नाहीं, किं० तीं झालीं असतां लवकर विकार पावतो असा जो मनुष्य पुष्पादि पदार्थ व मृदु असून पातळ जो पोळी इ० पदार्थ त्यास म्ह०·

**नाट**, न० पांचा कवड्यांचा जो समुदाय तें; २, कवड्या खेळायासाठीं रंग इ० कांचा रेघानीं कोष्टकांकित काढितात तें; ३ देण्याघेण्याचा व्यवहारांत जा कुळाकडला पैसा उगवेनासा झाला तें कूळ तें; ४, कांहीं एक दोषारोपानें कुळास लागला जो बट्टा तें; ५, जा कार्यास उद्दिष्ट जो कालावधि, किं० क्रियेचा अवधि त्या अवधीस कार्य न झाल्यामुळें प्रतिबंधक त्वेंकरून कल्पित जे अपशकुनादिक तें; उ० आज कार्य व्हावयाचें परंतु आज काय नाट लागलें तें समजेना; ६, ३ लिं० जा कार्याविषयीं उद्दिष्ट जो काल त्या कालीं तें कार्य न झालें असतां प्रतिबंधकत्वेंकरून कल्पित जो

जो तो काल तो; उ॰ आजच्या दिवस नाट लागला; ७, अ॰ थांग लागे असें कर, जा, इ॰कांचें वि॰; ८ समुद्राचे आंत दूर प्रदेशीं; उ॰ गलबताची नाळ नाट लाव; मीं नाट जाणार नाहीं, नाट येणार नाहीं, स॰ विवक्षित कार्याविषयीं असमर्थ होणार नाहीं

**नाटक**, न॰ सं॰ काव्यांतील एक जाति आहे: २. दशावतारादिकांचीं सोंगें घेऊन खेळ करितात तें.

**नाटकशाळा**, स्त्री॰ पोरीस विकत घेऊन नाचणें गाणें शिकवून उपभोगार्थ ठेवितात ती·

**नाटकसाळ**, स्त्री॰ नाटकशाळा·

**नाटकी**, ३ लिं॰ नाटकाचा तमाशा करितो जो; २, ला॰ ज्याचे कृतीचा अनुक्रम सांपडत नाहीं तो; उ॰ हा कारभारी मोठा नाटकी आहे; ३, नाटकसंबंधी जो श्लोकादि तो·

**नाटाळ**. ३ लिं॰ नाटवृतीचा थीं [illegible] अविचारीपणें जो द्वाड तो·

**नाट्य**, न॰ नृत्य·

**नाठवणें**, स॰ न आठवणें·

**नाड**, स्त्री॰ शरीरांतील एक [illegible] ती; २, न॰ बा॰ कळकांचे नळकांडें; नाडी पाहाणें [illegible] डी दाखविणें, ला॰ जा नाडीवरून रोगपरीक्षा करणें आहे ती नाडी पाहाणें दाखविणें; कोणेकाची नाड सांपडणें, स॰ युक्तिप्रयुक्तीनें कोणेकाचा स्वभाव हस्तगत होणें; कोणेकाचा नाडी आटपणें, स॰ त्याणें मरणोन्मुख होणें; ला॰ त्या कार्याविषयीं त्याचा नाडी आटपणें, स॰ त्या कार्याविषयीं त्याणें थकणें·

**नाडणूक**, स्त्री॰ बुडणूक·

**नाडणें**, नागवणें; २, ला॰ ऊर्जित होण्यासाठीं ज्या पदार्थाचा योग झाला त्याणें दैवयोगानें, किं॰ स्वकृतीनें त्या ऊर्जितांत माती पडे असें करणें; उ॰ आपण त्या पोरीस नाडून मरून गेला·

**नाडवंद**, ३ लिं॰ स्त्रीचा उपभोग करावयाजोगें वय असून स्त्रीसंग घडला नाहीं ज्यास तो·

**नाडा**, पु॰ बहुरुपी तमाशा करावयाकरितां उंच स्तंभ रोंविलात तो; २, फार जाडी जी दोरी तो; ३, ताबुताचे दिवसांत फकीर इ॰कांस धारण करण्यासाठीं सूत रंगवून करितात तो; ४, चोळणा इ॰कांस अरुंद जें नवारें सारिखें वस्त्र लावितात तो; ५, खालीं डोकें टेंकून वर पाय करून राहाण्याचा जो प्रकार तो·

**नाडापुडी**, स्त्री॰ सूत रंगवून करितात जो नाडा आणि अबीर, गुलाल, इ॰ द्रव्याची जी पुडी ती; उ॰ सटवाईला नाडापुडी वाहिली·

**नाडी**, स्त्री॰ सं॰ नाड; २, नाडा चतुर्थार्थी; ३, घटिकात्मक जो काल ती·

**नाडीपरीक्षा**, स्त्री॰ नाड पाहून वातपित्ताद्याधिक्यादिकाची जी परीक्षा ती·

**नाडेबहुरूपी**, **नाडेबहोरुपी**, **नाडेभोरपी**, ३ लिं॰ नाडा उंच पुरून त्याजवर चढून खेळ करितात तो·

**नाडेभोरीप**, **नाडेभोरूप**, न॰ नाडे भोरपी नाडा पुरून जो खेळ करितात तें·

**नाणक**, न॰ सं॰ मोहोर, पुतळी, पांची, रुपया, पैसा, इ॰ रूप जें द्रव्य तें·

**नाणा**, पु॰ एक वृक्ष आहे·

णें, न० नाणक.

णेवटी, ३ लिं० नाण्याचा व्यापार करितो जो सराफ तो.

ात, स्त्री० लेंकाची, किं० लेंकीची जी कन्या ती; २, ला० नत्स्थानिक जी त्याची कन्या ती.

ातजावई, पु० नातीचा जो नवरा तो.

ातलग, ३ लिं० ज्यांचा परस्परें विवाहादिकें करून नागीर संबंध झाला आहे ते परस्पर.

नातरूं, नातवंड, न० पुत्राचें, किं० कन्येचें जें अपत्य तें.

नातवानी, स्त्री० प्रायः द्रव्याभाव मूलक जी गरीबी ती; २, गंजिफाचे डावांत एक तर्‍हेनें देण्याचा प्रकार आहे.

नातसून, स्त्री० नातवाची जी बायको ती.

नातुंड, न० नातवंड.

नातू, पु० पुत्राचा जो पुत्र, किं० कन्येचा जो पुत्र तो; २, ला० तत्स्थानिक जो पुत्र ... पुत्र तो.

नातें, न० यौनसंबंध, किं० तत्कार्य प्रवृत्ति ... भूत जो संबंध तें; उ० त्याचें व आमचें ... सासऱ्याचें नातें आहे.

नातेवाईक, ३ लिं० नातलग.

नानोंड, न० नातवंड.

नाथ, पु० स्वामी, प्रा० समासीं, काशिनाथ विश्वनाथ इ०; २, वा० नञ द्वितीयार्थी.

नाथपंथी, ३ लिं० गोसाव्यांत भेद आहे.

नांद, स्त्री० दे० मोठा जो रांजण ती; २, स्नानार्थ सगडीचे आकाराची मृत्तिकेची ठेवितात तिलाही म्ह० नाद.

नाद, पु० ध्वनि विशेष तो; २, कांहीं एक गोष्टी विषयीं, किं० व्यसना विषयीं जो छंद तो; उ० तो बोलण्याचे नादांत आहे हा थोर गृहस्थ असून या गांडेच्या नादी लागला हें चांगलें नव्हे; त्याणें देतो असा नाद लाविला आहे, म्ह० आशा लावून ठेविली आहे. नाद जाणें म्ह० कांहीं एक गुप्त गोष्टीचा भाव प्रसिद्ध झाल्या मुळें नाहीं असा होणें; नाद दवडणें, नाद घालिवणें एथें तो नाद जाई असें करणें.

नादखोर, ३ लिं० एकदां जो नादांत लागला त्याच नादानें चालण्याचा स्वभाव ज्याचा तो.

नांदणूक, स्त्री० कोणेकस्थलीं घरदार, कुटुंब सुद्धां जी बहुत वर्षे स्थिति ती; उ० त्या गांवांत आमची दाहा वर्षें नांदणूक झाली; २, कोणेकाच्या राज्यांत, किं० हाताखालीं विवक्षित काल पर्यंत जो टिकाव ती.

नांदणें, एखादे गांवीं किंमध्यें संसार करून बहुत दिवस राहणें; उ० आम्ही त्या गांवांत सात पिढ्या नांदलों; २, ज्या व्यापारासाठीं जो पदार्थ सिद्ध केला तो पदार्थ त्या व्यापारानें अवियुक्त असणें; उ० त्या ... पण नांदत नाहीं; त्याचें व आमचें नांदत नाहीं, म्ह० कांहीं एक व्यापारा विषयीं पडत नाहीं.

नादबक, ... म्ह०.

नादिर, ३ लिं० स्वरूपानें, किं० गुणानें जो उत्कृष्ट तो; २, स्त्री० गंजीफांतील निकृष्ट शेवटील जें पान ती.

नादरशाई रुपाया, पु० रुपायाचे शिक्क्यांत एक भेद आहे.

नांदरूख, स्त्री० एक झाड आहे.

नांदवड, स्त्री० वा० नांदणूक.

नादान, ३लिं॰ नाकारा.

नादावणें, कांहीं एक चांगलें कार्य बिघडे असें आपलें अज्ञान प्रकट करणें; उ॰ तो तेथें जाऊन नादावला असेल म्हणून त्याणें काम केलें नाहीं.

नादावणें, व्यसनादि कित्येक गोष्टीचा नाद लागणें; २, दे॰ धातुमय पात्रादिकांवर कांहीं आघात झाल्यामुळें नादयुक्त होणें, किं॰ मृदंगादिक वाद्य कांहीं दोषामुळें विस्वर वाजणें.

नादाळ, ३लिं॰ नादखोर.

नादिष्ट, ३लिं॰ नादखोर.

नांदी, स्त्री॰ सं॰ नाटकाच्या प्रारंभीं मंगलाचरण श्लोक असतात ती.

नादी, ३लिं॰ नादखोर.

नांदट, स्त्री॰ रा॰ नगर; २, न॰ तिचें पुष्प तें.

नांदेटा, पु॰ वा॰ पुष्पवृक्ष आहे; २, रा॰ एक सर्पभेद आहे.

नानकपंथी, ३लिं॰ हिंदूमध्यें भिकारी आहेत जे टिपऱ्यावर टिपरी मारून भीक मागतात त्यांचा पा॰ वेष फकीरा सारिखा असतो तो.

नाना, ३लिं॰ अनेक; प्रकार, विध, तऱ्हा, देश, इ॰ कांचें वि॰; उ॰ नानादेश, नानाप्रकार, नानातऱ्हा, इ॰; २, पुरुषाचें महत्व द्योतक नाम आहे मुख्य नामाचा पुढें लागतें, कदाचित् मुख्याचा प्रयोग होतो; उ॰ चिंतोपंत नाना, नाना आले.

नानू, स्त्री॰ न॰ कांहीं एक कार्याविषयीं नाहीं, नको, इ॰ संदेहरूप भाषण करण्याचा जो प्रकार तो तें.

नानेटा, पु॰ रा॰ नांदेटा द्वितीयार्थीं.

नानेटी, नानेठी, स्त्री॰ नानेटा.

नापत, स्त्री॰ देण्याघेण्याचे व्यवहारांत मुदतीस पैसा देण्यास न मिळाल्यामुळें त्यानबरोबर व्यवहार करण्याविषयीं जी अयोग्यता येते ती; २, ३लिं॰ दे॰ तद्विशिष्ट जो पुरुष तो.

नापसंत, ३लिं॰ पसंत नव्हे तो.

नापाक, ३लिं॰ नाकारा सर्जाव वृत्ति.

नापिकलें, न॰ को॰ पर्जन्य न्यूनता इ॰ कारणामुळें तो कोणेकवर्षी धान्योत्पत्ति भाव तें; उ॰ गुदस्ता नापिकलें झालें त्यामुळें बहुत लोक परगांवास आले.

नापित, पु॰ सं॰ वस्त्र्यानें, कात्रीनें, जो डोकी इ॰ कांचे केश काढितो तो एक जाति आहे.

नापीक, न॰ नापिकलें.

नाफरमानी, ३लिं॰ एक रंग आहे; तद्विशिष्ट तो

नाबळ, स्त्री॰ दे॰ गंडोरी.

नाबदसारखर, स्त्री॰ पिठी साखरेंत एक भेद आहे.

नाबर, ३लिं॰ अशक्त, निषेध असतांच प्र॰; उ॰ तो परकां धावाला नाबर नाहीं.

नाबूद, अ॰ पाहुं गेलें असतां दिसना असें जाणें, बुडणें, होणें, मरणें, इ॰ कांचें वि॰; उ॰ शेत, नाबूद बुडालें मेलें झालें मेलें; उ॰ गडी गेला तो कोणीकडे नाबूद झाला.

नाभ, स्त्री॰ अंकडांसकूड, फळ्या, इ॰ भराव्यासाठीं खणी येतात ती.

नाभा, पु॰ कस्तुरी मृगाचा अंडकोश तो.

नाभि, पु॰ स्त्री॰ जीवमात्राचें नाळ ज्या ठिकाणीं असतें तो पोटावरील छिद्राकार तो ती.

नाभिकमल, न॰ नाभीमध्य प्र॰.

**नाम**, न० स० तत्तद्व्यक्तिवाचक जो आनुपूर्वी विशेष तें; २, पु० गंध इ० कांचा जो उभा टिळा कपाळीं लावितात तो; ३, ला० घोडा, कुत्रा, इ० कांचा कपाळावर उभा पांढरा पट्टा असतो तो.

**नामकरण**, न० उत्पन्न झालेलें जें लेंकरूं त्यास नाव ठेवण्याचा संस्कार आहे तें.

**नामजाद**, ३ लिं० नामांकित.

**नामधारी**, ३ लिं० ज्याचें उत्तमलेंकरून नाम प्रसिद्ध तो, उ० आह्माजवळ दाहा नामधारी सर्दार आहेत; २, स्वतः कांहींएक कारभार इ० करीत नसतां ज्याचे नावावर कारभार इ० होतात तो; ३, एकानामाचे जे दोन ते परस्पर; ४, ज्यामध्यें वैद्यविद्यादिक नसतां तत्तद्विद्याप्रयुक्त नाम मात्र ज्याचें चालतें तो.

**नामना**, स्त्री० कीर्ति.

**नामनिर्देश**, पु० नामाचा जो उच्चार तो.

**नामर्द**, ३ लिं० نامرد हिं० अपराक्रमी मनुष्य तो.

**नामर्दी**, स्त्री० نامردی हिं० नामर्दपणा.

**नामांकित**, ३ लिं० ज्याचे चांगलेपणाची [illegible] ख्याति आहे तो.

**नामाभिधान**, न० नाम प्रथमार्थी.

**नामी**, ३ लिं० उत्कृष्ट चांगला तो.

**नामोश**, पु० ناموس हिं० कीर्ति.

**नाम्या**, ३ लिं० दे० ज्याचे कपाळावर पांढरा पट्टा असतो असा जो घोडा. कुत्रा. इ० तो.

**नायक**, ३ लिं० ज्याज्या समुदायामध्यें जोजो श्रेष्ठ, किं० मुख्य तो; २, स्वामी; ३, नाटकामध्यें ज्याचें मुख्यत्वेंकरून वर्णन केलें असतें तो; ४, शृंगारामध्यें ज्याचे आश्रयानें शृंगार वर्णितात तो.

**नायकवडी**, ३ लिं० फौजेंत, किं० किल्ल्यावर दाहा, वीस, मनुष्यावर जो अधिकारी असतो तो.

**नायकी**, स्त्री० यवनी सालामध्यें दाहा, शंभर, हजार, इ० संख्येनें फिरतो जो शब्द तो; २, नायकपणा.

**नायकीकानडा**, पु० कानडा ह्मणून गाण्यांत राग आहे त्याचा भेद तो.

**नायकीण**, स्त्री० कळवंतीण; २, आपले हाताखालीं दाहा पांच नायका घेऊन कारखाना इ० कांवर जाणारी जी बायको ती.

**[illegible]**, स्त्री० कोणीं कांहीं सांगिलें असतां नाहीं [illegible] जो [illegible] मध्यें स्वभावसिद्ध शब्द असतो तो.

**नार**, स्त्री० ग्रं० स्त्री; २, पु० वृक्षादिक बहुत जून झा[illegible] पोटीं जो काठिन्यांश होतो तो.

**[illegible]**, स्त्री० एक झाड आहे.

**[illegible]**, ३ लिं० रंग आहे; २, तद्विशिष्ट शालजोडी, स[illegible].

**[illegible]**, पु० [illegible] आहे; २, ला० कज्जा [illegible] मौज पाहाण्याचा स्वभाव ज्याचा [illegible].

**[illegible]**, [illegible] कांताचाची सांगड असते ती.

**नारळ**, स्त्री० [illegible] झाड; २, पु० नारळीचें फळ तो; त्याचे हातीं नारळ देणें ह्म० त्या कामावरून त्यास काढणें.

**नारळपाक**, पु० साखरेचा पाकांत खोबऱ्याचा कीस घालून बरफी सारख्या वड्या करितात तो.

**नारळाची आई**, स्त्री० करवंटी; हातीं नारळाची आई येणें, म्ह० भिकारी होणें.

**नारळी**, स्त्री० नारळ म्हणून जो वृक्ष ती.

**नारळीपदर**, पु० वस्त्राचे पदरांस जर घालण्याचा प्रकार आहे ज्याजवर नारळीचा आकार दिसतो तो.

**नारळीपदरी**, ३ लिं० नारळीपदर आहे ज्यास तो वस्त्र इत्यादिकांत; २, जेथें वस्त्र सन्मानार्थ वास्तवीक द्यावयाचें त्यास्थळीं नारळ दिला असतां त्या नारळास नारळीपदरी पोषाख म्ह०.

**नारा**, पु० रा० नाडी.

**नारायण**, पु० देव आहे; २, सन्याशास नमस्कार केला असतां आशिर्वादार्थ हा शब्द उच्चारितात.

**नारिंग**, स्त्री० नारंगी; २, न० तिचें जें फळ तें.

**नारिंगी**, स्त्री० नारंगी.

**नारिंगीतवशी**, स्त्री० गा० कांकड्यांचे वेलांत एक भेद आहे.

**नारिंगेंतवसें**, न० नारिंगी तवशीचें जें फल तें.

**नारी**, स्त्री० स्त्री.

**नारीकेल**, पु० नारळी; २, न० नारळ.

**नारींव**, ३ लिं० नार द्वितीयार्थ आहे ज्या मध्यें तो: जांकडाचें वि०.

**नारू**, पु० सुताचे दोऱ्या सारखा एक रोग आहे.

**नारोपंत**, ३ लिं० संकेतानें नारूस म्ह०.

**नाल**, पु० घोड्याचे पायांस अर्धचंद्राकार लोखंडाचा बसवितात तो; २, न० सं० कमलाचा देंठ; ३, जरायुज प्राणी जन्मला असतां त्याचे नाभींत जो तंतु असतो तें.

**नालकी**, स्त्री० पालखी सारिखें वहन साधन आहे.

ल

**नालछेद**, पु० जन्मलेल्या प्राण्याचा नाभिनालाचा जो छेद तो.

**नालडवा**, पु० चढ़ नालांचा जो जोड तो.

**नालबंद**, ३ लिं० घोडे इ० कांचा पायांस नाल बसवितो तो.

**नालबंदी**, स्त्री० घोडे इ० कांचा पायांस नाल बसविण्याचा व्यापार ती; २, ला० तंग, तोबरा, नाल, इ० नवा करून स्वारीस निघण्याविषयीं जी सिद्धता ती; ३, शागिर्दपेशा माणसांचे रोज मुऱ्यांतून दरमहिन्यास कांहीं बाकी राखून ठेवितात आणि ती एकंदर अखेर सालीं देतात ती.

**नाला**, पु० शहर इ० कांतील वाईट पाणी बाहेर काढावयासाठीं जो नळ बांधितात तो.

**नालिश, नालिस्त**, स्त्री० ज्यापासून ज्याचें पारिपत्य व्हावयाजोगें त्यापाशीं कथनार्थ उद्दिष्ट जें तदीय दुष्कर्मादि तें.

**नाव**, स्त्री० नद्यादि उतरून पार होण्यासाठीं तर ठेवितात ती; २, सुताडा इ० जाड वस्त्रें एकत्र शिवून बैठक करितात ती; ३, नाम प्रथमार्थीं; लढाई, सभा इ० कांत नाव मिळविणें, म्ह० कीर्ति मिळविणें; कोणेकाचें करणें पदार्थ इ० कांस नाव ठेवणें, म्ह० खोड ठेवणें, नाव बुडविणें, नावावर पाणी घालणें इ० स्थळीं दुष्कर्माद्याचरणानें स्वकुलादिकांस बट्टा लावणें, कोणकानें कोणकाच्या नावानें, किं० नावावर विकणें. म्ह० प्रसिद्ध नाव ज्याचें असा जो मनुष्यादिक त्याचे नावानें आपण प्रसिद्ध होणें, किं० खपणें; पैसा, विद्या, इ० कांचें नाव नाहीं इ० स्थळीं त्या त्या पदार्थाचा अत्यंताभाव असा अर्थ; त्याचें त्याला नाव नको

म्ह०

स० तो पदार्थ त्याला अगदी नको, त्याचें नाव ग्रहण मला ठाऊक नाहीं, स० तत्संबंधी मला कांहीं ठाऊक नाहीं; कोणेकाचें नाव निशाण ठाऊक असणें स० कुलशील परंपरा ठाऊक असणें, स० नाव सोनूबाई आणि हातीं कथलाचा वाळा.

**नावकरी**, ३ लिं० नावधारी प्रथम तृतीयार्थी.

**नावड**, स्त्री० अप्रीति.

**नावडता**, ३ लिं० ज्यावर अप्रीति असा जो पदार्थ तो.

**नावडा**, ३ लिं० नावडता.

**नावनट**, अ० थांग नाहीं असें हो. कर. इ० कांचें वि०; उ० त्याची गाय गुराख्यानें नावनट केली.

**नावनिशी**, स्त्री० अनेक नावें ज्या कागदावर लिहिलीं आहेत तो कागद, किं० तीं नावें तीं; उ० माझी नावनिशी काढ.

**नावनिशीवार**, अ० प्रतिनामोद्देशें करून देणें, घेणें, मागणें, इ० कांचें वि०.

**नावरस**, स्त्री० जन्मकालीन नक्षत्रावरून नाव ठेविजात ती; २, तद्विषयीं जो निर्णय ती; ३, जन्मनक्षत्रांवरुन वधुवरांचें राशियटित पाहातात ती; नावरशास येणें, स० वधुवरांचा घटित विचार केला असतां अनुकूलता येणें.

**नावरूप**, न० कीर्ति; उ० त्याणें त्या लढाईमध्यें मोठें नावरूप मिळविलें; २, कांहीं एक वस्तूंचा यथायोग्य स्थानीं विनीयोग झाल्यामुळें जें सार्थक्य तें; उ० विद्वानास पुस्तक दिलें असतां त्याचें नावरूप होतें; नावारूपास येणें, स० नामांकित जे त्यांच्या मध्यें गणनीय होता पावणें.

**नावलौकिक**, पु० गुणादिकें करून नावाची जी प्रसिद्धि तो.

**नावसकी**, स्त्री० वा० कीर्ति.

**नावसता**, ३ लिं० वा० नावसकी ज्याची प्रसिद्ध तो.

**नावाचा**, ३ लिं० पांडित्यादि तादृश गुण नसतां नाममात्र पंडित इ० असतें ज्याचें तो; उ० तो नावाचा गवई आहे.

**नावाजणी**, स्त्री० कोणेकाची, किं० त्याच्या गुणाची जी प्रशंसा ती.

**नावाजणूक**, स्त्री० नावाजणी.

**नावाजणें**, नावाजणीनें अभिसंबद्ध करणें.

**नावाडी**, ३ लिं० नौका तारून नेतो तो.

**नावाड्या**, ३ लिं० नावाडी.

**नावालौकिकाचा**, ३ लिं० नावलौकिक ज्याचा आहे तो.

**नाविक**, ३ लिं० सं० नावाडी.

**नाश**, पु० सं० कांहीं एक विकृतीमुळें कोणेक पदार्थ, किं० व्यापार इ० कांचें मूलस्वरूप बिघडायाजोगी केली, किं० झाली जी दुर्दशा तो; उ० या पोरानें पोथीवर शाई पाडून नाश करून टाकला; २, कांहीं एक व्यवहारामध्यें जी द्रव्यादिकांची हानि, किं० द्रव्यादि हानिमूलक जी तत्त्वामीची हानि तो; ३, ध्वंस; उ० प्रलयीं सर्व जगाचा नाश होतो.

**नाशक**, ३ लिं० नाश करितो तो, किं० नाश करण्याचा स्वभाव ज्याचा तो; याचे समास पित्तनाशक, वायुनाशक, इ०.

**नाशकत**, ३ लिं० वा० अशक्त.

**नाशा**, ३ लिं० नाश करण्याचा स्वभाव ज्याचा त्यास निंदेनें स०.

**नाशिक**, न॰ एक क्षेत्र आहे; त्याचा नाशिक परगणा ओसाड असणें स॰ कोणेकाचें नाक बसकें, किं॰ अपरें असणें.

**नास**, पु॰ नाश.

**नासका**, ३ लिं॰ नासलेला जो पदार्थ तो.

**नासकेंकेणें**, न॰ लौकर नाश पावावयाजोगें जें केळें आंबइ॰ तें.

**नासणें**, उ॰ नाश प्रथमार्थ विशिष्ट करणें, किं॰ होणें स॰ नासलीं मिरें ह्मणून जों धळ्याबराबर विकत नाहींत.

**नासधूस**, स्त्री॰ पु॰ अनेक प्रकारानें जो नाश ती तो.

**नासरा**, ३ लिं॰ नाश.

**नासरी**, स्त्री॰ दमडीचा अर्धभाग ती.

**नासाड**, स्त्री॰ नासधूस.

**नासाडा**, पु॰ नासाड.

**नासाडी**, स्त्री॰ नासाड.

**नासावणें**, पूर्ण गर्भ न होतां प्रसूत होणें.

**नासिक**, न॰ नाक मुख्यार्थी.

**नासिका**, स्त्री॰ सं॰ नाक अवयव आहे.

**नासिकाचूर्ण**, न॰ संकेतानें तपकिरीस स॰.

**नासूर**, पु॰ नाक, नेत्र, यांस रोग होतो तो.

**नास्ति**, अ॰ नाहीं.

**नास्तिक**, ३ लिं॰ परलोक ह्मणून पदार्थ आहे असें मानित नाहीं तो.

**नास्तिपक्ष**, पु॰ दारिद्र्य मूलक जो द्रव्यादिकांचा अभाव तो; २, दे॰ नाश.

**नाहक**, **नाहाक**, अ॰ विचार न करितां, किं॰ प्रयोजना वांचून; उ॰ नाहाक मारिलें.

**नाहाण**, न॰ अभ्यंग पूर्वक जें स्नान तें; २, स्त्रीस जें प्रथम रजोदर्शन तें.

**नाहाणघर**, न॰ स्नान करायासाठीं जें स्थल करून ठेवितात तें.

**नाहाणवळी**, स्त्री॰ नाहाणूळी.

**नाहाणी**, स्त्री॰ गृहादिकांतील पाणी इ॰ बाहेर जावयासाठीं दगड, काष्ट, इ॰कांची, किं॰ चुना, दगड, इ॰कांची शालुंखेचा आकाराची बांधून करितात ती.

**नाहाणुळी**, स्त्री॰ प्रथमतः रजोदर्शन जीस झालें आहे ती.

**नाहाणें**, प्रायः अभ्यंग पूर्वक स्नान करणें; ही स्त्री नाहूं लागली स॰ विटाळशी होऊं लागली.

**नाहानीधुती**, ३ लिं॰ जिला नाहाण येऊन मोठ दशा पावली ती.

**नाहावगंड**, पु॰ निंदेनें नापितास स॰.

**नाहावी**, ३ लिं॰ नापित.

**नाहीं**, अ॰ अभाव बोधक.

**नाहींत**, अ॰ बहुवचनांताचा अभाव बोधक.

**नाहू**, ३ लिं॰ नाहावी; स॰ पक्ष्यांत काऊ आणि माणसांत नाहू, याचा प्र॰ ह्मणींतच आढळतो.

**नाळ**, न॰ नाल द्वितीय तृतीयार्थी; २, स्त्री॰ गळबनाचा अग्रभाग ती; ३, नाफ; ४, घोडे इ॰कांचा पाठीच संबंधानें क्षत पडतें तें.

**नाळकें**, न॰ धातुमय पात्रादिकांस मोठें छिद्र पडतें तें.

**नाळगूट**, न॰ नळगूट.

**नाळीक**, ३ लिं॰ जुनी, फुटकी, तुटकी, जीं भांडीं तो.

,उ॰ याचा संस्कृत पदार्थी योग झाला असतां प्रा॰ अतिशयें करून असा अर्थ होतो; उ॰ निमग्न, निमज्जन इ॰ प्राकृत शब्दामागें लागला असतां रहित इ॰ अर्थ होतो: उ॰ निकोप, निकामी इ॰:२. आणि; उ॰ तोनी तो बाजारांत गेले·

**निकट**, अ॰ जवळ अव्ययार्थी·

**निकटणें**, दे॰ कोणेक गृह, अधिकार, पद, इ॰ कांपासून निघून त्याणें तत्संबंध रहित होणें जाच्या लोकांस त्रास आला तद्विषयींच प्र॰·

**निकटवास**, ३ लिं॰ कोणेकाचे जवळ जी स्थिति तो·

**निकटवासी**, ३ लिं॰ जवळ राहातो तो·

**निकड**, स्त्री॰ कांहीं एक कार्य त्वरेनें न केलें असतां उपद्रव होईल म्हणून तद्विषयीं त्वरेनें प्रवृत्त व्हावें अशी जी अडचण प्राप्त होती ती; उ॰ सावकारानें पैक्याविषयीं निकड लाविली आहे·

**निकंड**, ३ लिं॰ रा॰ मध्यें खांद्या फुटल्यावांचून उंच जो झाड आंबा, फणस इ॰ तो·

**निकता**, अ॰ विवक्षित, समीप, भूतकाळीं; उ॰ तो निकता आला आहे. त्यास निकतें गतवर्षी वेड लागलें·

**निकर**, पु॰ कांहींएक कार्य करण्याविषयीं सोईचा मार्ग सोडून क्रोधावेशपूर्वक जी प्रवृत्ति तो·

**निकल्हा, निकल्ही**, ३ लिं॰ कल्हें नाहीं ज्यास असें भांडें इ॰ तो·

**निकशी**, ३ लिं॰ कां॰ क्रोधावेशानें अवलंबिली जी कांहींएक गोष्ट ती एकाएकी सोडीत नाहीं असा स्वभाव ज्याचा तो मनुष्य, किं॰ त्याचा स्वभाव इ॰ तो·

**निका**, ३ लिं॰ नक्की प्रथमार्थी; २, खरापंचमार्थी; ३, यवन लोकांत जो गांधर्व विवाह करितात तो·

**निकाढा**, पु॰ एकवार काढा केलेले औषधांचा जो दुसऱ्यानें काढा करितात तो; उ॰ सकाळीं काढा घ्यावा आणि संध्याकाळीं निकाढा घ्यावा·

**निकामी**, ३ लिं॰ विवक्षित कार्याचा उपयोगी नव्हे तो; २, वा॰ विवक्षित व्यापार रहित तो·

**निकाल**, पु॰ उलगडा; २, मोरी इ॰ कांचें पाणी बाहेर जायाची जी उतरती जागा ते·

**निकाळजी**, ३ लिं॰ काळजी नाहीं ज्यास तो·

**निकुटणें**, कों॰ धान्यादि कडंगणें·

**निकुरणें**, भांड्यास चिकटलेला पदार्थ नख इ॰ कांनें खरवडून काढणें·

**निकृष्ट**, ३ लिं॰ विवक्षित उत्तम गुणादिकें करून ज्याचें परिगणन उत्तमांत. किं॰ मध्यमांत होत नाहीं असा जो निर्गुणादि पदार्थ तो·

**निकृष्टपक्ष**, पु॰ कनिष्टपक्ष·

**निकोचा**, पु॰ लोखंडाचे खिळ्यांत एक तऱ्हा आहे·

**निकोप**, ३ लिं॰ स्त्रीलिंगार्थक जी कोपती नाहीं ज्यास तो काष्ठादि पदार्थ तो; २, रागादि दोषरहित जो मनुष्यादि, किं॰ त्याचें शरीर, गळा, इ॰ तो·

**निखडणें**, खडणें; २, पांचचार अवयव एकत्र जडून तयार झाला जो पदार्थ त्याचे अवयव मोकळे करणें; उ॰ कोंकणामध्यें आगोठीचे दिवसांत गाडीं निखडून ठेवितात·

**निखरड**, ३ लिं॰ रा॰ जा जमीनीवर शेत चांगलें होत नाहीं अशी जी जमीन तो·

निखळ

**निरवळ**, ३ लिं० जा पदार्थांत दुसऱ्या पदार्थाची भेळ नाहीं तो पदार्थ; उ० हें निरवळ तिळाचें तेल आहे; २, केवळ; उ० याला निरवळ वेड लागलें.

**निरवळणें**, उ० पडून जडून राहिलेला पदार्थ हालविणें, इ० कारणानीं मोकळा करणें; २, ला० कांहीं एका अधिकारावर, किं० एखाद्या स्थळीं दृढ राहिला जो मनुष्यादिक तो तेथून काढणें.

**निरवाडा, निरवाड्या**, ३ लिं० ज्यास मोठेपणीं दाढी मिशी येत नाहीं तो.

**निरवाद**, पु० सप्त स्वरांतील सातवा स्वर तो.

**निरवार**, ३ लिं० पराकाष्ठेचा, ओहोट ओहोटी यांचें वि०; उ० आज निरवार ओहोट होता म्हणून खाडीसपाय उतार झाला.

**निरवारणें**, दे० **निरवरणें**, आकाश निरभ्र होणें.

**निरवाररंगी**, ३ लिं० निरवाऱ्याचा रंगासारिखा आहे रंग ज्यास तो; उ० हें लुगडें निरवाररंगी आहे.

**निरवारा**, पु० निर्धूम अंगार; २, ला० दे० क्षुधा न गणितां न खातां राहाण्याचा जो प्रकार तो; उ० आज तिसरा प्रहर पर्यंत निरवारा दिला नंतर जेवलों; पराबर निरवारा ठेवणें म्ह० त्याची दुष्कर्में बाहेर काढून उभरवना करणें; म्ह० आपल्या पोळीवर निरवार कोण न ओढी.

**निरवालस**, ३ लिं० विवक्षित तत्संबंधरहित; उ० आमची जागा निरवालस आहे; २, निश्चित; उ० मीं आज निरवालस येतों; ३, निरवळ; ४, पृथक्; ५, भीड भाड न धरितां, किं० लाभलोभ न धरितां खरें बोलणें, खरा कारभार इ० करण्याचा स्वभाव ज्याचा तो, व त्याचें जें भाषणादिक तो.

**निरिवल**, ३ लिं० सं० सर्व.

**निरवेड**, ३ लिं० ग० ज्या मध्यें खेड लाक्षणिक, किं० मुख्य नाहीं असा जो पदार्थ तो.

**निरखोड**, ३ लिं० ज्या मध्यें, किं० ज्यास खोड नाहीं तो; उ० हें भात निरखोड पटणीचें आहे त्याचें बोलणें निरखोड आहे.

**निरखोडी**, ३ लिं० निरखोड.

**निगता**, ३ लिं० निकता.

**निगम**, पु० देव.

**निगरगट्टा**, ३ लिं० कोडगा.

**निगर्व**, ३ लिं० गर्व ज्यास नाहीं तो.

**निगर्वी**, ३ लिं० निगर्व.

**निगळ**, ३ लिं० ग० पर्जन्याचें उदक ज्यांत गळत नाहीं असें जें गृहादिक तो; २, न० जिच्या प्रसादानें घर निगळ होत असतें अशी एक देवता आहे तें; उ० आज घर शिवणी झाली आहे निगळास नैवद्य घाला.

**निगळता**, ३ लिं० निगळ शब्द भावार्थी.

**निगा**, स्त्री० पदार्थ सुरक्षित राहावा, किं० वृद्धिंगत व्हावा म्हणून त्या त्या कालीं लक्ष्य पूर्वक त्यास जो जो पदार्थ पाहिजे तो द्यावा, इत्यादिकें उपयोगाचा जो प्रकार तो; उ० या शेताची निगा केली असतां बहुत पिकेल.

**निगाळ**, पु० ग० नपकिरीचा तंबाखू दोन वेळ घोटून गाळून राहातो जो गोळा तो.

**निगुता**, ३ लिं० ग० निकता.

**निगूड**, स्त्री० एक औषधी झाड आहे.

**निगोड**, ३ लिं० जितकें ज्या पदार्थांत गोड पडावें नितकें

तकें जांत नाहीं तो; उ॰ आज पोळ्या निगोड झाल्या आहेत.

**निग्रह**, पु॰ लोकशास्त्रसिद्ध जी मर्यादा तद्रहित जे मनुष्यादिक त्यांस त्या मर्यादेंत आणण्यासाठीं जो दंडादि शिक्षाप्रकार तो; उ॰ राजानें दुष्टाचा निग्रह आणि साधूंचें रक्षण करावें; २, तत्तद्विषयांपासून इंद्रियादिकांचें जें आकर्षण तो; उ॰ साधूंनें इंद्रियनिग्रह करावा; ३, कांहींएक कार्य केल्यावांचून राहायाचें नाहीं असा जो निश्चयपूर्वक आग्रह तो; उ॰ निग्रह केल्यानें थकलेल्या कुळांपासून पैसा उगवणार नाहीं सोईसोईनें घ्या म्ह॰ उगवेल; समास इंद्रियनिग्रह इ॰ जाणावे.

**निग्रहानुग्रहसमर्थ**, ३ लिं॰ एकाद्यावर निग्रहाविषयीं, किं॰ अनुग्रहाविषयीं जो समर्थ तो; उ॰ राजा निग्रहानुग्रहसमर्थ आहे.

**निग्रही**, ३ लिं॰ निग्रह तृतीयार्थ आहे ज्यास तो.

**निघणें**, ज्या ज्या संबंधानें ज्या ज्या पदार्थीं संबद्ध जो पदार्थादि त्याणें त्याणें तत्तत्संबंध सुटायाजोगें त्या त्या पदार्थापासून वियुक्त होणें; उ॰ तो घरांतून निघाला, त्याची चाकरी निघाली; २, कांहींएक पदार्थांत तत्तद्रूपेंकरून अदृश्य जो पदार्थ तो त्याच्या रूपानें प्रकट होणें; उ॰ दाहा रुपयांत एक रुपया तांब्याचा निघाला, या दगडांतून हिरा निघाला; ३, तत्तद्व्यापारांत कुशल होणें, किं॰ तत्तद्गुणेंकरून प्रसिद्ध होणें; उ॰ चौघे बंधू होते त्यांत एक कारकून निघाला, एक गाणार निघाला; आज दिवाळें निघणार, सोडत निघणार इ॰ स्थलीं तो तो व्यापार होणार; पाठ निघणें यथें शत्रूपासून आपले संरक्षणाविषयीं पराक्रमी जो त्याचा आश्रय करणें; या लेखणीनें अक्षर निघतें, या कागदावर अक्षर निघतें, म्ह॰ उत्पन्न होतें; त्याणें निघतें घेतलें म्ह॰ काढतें घेतलें; तुमची गोष्ट निघाली होती इ॰ प्रयोग वक्त्याच्या हृदयांत सर्वदा ती गोष्ट असती अशा अभिप्रायानें जाणावे; चालता जो पदार्थ त्याविषयीं निघणें हा प्रयोग होतो तेथें अतित्वरेनें चालूं लागतो; उ॰ हा घोडा हळू चालत होता चाबूक उगारतांच निघाला तो दाहा कोश पांच घटकेंत गेला; पूर्वपक्षादि निघणें म्ह॰ कांहींएक व्यवहार करणें जे त्यांचें त्या व्यवहारप्रसंगीं पूर्वपक्ष इ॰ कांनीं तादृश व्यवहारविषय होणें.

**निघा**, स्त्री॰ निगा.

**निघावा**, पु॰ ग्रामांतरादिकाप्रत जावयासाठीं निघण्याचा, किं॰ तद्विषयींचे सामग्री सिद्धतेचा जो व्यापार तो.

**निचकणें**, लत्तादि प्रहारानें मनुष्यादिकांचा अवयव तत्काल वांके असें करणें.

**निचरणें**, गळूं इ॰ कांतील, किं॰ पोटांतील मळांश, किं॰ पदार्थांतील जलांश पातळ होऊन झरून बाहेर पडणें; उ॰ गळवांतील पाणी निचरूं दे. लोण्यांतील पाणी निचरूं दे. गळूं निचरतें. लोणी निचरतें, इ॰ स्थलीं लक्षणेनें तत्तदंतर्वर्ति जल, किं॰ जलांश निचरतो.

**निचरा**, पु॰ निचरण्याचा जो व्यापार तो; उ॰ गळवाचा चांगला निचरा झाला म्हणजे बरें होईल.

**निचव**, ३ लिं॰ चवदार नव्हे जो पदार्थ तो.

**निचळ**, अ॰ विवक्षित चलनवलनादि व्यापार न करितां

नां, बस, राहा, इ॰ कांचें वि॰; उ॰ कांहीं बोलूं नको उगीच निचळ बैस·

**निचाड**, ३ लिं॰ कांहींएक गुण, किं॰ गुण विशिष्ट पदार्थ इ॰ कांची ज्यास चाहाड नाहीं तो; उ॰ निचाहाड मनुष्याजवळ गुण दाखवून फळ काय·

**निचाडा**, ३ लिं॰ दे॰ निर्लज्ज·

**निचिंत**, ३ लिं॰ निश्चिंत·

**निचूळ**, पु॰ फणस·

**निचेत**, ३ लिं॰ निचेतन·

**निचेतन**, ३ लिं॰ निद्रा, मूर्च्छा, इ॰कें करून ज्याचें देहभान गेलें आहे तो·

**निचेष्ट**, ३ लिं॰ निचेतन·

**निचेष्टित**, ३ लिं॰ निचेतन·

**निज**, ३ लिं॰ सं॰ स्वकीय·

**निजगुज**, न॰ आपला जो परम इष्ट त्या पात्रींच सांगावयाजोगा जो अंतःकरणांतील भाव तें·

**निजणें**, निद्रेनें युक्त होणें; २, ला॰ अंथरूण इ॰ कांवर आडवें पडणें; ३, स्त्रीपुरुषानीं परस्परांचा संग करणें; ४, आघातादि कारणामुळें अकस्मात् कोणेकानें मरणें; उ॰ तो रात्रीस जेवून निजला तो निजला; ५, ऋण, सावकारी, इ॰ कांनीं बुडणें; उ॰ त्यास हजार रुपये कर्जी दिले होते ते ठार निजले म्हणून त्याची सावकारी ठार निजली; निजून काम साधणें म्ह॰ पडून असा अर्थ·

**निजसुरा**, ३ लिं॰ ज्याचे डोळ्यांतील झोंप पुरती गेली नाहीं तो·

**निजाळू**, ३ लिं॰ बहुत निद्रा घेण्याचा स्वभाव ज्याचा तो·

निजो



**निजोखमी**, ३ लिं॰ ज्या वाणिज्यादि व्यवहारामध्यें एकाएकीं हानि होईल ही संभावना नाहीं तो; उ॰ गाहाणावर रुपये द्यावे हा निजोखमी व्यवहार·

**निजोर**, ३ लिं॰ अशक्त; २, ज्याला कोणाचा जोर नाहीं तो; उ॰ तो प्यादा निजोर पडला म्हणून मेला·

**निजोरी**, ३ लिं॰ निजोर·

**निझर**, पु॰ उदकादिक सरून जो स्वल्प प्रवाह तो·

**निझरणें**, सद्रव पदार्थ झरणें·

**निझरवणी**, न॰ निझऱ्याचा जो जलांश तें·

**निझाडा**, पु॰ कांहींएक पदार्थ सरून जी निःशेषता तो; २, दे॰ स्पष्ट नाहीं म्हणण्याचा जो प्रकार तो; प्रा॰ दे; धातूचाच योगीं प्र॰; उ॰ मी मागितलें परंतु त्याणें निझाडा दिला·

**निझाडून**, अ॰ कोणाची भीड, किं॰ लाभलोभ न धरितां बोलणें, सांगणें, इ॰ कांचें वि॰

**निटस**, ३ लिं॰ जसा असावा तसा नीट नटका जो पदार्थ तो·

**निटाई**, स्त्री॰ नीटपणा·

**निटावणी**, स्त्री॰ निटावणें प्रथम अर्थाचा जो व्यापार तो·

**निटावणें**, पूर्वी यथाकथंचित सिद्ध जो पदार्थ तो जसा पाहिजे तसा नीट करणें; २, अक्षर, मनुष्य, इ॰ अत्यभ्यासामुळें विवक्षितानुरूप चांगली होणें; ३, कांहींएक कार्याविषयीं दुसऱ्याची अपेक्षा न धरितां पुढें सरणें; उ॰ शंभर शिपायांतून एक पुढें निटावला·

**निटाळा**, पु॰ ग्रा॰ अनिवारित उन्हाळा होतो ज्यामध्यें असा जो ग्रीष्मकाल तो·

निठ

**निठवें**, न० केली अदशेर.

**निडॉकी**, ३ लिं० जास डांक लागला नाहीं असा जो सोनें इ० कांचा दागिना तो.

**निडोळ**, ३ लिं० जा डाळींत डोळ नाहीं ती डाळ.

**निढळ, निढाळ**, न० कपाळासच प्रसंग विशेषीं स०; निढळच्या घामाचापैसा इ० स्थलीं स्वकष्टार्जितत्यायतः मिळविला जो पैसा इ० तो.

**निन**, अ० प्रतिदिवशीं.

**नितळ**, ३ लिं० पोंटून घांसून साफ गुळगुळीत केला जो पदार्थ तो; २, जामध्यें मलांश नाहीं असें जें तेल जल इ० तो.

**नितांतणें, नितांदणें**, कांहीं एक कर्माविषयीं, किं० पदार्थाविषयीं अत्युत्सुक होणें; स० नितांतल्या बायकोला बुरांडला दादव्या.

**निताव**, ३ लिं० ताव जास दिला नाहीं असें जें सुवर्णादिक तो.

**नित्य**, ३ लिं० अविनाशी; उ० परमाणु नित्य आहे; २, अ० प्रतिदिवशीं; उ० हा माझे घरीं नित्य येतो; ३, सर्वदा; उ० हा शब्द नित्य पुलिंग आहे.

**नित्यउटून**, अ० नित्य द्वितीयार्थी; नित्याखालीं पडणें, एथें संवई खालीं पडणें.

**नित्यकर्म**, न० नित्यकरावयाचें जें स्नान संध्यादिकर्म तें.

**नित्यनवा**, ३ लिं० नित्यशः करावयाचीं जीं कर्में तीं प्रथमदिवशीं सांगितलीं असतां जाचे ध्यानांत राहात नाहीं म्हणून प्रतिदिवशीं पुनःपुनः जास सांगावें लागतें असा जो मनुष्य तो.

**नित्यनियम, नित्यनेम**, पु० शास्त्रांमध्यें अमुक कर्म नित्य करावें असें सांगितलें नाहीं परंतु तें नित्य केलें असतां पुण्य विशेष सांगितलें अशीं जीं गीतापाठादिक नित्य करितात तो; २, कांहींएक गोष्ट नित्य करण्याविषयीं घेतला जो नियम तो; उ० याचा त्रिव्या देण्याविषयीं नित्यनियम आहे.

**नित्यपाठ**, पु० नित्यनियम; नित्यपाठांत पडणें स० नित्याखालीं पडणें.

**नित्यपाठांतला**, ३ लिं० नित्याखालीं पडलेला जो व्यापार मनुष्यादि तो.

**नित्यशः**, अ० नित्य द्वितीय तृतीयार्थी.

**नित्यांत**, अ० प्रतिदिवशीं.

**नित्यानें**, अ० प्रतिदिवशीं.

**नित्यावळ**, स्त्री० एखाद्यास धर्मार्थ भोजनास नित्य ये असें एकदांच आमंत्रण देऊन भोजन देण्याचा प्रकार ती.

**नित्यें**, अ० नित्य प्रथम द्वितीयार्थी.

**निथणणें**, ग्रा० श्रमल्यामुळें बेंबीपासून ओर करून दांत खात बोलणें.

**निथम**, स्त्री० ग्रा० पोटांत आमांश झाला असतां शौचाचे समयीं इंद्रिय ताणलें जाई अशी जी अवस्था ती.

**निथळ**, पु० ग्रा० पात्रादिकांत निथळून पडला जो जलांश तो.

**निथळणें**, उ० जलादिकानें भिजलेला जो पदार्थ त्याचा सर्वांगास व्यापून राहिला जो जलांश तो एकत्र होऊन थेंबथेंब गळून निःशेष होई असें करणें.

**निथळा**, पु० निथळ.

**निंदक**, ३ लिं० निंदा करण्याचा स्वभाव ज्याचा तो; उ० निंदकाचें घर असावें शेजारीं.

**निंदखोर**, ३ लिं० निंदक.

**निदण**, न० पेरलेल्या शेतांत उनाड उगवलें जें तृणादिक तें; उ० या राबांतील निदण काढ.

**निदणी**, स्त्री० शेतांतील निदण काढण्याचा जो व्यापार ती.

**निदणें**, शेत, इ० कांची निदणी करणें.

**निंदणें**, कोणेएक पदार्थास दोषवैशिष्ट्यें करून वर्णिणें.

**निदर्शनास**, अ० अनुभवास प्रा० य, धा० वि०; उ० तुह्मीं बोलत होतां तें निदर्शनास आलें.

**निदर्शनी**, अ० परिणामी; समज, कळ, धा० वि०; उ० तुह्मीं करितां जी गोष्ट इचें फळ निदर्शनी समजेल.

**निंदा**, स्त्री० कोणेकाचें दोषयुक्तत्वें करून जें वर्णन ती; उ० तो गृहस्थ चांगला असून त्याची कां निंदा करितां.

**निंदाखोर**, ३ लिं० निंदक.

**निदाँती**, ३ लिं० ज्यास दांत नाहींत असा जो तुंबजोड, फणी, इ० तो.

**निदान**, न० रोगादिकाचें जें बीजभूत कारण तें; २, निरुपायरूप जी अवस्था तें; उ० साईरधाईरे संपन्नीचे लोक निदानीचा एक पांडुरंग; ३, कांहींएक संख्या परिमाण इ० कांचा उत्कृष्ट निकृष्टतेचा जो परमावधि तें; उ० या धोतरजोड्यास दाहा रुपये पडतील हें निदान सांगितलें आहे पाहिजे तर घ्या, स० याहून पराकाष्ठा राहिली नाहीं असें तात्पर्य असतांच प्र०; ४, अ० निकृष्ट पक्ष अवलंबून लक्षून; उ० या कार्यास निदान दाहा रुपये पाहिजेत.

**निदानचा**, ३ लिं० पराकाष्ठेचा संकटदशेंत उपयोगी पडतो तो.

**निदावा**, पु० स्वामित्वादि संबंध राहित्य तो; उ० त्याचा निदावा करून ही जमीन त्याणें घेतली.

**निदावापत्र, निदावेपत्र**, न० निदावा लिहिला आहे ज्या पत्रांत तें.

**निंदित**, ३ लिं० शास्त्रादिकामध्यें ज्याची निंदा केली आहे तो.

**निदुधी**, ३ लिं० जीस स्वल्प दुग्ध आहे अशी जी गाय, म्हैस, इ० ती.

**निदेश**, पु० सं० आज्ञा.

**निंद्य**, ३ लिं० निंदा करायास योग्य असें जें वस्तु पुरुष, गोष्ट, इ० तो.

**निद्रा**, स्त्री० झोंप.

**निद्रालू**, ३ लिं० झोंपाळू.

**निद्रित**, ३ लिं० निद्रावस्थापन्न जो तो.

**निधड**, ३ लिं० कोणेक कार्या विषयीं मागें न सरतां निःशंकपणें प्रवृत्त व्हावया जोगें ज्यामध्यें सामर्थ्य आहे तो त्या विषयीं.

**निधडा**, पु० आपल्या अंतःकरणांतील, कि० परिच यादिकें करून अन्याचे अंतःकरणांतील कित्येक धर्माविषयीं जी खात्री तो; सांग, दे, इ० कांचा योगीं प्र०; २, धैर्यवान; उ० निधडा वीर पडला रणीं.

**निधन**, न० सं० मरण.

**निधा**, पु० ढं० भोंवरा फिरते समयीं एकाच ठिकाणीं चळत न पावतां फिरण्याची जी स्थिति तो.

**निधाई, निधाया**, स्त्री॰ पाड. लाग. इ॰ कांचा योगीं प्र॰ अर्थ, कांहीं एक व्यापारानें मोठी कीर्ति, बहुतद्रव्य, इ॰ मिळविणें परंतु कोणेकापासून तत्तद्व्यापारानीं तें तें घडायाचें नसतां, किं॰ घडलें नसतां निंदेनें प्र॰ उ॰ पागोटें बांधायाचे विद्येनें मोठी निधाई पाडाल बारावर्षें रोजगागार करून पन्नास रुपये घेऊन आले मोठी निधाई लाविली.

**निधान**, न॰ जा ठेवण्याचा स्वामी प्रसिद्ध नाहीं असें जें जमीन इ॰ स्थलीं ठेवणें सांपडतें तें; विद्येचें निधान, गुणाचें निधान, इ॰ स्थलीं त्या त्या विद्येचें पात्र असा अर्थ; ला॰ विवक्षित गुणवान् जो त्याचा स्तव कर्तव्य असतां केवळ निधान शब्दानेंच व्यवहार करितात; उ॰ आमचा बैल केवळ निधान आहे, गुण, विद्या, इ॰ शब्द मागें लागले असतां समास होतात; गुणनिधान विद्यानिधान, इ॰; म्ह॰ धान्य तेथें पुशी, निधान तेथें विंशी.

**निधारती**, स्त्री॰ वा॰ निधाई; हा शब्द नित्य बहुवचनांत; २, ३ लिं॰ निधारती पाडल्या जाणें तो; उ॰ तूं निधारती झालास.

**निधाव**, पु॰ निधाई.

**निधि**, पु॰ निधान प्रथमार्थीं; २, खर्व, पद्म, महापद्म, शंख, मकर, कच्छप, मुकुंद, कुंद, नील, हे नऊ प्र॰; उ॰ त्यास नऊ निधि आणि अष्टम हा सिद्धि अनुकूल आहेत.

**निनावा**, पु॰ निधडा प्रथमार्थीं; २, ३ लिं॰ जास नाव नाहीं तो.

**निपचेत**, ३ लिं॰ मूर्च्छा इ॰ कारणामुळें झाला जो निश्चेष्ट तो, पड, हो, धा॰ बि॰.



**निपज**, पु॰ उपज मुख्यार्थीं.

**निपजणें**, उपजणें; २, तत्तद्रूपें करून दृष्टोत्पत्तीस येणें; उ॰ बरासा दिसत होता परंतु तो सादा निपजला.

**निपजत**, ३ लिं॰ वा॰ निपचेत.

**निपट**, ३ लिं॰ ग्रा॰ केवळ या अर्थीं; उ॰ निपट नागवा, निपट दरिद्री.

**निपटणें**, ग्रा॰ मध्यम, सद्रव, पातळ, पदार्थ जमीन इ॰ कांवरून निःशेष होई असा हस्तादिकानें काढणें; उ॰ हें शेण निपटून भर.

**निपटारा**, ३ लिं॰ कोणत्या कार्याविषयीं जो अप्रयोजक तो.

**निपटीशिपटी**, स्त्री॰ पोरांस भरविते वेळेस निपटूनशिपटून घेतला जो अन्नांश तो.

**निपटूनशिपटून**, अ॰ सद्रव, मध्यम, पातळ पदार्थ निःशेष होई असें खा, काढ, पुस, इ॰ धा॰ वि॰; उ॰ त्या मांजरानें मडक्यांतील दूध निपटूनशिपटून खाल्लें.

**निपणजा**, पु॰ आजाचा आजा तो.

**निपणजी**, स्त्री॰ आजाची आजी ती.

**निपणजोळ**, न॰ निपणजाचें घर तें.

**निपणज्वळ**, न॰ वा॰ निपणजोळ.

**निपणतू**, पु॰ नातवाचा नातू तो.

**निपणखंड**, न॰ नातवाचें नातवंड तें.

**निपताळा**, ३ लिं॰ कोणेकापासून द्रव्यादि लाभ झाल्यामुळें त्याचा झाला जो ओशाळा तो.

**निपरजत**, ३ लिं॰ रा॰ निपचेत.

**निपाडसा**, ३ लिं॰ रा॰ तान्हा त्याचे पलीकडे पाडसा

सा त्याचे पलीकडला जो तो.

**निपाणीं**, ३ लिं० दमदार जमीनींमध्यें पाणीं घातल्यावांचून ह्मावया जोगा जो ऊस इ० लावितात तो; २, जा दुग्धादि पदार्थांत पाणीं घातलें नाहीं तो; ३, स्वल्प जा देशांत जल तो.

**निपाण्याचा**, ३ लिं० निपाणीं.

**निःपात**, पु० मारणें, खाणें, इ० कांनीं निःशेष ह्मावया जोगा जो पदार्थाचा नाश तो.

**निपाळवाचा**, ३ लिं० रा० शेवटले बाराचा जो भोपळा, वांगें, इ० तो; उ० वांग्यास पाणीं न मिळतां निपाळवाचीं वांगीं लागूं लागलीं.

**निपुठी**, ३ लिं० जा औषधादिकांस पुठ नाहीं असें जें औषधादिक तो.

**निपुण**, ३ लिं० जो जा कसबांत पूर्ण तो त्या विषयीं.

**निपुत्रिक**, ३ लिं० जास पुत्र नाहीं तो.

**निपुटशिपुट**, न० निपटी शिपटी; उ० निपुटशिपुट घेईतो आपले आजोळा जोई.

**निपूर**, स्त्री० नपूर.

**निपोटी**, ३ लिं० चाकर इ० कांस प्रतिमासाचा ठायीं जें देय त्यांतच त्याचें पोट अशा रीतीनें ठराविली जी चाकरी, बोली, इ० तो; २, रा० चाकर इ० कांस प्रतिमासीं देय जें नक्त त्या खेरीज पोटास देण्याचे ठरावानें ठरिविली जी चाकरी, बोली इ० तो.

**निप्राण**, ३ लिं० अत्यंत अशक्त तो.

**निफांशी**, ३ लिं० जिला फांसा नाहीं अशी जी पुतळी इ० तो.

**निफाळी**, ३ लिं० जास फाळ नाहीं असा जो नांगर तो.

**निंब**, पु० कडु निंब, काटिनिंब, इ० त प्र०.

**निबर**, ३ लिं० जून जो पदार्थ तो; २, काष्ठ, पाषाण, इ० जो कठीण पदार्थ त्यासही प्र०; ३, न० सूर्य किरण संबंधी जो ताप तें.

**निंबलोण**, न० कोणाचा दृष्टिविकार निघावा ह्मणून कडु निंबाची पानें, लवण, इ० पदार्थ मुखावरून उतरून टाकण्याचा जो प्रकार तें, व ते सर्व पदार्थ मिळून तें, उतर, कर, इ० धा० वि०.

**निबळ**, ३ लिं० बलहीन जो पदार्थ तो.

**निंबा**, ३ लिं० रा० लग्न ह्मावयाची योग्यता आली असतां जें लग्न न झालें तो

**निबाकी**, स्त्री० सावकार इ० कांचा देण्या घेण्याचा उलगडा करून जी निःशेषता ती.

**निंबारा**, पु० झाड आहे त्याचें फळ.

**निबिड**, ३ लिं० गाढ प्रथमार्थीं; निद्रा, आरण्य, छाया, अंधकार, मेघ, इ० कांचें वि०.

**निंबी**, स्त्री० रा० एक झाड आहे जाजवर निंबें येतात ती.

**निर्बी**, न० कांहीं एक पदार्थाचें बीजही नगाही असा जो अभाव तें.

**निंबू**, न० कागदी निंबू, साखर निंबू, इ० तीं प्र०.

**निंबूण**, स्त्री० निंबी.

**निंबूर**, पु० बाजरीची कणसें आसन्न पक्वतेस आलीं जी तो.

**निंबोटी**, स्त्री० निंबाचे अर्धामध्यें साखर, सुंठ, सैंधव, इ० पदार्थ घालून औषध करितात ती; २, दे० अर्थ निंबू ती.

**निंबोणी**, स्त्री० दे० निंबूण.

**निंबोळी**, स्त्री० कडु निंबाचें जें फळ ती, २, पु०

ग आहे; ३, ३लिं० तद्विशिष्ट; स० निंबाला
ल्या निंबोळ्या आणि कावळ्याला आल्या गळ-
ट्या·

ाणें, ग्वापरपोळ्या, द्रोणे, इ० भाजायाचें मृत्ति-
वें पात्र तें तडयानीं युक्त होणें

ाणें, कोणेक पदार्थाचा जा व्यापारापासून, किं० सं-
टापासून नाश होण्याची संभावना आहे त्यापा-
न त्याणें पारपडणें; उ० हें लांकूड नासते वेळेस
ाडेल असें वाटलें परंतु निभलें; २, कांहीं एक
ापाराचा अभ्यास झाल्यामुळें तो व्यापार सिद्धीस
ण्या विषयीं योग्य होणें; उ० तो लिहिण्याचा का-
ांत निभला; ३, कांहीं एक आरब्ध व्यापार यथा-
स्थित पणें सिद्धीस जाणें, किं० तत्कर्ता पुरुष त्या त्या
ापारापासून पार पडणें; उ० हें काम त्याचे हातून
ाभलें तो या कामांत निभला·

ाती, ३लिं० जांत भाताचे दाणे नाहींत असे जें तांदू-
ठ, करड इ० तें·

ाव, पु० निभलेपणा; उ० या कामांत माझा निभा-
ा होईल·

ावणी, स्त्री० निभाव·

ावणूक, स्त्री० निभाव·

ावणें, उ० निभे असें करणें·

्यांत, ३लिं० जा विषयांत जास भ्रांति नाहीं तो त्या
विषयांत; उ० या विषयीं मीं निभ्रांत आहें; २, अ०
भ्रांति न धरितां, जा, कर, इ० धा० वि०; उ० तूं निभ्रां-
त जा·

ाक, पु० نمك हिं० मीठ·

ाकहराम, ३लिं० نمك حرام हिं० कृतघ्न·



निमकें, न० कोणेए संख्या दोहोंनीं भागिली असतां
अमुक फळ येतें अशा तऱ्हेची मुलांस शिकविण्या-
ची आहे तें; उ० बारा निमे साहा, बैल, घोडे, यांवर नि-
मे ओझें घाला व याओगें जें तें प्रा० त्याची जकात
देते समयीं प्र०·

निमखाई, स्त्री० अर्धेल: प्र० संकुचित·

निमग्न, ३लिं० जलादिकांत बुडला तो व व्यवहारांत
सुचेना असा कांहींएक व्यवहारांत पडला तो त्या
व्यवहारांत; उ० तो गाण्यांत निमग्न आहे·

निमचा, पु० लाहान जी तलवार तो·

निमज्जन, न० सं० पाणी इ०कांत बुडण्याचा जो व्या-
पार तें

निमणें, अ० शांत होणें; संकेतानें मरण्यास स०·

निमताना, पु० शेत, इ०कांची पाहाणी करते वेळेस
यांत अमुक उत्पन्न होईल असा अदमास कळा-
वा म्हणून त्यांतील कांहीं अंशाचा अनुभव पाहू-
न उत्पन्नाचा अदमास पाहाण्याचा जो प्रकार तो·

निमदस्ती, ३लिं० रा० शेत इ०कांचा धान्यास निमें
धान्य देण्याचा जो ठराव तो व त्या ठरावानें केलें जें
शेत इ० तें·

निमपट, स्त्री० रा० अर्धानें गुणायाचें असतां गुण्यां-
काचा जो अर्धभाग घेतात तो·

निमा, ३लिं० अर्धा; २, अंगरख्याचा एक भेद आ-
हे·

निमाई, स्त्री० निमखाई·

निमाज, स्त्री० نماز हिं० नमाज·

निमित्त, न० कांहींएक व्यापार करण्याविषयीं जें उद्दे-
श्य तें; उ० पोट भरायाचा निमित्तानें चाकरी करा-

वी लागली; २, कांहींएक व्यापाराचें जें कारण तें; उ० तो चोरीचे निमित्तानें फांशीं गेला; ३, न करितां कांहींएक गोष्टीचा आळ तें; उ० त्याणें चोरी केली नसतां चोरीचें निमित्त आलें; ४, कांहींएक व्यापाराचें वास्तवीक कारण नसतां कल्पित जें कारण तें; उ० तो दुखण्याचें निमित्त करून घरीं राहिला; उद्देश्य निमित्त, किं० सिद्धनिमित्त यांचा पाठीमागें चोरी इ० निमित्त विशेष लाविलें असतां विशिष्टाचा समास होतो तें अव्यय त्याचा अन्वय क्रियेवर होतो; उ० चोरी निमित्त हजार रुपये खर्च आला; निमित्तास टेंकणें, स० कोणेक व्यापार बिघडावा म्हणून स्वल्प कारण शोधणें; निमित्त ठेवणें, स० एखादे पदार्थास, किं० व्यापारास, वास्तवीक खोड, नसतां खोडीचा आरोप करणें; निमित्त टाळणें, स० कांहींएक व्यापारानें आपल्यावरील शब्द चुकविणें.

**निमित्तकारण**, न० घटादिकांचा उत्पत्तीस कुंभार, इ० जें उपयुक्त साधन तें.

**निमित्तधारी**, ३ लिं० टिक्याचा धनी.

**निमित्तभूत**, ३ लिं० निमित्तधारी.

**निमित्ताचा**, ३ लिं० जास स्पर्शादिक व्यापार केला असतां मोडला, तुटला, इ० निमित्तें दुसऱ्यावर यावया जोगा जो पदार्थ तो; उ० हा चाकू निमित्ताचा आहे हात लावतांच मोडेल संभाळ; २, टिक्याचा धनी तो.

**निमिष, निमेष**, पु० नेत्राचे पापण्याचा जो स्वभावसिद्ध उघडणें, मिटणें असा व्यापार त्यांतील जो मिटण्याचा व्यापार तो; २, तदुपलक्षित जो काल तोही.

**निमिषार्ध, निमेषार्ध**, न० निमिष हिचा अर्धाचें जें अर्ध तें.

**निमिषोन्मेष**, पु० डोळ्याचा पापण्या उघडण्याचा मिटण्याचा, जो स्वभावसिद्ध व्यापार तो; उ० प्रीतीनें पाहूं लागला तो निमिषोन्मेष विसरला.

**निमूर**, ३ लिं० निपचित.

**निमें**, ३ लिं० अर्धा.

**निमेनिम, निमोनिम**, ३ लिं० अर्धा.

**निमेषोन्मेष**, पु० निमिषोन्मेष.

**निमोळता**, ३ लिं० प्रा० क्रमानें जो उतरता तो.

**नियत**, ३ लिं० ज्याची संख्या, किं० व्यापार, इ० विषयक नियमाचा कधींही भंग होत नाहीं असा जो तो; उ० आमचा घरीं नियतवीस पात्रें होतात खेरीज आला गेला.

**नियंता**, ३ लिं० कोणेक मनुष्यादि पदार्थ अमुक नियमानें राही असें करणारा तो.

**नियम**, पु० कोणेक गोष्टी विषयीं काल, देश, ईश्वर, आधुनिक, इ० कांनीं बांधला जो बंद तो; उ० वसंतामध्यें कोकिलानीं शब्द करावा असा नियम आहे; आम्हीं एकवेळ जेवण्याचा नियम केला आहे.

**नियमन**, न० कोणेक पदार्थास नियमानें ठेवण्याचा जो व्यापार तें; उ० मनाचें नियमन केलें असतां ईश्वर प्राप्ति लवकर होती.

**नियमनिष्ठ**, ३ लिं० स्नानसंध्यादि करायाचें जें नियमानें कर्म तें अवश्य निष्ठेनें करावें असा ज्याचा स्वभाव तो.

यमनिष्ठा, स्त्री॰ स्नानसंध्यादिरूप जें नियमनिष्ठाचें कर्म तें.

यमशील, ३लिं॰ नियमनिष्ठ; २, कांहींएक केलाजो नियम त्यास कधींही टळत नाहीं तो.

यमान्धा, ३लिं॰ सदाचरणाविषयीं ज्याचा नियम आहे असा जो त्याची निंदा कर्तव्य असतां मोठा गेला नियमान्धा असा प्र॰ करितात.

यमित, ३लिं॰ जा पदार्थाचा कांहींएक नियम करून ठेविला तो; २, नियमानें अभिसंबद्ध तो; ३, नियत.

यमी, ३लिं॰ नियमशील

यामक, ३लिं॰ नियम करणारा जो तो; २, नियम प्रदर्शक तो; उ॰ एकादशी करावी या विषयीं शास्त्र नियामक आहे.

युक्त, ३लिं॰ कांहींएक कार्याविषयीं योजिला तो.

युत, ३लिं॰ १०००००.

योग, पु॰ कोणेकास कोणेकस्थलीं, किं॰ व्यापारीं नियुक्त करण्याचा जो व्यापार तो; २, कांहींएक कर्म करण्या विषयीं जी आज्ञा तो.

रंकुश, ३लिं॰ लोक शास्त्र सिद्ध मर्यादा न गणतां केवल स्वभावानेंच वागण्याचा स्वभाव ज्याचा तो.

नेरख, पु॰ बाजार संबंधी जो जिनसाचा भाव तो; बाजार निरख अप्रतिष्ठा इ॰ करणें, म्ह॰ सर्वांस विदित होई अशी अप्रतिष्ठा करणें.

नेरखणें, एकाग्र दृष्टीनें चित्रादिक पाहाणें.

नेरख्या, ३लिं॰ निरखांचा कामावर जो चौकशी करितां ठेवितात तो.

निरं

निरंजन, न॰ पु॰ देवापुढें दीप लावायासाठीं धातुमय पात्र करितात तें तो; २, जन्म, मरण, दुःख, इ॰ कांस कारणीभूत जें प्रारब्ध तद्रहित जो ईश्वरादि तो.

निरण, न॰ नाभीचा खालचा आणि गुह्याचा वरचा जो भाग तें; २, गाय, म्हैस, इ॰ कांची जी योनि तें; गाय इ॰ कांनीं निरण करूं लागणें, म्ह॰ लवकर प्रसूत होण्या साठीं तें अंग शिथिल करूं लागणें.

निरपणें, निपटणें; २, ला॰ केलेलें कर्म निस्तरणें; म्ह॰ भलते ठायीं हगावें आणि निरपत बसावें.

निरपराध, ३लिं॰ अपराधरहित; अ॰ अपराध नसतां मारणें, हाणणें, इ॰ कांचें वि॰.

निरपराधी, ३लिं॰ निरपराध.

निरभिमान, ३लिं॰ अभिमानरहित.

निरभिमानी, ३लिं॰ निरभिमान.

निरभ्र, ३लिं॰ अभ्ररहित जें आकाश, दिवस, इ॰ तो; २, न॰ अभ्र राहित्य तें.

निरय, पु॰ सं॰ नरक.

निरर्थक, ३लिं॰ जास अर्थ नाहीं असा जो शब्द प्रयोग आदिकरून तो; २, उपयोग ज्याचा नाहीं तो; ३, अ॰ उपयोगावांचून, मार, बोल इ॰ धा॰ वि॰.

निरवणी, स्त्री॰ निरवण्याचा जो व्यापार ती.

निरवणूक, स्त्री॰ निरवणी.

निरवणें, ग्रामांतरास जाणारा, सन्यास घेणारा, आसन्नमरण जास वाटलें असे जे त्याणीं मागें राहाणार जे पुत्रादिक त्यांस अमुक रीतीनें अमुक करा, किं॰ देणें, घेणें, इ॰ व्यवस्था सांगणें; २, आपण

कर्तव्य जें कार्य त्याविषयीं आपले स्थानीं दुसरा कल्पून त्याजवर तें कार्य सोंपणें·

**निरवयव**, ३लिं॰ अवयव रहित जो ईश्वर परमाण्वादि तो·

**निरवानिरव**, स्त्री॰ अनेक पदार्थांची अनेकांजवळ जो निरवण्याचा व्यापार ती·

**निरशन**, न॰ उपवास मुख्यार्थी; २, धान्योपहार कल्पिल्या वांचून जें व्रतादिक तें तद्विशेषण त्वें करूनही प्र॰ करितात; उ॰ आज त्याला निरशन एकादशी आहे·

**निरशी**, ३लिं॰ पाणी घातल्या वांचून, तापविल्या वांचून, जें दुग्ध त्याचें स्त्री॰ वि॰; २, स्त्री॰ ग्रा॰ कांहींएक व्यापाराचा, किं॰ पदार्थांचा जो कंटाळा ती; उ॰ एकच भाजी नित्य होऊं लागली म्हणून तिची निरशी आली·

**निरस**, ३लिं॰ स्वसजातिय जे अनेक पदार्थ त्यांत जाची योग्यता कमी तो; उ॰ हें सोनें निरस आहे·

**निरसणें**, उ॰ प्राप्त झालें जें विघ्रादिक, किं॰ दोषादिक तें दूर होई असें करणें·

**निरसन**, न॰ निरसण्याचा जो व्यापार तें·

**निरसें**, ३लिं॰ निरशी प्रथमार्थी·

**निरहंकार**, ३लिं॰ जास अहंकार नाहीं तो·

**निरहंकारी**, ३लिं॰ निरहंकार·

**निरक्षर**, ३लिं॰ अक्षरशत्रु तो·

**निरा**, पु॰ रा॰ पांढरें एक गवत आहे; २, मद्यभेद आहे; ३, स्त्री॰ एका नदीचें नाव आहे; ४, निरसें·

**निराकरण**, न॰ निरसन; २, जी गोष्ट आपल्याकडे आली तिचा जो परिहार तें·

**निराकार**, ३लिं॰ जास आकार नाहीं असा जो ईश्वरादि पदार्थ तो·

**निराट**, ३लिं॰ ग्रा॰ वृक्षादिकांची छाया इ॰ जेथें नाहीं तो जागा इ॰ तो·

**निराधार**, ३लिं॰ मुख्य लाक्षणिक आधार रहित जो तो·

**निराश**, ३लिं॰ जा पदार्थावर इच्छा असती तो, पदार्थ मिळत नाहीं असा निश्चय झाल्या मुळें आशाभंग जाचा झाला तो; २, आतां हा पदार्थ नको अशी बुद्धी जास झाली तो·

**निराशा**, स्त्री॰ आशाभंग ती·

**निराश्रय**, ३लिं॰ निराधार·

**निराश्रित**, ३लिं॰ आश्रित नव्हे तो·

**निरास**, पु॰ सं॰ निरसन·

**निराहार**, पु॰ निरशन·

**निराळा**, ३लिं॰ विवक्षिताहून इतर तो·

**निरिच्छ**, ३लिं॰ कोणेक गोष्टी विषयीं इच्छा नाहीं जास तो·

**निरी**, स्त्री॰ वस्त्रादिकांची मोठी चुणी काढितात ती·

**निरीक्षण**, न॰ बारीक दृष्टीनें जें अवलोकन तें·

**निरीक्षणें**, निरखणें·

**निरुक्ति**, स्त्री॰ सं॰ कोणेक पदार्थाचें स्वरूप समजायासाठीं लक्षण बांधितात ती; २, लक्षणादिकें करून जें स्वरूपकथन ती·

**निरुतें**, अ॰ ग्र॰ निश्चयें·

**निरुत्तर**, ३लिं॰ उत्तर करण्या विषयीं कुंठित झाला

झाला तो ; २, न० उत्तरा भावतें ; उ० तुमचे बोल-
ण्यावर निरुत्तर हेंच उत्तर.

निरुंद, ३ लिं० अरुंद.

निरुद्ध, ३ लिं० ज्याचा निरोध झाला तो.

निरुद्योग, ३ लिं० उद्योग करूं नये असा ज्याचा
स्वभाव तो ; २, इच्छित उद्योगाची सोय नाहीं
ज्याची तो.

निरुद्योगी, ३ लिं० निरुद्योग.

निरुपकारी, ३ लिं० कृतघ्न ; २, कोणाचे उपयो-
गी पडूं नये असा स्वभाव ज्याचा तो.

निरुपद्रव, ३ लिं० विवक्षितोपद्रव रहित जो तो.

निरुपम, ३ लिं० अनुपम.

निरुपयोगी, ३ लिं० अनुपयोगी.

निरुपाय, पु० कोणेक कार्या विषयीं कोणेकाचा
उपाय चालेनासा झाला अशी जी दशा तो ; उ०
माझा निरुपाय झाला म्हणून असें कर्म केलें ;
२, कांहींएक कार्या विषयीं ज्याचा उपाय चाले-
नासा झाला तो ; ३, ज्यावर उपाय चालत नाहीं
असा जो रोगादिक तो

निरु, पु० रेव ज्यांत घातली नाहीं असा जो चुना
त्यास लावणें, इ० प्रसंग विशेषीं म्ह० ; २, सामा-
न्यतः निर्मळ जो स्वच्छ निर्मळ पदार्थ तो.

निरूपक, ३ लिं० निरूपण करणारा जो तो.

निरूपण, न० कांहींएक गोष्टीचे लक्षणस्वरूप
प्रामाण्यादिकें करून जें कथन तें.

निरूपिणें, लक्षण स्वरूपादिकें करून कांहींए-
क गोष्ट कथणें.

निरूपित, ३ लिं० निरूपण केलें ज्याचें तो.

निरोग, ३ लिं० रोग रहित जो तो.

निरोगी, ३ लिं० रोग रहित जो तो.

निरोध, पु० कांहींएक कार्या विषयीं जो प्रतिबंध
तो.

निरोप, पु० अमुकास अमुक जाऊन सांग अशी
जी गोष्ट सांगितली तो ; २, कोणेकास गमना
विषयीं जी आज्ञा तो ; उ० मी निरोप मागत हो-
तों परंतु निरोप होईना ; चाकर इ० कांस निरोप
देणें म्ह० चाकरी इ० कांवरून दूर करणें ; चार गृ-
हस्थांच्या निरोप घ्यावयाचा आहे एथें त्यां पासू-
न पाठवणी घ्यावयाची आहे.

निरोप्या, ३ लिं० ज्या बरोबर निरोप सांगून पाठवि-
ला तो ; २, दुसऱ्यानें जो निरोप सांगितला त्या-
पेक्षां अधिक बोलण्याचा प्रसंग पडला असतां
ज्यास बोलण्याचें ज्ञान नाहीं, किं० अधिक बोल-
ण्या विषयीं यजमानाची आज्ञा नाहीं तो.

निर्ऋति, स्त्री० दक्षिण आणि पश्चिम या दोन दि-
शा मधली जी दिशा ती ; २, पु० त्या दिशेचा अ-
धिकारी देव आहे तो.

निर्गत, स्त्री० कोणेक कार्याची निभावणी, किं० उ-
लगडा ती ; उ० माझा हातून या कामाची निर्ग-
त लागेलसें वाटत नाहीं ; २, कांहींएक पदार्था-
पासून जो निघाला तो.

निर्गम, पु० निर्गत प्रथमार्थी.

निर्गोठ, स्त्री० गाठींत एक भेद आहे.

निर्गुंड, स्त्री० एक वनस्पति आहे.

निर्गुंडी, स्त्री० निर्गुंड.

निर्गुण, ३ लिं० सत्वरजस्तमादि गुणरहित जो
ईश्वर.

ईश्वर तो; २, ज्या मध्यें चांगला गुण नाहीं असा जो मनुष्यादि तो.

**निर्गुणी**, ३ लिं॰ निर्गुण द्वितीयार्थी.

**निर्घोर**, ३ लिं॰ निघोर.

**निर्जन**, ३ लिं॰ जेथें लोक नाहींत असा जो देश, किं॰ काल तो.

**निर्जल**, ३ लिं॰ जल ज्या देशामध्यें फारच कमी तो देशादिक तो; २, पाणीही प्यावयाचें नाहीं असें जें उपोषणादिक तो.

**निर्जला, निर्जळा**, स्त्री॰ ज्येष्ठ शुद्ध एकादशी ती.

**निर्जित**, ३ लिं॰ सर्वांशीं करून जिंकिला जो तो.

**निर्जितेंद्रिय**, ३ लिं॰ सर्व प्रकारानीं जिंकिलीं आहेत इंद्रियें ज्याणें तो.

**निर्जीव**, ३ लिं॰ ज्या मध्यें जीव नाहीं तो पाषाणादिक तो; २, ला॰ अशक्त.

**निर्झर**, पु॰ झरा.

**निर्ढवणें**, ज्या मडक्यांत तूप, तेल, इ॰ ठेवायाचें त्या मडक्यांत प्रथमतः पाणी भरून ठेवून तेल इ॰ जिरणासें करणें; २, ला॰ व्यभिचारादि कर्मीविषयीं निर्लज्ज होणें.

**निर्णय**, पु॰ संदिग्ध स्थल, किं॰ भ्रम स्थल, यांचा विचार करून जो ठराव तो.

**निर्णयपत्र**, न॰ निर्णय ज्यांत लिहिला आहे असें जें पत्र तें.

**निर्णायक**, ३ लिं॰ निर्णय करण्याचे उपयोगी जो साधन भूत पदार्थादि तो; २, निर्णय करणारा जो मनुष्यादि तो

**निर्णीत**, ३ लिं॰ निर्णय ज्याचा ठरला तो.

निर्तु

**निर्तुटक**, न॰ कज्जा इ॰ कांहीं एक व्यवहाराचा निःशेष तुटण्याचा जो प्रकार तें.

**निर्ददात, निर्दधात**, ३ लिं॰ खाण्या पिण्याची ज्यास ददात नाहीं तो.

**निर्दय**, ३ लिं॰ दयारहित जो तो.

**निर्दलन, निर्दळण**, न॰ कोणेक पदार्थांचा निःशेष जो नाश तें.

**निर्दाळण**, न॰ निर्दलन.

**निर्दाळणें**, कोणेकाचें निर्दलन होई असें करणें.

**निर्दुष्ट**, ३ लिं॰ दोष विशिष्ट नव्हे तो.

**निर्देश**, पु॰ अमुक म्हणून दाखिवण्याचा व्यापार तो.

**निर्देव**, ३ लिं॰ देव हीन जो तो.

**निर्दोष**, ३ लिं॰ दोषरहित जो तो.

**निर्धन**, ३ लिं॰ धन रहित जो तो.

**निर्धात**, ३ लिं॰ द्रव्यहीन देश, मनुष्य इ॰ तो; २, ज्याचे आंगांत धातू नाहीं तो, बल्याचें अंग.

**निर्धार**, पु॰ ही गोष्ट अशीच असें जें निःसंदेहपणाचें ज्ञान तो.

**निर्धारण**, न॰ कांहीं एक गोष्टी विषयीं जो संदेहाभाव तें.

**निर्धारणें**, कांहीं एक गोष्ट निःसंदिग्धपणें जाणणें.

**निर्धूत**, ३ लिं॰ द्रव्य हीन जो तो; २, न॰ द्रव्यादि राहित्य; उ॰ पेंढाऱ्यानीं त्या देशांत आऊन अगदीं निधूत केलें.

**निर्धूतपाप**, ३ लिं॰ ज्याणें आपले पापाचें क्षालन

लन

लन केलें आहे असा साधु इ० तो.

**नीयक**, ३ लिं० जा देशादिकांस नायक नाहीं तो देशादिक तो.

**नीयकी**, स्त्री० निर्नायकपणा; उ० त्या देशांत निर्नायकी झाली या मुळें स्वराब झाला.

**निमित्त**, अ० निमित्तावांचून, बोल, जा, इ० धा० वि०.

**निराळा**, ३ लिं० निराळा निराळा.

**र्बंध**, पु० कोणत्याही गोष्टी विषयीं आग्रहपुरःसर जो निश्चय तो; २, कांहीं एक गोष्ट अमुक रीतीनें राहावी म्हणून केली जी मर्यादा तो.

**र्वल, निर्बळ**, ३ लिं० बल रहित जो तो.

**र्वली**, ३ लिं० जास बल नसेल त्यासच मागावें असा जो बुद्धबळें खेळण्याचा प्रकार तो डाव.

**र्वाणी**, ३ लिं० कांहीं एक कार्या विषयीं कोणाची अपेक्षा नधरितां स्वातंत्र्यें करून तें कार्य करण्या विषयीं समर्थ तो.

**र्बाध**, ३ लिं० बाध रहित.

**र्बीज**, ३ लिं० ज्याचें बीजही उरलें नाहीं असा निःशेषपणा पावला तो; २, न० अशा प्रकारानें जो नाश तें; ३, ३ लिं० जा फळांत बीज नाहीं तें फळादिक तो; ४, जा गोष्टीस मूळ अर्धार नाहीं ती गोष्ट इ० तो; क्रमानें सर्व अर्थांचीं उदाहरणें; उ० हें कृष्ण निर्बीज झाले; त्याचें निर्बीज झालें; हे दाणा निर्बीज आहे; त्याणें ही गोष्ट निर्बीज सांगितली.

**निर्बुद्ध**, ३ लिं० ज्याची शास्त्रादिकांत बुद्धि चालत नाहीं तो.

**निर्बुद्धि**, ३ लिं० निर्बुद्ध.

**निर्भय**, ३ लिं० भयरहित जो तो; २, न० भयराहित्य.

**निर्भर**, पु० कांहीं एक कर्मा विषयीं अतिशय निष्ठा, किं० आग्रह तो.

**निर्भर्त्सना**, स्त्री० कोणेकाचा पाण उतारा व्हावा एतदर्थ केला जो प्रा० त्याचे मुखावर, किं० मागें गालिप्रदानाचा, किं० निंदावाक्य इ० बोलण्याचा व्यापार ती.

**निर्भीड**, ३ लिं० जास कोणेकाची भीड नाहीं तो.

**निर्भेल**, ३ लिं० जा पदार्थांत दुसऱ्या विजातीय पदार्थांची भेल नाहीं तो.

**निर्मम**, ३ लिं० जास ममता नाहीं तो.

**निर्मर्याद**, ३ लिं० जास मर्यादा नाहीं तो.

**निर्मल, निर्मळ**, ३ लिं० वस्त्रादिकांचा मृत्तिकादिक, आकाशाचा अभ्र, बुद्धीचा दार्यां कपट इ० जे त्या त्या पदार्थाचे मल तत्तद्रहित जो तो तो पदार्थ तो.

**निर्मळी पंचपात्री**, स्त्री० पंचपात्रींत एक भेद आहे.

**निर्माण**, ३ लिं० उत्पत्ति विशिष्ट, हो, कर, इ० धा० वि०.

**निर्मानुष**, ३ लिं० मनुष्यरहित जो देशादिक तो.

**निर्माल्य**, पु० न० वा० देवादिकावर वाहिला जो पुष्पादिपदार्थ तो; २, तोच पदार्थ पादस्पर्शाद्यनेक कारणानीं देवास वाहाण्याचा उपयोगी पडत नाहीं तो; ३, ला० जा मनुष्यादि पदार्थांत तेज राहिलें नाहीं, किं० मुळचेंच नाहीं तो.

**निर्मिणें**, मनुष्यादि पदार्थ उत्पन्न होई असें करणें; २, उत्पन्न झालेल्या पदार्थांचा दैवीं अमुक कालीं अमुक होईल अशा रीतीनें ईश्वरानें लिहिणें; उ॰ ईश्वरानें जसें जसें निर्मिलें असेल तसें तसें घडेल.

**निर्मित**, ३ लिं॰ निर्माण केला जो तो; २, न॰ देवलिखित तें; उ॰ जसें निर्मित असेल तसें घडेल.

**निर्मुक्त**, ३ लिं॰ कोणे कामकटादिकापासून मुक्त झाला तो; उ॰ कर्जापासून निर्मुक्त झालों.

**निर्मूल**, ३ लिं॰ मुळासुद्धां नाश पावला जो वृक्षादिक; उ॰ फोकाट्यानीं वृक्ष निर्मूल झाले; २, ज्यास मूल नाहीं असा वृक्षावयवादिक तो; उ॰ निर्मूल झाड घेऊं नये; ३, न॰ समूल नाश पावल्यामुळें जो वृक्षादिकांचा अभाव तें; उ॰ या रानांत वृक्षांचें निर्मूल झालें; ४, ३ लिं॰ ला॰ ज्या वचनादिकास मूल आधार नाहीं, असें वचन वर्तमानादि तो; शत्रु इ॰ कांचें निर्मूल करणें इ॰ स्थलीं समूल नाश करणें.

**निर्मोह**, ३ लिं॰ सं॰ मोहरहित जो तो.

**निर्याण**, न॰ सं॰ स्थल सोडून निघण्याचा जो व्यापार तें.

**निर्लज्ज**, ३ लिं॰ सं॰ कोणेक गोष्टीविषयीं ज्यास लाज नाहीं तो.

**निर्लेप**, ३ लिं॰ सं॰ जो पदार्थ शिजविल्यानें भाजल्यानें खरकटा होत नाहीं तो पदार्थ.

**निर्लोभ**, ३ लिं॰ सं॰ लोभ ज्यास नाहीं तो.

**निर्लोभी**, ३ लिं॰ निर्लोभ.

**निर्लोभ** ३ लिं॰ लोभरहित जो तो.



**निर्वंश**, पु॰ सं॰ वंशक्षय.

**निर्वंशीकलम**, न॰ रा॰ वंशक्षय झालेल्या पिढीतील जें पिशाच्च तें.

**निर्वाण**, न॰ सं॰ निदान द्वितीयार्थी; २, सं॰ मुक्ति.

**निर्वाणयुद्ध**, न॰ सं॰ पराकाष्ठेचें जें युद्ध तें.

**निर्वात**, ३ लिं॰ सं॰ ज्या ठिकाणीं वायु स्वल्प, असें जें स्थलादिक तो; २, न॰ वायुराहित्य; उ॰ आज निर्वात आहे.

**निर्वासन**, न॰ सं॰ घालवून देण्याचा जो व्यापार तें; २, ३ लिं॰ वासनारहित तो.

**निर्वाह**, पु॰ सं॰ कोणतेंही कामामध्यें अटकून न टाकतां चालविण्याचा, किं॰ तडीस नेण्याचा जो प्रकार तो; उ॰ मी आजपर्यंत संसाराचा निर्वाह केला; २, एखादें भाषण, किं॰ लेख प्रमाणादिकें करून खरें करून देण्याचा जो प्रकार तो; उ॰ मी बोललों, मी लिहिलें याचा निर्वाह मला करणें प्राप्त आहे; ३, क्षुधा, थंडी, पाऊस, इ॰ कांचा निर्वाह इ॰ स्थलीं आपल्यास उपद्रव न होई असा व्यापार तो.

**निर्वाहक**, ३ लिं॰ सं॰ कांहींएक गोष्टीचा निर्वाह करितो तो.

**निर्वाळा**, पु॰ निधडा प्रथमार्थी.

**निर्विकार**, ३ लिं॰ सं॰ विकार ज्यास नाहीं तो.

**निर्विघ्न**, अ॰ सं॰ विघ्न न होतां तडीस आणें, करणें, होणें, इ॰ धा॰ वि॰; उ॰ हें कार्य निर्विघ्न तडीस गेलें; २, न॰ विघ्नराहित्य; उ॰ ईश्वरस्मरणानें निर्विघ्न होतें.

**निर्विवाद**, ३ लिं० सं० विवादाचा विषय नव्हे असें जें स्थलादिक तो.

**निर्विष**, ३ लिं० सं० विषरहित जो सर्पादिक तो; २, जाणें अहंकारादिक सोडिला तो.

**निर्वीर**, ३ लिं० सं० वीररहित; उ० आज निर्विर भूतल झालें.

**निर्वीर्य**, ३ लिं० सं० ज्याचे आंगीं वीर्य नाहीं तो; २, ज्याचे आंगात स्वल्प धातु आहे तो; उ० हें औषध निर्वीर्य झालें; हा पुरुष निर्वीर्य आहे.

**निर्वेद**, पु० सं० विरक्त.

**निर्वेध**, ३ लिं० सं० वेधरहित जें स्थल. पुरुषादि तो.

**निर्वैर**, न० सं० वैररहित्य; २, ३ लिं० कोणावरोबर ज्याचें वैर नाहीं तो.

**निर्व्यसन**, ३ लिं० सं० व्यसनरहित जो तो.

**निर्व्यसनी**, ३ लिं० निर्व्यसन.

**निर्व्याकुळ**, ३ लिं० प्रा० निर्वेधार्थी.

**निर्व्यापार**, ३ लिं० सं० व्यापाररहित जो मनुष्यादि तो.

**निलखी**, ३ लिं० ज्यादागिन्यांत लाख नाहीं तो.

**निलय**, न० सं० प्रा० स्थानार्थी.

**निलाख**, ३ लिं० निलखी.

**निलाखी**, ३ लिं० निलखी.

**निलाजरा**, ३ लिं० लज्जारहित जो मनुष्यादिक तो.

**निलीम**. न० रितें गलबत ग्राबऱ्यावयाचें असतां बारदाना साठीं त्यांत जें वाळू, धोंडे, इ० भरितात तें

**निवग्री**, स्त्री० तांदळादिकाचा पिठाचा वाटीसारिखा आकार करून शिजवितात तें पक्वान्न आहे.

**निवटणें**, कोणत्या एका विद्येत. किं० व्यवहारांत. गणनीय होणें; उ० हा सोदेगीरींत निवटला; २, ग्रं० मरणें.

**निवटा**, पु० मत्स्यांत एक भेद आहे.

**निवड**, स्त्री० कोणेक समुदायांतून विवक्षित पदार्थास निराळें करण्याचा जो व्यापार ती; २, सजातीय समुदायांतून निवडून काढिला, किं० निवडून काढाया जोगता जो पदार्थ ती; ३, समुदायांतील चांगला चांगला अंश काढून घेऊन राहिला जो गाळ ती; हा शब्द त्या त्या पदार्थाचें वि० होतो.

**निवडक**, ३ लिं० निवड द्वितीयार्थी.

**निवडंग**, **निवडुंग**, पु० न० सकंटक औषधी झाड आहे.

**निवडणें**, समुदायांतून विवक्षितांश पृथक् करणें; २, निवटणें, ग्रंथी या अर्थी वांचून.

**निवडुंगट**, न० निवडंग

**निवण**, न० रा० डोळ्याची गरमी उतरायासाठीं डोळ्यावर दुधानें भिजवून कापसाची घडी इ० औषधें घालितात तें.

**निवणें**, अग्नि, सूर्य, यांचा ऊष्म्यानें संतप्त जो पदार्थ त्याणें थंड होणें; २, महामारी, दंगा, क्रोधादिक शांत होणें; ३, क्रोधादिक जाऊन आपण शांत होणें; उ० त्यास बहुत क्रोध आला होता तो निवाला त्यामुळें ज्यास क्रोध आला होता

ता तोही निवाला; डोळे निवणें कान निवणें, इ० स्थळीं चिंता ओगी गोष्ट झाल्यामुळें समाधान होणें; स० शिजि तों राहावतें परंतु निवे तों राहावत नाहीं; ४, न० मडकें इ०कांचा तुडारवाळीं, गवत इ०कांचें वळ याकार करून घालितात तें.

**निवर्तन**, न० सं० दोनशें हात लांब रुंद जें क्षेत्र तें; २, कांहींएक स्थळादिकापासून मागें फिरण्याचा जो व्यापार तें.

**निवलकांदें**, न० वा० निवडुंग.

**निवली**, स्त्री० वा० चिकाडा.

**निवळ**, ३ लिं० गढूळ नव्हे जें उदकादिक तो; २, स्त्री० तळ्यादिकांतील जडांश तळीं बसून वर निर्मल उदक राहातें ती; ३, अ० निःसंशयपणें; उ० या पदार्थाचे निवळ दाहा रुपये येतील.

**निवळणें**, उदकादिकानीं निवळ होणें; २, त्या त्या पदार्थांतील विवक्षित जो गुणविशेष त्यास प्रतिबंधक जो त्या पदार्थांतीलच दोषविशेष तो जाऊन तो तो गुण प्रकट होई असें होणें; उ० डोळे निवळले, रात्र निवळली, पाणीं निवळलें, सुपारी निवळली, अंबे निवळले, इ० हरिक निवळणें, स० शेणाच्या ल्यांत घालून त्यांचा प्रथली उन्मादकता शक्ति काढून टाकणें, अशा कितीएक स्थळीं धातू सकर्मक ता येती.

**निवळी**, स्त्री० निवळ तृतीयार्थी; २, एक झाड आहे; ३, त्या झाडाची जी बी ती; ४, एक वेल आहे; ५, को० बैल इ०कांचा शिंगास दोरी बांधीत असतात ती.

**निवाडपत्र**, न० पंचाईती इ०कांचा निर्णय करून निवाडा जा पत्रांत लिहिला आहे असें जें पत्र तें.

**निवाडा**, पु० निर्णय प्रा० पंचाईत प्रकरणीं प्र०; दोन जिवाचा निवाडा होणें, स० गरोदर स्त्री प्रसूत होऊन अपत्य आणि ती या उभतांचा पृथक् भाव होणें.

**निवात**, ३ लिं० निर्वात.

**निवांत**, ३ लिं० विवक्षितोपद्रव शून्य जें स्थळादिक तें; उ० निवांत स्थळीं बसून ईश्वराचें ध्यान करावें. २, अ० चलनवलन भाषणादि न करितां राहाणें बसणें, इ० प्र० वि०; उ० तूं घटकाभर निवांत बैस.

**निवारण**, न० कांहींएक व्यापाराचा ठायीं प्रवृत्त जो त्यास त्या व्यापारापासून मागें फिरविण्याचा जो व्यापार तें; उ० तो वाघाचे आंगावर चालून जात होता परंतु त्याचें निवारण केलें; २, तगादारास तगादा न करण्याविषयीं त्याचे धन्याचें पत्र आणून देतात तें.

**निवारणपत्र**, न० निवारण द्वितीयार्थी.

**निवारणें**, उ० निवारण व्यापारानें निवृत्त होई असें करणें.

**निवारशी**, ३ लिं० कोणाचा वारसा जेथें नाहीं तें स्थळादिक तो.

**निवारसा**, पु० स्वामित्वादि संबंधविशेष राहित्य.

**निवारा**, पु० भिंत इ० प्रतिबंधानें जो वाऱ्याचा प्रतिरोध तो; निवाऱ्यास बसणें, स० वातरहित स्थळीं बसणें.

**निवारित**, ३ लिं० निवारण केलें जाचें तो.

निः

**निवारिशा**, ३ लिं० निवारणी.

**निवास**, पु० राहावयाचें ठिकाण तो व राहाण्याचा व्यापार तो; उ० आमचे मनांत काशींत निवास करावा असें आहे.

**निवासी**, ३ लिं० निवासाचाठायीं राहाणारा तो; प्रा० याचा समासीं प्र०; उ० मथुरा निवासी, द्वारकानिवासी.

**निविष्ट**, ३ लिं० सं० प्रविष्ट; २, कांहींएका स्थानावर, किं० अधिकारावर जो अधिकृत तो; ३, कांहीं एका व्यापाराचा परिचया मुळें जो निपुण तो; उ० तो शास्त्रांत निविष्ट आहे.

**निवृत्त**, ३ लिं० सं० कांहींएक व्यापार, स्थल, इ० कांपासून माघारा परतला जो तो.

**निवृत्ति**, स्त्री० सं० कांहींएक व्यापारादिकापासून माघारें घेण्याचा जो व्यापार ती; २, दोषादिकाचा जो निरास ती; उ० औषध सेवनानें रोगनिवृत्ति होती.

**निवृत्तिमार्ग**, पु० सं० इहलोक, परलोक, एतत्संबंधी विषयांचा अभिलाष नधरितां भूतमात्रीं दया ठेवून जो ईश्वरा राधन प्रकार तो; उ० लोक दृष्टीनें प्रवृत्ति मार्गांत असून निवृत्ति मार्गांत असावें.

**निवेदणें**, लाहानानें थोरापाशीं, किं० बरोबरी जाचीं त्यापाशीं कथणें कथन प्रसंग असतांच प्र०; २, देवादिकास पुष्पादि अर्पिणें.

**निवेदन**, न० सं० कथन; २, देवादिकास पुष्पादि अर्पिणेंयाचा जो व्यापार तें.

**निवेश**, पु० सं० कांहींएक आग्यांत स्थल करून जें स्थापन तो; उ० या पंक्तिमध्यें एक अक्षराचा निवेश होत नाहीं; २, शास्त्रादिकाचा ठायीं प्रवेश तो; उ० याच्या व्याकरणांत चांगला निवेश आहे.

**निवेशन**, न० सं० निवेश करण्याचा जो व्यापार तें.

**निःशंक**, ३ लिं० सं० कांहींएक गोष्ट आचरण्याविषयीं जास शंका नाहीं तो.

**निःशक्त**, ३ लिं० सं० जाचे आंगीं शक्ति नाहीं तो.

**निशा**, स्त्री० रात्री; २, एखादे गोष्टीविषयीं जो निसंदिग्धपणा तो; उ० या गोष्टी विषयीं मला संदेह होता, परंतु आज माझी निशा झाली; ३, कोणा एका बद्दल मीं द्रव्य देईन इ० कबूल करण्याचा जो व्यापार ती; उ० मी पांचशें रुपयांची निशा सावकारी देतों; ४, कैफ; उ० मीं आज निशा खाल्ली परंतु निशा आली नाहीं; ५, वाद, युद्ध, भोजन. इ० कां विषयीं अभिमानादि मूलक जी उत्कंठा असती तिला तो तो विषय स्वशक्तिपेक्षां अतिरिक्त झाल्यामुळें पुरेंपुरे नकोनको अशी अवस्था होती ती.

**निशाकर**, पु० सं० चंद्र.

**निशाचर**, ३ लिं० सं० राक्षस, पिशाच, चोर, इ० तो.

**निशाचरी**, स्त्री० चोराचें कर्म ती.

**निशाचरीविद्या**, स्त्री० सं० चोरीचें कर्म ती.

**निशाण**, न० झेंडा; २, बाणादिकानें वेध्य जें लक्ष्य तें; ३, प्रा० रुपया इ० नाण्यावर पोतदार इ० कांचें चिन्ह असतें तें.

**निशाणदार**, ३ लिं० सैन्यादिकाचाठायीं ध्वज धरितो तो.

**निशाणा**, पु० दे० शस्त्र पाजवावयाचा दगड आहे.

**निशाणी**, स्त्री० एखाद्या पदार्थावर खुणेसाठीं जें चिन्ह करितात तीं; २, कांहींएक कर्मानंतर दुष्टफळ भोगण्याचा प्रसंग तो; उ० वाघाचे घरांत गेलें असतां मरण्याची निशाणी.

**निशावाज**, ३ लिं० कैफी.

**निशीण**, स्त्री० माळा, झाड, इ० कांवर चढावयाकरितां दोन लांब लांकडांस पावकें मारून करितात ती.

**निशीथ**, पु० मध्यरात्री.

**निशेंड्या**, ३ लिं० शेंडी जास नाहीं असा जो यवनादिक तो.

**निःशेष**, ३ लिं० सं० अवशिष्ट सुद्धां नो; उ० तो पदार्थ निःशेष सरला.

**निशोत्तर**, न० एक ओषधी पदार्थ आहे.

**निश्चक्र**, ३ लिं० निस्त्रान.

**निश्चंद्र**, ३ लिं० सं० ज्या भस्मांतील चकाकी गेली असें जें पारद, अभ्रक, इ० कांचें भस्म तो.

**निश्चय**, पु० सं० कांहींएक गोष्टी विषयीं जो ठराव तो; उ० सर्कार अधिक पैसा मागतें परंतु द्यावयाचा नाहीं असा निश्चय झाला; २, हें असेंच असा जो एकरूप बुद्धीचा आकार तो; उ० दुरून रूपें आहे असा भास झाला हातीं घेतल्या नंतर शिंपी असा निश्चय ठरला; ३, कांहींएक गोष्टी विषयीं तत्स्वरूपें करून जी अवश्यंभाविता ती; उ० सूर्यास्तानंतर रात्रि होईल या गोष्टीचा निश्चय आहे; ४, ला० विश्वास; उ० ब्राह्मण्या मनुष्याचें वाक्यावर निश्चय ठेवून चालावें.

**निश्चयपूर्वक**, अ० निश्चयें करून.

**निश्चयाचा**, ३ लिं० एकवार ज्याचे बुद्धीच्या कोणेका विषयीं निश्चय झाला तो कधींही फिरावयाचा नाहीं असा जो पुरुष तो; २ निश्चय आहे ज्यांत अशी जी गोष्ट, तो.

**निश्चयात्मक**, ३ लिं० निश्चय आहे ज्यांत तो; २, अ० निश्चयपूर्वक.

**निश्चल**, ३ लिं० चलन रहित जो तो.

**निश्चळ**, ३ लिं० निचळ.

**निश्चित**, ३ लिं० निश्चयानें अभिसंबद्ध तो.

**निश्चिंत**, ३ लिं० निचिंत.

**निषाद**, पु० सं० कोळी ह्मणून हिंदूंत एक जाति आहे.

**निषिद्ध**, ३ लिं० सं० शास्त्र आणि लोक यानीं ज्या ज्या कर्मा विषयीं जो जो वर्जिला तो पदार्थ व तसें कर्महीं.

**निषेध**, पु० सं० जें कर्म करूं नये, किं० पदार्थ घेऊं नये इ० रूप शास्त्र आधुनिक इ० कांनीं केलें जें वर्जन तो.

**निषेधणें**, निषेधानें युक्त करणें.

**निष्क**, पु० सं० चाळीस मासे प्रमाण जें वजन तो; २, चार रुपयाचा किंमतीचें एक मान आहे ज्योतिष प्रसिद्ध.

**निष्कंटक**, ३ लिं० सं० ज्या मार्गादिका मध्यें कांटा नाहीं तो मार्ग, राज्यादिक; उ० कौरव मारून देइल निष्कंटक सर्व राज्य आपल्ला; २, न० कंटकराहित्य; उ० तो शत्रु मेला यामुळें तेथें निष्कंटक झालें.

**निष्कपट**, ३ लिं० सं० कपटरहित जो मनुष्य व्यवहारादिक तो.

निश्च- निष्क

**निष्कलंक**, ३लिं० सं० कलंकरहित जो तो.

**निष्कांचन**, ३लिं० सं० कांचन ह्मणजे द्रव्य तद्रहित जो मनुष्य, देश, इ० तो.

**निष्काम**, ३लिं० सं० फलेच्छा न धरितां जें अनुष्ठानादिक तो.

**निष्कारण**, अ० कारणावांचून, छळ, बोल, मर, इ० धा०वि०.

**निष्कासन**, न० कांहीं एकांतून कांहीं एकाचा बाहेर काढण्याचा जो व्यापार तें.

**निष्काळजी**, ३लिं० निकाळजी.

**निष्कृति**, स्त्री० केल्या पापकर्माचा परिहारार्थ प्रायश्चित्त दुःख भोगणें इ० रूप जो व्यापार ती.

**निष्कृत्रिम**, कपटरहित जो तो.

**निष्क्रय**, पु० ब्राह्मणादिकास मुख्यत्वें करून जो पदार्थ द्यावयाचा तदभावीं त्याचें द्रव्यरूप मोल देतात तो.

**निष्ठा**, स्त्री० कांहीं एका कार्याच्या ठायीं, किं० पदार्थाच्या ठायीं जी अतिशयित प्रेमा ती; २, शास्त्रादिकांच्या ठायीं हें सत्य अशी जी बुद्धि ती.

**निष्ठुर**, ३लिं० कठोर, मन, हृदय, भाषण, पुरुष, इ० काविषयीं प्र०.

**निष्णा**, पु० निशाणा.

**निष्णात**, ३लिं० विद्यादिकांच्या ठायीं निपुण तो.

**निष्पर्ण**, ३लिं० पर्णरहित जो वृक्षादि तो.

**निष्पत्र**, ३लिं० निष्पर्ण.

**निष्पन्न**, ३लिं० उत्पन्न.

**निष्पाप**, ३लिं० पापरहित जो मनुष्यादि तो.

**निष्प्रयोजन**, अ० प्रयोजनावांचून; उ० निष्प्रयोजन एखाद्यास मारूं नये.

**निष्प्राण**, ३लिं० सं० निप्राण; २, मृत जो तो.

**निष्प्रांजल**, ३लिं० सं० जा भाषणांत, किं० ग्रथादिकांत संदेह अथवा वक्रता कपट इ० नाहीं असें जें मोकळें भाषण, ग्रंथ, इ० तो.

**निष्फल, निष्फळ**, ३लिं० सं० फलोत्पत्ति रहित जो व्यापार आणि वृक्षादिक तो.

**निःसंग**, ३लिं० अंतःकरणापासून सर्व संग परित्याग जाणें केला तो; उ० संन्याशानें निःसंग असावें; २, ला० जाणें लोकरीति सोडली तो; उ० तो निःसंग होऊन जुगार खेळूं लागला.

**निसंग**, ३लिं० निःसंग द्वितीयार्थी.

**निसटणें**, अडचणींत सांपडलेला जो पदार्थ त्याणें नेटामुळें जिकडे अडचण कमी तिकडे मार्ग करून सवेग बाहेर पडणें; उ० आंबा आंवळतांच आंतून कोय निसटली; २, भारसाहकता शक्ति जामध्यें आहे असा जो पदार्थ, प्रदेश, तो प्रदेश सुटल्यामुळें त्या त्या पदार्थानें नेटामुळें सरणें; उ० त्या तुळईस टेंका देतोस तो मधोमध दे नाहीं तर निसटेल; त्या जमीनीवरून युक्तीनें चाल, नाहीं तर पाय निसटेल; ३, ला० कांहीं एका स्थलापासून, डोळा चुकवून, किं० बलात्कार इत्यादि उपायानीं पळणें; उ० एथें बसला होता इतक्यांत तो निसटून कोणीकडे गेला, तो चोर चवघानीं धरला होता परंतु निसटला; ४, कांहीं एका कार्यांत प्रथम आपण असून मग अंग काढणें; उ० तो त्या मसलतींतून निसटला.

निष्प्र

निसण

**निसण**, स्त्री॰ निशीण·

**निसणा**, पु॰ निष्णा·

**निसणें**, पदार्थावरची त्वचा काढून पदार्थ निस्त्वच करणें; उ॰ मीं सकाळपासून संध्याकाळपर्यंत हजार नारळ निसले; २, तांदूळ, भाजी, इ॰ पदार्थ निवडणें·

**निसन**, ३लिं॰ ग॰ बोलल्या चालल्याची ज्यास लाज नसून ज्यास भीड भर्यादा नाहीं तो; म्ह॰ निसनचा-जारी आणि पडला शेजारी·

**निसंतान**, न॰ कुळक्षय; म्ह॰ कुसंतानापेक्षां निसंतान बरें·

**निःसत्व**, ३लिं॰ प्रसिद्ध तेजावांचून जें तेज तद्रहित जो मनुष्यादि तो·

**निःसंदिग्ध**, ३लिं॰ संदेहानें युक्त नव्हे जो तो·

**निःसंदेह**, ३लिं॰ संदेहरहित जो तो·

**निसपटणें**, ग्रा॰ निसटणें या अर्थी·

**निसबत**, स्त्री॰ نسبت हिं॰ दिमत; उ॰ आमचा घोडा त्याचे निसबतीस आहे; सर्कार निसबत निसबत सर्कार इ॰ स्थळीं सर्कारचे निसबतीचा असा अर्थ·

**निसबतदार**, ३लिं॰ نسبتدار हिं॰ दिमतदार·

**निसबतवार**, ३लिं॰ जो ज्याचे निसबतीस राहातो तो त्याचा·

**निसरगांठ**, स्त्री॰ आसुडगांठ; निसरगांठ देऊन ठेवणें, म्ह॰ कांहींएक व्यापारांत आपण गुंतून पळायास वाट ठेवणें·

**सरड**, स्त्री॰ भूम्यादिकावर पाय सरला जाई असा जो शेवाळी, इ॰ कांनीं झाला बुळबुळीतपणा ती; उ॰ तूं त्या वाटेनें जाऊं नको तेथे निसरड झाली आहे·

**निसरडा**, ३लिं॰ निसरड ज्यावर झाली आहे असा जो वृक्ष, भूमि, इ॰ तो; २, पु॰ निसरड·

**निसरडें**, न॰ निसरड·

**निसरण**, स्त्री॰ निसरड·

**निःसरण**, न॰ सं॰ कांहींएक पदार्थांतून कांहींएक पदार्थाचा जो सरण्याचा व्यापार तें·

**निसरणें**, बुळबुळीत, किं॰ गुळगुळीत असा जो जमीन इ॰ कांचा प्रदेश त्यावर पाय इ॰ पदार्थ ठेविला असतां तेथें न ठरतां पलीकडे सरणें·

**निसरसांड**, स्त्री॰ अवश्य पालनीय, किं॰ अवश्य श्रोतव्य, किं॰ अवश्यं कर्तव्य अशा तऱ्हेचे जे पदार्थ त्यांवर अभीति, गर्व, इ॰ कांमुळें उपेक्षात्मक बुद्धि ठेवण्याचा जो प्रकार ती; उ॰ तूं मोठा संपत्तिमान झाल्यास म्हणून काय आईची निसरसांड करावी; हें वर्तमान चित्त देऊन ऐका याची केवळ निसरसांड करूं नका; तो पढण्याविषयीं निसरसांड करूं लागला·

**निसवणी**, स्त्री॰ धान्य निसवण्याचा जो व्यापार ती·

**निसवणें**, धान्यादिकानीं आपलें कणीस बाहेर टाकणें; २, ला॰ चोरी, छिनाळी, इ॰ दुष्कर्मांविषयीं निर्लज्ज होणें; म्ह॰ उसवल्याला दोरा घालतां येतो परंतु निसवल्याचें काय होणार·

**निसवील**, स्त्री॰ निसवणी·

**निसळ**, अ० निरवळ.

**निसांठा**, पु० संग्रहीत पदार्थांचा जो झाडा तो.

**निःसार**, ३ लिं० सं० निःसत्व.

**निःसारण**, न० सं० बाहेर टाकण्याचा जो व्यापार तें.

**निःसारित**, ३ लिं० सं० निःसारण केलें ज्याचें तो.

**निःसाक्षिक**, ३ लिं० सं० ज्यास साक्षी नाहीं असा जो व्यवहार इ० तो.

**निःसीम**, ३ लिं० सं० सीमेचा पलीकडेस गेलाहे ज्याला असा जो विद्यादिगुण तो; उ० याची विद्या निःसीम आहे; याची सोदगिरी निःसीम आहे, २, तत्तद्गुणविशिष्ट जो तो; उ० तो निःसीम विद्वान आहे; तो निःसीम चोर आहे.

**निसूक**, **निसूग**, ३ लिं० ग्रा० अ० ज्या प्रेरणेनें गोळी इ० प्रवृत्त झाली त्या प्रेरणेच्या बलाच्या व्याघात कांहींएक न होतां, लाग, मार, इ० धा० वि० उ० निसूक गोळी लागली; २, ग्रा० दे० कोडगा; म्ह० निसक्या माणसाला लाज नाहीं कालचें बोललें आज नाहीं.

**निसूर**, ३ लिं० कांहींएक काळजींतून मुक्त झाला तो; २, लोकशास्त्राची मर्यादा सोडून निर्लज्ज झाला तो.

**निःसृत**, ३ लिं० सं० कांहीं एका पदार्थांतून बाहेर निघाला तो.

**निसोत्तर**, न० निशोत्तर.

**निस्तरणें**, **निस्तारणें**, कांहींएक आरब्ध जें कार्य त्याचा परिणाम वाईट होऊं लागला असतां श्रम करून तें तडीस नेणें, किं० चांगलें होईं असें करणें; २, कांहींएक केलीं जीं दुष्कर्में तत्संबंधानें होणार जें वाईट फल तें भोगून त्याची निष्कृति करणें; उ० हें तूं व्यभिचाररूप कर्म करितोस परंतु निस्तरायास तूं नरकांत जाशील.

**निस्ता**, ३ लिं० साहित्यभूत इतर पदार्थ रहित. किं० विवक्षित इतर पदार्थ रहित जो तो; परंतु असा जो पदार्थ तो तत्कार्यी असमर्थ असतो; उ० निस्ता भात कसा जेवूं.

**निस्तुक**, ३ लिं० कांहींएक गुणानें विशिष्ट जो पदार्थ त्याचें तदतिरिक्त गुणरहितत्वें करून, किं० कांहींएक पदार्थाचें. किं० कांहींएक व्यवहाराचें अभावत्वें करून, किं० दुष्ट गुणातिशयत्वें करून कथन कर्तव्य असतां त्या त्या पदार्थाचें, किं० त्या त्या व्यापाराचें वि०; उ० तो निस्तुक वैदिक आहे; त्याजवळ निस्तुक पैसा नाहीं; तो निस्तुक सोदा आहे.

**निस्तुष**, ३ लिं० सं० ज्यावरला कोंडा निःशेष गेला असें जें धान्यादिक तो.

**निस्तेज**, ३ लिं० तेजोहीन.

**निस्तोष**, अ० निःशेष होईं असें, संप, हो, जा, इ० धा० वि०.

**निस्पृह**, ३ लिं० सं० निरिच्छ; २, इतर संबंधानाकांत असा; उ० आमचें बिह्राड निस्पृह आहे.

**निस्वन**, पु० सं० मेघादिकांचा नादरूप जो शब्द तो; उ० मेघाचा निस्वन होऊं लागला म्ह० मोरें नृत्य करूं लागतात.

**निळा**, पु० एक रंग आहे; २, तद्विशिष्ट वस्त्रादि तो

तो; ३, पांढऱ्या घोड्यासही म्ह०.

**निःक्षत्र**, न० सं० क्षत्रिय राहित्य.

**निःक्षत्रिय**, ३ लिं० सं० क्षत्रिय रहित तो: उ० परशुरामानें निःक्षत्रिय पृथ्वी केली.

**निक्षूण**, अ० सांगणें, बोलणें, इ० कांपासून तद्विपरितार्थ संभावना व्हावया जोग्या स्थलीं तो पुनः न होई असें स्वरूप सांगणें, बोलणें, इ० धा० वि०.

**निक्षेप**, पु० सं० कांहीं एक अधिकरणाहून करून जो त्याग तो; २, जमीनींत ठेवलेलें द्रव्य, किं० दुसऱ्या पाशीं ठेवलेलें जें द्रव्य तें.

**नीच**, ३ लिं० आकृति, किं० गुण, किं० जाति, किं० किंमत, इ० कांनीं जो विवक्षिता पेक्षां कमी तो; उ० या झाडापेक्षां तें झाड नीच आहे; हें मगरमापेक्षां अनंतभैरव नीच आहे; या शालजोडीपेक्षां ती शालजोडी नीच आहे; २, अधम जो मनुष्य तो; उ० नीचाची संगत करूं नये; हा विणा नीच आहे, पखवाज नीच आहे इ० स्थलीं त्याचा सूर नीच आहे असा अर्थ.

**नीच**, ३ लिं० नीच; २, जा जा ग्रहाचें जें जें उच्च स्थान सांगितलें आहे त्या स्थानापासून जें सातवें स्थान तें; ३, त्या स्थानावरचा जो ग्रह तो; नीचाश्रय नीचसेवा इ० समास आणावे.

**नीचा**, ३ लिं० नीच.

**नीज**, स्त्री० निद्रा.

**नीट**, ३ लिं० वक्र प्रतियोगी; उ० रानांत जाऊन नीट लांकूड आण; २, यथायोग्य; उ० याचें बोलणें नीट आहे; ही खुरशी नीट आहे; नीट जाणें, स० वांकडा तिकडा न होतां, किं० कोठें न गुंततां जाणें; त्याणें आपल्या शिष्यास भला नीट केला; स० त्यास ठोकून आंतील वक्रता काढिली असा अर्थ.

**नीटनेटका**, ३ लिं० जितक्यास जितका यथायोग्य सुशोभित दिसावयाजोगा तो.

**नीत**, स्त्री० अमुकानें अमुक तऱ्हेनें चालावें अशी शास्त्रांत लिहिली आहे, किं० लोकसिद्ध जी रीति ती.

**नीति**, स्त्री० नीत.

**नीतिशास्त्र**, न० नीतिप्रतिपादक जें शास्त्र तें.

**नीम**, पु० सं० पिशाचादिकास नियमानें द्यावयाचें द्रव्य जें तें; उ० यंदां त्या पिशाचाचा नीम द्यावयाचा राहिला म्हणून तुह्मास उपद्रव होतो; सांडणें, देणें त्याचा योगीं स०.

**नीध**, स्त्री० निधि; २, बाहेर विशेष डौल न दिसतां अनेक सद्गुण जामध्यें आहेत त्याचा स्तव कर्तव्य असतां ती; उ० ही गाय आह्मास मोठी नीध सांपडली.

**नीर**, न० उदक; २, पंचाईत इ० कांनीं जो द्रव्यदंड तें.

**नीरक्त**, ३ लिं० सं० रक्त रहित जें शरीरादिक तें.

**नीरस**, ३ लिं० सं० रसरहित जो तो.

**नीराजन**, न० सं० आरति ओवाळण्याचा व्यापार २, निरंजन पर्यायार्थी.

**नीरोग**, ३ लिं० सं० निरोग.

**नील**, पु० सं० वर्ण आहे; २, तद्विशिष्ट तो; ३, एक माणिकांत भेद आहे.

**नीलकंठ**, पु० सं० महादेव.

**नीलकमल**, न० सं० नीलवर्ण जें कमल तें.

नीलिमा, पु० सं० स्त्री० निळेपणा.

नीली, स्त्री० सं० एक वर्ण विशेष आहे.

नीव, पु० वृक्ष आहे; २, न० त्याचें फल तें; ३, न० कों० पु० ग० यर इ० कांचें पारवें.

नीस, ३ लिं० निस्तुष.

नीळ, ३ लिं० नील; २, स्त्री० दे० नीलवर्ण ज्यापासून उत्पन्न होतो असें एक झाड आहे; ३, पु० वानरांत एक जाति आहे; निळीचा रंग नासला असतां खोटी बातमी उठवावी, म्० रंग चांगला होतो अशी प्रसिद्धि त्याजवरून एखादे बातमीच्या खोटेपणा वर्णाचाच असतां नीळ रांपली आहे, रांपविली आहे, नासली आहे, ग० नीळ रांप झाला आहे, असे प्रयोग करितात, एथें त्या खोटे बातमीसच नीळ म्०.

नुकसान, न० نقصان हिं० व्यवहार इ० कांमध्यें तोटा येतो, किं० जिन्नस इ० कांचा नाश होतो तें.

नुकसानी, स्त्री० نقصانی हिं० नुकसान.

नुक्ता, अ० निगता; २, रसभंगित चमत्कारिक असें जें थोडके भाषणाचा, किं० गायनाचा अंश तो.

नुनू, स्त्री० मुलांचे भाषणांत निद्रेचें नाव.

नुमजणें, ग्रं० नउमजणें.

नुरणें, ग्रं० नउरणें.

नुरी, स्त्री० एक पक्षी आहे.

नुस्ता, ३ लिं० निस्ता.

नुस्था, ३ लिं० नुस्ता.

नूतन, ३ लिं० नवीन.

नूर, पु० शरीरावरील जो तेजो विशेष तो.

नृत्य, न० सं० नाचण्याचा व्यापार तें.

नृप, पु० सं० राजा.

नृपति, पु० सं० राजा.

नृपाळ, पु० सं० राजा

नृपासन, न० सं० राजाचें आसन.

नृसिंह, पु० सं० नरसिंह.

नेऊर, न० घोड्याचे पाऊलासवर जी गांठ असती जावर लांब लांब केश असतात तें.

नेक, स्त्री० जाजा व्यवहारांत, किं० जाशीं जाशीं जाजा संप्रदायानें चालायाचें त्यांत छक्का पंज्जा न करितां त्या त्या संप्रदायानें चालण्याचा जो प्रकार ती; उ० अल्प हेतू स्तव कोणी आपली नेक सोडीत नाहीं.

नेचा, पु० जा गुरगुडीस लांब वेटाळ्याची नळी असती तो.

नेट, पु० न० लोटणें, ओझें उचलणें, इत्याद्यर्थ सर्व शरीरांतील जें बळ तें एकत्र झालें तो; उ० मनुष्यानें कितीही नेट केला तरीं काय पर्वत लोटेल; २, कांहींएक वस्तूचा कांहींएक पदार्थावर जो भार तो; उ० या तुळईवर नेट पडला म्हणून वांकली; ३, ला० कांहींएक कार्य करण्याविषयीं जो तगादा तो; उ० माझे पाठीशीं रुपया विषयीं सावकाराचा फार नेट लागला आहे; ४, कांहींएक कार्य करण्या विषयीं जो बुद्धीचा दृढनिश्चय तो; उ० नेट दिल्यावांचून पंचाईत शेवटास आणार नाहीं.

नेटका, ३ लिं० जितक्याप्रमाणे तितका चांगला दिसाया जोगा यथायोग्य तो.

नेटणें, नेटानें कांहींएक पदार्थ पलीकडे ढकलणें; २, कांहींएक कार्य, किं० मनुष्यादि समुदाय अ-

पधी जवळ येऊन ठेपणें, उ० लग्न उद्यांवर येऊन-नेटलें तथापि कशास अद्यापि ठिकाण नाहीं; शत्रु किल्याशी नेटला मग उपाय काय.

**नेटवा**, पु० धिरा.

**नेडें, नेदें**, न० सुई, दाभण, कुदळी, कुह्राड, इ० कांस दोरा, दांडा, अडकवायासाठीं छिद्र करितात तें.

**नेण**, ३ लिं० रा० जास ज्ञान आलें नाहीं तें अर्भक.

**नेणणें**, नजाणणें.

**नेणता**, ३ लिं० नेण.

**नेणीव**, स्त्री० ग्रं० ज्ञानाच्या अभावती.

**नेणें**, आपणास विवक्षित जो देश त्या देशाप्रति कांहींएक वस्तु घेऊन आणें, स्म० जाचें त्याणें नेलें-पायां पडणें वांयां गेलें; २, ग्रं० नजाणणें.

**नेत**, स्त्री० नेक.

**नेत्र**, पु० न० सं० डोळा.

**नेत्रकटाक्ष**, पु० सं० वक्रदृष्टीनें पाहाण्याचा जो प्रकार तो.

**नेत्रकमल**, न० कमला सारखें जें नेत्र तें.

**नेत्रकोरान्न**, न० कों० कांहींएक चमत्कारीक वस्तु नेत्रानें पाहून संतोष मानण्याचा जो प्रकार तें.

**नेत्रपल्लवी**, स्त्री० नेत्राचे संकेताची एक भाषा आहे.

**नेत्रसंकेत**, पु० सं० नेत्रानें खूण करितात तो.

**नेपटी**, स्त्री० रा० वेळूची जी फटाकफळी ती.

**नेपती**, स्त्री० झाड आहे.

**नेपतें**, न० नेपतीचें फळ.

**नेपथ्य**, न० सं० भूषण; २, नाटकादिचें ठायीं पडदा धरितात त्याचें आंतील प्रदेश तें.

**नेफा**, पु० दे० चोळणा इ० कांचा जो नाडी घालायाचा प्रदेश तो.

**नेभळा**, ३ लिं० ज्याचें शरीर पुष्ट असून पोकळ तो. व त्याचें शरीर व त्याणें धरिलें अस्ताव्यस्त पणें वस्त्र भूषणादिक, किं० त्याचा तसा कारभार इ० तो.

**नेम**, पु० नियम; २, न० स्तंभादि पुरायाकरितां जो खळगा करितात तें, स्म० वांकडे मेढीस वांकडेच नेम करावें लागतें; ३, बाणादिक मारण्याचें जें लक्ष्य तें.

**नेमका**, अ० लक्ष्यानुसंधान न चुकायाजोगा मग कपणें, ये, जा, इ० धा० वि०.

**नेमणूक**, स्त्री० सर्कार, इ० चाकर इ० लोकांस वेतनाचा नियम करून देतात ती, उ० आह्मा-ला चारशें रुपये नेमणूक झाली आहे; २, जा० एकाद्याकडे एखाद्याची जी नियमानें योजना ती उ० त्या मामलतीवर त्या गृहस्थाची नेमणूक-झाली.

**नेमणें**, कांहींएक कार्य, किं० तत्तत्कार्य कर्ता पुरुषादिक अमुकच कालीं अमुकच देशीं अमुकच तऱ्हेनें निश्चय पूर्वक योजणें; २, रा० खळग्यामध्यें स्तंभादिक पुरणें, उ०. सकाळ पासून शंभर केळी नेमिल्या; ३, बाणादिकें करून लक्ष्य वेधणें

**नेमनिष्ठा**, स्त्री० नियमनिष्ठा.

**नेमवणें**, नेमणें द्वितीयार्थी.

**नेमस्त**, ३ लिं० न्यूनाधिक भावरहित, उ० हा मनुष्य उंच नव्हे, ठेंगणा नव्हे, नेमस्त आहे; तो पंडित

डित नेमस्तच आहे, इ॰ स्थलीं त्यामध्यें विशेष पांडित्य नाहीं; तोवर नेमस्त केला आहे. तीवधू नेमस्त केली आहे; एथें वरत्वें करून वधूत्वें करून नियमयुक्त केला असा अर्थ; याचा प्र॰ विवाहीं कुंकुमपत्रें बोलावण्याकरितां लिहितात त्यांतच उ॰ उद्यां मुलीचें लग्न आहे. अमुकाच्यापुत्र वर नेमस्त केला आहे आपण लग्नास यावें.

**नेव**, स्त्री॰ मत्स्यांत एक जाति आहे.

**नेवरा**, ३लिं॰ अश्वादिकांच्या पांढरा जो खूर तो; २, तद्विशिष्ट घोडा तो.

**नेवाळ**, स्त्री॰ एक पुष्प वल्ली आहे.

**नेवाळी**, स्त्री॰ नेवाळ.

**नेवाळें**, न॰ नेवाळीचें पुष्प तें.

**नेष्ट**, ३लिं॰ अनिष्ट, प्रा॰ आदित्यादि ग्रह वृत्ति.

**नेसण**, न॰ गुह्यावयव गोपनार्थ जें कटिसंबद्ध वस्त्र करितात तें; २, नेसण्याचा जो व्यापार तें; उ॰ इचें नेसण होईल तेव्हां पाणी देईल.

**नेसणें**, गुह्यावयव गोपनार्थ वस्त्र कटिसंबद्ध करणें; २, न॰ नेसायाचें जें वस्त्र तें; मुसळनेसणें म्ह॰ निर्लज्ज होऊन दुर्भाषण, दुष्कर्म, इ॰ करूं लागणें.

**नेसविणें**, नेसे असें करणें; २, लेखामध्यें कांहीं एक मुख्य कलम, इ॰ वरतें लिहून तत्संबधाकांत कलम इ॰ क्रमेकरून त्या त्या खालीं लिहिणें; उ॰ पर अमुक कलम त्याहा त्या खालीं हीं कलमें नेसवा; ३, रा॰ अमुक पदार्थानें अमुक देश व्यापावा असा जो संकेतसिद्ध अमुक पदार्थ तो तितका न मिळाल्यामुळें अल्प पदार्थानेंच त्या देशाचे अवयव न सोडितां युक्तियुक्तीनें यथाकथंचित् तो देश व्यापे असें करणें; उ॰ घरास हजार गुंड्या शिवायाला लागतात परंतु सालमजकुरीं गुंड्या महाग म्हणून पांचशानींच नेसवून घेतलें.

**नेहेमी**, अ॰ नित्यशः निरंतर, कालवृत्ति; उ॰ तो नेहेमी पढायाला जातो.

**नैय्यायिक**, ३लिं॰ न्यायशास्त्र पढला तो.

**नैवेद्य**, पु॰ देवास भक्षणार्थ अर्पितात जो भक्ष्य पदार्थ तो.

**नैष्ठिक**, ३लिं॰ नियम निष्ठा जास आहे तो.

**नैष्ठिकब्रह्मचर्य**, न॰ मुंज सुटल्या नंतर ब्रह्मचारि धर्मानें राहाण्याचा जो प्रकार तें.

**नैष्ठिकब्रह्मचारी**, ३लिं॰ नैष्ठिक ब्रह्मचर्य आहे जास तो.

**नोक**, स्त्री॰ खुबी; उ॰ त्याचे बालण्यांत नोक आहे, त्याचे पाहाण्यांत नोक आहे; २, चुणूक; उ॰ बरें आजच्या दिवस तुम्हीं मौजा करा. इतकी नोक मारून गेला; ३, भाल्यादिकाची जी अणी ती.

**नोकदार**, ३लिं॰ खुबीदार.

**नोकझोंक**, स्त्री॰ पु॰ नोक इ॰ हावभाव ती तो.

**नोकानोकी**, स्त्री॰ परस्परांचा मनांतील परस्परास समजण्या विषयीं प्रयोजक जो परस्परांचा वक्र भाषण प्रकार, किं॰ नेत्रकटाक्ष संकेत प्रकारती.

**नोकीचा**, ३लिं॰ नोकदार.

**नोडगा, नोड्या**, ३लिं॰ मुसलमानाची निंदा कर्तव्य असतां

असतां त्यास म्ह०.

**नौंदणें**, सराफाचे दुकानीं हुंडी लावायास नेली असतां तिची नक्कल करून ठेवणें.

**नौर**, पु० गलबतास जें भाडें पडतें तो.

**नौरी**, ३ लिं० भाडें करून केलें जें गलबत इ० तो.

**नौवरा**, पु० ग्रं० नवरा.

**नौवरी**, स्त्री० ग्रं० नवरी.

**नौका**, स्त्री० जलयान.

**न्यग्रोध**, पु० सं० वड म्हणून झाड आहे.

**न्यात**. स्त्री० ज्ञातिशब्दाचा अपभ्रंश.

**न्याय**, पु० इनसाफ; २, नीति; उ० न्यायानें जो वर्ततो त्यास भय नाहीं; ३, एक शास्त्र आहे; ४, दृष्टांतास जी उपयोगी सर्वजन प्रसिद्ध गोष्ट तो; उ० सशाचा पारधीस जावें परंतु वाघाचें सामान बाळगावें हा न्याय.

**न्यायाधिशी**, स्त्री० न्यायाधीशाचें जें कर्म, किं० अधिकार तो.

**न्यायाधीश**, पु० इनसाफ मनास आणायासाठीं जो अधिकारी करून ठेवितात तो.

**न्याय्य**, ३ लिं० न्याय संमत जी गोष्ट इ० तो.

**न्यारा**, ३ लिं० निराळा.

**न्याव**, पु० ग्रं० न्याय प्रथम द्वितीयार्थी.

**न्यास**, पु० गणितामध्यें गुणाकार भागाकार करायाचा असतां ते ते अंक मांडण्याचा जो व्यापार तो; २, बाणादिकावर मंत्रादिकें करून जें देवतास्थापन तो; उ० त्या बाणावर देवताचा न्यास करून बाण सोडिला.

**न्याहार**, ३ लिं० गुळगुळीत, साफ, चमत्कारिक जो पदार्थ तो.

**न्याहारणें**, पदार्थ न्याहार होई असें करणें.

**न्याहारी**, स्त्री० प्रातःकाळीं क्षुधा बहुत असतां स्वल्प भोजन करण्याचा जो प्रकार तो; २, स्वल्प भोजनासही म्ह०.

**न्याहाल**, ३ लिं० संपत्ति इ० कानीं जो वृद्धिंगत तो; उ० त्याणें त्याला न्याहाल केला; तो न्याहाल झाला; या० इतकेच प्रयोग दिसतात; तुसी न्याहाल पाहाल एथें नि धावा पाहाल असा अर्थ.

**न्याहाली**, स्त्री० वस्त्रामध्यें कापूस इ० घालून अंगरखाली घालाया करितां करितात ती.

**न्याहाळणें**, सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन करणें; उ० त्याचे डोळ्यावर चाळिशी आली त्यामुळें त्यास अक्षर न्याहाळत नाहीं. म्ह० दिसत नाहीं.

**न्यून**, ३ लिं० कमी; उ० झारेकऱ्याचे कसबापेक्षां सोनाराचें कसब न्यून; न्यून पडणें म्ह० कांहीं एक व्यापारांत वैगुण्य पडणें.

**न्यूनाधिक**, ३ लिं० उणें अधिक; उ० मी बोलतों यांत न्यूनाधिक असेल तें काढा.

**न्हाऊ**, ३ लिं० न्हावी; म्ह० माणसांत न्हाऊ आणि पक्ष्यांत काऊ.

**न्हाण**, न० नाहाण.

**न्हाणघर**, न० नाहाणघर.

**न्हाणी**, स्त्री० नाहाणी.

**न्हाणुली**, स्त्री० नाहाणुली.

**न्हाणें**. नाहाणें. म्ह० बहू न्हाली झाली आणि बापा शिंपला गेला.

**न्हाणोली**, स्त्री० नाहाणुली.

न्हातीधुती. स्त्री॰ नाहातीधुती॰
न्हावगंड. पु॰ नाहावगंड॰

न्हावी

न्हावी. ३ लिं॰ नाहावी: २. दे॰ एक किडा आहे. जो बाबळी इ॰ कांचे कांट्यां॰ घर करीत असतो तो॰

